# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## प्रस्तावनाखंड.



### विभाग पहिला.

### हिंदुस्थान आणि जग.

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर, एम्. ए., पीएच्. डी.

यांनीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.

१९२०.

मुद्रक—रामचंद्र येसु शेडगे, निर्णयसागर प्रेस, २३ कोलभाट लेन, मुंबई.

प्रकाशक—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फे श्रीधर व्यंकटेश केतकर, ४८१ शनिवार पेठ, पुणें.

# ग्रंथालोक. 



## चित्रें.



ज्ञानकोशकारांवर रूपक







महाभारतरूपी ज्ञानकोशाच्या प्रसाराची पद्धति

Lakshmi Art, Bombay, No. 8



शिवपार्वतीसंवाद उर्फ अनेक विद्यांचा उगम.







दण्डकारण्यीं राम आणि सीता उर्फ महाराष्ट्रांतील संस्कृतीस प्रारंभ.




## प्रस्तावनाखंड.

### ग्रंथप्रवेश.

ज्ञानकोशांतील अनेक विषयांकडे लक्ष गेलें तरच ज्ञानकोशाचा उपयोग होणार. अनेक विषयांसंबंधानें जिज्ञासा उत्पन्न होण्यास वाचकांस अगोदर विविध माहिती असावी लागते. जर जिज्ञासा नसेल तर ज्ञानकोशाचा बराचसा भाग उपयोगांतच येणार नाहीं. आज अशी स्थिति आहे कीं, आपल्या देशांतील सामान्यतः सुशिक्षित समजला जाणारा वर्ग अर्वाचीन संस्कृतीच्या अनेक अंगांपासून दूर आहे एवढेंच नव्हे, तर भारतविषयक इतिहास, शास्त्र, कला, वाङ्मय, यांची सामान्य माहितीहि त्यास नाहीं. मंत्रद्रष्टे ऋषी, श्रौतधर्मांचे संस्थापक, संशयनिर्णायक ब्रह्मवादी आणि रहस्यांचे वक्ते, तसेच स्मार्तधर्मांचे आचार्य यांची सामान्य माहिती देखील सुशिक्षित वर्गास नाहीं. निरनिराळ्या मतांचे, संप्रदायांचे व दर्शनांचे संस्थापक व प्रवक्ते, तसेंच वैद्यक, रसायन इत्यादि भौतिक शास्त्रांचे प्रवर्तक, धर्मशास्त्र व नीति अथवा अर्थशास्त्र यांचे आचार्य, वेदांगांचे प्रणेते या उत्तरकालीन भारतीय थोर पुरुषांचीं नांवें काय तीं थोडींबहुत परिचित असतील. काव्यनाटकादि ललितवाङ्मयाच्या इतिहासांतील प्रसिद्ध पुरुषांची माहिती आजच्या सुशिक्षितांस सामान्यतः बरी आहे, पण गीतनृत्यनाट्यादि कलांच्या शास्त्रीय नियमांच्या संशोधकांची माहिती त्यांस कितपत आहे? अनेक प्रकारच्या पुरुषांच्या व स्त्रियांच्या कर्तृत्वानें भारतीय संस्कृतीचा इतिहास जगतास भूषणभूत झाला आहे. या सर्व प्रकारच्या पुरुषांच्या व स्त्रियांच्या नांवांची सामान्य कल्पना ज्यास असेल तो तें तें नांव उघडून पाहून अधिक माहिती मिळवील. तथापि ज्यास मुळांत नांवच परिचित नाहीं, त्यास जिज्ञासा तरी कोठून होणार? वाचकवर्गाचें जिज्ञासाक्षेत्र जितकें विस्तृत असेल त्या मानानें त्याला ग्रंथोपयोग करावासा वाटणार. यासाठीं त्याचें जिज्ञासाक्षेत्र मोठें केलें पाहिजे. ज्ञानप्रसाराच्या प्रयत्नांत जिज्ञासावृद्धि हें प्रथम कार्य होय.

आर्यसंस्कृतीचीं अनेक अंगें व त्यांचा इतिहास हे विषय सामान्य विद्यासंस्काराच्या क्षेत्रांत येण्याजोगे आहेत. तथापि आजच्या आयुष्यास अत्यंत अवश्य असें ज्ञान हें नव्हे. आजला अत्यंत अवश्य ज्ञान म्हणजे शास्त्रीय होय. पण त्या ज्ञानाविषयीं देखील समाजांत आस्था नाहीं. याचें कारण मनुष्याचे हितसंबंध प्रत्येक शास्त्राच्या ज्ञानांत अडकले आहेत याची लोकांस कल्पना नाहीं. विवक्षित ज्ञानाविषयीं आस्था उत्पन्न होण्यास त्या ज्ञानांचा मनुष्य-हिताशीं असलेला संबंध लक्षांत यावा लागतो. जेव्हां कोर्टांत एखादा प्रश्न येतो, तेव्हां तो सोडविण्यासाठीं हजारों रुपये खर्च करण्यास मनुष्य तयार होतो; तथापि केवळ त्या प्रश्नाचा खल व्हावा म्हणून एक पै देण्यासहि तो मनुष्य तयार होणार नाहीं. एखाद्या शास्त्रीय शोधाचा पैसे उत्पन्न करण्यास उपयोग होत असेल तर त्या शोधासाठीं पैसे खर्च करण्यास लोक पुढें येतात; तथापि केवळ शास्त्रीय शोधासाठीं पैसे द्यावयास लोकांची नाखुषीच असणार. शास्त्रीय शोध देशांत अधिकाधिक शक्य होण्यास सर्वसामान्य शास्त्रीय ज्ञान देशांत अधिक असलें पाहिजे आणि संशोधक वर्गहि तयार असला पाहिजे, पण शास्त्रीय शोध व्हावा अशी जेव्हां सरकारची किंवा शास्त्रीय शोधांवर पैसे मिळवूं इच्छिणाऱ्या भांडवलवाल्यांची इच्छा होते तेव्हांच शास्त्रीय शोधांस उत्तेजन मिळतें. ज्ञानाचें स्तोत्र गाऊन जें काम होणार नाहीं तें काम पैसेवाल्याचा द्रव्यलोभ अधिक सुशिक्षित केल्यानें होतें.

ज्ञानकोशाचा उद्देश महाराष्ट्रीयांस अनेक शास्त्रांचें ज्ञान करून देण्याचा आहे. प्रस्तावनाखंडाचे उद्देश दोन आहेत. एक उद्देश जें ज्ञान गोष्टीच्या रूपानें मांडणें अधिक चांगलें तें त्या रूपांत मांडणें हा आहे, व दुसरा उद्देश प्रत्येक शास्त्राविषयीं जिज्ञासा उत्पन्न करून देण्यांचा आहे. भारतीयांचें जगांत स्थान, त्यांचें पूर्वीचें कार्य आणि भावी कार्य हा प्रस्तुत विभागाचा विषय आहे; आणि या स्थानाची व कार्याची व्यापक कल्पना येण्यासाठीं भारतीय संस्कृतीचा प्राचीन प्रसार बराच सविस्तर वर्णिला आहे; तसेंच परकीय संस्कृतीपासून भारतीयांनीं काय घेतलें हेंहि स्पष्ट दिलें आहे.

भारतीय संस्कृतीवर परक्यांचे जे परिणाम झाले त्यांत इराणी लोकांच्या संस्कृतीचे काय परिणाम झाले याचें विवेचन या भागांत आम्हीं फारसें केलेलें नाहीं. डॉ. स्पूनर यांनीं चंद्रगुप्त मौर्य आणि चाणक्य यांसहि इराणी

ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. इराणी परिणाम मोठा होता अशा अर्थाचीं विधानें अनेक आहेत. हीं विधानें करणारे असें गृहीत धरतात कीं या देशांत मगानुयायी लोक बऱ्याच उत्तरकालीं आले असावेत. पण ऋग्वेदाच्या मंत्ररचनाकालींच म्हणजे इराणी संस्कृतीच्या प्रारंभापूर्वींच बरेच मगानुयायी लोक भारतीयांत समाविष्ट झाले होते असा पुष्कळ पुरावा वेदांतच सांपडतो. यामुळें पर्शु, शक आणि मगानुयायी लोक यांच्या कार्याचें श्रेय इराणास देतां येईल किंवा नाहीं याचा वानवाच आहे. या प्रश्नाविषयींचें विवेचन विशिष्ट कालांचा इतिहास लिहितांना करतां येईल.

भारतीय व इतर संस्कृतींच्या युद्धाची व्यापक कल्पना देऊन मग भारतीयांस स्वकीय भवितव्याच्या नियमनास अवश्य असलेलें समाजशास्त्र आणि शासनशास्त्र व अल्पांशानें अर्थशास्त्र दिलें आहे.

हिंदु व हिंदुस्थान यांच्या हिताहिताशीं ज्यांचा संबंध येतो अशा अनेक गोष्टी व वरील तीन शास्त्रांत ज्यांचा समावेश होईल असे अनेक नियम व कार्यपरंपरा यांचा ऊहापोह या ग्रंथांत केला आहे. भारतीय समाजशास्त्राचें बरेंच आणि शासनशास्त्र व अर्थशास्त्र यांचें मूलतत्त्वविषयक विवेचन यांत येऊन गेलें आहे. हा भाग आपले जगांतील इतर मनुष्यसमूहांशीं काय संबंध आहेत हें स्पष्ट करील.

देशामध्यें ज्ञानसंवर्धनार्थ ज्या संस्था आहेत त्यांत युनिव्हर्सिट्या प्रमुख होत. मुंबई, मद्रास, कलकत्ता, अलाहाबाद आणि पंजाब हीं पांच विद्यापीठें जुनीं आहेत. गेल्या दहा वर्षांत कांहीं नवीन पीठें तयार झालीं. विहारला पाटणा युनिव्हर्सिटी मिळाली. म्हैसूरसारख्या संस्थानानेंहि आपली युनिव्हर्सिटी केली आहे आणि रंगूनलाहि युनिव्हर्सिटी मिळाली आहे. नागपूरची युनिव्हर्सिटी स्थापन होण्याच्या बेतांत आहे. येणेंप्रमाणें ठरींव शिक्षणाचा विस्तार झाला आहे. तथापि विद्यासंवर्धनाचें काम चांगलेंसें सुरू झालेलें नाहीं. सध्यांच्या विद्यापीठांतील मुख्य दोष म्हटला म्हणजे ग्रंथशालांचा अभाव होय. दुसरा दोष म्हटला म्हणजे विद्यापीठें ज्या कॉलेजांमार्फत शिक्षण देतात त्या कॉलेजांतील प्रोफेसरांनां पगार इतका थोडका मिळतो कीं, त्या पगारांत या संस्थांत काम करण्यास चांगलीं माणसें मिळावयाचींच नाहींत.

ज्ञानप्रगतीसाठीं ज्या खटपटी होत आहेत त्यांत शिक्षणखात्यावरील लोकसत्ता वाढविणें, आणि लोकांनीं स्वतंत्रपणें शिक्षणसंस्था चालविणें व शिक्षणपद्धति ठरविणें हे दोनहि प्रकार आहेत. आपल्या देशांतील प्रजेस जे नवीन अधिकार मिळाले आहेत त्यांत कांहीं मंत्री प्रत्यक्ष लोकांच्या प्रतिनिधींस जबाबदार केले आहेत व कांहीं खातीं या जबाबदार मंत्र्यांच्या हवालीं केलीं आहेत. त्यांत शिक्षण लोकांच्या हातीं दिलें आहे. या फरकामुळें शिक्षणविषयक विचाराला जोर मिळेल अशी अपेक्षा आहे. असहकारितेच्या तत्त्वामुळें कांहीं विद्यार्थी शाळा सोडीत आहेत आणि अशा विद्यार्थ्यांसाठीं "टिळक महाविद्यालय" पुण्यास स्थापन झालें आहे. केवळ स्वतंत्र बुद्धीनें शिक्षणाची पद्धति ठरविण्याचा हा प्रयत्न आहे. संस्था जितकी अधिक स्वतंत्र तितकी ती नवीन प्रयोग करण्यास मोकळी असते. अशा संस्थांमध्यें प्रयोग होऊन जो अनुभव उत्पन्न होतो तो सर्व राष्ट्रास उपयोगीं पडतो. खासगी शाळा, हिंदु युनिव्हर्सिटीसारख्या युनिव्हर्सिट्या, कर्वे यांची स्त्रियांकरितां स्थापन झालेली युनिव्हर्सिटी आणि नवीन स्थापन झालेलें टिळक महाविद्यालय यांसारख्या संस्था आपली बुद्धि स्वतंत्र ठेवून परकीय तंत्रानें कमी कमी चालतील, आणि स्वतः प्रयोग करून शिक्षणसंस्थांमध्यें नवीनपणा आणतील व देशांतील जुन्या शिक्षणसंस्थांत इष्ट फेरफार अनुभवानें सुचवितील.

हें सर्व खरें. पण योग्य शिक्षण द्यावयासाठीं शिक्षणास योग्य असें वाङ्मय पाहिजे. लोकांस काय सांगावयाचें तें सांगण्यासाठीं सांगावयाची माहिती गोळा झाली पाहिजे. ज्ञान स्वभाषेमार्फत लोकांस द्यावयाचें तर त्या भाषेंत तें व्यक्त करण्याची संवय झाली पाहिजे. स्वभाषागौरवाचा प्रयत्न झाला पाहिजे. देशांत स्वत्वस्थापनासाठीं जे प्रयत्न होत आहेत त्यांत स्वभाषागौरवाचा प्रयत्न विशेष महत्त्वाचा होय. स्वभाषागौरवाचे जे अनेक प्रयत्न लेखक करीत आहेत त्यांतील एक प्रयत्न ज्ञानकोशरचना हा होय.

ज्ञानकोश म्हणजे अत्यंत व्यापक वाङ्मय होय. यानें भाषा तयार व्हावयाची, आणि प्रगमनशील जग आणि अप्रगत महाराष्ट्र यांतील बौद्धिक अंतर कमी व्हावयाचें, या प्रकारच्या अनेक अपेक्षा प्रस्तुत ग्रंथासंबंधाच्या आहेत. अपेक्षा लक्षांत ठेवून ग्रंथ बनविण्याची जबाबदारी ज्यांच्यावर पडते त्यांच्या मनांत "आपल्या हातून या अपेक्षा कितपत सफल होत आहेत" हा विचार येतो. हा विचार प्रस्तावनाखंडाचा हा पहिला विभाग महाराष्ट्रीय वाचकांपुढें ठेवीत असतां आमच्या मनांत एकसारखा घोळत आहे.

हा विभाग तयार करतांना ज्यांचें पुष्कळ साहाय्य झालें त्यांत रा. यशवंत रामकृष्ण दाते, रा. पांडुरंग महादेव बापट आणि सौ० शीलवती केतकर यांचा विशेष उल्लेख केला पाहिजे.



श्रीधर व्यंकटेश केतकर.

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## प्रस्तावनाखंड–विभाग पहिला.

### हिंदुस्थान आणि जग.

### ग्रंथसंगति.

प्रकरण १ लें. जगांतील स्पर्धा.—अभिमान प्रदेशविषयक असावा कीं जातिविषयक असावा. जगाशीं (१) राजकीय (२) सामाजिक (३) व्यापारविषयक (४) सांस्कृतिक आणि पारमार्थिक संबंध. पृ. ४१–४७.

### हिंदुस्थान आणि जग. राजकीय संबंध.

प्रकरण २ रें. राष्ट्रसंघ आणि हिंदुस्थानविषयक राजकारण.—आपला जगाशीं मुख्य संबंध ब्रिटिश साम्राज्यामार्फत आहे. तथापि हिंदुस्थानास जगाशीं सहकार्य आतां प्रत्यक्ष म्हणजे राष्ट्रसंघामार्फत करतां येईल. जगांत राष्ट्रसंघाची कल्पना आणि स्वयंनिर्णयाची भावना या टिकण्याकरतां आल्या असून राजकारणास सर्व तऱ्हेनें निराळें स्वरूप मिळण्याचा संभव आहे. जगास एका घटनेखालीं आणण्याच्या प्रयत्नानें मोठे धार्मिक फेरफारहि होतील. जगाच्या राजकारणावर मोठे परिणाम घडविणाऱ्या गोष्टी म्हणजे राष्ट्रसंघ आणि बोलशेव्हिझम् होत. त्या दोहोंचा परिणाम पुष्कळसा एकच होणार आहे. पृ. ४७–७७.

### हिंदुस्थान आणि जग. सामाजिक संबंध.

प्रकरण ३ रें. हिंदु आणि जग.—भारतीय आणि यूरोपीय यांचे पूर्वज एकत्र होते पण जगांतील यहुदी, द्राविड, वगैरे लोकांपासून निराळे होते, अशा केवळ भाषाभेदामुळेंच ज्ञेय अशा कालापासून तर अर्वाचीन यूरोपीय लोकांच्या प्राबल्यापर्यंतचा जो काल आहे, त्या कालांतील घडामोडींचें स्थूल अवलोकन. या घडामोडींचा इतिहास लिहिण्यासाठीं कालविभाग भाषातत्त्वावर पाडतां येण्याजोगे आहेत. या कालाचा अभ्यास करण्यासाठीं कोणतीं शास्त्रें उपयोगीं पडतात त्यांचें अवलोकन. मानववंशशास्त्रदृष्ट्या आजच्या भारतीय रक्ताचे घटक. हिंदुसमाजविवेचन. "हिंदु" या शब्दानें ज्ञेय होणाऱ्या समाजाचें यथार्थ ज्ञान होण्यासाठीं धर्म, संप्रदाय इत्यादींची चर्चा करून भारतीय संस्कृतीच्या वृद्धिसंकोचाचा विचार. पृ. ७७–१०४.

प्रकरण ४ थें. हिंदुस्थान, सिलोन व ब्रह्मदेश.—सिंहलद्वीपाचें भारतीयत्व. प्राचीन आणि अर्वाचीन भारतीयत्वाचें सूक्ष्म ज्ञान व्हावें या हेतूनें सिंहलद्वीपाचा आणि सिंहली भाषा आणि वाङ्मय यांचा इतिहास. आजच्या ब्रह्मदेशाच्या रक्ताचे घटक. ब्रह्मदेशाचें स्वातंत्र्यनाशापूर्वींचें स्वरूप. दोन्ही देशांत भारतीय संबंधाचे दोन थर, प्राचीन व अर्वाचीन. ब्रह्मदेश व सिंहलद्वीप येथें अनेक बाबतींत भारतीयांशीं सदृश व कांहीं बाबतींत भिन्न असा समाज असल्यामुळें जातिभेदविनाश, अनुनयमूलक विवाह इत्यादि भारतीय सामाजिक प्रश्नांवर प्रकाश. पृ. १०५–१६५.

प्रकरण ५ वें. भारतीय संस्कृतीचे पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील परिणाम.—अंदमान बेटांतील भारतीयांची स्थिति. अफगाणिस्तान, ट्रान्सकाकेशिया, सैबिरिया, सोकोत्रा, चिनी तुर्कस्तान इत्यादि प्रांतांत हिंदुत्वाचे अवशेष. इराणांतील अवशेष. बलुचिस्तान, तार्तरी, अबिसीनिया, ज्यूबालँड यांतील भारतीय व्यापाऱ्यांची स्थिति. सुमात्रा, जावा, बोर्निओ, सेलिबिस्, बलि, सयाम, कांबोज (कांबोडिया) इत्यादि प्रदेशांतील भारतीयत्व. संस्कृत

भाषेनें व वाङ्मयानें संस्कारिलेल्या पण भारताबाहेरील अशा पंधरा भाषांची व त्या भाषांनीं ज्ञात होणाऱ्या राष्ट्रांची, विशेषेंकरून कांबोज व अनाम यांची माहिती. पृ. १६५–२०५.

**प्रकरण ६ वें. यावद्वीप संस्कृति.**—जावा व बलि येथील वाङ्मयाचें सविस्तर वर्णन. तेथील महाभारतादि ग्रंथांची आपल्या त्याच ग्रंथांशीं तुलना. तेथील वाङ्मयावरून आणि संस्कृतिस्वरूपावरून त्यांच्या गमनकाला-विषयीं विचार. तेथील राजांचे इतिहास. बलिद्वीपांतील सामाजिक स्थिति. पृ. २०५–२३०.

**प्रकरण ७ वें. हिंदुस्थान, चीन, जपान व तिबेट.**—यांपैकीं प्रत्येक भागावर भारतीय संस्कार पुष्कळ झाला आहे. त्याचें या राष्ट्रांतील कला, वाङ्मय, आचार व विचार लक्षांत घेऊन विवेचन. चिनी भाषेंत ग्रंथ लिहि-णाऱ्या भारतीय पंडितांची यादी. पृ. २३०–२४२.

**प्रकरण ८ वें. पश्चिमेकडे भ्रमण.**—जिप्सी भारतीय आहेत. त्यांचा डोम, वंजारी, आणि जाट या तीन जातींशीं संबंध लावण्याचा प्रयत्न झाला आहे. रमणभाई त्यांचें गुजराथ्यांशीं नातें जोडतात. यांचा यूरोपांत छळ व सध्यांची स्थिति. त्यांच्या भाषांचें पृथक्करण. पृ. २४२–२५६.

**प्रकरण ९ वें. अर्वाचीन परदेशगमन—आफ्रिका व अमेरिका येथील वसाहती.**—आफ्रिका, अमेरिका फिजी इत्यादि प्रदेशांत भारतीयांची स्थिति व तेथें झालेल्या चळवळींचा इतिहास. प्राचीन परदेशगमन आणि अर्वाचीन परदेशगमन यांची सांखळी तुटलेली नाहीं. परदेशीं मजूर पाठविण्याची बंदी. वसाहतींनीं हिंदी मजूर मिळण्यासाठीं केलेल्या नव्या योजना. इंग्लंडांतील हिंदी लोक व विशेषतः विद्यार्थी. चिनी लोकांपेक्षां भारतीय लोक परदेशीं अधिक गेले. पृ. २५६–२९४.

## हिंदुस्थान व हिंदु यांचा जगाशीं सांस्कृतिक व पारमार्थिक संबंध.

**प्रकरण १० वें. हिंदुस्थानाचे बाह्यांवर सांस्कृतिक परिणाम.**—बौद्धसंप्रदाय, शामनिझम्, मणिसंप्रदाय. पाश्चात्त्य जगांत बौद्धसंप्रदायाचा प्रसार, पाश्चात्त्यांचें भारतीय पांडित्य, या बाबतींत भारतीय संस्कृतीची छटा पाश्चात्त्य जगांत दिसून येते. पृ. २९४–२९८.

**प्रकरण ११ वें. बाह्यांचा हिंदुस्थानावर परिणाम.**—हिंदूंचा बाह्यसमाजप्रवेश, अनेक वनस्पतींचा हिंदुस्थानांत बाह्यांमार्फत प्रवेश, परकीय लोकांचीं भारतांत राज्यें, मूर्तिकलेंत परकीयता, ज्योतिष व गणित यांत परकीय गोष्टी. महाकाव्य व नाटक यांत परकीय भाग. परकीय संप्रदाय. परकीय जनतेचें हिंदुस्थानांत महत्त्व. परकीय समाजाचें भारतांतील उच्चस्थान गुणमूलक कितपत आहे? मुसुलमानांची वाढ. पृ. २९८–३३६.

## हिंदुसमाजाचा जगांतील इतर समुच्चयांशीं व समाजांतील निरनिराळ्या अवयवांशीं संबंध व तद्विषयक समाजशास्त्र.

**प्रकरण १२ वें. समाजरूपांतराचे नियम व हिंदुसमाजाचें भवितव्य.**—समाजकेंद्र, समाजवर्धन, समाजविशिष्टत्व, पारतंत्र्य, वैवाहिक पृथक्त्व, लहान समाजाचा मोठ्या समाजांत अंतर्भाव, भाषारक्षण, प्रसरणशील संप्रदाय व राष्ट्रस्वरूपी जाति, इत्यादिकांचीं सामाजिक कार्यें. जातींची घटना आणि विघटना. हिंदु-मुसुलमानांचें ऐक्य होऊन निराळा समाज उत्पन्न होण्याची शक्यता. पृ. ३३७–३४९.

**प्रकरण १३ वें. स्पर्धाक्षेत्राकडे पुन्हां एकदां.**—भारतीय संस्कृति व परकीय संस्कृती यांच्या स्पर्धांचें क्षेत्र व कार्य यांचें सिंहावलोकन. या विस्तृत स्पर्धाक्षेत्राच्या ज्ञानानें आपलें समाजवर्धनविषयक कर्तव्य अधिक व्यापक करतां येईल काय? परदेशांतील भारतीय व देशांतील बाह्य समाज यांविषयीं शक्य कार्यें, (१) सदृश देशांशीं राजकीय संयोग. (२) देश्य भाषा आणि वाङ्मय यांमध्यें संस्कृत भाषाजन्य सादृश्याचा विकास. (३) वैद्यक व ज्योतिष या शास्त्रांच्या अभ्यासकांचें ऐक्य. (४) व्यापारमूलक संबंध वाढविणें. भारतीय समाजाच्या विशिष्ट

---

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश–प्रस्तावनाखंड.

## विभाग पहिला–हिंदुस्थान आणि जग.

## ग्रंथसंक्षेप.

### प्रकरण १ लें.

#### उपोद्घात–जगांतील स्पर्धा.

ज्ञानार्जनाच्या उपहासकांच्या दोन आक्षेपांचें निरसन. ज्ञानकोशांत येणाऱ्या ज्ञानाबद्दल जिज्ञासा उत्पन्न करण्याकरितां प्रस्तावनाखंडांत आपले सामाजिक आणि राजकीय दृष्टीनें जगाशीं असलेले हितसंबंध शक्य तितक्या विस्तृत रीतीनें लक्षांत आणून दिले आहेत. ... ... ४१

हे हितसंबंध सहकार्य व स्पर्धा या दोन्ही बाजूंनीं जाणले पाहिजेत. अंतःस्थितिनिरीक्षण हाहि महत्त्वाचा विषय आहे. हिंदुस्थानचें क्षेत्रफळ वसतियोग्य भूपृष्ठभागाचा एकोणतिसावा हिस्सा असून त्याची लोकसंख्या जगाच्या लोकसंख्येचा एकपंचमांश आहे. ... ... ४२

स्पर्धेचीं तीन अंगें–सांस्कृतिक, राजकीय व आर्थिक. संस्कृतिदृष्ट्या यूरोपीय, महंमदी, चिनी व हिंदु असे जगाचे चार भाग पडतात. याशिवाय कित्येक संस्कृतींचा इतिहास आधुनिक काळाच्या पाठीमागें लपला गेला आहे. ... ... ... ... ... ४२

अत्यंत प्राचीन इतिहासाचीं साधनें—अत्यंत प्राचीन अवशेष व जगांतील प्रस्तुत भाषांतील भेद व सादृश्य. संस्कृतींच्या अभ्यासापासून जिज्ञासातृप्तीशिवाय व्यावहारिक फायदाहि होऊं शकतो. वैदिक परंपरेच्या लोकांच्या आचारधर्माशीं इतरांच्या आचारधर्माचें एकीकरण होऊन आजची भारतीय संस्कृति बनली आहे व तिनें बऱ्याच लोकसमुदायास स्थूल एकरूपता आणली आहे. संस्कृतिसंवर्धन हें स्वसंरक्षणमूलकच आहे. ... ... ... ४४

भारतीयांनीं प्रदेशमूलक अभिमान बाळगावयाचा कीं संस्कृतिमूलक बाळगावयाचा? हिंदुस्थान ही एक स्वतंत्र सृष्टीच आहे. जगांतील स्पर्धेत आपल्या सामुचयिक अस्तित्वाची ओळख पटण्यास हिंदुस्थानांत नुकतीच सुरुवात झाली आहे. ... ... ... ... ... ४५

हिंदुस्थानाचा जगाशीं संबंध राजकीय, ज्ञानविषयक, पारमार्थिकविचारमूलक, व्यापारविषयक व सामाजिक अशा पांच प्रकारांनीं येतो. ... ... ... ... ४७

---

### प्रकरण २ रें.

#### राष्ट्रसंघ आणि हिंदुस्थानविषयक राजकारण.

राष्ट्रसंघांत हिंदुस्थानचें सहकार्य हे शब्द आज केवळ गौरवास्पद आहेत. पारतंत्र्यामुळें हिंदुस्थानास जगाशीं सहकारिता करण्यास किंवा परराष्ट्रीय दळणवळण ठेवण्यास फारसा अवकाश नाहीं. कार्यार्थ अवकाश नसल्यामुळें विचारासाठीं क्षेत्र फारच थोडें उरलें आहे. स्वतःचें भवितव्यनियमन हातीं नसल्यानें प्रगतीस व्यत्यय येत आहे. ... ... ... ... ... ... ... ४८

राष्ट्रसंघ व त्याच्या अनुषंगानें हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेंत झालेले व होणारे फेरफार सामाजिक व शासनविषयक विचारास कारक होतील असा अजमास आहे. ४९

राष्ट्रसंघाचा करारनामा. ... ... ... ... ५०

डॉ. विल्सन यांनीं घडवून आणलेल्या ह्या राष्ट्रसंघांत मित्रराष्ट्रसंघ करून आपलें हित करण्याचें जुनें तत्त्व आणि जगास एक घटना द्यावयाची हें नवें तत्त्व या दोहोंचें मिश्रण आहे. ... ... ... ... ... ५७

राष्ट्रसंघाचीं सूत्रें आज जरी लवचीक दिसत आहेत तरी तीं कालानुसार बलवान होतील अशी अमेरिकेच्या संयुक्तसंस्थानांच्या उदाहरणावरून आशा करण्यास जागा आहे. ... ... ... ... ... ... ५८

राष्ट्रसंघ बळावत गेल्यास जगाच्या हिताहिताच्या दृष्टीनें विचार करण्याची प्रवृत्ति, राजकीय चढाओढीच्या ऐवजीं आर्थिक चढाओढीस सुरुवात इत्यादि परिणाम दृग्गोचर होतील. बलवान् राष्ट्रें, बहुजनसमाज, सत्ता हातीं असलेला वर्ग व कारखानदार वर्ग हे स्वानिक स्वायत्ततेचे अभिमानी व दुर्बल राष्ट्रें, अल्पसंख्याक समाज, पीडा सोशीत असलेले वर्ग व व्यापारी वर्ग हे राष्ट्रसंघाचे अभिमानी बनतील. ... ... ... ,,

युद्धें बंद व्हावींत हें तत्त्व शांततामय जगांत कांहीं निराळी संस्कृति जन्मास येईल या अपेक्षेनें उदयास आलें आहे. युद्धविषयक मतभेदः कोणी युद्धास संस्कृतीचा नाश करणारा प्रलय म्हणतात, तर कोणी त्यास अनेक गुणांच्या विकासाचें कारक समजतात. ... ... ५९

युद्धें बंद झालीं तरी स्पर्धा राहणारच. आर्थिक स्पर्धेत व युद्धांत बहुतांशानें तेच सद्गुण लागत असल्यामुळें राष्ट्रसंघस्थापनेनें युद्धोपयोगी सद्गुणांचा ऱ्हास होणार नाहीं. सशस्त्र स्वयंनिर्णयाऐवजीं न्यायासनापुढें प्रश्न नेण्याची क्रिया जशी एका साम्राज्यांत होते तशी सर्व जगभर चालू व्हावी हें राष्ट्रसंघाचें ध्येय आहे. ... ६०

राष्ट्रसंघाचीं ध्येयें तडीस नेण्याची लोकांची इच्छा नाहीं असेंच कांहीं अशीं म्हटलें पाहिजे. स्वायत्तेतर संस्थानांस राष्ट्रसंघांत प्रतिनिधी नसल्यानें राष्ट्रसंघानें हिंदुस्थानचे प्रतिनिधी मान्य केले ते केवळ इंग्रज सर-

---

## प्रकरण ३ रें.

### हिंदु आणि जग.

हिंदु कोणास म्हणावें व कोणास म्हणूं नये याबद्दल बराच मतभेद आहे. हिंदु समाजांतून फुटून जाऊं

इच्छिणारे किंवा हिंदुत्वाचे अभिमानी हिंदु शब्दाची व्याख्या फार संकुचित करतात; उलट, हिंदुत्वांत अंतर्भाव करून घेऊं पाहणारे लोक ती फार विस्तृत करतात. ... ... ... ... ... ... ७७

भारतीयांचा इतर जगाशीं संबंध कांहीं अंशीं रक्ताचा आहे. आपल्या संस्कृतीचा प्रसारहि देशाबाहेर पुष्कळच झाला आहे. भारतीयसंस्कृतिप्रसाराचें सर्व जगांतील मनुष्यसमूहाच्या आयुष्यक्रमांत स्थान शोधण्यासाठीं सर्व मनुष्यसमूहाच्या हालचालींची स्थूल माहिती पाहिजे. ७८

मानवजातीची उत्पत्ति कोणत्यातरी स्थलीं झाली व व्यक्तींचें इतस्ततः भ्रमण होऊन मानवजातीच्या अनेक लहान लहान जमाती झाल्या. स्थलांतराच्या कालांत शारीरिक व भाषाविषयक भेद उत्पन्न होऊन अनेक मानववंश उत्पन्न झाले. हे भेद अलीकडच्या दळणवळणाच्या व संघीकरणाच्या कालांत कमी होत जात आहेत.... ... ... ... ... ... ... ,,

शासनसंस्था व प्रचारशील उपासनासंप्रदाय या दोन मुख्य कारणांमुळें मोठ्या समुच्चयाची भावना जन्मास आली. भाषाभेद हे प्रयाणाचे, शब्दसमुच्चय प्रयाणमार्गाचे व अपभ्रंश हे प्रयाणकालाचे सूचक आहेत. ७९

भाषाचित्रावरून दिसून येणारा जगांतील निरनिराळ्या जातींचा प्राचीन परस्परसंबंध.... ... ... ... ,,

हिंदूंची संस्कृति ही आर्यन् व द्राविड या दोन मानववंशांच्या परिश्रमाचें फल आहे. हिंदु संस्कृतीचा प्रसार निरनिराळ्या काळांत झाल्यामुळें, विविध जातींच्या संनिकर्षामुळें संस्कृतींत होणारा फरक चोहोंकडे सारखा पसरला नाहीं. आठव्या शतकांत मुसुलमानी व सोळाव्या शतकांत यूरोपीय संस्कृति स्पर्धाक्षेत्रांत अवतीर्ण होऊन त्या हिंदु संस्कृतीच्या संकोचास कारण झाल्या. पूर्वेकडील द्वीपकल्पांत चिनी संस्कृतीचा विकासहि भारतीय संस्कृतीच्या संकोचास कारण होत आहे. ... ... ... ,,

निरनिराळ्या ठिकाणच्या जनता हिंदु संस्कृतीकडून पूर्ण चर्वण न झालेल्या स्थितींत राहिल्यामुळें जातिभेद उत्पन्न झाला आहे. जातिभेदाचा चातुर्वर्ण्याशीं संबंध नाहीं. ... ... ... ... ... ... ... ८०

हिंदुसमाजाच्या घटकांत दोन तऱ्हेचे समुदाय आहेत–एक राष्ट्रस्वरूपी जाती व दुसरे संप्रदाय. संप्रदाय व राष्ट्र यांची घटना भिन्न आहे. ... ... ... ,,

माध्वादि संप्रदायांचें संवर्धन करण्याची पद्धति एकच आहे ती ही कीं, समूहांत नवीन नवीन माणसें व्यक्तिशः घेणें. ... ... ... ... ... ... ... ,,

जातिमूलक समुदाय आपल्या जातींत नवीन माणसें व्यक्तिशः घेत नाहींत; तर ते आपल्या जातीशीं संपर्क येणाऱ्या जातीचें व आपलें एकरूप होऊन, सर्वसामान्य संस्कृति उत्पन्न व्हावी असा प्रयत्न करितात ... ... ,,

लहानांचे मोठे समूह बनविण्याच्या वरील दोन पद्धती आहेत; पहिल्या पद्धतीनें ख्रिस्ती व मुसुलमान समाज, व दुसऱ्या पद्धतीनें हिंदु समाज बनला आहे. ८०

हिंदूंत आपण व यूरोपियन वेगवेगळ्या वंशांतले आहोंत, अशी भावना अद्यापीहि दिसून येते ... ... ८१

अर्वाचीन शास्त्रांच्या अभ्यासानें ही चुकीची भावना लुप्त होत चालली आहे. ... ... ... ... ,,

भाषाशास्त्र व इतर संशोधनें यांच्या साहाय्यानें हिंदु समाजघटनेचा इतिहास जास्त ज्ञात होत आहे; व मानववंशाचे दुवे जोडतां येऊं लागले आहेत. ... ,,

जगांतील सर्व प्रकारचे लोक हिंदुस्थानांत व हिंदु समाजांतहि आहेत. ... ... ... ... ... ,,

डॉ. कीनच्या मतें, हिंदु समाजांत खालील पांच रक्तें आहेतः—(१) "कृष्णवामनांचें" (२) "कोलेरियन" लोकांचें; "द्राविडी" लोकांचें; (४) "आर्यन्" लोकांचें; व (५) "मंगोलियन" लोकांचें.... ... ... ... ,,

खानेसुमारीखात्याच्या अधिकाऱ्यांच्या मतें वरील डॉ. कीनचें मत चुकीचें आहे. ... ... ... ,,

वेदकालांत व त्यापूर्वी हिंदुस्थानांत निरनिराळ्या वंशांतील लोकांचें आगमन झालें; व या लोकांनां हिंदु समाजानें एकस्वरूपता आणली. ... ... ... ८२

भारतीय इतिहासांत अनेक इतिहास मोडतात. ... ,,

भारतीय वेदकालीन इतिहास सर्वांत प्राचीन आहे; वेदकाल कोणता हें कालदर्शक आंकड्यांनीं सांगतां येणार नाहीं. ... ... ... ... ... ... ,,

कुरुयुद्धकाल हा प्राचीन व अर्वाचीन काल यांनां विभाजक रेषेसारखा आहे असें पुष्कळ ग्रंथकार समजतात. ,,

आर्यसंस्कृतीचा इतिहास व इतर संस्कृतींचा इतिहास यांमध्यें मोठा फरक हा कीं, आर्यसंस्कृतीच्या अभ्यासास वाङ्मयाभ्यासापासून प्रारंभ करितां येतो ... ,,

वाङ्मयावशेषांवरून जुन्या संस्कृतीची जशी माहिती मिळते तशी दुसऱ्या अवशेषांवरून मिळत नाहीं. ... ८३

समाजाचा वाङ्मयीन व भाषाविषयक इतिहास आणि त्याचा इतर राजकीय, सामाजिक वगैरे इतिहास यांचें रूपसाहचर्य असतें; राष्ट्राच्या इतिहासांतील फेरबदलांचें महत्त्वमापन करण्यास भाषाविकृतींसारखें दुसरें चांगलें साधन नाहीं. ... ... ... ... ,,

## आर्यसंस्कृति आणि भारतीय भाषा.

संस्कृत वाङ्मय व भारतीय वाङ्मय एक नाहींत; भारतीय भाषा तीन अवस्थांतून गेली आहे असें भाषाशास्त्रज्ञांनीं कल्पिलें आहे; त्या अवस्था म्हणजे (१) अत्यंत प्राचीन गीर्वाण भाषा (वेदभाषा); (२) प्राचीन गीर्वाण भाषा (संस्कृत); (३) प्राकृत भाषा. ... ,,

वेदभाषा व 'पर्शुभारतीय' भाषा, यांत फारसा फरक नाहीं. ... ... ... ... ... ... ८४

संस्कृत व वेदभाषा यांत फरक–वेदभाषा जास्त जुनी असून तींत पुष्कळ अधिक रूपें व प्रयोग आहेत. ,,

वेदभाषेचीं दोन स्वरूपें दृष्टीस पडतात ... ... ८५

मानववंशशास्त्राला साहाय्यभूत शास्त्रांत भाषाशास्त्र हें प्रमुख आहे. यांत शब्दशास्त्र व तौलनिक व्याकरण या दोन शाखांचा अंतर्भाव होतो. ... ... ... ९०

मानववंशशास्त्रीय शोधाचें एक प्रमुख साहित्य म्हणजे मनुष्याचें शरीर व त्यांत कालानें व परिस्थितीनें घडून आलेले रूपभेद हें होय. आर्यन् लोकांचा मूलगृहकाल व मूलगृहस्थान शोधण्यासाठीं चाललेल्या खटपटींतील हेतु मनुष्याच्या निरनिराळ्या जातींच्या दूरीभवनाचा इतिहास सांपडावा हा होय. ... ... ... ... ... ९१

आर्यन् व आर्य या शब्दांतील अर्थभेद. आर्यन् हा पाश्चात्यांचा शब्द असून याचा अर्थ भारतीय, इराणी व यूरोपीय यांच्या पूर्वजांचे जे पूर्वज एकत्र राहत होते ते असा आहे. आर्य हा जातिवाचक शब्द नसून संस्कृति-वाचक आहे. ऋग्वेदकालीन लोक हा शब्द आपल्या अभिजात वर्गास लावीत असत. पाश्चात्य लोक आर्यन् व आर्य या शब्दांचा घोंटाळा करून आर्य वर्गांत आपल्या पूर्वजांचा व त्यांच्या द्वारा आपला समावेश करूं इच्छितात. ... ... ... ... ... ... ,,

आर्यन् लोकांचें मूलगृहस्थान व त्याचा काल ठर-विण्यास त्या लोकांच्या एकंदर सांस्कृतिक परिस्थितीचें ज्ञान अवश्य आहे. ... ... ... ... ... ... ,,

वेदाच्या अभ्यासासाठीं उपयोगिलेलें एक महत्त्वाचें शास्त्र म्हणजे तौलनिक दैवतशास्त्र व दैवतेतिहास हें होय. दैवतेतिहास दैवतशास्त्रांतूनच तयार होतो, परंतु परिश्रमपृथक्त्व दाखविण्यासाठीं नामपृथक्त्व रक्षिलें आहे. दैवतांची तुलना करतांना एका वंशांतील भिन्न राष्ट्रांचीं दैवतें तपासूनच केवळ चालत नाहीं, तर त्यांच्या भाऊ-बंदांचीं व शेजाऱ्यांचीं दैवतें तपासणेंहि जरूर असतें.... ,,

दैवतशास्त्राचें एक महत्त्वाचें अंग 'अवस्तु-आस्तिक्य-शास्त्र' (mythology) हें आहे. अवस्तु-आस्तिक्य-शास्त्राचें स्वरूप आज प्रचलित असलेल्या अद्भुत गोष्टी व कथानकें घेऊन त्यांच्या मुळांशीं असलेल्या भावना अथवा क्रिया (म्हणजे अवस्तु) शोधून काढणें हें आहे. या शास्त्राची तौलनिक शाखा वेदाभ्यासानें वृद्धिंगत झाली आहे. वेदकालीन दैवतकथानकांतील रूपकें पार-दर्शक आहेत. भारतीय वाङ्मय व इराणी वाङ्मय इकडे धांव घेणें ज्युपिटर, युरेनस इत्यादि दैवतांचें आदिसूत्र शोधूं इच्छिणारांनां प्राप्त आहे. ... ... ... ,,

संस्कृतीचा तौलनिक अभ्यास. या अभ्यासानें एका सामान्य संस्कृतीपासून भिन्न संस्कृती कशा निपजतात या संबंधीचे नियम आपणांस कळतात. हा अभ्यास करतांना संस्कृतींचीं प्राथमिक स्वरूपेंच तोललीं पाहिजेत. हीं स्वरूपें गुंतागुंतीचीं नसतात. एकमूल संस्कृतींतील सदृश गोष्टी या प्राथमिक स्वरूपांत स्पष्टपणें नजरेस येतात... ... ९२

तुलनात्मक भाषाशास्त्राबरोबर पुराणवस्तुशास्त्राचा उपयोग केला पाहिजे. भाषाशास्त्राचे ऐतिहासिक शोध असें केल्यासच टिकाऊ होतील. पुराणवस्तुशास्त्र बाल्या-वस्थेंत आहे. या शास्त्राचा विषय पूर्वीच्या काळच्या निरनिराळ्या राष्ट्रांच्या संस्था, चालीरीती इत्यादिकांचें तुलनात्मक परीक्षण करून त्या राष्ट्रांत सामान्य अशा चाली व संस्था कोणत्या आणि प्राचीनतम चाली व संस्था कोणत्या या गोष्टींचा निर्णय करणें हा आहे. ... ... ९२

मूलगृहकाल म्हणजे प्राचीन इंडोयूरोपीय काल. ज्या कालीं इंडोयूरोपीय राष्ट्रें साधारणतः एकच भाषा बोलत होतीं व एकाच संस्कृतींत होतीं तो काल. मूलगृहींचा आर्यन् समाज हा एक राष्ट्र अथवा राष्ट्रसंघ नसून एक-मेकांशीं बद्ध नसलेल्या अशा राष्ट्रांचा समुच्चय होता ही कल्पना तिजविरुद्ध प्रबळ पुरावा मिळेपर्यंत गृहीत केली पाहिजे. ... ... ... ... ... ... ... ,,

सांस्कृतिक स्थिति शोधावयाची म्हणजे खाद्यपेयें, वस्त्रविभूषणें, गृहें, वायव्य, आरण्य व ग्राम्य पशु, मनुष्यामनुष्यांचा संबंध म्हणजे विवाह, व्यापार, राज्य-व्यवस्था व समाजव्यवस्था इत्यादि गोष्टी, तसेंच पितृगण, देवदैवतें यांजसंबंधींच्या कल्पना व त्यांचा व्यवहारावर परिणाम, कालमान ठरविण्यासंबंधींच्या योजना वगैरे गोष्टींचें संशोधन करावयाचें. ... ... ... ... ,,

भारतीय इतिहासाच्या अध्ययनाच्या कामीं उपांगें म्हणून उपयोगिलेल्या शास्त्रांची यादी: (१) भाषांचा तौलनिक अभ्यास (२) संस्कृत भाषेचा ऐतिहासिक अभ्यास, (३) वेदभाषा, संस्कृत, प्राचीन प्राकृत व अर्वाचीन भाषा यांचा तौलनिक अभ्यास, (४) हिंदु-स्थानांतील स्थावर आणि जंगम लिखाणांचा अभ्यास, (५) मुद्राविज्ञान, (६) संस्कृत भाषेशीं असंबद्ध अशा भारतीय भाषांचा व भारतीय संस्कृतीचा परिणाम झालेल्या अभारतीय प्रदेशांतील भाषांचा अभ्यास (७) गोत्रें, देवदेवकें, शरीराचीं मोजमापें वगैरेंचा मानववंश-शास्त्रात्मक अभ्यास, (८) भारतीय दैवतें, कल्पना, विचार, तत्त्वज्ञान, शास्त्रें, कला इत्यादि साहित्याचा अभ्यास करणें व त्याचा इतिहास तयार करणें. उपलब्ध भारतीय साहित्याच्या अभ्यासाचे दोन प्रकार— भारतीयांनीं केलेल्या अभ्यासाचा हिशोब घेणें व भारती-यांनीं जतन केलेलें साहित्य वापरून आजच्या शास्त्रीय पद्धतीनें त्याचा उपयोग करणें. ... ... ... ... ९३

सांस्कृतिक अभ्यासाचा विषय: हिंदूंमध्यें निर्माण झालेलें वाङ्मय, या वाङ्मयामुळें, शास्त्रीय परिश्रमामुळें व निरनिराळे विचारसंप्रदाय लोकांत प्रसृत झाले त्यामुळें संस्कार पावलेली भाषा, एका संस्कृतीच्या छत्राखालीं अनेक लोक आल्यामुळें त्यांजमध्यें उत्पन्न झालेली समाज-पद्धति, या सर्वांचा हिशोब घेतला पाहिजे. ... ... ९४

या अभ्यासाच्या पूर्तीसाठीं हिंदुबाह्य संस्कृतींचाहि अभ्यास करणें अवश्य आहे. कारण आज हिंदु जनतेचा सर्व जगताशीं संबंध येत आहे. ... ... ... ९४

नवीन मनु आला कीं ज्ञानाच्या संचयाचे प्रयत्न होतात. आजच्या सारखे दोन काल पूर्वी येऊन गेले ते

(१) भारतीय युद्धसमाप्तीचा काल (२) मुसुलमानी संस्कृतीचें दडपण हिंदूंच्या स्वत्वाला मारक न व्हावें, हिंदूंचें स्वत्व रक्षिलें जावें यासाठीं केलेल्या प्रयत्नांचा म्हणजे विद्यारण्यांचा काल. आजचा काल आपलें महत्त्व पूर्ववत् जगांत स्थापित करण्याचा आहे. महाभारतीय युद्धाच्या समाप्तीच्या कालीं झालेल्या वाङ्मयविकासार्थ प्रयत्नाचें स्वरूप भगवान् वेदव्यासांची म्हणून जी कामगिरी प्रसिद्ध आहे तिजवरून स्पष्ट होतें. व्यासांनीं सर्व जुन्या विद्यांचें एकत्रीकरण, सर्व जुन्या इतिहासांतील रक्षणीय भागाचें रक्षण आणि विद्येच्या अभिवृद्धीसाठीं अवश्य असणारें विचारप्रवर्तन व शास्त्रप्रवर्तन केलें. ... ... ... ... ... ... ... ९४

व्यासानंतर विद्येस सर्व तऱ्हेनें चालन देणारा पुरुष विद्यारण्याच्या कालपर्यंत आढळत नाहीं. सायणमाधवांनीं [ हे एक कीं दोन ? ] (अ) वेद लोकांस समजत नव्हते ते सुगम केले; (आ) देशांतील निरनिराळीं मतें व संप्रदाय यांचें लोकांस समुच्चयानें ज्ञान दिलें; (इ) धर्मशास्त्र संकुचित झालें होतें तें विस्तृत केलें; (ई) ज्ञानमार्गाचा व वेदांतमताचा प्रसार केला व त्याची ऐतिहासिक परंपरा दाखविली; (उ) वैद्यकासारख्या लोकोपयोगी शास्त्रांचें पुनरुज्जीवन केलें. व्यासांची चळवळ संस्कृतीच्या संस्थापकाची होती, तर विद्यारण्यांची (माधवाचार्यांची) चळवळ संस्कृतीच्या उद्धारकाची होती असा या दोघांच्या कार्यांतील भेद आहे.... ... ... ... ... ... ९५

हिंदु समाज हा जातींचा समुच्चय आहे. सर्व जग हें पावित्र्याच्या दृष्टीनें एका सोपानपरंपरेंत असून त्यांत ब्राह्मण श्रेष्ठ आणि महार, वाघ्र वगैरे हे कनिष्ठ अशी हिंदूंची सामाजिक भावना आहे. सामाजिक उच्चनीचतेच्या प्रश्नामध्यें मताचा किंवा उपास्याचा प्रश्न नाहीं. आचाराचा प्रश्न आहे.... ... ... ... ... ... ,,

मतमूलक किंवा उपास्यमूलक भिन्नता या गोष्टी हिंदूंच्या दृष्टीनें फारच कमी महत्त्वाच्या असतां ख्रिस्ती, मुसुलमान इत्यादिकांस हिंदूंनीं आपणांपेक्षां निराळे समजण्याचें कारण ते लोक आपणांस हिंदूंहून निराळे समजतात एवढेंच. विशिष्ट मतें मान्य करणारीं माणसें आपला समुच्चय बनवून हिंदूंपासून आपलें पृथक्त्व स्थापित करण्याचा प्रयत्न करतात, आणि हिंदूंहून वेगळा व हिंदूंनीं कनिष्ठ ठरविलेला आचार स्वीकारतात तेव्हांच हिंदूंहून वेगळी अशी जात उत्पन्न होते ... ... ९६

हिंदु आणि अहिंदु यांजमधील फरक. हिंदु हा शब्द मुसुलमानी स्वारीपूर्वीच्या संस्कृत ग्रंथांत नाहीं. हिंदुत्वभावना पूर्वीं नव्हती. अर्थात् आतांसारखी परकीयत्वभावनाहि पूर्वीं नव्हती. प्राचीन काळीं भारतांत परकीय येई तो आपल्या राष्ट्राच्या म्हणजे जातीच्या नांवानें लोकांस माहीत होई व त्यानें देश्य आचार घेतला कीं तो नकळत हिंदु होऊन जाई. फार झालें तर हिंदू झालेल्या परकीयांची वेगळी जात बने.... ... ... ९६

प्राचीन भारतांत मध्यदेशांतून भारताबाहेर जाणाऱ्यांप्रमाणेंच दक्षिणेंत, बंगाल्यांत वगैरे जाणाऱ्यांनाहि प्रायश्चित्त असे. प्रायश्चित्त केवळ भक्ष्याभक्ष्यविशुद्धीसाठीं असे. व्यक्तींच्या लहान समूहांत आपण एकवंशीय आहोंत ही कल्पना एकत्वाची भावना आणते. मोठ्या समूहांत एकत्वाची भावना उत्पन्न करण्यास एका शासनसंस्थेखालीं वास किंवा विसदृश समाज डोळ्यापुढें असेल तर आचारांतील व राहणींतील सादृश्य या गोष्टी कारक होतात. ... ... ... ... ९६

उपास्यमूलक व आचार्यमूलक एकत्वभावना–ख्रिस्ती वगैरे संप्रदायांत ही भावना आहे. या भावनेंत इतर संप्रदायांशीं भेदबुद्धि अंतर्भूत असते. ... ... ... ९७

हिंदु समाजाचें एकत्व मतमूलक, उपास्यमूलक किंवा आचार्यमूलक म्हणजे संप्रदायभेदमूलक नाहीं तर 'संघट्टनमूलक' असून संप्रदायसंग्राहक आहे. यांत संप्रदायशत्रुत्वाला स्थान नाहीं. हिंदूंची समाजसंवर्धनपद्धति व ख्रिस्ती वगैरे अहिंदू संप्रदायांची समाजसंवर्धनपद्धति यांतील फरक–हिंदूंची पद्धति सार्वकालिक आहे; अहिंदूंची पद्धति संप्रदायशत्रुत्वभावनेवर आधारलेली अतएव शत्रुत्वभावनामय परिस्थितींत मात्र काम देणारी आहे. ... ,,

भावी जगत्संस्कृति हिंदु संस्कृतीप्रमाणें सर्वसंप्रदायसंग्राहक होऊन असांप्रदायिकांचाहि संग्रह करील ... ९८

हिंदुत्व अथवा हिंदूंचा विशिष्ट धर्म अशी जाणीव पूर्वीं नव्हती. स्त्रीधर्म, पुरुषधर्म, कुलधर्म, जातिधर्म, राष्ट्रधर्म, मानवधर्म अशी धर्मकल्पनांची श्रेणि होती. या श्रेणींत "हिंदु धर्म" म्हणून कांहीं विशिष्ट धर्म ठरला नव्हता. ... ... ... ... ... ... ... ९९

जातिधर्म, राष्ट्रधर्म या विशिष्ट भावनांपेक्षां जी अधिक विस्तृत भावना मुसुलमान वर्चस्वापूर्वीं हिंदूंमध्यें होती ती मानवधर्माची होय.... ... ... ... ... ,,

एखाद्या वर्गानें स्वतःला हिंदु म्हणणें किंवा न म्हणणें हें त्याच्या इच्छेवर आहे. मुसुलमान व ख्रिस्ती समाजांप्रमाणें हिंदु समाज परमार्थसाधनविशिष्टत्वमूलक नाहीं. ... ... ... ... ... ... ... ,,

"प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता, उपास्यानामनियम एतद्धर्मस्य लक्षणम्" ॥ ही हिंदुधर्माची व्याख्या नाहीं. ही व्याख्या समाजाची आहे. ही हिंदुधर्माची व्याख्या नाहीं, कां कीं "हिंदुधर्म" अशी वस्तूच नाहीं.... ,,

हिंदू लोकांस एकत्र बांधणारें एक बंधन कोणतेंच नसून हिंदु समाजांत अनेक ग्रंथींनीं बनलेले समूह अनेक अंतर्गत व परस्पराश्रयी बंधनांनीं निगडित झालेले आहेत.... ... ... ... ... ... ... ,,

हिंदु समाजास वेदांखेरीज ब्राह्मणांची जात हें एक मोठें बंधन आहे; सर्व जातीच्या लोकांनां संस्कारांकरितां ब्राह्मण लागतात. ... ... ... ... १००

पौरोहित्य करण्यास लागणाऱ्या ब्राह्मणांच्या दर्जावरून त्यांच्याकडून पौरोहित्य करून घेणाऱ्या वर्गांचा दर्जा ठरतो. ... ... ... ... ... ... १००

### आर्य संस्कृतीचा वृद्धिसंकोच.



---

## प्रकरण ४ थें.

### हिंदुस्थान, सिलोन आणि ब्रह्मदेश.

## सिलोनचा इतिहास.



## सिंहली वाङ्मय.



## सिंहली लोकांची भाषा व वाङ्मय.

## ब्रह्मदेश.

---

## प्रकरण ५ वें.

### भारतीय संस्कृतीचे पूर्वेकडील व पश्चिमेकडील परिणाम.

पोर्टब्लेअरमधील शिस्तीचे नियम जरी जातिभेदाकडे लक्ष देऊन केलेले आहेत, तरी जातींतील भेद व तुटकपणा यांचा कालांतरानें लय होईल. ... ... ... १६८

हद्दपारीच्या कालांत हिंदु बहुधा आपल्या जातीस चिकटून असतो; परंतु अधिकाऱ्यांची वृत्ति जातिभेदास कधींहि पोषक नसते. ... ... ... ... ... „

येथें हिंदु धर्मशास्त्राचें उल्लंघन केलें जातें.... ... „

पुरुषांपेक्षां स्त्रिया फारच कमी असल्यामुळें स्त्रियांविषयीं वरेच मोह सुटतात. ... ... ... ... „

वरेच लोक नीतिभ्रष्ट होऊन खेडेगांवांत उपदंशाचा प्रसार होतो. ... ... ... ... ... ... „

एकंदरींत खेड्यांमध्यें फारसे प्रत्यक्ष गुन्हे होत नाहींत. गुन्हेगारांत मोठी एकी असते. या गुन्हेगारांपैकीं कांहीं लोक लग्न वगैरे करून व्यवस्थितपणानें राहूं लागतात. वैवाहिक बंधनानें राहणाऱ्या लोकांचीं खेडीं फार प्राचीन काळीं वसलेलीं आहेत ... ... ... ... „

बहुतेक खेड्यांत फारसा हिंवताप नाहीं. ... १६९

उपदंश झालेल्या स्त्रियांचीं मुलें प्रथम निरोगी असतात, परंतु कालांतरानें तो रोग उद्भवूं लागतो. आईबाप आपल्या मुलांनां घेऊन तेथून लवकरच निघून जात असल्यामुळें मुलांच्या आनुवंशिक रोगाचीं सविस्तर लक्षणें पहातां येत नाहींत. ... ... ... ... „

सुटका झाल्यानंतर वसाहतींत फारच थोडे लोक रहातात. ... ... ... ... ... ... „

गुन्हेगारांचीं मुलें लहानपणींच हिंदुस्थानांत गेल्यामुळें त्यांच्या बुद्धिविकासाची चांगली माहिती मिळत नाहीं. ... ... ... ... ... ... „

अफगाणिस्तानांत १० व्या शतकापर्यंत हिंदु राज्य होतें. वाल्हीक, गांधार या नांवांनीं अफगाणिस्तानशीं आपली ओळख होती. तेथें कांहीं ठिकाणीं अद्याप बौद्ध मूर्ती सांपडतात. अफगाणांस लागू पडणारा जो पुस्तनवाली कायदा त्यांत हिंदू रिवाज अजून शिल्लक आहेत. काफरिस्तानांतील लोक १८९४ पर्यंत मुसुलमान झाले नव्हते.... ... ... ... ... ... ... „

त्रान्सकाकेशिया व सैबेरिया प्रांतांत हिंदुत्वाचे अवशेष सांपडतात. ... ... ... ... ... १७०

बलुचिस्तान येथें दर हजारीं ४७ हिंदू आहेत. येथें ७ व्या शतकांत एक बुद्ध भिक्षु राज्य करीत होता. मकरान प्रांतांतील गिचकी लोक आपणांस रजपूतांचे वंशज म्हणवितात. ... ... ... ... „

इराणांतील भारतीयत्वाच्या दृष्टीनें महत्त्वाचा प्रदेश म्हणजे लुरिस्तान होय. ... ... ... „

तार्तरी येथें बराचसा व्यापार सिंधी हिंदूंच्या ताब्यांत आहे. ... ... ... ... ... ... १७१

चिनी तुर्कस्तान हें पूर्वी बौद्धांचें एक महत्त्वाचें ठाणें होतें. येथें पुष्कळ संस्कृत ग्रंथ डॉ. स्वेन हेडिन यास सांपडले आहेत. ... ... ... ... १७१

सोकोत्रा उर्फ सुखाधारद्वीप येथें हिंदूंची एक वसाहत होती. हिंदू चांच्यांचीं जहाजें १३ व्या शतकापर्यंत सोकोत्रापावेतों जात होतीं. ... ... ... ... १७१

मालदीव बेटाची भाषा सिंहली आहे. लखदीव येथील भाषा मल्याळी आहे, तिच्यावर अरबी भाषेचा व लिपीचा पगडा बसला आहे. ... ... ... ... „

आफ्रिकेंतील वसाहती—पोर्तुगीज आफ्रिकेंत आज दीडशें वर्षांवर हिंदू व्यापार करीत आहेत. ... ... „

अबिसीनियामध्यें हिंदू व्यापारी आहेत. ज्यूबालँडमध्यें हिंदू लोक व्यापाराकरितां येत. ... ... ... „

पूर्वेकडील प्रदेशाचें स्थूल अवलोकन. हिंदुत्वप्रसाराचें कार्य सिंधुनदीच्या पश्चिमेकडे झालें त्या मानानें हिंदुस्थानाबाहेर पूर्वेकडील देशांत फार अधिक झालें. ... १७२

सुमात्रा, जावा, बोर्निओ, सेलिबिस, बलि, सयाम, कंबोडिया या सर्व देशांत भारतीयत्व पसरलें होतें. सध्यां तें मुसुलमानी आघातामुळें विस्कळित व कित्येक ठिकाणीं नष्ट झालें आहे. फिलिपाइन्स बेटांतील भारतीयत्वावर ख्रिस्ती आघात बसला. ज्या देशांत बौद्ध संप्रदाय जिवंत आहे तेथें भारतीयत्व तर शिल्लक आहेच, पण ब्राह्मणगौरव देखील शिल्लक आहे. ... ... ... १७३

इतर राष्ट्रांवर हिंदूंचा परिणाम झाला कीं नाहीं हें पाहण्यास तीन गोष्टी पहाव्या लागतातः—(१) भाषेंत संस्कृतसंभव शब्द किती रूढ आहेत, (२) हिंदू इतिहास-पुराणांतील किती कथानकें प्रचलित आहेत व (३) ब्राह्मणांचें महत्त्व तेथें किती आहे. ... ... ... १७४

प्राचीन काळीं सयामांत भारतीय ब्राह्मणसंस्कृति चांगली अस्तित्वांत असून तिनें ख्मेर रहिवाशांत बरीच जागृति उत्पन्न केली व त्यांस विद्या व कला शिकविल्या. „

प्राचीन काळीं कांबोजच्या ख्मेरलोकांचें राज्य फार विस्तीर्ण असून अंकोरथोम या राजधानीच्या शहरांत हस्तकौशल्य, कलानैपुण्य वगैरे चांगलें दृष्टोत्पत्तीस येतें. तें तेथील प्राचीन हिंदु वसाहतीची साक्ष देतें. ... ... १७५

अठराव्या शतकांत या राज्यांत फारच थोडा प्रदेश राहिला. ... ... ... ... ... ... „

"अंकोरवात" वगैरे देवालयें, मूर्ती, बकु ही ब्राह्मणी जात, या सर्व गोष्टी कांबोडियांत ब्राह्मणीधर्माचें अस्तित्व सिद्ध करितात. ... ... ... ... ... ... „

बकु या ब्राह्मणी जातीचे आचारधर्म हिंदु ब्राह्मणाप्रमाणें असून या जातीला तेथें विशेष मान आहे. ... „

या वर्गाला विशेष हक्क असून राजपौरोहित्य याकडेच असतें. ... ... ... ... ... ... „

बकूनंतर दुसरी महत्त्वाची जात म्हणजे आचार (आचार्य) या गृहस्थवर्गाची; या जातीलाहि चांगला मान मिळतो. ... ... ... ... ... ... १७६

सयामांतील भारतीय भाषा, विचार, कला वगैरेंच्या प्राबल्यावरून पाहतां, तिकडे बराच हिंदुसमुदाय गेला

असावा असें दिसतें; तो कांहीं जलमार्गानें व कांहीं भूमार्गानें तिकडे गेला असावा. ... ... ... १७६

हिंदुस्थानांत मुसुलमान ज्या वेळीं भारतीयांवर विजय मिळवूं लागले त्याच सुमारास इंडोचायनांतील ब्राह्मणी साम्राज्यास उतरती कळा लागली, व थई लोकांनीं त्याच्या करून ब्राह्मणी वसाहती घेतल्या. ... ... ... ,,

खि. श. च्या दहाव्या शतकांत कांबोडियांत बौद्ध-संप्रदाय ब्राह्मणानुयायांशीं सलोखा ठेऊन शिरला व १३ व्या शतकांत ब्राह्मणमहत्त्वाचें पूर्ण उच्चाटन करून त्यानें सर्व देश बौद्धसंप्रदायी बनविला.... ... ... ,,

हिंदुस्थान व चीन या देशांच्या मध्यंतरीं असलेल्या सर्व देशांतील लोकांस "भारतीय-चिनी" असें म्हणतात. १७७

भारतीय-चिनी लोकांच्या आचारविचारांविषयीं फार थोडी माहिती उपलब्ध आहे; प्राचीन काळीं त्यांच्यांत बौद्ध संप्रदाय असावा असा कित्येकांचा तर्क आहे. ... ,,

'इंडोचायनां'त बौद्ध ग्रंथांची भाषा सामान्यतः पाली आहे. ... ... ... ... ... ... ... ... ,,

इंडोचायनामधील भाषांचें वर्गीकरण खालीलप्रमाणें होईल:—

अनेकाक्षरी भाषा–(१) मलयु, (२) जावा, (३) बूगी, (४) बिम, (५) बत्ता, (६) गाल; एकाक्षरी भाषा–(१) रुखेंग, (२) ब्रह्मी, (३) मोन, (४) तहइ, (५) खोह्मेन, (६) लाव, (७) अनाम; पंडिती भाषा–पाली. ... ... ... ... ... ... ... ,,

**मलयु.**–ही मलाया द्वीपकल्पांतील भाषा असून हिची व्याप्ति फार आहे; हिच्या अनेक पोटभाषा आहेत; बोलण्याच्या भाषेंत निरनिराळ्या प्रदेशांत फरक आहे तरी लिहिण्याची भाषा एकच आहे.... ... ... ,,

या भाषेंत देश्य, संस्कृत व अरबी या भाषांचे अंश आहेत. ... ... ... ... ... १७८

मलयु भाषेच्या उत्पत्तीविषयीं बराच मतभेद आहे. ,,

मलयु भाषेंत कांहीं विशिष्ट गोष्टींचे वाचक शब्द संस्कृत व अरबी भाषांतून घेतलेले आहेत. ... ... ,,

भारतीय भाषांचा परिचय मलायी लोकांस बंगाली भाषेवरून झाला असण्याचा बराच संभव आहे. ... १७९

प्राचीन काळीं मलायी व जावानी लोक यांचा निकट संबंध असावा. ... ... ... ... ... ,,

मलयु भाषा फार मधुर व सुगम आहे; तरी तींत स्वतंत्र ग्रंथ फार थोडे आहेत. ... ... ... ... १८०

संस्कृत किंवा तैलंग कथानकांवरून महाभारतांतील पांडवांच्या कथा घेतल्या आहेत; जावानी कथानकांवरूनहि पुष्कळ गोष्टी रचल्या आहेत. अरबी भाषेंतून रूपांतर करून घेतलेल्याहि कांहीं कथा या भाषेंत आहेत. ... ,,

कांहीं ऐतिहासिक व कांहीं कायदेविषयक ग्रंथ आहेत. ,,

नाट्यग्रंथहि आहेत, पण संशोधकांनां ते उपलब्ध झालेले नाहींत.... ... ... ... ... १८१

मलयु लिहिण्याकरितां अरबी लिपी वापरतात. यूरोपीय संशोधकांनीं या भाषेसंबंधीं बरीच मेहनत घेतली आहे. १८१

मलायांतील ऐतिहासिक ग्रंथांचा हिंदुस्थानच्या इतिहासाला बराचसा उपयोग आहे. ... ... ... ,,

मलायी ग्रंथांविषयीं कांहीं टीपा. ... ... ... ,,

**तागाल भाषा.**—हिला ता-गाल अथवा गाल असेंहि म्हणतात. ही फिलिपाइन बेटांत सर्वत्र आढळते. ही भाषा लिहितात ती वांबू अथवा ताडपत्र यांजवर लोखंडाच्या अणकुचीदार खिळ्यानें लिहितात. ही भाषा मलयु, जावानी यांच्या वर्गांतलीच आहे. या भाषेंतील जुनें वाङ्मय नष्ट करून खिस्ती संप्रदायाचें वाङ्मय या भाषेंत तयार करण्याचे मिशनऱ्यांचे यत्न चालू आहेत. ... १८३

**तहइ अ० थइ भाषा.**—सयामी लोक ही भाषा वापरतात. सयामी लोकांचे दोन वर्ग आहेत. तहय व तहय-जहय. तहय-जहय हें फार जुनें राष्ट्र आहे. तहय-जहय व तहय या दोन्ही राष्ट्रांची लिहिण्याची भाषा सारखी आहे. १८४

चिनी, पाली व थइ या भाषांचा ब्रह्मी भाषांशीं संबंध आहे. तहइ वाङ्मयांतील ४१ ग्रंथ; त्यांतील विषय–रामायणीय वगैरे कथा.... ... ... ... ... ,,

**अनाम भाषा.**—कोचिनचीन व टांकिन या प्रांतांत चालते. अनाम लोकांचे सांप्रदायिक ग्रंथ चिनी ग्रंथां-सारखे दिसतात. ... ... ... ... ... १८५

**खोह्मेन भाषा.**—मेकॉन नदीच्या तीरीं राहणारे खोह्मेन लोक ही भाषा वापरतात. ... ... ... ,,

**लाव भाषा.**—ब्रह्मी व सयामी लोक आपला धर्म, शास्त्रें इत्यादि संस्कृति लाव भाषा बोलणाऱ्या राष्ट्रापासून आपणांस मिळाली असें म्हणतात. ... ... ... १८६

**जावा भाषा.**—थोड्या कालापूर्वी सर्व जावा बेटावर ही भाषा प्रचलित होती. येथील राजे सुसुपन वंशांतील होते. यांचें राज्य इ. स. १४०० पर्यंत होतें. पुढें मुसुलमानी अंमल झाला. जावा भाषा संस्कृतशीं फारच सदृश आहे. वर्णमालेचे देवनागरीशीं मुळींच साम्य नाहीं. जावानी पौराणिक ग्रंथ भारतीय पुराणांसारखेच आहेत. जावा भाषेच्या पोटभाषा बोलणाऱ्या बलि व मदुरा द्वीपांतील लोक इन्द्र, सूर्य, विष्णु यांची उपासना करतात, बायका सती जातात. ... ... ... ... ... ... ,,

**बूगी भाषा.**—ही सेलिबिस बेटाची मूळची भाषा आहे. बूगी राष्ट्र जावापेक्षां प्राचीन. या राष्ट्राचें जपानी लोकांशीं साम्य आहे. हे लोक धैर्य, धाडस इत्यादि बाबतींत श्रेष्ठ आहेत असें म्हणतात. ... ... ,,

बूगी भाषेच्या मूळच्या स्वरूपांत संस्कृतजन्य शब्द सांपडत नाहींत. या भाषेंतील ५३ ग्रंथ. याखेरीज 'अदत' म्हणजे नियमसंग्रह नांवाचे कायद्याचे ग्रंथ आहेत. ... १८७

**बिम भाषा.**—बिम राज्यांत चालते. सुंबावा बेटाचा पूर्वभाग व फ्लोरेस बेटाचा पश्चिम भाग या राज्यांत येतात. या भाषेचा बूगी व जावानी भाषांशीं संबंध असावा.... १८८

**बत्ता भाषा.**—सुमात्रांतील सर्वांत जुनी भाषा. सुमात्रा बेटाच्या मध्यभागीं राहणारे लोक ही भाषा वापरतात. हे लोक नरभक्षक आहेत. वृद्ध नातलगाला भक्षिण्याची धार्मिक रूढी या लोकांत आहे. बत्ता लोकांच्या ८ जाती आढळतात. बत्ता लोकांचें बूगी लोकांशीं साम्य आहे. बत्ता भाषेंतील ग्रंथ. ही भाषा लिहिण्याची रीति. बत्ता ग्रंथ म्हणजे बांबूच्या मोळ्या. ... ... ... १८८

भाषांची जंत्री देण्याचें प्रयोजन असें कीं, भारतीय विद्यांचा प्रसार होत असतां निरनिराळीं राष्ट्रें व लोक उर्फ निरनिराळ्या भाषा बोलणारे लोकसमुच्चय हिंदु संस्कृतीच्या प्रसारानें कितपत संस्कृत झाले याची कल्पना यावी. ... ... ... ... ... ... १८९

**कांबोज.**—कांबोजविषयीं माहिती प्रथम चिनी लोकांना होती. १३ व्या शतकांत कांबोजांत गेलेल्या एका चिनी लेखकाच्या वर्णनाप्रमाणें त्या वेळीं कांबोजी लोकांत मद्याचें व्यसन फार होतें. येथें पीकपाणी चांगलें असे. ,,

येथील नगररचना व्यवस्थित व मजबूत असे. येथील देवालयेंहि भव्य असून त्यांत बुद्धमूर्ती आहेत. ... ,,

राजवाडा फार विस्तृत व सुंदर होता. फक्त राजवाड्यावर व देवालयांवर कौलें असत; इतर घरांवर गवताचें छप्पर असे. ... ... ... ... ... ... १९०

कांबोजी लोक बौद्धधर्मी आहेत; आचारांत त्यांच्यांत व बौद्धलोकांत कांहीं फरक आहे. शाक्यसिंहाचे धर्मानुयायी प्रयोजनांत मासे खातात. ... ... ... ,,

पास्सेधर्मपंथ जास्त सोंवळा आहे; हा एक बौद्धपंथच असावा. याशिवाय तलाक नांवाचा एक वेगळा पंथ अस्तित्वांत होता. ... ... ... ... ... १९१

राज्यव्यवस्थेंत अधिकारदान लायकीवर अवलंबून नसे; सर्व अधिकारी ज्ञानाच्या बाबतींत एकसारखेच असत. अधिकाऱ्यांचा दर्जा छत्र्यांवरून ओळखतां येई. ,,

या देशांत राजाला विशेष मान असे; त्याची मिरवणूक फार मोठ्या थाटानें निघे. ... ... ... ,,

दरबारला राजा येई तो फार सजून येई. प्रत्येक वेळेस अधिकाऱ्यांनां त्याच्यापुढें गुडघे टेंकावे लागत. ... ,,

राज्याचे २१ प्रांत होते. यांतून पोष्ट ऑफिसेंहि असत. गुन्हेगारांनां अत्यंत निर्दयतेनें वागवीत. दिवाणी काम वगैरे कोर्टांतून न होतां, दिव्यासारख्या भाविक पद्धतीनें फिर्यादीचा निकाल देत. ... ... ... १९२

येथील रहिवाशी वर्णानें काळे व आचारानें रानटी होते. त्यांच्यांत फार अनीति माजलेली दिसून आली.... ,,

विवाहित मुलाला बापाच्या संपत्तीचा हिस्सा मिळे. १९३

कांबोजच्या राजाला अनेक स्त्रिया व उपस्त्रिया असत. ,,

साध्या लोकांची स्थिति बऱ्यापैकीं नव्हती; तेथील जमीन जात्या सुपीक असल्यानें कृषिकर्मसाधनांची विशेष जरूरी नसे. लोकांत अतिथिसत्कार कमी व उद्योगहि फार कमी होता. ... ... ... ... ... १९३

या देशांत रोगराई जास्त होती व त्याला कारण लोकांचा निष्काळजीपणा होता. ... ... ... १९३

या लोकांत जातिभेद नव्हता पण गुलाम पाळण्याची चाल असे; या गुलामांनां फार अमानुष रीतीनें वागविलें जात असे. ... ... ... ... ... ... ,,

कांबोजी लोकांचें लेखनसाहित्य फार साधें व त्यांची वर्णमाला फार स्पष्ट व सुबोध असे. भाषेंत बरेंच मिश्रण आहे. ... ... ... ... ... ... ... १९४

या लोकांनां अवगत असलेलें शास्त्र म्हणजे ज्योतिष. त्यांतहि त्यांची फार प्रगति नव्हती. भारतीयांप्रमाणें यांच्यांतहि महिने, आठवडे, प्रहर वगैरे वर्षाचे भाग पाडलेले असत.... ... ... ... ... ... ,,

द्वादशवर्षचक्र यांनीं भारतीयांपासून उचललें असलें पाहिजे. फलज्योतिषावर यांचा विश्वास असून भारतीयांप्रमाणें यांचें वर्ष अर्ध्या मार्चांत सुरू होतें. ... ... ,,

पाडव्याचा मोठा उत्सव असे; व इतरहि लहानमोठे उत्सव असत. बुद्धजलसंस्कारोत्सव हा एक त्यांपैकीं आहे. ,,

पोर्तुगीज येण्यापूर्वी उपभारतीय पौरस्त्य राष्ट्रांतून चिनी व्यापार चांगला चालत असे; या व्यापारांत कांबोजी लोकहि भाग घेत असावेत; कारण त्यांनां जहाजें बांधतां येत होतीं. ... ... ... ... ... ,,

कांबोजचा फार प्राचीन इतिहास फारसा उपलब्ध नाहीं, व जो आहे तो विश्वसनीय नाहीं. कांबोज व सयाम यांचा निकट संबंध असे; व कांबोज सर्व उपभारतीय पौरस्त्य राष्ट्रांच्या अगोदर संस्कृतींत श्रेष्ठ होता. ... १९५

चिनी दरबारीं कांबोजराजाकडून पहिला वकील ६१६-१७ या सालांत आला. श्संपम् व चुकिंग हीं राज्यें अनुक्रमें कांबोजच्या वायव्येस व कोचिन-चीनच्या दक्षिणेस होतीं. ... ... ... ... ... ... ... ,,

इ. स. ७०७ ते ७७९ पर्यंत कांबोजचे दोन विभाग पडले होते. ... ... ... ... ... ... ,,

कांबोजच्या राजांचे वकील चीनच्या दरबारीं असत; टांकिन व कोचिन-चीन या राष्ट्रांविरुद्ध त्यांनां चीनची मदत पाहिजे असे. इ. स. ११२८ ते १३७१ पर्यंत कांबोज परतंत्र होतें. इ. स. १३८५ पासून कांबोजराज्याचा ऱ्हास होत चालला.... ... ... ... ,,

चीनचे बादशहा कांबोजराजांची मर्जी संपादन करण्याकरितां झटत होते असें कांहीं वृत्तलेखांवरून दिसतें. १९६

**अनामचा इतिहास.**—अनामांत टांकिन व कोचिनचीन हीं दोन राज्यें आहेत. चिनी इतिहासकारांपासून व टांकिनच्या सांवत्सरिक ग्रंथांवरून या देशांची कांहीं खरी माहिती मिळते. ... ... ... ... १९६

कुलिएननें येथें इ. स. २३६ पूर्वी राज्यसत्ता स्थापिली. कुलिएनच्या वंशजानें चीनचें प्रभुत्व मान्य केलें. इ. स. ८०८ पूर्वी चीननें कोचिन-चीन पादाक्रांत केलें. तेथील राजानें आपली राजधानी कुणचिन बंदरीं

नेली व कुएन्चिनवरून पोर्तुगीजांनीं कोचिन-चीन हें नांव दिलें. .... ... ... ... ... ... ... १९६

पुष्कळ दिवसपर्यंत टांकिन चीनच्या अंकित होतें. इ. स. ९०७ मध्यें हा देश स्वतंत्र झाला. ... ... १९७

कुब्लइखानानें टांकिनवर स्वाऱ्या केल्या. कोचिन-चीन व टांकिन चीनचीं मांडलिक झालीं. टांकिन संस्थान इ. स. १४०७ त खालसा झालें. ... ... ... ,,

टांकिन पुन्हां स्वतंत्र झालें. ... ... ... १९८

१६ व्या शतकाच्या आरंभीं पोर्तुगीजांनीं कोचिन-चीनशीं व्यापार सुरू केला. ... ... ... ... ,,

या पौर्व उपभारतांतल्या कांहीं देशांतून चिनी राज्यपद्धति असे व कांहींतून नसे. ... ... ... ,,

या प्रदेशांत बौद्ध धर्म असल्यानें तेथें जातिभेद नव्हता. तेथील लोक आळशी व अक्कलशून्य असल्यानें राज्यकर्त्यांची अरेरावी चालूं शके; हिंदुस्थानासारखी ग्रामसंस्थापद्धति तेथें नव्हती. टांकिन व कोचिन-चीन येथील राज्यव्यवस्था जुलुमी आहे. ... ... ... ,,

राज्यव्यवस्थेसाठीं प्रांत, जिल्हे, तालुके पाडलेले आहेत; प्रत्येक प्रांतावर एक मुलकी व एक लष्करी अधिकारी असतो. ... ... ... ... ... ... १९९

वरिष्ठ सरकारांत सहा मंत्री व एक महासभा असते. मंत्र्यांकडे निरनिराळीं खातीं दिलेलीं असतात. ,,

लष्करी खातें विशेष महत्त्वाचें आहे. लष्करी नोकरी करण्याबद्दल सक्ती आहे. कोचिन-चीनमध्यें लष्करी लोकांनां चांगला मान असतो.... ... ... ... ,,

कोचिन-चीन राज्यांत प्रजेवर करांचें ओझें फार आहे व त्यामुळें प्रजेंत अस्वस्थता व बंडाळी माजते. ... २००

येथील न्यायशासनसंस्था बरी आहे; देहांत शिक्षा सावडतोब न देतां राजाच्या संमतीनें देतात. खालील न्यायसभेच्या निकालावर पुनर्विचारप्रार्थना (अपील) करतां येते. ... ... ... ... ... ... ,,

इ. स. १५४० त बौद्धधर्म या देशांत शिरला; बुद्धाचे अनुयायी येथें फार थोडे आहेत. अनामी लोक गर्विष्ठ व आळशी आहेत. ... ... ... ... ,,

थई संस्थानांतील राज्यपद्धति फार जुलुमी आहे. सयामचा राजा हा श्रेष्ठ असून त्याला वराच मान देतात. ,,

सयाममधील राज्याभिषेकाचें सविस्तर वर्णन. ... २०१

थई राजाचा दरारा व त्याचा वडेजाव विशेष असतो. ,,

राजाचा भाऊ किंवा नातलग 'उपराजा' उर्फ 'वनम्रा' असतो. राजाला बऱ्याच उपस्त्रिया असल्यानें अनेक राजपुत्र दृष्टीस पडतात व त्यांनां पोटासाठीं राबावेंहि लागतें. ... ... ... ... ... ,,

सयामच्या राज्यव्यवस्थेंत अधिकारविभागणी चांगली विस्तृत असून पद्धत साधी आहे. ... ... ... ,,

राज्याचे प्रांत पाडून त्यांवर सुभेदार नेमलेले असत. त्यांची सत्ता अमर्याद असे. ... ... ... २०२

थई राजापाशीं दिवाण नसे, तर अधिकाऱ्यांजवळ शिक्के दिलेले असत व त्यांनीं ते राजाज्ञा जाहीर करीत. २०२

सयामांत खालच्या लोकांचे पांच वर्ग असत: (१) सैनिक, (२) सक्तीनें काम करणारे, (३) कर देणारे, (४) चाकर, (५) गुलाम. ... ... ... ... ,,

पूर्वीं सयामांत युद्धकला फारशी नव्हती; विशिष्ट चार वर्ग सोडून बाकीच्या लोकांनां सक्तीची लष्करी नोकरी असे. हल्लीं जें कांहीं सैन्य आहे तें विशेष बलवान् नाहीं; पायदळ जास्त आहे. ... ... ... ... ... ,,

हल्लीं पाश्चात्त्य पद्धतीवर आरमार ठेवलें आहे. ... २०३

सयामी राजानें आपल्याकडे सर्व व्यापारी हक्क घेऊन इतर व्यापाऱ्यांचें व आपल्या प्रजेचें नुकसान केलें, व आपला खजिना भरला. राज्याचें उत्पन्न फार असे. ... ... ... ... ... ... ... ,,

सयामी कायद्यांचे ग्रंथ हिंदू कायदेग्रंथांवरून तयार केले असावेतसे दिसतात. ... ... ... ... ,,

सयामांत तीन प्रकारच्या न्यायसभा आहेत व त्यांतून व्यवस्थित रीतीनें खटल्यांचीं कामें चालतात. तुरुंगव्यवस्था चांगली नसते. दिव्य करण्याचीहि पद्धत आहे. कांहीं न्यायपद्धती फार पोरकट व विचित्र वाटतात.... ... २०४

थई लोकांच्या स्वभावांत गुलामगिरीची वृत्ति दिसून येते. ते खुशामतखोर, हट्टी, आळशी, बढाईखोर, तथापि प्रामाणिक, नेमस्त, संयमी, आज्ञाधारक व शांतताप्रिय आहेत. ते बौद्धधर्मी आहेत. ... ... २०५

---

## प्रकरण ६ वें.

### यावद्वीप संस्कृति.

यावद्वीप संस्कृति या शब्दानें यवद्वीप, बलि व लँबाक बेटांतील संस्कृतीचा निर्देश केला आहे. यवद्वीपाचें सांप्रतचें जाव्हा हें नांव डच लोकांनीं दिलेलें आहे. बलि व लँबाक या बेटांत चातुर्वर्ण्य अद्यापि कायम आहे. वेदाबद्दल पूज्यबुद्धि आहे. ब्रह्मांडपुराण या ग्रंथास मान फार आहे. ... ... ... ... २०५

बलिद्वीपांत पहिली हिंदूंची वस्ती खिस्तोत्तर प्रथम शतकांत झाली असावी. लँबाक याचें व तेथील लोकांचें तद्देशीय नांव ससक असें आहे. पण ससक मुसुलमान आहेत व बलिद्वीपस्थ लोक हिंदु आहेत. तेथील लोक-संख्येचे व इकडून तिकडे गेलेल्या लोकांच्या संख्येचे आंकडे.... ... ... ... ... ... ... ,,

बलिद्वीपांतील हिंदूंनीं १९ व्या शतकांत ससक बेट जिंकलें. पुढें तें १८९४ सालीं डच लोकांच्या ताब्यांत गेलें. ... ... ... ... ... ... ... २०६

यवद्वीपाचा हिंदुस्थानच्या इतिहासाशीं संबंध फार येतो. तेथील राजघराण्याचे सिंहलद्वीपच्या राजघराण्याशीं

शरीरसंबंध व केव्हां केव्हां तन्निमित्त युद्धप्रसंग होत. तेथील ग्रंथांची भाषा 'कवि' नांवाची असून तींत भारत-युद्ध, अर्जुनविवाह इ. अनेक ग्रंथ आहेत. त्यांचे धर्मशास्त्रीय ग्रंथहि हिंदूच आहेत व आज ते महंमदानुयायी असले तरी हिंदूच कायदे पाळतात. तेथें हिंदु संस्कृतीचे अवशेष प्राचीन मंदिरें वगैरे रूपानें फार आढळतात. तेथील लोकांत अद्यापीहि जुनीं हिंदू दैवतें शिल्लक आहेत; व चालीरीतीहि हिंदूंप्रमाणें आहेत. ... ... ... २०६

तद्देशस्थ हिंदूंचे आंकडे मुळींच मिळत नाहींत. तेथील लोकसंख्येच्या अंदाजी आंकड्यांत इतकी तफावत दिसते कीं त्यांच्यावर मुळींच विश्वास ठेवतां येणार नाहीं. „

सेलिबिस बेटाच्या लोकसंख्येचे आंकडेहि फार मौजेचे आहेत. ... ... ... ... ... ... ... „

बलिद्वीपांतील हिंदूंसंबंधानें 'स्टेट्स्‌मनच्या इयरबुक'-मध्यें कांहींच माहिती नाहीं. एकंदर डच लोकांच्या ताब्यांतील पौरस्त्य द्वीपसमूहांत बहुतेक मुसुलमान, कित्येक लक्ष बाटलेले ख्रिस्ती आणि कांहीं बौद्ध आहेत एवढीच माहिती आढळते. ... ... ... „

जावाच्या इतिहासाचे मुख्य तीन भाग पडतात. हिंदु सत्तेचा काल, मुसुलमानी सत्तेचा काल आणि यूरोपीय सत्तेचा काल. त्यांत हिंदु सत्तेच्या कालाचे पुन्हां तीन विभाग पडतात. पहिला बौद्ध प्रामुख्याचा, दुसरा शैव प्रामुख्याचा आणि तिसरा या दोहोंचे आचार व समजुती यांच्या एकीकरणाचा. ... ... ... ... ... „

जावा बेटांत अनेक हिंदू राज्यें होतीं त्यांत मयपहित संस्थान मोठें होतें व त्यानें पुढें इतर संस्थानेंहि बहुतेक आपल्या अंकित केलीं .... ... ... ... ... २०७

मन्वादि धर्मशास्त्रकारांनीं उपदेशिलेल्या व बलिद्वीपांत प्रचलित असलेल्या चातुर्वर्ण्यांतील मुख्य फरक. ... „

प्राचीन काळीं जावामध्यें वर्णानुक्रमानें पदवी मिळत असे; बलिद्वीपांत अजूनहि तशीच पद्धत आहे. ... „

कॅप्टन यानें म्हटलें आहे कीं, बलि येथील ब्राह्मण खालच्या जातींचा तिरस्कार करितात त्यामुळें त्या महंमदानुयायी बनत आहेत; तथापि ब्राह्मण पुरुष इतर जातीच्या स्त्रियांशीं लग्नव्यवहार करितात त्यामुळें समाजास एकरूपता येत आहे. ... ... ... „

जावांतील हिंदु संस्कृतीचा अभ्यास विशेष झाला नाहीं व डच पंडित भारतीय संशोधनाशीं अपरिचित असल्यामुळें त्यांचें संशोधन मागसलेलें दिसतें. ... „

यवद्वीपांतील कांहीं शिलालेखांचें परीक्षण झालें आहे, पण तेथील वाङ्मयाचें सूक्ष्म परीक्षण व्हावयाचें आहे व भारतीय वाङ्मयाशीं त्याची तुलना व्हावयाची आहे. यासाठीं अनेक ठिकाणची त्रुटित माहिती पुढें दिली आहे. २०७

जावा बेटांत शालिवाहन शक चालतो व त्याविषयीं तेथें अनेक दंतकथा आढळतात. शालिवाहन शकारंभापूर्वी दोन तीन वर्षे आदिशक नांवाचा कोणी द्वीपविजेता तेथें आला होता अशी तेथें कल्पना आहे. या आदिशकाचा अशोकाशीं संबंध जोडण्यांत येतो. पंधराव्या शतकाच्या अखेरीस मुसुलमानांनीं हें बेट जिंकलें. ... २०७

इ. स. १८४६ त आर्. फ्रेडरिक नांवाचा संस्कृतज्ञ बलिलिंग येथें गेला होता; त्यानें जावाकडील प्राचीन भाषांचें ज्ञान मिळविलें. बलिद्वीपांत पुरोहितवर्गाच्या साहाय्यानें त्यांच्या धर्माचेंहि ज्ञान त्यानें मिळविलें. या सर्व संशोधनाचा सारांश त्यानें अहवाल रूपानें प्रसिद्ध केला आहे. ... ... ... ... ... ... २०८

बलिद्वीपांत दोन लौकिक व दोन पण्डिती भाषा आहेत. ... ... ... ... ... ... ... ... „

जावा बेटांत गेलेल्या ब्राह्मणांनीं संस्कृत भाषा तेथें नेली. परंतु ती त्यांची बोलण्याची भाषा नव्हती. जावा-मध्यें आलेल्या भारतीयांची संख्या अल्प असल्यामुळें त्यांनीं आपल्या भाषेचा त्याग करून तेथील देश्य लौकिक भाषेचा स्वीकार केला असावा असें वेबरचें मत आहे. पंडितवाङ्मय संस्कृतमध्यें असल्यामुळें भारतीय पंडित प्राकृत भाषेस विशेष महत्त्व देत नसत. ... ... ... ... ... ... ... ... „

जावामध्यें कांहीं ऐतिहासिक ग्रंथ आहेत; त्यांपैकीं कांहींचें संशोधन झालें आहे त्यावरून ते अविश्वसनीय व निरुपयोगी असावेत असें वाटतें. ... ... ... „

येथील इतिहासग्रंथांत हिंदुस्थानांतून जावामध्यें झालेल्या प्रयाणाची माहिती नाहीं. ... ... ... २०९

यवद्वीपसंस्कृतीचें भारतीयत्व राज्यव्यवस्थासादृश्यांत दिसून येतें. ... ... ... ... ... ... „

पारमार्थिक व शास्त्रीय विषयांच्या बाबतींत तेथील भाषेंत शब्द नसल्यामुळें त्या भाषेंत संस्कृत शब्दांची भर पडली व ते शब्द तेथील लोकांस परिचयाचे झाले. „

जेथें बौद्ध जात तेथील लोकांशीं ते तादात्म्य पावत व आपलेपणा त्यांवर गाजवीत नसत; बौद्धांनीं अशी चाल घातली यामुळें ब्राह्मणांनां भारतीय प्राकृत भाषा जावा येथील लोकांवर लादतां आल्या नाहींत हें वेबरचें ह्मणणें चुकीचें आहे. ... ... ... ... ... ... „

बौद्ध संप्रदायापूर्वी आर्यांचा प्रसार सिंहलद्वीपांत झाला होता. आर्यांनीं सिंहलद्वीपांत इतक्या प्राचीन काळीं वसाहत केली होती कीं त्या वेळीं ब्राह्मणी संस्कृति व ब्राह्मणी जातहि उदयास आली नसावी. उलट पक्षीं, यवद्वीपांतील वसाहत बरीच उत्तरकालीन असावी. ... „

अर्वाचीन भारतीय संस्कृतीपासून भिन्न अशा यावद्वीप संस्कृतीचीं स्वरूपें आणि भारतीयांच्या स्थलांत-राचा काल दर्शविणाऱ्या गोष्टी. ... ... ... २१०

द्वैपायन छंदःशास्त्र व कामंदकाचा ग्रंथ हीं गमनकाल-सूचक नाहींत. नाटकांचा अभाव मात्र कालसूचक आहे. पौराणिक ब्राह्मणी ग्रंथांचा उदय होऊन त्यांचा परिणाम पुष्कळसा होण्यापूर्वीच हें परदेशगमन झालें होतें. संशोधनाच्या आजच्या स्थितींत हा गमनकाल आंकड्यांनीं सांगतां येत नाहीं. ... ... ... २१०

बौद्ध आणि इतर भारतीय हे कांहीं भिन्न लोक नव्हते. बौद्ध अगोदर गेले, कीं इतर लोक व बौद्ध हे बरोबर गेले हें गमनकालावरूनच ठरेल. बौद्धांचें सर्वव्यापित्व हिंदुस्थानांत कधींच नव्हतें. बौद्ध भिक्षु उपदेशाला जातील तेथें येथील समाजव्यवस्था नेऊं शकणार नाहींत. ज्या अर्थी भारतीय समाजव्यवस्था तेथें गेली, त्या अर्थी भारतीयांचा मोठा समुदाय तेथें गेला असावा. ... ... ... ... ... ... २१०

सिंहलद्वीप, यवद्वीप व उत्तरभाग यांचे संस्कृतिप्रसार-दृष्ट्या तीन भिन्न प्रकार आहेत. ... ... ... ,,

एका काळीं बौद्धसंप्रदाय प्रचाराचें काम जोरानें करीत असावा, व त्या झपाट्यांत जावा, बोर्निओ हीं बेटें व सयाम, चीन व तिबेट हे देश त्या प्रचारानें संस्कारले असावेत ही वेबरप्रभृतींची कल्पना चुकीची आहे. ... ... ... ... ... ... ... २११

द्राविडदेशांत व यवद्वीपांत देश्य भाषेवर संस्कृत भाषेचा संस्कार मात्र झाला. ... ... ... ... ,,

यवद्वीपांतील भाषेंत संस्कृत शब्दांचा भरणा होऊन एक नवीन भाषा बनली तिचें नांव कवि. ... ... ,,

पारमार्थिक शिक्षण व ग्रंथलेखन या कामीं कवि भाषेचा उपयोग केला जाई. कवि भाषा ही सामान्य लोकांस पवित्र वाटे; पुरोहितांनां ती अगदीं सोपी व साधी आहे असें वाटत असल्यामुळें ते काव्य लिहिण्याकडे तिचा उपयोग करीत. ... ... ... ,,

बलिद्वीपांत चारी वेदांतील महत्त्वाचा भाग आहे असें सांगतात. तेथील पुरोहित वेद फार गुप्त ठेवितात. बलिद्वीपांत भारतवर्षीय ब्राह्मणांतील शैव हा एकच पंथ होता; तेथील लोकांनां ब्रह्मांडपुराणाशिवाय इतर पुराणांचीं नांवेंहि माहीत नाहींत. ... ... ... ,,

तुतुर अथवा तात्त्विक ग्रंथांचे दोन वर्ग आहेत; एक पुरोहित वर्गाकरितां व दुसरा इतर वर्गाकरितां. ... ,,

रामायणाचें व इतर महाकाव्यांचीं रूपांतरें कवि-भाषेंत झालेलीं आढळतात. ज्या वेळीं जावामध्यें रामायणाचा प्रवेश झाला त्या वेळीं भरतखंडांतील रामायणास उत्तरकाण्ड जोडलें गेलें नसावें. ... ... २१२

जावामध्यें कवि भाषेंतील रामायणाचें 'रोमो' या नांवाचें जावानी भाषेंतील रूपांतर अस्तित्वांत आहे. 'रोमो' हा ग्रंथ बहुधा मुसुलमानी काळांतील असावा. ,,

फ्रेडरिकनें कविरामायणांत दिलेल्या कथेचें भारतीय रामायणांतील मूळ कथेशीं साम्य दाखविलें आहे. ... ,,

अगदीं अलीकडे कवि भाषेंत अर्जुनविजय या नांवाचा एक ग्रंथ झाला आहे; त्यांत उत्तरकाण्डांतील कथा-भाग घेतलेला आहे. ... ... ... ... ... २१२

कविवाङ्मयांतील ग्रंथ केव्हां व कोणीं लिहिले हें माहीत नाहीं; त्यांत व्रत युद (भारत युद्ध) या ग्रंथाला अग्रस्थान असून हें काव्य जावांतील रहिवाशांचेंच आहे असें अर्वाचीन जावानी लोक समजतात. ... २१२

अर्जुन विवाह हा ग्रंथ व्रतयुदापेक्षां जुना आहे. हा इ. सनाच्या ११ व्या शतकांत रचला गेला असावा. ,,

कांड हें सर्वांत जुनें काव्य असावें असें वाटतें. ... ,,

बलिद्वीपामध्यें महाभारताचें नांव अज्ञात दिसतें. २१३

कवि भाषेंतील महाभारताच्या पर्वांतील श्लोकसंख्या भारतीय महाभारताच्या श्लोकसंख्येहून निराळी आहे. ,,

कवि भाषेंतील धार्मिक ग्रंथांतील दुसऱ्या प्रतीचें वाङ्मय हें अंशतः संस्कृत ग्रंथांच्या आधारें देश्य लोकांनीं व अंशतः भारतवर्षांतून तेथें गेलेल्या हिंदूंनीं रचिलेलें आहे. यांतील मुख्य ग्रंथ. ... ... ... ... ,,

भारत युद्ध या ग्रंथांतील कथाभाग महाभारताच्या ६ ते ९ पर्वांवरून घेतलेला आहे. हा ग्रंथ कवि-वाङ्मयाच्या दुसऱ्या कालविभागांत मोडतो. यांत लौकिक भाषेचें मिश्रण आढळतें. ... ... ... ... ,,

विवाह नांवाच्या ग्रंथाची भाषा सुरस व शुद्ध कवि आहे; हेम्पु कण्व यानें हा ग्रंथ लिहिला. तो शैवपंथी असावा. ... ... ... ... ... ... २१४

सरदहन हा ग्रंथ हेम्पु दर्मय यानें रचिला. सरदहन हें कुमारसंभवाचें रूपांतर असावें. ... ... ... ,,

सुगानसंतक या ग्रंथाचा कर्ता हेम्पु मौनगुन हा आहे. हें काव्य रघुवंशाचें रूपांतर आहे. ... ,,

वोमकाव्य (भौमकाव्य) म्पु व्रदः वोद यानें केदिरीचा राजा जयवय याच्या वेळीं लिहिलें असावें. ... ... ,,

अर्जुनविजय हा ग्रंथ 'म्पु तन्तुलर वोद' यानें लिहिला. यामध्यें अर्जुनानें रावणाशीं युद्ध करून त्याचा पराजय केल्याची कथा आहे. ... ... ... ... ... ,,

सुतसोम हा ग्रंथहि म्पु तन्तुलर वोद यानेंच लिहिला. सुतसोम व प्रभुमकेतु (प्रभूमकेतु) यांनीं रतु दैत्य पुरुसद याचा पराभव केला. ... ... ... ... ... ... ,,

वोमकाव्य, अर्जुनविजय व सुतसोम हे ग्रंथ हिंदुस्थानां-तील ग्रंथांचींच रूपांतरें असावींत. ... ... ... ,,

म्पु पेनुलु वोद नांवाच्या बौद्ध भिक्षूनें हरिवंश हा ग्रंथ जावामध्यें नेला असावा. ... ... ... ... ,,

वाङ्मयेतिहासांतील यानंतरचा कालविभाग झटला म्हणजे बलिबेटांतील कवि वाङ्मयाचा होय. या वेळीं भिक्षूंनीं वाङ्मयपरंपरा पुढें चालविली; त्यांनीं कवि भाषेंत संस्कृतांतील धर्मशास्त्रीय ग्रंथांची भर घातली.... ... ,,

याशिवाय कांहीं गद्यात्मक ग्रंथ आहेत; हे बहुतेक कायद्यासंबंधाचे किंवा धर्मशास्त्रविषयक आहेत. ... २१५

पूर्वादिगम अथवा शिवानुशासन हा जावांतील ग्रंथ मनूनें केलेला आहे अशी जावांतील लोकांची समजूत आहे. 'मानव धर्मशास्त्र' हा ग्रंथ बलीमध्यें असून अद्याप अज्ञात आहे किंवा तो जावामध्येंच नष्ट झाला असावा, असा फ्रेडरिकचा तर्क आहे. ... ... ... ... २१५

आगम, आदिगम, देवागम वगैरे इतर धर्मशास्त्रीय ग्रंथांचीं नांवें राजा कासिमन यानें दिलीं आहेत, परंतु तमन् इन्तरम् मध्यें दिलेली यादी निराळीच आहे. ... २१५

अगस्त्यपर्व, अर्जुनप्रलब्ध, अर्जुनसहस्रबाहु, इत्यादि ग्रंथ पौराणिक स्वरूपाचे आहेत. ... ... ... ,,

जावा व बलि बेटांत गेलेल्या हिंदू लोकांनीं रचिलेलें जावा-बलि-वाङ्मयहि बलिबेटांत आहे. यांत बावद किंवा ऐतिहासिक बखरी, पॉलिनेशियामधील पुराणकथा व जन्मपरंपरेसंबंधाचेहि ग्रंथ आहेत. ... ... ... ,,

केह्रंग्रोक हा ग्रंथ बावदग्रंथांपैकीं आहे. केह्रंग्रोकनें केदिरि, मयपहित व बलि येथील राज्यें स्थापिलीं. ... ,,

रंगलवे या बावदग्रंथांत राजदरबाराचें वर्णन आहे. रंगलवे हा तुमपेल येथील शिवबुद्ध राजाचा प्रधान होता. ... ... ... ... ... ... ... २१६

उसनजव ग्रंथांत जावानी लोकांनीं बलिद्वीप काबीज केल्याचें वर्णन आहे. ... ... ... ... ... ,,

'मलत्' नांवाच्या ग्रंथांत रामायणांतील कथांसारख्या कथा आहेत. ... ... ... ... ... ... ,,

मलत्, वसेंग्, व वंगवहंग विदेथ हे किडुंग वृत्तांत लिहिलेले आहेत. कुरिपनच्या राजपुत्राचे पराक्रम व त्याच्या प्रियेचा वियोग या गोष्टी वरील ग्रंथांत आहेत. नुसापति हा मलत् ग्रंथांतील नायक आहे; त्यानें "अमलत् रश्मि" हें नांव धारण केलें होतें. मलत् हें या नांवाचेंच संक्षिप्त रूप आहे. ... ... ... ... ,,

कांहीं बावद ग्रंथांत अधिक अर्वाचीन इतिहास आलेला आहे. "बाबद बलि" या पुस्तकांत बलिद्वीपांतील डच लोकांचा इतिहास व 'बावदशक्र' या ग्रंथांत शक्र उर्फ लँबाक बेटांतील बंडाचें वर्णन आहे. ... ... ... ,,

'बावद संगूकल' नांवाच्या एका पौराणिक तऱ्हेच्या ग्रंथांत पृथ्वीच्या उत्पत्तीपासून जावामधील भारतीयांच्या वसाहतींचा काल्पनिक इतिहास दिला आहे. चोहोंकडचे पौराणिक व दंतकथांपासून उपलब्ध झालेले इतिहास जोडण्यांत फारसा पक्षपात दाखविला नाहीं. स्वर्गसौख्याचेंहि वर्णन यांत दिलेलें आहे. ... ... ... ... ,,

अगस्त्यपर्व नांवाच्या ग्रंथांत ऋषींच्या कुलांचा इतिहास दिला आहे; यांतील माहितीचें आदिपर्वांतील माहितीशीं थोडेंसें साम्य आहे. ... ... ... ,,

अर्जुनप्रलब्ध या ग्रंथांत कालीनें अर्जुनास मारलें व शिवानें जिवंत केलें अशी कथा आहे. ... ... ... ,,

जावाच्या वाङ्मयांत अद्भुत वाङ्मयहि आहे. या अद्भुत कथांपैकीं कांहीं निव्वळ हिंदू, कांहीं मुसुलमानी व कांहीं मिश्र स्वरूपाच्या आहेत. ... ... ... ... ,,

अजिधर्म हा ग्रंथ यावद्वीप व बलि या दोन्ही भाषांमध्यें आहे. यांत नायकाचें त्याच्या बायकोशीं भांडण झालें आहे. अमाद हें अहंमद महंमद नांवाच्या मनुष्याचें चरित्रपर काव्य फार लोकप्रिय आहे. या ग्रंथाचीं अनेक रूपांतरें झालीं आहेत. ... ... ... ... २१७

परिणयाला श्रीनंदी व द्रोहिका अशा दोन बायका होत्या, द्रोहिकेकडून परिणय मारला गेल्यावर श्रीनंदी सती गेली, ती पुढें विद्याधरी झाली वगैरे गोष्ट आत्मप्रशंसा नांवाच्या ग्रंथांत आहे. ... ... ... २१७

जयप्रमेय या ग्रंथांतील निर्णक सराज नांवाच्या नायिकेला दैत्यांनीं पळवून नेलें; परंतु ब्रह्मा व विष्णु यांच्या मदतीनें ती परत येते. पूर्वजाति हें एक बलिभाषा काव्य आहे. यांत नरकयातनांचें वर्णन आहे. एका राजकन्येस राक्षसांनीं त्रास दिल्याचें वर्णन जनिनतोरा या ग्रंथांत आहे. भीमस्वर्ग नांवाच्या पुस्तकांत कांहीं विचित्र नरकवासी स्त्रीपुरुषांचें वर्णन आहे. केबोगुंदर या ग्रंथांतील नायकाचा जन्म एक श्वान व एक राजकन्या यांपासून झालेला आहे. मयपहित येथील राजपुत्र हयम् वुरुक हा ससक येथील राजकन्येशीं विवाह लावितो, परंतु कांहीं भांडण उपस्थित होऊन राजा, राणी व राजकन्या यांचा नाश होतो अशी हयम् वुरुकांत गोष्ट आहे. ... ... ... ... ... ... ... ,,

कुंजरकर्ण या बौद्ध गद्य ग्रंथांत नरकांतील यातनांचें वर्णन केलें आहे. पकंगररस पुस्तकांत त्याच नांवाच्या राजपुत्राची दह येथील राजकन्येशीं मैत्री झाली, तिच्या पित्यानें त्यास ठार मारिलें परंतु नारदानें त्यास जिवंत केलें असें कथानक आहे. पमंज जगंह मनिक अंकेरन् या ग्रंथांत त्याच नांवाच्या ब्राह्मणानें वासुकीपासून तेगेर नांवाचें शस्त्र मिळविल्याचें वर्णन आहे. ... ... २१८

हिंदुस्थानांत पुराणें व महाभारत यांतील कथांचा उत्तरकालीन वाङ्मयापासून तुटकपणा दिसतो, तसा यावद्वीपांत दिसत नाहीं. उलट, येथें कथावाङ्मयस्वरूपाचें सातत्य दिसून येतें. कांहीं बावतींत मराठी बखरी व बावद यांची तुलना करितां येईल. ... ... ... ,,

जावा व बलि येथें नीति या विषयावर पुष्कळ वाङ्मय आहे. देगुणाति हें एक उपदेशपर काव्य असून त्यांत राजधर्महि सांगितला आहे. 'इंद्रलोक' हा ग्रंथ राजनीति या विषयावर लिहिलेला आहे. इंद्रलोक हा मुत्सद्दीगिरीचा एक आचार्य होता. ... ... ... ,,

जावाच्या वाङ्मयांत संस्कृत शब्द शिरले, व भारतीय वृत्तेंहि जावामध्यें गेलीं. अजरपिकतन् अजिकेनांग वगैरे छंदःशास्त्रावरील ग्रंथ त्यांच्यांत झाले आहेत. नागरकृतागम काव्यांत अनेक वृत्तें आलीं आहेत; त्यांतील नांवांवरून व लक्षणांवरून त्यांत भारतीय वृत्तें किती आहेत व नवीन तेथें कशीं तयार झालीं याची कल्पना येते. ... ... ... ... ... ,,

जावा येथें आपलें वैद्यक कितपत प्रसार पावलें होतें हें कळत नाहीं. अंगुलिप्रवेश नांवाचा कामशास्त्रावरील एक ग्रंथ ऋषि संविन्न याच्या नांवानें प्रसिद्ध आहे. ... २१९

कलाकौशल्यावर निरनिराळे ग्रंथ असतील असें वाटतें. हत्यारें, आउतें यांचा उपयोग सांगणाऱ्या ग्रंथांचें अस्तित्वहि दिसून येतें. पंगे लिंगे लिंग पदर्तन इ तर हा ग्रंथ अशाच प्रकारचा आहे. ... ... ... ... २१९

जावांतील ज्या स्थलांच्या नांवांवरून तेथील मुसुलमानांच्या पूर्वजांविषयीं आपणांस आपलेपणा वाटतो त्या स्थलांचीं नांवें. ... ... ... ... ... २१९

जावानीज ग्रंथांत मयपहितासंबंधीं असलेली माहिती अपूर्ण व अविश्वसनीय आहे. परारतन नामक ग्रंथांतील माहिती उत्तम आहे. तुमपेल येथील राजांविषयीं ज्या ग्रंथांत माहिती आहे, त्या ग्रंथावर डॉ. ब्रँडिसनें भाष्य केलें आहे. परारतन ग्रंथांत मयपहित घराण्याचा इतिहास दिला आहे. केन अंगरोक हा या घराण्याचा संस्थापक होय. तुंगल अमेतुंग याचा खून होऊन अंगरोक राजा होतो. परंतु गुप्त कव्यारीनें तो ठार होतो शके ११६९. अंगरोकनंतर त्याचा सावत्र मुलगा, अनुशपति हा राजा झाला. परंतु त्याचा खून होऊन अंगरोकचे पुत्र रादेन्तोह जय व रंगवूनी हे अनुक्रमें राजे झाले. ... ... ... ... ... ... ... २२०

रंगवूनीनंतर कृतनगर (भट्टार शिवबुध) हा गादीवर बसला. त्यानें मलयु (सुमात्रा) देशाशीं युद्ध केलें. त्यामुळें दहचा राजा जयकटोंग यास फावलें. रादेन विजय हा (कृतनगरचा) सेनापति होता. कृतनगर हा दुसऱ्या एका युद्धांत मारला गेला. नंतर त्याचा सेनापति रादेनविजय हा मदुरा येथें वीरराजाच्या आश्रयास राहिला. शके ११९८ त जयकटोंग यानें तुमपेल घेतलें; तें केव्हां घेतलें याविषयीं थोडा वाद आहे. रादेनविजय यावरोवर कांहीं लोक ट्रिक येथें गेले; त्यांनां भूक लागली तेव्हां त्यांनीं मय नांवाचें कडू फळ खाल्लें, म्हणून त्या प्रदेशास मयपहित (कडुमय) हें नांव पडलें. ... ... ,,

शके १२१५ त तार्तार लोक या बेटांत उतरले; त्यांस रादेन विजय जाऊन मिळाला. त्यानें कृतनगरच्या राजपुत्रीस मयपहित येथें आणिलें. त्यानें तार्तार लोकांस हांकून दिल्यामुळें, ते चीनमध्यें गेले. ... ... ... ,,

चीनच्या बादशहास देण्यासाठीं तार्तार लोकांनीं दोन सुंदर राजकन्या त्या बेटांतून नेल्या असें म्हणतात. २२०

१२१६ मध्यें रादेनविजय (उर्फ कृतराजस जयवर्धन) हा राजा झाला. कृतनगरच्या राजकन्यांशीं त्यानें विवाह केले. त्यानें पूर्वोपकारस्मृतीदाखल कुदादु येथील जमीन कुदादु येथील कांहीं लोकांस दिली. तो शके १२१७ त वारला असावा. त्याच्यानंतर त्याचा पुत्र रादेन काल गेमेत हा मयपहितचा राजा झाला. त्याच्या वेळीं पुष्कळ बंडें झालीं; क्षत्रियांशीं याचें वैर होतें. तंगशाच्या पत्नीस त्यानें दूषित केल्यामुळें तंगशानें त्यास ठार मारिलें (१२५०). त्याच्या नंतर त्याची सावत्र वहीण ब्रेंग जीवन (जयविष्णुवर्धिनी) ही आपल्या हयं वुरुक नामक अल्पवयस्क मुलासाठीं राज्यकारभार पहात होती. हयं वुरुकच्या वापाच्या नांवाविषयीं घोंटाळा आहे. हयं वुरुकच्या वेळीं मयपहितचें राज्य बरेंच विस्तृत असून सर्वांत श्रेष्ठ होतें. सुमात्रा द्वीपाचा राजा आदित्यवर्मन् याचा जयविष्णुवर्धिनी राणीशीं कांहींतरी संबंध असावा असें ब्रँडिसनें म्हटलें आहे. राजसनगर व संग हयंग वेकासिंग सुख असेंहि हयम् वुरुक याला म्हणत. ... ... ... ... ... २२१

परारतन व नागरकृतागम या ग्रंथांत जावाच्या साम्राज्याखालीं कोणकोणते देश होते तें सांगितलें आहे. ... ... ... ... ... ... ... ,,

नागरकृतागमांत बरीच ऐतिहासिक माहिती आहे. तेथील राजघराणें, तेथील राजांचे परकीय राजांशीं संबंध, त्या राजांनीं केलेलीं सार्वजनिक कामें वगैरे गोष्टींची माहिती या काव्यावरून होते.... ... ... ... ,,

हयं वुरुक यास दोन वहिणी होत्या असें या ग्रंथावरून कळतें. हयं वुरुक याची सर्वांत धाकटी वहीण पजंग राजकन्या, इचें सुमनवरोवर लग्न झालें असें परारतन ग्रंथांत म्हटलें आहे. परंतु सिंघवर्धन हा तिचा नवरा होता असें या काव्यांत आहे. ... ... ... ... ,,

हयं वुरुक याचा द्वितीय विवाह त्याच्या मावसवहिणीशीं झाला असें इतिहासावरून कळतें; सुसुमनदेवी हें तिचें नांव असून ती सर्व राण्यांत श्रेष्ठ होती असें या काव्यांत म्हटलें आहे. ... ... ... ... २२२

परारतन ग्रंथांत एका मोठ्या श्राद्धसमारंभाचा उल्लेख आहे. हयं वुरुक यास नाट्याची आवड होती असें या ग्रंथावरून कळतें. ... ... ... ... ... ,,

प्रस्तुत काव्याच्या आठव्या सर्गांत राजधानीचें व इतर स्थलांचें वर्णन आहे. राजधानींतील इमारतींच्या वर्णनावरून भारतीय-जावानी शिल्पकलेचा इतिहास अजमावितां येतो. ... ... ... ... ... ,,

हयं वुरुकनें आपल्या सर्व राज्यांत प्रवास केला होता. या त्याच्या प्रवासाच्या वर्णनावरून १४ व्या शतकांतील भौगोलिक स्थिति कळून येते. ... ... ... ... ,,

मधून मधून कवीनें स्वतःवद्दलचे कांहीं प्रसंग वर्णिले आहेत. ४० ते ४९ पर्यंतच्या सर्गांत कवीनें केन अंग्रोक राजाच्या उदयापासून तो समाधिस्थ होईपर्यंतची हकीकत देऊन हयं वुरुकच्या कारकीर्दीपर्यंतची कथा गोष्टीच्या रूपानें दिली आहे. इतिहासग्रंथांत ११४४ शकांत केंदरीचा अस्त झाला असें म्हटलें आहे. ११४९ त राजस राजा मरण पावला असें या काव्यांत म्हटलें आहे, परंतु तो ११६९ त मरण पावला असें परारतनमध्यें सांगितलें आहे. त्याच्या नंतर त्याचा पुत्र अनूषनाथ हा गादीवर बसला. तो शैव होता. ... ... ... ,,

त्याच्यानंतर विष्णुवर्धन हा गादीवर बसला. विष्णुवर्धनाच्या हकीकतींत या दोन्ही ग्रंथांत साम्य आहे. तो शक ११९० किंवा ११९४ त मृत्यु पावला.... ... ,,

यानंतर कृतनगर गादीवर बसला. त्यानें जावाचें वर्चस्व बऱ्याच देशांवर स्थापिलें. याच्या स्वभाववर्णनामध्यें काव्यांत व परारतन ग्रंथांत विरोध दिसतो. तो शक १२१४ त निर्वाणास गेला. ब्रँडिस व कर्न यांमध्यें याच्या मृत्युशकावद्दल मतभेद आहे. ... ... ... २२३

केदिरीचा मांडलिक राजा जय कतोंग यानें बंड केलें, परंतु कृतनगरपुत्र विजय यानें तार्तार सैन्याच्या मदतीनें जय कतोंगचा पराजय केला. विजयनें कृतनगर जयवर्धन हें नांव धारण केलें व मयपहित ही आपली राजधानी केली. तो शक १२१७ त मृत्यु पावला. कृतोन येथें त्याचें एक बुद्धमंदिर आहे. नंतर शक १२५० पर्यंत जयनगरनें राज्य केलें. तो वैष्णव होता. लुमजंग येथील नंबिराजाचा पराजय यानें केला, ही हकीकत परारतन ग्रंथांत सविस्तर दिली आहे. ... ... ... ... ... ... ... २२३

जयनगरनंतर त्याची बहीण आपल्या अज्ञान मुलाच्या वतीनें राज्य करूं लागली. तथापि सेनापति पतिः गजमद यावर राज्याचा मुख्य भार होता. त्यानें अनेक विजय संपादिले. त्याचा स्वभाव फार उत्तम होता. ... ... „

मधून मधून कवीनें कांहीं समाधिस्थानांचें वर्णन केलें आहे. कृतनगर राजा शैव व बौद्ध या दोन्ही धर्मांस सारखाच मान देत असे.

हत्ती, हस्तिदंत वगैरे नजराण्याचे पदार्थ होते. देणग्यांचा कांहीं भाग ब्राह्मण स्त्रियांस मिळे; उच्च क्षत्रिय, राजाचे आप्त यांसहि भोज्य पदार्थांचा वांटा मिळत असे. „

राजवाड्याच्या उत्तरवेशीजवळ उच्च दर्जाचे क्षत्रिय व दक्षिण दरवाजाजवळ इतर क्षत्रिय व पंडित रहात असत. पूर्वेकडे शैव ब्राह्मणांची व दक्षिणेकडे बौद्धांची वस्ती होती. पश्चिमेकडे एक मोठें बौद्ध मंदिर होतें. ... ... २२४

१२८१ त राजानें लमजुंग जिल्ह्यांत स्वारी केली, त्या वेळीं जावांतील सर्व मांडलिक राजे त्याच्याबरोबर होते. पौर्णिमेच्या दिवशीं राजा सभेंत येण्याकरितां निघाला तेव्हां सर्व लहान थोर बौद्ध भिक्षूंनीं त्याला मुजरा केला. ... ... ... ... ... ... „

नंतर राजे, सरदार, प्रतिनिधी व मांडलिक राजे यांनीं अनुक्रमें मुजरे केल्यावर, सर्वांनीं आपआपले नजराणे दिले. ... ... ... ... ... ... ... „

सर्व जातींचे व दर्जांचे लोक चैत्र अमावास्येस एकत्र विचार करण्यासाठीं जमत असत, व सैनिक लोकांनीं कसें वागावें यावद्दल त्यांस उपदेश करण्यांत येत असे. „

ज्या देशांशीं हिंदुस्थानचा मोठा व्यापार चालतो अशा देशांत जावाचा दुसरा नंबर आहे. जावामधील वाङ्मयांत पुष्कळ अद्भुत कथा आहेत त्यांचें एकीकरण केलें तर एक मोठा सुरस ग्रंथ होईल. ... ... ... „

वलिद्वीपांतील सामाजिक स्थितीचें वर्णन ... ... „

यवद्वीपविषयक माहिती देणारे आधारग्रंथ. ... २३०

---

## प्रकरण ७ वें.

### हिंदुस्थान, चीन, जपान व तिबेट.

भारतीय संस्कृतीचा सर्वांत थोर विजय म्हणजे चिनी साम्राज्यावर झालेला बौद्ध संप्रदायाचा परिणाम होय. चिनी हान बखरीचा अभ्यास करून यासंबंधीं पुष्कळ माहिती मिळण्याजोगी आहे. डॉ. फ्रांके, कर्नल वरळीकर, वील व स्टानिलास जुलिआं यांनीं या संबंधांत अगोदर कांहीं कार्य केलें आहे. ... ... ... ... ... २३०

मनुस्मृतींत उल्लेखिलेल्या चंचु जातीचें नांव मांगोलियांतील एका आयुधजीवी लोकांस लाविलेलें आढळतें. 'लाउत्से'च्या 'ताओ' विचारपद्धतींत व औपनिषद तत्त्वज्ञानांत कांहीं सादृश्य आढळतें. ... ... ... २३१

आपल्या देशांतीलच संस्कृतीच्या निरनिराळ्या अंगांचें परीक्षण झालें नसल्यामुळें आशियाखंडांतील निरनिराळ्या भागांत झालेल्या आपल्या प्रवेशानें आपल्या राष्ट्रावर काय परिणाम झाला हें सांगणें आज कठिण आहे. एवढें मात्र म्हणतां येईल कीं, चिनी किंवा तार्तार हे भारतीय लालित्याच्या संवर्धनास कामीं आले आहेत. „

आज पुराव्याच्या अभावीं चिनी लोकांचा आपणांवर फारसा परिणाम झाला नाहीं असें गृहीत धरावें लागतें. „

**जपान.**—हिंदुस्थानाप्रमाणें जपानांत भौतिक शक्तींची उपासना असे. अनेक दैवतें देशांत उत्पन्न झालीं होतीं. त्यांनां धान्यादि वस्तू व प्रसंगीं घोडा, बायको हीं देखील समर्पण होत असत. भारतीय संस्कृति चिनी संस्कृतीच्या प्रवाहाबरोबर विशेषतः कोरियामार्फत जपानांत शिरली. जपानी मातृकांच्या रचनेवरून व त्यांच्या कांहीं मूर्तींच्या भारतीय स्वरूपाच्या तोंडवळ्यावरून भारतीयांचाहि जपानांत प्रवेश झाला असावा असा संशय येतो. जपानांतील नगारे व घंटा यांचें अस्तित्व आपणांशीं सादृश्याचें बोधक आहे. नवीन बौद्ध संप्रदायानें जुनीं उपास्यें मारून न टाकतां तीं बुद्धाचेच अवतार आहेत असा उपदेश केला. ... „

मांसनिवृत्तीचा बऱ्याच प्रमाणानें जपानांत प्रवेश, लढणाऱ्या लोकांचा समाजांतील उच्च प्रकारचा दर्जा, बाराखडीप्रमाणें स्वरचिन्हांचा व्यंजनांशीं संयोग आणि पारमार्थिक संप्रदाय व राष्ट्रीय संस्कार यांचें भिन्नत्व या गोष्टी भारतीय संस्कृतीची छाप कांहीं अंशीं चीनपेक्षां जपानमध्यें अधिक पडली असें दर्शवितात. ... ... „

नीतिज्ञान, ब्रह्मज्ञान, कलाकौशल्य, यांत्रिक सुधारणा, इतिहास इत्यादि बाबतींत सर्व जगास अपूर्व वाटणारे संस्कृतीचे अंश ज्या चिनी लोकांत दृग्गोचर होतात त्यांवर बौद्धांच्या संप्रदायानें छाप कशी पाडली हा मोठा विचाराचा प्रश्न आहे. केवळ राजानें स्वीकार केला म्हणून परकीय संस्कृतीचें दोन हजार वर्षें टिकणारें आवरण लोकांवर बसूं शकणार नाहीं. चीनमध्यें बौद्ध संप्रदायाचा प्रसार करण्यास किती कर्तव्यनिष्ठ निग्रही मनुष्यांचे परिश्रम कारणीभूत झाले हें कळण्यास साधन 'ब्यूनिओ नँजिओ' यांची ग्रंथसूची होय. ... ... ... ... ... ... २३२

ज्या भारतीय ग्रंथकारांच्या ग्रंथांचीं चिनींत भाषांतरें झालीं आहेत व ज्या भारतीय ग्रंथकारांनीं चिनी भाषेत भाषांतरें केलीं आहेत त्यांची यादी. ... ... ... २३३

---

## प्रकरण ९ वें.

### अर्वाचीन परदेशगमन—आफ्रिका आणि अमेरिका येथील वसाहती.

चौकशी-कमिशनच्या शिफारशींवरून १९१४ च्या इंडियन रिलीफ ॲक्टांत विवाहासंबंधाच्या कलमांत थोडी दुरुस्ती होऊन तीन पौंडांची डोईपट्टी उठविली गेली. ... २७५

१९१४ त स्मट्स व गांधी यांच्या दरम्यान झालेला पत्रव्यवहार बराच महत्त्वाचा आहे. ... ... ... २७६

१९१९ सालीं 'प्राप्त' हक्क व कायदेशीर 'वारस' या शब्दांच्या अर्थासंबंधांत ट्रान्सवाल सरकार व हिंदी लोक यांच्या दरम्यान वाद उपस्थित झाला. ... ... „

म्युनिसिपालिट्यांच्या शिस्तवार पंक्तिप्रपंचाविरुद्ध ब्रिटिश इंडिअन असोसिएशननें पार्लमेंटकडे अर्ज केला. सरकाराकडून नेमलेल्या कमिशनच्या रिपोर्टांत संप्राप्त हक्क व वारस शब्दांचा अर्थ हिंदी लोकांविरुद्ध केला. व व्यक्तींच्या जुन्या हक्कांस मान द्यावा, पण नवीन हक्क देणें बंद करावें अशी शिफारस केली. ... ... ... २७७

कमिशनच्या शिफारसी अंमलांत आणण्यासाठीं केलेल्या १९१९ च्या अमेंडमेंट ॲक्टानें हिंदी लोकांचा पक्ष व त्यांच्या विरुद्ध असलेला ॲंटिएशिआटिक लीगचा पक्ष यांपैकीं कोणाचेंहि समाधान झालें नाहीं. ... ... „

१९१४ सालीं ब्रिटिश कोलंबिआकडे गेलेले हिंदी लोकांचें जहाज बंदरांतून पुन्हां परत हिंदुस्थानाकडे परत लावण्यांत आल्यामुळें परत आलेल्या लोकांत असंतोष पसरून हिंदुस्थानांत दंगा झाला. या कोमागातामारू प्रकरणांत दंगेखोर व पोलिस या दोहोंपैकीं थोडेथोडे इसम गतप्राण होऊन दंगेखोरांपैकीं बहुतेकांस कैद करण्यांत आलें. ... ... ... ... ... ... ... २७८

ब्रिटिश कोलंबिआंत ४००० हिंदी लोक वसाहत करून आहेत. ब्रिटिश कोलंबिआंत एशिआटिकांचें प्राबल्य होईल या भीतीनें कोलंबिआंतील सरकार हिंदी लोकांशीं अन्यायाचें वर्तन करीत आहे. ... ... ... ... „

हिंदी लोक येऊन आपला प्रांत व्यापून टाकतील अशी वसाहतींनां वाटणारी भीति निरर्थक आहे. ... ... २७९

ट्रान्सवालमधील वादाच्या मुळाशीं आर्थिक बाबतींत चढाओढ होईल अशी वसाहतवाल्यांनां वाटत असलेली भीति आहे. हिंदी लोकांचा छळ होत असलेला पाहून ज्यांनां हिंदी लोकांबद्दल सहानुभूति वाटते असे लोक वसाहतींत असल्यामुळें ते हिंदी लोकांची स्थिति हळूहळू सुधारतील असें 'इअर बुक'कार आश्वासन देतात. „

मुदतबंदीनें परदेशीं मजूर पाठविण्याची पद्धति फार जुनी आहे. हिंदुस्थानांत मजूरभरती करण्यास अडचण पडूं लागल्यामुळें हिंदुस्थानसरकारनें ती अलीकडे बंद केली आहे. ... ... ... ... ... ... ... २८०

ही पद्धति कित्येक बाबतींत गुलामगिरीच्या पद्धतीप्रमाणें असल्यामुळें ती हिंदी लोकांस व इंग्लंडांतील लोकांस अप्रिय झालेली आहे. हिच्या योगानें रोजमुऱ्याची किंमत कमी होते व हिंदी लोक स्वदेशीं परत जातांनां आपली शिल्लक बरोबर नेतात म्हणून ती वसाहतींतहि अप्रिय आहे. निरनिराळ्या वसाहतींतील हिंदी लोकसंख्या दाखविणारें कोष्टक. ... ... ... ... २८०

१९१२ सालीं हिंदुस्थानसरकारनें मुदतबंदीच्या पद्धतीसंबंधीं चौकशी करण्याकरितां मि. मॅक्नील् व रा. चिमणलाल यांचें कमिशन नेमलें. ... ... ... २८१

या कमिशननें प्रसिद्ध केलेल्या रिपोर्टांत त्यांनीं मिळविलेली सविस्तर माहिती दिली असून शेवटीं या पद्धतीपासून तोट्यांपेक्षां फायदेच अधिक आहेत असा अभिप्राय दिलेला आहे. ... ... ... ... ... ... „

१९१० सालीं हिंदुस्थान सरकारानें मुदतबंदीची पद्धति नाताळापुरती बंद केली. परंतु ती अजीबात बंद करण्याच्या ठरावास १९१२ सालीं हरकत घेण्यांत आली. मध्यंतरीं वसाहतींतील अनाचाराच्या गोष्टी कानावर येऊन हिंदुस्थानांतील लोकमत अधिकाधिक क्षुब्ध होत चाललें होतें. ... ... ... ... २८२

मुदतबंदीच्या पद्धतीस कसा आळा घालतां येईल याचा सरकार विचार करीत आहे असें, १९१६ च्या सप्टेंबरांत व्हाइसरायांनीं सांगितलें. ... ... ... „

युद्धासाठीं मजुरांचा तुटवडा येऊं लागल्यामुळें १९१७ सालीं मुदतबंदीची पद्धति अजीबात बंद करण्यांत आली, व ती पुन्हां कधींहि अंमलांत येणार नाहीं असें वचन दिलें गेलें. फिजी बेटांतील मुदतबंदी कराराच्या मजुरांस मुक्त करण्यासंबंधीं त्या वसाहतीच्या सरकाराशीं आपला पत्रव्यवहार चालू असल्याचें १९१९ च्या नोव्हेंबरांत व्हाइसरायांनीं जाहीर केलें. ... ... २८३

मुद्दाम त्याच कामाकरितां लंडनमध्यें नेमलेल्या कमिटीनें १९१७ चे चार सहा महिने लोटल्यावर आपला 'सरकारमदतीची मजूरनिर्यातपद्धति' यासंबंधीं रिपोर्ट प्रसिद्ध केला होता. परंतु त्या वेळेस मॉंटेग्यूच्या आगमनाकडे लोकांचे डोळे लागले असल्यामुळें याच्याकडे त्यांचें जावें तितकें लक्ष गेलें नाहीं. ... २८४

२० व्या शतकाच्या आरंभापासून पेन्शनर्स व व्यापारी धंद्यांतील हिंदी लोकांचा इंग्लंडांत कायमची वस्ती करून राहण्याकडे कल होऊं लागला आहे. „

इंग्लंडांतील हिंदी लोकसंख्येचा सर्वांत महत्त्वाचा घटक म्हणजे हिंदी विद्यार्थिवर्ग. १९०९ सालीं लॉर्ड मोर्ले यांनीं विद्यार्थिवर्गाच्या साहाय्याकरितां एक इन्फर्मेशन ब्यूरो काढली. कर्नल वायली यांचा खून झाला त्या वेळीं इंग्लंडांत जें राजद्रोहाचें वारें पसरलें होतें तें नाहींसें करण्याकरितां ही संस्था काढण्यांत आली अशी हिंदी लोकांची समजूत झाली आहे. ... ... ... ... २८५

कॉलेजें किंवा दुसऱ्या संस्था यांनीं जे हिंदी विद्यार्थ्यांस प्रतिबंधकारक नियम केले आहेत त्यांत ब्यूरोचें कांहीं अंग आहे किंवा ब्यूरोला विद्यार्थ्यांवर शिस्तीचें अनियंत्रित दडपण लादतां येतें, अशा ज्या समजुती आहेत त्या चुकीच्या आहेत. ऑक्सफोर्ड व केंब्रिज युनिव्हर्सिट्यांत हिंदी विद्यार्थ्यांस प्रवेश मिळवून देण्याचें श्रेय ब्यूरोकडेच आहे. ब्यूरोकडून विद्यार्थ्यांस मित्रत्वाचा सल्ला मिळतो; त्यांवर जुलूम करण्यांत येत नाहीं. इंग्लंडांतील हिंदी विद्यार्थ्यांनीं महायुद्धांत भाग घेतला होता. ... ... २८६

आर्थिकदृष्ट्या, परदेशांत जाणाऱ्या हिंदू लोकांची किंमत सामान्यतः मजुरापेक्षां जास्त नाहीं. ... ... २८७

परदेशांत भारतीयांस मुळींच मान नाहीं; याला कारण त्यांची परतंत्रता व दौर्बल्य, व परकीयांच्या मनांतील स्पर्धामूलक द्वेष. ... ... ... ... ,,

परदेशीं गेलेले चिनी लोक हिंदूंपेक्षां जास्त मेहनती, प्रामाणिक व आपआपसांत एकी ठेवून चालणारे असल्यानें त्यांचा धंदा फार किफायतशीर होऊन त्यांनां परदेशीं कांहीं मान असतो. ... ... ... ... ... २८८

परदेशांत गेलेले चिनी लोक परदेशांत गेलेल्या हिंदूंपेक्षां जास्त आहेत हें म्हणणें सर्वस्वीं चुकीचें आहे. ,,

परदेशांत चिनी किती आहेत याची देशवार यादी. २८९

परदेशांत वसाहती करण्यास हिंदूंनां पुढें चांगला योग येणार आहे; पण कांहीं काळपर्यंत परदेशगमन बरेंच कठिण होईल. ... ... ... ... ... ... ,,

परदेशीं गेलेल्या स्वकीयांची वस्ती तेथें कायम रहावी व त्यांनीं स्वसंस्कृतीस चिकटून रहावें म्हणून कांहीं भांडवलवाले व बऱ्याचशा स्त्रिया तिकडे जाणें अत्यवश्य आहे. स्त्रियांनां तिकडे घेऊन जाण्यापासून अनेक फायदे आहेत; व त्यायोगें स्वदेशाचें व स्वसंस्कृतीचें बरेंच कल्याण होणार आहे. ... ... ... ... २९०

भारतीय पुरुष पुष्कळ व स्त्रिया अगदीं थोड्या अशी ज्या प्रदेशांत स्थिति आहे तेथें दिसून येणारे परिणामः (१) चार चार पांच पांच पुरुष एका स्त्रीबरोबर राहण्याची चाल पडली आहे; (२) बायको फितविण्याचे प्रयत्न फार होतात; (३) वृद्ध धनसंपन्नाच्या हातीं मुली पडतात व पुढें व्यभिचार, खून, पळून जाणें इत्यादि अनर्थ घडतात. ... ... ... ... ... ... ... २९१

हिंदू लग्नें बेकायदेशीर मानतात व कुलीनें कुली स्त्रीवर बलात्कार केला तरी त्याला महिन्या दोन महिन्यांवर शिक्षा देत नाहींत, हीं दोन कारणें नीतिविघाताला मदत करतात. शिक्षा कमी देण्यांत व्यापारी दृष्टि असते. २९२

हिंदुस्थानांतून बायका नेल्या जातात त्या बहुधा बाजारांतल्याच नेल्या जातात–याचीं कारणें व परिणाम. ,,

परदेशीं भारतीयांनीं स्थाइक व्हावयाचें तर बऱ्याच स्त्रिया पुरुषांबरोबर गेल्या पाहिजेत. असें न झाल्यास कांहीं भारतीय अविवाहित मरतील; कांहीं तद्देशीयांशीं लग्न करतील व एका पिढींतच परठिकाणचें भारतीयत्व नाहींसें होईल. पुरुषांबरोबर बऱ्याच भारतीय स्त्रिया ज्या विदेशीय स्थळीं असतील तेथें विदेशीय व भारतीय समाजांत परस्पर विवाहसंबंध बरोबरीच्या नात्यानें व्हावा ही कल्पना तेथील पुरुषांच्या मनांत उत्पन्न होईल, व असें होणें इष्ट आहे. पंजाबी पुरुष व इंग्रज मुली अशीं १०।१२ लग्नें कानडांत १९०८ सालीं झालेलीं होतीं.... ,,

निरनिराळ्या ४१ देशांत व वसाहतींत भारतीय पुरुष व स्त्रिया किती आहेत तें दाखविणारें कोष्टक.... २९३

हिंदी स्त्रिया येऊं नयेत अशी कानडा सरकारनें जी वृत्ति ठेवली तिच्यांतील हेतु व तिचा परिणाम. कॅनेडिअन म्हणतात कीं, हिंदुस्थानांत बंड झालें तरी पुरवलें, पण आम्हांला येथें काळा नको. दक्षिण आफ्रिकेंत हीच वृत्ति आहे. ... ... ... ... ... ... २९४

निरनिराळ्या वसाहतींत गेलेल्या हिंदूंसंबंधानें त्यांनां जे हाल भोगावे लागतात तें वर्णन करीत बसण्यापलीकडे सध्यां आपणांस कांहीं करतां येत नाहीं. प्राचीन काळचा आमचा प्रसार आणि आजचा प्रसार यांतील अंतर. ... २९४

## प्रकरण १० वें.

### हिंदुस्थानचे बाह्यांवर सांस्कृतिक परिणाम.

प्राचीन काळीं बाह्य राष्ट्रांवर आपल्या राष्ट्राचा परिणाम झाला त्याचें स्वरूपः–बौद्ध संप्रदाय चोहोंकडे पसरला. यानें पाली भाषेचा प्रसार झाला. उपनिषदांतील तत्त्वज्ञानाच्या एका विकृतीचाहि बौद्ध संप्रदायाच्या प्रसारानें त्या त्या ठिकाणीं प्रसार झाला. भारतीय चित्रकला, मूर्तिकर्म, वैद्यक, धर्मशास्त्र, पारमार्थिक तत्त्वविचार यांचाहि जागोजाग प्रसार झाला. तसेंच संस्कृत भाषेचा अभ्यासहि जागोजाग सुरू झाला. ... ... २९४

बौद्ध वाङ्मयाला श्रद्धापूर्ण सेवक व अभ्यासक पूर्वेकडे मिळाले. पश्चिमेकडेहि पारश्यांच्या पवित्र ग्रंथांत गौतमाचा उल्लेख आहे. ख्रिस्ती शुभवर्तमानांतील बऱ्याच कथा बौद्ध कथांशीं सदृश आहेत. ... ... ... ... ,,

शामनिझम (शामन=श्रमण) म्हणून सैबेरियांतील वन्य लोकांत व तार्तरीच्या कांहीं भागांत जो परमार्थसाधनसंप्रदाय रूढ आहे तो बौद्ध संप्रदायाचाच एक विकार आहे असें मानण्यास जागा आहे. मणिसंप्रदाय मध्यएशियांत होता त्यांतहि बौद्ध मतें होतीं. ... ... २९५

बौद्ध संप्रदाय हा वैदिक परंपरेची विकृति आहे. वेद बौद्धसंप्रदायाबरोबर पूर्वेकडे गेला नाहीं. वेदाचे आस्थेवाइक अभ्यासक यूरोप व अमेरिका येथें झाले व होत आहेत.... ... ... ... ... ... ... ,,

यूरोपीय पंडितांस वेदांचा अभ्यास करण्यास जी स्फूर्ति झाली तिच्या मुळाशीं कांहीं अंशीं ख्रिस्ती संप्रदायाचें वर्धन करण्याची इच्छा व कांहीं अंशीं शासनविषयक कारणें आहेत. फ्रेंच, डच किंवा जर्मन ग्रंथकारांप्रमाणें इंग्रजांच्या ग्रंथांत चिकाटी, जोरदारपणा किंवा चिकित्सकबुद्धि यांचें अस्तित्व दिसून येत नाहीं. ... ,,

१६५१ पासून १८८१ पावेतों झालेल्या संस्कृत वाङ्मयाच्या यूरोपीय अभ्यासकांसंबंधीं संक्षिप्त माहिती. या कालानंतर भारतीय विद्येचे संशोधक पुष्कळ वाढले. २९६

यूरोपांत व अमेरिकेंत वेदाचा व संस्कृत भाषेचा जो अभ्यास झाला त्याचें एक फल, यूरोपीय व अमेरिकन आम्हां भारतीयांस थोडेंफार आपले म्हणत आहेत हें

---

## प्रकरण ११ वें.

### बाह्यांचा हिंदुस्थानावर परिणाम.

बौद्ध काव्यांत नसलेली सीतेच्या हरणाची कल्पना वाल्मीकीनें हेलेनचें हरण व ट्रॉय शहराचा वेढा यांवरून घेतली. ... ... ... ... ... ... ... ३०७

डायो क्रिसोस्टोम यास रामायणाची माहिती होती असें दिसतें; तथापि एवढ्यावरून रामायणाचा कालनिर्णय करतां येत नाहीं. ... ... ... ... ... ३०८

रामायणांतील विश्वामित्रास ब्राह्मण केल्याची कथा व रामाकडून परशुरामाचा पराजय झाल्याची कथा ह्या जरी फार प्राचीन असल्या, तरी धेनुहरणाच्या व सीताशुद्धीच्या कथांतील शकादिकांचा उल्लेख, रामाची जन्मपत्रिका व इतर ज्योतिषविषयक उल्लेख, अर्थशास्त्रादि अर्वाचीन नांवें, परमार्थसाधनांबद्दल रामायणांत सांपडणारी ऐतिहासिक माहिती, व्याकरणशुद्ध भाषा, निरनिराळीं वृत्तें इत्यादि गोष्टींवरून हा ग्रंथ ग्रीक संस्कृतीची आर्यावर्तावर छाप पडल्यानंतर लिहिलेला दिसतो. ... ,,

राजतरंगिणींतील दामोदर राजाच्या कथेवरून रामायणाचें प्राचीनत्व ठरूं शकत नाहीं. ... ... ३११

रामायणाचा सर्वांत जुना उल्लेख जैनांच्या अनुयोगद्वारसूत्रांत आढळतो. ... ... ... ... ... ,,

महाभारतांतील रामोपाख्यानाच्या रामायणाशीं असलेल्या साम्यावरून महाभारतांत रामोपाख्यान घातलें तेव्हां रामायण हा ग्रंथ कोणत्या तरी रूपांत अस्तित्वांत होता असें ठरतें. या कथानकाचा भारतामध्यें प्रवेश रामायणाचा उपयोग वैष्णव लोक बौद्ध धर्माविरुद्ध करूं लागले त्या कालीं झाला. ... ... ... ... ,,

महाभारतांत व त्याची पुरवणी हरिवंश यांत रामायणासंबंधीं उल्लेख अनेक आहेत. ... ... ... ... ३१२

याशिवाय शूद्रकाची मृच्छकटिका, कालिदासाचें मेघदूत व रघुवंश, भट्टिकाव्य, शत्रुंजयमाहात्म्य, वासवदत्ता, कादंबरी, सप्तशतक, भवभूतीचीं नाटकें, कविभाषेंतील अर्जुनविजयकाव्य, संग्रहरामायण, प्रसन्नरामायण, प्रचंडपांडव, दशरूपक ग्रंथ, सप्तशती, त्रिविक्रमभट्टाची दमयन्तीकथा, राजतरंगिणी, ब्रह्मवैवर्तपुराण, विष्णुपुराण इत्यादि ग्रंथांत रामायणाचा उल्लेख सांपडतो. ... ... ३१३

प्रसन्नराघव, चंपूरामायण, राजशेखराचें बालरामायण आणि धनिकानें उल्लेखिलेलीं उदात्तराघव व छलितराम हीं व अनर्घराघव, कृत्यारावण इत्यादि दुसरीं पुष्कळशीं नाटकें रामायणाच्या आधारें रचिलीं गेलीं आहेत. ... ... ३१६

याप्रमाणें वेबर यानें एकंदर आठ मुद्दे शोधून शेवटीं असें ठरविलें आहे कीं, रामायणाच्या अस्तित्वाबद्दलच्या ग्रंथांतर्गत पुराव्यावरून रामायणग्रंथ इसवी सनाच्या ३ ऱ्या किंवा ४ थ्या शतकांत लिहिला गेला असें निघतें. ,,

लासेन यानें वेबरच्या निबंधांतील मुद्द्यांचें पांच भागांत पृथक्करण करून ते सर्व खोडून टाकले आहेत. ३१७

**वेबरच्या लेखास तेलंग यांचें उत्तर.**—बौद्ध कथेंत बहीणभावांच्या लग्नाची चाल दाखविली आहे व रामायणांत ती नाहीं, किंवा बौद्ध कथेंत रामायणांतल्यापेक्षां कमी मजकूर आहे एवढ्याच मुद्द्यांवरून दोन ग्रंथांचें पौर्वापर्य ठरविणें धाडसाचें आहे. ... ... ... ३१८

बौद्ध संप्रदायाविरुद्ध चळवळ करण्याकरितां ब्राह्मणांनीं एखाद्या बौद्ध कथानकांतील नायकास ब्राह्मणी स्वरूप देणें अतर्क्य दिसतें. उलटपक्षीं बौद्ध संप्रदायासारख्या फुटून निघालेल्या संप्रदायानेंच आपल्याबरोबर जुन्या परंपरागत कथा नेणें अधिक संभवनीय आहे. ... ... ... ३१९

वेबरनें दाखविलेलें रामायण व होमर या काव्यांमधील साम्य बरोबर नाहीं. रामायण व होमर यांत जें वरवर साम्य दिसलें त्यावरूनच डायो क्रिसोस्टोमचें भरतखंडांत होमरचें भाषांतर असावें असें मत झालें असेल. ... ,,

वेबरच्या मतें उत्तरकांड रामायणास मागून जोडण्यांत आलें असें जें आहे तें खरें धरल्यास, कालिदास, भवभूति वगैरे ग्रंथकार उत्तरकांड रामायणांतलेंच आहे असें समजत असल्यामुळें ही जोडण्याची क्रिया या कवींच्या कित्येक वर्षें अगोदर झाली असली पाहिजे; व मूळ रामायण तर त्याहूनहि जुनें असलें पाहिजे. रामायण पतंजलीच्याहि पूर्वीं रचलें गेलें असावें. ... ... ३२०

रामायणांत यवन, शक इत्यादिकांचा उल्लेख सांपडतो यावरून तो भाग ग्रीकशकादिकांच्या हिंदुस्थानांत स्वाऱ्या होऊं लागल्यानंतरच लिहिला गेला असें निष्पन्न होत नाहीं. ... ... ... ... ... ... ,,

संस्कृत वाङ्मयाची वाढ रामायणापूर्वीं झाली असल्यामुळें रामायण सापेक्षत्वानें अर्वाचीन आहे असें वेबर म्हणतो; पण संस्कृत वाङ्मयाची वाढच ख्रिस्ती शकाच्या पुष्कळ वर्षें अगोदर झाली नसेल कशावरून? रामोपासना कृष्णोपासनेपूर्वींची. कृष्णोपासना पतंजलि व पाणिनि यांच्या कालीं होती, पण ती रामायणांत नाहीं, यावरून रामायण पाणिनीच्या पूर्वींचें दिसतें. रामायणांतील सर्गांच्या शेवटचे भिन्न वृत्तांतील श्लोक प्रक्षिप्त आहेत. रामायणांतील ज्योतिषविषयक गोष्टींचा उल्लेख त्याच्या प्राचीनत्वास बाधक नाहीं. ... ... ... ३२१

महाभारतांतील, सामवेदाच्या परिशिष्टांतील व रघुवंशांतील रामायणाच्या उल्लेखावरून रामायणाचें प्राचीनत्वच सिद्ध होतें. अयोध्याकांडांतील बुद्धाचा उल्लेख असलेला श्लोक प्रक्षिप्त आहे. ... ... ... ... ,,

रामायणांतील सौमित्रि वगैरे नांवांचा पाणिनीच्या गणपाठांतील उल्लेख, ब्रह्मा, विष्णु व शिव यांचें त्रैमूर्तींत ऐक्य झालेलें नसणें, रामजानकीविवाहाचा साधा विधि, या गोष्टी रामायणाचें प्राचीनत्वच दर्शवितात. ... ३२२

स्टूडंट्स् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीपुढें वाचलेल्या या निबंधास प्रसिद्ध करतेवेळीं तेलंग यांनीं कांहीं टीपा जोडल्या त्या. ... ... ... ३२३

इ. विंडिश याच्या मतें अलेक्झांडरच्या स्वारीच्या वेळीं भारतीयांनां ग्रीकांचे नाट्यप्रयोग व विशेषतः त्यांचीं

स्वतंत्र भाषा असलेल्या प्रांतीय समाजाचें विशिष्टत्व परसत्तेखालींहि कायम राहतें. राष्ट्रस्वरूपी जातींचा प्रसरणशील संप्रदायाशीं संबंध आला असतां त्या स्वसमाजरक्षणार्थ परकीयांसहि आपल्या समाजांत घेतात, किंवा संस्कारविधींसारख्या लौकिक गोष्टींस महत्त्व देऊन आपलें वैशिष्ट्य कायम राखतात. ... ... ... ... ३३८

समाजांतील लहान लहान संघांच्या योगानें अनेकांचें एकीकरण सुलभ होत असल्यामुळें थोडाफार फेरफार करून जाती समाजास पोषकच होतील. ... ... „

हिंदु समाजांत आज बाह्यांस जातीचें सदस्यत्व मिळालें नाहीं तरी संप्रदायाचें सदस्यत्व मिळूं शकतें. सध्यांच्या आपल्या दुर्बल समाजांत येऊन कोणाचा कांहीं फायदा नसल्यामुळें समाजविस्तारास ती एक अडचण आहे. राष्ट्रस्वरूपी जाती व संप्रदाय यांत संप्रदाय उत्तरकालीन आहेत. संप्रदाय माणसामाणसांमध्यें निराळेपणा उत्पन्न करीत असल्यानें ते सर्व जगास नुकसानकारक आहेत.... ... ... ... ... ३३९

उपासनासंप्रदाय व शासनसंस्था या दोहोंचा निकट संबंध पश्चिम एशिया व यूरोप यांत आला. प्राचीन काळीं यूरोपांत समाजनियमनास उपासनासंघांतर्गत नियमांची आवश्यकता असल्यामुळें तेथें उपासनासंप्रदायाचें महत्त्व वाढलें. परंतु आतां तेथेंहि सामाजिक नीतितत्त्वांचा प्रचार अधिकाधिक होत जाऊन उपासनासंप्रदायाचें महत्त्व कमी कमी होत आहे. ... ... ... ... ३४०

हिंदुस्थानांत संप्रदायसंस्थेस अपयश येण्यास, सादृश्य उत्पन्न झाल्याशिवाय किंवा कारण पडल्याशिवाय भिन्नजातिविवाहाची अशक्यता व संप्रदायाची अस्थिरता व दौर्बल्य, या गोष्टी कारण झाल्या आहेत. आचारविषयक व शैक्षणिक विषमता काढून टाकल्याखेरीज केवळ सुधारकांच्या तात्त्विक वादानें जातिभेदादि गोष्टी नाहींशा होणें अशक्य आहे. सुधारणेचे तत्त्ववेत्ते चमकूं लागण्यापूर्वींच दहा लाखांपेक्षां अधिक हिंदू परदेशीं गेले होते व ब्राह्मणांतील भिन्न जातींत परस्परविवाहहि बराच रूढ झाला होता. ... ... ... ... ... ... ३४२

ब्राह्मणेतरांत देखील मिश्रजातिविवाहाचीं पूर्वापार उदाहरणें अनेक आहेत. लोकांस एके ठिकाणीं ओढील आणि कार्यप्रवृत्त करील असें तत्त्व पुढें आलें, कीं लोक आपोआप एकत्र होतात. हिंदुस्थानांत संप्रदायांच्या बाहेरच ज्ञान व विचार वाढल्यामुळें यूरोपांतल्याप्रमाणें संप्रदायांचें समाजावर वजन पडलें नाहीं. ... ... ३४३

प्रत्येक व्यक्तीस आकर्षण करणारा असा बलवान् केंद्र उत्पन्न झाला, तरच त्या केंद्राकर्षणामुळें व्यक्तींचें आणि पूर्वगत जातिरूप समुच्चयांचें आकर्षण दृढ होत जाऊन हिंदुस्थानांतील जातिभेद शिथिल होईल. ख्रिस्ती व मुसलमान जगांत जातिभेद नाहीं असें आपण समजतों तें सर्वांशीं खरें नाहीं. ... ... ... ... ... ३४४

व्यक्तींची काळजी घेण्याचें कर्तव्य राष्ट्रानें म्हणजे सरकारनें फारच नियमितपणें अंगीकारलें असल्यामुळें अडचणीच्या प्रसंगीं प्रत्येकास जातीकडेच जावें लागतें; समाजसुधारणेचें काम करूं पाहणाऱ्या लोकांत निश्चयी व करारी माणसांचा अत्यंताभाव आहे; सर्व जनसमाजावर परिणाम करण्यासाठीं अवश्य असणारा आपल्या सामाजिक संस्थांचा सत्यनिर्णायक व ऐतिहासिक अभ्यास झाला नाहीं; व्यवहारोपयोगी सर्व प्रकारचें शिक्षण जुन्या परंपरेच्याच हातीं आहे; या कारणांमुळें व बहुजनसमाज निरक्षर व सुशिक्षित वर्ग व्यवहारानभिज्ञ असल्यामुळें जातींचा व्यक्तींवर पगडा राहिला आहे. ... ... „

नवीन जातींच्या घटनेसंबंधानें व जुन्या जातींच्या विघटनेसंबंधानें सर्वसामान्य तत्त्वें—जातिभेद नष्ट न होण्यास कारणें लौकिक आहेत. मोठ्या प्रमाणावर शिक्षणाची खटपट होऊन समाजांत सादृश्य वाढल्याशिवाय जातिभेदाविरुद्ध केलेली ओरड फोल होते. ... ३४५

समाजाचें पृथक्त्व आचारमूलक, आचार विचारमूलक व विचार सत्यमूलक असल्यामुळें, हिंदु व मुसलमान समाजांचें एकत्व होणें अशक्य नाहीं. मुसलमानांच्या विचारांतच विकास होऊन किंवा त्यांच्यामध्यें ज्या जुन्या हिंदू चालीरीती अवशिष्ट राहिल्या आहेत त्यायोगें हिंदूंचें व मुसुलमानांचें आचारविचारसाम्य होण्याचा संभव आहे.... ... ... ... ... ३४६

---

## प्रकरण १३ वें.

### स्पर्धाक्षेत्राकडे पुन्हां एकदां.

स्पर्धाक्षेत्रांतील माहितीची विषयानुरूप मांडणी होते ती अशी: (१) हिंदु संस्कृतीनें आर्य भाषाकुलाबाहेरील संस्कारलेल्या भाषा; (२) तिनें संस्कारलेल्या जाती; (३) हिंदूंच्या वंशजांकडून व्याप्त झालेले देश; व (४) भारतीय संस्कृतीचें कालदेशदृष्ट्या महत्त्वमापन. ... ... ३४९

भारतीय व चिनी संस्कृतींच्या स्पर्धेचा इतिहास समजण्याकरितां प्रथमतः या दोन राष्ट्रांच्या राजकीय संबंधाचे इतिहासांतील उल्लेख एकत्र केले पाहिजेत. चीन, जपान, तिबेट, कांबोज व सयाम हीं ५ राष्ट्रेंच मुख्यतः या दोन संस्कृतींचीं स्पर्धाक्षेत्रें आहेत. ... ३५१

भारतीय व महंमदी संस्कृतींचें स्पर्धाक्षेत्र (१) अफगाणिस्तान, (२) बलुचिस्तान, (३) इराण, (४) बोर्निओ, (५) सोकोत्रा, (६) आफ्रिका, (७) तार्तरी, (८) ट्रान्सकाकेशिया, (९) लखदीव, (१०) सुमात्रा, (११) सेलिबिस, (१२) मालदीव, (१३) फिलिपाइन्स, (१४) मलायाद्वीपकल्प, (१५) जावा, (१६) बलि व लॉंबाक इतक्या देशावर पसरलें आहे. ... ... ३५२

भारतीय व यूरोपीय संस्कृतींच्या स्पर्धेत यूरोपीय संस्कृतीच्या पारमार्थिक अंगास म्हणण्यासारखें यश आलें नाहीं. तथापि तिच्या आधिभौतिक अंगाचा परिणाम मात्र ज्या ज्या देशांत यूरोपीय जनतेचा तेथील लोकांशीं निकट संबंध आला त्या त्या देशांतील सर्वच जनतेवर कमी अधिक प्रमाणानें एकसारखा होत आहे.... ... ३५४

बोल्शेव्हिझमचीं तत्त्वें सर्वमान्य होऊन त्या तत्त्वांनुसार जगांतील राष्ट्रांस संयोगवियोगाची मोकळीक मिळाली, तरच पूर्वी सांगितलेलीं हिंदुत्वाचीं शकलें संयुज्यमान होण्याची कांहीं आशा आहे; नाहीं तर नाहीं. ... ... ... ३५५

संस्कृत भाषेच्या प्रभावामुळें उत्पन्न झालेलें सादृश्य वृद्धिंगत करण्याचा प्रयत्न झाल्यास तें मात्र संवर्धनक्षम आहे. हिंदुत्वाच्या विस्ताराचा इतिहास तयार होऊन सर्व देशांत पसरविला गेल्यास इतिहासमूलक ऐक्य होणेंहि असंभवनीय नाहीं. ... ... ... ... ... ,,

हिंदुस्थान व हिंदूंनीं वसाहत केलेले देश हे सर्व कच्चा माल उत्पन्न करणारे असल्यामुळें त्यांमध्यें व्यापारविषयक दळणवळण वाढण्याचा संभव कमी. तथापि व्यापारविषयक संबंध घडण्याचीं व वाढण्याचीं परस्परापेक्षित माल व व्यापारसाधनें हीं जीं दोन अंगें आहेत, तीं विचारांत घेतां अगदींच निराश होण्याचें कारण दिसत नाहीं. ... ... ... ... ... ... ... ,,

पाश्चात्य भाषांचा आत्यंतिक संस्कार होण्यापूर्वी जर पूर्वेकडील राष्ट्रांस उन्नतीची व वाङ्मयोद्धाराची इच्छा झाली, तर संस्कृतसंभव अभिजात शब्दांद्वारें भारतसादृश्य वृद्धिंगत होण्यास अवकाश आहे. संस्कृत भाषेंतील शब्द निरनिराळ्या भाषांनीं घेतले असल्यामुळें भारतीय संगीताचा विस्तार होण्यास जागा आहे. मलयु व यावद्वीप भाषांत भारतीय ग्रंथांशीं संबद्ध असे कथाग्रंथ असल्यामुळें भारतीय सिनेमाकारखानदारांचे चित्रपट तद्देशीय लोकांचें मनोरंजन करूं शकतील. ज्योतिष व वैद्यक शास्त्रांतहि तिकडील लोकांशीं संबंध जोडतां येण्यासारखा आहे. नवीन वसाहतींतील भारतीयांचा तर हिंदुस्थानाशीं संबंध राहीलच. ... ... ... ३५६

समुच्चयभक्ति संयुक्तस्वार्थज्ञानमूलक असते. समुच्चयभावनाजागृतीसाठीं विसदृश समाजाविषयीं मत्सर व तिरस्कार उत्पन्न करण्यापूर्वी, हृदयांत उत्पन्न होणारी समाजवैशिष्ट्यभावना कोणतें हित साधणार आहे याचा विचार व्हावा.... ... ... ... ... ... ३५८

श्रौतस्मार्तधर्म बहुतेक नाहींसे होत चालले आहेत; ज्या कारणांमुळें हे अजीवात बंद पडत चालले आहेत, तीं मनुष्यस्वभावमूलक कारणें त्यांच्या पुनरुद्धाराच्या कामीं विघातक होतील. ... ... ... ... ३५८

समाजामध्यें असलेला नियंत्रणाभाव आणि ऋषींनीं आरंभ केलेल्या कार्यांची अपूर्णता यामुळें जातिभेद उत्पन्न झाला. चातुर्वर्ण्यसंस्थापना म्हणजे जातिभेदाचा नाश होय. ज्या आर्थिक व सामाजिक परिस्थितींत चातुर्वर्ण्याची कल्पना जोपासिली गेली ती आज नाहीं. ३५८

सोंवळ्याच्या कल्पना दिवसेंदिवस नष्ट होणार. यांविषयींचे नियम अव्यवहार्य वाटूं लागतात. ऐतिहासिक व शास्त्रीय ज्ञान या कल्पनांनां विघातक आहे. ... ... ३५९

हिंदु समाजांत परस्परांस बांधणाऱ्या गोष्टी एकदम नाहींशा होऊन त्याची लोकसंख्या कमी होईल हें शक्य असलें तरी असंभाव्य आहे; कारण इतिहासाच्या ज्ञानामुळें आत्मीयभावना तीव्रतेनें जागृत होईल. या आत्मीयभावनेमुळें ज्यां विषयीं पुढील पिढीला अभिमान वाळगतां येईल अशा गोष्टी आपल्या वाङ्मयांत अनेक आहेत.... ... ,,

आपल्या समाजाला सोडून जर एखादा परकीय समाजास मिळाला तर आपणांस जें दुःख होतें त्याचें कारण आपल्या पूर्वजांविषयीं, संस्कृत भाषेविषयीं व संस्कृत ग्रंथांविषयीं आपला अभिमान हें होय. आपणांस रक्षणीय आहे तें एवढेंच. ... ... ... ... ३६०

समाजांतील सुशिक्षितवर्गांत खुळ्या समजुती राहणारच. अंधविश्वासाचें क्षेत्र चिरकाल राहील.... ... ,,

सर्व समाजास एकत्र होण्यास कांहीं तरी सामान्य परंपरा व हिताहितांचें ऐक्य लागतें. लोकसत्तेची वाढ हें परकीय लोकांस देश्य समाजामध्यें विलीन होण्यास मोठें द्रावक आहे. ... ... ... ... ... ३६१

चातुर्वर्ण्याच्या बाहेरील जे लोक ते बाह्य लोक. ख्रिस्त्यांचे संस्कृतिभेदानें पाडतां येणारे वर्ग. अलीकडील प्रॉटेस्टंट ख्रिस्ती हिंदु संस्कृतीपासून इतर ख्रिस्त्यांइतके च्युत झालेले नाहींत याचीं कारणें. ... ... ... ,,

कॅथोलिक संप्रदायांत एकस्वरूपता असून त्यांतील सर्व लोकांचें नागरवाङ्मय लॅटिनमध्यें आहे. राष्ट्रीय विभक्तपणास हा संप्रदाय विरोध करतो त्यामुळें हिंदी राष्ट्रीयत्वाला हा अडथळा करील. ... ... ... ३६२

काळागोरा हा भेद इंग्रजांइतका पोर्तुगीजांत नव्हता, त्या कारणानें गोवानीज (ख्रिस्ती) एतद्देशीय संस्कृतीपासून अधिक च्युत झाले आहेत. ... ... ... ,,

हिंदुस्थानांतील ख्रिस्ती पारमार्थिक विचारांत यूरोपीयांवर अवलंबून नाहींत; त्यांच्यांतहि देशाभिमान उत्पन्न झाला आहे. ... ... ... ... ... ,,

ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रसाराविषयीं आपणांस वाटणाऱ्या वैषम्याचें कारण सामाजिक आहे. ... ... ३६३

प्रॉटेस्टंट ख्रिस्त्यांचा देशी भाषेशीं अधिक परिचय असतो. आजच्या मराठी वाङ्मयाचा अभ्यासक वर्ग ख्रिस्ती मंडळांत फारसा आढळत नाहीं याचीं कारणें

व त्यापासून झालेला परिणाम. महाराष्ट्रीय प्रॉटेस्टंट खिस्त्यांस उत्तम महाराष्ट्रीय वनविण्यास फारसे आयास पडणार नाहींत. ... ... ... ... ... ३६३

बायबलचें चांगल्या मराठींत भाषांतर करावें, खिस्ती प्रार्थनामंदिरांत (चर्चमध्यें) मराठी चालीचीं भजनें, कीर्तनें व गीतें सुरू करावीं आणि चर्चला मराठी वळणाचें कांहीं नवें नांव द्यावें, अशा तऱ्हेच्या चालू असलेल्या प्रयत्नांवरून महाराष्ट्रीय खिस्त्यांमध्यें महाराष्ट्रभाव वाढत आहेसें दिसतें. ... ... ... ... ... ३६४

गोवानीज खिस्तीलोकांत मात्र मराठी जाणणारे फारच थोडे असून पोषाखाच्या बाबतींतहि ते बहुतेक पाश्चात्त्य बनले आहेत. या लोकांस महाराष्ट्रीय बनविण्याचें अवघड काम करण्याकरितां तिकडे प्रथम मराठीच्या शाळा उघडणें, मराठीच्या अभ्यासास उत्तेजन देणें व मराठीच्या द्वारा महाराष्ट्रीय इतिहास व वाङ्मय यांचा प्रसार करणें हीं कामें महाराष्ट्रीय खिस्त्यांच्या हातून करविलीं पाहिजेत. ... ... ... ... ... ,,

बेने-इस्रायल उर्फ यहुदी लोकांसहि वरील उपायांनीं महाराष्ट्रीय बनविलें पाहिजे. शिवाय खिस्ती, यहुदी, मुसुलमान व पारशी या लोकांबरोबर आपलें महाराष्ट्रीयत्व न गमावतां व हिंदु समाजाचें बल वृद्धिंगत होईल अशा रीतीनें लग्नव्यवहारहि सुरू केले पाहिजेत. असें करणाऱ्या खऱ्या हिंदुसमाजभक्त सुधारकानें स्वजनांशीं निकट संबंध कायम ठेवून आपल्या सुधारणांस लोकमत अनुकूल करून घेण्याचा मानखंडना सोसूनहि प्रयत्न केला पाहिजे. ,,

गेल्या पिढींतील सुधारकांनीं या बाबतींत भयंकर समाजद्रोह केला आहे. ... ... ... ... ३६५

पारशी लोकांतहि संस्कृत भाषेचा प्रसार करून तद्द्वारा त्यांच्यांत हिंदूसंबंधानें आदरभाव व प्रेमभाव वाढविला पाहिजे. त्याकरितां त्यांच्या संस्कृतीचाहि आपण अभ्यास केला पाहिजे. ... ... ... ... ... ... ,,

यूरोपियनांनीं संस्कृत विद्येची ओळख करून घेऊन संस्कृत वाङ्मयासंबंधानें अनेक ग्रंथ लिहिले आहेत व त्यांस हिंदू शास्त्रीपंडितांची मान्यता मिळावी म्हणून त्यांच्या पूर्वापार समजुतींस न दुखविण्याचा ते प्रयत्न करतात. ... ... ... ... ... ... ,,

पारशी लोकांच्या पुरातन संस्कृतीसंबंधानें विद्वत्तापूर्ण लिखाण त्यांच्या समजुती न दुखवितां मराठींत केलें गेल्यास त्या मराठी ग्रंथांकडे पारशी वळतील. 'झंदावेस्ता' नागरी लिपींत तयार होऊन त्यावर तौलनिक पद्धतीनें मराठींत ग्रंथ झाले म्हणजे आपल्या पवित्र ग्रंथांचा अभ्यास पारश्यांस मराठींतून करावा लागेल.... ... ३६५

सर्वांत मुसुलमानी समाज आपल्या हिंदु समाजाच्या पचनीं पाडणें अत्यंत कठिण आहे. मुसुलमानांत अरबी भाषेवर व कुराणावर श्रद्धा असलेले लोक फार आहेत. करितां त्यांच्या कुराणादि धर्मग्रंथांचा अभ्यास करून आपण त्यांच्यांत मान्यता मिळविली पाहिजे; त्यांच्या अभ्यासांस मराठी भाषेंत ग्रंथ लिहून तद्द्वारा उत्तेजन दिलें पाहिजे. मुसुलमानांनीं संस्कृताचा व आपण अरबीचा अभ्यास केला पाहिजे. ... ... ... ३६६

महाराष्ट्रीयांस सर्व राष्ट्राचे पुढारी होण्याकरितां वर सुचविलेले सर्व उपाय अत्यंत आवश्यक आहेत. महाराष्ट्रीय 'केसरी'ची गर्जना यहुदी, खिस्ती, गोवानीज, पारशी, मुसुलमान या सर्वांस मराठ्यांइतकी देशभक्तिप्रेरित करूं लागली पाहिजे. मराठी कवी, नाटककार, निबंधकार व वर्तमानपत्रकर्ते या सर्वांनीं वरील ध्येय बाळगलें पाहिजे. ,,

वरील सर्व समाजांतील मनुष्यस्वभावाच्या ज्ञानावर नूतन राष्ट्रीय नीतिशास्त्र उभारलें पाहिजे. सर्वांच्या भावनांचें व मतांचें एकीकरण करणारा तत्त्ववेत्ता निघाला पाहिजे. ... ... ... ... ... ... ... ३६७

महाराष्ट्रीय समाजानें स्वतः बलाढ्य होऊन वरील निकटवर्तीयांस आपणामध्यें समाविष्ट होण्यास सोयी करून दिल्या पाहिजेत, व पेशवाईतलें घातक धोरण सोडलें पाहिजे.... ... ... ... ... ... ३६८

खिलाफत ठार मेल्यानें हिंदुस्थानांतील मुसुलमानांच्या राष्ट्रीय भावनेस जोरच मिळणार आहे. परंतु पॅन-इस्लामिझमची चळवळ आशेपलीकडे गेली असल्यामुळें आतां हिंदूंनीं मुसुलमानांस खिलाफत चळवळींत साहाय्य करून व जमल्यास यूरोपीय राष्ट्रांच्या अधाशी धडपडींतून तुर्कांचें राज्य शक्य तितकें टिकवून त्यांनां आपले ऋणानुबंधी करून ठेवण्यास हरकत नाहीं. ... ,,

भारतीय समाजव्यवस्था व भारतबाह्य भारतीयांची समाजव्यवस्था यांचा संबंध एकसंस्कृतितत्त्वावर जोडतां येईल किंवा नाहीं हें ठरविण्यापूर्वीं भारतीय समाजव्यवस्थाच कितपत टिकेल याचा विचार आवश्यक आहे. व त्यासाठीं अगोदर समुच्चय जर व्यक्तिहितासाठींच आहेत तर स्वहिताकरितां स्वसमाजाचा त्याग करून परसमाजांत कां जाऊं नये या गोष्टीचा तात्त्विक विचार झाला पाहिजे. ... ... ... ... ... ३६९

अशा कित्येक अडचणी आहेत कीं ज्यांमुळें मनुष्य स्वसमाजत्यागास जात्याच नाखूष असतो. ... ... ३७०

ज्यांनां तत्त्वासाठीं भांडण्यास अवकाश नाहीं अशा सामान्य जनांतील व्यक्तींची प्रवृत्ति कोणत्याहि दुःखाच्या किंवा अपमानाच्या प्रसंगीं ते प्रसंग स्वतःपुरते चुकविण्याकडे असते हें एक स्वसमाजत्यागास प्रवृत्तिकारक असें मुख्य कारण आहे. आपण मेल्यावर समाजाला चांगली स्थिति आली तर त्याचा आपणांस काय उपयोग असें या लोकांनां वाटतें. ... ... ... ... ... ३७१

परंतु स्पर्धामय जगांत समुच्चयांनीं जिवंत रहावयाचें तर व्यक्तींची समुच्चयांच्या ठायीं निष्ठा असणें अत्यंत आवश्यक आहे. ... ... ... ... ... ३७१

आसक्ति केवळ व्यक्तीच्या फायद्यातोट्यावर ठेवली तर अनवस्था उत्पन्न होते. सामुच्चयिक स्थिति एकदां नष्ट झाली म्हणजे पुन्हां ती जुळविण्यास त्रास पडतो. विश्वबंधुत्वाच्या दृष्टीनें देखील नियमित समाजावर जडलेली आसक्ति अश्रेयस्कर नाहीं. तथापि जो समुच्चय आपल्यासाठीं घटना उत्पन्न करीत नाहीं तो जिवंत राहण्यास नालायक आहे. ... ... ... ... ३७२

देशाभिमान व्यक्तीस लहान समुच्चयाचा अभिमानी धनवून मोठा समुच्चय बनविण्याची क्रिया दूर ढकलितो या दृष्टीनें अपायकारक नाहीं काय? ... ... ... ३७२

---

## प्रकरण १४ वें.

### सामाजिक दृढीकरण व समाजविस्तार या क्रियांचें जगद्विकासांत स्थान.

विवक्षित समाजाच्या अस्तित्वाची युक्तायुक्तता ठरविण्यास समाजदृढीकरणाच्या क्रियेचें स्वरूप जाणलें पाहिजे. ... ... ... ... ... ... ३७२

वैयक्तिक घटना व सामाजिक घटना यांच्यामध्यें चार सामान्य धर्म आहेत. समाजाच्या घटनेच्या वाढीवरोबर त्यांच्या घटकांतील परस्परावलंबित्व वाढत जातें हा त्यांतील एक धर्म होय. ... ... ... ... ३७३

जातिभेद, साम्राज्यें व वंशपरंपरागत वर्गभेद ह्या समाजदृढीकरणांतील पायऱ्या आहेत. ... ... ... ,,

भिन्न मनुष्यसमूहांनीं एका समाजांत येऊन समाजदृढीकरण करण्यास राजकीय सत्तेची वृद्धि किंवा सामान्य शत्रूविरुद्ध संघीकरण असें कांहीं तरी निश्चित कारण लागतें. ... ... ... ... ... ... ३७४

जगामध्यें आतां मानवीजातीच्या वूरीकरणाची क्रिया बंद झाली असून एकत्व उत्पन्न करण्याची क्रिया चालू आहे. ... ... ... ... ... ... ... ,,

राजकीय सत्तेचा विजय व सांप्रदायिक सत्तेचा विजय हीं दोन एकीकरणास कारक अशीं महत्त्वाचीं कारणें आहेत. ... ... ... ... ... ... ... ,,

हल्लीं राजकीय सत्तेमधील एकीकरणसंबद्ध अशा गोष्टी म्हटल्या म्हणजे परकीय राजसत्ता जित लोकांच्या भाषेचा नाश करून तेथें आपली भाषा स्थापित करिते; जित लोक, खुषामतीसाठीं म्हणा किंवा जेत्या राष्ट्रांतील संस्थांच्या वास्तविक किंवा भ्रामक गुणाधिक्याच्या आणीबीमुळें म्हणा, जेत्या जातीचें अनुकरण करतात, व कधीं कधीं वैयक्तिक फायद्यासाठीं जेत्यांच्या दैवतसंप्रदायाचा अंगीकार करतात. ... ... ३७४

संप्रदायाची चळवळ स्वतःच्या श्रेष्ठ अशा अंतिम ध्येयाच्या प्रसारार्थ म्हणून वस्तुतः कधींच झालेली नाहीं. आपल्या संप्रदायांतील कल्पना दुसऱ्या समाजावर लादल्यानें त्याचा एकंदरींत काय परिणाम होईल याचा संप्रदायप्रसारक विचारच करीत नाहींत. ... ... ३७५

दैवतसंप्रदाय समाजाचें संघट्टन करण्यापेक्षां विघट्टनच कसें करितात हें खिस्त्याच्या उदाहरणावरून कळून येईल. ,,

ज्याचें पूर्णत्वानें दृढीकरण झालें आहे असा समाज आढळणें अशक्य आहे. पूर्णत्वानें दृढीकरण झालेल्या समाजांत पूर्वीची वंशविषयक कल्पना पूर्णपणें मावळून तिच्या जागीं या संयुक्त समाजाची कल्पना स्थापित होते. घटकभूत निरनिराळ्या संस्कृतींची पूर्वींची श्रमविभागणी नाहींशी होऊन नवीन श्रमविभागाचीं तत्त्वें उदयास येतात; व समाजांतील उच्चवर्ग एकच होतो. ... ३७७

समाजाचें पूर्णपणें दृढीकरण होण्यास उपासनापद्धती, दैवतें, परंपरागत विचार, भाषा, चालीरीती, पोषाख, उपभोग्य वस्तू व आनुवंशिक संस्कार या बाबतींत निरनिराळे भेद असणें हानिकारक आहे. ... ... ...

हिंदुसमाजांतील सांप्रतचा जातिभेद पूर्वींच्या चांगल्या स्थितीचें अवनत स्वरूप नसून केवळ दृढीकरणाची क्रिया अपुरी राहिल्यानें घडलेला परिणाम आहे. पूर्वींचे जातिभेद मोडण्याचे प्रयत्न व्यर्थ होण्याचें कारण आतांपर्यंत योग्य वेळ आली नव्हती हें होय. ... ... ... ,,

पूर्वींच्या समाजसुधारकांचे सर्व प्रयत्न सद्धेतुप्रेरित व सुयोजित होते असें म्हणतां येणार नाहीं. ... ... ३७८

आपल्या समाजाचें दृढीकरण करण्याच्या बाबतींत फार महत्त्वाचें असें काम एका परकीय सत्तेनें केलें आहे. जातिभेद मोडणें हें मनुष्याच्या शक्तीपलीकडील काम नाहीं. जातिभेद मोडणें म्हणजे हिंदुत्वाचा उच्छेद करणें नसून प्रसार करणें आहे. ... ... ... ... ३७९

हिंदू कल्पनांचा प्रसार होऊन व हिंदुसमाजाबाहेरील लोक या समाजांत येऊन अशा दोन्हीहि रीतींनीं भविष्य काळीं हिंदुत्वाचा प्रसार होणें शक्य आहे. अहिंदूंनां हिंदू करणें याचा अर्थ परकीय कुलांनां चातुर्वर्ण्यांत स्थान देणें इतकाच काय तो आहे. ... ... ... ,,

कांहीं हिंदू लोक प्रगल्भसंस्कृतिविहीन लोकांत मिसळून त्यांजमध्यें महत्त्वाचें स्थान व्यापून वसले म्हणजे कालांतरानें हे असंस्कृत लोक हिंदू चालीरीती स्वीकारतील. पुष्कळ प्रसंगीं हिंदु या नांवाची जाहिरात देण्याचेंच काम उरलेलें असतें. ... ... ... ... ... ... ३८०

मुसुलमान व खिस्ती यांनीं हिंदु हें नांव न स्वीकारण्याचीं कारणें हिंदु हा एक मूर्तिपूजक पारमार्थिक संप्रदाय आहे ही त्यांची कल्पना व तसें केल्यानें आपण हिंदु समाजाच्या कनिष्ठ जातींत मोडले जाऊं ही त्यांची भीति हीं होत. ... ... ... ... ... ... ३८०

पूर्वींच्या काळीं परकीय लोक आपल्या समाजांत येऊन केवळ शूद्र किंवा अंत्यज स्थानच पावले नाहींत. हल्लीं परकीय समाजांतील चांगल्या माणसांनां हिंदु

समाजांत येण्याचा मार्ग म्हणजे त्यांनीं आर्यसमाज ब्रह्मसमाज यांसारख्या संप्रदायांत शिरावें हा होय. ... ३८०

हिंदुसमाजाला आज भवितव्यनियमन करण्याची शक्ति नाहीं. हिंदुसमाजव्यवस्थेंतील सर्वांत मोठा दोष म्हटला म्हणजे दृढीकरणाची अल्पता हा होय. अनेक समाज एका संस्कृतीखालीं आणावयाचें कार्य झालें, पण उत्पन्न केलेलें सादृश्य दृढ करावयाचें काम उरलें. हिंदुस्थानांत संप्रदायसंस्थेस एकीकरणाच्या कामीं अपयश येण्याचें कारण येथील परंपरागत बौद्धिक संपत्ति सर्वांत श्रेष्ठ दर्जाची होती. शिवाय एखादें मत चांगलें असेल तर घ्यावें, त्याकरितां जात बदलावयास लावणाऱ्या संप्रदायास मिळावयाचें कारण नाहीं अशी हिंदूंची वृत्ति आहे. ... ... ... ... ... ... ३८१

येथील ऐक्याच्या अभावाचें कारण असें दिसतें कीं, हिंदुत्वांत कोणत्याहि प्रकारची राष्ट्रीय भावना म्हणून उत्पन्न झाली नाहीं. जातीची कल्पना व त्यानंतर एकदम मानव्याची कल्पना अशा दोनच कल्पना प्राचीन हिंदू लोकांस अवगत होत्या. ... ... ... ... ... „

मुसुलमान लोक हिंदुस्थानांत घुसून येथें वस्ती करी-पावेतों आपण अभारतीयांहून भिन्न आहोंत ही कल्पना भारतीयांस नव्हती. मुसुलमान आल्यावर त्यांनां म्लेच्छ हें नांव देऊन त्यांची व पुढें इंग्रज वगैरे ख्रिस्ती लोकांचीहि नीच जात म्हणून गणना करण्यांत येऊं लागली. सर्व जग आपलें म्हणून स्वीकारील असें या समाजव्यवस्थेचें स्वरूप नाहीं.... ... ... ... ... ३८२

जगाची प्रवृत्ति एक मोठा समाज होण्याकडे असल्यामुळें जागतिक समाजघटनेच्या तत्त्वास अनुसरून अंतर्गत व्यवस्थेच्या दृष्टीनें एक, पूर्ण व दृढ असा समुचय निर्माण करणें हें आपलें मुख्य कार्य आहे. ... ... „

तथापि फार मोठें ध्येय पुढें ठेवणारांपेक्षां बेताचें ध्येय ठेवणारांच्या हातूनच अधिक कार्य घडतें. हिंदूंचें तत्त्वज्ञान अत्युच असतांहि एकी होऊं शकली नाहीं ती याचमुळें. म्हणून हें मोठें ध्येय साधण्यापूर्वीं हिंदुस्थान हें माझें राष्ट्र आहे असें मनापासून वदविणारी देशभक्ति भारतीयांत उत्पन्न करणेंच हिताचें होईल. ... ... ३८३

पारमार्थिक बाबतींत उदारपणाच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार करणें, समाजाच्या दृष्टीनें सर्व जाती व वर्ग सारखेच आहेत ही कल्पना निर्माण करणें व ती व्यवहारांत आणण्याकरितां विटाळाच्या अश्रौत कल्पना व लग्नासंबंधाचे निर्बंध टाकून देणें हे भारतीय ऐक्याचे उपाय आहेत. पण हे फेरफार पुराणसंरक्षणप्रिय लोकांच्या पद्धतीनें घडवून आणले पाहिजेत. ... ... ... ... „

प्रादेशिक समाज व जातिस्वरूपी समाज असे समाजाचे दोन प्रकार आहेत. कोणताहि प्रादेशिक समाज संकुचित वृत्तीचा होऊन जातीच्या स्वरूपाचा होण्याचें भय नेहमींच असतें.... ... ... ... ३८४

जगांत पूर्णपणें जातिस्वरूपाचा किंवा पूर्णपणें प्रादेशिक असा समाज आढळत नाहीं. ... ... ... ... ३८५

जेव्हां एखादी जात आपली परिभ्रमणवृत्ति सोडून एका विशिष्ट प्रदेशांत स्थायिक होते व तिचे आचारनियम त्या प्रदेशांतील सर्व लोकांस सामान्य होऊं लागतात तेव्हां तेथें लवकरच प्रादेशिक समाज तयार होतो. ... ... ... ... ... ... ... „

परकीय लोकांनां त्यांच्या चाली व कायदे असतील त्यांप्रमाणें चालूं दिलें तर त्यांचें जातिवद्ध स्वरूप कायम रहातें. ... ... ... ... ... ... ... „

एकमेकांपासून फार भिन्न अशा निरनिराळ्या प्रदेशांतील जाती एकत्र झाल्या म्हणजे जातिभेद उत्पन्न होतो. ... ... ... ... ... ... ... ३८६

सात्मीकरणास दोन्हीहि बाजूंकडून तयारी करावी लागते. परप्रदेशगमन विशेष सुलभ झालें तर जगांतील मनुष्यांमध्यें एक प्रकारचें साम्य उत्पन्न होईल. ... ३८७

हिंदुस्थानांतील जातिविशिष्ट समुचयांचें प्रदेशविशिष्ट समुचयांत रूपांतर करण्यास देशाचे भाषेनुसार विभाग पाडणें, हिंदी राष्ट्र तयार करण्याच्या कल्पनेचा प्रसार करणें व सर्वमान्य असा एक उच्चवर्ग तयार करणें या गोष्टी अवश्य आहेत. ... ... ... ... ... ३८८

समाजाला संप्रदायांची आवश्यकता नाहीं. ... „

सर्व जगास सामान्य अशी एक परंपरा अगर मानवधर्म निर्माण करावयाचा हें हिंदुधर्मापुढलें कार्य आहे. ३८९

जगांतील ज्ञान व विचार आणि मतें व उपास्यें यांबद्दल सुशिक्षित हिंदू लोकांच्या कल्पना या गोष्टींच्या पायावर संस्कृतींचें ऐक्य शक्य आहे. ... ... ... ३९०

---

## प्रकरण १५ वें.

### इतिकर्तव्यता.

### उपप्रकरण १ लें.

### राष्ट्रधर्मसंस्थापना.

आपल्यापुढील सर्वांत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे सामाजिक. ... ... ... ... ... ... ३९१

सामाजिक एकरूपतेची वाढ म्हणजेच आर्थिक पुनर्घटना. सर्वसामान्य संस्कृति उदयास कशी येते यासंबंधीं नियमांचें ज्ञान व्यवहारदृष्ट्या महत्त्वाचें आहे. ३९२

(१) इंग्रज, (२) हिंदू, (३) मुसुलमान व (४) पार्शी, यहुदी वगैरे भिन्न भिन्न संस्कृतींचे समाज हे भारतीय समाजांतील मुख्य घटक आहेत. ... ... ... ३९२

नेग्रिटो, कोलेरियन, द्राविड, आर्यन् व मंगोलियन या पांच वंशांनीं मिळून हिंदु संस्कृति निर्माण केली

---

## उपप्रकरण २ रें.

### राष्ट्रधर्म व राजकीय बल.

याच सालीं नेमल्या गेलेल्या पोटकमिटीनें सुचविलेल्या राष्ट्रीय सभेच्या घटनेच्या नव्या मसुद्यांतील कांहीं महत्त्वाचीं कलमें [ टीप ].... ... ... ... ... ४१३

'ब्रिटिश काँग्रेस कमिटी' म्हणून लंडनमध्यें असलेल्या राष्ट्रीय सभेच्या शाखेबद्दलची माहिती. ... ... ... ४१६

काँग्रेसमधील पक्षभेद १९०७ सालच्या सुरतच्या बखेड्यापूर्वींच दिसूं लागला होता. बंगालच्या फाळणीमुळें बहिष्काराची चळवळ सुरू झाली. यातत्त्वाचें १९०६ च्या काँग्रेसनें समर्थन केलें. पण तत्त्वभेदापेक्षां प्रकृतिभेदामुळें कांहीं पुढाऱ्यांस ही चळवळ न पटून काँग्रेसमध्यें मवाळ व जहाल असे दोन पक्ष तयार झाले. सुरतेस बखेडा होऊन जहालपक्ष काँग्रेसमधून बाहेर पडला तो १९१६ मध्यें समेट होऊन आंत शिरला. याच सुमारास गोखले व मेहता वारल्यामुळें नेमस्तपक्ष कमजोर झाला व काँग्रेसचें पुढारीपण लो. टिळक यांजकडे गेलें. ते १९२० मध्यें वारल्यावर महात्मा गांधी पुढारी बनून असहकारिता पुकारली गेली. खिलाफत व पंजाबप्रकरण यांच्या योगानें सरकारविरुद्ध तीव्र असंतोष पसरल्यामुळें, स्वयंनिर्णयाच्या तत्त्वामुळें, आयर्लंडांतील चळवळीमुळें व ईजिप्तला स्वराज्य मिळाल्यामुळें संपूर्ण स्वराज्य मिळविण्याची जोरांत आलेली ही असहकारितेची चळवळ ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या हिंदुस्थानास अधिकाधिक स्वराज्याचे हक्क देण्याच्या धोरणास पोषकच होणार आहे. ४१६

---

## उपप्रकरण ३ रें.

### लोकसत्ता व लोकमत यांजकडून अपेक्षा.

प्राचीन हिंदुस्थानांत उत्तरकुरु, उत्तरमद्र, लिच्छिवि वगैरे लोकसत्तात्मक राज्यें होतीं. राजशासित राष्ट्रांमध्यें देखील कार्यांचा बराचसा भाग लोकांनींच उचललेला असतो.... ... ... ... ... ... ... ४१७

लोकसत्ताक राज्याचें आत्यंतिक स्वरूप स्वित्झर्लंडांत आहे. तेथें सर्व लोकांच्या मतानें कायदे होतात. इंग्लंड वगैरे देशांतहि स्त्रीमताधिकारासारखे अवघड प्रश्न अखिललोकमतानें ( रेफरंडमनें ) सोडवितात. ... ... „

स्वित्झर्लंडच्याच उदाहरणावरून लोकसत्ताक राज्यांतहि वंशपरंपरेनें अधिकार चालणें अशक्य नसतें असें दिसून येतें. ... ... ... ... ... ... ४१८

तथापि लोकमत कायद्याच्या बारीक खांचाखोंचींकडे दुर्लक्ष करतें; त्यामुळें न्यायनिर्णयाचें काम लोकमतानें चोख होत नाहीं, ही गोष्ट यूरोपियन ज्यूरीनें काळ्यागोऱ्यांमधील केलेल्या न्यायनिवाड्यांवरून सिद्ध होते.... „

लोकांस अधिकार असतां लोकमत बनविणाऱ्या संस्था किंवा चळवळ करून लोकांचीं मतें मिळविण्याचा धंदा करणारे पुढारी यांच्या हातांत राजसत्ता आल्यावांचून रहात नाहीं. अमेरिकेंत प्रतिनिधींच्या निवडणुकींचीं सर्व सूत्रें "बॉस"च्याच हातांत असतात. ... ... ४१९

मोठाल्या जाहिराती देऊन, पगारी वक्त्यांमार्फत व फोनोग्राफमधील व्याख्यानांच्या द्वारें आपआपल्या पक्षाचीं मतें व उमेदवारांची लायकी वरील संस्था प्रसिद्ध करितात. स्वपक्षांत लोक ओढण्याकरितां नोकऱ्या मिळवून देणें, अडचणींतून व संकटांतून सोडविणें वगैरे युक्त्या योजतात. शिवाय धर्मपंथाचा अभिमान जागृत असतो. प्रॉटेस्टंट मतदार कॅथोलिक किंवा ज्यू उमेदवारास मत देत नाहींत. ... ... ... ... ... ... „

परपक्षाच्या उखाळ्यापाखाळ्या काढणें, पैसेखाऊपणाचा आरोप ध्वनित करणें, किंवा प्रसंगविशेषीं तडजोड करून तिसऱ्या पक्षाचा पाडाव करणें वगैरे सर्व प्रकार अमेरिकेंत चालतात. ... ... ... ... ... ४२०

इंग्लंडांतील लोकसत्तेची वाढहि मुख्य प्रधानाची जागा आपल्या हातीं पडावी याकरितां मुत्सद्द्यांनीं केलेल्या प्रयत्नांमुळेंच झालेली आहे. ... ... ... ... „

लोकशासित राज्य चालविणें फार कठिण आहे. त्याकरितां प्रत्येक नागरिकास चांगलें शिक्षण द्यावें लागतें; अनेक उपायांनीं त्यांच्यांत सादृश्य व सहिष्णुता उत्पन्न करावी लागते, परस्परांचें दळणवळण वाढवावें लागतें, पुढाऱ्यांनां सर्वांशीं स्नेहभाव ठेवावा लागतो; हे सर्व लोकसत्ताक राज्यापासून फायदे होतात. उलट, राजशासित देशांत अधिकारी उद्दाम असतात, प्रजाहि परस्परांशीं बेपर्वाईनें वागते; व लोकनियंत्रणाभावामुळें राजा व दरबारी वर्ग दुराचरणप्रवृत्त होतो. ... ... ४२२

---

## उपप्रकरण ४ थें.

### हिंदुसमाजबलवर्धन.

हिंदुसमाजांतील मोठा दोष म्हणजे सर्व समाजास एकत्र जोडणाऱ्या शासनसंस्थेचा अभाव. जनता साक्षर होऊन तिला सामुच्चयिक उत्कर्षाची इच्छा झाल्याशिवाय सामाजिक अंतर्घटनेचे प्रयत्न व्यर्थ जातील. ... ... ४२२

हिंदुसमाजबलवर्धनासाठीं, भाषावार राजकीय विभाग, देशी भाषेच्या द्वारें या प्रत्येक नवीन प्रांताची राज्यव्यवस्था चालविणें व प्रत्येकामध्यें देशी भाषेंतून सर्व शिक्षण देणारें एक तरी विद्यापीठ ठेवणें या सुधारणात्रयीनें सादृश्य उत्पन्न करून हिंदुस्थानचें राष्ट्रीभवन केलें पाहिजे. ... ... ... ... ... ... ४२३

समाजांत ऐक्य आणण्यासाठीं उच्च संस्कृतीचा लोकमान्य शिष्टवर्ग पाहिजे. आर्यसंस्कृतीचा विजय व्हावयासाठीं चातुर्वर्ण्यविषयक समाजनीति पूर्ववत् व्यापकरीतीनें प्रस्थापिली पाहिजे. ... ... ... ... ... ४२४

धर्म व शासन हीं आंग्लबुद्धी बनलेल्या हिंदू कायदेपंडितांनीं बिघडविलीं आहेत. हिंदूंचें धर्मानुसार शासन होण्यासाठीं स्वतंत्र न्यायासनें निर्माण केलीं पाहिजेत.... ४२५

---

## उपप्रकरण ५ वें.

### चातुर्वर्ण्यसंस्थापना.



---

## उपप्रकरण ६ वें.

### आर्थिक भवितव्य.

देश्य अशा उच्च राहणीच्या अभावामुळें कांहीं कालपर्यंत समाजाची प्रगति बंद होते. ... ... ... ४४४

परकीय सांस्कृतिक वर्चस्वाचे दोष काढून टाकण्यासाठीं सामाजिक परंपरेमध्यें ज्यांनां श्रेष्ठ स्थान आहे अशा लोकांत सुधारणा केली पाहिजे. सर्व राष्ट्राला सामान्य अशी संस्कृति उत्पन्न करण्याच्या कामीं राष्ट्रीय सभा व सरकार या दोहोंचाहि उपयोग करून घेतला पाहिजे.... ... ... ... ... ... ... ,,

साम्राज्यवाद भारतीयांनीं घ्यावा असें जर इंग्रजांनां वाटत असेल तर त्यांनीं भारतीयांच्या राष्ट्रधर्माचे आणि राष्ट्रीय भावनांचे कट्टे पुरस्कर्ते बनलें पाहिजे.... ... ४४५

समाजाची प्रगति व्हावी म्हणूनच माणसें शासनसंस्थेखालीं राहतात. सरकार हें सर्व राष्ट्राचें पुढारी असतें ही जाणीव हिंदुस्थानसरकारास दिसत नाहीं. ... ४४६

हिंदुस्थानांत होणाऱ्या निरनिराळ्या मालाच्या खपाच्या बाबतींत क्रांति घडवून आणण्याकरितां इंग्रज अधिकाऱ्यांस देश्य पोषाख करावयास लावून सरकारला भारतीयत्वाचें पुट चढविलें पाहिजे. या गोष्टीचें आर्थिक सामाजिक व राजकीय दृष्टींनीं फार महत्त्व आहे. ... ,,

देशांतील भौतिक शक्तींचा उपयोग करून घेतला पाहिजे, पण तें काम आमच्या देशी लोकांनीं केलें पाहिजे. केवळ जमिनीचें वैभव वाढविणें म्हणजे देशाभिमान नव्हे. ,,

हिंदुस्थानांतील भांडवल आतां नवीन नवीन धंद्यांत गुंतूं लागलें आहे. तें इतके दिवस दडून राहिलें याला कारण सरकारच्या रेल्वेसंबंधीं चुकीच्या धोरणामुळें हिंदुस्थानांतील उद्योगधंद्यांच्या प्रगतीवर झालेला विघातक परिणाम होय. ... ... ... ... ... ... ४४७

नुकत्याच स्थापन झालेल्या इंपीरियल बँकेंत आपला अधिकाधिक शिरकाव करून घेतला तरच तिच्या ताब्यांत राहणाऱ्या हिंदुस्थानसरकारच्या रोकडीचा हिंदी व्यापाऱ्यांस फायदा मिळण्याचा संभव आहे. ... ... ,,

हिंदुस्थानांत मजुरी स्वस्त असूनहि मजुरांच्या अडाणीपणामुळें पुष्कळ प्रसंगीं आपणांस तिचा उपयोग होत नाहीं. शिक्षणाची वाढ झाली म्हणजे ही स्थिति सुधारेल. ४४८

हिंदी शेतकऱ्यावरील पुराणप्रियतेचा आरोप खरा नाहीं. हिंदुस्थानांतील शेतकरी व इंग्लंड अथवा अमेरिका देशांतील लहान शेतकरी यांत विशेषसा फरक नाहीं. तथापि त्या देशांत व्यापारी वर्गांतील व पदवीधर शेतकऱ्यांचा एकंदर शेतकरी वर्गावर होणारा परिणाम महत्त्वाचा आहे. ... ,,

हिंदी कारागिरामध्यें अद्यापि सौंदर्य व डौलदारपणा या संबंधींच्या कल्पना नीटशा रुजलेल्या नाहींत. याचें एक कारण जनतेमध्येंच सुंदर वस्तूंबद्दल फारशी हौस दिसत नाहीं. ... ... ... ... ... ४४८

देशाच्या आर्थिक प्रगतीसंबंधांतील सरकारची किंवा तत्समान व्यापारी मंडळांची जबाबदारी ही कीं, त्यांनीं व्यक्तीच्या प्रयत्नास उत्कृष्ट मोबदला मिळेल अशी तजवीज करावयाची असते. सरकारनें व पुढाऱ्यांनीं लोकांच्या आर्थिक प्रगतीमध्यें अडथळा करणाऱ्या गोष्टी दूर केल्या पाहिजेत. ... ... ... ... ... . ... ... ४४९

मृत्युसंख्येचें प्रमाण कमी होत जाणें या गोष्टीचा सांपत्तिक स्थितीवर महत्त्वाचा परिणाम होतो.... ... ,,

मद्यविक्रयास बंदी केली असतां लोकांची आयुर्मर्यादा वाढेल. सरकारी उत्पन्नाच्या दृष्टीनेंहि मद्यविक्रय कमी करणें हेंच एकंदरीनें फायदेशीर होईल. ... ... ,,

रोगांचा प्रतिकार करण्यासाठीं लोकांमध्यें स्वच्छतेच्या कल्पना वाढविल्या पाहिजेत. यासाठींहि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें देश्य राहणीमध्यें सुधारणा करून तिचा एक उच्च प्रकारचा नमुना लोकांसमोर ठेवला पाहिजे. ... ... ४५०

देश्य संस्कृतींत सुधारणा करण्याचें जें वर सुचविलें आहे त्याचें कारण प्रस्तुत परिस्थिति कायम ठेवणें न ठेवणें हें आपल्याच इच्छेवर आहे पण परिस्थित्यनुरूप सर्वांगीण क्रांति करणें आपल्या समाजास शक्य नाहीं हें होय. ... ,,

वन्यांस नागरिकांसारखें रहावयास शिकविणें हें समाजापुढील एक मोठें कार्य आहे. वन्यांस ख्रिस्ती अगर मुसुलमान करण्याऐवजीं त्यांनां हिंदूंचा संस्कार करण्यापासूनच फायदा आहे.... ... ... ... ... ,,

आपली सांपत्तिक वाढ राजकीय परिस्थितीवर अवलंबून आहे. ही गोष्ट प्रस्तुत शासनकर्त्यांस पटवून व त्यांवर लोकमताचा दाव टाकून आपणांस आपली स्थिति सुधारली पाहिजे. ... ... ... ... ... ४५१

---

## उपप्रकरण ७ वें.

### देश्य चळवळ व परराष्ट्रीय राजकारण.

महाराष्ट्रानें राजकारणांत केलेलें कार्य म्हणजे स्वतःच्या उन्नतीला अवश्य असा अभिमान कायम ठेविला. ४५२

लोकमतास जागृत करून त्याचा शासनतंत्रावर परिणाम घडवून आणण्याची पद्धति काँग्रेसपूर्वींहि महाराष्ट्रांत होती. ... ... ... ... ... ... ,,

सध्यां हिंदुस्थानामध्यें सामान्य जनतेंतहि राजकीय जागृति होऊं लागली आहे. ... ... ... ... ,,

असहकारितेच्या चळवळीमुळें कौन्सिलांत शिरणाऱ्यांनां आपला घरभेदीपणा क्षम्य करण्याकरितां काम अधिक चांगलें करावें लागेल, सरकारासहि या लोकांच्या वचनास अधिक महत्त्व द्यावें लागेल व मजूरवर्गांत जाऊन काम करण्याची प्रवृत्ति असहकारितावादी मुत्सद्यांत वाढेल.... ... ... ... ... ... ... ४५३

श्रमजीविसत्तावाद मजुरांत वाढून कार्यप्रवर्तक होण्यास अवकाश लागेल. तथापि महाराष्ट्रामध्यें दिवसेंदिवस तो वाढतच जाईल. ... ... ... ...४५३

## उपप्रकरण ८ वें.

### अल्पप्रदेशविषयक कर्तव्यें.



## उपप्रकरण ९ वें.

### आर्थिक उन्नतीचीं अंगें व त्यांची साधना.

अमेरिकेंत गहाणदलाली करितात. हिंदुस्थानांत हा धंदा सुरू झाल्यास शेतकऱ्यांच्या कोऑपरेटिव्ह बँका अनवश्य होतील. ... ... ... ... ... ४६७

सावकारीमध्यें उत्पन्नांतून व्याजाची अपेक्षा करणारी सावकारी व अनुत्पादक वस्तूंच्या जमानतीवर सावकारी असे दोन भेद करतां येतात. ... ... ... ... ,,

विनजमानतीवरहि लहान लहान रकमांची सावकारी चालू आहे. हींत व्याज बेसुमार आकारण्यांत येतें. ... ४६८

सावकारी व दुकान हे दोन धंदे पुष्कळदां एकत्र सांपडतात. सावकारी व इतर धंदा यांचें एकीकरण झाल्याचींहि उदाहरणें नजरेस येतात. ... ... ... ,,

सावकार व पैसे वापरणारा या दोघांनां एकमेकांच्या धंद्याची जितकी माहिती अधिक तितका दोघांमधील व्यवहार अधिक सुलभ होतो. ... ... ... ... ,,

भूमिभक्षक सावकारी ही खरी सावकारी नव्हे; व्याजापेक्षी सावकारी तीच खरी सावकारी. खाजगी सावकार पहिल्या प्रकारची व समायिक भांडवलाच्या बँका दुसऱ्या प्रकारची सावकारी करतात. ... ... ... ४६९

वर सांगितल्याप्रमाणें रक्कम गुंतविण्याच्या तत्त्वांत फरक पडण्याचें कारण पहिल्यास पैसे परत करण्याची निकड नसते व दुसऱ्यास ती असते. अमेरिकेंतल्याप्रमाणें हिंदुस्थानांत जमिनींत पैसे गुंतविण्याची विमाकंपन्यांची वहिवाट नाहीं. ... ... ... ... ,,

कोऑपरेटिव्ह सोसायट्यांच्या स्थापनेमुळें आज शेतकऱ्यास पडणारा व्याजाचा दर दरमहा दरशेंकडा १ रुपया आहे. खाजगी सावकार शेंकडा १॥ रुपया व्याज आकारतो तरी त्यास, प्रामाणिकपणानें दुकान चाललें तर, शेंकडा ६ टक्के व्याजहि सुटत नाहीं. यामुळें इच्छा नसतांहि त्याची सावकारी भूमिभक्षक होते. ... ४७०

भूमिभक्षक सावकारीविरुद्ध सरकारकडून झालेले प्रयत्न प्रामाणिकपणाचे नाहींत. सरकारनें पतपेढ्या काढल्या, पण त्यांहूनहि अधिक परिणामकारी गोष्ट म्हणजे शिक्षणप्रसार होय. व्यक्तीस कर्जासंबंधीं जबाबदारी भासूं लागली व आपली पैसे परत करण्याची शक्ति पेढ्यांच्या मार्फत जाहीर करतां आली कीं व्याजाचा दर आपोआप उतरेल.... ... ... ... ... ... ... ४७१

अमेरिकेमध्यें ट्रस्ट उर्फ निधिसंरक्षक कंपन्यांचा प्रकार बराच प्रचलित आहे; यूरोपांत तो नाहीं. यांचें काम इस्टेटीची व्यवस्था पाहण्याचें म्हणजे हिंदुस्थानांत कोर्ट ऑफ् वॉर्ड्समध्यें जें काम होतें तें असतें. ... ,,

बँकेच्या व ट्रस्टकंपनीच्या धंद्यांत फरक आहे. बँकांस ज्यास्त मुदतीचें कर्ज देतां येत नाहीं पण ट्रस्टकंपन्या तें देऊं शकतात. ट्रस्टकंपन्यांचें उद्दिष्ट भिन्न असल्यामुळें न्यूयार्क संस्थानांत त्यांनां बँकांप्रमाणें हुंड्यांचा व्यापार करण्याची परवानगी नाहीं. ... ४७२

दुसऱ्या एक प्रकारच्या ट्रस्टकंपन्या अगर महासंघ अमेरिकेंत आढळतात त्यांचा उद्देश अनेक कंपन्यांचें नियंत्रण आपल्या हातीं ठेवण्याचा व कांहीं गोष्टींच्या व्यापाराचा पूर्ण मक्ता आपल्या हातीं ठेवण्याचा असतो. ४७२

या महासंघांमुळें एकाच धंद्यांतील स्पर्धा नाहींशी होते. ,,

वरील विवेचनांत ट्रस्टकंपन्या हें भांडवलाच्या एकीकरणाचें व बाजारांत विक्रीस असलेले जमिनीचे गहाण रोखे हें भांडवलाच्या विस्तरणाचें उदाहरण आहे. ४७५

शिक्षण हें मनुष्याच्या कार्यशक्तीच्या विकासाचें कारण आहे. ... ... ... ... ... ... ,,

हिंदुस्थानामध्यें वकिली सरकारी नोकरी वगैरे शिष्ट धंद्यांत असलेलीं, व्यापारांत पडलेलीं व स्थानांतराच्या कामीं मदत करणारीं माणसें या सर्वांचेंच प्रमाण इंग्लंडपेक्षां बरेंच कमी आहे. आपल्या देशांत स्थानांतरास मदत करणारी लोकसंख्या तर व्यापाऱ्यांच्या मानानें फारच कमी आहे. ४७६

आपल्या देशांत साक्षरता वाढली तर स्त्रियांची भवितव्यता बरीच सुधारेल. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या धंद्यांत काम करणाऱ्या स्त्रियांचें त्याच धंद्यांतील पुरुषांशीं प्रमाण दाखविणारे आंकडे. ... ... ... ... ,,

समाजांत विशिष्ट प्रकारचा धंदा करणाऱ्या लोकांचें प्रमाण अमुकच असलें पाहिजे असा नियम नाहीं. ... ४७८

## उपप्रकरण १० वें.

### संघरक्षण, संघसदस्यत्व व शिक्षणपद्धति.

जगाचें अंतिम ध्येय विश्वबंधुत्व व विश्वैक्य आहे. विश्वैक्य पूर्णतेस येण्यापूर्वीं जगास संघसमुच्चयाची स्थिति येईल. या संघसमुच्चयांत देशच्या देश ब्राह्मणत्व, क्षत्रियत्व व वैश्यत्व पत्करून इतर देशांस शूद्रत्व करावयास लावण्याचा संभव आहे. ... ... ... ... ४७८

विश्वराष्ट्र हें मतें किंवा संप्रदाय यांचा समुच्चय न बनतां प्रादेशिक समुच्चयांचाच समुच्चय होईल. ... ,,

स्वतंत्र राष्ट्रांतील लोकांनीं राष्ट्रीय भावनांची थट्टा करणें म्हणजे शुद्ध लबाडी आहे. एखाद्यास आपल्यांतच वागूं द्यावयाचें असल्यास त्याच्या वैसादृश्याविषयीं आपण असहिष्णु होणें साहजिक आहे. ... ... ... ४७९

देशसदस्यत्व व समाजसदस्यत्व एक करण्यासाठीं चातुर्वर्ण्यसंस्थापना केली पाहिजे. रामनवमी वगैरे ज्या कित्येक लौकिक गोष्टी खिस्ती व मुसुलमानी संप्रदायाशीं अविरुद्ध आहेत त्या त्यांनीं टाकण्याचें कारण नाहीं. व हिंदूंनींहि त्यांनां त्यांच्या परमार्थविषयक ज्ञानाचा आपल्यामध्यें प्रसार करण्यास फारशी हरकत करूं नये. ४८०

प्रांतिक भाषेंत किती व्यवहार ठेवावा व परकीय अशा सार्वदेशिक भाषेंत किती व्यवहार ठेवावा हा प्रश्न ज्या त्या प्रांताच्या हिताच्या दृष्टीनेंच सोडविला पाहिजे. ,,

शास्त्राविषयीं, शास्त्राच्या केंद्राविषयीं व शास्त्राच्या संस्कृतीविषयीं श्रद्धा व अभिमान उत्पन्न करणें व प्रत्येक व्यक्तीचा समाजास शक्य तितका अधिक उपयोग करून देणें हें शिक्षणाचें ध्येय असून शिक्षणाचें काम गृहें, शाळा व समाजव्यवहार यांमध्यें वांटून दिलेलें असतें. ... ४८२

# ग्रंथशुद्धि.

| पान | कॉलम | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ४ | १ | ३ | त्यांत | त्यांस |
| ८ | २ | १३ | हा | येथें हें अक्षर गाळावें |
| ४२ | २ | १ | पंचदशांश | एकवत्तिसांश |
| ४७ | १ | २४ | यांशीं | यांमध्यें |
| ५१ | १ | १६ | ज्या संघसदस्यांची | हे दोन शब्द गाळावे |
| ५१ | १ | २७ | ज्या सदस्याचा | ज्याचा |
| ८३ | २ | १३ | वाणीणी | वाणीचा |
| ९४ | २ | ५ | भिन्नजनांच्या | भिन्न |
| ९५ | २ | ३८ | तितका | तितका ते |
| १०४ | २ | ४ | व्रात्यस्तोम | व्रात्यस्तोम |
| ११५ | २ | ३ | यघनं | यप्पनं |
| १२४ | १ | २१ | ४३ | ४३७८ |
| १२५ | १ | ३१ | करणाच्या | करण्याच्या |
| १२९ | २ | १९ | त्याबरोबर | तेथें |
| १३८ | २ | ३५ | (३ न्या... | (इ. स. पूर्वी ३ न्या. |
| १४० | २ | ४० | अबयवावाच्या | अभयवनाच्या |
| १५१ | २ | ३ | त्याजातींची | त्या जातींच्या |
| १५६ | १ | २१ | यांप्रमाणें | यांतल्याप्रमाणें |
| १६१ | २ | १७ | कुतिलाच्या· | कुटिल लिपीच्या |
| १६१ | २ | ४०–४७ | | या ओळी गाळाव्या |
| १६६ | ७ | ११ | २४५ | २९५ |
| १६७ | ३ | ९ | १ | ० |
| १८१ | २ | २७ | त्यांस | त्यांत |
| १८३ | १ | ३० | आढळतात | आढळते |
| ,, | २ | ८ | यांतील | हींतील |
| १८९ | २ | ७ | हीता | होता |
| १९२ | १ | १० | पदडे | पडदे |
| १९४ | १ | ४० | यांत | हींत |
| २१७ | १ | ४० | त्याचीं | पूर्वजातीचीं |
| २२० | १ | २९ | त्या | त्याच्या |
| २२१ | १ | २ | त्यांनीं | त्यानें |
| २२२ | १ | ३२ | आणल्या | आपल्या |
| २२५ | १ | ५ | नाहीं.. | नाहीं. ते |
| २२९ | २ | १८ | मरणांत | देहान्त |
| २४५ | १ | १६ | 'सर' | 'सा' |
| २४९ | २ | ६ | वेंग | वेंग* |
| २५७ | २ | २४ | तसेंच | व तसाच |
| २५८ | १ | ३६ | त्यांतील | तिजमधील |
| २६३ | १ | १७ | जन्मलेले | जन्मलेले* |
| २६३ | १ | ४४ | येथें पुढें दिलेली टीप वाचावी. | *जेथें एतद्विषयक आंकडे उपलब्ध नव्हते तेथें पहिल्या खान्यांतील आंकडेच पुन्हां या खान्यांत दिले आहेत. |
| २६३ | २ | १८–२० | हिंदुस्थानांत जन्मलेले या सदराखालील मोकळी जागा. | येथें भारतीय वंशाचे या सदराखालील आंकडेच पुन्हां वाचावे. |
| २८१ | २ | ४३ | लोक व मजूर यांमध्यें सारखेंच | लोकांपेक्षां मजुरामध्यें मोठें |
| २८३ | २ | ४१ | १९१९ | १९१७ |
| २९३ | २ | २६ | कोष्टकाच्या पुढें दिलेल्या दोन टीपा वाचाव्या. | *एकंदर भारतीय लोकसंख्येंत पुरुष या सदरामध्यें दिलेला आंकडा पुरुष व स्त्रिया मिळून आहे गेल्या (१९११ सालच्या) खानेसुमारीच्या अहवालांत यासंबंधीं तपशील दिलेला नाहीं. †अहवालाच्या सालाकरितां एकंदर भारतीय लोकसंख्येसंबंधीं आंकडे उपलब्ध नाहींत. |
| ३०० | १ | ९ | नाहीं. | नाहीं.* |
| ,, | ,, | ४८ | येथें पुढें दिलेली टीप वाचावी. | *श्रीयुत जयस्वाल यांनीं आपणांस मौर्यपूर्वकालीन तीन पुतळे आढळून आल्याचें नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. Journal of Bihar & Orissa Research Society for March & Decembr 1919. |
| ३०३ | २ | ३२ | हें | हें रा. दीक्षित यांनीं. |
| ३१६ | १ | २४ | घुनाथाभ्युदय | रघुनाथाभ्युदय |
| ३१७ | १ | ४६ | pp. 12–103 | pp. 102–103. |
| ३२० | २ | ३० | समजुतींच्या विरुद्ध | परिचयाच्या झाल्या |
| ३३३ | १ | १० | २$\frac{1}{3}$% | २$\frac{1}{2}$% |
| ३३७ | २ | २८ | स्वीकार | प्रवेश |
| ३५७ | १ | २९ | दोघांचेंहि | दोघींचेंहि |
| ३५९ | २ | ३१ | चालली आहे. | जाणार. |
| ४१३ | १ | २५ | सदनशीर | न्यायाच्या |

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

# प्रस्तावनाखंड.

## विभाग पहिला.

## हिंदुस्थान आणि जग.

### प्रकरण १ लें.

#### उपोद्घात–जगांतील स्पर्धा.

**ज्ञानार्जनाचें प्रयोजनः**—एका विशिष्ट विचारपद्धतीच्या तत्त्वज्ञांचें असें मत आहे कीं, आपणांस जगांत वास्तविक म्हणजे खरें ज्ञान होतच नाहीं. जें कांहीं आपणांस होतें तें ज्ञान वास्तविक नसून व्यक्तिसिद्धरूप म्हणजे व्यक्तींच्या ज्ञानेंद्रियांनीं निश्चित झालेल्या स्वरूपांत असतें. सर्व भौतिक शास्त्रें हीं देखील वास्तविक ज्ञानाच्या तत्त्वावर उभारलेलीं नसून स्वानुभवनियमित ज्ञानाच्या तत्त्वावर उभारलेलीं आहेत. अर्थात् हें म्हणणें खोटें नाहीं. तथापि या गृहीत तत्त्वावरून कित्येक लोक एक उंच भरारी मारतात ती ही कीं, वास्तविक ज्ञान होणें जर अशक्य आहे, तर आपण ज्यास ज्ञान म्हणतों तें ज्ञानच नव्हे; आणि त्यामुळें तें निरुपयोगी होय. या प्रकारच्या वादविवादपद्धतीमध्यें शास्त्रज्ञानें उगीच डोकेंफोड करण्यांत मतलब नाहीं; कां कीं ज्ञान जरी इंद्रियानुभवनियमित असलें तरी तें "गजोऽपि मिथ्या पलायनमपि मिथ्या" या न्यायानें इंद्रियानुभवनियमित जगाशींच वागतांना उपयोगांत आणावयाचें आहे, आणि त्यासाठींच तें मिळवावयाचें आहे.

शास्त्रज्ञांचा आणि त्यांच्या प्रयत्नांचा उपहास करूं पहाणारा दुसरा वर्ग म्हटला म्हणजे "अमुक ज्ञानाचा उपयोग काय ?" असें विचारणारांचा होय. प्रस्तुत प्रश्न विचारणें जितकें सोपें आहे, तितकें त्याचें उत्तर देणें सोपें नाहीं. कारण अनेक ज्ञानांगांचा उपयोग समजण्यास देखील तें ज्ञान मिळविल्यानंतरची स्थिति अनुभवावी लागते. जंगली मनुष्यांस अनेक शास्त्रांच्या ज्ञानाचा उपयोग समजावून देतां येणार नाहीं. कोनन डॉइल या प्रसिद्ध आंग्ल कादंबरीकारानें आपल्या "शरलॉक होम्स्"ची ओळख करून देतांना शरलॉक होम्सला असें म्हणतांना दाखविलें आहे कीं "'पृथ्वीभोंवतीं सूर्य फिरत नसून पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते' या ज्ञानाचा उपयोग काय ? ही गोष्ट खरी आहे कीं खोटी आहे याची चौकशी करण्याच्या भानगडींत मी पडत नाहीं. आणि जर खरी असलीच तर ती मला विसरून गेलें पाहिजे. कां कीं तिचा उपयोग मला कांहींएक नाहीं. मग ती डोक्यांत ठेवण्याचे तरी परिश्रम हवेत कशाला ?" अर्थात् वर्षांचें गणित करण्यासाठीं, ऋतूंच्या स्पष्टीकरणासाठीं आणि कालविषयक सूक्ष्म मोजदाद करण्यासाठीं पृथ्वी व सूर्य यांपैकीं कोण कोणाभोंवतीं फिरतें याचें ज्ञान अवश्य आहेच. पण ह्या ज्ञानाचा रोजच्या व्यवहारांत फारसा उपयोग सामान्य व्यक्तीस नाहीं. मनुष्याचा व्याप जितका जास्त होत जातो तितकी त्यास अधिक ज्ञानाची जरूर असते. राष्ट्रांत अनेक अवयव असतात, त्या अवयवांस अनेक क्रिया करावयाच्या असतात, म्हणून अत्यंत विविधज्ञानाची जरूर राष्ट्रास आहे. तथापि शरलॉक होम्ससारख्या संशयी माणसांचा उपयोग आहेच. त्यानें काढलेल्या संशयासारखे संशय उपयुक्ततेच्या दृष्टीनें ज्ञानक्षेत्राचें अवलोकन करावयास आणि मनुष्यहितबुद्धीनें तें ज्ञान मांडावयास लेखकांस आणि वक्त्यांस भाग पाडतील.

विविध प्रकारच्या ज्ञानाची उपयुक्तता लक्षांत येण्यासाठीं आपले म्हणजे हिंदूंचे व हिंदुस्थानाचे हितसंबंध जितक्या विस्तृततेनें लक्षांत आणतां येतील तितक्या विस्तृततेनें आणले पाहिजेत; आणि ते लक्षांत आणून देण्याची जबाबदारी सर्व विषयांचें अवडंबर पुढें मांडण्याचा आपला हक्क आहे असें समजणाऱ्या ज्ञानकोशकारांवर पडते. ज्ञानकोशकारांच्या दृष्टीनें सर्व भारतीयांस हिंदूंची एकंदर परिस्थिति ठाऊक पाहिजे, म्हणजे हिंदूंच्या विस्ताराची, त्यांच्या संस्कृतीच्या विस्ताराची, त्या दोहोंशीं स्पर्धा करीत असलेल्या जगांतील शक्तींची व कार्यपरंपरांची माहिती पाहिजेच. हिंदुस्थानच्या भूमीचा भारतीयांनीं व इतरांनीं केलेला उपयोग, तिच्या उपयोगांत भारतीयांची इतरांशीं स्पर्धा आणि सर्व देश हाच एक समुच्चय धरून त्या देशांतील लोकांची इतर देशांतील लोकांशीं होत असलेली स्पर्धा आणि या दोन स्पर्धांच्या मुळें उत्पन्न झालेल्या व होणाऱ्या कार्यपरंपरा, या सर्व आपणांस ज्ञातव्य आहेत. सामाजिक आणि राजकीय दृष्टीनें आपले हितसंबंध जाणण्याचा आपण प्रयत्न करूं लागलों तर आत्महितबुद्धीनेंच पण जगांतील बहुतेक ज्ञानविषयांसंबंधीं जिज्ञासा आपणांस उत्पन्न होईल.

**भारतविषयक ज्ञानार्जनांतील दृष्टीः**—भारतीयांस जे आपले हितसंबंध जाणावयाचे आहेत ते त्यांस सहकार्य आणि स्पर्धा या दोन्ही बाजूंनीं विचार करून जाणले पाहिजेत. समाज आणि शरीर यांची तुलना करून समाजास शरीराची उपमा देण्यांत येते. लहान समाज घेतले तरी ते विशिष्ट क्रिया करीत असलेल्या निरनिराळ्या अवयवांनीं युक्त असे दिसतात. तथापि समाज हें शरीर जरासें निराळ्या प्रकारचें आहे. मनुष्यशरीरांतील निरनिराळे व्यापार करणारे अवयव निरनिराळे असतात. त्यांची आपआपसांत स्पर्धा नसते, आणि ते स्वतः स्वयंपूर्ण नसतात. तथापि मोठा समाज घेतला तर त्यांत जवळजवळ स्वयंपूर्ण असलेले आणि एकमेकांशीं स्पर्धा करणारे विभाग असून त्या विभागांमध्यें अन्योन्याश्रय उत्पन्न झालेला असतो, आणि कांहीं बाबतींत ते केवळ मोठ्या समाजाचे विशिष्ट क्रिया करणारे अवयव असतात. समाजाची घटना मनुष्यशरीरघटनेपेक्षां भिन्न असल्यामुळें जेव्हां आपणांस एखाद्या समाजाचा अभ्यास करावयाचा असतो, तेव्हां तो स्पर्धा करणारा समूह या दृष्टीनें केला पाहिजे, तसेंच त्याहूनहि मोठ्या समाजाचा अवयव या दृष्टीनेंहि केला पाहिजे.

हिंदुस्थानाचें किंवा हिंदुसमाजाचें जें ज्ञान आपणांस मिळवावयाचें तें साम्राज्याचे अगर जगाचे विभाग, आणि जगांतील इतर समूहांशीं स्पर्धा करणारे समूह, या दोन्ही दृष्टींनीं मिळविलें पाहिजे.

या दोन्ही दृष्टींनीं प्राप्त झालेलें ज्ञान हें इतरांशीं असलेल्या संबंधांचा अभ्यास होय. तथापि जगाशीं आपला कांहीं संबंध नाहीं अशी तात्पुरती कल्पना करून अंतःस्थिति जाणावयाची आणि अंतर्घटना अभ्यासावयाची, हा देखील महत्त्वाचा विषय आहे. आपण प्रथमतः जगाचा एक भाग या दृष्टीनेंच हिंदुस्थानाकडे व हिंदुसमाजाकडे पाहूं.

**स्पर्धेचा क्षेत्रफळ व लोकसंख्या यांशीं संबंधः**—एखाद्या समाजाचें महत्त्वमापन करण्यासाठीं आणि जगांतील स्पर्धेचा इतिहास थोडक्यांत सांगण्यासाठीं, त्या समाजानें किती भूभाग व्यापिला आहे आणि आपली लोकसंख्या किती वाढविली आहे याचा हिशोब घ्यावा लागतो. आधुनिक जगाच्या सध्यांपर्यंत परिचित झालेल्या भूपृष्ठभागाचें क्षेत्रफळ पांच कोटी वीस लक्ष चौरस मैल आहे. पृथ्वीच्या औदीच्य आणि दक्षिण टोंकांवरील निर्जन भूभाग वगळला असतां, म्हणजे जगांतील मनुष्यांचें वसतिस्थानच जमेस धरिलें असतां येणारा आंकडा वर दिला आहे. हिंदुस्थानाचें क्षेत्रफळ सुमारें अठरा लक्ष चौरस मैल म्हणजे परिचित जगाचा एकोणतिसावा हिस्सा आहे. ज्ञात तथापि अपरिचित असा औदीच्य व दक्षिण ध्रुवाकडील भाग हा पसतीसपासून चाळीस लक्ष चौरस मैल म्हणजे दोन हिंदुस्थानांएवढा अगर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांहूनहि मोठा आहे.

इंग्लंडचें क्षेत्र हिंदुस्थानच्या सुमारें पंचदशांश आहे. इंग्लंडच्या ताब्यांतील सर्व जगाचा भूभाग घेतला तर तो एकंदर सुमारें एक कोटी सत्तावीस लक्ष चौरस मैल म्हणजे जगाच्या पंचमांशाहून बराच अधिक भरेल. आपल्या सवादोनशेंपट प्रदेशावर इंग्लंड आज राज्य करीत आहे, आणि इंग्लंड व अमेरिका या इंग्रजी भाषा बोलणाऱ्या लोकांचें जग व्यापून टाकण्याच्या आणि आपली सत्ता स्थापन करण्याच्या बाबतींत महत्त्व काय आहे, याची आपणांस वरील आंकड्यांवरून कल्पना येणार आहे.

जगाची लोकसंख्या दीडशें कोटींवर आहे. आणि तिचा एकपंचमांश हिंदुस्थानांत आहे. या एकपंचमांश लोकसंख्येचे घटक कोणते, त्यांचा पृथक्पणें व समुच्चयरूपानें इतर जगाशीं संबंध काय, याची कल्पना प्रत्येक भारतीयास पाहिजे. आपणांवर बाहेरील जगाचा परिणाम काय होतो, बाहेरच्या जगावर आपला परिणाम पूर्वीं काय झाला आणि आतां काय होत आहे, व जगांतील स्पर्धेचें स्वरूप कसें आहे, याचें स्थूल अवलोकन केलें असतां आपली जगांत काय किंमत आहे, याची आपणांस कांहीं तरी कल्पना येईल.

**स्पर्धेचीं अंगें:**—आपणांस जें निरीक्षण करावयाचें तें सांस्कृतिक, राजकीय, आर्थिक या निरनिराळ्या दृष्टींनीं करावें लागेल, तेव्हांच आपणांस आपले हितसंबंध पूर्ण कळूं लागतील. कां कीं स्पर्धा या सर्व बाबतींत आहे.

**संस्कृतिस्पर्धाः**—जगाचे संस्कृतिदृष्ट्या चार भाग पडतात. एक भाग म्हटला म्हणजे युरोपीय संस्कृतीचा. ज्या लोकांनीं या संस्कृतीचें संवर्धन केलें त्यांचे वंशज किंवा त्यांशीं पूर्णपणें तादात्म्य पावलेले लोक यांनीं तुर्कस्थानाचा लहानसा तुकडा खेरीजकरून सर्व युरोपखंड आणि बहुतेक सर्व पश्चिम गोलार्ध व्यापिला आहे. ईजिप्तच्या मुसलमानी आणि अबिसीनियाच्या ख्रिस्ती धुगधुगीस बाजूला वगळलें तर सर्व आफ्रिकाखंड या संस्कृतीच्या लोकांनींच पादाक्रांत केलें आहे. आणि जपानचें जिवंत राष्ट्र, चीनचें साम्राज्यस्वरूपी लोकसत्तात्मक राज्य आणि मृतकल्प सयाम, इराण आणि तुर्कस्थान म्हणजे एशिया मायनर हीं वगळलीं असतां एशिया खंडाचा सर्व भागहि यांनींच पादाक्रांत केला आहे. अफगाणिस्तान व नेपाळ यांस मेहेरबानीनें किंवा उगाच आपला व्याप फार वाढवूं नये या बुद्धीनें, हातपाय बांधून पण जिवंत ठेवलें आहे. हिंदुस्थानांतील इंग्रजांच्या कृपाछत्राखालीं असलेलीं संस्थानें यांचें अस्तित्व नेपाळ व अफगाणिस्तान यांपेक्षांहि केवळ मेहेरबानीनेंच आहे. सर्व इतर संस्कृतींपेक्षां या संस्कृतीशीं तन्मय झालेले लोक ज्ञानानें व कर्तृत्वानें आणि व्यवहारांच्या अवाढव्यतेनें इतरांच्या पुढें गेलेले आहेत.

या संस्कृतीच्या शिवाय दुसऱ्या दोन भारतीयेतर संस्कृती म्हटल्या म्हणजे मुसलमानी व चिनी या होत. या संस्कृतीं-

मध्यें शासनसंस्था जिवंत असल्यामुळें या खालावलेल्या तथापि अजून सर्वांगपरिपूर्ण आहेत. अत्यंत पुरातन कालीं उच्च दर्जा पावून जिनें आपलें सातत्य आतांपर्यंत कायम राखलें, आणि भौतिक शक्तींचा उपयोग व युद्धकला याखेरीज इतर बाबतींत जिचे अवयव जगांतील कोणत्याहि संस्कृतीच्या तोडीचे आहेत, अशी संस्कृति चिनी होय. मुसलमानी संस्कृतीचा ईश्वरविषयक भावनांच्या आवेशानें असंस्कृत अरबांनीं पाया घातला आणि इतरांचें ज्ञान मागांहून मिळवून तिला जोरदार केली आणि चोहोंकडे जय मिळवून आपल्या संस्कृतीस महत्त्व आणलें. सध्यां ही संस्कृति मरणोन्मुख झाली आहे.

चिनी संस्कृतीसंबंधानें हेंहि म्हटलें पाहिजे कीं, तिचा चोहोंकडे फैलाव होण्यास एक महत्त्वाचें कारण म्हटलें म्हणजे बौद्ध संप्रदायाचा तिजवर झालेला परिणाम होय. तिनें कोरियावर प्रकाश पाडला आणि कोरियामार्फत जपानवर प्रकाश पाडला. तिनें अनामवर आपला पगडा बराच बसविला आणि सयाम, ब्रह्मदेश, नेपाळ आणि तार्तरीचा बराचसा भाग यांस शह दिला. तथापि चीनचें आणि वर दिलेल्या इतर राष्ट्रांचें जें स्वरूपैक्य झालें आहे तें भारतमूलकच आहे.

**स्पर्धाक्षेत्राबाहेरील संस्कृतीः**—जुन्या काळच्या ज्या संस्कृती आज नामशेष झाल्या त्या बाबिलोनिअन, खाल्डिअन, मिसरी, ईजिअन, पेरू देशांतील व मेक्सिकन या होत. या संस्कृती मृत झाल्या असून त्या आजच्या स्पर्धायुक्त जगांतील भांडणाऱ्या व्यक्ती नाहींत पण त्या कार्य करून गेल्या.

वर निर्दिष्ट केलेल्या प्राचीन कालच्या प्रगल्भ संस्कृतींपेक्षां कमी योग्यतेच्या संस्कृतींचीं कार्यें देखील मोठीं आहेत. अमेरिकन तांबड्या इंडियनापासून मका, भुइमूग, बटाटे इत्यादि उपयुक्त जिन्नस आणि तंबाखूसारखीं व्यसनें जगास लाभलीं आहेत. सिफिलिस म्हणजे फिरंगरोगासारख्या रोगाच्या उत्पत्तीचें श्रेय कांहीं संशोधक तांबड्या इंडियनांस देतात. ऐतिहासिक माहिती ज्या काळापासून उपलब्ध होते त्याच्या पूर्वीच्या अनेक शतकें, सहस्रकें, दशसहस्रकें आणि कदाचित् लक्षकें इतक्या कालापासून आजपर्यंत मनुष्यप्राण्याचा इतिहास पसरला आहे. त्यापैकीं बराच अज्ञात आहे. पशूंचें गृह्यीकरण म्हणजे पशूला जंगली स्वरूप टाकावयास लावून मनुष्योपयोगी बनविणें, वन्य वनस्पतींची जोपासना व सुधारणा करून त्यांस मनुष्योपयोगी स्वरूप देणें, मनुष्यास अत्यंत आवश्यक अशा कला तयार व्हावयास म्हणजे उदाहरणार्थ अग्नीचा उपयोग करणें, अत्यंत सामान्य असे विचार व्यक्त करण्यास समर्थ अशी भाषा बनविणें, अपत्यविषयक जबाबदारी कांहींअंशीं स्त्रीजातीच्या अंगावरून घेऊन पुरुषजातीच्या अंगावर टाकणें, म्हणजे थोडाबहुत गृहस्थधर्म स्थापन करणें, इतपतच संस्कृतीचें स्वरूप बनावयास किती काळ लोटला असेल याची कल्पना शास्त्रीय तऱ्हेनें मांडणें शक्य होईल इतकी इतिहासशास्त्राची प्रगति अजून झाली नाहीं. संस्कृति या शब्दानें आपण जी कल्पना व्यक्त करितों ती अधिक विविध, अधिक श्रमविभागपूर्ण आणि अधिक अन्योन्याश्रयी अशा समाजाची होय. ज्या समाजांत वाङ्मय उपस्थित झालेलें असतें असल्याच संस्कृती आपल्या दृष्टिपथांत येतात. वर उल्लेखिलेल्या संस्कृतींच्या काळींच किंवा आधुनिक काळाच्या पाठीमागें तत्पूर्वं किती संस्कृतींचा इतिहास लपला गेला आहे हेंहि आपणास निश्चयानें सांगतां येत नाहीं. आपणास असे अनेक प्रदेश आढळतात कीं जेथें मातींत गडलेल्या मोठमोठ्या अनेक इमारती आहेत, आणि त्या स्थलावर आज परिभ्रमण करणारे लोक रानटी स्थितींत आहेत. उदाहरणार्थ सामोआ बेटांतील आजच्या देश्य म्हणून समजल्या जाणाऱ्या रहिवाशांची सुमारें ५० वर्षांपूर्वींची सांस्कृतिक स्थिति पाहिली म्हणजे त्या बेटांतील मोठमोठ्या मयकल्पनांचे कर्ते त्यांचेच पूर्वज होते कीं काय असा संशय उत्पन्न होतो.

लुप्त झालेल्या अशा संस्कृतींची आपणांस साकल्यानें कल्पनाहि येत नाहीं. शिवाय समुद्र व जमीन यांची आजची जगावरील वांटणी ही देखील अनेक वर्षांपूर्वींच्या ज्या कालीं नव्हती त्या वेळेस भूभागाचें सांस्कृतिक स्वरूप काय होतें याचें आपणास चित्र काढतां येत नाहीं. हिंदुस्थान म्हणून आपण आज ज्याला म्हणतों तोच देश घेतला तर त्याचें प्रादेशिक एकत्व प्राचीनकालीं नव्हतेंच. दख्खन, ऑस्ट्रेलिया, मादागास्कर आणि दक्षिण आफ्रिका हीं एका कालीं संबद्ध होतीं अशी भूशास्त्रवेत्त्यांची कल्पना आहे. कदाचित् मनुष्यप्राण्याचा उद्भवहि तेथेंच झाला असेल आणि तेथील मनुष्याचें स्वरूप आज लिमर नांवाचा मनुष्यकल्प प्राणी आढळतो त्या प्राण्यासारखें असेल अशी शास्त्रीय कल्पना संशोधकांनीं बसविली आहे.* हिंदीमहासागर लिमरस्वरूपी मनुष्यकल्पांनीं वसलेला होता ही कल्पना आजच्या शास्त्रज्ञांकडून तीव्र टीकेस पात्र होऊन सोडून दिली गेल्यासारखीच आहे. तथापि आफ्रिका व हिंदुस्थानचा दक्षिणभाग जोडणारा प्रदेश प्राचीनकालीं होता या कल्पनेचा त्याग झाला नाहीं.

---

* थिआसफिस्ट नांवाचा जो विचारसंप्रदाय अलीकडे तयार होत आहे त्यांनीं लिमुरिया खंडाची कल्पना गृहीत धरून त्यावरील एका प्रलयपूर्व उच्च संस्कृतीविषयीं मोठे मौजेचे विचारतरंग 'अतींद्रियशक्ती'च्या साहाय्यानें रचले आहेत. ते कोणास पहावयाचे झाल्यास ब्लाव्हाटस्कीचें 'सीक्रेट डॉक्ट्रिन' हें पुस्तक पहावें. त्या पुस्तकांतील मतें व कल्पना थिआसफिस्टांतील कांहीं भोळसर आणि कांहीं धूर्त माणसांनीं उपबृंहित केलीं आहेत. ब्लाव्हाटस्कीचे अनेक स्वैर कल्पनातरंग हिंदुस्थानांतील कांहीं भोळसर मंडळीस कसे ग्राह्य होतात हें पहाण्याची ज्यास इच्छा असेल त्यानें ग. वि. चिपळूणकर मंडळीच्या महाभारतास परिशिष्टरूप असलेल्या हरिवंशाच्या भाषांतराची प्रस्तावना पहावी.

आफ्रिकेचें आजचें भूस्तरस्वरूप देखील पुष्कळ फेरफार होऊन बनलेलें आहे. या खंडांत देखील पुष्कळ ठिकाणीं अनेक नष्ट संस्कृतींचे अवशेष सांपडतात. अमेरिकेंत पेरू आणि मेक्सिको खेरीज इतर ठिकाणीं देखील बऱ्याच उच्च प्रकारच्या संस्कृतीचे अवशेष आज सांपडत आहेत. त्यांची गोळाबेरीज करून सांगणारा ग्रंथ अलीकडे झाला नाहीं. तथापि नाडिलॅक यानें 'प्रिहिस्टॉरिक अमेरिका' म्हणून जें पुस्तक बऱ्याच वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलें त्यांत अशा पुष्कळ अवशेषांचें वर्णन दिलें आहे.

**अत्यंत प्राचीन इतिहासाचीं साधनें:—** अत्यंत प्राचीन काळांतील मनुष्याचा इतिहास लिहिण्याचें साहित्य पुरविणारे संशोधक म्हणजे भूशास्त्रवेत्ते होत. पृथ्वीच्या भूमिजलरूपी पापुद्र्याचा इतिहास मिळविण्याचा त्यांनीं जो प्रयत्न केला त्यांत त्यांस मनुष्यप्राण्याच्या अत्यंत प्राचीन अस्तित्वाचे अवशेष जगांतील अनेक ठिकाणीं सांपडले. ते अवशेष आणि जगामध्यें आज बोलल्या जाणाऱ्या भाषांचें सादृश्य आणि भेद हीं अत्यंत प्राचीन इतिहासाचीं साधनें होत.

**संस्कृतींच्या अभ्यासाचे हेतु आणि महत्त्व:—** जुन्या संस्कृतीचा अभ्यास करावयाचा तो कौतुकमय दृष्टीनेंच होईल तथापि आजच्या जीवनार्थकलहांत त्या अभ्यासाचें महत्त्व नाहींच असें नाहीं. जिवंत संस्कृतीस आपले पूर्वीचे अवयव शोधणें आणि शक्य असल्यास त्यांचा मुख्य भागांशीं संबंध जोडणें हें महत्त्वाचें कार्य आहे. जिप्सींचा आणि हिंदुस्थानचा संबंध आज जो लक्षांत येतो तो भाषाशास्त्रमूलकच आहे. आणि आजचे श्यामलवर्ण हिंदू अमेरिकेच्या नागरिकत्वास योग्य ठरले, त्या प्रसंगीं कायद्याचा अर्थ लावण्यासाठीं भाषाशास्त्रच उपयोगास आलें.

मृतसंस्कृती आजच्या स्पर्धेंत नाहींत. तेव्हां आपलें लक्ष साहजिकच जिवंत संस्कृतींकडे आणि विशेषेंकरून ज्या संस्कृतीचा आपण अभिमान धरतों तिचीं नातीं शोधण्याकडेसच जाणार. मनुष्यप्राण्याच्या इतिहासांत त्याच्या अनेक करामती जलप्रलय ( प्रदेशच्या प्रदेश समुद्रांत कायमचे बुडणें ), धरणीकंप इत्यादि सृष्टिक्षोभांनीं नष्ट झाल्या आहेत. ज्या करामती नष्ट झाल्या त्यांचे अवशेष शोधून त्या अवशेषांचे धागे आजच्या परिस्थितीशीं जोडणें शक्य होऊन इतिहासाचें सातत्य आपणास देतां येईल काय हाहि एक प्रश्नच आहे. असो.

**भारतीय संस्कृति:—** भारतीय संस्कृति म्हणून आज आपण जी म्हणतों ती एकाच मानववंशांतून निघालेली नाहीं. सगोत्रविवाहास निषेध, कुंकूं व बांगड्या इत्यादि स्त्रियांचीं सौभाग्यचिन्हें, देशांत दृष्टीस पडणारीं अनेक उपास्यें, अनेक चालीरीति हीं वैदिक परंपरेंतून निघालीं नाहींत तर वैदिक परंपरेच्या लोकांच्या आचारांशीं आणि धर्मांशीं इतरांच्या आचारधर्मांचें एकीकरण होऊन आजचें हिंदुत्व निर्माण झालें आहे, असा संशोधकांचा मथितार्थ आहे. या भारतीय संस्कृतीच्या मूलघटनेचा व संवर्धनाचा म्हणजे इतरांशीं आलेल्या तिच्या संबंधाचा व तन्मूलक विस्ताराचा एक लांबलचक इतिहास आहे; तो प्रत्येक भारतीयास ज्ञातव्य आहे. भारतीय संस्कृतीचीं अंगें चोहोंकडे पसरलीं, तिनें अनेक लोकांवर छाप टाकली, आणि बऱ्याच लोकसमुदायास स्थूल एकरूपता आणली. गेल्या ९०० वर्षांचा इतिहास पाहिला असतां विद्येविषयीं होत असलेल्या दुर्लक्षामुळें, स्पर्धा करणाऱ्या आणि भारतीय संस्कृतीचा नाश करूं पाहणाऱ्या इतर संस्कृतींशीं भारतांतील विद्वान् वर्ग अपरिचित असल्यामुळें, वाढत चाललेल्या ज्ञानक्षेत्राशीं असंबद्ध राहिल्यानें, जगाशीं स्पर्धा करण्यास योग्य असें समाजयंत्र बनविण्याकडे दुर्लक्ष केल्यामुळें, आणि इतर अनेक कारणांनीं या संस्कृतीचा दिवसानुदिवस नाश होत आहे. एका काळीं या संस्कृतीचा पगडा बॅक्ट्रियापासून कँबोडियापर्यंत आणि खरोष्ट्रापासून फिलिपाइनपर्यंत इतका दृढ झाला होता कीं हा सर्व प्रदेश म्हणजे भारतवर्षच होऊं पहात होता. या संस्कृतीचें महत्त्व ग्रीक व रोम येथपर्यंत भासत होतें, आणि या संस्कृतींतील बौद्ध संप्रदायाचा पगडा चीन, जपान, तिबेट, मांचुरिया, तुर्कस्तान आणि सैबेरिया इतक्या विस्तीर्ण प्रदेशावर पडला होता. तीच संस्कृति आज कां नामशेष होऊं पहात आहे, आणि तिचें आपण जागरूक झाल्यास काय भवितव्य आहे या सर्व गोष्टी आपणांस विचारार्ह आहेत.

**स्पर्धातत्त्वें:—** स्पर्धा वैयक्तिक स्थितींतून सामुच्चयिक स्थितींत गेली म्हणजे समुच्चयविषयक भावना जागृत होते, आणि ही स्पर्धा चालू असतांना ज्या समुच्चयाचे आपण अवयव आहोंत त्या समुच्चयाचें हित व्हावें ही भावना उत्पन्न होते. जगांतील स्पर्धेचें क्षेत्र आपणांस जितकें अधिक परिचित होईल तितकें अवलोकन अधिक मार्मिक होईल आणि दीर्घकालव्यापी स्पर्धामूलक चळवळी समजल्यास इतिहासाचा अभ्यास करतांना महत्त्वाच्या गोष्टी कोणत्या हें कळावयास लागेल. स्वसंरक्षण हें मनुष्याचें आद्य कर्तव्य होय. राष्ट्रसंरक्षण, जातिसंरक्षण ह्या प्रकारचीं स्वसंरक्षणाचीं अनेक अंगें आहेत. व्यक्तींच्या हितासाठींच राष्ट्राचें हित साधावयाचें. आणि स्वजनांना आपलें सामुच्चयिक हित साध्य करून घेणें शक्य व्हावें म्हणून तें साध्य करून घेण्याचें यंत्र जें राष्ट्र म्हणजे व्यक्तींची संयुक्तस्थिति तिचें संरक्षण करावयाचें. भाषेचें संवर्धन करावयाचें आणि वाङ्मयाचें संवर्धन करावयाचें यांचाहि हेतु हाच कीं, स्वजनांपैकीं बहुतेकांस स्वभाषेखेरीज अन्य भाषा परिचित नसते आणि त्या लोकांस आपल्या उन्नतीच्या मार्गांत अन्य भाषेंत माहिती अडकल्यामुळें परावलंबन, पारतंत्र्य, चढाओढींत अडचण वगैरे जीं विघ्नें भासतात तीं दूर

करावयाचीं. संस्कृतिसंवर्धन हें याच प्रकारचें कार्य होय. आपल्या संस्कृतीचा त्याग न करितां, आपल्या मध्येंच अत्यंत प्रगत अशा गोष्टी आणावयाच्या हें अनेकव्यक्तिहितबुद्धीनेंच निघालेलें तत्त्व होय. स्वसंस्कृतीचें रक्षण आणि संवर्धन होण्यासाठींच धर्मविषयक, भाषाविषयक, आणि वाङ्मयविषयक भावना अस्तित्वांत येतात. जाति, राष्ट्र आणि संस्कृति या बंधनांनीं मनुष्यसमाज बांधला गेला आहे. हीं बंधनें तोडून एखादी व्यक्ति परसंस्कृतींत प्रवेश करून आपलें वैयक्तिक हित साध्य करूं शकेल, पण राष्ट्रास किंवा संस्कृतिछत्राखालीं असलेल्या सर्व लोकांस तसें करतां येणार नाहीं. आणि एका संस्कृतीचें संवर्धन दुसऱ्या संस्कृतीचा म्हणजे तिच्या घटनेचाच केवळ नव्हे तर तिच्या छत्राखालील व्यक्तींचाहि नायनाट करूं पहातें.

जगांतील स्पर्धेत आज असें आहे कीं ही स्पर्धा वैयक्तिक असते तशी सामुच्चयिकहि असते. सामुच्चयिक स्पर्धेत ज्या गोष्टी जिवंत राष्ट्रांस कराव्या लागतात त्या येणेंप्रमाणें:—

(१) आपला समुच्चय चांगल्या स्थितींत राखावयाचा.

(२) दुसऱ्या स्पर्ध्यमान समूहामधील व्यक्ती आणि समुच्चय अथवा समुच्चयाचा केंद्र यांमधील स्नेहाकर्षण कमी करावयाचें.

(३) दुसरे समुच्चय अंतर्घटनाविरहित झाले म्हणजे आपला सामुच्चयिक स्वार्थ साधावयाचा.

(४) प्रसंगीं स्पर्ध्यमान समुच्चयांतील व्यक्ती आपल्या समुच्चयांत समाविष्ट करावयाच्या.

(५) आपला समुच्चय शिक्षणानें व ज्ञानवृद्धीनें इतर समुच्चयांपेक्षां चढाओढींत श्रेष्ठ ठरेल अशी व्यवस्था करावयाची.

आपलें राष्ट्र रक्षून दुसऱ्याचें राष्ट्र पादाक्रांत करण्याचा, आपल्यांतील संस्था सुसंघटित करून स्पर्ध्यमान समाजांतील संस्थांच्या संवर्धनास व्यत्यय करावयाचा, आपल्या देशांत चोहोंकडचे लोक आणून त्यांस आपले नागरिक बनविण्याचा, बाहेरून आलेल्या लोकांचा निराळेपणा काढून टाकावयाचा इत्यादि सर्व प्रकारचे प्रयत्न उपर्युक्त हेतूंमुळेंच अस्तित्वांत येतात.

पारमार्थिक संप्रदायांचा म्हणजे "रिलिजनां"चा प्रसार हा देखील सामुच्चयिक स्पर्धेचाच एक भाग आहे. मुसलमानांनीं श्रीमंत व्हावें म्हणून होणारी चळवळ हें संवर्धनाचें एक प्रकारचें अंग आहे, तसेंच दुसरें एक अंग म्हटलें म्हणजे मुसलमानांची संख्या वाढविणें हें होय. धर्मोपदेशादि संप्रदायांच्या प्रसाराकरतां होणाऱ्या चळवळी आर्थिक चढाओढीचींच अंगें आहेत. स्पर्धेचीं जितकीं अनेकविध अंगें लक्षांत घ्यावीं तितकीं इतिहासाचीं विविध अंगें लक्षांत येऊन चाललेल्या घडामोडीचें अवलोकन अधिक होतें आणि कार्यकर्त्या मुत्सद्यास, आणि जगद्विकासतत्त्वांचें स्पष्टीकरण करूं पहाणाऱ्या तत्ववेत्त्यास तें उपयोगी होतें. सांस्कृतिक प्रश्नांचा विचार मुत्सद्दी फारसा करीत नाहींत, कां कीं त्यांस स्पर्धेचें विस्तीर्ण क्षेत्रच समजलें नाहीं. स्वसदृश समाज निर्माण करण्याचें कार्य केवळ कठोर आणि अरसिक अर्थशास्त्राच्या दृष्टीनें देखील महत्त्वाचें आहे, हें अर्थशास्त्रज्ञानें जगाच्या इतिहासाचा त्या दृष्टीनें थोडाबहुत अभ्यास केल्यास त्यास सहज समजणार आहे.

**हिंदु आणि हिंदुस्थानः**—सामाजिक किंवा राजकीय गोष्टींसंबंधानें विचार करतांना आम्हा भारतीयांचें अन्तःकरण द्विधा होतें. मनुष्यानें आपल्या अन्तःकरणांत जो अभिमान बाळगावयाचा तो संस्कृतीच्या एकत्वानें जो मनुष्यसमूह निश्चित होतो त्या समूहाविषयीं धरावयाचा, कीं, ज्या स्थानांत आपण राहतों त्या स्थानांत निरनिराळ्या संस्कृतीचे लोक मिळून जो समाज होतो त्या प्रदेशनिश्चित समाजाचेच केवळ आपण अंशभाक् आहोंत, संस्कृतीच्या एकत्वामुळें उत्पन्न होणाऱ्या इतस्ततः पसरलेल्या मनुष्यसमूहाशीं आपणास कांहीं एक कर्तव्य नाहीं, ही भावना मनांत ठेवून केवळ प्रदेशमूलक अभिमान बाळगावयाचा, या प्रश्नाचें उत्तर येथें देणें अप्रस्तुत होय. तथापि हें सांगितलें पाहिजे कीं, लोकांचें अन्तःकरण जसें देशप्रेमानें व्याप्त असतें तसेंच जाती, संप्रदाय आणि संस्कृति यांच्या प्रेमानेंहि व्याप्त असतें. आणि प्रेममूलक जिज्ञासा ही या सर्वांसंबंधानें आहे. यासाठीं हिंदुस्थानचें आणि तसेंच हिंदुसमाजाचें ज्ञानहि आपणास पाहिजे. हिंदुस्थान आणि हिंदुसमाज हे दोन्ही मनुष्यसमूह स्पर्धेनें व्याप्त आहेत.

आपणांस हिंदुस्थानचे अवयव आणि हिंदुसमाजाचे अवयव या दोन्ही दृष्टींनीं आपले हितसंबंध तपासले पाहिजेत. हिंदुस्थानदेश आणि हिंदुसमाज या दोन्ही समुच्चयांस स्पर्धा बाधत आहे. हिंदु ही भावना ठेवून आपलें हितसंबंध पहाण्यापूर्वी आपण हिंदुस्थानविषयकच विचार करूं. कां कीं हिंदुस्थान ही केवळ राजकीय व प्रादेशिक कल्पना असल्यामुळें हिचें स्पष्टीकरण करणें आणि आपले हितसंबंध पहाणें अधिक सुलभ आहे.

**हिंदुस्थानाचें स्थूल स्वरूप**—हिंदुस्थानाविषयीं विचार करतांना हिंदुस्थानाला देश म्हणण्यापेक्षां स्वतंत्र खंड म्हणणेंच अधिक योग्य होय. आज जरी तो आशिया खंडाचा भाग आहे, तरी भूस्तरशास्त्रांतील कालमापनपद्धतीप्रमाणें पाहतां हा हिंदुस्थान व आशिया यांचा अवयव-अवयवीसंबंध अलिकडला आहे. भूस्तरशास्त्रज्ञांचें मत असें आहे कीं हिमालयपर्वताचे ठिकाणीं पूर्वी एक मोठा समुद्र होता; व हिंदुस्थानचा दक्षिणभाग मादागास्करपासून मलायाबेटापर्यंत पसरलेल्या मोठ्या भूप्रदेशाशीं जोडलेला होता. हल्लींहि हिमालयपर्वतामुळें हिंदुस्थान आशियाखंडापासून अगदीं पृथक् झालेला आहे. यांशिवाय हिंदुस्थानाला स्वतंत्र खंड असें मानण्यास अनेक कारणें आहेत. आकारानें हिंदुस्थान रशियावर्जित युरोपखंडाएवढा आहे. लोकसंख्या सर्व पृथ्वीवरील लोकसंख्येच्या पंच-

मांश आहे हें सांगितलेंच आहे. जमीन, हवापाणी वगैरे भौतिक स्थिति व मनुष्यजाति या बाबतींत इतकी विविधता आहे कीं, हिंदुस्थानाला भिन्न देशाचा समुदाय किंवा खंड म्हणणेंच योग्य दिसतें. उत्तरेकडील सर्वोच्च हिमालयपर्वत व त्याच्या पायथ्यावरील गहनदाट अरण्यें, मध्यवर्ती वालुकामय अफाट प्रदेश, दक्षिणेकडील सह्याद्रि, निलगिरि इत्यादि पर्वत, सिंधुगंगायमुनादि महानद्या या सर्वांनीं मिळून होणारा भौगोलिक असामान्य देखावा कोणाहि प्रवाशाच्या सहज लक्षांत भरण्यासारखा आहे.

भूस्तरशास्त्रदृष्ट्या परस्परविरोधी गोष्टींनीं हिंदुस्थानदेश भरलेला आहे. हीच गोष्ट त्यास एक देश म्हणण्यापेक्षां ही एक स्वतंत्र सृष्टीच आहे अशी भावना उत्पन्न करिते. हिंदुस्थानच्या केवळ अधोभागासारखें असलेलें द्वीपकल्प जगांतील अत्यंत जुन्या भूभागापैकीं आहे, उलट जगांत उच्चतेंत श्रेष्ठ असलेला आणि उत्तरहिंदुस्थान जरी प्रलयानें बुडून गेलें तरी आपलीं शिखरें उंच राखणारा हिमालय पर्वत मात्र अगदीं अलीकडे उत्पन्न झालेला आहे. पृथ्वीच्या इतिहासांतील निरनिराळ्या युगांच्या दर्शक गोष्टी हिंदुस्थानांत सांपडतात. जमिनीचे अनेक भिन्न प्रकार येथें आहेतच; आणि युरोपांतल्यापेक्षां कितीतरी अधिक जातींचे प्राणी येथें आहेत. हवामानांतहि ठिकठिकाणीं फार भिन्नता आहे. उत्तरहिंदुस्थानांत कांहीं ठिकाणीं शीतोष्णतामान आत्यन्तिकतेला जातें, म्हणजे हिंवाळ्यांत पारा शून्यांशाच्या बराच खालीं जातो, तर उन्हाळ्यांत उष्णतामान १२० अंशांपर्यंत वाढतें.

पर्जन्यवृष्टीसंबंधींहि विविधता अशीच विलक्षण आहे, कांहीं ठिकाणीं पाऊस ३०० इंचांपेक्षांहि अधिक पडतो, तर कोठेंकोठें तो पांच इंचहि पुरा पडत नाहीं.

लोकांच्या बाह्यस्वरूपाकडेच लक्ष देतां भिन्नभिन्न प्रकारचे लोक हिंदुस्थानांतल्याप्रमाणें इतरत्र कोठेंहि आढळत नाहींत. परकी मनुष्याला सर्व चिनी लोक बहुतेक सारखेच दिसतात, पण हिंदुस्थानच्या रहिवाशांतील परस्परांतला विलक्षण फरक कोणाच्याहि तावडतोब लक्षांत येतो. गुरखे, पठाण, जाट, रजपूत, नाग, या प्रकारें लोकांत शारीरिक भेद असून शिवाय तामील, तेलंगी व कानडी यांसारखे पोटभेद युरोपांतील इंग्रज, फ्रेंच, जर्मन यांच्याप्रमाणें आहेत. निरनिराळ्या काळीं आर्यन, शक, हूण, पठाण, मोंगल वगैरे लोकांच्या स्वाऱ्या येऊन गेल्या त्यांचे वंशज आज कित्येक वर्षे हिंदुस्थानांत एकत्र राहत आहेत. कांहींतर मूळच्या हिंदुसमाजामध्यें त्यांचें नवेपण ओळखतां येणार नाहीं इतके प्रविष्ट झाले आहेत. या बाह्य फरकांकडे लक्ष न देतां सांस्कृतिक आणि विचारविषयक फरकांकडे लक्ष दिलें तर ही एक स्वतंत्र सृष्टीच आहे असें परकीयांस वाटतें. येथील सांस्कृतिक आणि विचारविषयक परंपरेवर आज बाह्य जगाचा जाणवेल इतका परिणाम होत आहे. आतां यापुढें इंग्रजी अम्मलाखालील सुधारणांमुळें व युरोपियन लोकांशीं चालू असलेल्या संघट्टनामुळें व स्पर्धेनें होणारे फरक भविष्यकाळीं दिसून येणार आहेत.

हिंदुस्थानांत निरनिराळ्या मुख्य सहा भाषागोत्रांपासून बनलेल्या अशा एकंदर १३० भाषा आज प्रचलित आहेत. बहुतेक लोक हिंदु आहेत. त्यांत शैव, वैष्णव, महानुभाव, लिंगाईत, बौद्ध, जैन, शीख इत्यादि पंथ आहेतच, शिवाय ख्रिस्ती, मुसलमान वगैरे भिन्न लोकांचे प्रकार या भारतीय जनतेंत आहेत. एकेश्वरवादी, अनेकेश्वरवादी, सर्वेश्वरवादी वगैरे मतें, पूजकांचे अनेक प्रकार, जलतरुपाषाणांनां देव मानून त्यांनां जिवंत प्राण्यांचे बळी देणारे लोक या सर्वांचें वैविध्य कोणासहि दिसल्याखेरीज रहात नाहीं. विवाहविधी अनेक प्रकारचे आहेत. बायकांमध्यें पातिव्रत्यगुणाची महती विशेष आहे. कांहीं ठिकाणीं पडदापद्धती आहे, तर कोठें स्त्रीपुरुषमिश्र व्यवहार अव्याहत चालू आहे. पोषाखांचे अनेक प्रकार आहेत. कांहीं ठिकाणीं गहूं, कोठें तांदूळ, तर कोठें ज्वार, मका वगैरे मुख्य भोज्यांचे प्रकार आहेत. सुधारणेंतील सर्व पायऱ्यांवरचे लोक येथें सांपडतात. उदाहरणार्थ पाश्चात्य सुधारणेचें आगर जी मुंबापुरी तिजपासून पन्नास मैलांच्या आंतच नग्नकल्प स्त्रीपुरुष दृष्टीस पडतात. उच्च शिक्षण व सुधारणा झालेले कांहीं लोक सांपडतात, तर जंगलांत दऱ्याखोऱ्यांत राहून झाडांचीं पानें पांघरून रानांतील फळेंमुळें खाऊन राहणारे अत्यंत रानटी लोकहि कोठेंकोठें आढळतात.

राजकीय परिस्थितीहि अशीच भिन्नभिन्न आहे. हिंदुस्थानचा बहुतेक भाग ब्रिटिशसत्तेखालीं आहे, तरीहि मधूनमधून लहानमोठीं देशी संस्थानें आहेतच. कांहीं मोठ्या संस्थानिकांचे संपूर्ण अधिकार राहूं दिलेले आहेत. कांहीं अगदींच लहान जहागिरदार आहेत. ब्रिटिश अमलाखालीं मुख्य मोठे चार इलाखे असून बाकीचे लहानमोठे प्रांत बनविलेले आहेत.

हा इतका मोठा प्रदेश आज जवळ जवळ एक छत्राखालीं आला आहे आणि ब्रिटिश साम्राज्यास साम्राज्य हें नांव धारण करण्यास अधिकार जर पोंचत असेल तर तो हिंदुस्थानमुळेंच पोंचतो. हा देश अत्यंत विविध असल्यामुळें या देशाचें जगापासून भिन्नत्वमूलक ऐक्य जरी कांहींअंशीं प्राचीन कालापासून लोकपरिचित होतें, तथापि संहतकार्यविषयक भावना सर्व अर्वाचीनच आहेत. आणि जगांतील स्पर्धेत आपल्या सामुच्चयिक अस्तित्वाची ओळख पटण्यास नुकतीच कोठें सुरवात झालेली आहे.

या इतक्या विविधस्वरूपी समूहांनीं भरलेल्या समुच्चयास एकराष्ट्रीयत्व कसें येईल, त्यांस एकच कसें म्हणावें, त्या सर्वांस एकत्र बांधणारा इतिहास काय इत्यादि प्रश्न पुढें येतात. एवढी गोष्ट खरी कीं विसाव्या शतकांत एकत्वभावना जितकी जोरानें जाणवली तितकी पूर्वी कधींहि जाणवली नव्हती.

सध्यांच्या हिंदुस्थानांतील एखादा भाग तोडून तो जगाच्या दुसऱ्या कोणत्या तरी भागास जोडल्यास तें भारतीयांस आवडेल काय हा प्रश्न विचारावा म्हणजे हिंदुस्थानास एकलभावना कितपत आहे याचें उत्तर मिळेल.

सर्व लोकांनीं मिळून एकत्र कार्य केलेलें जरी थोडें असलें तरी ज्या गोष्टी लोकांस एकत्र बांधतात अशा अनेक आहेत. त्यांपैकीं मुख्य ही कीं बाहेरील जग भारतीयांस एकसारखेंच वागवितें. अमेरिकन लोक हिंदुस्थानांतील हा मनुष्य हिंदु आहे अगर मुसलमान आहे अगर ख्रिस्ती आहे याची चौकशी करीत नाहींत. अमेरिकन लोक हिंदुस्थानांतील सर्वांसच हिंदु म्हणतात. खुद्द तुर्कस्थानांतील लोक हिंदुस्थानांतील मुसलमानांस हिंदी म्हणून परके समजतात. इराणांतहि तसेंच करतात. आणि याप्रकारें बाहेरील जगानें हिंदुस्थानांतील सर्व लोकांस इंडियन किंवा हिंदी किंवा हिंदु यांपैकीं कोणतेंहि नांव देऊन एकच समजावें ही गोष्ट भारतीय जनतेच्या एकत्वाची उत्पादक आहे.

हिंदुस्थानाच्या जगाशीं संबंधाचा विचार करतांना चार-पांच संबंधांकडे लक्ष दिलें पाहिजे.

पहिला संबंध राजकीय होय. जगाशीं ब्रिटिश साम्राज्य अनेक तहनाम्यांनीं आणि अनेक तऱ्हेच्या आश्वासनांनीं आणि सार्वराष्ट्रीयसंघामध्यें सभासद असल्यामुळें बद्ध आहे. आणि हिंदुस्थानाचा ब्रिटिश साम्राज्याशीं अवयव–अवयवीसंबंध असल्यामुळें हिंदुस्थानहि त्याचप्रकारें बद्ध आहे. याशिवाय राष्ट्रसंघामध्यें स्वतंत्रपणें हिंदुस्थानास सदस्यत्व आहेच.

हिंदुस्थान व इतर जग यांशीं असलेला ज्ञानविषयक आणि विचारविषयक संबंध हा दोहोंस जोडणारा दुसरा संबंध होय. जगाशीं विचारविषयक संबंध देखील युरोपीय संस्कृतीमार्फत व इंग्रजी भाषेंतील ग्रंथांमार्फत व येथील विद्यापीठांमार्फत झाला आहे. जगांतील सर्व तऱ्हेच्या अर्वाचीन विचारांची छाया इंग्रजी ग्रंथांत दिसून येते आणि इंग्रजी ग्रंथांमार्फत ते विचार हिंदुस्थानभर पसरतात. शास्त्रज्ञांचा विकासवाद जगाचें निरनिराळ्या शास्त्रीय विचारांच्या बाबतींत होणारें ऐक्य हिंदुस्थानांतील सुशिक्षित वर्गांत पसरीत आहे.

तिसरें बंधन पारमार्थिकविचारमूलक आणि उपासनामूलक होय. पारमार्थिक विचार आणि उपासना हीं दोन्हीं कधीं कधीं बरोबर जातात आणि कधीं कधीं पृथक्पणें जातात. भारतीय पारमार्थिक विचारांची व पाश्चात्य पारमार्थिक विचारांची देव-घेवहि, बुद्धिस्ट सोसायटी आफ् ग्रेटब्रिटन अँण्ड आयर्लंड, ब्रह्मसमाज, थिआसफीकल सोसायटी, अमेरिकेची वेदांत सोसायटी इत्यादि संस्थांमार्फत होत आहे. तथापि हेंहि सांगितलें पाहिजे कीं संस्थांमार्फत प्रसृत होणारे विचार हे वैयक्तिक प्रयत्नानें होणाऱ्या विचारांच्या देवघेवीचा अत्यंत अल्प अंश होत. हिंदुस्थानांत पूर्वी उत्पन्न झालेले विचार येथील ग्रंथांच्या भाषांतरांनीं पाश्चात्यांत प्रसृत झाले आणि पाश्चात्य विचार त्यांच्या ग्रंथांच्या प्रत्यक्ष ओळखीनें आपल्या लोकांत प्रसृत होतात.

हिंदुस्थानांत मुसलमान, ख्रिस्ती इत्यादि अनेक संप्रदायांचे लोक आहेत, त्यांचा स्वसदृश बाह्य लोकांशीं संबंध येतो. तथापि बाह्यांचा आणि त्यांच्या प्रयत्नांचा हिंदु जनतेवर परिणाम कितपत होत आहे ही गोष्ट सांगतां येण्याजोगी नाहीं.

चवथें दोहोंसहि बांधणारें बंधन हें व्यापारविषयक होय. एका स्थलीं उत्पन्न झालेल्या मालाचा दुसऱ्या ठिकाणीं उपयोग होणें हें स्वाभाविक आहे आणि हें बंधन इतर कोणत्याहि बंधनापेक्षां अधिक लौकर जोमास येणारें आणि अधिक परिणामकारी होईल. या बंधनाचा अभ्यास फार सूक्ष्म तऱ्हेनें व्हावयास पाहिजे.

हिंदुस्थान आणि इतर जग यांमधील उपासनाविषयक व देव-घेव आणि व्यापारविषयक या दोन्ही क्रिया सर्धापर आणि सहकार्यपरहि असल्यामुळें त्यांचें सविस्तर परीक्षण अवश्य आहे, आणि तें तसें करावयाचें योजिलें आहे.

हिंदुस्थान आणि जग यांचा सामाजिक संबंध फारच अल्प आहे आणि जो आहे तो नाखुषीनें होत आहे. सोंवळ्या समाजाचें सोंवळें न टिकल्यामुळें हें बंधन उत्पन्न होत आहे. हिंदु जनता आणि बाहेरील जग यांच्यामध्यें लग्नव्यवहार नाहीं. हिंदूंनीं परदेशीं जावें हेंच पन्नास वर्षांपूर्वी लोकांना फारसें रुचत नव्हतें. मोनिअर विल्यम्स म्हणतो कीं तेल आणि पाणी हीं एकमेकांशीं मिळतील पण राज्यकर्ते आणि जित लोक हिंदुस्थानांत एकत्र व्हावयाचे नाहींत. हिंदुस्थानी जनतेंत आज परकीय रक्त मिसळत नाहीं असें नाहीं. कायद्यानें असें ठरविलें आहे कीं, युरोपीय पुरुषाशीं हिंदु बाईनें लग्न न लावतां तिला त्यापासून जर मुलगा झाला असेल तर तो हिंदु आहे. हा नियम व्यवहारांत दिसून येतो. पुष्कळ वेश्यांस युरोपीय लोकांपासून मुलें होऊन आज तीं हिंदु म्हणून समाजांत मोडलीं जातात. आणि याच प्रकारच्या एका घराण्यांत उत्पन्न झालेली एक मुलगी आपल्या सौंदर्याच्या जोरावर मोठ्या पदावर चढली आहे. कांहीं राजघराण्यांत मुसलमान स्त्रियांबरोबर लग्नव्यवहार होतो आणि कांहीं मुसलमान स्त्रियांपासून झालेले मुलगे आज हिंदु म्हणून समाजांत आहेत. या सर्व गोष्टी आज अपवादादाखल आहेत. रक्ताच्या दृष्टीनें मुसलमान आणि ख्रिस्ती यांचे वर्ग सोडून दिले तर भारतीय जनतेचा आणि इतर जगाचा रक्ताचा संबंध क्वचितच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---

## प्रकरण २ रें.

## राष्ट्रसंघ आणि हिंदुस्थानविषयक राजकारण.

**हिंदुस्थानांतील राजकीय आणि सामाजिक विचारः**—हिंदुस्थानाचा इतर देशांशीं पृथक्पणें संबंध आणि

इतर अनेक देश मिळून जो राष्ट्रसंघ बनला आहे त्याशीं संबंध, अनुक्रमें मुख्यतः स्पर्धामय आणि सहकारितेचा आहे. या संबंधानुरूप कर्तव्याची बजावणी व्हावयास सुरुवात अजून झाली नाहीं. देश या नात्यानें स्पर्धा करण्यासाठीं विचार करणारी आणि विचारानुरूप कार्य करण्याची शक्ति असलेली व्यक्ति म्हणून हिंदुस्थानची आज तयारी नाहीं, कां कीं ज्या राष्ट्रांतील लोकांचें कर्तव्य वरून येणारे हुकूम निमूटपणें पाळणें हेंच प्रधानतः आहे तें राष्ट्र स्पर्धेचे विचार तरी काय करणार ? मग सहकारिता तर दूरच राहिली. आज राष्ट्रसंघांत हिंदुस्थानचें सहकार्य हे शब्द केवळ गौरवासद आहेत. हिंदुस्थानाच्या तर्फेनें इतरांशीं सहकारिता करावयाचें अभिवचन सरकारनें दिलें तें केवळ भावी स्थितींत उपयोग व्हावा या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. लोकांना परराष्ट्रीय बाबतींत विचार करण्यास सवड नाहीं. हिंदुस्थानांतच सर्व देशभर लागू पडणाऱ्या मोठमोठ्या योजना तयार करण्यासहि नजीकच्या भविष्यकालांत स्फूर्ति होईल किंवा नाहीं हाहि प्रश्नच आहे. शासनशास्त्रीय विचाराचा आणि तन्मूलक कर्तृत्वबुद्धीचा अभाव कां आहे हें समजण्यास आपल्या हातीं फार थोडें आहे एवढी माहिति पुरे आहे; आणि एवढी माहिती प्रत्येकास आहे. देशाची सविस्तर राजकीय घटना देणें आणि तीवर विचार व्यक्त करणें अनवश्य आहे.

राजव्यवस्थेचें केवळ वर्णन देण्याचें येथें प्रयोजन नाहीं. जगाशीं सहकारिता करणें, परराष्ट्रीय दळणवळण ठेवणें या गोष्टींस अजून आपणांस फारसा अवकाश नाहीं हें विधान प्रत्येकास ठाऊक असलेल्या माहितीवर करण्यास हरकत नाहीं. कार्यक्षेत्रानुरूपच विचार आणि भावना असणार. वारंवार झालेल्या मंत्रोच्चारामुळें आपणांस एवढें ठाऊक आहे कीं आपण साम्राज्याचे विभाग आहोंत. ही साम्राज्याच्या अवयवत्वाची जाणीव फार फिक्की आहे. ती साम्राज्यविषयक भावनाकारक किंवा विचारप्रवर्तक नाहीं. समुच्चयासमुच्चयांतील संबंधांवर राहूं द्या पण केवळ देशांतर्गत जनताविषयक कर्तव्याचे, समाजव्यंगनिवारणाचे ऊर्फ दानाचे किंवा दुसरे राजकीय, आर्थिक किंवा सामाजिक विचार किंवा तत्त्वज्ञान आपल्या देशांत अलीकडे तयार झालें नाहीं. "सामाजिक सुधारणा" म्हणून जी चळवळ झाली ती चळवळ ज्ञानाच्या आणि विचारगांभीर्याच्या दृष्टीनें समाजशैशव सिद्ध करणारी होती. ज्या राष्ट्राचें भवितव्यनियमन दुसऱ्या राष्ट्राकडून पूर्णपणें होत होतें, त्या राष्ट्रांत सामाजिक अगर शासनविषयक विचार तरी जन्मास कसे येणार ? ते जन्मास आले नाहींत यांत कांहीं नवल नाहीं.

प्रत्यक्ष कार्यार्थ ज्यांस अवकाश नाहीं त्यांस विचारासाठीं फारच थोडें क्षेत्र उरतें, आणि तें झालेल्या कृत्यांसंबंधानें टाळ्या वाजवावयाच्या कीं वाजवावयाच्या नाहींत यांपैकीं कांहीं तरी करणें किंवा अधिक कार्य करण्याचें सामर्थ्य पाहिजे म्हणून मागणी करणें, आणि ज्या अत्यंत क्षुल्लक सामाजिक प्रश्नांवर बोललें असतां अधिकारीवर्ग रागावणार नाहीं त्या प्रश्नांवर बोलणें, या पुरतेंच रहातें. सरकारच्या कृत्यावर जेथें त्यांची सदोषता भासून येईल तेथें टीका करणें, किंवा सरकारी कर्तबगारी तिच्या स्वरूपाचा विपर्यास करून हास्यासद करणें आणि येणेंप्रमाणें अत्यंत घट्ट मुठींत धरून ठेवलेल्या अधिकाराबद्दल उट्टें घेणें, अधिक हक्कांची मागणी करणें, आणि महत्त्वाच्या जागा मागणें, या प्रकारची पद्धति कांग्रेस व इतर संस्थांनीं स्वीकारली आहे. सरकारी योजनांची आणि कार्यपद्धतीची कठोर दृढता, लोकांचें दौर्बल्य, बहुजनसमाजाची निरक्षरता, या गोष्टींनीं चळवळींवर, कायद्यांवर व समाजावर जे परिणाम होतात ते परिचितच आहेत. वर सांगितलेल्या अनेक पद्धतींनीं टीका करण्यापलीकडे येथील न बदलणाऱ्या सरकाराला लोकमतास मान देण्यास भाग पाडण्यासाठीं ज्या गोष्टी उद्भूत झाल्या त्यांमध्यें इंग्रजी मालास बहिष्कार घालणें, दुकानें बंद करणें इत्यादि गोष्टी येतात. निःशस्त्र प्रतिकाराची चळवळ किंवा सत्याग्रहतत्त्व अशा पेचांतच पुढें आलेलें आहे. निराशावादी लोकांनीं अधिकारारूढ व्यक्तींचे खून करणें एवढेंच तत्त्व उत्पन्न केलें आहे. हे खून आतां नाहींसे झाले आहेत आणि त्यांचें बरेंच महत्त्वाचें कारण जो निराशावाद तोच नाहींसा होऊन आज लोकांची वृत्ति थोडीबहुत आशामय झालेली आहे.

ब्रिटिशसत्तेखालीं असलेल्या हिंदुस्थानच्या विभागावर आज मोंगलाई जुल्म नाहीं; किंवा अव्यवस्थित आणि विचारशून्य राजे लोकांच्या लहरीप्रमाणें राज्य चालून हें राज्य लोकांस तापदायक होत नाहीं. तथापि आमचें भवितव्यनियमन आमच्या हातीं फारसें नसल्यानें सर्वप्रकारें प्रगतीस व्यत्यय येत आहे. लोकांपेक्षां राज्यकर्ते अधिक कर्तव्यनिष्ठ आहेत असेंहि नाहीं.

लोकांच्या प्रगतीस अडथळा करणाऱ्या आणि सरकारी यंत्रांत उच्च हेतूंचा अभाव किंवा उच्चहेतुसिद्ध्यर्थ प्रयत्नदौर्बल्य दाखविणाऱ्या महत्त्वाच्या गोष्टी म्हटल्या म्हणजे, शिक्षणविषयक सरकारी औदासीन्य आणि दारूपासून उत्पन्न काढण्याची सरकारी अधिकाऱ्यांची इच्छा दिसत असल्यामुळें समाजांतील पुढाऱ्यांच्या दारू बंद करण्याच्या उच्च इच्छेस सरकारी अधिकाऱ्यांकडून होणारा व्यत्यय या होत. आणि या दोहोंपेक्षांहि अधिक महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे देशी भाषा आणि वाङ्मय यांच्या विकासास सर्व व्यवहार परकीय भाषेंत चालवावयाचे या सरकारी पद्धतीमुळें लागलेला गळफांस होय. लोकांच्या भाषा राजव्यवहारांत न वापरणें, उच्च शिक्षण परक्या भाषेंतच ठेवणें, आणि त्यामुळें बहुतेक सर्व जनतेस मूक आणि अज्ञानी बनविणें यापेक्षां मानवी जातीविरुद्ध भय-

कर गुन्हा दुसरा कोणताच नाहीं; आणि सर्व प्रकारच्या जुलमांपेक्षां हा जुलूम अधिक दुष्ट व भयंकर होय. कारण या जुलमानें केवळ एक दोन व्यक्तीच मरत नाहींत, तर सर्व राष्ट्रचेंराष्ट्र गुलामगिरींत टाकण्यास, अज्ञानांत ठेवण्यास, आणि त्याची सर्व प्रकारें दुर्गति करण्यास हा प्रत्यक्ष न वोंचणारा जुलुम कारण होत आहे. या परिस्थितीकडे सरकारचें लक्ष फारसें गेलें नाहीं; आणि समाजांतील पुढाऱ्यांचेंहि लक्ष गेलें नाहीं. उलटपक्षीं देश्य भाषांस महत्त्व देणारा 'देशाचे शासनविभाग भाषेच्या तत्त्वानुसार पाडावेत,' हा ठराव नामदार वैया नरसिंह शर्मा यांनीं आणि 'देशी भाषेंतून मध्यम शिक्षण असावें', हा ठराव ना. रामुणि रायंगार यांनीं व्हाइसरायच्या कायदेकौन्सिलांत आणला तेव्हां बऱ्याचशा इतर प्रसंगीं लोकांचे पुढारी समजल्या जाणाऱ्या वर्गानें त्यास विरोध केला. समाजांतील पुढाऱ्यांची कल्पना अशी दिसते कीं हिंदुस्थानची भावी संस्कृति आंग्लरूपच होणार आणि ती तशी होण्यांतच देशाचें हित आहे. या जुन्या कल्पनेविरुद्ध ज्या चळवळी आणि संस्था उत्पन्न झाल्या त्यांमध्यें डॉ. केतकर यांनीं आन्ध्र देशांत स्थापन केलेल्या राष्ट्रधर्मप्रचारणसंघाचा निर्देश करावा लागेल. तो संघ आज स्तिमितावस्थेंतच आहे. या संघाचा हेतु देशामध्यें राजकीय विभाग भाषेच्या तत्त्वानुसार पाडणें, प्रांतिक राज्यकारभार देशी भाषेंत चालविणें आणि शिक्षण देशी भाषेंतून देणें या सुधारणा घडविणें हा होय.

हिंदुस्थानामध्यें राजकीय विचारांचा सध्यांचा थर सांपत्तिकदृष्ट्या मध्यम वर्गाकडून निर्माण झाला आहे आणि त्याची व्याप्ति वर सांगितली एवढीच आहे. राष्ट्रशासनविषयक विचारच उत्पन्न झाले नाहींत तर साम्राज्यविषयक विचार कोठून उत्पन्न होणार? अर्थात् जगच्छासनविषयक विचार उत्पन्न होण्याचा आणि सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्रांत कांहींतरी भर टाकण्याचा काल तर दूरच आहे.

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या संस्थानांमध्यें विचारवान् मुत्सद्दी फारसे निघाले नाहींत आणि संस्थानाची प्रगति कशी काय करावी याविषयीं देखील विचार चालू नाहींत. संस्थानविषयक राजकीय विचार ज्यांत बऱ्याच उच्च दर्जाचे दृष्टीस पडतात असा फक्त एकच लेख दृष्टीस पडला आहे आणि तो म्हटला म्हणजे "वडोद्यांतील सुधारणा" हा रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांचा कोल्हापूर येथें प्रसिद्ध होत असलेल्या विश्ववृत्त मासिकांतील होय. हा लेख देखील त्या संस्थानच्या कोणी नागरिकानें लिहिलेला नसून ब्रिटिश हद्दींतील एका इतिहासशास्त्रज्ञानें तात्पुरता संस्थानाचा अभिमान धरून लिहिलेला आहे.

हिंदुस्थानांत राज्यव्यवस्था कशी असावी आणि लोकहित कसें साधावें याविषयीं चर्चा बऱ्याचशा सरकारी रिपोर्टांतून आणि सरकारी ठरावांतून आढळते. आणि कांहीं इंग्रज लोकहि या विषयावर स्वतंत्रपणें लिहितात. तथापि यासंबंधीं विचार करतांना त्यांचें विचारक्षेत्र बरेंचसें नियमित असतें आणि विचारांचें धोरणहि एतद्देशीय मुत्सद्दी असल्या बाबींवर विचार करितांना ठेवील त्यापेक्षां भिन्न असतें.

भारतीय राज्यव्यवस्थेच्या प्रश्नावर कांहीं त्रयस्थांनीं देखील लेख व ग्रंथ लिहिले आहेत. पण ते फारसे महत्त्वाचे नाहींत.

**राष्ट्रसंघ आणि सामाजिक व राजकीय विचाराकडे प्रवृत्तिः**—ज्यामुळें देशांत राष्ट्रहितविषयक विचार सुरु होतील अशी गोष्ट म्हटली म्हणजे डिसेंबर १९१९ मध्यें झालेला हिंदुस्थानाच्या राज्यव्यवस्थेसंबंधाचा कायदा होय. हा कायदा नुकताच पास झाला आहे आणि त्यामुळें आपलें भवितव्य आपण ठरवावें हें ध्येय शक्य करण्यास या कायद्याचा कितपत उपयोग होईल ही गोष्ट अद्याप दिसावयाची आहे. त्या कायद्याचें स्वरूप प्रत्येक भारतीयानें जाणलें पाहिजे.

या कायद्यानें हिंदुस्थानी जनतेस मिळालेले हक्क अपुरे आहेत असें मत येथील कांग्रेसवाले आणि कांग्रेसच्या बाहेरील नेमस्त या दोघांनींहि व्यक्त केलें आहे. साम्राज्यविषयकभावना देखील कदाचित् जागृत होईल काय अशी शंका उत्पन्न करणारी गोष्ट म्हटली म्हणजे १८ आगष्ट १९१८ रोजीं प्रसिद्ध केलेली साम्राज्याच्या युद्धविषयक मंत्रिमंडळाची योजना होय. नवीन होणाऱ्या कायमच्या व युद्धविषयक मंत्रिमंडळामध्यें आपला मंत्री पाठविण्याची सवड वसाहतींच्या संघांस त्या प्रसिद्धिपत्रकांत दिली आहे आणि या प्रसंगीं हिंदुस्थानालाहि आपला प्रतिनिधि पाठविण्याची योजना करूं असें अभिवचन दिलें गेलेलें आहे.

सार्वराष्ट्रीय राजकारणांत हिंदुस्थानचें स्थान महायुद्धाच्या समाप्तीपर्यंत एवढेंच होतें कीं स्वसंरक्षणास असमर्थ अशा लोकांचा हा देश इंग्रजांपासून शक्य झाल्यास दुसऱ्या कोणीतरी हिरावून घ्यावा. भविष्यकालीन राजकारणांत जगाचा हिंदुस्थानासंबंधीं विचार बदलला आहे काय हें दिसावयाचें आहे.

महायुद्धाचेच जे अनेक परिणाम झाले त्या परिणामांचें एक अत्यन्त महत्त्वाचें अंग म्हटलें म्हणजे राष्ट्रसंघाची घटना होय. या घटनेचा परिणाम भविष्यकालाच्या अंधारांत लपलेला आहे.

हिंदुस्थानाच्या राजकारणासंबंधीचा प्रश्न या युद्धानें आणि राष्ट्रसंघाच्या घटनेनें पालटून गेला आहे. सरहद्दीच्या प्रश्नापेक्षां राष्ट्राच्या अंतस्थ चळवळींनां इतःपर अधिक महत्त्व येईल असा रंग दिसत आहे आणि हिंदुस्थानविषयक राजकारणामध्यें परराष्ट्रीय व्यवहाराचें महत्त्व फारच कमी झालें आहे.

सर्व जगाचें एकल आतां दिवसानुदिवस शक्य आहे असें भासूं लागलें आहे. सर्व जगास सामान्य असें धर्मशास्त्र निर-

निराळ्या स्वतंत्र राष्ट्रांच्या व्यवहारांपासून निर्माण झालें असून सर्व जगामध्यें परस्परांस एका संस्थेखालीं बद्ध करणारी संस्था नव्हती ती आतां स्थापित झाली आहे; आणि ही स्थापन करण्याचें श्रेय अमेरिकेचे विद्वान् प्रेसिडेंट डॉ. विल्सन यांच्याकडे आहे. या राष्ट्रसंघाचीं घटनासूत्रें तपासून पाहिलीं असतां हीं संघसूत्रें फार लवचिक दिसतात आणि दुर्बलास साहाय्य करण्यासाठीं राष्ट्रसंघ स्थापन करावयाचा हें डॉ. विल्सन यांचें उद्दिष्ट साध्य न होतां ग्रेट ब्रिटनलाच आपला डाव साधण्यासाठीं राष्ट्रसंघानें सवड दिली असा डॉ. विल्सन यांवर त्यांच्या देशांतील लोकांचा आक्षेप आहे. ज्या परिस्थितींत या संघाची स्थापना झाली ती परिस्थिति लक्षांत घेतां असें दिसतें कीं डॉ. विल्सन यांस त्यांनीं केल्या त्यापेक्षां अधिक गोष्टी शक्य नव्हत्या. जगांतील बलवान् राष्ट्रांस आपली कांहीं विशेष किफायत दिसल्याशिवाय राष्ट्रसंघांत जाण्यानें कांहीं फायदा होणार नाहीं; आणि बलवान् राष्ट्रें आंत आल्याखेरीज कांहींच करणें शक्य नाहीं. राष्ट्रसंघांत ब्रिटिश साम्राज्यानें आपणास महत्त्वाचें स्थान आणि अधिक मतें मिळावीं म्हणून जी खटपट केली तीमुळेंच हिंदुस्थानाचें जगांत अस्तित्व जगाच्या लक्षांत आलें. हा राष्ट्रसंघ स्थापन झाला तो व त्याच्या अनुषंगानें जे हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेंत फेरफार झाले व होणार ते आतां सामाजिक आणि शासनविषयक विचारास कारक होतील असा अजमास आहे.

राष्ट्रसंघाचा करारनामा येणेंप्रमाणें आहे.

## राष्ट्रसंघाचा करारनामा ( समयपत्रिका )

राष्ट्राराष्ट्रांत सहकारित्व वाढत जावें, राष्ट्राराष्ट्रांतील परस्परसंबंध शांततेचे राहून सर्वांना निर्भयतेची स्थिति प्राप्त व्हावी, आणि एतदर्थ (इष्टप्राप्तीसाठीं) युद्धाचा आश्रय करणार नाहीं (तर शांततेच्या मार्गांनीं शक्य तेवढी सर्व खटपट राष्ट्रसंघसमयपत्रिकेनुसार करूं) हें बंधन मान्य करणें, राष्ट्राराष्ट्रांतील व्यवहार उघडपणें व न्यायाच्या आणि सन्मान्यतेच्या तत्त्वावर चालतील असें करणें, सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्राच्या सर्वसंमत तत्त्वांना शासनसंस्थांनीं (सरकारांनीं) प्रत्यक्ष आचारनियमांत स्थान द्यावें व ही सुधारणा कायमची व्हावी असा प्रयत्न करणें, सुसंघटित जनसमाजांच्या परस्परव्यवहारांत न्याय राखणें, व तहनाम्यांनीं उत्पन्न झालेल्या सर्व बंधनांबद्दल सर्वांकडून पूर्ण आदरभाव कृतीनें व्यक्त केला जाईल अशी व्यवस्था करणें, या हेतूंनीं करार करणारे महापदस्थ पक्ष (राष्ट्रें) हा राष्ट्रसंघाचा करारनामा मान्य करितात.

कांड १-(१) या करारनाम्याला जोडलेल्या परिशिष्टांत तहनाम्यावर सही केलेल्या ज्या राष्ट्रांचीं नांवें दिलीं आहेत तीं राष्ट्रें व (२) सदरील परिशिष्टांत जीं इतर राष्ट्रें उल्लेखिलीं आहेत त्यांतील जीं कोणीं हा करारनामा विनशर्त कबूल करतील तीं, या राष्ट्रसंघाचे उत्पादक सभासद गणले जातील. हा करारनामा अमलांत आल्यानंतर दोन महिन्यांच्या आंत राष्ट्रसंघाच्या चिटनवीस-कचेरींत कबुलायतनामा (राष्ट्रसंघाचे सभासद झाल्याचें मान्यतापत्र) वरील उल्लेखिलेल्या राष्ट्रांच्या समूहांतून जें राष्ट्र हजर करील तें संघाचें सदस्य झालें असें मानलें जाईल. संघाच्या इतर सदस्यांना हें नवें राष्ट्र सदस्य झाल्याची वार्ता वटपत्रानें दिली जाईल.

परिशिष्टांत दाखल न झालेल्या अशा कोणत्याहि पूर्ण स्वायत्त संस्थानाला, संस्थानसंघाला (डॉमिनियन)* अथवा वसाहतीला राष्ट्रसंघाचे सदस्य होतां येतें. मात्र, संघ-सभेंतील दोन तृतीयांश सभासदांची या गोष्टीस अनुमति पाहिजे, आणि या सदस्य होऊं इच्छिणारानें खालील दोन गोष्टी केल्या पाहिजेतः (अ) एक, आपलीं अन्यराष्ट्रविषयक कर्तव्यें व बंधनें पाळण्याची आपली इच्छा मनापासूनची आहे हें सिद्ध करणारीं चोख तारणें† त्यानें द्यावीं, (आ) दुसरें, त्याची लष्करी व आरमारी सामुग्री व फौज किती असावी इत्यादि संबंधीं जे नियम संघ त्याला घालून देईल ते त्यानें मान्य करावे.

राष्ट्रसंघाच्या सदस्यास, दोन वर्षांची सूचना देऊन, सदस्यत्व सोडतां येतें; मात्र, सदस्यत्व सोडूं इच्छिणारानें त्याजवर संघाच्या करारनाम्यानें पडलेली जबाबदारी व या करारनाम्यानें उत्पन्न होणारीं त्याचीं अन्यराष्ट्रविषयक कर्तव्यें सदस्यत्व सोडण्याच्या पूर्वीं पार पाडलीं पाहिजेत.

कांड २-एक संघ-सभा, एक कारभारी-मंडळ आणि एक कायम चिटनवीस-कचेरी या यंत्रांमार्फत राष्ट्रसंघाचें कार्यकर्तृत्व व्यक्त होईल.

कांड ३-राष्ट्रसंघाच्या सदस्यभूत राष्ट्रांचे प्रतिनिधी हे प्रस्तुत संघ-सभेचे सभासद समजावे.

प्रस्तुत संघसभेच्या बैठकी नियमित वेळीं होऊन शिवाय प्रसंगोपात्त प्रश्नांचा विचार करण्यास नियमित वेळांबाहेरहि या सभेच्या बैठकी होतील. या बैठकी संघाचे 'गृह-स्थानीं' अथवा इतरत्र पूर्वनिश्चित अशा स्थानीं होतील.

या बैठकींत राष्ट्रसंघाच्या कार्यक्षेत्रांत येणाऱ्या अथवा जगाच्या शांततेशीं संबद्ध अशा कोणत्याहि गोष्टीचा विचार संघ-सभा करील.

* डॉमिनियन याचा अर्थ सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्राच्या आजच्या नियमांत निश्चित झाला असल्याची आमची खात्री नाहीं. सं०

† याचें स्वरूप काय असावें ? सं०

या बैठकींत संघसदस्यांनां प्रत्येकीं एक मत असेल. कोणत्याहि सदस्यराष्ट्रास तीनपेक्षां अधिक प्रतिनिधी संघ-सभेच्या बैठकींत पाठविण्याचा अधिकार नाहीं.

कांड ४–कारभारी-मंडळांत अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें, ब्रिटिश साम्राज्य, फ्रान्स, इटली व जपान या राष्ट्रांचे प्रतिनिधी असून शिवाय इतर चार संघ-सदस्यांचे प्रतिनिधी असतील. कोणत्या चौघांचे प्रतिनिधी उल्लेखित राष्ट्रांच्या प्रतिनिधींबरोबर असावयाचे, हें वेळोवेळीं ठरविण्याचा पूर्ण अधिकार संघ-सभेला आहे. संघ-सभा आपल्या अधिकारानें हे प्रतिनिधी निवडून देईपावेतों ······या राष्ट्रांचे प्रतिनिधी कारभारी-मंडळांत नेमले आहेत.

संघ-सभेची मताधिक्यानें अनुमति मिळाल्यास कोणत्याहि संघ-सदस्यांचे प्रतिनिधी कायमचे जादा कारभारी करून घेण्याचा अधिकार कारभारी-मंडळास आहे. तसेंच ज्या संघ-सदस्यांची संघसभा कारभारी-मंडळांत प्रतिनिधि-रूपानें बसण्यास निवड करूं शकेल अशा सदस्यांची संख्या संघ-सभेच्या सदरहू प्रकारच्या अनुमतीनें वाढविण्याचा अधिकारहि कारभारी-मंडळास आहे.

जरूरी भासेल त्याप्रमाणें कारभारी-मंडळाच्या वेळोवेळीं बैठकी होतील. या मंडळाची वर्षांतून एक बैठक मात्र झालीच पाहिजे. बैठकीचें ठिकाण हें संघाचें 'गृह-स्थान' असेल अथवा पूर्वनिश्चित असें कोणतेंहि स्थान असेल.

या (कारभारी मंडळाच्या) बैठकींत राष्ट्रसंघाच्या कार्यक्षेत्रांत येणाऱ्या अथवा जगताच्या शांततेशीं संबद्ध अशा कोणत्याहि गोष्टीचा विचार होईल.

कारभारी-मंडळांत ज्या सदस्याचा प्रतिनिधि नाहीं अशा सदस्य-राष्ट्रांच्या हिताहिताशीं प्रामुख्यानें निगडित असलेल्या कोणत्याहि प्रश्नाचा कारभारी-मंडळाच्या ज्या बैठकींत विचार व्हावयाचा असेल त्या बैठकींत त्या प्रश्नाचा विचार व्हावयाच्या वेळीं सभासद म्हणून आपला कोणी प्रतिनिधि पाठवावा अशी निमंत्रण-सूचना कारभारी-मंडळाकडून त्या सदस्य-राष्ट्राला गेली पाहिजे.

कारभारी-मंडळाच्या बैठकींत ज्या सदस्य-राष्ट्रांचे प्रतिनिधी या मंडळावर असतील त्यांनां प्रत्येकीं एक मत आहे. या बैठकींत कोणत्याहि सदस्यास एकाहून अधिक प्रतिनिधी पाठवितां येणार नाहींत.

कांड ५–या करारनाम्यांत ज्या बाबींसंबंधानें भिन्न तऱ्हेचा स्पष्ट उल्लेख नाहीं, अशा सर्व बाबीसंबंधीं, कारभारी-मंडळ अथवा संघ-सभा यांच्या बैठकींत त्या त्या बाबीचा विचार होऊन प्रतिनिधिद्वारा हजर असलेल्या सर्व सदस्य-राष्ट्रांचें जेव्हां एकमत होईल तेव्हांच त्या विशिष्ट बाबीचा त्या बैठकीनें निर्णय केला असें समजलें जाईल.

बैठकीच्या कार्यानुक्रमासंबंधाचे नियम करणें, विशिष्ट प्रश्नांच्या चौकशीसाठीं चौकशी-मंडळें नेमणें वगैरे गोष्टी विशिष्ट (संघ-सभेच्या किंवा कारभारी-मंडळाच्या) बैठकींत प्रतिनिधिद्वारा हजर असलेल्या सदस्य-राष्ट्रांच्या मताधिक्यानें ठरवाव्या.

संघ-सभेची व कारभारी-मंडळाची पहिली बैठक अमेरिकेंतील संयुक्तसंस्थानांच्या अध्यक्षांच्या निमंत्रणानें होईल.

कांड ६–कायमची चिटनवीस-कचेरी संघाच्या 'गृह-स्थानीं' स्थापिली जाईल. या कचेरींत एक सर चिटनवीस व जरूरीप्रमाणें दुसरे चिटनवीस व इतर कामगार असतील.

परिशिष्टांत दाखविलेले गृहस्थ संघाचे पहिले सर चिटनवीस होत. यानंतर संघ-सभेच्या मताधिक्य-संमतीनुसार कारभारी-मंडळ सर चिटनवीसांची नेमणूक करील.

दुय्यम चिटनवीसांच्या व इतर कामगारांच्या नेमणुका सर चिटनवीस हे कारभारी-मंडळाच्या पसंतीनें करतील.

संघ-सभा व कारभारी-मंडळ यांच्या सर्व बैठकींत सर चिटनविसीचें काम हेच सर चिटनवीस करतील.

चिटनवीस-कचेरीचा खर्च संघ-सदस्य हिस्सेरशीनें सोसतील. सार्वदेशीय 'पोस्टल युनिअन'च्या सार्वराष्ट्रीय कचेरीचा खर्च ज्या हिस्सेरशीनें वांटून घेतात त्याच हिस्सेरशीनें सदरील चिटनवीस-कचेरीचा खर्च वांटून घेतला जाईल.

कांड ७–संघाचें 'गृह-स्थान' जिनीव्हा येथें स्थापिलें आहे. हें 'गृह-स्थान' केव्हांहि बदलण्याचा अधिकार कारभारी-मंडळास आहे.

राष्ट्र-संघाच्या ताब्यांतील अथवा त्याजशीं संबद्ध अशा सर्व जागां (चिटनवीस-कचेरींतील जागा धरून) वर स्त्रिया किंवा पुरुष यांपैकीं कोणासहि नेमतां येईल.

संघ-सदस्यांचे प्रतिनिधी व संघाचे अधिकारी हे संघाचें कार्य करीत असतां त्यांना राष्ट्र-वकीलांचे हक्क व सवलती आणि अदंड्यता हीं भोगावयास मिळतील.

संघ, संघाचे अधिकारी अथवा संघाचे बैठकीसाठीं आलेले प्रतिनिधी यांची ज्या इमारतींत व इतर जमिनींत वसति असेल त्या इमारती व जमिनी अनतिक्रमणीय समजाव्यात.

कांड ८–राष्ट्र-संघाच्या सदस्यांस जाणीव आहे कीं, जगतांत शांतता राखावयाची तर, प्रत्येक राष्ट्रानें त्याची अंतर्गत सुरक्षितता असावी, आणि त्याचीं अन्यराष्ट्रविषयक

कर्तव्यें त्याजकडून संघबलानें करवून घेण्याला राष्ट्र-संघाला जरूर असणारें सामर्थ्य असावें, या दोन तत्त्वांची उपेक्षा होऊं न देतां युद्धसाहित्य जितकें किमानपक्षीं कमी करतां येईल तितकें केलें पाहिजे.

संघाच्या प्रत्येक सदस्याच्या देशाची भूप्रदेशविषयक व इतर परिस्थिति लक्षांत घेऊन प्रत्येक राष्ट्रांतील सरकारानें आपलें युद्धसाहित्य किती व कसें कमी करीत जावें यासंबंधीं योजना तयार करणें व या योजना त्या त्या सरकाराकडे विचारासाठीं व अमलांत आणण्यासाठीं रवाना करणें हें काम कारभारी-मंडळाकडे आहे.

या योजनांचा दहा दहा वर्षांनीं ( किंवा तत्पूर्वीं ) पुनर्विचार होईल व जरूर भासल्यास त्या बदलल्या जातील.

कोणत्याहि सरकारानें सदरील प्रकारची युद्धसाहित्यविषयक योजना एकदां मान्य केली म्हणजे मग कारभारी-मंडळाच्या पूर्वानुमतीशिवाय या योजनेबाहेर त्या सरकाराला युद्धसाहित्य वाढवितां येणार नाहीं.

दारुगोळा व हत्यारें खासगी कारखान्यांतून खासगी पैशानें तयार होऊं देणें हें अनेक दृष्टींनीं अत्यंत आक्षेपार्ह आहे ही गोष्ट संघाच्या सदस्यांनां मान्य आहे. युद्धसाहित्याच्या सदरील उत्पादनपद्धतीमुळें होणारे दुष्ट परिणाम कसे टाळतां येतील आणि संघ-सदस्य असणाऱ्या ज्या राष्ट्रांनां आपल्या सुरक्षिततेला अवश्य असणारें युद्धसाहित्य स्वतःचे देशांत निर्माण करतां येत नाहीं त्यांची ती गरज योग्य मार्गानें कशी भागवितां येईल यासंबंधीं सल्ला देण्याचें काम कारभारी-मंडळाकडे आहे.

आपलें युद्धसाहित्य किती आहे, लष्कराच्या व आरमाराच्या वाढीसंबंधाच्या आपल्या पुढील योजना कशा प्रकारच्या आहेत, आणि युद्धसाहित्य करण्यास थोड्याफार फेरफारानें साहाय्यक होऊं शकतात अशा आपल्या कारखान्यांची व धंद्यांची तपशीलवार स्थिति कशी आहे—या सर्व बाबींसंबंधीं मोकळया मनानें लागेल ती माहिती एकमेकांस देण्याचें संघ-सदस्य मान्य-करीत आहेत.

कांड ९—संघाच्या करारनाम्यांतील कांडें १ व ८ यांतील नियमांची अंमलबजावणी करण्याच्या कामीं आणि सामान्यतः लष्करी व आरमारी सर्व प्रश्नांचे बाबतींत कारभारी-मंडळाला सल्ला देण्यासाठीं एक कायमचें सल्ला-मंडळ स्थापिलें जाईल.

कांड १०—राष्ट्रसंघाचें सदस्यत्व ज्यांनीं स्वीकारलें आहे अशा सर्व राष्ट्रांचें विद्यमान राजकीय स्वातंत्र्य आणि त्यांच्या मुलखांचें अभंगत्व यांसंबंधानें संघ-सदस्य स्वतः आदरबुद्धि ठेवतील इतकेंच नव्हे तर कोणीहि बाह्य शत्रु कोणाहि सदस्य-राष्ट्रावर चाल करून आल्यास या सदस्य-राष्ट्राला इतर सदस्य-राष्ट्रें साहाय्य करून त्याचें स्वातंत्र्य व त्याचा मुलूख संरक्षितील. कोणा सदस्य-राष्ट्रावर अशी संघ-बाह्याची स्वारी झाली अथवा होणार अशीं चिन्हें दिसलीं किंवा त्याला दरडावणीची स्वारीची सूचना कोणा शत्रु-राष्ट्राकडून आली तर अशा स्थितींत त्या सदस्य-राष्ट्राच्या संरक्षणाची जबाबदारी संघानें कशी पार पाडावी यासंबंधीं योजना करण्याचें व सल्ला देण्याचें काम कारभारी-मंडळानें केलें पाहिजे.

कांड ११—कोणीहि कोठेंहि युद्ध सुरू करो, अथवा युद्धाची धमकी देवो, या युद्धाचा अथवा धमकीचा संघ-सदस्यभूत राष्ट्राशीं प्रत्यक्ष संबंध असो वा नसो, राष्ट्र-संघाचे विचारक्षेत्रांत व कार्यक्षेत्रांत हें युद्ध व ही धमकी येते असें या करारनाम्याअन्वयें ठरविलें गेलें आहे. अशा युद्धाच्या अथवा धमकीच्या प्रसंगीं जगाची शांतता कायम रहावी यासाठीं योग्य दिसतील ते व उपयोगी वाटतील ते उपाय योजणें हें राष्ट्र-संघाचें काम आहे. असा कांहीं प्रसंग प्राप्त झाल्यास कोणाहि सदस्यभूत राष्ट्राच्या विनंतीवरून सर चिटनवीसांनीं कारभारी-मंडळाची सभा तावडतोब बोलावली पाहिजे.

राष्ट्राराष्ट्रांतील शांतता उच्छेद होण्यासारखी कांहीं भयसूचक परिस्थिति राष्ट्रांच्या अन्योन्यव्यवहारांत उत्पन्न झाली अथवा शांततेचा मूलाधार जो राष्ट्रांचा अन्योन्य स्नेह त्या स्नेहांत तफावत पडण्यासारखी जर कांहीं विपरीत गोष्ट घडून आली तर अशा कोणत्याहि गोष्टीकडे संघ-सभेचें अथवा कारभारी-मंडळाचें लक्ष वेधण्याचा हक्क प्रत्येक सदस्य-राष्ट्रास असून तें एक स्नेह-कार्य आहे असेंहि या कांडान्वयें ठरविलें जात आहे.

कांड १२—आपापसांत युद्ध जुंपण्यासारखें कांहीं वितुष्ट उत्पन्न झाल्यास सदस्य-राष्ट्रें ही आपली वितुष्टाची बाब निर्णयासाठीं पंचायतीपुढें अथवा चौकशीसाठीं कारभारी-मंडळापुढें मांडण्याचें या कांडान्वयें मान्य करीत आहेत; तसेंच पंचायतीनें निकाल दिल्यानंतर अथवा कारभारी-मंडळानें चौकशीचा अहवाल प्रसिद्ध केल्यानंतर तीन महिनेपावेतों, कसलीहि बाब असली तरी, युद्धाचा आश्रय करावयाचा नाहीं अशीहि मान्यता सदस्य-राष्ट्रें देत आहेत.

या कांडान्वयें असेंहि ठरलें आहे कीं, जे पंच नेमले जातील त्यांनीं आपला निर्णय देण्यास भलताच कालक्षेप करूं नये व कारभारी-मंडळानें आपला अहवाल त्यांजकडे प्रकरण आल्यापासून सहा महिन्यांच्या आंत प्रसिद्ध करावा—मग वाद कशाहि भानगडीचा असो.

कांड १३—राष्ट्रांच्या वकीलांच्या वकीलीमार्फत न तुटण्यासारखा परंतु पंचायतीकडे सोंपविण्यासारखा असा

वाद परस्परांत उत्पन्न होईल तेव्हां तो सांगोपांग पंचायतीपुढें ठेवण्याचें सदस्य-राष्ट्रें मान्य करीत आहेत.

तहनाम्याचा अर्थ, सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्राचा प्रश्न, अन्यराष्ट्र-विषयक स्वीकृत वा स्वभावसिद्ध कर्तव्याचा भंग सिद्ध करणारी गोष्ट, असा भंग झाल्याचें सिद्ध झाल्यास त्याजबद्दल मोबदला कसा व किती द्यावयाचा हा प्रश्न, या व असल्या गोष्टीसंबंधाचे वाद पंचायतीपुढें मांडण्यासारखे आहेत असें संघाचें मत आहे.

या वादाकरितां जें लवाद (पंचायत) नेमावयाचें तें वादांतील सर्व पक्षांनां मान्य असें असावें; अथवा तें वादी प्रतिवादी यांच्या दरम्यान कांहीं अशा प्रकारच्या लवादासंबंधीं लेख झालेला असेल तर या लेखांतील शर्तीनुसार नेमलें गेलें पाहिजे.

अशा लवादानें दिलेला निकाल कांहीं कसूर न करितां अमलांत आणण्याचें सदस्य-राष्ट्रें अंगावर घेत आहेत. जें सदस्य-राष्ट्र हा लवाद-निर्णय मान्य करील त्याचे विरुद्ध युद्ध न करण्याचेंहि सदस्य-राष्ट्रें पत्करीत आहेत. लवादाचा निकाल एखादें राष्ट्र मान्य न करील व अमलांत न आणील तर त्याच्या बाबतींत या निकालाचा अंमल कसा करावयाचा यासंबंधीं योजना करण्याचें व सल्ला देण्याचें काम कारभारी-मंडळ करील.

कांड १४–कायमची सार्वराष्ट्रीय न्याय-कचेरी स्थापावयाची तर ती कशी असावी वगैरे संबंधाच्या योजना कारभारी-मंडळानें तयार करून त्या सदस्य-राष्ट्रांनां त्यांच्या संमतीलाठीं सादर कराव्या. राष्ट्राराष्ट्रांतील वादाच्या स्वरूपाचा तंटा कोणी वादी अगर प्रतिवादी राष्ट्रानें अशा कचेरींत आणल्यास तो ऐकून घेऊन त्याचा निर्णय करण्याचा या कचेरीला अधिकार राहील. तसेंच कारभारी-मंडळानें अथवा संघ-सभेनें एखादा वादाचा अथवा इतर प्रश्न या कचेरीपुढें मांडल्यास त्याजवर सल्लागाराचें मत म्हणून आपले विचार प्रदर्शित करण्याचाहि या कचेरीला अधिकार असेल.

कांड १५–लढाईपर्यंत जाण्यासारखा कांहीं वाद आपापसांत उपस्थित झाला व तो लवादाकडे नेण्याचें न ठरलें अथवा रहित केलें गेलें तर तो कारभारी-मंडळापुढें मांडण्याचें सदस्य-राष्ट्रें मान्य करीत आहेत. सर चिटनवीसांनां एक सूचनापत्र पाठवून असल्या प्रकारचा वाद उपस्थित झाल्याचें कळविलें म्हणजे कारभारी-मंडळापुढें तो मांडला असें समजलें जाईल, व पुढचें वादग्रस्त बाबींची पूर्ण चौकशी व विचार करण्यासाठीं सर्व व्यवस्था करण्याचें काम सर चिटनवीस करतील.

या कामाच्या सोईसाठीं वादी–प्रतिवादी-राष्ट्रांनीं आपल्या कैफियती, वादसंबद्ध कागदपत्रें व इतर हकीकती यांसह, होईल तितक्या लवकर सर चिटनवीसांकडे पाठवाव्या.

या कैफियती वगैरे तावडतोब प्रसिद्ध करण्याचा हुकुम कारभारी-मंडळ जरूरीप्रमाणें सोडील.

अशा वादाचा समाधानकारक निकाल लावण्याचा यत्न कारभारी-मंडळ करील; व हा यत्न यशस्वी झाल्यास कारभारी-मंडळाला योग्य दिसेल त्याप्रकारें या वादांतील बाबी, वादी-प्रतिवादींचें म्हणणें, व निर्णयपत्रांतील कलमें प्रसिद्ध केलीं जातील.

वादाचा निकाल न लागेल, तर कारभारी-मंडळानें वादविषयक बाबी आणि त्यांजसंबंधीं मंडळाचे दृष्टीनें योग्य व न्याय्य वाटतील ते शिफारसीच्या स्वरूपाचे निकाल मतैक्यानें अथवा मताधिक्यानें एकत्र लिहून तो अहवाल प्रसिद्ध करावा.

कारभारी-मंडळांत प्रतिनिधि पाठविणारें कोणतेंहि सदस्य-राष्ट्र मंडळाकडे आलेल्या वादांतील गोष्टी व मंडळाचे तत्संबंधीं निर्णय जाहीर करण्यास अधिकृत आहे.

कारभारी-मंडळाचा वादासंबंधीं अहवाल एक वा अधिक वादी-प्रतिवादी राष्ट्रांचे प्रतिनिधींखेरीज बाकी सर्व सभासदांच्या मतैक्यानें जर मंजूर झाला तर या अहवालांतील शिफारसीवजा निर्णय ज्या पक्षाला मान्य असेल त्याशीं युद्ध न करण्याचें संघ-सदस्य मान्य करीत आहेत.

एक वा अधिक वादी-प्रतिवादी राष्ट्रांच्या प्रतिनिधींखेरीज बाकी सर्व सभासदांनां पसंत असा अहवाल जर कारभारी-मंडळाला तयार करतां न आला, तर हक्क व न्याय या दृष्टींनीं योग्य ती कारवाई करण्यास संघ-सदस्य मुखत्यार आहेत.

वादाचा विषय "सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्रान्वयें सर्वथा आमच्या अंतर्गत अथवा स्थानिक अधिकारांतील आहे" असें एखाद्या वादी अथवा प्रतिवादी पक्षानें म्हटलें व हें त्याचें म्हणणें बरोबर आहे असें कारभारी-मंडळालाहि चौकशीअंतीं वाटलें तर, मंडळानें तसा अहवाल प्रसिद्ध करावा; असल्या वादांत अमुक निकाल योग्य होईल अशी कोणतीहि शिफारस मंडळानें करूं नये.

या कांडान्वयें जे वाद मंडळाकडे येतील त्यांपैकीं कोणताहि वाद संघ-सभेकडे पाठविण्याचा मंडळास अधिकार आहे. वादी-प्रतिवादी-पैकीं कोणीहि तशी विनंति केल्यास मंडळानें त्यांचा वाद संघ-सभेकडे पाठविला पाहिजे; मात्र, ही विनंति कारभारी-मंडळाला त्याजकडे वाद दाखल झाल्यापासून १४ दिवसांचे आंत केली पाहिजे.

कारभारी-मंडळाकडून एखादें प्रकरण संघ-सभेकडे जाईल त्यावेळीं संघसभेला अधिकार कोणते असावयाचे

व त्यांची कारवाई कशी व्हावयाची यासंबंधांत असें ठरविलें आहे कीं, प्रस्तुत कांड (१५) व कांड १२ यांत कारभारी-मंडळाचे अधिकार व कार्यक्रमासंबंधीं जे नियम आहेत तेच नियम सदरील प्रसंगीं संघ-सभेला लागू होतील; मात्र, संघ-सभेनें काढलेला अहवाल जर, कारभारी-मंडळांत प्रतिनिधि पाठविणाऱ्या संघ-सदस्यांच्या सर्व प्रतिनिधींनां ( वादी-प्रतिवादी सदस्यांचे प्रतिनिधी खेरीज करून ) आणि इतर संघ-सदस्यांपैकीं निम्म्यांहून अधिकांनां ( या गणनेंतहि वादी-प्रतिवादी धरणें नाहीं ) मंजूर होईल तर, वादी-प्रतिवादी सदस्यांचे प्रतिनिधि वगळून बाकी सर्व सभासदांच्या मतैक्यानें मंजूर झालेल्या कारभारी-मंडळाच्या अहवालाइतकाच हा संघ-सभा-अहवाल संघ-सदस्यांनां बंधनकारक मानला जाईल.

कांड १६–या करारनाम्यांतील कांडें १२, १३ व १५ यांची अवहेलना करून जें सदस्य-राष्ट्र युद्धाचा आश्रय करील त्याच्या या करणीवरूनच त्यानें इतर सर्व संघ-सदस्यांविरुद्ध युद्धाचें कृत्य केलें आहे असें मानलें जाईल, आणि संघ-सदस्य या कांडान्वयें असा करार करीत आहेत कीं, अशा राष्ट्राशीं असलेले सर्व व्यापारी व देण्याघेण्यांचे संबंध तोडून टाकणें, आपले राष्ट्रजन व या करार मोडणाऱ्या राष्ट्राचे लोक यांजमध्यें चालू असलेल्या सर्व व्यवहाराला बंदी करणें, तसेंच संघ-सदस्य असलेल्या वा नसलेल्या कोणत्याहि राष्ट्राचे नागरिक व करारबंधन तोडणाऱ्या राष्ट्राचे नागरिक यांजमध्यें देण्याघेण्याचा, व्यापारी, अथवा खासगी वैयक्तिक असे सर्व प्रकारचे व्यवहार बंद करणें, या गोष्टी ते ( यथाशक्य ) ताबडतोब अमलांत आणतील.

अशा प्रसंगीं कोणी किती आरमारी व लष्करी खास युद्धक्षम सैन्यबळ पुरवून या संघसमयपत्रिकेंतील करारांचें अनुल्लंघनीयत्व स्थापित करण्यासाठीं उपयोगिल्या जाणाऱ्या सैन्याची भरती करावी यासंबंधींच्या शिफारसी सदस्य-राष्ट्रांच्या सरकारांकडे करण्याचें काम कारभारी-मंडळानें केलें पाहिजे.

प्रस्तुत कांडान्वयें देण्याघेण्याच्या व्यवहाराला व उद्यम-व्यापाराला जीं बंधनें घातलीं जातील त्यांजपासून संघ-सदस्यांनां शक्य तितकें कमींत कमी नुकसान व त्रास व्हावा एतदर्थ हीं सदस्य-राष्ट्रें या बंधनांच्या संबंधांत एकमेकांनां सर्वप्रकारें पाठबळ देण्याचें मान्य करीत आहेत. तसेंच करार मोडणाऱ्या सदस्य-राष्ट्रानें कोणाहि संघ-सदस्याला अडचणींत आणण्यासाठीं जे कांहीं विशेष निर्बंध उत्पन्न केले असतील त्यांचा प्रतिकार करण्याच्या कामीं अन्योन्य साहाय्य करणें, आणि संघ-करार-संरक्षणासाठीं बंधु-सदस्यांशीं सहकार्य करून संग्राम करणाऱ्या कोणाहि सदस्य-राष्ट्राच्या फौजेला आपापल्या मुलखांतून निष्प्रतिबंध मार्ग मिळण्यासाठीं जरूर त्या तजविजी करणें, या दोन गोष्टी करण्याचाहि या कांडान्वयें संघ-सदस्य करार करीत आहेत.

संघ-करारांतील कोणतेंहि कांड अमान्य करून तद्विरोधी वर्तन करणाऱ्या कोणाहि संघ-सदस्याचें सदस्यत्व काढून घेऊन तसें जाहीर करण्याचा अधिकार कारभारी-मंडळाला आहे; मात्र, कारभारी-मंडळाचा हा निर्णय त्यांत बसणारे जितके संघ-सदस्य ( करार-भंग करणारा वगळून ) असतील तितक्या सर्वांच्या प्रतिनिधींच्या संमतीनें झाला असला पाहिजे.

कांड १७–संघ-बाह्य व संघांतर्वर्ती अशा दोन संस्थानांमध्यें एखादा झगडा असेल, अथवा एखादा तंटा करणारीं संस्थानें सर्वच संघ-बाह्य असतील, अशा प्रसंगीं त्या वादापुरतें तरी संघ-बाह्य संस्थानानें ( अ० संस्थानांनीं ) संघ-सदस्याचीं बंधनें पाळण्यास अमुक अटींवर तयार व्हावें अशा प्रकारची त्या त्या संस्थानांस सूचना करण्याचें काम कारभारी-मंडळानें केलें पाहिजे. सदरील अटी कारभारी-मंडळानें त्याला न्याय्य दिसतील त्या ठरवाव्या. या कारभारी-मंडळाच्या सूचनेला निमंत्रित संस्थानाकडून ( संस्थानांकडून ) मान्यता मिळाली तर या करारनाम्यांतील कांडें १२ ते १६ ( दोन्ही धरून ) यांतील नियम कारभारी-मंडळास जरूर वाटतील ते फेरफार करून सदरील तात्पुरत्या संघ-सदस्याला ( अ० त्यांनां ) लागू केले जातील.

सदरील प्रकारच्या वादांत सदरील प्रकारचें निमंत्रण संघ-बाह्य संस्थानाला पाठविल्यावर लागलीच वादाच्या गोष्टींची चौकशी कारभारी-मंडळानें करून वाद मिटण्यास उत्तम व खात्रीनें परिणामकारक अशी जी कारवाई मंडळाला दिसेल ती त्या त्या संस्थानानें करावयाची शिफारस करण्याचें काम मंडळानें केलें पाहिजे.

सदरील प्रकारच्या निमंत्रणाचा अव्हेर करून, संघ-सदस्यभूत एखाद्या संस्थानाच्या विरुद्ध जर कोणतेंहि संस्थान युद्ध सुरू करील तर अशा संस्थानाचे बाबतींत कांड १६ लागू होईल.

वादी प्रतिवादी दोनहि पक्ष जर सदरील प्रकारचें निमंत्रण अव्हेरतील, तर ज्यांचे योगानें युद्ध टळून वाद नीटपणें मिटेल अशा प्रकारचे उपाय योजण्याचा व शिफारसीच्या स्वरूपाच्या सूचना करण्याचा अधिकार कारभारी-मंडळाला आहे.

कांड १८–संघ-करार-मान्यतेच्या दिवसानंतर केव्हांहि कोणतेंहि सदस्य-राष्ट्र परराष्ट्राशीं जो जो करारनामा अथवा तह करील तो तो त्यानें ताबडतोब संघाचे चिटनवीस-कचेरींत नोंदविला पाहिजे आणि या कचेरीनें तो शक्य

तितक्या लवकर प्रसिद्ध केला पाहिजे. अशी नोंद होई-पावेतों कोणाहि सदस्य-राष्ट्राचा अन्यराष्ट्राशीं झालेला तह अथवा करारनामा बंधनकारक समजला जाणार नाहीं.

कांड १९-(परिस्थिति वगैरे बदलल्यामुळें) गैर लागू झालेले असे जे तह असतील त्यांचा पुनर्विचार संघ-सदस्यांकडून व्हावा अशा प्रकारची या सदस्यांनां त्या त्या प्रसंगीं सल्ला देणें, तसेंच जगताच्या शांततेला विघ्नभूत होऊं शकेल अशा राष्ट्रा-राष्ट्रांतील व्यवहार-स्थितीचा विचार करण्याची सदस्यांनां वेळोवेळीं सूचना करणें हें काम संघ-सभेच्या अधिकारांतील आहे.

कांड २०-या करारनाम्याशीं विसंगत अशा प्रकारचे एकमेकांत झालेले लेखी व तोंडी करारमदार या करार-नाम्यानें रद्द झाले अशी मान्यता देऊन असले करारमदार यानंतर आम्ही करणार नाहीं अशी प्रतिज्ञा प्रत्येक सदस्य-राष्ट्र आज शपथपुरःसर करीत आहे.

संघ-सदस्य होण्यापूर्वी संघ-कराराशीं विसंगत असे ज्या कोणा सदस्याचे करारमदार कोणाशीं झाले असतील त्या करारमदारांच्या बंधनांतून आपली सुटका करून घेण्या-साठीं तावडतोब उपाययोजना करणें हें त्या सदस्याचें कर्तव्य आहे.

कांड २१-पंचांमार्फत निकाल करून घेण्याविषयींचे ठराव आणि शांततारक्षणासाठीं अस्तित्वांत आलेले *मन्रो-मतासारखे कर्तव्यक्षेत्रविषयक ठराव, यासारखे जे राष्ट्र-राष्ट्र-व्यवहार-नियामक करारमदार आहेत त्यांनां मात्र या संघ-करारांतील कोणत्याहि कांडानें बाध येत नाहीं असें सदस्य-राष्ट्रें ठरवीत आहेत.

कांड २२-गेल्या युद्धानें ज्या वसाहती व जे प्रदेश युद्धा-पूर्वीच्या सत्ताधीशांच्या सत्तेखालून निघालेले आहेत परंतु ज्या ठिकाणचे रहिवासी आधुनिक जगताच्या कठोर परि-स्थितींत आपल्या पायांवर उभे राहण्यासारखे अद्यापि बनलेले नाहींत, त्या ठिकाणांची पुढची व्यवस्था लावतांना जें तत्त्व अमलांत यावें तें येणेंप्रमाणेंः—या (मागस-लेल्या) मुलखांतील लोक सुखी राहून त्यांची उन्नति कशी होईल याची विवंचना व खटपट करणें हें सुधार-लेल्या जगाचें (ईश्वरानें) त्याजवर सोंपविलेलें असें पवित्र कर्तव्य मानलें जावें आणि हें (ईश्वरदत्त) कर्तव्य नीटपणें बजावलें जाईल यावद्दलच्या हमीची व्यवस्था या संघ-करारांत अंतर्भूत केली जावी.

सदरील तत्त्व व्यवहार-गत करण्याचा उत्तम प्रकार असाः—साधनसंपत्ति, अनुभव व प्रादेशिक दूर-निकट-भाव या सर्व दृष्टींनीं जें पुढारलेलें राष्ट्र विवक्षित मागसलेल्या मुलखाचें पालकत्व पत्करण्यास सर्वांत अधिक लायक असून ही पालकत्वाची जबाबदारी शिरावर घेण्यास तयार असेल त्या राष्ट्रावर हें पालकत्व सोंपविलें जावें आणि त्यानें हें पालकाचें काम संघाचे आज्ञाकारी या नात्यानें करावें.

पालकत्वाखालीं दिलेले लोक संस्कृतीच्या निरनि-राळ्या पायऱ्यांपैकीं कोणत्या पायरीवर आहेत, त्यांच्या प्रदेशाची (भूपृष्ठ-दृष्ट्या) जागा कोठें व कशी आहे, या प्रदेशाची आर्थिक स्थिति काय आहे वगैरे गोष्टींचा विचार होऊन त्यांतील भेदानुरूप पालकत्वाचें आज्ञापत्र, भिन्न प्रदेशांचे बाबतींत भिन्न प्रकारचें असणें जरूर आहे.

तुर्की साम्राज्यांत (युद्धापूर्वी) असलेल्या कांहीं लोक-समाजांची विकास-अवस्था अशा प्रकारची आहे कीं, त्यांचें स्वतंत्र राष्ट्रत्व आजच कांहीं शर्तीवर मान्य करतां येईल. या मान्यतेच्या शर्ती म्हणजे स्वतःच्या पायांवर मदतीशिवाय उभे राहण्याची ताकद त्यांनां येईपावेतों, त्यांनीं एका संघ-नियुक्त पालक-राष्ट्राचा राज्यकारभारा-साठीं सल्ला व साहाय्य घेत जावें. हा राष्ट्र-पालक निवड-तांना त्या त्या समाजाची जी इच्छा असेल तिलाच प्राधान्य दिलें पाहिजे.

कांहीं लोकसमाज, विशेषतः मध्य-आफ्रिकेंतील लोक, अशा अवस्थेंत आहेत कीं, यांच्या प्रदेशांचें संघ-नियंत्रित पालकत्व जें राष्ट्र पत्करील त्याचेवर खालील शर्तीनुसार तेथील कारभार चालविण्याची जबाबदारी असली पाहिजे. व ही जबाबदारी त्याचे हातून योग्य रीतीनें पार पडेल अशी त्यानें खातरजमा दिली पाहिजे. या शर्ती अशाः (१) या प्रदेशांत धर्मविचार-स्वातंत्र्य अथवा उपासना-स्वातंत्र्य असावें व या स्वातंत्र्याला निर्बंध घालावयाचे ते सुव्यव-स्थेचा व सुनीतीचा भंग न होईल इतक्यापुरतेच घालावे; (२) गुलामांचा, हत्यारांचा व मादक पेयांचा व्यापार यांसारख्या गैर व्यवहारांनां बंदी असावी; (३) गड-किल्ले बांधणें, लष्करी अथवा आरमारी तळाचीं ठिकाणें तयार करणें, पोलीसकाम व देश-संरक्षणाचें काम, याखे-रीज इतर कामासाठीं तद्देशीयांनां लष्करी शिक्षण देणें या

* हें मत असें आहे कीं, अमेरिका सर्व अमेरिकन लोकांसा-ठींच आहे आणि कोणाहि युरोपियन राष्ट्रास अमेरिका (संयुक्त संस्थानें) तेथें आहे त्यापेक्षां अधिक अधिकार चालवूं देणार नाहीं. या तत्त्वावरच वेनेझुएला आणि ब्रिटिश सरकार यांमध्यें ब्रिटिश गियानाच्या सरहद्दीविषयीं तंटा उपस्थित झाला तेव्हां तो तंटा कायदेशीर आणि ऐतिहासिक संशोधन करून तडजोडीनें मिटवि-ण्यास अमेरिकेनें ब्रिटिशसरकारास भाग पाडलें. अलीकडे या मन्रोमतास बरेच पाय फुटत चालले आहेत. जपानी मजुरांच्या मेक्सिकोमधील होत असलेल्या वसाहती देखील अमेरिकेंतील मुत्सद्दी मन्रोमताविरुद्ध आहेत असें बोलत आहेत. न जाणों तेथील पुष्कळ जपानी मजूर पुढेंमागें हत्यारबंद झाले तर अमे-रिकेचा तुकडा जपानच्या पोटांत जाणार नाहीं कशावरून !!!

गोष्टी न होतील अशी व्यवस्था ठेवावी; (४) बंधु-सदस्यांस या प्रदेशांत उद्यम-व्यापारासंबंधींच्या सवडी व सवलती अगदीं सर्वांस सारख्या अशा असाव्या.

असेहि प्रदेश आहेत कीं ज्यांत लोकवस्ती अगदीं विरळ, ज्यांचें क्षेत्र लहान व सुधारलेल्या ठिकाणांपासून जे फार दूर आहेत. अशा प्रदेशांत नैऋत्य-आफ्रिका व दक्षिण पासिफिक द्वीपसमूहांपैकीं कांहीं द्वीपें हीं येतात. असे प्रदेश संघ-नियुक्त पालक-राष्ट्राच्या मुलखाला जर अगदीं लागून असतील तर त्यांची सदरीं वर्णिलेली व इतर परिस्थिति लक्षांत घेतां तेथें राज्यकारभार करण्याचा उत्तम प्रकार हाच दिसतो कीं पालक-राष्ट्राच्या मुलखांचे हे प्रदेश अवयवीभूत भाग समजले जाऊन तेथें त्या राष्ट्राचे कायदे चालावे आणि या कायद्यांच्या बाबतींत वर वर्णिलेले निर्बंध तद्देशीयांच्या हितासाठीं पाळले जावे.

संघाच्या आज्ञापत्रानें देश-पालकत्व ज्याच्याकडे आलें असेल, त्यानें आपल्या ताब्यांत दिलेल्या देशाच्या कारभारासंबंधींचा वगैरे वार्षिक अहवाल कारभारी-मंडळास सादर केला पाहिजे.

विवक्षित प्रतिपालित देशांत संघनियुक्त पालक-राष्ट्रानें जो कारभार करावयाचा, व जी सत्ता हुकमत चालवावयाची त्या कारभाराच्या व हुकमतीच्या मर्यादा संघ-सदस्यांचे संमतीनें अगोदरच ठरलेल्या नसतील तर कारभारी-मंडळानें या मर्यादा ठरविल्या पाहिजेत व त्या अगदीं स्पष्ट व निःसंदेह अशा ठरविल्या पाहिजेत.

संघनियुक्त पालक राष्ट्रांचे प्रतिपालित देशांसंबंधींचे वार्षिक अहवाल त्या त्या राष्ट्रांकडून मागवून ते तपासणें व या राष्ट्रांनां दिलेल्या आज्ञापत्रांचें पालन त्यांजकडून कसें होत आहे व कसें व्हावें यासंबंधांत कारभारी-मंडळाला सल्ला देणें या दोन कामांसाठीं एक कायमचें अहवाल-तपासणी-मंडळ नेमलें जाईल.

कांड २३–खालीं दिलेल्या बाबतींत आज अस्तित्वांत असलेलीं व पुढें होतील तीं राष्ट्रा-राष्ट्रांतील करारपत्रें जमेस धरून व त्यांतील कलमांनां अग्रस्थान देऊन त्यांचे धोरणानुसार सदस्य-राष्ट्रें खालील गोष्टी करण्याचें मान्य करीत आहेत.

अ–स्वतःच्या देशांत व ज्या देशांशीं त्यांचा उद्यम-व्यापाराचा संबंध आहे अशा देशांत मोलमजुरी करणारे स्त्री-पुरुष व मुलें यांजकडून काम घेण्याच्या पद्धतींत व परिस्थितींत सचोटी व दयार्द्रता यांचा शिरकाव करून ही सुधारलेली स्थिति टिकाऊ करण्याचा यत्न करणें, आणि यासाठीं अवश्य ते सार्वराष्ट्रीय समाज काढून ते चालविणें.

आ–आपल्या ताब्यांतील देशांत असलेल्या तद्देशीयांनां न्यायानें वागविलें जाईल अशी व्यवस्था करणें.

इ–स्त्रिया व मुलें यांची सौदागिरी आणि अफूचा व दुसऱ्या घातुक मादकांचा व्यापार यांसंबंधीं करारनाम्यांची अंमलबजावणी नीट होत आहे कीं नाहीं हें पाहण्याचें सर्वसाधारण देखरेखीचें काम राष्ट्र-संघावर सोंपविणें.

ई–संघ-सदस्यांचे सर्वसामान्य हितसंबंध संरक्षित व्हावे यासाठीं ज्या देशांतील हत्यारें व दारूगोळा यांच्या व्यापारावर निर्बंध असणें अवश्य आहे त्या देशाशीं होणाऱ्या सदर व्यापारावर सर्व साधारण देखरेख करण्याचें काम संघावर सोंपविणें.

उ–सर्व संघ-सदस्यांनां व्यापाराचे बाबतींत सारख्या न्यायानें वागविणें, सर्वांनां दळणवळणाचीं व नेआण करण्याचीं साधनें अनिर्बंधपणें वापरावयास मिळतील अशी व्यवस्था करून ती चालविणें; यासंबंधांत, १९१४–१९१८ चे युद्धांत जो प्रदेश उध्वस्त झालेला आहे त्यांत सदरील प्रकारच्या सोई करण्याची विशेष आवश्यकता आहे या गोष्टीकडे लक्ष दिलें जाईल.

ऊ–अनेक राष्ट्रांचें ज्या रोगादिकांनीं नुकसान होण्याचा संभव आहे असे रोग न होण्याचे व उद्भवल्यास त्यांच्या प्रतिकाराचे व निर्मूलनाचे उपाय योजण्याचा यत्न करणें.

कांड २४–निरनिराळ्या राष्ट्रांनीं सर्वसामान्य तहनाम्याअन्वयें ज्या राष्ट्र-राष्ट्रव्यवहाराच्या कचेऱ्या निर्माण केलेल्या आहेत त्या, या तहनामावाल्या पक्षांची संमति असेल तर राष्ट्र-संघाच्या हाताखालीं दिल्या जातील. तसेंच, यापुढें अशीं अनेक राष्ट्रव्यवहारनियामक कार्यालयें व अनेक-राष्ट्र-संबद्ध बाबींची सुव्यवस्था लावण्यासाठीं "तात्पुरतीं व्यवस्था-मंडळें" (Commiissons) जीं निर्माण केलीं जातील तीं राष्ट्रसंघाच्या नियंतृत्वाखालीं आपलें कार्य करतील.

सदरील प्रकारच्या अनेक-राष्ट्र-व्यवहार-नियामक-कार्यालयांच्या अथवा "तात्पुरत्या व्यवस्था-मंडळां"च्या हातीं न दिलेल्या परंतु सर्वसामान्य करारपत्रांनीं निर्बंधित झालेल्या अशा ज्या बहु-राष्ट्रीय हितसंबंधाच्या बाबी आहेत त्यांचे बाबतींत, कारभारी-मंडळाची तशी संमति असून करारपत्रवाल्या पक्षांची तशी इच्छा असल्यास, संघाची चिटनवीस-कचेरी त्या त्या बाबींसंबंधीं सर्व प्रकारची उपयुक्त माहिती गोळा करून तिचा प्रसार करण्याचें काम करील, आणि दुसरीहि जरूर ती व योग्य ती कोणतीहि मदत (लागेल त्या पक्षास) देईल.

संघाच्या नियंतृत्वाखालीं जें अनेक-राष्ट्र-व्यवहारनियामक कार्यालय अथवा तात्पुरतें व्यवस्था-मंडळ दिलें जाईल त्याचा खर्च चिटनवीस-कचेरीच्या खर्चाचे पोटांत धरून घेण्याचा अधिकार कारभारी-मंडळाला आहे.

कांड २५—जगतांत सर्वत्र आरोग्यसंवर्धन व्हावें, रोगांचा प्रादुर्भाव टळावा, व दुःखाचें साम्राज्य आकुंचित होत जावें, या हेतूंनीं प्रेरित होऊन खटपट करणारे स्वयंसेवकांचे समुचित अधिकारपत्र मिळविलेले 'राष्ट्रीय शुश्रूपा-संघ' ( रेड क्रॉस ) संस्थापित होऊन त्यांनीं सहकार्यानें काम करावें या गोष्टीस हरतऱ्हेचें उत्तेजन व साहाय्य देण्याचें सदस्य-राष्ट्रें मान्य करीत आहेत.

कांड २६—या करारनाम्यांत ज्यांयोगें फेरफार होईल अशा सूचना, कारभारी-मंडळांत प्रतिनिधिद्वारा बसणाऱ्या सर्व संघ-सदस्यांस आणि संघ-सभेंत प्रतिनिधिद्वारा बसणाऱ्यांतील निम्म्यांहून अधिकांस त्या संमत झाल्यानंतर, करार-नाम्याचीं कलमें म्हणून अमलांत येतील.

हें फेरफाराचें कलम आपणांस मान्य नाहीं असें जें सदस्य-राष्ट्र म्हणेल त्यास तें लागू होणार नाहीं; मात्र या अमान्यतेनें त्याचें संघ-सदस्यत्व संपेल.

---

## परिशिष्ट.

### संघाचे उत्पादक सभासद.

### शांततातहावर सही दिलेलीं संस्थानें.

| | | |
|---|---|---|
| अमेरिकेंतील संयुक्त-संस्थानें, | क्यूबा, | लायबेरिया |
| बेल्जम, | चेकोस्लोवाकिया, | निकाराग्वा |
| बोलिविया, | इक्वेडोर, | पनामा |
| ब्रेझिल, | फ्रान्स, | पेरु |
| ब्रिटिश-साम्राज्य, | ग्रीस, | पोलंड |
| कानडा, | ग्वाटेमाला, | पोर्तुगाल |
| आस्ट्रेलिया, | हैटि, | रुमानिया |
| दक्षिण आफ्रिका, | हेजाझ, | सर्बिया |
| न्युझीलंड, | हाँड्यूरास, | सयाम |
| हिंदुस्थान, | इटली, | युरुग्वे |
| चीन, | जपान. | |

संघ-करारपत्राला मान्यता देण्यासाठीं निमंत्रित असलेलीं संस्थानें.

| | | |
|---|---|---|
| आर्जेन्टिना, | नार्वे, | स्वीडन |
| चिली, | पाराग्वे, | स्विसलँड |
| कोलम्बिया, | इराण, | वेनेझुएला |
| डेन्मार्क, | साल्वेदोर, | |
| नेदर्लंड, | स्पेन. | |

**संघाध्यक्ष, मॉं. पिशां.**

**सर-चिटनवीस, सर एरिक् डुमंड.**

राष्ट्र-संघाचीं हीं सूत्रें किती लवचिक आहेत हें तीं वाचल्यानेंच स्पष्ट होतें. असल्याच सूत्रांची अवश्यकता या वेळेस होती. राष्ट्र-संघ तयार व्हावा ही इच्छा इंग्रज आणि फ्रेंच मुत्सद्यांची मनापासून होती अगर नव्हती, याबद्दल शंका आहे. इंग्लंडांतील मुत्सद्यांनीं असें भय व्यक्त केलें होतें कीं डॉ. विल्सन हा कोणी व्यवहारशून्य तत्त्ववेत्ता असावा. प्रत्यक्ष परिचयानें ही कल्पना चुकीची ठरली. तात्कालिक प्रश्नापेक्षां फार दूरच्या प्रश्नाकडे लक्ष पोंचविणारा आणि त्यावरून तात्कालिक कार्य काय करावें हें ठरविणारा हा मुत्सद्दी होय यांत शंका नाहीं. जगाच्या इतिहासांत सर्व जगास एकत्र जोडणारी ही संस्था प्रथमच निर्माण झाली आहे, आणि सूक्ष्म रीतीनें विचार करणाऱ्यास या संस्थेचीं तत्त्वें आज लवचिक व म्हणून बलवान् राष्ट्रांस केव्हांहि मोडतां येतील अशीं दिसलीं तरी तीं अत्यंत व्यापक आहेत आणि बंधनयंत्रापेक्षां देखील अधिक बलवान् आहेत, असें पुढें दिसून येईल. जगामधील राष्ट्रांनीं एकमेकांनीं, एकमेकांस दवबण्यासाठीं मित्रसंघ निर्माण करून एकमेकांस भिववून शांतता राखावी हें ध्येय आज शंभर दीडशें वर्षें जगांत चालू आहे. युरोपांतील निरनिराळीं राष्ट्रें एका साम्राज्याखालीं आणावयाची ही कल्पना नेपोलियनच्या पाडावाबरोबर लयास गेली तरी राष्ट्रांची साम्राज्यतृष्णा लयास गेली नाहीं. उलट प्रत्येक राष्ट्रामध्यें ती वाढतच गेली. प्रो. राईंच म्हणतो कीं *विसाव्या शतकांतील राजकारणविषयक मुख्य फरक म्हणजे राष्ट्रीयत्वस्थापनेसाठीं होणाऱ्या प्रयत्नाऐवजीं राष्ट्रांचीं साम्राज्यें करण्यासाठीं प्रयत्न होऊं लागला हा होय. नेपोलियनच्या पाडावानंतर, साम्राज्यसंवर्धनाच्या प्रयत्नाचें क्षेत्र यूरोप हें नाहीं हें कायमचें ठरलें, आणि जगांतील दुर्बल प्रदेशांकडे सर्व राष्ट्रांचा मोर्चा वळला. इटलीसारख्या दास्यांतून नुकत्याच सुटलेल्या राष्ट्रासहि साम्राज्य-संवर्धनाची इच्छा होऊन त्यानें तुर्कस्थानच्या प्रदेशाचे लचके तोडले. साम्राज्यविषयक भावना वाढत जाऊन त्याच युद्धास कारण झाल्या आणि दुर्बलांचे प्रदेश हाच भांडणाचा विषय झाला. मित्रसंघ करून राष्ट्रशक्तींचा समतोलपणा सिद्ध करणें हें युद्धास संयामक होत नाहीं, दुर्बलव्याप्तप्रदेश घेण्याचा मोह सर्व जिवंत राष्ट्रांस भांडावयास लावून जगाची शांतता बिघडवील या गोष्टीची जाणीव उत्पन्न होऊन राष्ट्रसंघाची स्थापना करण्याचें श्रेय डॉ. विल्सन या थोर तत्त्ववेत्त्यास आहे. डॉ. विल्सन यांनीं हा राष्ट्रसंघ घडवून आणला तो राष्ट्रांचें निर्दोष संयुक्तीकरण कसें करावें या दृष्टीनें घडवून आणला नाहीं. युध्यमान मित्रसंघ कायमचा करून त्यांत संधि केलेल्या राष्ट्रांस स्थान देऊन हा राष्ट्रसंघ त्यांनीं घडवून आणला. मित्रराष्ट्रसंघ करून आपलें हित करण्याचें पूर्वीचें तत्त्व, आणि जगास एक घटना द्यावयाची हें नवें तत्त्व, या दोहोंचें मिश्रण प्रस्तुत राष्ट्रसंघघटनेंत आहे. पूर्वी अनेक मुत्सद्यांनीं असें म्हटलेंच होतें कीं सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्राची दृढ स्थापना जगांतील सर्व राष्ट्रें युद्ध करून तह करतील तेव्हांच होईल. हें भविष्य बरेंच खरें झालें आहे.

---

* World Politics, Chap. i.

सभ्यांची दुर्वल दिसणारी समयपत्रिका पुढें वलवान् होईल; आणि राष्ट्रसंघ म्हणजे कांहींच नाहीं, ती एक करमणुकीखातर स्थापलेली आणि कमी महत्त्वाच्या मुद्यांच्या निर्णयापुरती संस्था आहे, अशी आज जी कांहीं लोकांची भावना आहे ती हा संघ दहा वर्षें टिकल्यास खोटी ठरेल असें वाटतें. तथापि, दुर्वलांस गप्प वेसविण्यासाठीं वलवान् राष्ट्रांचा संघ हें जें आज राष्ट्रसंघाचें स्वरूप आहे तें बदलण्यास यापेक्षांहि अधिक काल लोटावा लागेल असें दिसतें. प्रस्तुत राष्ट्रसंघाशीं स्पर्धा करणारा दुसरा म्हणजे वोल्शेव्हिकांचा राष्ट्रसंघ होऊन तो हें स्वरूप बदलावयास लावील, असा तर्क करण्यास जागा आहे.

राष्ट्रसंघ ही कल्पना सर्व जगानें स्वीकारल्यासारखी दिसत आहे. आणि राष्ट्रसंघाच्या स्वरूपांत वदल होवो किंवा कांहीं होवो, ही कल्पना जिवंत रहाण्यासाठीं अस्तित्वांत आली आहे, हें मात्र निःसंशय.

जे संघ आपणांस स्थापनेच्या काळीं अत्यंत दुर्वल दिसतात ते कालांतरानें प्रवल होतात, हें संयुक्त-संस्थानांच्या उदाहरणावरून स्पष्ट दिसतें.

अमेरिकेनें स्वातंत्र्य मिळविलें तें तेरा एकमेकांपासून पृथक् अशा वसाहतींनीं एकीकृत होऊन मिळविलें. पुढें जेव्हां सर्व वसाहतींनां एका शासन-संस्थेखालीं आणण्यासाठीं प्रयत्न केला गेला तेव्हां प्रत्येक वसाहतीस हें संयुक्तराष्ट्र आपलें—प्रत्येक वसाहतीचें—स्वातंत्र्य हिरावून घेईल कीं काय अशी भीति वाटत होती आणि त्यामुळें मध्यवर्ती सरकारास दुर्वल ठेवण्याची त्यांनीं खटपट केली. वरेच दिवस मध्यवर्ती सरकार हें कोणीच नाहीं अशी भावना अनेक संस्थानांची असे. अमेरिकेस जर राष्ट्र म्हटलें तर तेथील अनेक लोकांस राग येई. प्रत्येक संस्थान हेंच राष्ट्र, अमेरिका हें राष्ट्र नव्हे, अमेरिका म्हणजे केवळ संयुक्त संस्थानें, अशा भावना लोकांमध्यें जागृत ठेवण्यासाठीं स्थानिक स्वायत्ततेचे अभिमानी आणि संस्थान-स्वातंत्र्याचे अभिमानी धडपडत होते. अमेरिकेला ज्या अनेक लढाया पुढें कराव्या लागल्या त्यांमुळें संयुक्त संस्थानांचा अधिकार वाढला. पुढें गुलामांचा व्यापार वंद होण्यासाठीं १८६२ सालीं यादवी सुरू झाली तेव्हां दक्षिणेंतील वसाहतींचा असा आग्रह होता कीं आम्ही जसे खुषी म्हणून संयुक्त-संस्थानांत शिरलों तसे खुषी म्हणून वाहेर पडूं. या लढाईनें मध्यवर्ती सरकारचे अधिकार किती असावेत आणि स्थानिक स्वायत्तता किती असावी हे प्रश्न पुढें आले व या दोन्हीहि तत्त्वांचें एकीकरण कितपत व्हावयाचें याचा निकाल लागला. दुर्वल शासनसंस्था कालानुसार अधिक वलवान् होऊं शकतात ही गोष्ट अमेरिकेच्या संयुक्त-संस्थानांच्या घटनेवरून लक्षांत येण्याजोगी आहे. राष्ट्रसंघ हा निवळ फार्स आहे असें म्हणणारे लोक आहेतच. आणि हें म्हणणें या जगदैक्याच्या प्रारंभकालीं खरेंहि धरलें पाहिजे. तथापि सर्व जगास एका शासनसंस्थेखालीं आणण्याच्या प्रयत्नास राष्ट्रसंघघटनेनें सुरवात झाली आहे हें खास.

भवितव्य गूढ आहे, तथापि राष्ट्राराष्ट्रांच्या प्रवृत्तींमुळें आणि सर्व जगास सामान्य असा जो मनुष्यस्वभाव आहे त्यामुळें संभाव्य असणाऱ्या स्थितीचें कल्पनाचित्र रेखाटण्यास हरकत नाहीं. त्या कल्पनाचित्राची योग्यायोग्यता भविष्यकालच ठरवील. राष्ट्रसंघ वळावत गेल्यास जे परिणाम होण्यासारखे दिसतात ते येणेंप्रमाणें:—

देशाभिमान नियमित होऊन जगाच्या हिताहिताच्या दृष्टीनें विचार करण्याची प्रवृत्ति वृद्धिंगत होईल.

वलवान् राष्ट्रें हीं प्रत्येक राष्ट्रानें हवें तें करण्याचें स्वातंत्र्य राष्ट्रसंघापासून रक्षण करण्याचा प्रयत्न करतील आणि दुर्वल राष्ट्रें मध्यवर्ती राष्ट्रसंघाला वलवान् करण्याचा प्रयत्न करतील.

सर्व जगाचें अर्थशास्त्राच्या दृष्टीनें एकसमाजत्व हळूहळू स्थापन होईल.

ज्या राष्ट्रामध्यें भांडवलाचें एकीकरण करणें, मोठ्या प्रमाणावर उद्योगधंदे करणें आणि केवळ आर्थिक स्पर्धेनें आर्थिक स्पर्धेत विजयी होणें या गोष्टींची संवय लोकांस लागली असेल आणि आर्थिक चढाओढीस लायक करणारें शिक्षण जनतेस मिळालें असेल तें राष्ट्र विजयी होईल.

मजुरांची सत्ता वाढत गेल्यास संस्थानांच्या मर्यादा लहान असाव्यात का मोठ्या असाव्यात इत्यादि प्रश्नांचें महत्त्व कमी होईल.

प्रत्येक संस्थानांत, राज्यांत किंवा साम्राज्यांत, सत्ता हातीं असलेला वर्ग संस्थानाच्या वैयक्तिक स्वातंत्र्याचे गोडवे गाईल; आणि सत्ता हातीं नसून पीडा सोशित असलेला वर्ग, पिढ्यान्‌पिढ्या हातीं सत्ता येण्याचा संभव नाहीं अशा स्थितींत असेल तर, राष्ट्रसंघाचा अभिमानी वनेल.

सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्रास अधिक वळकटी येईल, आणि अनेक सामाजिक प्रश्नांवरील निरनिराळ्या राष्ट्रांच्या कायद्यांतील एकमेकांशीं असलेली असंगति काढून टाकणारे निकाल देण्याचे प्रसंग येतील व त्यामुळें सर्व जगाला सामान्य अशा सामाजिक धर्मशास्त्राची स्थापना होईल. उदाहरणार्थ, इंग्लंडांत दोन वायका करण्याचा अखत्यार इंग्रजास नाहीं. पण मुसलमान हा अधिकार तेथेंहि चालवूं शकतो. याप्रकारची मतमूलक अधिकारभिन्नता असावी काय हा प्रश्न पुढें येईल. या गोष्टीवद्दल विचार करितांना एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राच्या किंवा कोणत्याहि राष्ट्रानें आपल्या उपासनामूलक संप्रदायाच्या कायद्यांस कितपत मान द्यावा, याचाहि विचार करावा लागेल.

प्रत्येक राष्ट्रांत कांहीं दुर्वल धार्मिक संप्रदाय, व बहुजन समाजाकडून जुलूम होत असलेला वर्ग हे आहेतच. सर्व

युरोपभर यहुदी आहेत. त्यांचें आर्थिक व्यवहारांत महत्त्व असलें तरी त्यांचा द्वेष होत आहे. इंग्लंडांतील क्याथलिक, तुर्कस्थानांतील ख्रिस्ती प्रजा, यांच्यासारखे अल्पसंख्याकांचे वर्ग देशोदेशीं आहेत. अशा अल्पसंख्याकांस जनतेनें आणि विशेषतः सरकारानें कसें वागवावें याविषयींची वृत्ति जरी सर्व जगभर सुधारत आहे तरी देखील विसदृश समाजाविषयीं द्वेषाचे झटके जनतेंत आणि सरकारांत मधूनमधून संचरतात. सध्यांच्या राष्ट्रांत पूर्वी राष्ट्रें म्हणून अस्तित्व असलेले समुच्चय अंतर्भूत आहेत. यापुढें जीं राष्ट्रें निर्माण होतील त्यांतील जनता देखील एकसमाजस्वरूपी ऊर्फ एकजिनसी राहील अशी शक्यता नाहीं. राष्ट्रामध्यें मुख्य जनतेशीं विसदृश असे जे समाज असतात त्या समाजांस बहुजन-समाजाशीं सदृश करून एकरूपता आणावी याप्रकारची इच्छा कांहीं लोकांत असते. हे विसदृश अल्पसंख्याक लोक आपलें अल्पसंख्याकत्व आणि जनतेचा प्रेमाभाव ओळखून स्वहिताविषयीं जागरूक असले म्हणजे व्यापारधंद्यांत अधिक उत्कर्ष पावतात, या गोष्टीच्या जाणीवे-मुळें त्यांचा समाज आपल्या समाजांत समाविष्ट करण्याची इच्छा राष्ट्राच्या मुत्सद्यांत बलवत्तर होते, आणि बहुजनसमा-जामध्यें विसदृशांविषयीं जो अगोदरच प्रेमाभाव असतो त्या प्रेमाभावास वरील प्रकारची जाणीव मत्सराची जोड करून देते. उदाहरणार्थ, महाराष्ट्र स्वतंत्र असतें आणि स्वहिताविषयीं जागरूक असतें तर मारवाडी आणि पारशी यांसंबंधानें राष्ट्राच्या मुत्सद्यांमध्यें त्यांस पचनी पाडण्याची इच्छा, आणि लोकसमूहामध्यें त्यांजसंबंधानें द्वेषबुद्धि, हीं उत्पन्न झालेलीं दिसलीं असतीं. विसदृश जनता समाजाच्या मुत्सद्यांचे तिला पचनीं पाडण्याचे प्रयत्न जितके निष्फळ करील तितका तिला अधिक त्रास होईल. याप्रकारच्या मानवी स्वभावामुळें जुन्या नव्या सर्व राष्ट्रांत तदंतर्गत भिन्नभाषाभाषी, भिन्नधर्मी (आचार-दृष्ट्या) लोकसमाजांनां परस्परांपासून उपसर्ग होणार. या उपसर्गामुळें राष्ट्रांतील दुर्बल समाज राष्ट्र-संघाच्या सत्तेची अभिवृद्धि व्हावी म्हणून प्रयत्न करतील तर राष्ट्रांतील बहुजनसमाज स्थानिक स्वायत्तता दृढ करण्याचा प्रयत्न करील. व्यापारी वर्गांची प्रवृत्ति आणि कारखानदारांची प्रवृत्ति यांमध्यें साधारण भेद राहील. व्यापारी वर्ग म्हणजे विक्रय करणारा वर्ग राष्ट्र-संघाचा अभिमानी बनेल आणि कारखानदारांचा वर्ग स्थानिक स्वायत्ततेचा अभिमानी बनेल. व्यापाऱ्याचें हित निरनिराळ्या देशांतील परस्पर व्यवहार सुरळीत चालण्यांत असतें आणि त्यामुळें, येणाऱ्या मालावर फार जकात पडूं नये, दोन सरकारांत तंटे उपस्थित होऊं नयेत, जगांतील व्यापार अप्रतिबंध चालावा असें त्यांस वाटत असतें. उलट इकडे कारखानदारांकडे पहावें तर, मालाची पैदास करण्यासाठीं सवलती देण्यास स्थानिक सत्ता मजबूत असावी, तिचे अधिकार मोठे असावे, इत्यादि भावना यांचे ठिकाणीं स्वभावतःच बलवत्तर असतात.

या वरील सामाजिक धार्मिक व व्यापारी कारणांमुळें प्रत्येक राष्ट्रांत राष्ट्रसंघाचा अभिमानी आणि स्थानिक स्वायत्ततेचा अभिमानी असे दोन पक्ष उत्पन्न होतील.

फ्रेंच तत्ववेत्ता कोंट यानें असें राजकीय मत काढलें होतें कीं शासन-विषयक बाबतींत मोठीं राष्ट्रें असण्यापेक्षां लहान लहान राष्ट्रें असणें हितावह आहे. साम्राज्यें नष्ट होऊन लहान लहान संस्थानें बनण्यास सुरवात झाली आहे हें रशियाच्या उदाह-रणावरून स्पष्ट होणार आहे, तथापि कोंटच्या कल्पनेएवढा या तत्त्वाचा विकास होईल किंवा नाहीं हें पाहणें आहे.

वर सांगितलेले परिणाम केवळ राजकीय म्हणजे शासन-विषयक होत. तथापि युद्धें बंद व्हावीं, शांतता रहावी, हीं तत्त्वें जीं पुढें येतात तीं केवळ रक्तपात बंद व्हावा या क्वेकर किंवा जैन भावनांनीं येत नाहींत आणि आलीं नाहींत. शांततामय जगांत कांहीं निराळी संस्कृति जन्मास येईल अशी लोकांची अपेक्षा आहे म्हणून हीं तत्त्वें पुढें आलीं आहेत. युद्ध हें संस्कृतीचा नाश करणारा एक मनुष्यनिर्मित प्रलय होय असें म्हणणारे तत्ववेत्ते आहेत. तसेंच मनुष्यमात्राच्या अनेक गुणांचा विकास करावयास उपयोगी पडणारें तें एक साधन होय असें दुसरे तत्ववेत्ते म्हणतात. दोन्ही पक्षांत सत्यांश आहेच. आणि यासाठीं लोक युद्धें चालू रहाण्यापासून जे फायदे प्रतिपादितांना दृष्टीस पडतात ते भावी संस्कृतींत रहातील किंवा नाहीं, युद्धें बंद पडल्यानंतर भावी संस्कृतीचें एकंदर स्वरूप काय होईल याचा विचार करणें इष्ट आहे. हा विचार भारतीयांस भावी कर्तव्याच्या आणि तें साधण्यासाठीं अवश्य होणाऱ्या शिक्षणपद्धतीच्या नियमनाच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे.

युद्धांचें स्थान आपल्या देशांतील चाणक्यादि नीतिवेत्त्यांनीं युद्धांस "उपाय" या सदरांत घालून व्यक्त केलें आहे. युद्धांच्या क्षयाविषयीं विचार करतांना युद्धाची जागा कोणते उपाय घेतील हें प्रथम पाहूं. कां कीं भावी संस्कृतींत तो बदल आणि त्या बदलामुळें झालेले इतर बदल हे अगोदर दृष्टीस पडतील. युद्धाऐवजीं कोणते उपाय योजाव-याचे ते राष्ट्रसंघाच्या करारनाम्यांत समाविष्ट केलेले आहेत.

एक उपाय राष्ट्राराष्ट्रांतील तंटे राष्ट्रसंघापुढें मांडावे हा आहे, दुसरा उपाय युद्धोत्सुक राष्ट्राशीं इतर राष्ट्रांनीं व्यवहार टाकून देऊन त्यास आर्थिक गळफांस लावावा असा आहे. युद्धास प्रवृत्तिच होऊं नये यासाठीं सध्यां जें राष्ट्र-संघाच्या समयपत्रिकेंत बोधिलें आहे तें हें कीं, युद्धसाहित्यविषयक माहिती गुप्त न ठेवतां राष्ट्र-संघास कळवावी, व गुप्त तह करणें बंद व्हावें. शिवाय जनतेची सत्ता शासनतंत्रांत वाढविल्यानें

हें ध्येय साध्य होईल या अपेक्षेनें मजूरवर्ग संघटित करण्यासाठीं प्रयत्न होत आहे.

या प्रकारचे युद्धोद्भवनियमनार्थ प्रयत्न चालू असतां त्याचे काय परिणाम होतात ते ताडण्यासाठीं प्रथम युद्धोपयोगी सद्गुण व समाजाचा व्यवस्थितपणा या प्रयत्नांनीं नाहींसा होईल काय याचा विचार करूं व नंतर ज्या लहानसहान समाजांनां आपआपसांत लढण्यास मनाई केली आहे त्यांवर एकंदर काय परिणाम झाले आहेत तें पाहूं.

युद्धास होणाऱ्या बंदीमुळें युद्धोपयोगी सद्गुणांचा ऱ्हास होईल असा संभव दिसत नाहीं. युद्धाचें स्वरूप इतकें बदललें आहे कीं तें यशस्वी करण्यास पूर्वी लागणाऱ्या गुणांपेक्षां आज अधिक गुण लागतात, व पूर्वींचेच गुण अधिक प्रमाणांत लागतात. युद्ध चालू असतां राष्ट्रांतर्गत लोकांचें आर्थिक स्वास्थ्य पहाणें पूर्वीपेक्षां नवीन कालांत अधिक जरूर आहे असें गेल्या युद्धांत पूर्णपणें भासून आलें. युद्धें बंद झालीं तरी स्पर्धा रहाणारच. समाजांत स्पर्धेचें क्षेत्र वाढत असतें आणि स्पर्धा तीव्र होत असते. हा प्रकार पुढें अधिकाधिक होत जाणार, आणि ज्या राष्ट्रांस या स्पर्धेत जय मिळवितां येईल तीं राष्ट्रें अधिक यशस्वी होणार. युद्ध संपल्यानंतर युद्धांत उत्पन्न झालेल्या प्रसंगांमुळें आर्थिक प्रश्न युरोपांत अधिक बिकट झाला आणि त्या प्रसंगांत रशियानें आपल्या समाजाची पुनर्घटना केली. या पुनर्घटनेमुळें भावी कालांत काय फेरफार होतील तें पाहणें आहे. सर्व राष्ट्राच्या भांडवलाचें एकीकरण करून, प्रत्येक मनुष्यास काम करावयास लावून आणि त्यास अधिक सुखें प्राप्त होतील अशी व्यवस्था करून राष्ट्रांत द्रव्योत्पादन करावें, राष्ट्रानेंच बाहेर देशाचा व्यापार हातीं घ्यावा आणि बाहेरच्या स्पर्धायुक्त जगाशीं राष्ट्रांतर्गत व्यापारी संस्थांनीं किंवा कारखान्यांनीं स्वतंत्रपणें स्पर्धा न करतां राष्ट्रसमुच्चयरूपी महासंघामार्फत स्पर्धा करावी, ही नवी रशियन व्यवस्था इतर राष्ट्रांसहि तोच कित्ता कमी अधिक प्रमाणांत गिरवावयास लावील असा रंग दिसतो.

जेव्हां युद्ध बंद करावें लागतें आणि आपली मागणी, हक्क किंवा दुःखाचें निवारण शस्त्रोपयोग करून साध्य करावयाचें नसतें तेव्हां मनुष्यास ज्या गोष्टी कराव्या लागतात त्या येणेंप्रमाणें:--

जें साध्य करावयाचें तें कायद्यानें आणि आपली बाजू नीट मांडून साध्य करावयाचें. प्रतिकार करावयाचा तो कायदेशीर करावयाचा आणि व्यवहारांत अत्यंत सहनशीलपणा दाखवावयाचा. युद्धें अशक्य झाल्यास मनुष्यस्वभाव या तऱ्हेचा बनून जातो. शिवाय आर्थिक स्पर्धा अधिक तीक्ष्ण आणि कठोर होत जाते. जीं राष्ट्रें शांततेंतील स्पर्धेत आपलें स्वहित साधन करूं शकतील तींच विजयी होतील. युद्धोपयोगी सद्गुणांचें महत्त्व सर्व राष्ट्रांत कमी होईल असे प्रसंगीं घटण्याचा संभव आहे आणि युद्धोपयोगी सद्गुण जर कमी झाले तर जगाचें नुकसान होईल असेंहि वरवर विचार करितांना वाटतें. तथापि आर्थिक स्पर्धेत आणि युद्धांत आज बहुतांशानें तेच सद्गुण लागतात. सर्व राष्ट्रांस अधिकारिपदाचे हुकुम पाळण्यास शिकविणें, श्रम सहन करण्यास समर्थ असणें, पुढाऱ्यांनीं अनुचरांत उत्साह उत्पन्न करणें, युध्यमान व्यक्तीची काळजी घेणें, भोज्यांचा पुरवठा योग्य व्हावा म्हणून बंदोबस्त करणें, हात आणि इंद्रियें यांस नेमकेपणा शिकविणें, संकटप्रसंगीं धैर्य धरणें, पराभव होत आला तरी शिस्त बिघडूं न देणें, इत्यादि गुण जसे युद्धांत लागतात तसेच ते अनेक आर्थिक खटाटोपांतहि लागतात. अमेरिकेनें युद्धांत जी कामगिरी केली ती तिला शक्य होण्याचें एक कारण हें कीं, अनेक गोष्टी मोठ्या प्रमाणावर करण्यास राष्ट्र अगोदरच शिकलें होतें. जो गुणांचा विकास युद्ध जिंकण्यास सहायभूत झाला तो विकास युद्धपूर्वकालींच झाला होता, आणि तो आर्थिक स्पर्धेनें झाला होता.

युद्धें बंद होवोत अगर न होवोत त्यासंबंधीं एक गोष्ट स्पष्ट आहे ती ही कीं, स्वहितसाधनार्थ युद्धाशिवाय इतर उपाय योजणें अवश्य झालें असून युद्धें होण्याचें क्षेत्र आणि काल हीं वरींच संकुचित झालीं आहेत. ज्या प्रश्नांत एकापेक्षां अधिक समूहांचे हितसंबंध अडकले आहेत आणि त्या हितसंबंधांतील कांहीं एकमेकांच्या विरुद्ध आहेत अशा अनेक गुंतागुंतीच्या प्रश्नांचा निकाल व्हावा व त्यांत आपणांस योग्य वांटा मिळावा म्हणून भिन्न समूहांकडून परस्परांवर होत असणारा शस्त्रोपयोग लहानसान टोळ्यांच्या व राष्ट्रकांच्या बाबतींत सत्ताधारी साम्राज्य बंद करतें. जी कांहीं बाधा व्यक्तींच्या किंवा लहान समुच्चयांच्या हितास झाली असेल ती दुरुस्त करण्यासाठीं कायदेशीर इलाज करण्यास साम्राज्य शिकवितें. हीच क्रिया आतां जगभर अधिक मोठ्या प्रमाणावर आणि प्रश्नांवर होण्यास राष्ट्र-संघघटनेनें सवड झाली आहे. गेल्या महायुद्धांत सर्व जग सामील झालें होतें तरी जगाचे बहुतेक भाग शांततेंतच होते. कांहीं थोडकीच जमीन युद्धक्षेत्र झाली होती. राष्ट्रसंघाचें ध्येय हें आहे कीं सशस्त्र स्वयंनिर्णयाऐवजीं न्यायासनापुढें प्रश्न नेण्याची क्रिया जशी एका साम्राज्यांत होते तशीच ती सर्व जगांत चालू व्हावी. राष्ट्रसंघ बलवान् होत गेला तर ज्या गोष्टी युद्धानें व्हावयाच्या त्या राष्ट्राराष्ट्रांत देवघेव करून, राष्ट्र-संघांत मुत्सद्दीगिरी करून आणि संघाच्या न्यायपीठाकडून निर्णय घेऊन होत जातील.

राष्ट्राचे युद्ध करण्याचे अधिकार कमी करून सार्वराष्ट्रीय संघाचे अधिकार वाढविण्यांत राष्ट्रांच्या कोणत्या हितसंबंधांवर गदा येण्याचा संभव आहे? युद्धें बंद व्हावयाचीं तर राष्ट्रसंघाचा करारनामा हा जगांतील आजची स्थिति आहे तशीच राखण्यासाठीं परवाना समजावयाचा काय? भूपृष्ठावरील जमीनीची राष्ट्राराष्ट्रांत झालेली आजची वांटणी योग्य आहे आणि

तींत वदल करावयाची आवश्यकता नाहीं अशी वस्तुस्थिति आहे काय? नसल्यास बदल घडवून आणण्यास उपाय काय? एक राष्ट्र दुसऱ्या लोकांवर सत्ता गाजवीत आहे, आणि राष्ट्रसंघामध्यें स्वतंत्र राष्ट्रांखेरीज इतरांचा प्रवेश नाहीं अशा परिस्थितींत जित लोकांनीं काय करावयाचें? हे सर्व प्रश्न महत्त्वाचे आहेत.

राष्ट्र-संघाच्या ध्येयसमुच्चयांत गटंगळ्या खाणें थोडें बंद ठेवून आजच्या परिस्थितीकडे लक्ष देणें अवश्य आहे. कां कीं ध्येयें पार पाडणें हें मनुष्यांच्या इच्छांवर अवलंबून असतें. आपणांस हें पाहिलें पाहिजे कीं राष्ट्र-संघाचीं ध्येयें तडीस नेण्याची लोकांची इच्छा आहे काय?

या प्रश्नास कांहीं अंशीं 'नाहीं' असेंच उत्तर द्यावें लागतें. आज जो तो विल्सनच्या नांवानें खडे फोडीत आहे. इंग्रज आणि फ्रेंच यांच्या मतें जर्मनांचा सूड घेण्याला विल्सननें फारशी संधि दिली नाहीं आणि जर्मन लोक असें समजतात कीं विल्सननें विश्वासघात केला. जीं चौदा तत्त्वें त्यानें प्रसिद्ध केलीं तीं प्रत्यक्ष तहनाम्यांत पाळलीं गेलीं नाहींत. लढाई बंद झाली पण युद्धासाठीं बद्धपरिकर रहाण्याची कल्पना अद्याप त्यागिली गेली नाहीं. पुष्कळ जपान्यांस असें वाटतें कीं अमेरिकेनें या युद्धांत जपानशीं युद्ध करण्याची तयारी केली. कित्येक जबाबदार जपानी मुत्सद्दी हें बोलूनहि दाखवीत आहेत. पोलंडमध्यें आणि पूर्वीच्या आस्ट्रियन साम्राज्याच्या अनेक भागांत यहुदी लोकांचा छळ होत आहे. राष्ट्रांचे हक्क रक्षावयाचे पण राष्ट्रें नसतील अशा लोकसमूहांस तुडवावयाचें हा परिणाम आतांच कांहींसा दिसूं लागला आहे. अमेरिकेंतील निग्रोंस चांगल्या तऱ्हेनें वागविण्याची व्यवस्था करण्यास जेथें अमेरिकन सरकार असमर्थ आहे तेथें राष्ट्रसंघ काय समर्थ होणार? राष्ट्रसंघाच्या योगानें जातींचा प्रश्न सुटणार नाहीं आणि उपासनामूलक द्वैतामुळें जे निराळे समाज उत्पन्न होतात त्यांचाहि प्रश्न बरेच दिवस सुटणार नाहीं. हिंदुस्थानाच्या लोकांनीं ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

वर सांगितलेल्या सामान्य प्रवृत्तींमुळें हिंदुस्थानामध्यें काय प्रवृत्ती होतील हें निराळें सांगावयास नको. तथापि राष्ट्र-संघांत हिंदुस्थानचें स्थान काय ह्याची कल्पना येण्यासाठीं थोडेंसें विवेचन करणें इष्ट होईल.

राष्ट्रसंघामध्यें कोणत्याहि स्वायत्त संस्थानाचा किंवा वसाहतीचा समावेश होऊं शकतो. हिंदुस्थान स्वायत्त नाहीं त्यामुळें हिंदुस्थानचा राष्ट्र-संघांत प्रवेश झाला नसता, तथापि राष्ट्र-संघाच्या उत्पादकांतच हिंदुस्थान असल्यामुळें त्याचा संघांत प्रवेश कसा व्हावा यासंबंधानें प्रश्न उरत नाहीं.

राष्ट्र-संघानें हिंदुस्थानचे प्रतिनिधि मान्य केले ते ब्रिटिश साम्राज्याच्या नेटामुळें मान्य केले आणि 'गाड्याबरोबर नळ्याला यात्रा' या तत्त्वाप्रमाणें हिंदुस्थानचाही प्रवेश संघांत झाला.

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या संस्थानांनीं, उदाहरणार्थ, हैद्राबाद, बडोदें यांनीं राष्ट्र-संघांत आपला प्रतिनिधि पाठविल्यास त्याचा स्वीकार होईल किंवा नाहीं या प्रश्नाचा निर्णय व्हावयाचा आहे.

सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्रामध्यें जें संस्थान दुसऱ्या संस्थानाच्या आश्रयाखालीं किंवा संरक्षणाखालीं असेल त्याविषयीं जे नियम ठरले आहेत त्यांतील दोन नियम संस्थानाच्या प्रवेशास साहाय्यक आहेत. एक नियम हा कीं, संरक्षक संस्थान अगर राज्य परराज्याशीं युध्यमान असेल तर तेवढ्यावरूनच संरक्षित संस्थान त्या दुसऱ्या राष्ट्राबरोबर युध्यमानआहे असें समजावयाचें नाहीं. या नियमानें 'प्रोटेक्टरेटांचें' म्हणजे संरक्षित संस्थानांचें स्वातंत्र्य बरेंच रक्षिलें गेलें आहे. दुसरा नियम असा कीं, कोणत्याहि संस्थानानें दुसऱ्या संस्थानास आपलें संरक्षक नेमलें म्हणजे आपले अधिराजत्वाचे हक्क सोडून दिले असें होत नाहीं. १९११ डिसेंबर मधील 'स्ट्रॅथेम वि० गायकवाड' या खटल्यांतील ठरावावरून हा दुसरा नियम स्पष्ट झाला आहे.

राष्ट्र-संघामध्यें हिंदुस्थानच्या तर्फेनें गेलेल्या लोकांपैकीं बिकानेरचे महाराज हे एक होते. हे इंग्रजसरकारतर्फे होते आणि यांनीं जी राष्ट्रसंघाच्या मसुद्यावर सही केली ती अर्थात् ब्रिटिश हिंदुस्थानाचे तात्पुरते प्रतिनिधि या नात्यानें केली हें उघड आहे. बिकानेरचे महाराज तिकडे असतांनाच हिंदुस्थानच्या व्हाइसरायांनीं राजेरजवाड्यांस बोलाविलें होतें. त्या समुदायानें म्हणजे (श्री० माधवराव शिंदे यांनीं दिलेलें नांव योजावयाचें तर) नरेंद्रमंडळानें बिकानेरच्या महाराजानांच आपले प्रतिनिधि नेमल्याचें कोठें प्रसिद्ध झालें नाहीं. यावरून हिंदुस्थानांतील संस्थानांनीं राष्ट्र-संघांत प्रवेश केला आहे किंवा नाहीं या प्रश्नास सध्यां तरी "नाहीं" हेंच उत्तर देणें प्राप्त आहे. अर्थात् राष्ट्र-संघाचे सभासद या नात्यानें त्यांनीं जबाबदारी देखील पत्करिली नाहीं हें उघड होतें. निरनिराळ्या संस्थानांच्या मुत्सद्यांनीं या प्रश्नावर विचार केला पाहिजे; आणि राष्ट्रसंघांत आपणास प्रविष्ट करून घेऊन राष्ट्रसंघाच्या उच्च ध्येयांचा आणि त्यामुळें आपणावर पडलेल्या जबाबदारीचाहि अंगीकार केला पाहिजे. त्यांनीं सोडवावयाचा मुख्य प्रश्न हा कीं, प्रत्येक संस्थानानें राष्ट्र-संघांत स्वतंत्र प्रवेश करावयाचा किंवा सर्व संस्थानांनीं एकीकृत होऊन आपला प्रवेश करावयाचा. निरनिराळीं संस्थानें जर राष्ट्र-संघांत स्वतंत्रपणानें प्रविष्ट झालीं तर भारतीयांचें राष्ट्र-संघांत संख्याधिक्य होऊन ब्रिटिश साम्राज्य राष्ट्र-संघांत अधिक बलवान् होईल आणि प्रत्येक संस्थानास आपली व्यक्तिशः जबाबदारी भासूं लागेल. राजे लोकांचें जें नरेंद्रमंडळ स्थापन झालें त्यामुळें कांहीं तरी सामुच्चयिक पद्धतीनें संस्थानांचा प्रवेश राष्ट्रसंघांत होईल असें वाटतें. या संबंधानें संस्थानांनीं जें काय करावयाचें तें त्यांनीं हिंदुस्थान-सरकारचा सल्ला घेऊन त्यांच्या मार्फत करण्यांतच फायदा आहे.

संस्थानांचा प्रवेश राष्ट्र-संघांत व्हावा किंवा भारतीय संस्थानें राष्ट्रसंघाला जबाबदार धरलीं जावीं अशी व्यवस्था राष्ट्र-संघांतील इतर राष्ट्रें आग्रहानें घडवून आणतील असाहि संभव आहे. कां कीं देशी संस्थानांत दारूगोळा तयार करावा आणि त्याची माहिती राष्ट्र-संघास देऊं नये असा प्रकार हिंदुस्थानांत सुरू होईल अशी शंका परराष्ट्रें घेणार.

आपल्या ताब्यांतून हिंदुस्थान जाईल ही इंग्लंडची भीति दिवसानुदिवस कमी होत जाऊन लष्करी खर्च कमी करण्याची प्रवृत्ति सरकारास ठेवावी लागेल. इंग्रजांच्या स्वार्थासाठीं जनतेला हवेंतसें पिळावें आणि जनतेनें बंड केल्यास तिला तडाके मारावे या शक्य कारणाखेरीज दुसरें कारण मोठी फौज ठेवण्यास उरणार नाहीं. तथापि हा हेतु लोकांपुढें मांडतां येण्याजोगा नाहीं, आणि जो हेतु लोकांपुढें मांडतां येण्याजोगा नाहीं त्याचें अस्तित्वहि फार दिवस टिकूं शकत नाहीं. जर लष्करी खर्च कमी होईल तर शिक्षण, व्यापारवृद्धि, इत्यादि गोष्टी अधिक महत्त्वाच्या होणार.

देशी संस्थानांवर इंग्लंडचा जो पगडा आहे त्याचा हेतु मुख्यतः हाच आहे कीं, देशी संस्थानांनीं एकमेकांचे उरावर बसून एकानें दुसऱ्यास खाऊन टाकूं नये. राष्ट्रसंघाचें ध्येय याच प्रकारचें असल्यामुळें जर जगाची शांतता राष्ट्र-संघ ठेवणार तर हिंदी संस्थानांच्या संरक्षणार्थ इंग्रजांची जरूर काय? ब्रिटिश हिंदुस्थानानें संस्थानांवर हुकमत चालविण्याचें समर्थन करणें कठिण करणाऱ्या दुसऱ्याहि कांहीं गोष्टी झाल्या आहेत. पूर्वीच्या तहनाम्यांस तहनाम्यांइतकी मान्यता देणार नाहीं असें विधान इंग्रजांनींच प्रसिद्ध केलें आहे. शिवाय मनुष्याच्या प्रगतीस व्यत्यय करणारे अधिकार संस्थानांपासून काढून घेऊन इंग्रजांनीं आपल्या हातीं ठेवले आहेत. उदाहरणार्थ, कांहीं संस्थानांनां टेलिफोन आपल्याच अधिकारानें ठेवण्याचें स्वातंत्र्य नाहीं. हें तत्त्व दडपशाहीच्या जोरावर इंग्रजांनीं संस्थानांवर लादलें. संस्थानांकडून बंडें होण्याच्या अशक्यतेमुळें यापुढें असली दडपशाही अनवश्य होऊन संस्थानांचें स्वातंत्र्य वाढेल. मात्र याचेबरोबर संस्थानिकांनां प्रजेविरुद्ध दुर्वर्तन करण्याचा जो विल्ला ब्रिटिश संरक्षणामुळें मिळाला आहे तो जाईल. एखाद्या संस्थानांतील लोकांनीं आपल्या भागापुरती राज्यक्रांति घडविली तर हिंदुस्थान सरकारास त्या संस्थानाचे कारभारांत पडतां येईल कीं नाहीं हा संशय आहे. राष्ट्रसंघ जगाच्या शांततेचें संरक्षण करणार, तर ब्रिटिश हिंदुस्थानच्या सरकाराचें शांतता रक्षणाचे कामीं महत्त्व नाहीं. पुष्कळ राजेलोकांपाशीं संस्थानाधिप म्हणून करारमदार करावयाच्या ऐवजीं व्यक्तीच्या नात्यानें सरकारचे करारमदार झालेले आहेत. आणि पुष्कळ राजे असें समजतात कीं त्यांचें सिंहासनाधिपत्य इंग्रज सरकाराकडून या करारानुसार रक्षिलें गेलें आहे व जात आहे. पण संस्थानें आतां राष्ट्रसंघाकडूनच रक्षिलीं जाणार आणि म्हणून इंग्रजाकडून होणारें संस्थानांचें संरक्षण अनवश्य होणार. इंग्रज जर राजे लोकांनां व्यक्तिशः संरक्षित ठेवण्याचा आग्रह धरतील तर लोकांच्या इच्छेचा त्यामुळें चुराडा होणार आणि तें तर राष्ट्र-संघाचें ध्येय नाहीं. या सर्व गोष्टींमुळें देशी संस्थानांचे सर्व करारमदार फिरतील असा अजमास आहे. पुढें होणारे सर्व फरक शांतपणें लक्षांत आणून कामें कशीं करावीं या विषयावर ब्रिटिश सरकार व देशी संस्थानें यांची सर्व बुद्धि खर्ची पडणार आहे. राजे लोकांनां आपआपल्या प्रजेस जबाबदार करण्याकडे ब्रिटिश मुत्सद्यांची प्रवृत्ति न होणें अनिवार्य आहे असें वाटतें.

युद्धें जर बंदच झालीं तर त्यांच्या या बंदीचा जगांतील समाजांवर काय परिणाम होईल ही गोष्ट विचार करण्याजोगी आहे. जगांतील भांडणें जमीनीच्या तुकड्यासाठीं, व्यापारासाठीं आणि खाणींसाठीं होतात, त्याप्रमाणेंच 'कुल्टुर' (संस्कृति) पसरविणें आणि पारमार्थिक संप्रदाय वाढविणें या हेतूनें अथवा निमित्तानें होतात व झालीं आहेत. हा हेतु आपणांस सदृश व अनुकूल असा समाज बनविण्याचा म्हणजे स्वार्थमूलक व युद्धपर असतो. संस्कृतिप्रसाराची इच्छा किंवा संप्रदायप्रसारार्थ प्रेरणा परहितसाधनबुद्धीप्रमाणें परहित गुंडाळून पहावयाच्या स्वहितसाधनबुद्धीनें देखील होणें शक्य आहे. संप्रदायसंवर्धन अत्यंत उत्साहानें होतें तें प्रसंगीं युद्धांत त्याचा उपयोग व्हावा म्हणून होतें. युद्धें अशक्य झाल्यास संप्रदायसंवर्धन तरी बंद पडेल, किंवा संप्रदायसंवर्धनाच्या हेतूंत आणि स्वरूपांत बदल होईल. आपल्याशीं सदृश आणि इतरांशीं विसदृश असा वर्ग निर्माण करून युद्धामध्यें स्वजनास अनुकूल अशी स्थिति उत्पन्न करण्यासाठीं म्हणून जीं अंगें संस्कृति व संप्रदाय यांच्या घटनेमध्यें आहेत त्यांचें महत्त्व युद्धें बंद पडल्यास कमी होईल. विशिष्ट संस्कृति पसरविणें किंवा विशिष्ट पारमार्थिक संप्रदायाचा प्रसार करणें, एतद्विषयक भावना जागृत ठेवण्याचें महत्त्व युद्धोत्सुकतेबरोबरच कमी होईल. संस्कृतिसंवर्धन किंवा संप्रदायाविषयीं आवेश उत्पन्न करणें या दोन्ही गोष्टींस जें महत्त्व देण्यांत येतें तें देण्यांत युद्धप्रसंगीं आपणास अधिक जनता साहाय्यक व्हावी आणि ती जनता सहज कार्यप्रवृत्त व्हावी हे हेतू प्रच्छन्न असतात. महंमदानें आपला जो संप्रदाय स्थापन केला तो नवीन क्षत्रिय वर्ग निर्माण करण्याच्या स्वरूपाचा होता. त्यांत पारमार्थिक तत्त्वें होतीं आणि त्यांबरोबरच संप्रदायसंवर्धनासाठीं लोकांस विशिष्ट शिस्त लावणें आणि त्यांचे ठिकाणीं विशिष्ट भावना उत्पन्न करणें या गोष्टीहि होत्या. संप्रदाय वाढविणें म्हणजे सैन्य वाढविणें असाच प्रकार बहुधा होतो. केवळ स्वहिताच्या दृष्टीनें एखाद्या संस्कृतीचा कांहीं अंश घेण्याकडे विशिष्ट जनसमुदायास वळवितां येतें, आणि जेव्हां असें वळवितां येत नाहीं तेव्हां संस्कृतीचा प्रसार बळजबरीनें करतां येतो. हा असा प्रसार करतां यावा म्हणून आपल्या संस्कृतीचा प्रसार इतरांत केला पाहिजे इत्यादि तत्त्वें आपलें महत्त्व दुसऱ्यावर लादूं इच्छिणारीं राष्ट्रें किंवा संप्रदाय स्वजनांत प्रतिपादूं लागतात.

कोणत्याही दोन राष्ट्रांचे संबंध कांहीं दोघांच्याहि हिताचे असतात, कांहीं असे नसतात. ज्या संबंधांचा पाया दोघांचें हित हा नसतो, जे एकाच्या हिताचे आणि दुसऱ्याच्या अहिताचे असतात, अशा संबंधांचें उत्पादन व पोषण करण्याचें काम अवघड असतें. हें काम अर्थातच ज्या राष्ट्राला अशा संबंधांपासून लाभ आहे त्या राष्ट्राचे पुढारी लोक अंगावर घेतात. हें नीटपणें होण्यासाठीं या पुढाऱ्यांना स्वजनांच्या जागरूकतेची व युद्धोन्मुखतेची जरूर असते. आणि ही युद्धोन्मुखता व जागरूकता स्वजनांचे ठिकाणीं परिपुष्ट व्हावी यासाठीं संस्कृतिप्रसाराचें तत्त्व जनतेस शिकविणें पुढारी लोकांना प्राप्त होतें, अशी ही सांखळी आहे.

युद्धें बंद करण्याचें अंगिकारिणाऱ्या संस्थेस परस्परांच्या हितबुद्धीनें जे संबंध राष्ट्राराष्ट्रांत उत्पन्न झाले नसतील ते मोडून टाकण्याच्या प्रयत्नास एक तर साहाय्यक बनावें लागेल किंवा एका पक्षास बलवान् ठेऊन त्याला दुसऱ्या पक्षावर जुलूम करण्याचें स्वातंत्र्य द्यावयाचें आणि जर पहिला पक्ष ओरडूं लागला किंवा रणोत्सुक झाला तर तें बंद करावयाचें अशी भलतीच नीति आचरावी लागेल. या दोन नीतींतील पहिली घ्यावयाचें टाळून दुसरी स्वीकारणें कोणत्याहि सुसंस्कृत लोकांस मान्य होणार नाहीं. आणि या कारणानें असा एक नियमच होण्याचा संभव आहे कीं, संप्रदाय किंवा संस्कृति यांचा कोणास प्रसार करावयाचा झाल्यास ज्या लोकांत तो प्रसार करावयाचा त्यांच्या इच्छेनें किंवा त्यांच्या हितासाठींच तो झाला पाहिजे, आणि असा प्रसार करणारांचे ठिकाणीं दुसऱ्यास दुर्बल करण्याचा राजकीय हेतु नसला पाहिजे. असो. याचा विशेष विचार हिंदुसमाज आणि जग यांच्या संस्कृतींच्या भवितव्याबरोबर करूं.

राष्ट्र-संघाचे आर्थिक परिणाम कालांतरानें अत्यंत महत्त्वाचे होतील. एखाद्या ठिकाणीं शांतता नांदूं लागली म्हणजे त्या भागांतील लोकांची पत म्हणजे कर्ज काढण्याची शक्ति वाढते. ज्या देशांत आपआपसांतील युद्धें, रक्तपात, वगैरे प्रकार आहेत आणि त्यामुळें मालमत्तेची असुरक्षितता आहे त्या देशांत लोक पैसे घालूं इच्छित नाहींत. तसेंच राष्ट्रें एकमेकांपाशीं लढावयास लागण्याचा संभव असेल तर एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राकडे भांडवलाचा ओघ किती जाऊं द्यावा यास बरीच नियंत्रितता येते. जगांतील भांडवलास जगत्स्वास्थ्यामुळें पाय फुटतील आणि यामुळें ज्या देशांत कार्यकर्तृत्वास बरेंच मोठें क्षेत्र असेल त्या देशाकडे भांडवल अधिकाधिक जाऊं लागेल. असें झाल्यानें हिंदुस्थानांत बाह्य भांडवल मुबलक येईल असें खात्रीनें सांगतां येत नाहीं. कां कीं ज्यास स्वास्थ्य प्राप्त झालें आहे असा प्रदेश आतां पुष्कळ वाढणार आणि तो भांडवलास आपल्याकडे ओढण्याच्या बाबतींत हिंदुस्थानाशीं स्पर्धा करणार. चीनच्या साम्राज्यास इतःपर त्याचे तुकडे पडण्याच्या भयापासून बरीच मुक्तता मिळाली आहे. आणि चीनकडे जगांतील लोकांचे पैसे जाण्याचाहि संभव पुष्कळ आहे. चीनमधील मजूर अधिक मेहनती आहेत आणि चिनी प्रामाणिकपणाची हिंदुस्थानच्या प्रामाणिकपणापेक्षां अधिक ख्याति आहे; व चीन जर लोकांचें भांडवल घेणारें राष्ट्र बनलें तर हिंदुस्थानाकडे भांडवलाचा ओघ बराच कमी होईल अशी शक्यता आहे. तथापि हे परिणाम जाणवूं लागण्यापूर्वी बराच काल जाईल असें वाटतें.

मालमत्तेची अधिक सुरक्षितता झाली म्हणजे तिच्या मालकीचे किंवा गहाणाचे रोखे व्यवहारांतील क्रयविक्रयाचा जिन्नस बनून मालमत्तेवर दिलेले पैसे हवे त्यावेळीं कोणाकडून तरी परत मिळण्याची शक्यता वाढणार. याचा पुढील एक परिणाम हा कीं, जी संपत्ति मालमत्तेच्या रूपानें अस्तित्वांत असते परंतु जी वापरणारास तावडतोब पैशाच्या रूपांत आणतां येत नाहीं अशा संपत्तीच्या निर्मितीकडे म्हणजे कायमची सुधारणा करण्याकडे ज्यास्त भांडवल जाऊं लागतें. असल्या सुधारणांस आतां वाढतें क्षेत्र लाभलेलें आहे. तुर्कस्थानचे कांहीं भाग आतां सुरक्षित होणार आणि तिकडे कायमच्या सुधारणा पुष्कळ होणार. शिवाय तुर्कस्थानांतील आर्मेनियन, सीरीअन, इत्यादि जातींचे ख्रिस्ती आणि यहुदी अमेरिकेंत पसरले असल्यामुळें आणि युरोपीय लोकांशीं त्यांचा संबंध अधिक निकट असल्यामुळें त्यांपैकीं पुष्कळ लोक कार्यक्षम बनले आहेत. त्यामुळें जगांतील भांडवलाचें आकर्षण ते करूं शकतील. तुर्कस्थानांतील नवीन राष्ट्रांच्या अभिवृद्धीचा एक इष्ट परिणाम हिंदुस्थानावरहि होण्याचा संभव आहे. तेथें हिंदुस्थानी मंडळींचा मोठा किफायतशीर व्यापार सध्याच सुरू झाला आहे आणि तो पुढें अधिकाधिक होत जाईल अशी शक्यता आहे.

थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे राष्ट्र-संघनिर्मित शांततेमुळें भांडवल आकर्षण करण्याच्या बाबतींत आपणावर नजीकच्या भविष्य काळांत इष्ट परिणाम कितपत होतील किंवा होणार नाहींत हें सांगतां येणें कठिण आहे. तथापि एकंदरींत रकमांचें एकीकरण, भांडवलाची जगभर वांटणी आणि कायमच्या सुधारणा करण्याकडे प्रवृत्ति, या तीन गोष्टींचा फायदा राष्ट्र-संघनिर्मित सुरक्षिततेमुळें मागसलेल्या सर्व जगास होईल आणि त्यामुळें जगांतील निरनिराळ्या भागांत आर्थिक पायऱ्यांचें जें अंतर आहे तें कमी कमी होत जाईल, अशी कल्पना करण्यास हरकत नाहीं. आर्थिक अंतर कमी झाल्यास इतर बाबतींतील अंतरहि कमी होऊन जग हा राष्ट्रासारखाच एक समाज आहे असें त्यांत वाढलेल्या सादृश्यानें दिसावयास लागेल.

**राष्ट्र-संघाचें नैतिक ध्येयः**—राष्ट्र-संघाच्या करारांत जीं अनेक ध्येयें व्यक्त झालीं आहेत तीं येणेंप्रमाणें:—

१ निरनिराळ्या राष्ट्रांमध्यें सहकारिता उत्पन्न करणें.

२ राष्ट्राराष्ट्रांच्या व्यवहारांत शांतता व सर्व राष्ट्रांत सुरक्षितता राखणें, आणि हें साध्य करण्यासाठीं युद्धास प्रवृत्त न होण्याची जबाबदारी स्वीकारणें, व राष्ट्राराष्ट्रांतील व्यवहार अनावृत, न्याय्य आणि सन्मान्य असे स्थापित करणें. आणि सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्राचीं तत्त्वें हीं संस्थानांतील प्रत्यक्ष अमलांत येणारीं तत्त्वें बनविणें. सुसंघटित आणि एकजीव अशा भिन्न लोकांचे जे परस्परांशीं व्यवहार होतात, त्या व्यवहारांमध्यें न्यायबुद्धि आणि तहनाम्यांविषयीं अत्यंत आदर स्थापित करणें.

३ युद्धसामुग्री उत्पन्न करण्याचा धंदा खाजगी व्यक्तींच्या किंवा भांडवलवाल्यांच्या हातीं न ठेवणें; आणि कोणत्याहि राष्ट्राकडून जें युद्धसाहित्य तयार होईल त्याची माहिती गुप्त राखण्याचें बंद करणें व प्रत्येकानें युद्धसामुग्री किती करावी याचें नियमन करणें.

४ राष्ट्रांतील लढे तडजोडीनें व न्यायबुद्धीनें तोडतां यावे यासाठीं ते राष्ट्रसंघापुढें ठेवण्यास वादी प्रतिवादी राष्ट्रांनां भाग पाडणें.

५ गुप्त तहनामे बंद करण्यासाठीं सर्व तहनामे राष्ट्रसंघामध्यें नोंदवणें आणि जे नोंदले नसतील ते कोणत्याहि राष्ट्रास बंधनकारक नाहींत असें ठरविणें. जे तहनामे जुनाट अगर शांततेस अपायकारक असतील त्यांचा राष्ट्रसंघांत विचार करणें.

६ ज्या वसाहती किंवा जे प्रदेश पूर्वीच्या सरकारांच्या ताब्यांतून निघाले असून जे स्वतःच्या पायांवर उभे राहण्यास असमर्थ अशा लोकांनीं वसलेले असतील त्यांस हें तत्त्व लावावयाचें कीं असल्या लोकांचें स्वास्थ्य आणि प्रगति हीं साध्य करणें हें सुधारलेल्या जगाचें पवित्र कर्तव्य आहे. हें तत्त्व अमलांत आणण्यासाठीं असल्या प्रदेशासंबंधाची जबाबदारी कोणाची व किती तें निश्चित करणें.

७ मजुरांचे संबंधांत दयेची आणि सचोटीची वागणूक सर्वत्र सर्वांकडून होईल अशी व्यवस्था राखणें.

८ प्रत्येक ठिकाणच्या जित किंवा मूळच्या ( नेटिव्ह ) लोकांस न्यायबुद्धीनें वागविण्याचें सभासद राज्यांस कबूल करावयास लावणें.

९ खालील गोष्टी प्रत्यक्ष राष्ट्रसंघाच्या ताब्यांत देणें, (१) स्त्रियांच्या व मुलांच्या खरेदीविक्रीवर देखरेख. (२) अफूच्या व असल्या इतर भयंकर पदार्थांच्या व्यापारावर देखरेख. (३) अनिष्ट भागांतील हत्यारांच्या व्यापारावर देखरेख.

१० निरनिराळ्या सर्व राष्ट्रांतील दळणवळण खुलें ठेवणें.

११ निरनिराळ्या देशांत पसरणाऱ्या रोगांचें किंवा सांथींचें नियमन करणें.

१२ रुग्णशुश्रूषेसाठीं असलेल्या रेड क्रॉस सोसायटीसारख्या संस्थांस उत्तेजन देणें.

राष्ट्रसंघाच्या समयपत्रिकेंतील मुख्य तत्त्वें वरील प्रमाणें आहेत.

राष्ट्रसंघसमयपत्रिकेच्या अनेक कांडांचा अर्थ हिंदुस्थानासंबंधानें कसा लावावा याविषयीं पंचाईत उत्पन्न होते. देशी संस्थानांस राष्ट्रसंघांत प्रवेश करतां येईल किंवा नाहीं, देशी संस्थानें आपण इंग्रजामार्फत राष्ट्रसंघांत प्रविष्ट झालों असें समजतात किंवा कसें याविषयीं संशय उत्पन्न होण्याजोगी आजची परिस्थिति असल्याचें वर्णन पूर्वीं आलेंच आहे. तथापि एवढ्यानेंच आमचे अनिश्चित प्रश्न संपत नाहींत. हिंदुस्थानविषयक दुसरे अनेक प्रश्न अनिश्चित आहेत. उदाहरणार्थ, तेविसाव्या कलमांत जित अगर मूळच्या लोकांचें नेटिव्ह या शब्दानें वर्णन केलें आहे आणि त्यांस न्यायवृत्तीनें वागविण्याचें प्रत्येक सभासद संस्थनानें कबूल केलें आहे; येथें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं हिंदु लोकांचा या नेटिव्ह शब्दानें उल्लेख होतो काय? सिंह व बिकानेरचे महाराज हे ज्यांस नेटिव्ह म्हणतात असा वर्ग कोणता? आम्हांस असा तर्क होतो कीं गोंड, भिल्ल, कोरकु या लोकांसंबंधानें हा उल्लेख असावा आणि हिंदुलोक हे जरासे सुधारलेल्या कोटींत समजण्याची राष्ट्रसंघाची प्रवृत्ति असावी. राष्ट्रसंघाचें सूत्र २२ हें हिंदूंस लागू पडणारें आहे असेंहि म्हणण्यास अडचण आहे. कां कीं या सूत्राची व्याप्ति युध्यमान सरकारें युद्धांत नष्ट झाल्यामुळें उघड्या पडलेल्या लोकांपुरती आहे अगर सर्व जगांतील लोकांपुरती आहे हा प्रश्न आहे. स्वतःच्या पायांवर उभें राहण्यास असमर्थ असल्यामुळें ज्यानां दुसऱ्या कोणाचें तरी पालकत्व स्वीकारावें लागतें अशा लोकांचा उल्लेख २२ व्या कलमांत आहे आणि म्हणून तें कलम हिंदुस्थानांतील लोकांस लागू खास नाहीं. कां कीं त्यांचें पालकत्व निश्चित झालेंच आहे. तसेंच हिंदुस्थान सरकारानें निरनिराळ्या संस्थानांशीं केलेले तहनामे, तसेंच नेपाळ, अफगाणिस्थान यांसारख्या शेजाऱ्याशीं केलेले तहनामे राष्ट्रसंघांत नोंदविले पाहिजेत आणि त्यांच्या इष्टानिष्टतेविषयीं विचार करण्याची संधि राष्ट्रसंघास पाहिजे अशीहि राष्ट्रसंघाची अपेक्षा आहे कीं काय हेंहि निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. शिवाय देशी संस्थानांशीं केलेले तहनामे आज तहनामे म्हणून समजले जाणार नाहींत असें हिंदुस्थानसरकारनें केलेलें विधान कितपत कायदेशीर ठरेल आणि याविषयीं विचार करण्याचा राष्ट्रसंघास कितपत अधिकार आहे हें देखील गूढच आहे.

राष्ट्रसंघामध्यें फक्त स्वतंत्र संस्थानांचा समावेश न करतां वसाहतींचा आणि इतर प्रदेशांचाहि समावेश केला गेल्यामुळें साम्राज्यांस दौर्बल्य येणार, कां कीं व्यक्तींस बंधन घालणाऱ्या अशा संस्था दोन उत्पन्न झाल्या म्हणजे त्यांपैकीं कोणती तरी एक संस्था दुर्बल व्हावयाचीच. यामुळें साम्राज्यांनां आपल्या व्यव-

हारनीतीमध्यें बरीच सुधारणा करावी लागणार. जो संबंध दंडमूलक आहे तो परस्परहितमूलक करावा लागेल किंवा निदान तसा भासवावा तरी लागेल. राष्ट्रसंघानें जग एकत्र बांधलें गेलें आहे आणि कोणाचेंहि दुसऱ्यावरील स्वामित्व, या दोघांवरहि स्वामित्व करणारी तिसरी संस्था असेल तर खुलें पडणार हें उघडच आहे. साम्राज्यें अस्तित्वांत येतात त्याचें कारण असें कीं, निरनिराळे लोक आणि निरनिराळे प्रदेश यांचें एकत्व व्हावें, त्यांच्यामध्यें सहकार्य व्हावें व परस्परांशीं दळणवळण आणि व्यापार अनियंत्रित व्हावा. शासनसंस्था ह्या माणसांसाठीं आहेत हें ध्येय सर्वमान्य झालें तर शासनसंस्थांचा परस्परांमधील वांकडेपणा कमी होईल. साम्राज्याचें एकत्व स्थापण्याचें मुख्य प्रयोजन हें कीं, युद्धाच्या प्रसंगीं सर्व लोकांस एकजुटीनें कार्य करतां यावें. युद्धेंच जर अशक्य किंवा बंद झालीं तर साम्राज्यांत साम्राज्यापुरतेंच एकमेकांशीं अधिक स्नेहाकर्षण उत्पन्न करण्याची जबाबदारी कमी होईल; आणि स्नेहाकर्षण राखण्यासाठीं एकमेकांस एकमेकांचें खरें हित पहावें लागेल. व्यक्तीनें कोणत्या समूहांत असावें, हें सरहद्दी ठरविणाऱ्या मुत्सद्यांनीं न ठरवितां व्यक्तींनींच ठरवावें हें तत्त्व स्थापित झालें तर साम्राज्यें वाढविण्याचा अट्टहास तरी कशास पाहिजे ? युद्धें कशास पाहिजेत ? आणि आपल्या संस्कृतीचा प्रसार व दुसऱ्या संस्कृतीचा नाश करण्यासाठीं, म्हणजे "कुलटूर" पसरविण्यासाठीं, प्रत्येक राष्ट्रानें युद्धोत्सुक व बद्धपरिकर कशाला व्हावयास पाहिजे ? इत्यादि अनेक प्रश्न आणि तत्त्वें राष्ट्रसंघाबरोबर जन्मास आलीं आहेत. स्वयंनिर्णय अथवा आपल्या जातीच्या अगर आपल्या राष्ट्राच्या भवितव्याचें नियमन करणें हा आपला अधिकार आहे ही कल्पना प्रकाशवेगानें सर्व जगभर खेळली आहे; आणि या कल्पनेच्या प्रसारामुळें साम्राज्यें दुर्बल होणार ही गोष्ट स्पष्ट आहे.

पण या गोष्टीचें वाईट वाटावयास नको. कारण साम्राज्यें आतां दुर्बल झालीं तरी त्यांनीं आपलें इष्ट कार्य बरेंच केलें आहे आणि तीं पूर्ण दुर्बल व्हावयाच्या पूर्वींच साम्राज्याची अवश्यकता साम्राज्यांतर्गत ज्या राष्ट्रांत साम्राज्याचे मुख्य तंत्री उत्पन्न होतात त्या राष्ट्रांसच कमी होईल यांत संशय नाहीं. इतर देशांस जिंकून, त्यांची प्रगति बंद करून, त्यांच्या भाषांस लगाम घालून, त्यांस अज्ञानांत ठेऊन, इत्यादि प्रकारांनीं आजपावेतों लोक आपली प्रगति साधीत आले; ती ते यापुढें अशी न साधतां आपल्या देशांतच होणाऱ्या प्रयत्नानें, गुणाधिक्यानें, घटनेच्या श्रेष्ठत्वानें व मनुष्यास अधिक सुखकर होण्याच्या उद्यमानें साधूं लागतील. जेथें केवळ साक्षरताच नव्हे तर साधारण महत्त्वाचे विषय वाचून ते समजून घेण्याची शक्ति सर्वत्रांस असेल, ज्या देशांत लोक ज्यास्त धडपड करणारे असतील, ज्या देशांत शास्त्रज्ञान अधिक वाढेल आणि नवीन शास्त्रीय शोध उत्पन्न होतील व शिस्तीनें वागणें करार पाळणें प्रत्येक व्यवहार प्रामाणिकपणानें करणें या गोष्टी जेथील जनता शिकली असेल आणि शांततेच्या कायदेशीर स्पर्धेंत जय मिळविण्यास समर्थ झाली असेल, अशा देशासच प्रामुख्य येईल. पुढेंमागें मनुष्यांचें स्थलांतर अधिक सुलभ होईल आणि नवीन आलेल्या मनुष्यास त्या त्या ठिकाणचा नागरिक बनविणें हें कार्य अधिक वृद्धिंगत होईल.

जेथें जित नाहींत व जेतेहि नाहींत, प्रत्येक मनुष्यसमूहास आपली प्रगति करून घेण्याची जेथें पूर्ण मोकळीक आहे, आणि युद्धाला रजा मिळून जेथें सर्व जगांतील लोकांमध्यें अप्रतिहत दळणवळण व कायदेशीर स्पर्धा हींच तत्त्वें जिवंत राहतील अशा नवीन मनूच्या स्थापनेस प्रस्तुत राष्ट्रसंघ कारण होईल अशी अपेक्षा आहे.

राष्ट्रसंघाच्या ध्येयाप्रमाणें इंग्लंडनें वागावयास सुरवात केली आहे असें दिसतें. हिंदुस्थानास मिळालेले नवीन हक्क, प्रांतिक कारभारांत अंशेंकरून आलेली स्वायत्तता आणि बादशहांचें प्रेमळ अभिवचन हीं सर्व नव्या प्रवृत्तींचीं, नव्या ध्येयांचीं व अपेक्षांचीं द्योतक होत. सध्यां दिलें आहे तें सध्यांपुरतें आहे हें ब्रिटिश मुत्सद्यांनीं बोलून दाखविलें आहे; आणि जें मिळालें आहे तें पुरेसें नाहीं, तें कांहींच नव्हे, ही १९१९ मधील अमृतसरच्या कांग्रेसनें व्यक्त केलेली भावना देशाच्या महत्त्वाकांक्षा जागृत असून त्या ब्रिटिश अभिवचनास मूर्तस्वरूप आणण्यास कारण होतील हेंच सिद्ध करिते.

प्रांतिक कारभारांतील कांहीं बाबी पहाण्यासाठीं नेमलेल्या दिवाणास त्यांजबद्दल जबाबदार धरण्याचा हक्क हिंदुस्थानांतील लोकांस मिळाला आहे. बाबींचे राखून ठेवलेले (reserved) विषय आणि सोंपविलेले ( transferred ) विषय असें वर्गीकरण केलें आहे.* सोंपविलेल्या बाबींबद्दल दिवाण लोकप्रतिनिधींस जबाबदार राहील. तथापि या दोहों बाबींच्या खर्चाची पिशवी एकच ठेविली असून त्या पिशवींतील रकमेवर पहिली ओढ हिंदुस्थानसरकारची आहे. शिवाय त्या पिशवींतील किती रक्कम राखून ठेवलेल्या गोष्टींकडे घ्यावी हें गव्हर्नर व एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलच ठरविणार. राखून ठेवलेल्या विषयांसाठीं जी रक्कम खर्ची पडावयाची तिची मागणी पिशवीवर पहिली असणार आणि उरलेल्या रकमेपैकीं रक्कम सोंपविलेल्या विषयांकडे येणार.

ही व्यवस्था समाधानकारक नाहीं असें पुष्कळांनीं म्हटलें आहे आणि ही योजना ज्यांनीं केली ते देखील हिला निर्दोष समजावयास तयार नाहींत. ही योजना जरी वाईट दिसते

---

* दिलेल्या हक्कांविषयीं कांहीं वर्गांत किती असंतुष्टता आहे हें "रिझर्व्ड" आणि " ट्रान्स्फर्ड " यांचें भाषांतर म्हणून वापरलेल्या "रखेल्या" आणि "टाकाऊ" ( बाबी ) या उपहासात्मक शब्दांवरून व्यक्त होतें.

तरी इंग्रज अधिकारी व लोकांनीं निवडलेले लोक यांच्या समजूतदारपणामुळें ही वाईट योजना देखील चालूं शकेल असा भरंवसा योजकांनीं व्यक्त केला आहे. संशयास्पद योजना व्यक्तींच्या "चांगुलपणा"मुळें हिंदुस्थानामध्यें चालूं शकेल ही कल्पना पुष्कळांस न पटल्यामुळें त्यांनीं या योजनेच्या उपयुक्ततेविषयीं संशय व्यक्त केला आहे.

या नवीन सुधारणांमुळें लोकांस आपली सुधारणा करून घेण्यास काय अवकाश सांपडतो ही गोष्ट प्रत्यक्ष अनुभवानें सिद्ध व्हावयाची आहे. आणि यामुळें या नवीन सुधारणांविषयीं विशेष विचार व्यक्त करण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

राष्ट्रसंघाबाहेर राहिलेला एक मोठा जनसमुच्चय म्हटला म्हणजे रशियांतील संस्थानें हा होय. महायुद्धांत झारचें साम्राज्य नाहींसें झालें आणि तेथें संयुक्तसंस्थानांसारखा एक राष्ट्रसमुच्चय स्थापन झाला. त्या राष्ट्रसमुच्चयाचें आणि राष्ट्रसंघाचें ध्येय आणि कार्य कांहीं अंशीं सारखें आहे आणि कांहीं अंशीं वेगळें आहे. चालू चळवळी समजण्यासाठीं त्या संघाविषयीं आणि त्याच्या मूलभूत तत्त्वांविषयीं माहिती पाहिजे. राष्ट्रसंघ ही ज्याप्रमाणें विद्वान्, मुत्सद्दी, तत्त्ववेत्ते आणि इतिहासकार प्रे० डॉ० विल्सन यांची कृति होय, त्याप्रमाणें रशियाची नवीन तऱ्हेनें घटना बनविणें ही लेनिन् नांवाच्या एका ग्रंथकाराची आणि त्याच्या अनुयायांची कृति होय. जीं समाजशासनतत्त्वें रशियांत पुढें आलीं त्यांनां बोल्शेव्हिझम हें सामुच्चयिक नांव मिळालें आहे.

विलसन् आणि लेनिन् यांचें खालील गोष्टींत ऐकमत्य आहे.

(१) निरनिराळ्या लोकांस आणि राष्ट्रांस स्वयंनिर्णयाचें तत्त्व लागू करावें, अर्थात् त्यांनीं कोणत्या प्रकारची राज्यव्यवस्था ठेवावी हें त्यांजवरच ठेवावें.

(२) सरहद्दीवरील प्रदेश कोणत्या राष्ट्राकडे असावा हें तेथील लोकांनींच ठरवावें.

(३) युद्धें बंद होऊन जगांत शांतता नांदावी.

(४) गुप्त तहनामे बंद व्हावे.

(५) राष्ट्रांचे संघ असावेत आणि सर्व जग एकत्र बांधलें जावें.

(६) पारमार्थिक आणि उपासनाविषयक स्वातंत्र्य सर्वांस असावें.

(७) दोघेहि खासगी मालमत्ता नाहींशी करावी या मताचे* नाहींत. रशियानें कांहीं मालमत्तेवर राष्ट्रसत्ता स्थापन केली आहे तरी खासगी मालमत्तेचें अस्तित्व राखलें आहे.

(८) जगभर काम करणाऱ्या लोकांस सुखानें कालक्रमणा करतां यावी आणि त्यांचे संघ असावेत.

येणेंप्रमाणें दोघांच्या ध्येयांत एकवाक्यता बरीच दिसते. लेनिन मताच्या राष्ट्रांस राष्ट्रसंघांत प्रवेश करण्यास ज्यायोगानें हरकत यावी असें कांहीं एक यांत दिसत नाहीं. रशियन राष्ट्रांची घटना आणि राष्ट्रसंघाची घटना यांमध्यें एकमेकांच्या ध्येयांविरुद्ध असें कांहीं एक नजरेस येत नाहीं, आणि पुढेंमागें रशियास राष्ट्रसंघांत मिळण्यास सवड दिली जाईल असें दिसतें.

लेनिनच्या "बोल्शेव्हिझम्"ची कल्पना येण्यासाठीं रशियाची नवीन घटना पुढें दिली आहे. लेनिनची राष्ट्रसंघाची योजना अनेक राष्ट्रांचें एकराष्ट्र करण्याची अधिक जवळची पायरी आहे; तर इकडे विल्सनच्या राष्ट्रसंघांत राष्ट्रांचें कार्यस्वातंत्र्य अधिक रक्षिलें गेलें आहे. याप्रमाणें प्रत्येक योजनेंत कांहीं विशेष गुण आहे. असो. रशियाच्या लोकशाहीच्या घटनापत्रिकेंत समाजघटनेचीं जीं मुख्य तत्त्वें व्यक्त झालीं आहेत तीं येणेंप्रमाणें:–

(१) राष्ट्रें स्वतंत्र असावीं.

(२) त्यांचें एकीकरण व्हावयाचें तें स्वेच्छेनें व्हावें.

(३) कामकऱ्यांस त्यांचा योग्य वांटा मिळावा, आणि त्यांस नफेबाज भांडवलवाल्यांच्या तावडींतून सोडवावें.

(४) सर्व राष्ट्रांमध्यें या नव्या विचारांचा आणि नवीन समाजघटनेचा प्रसार व्हावा.

(५) काम न करणाऱ्या म्हणजे आयतेखाऊ लोकांचा वर्ग नाहींसा व्हावा.

(६) धंद्यावर सत्ता कामकऱ्यांची असावी.

(७) आपलें तत्त्व पसरविण्यासाठीं कामकरी लोकांनीं युद्धास बद्धपरिकर रहावें.

(८) गुप्त तहनामे बंद व्हावेत.

(९) ज्या अर्थी शेतकरी, कामकरी व शिपाई यांच्या हितासाठीं तह आहे त्या अर्थी तो त्यांच्या इच्छेनें देशोदेशींच्या या वर्गांचे दरम्यान बंधुत्व स्थापित करून घडवून आणावयाचा; खंडणी, मुलुख वगैरे देऊन विकत घ्यावयाचा नाहीं.

(१०) जनतेचे शासनार्थसमुच्चय लोकांनीं आपल्या इच्छेनें आपल्या संस्कृतीच्या स्वरूपावरून ठरवावेत, ते स्वयंशासित असावेत, आणि त्यांचे संघ व्हावेत. अशा रीतीनें लहान समुच्चयांचे मोठे समुच्चय बनवावेत.

(११) उपासनास्वातंत्र्य, मतस्वातंत्र्य, मतप्रचारस्वातंत्र्य आणि नास्तिक्यस्वातंत्र्य, हीं स्वातंत्र्यें अबाधित असावींत.

(१२) मतप्रचार भांडवलावर अवलंबून राहूं नये.

(१३) सभा भरविणें ही गोष्ट पैशावर अवलंबून नसावी.

(१४) शिक्षण सर्वत्रांस मिळावें व तें चांगल्याप्रकारचें मिळावें.

* स्त्रियांवरील व्यक्तिसत्ता काढून टाकून त्यांजवर राष्ट्रसत्ता स्थापन करावी आणि स्त्रिया राष्ट्रांत वांटून घाव्यात म्हणून रशियांत योजना केली आहे अशी जी बातमी १९१९ च्या पूर्वार्धांत पसरली होती तींत कांहीं तथ्य नाहीं.

(१५) परकीय कामकरी लोकांस देखील रशियाचें नागरिकत्व द्यावें.

हीं लेनिनच्या लोकशाहीचीं तत्त्वें होत. लेनिननें सुरू केलेली व्यवहारपद्धति खालील गोष्टींवरून लक्षांत येईल.

(१) त्यानें लोकांच्या भांडवलाचें एकीकरण सक्तीनें करविलें.

(२) आगगाड्या आणि इतर नेआण करण्याचीं साधनें यांचें एकीकरण केलें.

(३) जमीन राष्ट्राच्या मालकीची केली.

(४) परक्या देशाशीं होणारा व्यापार राष्ट्राच्या हातीं ठेवला म्हणजे त्या बाबतींत एकीकरण केलें.

(५) काम करण्याची सक्ती सर्वांस केली.

या सर्व महत्त्वाच्या सुधारणा आहेत आणि त्यांचें केवळ आर्थिक दृष्ट्याहि समर्थन करतां येण्याजोगें आहे. ज्या गोष्टीचें समर्थन करतां येणार नाहीं अशी गोष्ट एवढीच कीं त्यानें ज्यांच्यापासून मालमत्ता हिसकावून घेतली त्यांना कांहींच मोबदला त्यानें दिला नाहीं.

समाजानें प्रत्येक कार्य हातीं घेणें हें लेनिनला आजहि शक्य दिसत नाहीं. आणि यामुळें रशियाला पूर्णपणें सोशलिस्ट म्हणजे समाजसत्तावादी राष्ट्र असें अजूनहि म्हणतां येणार नाहीं.

राज्यक्रांतीचा आणि त्याबरोबर झालेल्या आर्थिक क्रांतीचा परिणाम एवढाच झाला कीं जगभर जें भांडवलाचें एकीकरण होत आहे, तें एकीकरण एका झपाट्यासरशीं झालें, तें कठोर उपायांनीं झालें आणि त्यांत कांहीं लोक बुडाले. नव्या रशियांत निरनिराळ्या व्यापारी संस्था परदेशांतील कारखानदारांशीं टक्कर देत नसून सर्व राष्ट्र टक्कर देत आहे. याचा अर्थ एवढाच कीं संयुक्त राष्ट्रांच्या स्वरूपाची एक फार मोठी लष्ट अशी कंपनी स्थापन झाली आहे.

लेनिन् आणि विल्सन यांच्या योजनांमध्यें जे भेद दिसून येतात ते येणेंप्रमाणेः—

(१) समाजांतील संपत्तीची वांटणी कशी व्हावी यासंबंधीं विल्सन मूकवृत्ति आहे. लेनिनचीं यासंबंधानें निश्चित मतें आहेत.

(२) विल्सनचें राष्ट्रसंघ हें ध्येय आहे. लेनिनचें ध्येय सामाजिक असून राष्ट्रसंघ निर्माण करणें हें त्याचें साधन आहे.

नवीन परिस्थितीची कल्पना येण्यासाठीं रशियाचें साम्राज्य नष्ट होऊन संयुक्तलोकराज्यपद्धतीवर जी रशियाची पुनर्घटना झाली ती व तिजबरोबर झालेले फरक लक्षांत घेतले पाहिजेत. या पुनर्घटनेचें वृत्त थोडक्यांत खालीलप्रमाणें आहे.

मार्च १२ सन १९१७ रोजीं रशियाच्या ड्यूमा नामक लोकसभेनें जो यशस्वी पेंच घातला त्याचा परिणाम असा झाला कीं तेथील बादशहा (झार) दुसरा निकोलस यानें सिंहासन सोडून दिलें. त्या दिवसापासून मेच्या १६ तारखेपर्यंत एक शासनयंत्र राजपुत्र जार्ज ल्वोफ् याच्या नेतृत्वाखालीं चालू होतें, पण त्या तारखेस त्याची पुनर्घटना झाली. आगस्ट ६ १९१७ रोजीं अलेक्झांडर केरेन्स्कीच्या नेतृत्वाखालीं एक निराळें मंत्रिमंडळ तयार झालें. त्याचीहि पुनर्घटना ८ आक्टोबर रोजीं होऊन ही नवी सत्ता एक महिनाभर म्हणजे ७ नोव्हेंबर पर्यंत टिकली. सात नोव्हेंबर रोजीं एका लष्करी क्रांतिकारक मंडळानें अधिकारसूत्रें हिसकावून घेतलीं आणि तीं दुसऱ्या दिवशीं कामकरी, शिपाई व शेतकरी यांच्या प्रतिनिधींच्या संघांच्या परिषदेच्या हवालीं केलीं. नोव्हेंबर १० १९१७ रोजीं एक प्रसिद्धिपत्रक काढलें गेलें त्यांत असें जाहीर झालें कीं, सर्व रशियाची कामकरी-शिपाई-शेतकरी-प्रतिनिधि-संघ-परिषद् रशियाच्या जनतेची परिषद् भरेपर्यंत कशी काय राज्यव्यवस्था असावी हें ठरवीत आहे; तोंपर्यंतच्या सत्ताधारी शासनतंत्रास लोकांचे कमिशनर्स म्हणावें; राज्याचीं जीं निरनिराळीं अंगें आहेत तीं निरनिराळ्या बोर्डांकडे सोंपविलीं जातील; या बोर्डांचें स्वरूप असें राहील कीं, कामकरी-शिपाई-शेतकरी यांच्या संस्थांशीं निकट संबंध ठेवून परिषदेनें योजिलेला कार्यक्रम या बोर्डांनीं पार पाडावा; कार्यसत्ता कमिशनरांचे अध्यक्ष व बोर्ड यांच्याकडे राहील आणि शासनाच्या कार्यासाठीं पद्धति उत्पन्न करणें व नियम करणें हें काम सर्व-रशिया-कामकरी-शिपाई-शेतकरी-प्रतिनिधि-संघ-परिषदेकडे आणि तिच्या मध्यवर्ती कार्यकर्त्यां कमिटीकडे राहील.

जानेवारी ३१, १९१८ रोजीं बोल्शेविकांच्या म्हणजे कामकरी-शेतकऱ्यांच्या सरकारचें स्वरूप निश्चित करणारा हुकूमनामा प्रसिद्ध झाला.

डिसेंबर १०, १९१७ रोजीं बोल्शेविकांनीं जमीनीवरची खासगी सत्ता नाहींशी केली आणि सर्व जमीन सरकारी म्हणजे सर्व जनतेची आहे असें जाहीर केलें.

१० फेब्रुआरी १९१८ रोजीं, पूर्वीच्या सरकारनें काढलेलें कर्ज, स्थानिक व परकीय कर्ज, सर्व अमान्य आहे असें ठरविलें. सर्व दर्यावर्दी मालमत्ता व पेढ्या सरकारजमा करून परक्या देशाशीं व्यापार राष्ट्रीय केला म्हणजे तो सरकारी मक्ता केला. ( या ठरावांत मागाहून बदल झाला व परकीयांच्या कर्जाची फेड करण्याचा निश्चय फेब्रुवारी १९१९ मध्यें होऊन त्याप्रमाणें प्रसिद्धहि करण्यांत आलें. )

१४ मार्च १९१८ रोजीं लोकांचे कमिशनर्स हे पेट्रोग्राड सोडून मास्काव येथें गेले आणि आतां मास्काव या जुन्या राजधानीसच मुख्य पद प्राप्त झालें आहे.

१० जुलै १९१८ रोजीं पास झालेली शासनघटना सर्व रशियाचा प्रथम धर्म अथवा मूलभूत कायदा म्हणून प्रसिद्ध करण्यांत आली. या घटनेचा प्रास्ताविक भाग येणेंप्रमाणेंः—

"१९१८ जानेवारीमध्यें संघांच्या तिसऱ्या अखिल-रशिया परिषदेनें कायम केलेला "नाडलेल्या ( Exploited ) कामगार वर्गाच्या हक्कांचा जाहीरनामा आणि पांचव्या परिषदेनें मान्यता दिलेली सांघिक लोकराज्याची राज्य-घटना" या दोन्ही मिळून रशियन समाजसत्तावादी ( सोशलिस्ट ) संयुक्त सांघिक ( सोव्हिएट ) लोकशाहीचा मूलभूत कायदा झालेला आहे. हा मूलभूत कायदा मध्यवर्ती कार्यकारी कमिटीच्या इझ्वेस्टिया-मध्यें ( सरकारी गॅझेटमध्यें ) अंतिम स्वरूपांत प्रसिद्ध होतांच तत्क्षणापासून त्याचा अम्मल सुरू व्हावयाचा आहे. सोव्हिएटांच्या सर्व स्थानिक पत्रांतून तो पुन्हां छापला जाईल, व सर्व सोव्हिएट संस्थांमधून सार्वजनिक जागीं लावण्यांत येईल.

"पांचव्या कांग्रेसनें शिक्षणखात्यावरील लोक मंत्र्यास असा हुकूम केला आहे कीं, सर्व शाळांमधून व विद्यालयां-मधून या राज्यघटना-नियमांचीं आधारतत्त्वें, त्यांचा उद्देश व त्यांचा अर्थ यांचा अभ्यास सुरू करावा."

ही बोल्शेव्हिक राज्यघटनापत्रिका देण्यापूर्वी बोल्शेव्हिझम-संबंधानें आणखी दोन शब्द सांगावेसे वाटतात ते असे. बोल्शेव्हिझमला डॉ. विल्सन यांनीं भुकेलेल्या लोकांचें मत म्हणून म्हटलें तें बरेंचसें यथार्थ दिसतें. कां कीं नव्या रशियांत संचय करणाऱ्या लोकांचा संचय काढून घेऊन त्यावरील सत्ता दरिद्री लोकांच्या हातीं देण्यांत आली आहे. याचा परिणाम एवढाच होईल कीं कांहीं चळवळ्या लोकांच्या हातीं राष्ट्राच्या रकमा येतील. खासगी भांडवली पद्धतीनें तयार झालेल्या लोकांच्या हातून ज्याप्रमाणें व्यवहार होतो तसा हे चळवळे लोक व्यवहार करतील कीं नाहीं याची शंका आहे. श्रीमान् लोकांस बुचाडणें, सर्व सत्ता आणि द्रव्य चळवळ्यांनीं आपल्या हातीं हिसकून घेणें आणि पुढें पुन्हां खासगी भांडवला-च्या तत्त्वाची स्थापना करणें या पलीकडे चालू कारकीर्दींत कांहीं अधिक होईल असें वाटत नाहीं. सामान्यतः पाहिलें तर लोकसत्तात्मक राज्य चालविणें ही गोष्ट कठिण आहे. आणि रशियासारख्या देशांत तर ही फारच कठिण आहे; कां कीं सरकारचें कार्यक्षेत्र इतर ठिकाणांपेक्षां येथें अधिक, आणि जनता अधिक निरक्षर. १९१३ सालच्या 'स्टाटिस्टिकल अन्युअल' मधील आंकड्यांवरून असें दिसतें कीं प्राथमिक शिक्षण देखील फारसें वाढलेलें नाहीं. सदरील वर्षीं नऊ वर्षांच्या मुलांत दर शेंकडा फक्त २७ मुलांस लिहितां व वाचतां येत होतें. पोलंड प्रांतांत शेंकडा ४१, यूरोपियन रशियांत ३०, काकेशस प्रांतांत १७, सैबेरियांत १६ आणि मध्य आशियांत ६ असें प्रमाण होतें.

यूरोपिअन रशियांतील जास्त सुशिक्षित प्रांतांत ( म्हणजे एस्थोनियामध्यें दर शेंकडा एकंदर लोकवस्तींत ३०·१ अशिक्षित, लिव्होनियामध्यें २२·३, कूरलंडमध्यें २९·१ व पेट्रोग्रॅडमध्यें ४४·९ असें ) अशिक्षितांचें प्रमाण मोठें होतें.

या तऱ्हेच्या शिक्षणविषयक आंकड्यांवरून शासनास अति कठिण असें जें समाजसत्तावादी राज्य तें रशियांतून उत्पन्न झालेल्या वैराज्यवाद्यांस कसें काय चालवितां येईल याची शंका उत्पन्न होते.

बादशाही सत्तेशिवाय राज्य चालविण्याच्या बाबतीमध्यें रशियन लोकांना कसा काय अनुभव आला हें त्यांच्या वारंवार झालेल्या क्रान्त्यांवरून ठरवितां येणार नाहीं. कां कीं एका क्रान्तीनंतर भक्कम सरकार मध्यंतरीं एक दोन क्रान्त्या झाल्याशिवाय येत नाहीं. आजचें सरकार बरेंचसें भक्कम आहे असें समजण्यास हरकत नाहीं. तथापि शासनक्षमता व शिस्त उत्पन्न करण्यासंबंधानें रशियन तत्त्ववेत्त्यांस उत्पन्न झालेल्या अपेक्षा प्रत्यक्ष अनुभवानें कमी होतील असा बराच अजमास आहे. समाजसत्तावाद म्हणजे काय याविषयींच्या तत्त्ववे-त्त्याच्या डोक्यांतील कल्पना आणि लोक ग्रहण करूं शकतील त्या कल्पना यांमध्यें महदंतर आहे. लोकांच्या ग्रहणशक्तीच्या अल्पत्वाची तर्कानें सिद्धता करीत बसणें अनवश्य करणाऱ्या गोष्टी आतांपर्यंत झाल्याहि आहेत. लोकांनां तारण्यास बोल्शेव्हिकांच्या पूर्वी कॅडेट आले. या कॅडेटांनीं सर्व जमीन शेतकरी लोकांस वांटून द्यावयाचें जाहीर अभि-वचन दिलें व त्यामुळें त्यांनीं जनतेंत बरीच खळवळ उडवून दिली. त्यांनीं असेंहि जाहीर केलें कीं, कोणापासूनहि कर घ्यावयाचा नाहीं अथवा सरकारला घेऊं द्यावयाचा नाहीं व कोणीहि सरकारला कर देऊं नये. परंतु त्यांच्या हातून यापैकीं कांहींच घडून आलें नाहीं व सरकारनें आपले कर वसूल करून घेतले. १९१७ च्या मार्चमध्यें राज्यक्रांति झाली, तेव्हां या कॅडेटांनीं राजसत्ता व ड्यूमा सभा यांचा नाश करण्यास आपली संमति दिली. यावेळीं त्यांनां आपल्या पक्षा-बद्दल असा विश्वास वाटत होता कीं, आपल्या पक्षांतील लोक अगदीं शिस्तीनें वागतील व आपणास सर्व गोष्टी व्यव-स्थितपणें घडवून आणतां येतील. परंतु हा त्यांचा निवळ भ्रम होता. त्यांची जी समजूत होती कीं, सामान्य जनता पद्धतशीरपणें सर्व गोष्टी करील व लोकांस जेवढें मिळेल तेवढ्यांत ते संतुष्ट राहतील, ती अगदीं चुकीची ठरली. सर्व स्थिरस्थावर होऊन नंतर कांहीं आपणास मिळेल या आशेवर थांबण्याइतका लोकांनां धीर निघणें अशक्य होतें. व म्हणूनच बोल्शेविकांनीं कॅडेटांपुढें जाऊन नोकरशाहीकडे असलेले सर्व हक्क जेव्हां लोकांनां त्वरित देण्याचें अभिवचन दिलें तेव्हां स्वभावतःच कॅडेटपक्ष मागें पडला आणि बोल्शेव्हिकांची सरशी झाली. असो.

आतां या बोल्शेव्हिकांची शासनघटना पाहूं. या घटनेचा प्रास्ताविक भाग वर आलाच आहे. मुख्य भाग येणेंप्रमाणें:-

# रशियन समाजसत्तावादी संयुक्त सांघिक (सोव्हिएट) लोकशाहीचा मूलभूत कायदा.

## भाग १.

## कामगार लोकांच्या हक्कांचें विधान.

### प्रकरण १.

(१) रशियाचें राज्य हें कामगार, सैनिक व शेतकरी यांच्या प्रतिनिधींच्या संघांचें लोकराज्य झालें आहे. सर्व स्थानिक व मध्यवर्ती सत्ता या संघांच्या हातीं देण्यांत आलेली आहे.

(२) रशियांतील सांघिक लोकशाही स्वेच्छानिर्मित राष्ट्रांच्या पायावर स्थापण्यांत आलेली आहे; आणि ही लोकशाही राष्ट्रीय सांघिक लोकराज्यांचें संयुक्त राज्य या स्वरूपाची आहे.

### प्रकरण २.

(३) मनुष्यामनुष्यांमधील एकमेकांच्या नाडवणुकीचे सर्व प्रकार बंद करणें, तसेंच वर्गवारीमुळें झालेले समाजाचे तुकडे कायमचे नाहींसे करणें, सर्व नाडणारे वर्ग पूर्णपणें लयास नेणें, समाजाची समाजसत्तापद्धतीची घटना करणें, आणि सर्व देशांत समाजसत्तातत्त्वाचा विजय होईल असें करणें, या मुख्य उद्देशांचे सिद्धीसाठीं पांचवी अखिल-रशिया सांघिक परिषद् खालील ठराव करीत आहेः—

(अ) सर्व जमीन समाजसत्तेखालीं आणण्याकरितां तिजवरील खासगी मालकी नष्ट करण्यांत आली आहे; सर्व जमीन राष्ट्राच्या मालकीची केली आहे व ती शेतकाम करणाऱ्यांच्या स्वाधीन करण्यांत येत आहे; या कामांत पूर्वीच्या मालकांना नुकसानभरपाई मिळावयाची नाहीं; जमिनीच्या वांटणींत न्याय्य तत्त्व लावलें आहे आणि वांटणीदार व्यक्तीस जमिनीचा फक्त उपयोग करण्याचा हक्क ठेवलेला आहे.

(आ) राष्ट्राला महत्त्वाचीं असलेलीं जंगलें, खनिज संपत्ति आणि जलसंचय; सर्व जनावरें व शेतीचीं इतर साधनें, सर्व खासगी जमिनी व अधिकतम उत्पन्न काढण्याचीं प्रयोगी शेतें; ही सर्व सार्वजनिक मत्ता केली आहे.

(इ) सर्व कारखाने, औद्योगिक कार्यालयें, रेलवे व मालाची निपज व नेआण करण्याचीं सर्व साधनें हीं शेतकरी व कामकरी यांच्या सांघिक लोकशाहीच्या पूर्णपणें ताब्यांत देण्याच्या कार्यांतील पहिली पायरी आणि नाडणाऱ्यां (भांडवलवाल्यां)वर कामकऱ्यांचें वर्चस्व स्थापन करण्याचा मार्ग म्हणून उद्योगधंद्यांवर कामकऱ्यांची सत्ता चालण्याबद्दलचें आणि राष्ट्रीय-मितव्यय-मंडळा-संबंधाचें सांघिक शासन ( कायदा ) ही परिषद् मान्य करीत आहे.

(ई) झारच्या सरकारनें आणि भांडवलवाल्यांनीं व जमीनदारांनीं काढलेलें कर्ज अमान्य करण्याबद्दलचा कायदा हा सार्वराष्ट्रीय भांडवली सत्तेवरील पहिला घाव होय असें ही पांचवी अखिल रशिया सांघिक परिषद् मानते; आणि आपला असा पूर्ण विश्वास व्यक्त करिते कीं, भांडवली सत्तेच्या जुंवाखालून सुटण्याबद्दलच्या कामकऱ्यांच्या सार्वराष्ट्रीय चळवळीला पूर्ण यश येईपर्यंत सांघिक सत्तेचें हेंच धोरण राहील.

(उ) कष्ट करणाऱ्या जनतेची भांडवली कचाटींतून सुटका करण्याचे कामांतील एक पाऊल म्हणून सर्व बँकांवरील अधिकार जो कामगार व शेतकरी यांनीं स्थापिलेल्या सरकारला दिलेला आहे तो ही परिषद् मान्य करीत आहे.

(ऊ) समाजांतील सर्व आयतेखाऊ लोकांचा नायनाट करण्याकरितां व देशाचे सांपत्तिक व्यवहारास सुसंघटित स्वरूप देण्याकरितां, समाजाला उपयुक्त असें काम करण्याची सर्वांवर सक्ती ठेविली आहे.

(ऋ) कामकऱ्यांची सत्ता कायम रहावी आणि नफेबाजांच्या हातीं ती पुनरपि जाण्याचा मुळींच संभव राहूं नये म्हणून ही परिषद् असा हुकुम करिते कीं, सर्व कामगारांना सशस्त्र करावें, सांघिक सरकारनें आपलें समाजसत्तावादी रक्तवर्णांकित सैन्य तयार करावें व सर्व मालदार वर्गास पूर्ण निःशस्त्र करून टाकावें.

### प्रकरण ३.

(४) खासगी भांडवलवाल्यांची द्रव्यतृष्णा आणि साम्राज्यतृष्णा यांच्या मगरमिठींतून मानवजातीची सुटका करण्याचा आपला कायम निश्चय ही पांचवी परिषद् जाहीर करीत आहे. या दोघींनींच या अत्यन्त पापमय महायुद्धांत सर्व जगभर भयंकर रक्तपात घडवून आणला. वरील निश्चयानुसार ही संघांची पांचवी परिषद् संघांच्या राज्यपद्धतीचें गुप्त तहांस अमान्य करण्याचें जें धोरण आहे त्या धोरणाला मनःपूर्वक मान्यता देत आहे. तसेंच एकमेकांशीं लढण्यांत गुंतलेल्या सैन्यांतील कामकरी व शेतकरी लोकांमध्यें शक्य तितक्या विस्तृत प्रमाणांत बंधुभाव उत्पन्न करण्याची व्यवस्था करणें, आणि निकराच्या क्रांतिकारक उपायांनीं स्वयंनिर्णयाच्या पायावर आणि 'ना मुलुख ना खंडणी' या तत्त्वावर लोकसत्तावादी कामगारांच्या हिताचा तह करण्याची व्यवस्था करणें, या कामांतील धोरणहि या परिषदेला पूर्णपणें मान्य आहे.

(५) वरील उद्देशानेंच, ज्या भांडवली सुधारणेनें आशिया खंड, वसाहती आणि लहान राष्ट्रें यांमधील लक्षावधि मजुरांना गुलाम बनवून विशिष्ट हक्क भोगणाऱ्या कांहीं

राष्ट्रांतील नफेबाजांची भरभराट घडवून आणली त्या सुधारणेच्या रानटी धोरणाचा सर्वथा निषेध व त्याग केला पाहिजे असा संघांच्या या पांचव्या परिषदेचा आग्रह आहे.

(६) फिनलंडचें स्वातंत्र्य जाहीर करणें, इराणमधून रशियन फौज परत आणण्याचा उपक्रम करणें, आणि आर्मेनियाला पूर्ण स्वयंनिर्णयाची मुभा देणें, या लोकमंत्रिसभेच्या कामाबद्दल ही पांचवी सांघिक परिषद् आदरपूर्वक पसंती व्यक्त करीत आहे.

## प्रकरण ४.

(७) कामगार व त्यांनां नाडणारे नफेबाज लोक यांच्यामधील झगड्यांतील या आणीबाणीच्या वेळीं 'कामगार—सैनिक-शेतकरी-प्रतिनिधि-संघ-पंचम-अखिल-रशिया-परिषद्' इचें असें मत आहे कीं या वेळीं तरी अधिकारीमंडळामध्यें या नफेबाजांचा शिरकाव होऊं देणें बिलकुल योग्य नाहीं. यावेळीं सर्व सत्ता पूर्णपणें व सर्वस्वीं कष्ट करणारे लोक आणि त्यांच्या खऱ्या प्रतिनिधींच्या सभा म्हणजे कामगार, सैनिक व शेतकरी यांच्या प्रतिनिधींचे संघ यांच्याच हातांत असली पाहिजे असें या परिषदेचें मत आहे.

(८) तथापि, रशियामधील निरनिराळ्या राष्ट्रांतील कामगार लोकांची खरोखर स्वतंत्रबुद्धीची व राजीखुषीची आणि म्हणून पूर्ण व चिरकालिक अशी एकी घडवून आणण्याच्या हेतूनें ही पांचवी परिषद् तूर्त रशियांतील सांघिक लोकराज्यांचें संयुक्तराज्य बनविण्याकरितां लागणारीं मुख्य तत्त्वें ग्रथित करण्याचेंच काम करीत आहे. रशियाच्या संयुक्त संघ-सरकाराच्या व इतर संघसंस्थांच्या शासनक्षेत्रांत शिरावयाचें किंवा नाहीं आणि शिरल्यास कोणत्या मूलभूत शर्तीवर शिरावयाचें हें स्वतंत्रपणें आपआपल्या संघांच्या राष्ट्रीय परिषदांत ठरविण्याचा हक्क प्रत्येक राष्ट्रांतील कामगारांकडे व शेतकऱ्यांकडे ही पांचवी परिषद् राखून ठेवीत आहे.

# भाग २ रा.

## रशियन संघांच्या समाजसत्ताक संयुक्त लोकराज्याच्या घटनेचीं सामान्य तत्त्वें.

## प्रकरण ५ वें.

(९) रशियन संयुक्त सांघिक लोकराज्याची ही प्रस्तुतची घटना प्रस्तुतच्या संक्रमण कालाकरितां असून हिचा मुख्य उद्देश हा आहे कीं, भांडवली सत्ता पूर्णपणें लयास नेतां यावी, एका मनुष्यानें दुसऱ्याला आपल्या स्वतःच्या स्वार्थासाठीं राबविण्याची पद्धति नाहींशी करतां यावी, आणि वर्ग-भेद व तजन्य सरकारी जुलुम यांपासून मुक्त अशा समाजसत्तेची प्रस्थापना करतां यावी या गोष्टी घडवून आणण्यासाठीं, शहरांतील व खेड्यांतील कामगार लोक आणि गरीब शेतकरी लोक यांची अप्रतिबंध सत्ता, जोमदार सांघिक शासनतंत्र निर्माण करून, स्थापावयाची.

(१०) रशियन लोकराज्य हा रशियांतील सर्व कामगारांचा समाजसत्तावादी समाज आहे. या राज्यांतील सर्व राज्याधिकार नगरसंघ व ग्रामसंघ यांत प्रतिनिधिद्वारा बसणाऱ्या सर्व रशियांतील कामगार लोकसमाजाच्या स्वाधीन आहेत.

(११) देशरूढींच्या व आचारविचारांच्या बाबतींत जेथील लोक समानधर्मी आहेत अशा प्रदेशांतील संघांनीं वाटल्यास आपले निरनिराळे प्रादेशिक समुच्चय स्थापण्यास हरकत नाहीं. हल्लींच्या व यापुढें अस्तित्वांत येणाऱ्या अशा प्रादेशिक समुच्चयांनीं वाटल्यास आपआपली स्वतंत्र संघ-परिषद् भरवावी व स्वतंत्र कार्यकारी मंडळें निवडावींत. या स्वयंशासित समुच्चयांचा रशियन वैराज्यांत संस्थानसंयोगतत्त्वावर प्रवेश होईल.

(१२) रशियन सांघिक लोकशाहीचीं सर्वाधिकारसूत्रें अखिल-रशिया-सांघिक-परिषदेच्या हातीं राहतील. आणि या वरिष्ठ परिषदेच्या दोन अधिवेशनांच्या मध्यंतरीं हीं सूत्रें मध्यवर्ती कार्यकारी मंडळाकडे राहतील.

(१३) कामकरी मंडळींनां आपल्या सदसद्विवेकबुद्धीस जें योग्य वाटेल त्याप्रमाणें वागण्यास खरें स्वातंत्र्य मिळावें म्हणून उपासनाखातें राज्यसंस्थेपासून व शाळाखातें उपासनाखात्यापासून अलग करण्यांत येईल व प्रत्येक नागरिकास उपासनेचें तसेंच स्वमतप्रसार, परमतखंडन किंवा नास्तिक्यप्रचार करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य राहील.

(१४) आज पावेतों मुद्रणकलेचीं सूत्रें जीं केवळ भांडवलवाल्या लोकांच्याच हातीं होतीं तीं त्यांचे हातून काढून घेतलीं आहेत व कामकरी लोकांस आपल्या मत-स्वातंत्र्याचा पूर्ण फायदा घेतां यावा म्हणून, वर्तमानपत्रें, हस्तपत्रकें, पुस्तकें वगैरे छापण्याकरितां लागणारीं यांत्रिक व आर्थिक साधनें मजूर व शेतकरी वर्गाच्या स्वाधीन करण्यांत येत आहेत. तसेंच यांनां आपल्या मताचा सर्व देशभर अप्रतिहत प्रसार करितां यावा अशी खबरदारी सरकार घेईल.

(१५) आपल्या नागरिकांचा सभा वगैरे भरविण्याचा व मिरवणुकी काढण्याचा हक्क सांघिक रशियन लोकशाहीस पूर्णपणें मान्य असल्यामुळें, कामकरी लोकांनां एकत्र जमण्यास कोणत्याहि प्रकारची अडचण पडूं नये म्हणून सार्वजनिक सभांकरितां सोइस्कर असलेल्या सर्व जागा दिवेबत्तीच्या व शीतनिवारणाच्या साधनांसह मजूर व शेतकरी लोकांच्या स्वाधीन करण्यांत आल्या आहेत. या

जागांची योग्य ती बरदास्त ठेवण्याकरितां अवश्य असणारे नोकरचाकरहि सरकारांतूनच पुरविण्यांत येतील.

(१६) कामकरी लोकांनां स्वतःचे समाज स्थापन करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य मिळवून देण्याकरितां, रशियन सांघिक लोकशाहीनें धनिकवर्गाची आर्थिक व राजकीय सत्ता नामशेष करून त्या वर्गाकडून मजूर व शेतकरी लोकांचें ह्या बाबतींतील स्वातंत्र्य मर्यादित केलें जाण्याची भीति अगोदरच समूळ नष्ट करून टाकली आहे, आणि आतां ह्या लोकांनां सुसंघटित समाज स्थापण्याकरितां जी काय आर्थिक व नैतिक मदत लागेल ती यथाशक्ति देण्यास नवें सरकार तयार आहे.

(१७) कामकरी लोकांनां शिक्षणाचा पूर्ण फायदा घेतां यावा म्हणून रशियन सांघिक लोकशाहीनें मजूर व शेतकरी वर्गाला अथपासून इतिपावेतों सर्व शिक्षण देण्याची जोखीम स्वतःवर घेतली असून हें शिक्षण सर्वांनां मोफत दिलें जाईल.

(१८) जो काम करील त्यालाच फक्त ह्या जगांत राहण्याचा हक्क आहे हें तत्त्व रशियन सांघिक लोकशाही अमलांत आणणार असून, त्याकरितां कोण्याहि नागरिकानें निरुद्योगी राहतां कामा नये असा निर्बंध घालण्यांत येत आहे. जो उद्योग करणार नाहीं त्यानें उपाशीच मेलें पाहिजे.

(१९) मजूर व शेतकरी वर्गानें राज्यक्रांति घडवून आणून जें पाऊल एकदां पुढें टाकलें आहे तें मागें घेण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून प्रत्येक नागरिकानें समाजसत्ताक लोकशाहीच्या संरक्षणार्थ यथाशक्ति मदत केलीच पाहिजे असें जाहीर करण्यांत येत असून त्याकरितां लष्करी नोकरी सक्तीची करण्यांत येत आहे. राज्यक्रांतीच्या संरक्षणार्थ हातीं शस्त्र धरण्याचा मान फक्त कामकरी वर्गासच देण्यांत येत असून, लढण्याव्यतिरिक्त लष्करांतील जीं दुसरीं कामें असतील तीं इतर वर्गास करावीं लागतील.

(२०) सर्व राष्ट्रांतील कामकरी वर्गांच्या हितसंबंधांचें ऐक्य लक्षांत घेऊन, रशियन नागरिकांनां जे कांहीं राजकीय हक्क आहेत तेच रशियन लोकशाहीच्या हद्दींत काम करणाऱ्या परदेशीय मजूर व शेतकरी लोकांनांहि दिले आहेत. मात्र हे इसम स्वतःच्या श्रमानें पोट भरणारे असून दुसऱ्याच्या परिश्रमावर उपजीविका करणारे नसावेत. अशा कामकरी परदेशीय लोकांनां रशियन नागरिकत्वाचे हक्क दुसऱ्या कोणत्याहि औपचारिक गोष्टींत कालापहरण न करितां तावडतोब अर्पण करण्याचा अधिकार स्थानिक संघांनां देण्यांत येत आहे.

(२१) राजकीय किंवा धार्मिक गुन्ह्यांबद्दल ज्या लोकांचा इतरत्र छळ करण्यांत येत असेल त्या सर्वांनां आमच्या हद्दींत येऊन आश्रय घेण्याचा हक्क आहे असें रशियन लोकशाही जाहीर करीत आहे.

(२२) अमुक मनुष्य कोणत्या राष्ट्रांतील अथवा मानववंशांतील आहे याचा कांहीं एक विचार न करितां कायद्यानें सर्व नागरिकांस सारखेंच वागविलें पाहिजे ही गोष्ट रशियन लोकशाहीस मान्य असल्यामुळें, आपपरभाव मनांत आणून अथवा अल्पसंख्याक राष्ट्रकांचें उच्चाटन करण्याच्या किंवा त्यांचे हक्क मर्यादित करण्याच्या उद्देशानें नवीन विशेष हक्क निर्माण करणें किंवा तसल्या प्रकारचे जुने हक्क पुढें चालूं देणें हें आमच्या मूलभूत तत्त्वांशीं विसंगत आहे असें ही लोकशाही जाहीर करीत आहे.

(२३) प्रस्तुत समाजसत्ताप्रतिष्ठापक क्रांतीला विघातक असे व्यक्तींचे व जातींचे हक्क कामगारवर्गाच्या सामान्य हिताकरितां रशियन सांघिक लोकशाही काढून घेत आहे.

## भाग ३.

### अ—मध्यवर्ती सत्तेची घटना.

### प्रकरण ६.

### कामगार, शेतकरी, कोसॅक व सेनेंतील शिपाई यांच्या प्रतिनिधींची अखिल-रशिया-सांघिक-परिषद्.

(२४) अखिल-रशिया-सांघिक-परिषद् ही रशियांतील सांघिक लोकशाहीची मुख्य सत्ताधारी सभा आहे.

(२५) ही अखिल-रशिया-सांघिक-परिषद् नगर-संघांतून पंचवीस हजार मतदारांस एक या प्रमाणानें, व प्रांतिक-संघांच्या परिषदेंतून सवालक्ष रहिवाश्यांस एक या प्रमाणानें प्रतिनिधी घेऊन बनविलेली आहे.

टीप १:—प्रांतिक-संघांची परिषद जर अखिल-रशिया-सांघिक-परिषदेपूर्वी भरली नसेल तर या परिषदेला जिल्हासंघांतूनच परस्पर प्रतिनिधी घेतले जातात.

टीप २:—जर संघांची प्रादेशिक-परिषद अखिल-रशिया-सांघिक-परिषदेपूर्वी नुकतीच भरली असेल तर प्रादेशिक-परिषदेनें प्रतिनिधी पाठविल्यास चालेल.

(२६) मध्यवर्ती कार्यकारी मंडळ वर्षांतून निदान दोन वेळ तरी अखिल-रशिया-सांघिक-परिषद् भरवितें.

(२७) मध्यवर्ती कार्यकारी मंडळास स्वतःच्या इच्छेनें अगर लोकशाहीमधील लोकसंख्येच्या निदान एक तृतीयांशाइतक्या लोकांचें मत प्रदर्शित करणाऱ्या स्थानिक संघांच्या मागणीवरून, अखिल-रशिया-सांघिक-परिषदेचें असाधारण अधिवेशन भरवितां येतें.

(२८) अखिल-रशिया-सांघिक-परिषद्, एक २०० पेक्षां अधिक सभासद नसलेलें अखिल-रशिया-मध्यवर्ति-कार्यकारी मंडल निवडते.

(२९) अखिल-रशिया-मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ हें अखिल-रशिया-सांघिक-परिषदेस सर्वस्वी जबाबदार आहे.

(३०) या परिषदेच्या दोन अधिवेशनांच्या मध्यंतरीं मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ हें लोकशाहीचें मुख्य सत्ता-स्थान असतें.

## प्रकरण ७.

### अखिल-रशिया-मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ

(३१) मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ ही लोकशाहीची कायदे करणारी, राज्यकारभार पहाणारी व नियमन करणारी वरिष्ठ संस्था आहे.

(३२) मध्यवर्ती कार्यकारी मंडळाकडे खालील कामें आहेत.

(अ) कामकरी-शेतकरी-सरकारच्या वरिष्ठ व इतर शासनसंस्थांनां सामान्यतः कार्यदिशा आंखून देणें,

(आ) कायदे व राज्यकारभार या दोन गोष्टींत संगति व सहकारिता राहील असें करणें,

(इ) सांघिक शासनघटनेचीं कलमें, तसेंच अखिल-रशिया-सांघिक-परिषदेचे व मध्यवर्ति शासनसंस्थांचे ठराव, हे बरोबर अमलांत येत आहेत कीं नाहींत हें पहाणें.

(३३) मध्यवर्ती कार्यकारीमंडळ लोकमंत्रिसभेनें पाठविलेले ठराव व सूचना यांचे कच्चे खर्डे तपासून त्यांस मान्यता देतें आणि स्वतःहि ठराव व नियम करून ते जाहीर करतें.

(३४) मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ अखिल-रशिया-सांघिक-परिषद् भरवितें आणि स्वतःचे कामाचा अहवाल व सर्वसाधारण राजकीय परिस्थितीबद्दलची व इतर अनेक विविध प्रश्नांविषयींची माहिती परिषदेपुढें सादर करतें.

(३५) मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ लोकशाहीच्या सर्वसाधारण व्यवस्थेकरितां लोकमंत्रिसभा स्थापन करतें आणि राज्यकारभाराच्या निरनिराळ्या सर्व शाखांवर देखरेख ठेवण्याकरितां लोकमंत्रिकार्यालयें नांवाचीं खातीं काढतें.

(३६) मध्यवर्ती कार्यकारी मंडळाचे सभासद या खात्यांत कामें करितात अगर मंडळाचें दुसरें कांहीं विशिष्ट काम करतात.

## प्रकरण ८ वें.

### लोकमंत्रिसभा.

(३७) रशियन लोक-राज्याच्या कारभाराची सर्वसाधारण दिशा ठरविण्याचा अधिकार लोकमंत्रिसभेच्या हातीं आहे.

(३८) वरील उद्देश साधण्याकरितां लोकमंत्रिसभेनें ठराव, हुकूम आणि नियम करावे; आणि झटपट रीतीनें आणि व्यवस्थितपणानें कारभार चालावा म्हणून योग्य त्या सर्वसाधारण गोष्टी कराव्या.

(३९) मध्यवर्ती कार्यकारी मंडळाला लोकमंत्रिसभेनें आपले सर्व हुकूम आणि निर्णय तावडतोब कळवावे.

(४०) लोकमंत्रिसभेच्या निर्णयाची किंवा हुकुमाची अंमलबजावणी तहकूब ठेवण्याची किंवा ते रद्द करण्याची सत्ता मध्यवर्ती कार्यकारी मंडळाला आहे.

(४१) राज्याच्या सर्वसामान्य धोरणांत मूलतः फेरफार करणारे लोकमंत्रिसभेचे निर्णय तपासणीसाठीं व मंजुरीसाठीं मध्यवर्ती कार्यकारी मंडळापुढें मांडले गेले पाहिजेत.

टीप–अत्यंत निकडीच्या उपायांची अंमलबजावणी लोकमंत्रिसभेनें केवळ आपल्याच अधिकारांत केल्यास चालेल.

(४२) लोक-कारभाराचीं खातीं लोकमंत्र्यांच्या ताब्यांत दिलीं आहेत.

(४३) लोक-कारभाराचीं खातीं अठरा आहेत. तीं येणेंप्रमाणें:–परदेश, युद्ध, नौका, अंतर्गत कारभार, न्याय, मजूरी, सामाजिक विमा, शिक्षण, पोष्ट आणि तारायंत्र, देशी राष्ट्रें, जमाबंदी, वाहतुक, कृषि, उद्योग व व्यापार, अन्नपुरवठा, खर्चाचें नियमन, राष्ट्रीय मितव्यय ( हें खातें कामकऱ्यांचा उद्योगधंद्यांवर तावा रहावा म्हणून स्थापिलें आहे ) आणि आरोग्य.

(४४) प्रत्येक लोकमंत्र्याच्या मदतीला एक पंच–मंडळ असतें, या पंचमंडळाचा अध्यक्ष तो लोकमंत्रीच असून हें पंचमंडळ लोकमंत्रिसभेनें नेमावयाचें असतें.

(४५) लोकमंत्र्याला स्वतःच्या मुखत्यारीनें आपल्या खात्याच्या कक्षेंत येणाऱ्या सर्व प्रश्नांचा निकाल लावण्याचा अधिकार आहे; परंतु त्यानें हे सर्व निर्णय आपल्या पंचमंडळापुढें ठेविले पाहिजेत. जर या पंचमंडळाचा एखाद्या प्रश्नाच्या बाबतींत त्याच्याशीं मतभेद झाला तर या पंचमंडळास हा प्रश्न, लोकमंत्र्याच्या निर्णयाची अंमलबजावणी न थांबवितां, लोकमंत्रिसभेपुढें किंवा मध्यवर्ती कार्यकारी मंडळापुढें ठेवण्याचा अधिकार आहे. अशा निर्णयाच्या बाबतींत वरील सभांपुढें वादग्रस्त प्रश्न मांडण्याचा अधिकार पंचमंडळांतील प्रत्येक सभासदास आहे.

(४६) लोकमंत्रिसभा ही अखिल-रशिया-सांघिक-परिषद् आणि मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ यांस जबाबदार आहे.

(४७) लोकमंत्री आणि त्यांचीं पंचमंडळें हीं लोकमंत्रिसभेस व मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळास जबाबदार आहेत.

(४८) 'लोकमंत्री' (पीपल्स कॉमिसरि) हें उपपद फक्त लोकमंत्रिसभेच्या सभासदांसच धारण करण्याचा हक्क आहे. यांच्या हातांत रशियन-सांघिक-लोकशाहीच्या सामान्य कारभाराचीं सूत्रें असतात. इतर कोणत्याहि मध्यवर्ती अगर स्थानिक संस्थेच्या प्रतिनिधीस हें उपपद धारण करण्याचा हक्क नाहीं.

## प्रकरण ९.

### अखिल-रशिया-सांघिक-परिषद् व मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ यांचे अधिकार.

(४९) अखिल-रशिया-सांघिक-परिषद् व मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ यांनां खालील राष्ट्रीय महत्त्वाच्या गोष्टी करण्याचा अधिकार आहे.

(अ) शासनघटनेस मंजुरी देणें, तींत बदल करणें, अथवा जास्त गोष्टी घालणें.

(आ) अन्तर्गत आणि बाह्य राजकारणाच्या धोरणाचें नियंत्रण करणें.

(इ) सरहद्दी ठरविणें, सरहद्दींत बदल करणें, रशियन-सांघिक-लोकशाहीपैकीं कोणताहि भाग वेगळा करणें व त्यावरील हक्क सोडून देणें.

(ई) रशियन लोकशाहीचे भाग झालेल्या प्रादेशिक-समुच्चयांच्या प्रदेशाची आणि अधिकारांची मर्यादा ठरविणें व अशा प्रादेशिक-समुच्चयांचे दरम्यान उपस्थित झालेल्या वादग्रस्त प्रश्नांचे बाबतींत मध्यस्थी करून निकाल देणें.

(उ) रशियन संयुक्त-सांघिक-लोकशाहीमध्यें नवीन घटक सामील करणें, व तींतून फुटून निराळ्या झालेल्या घटकांच्या विभक्ततेस मान्यता देणें.

(ऊ) राज्यकारभार चालविण्याकरितां लोकशाहीच्या राज्याचे विभाग पाडणें, आणि प्रादेशिक गटांस मान्यता देणें.

(ऋ) वजनें, मापें आणि नाणीं ठरविणें, आणि त्यांत बदल करणें.

(ॠ) परराष्ट्रीय संबंध ठरविणें, लढाई पुकारणें आणि तह करणें.

(ऌ) कर्ज उभारणें, व्यापारी जकातींचा दर ठरविणें व व्यापार आणि देवघेव या दोहोंच्या संबंधानें करारमदार करणें.

(ए) राष्ट्रीय मितव्ययासंबंधीं सर्वसामान्य व प्रत्येक बाबींतील धोरण ठरविणें.

(ऐ) लोकशाहीच्या खर्चाचें अंदाजपत्रक तयार करणें.

(ओ) राष्ट्रीय कर बसविणें.

(औ) लोकशाहीचें हत्यारबंद सैन्य सुसंघटित करणें.

(अं) दिवाणी आणि फौजदारी बाबतींत न्याय देण्याचे व न्यायाचें काम चालविण्याचे कायदे करणें.

(अः) लोकमंत्री व लोकमंत्रिसभा यांची नेमणूक व स्थापना करणें आणि त्यांचे अधिकार काढून घेणें, तसेंच लोकमंत्रिसभेच्या अध्यक्षाची नेमणूक मंजूर करणें.

(क) रशियन रहिवाशांस नागरिकत्वाचे हक्क प्राप्त होणें अगर ते नष्ट होणें यासंबंधीं व त्याप्रमाणेंच लोकशाहीच्या राज्यांत वास करणाऱ्या परकीयाच्या हक्कांसंबंधीं नवीन नियम करणें.

(ख) कैद्यांनां पूर्ण अगर अंशतः माफी देणें.

(५०) अखिल-रशिया-सांघिक-परिषद् आणि मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ यांनां या वर उल्लेखिलेल्या प्रश्नांखेरीज ज्या दुसऱ्या कोणत्या गोष्टी आपल्या अधिकारांत आहेत असें वाटेल त्यांवर निकाल देतां येईल.

(५१) पुढील विशेष हक्क फक्त अखिल-रशिया-सांघिक-परिषदेलाच आहेत.

(अ) सांघिक-शासनघटनेचे मूलभूत कायदे करणें, त्यांत बदल करणें अथवा नवीन कलमें घालणें.

(आ) तहनाम्यांस मान्यता देणें.

(५२) अखिल रशिया परिषद् भरविणें अगदीं शक्य नसेल, अशाच वेळीं फक्त कलम ४९ मधील (इ) आणि (ऋ) पोटकलमांत अन्तर्भूत होणारे प्रश्न मध्यवर्ती कार्यकारी मंडळाला आपल्या जबाबदारीवर सोडविण्याचा अधिकार आहे.

## ब–संघांच्या स्थानिक सत्तेची घटना.

## प्रकरण १०.

### सांघिक-परिषदा (संघांच्या परिषदा).

(५३) सांघिक-परिषदांची रचना पुढीलप्रमाणें आहे.

(अ) प्रादेशिक (इलाखा) परिषदा—यांत नगरसंघांचे व जिल्हापरिषदांचे प्रतिनिधी असतात. या प्रतिनिधींच्या निवडणुकीचें प्रमाण २५००० रहिवाश्यांस एक याप्रमाणें असतें. याखेरीज ५००० मतदारांस एक याप्रमाणें शहरांचे प्रतिनिधी असतात. या सर्व प्रतिनिधींच्या संख्येची कमाल-मर्यादा ५०० आहे.

जर प्रांतिक परिषदेचें अधिवेशन प्रादेशिक-परिषदेपूर्वीं नुकतेंच झालें असेल तर त्याच परिषदेचे प्रतिनिधी वरील प्रमाणांत प्रादेशिक-परिषदेकरितां घेतल्यास चालेल.

(आ) प्रांतिक परिषदा—या परिषदांतून नगरसंघ आणि ग्रामगणां(व्होलॉस्ट–खेड्यांचा समूह)ची परिषद्

यांचे १०००० रहिवाश्यांस एक या प्रमाणांत आणि शहरांचे २००० मतदारांस एक या प्रमाणांत प्रतिनिधी घेतले जातात. या परिषदेच्या प्रतिनिधींची कमालमर्यादा ३०० आहे. जर प्रांतिक परिषदेपूर्वीं नुकतेंच जिल्हासंघांच्या परिषदेचें अधिवेशन झालें असेल तर प्रांतिक परिषदेच्या प्रतिनिधींची निवड याच तत्त्वांवर ग्रामगणांच्या परिषदेच्या ऐवजीं जिल्हा-परिषद् करिते.

(इ) जिल्हा-परिषदा—यांत ग्रामसंघांचे १००० रहिवाश्यांस एक या प्रमाणांत प्रतिनिधी असतात. यांची कमालमर्यादा प्रत्येक जिल्ह्यास ३०० ही आहे.

(ई) ग्रामगण-परिषदा—यांत सर्व ग्रामसंघांचे प्रतिनिधी असून त्यांचें प्रमाण संघाच्या दहा सभासदांस एक प्रतिनिधि असें असतें.

टीप १—जिल्हा-परिषदांमध्यें १०००० पेक्षां अधिक वस्ती नसलेल्या नगरांचे संघ प्रतिनिधी पाठवितात. १०००० पेक्षां कमी वस्ती असलेल्या ग्रामांचे संघ जिल्हापरिषदेस प्रतिनिधी पाठविण्याकरितां एकत्र जमतात.

टीप २—ज्या ग्रामसंघांमध्यें १० पेक्षां कमी सभासद असतील ते ग्रामसंघ ग्रामगणपरिषदेस एक प्रतिनिधि पाठवितात.

(५४) संघ-परिषदा भरविण्याचें काम सांघिक सत्तेच्या कार्यकारी घटकाकडे म्हणजे कार्यकारी-मंडळाकडे असतें. हें कारभारी-मंडळ आपण होऊन अगर स्थानिक-संघांच्या मागणीवरून या परिषदा भरवितें. एखाद्या वस्तींतील संघांच्या मागणीवरून परिषद् भरवावयाची तर मागणी करणाऱ्या संघांकडे त्या वस्तींतील लोकसंख्येपैकीं निदान एकतृतीयांश लोकसंख्येचें प्रतिनिधित्व असलें पाहिजे. कांहीं झालें तरी प्रादेशिक-परिषद् वर्षांतून दोन वेळां, जिल्हा व प्रांतिकपरिषद् तीन महिन्यांतून एक वेळ, आणि ग्राम-गण-परिषद् महिन्यांतून एक वेळ भरविलीच पाहिजे.

(५५) प्रत्येक संघपरिषद् ( प्रादेशिक, प्रांतिक, जिल्हा आणि ग्रामगण ) आपलें कार्यकारी मंडळ निवडते. या मंडळांतील सभासदांची संख्या (अ) प्रादेशिक व प्रांतिक मंडळांत २५ (आ) जिल्हा मंडळांत २० (इ) आणि ग्रामगण-मंडळांत १० यापेक्षां अधिक नसते. कार्यकारी-मंडळ आपणास निवडून देणाऱ्या परिषदेस जबाबदार असतें.

(५६) प्रत्येक संघपरिषद् (प्रादेशिक, प्रांतिक, जिल्हा अथवा ग्रामगण) तिला कायद्यानें मिळालेल्या अधिकाराच्या बाबतींत आपआपल्या कार्यक्षेत्रांत ( प्रदेशांत ) पूर्णपणें मुखत्यार ( वरिष्ठ सत्ता ) असते. संघपरिषदेच्या दोन अधिवेशनांच्या मध्यंतरीं ही सत्ता तिच्या कार्यकारी मंडळाच्या हातीं असते.

# प्रकरण ११.

## प्रतिनिधि-संघ.

(५७) प्रतिनिधि-संघांची निवडणूक खालीं दिल्याप्रमाणें होते.

(अ) शहरांत—१००० रहिवाशांस एक प्रतिनिधि या प्रमाणांत. नगरसंघ-सभासदांची संख्या कमींत कमी ५० व जास्तींत जास्त १०० असते.

(आ) खेड्यापाड्यांत ( मळा, वाडी, खेडें, छावणी व दहा हजारांपेक्षां कमी लोकवस्तीचीं लहान लहान शहरें यांत )—१०० रहिवाश्यांस एक प्रतिनिधि या प्रमाणांत. प्रत्येक ठिकाणीं कमींत कमी ३ व जास्तींत जास्त ५० सभासद असतात. प्रतिनिधींची मुदत तीन महिन्यांची असते.

टीप—खेड्यापाड्यांत, शक्य असेल तेव्हां, मतदारांच्या सर्वसाधारण सभेनें स्वतः राज्यव्यवस्थेसंबंधीं प्रश्न सोडवावेत.

(५८) नेहमींचीं कामें करण्यासाठीं प्रत्येक प्रतिनिधि-संघ आपलें कार्यकारी मंडळ निवडतो. खेडेगांवांतील मंडळांत पांचापेक्षां अधिक सभासद नसतात. शहरांतील मंडळांत ५० सभासदांस एक याप्रमाणें प्रतिनिधी असतात; मात्र या शहरांतील कार्यकारी मंडळांत कमींत कमी ३ व जास्तींत जास्त २५ सभासद असतात. ( पेट्रोग्राड व मास्को या ठिकाणीं कमाल मर्यादा ४० आहे. ) ज्या संघाकडून कार्यकारी मंडळ निवडलें गेलें असेल, त्या संघास तें मंडळ जबाबदार असतें.

(५९) प्रतिनिधिसंघाची बैठक कार्यकारी मंडळ आपण होऊन अगर संघसभासदांपैकीं किमानपक्षीं निम्या सभासदांकडून मागणी झाल्यास भरवितें. संघाची बैठक शहरांमध्यें आठवड्यांतून निदान एकदां व खेडेगांवीं आठवड्यांतून दोनदां भरते.

(६०) हे संघ व ५७ कलमाच्या टीपेंत सांगितल्याप्रमाणें मतदारांची सभा जमल्यास ती, आपल्या अधिकाराच्या मर्यादेंत, आपआपल्या वस्तींत पूर्ण मुखत्यार ( वरिष्ठ सत्ता ) आहेत.

# प्रकरण १२.

## स्थानिक-संघांचे अधिकार.

(६१) ( प्रादेशिक, प्रांतिक, जिल्हा अगर ग्रामगण ) संघांचीं अधिकारिमंडळें व प्रतिनिधिसंघ यांस पुढें दिलेले विशेष हक्क आहेत.

(अ) लगतच्या वरिष्ठ मंडळानें केलेल्या हुकुमांची बजावणी करणें.

(आ) आपल्या प्रदेशांतील सांस्कृतिक व सांपत्तिक स्थिति सुधारण्याकरितां सर्व प्रकारचे योग्य ते उपाय योजणें.

(इ) फक्त स्थानिक महत्त्वाचेच असतील असे सर्व प्रश्न सोडविणें.

(ई) आपल्या प्रदेशांतील संघांच्या कार्यांत एकसूत्रीपणा आणणें.

(६२) संघपरिपदा व त्यांचीं कार्यकारी मंडळें यांनां आपल्या वस्तींतील संघांच्या कार्याचें नियमन करण्याचा अधिकार आहे. ( म्हणजे प्रादेशिक परिपदेचें तिच्या हद्दींतील सर्व संघांवर नियंत्रण असतें; प्रांतांतील ज्या नगरसंघांचा जिल्हापरिपदेच्या घटनेमध्यें समावेश होत नाहीं ते नगरसंघ वगळून बाकी सर्व संघांवर प्रांतिक परिपदेचा ताबा असतो; इत्यादि. ) प्रादेशिक-परिपद्, प्रांतिक-परिपद् व त्यांचीं कार्यकारी मंडळें यांस आपआपल्या क्षेत्रांतील संघांचे निकाल रद्द करण्याचा जादा अधिकार आहे. मात्र त्यांनीं महत्त्वाच्या बाबतींत या गोष्टी मध्यवर्ती सांघिक सत्तेस कळविल्या पाहिजेत.

(६३) प्रत्येक नगरसंघास व ग्रामसंघास आणि प्रत्येक प्रादेशिक, प्रांतिक, जिल्हा व ग्रामगण कार्यकारी मंडळास राज्यकारभाराच्या प्रत्येक खात्यांतील कामकाजासाठीं स्वतंत्र कचेरी व चिटणीस दिलेला असतो.

# भाग चौथा.

## निवडणुकीचे हक्क.

## प्रकरण १३ वें.

(६४) निवडणुकीच्या दिवशीं अठरावें वर्ष पूर्ण झालें आहे अशा रशियन-सांघिक-लोकशाहीच्या प्रत्येक नागरिकास स्त्री-पुरुष, उपास्य, राष्ट्र, किंवा वस्ती, एतद्विषयक भेदांकडे लक्ष न देतां मत देण्याचा व निवडून येण्याचा हक्क आहे. मात्र तो पुढें दिलेल्या कोणत्या तरी वर्गांत मोडला पाहिजे.

(अ) समाजाला उपयुक्त अशीं उत्पादक कामें करून जे आपला उदरनिर्वाह करितात ते सर्व लोक; घरगुती कामें करून वरील लोकांनां उत्पादक कामें करण्यास सवड देतात, अशीं सर्व माणसें; कारखाने, व्यापार, कृपिकर्म इत्यादि उद्योगांतील सर्व प्रकारचे मजूर व नोकर; शेतकरी लोक; व आपल्या स्वतःसाठीं नफा काढण्याच्या हेतूनें दुसऱ्यांनां चाकरीवर ठेवीत नाहींत असे शेतकी काम करणारे कोसॅक लोक.

(आ) सांघिक-लोकशाहीच्या लष्करांतील व आरमारांतील सैनिक.

(इ) वरील पुखाद्या सदरांत येणारे परंतु काम करण्यास असमर्थ झालेले नागरिक.

टीप १–स्थानिक संघाला मध्यवर्ती सत्तेची संमति घेऊन या कलमांत ठरविलेली कायदेशीर वयोमर्यादा कमी करितां येईल.

टीप २–रशियांतील नागरिकाप्रमाणेंच कलम (२०), भाग २ प्रकरण ५ यांत नमूद केलेल्या लोकांसहि निवडणुकीचा हक्क आहे.

(६५) खालीं दिलेल्या लोकांस, जरी ते वर दिलेल्या सदरांत येणारे असले तरी मत देण्याचा व निवडून येण्याचा हक्क नाहीं.

(अ) नफ्याकरितां दुसऱ्यास चाकरीवर ठेवणारे.

(आ) स्वतःच्या अंगमेहनतीशिवाय मिळणाऱ्या पैशावर, म्हणजे भांडवलावरील व्याजावर, तसेंच व्यापार-धंदा अथवा जमीन जुमला यांतून येणाऱ्या आयत्या उत्पन्नावर उपजीविका करणारे.

(इ) खाजगी रीतीनें धंदा करणारे अडते, मध्यस्थ वगैरे.

(ई) कोणत्याहि संप्रदायांतील सर्व दर्जाचे धर्मोपदेशक व भिक्षु.

(उ) जुन्या पोलिस खात्यांतील नोकर व त्यांचे हस्तक, जादा पोलिस, गुप्त पोलिस व रशियाच्या जुन्या राजघराण्यांतील लोक.

(ऊ) कायद्यानें ज्यांस वेडे, डोकें बिघडलेले, अथवा जन्माचे वेडसर म्हणून ठरविलें आहे ते लोक.

(ऋ) घाणेरड्या तऱ्हेचे अथवा पैशाच्या लालचीचे गुन्हे केल्यामुळें शिक्षा मिळालेले लोक. ( कायद्यानें किंवा न्यायासनाच्या हुकुमानें ठरविलेल्या मुदतीपर्यंतच यांची अपात्रता असते ).

## प्रकरण १४.

## निवडणुकीची पद्धति.

(६६) निवडणुकी स्थानिक संघ मुक्रर करील त्या दिवशीं ठराविक पद्धतीप्रमाणें केल्या जातात.

(६७) निवडणुकीकरितां नेमलेलें निवडणूक-पंचमंडळ व स्थानिक संघाचा एक प्रतिनिधि यांचे समोर निवडणुकी होतात.

(६८) जेव्हां स्थानिक संघाच्या प्रतिनिधीस हजर राहतां येणें शक्य नसेल तेव्हां त्याच्या जागीं निवडणुकीकरितां नेमलेल्या पंच-मंडळाचा अध्यक्ष काम करितो व त्याच्या गैरहजिरींत निवडणूकसभेचा अध्यक्ष काम करितो.

(६९) मतें घेण्याच्या वेळीं घडणाऱ्या गोष्टींचा व निवडणुकीच्या निकालाचा एक अहवाल तयार करण्यांत येतो व

त्यावर निवडणुकीकरितां नेमलेले पंच व स्थानिक-संघाचा प्रतिनिधि यांच्या सल्ला घेण्यांत येतात.

(७०) निवडणूकपद्धतीचा तपशील आणि धंदे-संघ व औद्योगिक मंडळें यांनीं निवडणुकींत कितपत व कशा प्रकारें भाग घ्यावा या संबंधाचा तपशील स्थानिक-संघ मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळाच्या सूचनांनुसार ठरवितात.

## प्रकरण १५.

### निवडणुकी तपासणें व रद्द करणें व प्रतिनिधींस काढून टाकणें.

(७१) कोणत्याहि निवडणुकीसंबंधीं सर्व कागदपत्र तत्संबद्ध संघाच्या स्वाधीन केले जातात.

(७२) निवडणुकीचे निकाल संघानें नेमलेल्या एका मंडळाकडून ( तपासनीस मंडळाकडून ) तपासले जातात.

(७३) हें ( तपासनीस ) मंडळ आपल्या चौकशीचा निकाल संघास कळवितें.

(७४) ज्या निवडणुकीसंबंधीं वाद उत्पन्न होईल तिचा खरेखोटेपणा संघाकडून ठरतो.

(७५) एखाद्या उमेदवाराची निवडणूक खोटी ठरविण्यांत आल्यास संघ दुसरी निवडणूक करण्याकरितां हुकुम करितो.

(७६) जर एखाद्या निवडणुकींत मुळापासूनच गैरकायदेशीरपणा दिसून आला तर ती निवडणूक रद्द करण्याचा प्रश्न लगतचा वरिष्ठ संघ सोडवितो.

(७७) निवडणुकीच्या बाबतींत मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ हें अपील करण्याची अखेरची कचेरी आहे.

(७८) निवडणूक करणाऱ्या लोकांस आपल्या प्रतिनिधीस वाटेल त्यावेळीं काढून टाकण्याचा व नवी निवडणूक करण्याचा अधिकार आहे.

# भाग ५.

## प्रकरण १६.

### रशियन-सांधिक-लोकशाहीचें सांपत्तिक धोरण.

(७९) अप्रतिबंध कामगार-सत्ता असलेल्या या संक्रमण-कालांत रशियन सांधिक लोकशाहीचें सांपत्तिक धोरण, भांडवलवाल्यांचें सर्वस्व काढून घेऊन संपत्तीचें उत्पादन आणि विभागणी या दोन्ही बाबतींत आपल्या सर्व नागरिकांमध्यें समता राखण्यास अनुकूल अशी परिस्थिति उत्पन्न करण्याचें आहे. याकरितां ही लोकशाही समाजाच्या सामान्य आणि विशिष्ट गरजा भागविण्याकरितां जरूर असणारे उत्पन्नाचे सर्व मार्ग लोकांच्या प्रतिनिधींच्या ताब्यांत देत आहे व या बाबतींत मालमत्तेवरील खासगी हक्कांचें अतिक्रमण करण्यास ती मागेंपुढें पहात नाहीं.

(८०) लोकशाहीचें उत्पन्न आणि खर्च यांचें एक राष्ट्रीय अंदाजपत्रक तयार करण्यांत येतें.

(८१) अखिल-रशिया-सांधिक-परिषद् अथवा मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ हें करांसंबंधीं नियम ठरवितें व एकंदर उत्पन्नाची मध्यवर्ती सरकार आणि स्थानिक-संघ यांचे दरम्यान योग्य प्रमाणानें विभागणी करितें.

(८२) स्थानिक संघांनीं फक्त आपल्या स्थानिक गरजांपुरत्याच उत्पन्नाच्या बाबी ठरवावयाच्या असतात. ज्या सर्वसामान्य व राष्ट्रीय स्वरूपाच्या गरजा असतील त्यांजसाठीं मध्यवर्ती कोशांतून पैसे पुरविले जातात.

(८३) (स्थानिक) संघांनां मध्यवर्ती खजिन्यांतून पैका पाहिजे असल्यास, एक तर त्यांनीं मध्यवर्ती सरकाराच्या जमाखर्चांत आपल्या नांवचीं खातीं उघडलीं पाहिजेत, अथवा खात्यावांचून पैसा देण्याविषयीं मध्यवर्ती सरकाराचा विशेष हुकूम मिळविला पाहिजे.

(८४) राष्ट्रीय स्वरूपाच्या कामांकरितां मध्यवर्ती खजिन्यांतून कोणत्याहि संघाला ज्या रकमा लागतील त्या योग्य लोकमंत्र्याच्या आज्ञेवरून त्या संघाच्या स्वाधीन करण्यांत येतात.

(८५) मध्यवर्ती खजिन्यांतून स्थानिक-संघांनां ज्या रकमा राष्ट्रीय कामाकरितां देण्यांत येतील किंवा केवळ स्थानिक गरजा भागविण्याकरितां ज्या रकमा ते मध्यवर्ती खजिन्यांतून ( कर्जाऊ ) घेतील, त्या रकमा अंदाजपत्रकांतील कार्यक्रमाप्रमाणें जशाच्या तशा खर्च करण्यांत आल्या पाहिजेत. त्यांचा विनियोग ठरलेल्या कार्याबाहेर दुसऱ्या एखाद्या कार्याकडे करणें झाल्यास, त्याकरितां मध्यवर्ती कार्यकारी मंडळाची अथवा लोकमंत्रिसभेची अलाहिदा परवानगी घेण्यांत यावी.

(८६) स्थानिक-संघ आपआपल्या स्थानिक गरजांपुरतीं षाण्मासिक व वार्षिक अंदाजपत्रकें तयार करितात. ग्राम-संघ, ग्रामगण-संघ (परिषदा ?) व जिल्हा-परिषदेमध्यें भाग घेणारे नगर-संघ व जिल्हा-संघ ( परिषदा ? ) यांच्या अंदाजपत्रकासाठीं त्यांच्या प्रांतिक आणि प्रादेशिक परिषदांकडून किंवा प्रादेशिक कार्यकारी मंडळाकडून मंजुरी घेण्यांत येते. नगर-संघ, प्रांत-संघ, ( परिषदा ? ) व प्रादेशिक-संघ ( परिषदा ? ) यांच्या अंदाजपत्रकांस अखिल रशिया-मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळाकडून आणि लोक-मंत्रि-सभेकडून मंजुरी मिळविण्यांत येते.

(८७) अंदाजपत्रकांत ज्या खर्चासाठीं तरतूद केली नसेल किंवा तरतूद केली असून अंदाजी रक्कम अपुरी पडत

असेल तो खर्च भागविण्यास लागणारी रक्कम मिळविण्याकरितां संघांनीं योग्य लोकमंत्र्याकडे अर्ज करावे.

(८८) स्थानिक उत्पन्न जर स्थानिक गरजा भागविण्यापुरतें नसेल तर मध्यवर्ति-कार्यकारी-मंडळ किंवा लोकमंत्रि-सभा यांस स्थानिक-संघांस निकडीच्या खर्चासाठीं मध्यवर्ती खजिन्यांतून मदत किंवा कर्ज देण्याचा अधिकार आहे.

वोल्शेव्हिझम उर्फ कामकरी व शेतकरी यांची सत्ता इच्या घटनेचा इतिहास विशेष देण्याचें कारण हेंच कीं हिंदुस्थानच्या सरहद्दीवर हें संकट येऊं पाहात आहे, आणि यासाठीं याविषयीं लोकांत विशेष माहिती असणें अवश्य आहे. हिंदुस्थानांतील कांग्रेसनें ब्रिटिश मजूरपक्षाशीं गट्टी जोडण्याचा प्रयत्न चालविला आहे आणि ब्रिटिश कामगारवर्गांत वोल्शेव्हिझमच्या तत्त्वांचा प्रसार होत आहे. वोल्शेव्हिझमचीं अनेक ध्येयें जवळ जवळ अशक्य आहेत. हा प्रश्न अर्थशास्त्रीय आहे म्हणून येथें वादविवाद करणें अनुचित होईल. सामान्य सुशिक्षित मनुष्याचें हेंच कर्तव्य आहे कीं वोल्शेव्हिकांविषयीं आणि त्यांच्या मतांविषयीं पूर्ण विचार केल्याशिवाय आणि संपूर्ण माहिती मिळविल्याशिवाय स्तुतिपाठक अनुयायी, निंदक अगर द्वेष्टे बनूं नये; आणि यासाठीं त्यांच्या समाजघटनेच्या तत्त्वांची सविस्तर माहिती देणें आम्हांस अवश्य वाटलें. शिवाय जी चळवळ सर्व जगास हालवून सोडण्यासाठीं बद्धपरिकर होत आहे ती हिंदुस्थानांतील कांहीं विचारांवर परिणाम केल्याशिवाय रहाणार नाहीं. जगांत उत्पन्न होणाऱ्या तत्त्वांत पूर्णपणें बरोबर किंवा पूर्णपणें चुकलेलें असें कांहींच नसतें. यामुळें ज्या कांहीं गोष्टी आपणांस अयोग्य किंवा अशक्य म्हणून वाटत असतील त्या कांहीं बदललेल्या स्वरूपांत योग्य किंवा शक्यहि होतील. हिंदुस्थानामध्यें शेंकडा ९५ लोक जेथें निरक्षर आहेत तेथें ते सत्तारूढ होतील अशी अपेक्षा करणें व्यर्थ होय. अगदींच निद्रिस्त लोक थोडे बहुत जागे होण्यास आणि आपणहि चार पायांचे पशू नसून दोन पायांचीं माणसें आहोंत असें भासविण्यापुरती त्यांच्या ठिकाणीं जागृति होण्यास देखील वोल्शेव्हिझमसारख्या देशाबाहेर कितीहि चळवळी झाल्या तरी त्या कांहीं परिणामकारक होतील किंवा नाहीं याचा संशयच आहे.

## प्रकरण ३ रें.

## हिंदु आणि जग.

हिंदुस्थान आणि जग यांचा परस्परसंबंध लक्षांत येण्यासाठीं ज्या गोष्टींची माहिती आपणास पाहिजे त्यांत (१) हिंदुस्थानचें जगापासून पृथक्त्व आणि त्याचा जगाशीं संबंध व (२) हिंदुसमाज आणि त्याचें पृथक्त्व आणि संबंध या दोन गोष्टी मोडतात. या दोन्ही गोष्टी समजण्यासाठीं हिंदुस्थान आणि हिंदु या शब्दांचे अर्थ समजले पाहिजेत. हिंदुस्थानाची आज ब्रिटिश हिंदुस्थान आणि ब्रिटिश छत्राखालील संस्थानें ही राजकीय व्याख्या घेऊन, हिंदुस्थान आणि जग यांचा राजकीय संबंध या विषयावर विवेचन केलेंच आहे. आतां हिंदुजनतेविषयीं विचार करूं.

**हिंदू आणि हिंदू नसलेले इतर लोकः**—यांतील भेद काढावयाचा हें शास्त्रीय दृष्ट्या बरेंच कठीण काम आहे. शास्त्रीयसंज्ञा असतात त्या एका शब्दांत अनेक अर्थ व्यक्त करण्यासाठीं असतात. जगांतील निरनिराळ्या लोकांतील सादृश्य आणि भेद यांचें ज्ञान हें ज्ञेय आहे. सादृश्य एका शब्दांत व्यक्त करण्यासाठीं संज्ञा बनतात. मनुष्यसमूहांत जें एकत्व उत्पन्न होतें तें कशामुळें होतें हें जाणणें अवश्य आहे. समाजाची स्थिति फार गुंतागुंतीची आहे तिचें सूक्ष्म ज्ञान फारच थोड्यांस आहे. यामुळें व्याख्या करणारांचा हट्टवाद हिंदु या शब्दाची व्याख्या करतांना जेथें तेथें दृष्टीस पडतो. ज्यास हिंदूच्या समाजांतून फुटून जावें असें वाटेल तो हिंदु या शब्दाची व्याख्या संकुचित आणि प्रसंगीं अपमानकारक करितो, आणि ज्यास हिंदुसमाजांत आपला अंतर्भाव असावा असें वाटतें तो तीच व्याख्या विस्तृत करितो. शिवाय ज्यांस आपण हिंदू आहोंत याबद्दल अभिमान वाटतो आणि हिंदु हें नांव गौरवाचें वाटतें आणि तें अभिधान आपणांस अप्रिय असलेल्या भिन्नाचारयुक्त मनुष्यसमूहास लावावें असें वाटत नाहीं ते देखील हिंदु या शब्दाची व्याख्या फार संकुचित करितात. हिंदु शब्दाचा इतिहास पाहातां सिंधूच्या आसपासच्या लोकांखेरीज इतर ठिकाणच्या लोकांपैकीं कोणाचीच मालकी या शब्दावर नाहीं किंवा सिंधूपलीकडील सर्वच लोकांची आहे. आपलें सामाजिक स्थिति हें ज्ञेय आहे. जगांतील लोकांचें वर्गीकरण शास्त्रदृष्ट्या केवळ सादृश्यासादृश्यावर करावें या हेतूनें या शब्दाची व्याख्या करण्याचा प्रामाणिक प्रयत्न झाला नसल्यानें आणि व्याख्या करतांना समूहविषयक आकांक्षा आणि द्वेष हीं व्यक्त होत असल्यामुळें या शब्दास आम्हीं एक अर्थ देण्याचा प्रयत्न करणें म्हणजे विशिष्ट एका पक्षास जाऊन मिळणें होय. या अपवादाची अडचण व्याख्या करतांना उत्पन्न होते. एकानें एक व्याख्या करावी आणि वर्गीकरण त्या व्याख्येला जुळेल असें करावें आणि दुसऱ्यानें व्याख्या निराळी करावी आणि वर्गीकरण निराळें करावें या तऱ्हेची पद्धति शास्त्रीय विवेचनास पोषक नाहीं.

लोकांमध्यें व्याख्या करतांना ज्या भावना उत्पन्न होतात, त्या भावनांमुळें व्याख्येंत होणारे फरक दाखविण्यासाठीं कांहीं उदाहरणें येथें देतों.

१ ज्या जैनांस आपण हिंदूंपेक्षां निराळें व्हावें असें वाटतें ते हिंदु या शब्दाची संकुचित व्याख्या करितात; आणि त्या व्याख्येंत आपण नाहीं असें भासवितात. हीच गोष्ट शीखांस लागू आहे. ज्यांस आपण हिंदू असावेसें वाटतें ते शीख व जैन निराळी व्याख्या करितात.

२ ज्या इंग्रजांस समाजांतील बहुजनसमाजापासून भिन्न अशा अल्पसंख्याकांनां आपणांकडे ओढावें आणि बहुजनसमाजावर राज्य करण्यास थोडासा खुलविलेला एक अल्पसंख्याकांचा पक्ष आपल्याकडे ओढला जावा असें वाटत असेल ते संकुचित व्याख्या करितात; आणि बऱ्याच लोकांनां हिंदूंच्या बाहेर काढतात. ही इंग्रजांची वृत्ति म्हणून जी सांगितली ती कांहीं विशिष्ट व्यक्तींसंबंधानें आहे. सरकारी वृत्ति यासंबंधानें पूर्णपणें निश्चयात्मक नाहीं; आणि या संबंधानें सरकारी धोरण बरेंचसें तटस्थपणाचें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

सेन्सस रिपोर्टांत ही अडचण भासून जैन, शीख, ब्राह्मो, आर्यसमाजी यांचे आंकडे पृथक् मानण्यासाठीं पण हिंदूंपासून त्यांचें पृथक्त्व नाहीं असें दाखविण्यासाठीं इंडोआर्यन रिलिजन यामध्यें सर्वांचा समावेश केला आहे.

ज्या लोकांस विशेष आचारसंप्रदायाचा, ग्रंथाचा अगर तत्त्वांचा अभिमान असतो ती मंडळी आपलें मतवैशिष्ट्य हिंदुत्वाच्या लक्षणांत घालतात. महानुभाव, जैन इत्यादि हिंदू नाहींत असें म्हणणारे ग्रंथकार याच विशिष्ट भावनेनें प्रेरित होतात. असो. सध्यां आपण हिंदु हा शब्द सर्वांस समजतो असें धरून चालूं.

**मानववंशविषयक आणि सांस्कृतिक संबंधः—** भारतीयांचा इतर जगाशीं संबंध अनेक प्रकारचा आहे. कांहीं अंशीं हा संबंध रक्ताचा आहे. म्हणजे वेद हे ज्या लोकांच्या पूर्वजांनीं लिहिले त्या लोकांचे पूर्वज इतर देशांतील लोकांच्या पूर्वजांचे भाईबंद होते. शिवाय आपल्या देशांतील लोकांचें परदेशगमन अनेक शतकें होत असून त्या इतरत्र गेलेल्या लोकांनीं तद्देशीयांत आपला अंतर्भाव करून घेतला. यूरोपांत आणि अमेरिकेंत जे जिप्सी म्हणून लोक आहेत ते तर याच देशांतले. गेल्या पाऊणशें वर्षांत लाखों लोक परदेशीं जाऊन तेथें वसती करून राहिले. त्या सर्वांचा हिशोब घेतल्यास आपल्या रक्ताचा हिंदुस्थानाबाहेर संबंध काय आहे हें लक्षांत येतें.

आपल्या देशांतील संस्कृतीचा प्रसार देशाबाहेर पाहिला तर तो देखील पुष्कळच झाला आहे. हिंदुस्थानाबाहेर कांहीं देशच्या देश बौद्ध झाले आहेत, आणि कांहीं ठिकाणीं शैव संप्रदाय अजून चालू आहे. कांहीं ठिकाणीं ब्राह्मणहि आहेत. या सर्व गोष्टींचें वर्णन पुढें येईलच. संस्कृतीचा प्रसार माणसें गेल्याशिवाय होत नाहीं म्हणून जेथें आपली संस्कृति पसरली तेथें माणसांचीहि वसती झाली आणि पुढें तीं माणसें इतर जनतेंत मिसळून गेलीं असावींत असें धरण्यास हरकत नाहीं. यासाठीं आपला आणि इतर जगाचा संबंध शोधतांना आजचें परदेशगमन आणि पूर्वकालीं झालेला संस्कृतिप्रसार या दोन्ही गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत.

भारतीय संस्कृतिप्रसाराचें सर्व जगांतील मनुष्यसमूहाच्या आयुष्यक्रमांत स्थान शोधण्यासाठीं प्रथमं सर्व मनुष्यसमूहाच्या हालचालींची आपणांस स्थूल माहिती पाहिजे. ही आपणांस थोडी बहुत अनुमानानें अवगत आहे. जगांतील मनुष्यसमूहाचा एकंदर कार्यक्रम समजला म्हणजे भारतीयांचें जगाच्या इतिहासांत स्थान अधिक स्पष्ट होईल. या हालचाली शोधण्याचें काम मानवशास्त्रज्ञांचें आहे.

मानवशास्त्रज्ञांचा मुख्य विषय मानवेतिहास होय. त्यांनीं व इतर शास्त्रांच्या अभ्यासकांनीं आजपर्यंत जे परिश्रम केले त्यांवरून त्यांनां मानवेतिहासविषयक कांहीं गोष्टी समजल्या आहेत. निरनिराळ्या कालांच्या परिस्थितींची सर्व अंगें एकदम समजत नाहींत तथापि जी कांहीं माहिती मिळते तीवरून जगाचा एकंदर इतिहास कसा झाला असेल याविषयीं कांहीं कल्पना बसवितां येते. समाजशास्त्रज्ञ आणि मानवेतिहासज्ञ मनुष्यजातीच्या एकंदर इतिहासाविषयीं ज्या कांहीं गोष्टी मनांत बाळगितात त्या येणेंप्रमाणें:—

मनुष्यजाति ही कोणत्या तरी मनुष्यकल्प प्राण्यांत बदल होत होत कोणत्या तरी कालीं आणि कोणत्या तरी स्थळीं तयार झाली.

मनुष्यप्राण्याची जगावर वसति जी कित्येक हजारों किंवा लाखों वर्षें असेल त्या अवधींत एकसारखी वाढत आहे. मूळचीं माणसें फार तर कांहीं हजार असतील आणि त्यांचा वंशविस्तार होत होत आज दीडशें कोटींवर वाढ झाली आहे.

मानवी संस्कृतीच्या जुन्या कालीं म्हणजे सांस्कृतिक प्रगति अल्प असतां मानवी जातीच्या व्यक्तींचें इतस्ततः भ्रमण होऊन मानवजातीच्या अनेक म्हणजे पुष्कळच लहान लहान जमाती तयार झाल्या. याप्रमाणें जे भ्रमण होऊन वियुक्त होत गेले ते बहुतेक एकटे पडले, त्यांचा व इतरांचा संबंध बराच कमी कमी राहात गेला.

संस्कृतीच्या इतिहासांत बऱ्याच उत्तरकालीं हे मानवी समुदाय जे एकाकी आणि एकमेकांकडून जवळ जवळ अस्पृष्ट अशा स्थितींत पडले होते ते आतां अधिक दळणवळण, अधिक परस्परसहवास, ज्ञातींचें संघीकरण आणि परस्परविवाह यांच्याकडे प्रवृत्ति दाखवीत आहेत.

मनुष्य पोट भरण्याकरितां स्थलांतर करितो. तो केव्हां केव्हां एखाद्या ठिकाणीं बरींच वर्षें किंवा कायमचा राहातो. हें त्याचें विवक्षित ठिकाणीं राहाणें त्याच्या त्या ठिकाणच्या सांपत्तिक स्थितीचा उपयोग करण्याच्या शक्तीवर अवलंबून असतें व हीं शक्ति सामान्यतः तो ज्या सांस्कृतिक परिस्थितींत असेल तीवर अवलंबून असते, आणि हीच सृष्ट्युपभोगशक्ति त्याची भविष्यकालीन संस्कृति निश्चित करिते.

मनुष्यजातीचें ज्या वेळीं निरनिराळ्या दिशांनीं स्थलांतर होत होतें त्या वेळीं त्यांच्यामध्यें शारीरिक व भाषाविषयक

अनेक भेद उत्पन्न झाले; आणि यामुळें अनेक मानववंश निर्माण झाले. एकमेकांशीं दळणवळण, अधिक परस्परसहवास, ज्ञातींचें संघीकरण आणि परस्परविवाह यांच्या कालांत स्थलांतराच्या कालांत उत्पन्न झालेले शारीरिक आणि भाषाविषयक भेद कमी कमी होत जात आहेत.

मनुष्यसमूहांचें पृथक्त्व आणि एकाकित्व हीं इतर जातींशीं समागमामुळें आणि पूर्वीपेक्षां अधिक मोठे मनुष्यसमुच्चय बनल्यामुळें मोडत चाललीं आहेत.

मोठ्या समुच्चयाची भावना अनेक कारणांनीं जन्मास आली आहे; आणि त्या अनेक कारणांपैकीं प्रचारशील उपासनासंप्रदाय आणि शासनसंस्था हीं दोन महत्त्वाचीं होत.

लहान लहान जाती किंवा संस्थानें यांच्या संघीकरणामुळें मोठमोठ्या शासनसंस्था तयार होत आहेत.

मोठ्या शासनसंस्था उत्पन्न करणारें हें जें संघीकरण होई तें अनेक पद्धतींनीं जन्मास येई. एक जाति दुसऱ्या जातीस जिंकी आणि त्या जातीचा आपणांतच समावेश करून घेई. कधीं कधीं एक बलवान् राष्ट्र इतर अनेक राष्ट्रांस जिंकून त्यांस एकस्वरूपता आणी. कधीं कधीं अनेक राष्ट्रें एका मोठ्या शत्रूच्या भीतीनें देखील एकीकृत होत आणि पुढें त्यांचे कायमचे संघहि बनत.

मनुष्यजातीचा प्रसार चोहोंकडे होऊन त्यांच्यामध्यें जे भेद उत्पन्न झाले त्या सर्व भेदांमध्यें भाषाभेद हा अत्यंत महत्त्वाचा आहे. तो प्रयाणाचा सूचक आहे. भाषेतील शब्दसमुच्चय प्रयाणमार्गाचे सूचक आहेत आणि अपभ्रंश कालाचे सूचक आहेत.

सर्व जगाचें भाषाचित्र येथें देण्यास अवकाश नाहीं तथापि एवढें सांगितलें पाहिजे कीं, हिंदुस्थानांतील द्राविडी आणि सरहद्दीजवळच्या कांहीं भाषा सोडून इतर सर्व भाषा संस्कृतसंभव आहेत; आणि यूरोपांतील बास्क, हंगेरियन, फिन, लॅप व तुर्की या भाषा सोडून सर्व भाषा संस्कृत भाषेशीं सगोत्र आहेत. अरबी, हिब्रू व तुर्कस्थानांतील कांहीं भाषा याहि सगोत्र आहेत. इराण, अफगाणिस्तान, काफरिस्तान व काश्मीर येथील भाषाहि संस्कृतशीं सगोत्र आहेत. अमेरिकेंतील इंडियनांच्या सर्व भाषा एकाच गोत्रांतील आहेत. बलुचिस्तानांतील ब्राहुइ भाषा द्राविडी भाषेशीं सगोत्र आहे. द्राविडी भाषांत तामिळ, तेलुगु, मल्याळी व कानडी या सुशिक्षितांच्या भाषा व गोंडीसारख्या अशिक्षितांच्या भाषा यांचा अंतर्भाव होतो. तुळुव व कोडगु ( कोडगी ) या सुशिक्षित व जंगली यांच्या सरहद्दीवरील लोकांच्या भाषा आहेत. द्राविडी भाषांचा संबंध कित्येकांकडून वायव्येकडील हंगेरियनसारख्या भाषांशीं व आग्नेयीकडील ऑस्ट्रेलियन देश्य भाषांशीं जोडण्यांत येतो. चिनी, जपानी यांचा संबंध कांहीं लोकांकडून अमेरिकन इंडियन लोकांच्या भाषांशीं जोडण्यांत आला आहे; तसाच पूर्वेकडील द्वीपकल्पांतील भाषांशीं देखील जोडण्यांत आला आहे. भारतीय संस्कृतीचें कार्य म्हटलें म्हणजे इराणी आणि यूरोपीय लोकांशीं संबद्ध अशी एक भाषा घेऊन तिची शास्त्रें व वाङ्मय यांच्या विकासानें जोपासना करून तिचें महत्त्व द्राविडी भाषांवर, पूर्वेकडील द्वीपकल्पांतील भाषांवर आणि त्याचप्रमाणें जावा, बलीसारख्या द्वैपायन भाषांवर स्थापन करणें हें होय.

अनागरांच्या अज्ञानामुळें मूळ भाषा भ्रष्ट होऊन निरनिराळ्या भाषांचा विकास होत असतां त्यांचा मूळ भाषेशीं संबंध जोडणें हें कार्य आणि भाषेचें महत्त्व भिन्न भाषा बोलणाऱ्या लोकांवर स्थापित करणें हें कार्य एकसारखें चालू राहून तिचा फिलिपाइनपर्यंत पगडा बसलेला दिसतो. भाषाप्रसार करणें या हेतूनेंच कार्य झालेलें नसून विचारांचा प्रसार करणें, दैवतांचा प्रसार करणें आणि राजसत्ता वाढविणें हें कार्य होत होतें आणि या सर्व कार्यांच्या योगानेंच भाषेचा प्रसार झाला.

हिंदूंची जी संस्कृति बनली ती एकाच जनतेच्या किंवा एकाच मानववंशाच्या श्रमाचें फल नसून आर्यन् आणि द्राविड या दोन्ही मानववंशांच्या परिश्रमाचें फल आहे. आणि या संस्कृतीचा प्रसार जो झाला तो निरनिराळ्या कालांत झाला त्यामुळें विविध जातींच्या संनिकर्षामुळें संस्कृतींत होणारा फरक चोहोंकडे सारखाच पसरला नाहीं. सीलोनमध्यें सिंहली जनतेंत ब्राह्मणांचें अस्तित्व दिसून येत नाहीं तर कांबोडिया उर्फ कांबोज या देशांत ब्राह्मण व शिवविष्णूसारख्या देवता देखील दिसून येतात. दक्षिणेंत उत्पन्न झालेल्या आचार्यांच्या विचाराचा परिणाम जरी उत्तरहिंदुस्थानांत दिसून येतो तरी तो पूर्वेकडील द्वीपकल्पांत दिसून येत नाहीं. भारतीय संस्कृतीच्या केंद्रापासून जितकें अधिक दूरत्व दिसून येतें तितका परकीय संस्कृतीचा परिणाम अधिकाधिक दिसून येतो.

अरबांनीं उत्पन्न केलेली मुसुलमानी संस्कृति ख्रिस्ती शकाच्या सहाव्या शतकांत उत्पन्न होऊन पुढील आठ शतकांत तिचा फैलाव चोहोंकडे झाला आणि तिच्या प्रभावानें पूर्वी आपल्या जवळ आलेले लोक अधिकाधिक अपसृष्ट बनले. पंधराव्या शतकाच्या अंतिमकालापासून किंवा सोळाव्या शतकाच्या प्रारंभापासून गेलीं चारशें वर्षें यूरोपीय संस्कृति हिंदु संस्कृतीचा आणि मुसुलमानी संस्कृतीचा चोहोंकडे संकोच करीत आहे.

मुसुलमानी संस्कृतीची छाप चोहोंकडे बसत चालली त्यावेळेस जे मुख्य फेरफार झाले त्यांत इतर लोकांस हिंदूंपासून अपसृष्ट करणारा फेरफार म्हटला म्हणजे ब्राह्मणी लिपीशीं संबद्ध अशा लिपी नाहींशा करून तेथें अरबी लिपीची किंवा तिच्या अपभ्रंशांची स्थापना करणें आणि अरबी शब्द

व फारसी शब्द निरनिराळ्या ठिकाणच्या देश्य भाषांत घुसडणें हा होय. हिंदुस्थानांत या पद्धतीनें हिंदीस फारसीचें स्वरूप दिलें, हिंदुस्थानीस उर्दु बनविली, मलयु भाषा व जावा येथील भाषा यांचें रूपांतर केलें आणि लखदिव मालदिव येथील मल्याळी भाषेचा एक निराळाच अपभ्रंश तयार केला.

पूर्वेकडील द्वीपकल्पामध्यें वर सांगितलेल्या संकोचकारणाशिवाय चिनी संस्कृतीचा विकास तेथील भारतीय संस्कृतीच्या संकोचास कारण होत आहे. फिलिपाइन्समध्यें स्पॅनिश लोकांनीं देशास जवळ जवळ पूर्णपणें ख्रिस्ती केलें आणि बऱ्याच लोकांवर स्पॅनिश भाषेचें दडपण घातलें. आतां अमेरिकन लोकांच्या ताब्यांत फिलिपाइन्स आल्यानंतर तेथील लोकांत इंग्रजी भाषेचा जारीनें प्रसार होत आहे आणि तेथील सर्व भाषा नष्ट होऊन सर्व लोकांची भाषा इंग्रजीच होईल असाहि संभव दिसत आहे. जुन्या भाषांचे पूर्वी केलेले कोश उघडून पाहून किंवा जीं कांहीं जुनीं गाणीं जतन करून ठेवलीं असतील तीं वाचून तेथील हिंदु संस्कृतीच्या अस्तित्वाची एखाद्दुसऱ्या संशोधकास आठवण होईल एवढेंच.

संस्कृत भाषेच्या प्रसाराबरोबर आणि त्या संस्कृतीच्या आवरणानें व्याप्त अशा राजांनीं केलेल्या विजयांबरोबर ज्या निरनिराळ्या ठिकाणच्या जनता एकीकरण पावल्या त्या आज हिंदुसंस्कृतीनें थोड्याशा चर्वित परंतु पूर्णपणें चर्वण न झालेल्या स्थितींत असल्यामुळें निरनिराळ्या जातींचें पृथक्त्व कायम राहिलें आहे. या अपूर्ण चर्वित स्थितीमुळें समाजांत जी विभक्तता दृष्टीस पडते तिला प्राकृत लोक जातिभेद म्हणतात, आणि चातुर्वर्ण्य हें समाजघटनेचें तत्त्व पूर्वीपासून बोधिलें गेलें असल्यामुळें आजची अचर्वित स्थिति त्या चातुर्वर्ण्यविषयक उपदेशाचाच परिणाम आहे असें समजून अप्रगमनशील लोक जातिभेदाचें आज समर्थन करीत आहेत, आणि प्रगमनशील वर्गापैकीं प्राकृत लोक जातिभेदाबरोबर पूर्वकालीन चातुर्वर्ण्यावरहि शिंतोडे उडवीत आहेत.

समाजाचें स्पष्ट स्वरूप न समजल्यामुळें चुकांनीं भरलेलें वरेंच समाजविषयक वाङ्मय उत्पन्न झालें आहे.

हिंदुसमाजाचें स्वरूप समजण्यासाठीं त्याचे घटक असलेल्या व इतरत्रहि दिसून येणाऱ्या दोन तऱ्हांच्या समुदायाचें स्वरूप लक्षांत घेतलें पाहिजे. पहिल्या प्रकारचा समुदाय म्हणजे राष्ट्र अगर राष्ट्रस्वरूपी जाति होय. ग्रीक, इंग्रज, आयरिश, ज्यू या राष्ट्रस्वरूपी जाती होत. दुसऱ्या प्रकारचा समुदाय म्हणजे संप्रदाय. संप्रदायांचीं उदाहरणें म्हटलीं म्हणजे ख्रिस्ती, मुसुलमान, महानुभाव, बौद्ध, आर्यसमाजी, ब्रह्मसमाजी इत्यादि होत. राष्ट्र अगर राष्ट्रस्वरूपी जाती राजकीय कारणामुळें किंवा रक्ताच्या एकत्वामुळें बनलेली असते; आणि संप्रदाय हा एका गुरूनें कांहीं शिष्य गोळा केले आणि त्यांची परंपरा अनेक पिढ्या चालली म्हणजे बनतो, आणि त्या गुरूचा उपदेश हीं संप्रदायाचीं आदितत्त्वें होतात.

राष्ट्रस्वरूपी जाति कांहीं स्वतंत्र संस्कृति उत्पन्न करिते. त्या समुदायांत व्यक्तीची पदवी ठरविणारे नियम उत्पन्न होतात. तसेंच त्या राष्ट्रांतील लग्नव्यवहार किंवा उपासना ठरविणारे नियम राष्ट्रांत किंवा राष्ट्रस्वरूपी जातींत उत्पन्न होतात. तथापि या प्रकारच्या समूहांतील लोकांचीं मतें किंवा उपास्यें अनिश्चित असतात. या संस्कृतिवैशिष्ट्यामुळें वरवर पाहाणाराला त्यांचें आणि संप्रदायांचें सादृश्य दिसतें. तथापि संप्रदाय आणि राष्ट्र यांची घटना भिन्न आहे. संप्रदायाचें अस्तित्व आणि विस्तार हीं गुरूच्या उपदेशाच्या जिवंतपणावर अवलंबून असतात. संप्रदाय आपणांस अनुयायांचें सातत्य मिळविण्यासाठीं त्या मताच्या किंवा उपास्याच्या लोकांचा पृथक् वर्ग निर्माण करण्याचा प्रयत्न करितो आणि आपल्या लोकांस निराळे करण्यासाठीं त्या संप्रदायांतील आचार्यवर्ग आपल्या लोकांसाठीं निराळे संस्कार निर्माण करितो, निराळे आचार लावून देतो आणि आपल्या लोकांचा इतरांपासून निराळेपणा स्थापित करून त्यांची जात बनत चालली म्हणजे त्या संप्रदायांतील आचार्यवर्गाची भिक्षुकी अव्याहत चालते. संप्रदायांतील गुरु संप्रदायाबाहेर लग्नें बंद करण्याची आणि संप्रदायांतल्या संप्रदायांत लग्नव्यवहार मोकळा करण्याची खटपट करितात. ख्रिस्ती संप्रदायाचीच गोष्ट घ्या. ख्रिस्तानें लग्नें वगैरे लावण्याचें काम कधींहि केलें नाहीं. तथापि त्याच्या संप्रदायांतील लोकांनीं पुढें अनेक संस्कार निर्माण केले आणि आपल्या संप्रदायास भिक्षुकी जोडली. आज माध्वांचे गुरू अशी खटपट करीत आहेत कीं माध्वांनीं स्मार्तांबरोबर लग्न करूं नये आणि आपआपसांतील महाराष्ट्र, तैलंग, कन्नड इत्यादि जातिभेद विसरावेत.

अशा संप्रदायांचें संवर्धन करण्याची पद्धति एकच आहे, ती ही कीं, समूहांत नवीन नवीन माणसें व्यक्तिशः घेणें.

जातिमूलक समुदाय आपल्या जातींत नवीन माणसें व्यक्तिशः घेण्याचा प्रयत्न करीत नाहींत, तर आपल्या जातीचा ज्या जातीशीं संपर्क येईल त्या जातीचें आणि आपलें स्वरूप एकसारखें होऊन सर्वसामान्य संस्कृति उत्पन्न व्हावी असा प्रयत्न करितात.

लहानांचे मोठे समूह बनविण्याच्या या दोन पद्धती आहेत. यांपैकीं दुसऱ्या पद्धतीनें हिंदुसमाज बनला आहे; आणि पहिल्या पद्धतीनें ख्रिस्ती व मुसलमान हे मोठे समुदाय तयार झाले आहेत.

हिंदुसमाज ज्या पद्धतीनें बनला त्या पद्धतीचें स्पष्टीकरण वर झालें. वाचकांनीं हें लक्षांत ठेवावयाचें कीं एका बाजूनें मुसुलमानी, ख्रिस्ती, जैन, इत्यादि संप्रदाय आणि दुसऱ्या बाजूनें सर्व सामान्य हिंदुसमाज, हे एकमेकांपासून अत्यंत भिन्न प्रकारचे समाज होत; आणि दैवतें, पारमार्थिक विचार तत्त्वज्ञान, कायदा, संस्कारवर्ग यांचीं स्थानें या दोन्ही प्रकारच्या

समाजांत एकमेकांपासून अगदीं निराळीं आहेत. हिंदुसमाजाचें ज्ञान करून द्यावयाचें म्हणजे दोन गोष्टी करावयाच्या, घटनापद्धति समजावून द्यावयाची आणि घटनाविषय स्पष्ट करावयाचे. पद्धतीचें स्पष्टीकरण वर झालें. आतां घटनाविषय अथवा घटक म्हणजे कोणते मनुष्यसमूह हिंदु या नांवाखालीं ओढले गेले हें स्पष्ट केलें पाहिजे.

यासंबंधानें अर्वाचीन संशोधन देण्यापूर्वी जुन्या कल्पनेचा निदान उल्लेख करणें प्राप्त होतें. हिंदूंस आज अशी भावना आहे कीं–पन्नास वर्षांपूर्वी तर ही भावना अत्यंत तीव्र होती कीं–आपण हिंदू हे सर्व एका वंशांतले आणि यूरोपीय हे दुसऱ्या एका वंशातले. सामान्य हिंदूंस तर असें वाटत होतें कीं, आपली उत्पत्ति मनुष्यांपासून झाली व इंग्रज वगैरे लोकांची उत्पत्ति माकडांपासून झाली. सीतेच्या आशीर्वादानें आज वानरांच्या वंशास राज्य मिळालें, इत्यादि कल्पना अडाणी हिंदूंत अजूनहि आढळतात. अर्वाचीन शास्त्रांचा अभ्यास हिंदुस्थानांत सुरू झाल्यापासून यूरोपीय लोक आणि हिंदूंचे संस्कृतिसंस्थापक पूर्वज हे एकच रक्ताचे होते हें कळून आलें आहे.

भाषाशास्त्राच्या व इतर संशोधनविषयक परिश्रमांच्या साहाय्यानें हिंदुस्थानांतील लोकसमाजाच्या घटनेचा इतिहास अधिकाधिक ज्ञात होत असून मानववंशाचे दुवे आतां जोडतां येऊं लागले आहेत. या नवीन ज्ञानानें जगांतील सर्व प्रकारचे लोक हिंदुस्थानांत आहेत एवढेंच केवळ सिद्ध होत नसून, परकीय लोकांचा प्रवेश जेणेंकरून अशक्य होईल अशा नियमांनीं बांधलेल्या हिंदुसमाजांतहि ते लोक आहेत असें दिवसानुदिवस भासूं लागलें आहे. पूर्वबंगालमधील लोकांचा आणि ब्रह्मी, चिनी इत्यादि लोकांचा वंश एकच आहे; ब्राह्मण आणि बरेच यूरोपीय हेहि एकाच वंशातले आहेत, इत्यादि सिद्धांत मांडले गेले असून यूरोपांतील फिनलंड, हंगेरी वगैरे ठिकाणचे लोक, द्राविड जनता आणि आस्ट्रेलियांतील यूरोपीयांपूर्वीचे रहिवासी यांचाहि संबंध जोडण्यांत येत आहे. कोणी द्राविडांचा व यहुदी लोकांचा एकवंशसंबंध सिद्ध करण्याच्या खटपटींत आहेत.

येथें मानववंशशास्त्राचें ज्ञान वाचकांपुढें मांडणें अप्रस्तुत होय. तथापि हिंदुस्थानी जनतेंत कोणतें कोणतें रक्त आहे हें समजण्यापुरती माहिती देणें इष्ट आहे, म्हणून ती येथें देत आहों. येथें मग, शक, हूण, पल्हव इत्यादि लहान लहान समुच्चयांविषयीं झालेला विचार उद्धृत करीत नाहीं. फक्त मोठ्या व ठळक लोकसमूहांविषयींचाच विचार ग्रथित करितों.

सध्यांच्या हिंदुस्थानांतील जनतेंत डॉ. कीनच्या* मताप्रमाणें पांच प्रकारचें रक्त आहे.

(१) पहिलें रक्त "कृष्णवामनांचें" (Negritoes). अंदमान व निकोबार बेटांमध्यें सिद्दीलोकांसारखी काळी आणि वांकड्या केसांची पण खुजी जात आहे. या जातीची कांहीं थोडी वस्ती पूर्वी हिंदुस्थानांत असावी असें अनुमान आहे. या जातीचे लोक हिंदुस्थानांत कोणत्याहि एका ठिकाणीं अगर एका घटनेनें आढळत नाहींत. दऱ्याखोऱ्यांतून रहाणाऱ्या वन्य जातींमध्यें ही जात मिसळून गेली असावी असें वाटतें. कारण कांहीं वन्य व कनिष्ठ जातींत या स्वरूपाचे लोक तुरळक सांपडतात. मद्रास इलाख्यांत डोंगराळ प्रदेशांतील कांहीं कनिष्ठ जातींत या प्रकारच्या केंसांचे लोक विशेष आढळतात. यावरून हिंदुस्थानांत एका कालीं खुज्या निग्रोंचें अस्तित्व असावें, असें अनुमान बांधलेलें आहे. निरनिराळ्या जातींच्या लोकांमध्यें उरलेलीं हीं वर सांगितलेलीं शरीरलक्षणें काय तीं निग्रिटो लोकांच्या निशाणीदाखल राहिलेलीं आहेत. निग्रिटोंस या शरीरलक्षणांखेरीज जातिवैशिष्ट्याचें द्योतक असें दुसरें कांहीं एक आज मितीला जिवंत ठेवतां आलेलें नाहीं.

(२) निग्रिटोंशिवाय दुसरें एक रक्त दक्षिणेकडील भारतीयांमध्यें दिसतें तें "कोलेरियन" लोकांचें. द्राविडी भाषेस व आर्य भाषांसहि परकीय असे जे शब्द द्राविडी भाषांत शिरले आहेत त्यांवरून आणि द्राविड लोकांच्या इतर कांहीं विशेषांवरून एक अगदीं निराळीच जात या लोकांत शिरली असावी असें अनुमान काढलेलें आहे व संशोधकांनीं एका मोठ्या समुच्चयासाठीं बनविलेलें कोलेरियन हें नांव या वर उल्लेखिलेल्या अवशेषांवरून अनुमानिलेल्या जातीस दिलें गेलें आहे.

(३) हिंदुस्थानांतील तिसरें रक्त म्हणजे द्राविडी भाषा बोलणाऱ्या लोकांच्या पूर्वजांचें होय. या भाषा बोलणारे लोक अफगाणिस्तानापासून सिलोनच्या उत्तर भागापर्यंत मधूनमधून आहेत. (अफगाणिस्तानामधील ब्राहुई भाषा ही द्राविड भाषा आहे).

(४) चवथें रक्त "आर्यन्" लोकांचें होय. वेद हे ज्या लोकांचे ग्रंथ आहेत आणि ज्या लोकांचे पूर्वज संस्कृत भाषा बोलत होते ते लोक "आर्यन्" होत.

(५) पांचवें रक्त "मंगोलियन" होय. बंगालमधील अनेक जाती "मंगोलियन" रक्ताच्या आहेत.

येथें हें सांगणें अवश्य आहे कीं डॉ. कीन यांचें वरील म्हणणें सर्वमान्य झालेलें नाहीं. हिंदुस्थानसरकारच्या खानेसुमारीखात्यास मानववंशशास्त्रीय विषयावर लिहिण्याचा प्रसंग अनेकदां येतो. या खात्याच्या अधिकाऱ्यांस डॉ. कीन यांचें मत चुकलेलें वाटतें. या अधिकाऱ्यांचें मत सामान्यतः असें आहे कीं, द्राविडी भाषेंतील ज्या "भाषाविशेषां"ना डॉ. कीन आणि त्यांच्या अगोदरचे कित्येक पंडित परकीय लेखतात व कोलेरियन हें नांव देतात ते भाषाविशेष परकीय

* अनंत कृष्ण अय्यर यांचें 'कोचीनचें जातिवर्णन' (मद्रास १९०९) या ग्रंथाची कीननें लिहिलेली प्रस्तावना.

भाषेंतून द्राविडींत आलेले नाहींत, तर ते तिचेच आत्मभूत आहेत. तसेंच वांकड्या केंसांची निग्रिटो म्हणून जी निराळी जात डॉ. कीन काढतात ती जात निराळी नसून, एकाच जातींत नानाप्रकारच्या केंसांचे लोक आढळतात त्याप्रमाणें अगदीं वांकड्या केंसांचे लोक द्राविडी लोकांत स्वभावतःच उत्पन्न झाले असावेत असें त्यांचें म्हणणें आहे. असो.

भाषाशास्त्राच्या दृष्टीनें पडणाऱ्या कालविभागांचा पुरावा आणि विवक्षित लोकसमुच्चयांतील माणसें कोठून आलीं हें सांगणाऱ्या इतिहासाचा पुरावा या दोहोंची एका सिद्धांता-संबंधानें पूर्ण एकवाक्यता आहे. तो सिद्धांत हा कीं, हिंदुस्थानांत निरनिराळ्या वंशांतील लोकांचें आगमन झालें तें कांहीं वेदकालांत व कांहीं त्याच्या पूर्वी झालें, व या निरनिराळ्या वंशांतील लोकांनां एकस्वरूपता आणण्याचें काम हिंदुसमाजानें केलें. ही एकरूपता आणणें या समाजास कसें शक्य झालें हें समजण्यासाठीं त्याचें स्थूल स्वरूप स्पष्ट झालें पाहिजे; आणि या स्वरूपाची कल्पना येण्यासाठीं भारतीय संस्कृतीचें स्वरूप लक्षांत आलें पाहिजे. हिंदुसमाज म्हणजे हिंदुसंस्कृतीनें बद्ध असा मनुष्यसमूह. या समूहास आजचें निश्चित स्वरूप येण्यास केवळ दैवतें, उपास्यें किंवा कुराणा-सारखे एकोक्त ग्रंथ कारणीभूत झालेले नाहींत. नानाप्रकारच्या सामाजिक व राजकीय घडामोडी आणि विद्येची, मतांची आणि विचारांची प्रगति यांचे एकमेकांवर परिणाम होऊन जगाच्या बऱ्याच मोठ्या भागांस एकत्र आणणारें जें संस्कृति-स्वरूप उदयास आलें त्यामुळें हिंदुसमाज आणि हिंदुसंस्कृति हीं बनलीं आहेत. यासाठीं भारतीय सामाजिक इतिहासाचें स्थूल स्वरूप आणि भारतीय इतिहासाशीं संबद्ध असलेलीं शास्त्रें यांचें आपण आकलन केलें पाहिजे. त्यांच्या ज्ञानाशिवाय अर्वाचीन भारतीय जनतेची घटना समजावयाची नाहीं. ही घटना सांगावयाची म्हणजे भारतीय इतिहासाचें अत्यंत व्यापक विराट् स्वरूप व्यक्त करावयाचें.

भारतीय इतिहास म्हणजे कांहीं एकच प्रकारचा इतिहास नव्हे. अनेक इतिहास त्यांत मोडतात आणि प्रत्येक इतिहास जाणण्यास निराळ्या प्रकारची तयारी लागते, हें विसरतां कामा नये. असो.

या सर्वांत प्राचीन इतिहास म्हटला म्हणजे वेदकालीन भारतीयांचा इतिहास होय. या इतिहासांतील राजकीय घडामोडी आपणांस अजून फारशा समजल्या नाहींत. वेदकाल कोणता हें आंकड्यांनीं आज नक्की सांगतां येणार नाहीं. ज्या कालास आपण वेदकाल म्हणतों त्या कालांतील घडामोडीच्या बोधक अशा अनेक कथा रामायण, महाभारत, पुराणें इत्यादि उत्तर-कालीन वाङ्मयांत सांपडतात.

कुरुयुद्धपूर्व इतिहास हा वेदकालीन इतिहासच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. संहिता कुरुयुद्धानंतर सुमारें पन्नास वर्षांनीं अस्तित्वांत आल्या असाव्यात असें वाटतें. पुष्कळ ग्रंथकार ( उदाहरणार्थ प्राचीन आणि अर्वाचीन कोशांचे कर्ते रघुनाथशास्त्री गोडबोले ) प्राचीनकाल आणि अर्वाचीनकाल यांस विभागणारी रेषा कुरुयुद्धकाल ही समजतात. कलियुग आणि द्वापारांत युग-त्रितय यांची पृथक्कारक रेषा म्हणजे भारतीययुद्धसमाप्तीचा काल होय हें जुन्या संस्कृत ग्रंथकारांचें गृहीत तत्त्व आहे.

अर्वाचीन पंडितांच्या दृष्टीनें वेदकालीन भारतीय इतिहासांत तत्कालीन सामाजिक स्थिति, विचारविकास, दैवतेतिहास, भाषाविकास हे अभ्यासाचे मुख्य विषय आहेत. भारतीय ग्रंथकार निराळ्या कारणामुळें, म्हणजे उत्तरकालीन मतांचा किंवा शास्त्रांचा प्रारंभ शोधण्यासाठीं वैदिक वाङ्मया-कडे धांव घेत. आपल्या मतास किंवा परिश्रमास गौरव आणण्यासाठीं प्रत्येक शास्त्राचा तेथपासून उगम दाखविण्याची उत्तरकालीनांची पद्धति आहे. असो.

आपल्या संस्कृतीचा उदय, वृद्धि व अस्त यांच्या इतिहासाशीं संस्कृत भाषेचा उदय, वृद्धि व अस्त यांचें निकट साहचर्य आहे.

आर्यसंस्कृतीचा इतिहास आणि इतर संस्कृतींचा इतिहास यांमध्यें एक मोठा फरक आहे तो हा कीं, आपल्या संस्कृतीच्या अभ्यासास वाङ्मयाभ्यासापासून प्रारंभ करितां येतो, तशी इतर संस्कृतींची गोष्ट नाहीं. इतर संस्कृतींच्या इतिहासाचा अभ्यास करावयाचा झाल्यास समाजाच्या उत्क्रांतीच्या बऱ्याच पुढच्या कालांत वाङ्मयाशीं प्रसंग येतो. भरतखंडाच्या इतिहासाचें संशोधन करणारांनीं गारगोट्यांचीं हत्यारें, व शस्त्रीकरणार्थ कमीजास्त घडलेले दगड शोधून काढले आहेत. तथापि संस्कृतीच्या अनेक पायऱ्या एकाच भूमीवर एकाच कालीं दृग्गोचर होतात हें लक्षांत घेतलें असतां तीं गारगोटीचीं हत्यारें आणि ते दगड वेदपूर्वकाल दाखवितातच असें म्हणतां येत नाहीं. पाश्चात्य सुधारणांचें आगर जें मुंबई शहर त्याच्या कोशविंशतीच्या आंतच अर्धनग्न ठाकूर आणि कातकरी या जाती आढळतात. वस्तुस्थिति अशी असतां प्रास्तरसंस्कृतीचा शहाणा अभ्यासक आपल्या साहित्याची अक्षर शब्दांनीं तयार झालेल्या वेदवाङ्मयाशीं सर्धायुक्त तुलना करण्यास धजावेल असें वाटत नाहीं. मनुष्याच्या वाणीनें जें वाङ्मय निर्माण झालें आहे, त्याच्या अभ्यासास ऐतिहासिक पद्धतीची जोड मिळाल्यास, आणि त्या वाङ्मयाच्या अभ्यासास योग्य अशी अधिक सूक्ष्म ऐतिहासिक पद्धति उत्पन्न झाल्यास, जें फल आपल्या हातीं लागणार आहे, तितकें महत्त्वाचें फल जगांत दुसऱ्या कोणत्याहि प्राचीन विषयाच्या अभ्यासानें प्राप्त होणार नाहीं अशी आमची भावना आहे.

दगड, गारगोट्या, यांचा अभ्यास आणि वाङ्मयाचा अभ्यास यांची तुलना करणें अगदींच अप्रशस्त आहे. कीट

वेटाभोंवतालच्या व एजियन समुद्रांतील द्वीपांच्या पुरातन संस्कृतीचे जे आज उच्च प्रकारचे अवशेष राहिले आहेत तसल्या अवशेषांची मात्र जुन्या वाङ्मयाशीं थोडी बहुत तुलना करणें योग्य होईल आणि अशी तुलना केली असतां वाङ्मयरूपी साहित्याची अधिक उपयुक्तताच उघड होते. मोठमोठ्या अवशेषांवरून प्राचीन सांपत्तिक स्थिति अनुमानानें काढतां येते. परंतु, निरनिराळ्या जातींचा सन्निकर्ष, लोकांचें अंतःकरण, लोकांची विचार करण्याची शक्ति आणि शास्त्रघटनेंत झालेली प्रगति हीं वाङ्मयावशेषांवरून जशीं काढतां येतात तशीं जमिनींतील मातीचीं टेंकाडें खणून पत्ता लावलेल्या राजवाड्यांच्या अवशेषांवरून काढतां येत नाहींत. काव्याचे विविध प्रकार, छन्दःशास्त्र, इत्यादि प्रगतिबोधक प्राचीन गोष्टींचें अस्तित्व वाङ्मयद्वाराच आज आम्हांला प्रतीत होऊं शकतें. असो. ज्या राष्ट्रास आपलें अत्यन्त प्राचीन वाङ्मय उत्तम रीतीनें जतन करण्याचें श्रेय आहे असें राष्ट्र भारताशिवाय दुसरें नाहीं. या बाबतींत आपल्या जोडीला दुसरें एखादें राष्ट्र येऊन बसलेंच तर तें प्राचीन असुरांचें अथवा प्राचीन इजिप्शिअन किंवा चिनी लोकांचें बसेल. तथापि या राष्ट्रांस संस्कृतीचें सातत्य आणि पद्धतशीर संवर्धन या बाबतींत भारतीयांच्या पुढें मान वांकवावी लागेल; आणि चिनी राष्ट्रानें संस्कृतिसातत्यामध्यें जरी हिंदुस्थानापेक्षां अधिक मान्यता मिळविली आहे तरी आपल्या संस्कृतीचा कायमपणा राखून तिचा प्रकाश इतर राष्ट्रांवर अनेक शतकें पाडण्याचें श्रेय जें भारतास मिळालें आहे तें चीन देशास लाभलेलें नाहीं.

वेदकालापासून जो इतिहास सुरु होतो त्याचे विभाग पाडण्याच्या कामीं उपयोगी असें जें अनेक प्रकारचें संक्रमणसूचक साहित्य आहे त्यांत भाषाभेद हें एक मुख्य साहित्य होय. तर या दृष्टीनेंच आपण प्रस्तुत इतिहासाचे विभाग पाडूं. इतिहासविषयाची विभागणी भाषातत्त्वानें करावी हें तत्त्व आर्यन् महावंशाच्या भारतपूर्वकालासहि लावतां येईल. आर्यांची वेदभाषा आणि पर्शूंची अवेस्ती भाषा यांच्या पृथक्त्वाबरोबर या लोकांचें सांस्कृतिक पृथक्त्वहि स्पष्टपणें दिसून येतें. पर्शुमगांच्या वाङ्मयांत वरुणाचा लोप झाला आहे, निदान त्याचें स्वरूपांतर झालेलें आहे. वैदिक वाङ्मयांत असुर शब्दाचें अर्थांतर झालेलें नजरेस येतें. इंद्र हा वेदांत देवता आहे तर अवेस्तांत दैत्य आहे. वेदभाषेंत मंत्रभाषा आणि ब्राह्मणभाषा असे प्रकार आहेत व त्यांजमध्यें विचारभेद पण दृष्टीस पडतो. पाली वाङ्मयाचा विकास समाजाचें निराळेंच स्थित्यंतर दाखवितो. अर्धमागधी वाङ्मय निराळ्याच एका संप्रदायाची छाप व्यक्त करितें. बौद्ध व जैन यांचें संस्कृत वाङ्मय या संप्रदायांचें एतद्देशीय समाजांतील स्थान पूर्वीपेक्षां कांहीं वेगळेंच झाल्याचें नजरेस आणतें. अर्वाचीन भाषांचें वाङ्मय अर्वाचीन कालाचें बोधक आहे. उर्दूभाषा हीच काय ती मुसुल्मानी महत्त्वाचें सूचक आहे असें नव्हे तर अर्वाचीन भाषांत भासमान होणारें फारसी शब्दांचें अस्तित्वहि अशा प्रकारच्या विशिष्ट राजकीय परिस्थितीचें द्योतक आहे. मराठी भाषेंत 'दिठीचे' जागीं 'दृष्टि,' 'ठाण' चे जागीं 'स्थान,' अशाप्रकारें संस्कृतसाधित शब्दाच्या ठिकाणीं शुद्ध संस्कृत शब्द वापरण्याचा प्रकारहि विशिष्ट प्रकारच्या वाङ्मयीन, राजकीय व सामाजिक स्थितीचा बोधक आहे. याप्रमाणें समाजाचा वाङ्मयीन व भाषाविषयक इतिहास आणि त्याचा इतर राजकीय, सांप्रदायिक वगैरे इतिहास यांच्यामध्यें केवळ एककालीनत्वच नाहीं, तर अन्योन्याश्रयहि आहे, आणि म्हणून कोणत्याहि संस्कृतीच्या स्वरूपाचें व इतिहासाचें ज्ञान करून घेतांना तत्संबद्ध वाङ्मयाचा व वाणीचा इतिहास बारीक दृष्टीनें चाळणें अति अवश्यक असतें. राष्ट्राच्या इतिहासांत जे लहानसान फेरफार किंवा ज्या मोठमोठ्या क्रांत्या होतात त्यांचें महत्त्वमापन करण्यास भाषाविकृतींसारखें निश्चयात्मक साहित्य दुसरें कोणतेंच नाहीं. ज्या सामाजिक व राजकीय फेरफारांच्या योगानें भाषेंत विशेष फेरफार होत नाहींत ते क्षुल्लक होत; आणि जे फेरफार भाषेचें स्वरूप बदलून तिला शिष्ट बनवितात, किंवा तिचें उच्चाटन करतात, किंवा तिची लिपी बदलतात, किंवा तिच्यांत परकीय शब्द भेसळवून तिच्या मूळ स्वरूपाची ओळख पटणें कठिण करितात ते सर्व मोठे फेरफार होत.

आपल्यापूर्वी होऊन गेलेला जो इतिहासविषयीभूत काल त्याचे भाग पाडण्यासाठीं किंवा विधायक आणि विध्वंसक मानवी करामतींचें इतिवृत्त संगतवार लिहिण्यासाठीं जेव्हां आपणांस वृत्तांचे संच करावयाचे असतात तेव्हां विषयांचे तुकडे पाडण्यासाठीं भाषातत्त्वाचा आश्रय करणेंच सशास्त्र होय.

**आर्य संस्कृति आणि भारतीय भाषा**–ज्या आपल्या संस्कृतीचें सातत्य आपण गातों ती संस्कृति गीर्वाणवाणीचा आश्रय करून आहे. आम्हां भारतीयांचें आजचें वाङ्मय अनेक देश्य भाषा, तसेंच संस्कृत भाषा व पाश्चात्यांनीं आपणांस शिकविलेली इंग्रजी भाषा या सर्वांत थोडें फार आहे. ही आजची अवस्था झाली. तथापि अत्यंत प्राचीन कालीं आपणास आपलें संस्कृतिसंवर्धन एकाच भाषेनें करावयास सांपडलें.

आपलें बरेंचसें प्राचीन वाङ्मय संस्कृत भाषेंत सांपडतें हें जरी खरें आहे, तथापि संस्कृत वाङ्मय व भारतीय वाङ्मय सर्वथैव एकच नव्हत. भारतीय वाङ्मयाच्या इतिहासांत सर्व ठिकाणचे संस्कृत ग्रंथ येत नाहींत. उलटपक्षीं भारतवर्षांतील अनेक भाषांत लिहिलेले ग्रंथ भारतीय वाङ्मयाच्या इतिहासांत येतात. 'आर्यन् भाषा' म्हणून जो भाषांचा वंश भाषाशास्त्रज्ञांनीं कल्पिला आहे त्या वंशवृक्षाच्या भारतीय शाखेंत अर्वाचीन हिंदुस्थानांतल्या ज्या भाषा व पोटभाषा येतात त्या

मुख्यतः तीन अवस्थांतून आलेल्या आहेत. या भाषावस्था अशाः—

१ अत्यंत प्राचीन गीर्वाण भाषा. ( वेदभाषा ).
२ प्राचीन गीर्वाण भाषा. ( संस्कृत ).

३ प्राचीन अपसृष्ट भाषा ( अपसृष्ट म्हणजे पाणिनीय संस्कृत भाषेपासून दूर सरकलेल्या, प्राकृत ).

**वेदभाषा**—वेदग्रंथांतील स्तोत्रें, प्रार्थना, मंत्रतंत्र, वगैरे जे प्राचीनतम भारतीय वाङ्मयाचे अवशेष आज उपलब्ध आहेत, त्यांत वापरलेली भाषा ही या पहिल्या सदरांत येते. हिला वेदभाषा असेंहि म्हणतात. ही वेदभाषा जरी एकाकाळीं आमच्या बोलण्याच्या भाषेचेंच उच्च स्वरूप होतें तरी हिचा हा दर्जा पूर्वींच नाहींसा झाला असून अलीकडे केवळ शास्त्री पंडित लोकांत वंशपरंपरेनें वेदमंत्र वगैरे म्हणण्याच्या कामींच हिचा उपयोग होत आलेला आहे. या भाषेची जुनाट रचना अद्यापिहि बुद्धिपुरःसर कायम ठेवण्यांत आलेली आहे.

वेदभाषा व पर्शुभारतीय मूलभाषा—वेदभाषा एका काळीं सामान्य लोकभाषा होती आणि ती भरतखंडाच्या वायव्येकडील प्रदेशांत आलेल्या "आर्य" म्हणविणाऱ्या लोकांत चालत होती. ही भाषा प्राचीन इराणी व बॅक्ट्री या भाषांशीं अगदीं सदृश असून वेदभाषा व प्राचीन अवेस्ती भाषा यांच्या तुलनेनें भाषाशास्त्रवेत्त्यांनीं कल्पिलेली जी 'पर्शुभारतीय' भाषा त्या मूलभाषेहून फारशी वेगळी नसावी. संस्कृत व पाली या भाषांत जितका फरक आहे तितका वेदभाषा व पर्शुभारतीय मूलभाषा यांमध्यें असेल असें दिसत नाहीं.

संस्कृत व वेदभाषा—या दोहोंतील वर्णोच्चार बहुधा सारखेच आहेत. यांमध्यें जो फरक आहे, तो वेदभाषा संस्कृतपेक्षां फार जुनी असून तींत संस्कृतपेक्षां पुष्कळच अधिक रूपें व प्रयोग वगैरे आहेत, यामुळें आहे. उदाहरणार्थ या जुन्या वेदभाषेंत संकेतार्थ आहे तो संस्कृतांत नाहीं; जुन्या भाषेंत तुवन्ताचें रूप १०।१२ प्रकारांनीं साधीत असत, सध्यां एकच प्रकार आहे; इत्यादि.

वेदभाषेचीं दोन स्वरूपें—वेदभाषेचें जें स्वरूप ऋग्वेदाच्या प्रथम नऊ मंडळांत प्रामुख्यानें सांपडतें तें ऋग्वेदाचें दहावें मण्डळ व अथर्ववेदांतील आणि यजुर्वेदांतील कांहीं भाग यांमध्यें दृष्टीस पडत नाहीं.

वैदिक ग्रंथांत संस्कृत—ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें हे जे वैदिक गद्य ग्रंथ आहेत त्यांत जुनी वेदभाषा अगदींच थोडी असून ते बहुधा संस्कृत भाषेंतच आहेत असें म्हणतां येईल. वेदांगांतील सूत्रें कांहीं ठिकाणीं वैदिक स्वरूपाचीं दिसतात तरी मुख्यतः तीं शुद्ध संस्कृतांत आहेत.

वेदाचें व्याकरण—वेदभाषेच्या व्याकरणावर पाणिनीनें परिश्रम केले पण पाणिनीनंतर या विषयावर पुढें फारसा परिश्रम झाला नाहीं, आणि अर्वाचीन ऐतिहासिक दृष्टि पाणिनीनें व इतरांनीं क्वचितच वापरली आहे. यामुळें वेदविषयक अभ्यासाचे कामीं केवळ या वैयाकरणांवर विसंबून राहिल्यास अभ्यासांत बराच दोष राहातो. हा दोष अर्वाचीन ऐतिहासिक दृष्टीच्या वैयाकरणांच्या मदतीनें थोडाफार दूर करितां येतो. अर्वाचीन पाश्चात्य पंडितांनीं वेदांतील निरनिराळ्या शब्दांचा, अव्ययांचा, प्रत्ययांचा वगैरे ऐतिहासिक अभ्यास केला असून त्या अभ्यासाचा उपयोग त्यांनीं वेदांतील सूक्तांचा कालानुक्रम ठरविण्याकडे केला आहे.

वेदकाल—वेदाचा रचनाकाल म्हणजे एक लहानसा काल नसून तो एक किंवा अनेक हजार वर्षांचा काल असावा असें दिसतें. या कालांतच यज्ञ लहानांचे मोठे बनले व जवळ जवळ नष्टहि झाले. मूळ देवतांचीं स्वरूपें पालटून नवीन दैवतें उत्पन्न झालीं. वैदिक भाषा बोलणारांची प्रगति अफगाणिस्तानापासून बिहारपर्यंत झाली हें ऋग्वेदमंत्रांवरूनच दिसून येतें. तैत्तिरीय आरण्यक व ऐतरेय ब्राह्मण हे ग्रंथ घेतले तर आंध्र कर्नाटकादि दाक्षिणात्य राष्ट्रांचाहि उल्लेख त्यांत आढळतो. वेदकालाच्या दीर्घत्वाची कल्पना ज्या एका गोष्टीवरुन बरीच चांगली येते ती ही कीं, वेदकालांत उत्तरार्धांतील लोकांस पूर्वार्धांतील लोकांची भाषा समजेनाशी झाली होती. कुटण्याच्या क्रियेच्या वाचक शब्दाशीं एका शब्दाच्या ध्वनिसादृश्याखेरीज कांहीं एक संबंध नाहीं असा "कुक्कुटोसि मधुजिव्हः" हा कुटण्यासाठीं बेधडक योजलेला मंत्र वाजसनेय संहितेंत सांपडतो. मंत्रांचा अर्थ जनतेस कळत नसल्यामुळें क्रिया व मंत्र यांची जुळणी करतांना मंत्राच्या अर्थाच्या ऐवजीं मंत्रांतील शब्दांच्या ध्वनीवरून अडाणी श्रोत्यांमध्यें मंत्र क्रियावाचक आहे असा भाव उत्पन्न होईल या अपेक्षेनें वाटेल तो मंत्र दडपून द्यावयास जनता मंत्राची भाषा न समजण्या इतकी अपसृष्ट झाली असली पाहिजे हें स्पष्ट होतें. अशा तऱ्हेचीं मंत्रांच्या भाषेशीं जनतेच्या असलेल्या अपरिचयाचा फायदा घेतला जात आहे असें दाखविणारीं उदाहरणें उत्तरकालीन विधींच्या प्रयोगांत अनेक आढळतात. वेदकाल म्हणून उल्लेखिलेल्या या दीर्घ युगांत साखर, मीठ, इत्यादि उपयुक्त जिनसांशीं व यवाखेरीज इतर धान्यांशीं आर्यांचा परिचय नव्हता त्या कालापासून तों तहत अनेक धान्यांशीं व इतर जिनसांशीं त्यांचा दृढ परिचय ज्या कालांत झाला त्या कालापर्यंतचा सर्व काल येतो.

राजकीय दृष्टीनें या युगाकडे पाहिलें तर सर्वत्र लहान लहान संस्थानें आणि तेथें राजांची निवडणूक अशाप्रकारचें शासनसंस्थाशैशव या युगाच्या एका भागांत दृष्टीस पडतें, तर त्याच्याच दुसऱ्या भागांत मरुत्ताच्या साम्राज्यासारखीं मोठमोठीं साम्राज्यें दृष्टीस पडतात. तसेंच, सामाजिकदृष्ट्या पाहतां अस्थिर स्त्रीपुरुषसंबंधापासून पूर्ण प्रगल्भ अशागृहस्थधर्माच्या स्थापनेपर्यंतचा दीर्घकाल या वेदरचनायुगांत मोडतो.

या सर्व गोष्टींवरून वेदकालाचा दीर्घ विस्तार आपल्या लक्षांत येतो. असो.

**संस्कृत भाषेचीं तीन स्वरूपें**:–पाणिनीय, गद्यग्रांथिक, आर्षकाव्यः—ब्राह्मणें, आरण्यकें, व उपनिषदें हे उत्तर वेदकालांतील गद्यप्रचुर ग्रंथ व सूत्रग्रंथ यांची संस्कृत भाषा व पाणिनीनें उपदेशिलेली संस्कृत भाषा या दोहोंत फारसा फरक नाहीं. उपर्युक्त ग्रंथांच्या भाषेला 'प्राचीन संस्कृत' असें म्हणणें सोईचें होईल. या ग्रंथांच्या रचनाकालीं व तत्पूर्वी कांहीं काल विद्वान् लोक व पुरोहित वर्गांतील लोक बहुधा ही भाषा वापरीत असावेत. पाणिनी ख्रि. पू. ७५० च्या वर्षाच्या सुमारास किंवा त्याहूनहि पूर्वी होऊन गेला असावा. कात्यायनानें जी भाषा प्रचलित म्हणून गृहीत धरलेली आहे त्या भाषेंत आणि पाणिनीकालीन भाषेंत जे फरक दृग्गोचर होतात त्या फरकांची भोंवतालच्या राजकीय घडामोडींशीं संगति लावून रा. राजवाडे यांनीं पाणिनीस ख्रि. पू. ७५० वर्षांच्या पलीकडे ढकललें आहे.* पतंजलीच्या कालींहि ही प्राचीन संस्कृत भाषा शिष्ट लोकांत रूढ होती. याच कालीं हिचें एक स्वरूप सामान्य लोकांत प्रचारांत होतें तें आपणास तत्कालीन आर्ष महाकाव्यांतून आढळतें. हें रामायणमहाभारतांतील संस्कृत व अभियुक्त (पाणिनीय) संस्कृत यांत फरक आहे तो एवढाच कीं, अभियुक्त संस्कृतांत नियमबद्धता अधिक असून लोकभाषेपासून तें वरेंच निराळें आहे व त्यांत रामायणमहाभारताच्या संस्कृताइतके जुने प्रयोग नाहींत. हें स्वरूपभिन्नतेचें कारण न समजल्यामुळें पंडितवर्गास मौज उत्पन्न करणारा असा एक गीतेंतील नाना प्रकारच्या 'चुका' दाखवूं पाहणारा लेख भांडारकरांच्या स्मारक ग्रंथांत एका सुशिक्षित ब्राह्मणानें लिहिला आहे. संस्कृत व प्राकृत गद्यग्रांथिक भाषा व आर्ष काव्यभाषा हीं समाजांतील निरनिराळ्या वर्गांच्या भाषांचीं स्वरूपें होतीं. यांचेंच पर्यवसान संस्कृत व प्राकृत या भेदांत झालें. संस्कृत व प्राकृत या भाषा एकाच कालीं समाजांतील निरनिराळे वर्ग वापरीत होते.

राजा, ब्राह्मण, सरदार लोक व कांहीं सुशिक्षित स्त्रिया यांच्या तोंडीं संस्कृत व इतरांच्या तोंडीं प्राकृत अशी जी व्यवस्था नाटकांतून आढळून येते, तीवरून नाटकें लिहिलीं गेलीं त्याकाळाचे पूर्वी म्हणजे ख्रिस्तशकापूर्वी कित्येक शतकें सामान्य लोकांनां संस्कृत बोलतां येत नसलें तरी बोललेलें समजत असे असा सिद्धांत काढण्यांत आला आहे.

**संस्कृत ही मृतभाषा नव्हे.**–पाश्चात्य ग्रंथकारांस संस्कृत भाषेस मृत किंवा जिवंत यापैकीं कोणता शब्द लावावा याचीच मोठी फिकीर पडलेली दिसते. जिवंत हा शब्द लावण्यासाठीं किंवा निदान मृत शब्द न लावावा या हेतूनें विंटरनिट्झ म्हणतोः—"संस्कृत भाषा ही मृत भाषा आहे असें म्हणणें चुकीचें ठरेल. तिला फार तर बद्ध भाषा असें म्हणतां येईल. कारण, या भाषेला पाणिनीसारख्या व्याकरणकारांनीं व्याकरणनियमांनीं गच्च आंवळून टाकल्यामुळें कांहीं दिवसांनीं हिची वाढ खुंटली. पाणिनीय व्याकरणाप्रमाणें जें शुद्ध संस्कृत त्यासच अभियुक्त संस्कृत ही संज्ञा आहे. पाणिनीनंतर हजार एक वर्षेपर्यंत या भाषेंत अनेक नवीन काव्यें व शास्त्रग्रंथ निर्माण झाले व अद्यापिहि अशीं काव्यें व ग्रंथ होत आहेत. आजच्या घटकेला हिंदुस्थानांत अनेक संस्कृत पंडित अनेक नियतकालिकें व ग्रंथ संस्कृतांत लिहून प्रसिद्ध करीत आहेत. महाभारत, रामायण वगैरे पुराणांचें अद्यापि श्रवण व वाचन चाललेलें आहे. संस्कृत काव्यें व लेख अजूनहि निर्माण होत आहेत व पुष्कळ विद्वान् लोक संस्कृत भाषेमध्यें शास्त्रीय विषयांवर अस्खलित भाषण करतांना दृष्टीस पडतात. तेव्हां या सर्व गोष्टी समोर दिसत असून संस्कृत भाषा ही मृतभाषा आहे असें कसें म्हणतां येईल?" येणेंप्रमाणें विंटरनिट्झची विचारसरणि आहे. असो. या प्रकारच्या वादाशीं आपणास कांहीं कर्तव्य नाहीं. लॅटिन भाषेचा यूरोपच्या इतिहासांतील मध्ययुगांत जितका प्रचार होता अगर हिब्र्यू भाषेचा यहुदी लोकांत जितका आज प्रचार आहे, तितकाच संस्कृत भाषेचा प्रचार आज भरतखंडांत आहे एवढें लक्षांत ठेवलें म्हणजे झालें.

**प्राचीन भारतीय भाषांचें वर्गीकरण**—वरील विवेचनावरून प्राचीन भारतीय भाषांचें वर्गीकरण थोडक्यांत पुढें दिल्याप्रमाणें मांडतां येईल. **(१) वेदभाषा.** (अ) **पूर्वकालीन**–विशेषतः ऋग्वेदांतील स्तोत्रमंत्रांची भाषा. (आ) **उत्तरकालीन**–ब्राह्मण, सूत्रें व फार पुरातन नव्हत अशा–विशेषतः ऋग्वेदाखेरीज इतर वेदांतील–स्तोत्रमंत्रांची भाषा. **(२) संस्कृत.** (अ) **प्राचीन संस्कृत**—वैदिक गद्य ग्रंथांची (त्यांतील मंत्र खेरीज करून) व पाणिनीची भाषा. (आ) **रामायणमहाभारतांतील संस्कृत.** (इ) **पाणिनीय संस्कृत**—पाणिनीच्या नियमानुसार संस्कृत साहित्यग्रंथांतून लिहिलेली संस्कृत भाषा. **(३) प्राकृत उर्फ अपसृष्ट भाषा**—संस्कृत भाषेच्या वाढीबरोबरच भारतीय आर्य लोकांमध्यें प्रचलित असलेल्या इतर भाषांची साहजिकपणें वाढ होत गेली. या भाषा व पोटभाषा प्रत्यक्ष संस्कृतवरून निघाल्या नसून, प्राचीन आर्ष भाषा व संस्कृत भाषा यांच्या मुळाशीं असलेल्या सामान्य जनतेच्या भाषांपासून जन्म पावल्या असल्या पाहिजेत. त्यांचें वेदभाषेशीं अगर पाणिनीय भाषेशीं माता व कन्या हें निकटचें नातें नसून केवळ सामान्य आप्तसंबंधाचें नातें आहे. परदेशांतून हिंदुस्थानांत आलेले आर्य लोक जसजसे पश्चिमेकडून पूर्वेकडे वसती करीत गेले, तसतसे पुष्कळ प्रांतिक भाषाभेद

*राजवाडे यांचें मत ग्राह्य धरून गोल्डस्टकरचें मत आम्ही अपूर्ण धरतों.

उत्पन्न होत गेले. ( संहितेमध्यें जो भाषाभेद दृष्टीस पडतो त्याचें कारणहि कांहीं अंशीं प्रांतिक भाषाभेद हेंच असावें ). या भाषाभेदांतूनच उत्तरकालीन प्राकृत भाषा निघाल्या. सर्वांत जुने शिलालेख संस्कृत भाषेंत नसून प्राकृत अथवा अपसृष्ट म्हणजे पाणिनीय संस्कृत भाषेपासून दूर सरकलेल्या भाषांत आहेत. या लेखांवरून या लौकिक भाषांतील परस्परभेद दृष्टोत्पत्तीस येतो. अपसृष्ट भाषांपैकीं कांहीं थोड्या अभिजात भाषांच्या पदवीस पोंचल्या आहेत, त्या खालीं दिल्या आहेत.

**(१) पाली भाषा व तिची उत्पत्तिः**—या अपसृष्ट भाषांपैकीं सर्वांत जुनी पाली ही होय. ही सिलोन, ब्रह्मदेश, व सयाम येथील बौद्ध भिक्षुवर्गाची भाषा होय. बौद्ध संप्रदायाचे पूज्य व पवित्र असे धार्मिक ग्रंथ याच भाषेंत लिहिलेले आहेत. बुद्धास संस्कृत येत असो अगर नसो, तो संस्कृत भाषेंत उपदेश करीत नसून लोकभाषेंत करीत असे हें मात्र निःसंशय आहे. बुद्धाचें प्रथम कार्यक्षेत्र मगध असल्यामुळें त्याची 'पालीभासा' म्हणजे मागधीच होय, असें बौद्धांचें म्हणणें आहे. परंतु या म्हणण्यावर आक्षेप घेण्यास जागा आहे. कारण मगधदेशीय भाषा जी आपणास इतर साधनांवरून उपलब्ध झाली आहे, ती पाली भाषेहून स्पष्टपणें निराळी दिसते. पाली भाषा ही उज्जयिनीच्या भाषेपासून निघाली असावी ही गोष्ट प्राकृत भाषांच्या अभ्यासकांस वरील बौद्धांच्या कल्पनेपेक्षां जास्त संभवनीय दिसते. तें कसेंहि असो. पाली भाषेंत लिहिलेले जे ग्रंथ आहेत, तेच आपणाला प्राचीन व मूळच्या बौद्ध धर्माचें व संप्रदायाचें यथार्थ ज्ञान करून घेण्याच्या कामीं सर्वांत अधिक विश्वसनीय आहेत, एवढें मात्र खरें.

पाली या शब्दाची व्युत्पत्ति.—पाली या शब्दाचा मूळ अर्थ 'पाळी' ( रांग ) असा असून नंतर नियम, व्यवस्था वगैरे अर्थ याच्या अर्थकक्षेंत शिरला व पुढें सांप्रदायिक नियम असा त्याचा अर्थ होऊन शेवटीं या सांप्रदायिक ग्रंथांची भाषा या अर्थीं त्याचा प्रयोग होऊं लागला. हा शेवटचा अर्थ या शब्दाला प्राप्त होण्याचें कारण सिंहली टीकाग्रंथांपासून मूलग्रंथांच्या भाषेचें पृथक्त्व स्थापित करण्याचा कांहीं ग्रंथकारांचा हेतु हें होय, असा विंटरनिट्झ व इतर पाश्चात्य ग्रंथकार तर्क करितात. प्रकट ( म्ह० उघडी=सामान्य जनांची ) या शब्दापासून 'पाली' शब्दाची व्युत्पत्ति रा. राजवाडे यांनीं आपल्या ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेंत लाविली आहे. या पंडितांच्या वरील व्युत्पत्तीविषयीं येथें हें नमूद केलें पाहिजे कीं, 'प्रकट' किंवा 'पाली' हे दोन्ही शब्द किंवा यांचीं पूर्वरूपें वरील अर्थानें संहितांत अगर ब्राह्मणांत आढळत नाहींत.

**( २ ) 'गाथाभाषा' अथवा 'मिश्रसंस्कृत'ः**—बौद्ध वाङ्मय पाली भाषेंत जसें आहे तसें संस्कृतांतहि आहे. या वाङ्मयग्रंथांतील गद्यभाग बहुधा संस्कृत आहे, व मधून मधून जो पद्यभाग अथवा गाथा आहेत त्या एका देश्य भाषेंत आहेत. हिला 'गाथाभाषा' असें नांव देतात. वरील ग्रंथांतील कांहीं गद्यभागहि या गाथाभाषेंत आहेत. तसेंच केवळ या भाषेंत लिहिलेले असे कांहीं स्वतंत्र ग्रंथहि आहेत. या भाषेंत पुष्कळ संस्कृत प्रत्यय व इतर संस्कृतांतील प्रयोग मिसळले असल्यामुळें हिला सेनार्ट यानें 'मिश्र संस्कृत' असें नांव सुचविलें आहे.

**( ३ ) जैन प्राकृत व जैन महाराष्ट्रीः**—बौद्ध लोकांप्रमाणें जैन लोकांनींहि आपल्या ग्रंथांतून संस्कृत भाषा न वापरतां प्राकृत भाषा वापरल्या आहेत. यांच्या प्राकृत भाषा दोन आहेत.

(अ) **जैन प्राकृत**–हिलाच अर्धमागधी किंवा आर्ष म्हणतात. जुनें जैन धर्मशास्त्र या भाषेंत आहे.

(आ) **जैन महाराष्ट्री**–या भाषेंत जैन धर्मग्रंथांवरील टीका व इतर 'द्वैआशराय' सारखीं लौकिक जैन काव्यें लिहिलेलीं आहेत. या जैन महाराष्ट्रीचें स्वरूप लौकिक वाङ्मयाची जी सामान्य भाषा महाराष्ट्री तिच्याशीं अगदीं सदृश असें आहे.

**(४) महाराष्ट्री**–ही महाराष्ट्राची जुनी भाषा होय. प्राकृतांमध्यें हीच सर्वांत उत्तम समजतात. व जेव्हां जुने ग्रंथकार नुसतें प्राकृत असें म्हणतात, तेव्हां त्यांचा आशय 'महाराष्ट्री' असा असतो. हिचा उपयोग मुख्यत्वेंकरून गाण्यांतून व विशेषतः नाटकांतील गीतांत करितात. हींत कांहीं आख्यानेंहि आहेत.

**(५) शौरसेनी**–नाटकांतील इतर प्राकृत भाषांमध्यें शौरसेनी ही नाटकांतील गद्यांत थोर कुळांतील स्त्रियांच्या तोंडीं असते. शूरसेन देशांतील म्हणजे मथुरेच्या आसपासच्या प्रदेशांतील भाषेवर हिची उभारणी झालेली आहे.

**(६) मागधी**–ही मगध देशाची भाषा होय. ही नाटकांतून खालच्या वर्गांतील पात्रांच्या तोंडीं घालतात.

**(७) पैशाची**–ही भाषा समाजांतील सर्वांत खालच्या दर्जाच्या लोकांच्या तोंडीं नाटकांतून घालतात. ही मूळची पिशाच जातीच्या लोकांची भाषा असावी. हिलाच राक्षसांची भाषा म्हणत. या भाषेंत गुणाढ्याचा 'बृहत्कथा' म्हणून एक प्रख्यात कथाग्रंथ आहे. हिचा संबंध ग्रियर्सननें काफरिस्तान येथील प्रचलित भाषेशीं व काश्मिरी भाषेशीं जोडिला आहे; आणि तें मत मान्य करून रा. राजवाडे 'पेशावर' हा शब्द 'पिशाचपुर' या शब्दापासून व्युत्पादितात.*

**(८) 'अपभ्रंश'** या नांवाखालीं पुष्कळ प्राकृत भाषा आलेल्या आहेत. त्या नाटकांतून मधून मधून दृष्टीस पडतात. अपभ्रंश या शब्दाचा मूळ अर्थ संस्कृतेतर भाषा असाच होता. नंतर हा शब्द प्रचारांतील लोकभाषांस लावण्यांत

* लेखक. भा. इ. सं. मं.

येऊन शेवटीं विवक्षित प्राकृत भाषांचा निदर्शक बनला. पुष्कळशा हिंदी म्हणून समजल्या जाणाऱ्या जुन्या काव्यांची भाषा खरोखर पहातां अपभ्रंश भाषा आहे. कित्येक लेखकांनीं तामिळ, तेलुगु इ. भाषांचें यथार्थ स्वरूप न समजून त्यांस अपभ्रंश म्हटलें आहे.

**अर्वाचीन भाषा व पोटभाषाः**—सामान्यतः ख्रि. श. च्या दहाव्या शतकापासून पुढें अर्वाचीन भाषा ही भाषावस्था सुरू होते. बाराव्या शतकापासून अर्वाचीन भाषेंत वाङ्मय तयार होऊं लागलें. हें वाङ्मय कांहींसें स्वतंत्र रूपाचें व कांहींसें संस्कृतवाङ्मयावलंबी असें होतें.

**मराठी व इतर प्रचलित भाषाः**—मराठी भाषेच्या उत्पत्तीविषयीं लिहितांना रा. राजवाडे असें सांगतात कीं, आन्ध्रभृत्यांच्या स्थानभ्रंशानंतर म्हणजे ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकांत जें अराजक माजलें, त्यांत महाराष्ट्रीय पंडितवर्ग नष्ट झाला आणि भाषा अनागरांच्या हातांत जाऊन भ्रष्ट होत चालली व बरेच अपभ्रंश झाल्यावर सहाव्या किंवा आठव्या शतकांत सध्यांची मराठी तयार झाली.* अपसृष्ट भाषांपासून तयार झालेल्या अर्वाचीन भाषांत सध्या प्रमुख म्हणजे खालील भाषा होत.

पश्चिम हिंदुस्थानांत—सिंधी, गुजराथी, पंजाबी व पश्चिम हिंदी. उत्तर हिंदुस्थानांत—गढवाली ( सतलज व भागीरथी यांचे दरम्यान ), कुमाउनी ( गंगा व घोग्रा यांचे दरम्यान ), काश्मिरी व नेपाळी. दक्षिण हिंदुस्थानांत—मराठी. व पूर्व हिंदुस्थानांत—बिहारी, बंगाली, उडिया व आसामी.

**उर्दु अथवा हिंदुस्थानीः**—याखेरीज उर्दु अथवा हिंदुस्थानी भाषा ही दिल्लीच्या आसमंताद्भागीं छावण्यांत उदयास आली. सोळाव्या शतकांत या भाषेंत ग्रंथरचना होऊं लागली. हल्लीं हिंदुस्थानी भाषा सर्वत्र चालते.

सिलोनमधील सिंहली भाषा हीहि एका अपसृष्ट भाषेपासून निघाली असून तिचीहि मूळ भाषा 'इंडोजर्मानिक'च होय. बौद्ध संप्रदायाचा व वाङ्मयाचा सिलोनमध्यें प्रवेश झाल्यानंतर लवकरच तेथें या भाषेंत ग्रंथ तयार होऊं लागले. प्रथमचे ग्रंथ धर्मग्रंथांवरील टीकांच्या रूपाचे असून पुढें संस्कृत काव्यांतील कल्पनांच्या आधारें लौकिक वाङ्मयहि तयार झालें.

आतांपर्यंत वर सांगितलेल्या हिंदुस्थानांतील सर्व भाषा 'इंडोजर्मानिक' उर्फ आर्यन् वंशांतीलच आहेत. परंतु दक्षिण हिंदुस्थानांत मराठी वगैरे वरील कांहीं भाषा प्रचारांत असून शिवाय इंडोजर्मानिक कुलांत येत नाहींत अशा पुष्कळ भाषा प्रचारांत आहेत. या भाषांनां द्राविडी भाषा असें म्हणतात. यांचें एक स्वतंत्र भाषाकुल आहे. निदान अद्यापपर्यंत कोणत्याहि अद्राविड भाषांशीं या द्राविड भाषांचा संबंध भाषाशास्त्रवेत्त्यांनां निश्चितपणें जोडतां आलेला नाहीं. तामिळ, तेलुगु, मल्याळम् व कानडी या द्राविडकुलांतील प्रमुख भाषा होत.*

या इंडोजर्मानिक भाषा नसल्या तरी सुद्धां यांतून पुष्कळ संस्कृत प्रयोग वगैरे सांपडतात, व यांतील बरेंच महत्त्वाचें वाङ्मय देखील अनेकांशीं संस्कृत वाङ्मयाच्या आधारें रचलेलें आहे असें आढळून येतें. याशिवाय ज्या लोकांची संस्कृति भारतीय आहे आणि ज्यांचें वाङ्मय भारतीय वाङ्मयाचा भाग आहे असे अनेक लोक आहेत. ब्रह्मदेश, सयाम, सुमात्रा, जावा, बलि, अनाम, कांबोज इत्यादि प्रदेशांच्या भाषांचें आणि वाङ्मयांचें स्वरूप द्राविडी भाषा व वाङ्मयें यांच्या इतकें जरी नसलें तरी जवळजवळ तितकेंच भारतीय आहे. त्यांचा हिशोब घेतल्यास हिंदूंचा विस्तार लक्षांत येईल.

संस्कृत भाषेशीं सगोत्र अशा परकीय भाषांचें, तिजपासून अपसृष्ट झालेल्या भाषांचें आणि तिजशीं रक्तानें असंबद्ध अशा इतर भाषांवरील तिच्या परिणामांचें जें वर निरीक्षण केलें, त्याचा पुढें येणाऱ्या सांस्कृतिक इतिहासाशीं निकट संबंध आहे. कोणत्याहि देशाच्या सांस्कृतिक आणि राजकीय इतिहासाच्या युगांची विभागणी भाषातत्त्वावर केली असतां तत्संबद्ध ऐतिहासिक घडामोडी स्पष्ट होतात हें वर एका ठिकाणीं सांगितलेंच आहे. आपण जी भाषा बोलतों तीच भाषा आपले पूर्वज बोलत असले तर ते आपलेसे वाटतात पण त्यांची भाषा कांहीं निराळी असल्यास ते निराळे लोक वाटतात. भाषेंत जे मोठाले फरक होतात ते कांहीं विशिष्ट सामाजिक किंवा राजकीय घडामोडींचे बोधक असतात. विचारभेद तीव्र होऊन निराळे विचार व्यक्त करणारा अगदींच निराळा एखादा जनविभाग किंवा वर्ग विवक्षित देशांत पुढें आला म्हणजे तेथें निराळी भाषा उदयास येते. ज्या राष्ट्रास महत्त्व येईल त्याची भाषा महत्त्व पावते. याप्रमाणें भाषांचा उदयास्त, संकोचविकास या गोष्टींचें कोणत्याहि प्रदेशाच्या सांस्कृतिक इतिहासांत फार महत्त्व आहे. उलटपक्षीं एकाच संस्कृतीखालील अथवा एकच भाषा बोलणारें एक राजघराणें जाऊन दुसरें राजघराणें येणें असल्या गोष्टींनां या इतिहासांत फार थोडें महत्त्व आहे. सांस्कृतिक इतिहास हा ढोबळ रेषा दाखविणाऱ्या नकाशाप्रमाणें आहे. या इतिहासाचे विभाग पाडावयाचे ते भाषांवरील संस्कार आणि भाषांचें उत्सरण-उत्सारण पाहून पाडावे हा शास्त्रशुद्ध मार्ग होय. असो.

भारतीय संस्कृतीचा इतिहास म्हटला म्हणजे दुसरें कांहीं एक नसून केवळ संस्कृत भाषेचा जगाच्या भाषांवर झालेल्या परिणामांचा इतिहास आहे असें म्हटल्यास चालेल.

* विश्ववृत्त. व. २. अं. ३.

* द्राविडी भाषांचें नातें कांहीं पंडितांनीं हंगेरियन व तुर्की भाषांशीं आणि आस्ट्रेलियन भाषांशीं जोडण्याचा प्रयत्न केला आहे. डॉ. वीनर नांवाच्या एका रशियन पंडितास तिचा हिब्र्यूशीं देखील संबंध असावा असा संशय वाटूं लागला आहे.

संस्कृत भाषेची निरनिराळ्या काळांतील स्थिति आणि वेद-भाषेपासून उत्पन्न झालेल्या आज तागाईतच्या अनेक भाषा यांची सामान्य माहिती असल्याशिवाय, भाषाशास्त्राच्या दृष्टीनें आपल्या भाषेचा जो अभ्यास आपणांस करावयाचा आहे त्याच्या विस्ताराची अंधुक कल्पना देखील आपणांस यावयाची नाहीं. तसेंच ऐतिहासिक संशोधन करण्यासाठीं आपणांस भाषाज्ञानाची केवढी तयारी पाहिजे हें कळण्यासहि देशांतील भाषांची विविधता पूर्णपणें लक्षांत आली पाहिजे. गेल्या चार पांच हजार वर्षांत वेदभाषा स्थित्यंतरें पावत आहे. प्रत्येक काळांत वाङ्मय तयार होत आहे. त्या वाङ्मयांपैकीं कित्येकांचे अवशेष आज उपलब्ध आहेत. पुष्कळांचे नाहींत. तथापि वेदभाषा, प्राचीन संस्कृत, पाणिनीय संस्कृत, आर्षकाव्य-भाषा, पाली, महाराष्ट्री, प्राकृत, मिश्रसंस्कृत, जैन प्राकृत इत्यादि अनेक गतकालीन भाषांत तसेंच मराठी, गुजराथी इत्यादि अर्वाचीन भाषांत ग्रंथसमुच्चय मोठे आहेत. याखेरीज प्राकृत भाषेच्या निरनिराळ्या स्वरूपांत शिलालेख, ताम्रपटलेख आहेत ते निराळेच. वरील सर्व भाषांतील ग्रंथ तसेंच आंध्र-द्राविडादि दाक्षिणात्य भाषांतील ग्रंथ मिळून एका जनतेचा, एका संस्कृतीचा, आणि एका ज्ञानसंचयाचा इतिहास होतो. एकच अनेक ठिकाणीं विभागलें गेलें आहे. या सर्व अवयवांचें ज्ञान होईल तर हे सर्व अवयव मिळून जी हिंदु संस्कृति होते तिचें ज्ञान होईल. संस्कृतीच्या अभ्यासाच्या साधनांपैकीं एका अल्प भागाकडेसच लक्ष देऊन भागावयाचें नाहीं ही गोष्ट जितकी लवकर समजेल तितकें आजचें सवंग पांडित्य कमी होत जाऊन त्याच्या जागीं अधिक व्यापक अभ्यास करण्याची प्रवृत्ति होईल.

भारतीय इतिहासकालाचे व वृत्तसमुच्चयांचे विभाग भाषेच्या दृष्टीनें दिले आहेत. त्याशिवाय इतर दृष्टींनींहि या कालाचे विभाग पाडतां येतील. कोणत्या जातिमूलक संस्कृतीचें वर्चस्व कोणत्या काळीं होतें ही दृष्टि वापरून जे भाग पडतात ते येणेंप्रमाणें.

(१) हिंदु संस्कृतीच्या वर्चस्वाच्या कालाचा इतिहास.
(२) मुसलमानी संस्कृतीच्या वर्चस्वाच्या कालाचा इतिहास.
(३) पाश्चात्य संस्कृतीच्या वर्चस्वाच्या कालाचा इतिहास.

हे तीन विभाग कांहीं फरकानें राजकीय वर्चस्वांतील परिवर्तनांचेहि निदर्शक होतील. मध्यंतरीं हिंदूंच्या राजकीय वर्चस्वाचा कांहीं सत्तर ऐंशी वर्षांचा काल मराठ्यांच्या उचली-मुळें अस्तित्वांत आला होता तो राजकीय दृष्टीनें वेगळा लक्षांत घ्यावा लागेल. तथापि त्या काळांत भारतीय संस्कृतीचें वर्चस्व स्थापन होण्यास अवकाश मिळाला नाहीं; आणि यामुळें तो काल संस्कृतीच्या दृष्टीनें वरील दुसऱ्या विभागांत घालण्यास हरकत नाहीं. हिंदुस्थानाचा असाहि कांहीं भाग आहे कीं मुसलमानी सत्तेच्या उत्कर्षकाळीं देखील तो त्यांच्या ताब्यांत न आल्यामुळें तेथें हिंदु संस्कृतीची परंपरा अबाधित चालली. या भागांत कांहीं रजपूत संस्थानें आणि सरहद्दीवरील अनेक डोंगरी संस्थानें व दक्षिणेकडील कांहीं प्रदेश यांचा अंतर्भाव होतो. हिंदूंच्या संस्कृतीच्या पुन-र्घटनेचाहि एक काल दक्षिणेपुरता कल्पितां येईल. हा काल म्हणजे विजयानगरच्या साम्राज्याचा काल होय. हा काल हिंदूंच्या पराभवानंतर त्या भागांत फारच लवकर आल्यामुळें त्याला हिंदूंच्या सांस्कृतिक वर्चस्वाच्या कालाचें एक टोंक म्हणून समजण्यास हरकत नाहीं.

भारतीय विषयांवर जें पाश्चात्यांचें पांडित्य आहे तें सर्व-व्यापक आहे तथापि आपण जितकें अलीकडील कालाकडे येत जावें तितके त्यांचे परिश्रम कमी झालेले दृष्टीस पडतात. प्राचीन हिंदूंच्या इतिहासाच्या अभ्यासकांपेक्षां भारतीय मुसलमानी काळाचे अभ्यासक फारच कमी आहेत; आणि महाराष्ट्रीय इतिहासाचे अभ्यासक तर मुळींच नाहींत असें म्हटलें तरी चालेल.*

पारमार्थिक विचारांचा इतिहास घेतला आणि त्या दृष्टीनें कालविभाग पाडण्याचा प्रयत्न केला तर आपणांस असें दिसून येईल कीं भाषेच्या दृष्टीनें किंवा राजकीय अगर सांस्कृतिक वर्चस्वाच्या दृष्टीनें जे कालविभाग पडतात तेच ह्या दृष्टीनेंहि पडतात. हिंदूंच्या पारमार्थिक विचारांचा पूर्ण विकास आणि या विकासानें उत्पन्न झालेलीं पांखडें अथवा विचारभेद मुसलमानी वर्चस्वापूर्वींच दृग्गोचर होतात. मुसलमानी काळांत परमार्थसाधनांत भक्तिप्राधान्य उदयास आलें असें समजतात आणि तें कांहीं अंशानें खरेंहि आहे. तथापि हें भक्तिप्राधान्य एका आणखी मोठ्या सदरांत घालतां येईल. मुसलमानी अमलानंतर जुन्या संस्कृतीच्या कोणत्या तरी अवयवास हिंदु-समाजास चिकटवून ठेवण्याचा प्रयत्न चालू असे, आणि यासाठीं दैवतश्रद्धामय धर्मांचें आणि त्याबरोबर आचाराच्या (सोंवळ्याओंवळ्याच्या) कठोर धर्मांचें उपबृंहण झालें; आणि विचारप्रधान कार्य कमी कमी होऊं लागलें. आजची हिंदु जनता ज्या दोन गोष्टींमुळें इतरांपेक्षां पृथक् आहे ती याच दैवताचारधर्मांमुळें होय.

उपर्युक्त विवेचनावरून भारतीय संस्कृतीच्या व हिंदु समाजाच्या इतिहासाचे भारतांतील भाषासमुच्चयांच्या इति-हासाच्या दृष्टीनें विभाग पाडणें कसें सयुक्तिक आहे हें लक्षांत येईल.

---

* किंकेड व पारसनीस यांनीं मराठ्यांचा इतिहास लिहाव-याचा एक प्रयत्न केला आहे. होतकरू लेखकास उत्तेजनार्थ दोन गोड शब्द बोलावे या दृष्टीनेंच त्याची थोडीबहुत प्रशंसा होत असावी. एरवीं हा विषय जाणणारा कोणीहि ग्रंथकारांचें अभिनंदन करील असें वाटत नाहीं.

निरनिराळ्या सर्व मानववंशांचा इतिहास हिंदूंच्या इतिहासाशीं वराच संवद्ध आहे. जगांतील एकपंचमांश जनता ज्या समुदायांत आहे तो समुदाय मानववंशाच्या एकंदर इतिहासाशीं स्वाभाविकपणेंच निकट रीतीनें संवद्ध असणार. हा संवंध पूर्णपणें निश्चित नसल्यामुळें याचें विशेष विवेचन येथें केलेलें नाहीं. एतद्विषयक एक मत (डॉ. कीन याचें) मागें व्यक्त केलेंच आहे. त्याची स्थूल पण साकल्यानें माहिती देणें म्हणजे सर्व जगाचें भाषाशास्त्र सांगणें होय.

मनुष्यसमुच्चयांचीं नातीं जोडणारें ज्ञान ज्या शास्त्रांच्या अभ्यासानें झालें आहे अशीं शास्त्रें भाषाशास्त्रांशिवाय अनेक आहेत. त्या शास्त्रांची स्थूल कल्पना असल्याशिवाय त्या शास्त्रांच्या साहाय्यानें हिंदूंच्या पूर्वस्थितीसंवंधानें जी माहिती उपलब्ध झाली आहे तिचें आकलन होणार नाहीं यासाठीं इतिहासास उपकारक अशा अभ्यासपद्धतींचें विहंगमावलोकन येथें अवश्य आहे. वेद हें आपलें प्रथमचें इतिहाससाहित्य होय. त्या साहित्याचा उपयोग भारतीय परिस्थिति जाणण्याकडे आपण करूंच करूं, तथापि वेदमंत्ररचनेच्या कालाच्या पूर्वींचीहि परिस्थिति शोधून काढण्यासाठीं त्या साहित्याचा कसा काय उपयोग होईल याची कल्पना आपणास पाहिजे. वेदांचा अभ्यास आपणाकडे नवा नाहीं. वेदकाल म्हणून ज्या कित्येक शतकांस अगर सहस्रकांस आपण उल्लेखितों, त्या कालींच स्वकालीन साहित्याचा अभ्यास मोठ्या जोरानें चालू असे. त्याशिवाय संहिता नांवाचीं जुडगीं वांधणें, त्यांचें अक्षरमात्र भ्रष्ट न व्हावें यासाठीं प्रातिशाख्यें तयार करणें, कल्पसूत्रें, ज्योतिष इत्यादि शास्त्रांचा पाया घालणें, या क्रिया वेदरचनेच्या अंतिमकालीं होतच होत्या. पण त्या वेळच्या अभ्यासांत आणि आजच्या यूरोपीयांच्या अभ्यासांत मुख्य फरक हा आहे कीं, आपल्याकडील अभ्यास उत्तरकालावर दृष्टि ठेवून झाला, व यूरोपीयांच्या अभ्यासास चोदना पूर्वकालावरील दृष्टीमुळें झाली आहे. उत्तरकालीन क्रियांचें, मतांचें व आचारांचें परीक्षण, खंडन व मंडन करणें आणि त्यांची वेदांशीं संगति ठेवणें हेंच कार्य करण्यांत आपलें पाण्डित्य गुंतलें होतें. आपल्याकडील रा. वाळ गंगाधर टिळक वगळले असतां इतर पंडितांची, उदाहरणार्थ वेदार्थयत्नकारासारख्यांची, दृष्टि उत्तरकालीन क्रियांशीं वेदाची संगति किंवा असंगति शोधण्याकडेसच विशेष होती. कै. शंकर पांडुरंग पंडित यांच्या अंतःकरणांत चिकित्सकबुद्धीपेक्षां श्रद्धेचा विकास अधिक झाला होता असें दिसतें. यज्ञकर्म विधिपूर्वक करतां न आल्यामुळें यज्ञ करतेवेळेस जी कामना मनांत असेल तिची प्राप्तिहि होत नाहीं, अशी या भोळ्या ब्राह्मणाची समजूत वेदार्थयत्नांत व्यक्त होते. पाश्चात्यांची दृष्टि मूलतःच वाह्यांची. आजचे आपण व आजचे पाश्चात्य हे एकमेकांपासून फार दूर आहों. आपले पूर्वज त्यांच्या पूर्वजांचे वंधु होते. अर्थात् त्यांना जितकें प्राचीन अधिक सांपडेल तितकें अधिक महत्त्वाचें, कां कीं त्याच्या योगानें त्यांच्या पूर्वजांची त्यांना अधिक ओळख होते. या त्यांच्या बुद्धीनें त्यांच्या वेदाभ्यासास अगदीं निराळें स्वरूप मिळालें. प्राचीनवस्तुसंशोधनाचें वेद हें अत्यन्त महत्त्वाचें साहित्य वनलें. त्यांस वेदावरून जिची कल्पना येईल ती वेदपूर्वकालीन स्थिति ज्ञातव्य आहे आणि तें ज्ञातव्य शोधण्यासाठीं जीं शास्त्रें उत्पन्न झालीं त्यांत वेदान्तर्गत शब्द, व्याकरण, आचार, वस्तु इत्यादि सर्वांचा उपयोग होतो.

ज्याप्रमाणें अग्नि, पुरोहित, यज्ञ, देव, रत्न इत्यादि शब्द ऋग्वेदकालीं असून देखील आजच्या मराठींत टिकले आहेत, उपवासाचे नियम सामान्यपणें यज्ञसंस्था वृद्धिंगत पावलेल्या ब्राह्मणकालापासून आतांपर्यंत अव्याहत चालत आले आहेत, आणि देवांचें स्वरूप वदललें तरी विष्णु, शिव इत्यादि नांवें वेदकालापासून आतांपर्यंत देवनामें म्हणून टिकलीं आहेत, त्याचप्रमाणें वेदवक्त्या ऋषींचे पूर्वज त्यांच्यापासून हजारों वर्षांनीं वियुक्त अशा वेदपूर्वकालाचे शब्द आणि आचार उपयोगांत आणीत नसतील असें कशावरून? आणीत असतीलच. अशा विचारसरणीनें भारतीय वेदकालापेक्षां अत्यंत प्राचीन कालाच्या इतिहासाचे अवशेष वेदांत सांपडले तर ते शोधावेत आणि त्यांचा प्राचीनतम यूरोपीय कालांतील अवशेषांशीं संवंध जोडावा अशी कल्पना उत्पन्न झाली व प्रत्येक देशांतील प्राचीन अवशेष शोधण्याचा आणि त्या अवशेषांची परस्परांशीं तुलना करून सर्वांस सामान्य असें प्राचीन काय होतें तें काढण्याचा उपक्रम युरोपांत सुरू झाला. पारशांच्या प्राचीन ग्रंथांचा अभ्यास तौलनिक पद्धतीनें सुरू झाला. केवळ शब्दांचीच तुलना झाली असें नाहीं; तर देवस्वरूपांची तुलना झाली, सामान्य आचारविचार काय होते हें काढण्यासाठींहि परिश्रम झाला. देवविषयक आख्यानें व कथासूत्रें एकमेकांपाशीं मांडून तोललीं गेलीं, आणि निरनिराळ्या भाषांची अन्तर्गत रचना म्हणजे व्याकरण शोधिलें जाऊन या निरनिराळ्या भाषांचें सादृश्य अथवा असादृश्य यांवरून त्यांचें मूलस्वरूप काय असावें याचा विचार होऊं लागला, आणि सर्व आर्यन् लोकांची म्हणजे भारतीय, इराणी व यूरोपीय यांच्या पूर्वजांची भाषा कशी काय असावी तिची कल्पनेनें मांडणी करण्यापर्यंत मजल गेली. सर्वांचें मूलगृह कोठें असेल, ते कोणत्या कालीं एकत्र असतील, याचा विचार सुरू झाला; आणि मूलगृह एकत्र होतें अशी कल्पना मनांत धरून त्या कालापासून भारतीय कालापर्यंत जो काल लोटला त्या कालाचे तीन विभाग कल्पिले गेले.

१ मूलगृहकाल म्हणजे ज्या वेळेस यूरोपीय, इराणी व भारतीय या सर्वांचे पूर्वज एकत्र होते तो काल. या कालास 'इंडोयूरोपिअन पीरिअड' (Indo-European Period), किंवा 'इंडोजर्मानिक पीरिअड' (Indo-Germanic Period) किंवा 'आर्यन् पीरिअड' (Aryan Period), अशीं नांवें

वापरण्याचा प्रघात आहे. या तीन नांवांपैकीं 'इंडोयूरोपिअन पीरिअड' हें नांव वापरण्याची इंग्रज, फ्रेंच व अमेरिकन लोकांस, आणि 'इंडोजर्मानिक पीरिअड' हें नांव वापरण्याची जर्मन पंडितांस आवड दिसते.

(२) दुसरा काल म्हटला म्हणजे पर्शुभारतीय काल. यालाच 'इंडोइरेनिअन पीरिअड' (Indo-Iranian Period). असें नांव पाश्चात्य शास्त्रज्ञ देतात. या कालाची परिस्थिति अजमावण्यासाठीं साधारणपणें तीन साहित्यांचा उपयोग करण्यांत येतो. त्यांपैकीं पहिलें वेद, दुसरें पारशांचे धर्मग्रंथ आणि तिसरें डरायस हेस्टासस याचे बेहिस्तान येथील त्रिकोणयुक्ताक्षरी शिलालेख. शिवाय पुस्तु व ग्रियर्सननें पिशाच असें नांव दिलेल्या ज्या भाषा त्यांचेंहि साहित्य उपयोगिलें जातें.

(३) या पर्शुभारतीय कालानंतरचा काल तो वेदकाल. वरील दोन कालांशीं त्याचें पृथक्त्व व सादृश्य दाखविण्यासाठीं पाश्चात्य पंडित त्यास 'इंडोआर्यन् पीरिअड' (Indo-Aryan Period) असें नांव देतात.

'इंडोयुरोपिअन पीरिअड' म्हणजे मूलगृहकाल. यांतील शोधाचे तीन वर्ग करतां येतील.

(१) स्थानशोधनार्थ अभ्यास.
(२) मूलगृहींच्या वसतीचा काल शोधण्यास केलेला अभ्यास.
(३) तत्कालीन स्थिति शोधण्यास केलेला अभ्यास.

पहिल्या प्रकारचा अभ्यास ग्रांथिक अभ्यासाशीं असंबद्ध अशा अनेक शास्त्रांशीं व अभ्यासांशीं संबद्ध आहे. प्राणिशास्त्रांत इ. स. १८३९ सालीं डार्विन यानें 'जातिजनन' (Origin of Species) या नांवाचा ग्रंथ लिहून शास्त्रज्ञांची अशी खात्री करून दिली कीं, वायव्य, आरण्य आणि जलविहारी प्राण्यांच्या जाती कांहीं कायमच्या बनलेल्या नाहींत. परिस्थितीचा परिणाम होऊन व पूर्वकालीन अनेक जातींत फरक होऊन त्यांच्या पृथक् जाती बनल्या. त्याच ग्रंथकारानें पुढें 'मानवोत्पत्ति' (Descent of Man) या नांवाच्या ग्रंथामध्यें आपलें म्हणजे मनुष्यजातीचें वानराशीं नातें सिद्ध केलें. मनुष्य पूर्वींच्या मनुष्येतर प्राण्यापासून जन्मला आहे, एवढें ठरल्यानंतर त्याची उत्पत्ति एका प्राण्यापासून झाली कीं अनेक प्राण्यांपासून झाली या तऱ्हेचा वाद पुढें उपस्थित झाला. या वादामध्यें मनुष्य एका प्राण्यापासून उत्पन्न झाला असें सिद्ध झालें आहे, हें कबूल करण्याची इच्छा किंवा हें कबूल करण्याइतकी खात्री सर्व शास्त्रज्ञांची अजून झालेली नाहीं. अनेक प्रकारच्या प्राण्यांपासून मनुष्य झाला असा आग्रह धरणारे ग्रंथकार अमेरिकेंत इतर देशांपेक्षां फार अधिक आहेत; पण त्या देशांत गोरा आणि नीग्रो यांमध्यें तीव्र द्वेष असल्यामुळें अनेकसंभव मताचा पुरस्कार जो तेथें होतो तो केवळ शास्त्रीय जाणिवीनेंच होतो अशी आमची खात्री पटत नाहीं. असो. मनुष्य एकसंभव असो अगर अनेकसंभव असो, अनेकसंभव मताचा आग्रह धरणारे लोकहि १०।१२ प्राण्यांपासून मनुष्य विकासला असें म्हणत नाहींत. त्यांचें एवढेंच म्हणणें आहे कीं, 'काला अदमी' आणि 'गोरा अदमी' निरनिराळ्या मनुष्यपूर्वजातींपासून विकासले गेले असावेत. असो.

आतां कांहीं मानवविषयक शास्त्रांचें सामान्य स्वरूप पाहूं. मनुष्यप्राण्याच्या उत्पत्तीपासून आजतागाइतपर्यंत मानवेतिहासविषयक जीं शास्त्रें तयार झालीं त्यांपैकीं वरींचशीं शास्त्रें भारतीय संस्कृतीच्या अभ्यासास लावलीं गेलीं आहेत; म्हणून भारतीय संस्कृतीच्या अभ्यासास आज हात घालूं पहाणारानें या शास्त्रांचें सामान्य स्वरूप प्रारंभींच लक्षांत घेतलें पाहिजे; नाहीं तर आपणाविषयीं झालेलें एकंदर संशोधन त्यास नीट समजणारच नाहीं.

**मानववंशशास्त्रः**—या शास्त्राचें ध्येय मनुष्यांच्या आज अस्तित्वांत असलेल्या अनेक जातींची पहाणी करून त्यांचें वंशवृद्धिबोधक वर्गीकरण करणें. मनुष्यप्राणी विकास पावल्यानंतर आणि त्याचा कांहींसा मोठा जमाव झाल्यानंतर भक्ष्यशोधार्थ म्हणा कीं अन्य कारणार्थ म्हणा त्याच्या टोळ्या इतस्ततः भ्रमण करूं लागल्या. दोन टोळ्यांमध्यें जसजसें प्रादेशिक अंतर पडे, तसतसें त्यांच्यामध्यें भाषाविषयक, आचारविषयक, खाद्यपेयविषक, वस्त्रविषयक, भूषणविषयक अंतर पडत जाई. यामुळेंच विविध संस्कृति जन्मास आल्या. मानववंशशास्त्राचें हें ध्येय आहे कीं, मनुष्यांच्या टोळ्या तपासून आणि उपर्युक्त दृष्टींनीं त्यांचें वर्गीकरण करून त्यांच्या प्रसाराचा व मिश्रीकरणाचा इतिहास लावणें. या मानववंशशास्त्रासंबंधानें पाश्चात्यांत दोन शब्द प्रचारांत आहेत, एक शब्द अन्थ्रोपॉलॉजी (Anthropology) 'मानवशास्त्र' आणि दुसरा शब्द एथ्नॉलॉजी (Ethnology) 'वंशशास्त्र'. हे दोन शब्द शास्त्रज्ञांच्या स्थानभेदामुळें उत्पन्न झाले आहेत आणि दोन्ही शब्द कायम राखून प्रत्येकास कांहींतरी अभ्यासक्षेत्र वांटून देण्याची निरर्थक तडजोड सध्यां चालू आहे. आपण मानववंशशास्त्र हा एकच शब्द वापरूं आणि वर सांगितलेले दोन्ही शब्द गुंडाळून ठेवूं.

मानववंशशास्त्र व मानवेतिहास हें फार मोठें शास्त्र झालें. याला साहाय्यक अशीं अनेक शास्त्रें अस्तित्वांत आलीं आहेत. एक भाषाशास्त्र घ्या. निरनिराळ्या जाती व राष्ट्रें निरनिराळ्या भाषा बोलतात. त्यांपैकीं कांहीं भाषा इतर भाषांपेक्षां परस्परांशीं अधिक सदृश असतात. हें सादृश्य दोन तऱ्हेचें असतें. एक भाषान्तर्गत शब्दांचें सादृश्य आणि दुसरें भाषेच्या अन्तर्रचनेचें म्हणजे व्याकरणाचें सादृश्य. या दोन सादृश्यांनां यूरोपीयांनीं आज दोन निरनिराळीं नांवें दिलीं आहेत. 'फिलालॉजी' (Philology) म्हणजे शब्दशास्त्र व 'लिंग्विस्टिक्स्' (Linguistics) म्हणजे भाषाशास्त्र अथवा निरनिराळ्या भाषांतील व्याकरणांचें शास्त्र. यास प्रसंगीं

तौलनिक व्याकरण म्हणजे 'कंपॅरटिव्ह ग्रामर' (Comparative Grammar) असेंहि म्हणतात. वेदाच्या अभ्यासास हीं दोन्हीं शास्त्रें उपयोगिलीं गेलीं आहेत.

मानववंशशास्त्रामध्यें शोध करण्यासाठीं जें साहित्य जमा झालें त्याचें एक अंग म्हटलें म्हणजे मनुष्याचें शरीरस्वरूप होय. शरीरस्वरूपावरून मनुष्याचें वर्गीकरण करून त्यांतील मोठ्या फरकांवरून मोठे समुच्चय आणि लहान फरकांवरून लहान समुच्चय वसविले आहेत. मोठ्या फरकांवरून मनुष्याचें आद्य दूरीकरण अनुमानावयाचें आणि लहान फरकांवरून उत्तरकालीन दूरीकरणें अनुमानावयाचीं अशी सामान्य कल्पना मनांत धरून मनुष्यांच्या शारीरिक फरकांच्या अभ्यासास आणि तज्जन्य वर्गीकरणास ऐतिहासिक अर्थ व महत्त्व दिलीं गेलीं आहेत. 'आर्यन्' लोकांचा मूलगृहकाल आणि त्यांचें मूलगृहस्थान शोधण्यासाठीं जी खटपट चालू आहे, त्या खटपटीचा हेतु हाच कीं, मनुष्याच्या निरनिराळ्या जातींचें जें दूरीभवन झालें त्या दूरीभवनाचा इतिहास सांपडावा. हा इतिहास शोधण्यांत शारीरिक स्वरूप, भाषा, दैवतें, समजुती, आचार आणि पुराणकालीन कथा या सर्वांचा उपयोग केला आहे.

**आर्यन् व आर्यः**—आम्हीं वर 'आर्यन्' शब्द वापरला आहे, तो मुद्दाम वापरला आहे. आर्य हा शब्द वापरला असतां वाचकांचा घोंटाळा होईल. आर्य या शब्दाचा अर्थ पाश्चात्यांनीं फिरविला आहे. ऋग्वेदकालीन लोक आपणांस आर्य म्हणवीत. जो शब्द वंशवाचक आहे पण राष्ट्रवाचक नाहीं आणि अशा प्रकारच्या शब्दांत जो फार जुना असून ज्यास गौरव प्राप्त झालें आहे असा शब्द हाच. या कारणानें यूरोपीयांनीं आर्य शब्दाची अर्थकक्षा वाढवून आर्य नांवानें संबोधिलेल्या जातींत अगर वर्गांत आपल्या पूर्वजांचा समावेश करून घेतला आहे. यूरोपीय लोकांचा आर्य (आर्यन्) शब्दाचा अर्थ, संस्कृत भाषेशीं जिचें वहिणीचें अगर चुलत वहिणीचें अगर चुलतचुलत पुतणीचें किंवा चुलतचुलत चुलत नातवंडाचें किंवा पगतवंडाचें नातें जोडतां येईल अशा भाषा केवळ आनुवंशानें बोलणाऱ्या जातींचा समुच्चय असा आहे. हा अर्थ व्यक्त करण्यासाठीं आम्ही त्यांनींच वापरलेला शब्द 'आर्यन्' हा योजीत आहों. आणि हा भेद पूर्वीं डॉ. केतकर यांच्या (Ketkar's History of Caste in India) जातिभेदाच्या इतिहासांत वापरला आहे. आपल्याकडील आर्य शब्दाचा अर्थ निराळा आहे. वैदिक सूक्तें जे लोक बरोबर घेऊन आले ते लोक आपणांस आर्य म्हणवीत. आर्य हा शब्द जातिवाचक होता अशी अजून कोणाचीच खात्री नाहीं. शिवाय या शब्दाचा पुढें पुढें तर सभ्याचारयुक्त मनुष्य म्हणजे 'जंटल्मन्' असा अर्थ झाला आहे. तरी जेथें जेथें 'आर्यन्' हा शब्द येईल तेथें त्याचा पाश्चात्यांनीं केलेला अर्थ म्हणजे भारतीय, इराणी व यूरोपीय यांचे पूर्वज एकत्र रहात होते तत्कालीन लोक किंवा त्यांचे सर्व वंशज असा समजावा व त्या शब्दाचा वास्तविक आर्य शब्दाशीं घोंटाळा करूं नये.

'आर्यन्' लोकांचें मूल वसतिस्थान कोठें होतें हें 'आर्यन्' लोकांच्या एकंदर सांस्कृतिक परिस्थितीच्या ज्ञानाशिवाय समजणार नाहीं. आणि तो काल कोणता असावा हें ठरविणें ही तर अधिकच कठिण गोष्ट होय. म्हणून मूलगृहाचा व मूलकालाचा विचार प्राचीन परिस्थितीच्या सामान्य कल्पना दिल्यानंतर करावा लागेल.

**तौलनिक दैवतशास्त्र व दैवतेतिहासः**—वेदाभ्यासासाठीं उपयोगास आणलेलें दुसरें एक महत्त्वाचें शास्त्र म्हटलें म्हणजे 'तौलनिक दैवतशास्त्र व दैवतेतिहास' हें होय.

शास्त्र व इतिहास या दोन शब्दांची दुक्कल येथें ठेवण्याचें कारण हे दोन अभ्यास विशेष परस्परावलंबी व अन्योन्याश्रयी आहेत हें होय. पूर्वेतिहास केवळ तुलना करून काढावयाचा असतो म्हणजे दैवतेतिहासार्थ अत्यंत प्राचीन काळापर्यंत गेलें तर दैवतांच्या साहाय्याखेरीज अर्थात् तौलनिक दैवतशास्त्राखेरीज दुसरें साधन नसतें; आणि दैवतांच्या तुलनेचा म्हणजे दैवतशास्त्राचा अंतिम हेतु दैवतेतिहास हाच असतो. परंतु या दोन परिश्रमांत स्वरूपाचें पृथक्त्व आहे व हें पृथक्त्व दाखविण्यासाठींच नामपृथक्त्व रक्षिलें आहे. आपणांस साधारणतः असें आढळून आलें आहे कीं, एक देवतेची उपासना अनेक लोकांत पसरते. आणि एका दैवतसमुच्चयांत दुसऱ्या लोकांचीं दैवतें चोरून मारून किंवा राजरोस शिरतात. या दैवतेतिहासासाठीं किंवा तौलनिक दैवतशास्त्रासाठीं ज्या दैवतांची तुलना करावयाची तीं दैवतें एका वंशांतील भिन्न झालेल्या राष्ट्रांचीं म्हणजे भाऊबंदांचींच केवळ घेऊन चालत नाहीं, तर भाऊबंदांचीं व शेजाऱ्यांचीं अशीं दोघांचींहि दैवतें तपासावीं लागतात. प्राचीन असुरांच्या राष्ट्राचा अंतर्भाव 'इंडोजर्मानिक' समुच्चयांत करीत नाहींत, तथापि प्राचीन इराणांतील दैवतांचा अभ्यास करीत असतांना इराणच्या दैवतांची तुलना जशी भारतीय व यूरोपीय दैवतांशीं करावी लागते तशीच असुरांच्या दैवतांशींहि करावी लागते. असुर लोकांचीं दैवतें कांहीं वेदग्रंथांत शिरलीं आहेत असा संशय रा. बाळ गंगाधर टिळक यांनीं आपल्या भांडारकरांच्या स्मारक ग्रंथांतील लेखांत व्यक्त केला आहे.

दैवतशास्त्राचें एक महत्त्वाचें अंग आहे. त्या अंगास आपण 'अवस्त्वास्तिक्यशास्त्र' असें म्हणूं. अवस्त्वास्तिक्यशास्त्र हा शब्द (Mythology) मायथॉलॉजी या गचाळ शब्दानें जें क्षेत्र अंधुकपणें दर्शविलें जातें त्याची कक्षा निश्चित करून त्या निश्चित क्षेत्राच्या अभ्यासास लाविला आहे. भावरूप अगर क्रियारूप अशा अनेक गोष्टी कांहीं कालानें लोकांच्या कल्पनेंत भौतिक व्यक्तीचें स्वरूप पावतात. तसेंच

विशिष्ट गुणांचा आणि क्रियांचा कल्पनानिर्मित व्यक्तीच्या ठिकाणीं आरोप करण्यांत येतो. हा भौतिकरूपाश्रय कधीं कधीं अज्ञानमूलक असतो आणि कधीं कधीं रूपकमूलक असतो. प्रत्येक क्रियेस अधिष्ठात्री कोणीतरी देवता आहे अशा समजुतीनें केव्हां केव्हां हा प्रकार घडतो. आणि कधीं कधीं कायद्याचा अधिकार आणि जबाबदारी यांचें आश्रय-स्थान होऊं शकेल अशी व्यक्ति बुद्धिपुरःसर कल्पिली जाते. सूर्यतेज आणि उषःकाल यांचे ठिकाणीं देवताबुद्धि उत्पन्न झाली, हें परिवर्तन वरील एका नियमाचेंच बोधक आहे. एखाद्या क्रियाकलापांतर्गत एका भावमय वस्तूस आपण देवता आहे असें समजलों म्हणजे तो क्रियासमूह त्या देवतेचीं कार्यें आहेत असें वाटावयास लागतें. आणि त्या क्रियासमूहामध्यें भावरूप कल्पनांच्या ऐवजीं अनेक भौतिक वस्तू असल्या म्हणजे तेथें कथासूत्रहि सुरू होतें. उदाहरणार्थ, सूर्य हा प्रेम करणारा आहे आणि तो उषासुंदरीच्या पाठीस लागला आहे अशी कल्पना उत्पन्न होते. कालांतरानें या गोष्टींचा विकास होऊन लांबलचक कथा बनतात. त्या कथांमध्यें कधीं कधीं मानवी कोटींतील आणि कधीं कधीं अद्भुत कोटींतील क्रिया आणि अंगें निर्माण होतात; आणि कालांतरानें मूळाची विस्मृति पडून त्या अद्भुत चमत्कार करणाऱ्या ऐतिहासिक व्यक्तीच होत्या कीं काय असें लोकांस वाटूं लागतें. प्रस्तुत शास्त्राचा उद्देश हाच कीं आजच्या अद्भुत गोष्टी व कथानकें घेऊन त्यांचें अवस्तुरूप म्हणजे भावरूप अगर क्रियारूप मूळ शोधीत जावयाचें. या शास्त्राची तौलनिक शाखा वेदाभ्यासानें वृद्धिंगत झाली आहे. 'ज्युपिटर,' 'युरेनस' इ. देवतांचें व तत्संबंधीं कथांचें आदिसूत्र शोधण्यासाठीं इराणी व भारतीय वाङ्मयाकडेच यावें लागेल. कारण आमच्या वाङ्मयाच्या प्राचीनतम भागांत अवस्तूंस आस्तिक्य पूर्णपणें आलेलें नाहीं. वेदकालीन दैवतविषयक कथानकांतील रूपकें द्राक्षालचेइतकीं पारदर्शक आहेत; आणि त्यांचा अभ्यास आपणास जितका फलप्रद आहे तितकाच तो यूरोपीयांसहि आहे.

**संस्कृतींचा तौलनिक अभ्यासः**—हा एक महत्त्वाचा विषय आहे. कोणत्याहि संस्कृतीच्या स्वरूपाचा निश्चय तिच्या प्राचीन कालींच झालेला असतो आणि यासाठीं तौलनिक अभ्यास करतांना निरनिराळ्या संस्कृतींचें प्राचीन स्वरूपच तुलणें अवश्य असतें. हें प्राथमिक स्वरूप फारसें गुंतागुंतीचें नसतें. ज्या अनेक संस्कृती एकमूल असतील त्यांचें सादृश्य त्यांच्या प्राथमिक रूपांत सांपडतें आणि एका सामान्य संस्कृतीपासून भिन्न संस्कृती कसकशा होत गेल्या यासंबंधींचे नियम या अभ्यासानें कळतात. भारतांतील आचारविचार, वेष, शासनसंस्था, कुटुंबघटना यांची प्राचीनतम इराण व यूरोप यांच्या प्राचीन-तम अवशेषांशीं तुलना केली असतां आपणास एक बराच महत्त्वाचा इतिहास-भाग उपलब्ध होणार आहे. शब्द व आचार यांचीं तुल्यें जितकीं अधिक सांपडतील तितका हा वर झालेलें संशोधन अभ्यास अधिक परिपक्व होईल. या संबंधाचा परिश्रम जोरानें चालू आहे.

तुलनात्मक भाषाशास्त्राच्या दृष्टीनें प्राचीनतम गोष्टींची चिकित्सा करितेवेळीं नुसत्या शब्दसादृश्यावरच भर न देतां पूर्वकालीन वस्तूंचे, आचारांचे आणि कल्पनांचे जे अवशेष आजमितीस सांपडतात त्यांच्याकडेहि वेळोवेळीं लक्ष पुरविणें जरूर आहे हें वर सांगितलेंच आहे. असें लक्ष पुरविलें तरच भाषाशास्त्राचे ऐतिहासिक शोध टिकाऊ व उपयुक्त होतील. या दृष्टीनें पहातांना 'इंडोयुरोपीय' लोकांच्या प्राक्कालीन इतिहासाचें संशोधन करतेवेळीं तुलनात्मक भाषाशास्त्रा-बरोबरच पुराणवस्तुशास्त्राचाहि विचार चुकवितां येणार नाहीं. हें पुराणवस्तुशास्त्र अद्यापि बाल्यावस्थेंत आहे. या शास्त्राचा विषय म्हटला म्हणजे पूर्वीच्या काळच्या निरनिराळ्या राष्ट्रांच्या जुन्या संस्था, चालीरीती, इत्यादिकांचें तुलनात्मक परीक्षण करून त्या राष्ट्रांत सामान्य अशा चालीरीती कोणत्या आढळतात, कोणत्या चालीरीती प्राचीनतम माणसांपासून चालत आलेल्या आहेत याचा निर्णय करणें हा होय.

मूलगृहकाल म्हणजे प्राचीन 'इंडोयूरोपिअन पीरिअड' या शब्दसमूहानें 'इंडोयूरोपीय' राष्ट्रें ज्या वेळीं साधारणतः एकच भाषा बोलत होतीं, त्यांची संस्कृति ज्या कालांत साधारणतः एकच दर्जाची होती तो काळ हा अर्थ विवक्षित आहे. मूलगृहीं असतांना त्यांच्यामध्यें अंतःस्थ काय भेद होते, मूलगृहकक्षेंत असतां हे लोक एकाच शासनसंस्थेखालीं होते कीं अनेक शासनसंस्थांखालीं होते हें आज पुराव्यानें सिद्ध झालेलें नाहीं. मोठा मनुष्यसमूह असला तर तो अनेक शासन-संस्थांखालीं असतो आणि ठोकून ठोकून एकत्र केल्याखेरीज तो एकराष्ट्रांतर्गत होत नाहीं ही स्वाभाविक प्रवृत्ति असल्या-मुळें एका प्रदेशावर लहानलहान टोळ्यांचीं, गांवांचीं अनेक स्वतंत्र राष्ट्रकें होतीं असें गृहीत धरलें पाहिजे. मूलगृहींचा 'आर्यन्' समाज हा एक राष्ट्र किंवा राष्ट्रसंघहि नसून एक-मेकांशीं बद्ध नसलेल्या राष्ट्रांचा समुच्चय होता ही कल्पना तिजविरुद्ध भक्कम पुरावा सांपडेपर्यंत गच्च धरून बसलें पाहिजे.

सांस्कृतिक स्थिति शोधावयाची तर संस्कृतीचीं अनेक अंगें म्हणजे खाद्यपेय, वस्त्रें, विभूषणें, गृह आणि तदनुषंगानें वायव्य, आरण्य व ग्राम्य पशु, मनुष्यमनुष्यांचा संबंध आणि तदनुषंगानें विवाह, व्यापार व राज्यव्यवस्था आणि समाज-व्यवस्था यांचा विचार केला पाहिजे. मानवी कार्यक्रमांत निश्चितता आणण्यासाठीं केलेल्या कालमानादि गोष्टींकडे पाहिलें पाहिजे. तसेंच मेलेले लोक उर्फ पितृगण, देव, दैवतें यांच्या विषयींच्या कल्पनांनीं त्यांचें आयुर्नियमन कितपत होत होतें हेंहि पाहिलें पाहिजे.

**भारतेतिहासाभ्यासास साहित्यः**—मूलगृहकाला-पासून तों अल्पप्रमाणानें द्यावयाचें म्हटलें तरी

त्याचें स्वतंत्रपणें विवेचन पाहिजे. असें विवेचन प्रारंभींच देणें अप्रस्तुत होईल म्हणून त्या खटाटोपांत आम्ही सध्यां पडत नाहीं. या अभ्यासाचीं जीं अनेक अंगें आहेत त्यांची सामान्य कल्पना आतांपर्यंत दिलेल्या माहितीवरून वाचकांच्या लक्षांत येईलच. आतां भारतीय इतिहासाचें अध्ययन करण्यासाठीं उपांगें म्हणून ज्या शास्त्रांची वृद्धि झाली आहे त्यांची सामान्य कल्पना येण्यासाठीं यादीच्या रूपानें कांहीं माहिती खालीं देतों. या यादीच्या योगानें आपली कल्पना विस्तृत होईल. तथापि ही यादी संपूर्ण आहे असें मात्र समजूं नये.

(१) भाषांचा तौलनिक अभ्यास. यांत वेदभाषा, संस्कृत, यूरोपांतील जुन्या भाषा आणि इराणी जुन्या भाषा यांचा उपयोग वेदकालपूर्वस्थिति काढण्यासाठीं करावयाचा.

(२) संस्कृत भाषेचा ऐतिहासिक अभ्यास. वेदकालांत कोणते शब्द प्रचलित होते, पाणिनीस कोणते शब्द ठाऊक होते, वेदकालीं शब्दांचा अर्थ काय होता, पाणिनिकालीं काय होता, अर्थात फरक झाला असल्यास त्यास सामाजिक कारणें काय झालीं, इत्यादि गोष्टींचा अभ्यास.

(३) वेदभाषा, संस्कृत, प्राचीन प्राकृत भाषा आणि अर्वाचीन भाषा यांचा तौलनिक अभ्यास. यावरून भाषांच्या अपभ्रंशांचे नियम, लोकांचें इतस्ततः भ्रमण, इत्यादि काढतां येईल.

(४) हिंदुस्थानांतील स्थावर आणि जंगम लिखाणांचा अभ्यास. हा अभ्यास अनेक तऱ्हांनीं करतां येईल. यांचा भाषेच्या दृष्टीनें अभ्यास केला तर वर सांगितलेल्या भाषांच्याच अभ्यासाचा कांहीं अंशीं हा एक भाग होईल, तथापि लिखाणविषयक अभ्यासाची व्याप्ति तेवढीच नाहीं. हिंदूंचीं व हिंदुस्थानाचीं लिखाणें केवळ संस्कृतसंभव भाषांतच नाहींत. हिंदुस्थानांतील द्राविडी भाषांत व इतर बाहेरच्या भाषांत देखील लिखाणें आहेत. त्याप्रमाणेंच हिंदुस्थानाच्या बाहेर हिंदु संस्कृति जेथें गेली आहे तेथील लिखाणें संस्कृत किंवा स्थानिक भाषांतून आहेत. यामुळें लिखाणांचा अभ्यास करण्यासाठीं अनेक भाषांचा अभ्यास भारतीय इतिहासाच्या अभ्यासकास उपयुक्त आहे. याशिवाय लिखाणें एकाच लिपींत नसून अनेक प्रकारच्या लिपींत लिहिलीं किंवा कोरलीं गेलीं आहेत आणि यामुळें लिपींचा अभ्यास हाहि एक महत्त्वाचा अभ्यास होऊन बसला आहे.

(५) लिखाणांच्या अभ्यासाशीं संबद्ध असा दुसरा एक अभ्यास म्हटला म्हणजे "मुद्राविज्ञान" होय. आजपर्यंत निरनिराळीं राजघराणीं होऊन गेलीं. त्यांच्या मुद्रांचे उर्फ नाण्यांचे अवशेष आज शिल्लक आहेत, तेहि एक अभ्यासाचा मोठा विषय झाले आहेत.

(६) भारतीय अभ्यासाचा आणखी एक भाग म्हटला म्हणजे संस्कृत भाषेशीं असंबद्ध अशा भारतांतील आणि भारतीय संस्कृतीचा ज्यांवर परिणाम झाला त्या प्रदेशांतील भाषांचा अभ्यास होय. द्राविडी भाषांचा अभ्यास आणि पूर्वेकडील ज्या प्रदेशांत भारतीयांच्या वसाहती झाल्या तेथील भाषांचा अभ्यास या वर्गांत मोडतो. नवीन शब्द संस्कृत भाषेंतून इतर भाषांत ज्याप्रमाणानें अधिक जातात त्या प्रमाणानें त्या देशांत भारतीय संस्कृतीचा विकास कितपत झाला याचें मोजमाप करतां येतें. शिवाय संस्कृत भाषेचा अपभ्रंश दाखविणारे शब्द तेथें आढळले तर त्यांचें हिंदुस्थानांतील अपभ्रंशांशीं नातें जोडतां येतें, आणि त्यामुळें हिंदुस्थानांतील कोणते लोक तिकडे गेले, कोणत्या प्रांतांतून गेले, कोणत्या काळीं गेले, कोणत्या मार्गानें गेले इत्यादि प्रश्न सोडविण्यास मदत होते. तसेंच भाषांतील वाङ्मयहि पाहिलें पाहिजे. कारण त्या वाङ्मयांत भारतीय वाङ्मयाचीं रूपांतरें किंवा अवस्थांतरें दृष्टीस पडतात.

(७) मानववंशशास्त्रात्मक अभ्यास. हा भारतीय अभ्यासाचें एक महत्त्वाचें अंग आहे. जातींचीं नांवें, गोत्रांचीं नांवें, देवदेवकांचीं नावें, कुलदेवता इत्यादि फार प्राचीन कालाची स्थिति दाखविणारें साहित्य आपल्या देशांत इतर देशांपेक्षां अधिक आहे. या सर्व गोष्टींचा उपयोग करून आणि शरीरावयवांचीं मापें वगैरे साहित्य वापरून भारतीयांच्या पूर्वपरंपरेचे धागे जोडणें हेंहि महत्त्वाचें काम आहे.

(८) दैवतें, कल्पना, विचार, तत्त्वज्ञान इत्यादि साहित्याचा अभ्यास करून त्यांचा इतिहास तयार करणें हें आणखी एक महत्त्वाचें कार्य आहे. तसेंच भारतांत जीं अनेक शास्त्रें प्रकट झालीं त्यांचा इतिहास जुळविणें हें एक काम आहे. शिवाय, वास्तुसौंदर्याच्या भारतांतील कल्पना आणि बाहेरील कल्पना यांची संगति लावण्याचें काम आहे. संगीत, वैद्यक इत्यादि कलांचा अभ्यास आपणांस अवश्य आहे. हा एकंदर अभ्यास करण्याचे प्रकार दोन आहेत. भारतीयांनीं केलेल्या अभ्यासाचा हिशोब घेणें हा एक प्रकार होय; आणि भारतीयांनीं जतन केलेलें साहित्य वापरून त्याचा आजच्या वाढलेल्या शास्त्रीय पद्धतीनें उपयोग करणें हा दुसरा प्रकार होय. संस्कृत भाषेच्या अभ्यासासाठीं पाणिनीसारख्या आपल्या वैयाकरणांनीं सांगितलेले व्याकरणाचे नियम लक्षांत घ्यावयाचे, आणि त्या वैयाकरणांच्या खटपटीचा इतिहास तयार करावयाचा हा पहिला प्रकार होईल. दुसरा प्रकार म्हटला म्हणजे संस्कृत भाषेचे नमुने घेऊन आपण स्वतंत्र व्याकरण बनवावयाचें हा होय. या दुसऱ्या प्रकारानें पाणिनीनें वेदांचा अभ्यास केला. पाणिनीपेक्षां देखील आजच्या पाश्चात्य पंडितांकडून असा अभ्यास अधिक झाला आहे. या नवीन प्रकारच्या अभ्यासानें जुन्या अभ्यासाचें अधिक संवर्धन होतें; आणि

जुन्या अभ्यासपद्धतीची परंपरा बरीच कायम राहून तींत इष्ट असे फेरबदल होतात. असो.

श्रुतिस्मृतिपुराणादिग्रंथांतर्गत भाषांचें, कल्पनांचें आणि चालीरीतींचें पृथक्करण करून आणि त्यांचे परस्पर संबंध शोधून त्यावरून त्या भाषा, कल्पना, आणि चालीरीती ज्या लोकसमूहांत चालत असतील त्या निरनिराळ्या लोकसमूहांचा परस्पर संबंध शोधतां येतो. या पृथक्करणाच्या अभ्यासानें आजच्या हिंदूंचे मानववंशविषयक घटक शोधतां येतील एवढेंच नव्हे तर पृथक्करणविषय होणाऱ्या ग्रंथांचें ऐक्य व त्यांची लोकमान्यतेच्या दृष्टीनें व्यापकता परिचित असल्यामुळें ज्यांचें मानववंशीय पृथक्त्व शास्त्रीय पद्धतीनें शोधून काढलें आहे अशा सर्व लोकांस एकस्वरूपता निरनिराळ्या काळीं कशी येत गेली याचा पत्ता लागेल.

शास्त्रांची वृद्धि, शास्त्रांचा प्रसार, वाङ्मयाचें एकीकरण, जुनें वाङ्मय दृष्टीआड होऊन नवीन वाङ्मय उत्पन्न होणें, या सर्व गोष्टी समाजाच्या घटनेचा इतिहास दाखवितात. वेदपूर्वकालीन निरनिराळ्या लोकसमूहांचें असलेलें ऐक्य, वेद, अवेस्ता व यूरोपीय ग्रंथ यांच्या तुलनेनें बाहेर पडेल, तर वेदविस्तारा-बरोबर सामाजिक रूपांतर कसें काय होत गेलें, भारतांत आलेलीं "आर्यन्" वंशांतील राष्ट्रें पूर्वींच्या भाऊबंदांपासून कशीं वेगळीं वेगळीं होत गेलीं, आणि देश्य लोकांशीं संस्कृतिदृष्ट्या एकजीव होण्यास अनुकूल स्वरूपाचीं कशीं बनत चाललीं याचा वृत्तांत वैदिक वाङ्मयाची उत्तरकालीन वाङ्मयाशीं तुलना झाल्यास कळून येईल. वैदिक वाङ्मयाची विस्मृति आणि महाभारताचा आणि पौराणिक वाङ्मयाचा विकास समाजाची दुसरी एक स्थिति दाखवितो. पारमार्थिक कल्पनाच केवळ नाहींत तर शास्त्रविषयक किंवा शास्त्राभासात्मक गोष्टी देखील हिंदु समाजाच्या घटनेवर परिणामकारी झाल्या आहेत. सर्व लोकांस एकस्वरूपता देण्यास जेथें मंत्रांचें संहितीकरण असमर्थ झालें, महाभारतांतील मनोरम कथानकें, रामायणासारखें सुंदर आर्ष काव्य, किंवा वेदांतासारखें अत्यंत व्यापक तत्त्वज्ञान लोकांच्या एकीकरणास जेथें असमर्थ ठरलें, तेथें परमार्थापेक्षां प्रत्येक मनुष्यास हालवून सोडणारा जो स्वार्थ त्याचा अदृष्टशक्तींशीं निकट संबंध जोडून फोंफावलेलें फलज्योतिष सर्व लोकांस एकत्र बांधूं शकलें. वेदांनीं, स्मृतींनीं, पुराणांनीं, बुद्धाच्या धम्मानें, जैनांच्या धर्मानीं, चार्वाकांच्या उपदेशानें जेथें आचारैक्य उत्पन्न झालें नाहीं तेथें बरेंचसें आचारैक्य फलज्योतिषानें उत्पन्न झालें. एवंच हिंदुसमाजाचें एकत्व समजण्यासाठीं बऱ्याच लोकांस एकत्र बांधणाऱ्या वाङ्मयाचा इतिहास ज्याप्रमाणें समजला पाहिजे त्याप्रमाणें शास्त्रांचाहि इतिहास समजला पाहिजे. यज्ञ करतांना वेदी कशी करावी, मंत्रोच्चार कसे करावे याविषयींचे भेद जेथें समाजांत एकमेकांशीं लग्नें न करण्याच्या प्रवृत्तीस बंधनकारक होतात, तेथें वाङ्मयाच्या व शास्त्रांच्या इतिहासाच्या ज्ञानाशिवाय समाजघटनेचें स्पष्टीकरण कसें होईल?

कांहीं माणसांस एकानें आपल्याकडे वळवून इतरांपासून विभक्त करणें ही क्रिया, व तशीच भिन्नजनांच्या कर्मांचें, उपासनांचें किंवा मतांचें एकीकरण व एकवाक्यता करून तदनुयायी जनतांचें एकीकरण करणें ही क्रिया, या दोन्ही क्रिया समाजांत चालू असतात. विश्वामित्रवसिष्ठांचें भांडण, वैशंपायन व याज्ञवल्क्य यांचें भांडण, बुद्ध, महावीर, बसव, महानुभाव यांच्या संप्रदायांच्या स्थापना, हे सर्व प्रयत्न जर लोकांस विभक्त करण्यास कारण झाले असतील तर वेदांचें संहितीकरण, महाभारतरचना, मनुस्मृतीचा उद्भव, पंचायतनपूजा हे प्रकार अनेक भिन्न लोकांस एकत्र आणण्यास कारण झाले आहेत.

हिंदूंमध्यें वाढलेलें वाङ्मय, त्याप्रमाणेंच वाङ्मयामुळें, शास्त्रीय परिश्रमामुळें आणि निरनिराळे विचारसंप्रदाय लोकांत प्रसृत झाल्यामुळें संस्कार पावलेली भाषा, व संप्रदायामुळें आणि एका संस्कृतीच्या छत्राखालीं अनेक लोक आल्यामुळें त्यांमध्यें उत्पन्न झालेली समाजपद्धति, या सर्वांचा हिशोब घेणें हा सांस्कृतिक अभ्यासाचा मुख्य विषय आहे. तसेंच आज सर्व जगाशीं आपल्या जनतेचा संबंध येत असल्यामुळें हिंदूंच्या बाहेरील जगाच्या संस्कृतींचा अभ्यास आपणांस इष्ट असणाऱ्या अभ्यासाच्या पूर्तीसाठीं करावयास पाहिजे.

**ज्ञानसंचयाचा काल**—आतां आपणापुढें जो नवा काल येत आहे त्यासाठीं जुनें ज्ञान गोळा होऊन त्याचें संवर्धन झालें पाहिजे. नवीन येणाऱ्या मनूबरोबर ज्ञानाच्या संचयाचे प्रयत्न यापूर्वींहि झालेले दृष्टीस पडतात. आपल्या संस्कृतीच्या इतिहासांत आजच्यासारखे दोनच काल पूर्वीं होऊन गेले आहेत. एक काल म्हटला म्हणजे भारतीय युद्ध समाप्त झालें तो काल आणि दुसरा काल म्हणजे मुसुलमानी संस्कृतीच्या दडपणाखालीं मरून न जातां हिंदूंनीं आपलें स्वत्व रक्षण करण्यासाठीं केलेल्या प्रयत्नाचा म्हणजे विद्यारण्यांचा काल. आजचा काल हा आपण आपलें महत्त्व जगांत पूर्ववत् स्थापन करण्याचा काल आहे.

अर्वाचीन आणि प्राचीन कालांचें एकमेकांपासून पृथक्त्व दाखविण्यासाठीं जुन्या कालापासून एखादी गोष्ट प्रसिद्ध असेल तर ती कुरुयुद्ध होय. कुरुयुद्धाच्या शेवटीं किंवा हें युद्ध आटपण्यापूर्वीं कांहीं वर्षें एक मोठा वाङ्मयविकासार्थ प्रयत्न झालेला दिसतो. त्या प्रयत्नाचें स्वरूप आज उपलब्ध नाहीं तथापि तें शोधतां येण्याजोगें आहे. तो प्रयत्न किती विस्तारानें झाला याची कल्पना येण्यासाठीं भगवान् वेदव्यासांच्या नांवावर कोणतीं कामें लादलीं गेलीं आहेत याचा विचार करूं.

१. वेदांच्या संहिता व्यासांनीं केल्या.

२. पुराणें व्यासांनीं लिहिलीं.

३. महाभारताचे कर्ते व्यासच होत.

४. बादरायण सूत्रें व्यासांचींच आहेत.

वैशंपायन, सुमंतु, जैमिनि, इत्यादि माणसें व्यासांचींच शिष्य होतीं, आणि याज्ञवल्क्य हा व्यासांचा शिष्यानुशिष्य होता. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे सर्व जुन्या विद्येचें एकत्रीकरण आणि विद्येच्या अभिवृद्धीसाठीं अवश्य होणारें विचारप्रवर्तन आणि शास्त्रप्रवर्तन, आणि त्याप्रमाणेंच जुन्या सर्व इतिहासांतील रक्षणीय भागाचें रक्षण हें व्यासांचेंच कार्य होय. प्राचीन ग्रंथकारांमध्यें व्यासांची थोरवी लोकांस वाटते ती अयथार्थ नाहीं. व्यासांनीं विद्येच्या संरक्षणासाठीं जो प्रयत्न केला त्याच्यावरच पुढील सर्व इमारत रचली गेली असें म्हणण्यास हरकत नाहीं. महाभारतानें लोकांपुढें श्रेष्ठ चरित्रें ठेवलीं, आणि पुढील बऱ्याच कवितेस तो ग्रंथ आधारभूत झाला. त्यानें व पुराणांनीं अत्यंत प्राचीन अशा इतिहासास जिवंत ठेवलें; आणि संहितांनीं पाठीमागची भाषा आणि कल्पना जशाच्या तशा जिवंत ठेवल्या. पूर्वींचीं पुराणें उत्तरकालीन लोकांच्या तावडींत सांपडून वाढत गेलीं. वेदांच्या संहिता व ब्राह्मणें देखील थोडींबहुत वाढलीं. पुढें वेदांचा प्रतिपाद्य विषय जो यज्ञ तो मागें पडत चालल्यामुळें त्यांचें वर्धन खुंटलें. 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वं' इत्यादि वाक्यें व्यासाचें महत्त्व दाखवितात.

व्यासानंतर विद्येच्या इतिहासांत व्यासासारखा थोर पुरुष झाला नाहीं असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. पुढील लोकांचीं कार्यें लहान व एकांगी होतीं आणि पूर्वींच्याच पायावर पूर्वींचीच बांधलेली इमारत एखादी खोली वाढवून किंवा एखादा मजला चढवून वाढवावी या स्वरूपाचीं होतीं. गौतमबुद्धाचें कार्य याहून भिन्न होतें. गौतमबुद्ध हा जरी नवीन प्रकारच्या वाङ्मयाचा जनक झाला नसला तरी नवीन भाषेंतील वाङ्मयास जन्म देता झाला खास. त्याचे हातून विद्यांना चालन मिळालें असें मात्र म्हणतां येणार नाहीं. बौद्ध वाङ्मयाच्या इतिहासप्रसंगीं या संबंधानें विशेष विवेचन करतां येईल. असो. तेव्हां व्यासानंतर सर्व तऱ्हेनें विद्येस चालन देणारा मनुष्य शोधावयाचा झाल्यास आपणांस विद्यारण्यस्वामीपर्यंत आल्याखेरीज कोणी दिसत नाहीं. सायणमाधवांनीं ( हे एक असोत किंवा दोन असोत )-जे प्रयत्न केले त्यांचें स्वरूप व्यासांच्या प्रयत्नांपेक्षां निराळें आहे. त्यांतील मुख्य भाग येणेंप्रमाणें—

१. वेद लोकांस समजत नव्हते म्हणून ते सुबोध करणें.

२. देशांतील निरनिराळीं मतें व संप्रदाय यांचें समुच्चयानें लोकांस ज्ञान देणें.

३. धर्मशास्त्र संकुचित झालें होतें तें विस्तृत करणें.

४. भिन्नमतांपैकीं ज्ञानमार्गाचा आणि वेदांतमताचा प्रसार करणें आणि त्याची ऐतिहासिक परंपरा दाखविणें.

५. वैद्यकासारख्या लोकोपयोगी शास्त्रांचें पुनरुज्जीवन करणें.

भगवान् वेदव्यास आणि अत्यंत विद्वान् विद्यारण्य यांच्या कार्यांत भेद आहे. हा भेद असा मांडतां येईल कीं, माधवाचार्यांची उर्फ विद्यारण्यांची चळवळ संस्कृतीच्या उद्धारकाची होती व व्यासांची चळवळ संस्कृतीच्या संस्थापकाची होती. विद्येच्या इतिहासांतील हे दोन अत्यंत थोर आचार्य होत. तथापि ज्या विद्यांस व्यासांचा हातहि लागला नाहीं अशा कांहीं थोड्या प्राचीन विद्या आहेतच. असो.

हिंदुसमाजाचें जें एकत्व स्थापन झालें तें अनेक जाती एकत्र येऊन त्यांच्यामध्यें सामान्य वाङ्मयाचा प्रसार झाल्यानें अंशेंकरून झालें; आणि तें कार्य करण्यासाठीं वाङ्मयास आपलें एकदेशीयत्व टाकून देऊन सर्वांगीणत्व साध्य करावें लागलें. हा सामाजिक इतिहास वाङ्मयाच्या इतिहासाबरोबरच अधिक स्पष्ट होईल.

आतां निरनिराळ्या जातींना एकत्र करणाऱ्या हिंदुसमाजाचें एकत्व आज किती दृढ झालें आहे व निरनिराळ्या जातींत परस्परसंबंध काय आहे याच्याकडे लक्ष देऊं.

**हिंदुसमाजसमीक्षण**—हिंदुसमाज हा जातींचा समुच्चय आहे. जग अनेक जातींनीं भरलेलें आहे. आपणां हिंदूंच्या दृष्टीनें त्या जातींपैकीं कांहीं जाती आपल्या जवळच्या आहेत असें आपण समजतों आणि असेंहि समजतों कीं, पावित्र्य व शुद्धता या दृष्टींनीं कांहीं जाती वरच्या पायरीच्या, कांहीं कमी योग्यतेच्या आणि कांहीं कनिष्ठ अशा आहेत. या सर्व जातींमध्यें ब्राह्मणांची जात त्यांच्या पावित्र्यामुळें इतरांपेक्षां श्रेष्ठ आहे. ख्रिस्ती व मुसुलमान किंवा इतर बाह्य लोक हे पावित्र्याच्या दृष्टीनें सर्वांत शेवटच्या पायरीवरचे आहेत. सर्व जग हें पावित्र्याच्या दृष्टीनें किंवा अस्पृश्यत्वाच्या दृष्टीनें एका सोपानपरंपरेंत असून त्यांत ब्राह्मण श्रेष्ठ आणि म्लेच्छ, बाह्य किंवा व्रात्य हे कनिष्ठ होत या प्रकारची सामाजिक भावना आपल्या व्यवहारांत व्यक्त होते.

सामाजिक उच्चनीचतेच्या प्रश्नामध्यें मताचा किंवा उपास्याचा प्रश्न नाहीं. तो प्रश्न असता तर जैनांची पदवी वेदास मानणाऱ्या अनेक जातींपेक्षां उच्च नसती; तथापि अनेक ब्राह्मणानुयायी जातींचा जितका विटाळ ब्राह्मण समजतात तितका जैनांचा समजत नाहींत. आपणांस उलट असें आढळून येतें कीं, वऱ्हाडांत पुष्कळ जुन्या चालीचे ब्राह्मण देखील जैनांच्या हातचें पाणी पंचवीस वर्षांपूर्वी पीत असत, आणि त्यांस कायस्थप्रभू शिवलेल्या पाण्याचा विटाळ होत असे. यावरून समाजामध्यें असलेली जातींची पदवी मतमूलक

नसून आचारमूलक आहे. निवृत्तमांस ब्राह्मणांनां अनेक आचारांमध्यें मांसपराङ्मुख जैन हे जवळचे व व्यवहाराला योग्य असे वाटत यांत आश्चर्य नाहीं. ख्रिस्ती व मुसुलमान यांची पदवी आज समाजांत महारांच्या पेक्षां वर आहे याचें कारण विचारमूलक नसून आचारमूलकच आहे. वाह्यांची पदवी जवळजवळ कनिष्ठ ठरली याचें कारण देखील आचारमूलकच आहे. ज्या समाजामध्यें गोमांस अत्यंत निषिद्ध आहे त्या समाजांत त्याचें सेवन करणाऱ्यास जवळजवळ सर्वांत कनिष्ठ पद प्राप्त व्हावें यांत नवल तें कोणतें ? बाहेर दिसणारें स्वरूपच लक्षांत घेतां ख्रिस्ती व मुसुलमान यांचें आचरण महारांपेक्षां अधिक स्वच्छ दिसतें, त्यामुळें त्यांचा विटाळ महारांपेक्षां कमी मानण्यांत येतो.

मतमूलक भिन्नता किंवा उपास्यमूलक भिन्नता या गोष्टी हिंदूंच्या दृष्टीनें फारच कमी महत्त्वाच्या आहेत तर ख्रिस्ती व मुसुलमान यांस हिंदूंनीं आपणांपेक्षां निराळें कां समजावें? कारण एवढेंच कीं, हिंदूंपासून भिन्नत्व स्थापन करणाऱ्या रेषा हिंदूंनीं ओढल्या नसून मुसुलमान, ख्रिस्ती, यांनींच ओढल्या आहेत. हिंदूंच्या दृष्टीनें परमार्थाविषयीं मत आणि तो साध्य करून घेण्यासाठीं उपयोगांत आणिलेलें साधन यामुळें मनुष्याचें सामाजिक पृथक्त्व स्थापन होत नाहीं, किंवा आपल्यासारखें परमार्थसाधन दुसऱ्यानें आचरिलें तर तेवढ्यानेंच त्याचा प्रवेश समाजांत फारसा होत नाहीं. जेव्हां विशिष्ट मतें मान्य करणारीं माणसें एकत्र जमून आपला समुच्चय बनवितील आणि त्याचें पृथक्त्व स्थापन करण्याचा प्रयत्न करतील व जेव्हां त्या बनलेल्या समुच्चयाचा आचारहि एकस्वरूपाचा आणि हिंदू लोकांनीं जें आचरण कनिष्ठ म्हणून गणिलें आहे तें आचरण मान्य करणारा असा असेल तेव्हांच मात्र कोणी मनुष्य त्या संप्रदायाचा अनुयायी झाला असतां तो हिंदुसमाजापासून विभक्त होईल, म्हणजे तो आपल्या जातीला मुकून किंवा जातिबाह्य होऊन त्या जातीनें कनिष्ठ ठरविलेल्या जातींत प्रविष्ट होईल. मनुष्य ख्रिस्ती होतो याचा हिंदूंच्या दृष्टीनें अर्थ एवढाच कीं तो आपल्या जातींतून निघून ख्रिस्ती जातींत जातो.

हिंदु आणि अहिंदु यांमध्यें फरक तरी कोणता? या प्रश्नाचें उत्तर देण्यास थोडीशी इतिहासाकडे नजर फेंकली पाहिजे. 'हिंदु' हा शब्द मुळींच परका. हा शब्द मुसुलमानी स्वारीपूर्वीच्या संस्कृत ग्रंथांत वापरण्यांत आलेला नाहीं. हिंदूंनां आपल्याशीं सदृश असा समुच्चय कोणता आहे हें ठरवून त्यास एक नांव देण्याचें कारणच कधीं पडलें नाहीं. जगांतील अनेक देश, राष्ट्रें आणि लोक यांच्या अस्तित्वाविषयीं प्राचीन भारतीय लोक पूर्णपणें अज्ञानी जरी नसले तरी उदासीन होते हें खास. परके जेव्हां त्यांच्या देशांत येत तेव्हां त्यांची परक्यांशीं ओळख होई. परके येत ते व्यापारासाठीं, देश पहाण्यासाठीं किंवा देश जिंकण्याकरितां ह्मणून येत. अशा काळीं येणारा परकीय त्याच्या राष्ट्राच्या किंवा जातीच्या नांवानेंच लोकांस माहीत होई आणि तो त्या जातीचा म्हणून समाजांत वावरे. प्राचीनकाळीं हिंदु आणि इतर यांमध्यें अंतर फारसें नव्हतें त्यामुळें परके आले आणि देश्य आचार घेतला म्हणजे ते नकळतां हिंदु होऊन जात. त्यांची एखादी स्वतंत्र जात बने एवढेंच. सारांश, प्राचीन काळच्या हिंदूंस असें वाटत नव्हतें कीं देशांत ज्या अनेक विविधाचारयुक्त जाती आहेत त्यांपेक्षां नवीन आलेले परकी लोक कांहीं निराळे आहेत. आपण व इतर जगांतील लोक यांमध्यें सामाजिक भिन्नता विशेष आहे अशी भावनाच नव्हती. जो मनुष्य मध्यदेशांत राही त्यास कंदाहार, अफगाणिस्तान, पंजाब किंवा सयाम या देशांतील लोक अशिष्ट किंवा संस्कृतीमध्यें कमी किंवा म्लेच्छहि वाटत, पण दक्षिणेंतील लोकहि त्यास तसेच वाटत. अनेक धर्मशास्त्रकारांनीं जे लोक दक्षिणेंत, वंगालमध्यें किंवा पंजावांत जातील त्यांस प्रायश्चित्त सांगितलें आहे. जो मनुष्य आपला प्रांत सोडून दुसऱ्या प्रांतांत जाईल तेथें तो परका आणि त्याच्या लोकांच्या दृष्टीनें तो परत आल्यानंतर परदेशगमनाबद्दल प्रायश्चित्तार्ह होई. तो परदेश वंगाल, सयाम, यवद्वीप, चीन, तिवेट, पंजाब, इराण, किंवा हिंदुस्थानचा दक्षिणभाग यांपैकीं कोणता कां असेना? थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे भारतीयभावना किंवा हिंदुत्वभावना प्राचीनकाळीं लोकांस नव्हती. तेव्हां परकीयभावना ही तरी कोठून येणार?

प्राचीन हिंदू परदेशगमनाचें पातक मानीत होते तथापि परदेशगमनानें समाजांतील स्थान नाहींसें होऊन मनुष्य परकीय समाजाचा अवयव बनतो अशी त्यांची भावना नव्हती. आलेली अशुद्धि दूर करावी एवढाच परदेशगमनप्रायश्चित्ताचा उद्देश असे. अग्निपुराणांत म्हटलें आहे कीं, "म्लेच्छैर्गतानां चौरैर्वा कान्तारे वा प्रवासिनाम्। भक्ष्याभक्ष्यविशुद्ध्यर्थं तेषां वक्ष्यामि निष्कृतिम् ॥ पुनः प्राप्य स्वदेशं च वर्णानामनुपूर्वशः। कृच्छ्रस्यान्ते ब्राह्मणस्तु पुनःसंस्कारमर्हति ॥" हे श्लोक अनेक दृष्टींनीं महत्त्वाचे आहेत. निष्कृति जी करावयाची ती केवळ परदेशगमनासाठीं नसून भक्ष्याभक्ष्यविशुद्धीसाठीं होती; आणि याकरितां जें प्रायश्चित्त म्लेच्छांच्या देशीं जाण्याबद्दल असे तेंच प्रायश्चित्त वानप्रस्थाश्रमाचे एकीकडे गोडवे गात असतां अरण्यांत जाऊन राहाण्याबद्दल असे. कारण दोन्ही ठिकाणीं भक्ष्याभक्ष्यविषयक शुद्धि राहणें सारखेंच अशक्य असे हें यांतील मूळ होतें. यावरून जगांतील जो जमिनीचा तुकडा आपला नव्हे अशा तुकड्याचा किंवा म्लेच्छांचाहि विटाळ प्राचीन भारतीयांनां नसून भक्ष्याभक्ष्याचा मात्र विटाळ होता ही गोष्ट बाहेर पडते आणि समाजांत उच्चनीच स्थान किंवा समाजाचा बहिष्कार यांच्याविषयींचा विचार ज्या काळीं वरील

श्लोक तयार झाले त्या काळीं केवळ आचाराच्या शुद्धताशुद्धतेवरून ठरत असे हें उघड होतें.

भारतीय भावनेचा अभाव आणि भारतीय वैशिष्ट्याच्या जाणीवेचा अभाव प्राचीन भारतीयांत कां होता हें जाणण्यासाठीं एकत्वाची भावना व्यक्तींच्या समूहास येते तरी कशी याचा विचार केला पाहिजे. जर कांहीं लोकांस आपण एकवंशीय आहोंत अशी भावना असेल तर त्या लोकांस एकत्व आणण्यास आणि इतरांपासून पृथक्त्व भासविण्यास तेवढें कारण पुरेसें आहे. तथापि अशी एकवंशत्वाची भावना फार लहान वर्गांतच असावयाची. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जाती हीं या प्रकारचीं उदाहरणें होत. मोठ्या समूहांमध्यें एकत्वस्थापन आणि एकत्वभावना हीं निराळ्या क्रियेनें उत्पन्न होतात. एका शासनसंस्थेखालीं असल्यामुळें एकत्वाची भावना उत्पन्न होते. आचारांतलें आणि राहणींतलें सादृश्य याच्या योगानेंहि एकत्वाची भावना उत्पन्न होईल; पण ती अशा वेळेस उत्पन्न होऊं शकते कीं जेव्हां विसदृश समाज डोळ्यापुढें असतात, आणि सदृश व विसदृश यांचें पृथक्करण करणें लोकांस शक्य होतें.

जेव्हां कांहीं लोक एकच उपास्य अंगिकारितात किंवा एकच गुरु करितात तेव्हां उपास्यमूलक किंवा आचार्यमूलक एकत्व त्यांच्या मनावर ठसतें, आणि त्यावरोबर आपण इतरांपासून वेगळे आहोंत ही जाणीव त्यांच्यांत उत्पन्न होते. या तऱ्हेनें अनेक संप्रदाय उत्पन्न झाले आहेत. ख्रिस्ती, मुसुलमान, ब्राह्मो, आर्यसमाजी हे याच तऱ्हेचे संप्रदाय होत. ख्रिस्ती आणि मुसुलमान यांच्या बाबतींत असें म्हणतां येईल कीं, जेव्हां त्यांनीं आपले प्रचारक परदेशीं पाठविले तेव्हांच म्हणजे सुरवातीसच त्यांच्या ठिकाणीं, आपल्यापासून इतर जग भिन्न आहे ही कल्पना आणि तिजवरोबरच आपण ( ख्रिस्ती किंवा मुसुलमान ) तेवढे एक आहोंत ही कल्पना, या दोन्ही कल्पना एकसमयावच्छेदेंकरून वागत होत्या. कालांतरानें ख्रिस्त्यांच्या टोळीमध्यें जो समाज होता तो इतरांच्या म्हणजे टोळीबाहेरच्या लोकांच्या समावेशानें वाढत गेला. तथापि त्या विस्तारानें त्यांची एकत्वोत्पादक कल्पना विस्तृत झाली नाहीं. ती होती तशीच आकुंचित राहिली. मुसुलमानांचीहि गोष्ट अशीच झाली. यावरून असें दिसून येईल कीं, संप्रदायांचें किंवा यूरोपियन लोक ज्या मतसमुच्चयांना 'रिलिजन' म्हणतात त्यांचें मूलस्वरूप भेदमूलक आहे. आपण आणि इतर यांमधील भेदाची जाणीव कायम ठेवावयाची, आंत माणसें मात्र ज्यास्त ओढावयाचीं पण भेदकारक गोष्टी नाहींशा होऊं द्यावयाच्या नाहींत, अशी संप्रदायांची प्रवृत्ति असे. आपल्यासारखे ज्यांचे विचार नसतील त्यांस निराळें समजावयाचें, एकत्वभाव आपल्या समानोपास्य वर्गापुरताच ठेवावयाचा आणि आपल्या वर्गांत इतरांपासून भिन्नत्वाची आणि इतरांच्या शत्रुत्वाची जाणीव करून द्यावयाची, असें संप्रदायांचें सामान्य स्वरूप आहे. संप्रदायांचें हें स्वरूप जो ओळखतो त्यास या संप्रदायांचे प्रचारक आपल्या विश्वव्यापित्वाची आणि विश्वबंधुत्वाची वढाई मारतात तेव्हां मोठी मौज वाटते.

**हिंदुसमाजघटनेचा इतिहासः**—हिंदुत्वाचा म्हणजे 'हिंदु' म्हणून आज जो समाज बनला आहे त्या समाजाचा आणि तदंतर्गत मानवसादृश्याचा इतिहास निराळा आहे. हें सादृश्य समाजांतील एका विशिष्ट वर्गानें मतें किंवा उपास्यें अथवा आचार्य या तत्त्वावर टोळी बनवून तींत माणसें ओढावयाचीं या प्रकारच्या चळवळीनें तयार झालें नाहीं. जेव्हां दोन जातींचा सन्निकर्ष उत्पन्न होतो तेव्हां त्या दोन जातींमधील माणसें एकमेकांचें कांहीं बाबतींत अनुकरण करितात. कालांतरानें त्यांचें मिश्रण होतें आणि असें मिश्रण जरी झालें नाहीं तरी अनुकरणाच्या देवघेवीनें दोघांमध्यें बरेंच सादृश्य उत्पन्न होतें. जेव्हां एकाच ठिकाणीं अनेक जाती येतात तेव्हां या सर्व जातींमध्यें हळू हळू रीतीभातींचें सादृश्य उत्पन्न होऊं लागतें. जी जात बलवान किंवा वरिष्ठ असेल तिचें अनुकरण इतरांकडून होऊं लागतें. संघट्टनामुळें कालांतरानें सर्वांच्या कल्पनाहि सारख्या होऊं लागतात. एखाद्या जातीमध्यें जर सुशिक्षित किंवा हुशार वर्ग निघाला तर कमी सुशिक्षित किंवा कमी बुद्धिवान अशा लोकांकडून त्याला मान मिळतो, त्याची संभावना होते किंवा त्याला अनुयायीहि मिळतात. जर अनेक कुळें, गोत्रें किंवा जाती एकाच ठिकाणीं राहत असतील आणि प्रत्येकाचीं दैवतें निरनिराळीं असतील तर कांहीं दैवतांचा लोप होईल व कांहीं टिकतील; किंवा तीं अनेक दैवतें एकाच दैवताचीं भिन्न स्वरूपें आहेत असें तत्त्ववेत्ते सांगूं लागतील; अगर त्या दैवतांपैकीं एका दैवताला प्रामुख्य मिळेल आणि इतर दैवतें विशिष्ट कर्मांचीं, प्रसंगांचीं, किंवा विशिष्ट इष्टफल देणारीं दैवतें होतील; आणि या रीतीनें दैवतें कुळविशिष्ट न राहतां सार्वजनिक होतील. केवळ संघट्टनानें, बरेच दिवस एकत्र राहिल्यानें, सर्वसामान्य आचार, सर्वसामान्य रीतीभाती, सर्वसामान्य विचारपरंपरा, सर्वसामान्य उपास्यें, सर्वसामान्य ईश्वरविषयक कल्पना आणि सर्वसामान्य आचार्यवर्ग निर्माण होईल. एका वर्गाचें वाङ्मय तेंच सर्वांचें होईल आणि सर्व समूहास एक स्वरूप येऊन सर्वांसच हें वाङ्मय म्हणजे आपणां सर्वांची वडिलोपार्जित मिळकत आहे असें वाटूं लागेल. हिंदुसमाजाचा विस्तार या पद्धतीनें झाला, आणि हिंदूंचे विचार याच पद्धतीनें निश्चित आणि संवर्धित झाले. जगाच्या बऱ्याचशा भागास एकत्व उत्पन्न होण्यास या गोष्टी आणि विशेषेंकरून विद्वान् ब्राह्मणांचा चोहोंकडे संचार कारण झाला.

वर सांगितलेली क्रिया आज हजारों वर्षें होत राहून आजचा हिंदुसमाज बनला आहे. या क्रियेचें स्वरूपच असें आहे कीं ती सहज दृष्टीस पडत नाहीं आणि यामुळें लोकांचा बराच गैरसमज झालेला आहे. पुष्कळांस असें वाटतें कीं

हिंदू लोक हे परकी गोष्टी मुळींच न घेणारे आहेत. त्यांनीं जरी कांहीं परकीय गोष्टी घेतल्या असल्या तरी ते परकीय गोष्टींचा द्वेष करणारे आहेत आणि ते आपल्या समाजांत इतरांस घेत नाहींत असा पुष्कळांचा समज आहे. या दोन्ही कल्पना सत्यापासून अत्यंत दूर आहेत. खरें पाहिलें असतां आजचे हिंदूंचे आचारविचार हे अनेक जातींच्या अनेक चालीरीती व कल्पना यांचें मिश्रण आहे. सर ऑलफ्रेड लायल यांनीं हिंदुस्थानांतील वन्य जातींच्या अंतर्भावामुळें हिंदुसमाजाची कशीकशी वाढ होत आहे याचें सुंदर वर्णन आपल्या 'एशियाटिक स्टडीज्' (लंडन १८८४) या पुस्तकांतील 'मिशनरी ॲण्ड नॉन्मिशनरी रिलिजन्स्' या लेखांत दिलें आहे.

हिंदू इतरांस आपणांत घेत नाहींत ही कल्पना चुकीची आहे पण ती सार्वत्रिक आहे यांत संशय नाहीं. ती तशी कां असावी? मुळांत कांहीं तरी सत्य असल्याशिवाय इतकी सार्वत्रिक कल्पना तरी कशी उत्पन्न होईल? असे प्रश्न येथें उद्भवतात. या प्रश्नांचें उत्तर खालील विवरणावरून मिळेल. हिंदू हे ख्रिस्ती किंवा मुसुलमान होतांना दृष्टीस पडतात; पण कोणी मुसुलमान किंवा ख्रिस्ती हिंदू होतांना दृष्टीस पडत नाहींत. या अवलोकनावरून पुष्कळांस असें वाटतें कीं, हिंदुत्व परजनसंग्राहक नसून केवळ विशिष्ट जातीपुरतें किंवा राष्ट्रापुरतें आहे; आणि ख्रैस्त्य व मुसलमानी संप्रदाय हे सर्व जातिसंग्राहक आणि सार्वराष्ट्रीय आहेत. कित्येकांस असें वाटतें कीं सुशिक्षित व सुधारलेल्या लोकांनां किंवा निश्चित पारमार्थिक मतें असणाऱ्यांनां आपल्यामध्यें ओढण्यास हिंदुत्व समर्थ नाहीं. प्रत्यक्ष ज्ञान यथार्थ होऊन अनुमान तेवढें अयथार्थ कां व्हावें? लोकांची सर्वसामान्य कल्पना आणि आमचें म्हणणें यांत तफावत कां पडावी?

या घोंटाळ्याच्या स्पष्टीकरणासाठीं हिंदुत्व व ख्रिस्ती संप्रदाय यांसंबंधीं कांहीं सामान्य कल्पना येथें दिल्या पाहिजेत. हिंदुसमाज हा कांहीं ख्रिस्ती व मुसलमान यांसारखा संप्रदायमूलक संघ नाहीं. हिंदुसमाज व ख्रिस्तीआदि संप्रदायमूलक समाज या दोहोंमध्यें मुख्य फरक हा आहे कीं, संप्रदायाची स्थापना इतर लोक आपल्यासारखे करण्यासाठींच झालेली असते. संप्रदाय हे विवक्षित कल्पनांचा, आचारांचा आणि उपास्यांचा विशेष खटपटींनीं इतरांमध्यें प्रसार करून त्या इतरांमध्यें आपणांशीं सादृश्य उत्पन्न करण्याकरितांच जन्मास आलेले असतात. हिंदुत्वाच्या प्रसाराची गोष्ट अशी नाहीं. आचार, सण, उत्सव, मतें, विचारपद्धती, या बाबतींत हिंदू व अहिंदू लोकांत ऐक्य उत्पन्न करण्याची भिस्त हिंदूंकडून केवळ संघट्टनावर व कालावर ठेवली जाते आणि संघट्टन प्रादेशिक सान्निध्यावर सोंपविलें जातें. संघट्टन असलें म्हणजे कालांतरानें आचारादिकांचें एकत्व सहजच उत्पन्न होतें. संप्रदायांची गोष्ट अशी नाहीं. त्यांची प्रवृत्ति अशीं नेसती असते. आपण जें मानतों तें मानणारा आणि आपण जें मानीत नाहीं तें न मानणारा असा जो कोणी असेल, असल्या तऱ्हेची ज्याची मनोवृत्ति बनली असेल, त्यासच आपल्या संप्रदायांत स्थान द्यावयाचें आणि आपल्या समाजाचें सभासद करावयाचें, अशी संप्रदायी समाजांची प्रवृत्ति असते.

ख्रिस्ती आणि महंमदीय संप्रदायांचा प्रसार आणि हिंदूंचा संख्याक्षय पाहून हिंदूंची विस्तारपद्धति अगदींच नियमित प्रमाणानें लहानाचे मोठे संघ बनविण्याचे कामीं जगास उपयोगी पडणारी आहे असें कांहीं लोकांस वाटेल. परंतु वस्तुतः अशी गोष्ट नाहीं. आजची स्थिति कांहींशी पालटल्यानंतर या हिंदु पद्धतीचें नवीन परिस्थितीस अनुरूप असें विकसन होईल, व या पद्धतीनेंच हळू हळू जगाचें ऐक्य होईल. विशिष्टसंप्रदायसंवर्धनपद्धति सर्व जगाचें ऐक्य घडवून आणण्यास केव्हांहि समर्थ होणार नाहीं. आजपर्यंत संप्रदायसंवर्धनपद्धति एकसमाज करण्यास बरीच उपयोगी पडली आणि जोंपर्यंत जगांत अनेक जंगली लोक आहेत तोंपर्यंत या पद्धतीचा विकास होण्यासहि अडचण नाहीं. तथापि या पद्धतीची वाढ कांहीं काळानें खुंटणारच. स्पर्धा करणारे दोन संप्रदाय जगांत वावरत असले म्हणजे एक दुसऱ्याच्या उन्मूलनाची खटपट करीतच राहणार आणि त्या दोन संप्रदायांच्या लोकांमध्यें द्वेषबुद्धीहि वाढणार. जगांतील सर्व ख्रिस्ती मुसुलमान होतील काय? नाहीं. जगांतील सर्व मुसुलमान ख्रिस्ती होतील काय? नाहीं. संप्रदायाच्या अभिमानाचा आवेश संप्रदायाचे चालक वक्ते आपआपल्या लोकांत उत्पन्न करणार आणि भिन्न संप्रदायांचें अनिष्ट इच्छिणार व यामुळें समाजाच्या द्वैतास जोर मिळणार. परस्परांमध्यें द्वेष वाढविणारे विद्यमान संप्रदाय जागतिक कसे होतील? केव्हांहि होणार नाहींत. हिंदुत्व ज्या रीतीनें तयार झालें ती रीति मात्र पुढें सर्वांवरच परिणाम करील. सर्व जगाच्या संस्कृतींतील सादृश्यें आणि प्रत्येक संस्कृतींतील उपयुक्त भागाची देवघेव यांच्या योगानें सर्व जगाच्या संस्कृतींचें एकीकरण होईल. सर्व जगास सामान्य अशा नीतिविषयक कल्पना उदय पावतील आणि ईश्वरदत्त म्हणून मानलेल्या किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें सोंवळ्या झालेल्या मंत्रांत या कल्पना उक्त नसल्या तरी त्यांचें अस्तित्व व प्रसार उपयुक्ततेमुळें शक्य होईल. तसेंच ग्रंथामध्यें संकुचित वृत्तीच्या ज्या कल्पना केवळ संप्रदायाच्या रक्षणासाठीं लिहिल्या असतील त्या कल्पना नाहींशा होतील. आज हिंदुस्थानामध्यें पुष्कळ माणसें कोणत्याहि संप्रदायाचीं नाहींत, तथापि सर्व जनतेला सामान्य अशा नैतिक कल्पनांनीं त्यांचें आयुष्यक्रमण होत आहे; अशी भावी जगाची स्थिति होईल. विशिष्ट संप्रदायांनां जें स्थान हिंदु संस्कृतींत आहे तें स्थान ख्रिस्ती व महंमदी संप्रदायांनां भावी जगत्संस्कृतींत राहील. राष्ट्रीय संस्कृतींत संप्रदायधर्मास गौणत्व देण्याची परिस्थिति उत्पन्न

होण्यास अमेरिकेंत सुरवातहि झाली आहे, ही गोष्ट संप्रदायवद्ध पाश्चात्त्य जगताच्या इतिहासांत लक्षांत घेण्यासारखी आहे.

प्राचीन कालीं 'हिंदुत्व' या कल्पनेची आजच्या हिंदूंच्या पूर्वजांमध्यें जाणीव नव्हती आणि हिंदूंचे आपला समाज निराळा वनवावा या हेतूनें स्थापित केलेले असे कांहीं धर्म नव्हते. लोक एखादी गोष्ट हिंदूंचा धर्म आहे किंवा नाहीं असा विचार करीत नसत. अमुक आचार हिंदु म्हणविणाऱ्यास केला पाहिजे अशी भावनाच नव्हती. स्त्रीधर्म, पुरुषधर्म, वर्णाश्रमधर्म, कुलधर्म, जातिधर्म, राष्ट्रधर्म, स्थानधर्म यांपेक्षां विस्तृत धर्मांची जी कल्पना होती ती मानवधर्माची होती. म्हणजे जातीच्या दृष्टीनें, पुरुष या नात्यानें, स्त्री या नात्यानें, किंवा स्थानविषयक अशीं जीं कर्तव्यें होतीं त्यांखेरीज इतर कर्तव्यें सर्व मनुष्यसमाजास लागू पडणारीं ऊर्फ मानवधर्म होत अशी विस्तृतभावना तेव्हां होती. या पद्धतीच्या यथोचित विकासाचा मध्येंच अवरोध व्हावयास खिस्ती आणि महंमदी हे नियमित वर्गामध्यें एकत्वभाव उत्पन्न करणारे दोन संप्रदाय कारण झाले.

जाति व राष्ट्र या विशिष्ट भावनांपेक्षां अधिक विस्तृत भावना हिंदूंमध्यें होत होती. तिच्या विस्तारास अडथळा करण्याचें श्रेय किंवा दोष प्रथम मुसुलमानांचा आहे. मुसुलमान आले ते एतद्देशीयांस हिंदु म्हणूं लागले. ते देशाचे नेते झाले. त्यांचा पगडा चोहोंकडे वसला आणि त्यांनीं ईश्वराच्या नांवानें अनन्वित कृत्यें केलीं. त्यांची उपासनापद्धति निराळी, त्यांचा आचार्यवर्ग निराळा. जित राष्ट्राच्या संस्कृतीविषयीं वराचसा तिरस्कारहि त्यांचे ठिकाणीं वसत होता. या त्यांच्या अनेक गोष्टींमुळें आणि क्रौर्यामुळें मुसुलमान म्हणजे केवळ भिन्नविचारयुक्त लोक असें न वाटतां स्वतःशीं संबंध असण्यास अयोग्य अशी दैत्यांची ती एक जात आहे कीं काय असें हिंदूंस वाटलें. खिस्त्यांशीं संबंध आला तो प्रथम प्रामुख्यानें पोर्तुगीजांशीं आला; आणि पोर्तुगीजांचेंहि खरूप हिंदूंस मुसुलमानांसारखेंच दिसलें. क्रौर्य, भक्ष्याभक्ष्यविषयक 'अशुद्धता' याच गोष्टी बाह्यांसंबंधानें हिंदूंस दिसत असल्यामुळें जुने तिरस्कारवाचक आणि पावित्र्यदृष्टीनें कनिष्ठतावाचक शब्द जे हूण किंवा यवन तेच त्यांस लावण्यांत आले.

जर हिंदु आणि इतर यांमधील अंतर तत्त्वतः हिंदूंतील दोन जातींतील अंतरापेक्षां निराळें नाहीं आणि संप्रदाय हे वस्तुतः जातिस्वरूपी नसून मत व उपासना यांपुरते संघ आहेत, तर हिंदूंपैकींच जीं माणसें खिस्ती किंवा मुसुलमान मत स्वीकारतात त्यांनां हिंदु म्हणण्यास कोणती हरकत आहे? आणि मुसुलमान आणि खिस्ती हे हिंदूंतीलच दोन संप्रदाय समजण्यास कोणती हरकत आहे? हरकत कोणतीच नाहीं. त्यांस असें न म्हणण्याचें मुख्य कारण एवढेंच कीं भारतीय खिस्ती किंवा मुसुलमान हे आपणांस हिंदु म्हणवीत नाहींत. मग प्रश्न असा उपस्थित होतो कीं एखादा संप्रदाय किंवा जात हिंदु आहे किंवा नाहीं हें ठरविण्यास कांहीं प्रमाण आहे कीं तें एखाद्या जातीच्या किंवा संप्रदायाच्या स्वेच्छेवर आहे? या प्रश्नास उत्तर हेंच कीं, हिंदु या नांवावर अधिकार स्थापित करणें हें जातीच्या किंवा संप्रदायाच्या इच्छेवरच आहे. मुसुलमान व खिस्ती हे दोन समाज विशिष्टपरमार्थसाधनमूलक आहेत आणि ते हिंदुसमाजाशीं स्पर्धा करीत आहेत. या स्पर्धा करणाऱ्या समाजांकडे पाहून हिंदूंस आपलेंहि विशिष्ट मत कांहीं तरी आहे किंवा असावें असें वाटतें. असें विशिष्ट मत नसलें तर आपल्याकडे कांहीं तरी कमीपणा येतो अशा तऱ्हेची धास्ती वाटून हिंदूंचीं मतें काय आहेत याविषयीं कित्येक हिंदुत्वाभिमानी 'हिंदुधर्मा'चीं लक्षणें शोधावयास लागतात. अशाच कांहीं कारणपरंपरेनें समाजशास्त्राविषयींचें एक अनभिज्ञपणाचें मत लो. बाळ गंगाधर टिळक यांनीं प्रसृत केलें आहे. तें "प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता उपास्यानामनियम एतद्धर्मस्य लक्षणम्" असें आहे. उपास्यांचा अनियम आणि साधनांचें अनेकत्व हें समाजाचें लक्षण होईल. वरील लक्षणांत हिंदु हें पद विशिष्ट उपास्य किंवा उपासनापद्धति यांवर अवलंबून नाहीं असेंच म्हटल्यासारखें आहे. हें लक्षण धर्माचें म्हणण्यापेक्षां समाजाचें म्हटल्यास अधिक बरोबर होईल. जें धर्मशास्त्र किंवा कायदा हिंदू मानतात त्याचें तात्त्विकदृष्ट्या वेदांविषयीं प्रामाण्यबुद्धि हें मूळ होय. तथापि वेदाविषयीं प्रामाण्यबुद्धि नसलेला वर्ग हिंदु नव्हे असें जर आपण धरावयास लागलों तर सांख्य तत्त्ववेत्त्यांचा वर्ग हिंदूंच्या बाहेर पडणार नाहीं काय? वेदोक्तधर्म आचरणारे ज्या समाजांत शेंकडा जवळजवळ पूज्य आढळतील, त्या जनतेस वेदाविषयीं प्रामाण्यबुद्धि कितपत आहे असें म्हणावें? शिवाय ज्या समाजांत शेंकडा नव्याण्णव लोकांनीं किंवा दर हजारांत नऊशें नव्याण्णव लोकांनीं सर्व जन्मांत वेदग्रंथ कधींहि उघडून पाहिला नसेल ते अपरिचित आचाराशीं प्रसंग आला तर वेदाविषयीं प्रामाण्यबुद्धि तरी कितपत ठेवतील? तसेंच, आपण वेद वगैरे कांहीं जाणत नाहीं, विठ्ठला आम्ही तुलाच जाणतों, असें म्हणणाऱ्या अनेक भगवद्भक्तांची वाट काय? असे अनेक प्रश्न उपस्थित होतात. रा. बाळ गंगाधर टिळक यांच्या व्याख्येंत उपयुक्तता कांहींच नाहीं असें नाहीं. 'उपास्यानामनियमः' आणि 'साधनानामनेकता' या दोन पदांनीं हिंदुसमाज हा विशिष्टपरमार्थसाधनमूलक असा संप्रदाय नाहीं ही गोष्ट त्यांनीं दाखविली आहे; आणि 'प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु' या वाक्यानें त्यांनीं हिंदुसमाजांतील अनेक व्यक्ती आणि जाती एकत्र बांधण्यास जें बंधन कांहीं अंशीं उपयोगी पडतें तें दिलें आहे. ही प्रामाण्यबुद्धि हें एक महत्त्वाचें बंधन आहे यांत शंका नाहीं.

हिंदुसमाजाची यथार्थ कल्पना मनांत येण्यास आपण लांकडाचा एक मोठा गठ्ठा मनांत आणावा. तो असा कीं, सर्व लांकडें एकाच दोरीनें बांधलेलीं नाहींत. त्यांत दहापांच लांकडें एका मोळींत बांधलीं आहेत अशा अनेक मोळ्या असून या

मोळ्यांपैकीं कांहीं मोळ्या एका दोरीनें बांधल्या आहेत, या एका दोरीनें बांधलेल्या मोळ्यांपैकीं कांहीं मोळ्या व बाहेरचीं कांहीं लांकडें यांच्याभोंवतीं एक दुसराच दोर आहे, व असे निरनिराळ्या प्रकारचे निरनिराळे जुडगे एकमेकांशीं बांधले गेल्यामुळें तो गठ्ठा एकत्र राहिला आहे. या गठ्ठ्याप्रमाणें हिंदु समाजाची स्थिति आहे. हिंदू लोकांस एकत्र बांधणारें सर्वव्यापी असें बंधन कोणतेंच नाहीं. हिंदू लोक आज जे एकमेकांशीं बांधले गेले आहेत, ते अनेक ग्रंथींनीं व अनेक बंधनांनीं बांधले गेले आहेत. असो.

हिंदु समाजास वेदप्रामाण्य हें जसें एक बंधन मानलें जातें तसें दुसरें बंधन म्हणजे ब्राह्मणांची जात हें होय. ब्राह्मणांस मानणारे ते हिंदू असें लक्षण केलें तर तें जरी पूर्णपणें बरोबर होणार नाहीं तरी बरेंच व्यापक होईल. पुष्कळ जाती अशा आहेत कीं, त्यांस ब्राह्मणांचें समाजांतील प्रथमस्थान मान्य आहे. ब्राह्मणांचें श्रेष्ठत्व ज्यांस नाखुषीनें मान्य करावें लागतें असा कांहीं वर्ग अर्थात् आहेच. ब्राह्मणांचें बंधन जैनांसहि आहे. कर्नाटकांतील जैन सोडून दिले तर इतरत्र लग्नें लावण्यासाठीं ब्राह्मणांचीच योजना जैन करीत असतात. अलीकडे उत्तरहिंदुस्थानांत कांहीं जैन आपले नवीन उपाध्ये करीत आहेत आणि जैन यती त्या प्रयत्नास उत्तेजन देत आहेत. संस्कार आणि परमार्थसाधन या दोन गोष्टी भिन्न आहेत. ब्राह्मणांमार्फत संस्कार ही लौकिक गोष्ट आहे. ही परंपरागत भावना काढून टाकून जैनांचें पृथक्त्व स्थापित करावें अशी खटपट पुष्कळांकडून होऊं लागली आहे. हा प्रयत्न थोडाबहुत आपण 'हिंदु' या सदरांत येत नाहीं असें दाखविण्यासाठीं आहे. लॉर्ड मोर्ले यांनीं मुसुलमानांस जेव्हां निराळे अधिकार दिले तेव्हां हिंदु नसणें अधिक फायद्याचें झालें असें पुष्कळांस वाटलें आणि आपण हिंदु नाहीं, आम्हांस स्वतंत्र प्रतिनिधी पाहिजेत अशी चळवळ सुरू झाली. या आजकालच्या गोष्टी सोडून दिल्या तर ब्राह्मणांस जैन देखील आपले संस्कर्ते समजतात हें लक्षांत येतें. ब्राह्मणांचें समाजांतील स्थान आहे तें संस्कर्ते या नात्यानेंच आहे. कोणी मुसुलमान फकिराचा उपदेश घेतला तरी तो जातिभ्रष्ट होत नाहीं. किंवा कोणी थिऑसफिस्ट झाला तरी त्यास हिंदुसमाजांतून गचांडी मिळत नाहीं. उपदेश घ्यावयास मुसुलमानाकडे, महाराकडे, किंवा खिस्त्याकडे जाण्याचा जरी कोणाहि हिंदूस संकोच वाटला नाहीं तरी लग्न लावण्यासाठीं किंवा मुलाची मुंज करण्यासाठीं कोणीहि ब्राह्मणेतर हिंदूंस आणीलसें वाटत नाहीं. सत्यशोधकसमाजानें ब्राह्मणेतर जातीचे उपाध्ये अस्तित्वांत आणले आहेत. ही चळवळ जर कांहीं दिवसांनीं बंद पडली तर सर्वच लोक पूर्वपदावर येतील आणि वाढत गेली तर ब्राह्मण म्हणविणारी आणखी एक जात तयार होईल. लिंगायतांतील कांहीं वर्ग आपणांस ब्राह्मण म्हणवूं लागला आहे.

जातीच्या स्वरूपावरून आणि मतावरून कोणत्या प्रकारच्या ब्राह्मणांनीं तिचें पौरोहित्य करावें हें ठरतें आणि उलटपक्षीं ज्या प्रकारचे ब्राह्मण पौरोहित्यास लागतात त्यांच्या स्वरूपावरून किंवा समाजांतील स्थानावरून त्यांच्याकडून पौरोहित्य करून घेणाऱ्या वर्गाचें समाजांत स्थान ठरतें. ब्राह्मणांब्राह्मणांतच कांहीं जाती उच्च समजल्या जातात आणि कांहीं कमी दर्जाच्या समजल्या जातात. ज्या कमी दर्जाच्या समजल्या जातात त्यांच्याकडून पौरोहित्य करून घेणाऱ्या जातींसहि कमीपणा येतो. या प्रकारच्या परिस्थितीचे दोन परिणाम घडतात. नवीन निघालेल्या संप्रदायास पुन्हां वक्री अवलोकन करून जुन्या ब्राह्मणांकडेसच यावें लागतें, किंवा जातिकनिष्ठत्व पत्करावें लागतें. कांहीं भंग्यांसारख्या जाती आहेत, त्या आम्ही ब्राह्मणांच्या हातचें खात नाहीं, जातीच्या नियमांप्रमाणें तसें करणें आम्हांस निषिद्ध आहे, असें सांगतात; आणि सरकारी रिपोर्टांतून या जाती ब्राह्मणांच्या हातचें खात नाहींत असें लिहिलेलें आढळतें; पण व्यवहारांत तसें कांहीं दिसत नाहीं. ब्राह्मण, कायस्थप्रभु, कुणबी, मराठे, हे घरांतील उष्टें व उरलेलें अन्न भंग्यांस देतात आणि तें ते घेऊन जातात हें आपण दररोज पहातोंच.

अद्यापिहि अनेक जाती अशा आहेत कीं त्यांजवर ब्राह्मणांची छाप पडलेली नाहीं. गोंडांसारख्या ज्या वन्य जाती आहेत त्यांपैकीं पुष्कळांस ब्राह्मणाचा संपर्कच नाहीं. भिल्ल, गोंड, कातकरी, महार, यांचीं लग्नें लावावयास ब्राह्मण जात नाहींत. ते आपला कोणीतरी मोहोरक्या ठेवून त्याच्या मार्फत लग्न करितात. कांहीं ठिकाणीं ब्राह्मण कुणब्यांच्याकडे पाट लावण्यास जात नाहींत. पाट हें एक कनिष्ठ प्रकारचें लग्न आहे. कनिष्ठ प्रकारचें लग्न लावण्यास ब्राह्मण लागत नाहींत. मध्यप्रांतांत मालगुजार पाट लावण्याची परवानगी देण्यासाठीं फी वगैरे अजून घेतात. पूर्वीं हा अधिकार भोंसल्यांच्याकडे होता आणि त्यामुळें थोडाबहुत गैरसमजहि उत्पन्न झाला होता. चार्लस ग्रॅन्ट यानें मध्यप्रांताच्या ग्याझेटिअरमध्यें अशी एक शंका ध्वनित केली आहे कीं, विधवांस संस्थानाच्या फायद्याकरितां विकीत असत. ब्राह्मणांऐवजीं सजातीयांकडून किंवा स्थानिक मोठ्या मनुष्याकडून लग्नें लावून घेण्याची चाल म्हणजे 'सिव्हिल म्यारेज' फार पूर्वापार चालत आहे. त्यानें ब्राह्मणाचा अधिकार नष्ट झाला किंवा नाकबूल झाला असें मात्र नाहीं. जीं लग्नें लावण्यास ब्राह्मण कचरतात किंवा नाखूष असतात अशांचेंच लग्न या पद्धतीनें होतें.

भिन्न भिन्न मतांमुळें ब्राह्मणांत भिन्नता आढळते तशी ती इतरांतहि आढळते. तथापि ब्राह्मणांचें प्रयोजन उपास्यमूलक नसल्यानें भिन्न उपास्याचे वर्गहि ब्राह्मणांनां पौरोहित्यासाठीं बोलावितात. ब्रह्मदेशचे राजे लग्नव्यवहारासाठीं ब्राह्मणांस बोलावीत असत. मनुष्य वेदांती असो अगर जैन असो, त्यानें आपलें परमार्थसाधन स्वेच्छेप्रमाणें करावें आणि संस्कारकर्में मात्र ब्राह्मणां-

करून करवून घ्यावींत हा प्रकार सर्वत्र रूढ आहे. खुद्द ब्राह्मणांतच देवळांतील पुजाऱ्यांचें, क्षेत्रांतील भिक्षुकींचें, या प्रकारचीं कामें हलकीं समजलीं जातात. पारमार्थिक कामांत ब्राह्मणेतर पुष्कळ आहेत. उदाहरणार्थ, गुरव हे शिवमंदिरांत पुजारी असतात. यावरून असें दिसतें कीं समाजांतील संस्कर्तृपद ब्राह्मणांनीं आपल्या हातीं राखिलें आणि पारमार्थिक कर्म मात्र सर्व जनांच्या सर्वांसाठीं मोकळें ठेवलें. पुराण सांगणें, कीर्तन करणें, गुरुमंत्र देणें इत्यादि गोष्टींत जरी ब्राह्मणांचेंच प्रामुख्य आहे तरी त्यांत इतर जातींचेंहि भासून येण्यासारखें अस्तित्व आहे.

ब्राह्मणांचें पद भारतीय समाजांत बरेंचसें अचल राहण्यास कारण हें कीं, राज्यक्रान्त्या अनेक होऊन क्षत्रिय वर्ग अनिश्चित होत होता, व विचारस्वातंत्र्य बरेंच वाढून त्यामुळें अनेक पारमार्थिक मतें आणि अनेक उपास्यें येत होतीं व जात होतीं, अशा परिवर्तनाच्या दीर्घ काळांत समाजांतील स्थैर्याला कारण आणि सर्वमान्य अशा वेदविद्येला अधिष्ठान जर कोणी झालें असेल तर ती एक ब्राह्मणांचीच जात होय.

वेद आणि ब्राह्मण यांशिवाय हिंदुसमाजांतर्गत विविध जनतेस एकत्र बांधणारीं अशीं जीं बंधनें आहेत तीं येणेंप्रमाणें: (१) ज्या कनिष्ठ जाती आहेत आणि ज्या पुष्कळांस वेदाधिकार नाहीं आणि ब्राह्मण पौरोहित्य देखील ज्यांच्या आवांक्याबाहेर आहे त्या जातींनां ब्राह्मण व वेद यांविषयीं आदरबुद्धि असल्यानें त्या बहुतेक समाजास बांधल्या गेल्या आहेत. (२) शूद्रादि मंडळीस वेदाधिकार नाहीं तरी त्यांना महाभारतासारखे इतिहासपुराणादि ग्रंथ वाचण्यास अधिकार असल्यामुळें आणि या ग्रंथांचाच विशेष प्रचार सर्व हिंदूंत असल्यामुळें आजच्या पुराणोक्त धर्मास अधिकारी असलेला शूद्रवर्ग आणि वेदास अधिकार असूनहि कांहींच येत नसलेला ब्राह्मणवर्ग हे दोघे एकत्र बांधले गेले आहेत. (३) सामान्य उपास्यें, सामान्य दैवतें आणि सामान्य सण यांचें बंधन बऱ्याच हिंदूंस एकत्र बांधीत आहे. (४) पुनर्जन्म आणि कर्मवाद यांसारखीं अनेक मतें समाजांतील जवळ जवळ सर्व लोकांस एकत्र बांधितात. (५) अनेक जातींची उत्पत्ति पुराणांतून दैवतांपासून किंवा ऋषींपासून वर्णिली आहे आणि तन्मूलक भावनांनीं बऱ्याच लोकांस एकत्र बद्ध ठेविलेलें आहे. शिवाय जीं अनेक दैवतें खेडोखेडीं आणि निरनिराळ्या जातींत आढळतात तीं दैवतें वेदांततत्त्वानें एकत्र जोडलीं गेलीं असल्यामुळें ज्येव्हां कोणी मनुष्य आपल्या दैवतांपलीकडे पाहूं लागतो तेव्हां सर्वव्यापी वेदांततत्त्वाकडे त्याला आपल्या पैतृक उपासनामार्गानें वळणें शक्य झालें आहे, आणि विविध उपासनामार्गांच्या या फलसाम्यामुळेंहि या विविध मार्गांतील लोक एकप्रकारच्या ऐक्यभावानें बांधले गेले आहेत. ग्रहशांति, ज्योतिष, शकुनांवर भरंवसा, भुतें काढण्याची विद्या, मंत्रांवर विश्वास या गोष्टींनीं हिंदूंच्या विदेस पारशी व मुसुलमानांपैकींहि कांहीं लोक बांधले गेले आहेत.

**भारतांतील संप्रदायांचें सामान्य स्वरूप.**—आतां येथील संप्रदाय व त्यांचें सामान्यस्वरूप या प्रश्नाकडे वळूं. हिंदुस्थानामध्यें सामाजिक गोष्टी आणि पारमार्थिक विचार यांची भिन्नता ज्यांत ठेविली गेली नाहीं असे कांहीं संप्रदाय उत्पन्न झाले आणि ते संप्रदाय बऱ्याचशा सामाजिक चळवळीस कारण झाले. या चळवळीमुळें समाजाचें रूप विशेष बदललें असें नाहीं; तथापि कांहीं कालपर्यंत त्यांनीं बराच उपद्व्याप केला ही गोष्ट खरी आहे. आतां जे संप्रदाय हिंदुस्थानांतीलच अथवा देश्य आहेत त्या संप्रदायांपासून समाजघटनेस फारशी भीति नाहीं, पण मुसुलमानी आणि ख्रिस्ती हे जे परकीय संप्रदाय आहेत त्यांच्यापासून मात्र कांहीं दिवस तरी त्रास होईल. भारतीय समाजाचें ऐक्य विघडविण्यास हे संप्रदाय जसे कारण झाले तसे ते आज जागतिक ऐक्य विघडविण्यास कारण झालेले आहेत. हिंदुस्थानांतील सामाजिक परिस्थिति तर त्यांनीं फारच निकट केली आहे तरी या संप्रदायांचें अनिष्ट स्वरूप हिंदुस्थानांतच नाहींसें होऊन सर्व जगाचा प्रश्न त्यामुळें सुटेल असा भरंवसा वाटतो. याचें सविस्तर विवेचन पुढें येईल. तथापि तें समजणें सुकर व्हावें यासाठीं संप्रदायांच्या घटनेचें स्वरूप आणि घटनेच्या विशिष्टत्वामुळें स्वाभाविकपणें घडून येणारा त्यांचा इतिहास कांहीं सूत्रांत वर्णिला पाहिजे.

येथें हें पुनरुक्तीनें सांगितलें पाहिजे कीं, हिंदू, ख्रिस्ती आणि मुसुलमान हे सदृश समूह नाहींत; आणि ख्रिस्ती व मुसुलमान समाजांशीं सदृश असा जर मनुष्यवर्ग हिंदुसमाजांत असेल तर तो हिंदूंतील संप्रदाय होय. हिंदुसमाज आणि तदंतर्गत संप्रदाय यांमध्यें जें नातें आहे तेंच सर्व जग आणि ख्रिस्ती व मुसुलमान समाज यांमध्यें आहे. हिंदुस्थानांतील संप्रदायांचें सामान्य स्वरूप असें आहे कीं एखादा गुरु विशिष्ट दैवत किंवा उपासनापद्धति प्रचारांत आणूं पाहतो आणि उपदेशितो व शिष्य गोळा करितो. त्यामुळें मतें आणि माणसें मिळून जें कांहीं एक बनतें त्यास संप्रदाय असें म्हणतात. संप्रदायसंस्थापक गुरु परमेश्वराशीं इतर माणसांपेक्षां आपलें कांहीं विशेष सलगीचें नातें आहे असें भासवितो. निदान आपल्या अनुयायांची अशी समजूत करून देतो कीं, सामान्य जनांपेक्षां कांहीं बाबतींत ज्ञानानें म्हणजे अतींद्रिय ज्ञानानें आपण श्रेष्ठ आहों. हे संप्रदाय मतप्रसार आणि उपास्यप्रसार यांचे अभिमानी असतात. कां कीं त्यांस आपला अनुयायी वर्ग वाढवावयाचा असतो. ब्राह्मणांस प्रचारकार्याची फारशी फिकीर नसते याचें कारण त्यांचें उत्पन्न विधिसंस्कारासारख्या प्रत्येक मनुष्यास कर्तव्य अशा बाबतींवर अवलंबून असतें. संप्रदायांच्या गुरूंची गोष्ट अशी नाहीं. त्यांचें उत्पन्न शिष्यवर्गाच्या संख्याधिक्यावरच अवलंबून असतें. या कारणानें अनेक प्रसंगीं हे संप्रदाय सामाजिक दृष्टीनें इतरांपासून आपलें भिन्नत्व स्थापूं पहातात,

आणि आपआपसांत अधिक बंधुभाव उत्पन्न व्हावा आणि संप्रदायांतर्गत व्यक्तीचा आपल्या जातीकडे ओढा कमी व्हावा यासाठीं प्रयत्न करितात. पुष्कळदां त्यांनीं बाहेरच्यांशीं लग्नव्यवहारहि बंद केले आहेत. मद्रासकडे वैष्णवांमध्यें वेदशाखेचें लग्नव्यवहारांत महत्त्व नसून हा वैष्णव आहे कीं नाहीं हें पहातात. जर संप्रदायामध्यें आणि संप्रदायाबाहेर असलेल्या लोकांमध्यें लग्नव्यवहार बंद पडला तर संप्रदाय ही स्वतंत्र जात होऊं पहाते. कित्येक संप्रदायांमध्यें संप्रदायाचें सामाजिक पृथक्त्व इतरांपेक्षां अधिक असतें आणि कित्येकांमध्यें कमी असतें. कांहीं संप्रदाय उपासनेपुरत्या एकत्र होणाऱ्या निरनिराळ्या जातींच्या लोकांचे संघ आहेत. असे संप्रदाय लोकांस फारसे अप्रिय होत नाहींत आणि त्या संप्रदायांचीं तत्त्वें सर्वसामान्य समाजांत सहज प्रविष्ट होतात. पुष्कळशा संप्रदायांमध्यें ब्राह्मणांचें अस्तित्व फारच कमी असतें. कां कीं एका गुरूचें अचल शिष्यत्व आणि गुरूचें स्तोम आणि गुरूचें देवत्वधारण इत्यादि सोंगांनीं पुष्कळ संप्रदाय व्यापिले गेले आहेत व असल्या संप्रदायांमध्यें सुशिक्षितवर्ग फारसा शिरणें शक्य नाहीं. अजाण कुणबी, भोळ्या बायका, यांवर अशा संप्रदायांचें अस्तित्व अवलंबून असतें. हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, संप्रदाय स्थापून समाजांत कांहीं निराळी खळबळ उत्पन्न करणें हें काम बहुधा ब्राह्मणांनींच केलेलें आहे. बौद्ध व जैन संप्रदाय वगळतां बहुतेक संप्रदायांचे संस्थापक ब्राह्मणच आहेत. या संप्रदायांनीं हिंदुस्थानचें फारसें हित केलें असें म्हणतां येत नाहीं. ब्राह्मण समाजाची सर्वसाधारण प्रवृत्ति संप्रदायांच्या संवर्धनास उत्तेजक नसून विरुद्धच होती. याचें कारण असें आहे कीं, एखादें विशिष्ट तात्त्विक मत किंवा विशेष व्यक्तीवर असलेली श्रद्धा यासारख्या अनित्य व दुर्बल पायावर समाजांतील एखाद्या व्यक्तीनें ( गुरूनें ) अथवा वर्गानें एक जात बनविण्याचा प्रयत्न करावा आणि आपलें व्यक्तीपुरतें अगर वर्गापुरतें हित साध्य करून घेण्यासाठीं समाजामध्यें अराजक माजवावें हें समाजास हितावह नाहीं ही जाणीव ब्राह्मणसमाजास होती संप्रदायास विरोध आणि मतास विरोध या गोष्टींमधील पृथक्त्व लक्षांत आणिलें पाहिजे. ब्राह्मणांचीच केवळ नव्हे, तर सर्वसामान्य हिंदूंची अशी प्रवृत्ति असे कीं, वादविवादाच्या बाबतींत अत्यन्त मोकळेपणा रक्षावयाचा आणि नवीन मतें वगैरेंस उत्तेजन द्यावयाचें, तथापि जेव्हां मतसत्यत्वस्थापनेपलीकडे किंवा उपास्याच्या उपासनेपलीकडे सामाजिक खटपटी होऊं लागतील आणि लोकांपासून पृथक् राहणारा असा जनसमूह निर्माण होऊं लागेल तेव्हां त्याच्याविरुद्ध जावयाचें.

मोकळेपणानें वादविवादास उत्तेजन न देणारा असा वर्ग जर असेल तर तो वर्ग संप्रदायांचाच होय. कां कीं, संप्रदायांचें अस्तित्वच विशिष्टमतांवर अवलंबून असतें. उलटपक्षीं मनुष्याचें जातिरूपी समाजांतील स्थान कोणत्याहि विशिष्ट मतावर अवलंबून नसतें किंवा जातीचें अस्तित्वहि कोणत्याच मतावर अवलंबून नसतें आणि त्यामुळें कितीहि भिन्नभिन्न मतें निघालीं तरी जातीचें एकत्व हें राहतेंच. संप्रदायांचें असें नाहीं. विशिष्टमतांवर किंवा उपास्यांवर त्यांचें अस्तित्व अवलंबून असल्यामुळें तीं मतें किंवा उपास्यें दुर्बळ झालीं तर संप्रदायाचें अस्तित्वच नाहीसें होणार अशी संप्रदायवाल्यांस धास्ती वाटत असते आणि त्यामुळें संप्रदायांमध्यें विरुद्ध मतांविषयीं असहिष्णुता फारच वाढते. ख्रिस्ती आणि मुसुलमान संप्रदायांच्या इतिहासांत विचारविषयक असहिष्णुतेमुळें जे रक्तपात आणि भिन्नमतवाल्यांस जिवंत जाळणें इत्यादि प्रकार घडले त्यांचें बीज हेंच आहे. ख्रिस्त्यांनीं परमतासहिष्णुतेमुळें माणसें जाळलीं आणि आम्हीं हिंदूंनीं तसें कांहीं केलें नाहीं म्हणून ख्रिस्त्यांस निंदावयास नको व हिंदूंस वंदावयास नको. दोघांची समाजघटना भिन्न असल्यामुळें हे भिन्न परिणाम झाले. ख्रिस्त्यांमध्यें अनेक पंथ आहेत, हिंदूंत अनेक संप्रदाय आहेत. एवढें या दोघांत साम्य आहे. पण या साम्याबरोबर एक महत्त्वाचा भेद आहे तो असा कीं, प्रत्येक ख्रिस्ती कोणत्या तरी पंथाचा असतो पण हिंदु कोणत्या तरी संप्रदायांत आहेच असें नाहीं. हिंदूंच्या बाबतींत असें होतें कीं, आज याचें हें मत आहे तर उद्यां निराळें आहे. आज हा एकादशी करील, उद्यां शिवरात्रिहि करील. कोणत्याहि विशिष्ट मतास अगर संप्रदायास न बांधला गेल्यामुळें तो स्वतंत्र आहे. ख्रिस्त्याचें तसें नाहीं. तो कांहीं बऱ्याबाईट कल्पनांनां बांधला गेला आहे. येथें हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, विशिष्ट विचारांनीं बद्ध रहाण्यावर संप्रदायांत स्थान असावयाचें या परिस्थितीनें सामान्य ख्रिस्त्याचे मोठे हाल होतात असें नाहीं; आणि पिढ्यान् पिढ्या विशिष्ट कल्पनांनां बांधलें जाणारें व नवीन कल्पनांशीं असंबद्ध असणारें ख्रिस्ती डोकें म्हणजे कांहीं विलक्षण बनावटीचें आहे अशांतला भाग नाहीं. नवीन मतें ग्रहण करणारा ख्रिस्ती कोणत्या तरी एका संप्रदायास चिकटून राहतो एवढेंच. संप्रदायाचें एक विशिष्ट मत असतें, तो त्या संप्रदायाचा सदस्य असतो; आणि लौकिक कारणासाठीं त्यास चिकटून असतो.

हिंदूंपैकीं प्रत्येकास मी अमुक पंथाचा असें जरी सांगतां येणार नाहीं तरी विशिष्ट संप्रदायांतर्गत मनुष्यास आपण कोणत्या पंथांत आहों हें सांगतां येईल. मी निंबार्कपंथी आहें किंवा रामानुजपंथी आहें हें वैष्णव सांगूं शकेल, मी श्वेतांबर आहें कीं दिगंबर आहें हें जैन सांगूं शकेल आणि मी आदिब्राह्मो आहें कीं साधारण ब्राह्मो आहें हें कोणीहि ब्राह्मो सांगूं शकेल. संप्रदायांत जेव्हां फूट पडते तेव्हां कांहीं माणसें इकडे जातात व कांहीं तिकडे जातात. आणि त्यामुळें प्रत्येक व्यक्ति संप्रदायांतर्गत कोणत्या तरी पंथांत जाऊन पडतेच. संप्रदायांतर्गत व्यक्ति कोणत्या तरी संप्रदायांतर्गत पंथांत पडणें ही गोष्ट सहज शक्य होते तशी कोणत्याहि विशिष्ट संप्रदायाचा नव्यानें अंगीकार करणें ही गोष्ट होत नाहीं.

संप्रदाय अशिष्ट असतां संग्राहक असतात ते शिष्ट झाले असतां त्यांची संग्राहकता कमी होते. जे संप्रदाय आपलें पृथक् सामाजिक अस्तित्व स्थापूं पहातात त्या संप्रदायांवर मोठेपणाचा किंवा हलकेपणाचा शिक्का वसतो. अमेरिकेंत आपणास दिसतें कीं ज्या संप्रदायाच्या मंदिराच्या बाहेर जास्त मोटारगाड्या दिसतात त्या संप्रदायाचे अनुयायी व्हावें असें पुष्कळ लोकांस वाटतें. याप्रमाणें एकाच ख्रिस्ती जातींतील लोकांमध्यें केवळ सदस्यांच्या पैशाच्या थैलीवरून संप्रदायमहत्त्व किंवा संप्रदायनीचत्त्व जर कांहीं लोकांच्या दृष्टीनें स्थापन होतें तर ज्या भारतासारख्या देशांत निरनिराळ्या सामाजिक पायरीच्या अनेक जाती आहेत आणि जेथें एकदां आलेलें उच्चनीचत्व वरेंच वर्षे टिकणारें असतें तेथें लौकिक हेतूंचे परिणाम संप्रदायाच्या वृद्धीवर आणि क्षयावर आणि त्याचप्रमाणें संप्रदायाच्या कार्यकारी नीतिसूत्रांवर झाल्याशिवाय कसे राहतील ? येथें ज्या संप्रदायांमध्यें कनिष्ठ जातींचा भरणा होतो ते संप्रदाय खालची पदवी पावतात. तसेंच अत्यन्त खालच्या पदवीचे लोक आपणास समाजांत कांहीं तरी स्थान मिळावें म्हणून कोणत्या तरी संप्रदायांत घुसूं पहातात. जेव्हां संप्रदायांस हा अनुभव येऊं लागतो तेव्हां आपली उच्चता कमी होऊं नये म्हणून ते आपणांत नवीन माणसें घेणें बंद करितात. जैन लोक, लिंगायत आणि महानुभाव या मंडळींनीं आपल्या संप्रदायाचा प्रचार करणें सोडून दिलें आहे. अलीकडे कांहीं जैन लोक कांसारांमध्यें आपला संप्रदाय वाढविण्याची खटपट करीत आहेत. ते आपला संप्रदाय वाढविण्याकरितां ज्या युक्त्या करीत आहेत त्यांतील एक अशी आहे कीं, ते कांसारांनां सांगतात कीं, तुम्ही कांसार पूर्वीं जैनच होतां, पण तुम्ही जैन धर्म सोडले आणि व्रतें विसरलां त्यामुळें हिंदू झालां. महाराष्ट्रांत ही मतप्रचारार्थ खटपट असण्याचें एक विशेष कारण असें आहे कीं या कांसारांपैकीं कांहीं वर्ग जैनच आहे आणि त्यांच्यांत व जैनेंतर कासारांत लग्नव्यवहार चालू आहे.

पुष्कळदां युरोपांतील ज्यू हे ख्रिस्ती लोकांस ज्यू करून घेतात, तथापि ते वाटेल त्यास ज्यू करून घेतील असें वाटत नाहीं. यांनीं नीग्रोला कधीं ज्यू बनविल्याचें ऐकिवांत नाहीं.

पारशी लोकांनींहि भरतखंडांत आपल्या झरथुंष्ट्र संप्रदायामध्यें कांहीं हिंदू लोकांस घेण्याचा प्रथम प्रयत्न केला, पण जेव्हां घरकामं करणारे नोकर किंवा अस्पृश्य जाती यांशिवाय कोणी हिंदु त्यांच्या संप्रदायांत शिरत नाहीं असें त्यांस आढळून आलें तेव्हां त्यांनीं हें संप्रदायसंवर्धनाचें काम बंद ठेवलें, असें पारशी आचार्य डॉ. ढालानें आपल्या ग्रंथांत म्हटलें आहे.

जाती आणि संप्रदाय यांच्यामध्यें सादृश्य आहे. संप्रदाय म्हणजे नवीन सदस्य घेणारी 'जात' असें म्हणतां येईल. जे संप्रदाय पूर्वीं आपला प्रचार करीत होते ते त्यावेळीं उघड्या तोंडाच्या जातीसारखेच होते. तथापि आतां त्यांची परजनसंग्राहकता वंद झाल्यामुळें ते खऱ्याखुऱ्या म्हणजे बंद तोंडाच्या जातीच बनले आहेत. ख्रिस्त्यांमध्यें देखील जातिस्वरूप थोडेंबहुत येऊं पहात आहे. उमरावती येथील एका सुशिक्षित महारानें डॉ. केतकर यांस असें सांगितलें कीं, ख्रिस्ती मिशनरी महार आणि ख्रिस्ती हे एकच आहेत असें अडाणी महारांस भासवितात आणि महारांची सहानुभूति कमी न व्हावी म्हणून महार ज्यांस हलके समजतात त्या मांगांस ख्रिस्ती करीत नाहींत.

येथवर सांप्रतच्या भारतीय हिंदुसमाजाचें निरीक्षण करून तदंतर्गत संप्रदायांचें स्वरूप, ख्रिस्ती व मुसुलमान समाजांपासून हिंदुसमाजाची भिन्नता इत्यादि गोष्टींचें विवरण केलें. हिंदु समाजाची संस्कृति म्हणजे भारतीय संस्कृति. हिलाच आर्य संस्कृति असें नांव आहे. या आर्य संस्कृतीचा अथवा भारतीय संस्कृतीचा इतर संस्कृतींशीं संबंध येऊन ज्या घडामोडी झाल्या त्यांजकडे वळणें आतां इष्ट आहे.

**आर्यसंस्कृतीचा वृद्धिसंकोचः**—इतर संस्कृतींच्या स्पर्धेमुळें आर्यसंस्कृतीचा कसा काय वृद्धिसंकोच होत आहे याचा विचार करण्यासाठीं इतिहासांत शिरण्यापूर्वी जगतांतील प्रकृत समाजाचें अवलोकन करूं. जगाच्या क्षेत्राचें अवलोकन ज्या तीन तऱ्हांनीं केलें पाहिजे त्या येणेंप्रमाणें:—

(१) अखिलभारतीय आर्यसंस्कृतीच्या क्षेत्रांत भारतीय व अभारतीय जाती धरून किती लोकसमुदाय आहे ?

(२) आर्यसंस्कृतीपासून अपसृष्ट परंतु जातीनें भारतीय अशांचा लोकसमुदाय किती आहे ?

(३) जातीनें आजच्या भारतावाहेरील परंतु आर्य संस्कृतीच्या आवेष्टनानें वेष्टित झालेला लोकसमुदाय किती आहे ?

या तिन्ही वाजूंनीं आतां विचार करूं.

वरील प्रश्नांत निर्दिष्ट झालेले तीन वर्ग एकमेकांपासून अत्यंत पृथक् करतां येणार नाहींत. भारत म्हणजे काय याची स्थानमूलक व्याख्या आपण प्रथम करूं. या ठिकाणीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं भारताच्या मर्यादा निश्चितपणें कधींच ठरल्या नव्हत्या. असो. सध्याचा ब्रिटिश छत्राखालीं असलेला हिंदुस्थानचा भाग घ्यावयाचा, त्यांत बलुचिस्तान, अंदमान व निकोबार बेटें व ब्रह्मदेश हें वजा करावयाचें आणि नेपाळ, भूतान आणि फ्रेंच व पोर्तुगीज अंमलाखालीं असलेला भारतीय भाग हा मिळवावयाचा; आणि इतकें करून जें क्षेत्र निर्माण होतें त्यास भारत हें नांव द्यावयाचें, ही कल्पना भारत किंवा भारतीय या स्थानविषयक शब्दांचा उपयोग करितांना आम्ही वापरली आहे. सामान्य हिंदूंच्या मनांत 'हिंदुस्थान' शब्द म्हणतांना एवढाच प्रदेश लक्षांत येतो.

**(१) भारतीय संस्कृतीच्या लोकांचा व अपसृष्टांचा हिशोबः**—भारतीय संस्कृतीच्या छत्राखालीं असलेल्या भागांतील बौद्धसंप्रदायी लोक, शैववैष्णवादि लोक आणि भारतीयांपैकींच जे निरनिराळ्या ठिकाणीं पसरले आहेत असे सर्व लोक आणि हिंदुस्थानांतील बाह्य जातींचे किंवा बाह्य संप्रदायांचे अनुयायी वगळून उरलेले सर्व लोक हे भारतीय संस्कृतीच्या छत्राखालील लोक समजावेत. जगांतील निम्म्याहून अधिक लोकसंख्या या वर्गांत येईल. भारतीय वंशाचे अथवा जातीचे असलेले परंतु भारतीय संस्कृतीपासून अपसृष्ट झालेले अशा लोकांचा हिशोब घेतां ब्रिटिश हिंदुस्थानांतील सहा कोटी सहासष्ट लक्ष मुसुलमान, व सुमारें छत्तिस लक्ष ख्रिस्ती आणि दहा लक्ष जिप्सी मिळून सुमारें सातकोटी बारालक्ष इतक्या लोकांचा या वर्गांत अंतर्भाव होतो. अफगाणिस्तान म्हणजे प्राचीन गांधार व बाहीक अगर बाल्हीक येथील लोक व तसेंच फ्रेंच आणि पोर्तुगीज सरकारच्या भारतीय प्रदेशांतील ख्रिस्ती हे वरील हिशोबांत मिळविले तर लोकसंख्या पन्नास लक्षांनीं अधिक वाढून एकंदर अपसृष्टांची संख्या सातकोटी बासष्ट लक्षांवर जाईल. ज्या जनतेंतून इतका वर्ग बाहेर पडला ती जनता म्हटली म्हणजे हिंदुस्थानांतील ब्रिटिश छत्राखालीं असलेले चोवीस कोटींहून अधिक हिंदू आणि ब्रिटिश छत्राखालीं नसलेले सुमारें पन्नास लक्ष हिंदू आणि हिंदुस्थानाबाहेर गेलेले सुमारें वीस लक्ष हिंदू मिळून सुमारें पंचवीस कोटी हिंदूंचे आणि सात कोटी अपसृष्टांचे पूर्वज होत. यावरून सरासरी दर बत्तीस माणसांतील सात लोक अपसृष्ट आहेत असें स्थूल प्रमाण निघतें.

हिंदुस्थानांतील एकंदर सुमारें ३१ कोट लोकसंख्येपैकीं चोवीस कोटींवर लोक हिंदू आहेत, साडेसहा कोटींपेक्षां अधिक मुसुलमान आहेत, आणि अडतीस लक्षांवर ख्रिस्ती आहेत, एक लाखाहून थोडेसे अधिक पारशी आहेत आणि एकवीस हजार यहुदी आहेत. ख्रिस्ती लोकांपैकीं सुमारें दोन लक्ष ख्रिस्ती यूरोपीय आहेत, एक लक्षावर मिश्र ख्रिस्ती आहेत आणि उरलेले ख्रिस्ती म्हणजे सुमारें छत्तीस लक्ष देश्य आहेत. अशा विविध लोकसंख्येमध्यें हिंदूंचें प्राबल्य अजूनहि आहे.

हिंदूंची संख्या कमी कमी होत जाऊन परकीय संप्रदायांची वाढ होण्याचा प्रकार व तदंतर्गत भवितव्यता टाळण्यासाठीं हिंदूंमध्यें अनेक चळवळी सुरू होऊन जे विविधजातिसंग्राहक समाज स्थापन झाले त्यांमध्यें आर्यसमाज हा प्रमुख होय. हिंदुसंस्कृतिसंकोचार्थ होणाऱ्या प्रयत्नांशीं तुलना करण्याजोगा दीर्घ प्रयत्न हिंदुलरक्षणपरांकडून अजून झालेला नाहीं. ब्रह्मसमाज, हिंदु मिशनरी सोसायटी यांचें या बाबतींतील कार्य फारच अल्प आहे. मराठे जातींमध्यें ख्रिस्ती लोकांस मराठे करून घेण्याची चळवळ अहमदनगरचे सयाजी पाटील यांनीं सुरु केली आहे. तसेंच वर्धा येथील मराठ्यांच्या परिषदेंत इतरांस मराठे करावें याबद्दल ठरावहि पास झाला आहे. या प्रयत्नांकडे अभिमानी हिंदूंचें लक्ष लागलें आहे. २१ मार्च १९२० रोजीं ज्ञानकोशाच्या उपसंपादिका कुमारी ईडिथ कोहन यांस निरूढ व्रात्यस्तोम विधीनें हिंदु समाजांत घेतलें हा जुन्या संस्थेच्या पुनरुद्धाराचा निराळा एक प्रयत्न होय.

**भारतीय संस्कृतीचें अतिभारतीयत्वः**—हिंदूंच्या संस्कृतीचा आणि हिंदूंच्या संख्येचा विचार करितांना आपलें लक्ष केवळ हिंदुस्थानांतच अडकवून उपयोगी नाहीं. प्राचीन काळीं भारतीय संस्कृतीचा विस्तार होत असतां त्या संस्कृतीनें जेवढें क्षेत्र आक्रमण केलें त्या सर्व क्षेत्राचें स्थूल ज्ञान तरी आपणांस अवश्य आहे. अशा ज्ञानाखेरीज जगांत ज्या मोठमोठ्या उलाढाली होतात आणि ज्या अनेक शतकें चालतात त्यांचें ज्ञान आपणांस व्हावयाचें नाहीं. स्थानिक इतिहास जितके महत्त्वाचे आहेत त्यांहूनहि सांस्कृतिक इतिहास अधिक महत्त्वाचे होत. फार मोठ्या जनसंख्येवर परिणाम घडविणाऱ्या आणि आपल्या विविध शक्तींचा उपयोग करणाऱ्या अशा शक्ती राजकीय नसून सांस्कृतिक असतात. राष्ट्रांचे इतिहास हा संस्कृतीच्या इतिहासांतील एक अल्प भाग असतो. सर्व जगाचें निरीक्षण करतांना राष्ट्रांच्या लहानसान क्रियाच केवळ नव्हत तर राष्ट्रांची विस्तारसंकोचमूलक बनलेलीं साम्राज्यें हीं देखील संस्कृतीच्या इतिहासाच्या पोटांत येऊन जातात. यासाठीं राष्ट्रांचे आणि साम्राज्यांचे इतिहास संस्कृतींच्या इतिहासाचे अल्प घटक समजण्याचा इतिहासवेत्त्यांचा परिपाठ आहे. जगांतील सर्व प्रकारच्या स्पर्धांत सांस्कृतिक स्पर्धा सर्वांत अधिक महत्त्वाची आहे. ही स्पर्धा समजली म्हणजे जगदितिहासचित्राच्या स्थूल रेषा समजल्या. राष्ट्रांच्या अंतर्गत ज्या निरनिराळ्या घडामोडी त्या वरील रेषांहून खालच्या नंबरच्या अशा रेषा होत. अशी ही महत्त्वपरंपरा आहे. हिंदु या दृष्टीनें जो आपणांस विचार करावयाचा त्याचें महत्त्व हिंदुस्थानीय विचारापेक्षां मोठें आहे; हिंदुस्थान आणि इंग्लंड यांच्यासंबंधाचा प्रश्न, जगांतील विविध संस्कृतींच्या भवितव्यासंबंधींच्या प्रश्नापेक्षां फारच लहान आहे; या गोष्टी वरील विवेचनावरून आपल्या लक्षांत येतात. असो.

संशोधनामध्यें प्रवेश करावयाचा म्हणजे आजच्या व म्हणून अधिक परिचित अशा परिस्थितीकडे प्रथम अवलोकन करावयाचें आणि तेथून मग कमी परिचित अशा पूर्वकालाकडे जावयाचें. या संशोधन तत्त्वाचा अवलंब करून हिंदूंची भारतबाह्य अथवा अभारतीय जगांतील आजची परिस्थिति प्रथम पाहूं आणि नंतर पूर्वकालाकडे म्हणजे हिंदुसंस्कृतीच्या आजवरच्या संगतवार इतिहासाकडे जाऊं.

---

## प्रकरण ४ थें.

### हिंदुस्थान, सिलोन आणि ब्रह्मदेश.

हिंदुस्थानाच्या जवळील भागांचा म्हणजे ब्रह्मदेश, सिंहलद्वीप, मलायीद्वीपकल्प इत्यादि भागांचा विचार करतांना आपणांस दोन थर लक्षांत घ्यावे लागतात. एक सांस्कृतिक दृष्ट्या जे भारतीय आहेत अशा तद्देशीयांचा आणि दुसरा आजच्या मुसुलमानांनीं आणि ख्रिस्त्यांनीं युक्त अशा अर्वाचीन भारतीयांचा. या दोन्ही प्रकारच्या लोकांसंबंधानें आज येथें स्थानबद्ध झालेल्या हिंदु जनतेंत निश्चयात्मक भावना नाहींत. संस्कृतिविस्ताराचें काम बंद पडलें असल्यामुळें वरील देशांत नवीन जाणाऱ्यांचा आणि तेथील देश्यांचा संबंध जोडणाऱ्या चळवळी मुळींच नाहींत. यासाठीं या दोन प्रकारच्या लोकांचें ज्ञान आज आपणांस पृथक्पणें मांडलें पाहिजे. जे आपले लोक तिकडे नवीन गेले आहेत त्यांच्याशीं आपलें अधिक जिव्हाळ्याचें नातें असेल आणि आहेहि; आणि यामुळें त्यांच्या हिताहिताविषयीं थोडीबहुत जागृति आपणांस दिसते; पण तिकडील देश्य लोकांसंबंधानें आपण आज उदासीन आहों. तथापि हरवलेल्या कोंकराच्या भेटीविषयीं अधिक आतुरता दाखविणाऱ्या ख्रिस्ती कथेंतील मेंढपाळाची वृत्ति आपणांत केव्हां तरी जागृत होऊन भारतीय संस्कृतीच्या निरनिराळ्या देशांतील देश्य प्रतिनिधींविषयीं आपणांस सहानुभूति उत्पन्न होईल अशी आशा आहे. सद्यःकालीन चळवळीकडे व स्पर्धेकडे थोडेंफार दुर्लक्ष करून ऊर्ध्वदृष्टि राहणाऱ्या संशोधकांस जी जिज्ञासा या लोकांसंबंधानें उत्पन्न होते तेवढीच काय ती जिज्ञासा आज आहे. या संशोधकांखेरीज इतरांस आज जिज्ञासाच नाहीं.

ज्याविषयीं आधुनिकांस कमी जिज्ञासा आहे तो भाग अगोदर घेण्याचें पाप आम्ही करतों.

एखाद्या लढाईंत पराभव झाल्यानंतर ज्याप्रमाणें सेनापतीस आपलें गेलें काय आणि राहिलें काय याचा हिशेब घ्यावा लागतो, त्याप्रमाणें गेल्या आठशें नऊशें वर्षे चालू असलेल्या भारतीय संस्कृतीच्या उच्छेदांतून आज शिल्लक काय राहिलें आहे याचा विचार केला पाहिजे.

वरील हिशेब काढून करावयाचें काय ? असा प्रश्न कित्येक तत्त्ववेत्ते करतील. त्याला उत्तर एवढेंच कीं, देशी संस्कृतीपासून हिंदू लोक कधीं मुक्त व्हावयाचे नाहींत आणि त्यांच्या संस्कृतीची जोपासना जितकी चांगली होईल तितकें हिंदूंस जगांत महत्त्व येईल. यासाठीं हिंदु संस्कृतीची जी वाताहात झाली आहे ती नाहींशी करून तिचें एकीकरण केलें पाहिजे.

हिंदु संस्कृति एकसूत्री कधीं होती काय ? हिंदु लोक कधीं एकसूत्री होते काय ? याला उत्तर एवढेंच कीं, हिंदु संस्कृतीच्या सार्वभौमत्वाखालीं असलेल्या लोकांस, एकत्र होऊन स्वसंरक्षणाचें काम, मुसुलमानी व ख्रिस्ती लोकांचीं संप्रदायरूपी राष्ट्रें आमच्या संस्कृतीच्या उच्छेदार्थ प्रयत्न करीपर्यंत पडलें नव्हतें. ज्या निरनिराळ्या राष्ट्रांची संस्कृति अल्प होती तीं राष्ट्रें ब्राह्मणांनीं आपल्या संस्कृतीच्या बाहुल्यामुळें सहज आपल्या कबजांत आणलीं, त्यामुळें हिंदूंस एकसूत्री होण्याचें प्रयोजन नव्हतें. मुसुलमानी स्वाऱ्यांनंतर आम्ही जरा कोठें डोकें वर काढतों तों पाश्चात्य संस्कृति येऊन आम्हांस कबजांत आणूं पहात आहे यामुळें हिंदु संस्कृतीखालीं असलेल्या लोकांचें एकीकरण करून तिचा विस्तार करण्याचें आमचें कार्य अजून तसेंच राहिलें आहे. या कार्याकडे विशेष कळकळीनें लक्ष देण्याचें आतां आम्हीं मनावर घेतलें पाहिजे. उच्छेदक शक्तींच्या धुमाकुळांतून आमच्या संस्कृतीचें जें कांहीं कोठें शिल्लक राहिलें आहे त्याचा हिशेब घेणें हें आमच्या एकीकरणकार्याला अवश्यक असें प्रस्तावनारूप कार्य आहे तेव्हां आतां तिकडे वळूं.

सिंहलद्वीप आणि ब्रह्मदेश या दोन प्रदेशांचें सांस्कृतिक भवितव्य हिंदुस्थानच्या भवितव्याशीं फार निकट तऱ्हेनें संबद्ध असल्यामुळें या दोन भूभागांविषयीं प्रथम विचार करणें योग्य होईल. यांत अगोदर सिंहलद्वीपस्थांकडे वळूं.

सिंहलद्वीपास भारतीय संस्कृतीचा अवशेष म्हणण्यापेक्षां विभाग म्हटलें तर अधिक शोभेल. तेथें बौद्ध संप्रदायाचें जगांतील एक अत्यंत महत्त्वाचें ठाणें आहे. हीनयान पंथाचें शुद्ध स्वरूप सिलोनमध्यें जसें सांपडतें तसें तें इतरत्र सांपडत नाहीं. पालीग्रंथांचें आगर आज सिंहलद्वीपच आहे आणि भारतीय संस्कृतीच्या इतिहासास थोडी बहुत मदत करणारे महावंसो, दीपवंसो यांसारखे इतिहासग्रंथ सिंहलद्वीपांतच सांपडतात. आज अनुराधपुर येथें गेलें असतां प्राचीन सुसंस्कृत हिंदुकलेचें स्वरूप अवशेषांच्या रूपांत पहावयास मिळतें. खुद्द सिंहली लोक बौद्ध आहेत पण वेदभाषाजन्य वाणी बोलत आहेत आणि तेणेंकरून ते आपली पितृपरंपरा व्यक्त करितात. सिंहलद्वीपांतील दुसरा मोठा वर्ग म्हणजे तामिळ लोकांचा. हे लोक वेदभाषाजन्य भाषा बोलत नसले तरी ते आपणांस ब्राह्मणानुयायी हिंदू म्हणवितात. याप्रमाणें एका लोकसमूहाचें आपणांशीं जवळचें नातें एका कारणामुळें आहे तर दुसऱ्याचें दुसऱ्या कारणामुळें आहे. यासाठींच वर म्हटलें आहे कीं, सिंहलद्वीपास हिंदु संस्कृतीचा अवशेष म्हणण्यापेक्षां विभाग म्हटलेलेंच अधिक शोभेल. असो.

आतां या द्वीपांतील आजच्या सामाजिक स्थितीचें सूक्ष्मावलोकन करूं. आपलें सिंहली लोकांशीं नातें दाखविणाऱ्या अनेक गोष्टी डॉ. केतकर यांनीं पूर्वीं लोकशिक्षणांत प्रसिद्ध केल्या आहेत त्याच कांहीं फरकानें येथें दिल्या आहेत. त्यांचें वर्णन करितांना जातिभेद, परस्परजातिविवाह, प्रीतिविवाह,

देश्य आणि परकीय संस्कृतीची स्पर्धा इत्यादि गोष्टी विशेष विचारासाठीं घेतल्या आहेत, आणि तदनंतर तेथें आज जाणाऱ्या भारतीयांच्या स्थितीसंबंधानें प्रत्यक्ष अवलोकन-मूलक माहिती सादर केली आहे.

सिंहलद्वीप येथील लोक हिंदुस्थानांतून तिकडे गेलेले आहेत. तथापि तेथें बौद्ध संप्रदायाचा प्रसार झाल्यामुळें आणि यूरोपीय लोकांचें प्राबल्य तेथें अगोदर झाल्यामुळें त्यांच्या समाजांत आणि आपल्या समाजांत कांहीं फरक उत्पन्न झाले आहेत. तेथें कांहीं अंशीं यूरोपीय संस्कृतीची प्रगति अधिक झाली आहे. असें असल्यानें आपल्यापुढें असे प्रश्न उपस्थित होतात कीं, हे लोक हिंदुस्थानच्या संस्कृतीस अगदींच पारखे होणार काय? ते अगदींच पारखे झाल्यास हिंदुस्थानाविषयीं त्यांच्या मनांत प्रेम राहील काय? ते जर आपणांपेक्षां अधिक पाश्चात्य बनले असले तर त्यांस "आपणासारिखें" करण्यास काय परिश्रम केले पाहिजेत? आणि त्या परिश्रमांस चांगलें फल येण्यास किती "काळ वेळ" लागेल? तसेंच आपल्यामध्यें राष्ट्रीय आकांक्षा उत्पन्न होत आहेत त्याप्रमाणें त्यांच्यामध्येंहि होत आहेत काय? होत असल्यास त्यांचें स्वरूप कोणत्या प्रकारचें आहे? आंग्लसंस्कृतीचा अधिकाधिक प्रसार करून म्हणजे आपण अधिकाधिक इंग्रज बनून आंग्लसंसर्ग-संभव सादृश्यानें राष्ट्राचें एकीकरण करावें अशी जी आजच्या काँग्रेसमधील पुढाऱ्यांची म्हणजे गेल्या पिढींतल्या शिष्टांची वृत्ति आहे त्याचप्रमाणें त्यांचीहि आहे काय? असल्यास तिला अवरोधक कोणी पक्ष उत्पन्न झाला आहे काय? झाला असल्यास त्या पक्षाचा जोर कितपत आहे? राष्ट्रीय संस्कृतीच्या पायावर नवीन संस्कृति उत्पन्न करणें त्या लोकांस कितपत शक्य आहे? इत्यादि प्रश्नांचें उत्तर देण्यासाठीं जें अवलोकन करावयाचें त्यास राष्ट्रीय दृष्टीचें अवलोकन असें डॉ. केतकर म्हणतात.

सिलोनची लोकसंख्या १९११ च्या खानेसुमारीप्रमाणें ४१ लक्ष आहे. या लोकसंख्येपैकीं सातअष्टमांश स्थाईक आहे आणि एकअष्टमांश फिरती आहे. म्हणजे हिंदुस्थानांतील मजूर आणि त्यांच्या बरोबर आलेलीं आश्रित माणसें मिळून सुमारें पांच लक्ष तीस हजार लोक भरतील. या लोकांपैकीं बहुतेक लोक तामिळ असल्यामुळें यांची मोजणी हिंदी तामिळ या सदराखालीं करितात. सिंहली तामिळ लोकांची संख्या जवळजवळ इतकीच आहे. एकंदर तामिळ लोकांची संख्या येथें एकचतुर्थांशापेक्षां जराशी अधिक आहे.

सिंहली लोकांची संख्या सत्तावीस लक्षांहून अधिक आहे म्हणजे शंभर सिलोनी लोकांत पांसष्ट लोक सिंहली आहेत. या पांसष्टांत ४१ "पातराट" सिंहली आहेत आणि चोवीस "उदराट" सिंहली आहेत.

"उदराट" आणि "पातराट" हे सिंहली लोकांचे भेद आहेत. उदराट ( ऊर्ध्वराष्ट्र ? ) म्हणजे उच्च प्रदेशांत रहाणारे लोक आणि पातराट म्हणजे सखल प्रदेशांत म्हणजे समुद्र-किनाऱ्याशीं रहाणारे लोक.

सध्यां आपण सिंहलद्वीपांत पाहूं लागलों तर जिकडे तिकडे पातराटच आपणांस दिसतात. पातराटांमध्यें जितकी पाश्चात्त्य संस्कृति शिरली आहे तितकी उदराटांत नाहीं. उदराट हा मागसलेला वर्ग आहे असें लोकांस वाटतें. क्यांडीशहर हें उदराटांचें केंद्र होय. पण तेथें देखील आज पातराटांचाच भरणा २७४५ या संख्येनें अधिक आहे.

उदराट जरी मागसलेले आहेत, तथापि स्वभावतः कर्तृत्व-शक्तीनें ते कमी आहेत असें नाहीं. स्वातंत्र्याची–परंपरागत संस्कृतीची–जोपासना करण्याचा बोजा त्यांच्यावर पडला होता व परकीय संस्कृतीस विरोध करणें हेंच त्यांचें कांहीं काळ-पर्यंत कर्तव्यकर्म झालें होतें. यामुळें पुष्कळांस उदराट हे मागसलेले वाटतात. ज्या वेळेस सिलोन हें डच आणि पोर्तुगीज लोकांनीं काबीज केलें त्या वेळेस या उदराटांनीं आपलें स्वातंत्र्य कायम ठेवलें. परक्या सत्तेचा अनुभव इंग्रजांची सरशी होई-पर्यंत यांस मिळाला नाहीं. सिंहली लोकांचें परंपरागत धर्म-शास्त्र आणि कायदा हीं आज उदराटांस फक्त लागू पडतात. पातराटांस लागू पडत नाहींत. यूरोपीय सुधारणा ज्यांनीं अधिक स्वीकारली असेल त्यांसच आजकालच्या दिवसांत अधिक प्रामुख्य मिळतें. त्यामुळें उदराटांस आज प्रमुखता नाहीं.

आज लंकेंतील ज्या लोकांचीं नांवें आपणांस ऐकावयास मिळतात ते लोक एक तर सिलोनी तामिळ आहेत अगर पातराट आहेत. उदराटांचीं नांवें आपल्या कानीं क्वचितच येतात.

सिलोनमध्यें यूरोपियनांची लोकसंख्या साडेसात हजार आहे आणि बर्घेर आणि यूरेशिअन लोकांची संख्या साडे-सव्वीस हजार आहे. तसेंच तेरा हजार मलायी लोक आहेत.

सिलोनमध्यें वेद्द नांवाची एक जंगली जात आहे, तिचें नांव पुष्कळांनीं ऐकलें असेल. या जातीची लोकसंख्या गेल्या खानेसुमारीच्या वेळेस ५३३२ होती. या वेद्दांपैकीं तीन हजार म्हणजे शेंकडा सत्तावन लोक आपणांस हिंदू म्हणवितात. वेद्दांमध्यें एकोणनव्वद माणसें ख्रिस्ती झालीं आहेत.

**सिंहलद्वीपांतील जातिभेद**—सिंहलद्वीपांतील जाति-भेदाचें वर्णन करावयाचें झाल्यास या वर्णनाचे प्रथम दोन विभाग केले पाहिजेत ते येणेंप्रमाणें:—१ तामिळ लोकांतील जातिभेद, आणि २ सिंहली लोकांतील जातिभेद. या दोहोंच्या जातिभेदांमध्यें सामान्य स्वरूप कांहीं तरी आहेच. त्याचें नंतर वर्णन करूं.

सिंहलद्वीपांतील तामिळ लोकांच्या जातिभेदांत आणि हिंदुस्थानांतील तामिळ लोकांच्या जातिभेदांत फारसा फरक नाहीं. ज्या जाती हिंदुस्थानी तामिळांत आहेत त्याच सिलोनी तामिळांत आहेत. कांहीं फरक आपणांस दृष्टीस पडतात, ते येणेंप्रमाणें:–सिंहलद्वीपांतील जातिभेदांत ब्रह्मद्वेषाचा अभाव, ख्रिस्ती पारमार्थिक संप्रदायाचें जातिभ्रंशकरणांत दौर्बल्य आणि दत्तविधान आणि विवाह यांच्या योगानें जात्यंतराची शक्यता या गोष्टी नजरेस येतात. याशिवाय दुसऱ्याहि महत्त्वाच्या गोष्टी आहेत. मद्रास इलाख्यांत ब्राह्मणांची जात शिक्षणांत फार पुढें गेली आहे; आणि सरकारी नोकरी, वकिली, वैद्यकी इत्यादि धंद्यांत ब्राह्मणच इतरांच्या पुढें आहेत. लंकेंतील परिस्थिति निराळी आहे. तेथें अर्वाचीन शिक्षणाचा संसर्ग ब्राह्मणांस झाला नाहीं. येथें जे ब्राह्मण आहेत त्यांचे धंदे मुख्यत्वेंकरून दोन आहेत. एक धंदा म्हटला म्हणजे उपाध्येगिरी आणि दुसरा धंदा म्हटला म्हणजे गणपति, सुब्रह्मण्य ( कार्तिकेय ), शिव आणि विष्णु इत्यादि उपास्यांच्या देवळांतून पुजारीपण करणें. जे सुशिक्षितांचे धंदे आपल्याकडे ब्राह्मण लोक करितात ते धंदे इकडे "वेल्लाल" ही जात करिते.

हिंदुस्थानांतील वरेचसे वेल्लाल अलीकडे निवृत्तमांस बनले आहेत; पण सिलोनी वेल्लाल मांसाहार करितात.

पाश्चात्य संस्कृति आणि हिंदी संस्कृति यांचें एक विलक्षण मिश्रण तामिळ लोकांत झालें आहे. बूट, पाटलोण, साहेबी टोपी, कालर, नेकटाय इत्यादि सर्व प्रकारचा पाश्चात्य पोषाख करावयाचा आणि कपाळावर पुन्हा भस्माचे चार स्पष्ट दिसतील असे पट्टे ओढावयाचे हा प्रकार चोहोंकडे आढळून येतो ! टेबलावर जेवण जेवावयाचें; तथापि टेबलावर चिनीमातीची प्लेट न घेतां केळीचें पान घ्यावयाचें हा प्रकार तर पुष्कळच आहे !

वेल्लाल जातीच्या खालोखाल अर्वाचीन सुधारणेंत पुढें आलेली जात म्हटली म्हणजे "करावा" ( मच्छीमार ) या लोकांची जात होय. ही जात श्रीमंत झाली आहे आणि वेल्लालांच्या बरोबर लग्नव्यवहार करण्याची आकांक्षा करीत आहे. *

**ख्रिस्ती व हिंदु:**—लंकेंतील तामिळ लोकांच्या जातिभेदाचें वर्णन करतांना एका गोष्टीचा उल्लेख मुख्यत्वेंकरून केला पाहिजे. ती गोष्ट म्हटली म्हणजे, हिंदु आणि ख्रिस्ती यांचीं लग्नें होत. तेथें एखादा वेल्लाल हिंदु असला तर त्यास वेल्लाल जातीची ख्रिस्ती मुलगी करण्यास हरकत वाटत नाहीं. तो वेल्लाल जातीची ख्रिस्ती मुलगी करील; पण दुसऱ्या जातीची हिंदु मुलगी करणार नाहीं. ख्रिस्ती संप्रदायाच्या लोकांची हीच गोष्ट आहे. ते आपली मुलगी स्वजातीय हिंदूस देतील; तथापि दुसऱ्या जातीच्या ख्रिस्त्यास देणार नाहींत. तेथें ख्रिस्ती मनुष्यास हिंदु होणें देखील सोपें आहे, असें एका ख्रिस्ती वकिलानें डॉ. केतकर यांस सांगितलें. कपाळास भस्म लावून एखादा मनुष्य हिंडूं लागला म्हणजे तो ख्रिस्ती नसून हिंदु झाला आहे असें लोक समजावयास लागतात !

सिलोनमध्यें ख्रिस्त्याचा विटाळ हिंदु तामिळास होत नाहीं हें सांगावयास नकोच.

हिंदू व ख्रिस्ती या लोकांनीं लग्न करतांना परमार्थसाधन आणि उपास्य यांच्याकडे लक्ष न देतां जातीकडे लक्ष द्यावें ही गोष्ट प्रथमदर्शनीं विस्मायक वाटेल. पण विचार केला असतां यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं. गुजराथी वाण्यांमध्यें पन्नास भेद उर्फ जाती आहेत. प्रत्येक जातींतले कांहीं लोक वैष्णवसंप्रदायी आहेत आणि कांहीं जैन आहेत. दोघेहि एकमेकांशीं लग्नें करितात. लग्न झाल्यानंतर वायको नवऱ्याचें उपास्य स्वीकारते.

जैन आणि वैष्णव या दोघांसहि हिंदूंचें धर्मशास्त्र लागू पडतें. पंजाबमध्यें शीख आणि सनातनी ( श्रुतिस्मृतींस पूज्य मानणारे हिंदू ) लग्नव्यवहार करितात. एखादा शीख जर आरोरा जातीचा असला तर तो आरोरा जातीच्या शीख नसलेल्या लोकांशीं विवाहसंबंध करील; पण त्यास आपली मुलगी जाठ जातीच्या शिखास देण्याचें जिवावर येईल. लग्नव्यवहारांत कोणच्या गोष्टीकडे लक्ष द्यावें या प्रश्नासंबंधानें महाराष्ट्रीयांमध्येंच प्रकार किती आहेत पहा. कोंकणस्थांत ऋग्वेदी आणि यजुर्वेदी यांचीं लग्नें होतात. वेदशाखेनुसार देशस्थांत जाती आहेत. पण त्या इतरत्र नाहींत. उपास्य आणि परमार्थसाधन यांस लग्नव्यवहारांत महत्त्व किती द्यावयाचें हा प्रश्न सादृश्यावर अवलंबून आहे असें दिसतें. ख्रिस्ती लोक ही आपल्याकडे निराळी जात झाली आहे. "ख्रैस्त्य"† हें आपल्या देशांत केवळ परमार्थसाधन नाहीं तर तें भिन्न आचारविचारांचें संस्थापक आणि नवीन जात तयार करणारें करण आहे; पण सिंहलद्वीपांत तसें नाहीं. आपल्याकडे आपण थिआसफिस्टास जातीबाहेर कोठें काढतों ? लोकांची रीत

* सिलोनमध्यें असलेल्या तामिळ लोकांसंबंधानें कांहीं उपयुक्त माहिती "A Handbook to the Jaffna Peninsula, by S. Katiresu, Prosecutor, District Court, Jaffna ( 1905 ) या पुस्तकांत सांपडेल. माहितींत अशुद्धें वरींच आहेत.

† "Christianity" या शब्दाचें रूपांतर "ख्रिस्ती धर्म" असें करणें बरोबर नाहीं. "ख्रिस्ती जात" असें करणेंहि बरोबर नाहीं. जाति, धर्म हे विवक्षित अर्थाचे शब्द आहेत. Christianity ही निरनिराळ्या परिस्थितींत निरनिराळीं स्वरूपें धारण करिते, त्यासाठीं कोणत्याहि स्वरूपबोधक नामाशीं ख्रिस्ती हें विशेषण लावून ख्रैस्त्याची स्वरूपव्यंजना करणें योग्य होणार नाहीं. ख्रिश्चानिटी हा जितका अस्पष्टार्थ शब्द आहे, तितकाच अस्पष्टार्थ शब्द तिच्या रूपांतरासाठीं वापरला पाहिजे.

विघडविण्याच्या व त्यांस देव मानावयास लोकांना शिकविण्याच्या कामीं हें अर्वाचीन पाखंड ख्रिस्ती संप्रदायापेक्षां कमी नाहीं.* जानवें टाकून द्यावें म्हणून गप्पा मारणाऱ्या, तथापि जानवें न टाकून देणाऱ्या प्रार्थनासमाजिस्टांस आपण कोठें जातीबाहेर काढतों? मिल्लमतानुयायी अगर स्पेन्सरमतानुयायी कोणी झाला तरी त्याला जातीबाहेर कोणी काढीत नाहींत; तथापि जर कोणी ख्रिस्ती झाला तर मात्र आपण त्यास बाह्य लेखितों. याचें मुख्य कारण, ख्रिस्ती झालेले आपले लोक आपल्या दृष्टीनें जें अयोग्य आचरण आहे तें करितात आणि परकीय समाजांत प्रवेश करितात हें होय.

सिंहलद्वीपांतील सर्व हिंदू निवृत्तमांस नाहींत आणि सर्वच ख्रिस्ती मांसाहारी नाहींत; शिवाय परजातीवरोबर ते लग्नव्यवहार करीत नाहींत. आणि तेथील सरकाराची वृत्ति ख्रिस्त्यांस अधिक चांगल्या तऱ्हेनें वागवावयाचें आणि हिंदूंस कमी चांगल्या तऱ्हेनें वागवावयाचें अशा प्रकारची नाहीं. त्यामुळें ख्रैस्त्य पत्करणाऱ्या लोकांस हिंदूंपासून तुटून राहण्यांत फायदा दिसत नाहीं.

जैन लोकांस हिंदूंचेंच धर्मशास्त्र कायद्याच्या दृष्टीनें लागू पडतें. सिलोनी तामिल-ख्रिस्ती लोकांस तामिल हिंदूंचांच धर्मशास्त्रीय कायदा लागू पडतो. उदाहरणार्थ, हिंदूंच्या लग्नांतील मुख्य भाग नवऱ्यानें मंगळसूत्र बांधणें हा धरला आहे; आणि इतर भाग कमी महत्त्वाचे धरले आहेत. ख्रिस्ती झालेल्या तामिलांत देखील मंगळसूत्राचें महत्त्व आहेच. (कोचीन येथील गोऱ्या ज्यू लोकांच्या लग्नास देखील मंगळसूत्र हें लागतेंच!) सिंहलद्वीपांतील कायद्याविषयीं विशेष विवेचन पुढें येईलच. जातिभेदाशीं संबंध असलेल्या एकदोन गोष्टींसंबंधानें येथें लिहितों.

"थेसावलमै" उर्फ जाफना येथील कायद्यांत असें लिहिलें आहे कीं:—

"रीतीप्रमाणें जर कोणी पुरुषानें उच्च अगर हलक्या जातीचा मुलगा दत्तक घेतला तर त्या मुलास बापाची मालमत्ता मिळते एवढेंच नव्हे, तर तो मुलगा बापाच्या जातीचा होतो. तथापि एखाद्या बाईनें जर मूल दत्तक घेतलें, तर त्या मुलास त्या बाईची मालमत्ता मिळेल एवढेंच. तें मूल दत्तक घेणाऱ्या बाईच्या जातीचें नाहीं, तर तें आपल्या जन्मदात्या बापाच्याच जातींत रहातें."

जर एखाद्या मनुष्यानें अन्य जातीच्या मुलीस दत्तक घेतलें, तर ती दत्तक घेणाऱ्या मनुष्याच्या जातींत प्रवेश करिते. तथापि तिच्या मुलांची आणि तिच्या (दत्तक) बापाची जात एक होत नाहीं. तिच्या मुलांची जात तिच्या नवऱ्याच्या जातीप्रमाणें ठरते. ("थेसावलमै" भाग दुसरा, कलम ७ वें).

जे तामिळ लोक "थेसावलमै" कायद्यास अनुसरतात त्यांपैकीं कोणा स्त्रीनें परजातीच्या पुरुषावरोवर लग्न केलें तर ती लग्नानंतर, जोंपर्यंत तें लग्न कायम आहे तोंपर्यंत म्हणजे ती दुसरें लग्न करीपर्यंत, नवऱ्याच्याच जातीची आहे असें कायद्याच्या दृष्टीनें समजलें जाईल. "वैवाहिक हक्क आणि वारसा या संबंधाचा कायदा (१८७६)."

तामिळ समाजाचें निरीक्षण करतां भिन्नत्वदर्शक गोष्टी यांपेक्षां अधिक दिसत नाहींत.

सिंहली लोकांतील जातिभेद आणि एकंदर समाजस्थिति समजण्यासाठीं त्यांच्या संस्कृतीच्या स्वरूपाचें आणि कायद्याचें ज्ञान पाहिजे आणि समाजस्वरूपाचा प्रचलित राजशासनस्वरूपी कायद्याशीं असलेला संबंध लक्षांत घेतला पाहिजे.

**सिंहली कायदा आणि सिंहली संस्कृतिः—** सिंहली लोकरिवाज आणि सिंहली कायदा यांच्या परस्परसंबंधाविषयीं असें म्हटलें पाहिजे कीं हिंदुस्थानापेक्षां सिहलद्वीपांत कायद्याची लोकरीतीपासून फारकत अधिक झाली आहे.

कोणत्याहि समाजाची विशिष्टता त्या समाजाचें शासन ज्या पद्धतीनें होत असेल त्या पद्धतीच्या चिरकालिकत्वामुळें रहाते. समाजाचें खाणेंपिणें, जेवणाच्या वेळा, कपड्यांची पद्धत, या गोष्टी कालानुसार वदलतात; तथापि समाजाची शासनपद्धति वदलण्यास अधिक अवकाश लागतो; आणि समाजाची घटना वदलणें तर त्याहूनहि कठिण आहे. समाजाच्या घटनेंत फेरफार सहज होत नाहींत. ते फेरफार करण्यासाठीं फारच मोठा प्रयत्न लागतो. एक तर समाजांत फारच मोठ्या जोराची खळवळ होऊन फेरफार घडून येतात; अगर परसत्तेचा वरवंटा येऊन मूल संस्कृति चिरडून टाकतो. या विधानाची सत्यता दाखविण्यासाठीं एकच उदाहरण घेतों. आफ्रिकेतील निग्रोंमध्यें शेंकडों अगर हजारों जाती आहेत असें म्हटलें तरी चालेल. सूदानमध्येंच एक हजारांवर जाती होतील. कित्येक ठिकाणीं प्रत्येक गांव म्हणजे निराळी जात असें झालें आहे. तथापि तेथूनच अमेरिकेंत नेलेल्या निग्रोंमध्यें जाती राहिल्या नाहींत; आणि त्या रहातील तरी कशा? निग्रो बायका म्हणजे गोऱ्या लोकांच्या रखेल्या होत्या; आणि त्यांच्यावर आणि निग्रो पुरुषांवर वाटेल ती सत्ता त्यांचे मालक चालवीत असत. "वाटेल त्या गाईवर वाटेल तो पोळ लावावयाचा" असा प्रकार देखील गुलामांचे मालक करीत. कारण, जितका भक्कम मुलगा तयार होईल तितकी त्यास जास्त किंमत येत असे. त्यांच्यामध्यें लग्नव्यवहारच नाहींसा झाला होता. अशा प्रसंगीं मूल संस्कृति आणि

* आंग्लोसाक्सन ही जात सर्व जातींपेक्षां सर्व दृष्टींनीं उच्च प्रतीची आहे हें तत्त्व मॅडम ब्लाव्हाटस्की नांवाच्या एका बाईनें "थिआसफिस्टां"स पढविलें आहे. "आकल्ट साइट" उर्फ अतींद्रिय दृष्टि सध्यां गोऱ्या कातडीच्या तिघां प्राण्यांशिवाय इतरांस साध्य झाली नाहीं, ही गोष्ट देखील मनोरंजक आहे.

मूळच्या आठवणी काय टिकणार? आजच्या वृद्ध निग्रोंपैकीं बहुतेकांस आपला आजा कोण हें ठाऊक नाहीं; आणि बऱ्याचशा लोकांस आपला बाप कोण हें ठाऊक नाहीं! आपण निग्रो आहों, याशिवाय इतर सर्व गोष्टींची त्यांस विस्मृति झाली आहे; आणि ते सर्व आज एकजात झाले आहेत. आफ्रिकेंतील निग्रोंस नवीन सुधारणा घेण्यास जी हरकत वाटते, ती अमेरिकन निग्रोंस वाटणार नाहीं. कारण त्यांचे परंपरागत संस्कार नष्ट झाले आहेत.

केवळ राजकीय पारतंत्र्यामुळें परकीयांची सत्ता पूर्णपणें स्थापित होत नाहीं. खासगी व्यवहारावर व्यक्तींची सत्ता असलेली नष्ट होत नाहीं, आणि त्यामुळें सर्व तऱ्हेचा कायदा नष्ट होत नाहीं. राजव्यवहाराचा कायदा मात्र बदलतोच. हिंदुस्थानांत त्याप्रमाणें बदललाहि आहे.

पोर्तुगीज आणि डच सत्तेखालीं सिंहलद्वीपाचा जो भाग आला त्या भागांत ख्रिस्ती संप्रदाय फारच जोरानें वाढला. आणि बहुतेक सिंहली लोकांचीं नांवें देखील पोर्तुगीज अगर डच बनलीं. शिवाय सिंहली संस्कृतीचें मुख्य स्थान समुद्र-किनारा नव्हता, तर अनुराधपूर आणि क्यांडी हीं आंतील शहरें होतीं. समुद्रकिनाऱ्यावरील भागांत आणि सखल प्रदेशांत संस्कृति फारच मागसलेली होती. सिंहली लोकांचा पोषाख अगदींच अल्प होता. यामुळें नवीन संस्कृतीचा स्वीकार करण्यास त्यांस फारसें जड गेलें नाहीं. परंपरागत संस्कृतीविषयींचा अभिमान देश परक्या सत्तेखालीं गेला म्हणजे अधिक वाढतो, हें खरें. तथापि ज्या लोकांची संस्कृतीच अल्प असते त्यांस परकी संस्कृति घ्यावयास कमी हरकत वाटते. बंगाली लोकांस साहेबी टोपी डोक्यावर घालावयास मनाचा फारसा निर्धार करावा लागत नाहीं. तथापि महाराष्ट्रीयांस साहेबी टोपी घालण्यास अधिक शंका वाटते. परंपरागत संस्कृतीचा थर बंगाल्यांत फारसा जाड नसल्याकारणानें त्यांस कांहीं बाबतींत पाश्चात्य संस्कृतीचा अवलंब करणें फारसें जड गेलें नाहीं.

पोर्तुगीज लोकांनीं पोर्तुगीज कायदा सिलोनमध्यें सुरू केला; आणि डच लोक आल्यानंतर डच लोकांनीं रोमन–डच कायदा सुरू केला. जो भाग त्यांच्या अंमलाखालीं आला होता तेथें तो कायदा सुरू झाला; तथापि क्यांडी व आसपासचा भाग त्यांच्या अंमलाखालीं आला नसल्याकारणानें तेथें मूळ कायदा कायम राहिला.

आज पातरटांचे सर्व व्यवहार–म्हणजे देवघेव, दान, विक्री, वारशासंबंधाचा कायदा–हे सर्व रोमन–डच झाले आहेत. म्हणजे कायद्याच्या बाबतींत पातरटांची संस्कृति पाश्चात्य आहे. तथापि सिंहली जातिभेदास त्या कायद्याचा संपर्क फारसा झाला नाहीं. कारण, राष्ट्राच्या सर्वांगांचें नियमन करणारें धर्मशास्त्र तें नाहीं, आणि मूळ भाषा नष्ट झाली नाहीं. समाजघटनेच्या बाबतींत परकीय संस्कृतीचें देखील कांहीं चाललें नाहीं. रोमन–डच कायद्याप्रमाणें वाटेल त्याला वाटेल त्या जातीच्या बाईबरोबर लग्न करण्यास हरकत नाहीं. पण बाह्यांनीं परवानगी दिली म्हणजे अंतःस्थ फेरफार होतात अशांतला भाग मुळींच नाहीं. आज हिंदुस्थानांत इंग्रजांनीं कायदा करून वाटेल त्यास वाटेल त्याबरोबर लग्न करण्यास परवानगी दिली; आणि मनुष्याच्या मृत्यूनंतर त्याच्या मालमत्तेची वांटणी इंग्रजी कायद्यानें व्हावी असें जरी म्हटलें तरी समाजव्यवस्थेंत फेरफार होईल असें नाहीं.

आतां सिंहलदेशाच्या समाजशासनाकडे लक्ष देऊं. आपल्या देशाप्रमाणेंच तेथें देखील राष्ट्रीय जीवनाच्या केवळ अल्पांगाचें नियमन "कायद्या"नें होतें हें लक्षांत घेतलें पाहिजे. तथापि कायद्यांचा संग्रह तपासणें हें महत्त्वाचें नाहीं असें मात्र नव्हे. या द्वीपांत एकंदर पांच शासनसमूह चालू आहेत.

१. उदराटांचा कायदा–याला "क्यांडियन सिंहली कायदा" असें म्हणतात. हा कायदा लोकांच्या रीतीभाती पाहून मुख्यत्वें-करून तयार केला आहे. "नीतिनिगंडुव" हा ग्रंथ या कायद्याचा आदर्श आहे. पुष्कळ लोक "नीतिनिगंडुवा"स लबाडीचें अर्वाचीन पुस्तक म्हणतात; तथापि तसें म्हणण्यास कोणीं यथासांग आधार दिला नाहीं. गोईगमांच्या जातीचें उच्चत्व आणि इतर जातींचें नीचत्व या ग्रंथांत सांगितलें असल्यामुळें या ग्रंथास उलथून पाडण्याची इच्छा इतर जातींस होणार यांत शंका नाहीं.

२. थेसावलमै–हा कायदा जाफना येथील तामिळ लोकांस मुख्यत्वेंकरून लागू आहे. हा कायदा केवळ रूढिमय होता. पुढें डच लोकांनीं हा लिहून काढला. या कायद्याच्या पूरणार्थ हिंदुस्थानांतील हिंदु कायद्याचें अवलंबन करितात.

३. मुसुलमानी कायदा–सिंहलद्वीपांतील मुसुलमानांचा जो कायदा आहे तो. त्याच्या पूरणार्थ हिंदुस्थानांतील मुसुलमानी कायद्याचा आश्रय केला जातो.

४. मुक्कुवा कायदा—बाटिकोला येथील तामिळ लोकांसंबंधाचा कायदा.

५. रोमन-डच कायदा–हा सर्व द्वीपाचा सामान्य कायदा होय.

एवंच, सिलोनचा कायदा जरी रोमन–डच आहे, आणि सिंहली लोकांस देखील जरी तो रोमन–डच कायदा अंगीकारावा लागतो, तरी देखील त्यांच्या समाजाची घटना पूर्वींचीच आहे, आणि ती फिरविणारा कायदा त्यांच्यावर दडपला गेला नाहीं.

**समाजस्वरूप आणि परंपराः—** परंपरा सांगावयाची म्हणजे मूलगृह, मूलगृहाची प्रयाणकालीन संस्कृति, विभक्त झाल्यानंतरहि मूलगृहाशीं म्हणजे तेथील वाङ्मयाशीं व विचार-परंपरेशीं संबंध या दृष्टींनीं सांगितली पाहिजे. या दृष्टींनीं

सिंहलांतील चातुर्वर्ण्य, श्रौतस्मार्त विद्येशीं संबंध अगर संबंधाभाव यांवर विचार व्यक्त करण्याचा प्रसंग येतो. सिंहली समाजाचें स्वरूप अर्वाचीन कायद्यावरून समजत नाहीं. त्यासाठीं इतिहासाकडे लक्ष दिलें पाहिजे. या इतिहासांत लोकांचा प्रयाणविषयक आणि संप्रदायविषयक इतिहास लक्षांत घेतला पाहिजे.

सिंहली लोकांची संस्कृति पूर्णपणें हिंदूच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आपल्या एखाद्या प्रांतांतील ब्राह्मण काढून टाकले व ब्राह्मणांचें ज्ञान ब्राह्मणेतरांस शिकविलें आणि त्या प्रांतावर यूरोपिअन संस्कृति आणून लादली तर त्या प्रांतास जें स्वरूप येईल तें स्वरूप आज सिंहली समाजास आलें आहे.

सिंहली लोकांमध्यें आपले पूर्वज ओरिसांतून आले अशी समजूत प्रचलित आहे आणि त्या समजुतीस "महावंसो" नांवाच्या लंकेच्या इतिहासांत नमूद केलेली दंतकथा कारण आहे. त्या दंतकथेंत, वंगदेशीय एका राजकन्येस एका सिंहापासून मुलगा झाला, आणि लोक त्याला सिंहल म्हणूं लागले, तो पुढें आपल्या अनुचरांसह लंकेंत आला आणि त्यानें लंका वसविली असें सांगितलें आहे.

सिंहली लोकांची भाषा संस्कृतजन्य आहे. त्यांच्या संस्कृतीचें साधारणपणें वर्णन करावयाचें म्हटलें म्हणजे येणेंप्रमाणें. त्यांची नित्य व्यवहाराची भाषा सिंहली आहे; पारमार्थिक ग्रंथांची भाषा पाली आहे; आणि शास्त्रग्रंथांची भाषा संस्कृत आहे. सिंहली लोक बौद्ध आहेत असें पाहून आपणांस असें वाटण्याचा संभव आहे कीं, यांच्या ग्रंथांत संस्कृतपेक्षां पालीचें मिश्रण अधिक असेल; पण तसें मुळींच नाहीं. कोणताहि चांगल्या प्रौढ भाषेंत लिहिलेला सिंहली उतारा घेतला तर त्यांत पालीपेक्षां संस्कृत शब्दांचाच भरणा अधिक आढळतो. ते नवीन शब्द तयार करितात ते संस्कृत शब्द जोडून तयार करितात. एवंच, पाली भाषा जरी त्यांची पारमार्थिक ज्ञान मिळविण्याची भाषा असली तरी ती त्यांच्या संस्कृतीची भाषा खास नाहीं.

सिंहलद्वीपांत सिंहली समाजांत ब्राह्मण कां नाहींत या प्रश्नाचें उत्तर येणेंप्रमाणें देतां येईल. बुद्धाच्या कालीं वंगदेशांत ब्राह्मण नव्हते, तेथें भुतें काढणारे, मंत्र म्हणणारे लोक नसतील असें नाहीं; पण श्रौतस्मार्त विद्यांचें बृंहितस्वरूप जाणून त्यांची वंशपरंपरेनें जोपासना करणारा वर्ग तेथें नव्हता, असें वाटतें.* पंचगौड आणि पंचद्राविड हे ब्राह्मणांचे भेद ज्या वेळेस झाले त्या वेळेस ब्राह्मणजातीचें अस्तित्व बंगाल्यांत नसावेंसें दिसतें. सुमारें पंचवीस वर्षांपूर्वीपर्यंत बंगालच्या ब्राह्मणांचें ब्राह्मण्य काशीक्षेत्रांत पूर्णपणें मान्य झालें नव्हतें; कारण, काशी येथील इतर ब्राह्मण बंगाली ब्राह्मणांस पाण्यास शिवूं देत नसत. अद्यापि देखील काशींतील अगदीं जुन्या प्रकारच्या लोकांत बंगाली ब्राह्मणांस पंचगौडांच्या दर्जाचे लेखीत नाहींत. वंगदेशांत ब्राह्मणांच्या अगोदरच बौद्ध भिक्षू गेले असावे असें वाटतें. ब्राह्मणजातीची संस्थापना होऊन तिचा वंगालपर्यंत प्रसार होण्यापूर्वींच म्हणजे अविकसित श्रौतस्मार्तधर्मकालींच कांहीं उत्कलदेशीय लोक सिंहलद्वीपांत गेले असावेत. जेव्हां अशोकानें धर्मप्रचारक पाठविले तेव्हां त्यांस मुळींच अडथळा झाला नाहीं, याचें बीज हेंच आहे. आर्यसंस्कृतीच्या इतिहासाचें अवलोकन केलें असतां आपणांस असें दिसून येईल कीं, पुष्कळ ठिकाणीं बौद्ध संप्रदायाचा प्रसार अगोदर होई; आणि बौद्धांनंतर ब्राह्मण तेथें जाऊन आपलें वस्तान वसवीत. सयाममध्यें देखील ब्राह्मण म्हणविणारे लोक आहेत. जावा येथील हिंदु संस्कृति नष्ट झाली आहे; आणि त्यामुळें ब्राह्मणांचें अस्तित्व तेथें होतें काय यासंबंधाची कल्पना आज करितां येत नाहीं. जावानजीकच्या बलिद्वीपांत "पादण्ड" या नांवानें तेथील ब्राह्मण संबोधिले जातात आणि ते तेथें अजूनहि सर्व वर्णांच्या स्त्रियांबरोबर लग्नव्यवहार करितात आणि त्या संततीस ब्राह्मण लेखिलें जातें. तेथें बौद्धहि आहेत. हिंदुस्थानच्या पूर्वभागाच्या सरहद्दीवर आणि हिमालयाच्या आसमंतात् ब्राह्मण अजूनहि

मंत्ररचना चालू होती त्याच वेळेस आर्यन् लोकांचा फैलाव चोहोंकडे झाला होता असें दिसतें. श्रौतकर्माचें उपबृंहण व व्यवस्था बऱ्याच उत्तरकालीं झालीं आणि यज्ञधर्म, वेदविद्या यांची व्यवस्था पहाणाऱ्या लोकांस गौरव, स्थैर्य आणि सामान्य जनतेपासून वियुक्तत्व उत्तरकालीं आलें. त्याच्या अगोदर पौरोहित्य करणारा परंतु विद्याहीन असा वर्ग असेल तो पुढें लयास गेला असावा. ओरिसा येथून सिंहलाबरोबर जे लोक लंकेंत गेले त्या वेळेस मंत्रकाल पूर्ण संपला नसून श्रौतविद्या पूर्ण वाढून ब्राह्मणजाति तयार झाली नसावी असें दिसतें.

---

* आर्यन् लोकांच्या वसाहती हिंदुस्थानांत झाल्या त्या एकाच प्रकारच्या लोकांच्या नसून अनेक परस्परविरुद्ध धर्मांचें म्हणजे आचारांचें अवलंबन करणाऱ्या आणि जीवनकलहांत एकमेकांविरुद्ध लढणाऱ्या लोकांच्या होत्या. शक आणि त्यांचे उपाध्ये मग यांची वसाहत कीकट म्हणजे अर्वाचीन मगध देशांत झाली, ती गौतमाच्या पूर्वीं अनेक पिढ्या झाली असली पाहिजे. गौतम आपल्या अनेक पिढ्यांचा उल्लेख आपल्या संवादांत करितो पण आपण कोणी परके आहोंत अशी भावनाहि त्यास नव्हती असें दिसतें. ही वसाहत ऋग्वेदकालींहि होती असें दिसतें. "(हे इंद्रा) कीकटांतील गाई तुजकरितां काय करितात? सोमांत घालावयाचें दूध देत नाहींत, पायस शिजवीत नाहींत. तूं प्रमगंदांचें धन आम्हांस आणून दे" असा ऋग्वेदांत (३,५३,१४) उल्लेख आहे. मगंद याचा अर्थ सावकार अथवा व्याजखोर असा सायणाचार्यांनीं पुष्कळ खटाटोप करून केला आहे, तथापि मगांस देणारे ते मगंद असा अर्थ लटपट केल्याशिवाय करतां येतो. शिवाय मगांचे अनुयायी पारशी इंद्रास दैत्य समजतात ही गोष्ट त्याच अर्थास पुष्टि देते.

प्रवेश करीत आहेत, आणि तेथील बौद्धसंप्रदायाची पिच्छेहाट होत आहे, हें त्या भागांवर हिंदुस्थान सरकारच्या अधिकाऱ्यानें लिहिलेल्या ग्रंथांवरून दिसून येतें. मलबारांत बौद्धांनीं प्रथम संस्कृतिप्रचारास सुरुवात केली व पुढें ब्राह्मणांनीं जाऊन तो भाग कावीज केला, असें तेथील पुराणेतिहास-संशोधकांचें मत आहे. श्रौतविद्येचा विकास जेथें झाला तें स्थान सोडून देऊन भारतांत देखील पुष्कळ ठिकाणीं आणि भारतीय वस्ती जेथें गेली अशा ठिकाणीं धर्मांच्या आवरणांचे तीन थर आहेत. पहिला थर आर्यांच्या अव्यवस्थित पैतृक धर्मांचा; दुसरा थर बुद्धाच्या धम्माचा आणि तिसरा ब्राह्मणांच्या श्रौत-स्मार्त धर्मांचा. जेथें अविकसित श्रौतस्मार्त धर्मांचा देखील मागमूस नाहीं आणि उत्तरकालीन ब्राह्मणांनीं पाय ठेवला नाहीं तेथें हिंदुत्वप्रसाराचें कार्य बौद्धांनींहि केलें आहे. हिंदुसमाज उर्फ हिंदुसंस्कृति हा सार्वभौम राजा होय; आणि हिंदुसमाजांत उत्पन्न झालेले संप्रदाय हे मांडलिक होत. मांडलिकांनीं प्रदेश कावीज केला म्हणजे कालांतरानें तेथें सार्वभौमाची सत्ता हळूहळू दृष्टीस पडूं लागते. ब्राह्मण हे हिंदु संस्कृतीचे लढवय्ये होत. जो देश बौद्ध संप्रदायाखालीं आला तो हिंदुसमाजाचा अर्धामुर्धा भाग बने, आणि तेथें ब्राह्मणांनीं जाऊन आपलें वर्चस्व स्थापन केलें म्हणजे तो पूर्णपणें हिंदु बने असें म्हणण्यास हरकत नाहीं. आपणांस बौद्धसमाजाकडे या दृष्टीनें अवलोकन केलें पाहिजे. बौद्धत्व आणि हिंदुत्व हीं एकमेकांपासून विभक्त नाहींत; आणि मनुष्य बौद्ध झाला म्हणजे तो हिंदुत्वापासून मुकला असेंहि नाहीं.

सिंहली संस्कृतीचें यथार्थ ज्ञान होण्यासाठीं सिंहली संस्कृतीचें हिंदुस्थानांतील हिंदुत्वाशीं सादृश्य किती आहे हें पाहिलें पाहिजे.

प्रथमतः उपासना घेऊं. तामिळ हिंदू लोक बुद्धास विष्णूचा अवतार समजतात आणि बुद्धदर्शनास जातात. जेथें विष्णूचें अगर सुब्रह्मण्याचें देवालय नसेल तेथें बुद्धदर्शनानें वैष्णव आपली पारमार्थिक तृष्णा भागवितात. शिवाय आपण पुष्कळ विहारांचें अवलोकन केलें तर आपणांस असें आढळून येईल कीं, विहाराच्या आवारांत इतर हिंदू दैवतांचीं देवालयें देखील आहेत; आणि "कापुआ" नांवाच्या जातीचे गुरव त्या देवाचे पुजारी आहेत. मद्रास इलाख्यांत पुष्कळ ठिकाणीं देवांचें पुजारीपण या जातीकडेच आहे. पुष्कळ बौद्ध हिंदुदेवतांसहि नवस करितात; पण यांत आश्चर्य मानण्याजोगें कांहीं नाहीं. कारण, बौद्ध हे भुताखेतांसहि नवस करितात.

वेदांत वगैरे तत्त्वज्ञानाचा अंगीकार न करितां बौद्ध तत्त्वज्ञानाचा अंगीकार करणारा हिंदु तो बौद्ध अशी बौद्ध याची व्याख्या केली तर ती बरोबर होईल.

चातुर्वर्ण्याची कल्पना सिंहली बौद्धांतून नष्ट झाली नाहीं. सिंहली लोकांच्या धर्मशास्त्राप्रमाणें* (म्हणजे नीतिनिगंडुव ग्रंथाप्रमाणें) सर्व सिंहली शूद्र आहेत.

सिंहलद्वीपांत पाली भाषेचा जसा अभ्यास होतो, तसा संस्कृत भाषेचाहि होतो. कोलंबोच्या परिसरांत "मलिगाकंद" येथील विद्योदय कॉलेजांत संस्कृत भाषा शिकविली जाते, आणि कांहीं सिंहली काशीक्षेत्रांतहि संस्कृत भाषा आणि वाङ्मय शिकण्यास जातात. येथें सामान्यपणें वाचण्याचे ग्रंथ म्हटले म्हणजे, रघुवंश आणि भक्तिशतक हे होत. भक्तिशतक हा ग्रंथ श्रीचंद्रभारती नांवाच्या एका भिक्षूनें लिहिला. हा भिक्षु सुमारें पांचशें वर्षांपूर्वी होऊन गेला असें म्हणतात. हा पूर्वी सारस्वत ब्राह्मण होता. लंकेंत आल्यानंतर तो बौद्ध झाला, आणि त्यास "बौद्धागमचक्रवर्ती" असा किताब राजानें दिला असेंहि सांगतात.

येथें अजूनहि चांगले संस्कृत पंडित आहेत. त्यांत सी. ए. शीलस्कंध, एम्. ज्ञानेश्वर यांचीं नांवें देतां येतील. शीलस्कंधानें "जानकीहरण" नांवाचा एक जुना ग्रंथ प्रकाशित केला. हा ग्रंथ उपलब्ध नव्हता; या ग्रंथावर एक सिंहली टीका मात्र होती, त्या टीकेच्या साहाय्यानें त्यानें टीकेंतील शब्द घेऊन मूळ ग्रंथास पुनर्जन्म दिला. अजून देखील संस्कृतमध्यें थोडीबहुत श्लोकरचना येथें होते.

आतां सिंहली लोकांतील जातिभेदाकडे वळूं. सविस्तर वर्णन देण्यास येथें अवकाश नाहीं, तथापि मुख्य गोष्टी येथें देतों.

चातुर्वर्ण्याची कल्पना बौद्धस्वरूपांत सिंहलद्वीपांत आहे हें सांगितलेंच आहे. त्यांचा आचारविचार आपल्यापेक्षां भिन्न असल्यास, सर्व सिंहली शूद्र आहेत हें त्याचें धर्मशास्त्रीय स्पष्टीकरण होय. हिंदुस्थानांत ब्राह्मण आणि शूद्र हे दोनच वर्ण राहिले असें धर्मशास्त्रज्ञांचें मत आहे. सिंहलद्वीपांत ब्राह्मण नाहींतच त्यामुळें सर्व लोक धर्मशास्त्राच्या दृष्टीनें एक-वर्णीय आहेत.

ज्या विविध जाती या समाजांत असतील त्या सर्व शूद्रांचे आणि अतिशूद्रांचे भेद आहेत, असें धर्मशास्त्रीय दृष्टीनें तेथील जातिभेदांचें स्पष्टीकरण होय. धर्मशास्त्रीय दृष्टि सोडून आतां प्रत्यक्ष वस्तुस्थितीकडे वळूं.

**सिंहली लोकांतील जातिभेद**—सिंहली लोकांत जातिभेद नाहीं असें मुळींच नाहीं. बुद्धाचा हेतु जातिभेद नष्ट करण्याचा नव्हता, याचें विवेचन प्रसंगानुसार येईलच. सिंहली लोकांत जातिभेद जवळजवळ आपल्याइतकाच

* नीतिनिगंडुव या ग्रंथाखेरीज दुसरा कोणताहि धर्मशास्त्रग्रंथ आमच्या अवलोकनांत आला नाहीं. सामान्य सिंहली लोकांत याखेरीज दुसरा ग्रंथ फारसा माहीत नाहीं. दापुल राजानें तयार करविलेला शासनग्रंथ आमच्या अवलोकनांत आला नाहीं.

तीव्र आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ब्राह्मणांनीं आपल्या ग्रंथांनीं जातिभेद उत्पन्न केला हें विधान किती चुकीचें आहे हें पाहण्यास सिंहली लोकांच्या समाजस्थितीचें अवलोकन केलें म्हणजे पुरे आहे. धर्मशास्त्र तर त्या सर्वांस एकाच वर्णांत घालून त्यांची एकी अपेक्षितें. विशिष्ट जातींचें उच्चत्व आणि नीचत्व त्यांच्या अधिकारावर, संस्कृतीवर आणि त्यांनीं स्वतःच्या उद्धारार्थ केलेल्या प्रयत्नांवर अवलंबून असतें.

सिंहली लोकांत प्रामुख्यानें वागणारी व उच्च समजली जाणारी जात म्हटली म्हणजे "गोईगम" ही होय. ही जात वेल्लालांच्या बरोबरीची आहे हें तत्त्व वेल्लालांनीं आणि इतरांनीं मान्य केलें आहे. कोणत्याहि जातीला आपलें उच्चत्व स्थापन करावयाचें झालें म्हणजे त्याला कांहींतरी कारण हें शोधिलेंच पाहिजे. कारण देतांना आम्ही श्रीमंत आहों, आणि स्वच्छतेनें राहतों एवढ्याकरितां आम्हांस तुम्ही उच्च माना, एवढेंच कारण पुरत नाहीं. कांहीं जुन्या सर्वमान्य तत्त्वांची आणि आधुनिक परिस्थितीची सांगड घालावी लागते, काल्पनिक इतिहास उत्पन्न करावा लागतो आणि स्वतःचें उच्चत्व फार जुन्या कारणांनीं स्थापित झालें आहे असें भासवावें लागतें. "नीतिनिगंडुव" नांवाच्या सिंहली धर्मशास्त्रग्रंथांत पृथ्वीची उत्पत्ति आणि जातींची उत्पत्ति देतांना "गोवीय" उर्फ "गोईगम" जातीच्या श्रेष्ठतेचें कारण दिलें आहे तें येणेंप्रमाणें:—

"सिंहलद्वीपांत ब्राह्मणादि तीन वर्ग नाहींत. गोवीय हीच उच्च जात आहे. गोवीय जातींत पूर्वी येथें आलेल्या ब्राह्मणांनीं लग्नें केलीं आणि ब्राह्मण गोवीयांत मिसळून गेले तेणेंकरून गोवीय ही उच्च जात आहे."

आजचे गोईगम आपणांस उच्च शूद्र म्हणवून घ्यावयास तयार नाहींत हे मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे.

निरनिराळ्या जातींनीं राजाबरोबर आणि उच्च जातीशीं कसें वागावें या संबंधानें जितके कठोर नियम लंकेंत होते तितके दुसरे कोठें नसतील. जातीच केवळ हलक्या होत्या असें नाहीं, तर जातींच्या अनुसार गांवांचाहि दर्जा ठरत असे. उदाहरणार्थ

गवदगाम=हें श्रेष्ठ प्रकारचें गांव होय. गवदगाम म्हणजे राजाचें गांव.

विहारगाम=विहाराच्या पोटगीसाठीं राखलेलें गांव.

गत्तुरगाम=उच्च जातीचे तथापि पतित झालेले लोक ज्या गांवांत रहातात तें गांव.

गहलगाम=नीच जातीनें वसलेलें गांव.

वेदिगाम=मृगया करणाऱ्या लोकांचें गांव.

बतगाम=पादुआ नांवाच्या हलक्या जातीनें वसविलेलें गांव. (सिंहलद्वीपांतील वेद्द नांवाचे लोक बहुतेक शिकार करून उपजीविका करितात. वेद्द, वेदिगाम, आणि व्याध शब्दांचा कांहींतरी संबंध असावा असें वाटतें.)

लंकेंत रोडिया म्हणून जात आहे. तिची स्थिति फारच वाईट आहे. ज्या कालांत रोडियांस उघडपणें रस्त्यावरून चालतां देखील येत नव्हतें तो काल आजच्या लोकांनीं लहानपणीं पाहिला आहे.

राजा तिसरा दापुलु यानें एक शासनग्रंथ तयार केला त्यांत रोडियाच्या सावलीनें पाणी विटाळतें असें दिलें आहे असें म्हणतात. हा ग्रंथ आमच्या अवलोकनांत आला नाहीं. सिंहली वाङ्मयाचा जर्मन इतिहासकार डॉ० गैजर याची तो नष्ट झाला असावा अशी समजूत आहे.

गोईगमांच्या खालोखाल महत्त्वाची जात म्हटली म्हणजे "करावा" म्हणजे कैवर्त उर्फ कोळ्यांची जात होय. ही जात देखील चांगली सुशिक्षित व श्रीमंत झाली आहे. गोईगमांच्यापेक्षां या जातीचें महत्त्व कमी असण्याचें कारण केवळ नीतिनिगंडुवांतील वाक्य नाहीं; जातींचें उच्चत्व अगर नीचत्व केवळ ग्रंथवाक्यांवर अवलंबून नसतें, तर ज्या कालांत ज्या गोष्टी अधिक सन्माननीय असतात त्या कालांत त्या गोष्टी करणारांस महत्त्व प्राप्त होतें. स्पष्टीकरणार्थ एक भारतीय उदाहरण घेऊं. सारस्वत ब्राह्मण खरोखरच पाहिले असतां फार जुने ब्राह्मण आहेत. तथापि ते मत्स्याहारी असल्यामुळें महाराष्ट्रीय ब्राह्मण त्यांस स्वतः-पेक्षां कमी समजतात. समुद्रमार्गानें प्रवास आपल्या देशांत कांहीं दिवस वाईट समजला जात होता, आणि तो सारस्वत ब्राह्मणांनीं स्वधर्मसंरक्षणार्थ केला. यामुळें कोचीन, त्रावणकोर इत्यादि संस्थानांत शूद्र नायर देखील त्यांस हलके लेखतात आणि त्यांस देवळांतून मज्जाव आहे. उलट उदाहरण पहावयाचें असल्यास तिनवेल्ली येथील "शैव"वेल्लालांचें पहावें. तिनवेल्ली जिल्ह्यांत कांहीं वेल्लालांनीं मांसाहाराचा त्याग करून अधिक उच्चपद मिळविलें आहे. लंकेंत जमिनीवर ताबा असणें हें मोठ्या मानाचें आणि राजत्वाचें लक्षण समजलें जातें आणि त्याच्या योगानें 'गोईगम' हा शेतकरी वर्ग फार थोर समजला गेला.

कैवर्तांचीं गोईगमांशीं थोडींबहुत लग्नें झालीं आहेत आणि अशा प्रसंगीं पन्नास हजार रुपयांपर्यंत रक्कम एका हातांतून दुसऱ्या हातांत गेली आहे. या लग्नांची उपपत्ति एका सुशिक्षित गोईगमानें दिली ती येणेंप्रमाणें:—"कोणी विलायतेस जाऊन आलेला गोईगम जातीचा बॅरिस्टर धंद्यांत पैसे मिळत नसले म्हणजे असली सामाजिक सुधारणा करितो. असल्या लोकांस आम्ही बहिष्कृत करितों."

गोईगम आणि करावा या जातींमध्यें द्वेषबुद्धि बरीच आहे. कायदेकौन्सिलच्या एका निवडणुकीच्या प्रसंगीं दोन उमेदवार उमे राहिले, त्यांपैकीं एक तामिळ "वेल्लाल" होता आणि दुसरा सिंहली "करावा" होता. त्या वेळेस सिंहली "करावांनीं" आपलीं मतें आपल्या जातभाईस दिलीं, तथापि सिंहली

गोईगमांनीं आपलीं मतें करावयास न देतां तामिळास दिलीं, आणि शेवटीं तामिळ उमेदवाराचा विजय झाला.

सिलोनमध्यें जो जातिभेद दृष्टीस पडतो, त्यास विविध कारणें आहेत. कांहीं जाती राष्ट्रमूलक आहेत. रोडिया आणि पाडुआ हीं लहान राष्ट्रें असून त्यांच्या पाडावामुळें त्यांस नीचत्व प्राप्त झालें असावें असें दिसतें. निदान या जाती पूर्वीच्या एकरूप समाजाचे तुकडे पडून झाल्या नाहींत हें खास. कांहीं जाती मात्र धंद्यावरून पडल्या असणें शक्य आहे. उदाहरणार्थ, "धोबी" नांवाची कपडे धुणारी जात घ्या. ही जात जो धंदा करिते तो धंदा सिंहली लोक शेतकी-पेक्षां हलका समजतात. धोबी जातीचे लोक कराव्यांस व करावा हे धोब्यांस हलके समजतात. अर्थात् कोळ्याचें काम हलकें कीं धोब्याचें काम हलकें या गहन प्रश्नाचा कायमचा निकाल लावणें कोणास शक्य आहे?

सिंहलद्वीपच्या सध्यांच्या समाजांत तरी "विटाळ" आणि "सोंवळें" या कल्पना नाहींत. पूर्वकालीं होत्या अगर नव्हत्या हें त्या देशांत उत्पन्न झालेल्या वाङ्मयावरून ठरविलें पाहिजे. त्या कल्पना असल्या तरी फारशा तीव्र नसाव्यात. याचें कारण सिंहली लोक सर्वभक्षक आहेत. सध्यांच्या समाजांतील कांहीं अवशेषांवरून त्या कल्पना एका काळीं असतील असें वाटतें. कारण आज सर्व लोक जरी मुसुलमानांच्या उपहार-गृहांत काफी घ्यावयास आणि उपहार करण्यास जातात तरी मुसुलमान, तामिळ आणि सिंहली या लोकांकरितां निरनिराळीं भांडीं राखून ठेवलेलीं असतात.

सिंहली समाजाच्या अवलोकनानें ज्या कांहीं गोष्टी मनांत येतात त्या येणेंप्रमाणें:—

पहिली गोष्ट मनांत ठसते ती ही कीं, ब्राह्मणांचें वजन जरी या समाजावर नाहीं तरी देखील जातिभेद आहे. बौद्ध-संप्रदायाचा परिणाम जातिभेद कमी करण्याकडे यत्किंचितहि झाला नाहीं. बुद्धाचा प्रयत्न जातिभेद नाहींसा करण्याकडे मुळींच नव्हता या विधानास लंकेंतील सद्यःस्थितीची साक्ष आहे. जातिभेद हा पारमार्थिक चळवळीनें कधींहि जाणें शक्य नाहीं. जी परिस्थिति अनेक राजकीय, सामाजिक आणि शासनविषयक कारणांचा परिणाम आहे, त्या परिस्थितीचा पारमार्थिक गोष्टींशीं संबंध जोडणेंच हास्यास्पद आहे. जाति-भेद मोडणें म्हणजे समाजाचें एकराष्ट्र बनविणें यासारख्या प्रचंड चळवळी करण्याकरितां समाजापुढें आपलें वर्चस्व स्थापण्याची एक तऱ्हेची प्रचंड सामाजिक आकांक्षा असली पाहिजे; आणि त्या आकांक्षेस मूर्त स्वरूप देण्यासाठीं अनेक तऱ्हेच्या राजकीय चळवळी केल्या पाहिजेत, ही गोष्ट अधिकाधिक स्पष्टतेनें भासूं शकते.

सिलोनमध्यें जातिपंचायती सध्यां उरल्या नाहींतसें दिसतें. जरी कांहीं कोठें असल्या तरी त्या मृतकल्प झाल्या आहेत. यामुळें समाजाचे निरनिराळे परमाणू एकत्र होऊन त्या परमाणूंकडून सामाजिक कार्य होण्याचा दिवस अजून आला नाहीं.

सोंवळ्याओंवळ्याच्या कल्पना जरी नष्ट झाल्या आहेत तरी समाजांत उच्चनीचतेच्या कल्पना कायम आहेत; यामुळें मनांत एक अशी शंका उत्पन्न होते कीं, हिंदुस्थानांतील लोकांच्या त्या कल्पना जरी नष्ट झाल्या तरी, समाजास एकत्व आणणारी समाजघटना झाली नाहीं तर जातिभेद नष्ट होणार नाहीं. जातिभेद मोडण्यास सोंवळ्याओंवळ्याच्या कल्पना कमी अगर नष्ट झाल्यास कदाचित् सुलभ जाईल; पण तेवढ्यानेंच कार्य होणार नाहीं.

लंकेंत बालविवाह नष्ट झाला आहे हें पुढें सविस्तर सांगितलें आहे. प्रौढविवाह आणि प्रीतिविवाह हे आपणास सकृद्दर्शनीं जितके जवळजवळ दिसतात तितके ते नाहींत हें या द्वीपाची आधुनिक स्थिति बोधिते. सिंहलद्वीपांत अजून देखील प्रीतिविवाहाचा प्रसार फारसा झाला नाहीं. मलबार येथील नायर स्त्रीपुरुषें जो संबंध करितात तो प्रौढ वयांत होतो, तथापि तेथें देखील प्रीतिविवाह आणि अनुनयपद्धति यांचा प्रसार झाला नाहीं. स्त्रीपुरुषांच्याच अहेतुक आणि सहज परिचयानें स्नेहसंबंध जडून त्यांचें प्रीतींत पर्यवसान होणें आणि त्यानंतर लग्नसंबंध घडून येणें हें सिंहल देशांत अजून देखील सुरू झालें नाहीं. प्रीतिविवाहाच्या योगानें जातिभेद नष्ट होण्याची पायरी फारच पुढची आहे असें दिसतें.

प्रीतिविवाहासारखी सुधारणा आमची शासनविषयक आणि राजकीय उन्नति झाल्याशिवाय चांगल्या तऱ्हेनें स्थापित होणार नाहीं असें आमचें मत झालें आहे. हें मत कोणच्या अनुमानमालिकेच्या आणि कार्यकारणभावांच्या साहाय्यानें झालें आहे हें येथें सांगण्यास अवकाश नाहीं. याचा ऊहापोह पुढें येईलच.

सिंहली जाती परस्परांशीं लग्नव्यवहार करण्यास तयार होत नाहींत; तथापि सर्व जाती यूरोपियन आणि बर्घर लोकां-बरोबर लग्नें करण्यास तयार होतात. बर्घर म्हणजे पोर्तुगीज आणि डच लोकांचे वंशज.

सिंहलद्वीपाची संस्कृति मुख्यत्वेंकरून हिंदु आहे हें अगोदर स्पष्ट केलेंच आहे. आतां या संस्कृतीवर यौरोपियनांचीं पुटें कशीं काय चढलीं आहेत हें पाहूं.

प्रथमतः येथें हें सांगितलें पाहिजे कीं, हिंदुस्थानांत यूरोपि-यन लोकांपैकीं एकाच राष्ट्रानें आपल्या संस्कृतींत बदल कर-ण्याचा प्रयत्न केला आणि तें राष्ट्र म्हटलें म्हणजे इंग्रजांचें होय.

पोर्तुगीजांनीं देखील आपल्या राष्ट्रावर आघात केले. तथापि देशाचा एक अगदीं अल्प भाग त्यांच्या सत्तेखालीं आला आणि तो देखील पुढें मराठ्यांनीं त्यांच्या तडाक्यांतून सोडविला. पोर्तुगीजांनीं आपल्या देशांतील लोकांस ख्रिस्ती

केलें. यूरोपियन लोकांची संस्कृति आपल्यावर लादण्याचे त्यांचे उपाय फारच प्रखर होते. स्पॅनिश लोकांनीं फिलिपाइन बेटाची संस्कृति यूरोपियन तऱ्हेची केली. पोर्तुगीज लोकांनीं आपल्या गोवानिजांस राष्ट्रीय संस्कृतीपासून कसें काय च्युत केलें हें सर्वांस अवगत आहेच. पोर्तुगीजांचा अंमल सिंहलद्वीपावर झाला, त्या कालीं पुष्कळ लोक जुलमानें आणि गोडीगुलाबीनें ख्रिस्ती बनले व पुष्कळ लोकांनीं आपलीं नांवें बदलून पोर्तुगीज नांवें घेतलीं. बुद्धसंप्रदाय इतरांस आपल्यांत ओढणारा असल्यामुळें त्यानें पोर्तुगीजांच्या कृतीचा पुढें विध्वंस केला. आज सिंहली लोकांत जितके ख्रिस्ती आहेत त्याच्या दुप्पट प्रमाणानें ते तामिळांत आहेत. पोर्तुगीजांनंतर डच आले आणि डचांनंतर इंग्रज आले. येणेंप्रमाणें सिंहली संस्कृतीवर यूरोपियन राष्ट्रांच्या रीतीभातींचीं तीन पुटें चढलीं आहेत. सिंहलद्वीपांतील सिंहली लोकांचें यूरोपीभवन किती झालें आहे याचा अजमास येण्यासाठीं थोडक्याच गोष्टींचा निर्देश पुरेसा आहे. उदाहरणार्थ, कोलंबो शहराकडे पाहिलें तर तें एशियाटिक शहर नसून यूरोपियन शहर आहे असें वाटतें. अगदीं हलक्या दर्जाचे कुली सोडून दिले तर सर्व लोक यूरोपियन पोषाख करितात असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. अगदीं जुन्या प्रकारचे लोक डोक्यावर केंस राखून बुचडा बांधतात आणि केंसांत वाटोळा कंगवा खोंचतात. अर्वाचीन सिंहली लोकांच्या रसिक दृष्टीस हा पोषाख अगदींच ओंगळ दिसतो. पुष्कळांचें असें म्हणणें आहे कीं, ही कंगवा घालण्याची चाल मूळ सिंहली नसून परकी आहे. समुद्रकिनाऱ्यावर येणाऱ्या परक्या लोकांपासून तो कंगवा त्यांनीं घेतला आहे. जुन्या सिंहली तऱ्हेनें पोषाख करावयाचा म्हटला तर सभ्य गृहस्थ आणि चपराशी यांच्यामध्यें फारसा भेदच करितां येणार नाहीं. "उच्च दर्जाचा देशी पोषाख मुळींच नसल्यामुळें आम्हांला परका पोषाख करावा लागतो. तुम्हां हिंदुस्थानी लोकांचें ठीक आहे. तुमच्यांमध्यें राजेरजवाडे आहेत आणि देशी पद्धतीचाच परंतु सभ्य तऱ्हेचा पोषाख करावयाचा म्हटल्यास तुम्हांस अडचण नाहीं. आमचें तसें नसल्यानें आम्हाला परका पोषाख करावा लागतो." असें ते समर्थन करितात.

सिंहली पुरुषच परका पोषाख करितात असें नाहीं, तर सिंहली बायका देखील मडमांसारखा पोषाख आज जवळ जवळ शंभर वर्षें करीत आहेत. हलक्या दर्जाच्या बायका कमरेस लुंगीसारखें कापड गुंडाळतात आणि अर्धस्तनदर्शी यूरोपियन पद्धतीचें पोलकें अंगांत घालतात. सभ्य स्त्रिया यूरोपियन पद्धतीचा पोषाख मोठ्या झोंकांत करितात. तथापि कोलंबो शहरांतील गरीब स्त्रिया आणि लहान शहरांतील स्त्रिया अनवाणी चालतात. त्यांनां बूट घालण्याची संवय नाहीं. लग्नप्रसंगीं अगर दुसऱ्या कोणत्या तरी कार्याच्या प्रसंगीं या बायका अनवाणी न जातां बूट घालतात. तथापि बुटानें चालण्याची संवय नसल्यामुळें हातांत बूट घेऊन रस्ता आक्रमावयाची पाळी येते.

सिंहली लोकांत सोंवळ्याओंवळ्याचें बंड नाहीं आणि यूरोपियन आणि बर्घेर लोकांबरोबर सिंहली लोक मोठ्या मोकळेपणानें मिसळतात, इतकेंच नव्हे, तर कांहीं सिंहली स्त्रीपुरुष त्यांबरोबर नाचण्यासहि कचरत नाहींत.

सिंहली लोकांपैकीं पुष्कळ लोक ख्रिस्ती झाले आहेत आणि आपल्याकडे ज्याप्रमाणें ख्रिस्ती लोक अस्पृश्य आणि बाह्य समजले जातात त्याप्रमाणें सिंहली लोकांत नाहीं. पुष्कळ शिष्ट मंडळी ख्रिस्ती आहेत आणि त्यांस बौद्ध कमी लेखीत नाहींत.

सिंहली लोकांचीं नांवें पाहिलीं तर आपल्यापैकीं पुष्कळांस मौज वाटेल. त्यांचीं नांवें म्हणजे पाश्चात्य (विशेषेंकरून डच आणि पोर्तुगीज) नांवें आणि संस्कृत शब्द यांचें एकच कोडबोळें असतें. उदाहरणार्थ, जान फेरेरा गुणतिलक, डी. आल्विस विक्रमसिंह, डान क्यारोलिस् विजयरत्न, या प्रकारचीं नांवें आपणांस जागोजाग आढळतात. अर्धेमुर्धें नांव पोर्तुगीज असलें म्हणजे तेवढ्यानें मनुष्य ख्रिस्ती होतो असें कोणत्या शास्त्रांत सांगितलें आहे ? 'लिली', 'रोझ' हीं मुलींचीं नांवें महाराष्ट्रीयांत नाहींत का शिरलीं ?

सिंहली लोकांत खुर्च्या, टेबलें, कोच इत्यादि गोष्टींचा उपयोग सार्वत्रिक झाला आहे. अगदीं गरीब लोक देखील चमचा, कांटा, चिनी मातीचीं ताटें वगैरे घेऊन टेबलावर जेवावयास बसतात.

हें सर्व वर्णन विशेषेंकरून **"पातराटांस"** म्हणजे सखल प्रदेशांत रहाणाऱ्या सिंहली लोकांस लागू पडतें, **उदराटांस** लागू पडत नाहीं. उदराटांमध्यें देखील यौरोपिन्य शिरलें आहे. पण तितक्या प्रमाणानें नाहीं.

आज एखाद्या सिंहली मनुष्यास विचारलें कीं, तुमच्या देशांत तुम्ही कोणता शक वापरितां, तर त्यास त्याचें उत्तर देतां येणार नाहीं. बहुतेकांनां ख्रिस्ती शकाखेरीज दुसरा कोणता तरी शक सिलोनमध्यें होता याची कल्पनाहि नाहीं. "ज्ञानादर्शय" नांवाच्या ए. मेंडिस गुणशेखर नांवाच्या गृहस्थांनीं चालविलेल्या मासिकावर शालिवाहन शक दृष्टीस पडला. तथापि पूर्वी देशांत चालू असलेला शक त्यांनीं पुस्तकावर घातला अगर हिंदुस्थानांत चालू असलेल्या शकास प्रचलित करावें या सुधारकबुद्धीनें घातला हें सांगतां येत नाहीं. सिंहली राष्ट्रांतील सुधारकपक्षाविषयीं माहिती पुढें येईलच.

पारमार्थिक प्रयत्नांत देखील अर्वाचीन सुधारणा शिरली आहे. अमेरिकेंत ज्या लोकांस रविवारीं चर्चमध्यें जावयास "फुरसत" नसते अशा मंडळीनें आपलें रविवारचें पारमार्थिक कर्म पार पाडण्याची एक युक्ति योजिली आहे. ते लोक रविवारची उपासना आणि व्याख्यान टेलिफोननें ऐकतात.

सिंहलद्वीपांत पारमार्थिक बाबतींत इतकें जरी अर्वाचीनत्व शिरलें नाहीं, तथापि तेथें प्रसिद्ध भिक्षूंचे उपदेश अगर व्याख्यानें यांचे नादलेख ( फोनोग्राफचे रेकार्ड्स ) आपल्या घरीं वाळगतात.

**लंकेंतील विवाहसंस्थाः**—सिंहली लोकांचीं आणि यूरोपियन व बर्घेर लोकांचीं लग्नें देखील होतात. निरनिराळ्या जातींच्या लग्नांचे आंकडे ( खानेसुमारीच्या अहवालांवरून ) येणेंप्रमाणेः—

**मिश्र लग्नांचे आंकडे**

| मिश्र विवाह करणाऱ्या जाती. | १८९१ पासून १९००. | १९०१ पासून १९१० |
|---|---|---|
| यूरोपियन व बर्घेर | ११० | ९१ |
| यूरोपियन आणि सिंहली | २३ | २२ |
| यूरोपियन आणि तामिळ | ५ | १० |
| बर्घेर आणि सिंहली | २७० | ३१५ |
| बर्घेर आणि तामिळ | ५३ | ६६ |
| सिंहली आणि तामिळ | ५२७ | ६५३ |

वरील कोष्टकावरून कांहीं गोष्टी लक्षांत येतात, त्या येणेंप्रमाणेः—

यूरोपियन लोकांचीं देशी लोकांवरोवर लग्नें व त्याचप्रमाणें बर्घेर लोकांवरोवर लग्नें कमी झालीं आहेत. याला तामिळ आणि यूरोपियन हा अपवाद आहे; याचें कारण हें कीं, कित्येक शिष्ट तामिळ मंडळींनीं यूरोपियन बायकांवरोबर लग्नें केलीं हें होय.

कोलंबोचे लग्नाचे रेजिस्ट्रार रा. विक्रमतिलक यांनां (विक्रमतिलक यांची बायको यूरेशियन आहे. ) मिश्रविवाहाचें कारण विचारलें. त्यांनीं या प्रश्नाचें उत्तर येणेंप्रमाणें दिलें. गरीव यूरोपियन लोक, बर्घेर, सिंहली आणि तामिळ स्त्रियांस रखेल्या म्हणून ठेवतात आणि पुढें त्यांचीं लग्नें होतात. या मिश्रविवाहाची जी संतति होते त्यांपैकीं कांहीं आपल्या आयांच्या सल्ल्यानें व वजनामुळें सिंहली अगर तामिळ लोकांवरोवर लग्नें करितात. मिश्र लग्नांचें दुसरें कारण म्हटलें म्हणजे कोलंबोसारख्या बकाल वस्तीच्या शहरांत एका जातीच्या स्त्रिया आणि दुसऱ्या जातीचे पुरुष म्हणजे विशेषेंकरून तामिळ आणि सिंहली पुरुष आणि बर्घेर व यूरेशियन स्त्रिया यांच्या ओळखी होतात व पुढें लग्नें होतात. बर्घेर अगर सिंहली खाणावळींत तामिळ राहिल्यानें, त्या तामिळाचें, बर्घेर अगर सिंहली खाणावळवाल्याच्या मुलीशीं लग्न होतें. तामिळ मुलगा त्या मुलीशीं कांहीं गडबड करून मग पेंचांत सांपडतो व त्यास त्यामुळें लग्न करावें लागतें. अशी मिश्रविवाहांची उपपत्ति एक जाफना ( यघनं ) येथील तामिळ वकीलानें डॉ. केतकर यांस सांगितली. विक्रमतिलकांच्या मतें तामिळ वकिलाचें हें स्पष्टीकरण फारच थोड्या वर्गास अनुलक्षून आहे.

एका सिंहली तरुणाचें एका बर्घेर मुलीवरोवर प्रेमसंवर्धन चालल्याचें डॉ० केतकर यांस दिसून आलें. त्या तरुणास सिंहली लोक बर्घेर मुलीवरोवर लग्न कां करितात असा प्रश्न त्यांनीं विचारला असतां त्यास त्यानें उत्तर दिलें कीं, वेडगळ सिंहली मुलीस "सोसायटी"मध्यें कसें वागावें हें समजत नाहीं. आम्ही गोऱ्या कातड्याला भुलून जातों असें मुळींच नाहीं ! ! ! या तरुणाच्या शब्दांत सत्यता किती आहे याची येथें चर्चा नको. त्यानें सांगितलेली अडचण परजातीच्या स्त्रीशीं लग्न करण्यास कारण नसली तरी त्याच्या बोलण्यावरून तरुणांचें विजातीयांवरोवर लग्न होण्याचें निमित्त कांहीं अंशीं लक्षांत येईल.

सिंहलद्वीपांतील कांहीं बर्घेर जातीच्या सरकारी नोकरांस डॉ. केतकर यांनीं विचारिलें कीं, सिंहली आणि तामिळ लोकांनीं तुमच्या मुलींवरोवर लग्न करावें हें तुम्हांस आवडतें काय ? त्यांनीं उत्तर केलें, काय हरकत आहे ? जर सिंहली मुलगा सुशिक्षित असेल, त्याला चांगली नोकरी असेल, तर त्याला मुलगी द्यायला काय हरकत आहे ? या उत्तरावरून बर्घेर लोकांची वैवाहिक नीति लक्षांत येईल.

सिंहलद्वीपांत बालविवाह फारसा नाहींच म्हटलें तरी चालेल. तामिळ व सिंहली या दोन्ही लोकांविषयीं हें विधान केलें आहे. खालील आंकड्यांवरून ही गोष्ट लक्षांत येईल.

**विसांपेक्षां कमी वयाच्या विवाहित स्त्रिया.**

| | खानेसुमारी वर्ष १९०१ लग्न झालेल्या | खानेसुमारी वर्ष १९११ लग्न झालेल्या |
|---|---|---|
| १५पेक्षां कमी वयाच्या एक हजार स्त्रियांपैकीं | १३ | ६ |
| १५ पेक्षां अधिक परंतु २० पेक्षां कमी वयाच्या एक हजार स्त्रियांपैकीं | ५०३ | ३२६ |

या आंकड्यांवरून असें दिसून येईल कीं, आज पंधरा पासून वीस वर्षांच्या वयाच्या स्त्रियांपैकीं दोन तृतीयांश अविवाहित आहेत

स्त्रिया इतक्या वर्षांपर्यंत अविवाहित रहातात त्यावरून परंपरागत विवाहपद्धति म्हणजे पालकांनीं लग्नें जमवून द्यावयाचीं आणि लग्न करणारांनीं आपली नुसती संमति द्यावयाची ही पद्धति नष्ट झाली नाहीं. वर जे मिश्रविवाह सांगितले ते अर्थात् वधूवरांच्या स्वयंप्रेरणेनें आणि प्रसंगीं गुरुजनांच्या मताविरुद्धच होतात. लग्नांमध्यें पुरुष आपली इच्छा अधिक चालवूं शकतो. त्याला मुलीकरितां तिच्या पालकाकडे मागणी करतां येते व क्वचित् प्रसंगीं तरुणीची आराधना स्वतः करण्याचा अनुभव त्याला मिळतो. तथापि अनुनयपद्धति या देशांत अजून विकास पावली नाहीं. पुष्कळ लग्नें अशीं होतात कीं, लग्न ठरण्याच्या अगोदर वधूनें वरास पाहिलेलेंहि नसतें.

स्त्रीपुरुषांच्या संबंधामध्यें अजून मोकळेपणा आला नाहीं. एका तरुण अविवाहित तामिळ ख्रिस्ती शिक्षकानें डॉ. केतकर यांस सांगितलें कीं, माझी शेजारच्या मुलींच्या शाळेंतील मास्तरणीशीं ओळख करून घेण्याची इच्छा आहे, पण मला अजून संधि मिळाली नाहीं. तो म्हणाला, "आमच्या शाळेच्या विवाहित मुख्याध्यापकानें मुलींच्या शाळेच्या मुख्याध्यापिकेशीं उघडपणें थोडेंबहुत संभाषण केलें तर, आणि चोरून लपून आणखी कांहीं गडबडी केल्या तरी चालेल; पण आम्हां बिचाऱ्या अविवाहित उपाध्यापकांनीं त्या शाळेच्या शिक्षकिणीशीं बोलण्याचा प्रयत्न केला तर मात्र अगदींच बोभाट होऊन जाईल. त्या शिक्षकिणी तरी आम्ही बोलावयाचा प्रयत्न केला तर शांतपणें आमच्याशीं बोलतील, कीं आम्हीं त्यांच्यावर बलात्कार करण्याकरितांच आलों आहों असें वाटून भेदरून किंकाळी फोडतील कीं काय कोण जाणे !" डॉ. केतकर यांनीं त्या तरुणास म्हटलें, "कोणी मध्यस्थ पहा; नाहीं तर धटपणें मुख्याध्यापकाला सांग कीं, आमची पलीकडच्या शाळेंतल्या शिक्षकिणीशीं ओळख करून दे." तो म्हणाला, मीं त्यांनां अशी आपली इच्छा प्रदर्शित केली म्हणजे ते म्हणणार, तुझें त्या मुलीबरोबर काम काय ? आणि नुसती ओळख करावयाची म्हणून सांगितलें, कीं तो म्हणणार, ओळख करून काय करावयाचें ? या प्रकारची प्रश्नमालिका सुरू झाली म्हणजे स्वतःच्या लग्नासंबंधानें बोलणें करण्यासहि लाजणारा तरुण काय उत्तर देणार ?

सिलोनमधील तरुणास अनोळखी तरुणीबरोबर ओळख करून घेण्यास बऱ्याच अडचणी येतात. तरुणास आपल्याच वर्गाच्या अपरिचित तरुणींशीं ओळख करून घेण्याचा हक्क आहे व तरुणीस देखील तरुणांशीं ओळख करून घेण्याचा हक्क आहे. हें तत्त्व अजूनहि पौरस्त्य सिलोनमध्यें फारसें मान्य झालें नाहीं असें दिसतें.

यूरोपियन आणि यूरेशियन वर्गांशीं चिकटून रहाणाऱ्या सिंहली लोकांत स्त्रीपुरुषांमध्यें थोडीबहुत ओळखी करून देण्याची रीत आहे. खेडेगांवांत व विशेषेंकरून हलक्या वर्गांत लग्न होण्यापूर्वींच स्त्रीपुरुषांची चांगली ओळख असते. तथापि यूरोपियनांमध्यें अनुनयपद्धतीचा जितका विकास झाला आहे, तितका सिंहली लोकांत झाला नाहीं. उदाहरणार्थ, स्त्रीपुरुषांच्या जोडप्यांनीं रस्ता, उपवन हीं गजबजलेलीं दिसत नाहींत. स्त्रीपुरुषें थोडींबहुत विनोदाचीं व थोडींबहुत प्रेमयुक्त अशीं भाषणें करतांना दिसत नाहींत. रस्त्यांवरून तरुणींचा पाठलाग करणारे तरुण दिसत नाहींत. किंवा मुली समोरून येत आहेत असें पाहून, त्यांच्यांशीं ओळख अगर सलगी करण्याच्या इच्छेनें स्मितपूर्वक टोपी काढणारे आणि "गुड इव्हिनिंग" करणारे अलबेले दिसत नाहींत.

सिंहली लोकांत "निव्वळ हिंदू"पणा प्रीतिविवाहाच्या अभावानें नजरेस येतो एवढेंच नव्हे, तर सिंहली स्त्रियांस अजूनहि नवऱ्याचें नांव उच्चारावयाची लाज वाटते. सिंहली लोकांत विटाळशीच्या विटाळाची कल्पना नाहीं. लंकेंतील तामिळांतून देखील ती गेल्यासारखीच आहे.

निरनिराळ्या जातींनीं एकमेकांत लग्नास तयार होऊं नये, तथापि बाह्यांबरोबर लग्नें करावयास तयार व्हावें यास कारण काय ? प्रथमतः असा समज होतो कीं, गोरी जात सर्वांत उच्च समजली जाते; आणि उच्च समजलेल्या जातीशीं सादृश्य आणि सान्निध्य मिळवावें हा हेतु सर्वत्र असेल; तथापि "उच्च" वर्गाशीं संबंध ठेवण्याची इच्छा हें मिश्र लग्नांस केवळ कारण नाहीं असें दिसून येतें. परक्या मुलींबरोबर लग्न करण्याची प्रवृत्ति उच्च, धनाढ्य आणि सुशिक्षित अशा वर्गांत फारशी नाहीं हें कबूल केलें पाहिजे. तथापि येथें हेंहि सांगितलें पाहिजे कीं, हा वर्ग जरी गांवठी साहेबाची मुलगी करावयाचें नाकारतो, तरी इंग्लंडांत जाऊन बायको करून आणण्यास या वर्गास प्रत्यवाय वाटत नाहीं.

मनुष्यस्वभाव असा आहे कीं, स्वतःच्या समाजांतील हलक्या वर्गाच्या अगर जातीच्या मुलीशीं लग्न करण्यास जें धैर्य लागतें त्यापेक्षां अगदीं परक्या लोकांबरोबर लग्न करण्यास कमी धैर्य लागतें. जी अगदींच परक्या वर्गांतील असेल तिच्याबरोबर लग्न करण्यास लोकांस हरकत वाटणार नाहीं. अगदीं परक्या राष्ट्राच्या बाईबरोबर लग्न केलें तर तिचा केवळ परकेपणाच लोकांच्या लक्षांत येतो. एखाद्या महाराष्ट्रीयानें बंगाली बाईबरोबर लग्न केलें, तर ती बाई ब्राह्मणाची आहे कीं कायस्थाची आहे कीं नामशूद्राची आहे हा प्रश्न विचारण्याची देखील कांहीं लोकांस इच्छा होणार नाहीं. बंगाली या शब्दाखालीं पुष्कळ गोष्टी लपून जातात. त्याचप्रमाणें बर्घेरची मुलगी केली म्हणजे कोणत्या योग्यतेची मुलगी केली असा प्रश्नच उरत नाहीं. कारण, बर्घेर ही एकच जात आहे आणि जातीची पदवी व्यक्तीस मिळते.

पुष्कळदां दोन जाती आपआपसांत लग्न करीत नाहींत; तथापि बरोबरीच्या परक्यांशीं लग्न करण्यास तयार होतात. यास आपण तेलगू आणि कानडी ब्राह्मणांचें उदाहरण घेऊं.

तेलगू ब्राह्मणांत अनेक जाती आहेत; त्या परस्परांशीं लग्न करण्यास तयार नाहींत. तथापि या सर्व जाती महाराष्ट्रीय ब्राह्मणांशीं लग्न करण्यास तयार होतात.

एवंच, ज्या निरनिराळ्या जातींत लग्नें होत नाहींत, त्या जातींशीं अगदीं परके लोक लग्न करूं शकतात. ते परके उच्च आहेत ही भावना तेथें असलीच पाहिजे असें नाहीं.

यूरेशिअन आणि वर्घेर यांचीं सिंहली लोकांबरोबर लग्नें होतात याचें दुसरें एक कारण म्हटलें म्हणजे वर्घेर मुलींचें स्वातंत्र्य होय. ज्याप्रमाणें आपल्या महाराष्ट्रांतील लोक विदेशीं गेले म्हणजे तेथील मुलींच्या प्रेमपाशांत सांपडणें त्यांस शक्य आहे, तथापि स्वदेशांतच अनेक तरुणींशीं ओळखी संपादन करणें त्यांस शक्य नाहीं; तशीच गोष्ट कांहीं अंशीं कोलंबो येथें आहे. कोलंबो येथें गोईगम जातीच्या तरुणास करावा जातीच्या किंवा प्रत्यक्ष स्वजातीच्या मुलींशीं ओळखी करतां येत नाहींत, तथापि वर्घेर मुलींशीं ओळख करणें त्यास शक्य असतें. सिंहली अगर तामिळ तरुणांवर जाळें टाकण्याचा मक्ता सिंहली लोक वर्घेर मुलींस देतात असें म्हणण्यास हरकत नाहीं. स्वजातीय स्त्रियांशीं अपरिचय आणि विजातीय स्त्रियांकडून अनुनयास उत्तेजन या विलक्षण परिस्थितींत सिंहली आणि तामिळ यांपैकीं कांहीं तरुण लोक पडतात. अशा स्थितींत परक्या स्त्रियांबरोबर झालीं इतकीं लग्नें कशीं झालीं ही आश्चर्याची गोष्ट नसून अधिक झालीं नाहींत याचेंच आश्चर्य आहे.

या लग्नांविषयीं विचार करितांना आणखी एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे ती ही कीं, आपल्याकडे या प्रकारच्या लग्नासंबंधीं जो आक्षेप असेल त्याचें एक मोठें कारण यूरोपिअन लोक ख्रिस्ती आहेत हें होय. इंग्रज मुलीबरोबर लग्न करण्यास लोकांस जो आक्षेप वाटेल तो ख्रिस्ती मुलीबरोबर लग्न करण्यांतहि वाटतो. तेथें ख्रिस्ती संप्रदायाच्या लोकांबरोबर लग्नें करण्यास आक्षेप नाहीं आणि यामुळें वर्घेरांबरोबर लग्न करणें तितकें आक्षेपणीय नाहीं. शिवाय वर्घेरांबरोबर लग्न करणारी मंडळी पुष्कळ प्रसंगीं ख्रिस्ती असते. तथापि हें लक्षांत ठेवावें कीं, तामिळ अगर सिंहली ख्रिस्ती लोकांस वर्घेरांबरोबर लग्न करण्यास हरकत नसते असें नाहीं. ज्याप्रमाणें अन्यजातीयाबरोबर लग्न करणें हिंदूंस आवडत नाहीं त्याप्रमाणें ख्रिस्ती लोकांसहि आवडत नाहीं.

**पुनरुज्जीवक चळवळ**—परकीय संस्कृतीनें मनुष्य कितीहि पछाडला गेला असला तरी स्वकीयतेचें बीज त्याच्या अंतःकरणांतून जाणार नाहीं असें दिसतें. शासनविषयक नवीन परिस्थितीमुळें त्यानें बाह्यांसारखें कितीहि आचरण केलें तरी त्याच्या अंतःकरणांतील स्वकीय संस्कृतीनुसार आचरण करण्याची भूक नष्ट होत नाहीं. अमेरिकन इंडियन गोऱ्या लोकांच्या वस्तींत जाऊन राहतो, त्यांच्यांत वाढतो, कधीं गोऱ्यांचें उच्च शिक्षणहि त्यास मिळतें, पण फिरून काय? त्यास नवीन घेतलेल्या संस्कृतीचें ओझें वाटूं लागतें आणि सुधारलेला पोषाख टाकून देऊन पुन्हा घोंगडीकडे, पिसांकडे आणि रंगाकडे त्याचें मन धांव घेतें अशीं उदाहरणें अमेरिकन लोकांच्या किती तरी प्रत्ययास येत आहेत. ज्याप्रमाणें व्यक्तीची ही गोष्ट आहे त्याप्रमाणें अनेक व्यक्तींचा समूह जें राष्ट्र त्याचीहि गोष्ट आहे. धर्मांतराचीं कारणें पुष्कळ प्रसंगीं कृत्रिमतेचा कंटाळा आणि साधेपणाची आवड हीं असतात. ही गोष्ट दुसऱ्या लोकांच्या संस्कृतीच्या दडपणाखालीं ओरडणाऱ्या जित लोकांसंबंधानेंच तेवढी खरी आहे असें नाहीं; ही वृत्ति अत्यंत स्वतंत्र आणि प्रबल लोकांमध्येंहि दृष्टीस पडते. पैतृक "साधेपणा" आणि अर्वाचीन "कृत्रिमता" यांचा झगडा चाललेला सर्व देशांत दृष्टीस पडतो. पुष्कळांस जुन्या चालींचा रानटीपणा भासूं लागतो आणि कांहीं तरी फरक केला पाहिजे असें वाटूं लागतें; आणि पूर्वीपेक्षां कांहीं तरी अधिक कृत्रिमता समाजास येते. पुढें कालांतरानें कृत्रिमतेचा कंटाळा येऊन मूळ स्थितीकडे धांव घ्यावी असें पुष्कळांस वाटूं लागतें. तथापि या आरोहावरोहामध्यें समाजाची प्रगतिच होते. नवीन कृत्रिमता घेतांना आवश्यक गोष्टींबरोबर कांहीं अनवश्यक गोष्टी देखील लोक घेतात; त्या अनवश्यक गोष्टी झाडून काढावयाच्या असतात. यूरोपांत व अमेरिकेंत "पैतृक साधेपणा"कडे कशी प्रवृत्ति होत चालली आहे हें दाखविण्यासाठीं कांहीं उदाहरणें घेतों. आजचा पुरुषांचा पोषाख शंभर वर्षांपूर्वीच्या पुरुषांच्या पोषाखापेक्षां पुष्कळच साधा झाला आहे. स्त्रियांनीं कारसेट* वापरूं नये म्हणून खटपट चालू आहे. यूरोपियन स्त्रीपुरुषें पोषाखांत अगदीं लहान वयापासून मढविलीं असतात ही गोष्ट फार वाईट आहे, नग्नता फारशी अयोग्य नाहीं, स्त्रीपुरुषांचें एकमेकांच्या नग्नस्वरूपानें कामोद्दीपन होतें, ह्यासाठीं नग्नता निदान लहानपणीं लोकांस अधिक परिचित झाली पाहिजे, इत्यादि विचार स्त्रीपुरुषसंबंधशास्त्रज्ञ (sexual scientists) व्यक्त करीत आहेत.†

परकीय आचारांच्या ग्रहणामध्यें आपण राज्यकर्त्यांशीं सदृश व्हावें ही एक बुद्धि असते आणि रानटीपणा टाकून आपण सुधारावें ही दुसरी बुद्धि असते. त्याप्रमाणेंच जुन्या चालीकडे परत फिरा असा उपदेश करणाऱ्यांमध्यें दोन तऱ्हेचे लोक असतात. एक तर परंपरेचे अभिमानी आणि दुसरे म्हटले म्हणजे साधेपणाचे चहाते. कोणत्याहि राष्ट्रांत परकीयांचें गुलामांसारखें अनुकरण करणें बंद व्हावयास एक

* स्तनांच्या अधोभागापासून मांड्यांपर्यंत एक माशांच्या हाडांची केलेली बंडी. हिचा मुख्य हेतु उरःप्रदेशाचें विस्तृतत्व, कमरेचें लघुत्व आणि नितंबाचें गुरुत्व दाखविणें हा आहे.

† Havelock Ellis–Psychology of Sex. Vol. VI; शिवाय Sexual Ethics, A Study of Borderland Questions– Robert Michels.

गोष्ट अवश्य आहे, आणि ती म्हटली म्हणजे परकीयांशीं सादृश्य ठेवणाराला अधिक फायदा होण्याचा वंद झाला पाहिजे. जर हिंदु पोषाख करणाऱ्याला सरकारी अधिकारी आणि रेल्वे इत्यादि सार्वजनिक सेवकसंस्था तुच्छतेनें वागवितील तर परकीय तऱ्हेचा पोषाख करण्याची प्रवृत्ति अवाधित राहील. तथापि जनतेचा उत्कर्ष होऊं लागला आणि राज्यकर्त्यांशीं सदृश अशा पोषाखाचें महत्त्व उरलें नाहीं म्हणजे आत्मभौम पोषाखास आणि रीतिरिवाजांस महत्त्व येऊं लागतें.

सिलोनमध्यें परंपरागत संस्कृतीचा अभिमान धरून तिचें पुनरुज्जीवन करणें हा ज्यांचा हेतु आहे ते लोक आपणास सुधारक म्हणवितात. त्यांनीं Social Reform Society (समाजसुधारक संस्था) म्हणून एक संस्था काढली आहे. या सोशल रिफार्म सोसायटीमध्यें प्रमुख मंडळी म्हटली म्हणजे एल्. डब्ल्यू. ए. डी. सोयसा, डोनाल्ड ओमे (अभय) शेखर, आणि पाल पेरिस ही होत. या सोसायटीनें खालील गोष्टींकडे विशेष लक्ष दिलें आहे.

१. हिंदी पद्धतीच्या पोषाखाचा प्रसार करणें.
२. जुने सण आणि उत्सव यांचें पुनरुज्जीवन करणें.
३. सिंहलद्वीपाच्या इतिहासार्थ प्रयत्न करणें.
४. हिंदी तऱ्हेच्या वैद्यकाचा उद्धार करणें.

सोशल रिफार्म सोसायटीच्या कामास एक दोन बावतींत यश आलें आहे. स्त्रियांनीं यूरोपीय तऱ्हेचा पोषाख टाकून देऊन हिंदी तऱ्हेचा पोषाख करावयास सुरुवात केली आहे. या बावतींत डॉन क्यारोलिस हेवावितारण या कुटुंबांतील प्रसिद्ध लेखक धर्मपाल यांनीं पुढाकार घेतला आहे. धर्मपाल हे बराच काल हिंदुस्थानांत घालवितात. धर्मपालांनीं यूरोप, अमेरिका येथें प्रवास केला आहे; आणि त्यांचें नांव बोस्टन येथें कांहीं वर्गांत ऐकूं येतें. धर्मपाल यांनीं हिंदुस्थानी पद्धतीचा पोषाख सिलोनमध्यें नेला असें म्हणण्यास हरकत नाहीं. या बावतींत त्यांस साहाय्यकर्त्या दोन स्त्रिया होत्या. एक तर त्यांचीच आई मल्लिका हेवावितारण ही होय, आणि या कार्यास हातभार लावणारी त्यांच्या कुटुंबावाहेरची मुख्य एक बाई म्हटली म्हणजे मिसेस वीरकोणहामिनी ही होय.

**चळवळी आणि वाङ्मयः**—धर्मपाल हे दांडगे लेखक आहेत. त्यांच्या घराण्यानें "सिंहलबौद्ध" नांवाचें एक पत्र चालविलें आहे. या पत्राचा खप सुमारें साडेसहा हजार आहे. हें आठवड्यांतून दोनदां प्रसिद्ध होतें.

धर्मपालांच्या लेखांस आक्षेपक पुष्कळ आहेत. कांहीं आक्षेपकांनीं यांच्या लेखांचें येणेंप्रमाणें वर्णन केलें. "यांच्या लेखांत आवेशाची जोरदार भाषा असते, तथापि त्यांच्या लेखांत तार्किकता आणि युक्तिवाद नसतो. शिवाय एका विषयावर सुसंगतपणें न लिहितां एका विषयावरून दुसऱ्या विषयावर उड्डाण करण्याची धर्मपालांस फार खोड आहे. धर्मपालाच्या लेखांत कधीं विविधता आणि कधीं चर्वितचर्वण यांची एकच भेसळ सांपडेल."

पुरातन संस्कृतीचा अभिमान धरणाऱ्या लोकांत जॉन डी. सिलव्हा यांची गणना केली पाहिजे. लोकप्रिय नाटककार म्हणून यांचा लौकिक चांगला आहे. यांच्या नाटकांतील पदांचे नादलेख (रेकार्डस्) जागोजाग आढळतात. सामाजिक सुधारणेसंबंधाचें यांचें कार्य म्हटलें म्हणजे "सिंहलपराभव नाटक" होय. या नाटकांत राष्ट्रीय संस्कृतीचा कसा नाश होत आहे हें दाखविलें आहे आणि तो नाश थांबविण्यासाठीं खटपट करण्याकरितां प्रेक्षकांचें मन वळविण्याचा यत्न केला आहे.

हिंदु तऱ्हेचा पोषाख करण्याची फ्याशन दिवसानुदिवस वाढत आहे; आणि तेथील सुधारक वर्गास यावद्दल बरेंच श्रेय दिलें पाहिजे. सिंहलद्वीपांतील सुधारक वर्गास आपल्याकडील सुधारक वर्गासंबंधानें फारशी माहिती नाहीं. आणि ज्यांनां ज्यांनां माहिती आहे त्यांनां आपल्या सुधारक वर्गाविषयीं आदरबुद्धि नाहीं. ब्रह्मसमाजासारख्या संस्थांवर लंकेंतील सुधारक मंडळी तडाके हाणण्यास कमी करीत नाहींत.

लंकेंतील सुधारक मंडळीचें आणखी एक कार्य म्हटलें म्हणजे, यूरोपियन नांवें टाकून देऊन संस्कृत नांवांचा प्रचार करण्याविषयीं खटपट करणें हें होय. तसेंच आणखी एक कार्य हिंदी कलेचें पुनरुज्जीवन करणें हें होय. पोर्तुगीज लोकांच्या सहवासानें यूरोपियन संगीत लंकेंत शिरलें. आतां हिंदी संगीताकडे लक्ष घालून त्याचा प्रसार करण्याकडे अतिशय जोराची प्रवृत्ति झाली आहे.

राष्ट्रीय पुनरुज्जीवनार्थ खटपट करणाऱ्यांमध्यें बौद्ध व तसेच ख्रिस्ती लोकहि आहेत. दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे यूरोपांत जाऊन परत आलेले लोक राष्ट्रीय संस्कृतीच्या उद्धारार्थ जितके उत्साही झाले आहेत तितके देशांतच अडकून राहिलेले जुन्या पिढीचे सिंहली झाले नाहींत.

पुनरुज्जीवनाच्या चळवळींत प्रामुख्यानें खटपट करणाऱ्यांमध्यें डॉ. आनंदकुमारस्वामी यांचा उल्लेख केला पाहिजे. डॉ. कुमारस्वामी हें रक्तानें पूर्णपणें हिंदी देखील नाहींत. यांची आई इंग्रज आहे. तथापि हिंदी संस्कृतीचा अभिमान यांनां जितका आहे तितका थोडक्यांसच असेल.

सिंहली समाजांत बौद्ध, प्राटेस्टंट ख्रिस्ती, आणि क्याथोलिक ख्रिस्ती असे तीन मुख्यत्वानें भेद करितां येतील. या प्रत्येक संप्रदायानें आपापलीं वर्तमानपत्रें चालविलीं आहेत; आणि प्रत्येक पत्राचा हेतु आपल्या संप्रदायाचा प्रसार करण्याचा आहे असें दिसतें. सिंहली भाषांतून जीं पत्रें चालविलीं जातात त्यांचा देशाच्या शासनसूत्रावर परिणाम फारसा होत नाहीं. इंग्रजी पत्रें शासनावर परिणाम घडवितात; त्या पत्रांतून धार्मिक विषयाची चर्चा क्वचितच होते. ती चर्चा करणें देशी भाषांतील

पत्रांचें प्रधान कर्तव्य झालें आहे. सिंहलद्वीपांत प्रौढविवाह, विधवाविवाह, स्त्रीशिक्षण इत्यादि गोष्टींवर चर्चा होणें शक्य नाहीं. कारण, तेथें या तिन्ही गोष्टी केव्हांच स्थापन झाल्या आहेत. स्त्रियांनीं जाकिटें कां वापरूं नयेत यासारख्या महत्त्वाच्या गोष्टींवरहि चर्चा होणें शक्य नाहीं. कारण, जाकिटेंच काय, पण सुधारक पक्षास न मिळालेल्या बायका कॉरसेट देखील वापरतात. मांसाहाराचा पक्ष घेऊन देखील भांडतां येणार नाहीं. कारण गाईचें, डुकराचें आणि बोकडाचें मांस सर्वचजण खातात. ब्राह्मणांस शिव्या देण्यासहि तेथें अवकाश नाहीं. कारण तेथें ब्राह्मण मुळींच नाहींत.

सिंहल देशाची उपर्युक्त स्थिति असल्यामुळें तेथील पत्रकारांचे मोठे हाल होत असतील असें जर आपणांस वाटत असेल तर तो आपला गैरसमज आहे. तेथील देशी भाषांतील पत्रांचें एक मुख्य काम म्हटलें म्हणजे धार्मिक विषयांची चर्चा करणें हें होय.

निरनिराळ्या पक्षांचीं पत्रें आहेत त्यांचीं नांवें आणि पक्षवृत्ति दिल्यास वाचकांस समजण्यास सुलभ जाईल.

१. **सिंहलवौद्धः**—हें आठवड्यांतून दोनदां प्रसिद्ध होतें. या पत्राची वृत्ति मूलसंस्कृतीची जोपासना करण्यास लोकांस प्रवृत्त करणें ही होय. बौद्धसंप्रदायाचा पक्ष घेऊन भांडणें व त्याचा प्रसार करणें हें या पत्राचें ध्येय आहे.

२. **संदरेसः**—( चंद्ररश्मि ) हें पत्र थिआसाफिस्टांच्या प्रामुख्याखालीं अवतीर्ण झालें. या पत्राचे संपादक आपणांस बौद्धधर्माचे अभिमानी म्हणवितात, आणि "सध्यां थिआसफीच्या मताचा प्रसार करण्याचें काम आमचें नाहीं" असें सांगतात. "सिंहलबौद्धापेक्षां आमची पालिसी उर्फ व्यवहारनीति थोडीशी निराळी आहे" असेंहि बोलतात. सिंहलबौद्ध फारच एकांगी आहे असें या पत्राच्या संपादकांस वाटतें. हें पत्र आठवड्यांतून दोनदां प्रसिद्ध होतें.

३. **सिंहलजातीयः**—हें साप्ताहिक पत्र वारंवार संदरेस पत्रावर टीका करितें. संपादक आपणांस बौद्ध म्हणवितो. तो कादंबरीकार म्हणून प्रख्यात आहे.

४. **ज्ञानप्रदीपः**—हें क्याथोलिक संप्रदायाचें समर्थन करणारें पत्र आहे.

५. **रविकिरणः**—हें प्राटेस्टंट ख्रिस्त्याचें समर्थन करणारें आहे. सिंहली संस्कृतीवर हें पत्र तीक्ष्ण टीका करितें.

६. **लंकमिनुः**—( लंकामाणिक्य ) हें दैनिक पत्र ख्रिस्ती मंडळी प्रसिद्ध करिते. पारमार्थिक संप्रदायांच्या बाबतींत याची तटस्थवृत्ति आहे असें त्या पत्राचे चालक सांगतात. तथापि बौद्धांचें असें मत आहे कीं, हें पत्र अंतःस्थपणें बौद्धांच्या विरुद्ध आहे.

७. **दिनकरप्रकाश**
८. **दिनकरतापवृत्ति** } हीं दोन दैनिकें बौद्धांनींच चालविलीं आहेत; तथापि धार्मिक विषयांत जितकें मन यांनीं घालावें तितकें हीं घालीत नाहींत, असा या पत्रांविरुद्ध आक्षेप आहे.

९. **दिनमिनः**—ह्या पत्रानें दैनिक स्वरूप नुकतेंच स्वीकारलें आहे. संदरेस पत्राप्रमाणेंच याचें धोरण राहील असें दिसतें. कारण संदरेस पत्राच्या संपादकवर्गापैकीं कांहीं मंडळी तिकडे गेली आहे.

१० **सिंहलसमे** ( समय ):—हें बौद्ध पत्र आहे.

संस्कृतीचें वाग्युद्ध वर्तमानपत्रांतूनच होतें असें नाहीं; कादंबऱ्यांतून प्रत्येकास प्रिय असलेलीं मतें बाहेर पडतात.

कादंबरीकारांमध्यें एम्. सी. एफ्. पेरेरा, सायमन सिल्व्हा, पी. शिरिसेन, इत्यादिकांचीं नांवें सर्व लोकांस अवगत आहेत. पेरेराच्या कादंबऱ्यांत "मगे करुमि" ( माझें कर्म ) ही कादंबरी लोकप्रिय आहे. यांत सिंहली समाजाचे दोष दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. सायमन् सिल्व्हा याच्या कादंबऱ्यांत 'मीना,' 'तेरीझा,' आणि 'अपेआगम' या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. 'तेरीझा' ही कादंबरी लोकांस बिघडविण्याकरितां आणि हलक्या लोकांचा आश्रय मिळविण्याकरितां लिहिली आहे, असा त्या कादंबरीवर लोकांचा आक्षेप आहे. या कादंबरींत लग्ननिर्बंधच नसावा आणि वाटेल त्या मनुष्यानें वाटेल त्या स्त्रीवर प्रेम करावें हें मत उपदेशिलें आहे. 'अपेआगम' या कादंबरींत बौद्धभिक्षूंवर झोड उडविली आहे.

पी. शिरिसेन ( सिंहलजातीयपत्राचा संपादक ) याच्या तीन कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. त्या (१) "रोसलिन्", (२) "सहजयतिस्स" आणि (३) "अपटवेचदि" या होत. "सहजयतिस्स" या कादंबरीवर पुष्कळ लोकांचा आक्षेप आहे, आणि याचें कारण त्या कादंबरींत तरुणी आपल्या प्रेमपात्राबरोबर चोरून पत्रव्यवहार कसा करीत आहेत हें दाखविलें आहे. या कादंबरींतील लिहिणें तरुणींस सूचक होईल असें कांहीं पत्रकारांस वाटल्यामुळें त्यांनीं त्या कादंबरीचा निषेध केला आहे.

शिरिसेन याच्या "अपटवेचदि" ( आम्हांस काय झालें आहे ? ) या कादंबरींत समाजावर व त्यांतील व्यंगांवर पुष्कळ टीका आली आहे असें म्हणतात. या कादंबरीचा गोषवारा आम्हांस मिळाला नाहीं.

या कादंबऱ्यांचा निर्देश करण्यांत आमचा हेतु एवढाच कीं, समाजविषयक मतांचा वारा कोणत्या दिशेनें वहात आहे हें दाखवावयाचें. बौद्ध संप्रदायाचे लोक आपल्या समाजाचें निरीक्षण करून त्यांतील दोषांचें कादंबरीरूपानें आविष्करण करावयास लागले आहेत, व त्याप्रमाणेंच नवीं मतें कादंबऱ्यांच्या द्वारानें लोकांच्या दारावर आपटत आहेत हेंहि दिसून येईल.

देशाच्या संस्कृतींत दोन तऱ्हेनें फरक होत असतो. एक तर परकीय संस्कृति देशांतील लोकांस आपल्याकडे ओढा-

वयास पहाते आणि मूळ समाजघटना हाणून पाडण्याचा प्रयत्न करितें; अगर एखाद्या विशिष्ट समाजाच्या अंतर्भागांतच खळबळ सुरू होऊन समाजाचे विचार आणि आचार वदलूं लागतात. निरनिराळे पारमार्थिक संप्रदाय एकमेकांशीं झगडत असतां एकमेकांचीं उणीं काढावयाचा प्रयत्न करितात. एक संप्रदाय दुसऱ्या संप्रदायाचीं उणीं बाहेर काढतो, तेव्हां त्याचा हेतु, स्पर्धा करणाऱ्या संप्रदायास लोकांनीं सोडून जावें हा असतो. तथापि मनुष्य स्वसंप्रदायाचींच उणीं काढूं लागला तर त्याचा हेतु आपल्या संप्रदायांतील दोष नष्ट होऊन संप्रदाय बलाढ्य व्हावा हाच असतो. कधीं कधीं परकीय धक्क्यामुळेंच अंतःस्थ सुधारणेस प्रारंभ होतो. बौद्ध-संप्रदायास आणि परंपरागत रीतीस आंतून आणि बाहेरून कसे धक्के मिळत आहेत हें पूर्वोक्त विवेचनावरून लक्षांत येईल.

**राजकीय चळवळी आणि तेथील पक्षभेदः—** या देशांत राजकीय चळवळी होतात; आणि थोडाबहुत पक्षभेद देखील आहे. तथापि जो पक्षभेद आढळतो तो बहुतांशीं व्यक्तिविषयक आहे. येथें सिंहली, तामिळ आणि बर्घर या तिन्ही जातींस सरकार अगदीं सारख्या तऱ्हेनें वागवितें; आणि त्यामुळें बर्घर लोक आणि तद्देशीय हे दोघेहि एकदिलानें कामें करितात. अलीकडे मात्र बर्घर स्वजातीस सरकारनें अधिक पसंत करावें म्हणून खटपट करीत आहेत, असा कित्येकांचा आक्षेप आहे.

सिलोनमध्यें शिक्षण अधिक असल्यामुळें सार्वजनिक प्रश्नांसंबंधानें सिलोनमध्यें अधिक जागृति आहे. कोलंबोची लोकसंख्या थोडी आहे, तथापि तेथें पांच इंग्रजी भाषेंत चालविलेलीं दैनिकें आहेत. तीं येणेंप्रमाणें:—

( १ ) टाईम्स ऑफ सिलोन ( आंग्लो सिलोनीज* )

( २ ) ऑबझरव्हर ( आंग्लो सिलोनीज )

( ३ ) इंडिपेंडंट ( बर्घर )

( ४ ) मार्निंग लीडर ( देशी, संपादक हिंदुस्थानीय ख्रिस्ती आहे. हा गृहस्थ सिलोनचा टिळक बनला आहे. याचें नांव "आरमंड डिसोझा" हें होय. सिलोनमध्यें जे कांहीं अन्यायी न्यायाधीश होते त्यांच्यावर तो कडक टीका करी, आणि यामुळें यास कोर्टाच्या बेअदबीबद्दल तुरुंगांत जावें लागलें. हा तुरुंगांत गेल्यानंतर याला सोडून द्यावें अशा आशयाचा अर्ज गव्हर्नरकडे प्रमुख मंडळींकडून गेला आणि गव्हर्नरनें त्याची मुक्तता केली. डिसोझा यांनीं "माझें कुल ब्राह्मणाचें आहे" असें डॉ. केतकर यांस सांगितलें ).

( ५ ) सिलोनीज ( हें पत्र सिंहली मनुष्यानें चालविलें आहे. 'लोकांच्या अंतःकरणाचें प्रतिबिंब आमच्या पत्रांत जितकें पडतें तितकें मार्निंग लीडरमध्यें पडत नाहीं,' असा अभिमान या पत्राच्या संपादकामध्यें आहे असें दिसून आलें ).

सिलोनमध्यें कांहीं वर्तमानपत्रकारांची गांठ पडली, म्हणजे त्यांनां कांहीं तत्त्वें उपदेशिण्याचा डॉ. केतकर प्रयत्न करीत असत तीं तत्त्वें येणेंप्रमाणें:—

( १ ) सिलोनचे भाषेनुसार राजकीय भाग पाडावेत.

( २ ) त्या प्रत्येक भागांत स्वभाषेमार्फत सर्व व्यवहार चालावा. सर्व सरकारी खात्यांनीं देशी भाषाच वापरावी.

( ३ ) सर्व प्रकारचें उच्चशिक्षण देशी भाषेंतूनच द्यावें.

( ४ ) देशाच्या उन्नतीसाठीं आणि देश हा राष्ट्र बनण्यासाठीं देशांत राज्यतंत्रावर परिणाम घडविणारा अभिजातवर्ग (Aristocracy) उत्पन्न होणें अवश्य आहे. तसा वर्ग उत्पन्न झाल्याशिवाय राष्ट्रीकरण होणें शक्य नाहीं. हा अभिजातवर्ग देशांतूनच उत्पन्न झाला पाहिजे. इंग्रज हा सिंहलामध्यें अभिजात बनतां कामा नये; आणि देशी अभिजातवर्ग उत्पन्न करावयाचा असल्यास, देशी भाषांस महत्त्वास आणलें पाहिजे.

या कल्पनांचें स्वागत निरनिराळ्या पत्रांकडून कसें काय झालें हें लिहितों. त्यावरून पत्रांची वृत्ति कळून येईल.

जाफना येथील तामिळांचें अत्यंत प्रमुख पत्र म्हटलें म्हणजे "सिलोन पेट्रिअट". या पत्राचे संपादक कनकरत्न यांस या कल्पना फारच पसंत पडल्या आणि त्यांच्या मनांत जाफना येथें एक चांगलें तामिळ दैनिक काढावें असें आहे असें ते म्हणाले.

कोलंबो येथील सिंहली भाषेंत पत्र चालविणाऱ्या पत्रकारांपैकीं "सिंहलबौद्ध" आणि "संदरेस" या पत्रकारांमध्यें या कल्पनांसंबंधानें अनुकूलता दिसली.

"दि सिलोनीज" या पत्राचे संपादक ओ. ई. मार्टिनस यांस या सर्व कल्पना पसंत पडल्या आणि "या कल्पनांचा प्रसार करण्यास मी शक्य तेवढा प्रयत्न करीन" असें त्यांनीं कबूल केलें.

"मॉर्निंग लीडर" या पत्राचे संपादक मि. डिसोझा यांचें मत "सिंहली भाषेस उत्तेजन देऊं नये, तसें उत्तेजन दिल्यास प्रगति मात्र बंद होईल; पण काय करावें ? अलीकडे सरकार सिलोनी भाषेस उत्तेजन देऊन देशाची प्रगति बंद करण्याचा यत्न करीत आहे" अशा प्रकारचें आहे.

या पूर्वगत विवेचनावरून सिलोनांतील सध्यांच्या पक्षांसंबंधानें आणि देशी संस्कृतीचा पुनरुद्धार करणें हा जो पुढें मोठा राजकीय प्रश्न होणार, त्याविषयीं सिलोनमध्यें वृत्ति कशा प्रकारची राहील, यासंबंधानें कांहीं कल्पना वाचकांस येईल.

सिंहली समाजाचें अवलोकन केलें असतां आपणांपेक्षां तो कोणत्या बाबतींत अधिक प्रगत दिसतो याचें मापन करूं.

* आंग्लो सिलोनीज म्हणजे सिलोनमधल्या इंग्रजांनीं चालविलेलें.

१. एक गोष्ट म्हटली म्हणजे तेथील सांपत्तिक स्थिति. मजुरीचे दर सिंहलद्वीपांत हिंदुस्थानापेक्षां अधिक आहेत; आणि तेथील मजुरांचें खाणें देखील आपल्याकडील मजुरांपेक्षां अधिक किंमतीचें असतें.

२. तेथें शिक्षण आणि यूरोपियन सुधारणा अधिक आहे, आणि सार्वजनिक चळवळींत लोक अधिक मन घालतात.

३. ज्या सामाजिक सुधारणा हिंदुस्थानांतील सुधारक घडवून आणण्याचा प्रयत्न करीत आहेत, त्या सुधारणा केव्हांच पार पडल्या आहेत. प्रीतिविवाह तेथें अजून सुरू झाला नाहीं आणि त्याचें कारण राजकीय आहे. राजकीय प्रगति झाल्याशिवाय प्रीतिविवाह जोरानें सुरू होणार नाहीं, आणि झाल्यास त्याचे परिणाम योग्य होणार नाहींत.

४. तेथें शिक्षण अधिक झाल्यामुळें देशी भाषेंतील वाङ्मय आतां आपल्या देशापेक्षां अधिक जोरानें वाढूं लागलें आहे.

५. ख्रिस्ती आणि बौद्ध हा भेद फारच कमी आहे; आणि तेणेंकरून देशांतील निरनिराळ्या वर्गांच्या ठायीं एकप्रकारचा सामान्य देशाभिमान, आणि सामान्य शासनविषयक वृत्ति उत्पन्न झाली आहे. सिंहली भाषेचे जे आग्रही प्रवर्तक आहेत त्यांत ख्रिस्ती लोकांची संख्या अधिक आहे. तामिळ हिंदू, आणि तामिळ ख्रिस्ती यासंबंधानें हेंच विधान लागू पडेल.

६. वर्तमानपत्रें वाचण्याची इच्छा लोकांत अधिक आहे. सत्तावीस लाख सिंहली लोकांचें नियतकालिक सारस्वत आणि आपल्या दोन कोटी महाराष्ट्रीयांचें नियतकालिक सारस्वत यांची तुलना केल्यास फरक सहजच दिसून येणार आहे.

७. ख्रिस्ती आणि इतर बाह्य लोकांस हिंदू बनविण्याची शक्ति हिंदू तामिळांत वाढली आहे.

खरोखर पहातां सिंहली लोकांची प्रगति आपणांपेक्षां अधिक झाली आहे. तथापि त्यांची प्रगति आपणांपेक्षां अधिक झाली असेल अशी आपणांस कल्पना नाहीं आणि त्यांसहि नाहीं. हिंदुस्थानाकडे पैतृकभूमि म्हणून, शिवाय आपल्या परंपरागत संस्कृतीचें आगर म्हणून आदरबुद्धीनें पहाण्याची त्यांस संवय झाली आहे. आपणांविषयीं आदरबुद्धि उत्पन्न करणारी आणखी एक गोष्ट म्हटली म्हणजे आपल्याकडील लोकांचीं नावें त्यांच्या कानीं जातात आणि "डोंगर दुरुनी दिसे साजरा" या न्यायानें आपल्यांतील शिष्ट लोक त्यांस फारच थोर वाटतात. शिवाय सिलोनमध्यें युनिव्हर्सिटी नाहीं आणि आपल्याकडे युनिव्हर्सिट्या असल्यामुळें बी. ए., एम्. ए., पुष्कळ आहेत; आणि त्यांच्याकडे पदवीधरांचा भरणा कमी आहे. जे आहेत ते एक तर पूर्वकालीं शिकून गेल्यांपैकीं आहेत, अगर इंग्लंडांत जाऊन आल्यांपैकीं आहेत. यामुळें हिंदुस्थान हा विद्वानांचा देश आहे असा त्यांचा वृथा समज झाला आहे. शिवाय आपल्याकडे विद्वान् जरी थोडे आहेत तरी प्रत्येक ठिकाणचे कांहीं मिळून पुष्कळ होतात आणि ह्याचा त्यांच्या मनावर संयुक्त संस्कार होतो. शिवाय स्वदेशी चळवळीच्या वातम्यांमुळें आमच्या देशांतील लोक विलक्षण तऱ्हेनें जागृत झाले आहेत, कदाचित् हिंदुस्थानांत राज्यक्रांति देखील होईल आणि हिंदुस्थानी रक्तास अधिक महत्त्व येईल, अशा कल्पना देखील त्यांच्या मनांत चोरून मारून उद्भवतात. असो.

सिंहलविषयक ज्ञानाचें मोठें वैगुण्य म्हटलें म्हणजे उदराटांविषयीं असलेलें अज्ञान होय. तामिळ आणि सिंहली पातराट यांच्यामध्यें सर्धावृत्ति आहे हें दिसून येतें. तथापि उदराट आणि पातराट यांची परस्परांसंबंधीं वृत्ति कशी काय आहे याची कल्पना नाहीं. तामिळ आणि सिंहली लोकांच्या स्पर्धेत एक गोष्ट दिसून आली. ती ही कीं, सध्यां नोकरीकरितां जी धडपड आहे त्या बाबतींतच केवळ सर्धा आहे असें नाहीं, तर ही सर्धा फार पूर्वकालापासून चालत आहे आणि आजची सर्धा पूर्वस्पर्धेची केवळ पुनरावृत्ति आहे. या गोष्टीमुळें पुष्कळ लोकांची अशी इच्छा आहे कीं, सिलोनचा इतिहास शाळांतून शिकवूंच नये; कारण, त्याच्या योगानें द्वैत अधिक होईल. पाठीमागच्या इतिहासासंबंधानें वादविवाद करितांना देखील गरमपणा दिसून येतो. उदाहरणार्थ, एकच गोष्ट देतोंः अनुराधपूर हें सिलोनमध्यें प्राचीन संस्कृतीचें शहर होतें. येथें प्रचंड अवशेष सांपडतात आणि या शहरांत एका काळीं दीडदोन लाख वस्ती असावी असा अजमास होतो. या शहराचें नांव "अनुराधपूर" आहे असें सिंहली म्हणतात. तामिळ म्हणतात, येथें एका काळीं पन्नास तामिळ राजपुत्र राज्य करीत होते आणि म्हणून अनुराजपूर हें नांव पडलें आहे. सिंहली म्हणतात, "अनुराधा" नांवाच्या सिंहली महाराज्ञीच्या नांवावरून हें नांव या गांवास मिळालें. बौद्ध अवशेषांकडे नजर फेंकली असतां आणि सध्यां सिंहली लोक बौद्ध संप्रदायाचे आहेत ही गोष्ट लक्षांत घेतली असतां हें शहर सिंहली लोकांनीं वसविलें असावें असें मत होतें. तामिळ उत्तर करितात कीं, "ब्राह्मण लोक इकडे येण्यापूर्वी आम्ही देखील बौद्धच होतों; तथापि ब्राह्मणांनीं "आगम" आणून आम्हांस नास्तिक्यांतून सोडविलें."

या सर्व वादविवादांत ऐतिहासिक अंश काय असेल तो असो. एवढी गोष्ट मात्र खरी कीं, तामिळ आणि सिंहली या दोन्ही राष्ट्रांत परसरांविषयीं स्पर्धा आणि क्रोध हीं बरींच आहेत. उदराट आणि पातराट यांच्यामध्यें परस्परांविषयीं कांहीं निश्चित वृत्ति आहे कीं काय समजलें नाहीं.

**सिलोनमधील मजूरः**—यूरोपीय लोकांच्या मळ्यांवर काम करणारी हिंदु वस्ती जवळजवळ पांच लाख आहे. या वस्तीचें जीवनचरित्र चांगलें अभ्यासिलें गेलें नाहीं. या वस्तीपैकीं सिलोनमध्यें किती लोक कायमचे रहिवासी बनतात आणि त्यांचे

पूर्वींच्या तामिळांशीं कसे काय संबंध होतात याचें ज्ञान डॉ.केतकर यांस झालें नाहीं. या प्रश्नासंबंधानें डॉ० केतकर यांनीं लोकांस प्रश्न केले नाहींत असें नाहीं. तथापि प्रश्नाचें समर्पकपणें उत्तर देण्यासाठीं त्या प्रकारचें अवलोकन ज्यांनीं पूर्वी केलें होतें असे सुशिक्षित तामिळ त्यांनां भेटले नाहींत. ज्याप्रमाणें आपल्या देशांतील सुशिक्षित वर्गांमध्यें अशिक्षित वर्ग आणि हलक्या जाती यांच्या जीवनचरित्रासंबंधानें पूर्णपणें अज्ञान आहे तसेंच त्यांच्यामध्येंहि आहे.

रा. रा. करुमुत्तु थिअगराज यांनीं तेथील भारतीय मजुरांविषयीं जी माहिती प्रत्यक्ष अवलोकन करून मिळविली व प्रसिद्ध केली (Ind. Rev. March 1917) ती येणेंप्रमाणें:—

**घरेंदारें व आरोग्य**—सिलोनमध्यें मजुरांस राहण्याकरितां पुष्कळ इमारती बांधलेल्या आहेत. त्यांचा नमुना म्हणजे इमारतीच्या मध्यभागीं एक लांबचलांब भिंत घालून दोन्ही बाजूंनां सारख्यासारख्या खोल्या पाडतात. ही प्रत्येक खोली १२ फूट लांब, दहा फूट रुंद आणि सुमारें ९ फूट उंच असून तींतून बाहेर पडवींत जाण्याकरितां एक दरवाजा असतो; खिडकी मुळींच नसते. भिंती व जमीन चिखलमातीची असून वर ओंवणाला लोखंडी पत्रे असतात. कांहीं घरांवर कौलें असतात. सर्वत्र एकजात हाच नमुना असतो. प्रत्येक भागांत चार कामकरी मजूर रहावयाचे हा सामान्य नियम खरा; पण पुष्कळ मळ्यांत इमारती भरपूर नसल्यामुळें एकेका गाळ्यांत पांचपांच सहासहा मजूर मुलावाळांसह कोंबलेले असतात. गटारें, मोऱ्या वगैरेंची व्यवस्था अगदीं असमाधानकारक. मुतऱ्या, शौचकूप क्वचितच ठिकाणीं असतात. सुदैवानें नवें आरोग्यखातें या गैरसोयी दूर करण्याच्या मार्गांत आहे.

**प्रकृतिमान व औषधोपचार**—मजुरांचें आरोग्य समाधानकारक नाहीं. ज्या ज्या मळ्यांत गेलों तेथें तेथें आजारी पडलेले मजूर होतेच. हिंवताप आणि संधिवात या व्याधी फार पसरलेल्या आहेत. रत्नपुरांतील तपासणीवरील अधिकारी डॉ. लून (Lunn) यांनीं एका भागासंबंधानें खालील मजकूर लिहिला आहे:—

"ह्या चाळींत ज्याचे सांधे धरलेले नाहींत असा एकहि इसम नाहीं. कांहीं ठिकाणीं हिंवताप आहे. हगवण, अतिसार व त्वग्रोग यांचा उपद्रवहि कांहीं कमी नाहीं. औषधोपचारार्थ ठेवलेल्या इसमांवर मजुरांचा बिलकुल भरंवसा नाहीं. अशा कांहीं इसमांची मीं गांठ घेतली. या योगानें मजुरांचा त्यांचेवर विश्वास नसण्याचीं कारणें मला बरोबर समजलीं. क्विनाइन हें या औषध देणाऱ्यांचें अगदीं आवडीचें औषध; किंवा असें म्हटलें तर अधिक बरोबर होईल कीं, तेवढें एकच औषध तेथें असे. डॉक्टरनें एक दिवसाआड मजुरांच्या खोल्यांत जाऊन तपासणी करावी असा नियम आहे खरा, पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, डॉक्टरसाहेब आठवड्यांतून एकदां जात असतात! बाकी एक दिवसाआड जाणें काय व आठवड्यांतून एकदां जाणें काय, दोहोंची किंमत सारखीच!!"

प्रत्येक आजारी माणसास तांदुळ द्यावे असा कायदा आहे; पण कायद्याची अम्मलबजावणी पहावी तर क्वचितच कोणा भाग्यवंताला तांदूळ मिळतात. सुपरिंटेंडेंट साहेब म्हणतात: "तांदूळच काय, पण दूध, कांजी, साबूदाण्याची खीर, लागतील ते पदार्थ मजुरांनां देण्यांत येतात; इतकेंच नाहीं तर ते मळेवाल्यांच्या खर्चानें देण्यांत येतात." परंतु मला नमूद करण्यास फार वाईट वाटतें कीं, मी या मजुरांच्या तक्रारींची अगदीं निःपक्षपातीपणानें व बारकाईनें चौकशी केली असतां मला असें आढळून आलें कीं, साहेबमजुकरांच्या वरील विधानास वस्तुस्थितीचा बिलकुल आधार नाहीं. एखादा मजूर आजारी पडला आणि त्याचे कोणी नातेवाईक शुश्रूषा करण्यास नसले कीं त्यानें खुशाल प्राणांची आशा सोडावी; तो मरावयाचा हें ठरलेलेंच! मजूरस्त्रीला प्रसूतीनंतर अर्धा बुशेल (एक राकेलचा डबा) तांदूळ व दोन रुपये रोख देतात पण त्यांतहि ते दोन रुपये हिशोबांत त्या स्त्रीच्या नांवावर टाकतात!! मळ्यांमधून सुइणी नेहमींच्या नेमलेल्या नसतातच, पण तात्पुरत्याहि त्यांनां कामास ठेवीत नाहींत!!

तसेंच मजूर आजारी पडला कीं त्याला दवाखान्यांत पाठविणें हें सुपरिंटेंडेंटचें कर्तव्य आहे असा कायदा आहे, तसें न करणें हा कायद्यांत गुन्हा आहे; पण कायद्यांतलें कलम कायद्यांत. मजूर बेफाम आजारी असूनहि आपल्या खोलींतच पडलेले मी प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिले आहेत.

कांहीं कांहीं मळ्यांतील मजुरांच्या मृत्यूचें प्रमाण पाहण्यासारखें आहे. निवितीगल येथील ९५० मजुरांपैकीं १९१३ या एका सालांतच २२७ मजूर मरण पावले! डिकोया येथील गेल्या सालचा रिपोर्ट मला असा समजला कीं, जन्मास आलेल्या ६० नूतन अर्भकांपैकीं ४५ मृत्युमुखांत पडलीं!!

**अन्न, काम, पगार, "हिशोब."**—तांदूळ नेहमीं मळेवाल्यांकडून पुरविण्यांत येतो. त्याचा भाव दर बुशिलास सुमारें रु. ४।८ ते रु. ५।८ असतो. हा दरांतील फरक कोलंबोपासून मळ्यापर्यंतच्या थोड्याफार अन्तरामुळें होतो. जितका मळा लांब तितका तांदूळ महाग आणि खराब.

कांहीं थोड्या मळ्यांत "कोकोनाडा मिलचा" किंवा "रंगूनचा कलुंडा" तांदूळ पुरवितात. हा तांदूळ चांगला असतो. पण बहुतेक मळ्यांत 'सुलई' 'पखुडी' या जातींचा तांदूळ देतात. तो अत्यंत खराब आणि अपायकारक असतो; पण बिचाऱ्या मजुरांनां तोच खावा लागतो.

शिवाय हे तांदूळ द्यावयाचे ते दर आठवड्यास ठराविक; दर मजूर पुरुषास पाव बुशेल, मजूरस्त्रीस दर आठवड्यास आळीपाळीनें पाव व अष्टमांश बुशेल, आणि मजूरमुलांस व मुलींस प्रत्येकीं अष्टमांश बुशेल. येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मजुरांनां मजुरीच्या कांहीं रकमेऐवजीं हे तांदूळ देतात, म्हणजे आठवड्यांतील ठरलेल्या कामाच्या दिवशीं मजूर कामावर नसेल तर अर्थात् मजुरीची रकम कमी होते. कांहीं वेळां अजीबातच मिळत नाहीं. याप्रमाणें मजूर गैरहजर राहिला किंवा आजारी पडला कीं त्याचें अन्न बंद झालेंच. येथें आणखी हेंहि सांगणें भाग आहे कीं, १८६५ सालच्या कायद्याच्या २७ व्या कलमा-

प्रमाणें आजारी मजुरांनां मळेवाल्यांनीं तांदूळ फुकट द्यावा असें असूनहि या नियमाअन्वयें तांदूळ मिळाला असें क्वचितच घडतें.

मजुरांजवळ मसाला वगैरे कढीचें सामान विकत आणण्यापुरतेहि रोख पैसे बहुतकरून नसतात.

पिण्याचें पाणी कांहीं ठिकाणीं ओढ्यावरून आणावें लागतें; पण बऱ्याच ठिकाणीं विहिरी आहेत. कांहीं थोड्या मळ्यांत नळाची सोय केलेली आहे.

सिलोनच्या सरकारनें कृपाळूपणानें प्रत्येक मळ्यांत ताडीचें दुकान मात्र जवळच उघडलेलें आहे!

मळ्यांमधून दुपारच्या जेवणाची सुट्टी मुळींच कोठें देत नाहींत. त्यामुळें पुष्कळ मजुरांनां उभ्या चोवीस तासांत दोनच जेवणें पडतात; पैकीं एक सकाळीं सहा वाजण्याच्या आंत व दुसरें दिवस मावळल्यानंतर. कांहीं मजूर मात्र दुपारचें जेवण त्यांतल्यात्यांत कसेंतरी उरकून घेतात.

सर्व मळ्यांतून घरापुढें राहण्याच्या इतकीच जागा भाजीपाल्याकरतां मोकळी ठेवलेली असते.

**कामें**—लागवड करणें, खतें घालणें, वेणणें, कांव्यांनीं ओझें उचलणें, ओझीं वाहणें, हीं कामें सर्व मळ्यांतून सारखींच असतात, मग तो मळा चहाचा असो किंवा रबर, कोको, नारळ यांचा असो. चहाचीं पानें तोडणें, कोकोच्या बिंया वेंचणें व फोडणें आणि वेणणें असलीं कामें नेहमीं बायकाच करतात; कांहीं अल्प प्रमाणांत मुलगे व मुलीहि हीं कामें करतात. रबराच्या झाडांतील रस धरणें हें काम कांहीं अंशीं बायका करतात. हीं कामें सोडून बाकी सर्व कामें पुरुष करतात. खरोखर पाहतां कामें कांहीं कठीण नाहींत. पण त्यावरचे देखरेख करणारे अधिकारी—सब-कंगनी, हेड-कंगनी व कंडक्टर—यांच्यामुळें काम मोठें कठिण वाटतें. या वरच्या अधिकाऱ्यांनां लांचलुचपत देण्याचे प्रकार चालतात. त्याबद्दल पुष्कळ मजूर तक्रारी करतात. अर्थात् याचा दोष सुपरिंटेंडंटकडे आहे, कारण मजुराविरुद्ध वाईट काम करण्याबद्दलच्या तक्रारी ऐकण्यास हे नेहमीं एका पायावर तयार असतात.

कांहीं भागांत कामाची वेळ सकाळीं ६ पासून संध्याकाळीं ४ वाजेपर्यंत; व कांहीं ठिकाणीं स० ६–३० पासून सं० ४–३० पर्यंत असते. सारखें ओळीनें १० तास दररोज काम घेतात. केव्हां केव्हां १० तासांपेक्षांहि अधिक काम घेतात. एका मळ्यांत माझ्यासमोर कामबंदीचें शिंग ४–३० च्या ऐवजीं ५–१० वाजतां फुंकण्यांत आलें. असो. इतकें काम घेऊन दुपारच्या जेवणाकरतां सुट्टीहि नाहीं. याबद्दल मी तेथल्या एका सुपरिंटेंडेंटपाशीं खुलासा विचारला तेव्हां त्यानें तर्कशास्त्र लढविलें तें असें:—

**(अ)** मोठाल्या मळ्यांत मजूर राहत्या घरापासून लांब लांब कामावर येतात, तेव्हां तेथून दुपारच्या जेवणाकरितां घरीं परत जाऊन यायला बराच वेळ मोडणार; इतका वेळ सवड देणें मळेवाल्यांनां शक्य नाहीं.

**(आ)** आतां लहानलहान मळ्यांचीहि हीच पद्धत आहे.

**(इ)** शिवाय सुपरिंटेंडेंट लोक सुद्धां सकाळच्या थोड्याशा फराळावर दुपारीं बारा एक वाजेपर्यंत थांबतात व मग जेवतात; तर सकाळीं पोटभर जेवल्यानंतर बाराच्या पुढें आणखी दोनचार तास थांबण्यास मजुरांनां मुळींच हरकत नाहीं.

रबराच्या कामांतील मजूर दुपारीं एक वाजतां घरीं परत येतात, पण बाकी सर्वांनां संध्याकाळीं पांच साडेपांचच्या पूर्वीं परत येणें मुळींच शक्य नसतें. अगदीं वेळेवर सुटले तरी नांवें नोंदवणें वगैरे कृत्यांत आणखी एक तासावर वेळ लागतो. एवंच कारखान्याचें काम सकाळीं ६ पासून संध्याकाळीं ६ पर्यंत चालतें.

मजुरांनां पगार मिळतो महिन्यामहिन्यानें पण हिशोब मात्र रोजावरून ठेवतात; आणि एखादा दिवस जरी गैरहजिरी असली तरी तेवढा पगार कापला जातो. बहुतेक काम रोजंदारी पद्धतीनें चालतें. फक्त रबराचें काम व कांहीं चहाच्या मळ्यांत चहाची पानें तोडण्याचें काम ठेक्यानें चालतें.

बहुतेक शेंकडा ८०।९० मजुरांनां मळ्यांतील कामाची रोजमजुरी सव्वापांच आणे मिळते. झाडें खडसणारांनां सव्वासहा आणे मजुरी देतात; पण हें काम वर्षांतून कांहीं ऋतूंत मात्र चालतें. कारखान्यामधील आणि सुपरिंटेन्डेंटच्या बंगल्यांतील व चाळींतील झाडूवाल्याचें काम करणाऱ्या सुमारें शेंकडा ५ मजुरांनां सव्वासहा आणे मजुरी पडते.

सर्व मळ्यांतून स्त्रीमजुरांनां रोजीं ४ चार आणे मिळतात. पण ते ठराविक काम केलें तरच पदरांत पडतात. कमी काम करणाऱ्यांनां शिक्षा मिळते व अधिक काम करणाऱ्यांनां बक्षिस मिळतें पण अधिक काम हातून होण्याचा सुयोग विरळाच!

मुलांमुलींनीं ठरींव रोजाचें काम केल्यास पावणेतीन आणे त्यांनां मिळतात.

रविवारीं काम करणें मजुराच्या मर्जीवर असतें; आणि काम केल्यास पुरुषाला सव्वासहा आणे व स्त्रीला पावणेपांच आणे असें जादा वेतन देतात.

रबराच्या मळ्यांत रबराचें काम व चहाचीं पानें तोडण्याचें काम उक्तें देऊन त्यांत वजनावरून मजुरीचें प्रमाण ठरवितात. रबराच्या एका औंसाला १ ते ३ पै मिळतात. आणि चहाच्या पानांच्या एका पौंडाला १ ते ३ पै मिळतात.

रबराच्या कामांत चांगल्या मजुराला रोजीं आठ आणे मिळवितां येतात; आणि चहाचीं पानें खुडण्यांत चार आणे पडतात.

अशा रीतीनें आजारी न पडतां महिन्याचे २६ दिवस काम करून एक पुरुष मजूर साडेदहा रुपये मिळवूं शकतो; परंतु पुष्कळांनां (आजारी, गैरहजर यामुळें) साडेसात रुपयांवर मजुरी मिळतच नाहीं. स्त्रियांनां याप्रमाणें फार तर साडेसहा रुपये, आणि मुलामुलींनां ४ ते ५ रुपयेपर्यंत पडतात.

रबराच्या कामांत पुरुषाला १२ ते १५ व स्त्रीला ८ ते १० पर्यंत रुपये मिळूं शकतात.

एकंदर आढाव्यांत मजुरीचें प्रमाण इतकेंहि कायम पडत नाहीं; कारण पुरुषांनां आजारामुळें व बायकांनां अडचणींमुळें कामाचे खाडे करावे लागतात. बहुतेकांनां रोख ३ रुपयांवर महिन्याला मिळत नाहीं. अगदीं मोठ्या मिळकतीच्या रबराच्या

कामांत सुद्धां फार तर ५।६ रुपये दरमहा पडतो. एका चहाच्या मळ्यांत मीं पगारबुकांत पाहिलें तों बहुतेक मजुरांच्या नांवापुढें ( तांदुळाची किंमत रु. ५ दर बुशेलीं वजा जातां, ) २ ते २८८ रुपयेपर्यंत पडलेले दिसले.

थोडक्यांत तात्पर्य असें कीं, मजुरी मिळते ती मजुरांनां निर्वाहाला पुरेशी क्वचितच असते.

आणखी आश्चर्य असें कीं, सिंहली मजूर जेथें आहेत तेथें हिंदी मजुरांपेक्षां काम कमी करूनहि त्यांनां मजुरी मात्र जास्त देतात.

सिलोनांत एका मजुराला खर्च दरमहा रु. ८ ते १० येतो पण पुष्कळ मजुरांनां इतकी देखील मजुरी पडत नाहीं. एका मजुराला वर्षाचा खर्च रु. १२५ येतो त्याचा तपशील पुढीलप्रमाणें:—

| | | |
|---|---|---|
| तांदुळ १३ बुशेल, त्याचा सामान्य भाव दर बुशेलास रु. ५ प्रमाणें | | रु. ६५ |
| धोबी | | ,, २८८ |
| धोतरें ३ जोड्या | | ,, ६ |
| अंगावरचें ३ जोड्या | | ,, १ |
| कोट | २ ,, | ,, ३ |
| ब्लँकेट | १ ,, | ,, २ |
| बन्यानी | ४ ,, | ,, २ |
| कढीचें सामान इ० | | ,, ४३ |
| | | १२५ |

स्त्रियांनां थोडा कमी खर्च लागतो. कांहीं मजुरांनां १०० रुपयांवर वार्षिक प्राप्ति होते. पण असे फार थोडे. लहान मुलें व बायको या सर्वांची मिळकत मिळून एकंदर निर्वाह चालतो. पण पुष्कळांनां कर्जबाजारीच बनावें लागतें.

**मजूर ताब्यांत ठेवण्याच्या पद्धती**—कोणत्याहि मळ्यांत जा, तेथें असा एकहि मजूर आढळत नाहीं कीं ज्याला कर्ज वगैरे बिलकुल नाहीं, प्रत्येक जण कर्जबाजारी; कोणी अधिक कोणी कमी, एवढाच फरक; एकेका मजुराला रु. ५० ते २०० पर्यंत कर्ज असतें कांहींनां याहूनहि जास्त असतें. कर्जाची सरासरी मजुरामागें रु. १०० पडते. या कर्जाचा तपशील लक्षांत ठेवण्यासारखा आहे. मजुराची प्रथम भरती करतांना वाटखर्चाकरतां म्हणून त्याला आगाऊ रक्कम देतात. पुढें कंगनीकडून त्यानें आणलेल्या जिनसांची किंमत आकारतात. यांत आजारीपणांत व इतर अडचणींत उसनवार काढलेल्या पैशांची भर पडते—ही सर्व रक्कम त्या त्या मजुराचे नांवावर टिपणवहींत लिहितात, व नंतर ती हजेरी बुकांत उतरून घेतात. या अशिक्षित मजुरांनां फसविण्याचे तर अनेक मार्ग आहेत. आधीं पुस्तकांत मांडतांनाच खऱ्या रकमेपेक्षां अधिक मांडतात. मद्रासकडील एका ग्रॅज्युएटनें सिलोनांतील आपल्या प्रवासांत प्रत्यक्ष पाहिलेला एक प्रकार सांगितला तो असा:—"एक कंगनी '८ आणि ५ पंधरा' असें मजुराला सांगत होता आणि तो "एम्" म्हणून कबूल करीत होता." विचारे अशिक्षित मजूर, तेव्हां या प्रकाराचें कोणाला आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. हे मजूर बहुतकरून कंगनीपासूनच कापड आणतात व तें नांवावर मांडूनच आणतात. कंगनी कापडाच्या किंमती भलत्याच लावतात, तरी पण हे मजूर उधारीनेंच माल आणतात. प्रथम उधार आणून हे दुप्पट किंमत देतील पण रोखीचा व्यवहार करावयाचे नाहींत.

मजुरांनां मळेवाल्यांचें कर्ज असतेंच पण त्याशिवाय खाजगी कर्जहि सरासरी रु. ५ ते १५ पर्यंत असतें. शिवाय, या मजुरांनां एका मळ्यांतील नोकरी सोडून दुसऱ्यांत धरावयाची, असें करीत फिरण्याची संवय असते. चालू नोकरी सोडतांनां तेथील सर्व कर्ज वारावें लागतें. मजुरांच्या दहादहा वीसविसांच्या टोळ्या असतात. त्यांत सब-कंगनीच त्यांचा 'म्होरक्या' होतो. तो दुसऱ्या मळेवाल्याकडे त्यांचें जमवून देतो व मध्यें बक्षीस उपटतो. तोच त्यांचें कर्ज वारून हिशोब ठेवतो. पुन्हां दुसऱ्या मळ्यांत आगाऊ खर्चाला वगैरे देतो. अशामुळें एकंदरींत हिशोब पाहतां मजुरांचें कर्ज वर्षानुवर्ष वाढतच जात असतें.

या कर्जाच्या बाबतींत मळेवाल्याला हेडकंगनी जबाबदार असतो, हेडकंगनीला सब-कंगनी आणि शेवटीं सबकंगनीला मजूर.

कोणाहि कुटुंबांतील बायको, नवरा किंवा दुसरें कोणी वारल्यास त्याचें कर्ज राहिलेल्यांचे डोक्यांवर बसतें. कायदा पाहिला तर बायको कांहीं नवऱ्याच्या कर्जाला बांधलेली नाहीं. पण सिलोनमध्यें हे कंगनी कायदा ठेवतात सर्व गुंडाळून; आणि सुपरिंटेंडेंट लोकहि हा प्रकार चालू देतात. तथापि ही कर्जाची फेड सर्वस्वी कधींच होत नाहीं, आणि तो तोटा मुख्यतः सबकंगनींनां व कांहीं अंशानें कंगनी व मळेवाले यांना सोसावा लागतो.

एक वर्ष नोकरी केल्यास मजुराचा वाटखर्च त्याला माफ करतात.

आगाऊ उसनवार देण्याची जी पद्धत आहे तिनेंच मजुराचा खरोखर घात होत असतो. त्यामुळें मजुराची मजुरी कधीं वाढवीत नाहींत. कर्जांतून मजूर कधीं मुक्त होत नाहीं व त्यामुळें नोकरींतूनहि त्याला सुटतां येत नाहीं! तेव्हां हा सिलोनवास म्हणजे मजुरांनां अंदमानची काळेपाण्याची शिक्षाच होय. सिलोनांत गेलेला मजूर पुन्हां हिंदुस्थानांत परत आला असें उदाहरण अगदीं विरळा. कारण, रोजीं चार पांच आणे मिळविणाऱ्या मजुराकडून हें शेंकडों रुपयांचें कर्ज फिटावयाचें कसें?

तेव्हां सिलोनांत जाणारा मजूर म्हणजे अंदमानांत जन्मठेप काळ्यापाण्यावर जाणारा इसम म्हणून समजावा. हें ओळखूनच कल्लल, रामनाड वगैरे प्रांतांतल्या चेट्टिअरांनीं तेथील तंटेखोर लोकांची ब्याद नाहींशी करण्याकरितां मजूरभरती करणाऱ्या कामगारांनां मोठाले लांच देऊन मजुरांनां आगाऊ खर्चास-देऊन सिलोनमध्यें धाडून देण्याचा क्रम स्वीकारला आहे.

कित्येक बाबतींत मजुरांचें स्वातंत्र्य बरेंच हिरावून घेतलेलें असतें. उ०, कोर्टांत दाद मागण्यास जाण्यास मजुरांनां कठिण पडतें. कारण सुपरिंटेंडेंटच्या परवानगीवांचून कोर्टांत जाण्याकरितां मळ्यांतून बाहेर पडतांच येत नाहीं, व सुपरिंटेंडेंटच्याच विरुद्ध फिर्याद करण्याकरितां परवानगी मागण्यास कोणी मजूर धजत नाहीं.

लेह्यासोबत्यांच्या गांठी घेण्यास, उत्सव वगैरे करण्यास, लग्नकार्यादि कार्यास मजुरांस भरपूर सवलती देण्यांत येतात. तथापि

मजुरेतरांस मळ्यांत जाऊन मजुरांबरोबर गोष्टी करीत बसण्यास मोकळीक नसते.

वाईट कामाबद्दल एका अर्ध्या दिवसाच्या मजुरीइतका दंड करतात. तसेंच खराब कामाबद्दल किंवा चुकारपणाबद्दल किंवा हुकूम तोडल्याबद्दल काठीनें किंवा हातानें फटके मारतात. कामावरून पळून जाणारांनां कोर्टाकडे न पाठवितां सुपरिंटेंडेंटच त्यांनां शिक्षा ठोठावतात. कोणी मजूर नोकरी सोडून जाण्याच्या परवान्याबद्दल हट्ट धरून बसतात. त्यांनां सोडण्याची मळेवाल्यांनां सवड असली तर ठीक. नाहींतर या नाराज मजुरांनां वठणीवर आणण्यासाठीं अशा वेळीं छड्यांनीं वाटेल तसे ठोकतात.

**मजुरांनां वागविण्याची पद्धत**—मजुरांनां वाईट तऱ्हेनें वागवितात हें वरील हकीकतीवरून उघड होतेंच आहे. याशिवाय पुरावा म्हणजे नोकरींतून पळून जाण्याचा प्रकार फार चालतो हा आहे. पुष्कळ मजूर पळून जाण्यास तयार असतात, पण बायको, मुलेंबाळें व पहारेकरी या अडचणी विचाऱ्यांच्या मार्गांत असतात.

मालक व मजूर ह्यांच्यामध्यें बहुतकरून सरळ कधीं नसतेंच. कोर्टांतील फिर्यादींच्या संख्येवरून ही गोष्ट उघड होते.

मजूर कामाला नालायक झाला कीं त्याला मळ्यांतून हांकून देतात. राहिलेल्या आयुष्यांत त्यानें आपली पोटापाण्याची वाटेल तशी सोय पहावी.

**न्यायनिवाडा**—न्याय मिळण्याच्या मार्गांत मजुरांनां अनेक अडचणी असतात. कायद्यांतील सल्ला मिळविण्यास लागणारी फी देण्यास पैसा नसतो, तसेंच मारहाण केल्याबद्दलच्या सर्टिफिकिटासाठीं डॉक्टरला भरावयासहि पैसा नसतो. कोर्टांत स्वतःचा बचाव करण्यांत कोणाची मदत नसते, व स्वतःस अक्कल नसते. साक्षीदार द्यावयाचे ते मजूरबंधू, पण ते मालकाविरुद्ध साक्ष देण्यास नाखुष असतात. शिवाय मजुरांच्या जबान्या खऱ्या मानणारे मॅजिस्ट्रेटहि थोडेच असतात. मजुराचा कायदा कडक, मूर्खपणाचा व अमानुष आहे. कामांत खंड करणाऱ्या गुन्ह्यास सक्तमजुरीची कैद होते, हेंच काय पण दयार्द्रबुद्धीनें अशा मजुरास आश्रय देणारांस सुद्धां तशीच शिक्षा देतात.

**मजुरभरती व मजुरभरत्ये**—जेव्हां मजुरभरती करतात त्यावेळीं कामाबद्दल व मजुरीबद्दल खरी माहिती मजुरांनां देत नाहींत. प्रथम मोठमोठीं आश्वासनें देतात. सुतार व एंजिनवाले यांची गोष्ट तर राहो, पण चांगले सुशिक्षित लोक, शिक्षक, कारकून, असले लोक देखील मजुरभरत्यांनीं भुलवून नेलेले आहेत. यावरून अत्यंत खोट्या थापा देऊन हें भरतीचें काम चालतें हें चांगलें सिद्ध होतें.

चहा व कोको यांच्या मळेवाल्याकडून एकेका मजुरामागें पांच रुपये व रबरमळेवाल्याकडून १० रुपये या मजुरभरत्याला मिळतात.

सिलोनसरकारनें हिंदी मजुरांच्या स्थितीची चौकशी करण्याकरितां नेमलेल्या कमिशनपुढील साक्षींत एका सुपरिंटेंडेंटनें असें कबूल केलें कीं, दर मजुरामागें १० रुपये देण्यांत येऊन ते रुपये पुन्हां मजुराच्या नांवें टाकतात !

आणखी या मजुरभरतीच्या फीशिवाय या कंपन्यांनां दर मजुरामागें दररोज १ आणा मिळतो. उ०, ज्या दिवशीं शंभर मजूर कामावर असतील त्या दिवशीं कंपनीला ६ रुपये मिळतात. आणि याखेरीज यांनां चांगले पगार मिळतात ते वेगळेच.

**मजुरांची नीतिमत्ता शिक्षण वगैरे**—मी स्वतः हिंदी इसमच पडलों, तेव्हां या प्रश्नासंबंधानें लिहिण्यास मला अत्यंत शरम वाटते. हा नीतिमत्तेचा प्रश्न हें मुदतबंदीच्या मजूरपद्धतींत अत्यंत तीक्ष्ण शल्य होय. मजुरांची नीति विघडण्याचें मुख्य कारण हें आहे कीं, पुरुषमजुरांच्या मानानें स्त्रीमजुरांची संख्या फार कमी असते. मजुरांमध्यें अनीतीचा गोंधळ फारच चालू असतो. मजुरांच्या बायकांनां व मुलींनां या बाबतींत सुपरिंटेंडेंट व कंपनी यांची दया भाकणें नेहमीं भाग पडतें ! !

मजुरांच्या व त्यांच्या मुलांच्या शिक्षणाकरितां फारच थोड्या मळ्यांत शाळा काढलेल्या आहेत. बहुतेक मळ्यांत त्या नाहींतच.

हिंदुस्थानांत परत कायम राहण्यास येणारे मजूर विरळाच, हें पूर्वी सांगितलेंच आहे. जेव्हां कोणा मजुरास हिंदुस्थानांत परत येणें असेल तेव्हां आपली बायको किंवा मुलें त्याला तेथें ओलीस ठेवावीं लागतात; आणि याप्रमाणें पुरेशी जामिनकी दिल्यावांचून आपल्या घराला परत येण्याचें त्यानें स्वप्नांतहि आणण्यास नको.

याप्रमाणें सिलोनमधील हिंदी मजुरांच्या दुःस्थितीची हकीकत आहे.

एका मद्रासी मनुष्यानें स्वतः वस्तुस्थिति पाहून लिहिलेली ही हकीकत वाचली असतां आपल्या अगदीं जवळ काय चाललें आहे याची कल्पना येईल. ही हकीकत १९१७ मध्यें प्रसिद्ध झाली व ती १९१६ सालच्या स्थितीसंबंधानें असावी. सरकारनें करारबंद मजूर पाठविण्याची पद्धत बंद केली आहे. तथापि तेवढ्यानें सर्व प्रश्नांचा निकाल लागणार नाहीं. कोणत्याहि संस्थेंत असलेली पद्धति एकदम मोडत नाहीं यासाठीं करारबंद मजुरांच्या पद्धतीकडे लक्ष असलेंच पाहिजे. ही पद्धति मद्रास इलाख्यांत मुख्यतः भोंवते; तथापि सांनिध्यानें मुंबई इलाख्यावरहि तिचा परिणाम होतोच. १९१३ सालीं सिलोनच्या मजुरांच्यामध्यें सांपडलेल्या एका महाराष्ट्रीय गृहस्थाचें पत्र केसरींत प्रसिद्ध झालें होतें, व त्या वेळेस नामदार परांजपे ह्यांनीं या पत्राविषयीं मुंबई सरकारला प्रश्नहि विचारला होता.

हे मजूर बरेचसे सिंहलद्वीपांत कायमचे रहिवासी बनतात व याकरतां तेथील सर्व हिंदूंचा जीवनक्रम आपणांस लक्षांत ठेवला पाहिजे.

सिंहलद्वीपाचें हिंदीभवन अधिकाधिक व्हावें अगर न व्हावें हा आपल्या राष्ट्रांतील लोकांच्या इच्छेचा प्रश्न आहे. जर आपल्या देशांतील ब्राह्मण सिंहलद्वीपांत अधिकाधिक जाऊं लागले आणि सिंहली संस्कृतीचा उद्धार म्हणजेच हिंदुस्थानीय संस्कृतीचा प्रसार करण्यासाठीं धडपडूं लागले, तर त्यांस अनुयायी मिळण्यास अडचण पडणार नाहीं. बौद्ध संप्रदायानें

कोणत्याहि देशांत अगोदर जावें आणि कनिष्ठ प्रकारच्या हिंदी संस्कृतीचा प्रसार करावा आणि तदनंतर ब्राह्मणांनीं जाऊन तेथें त्या लोकांमध्यें उच्च तऱ्हेच्या ब्राह्मण्याचा प्रसार करावा ही पूर्वापार रीति आहे. त्या रीतीचें प्रवर्तन हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील बौद्ध भागांत अजून बंद पडलें नाहीं. ब्राह्मण्य अजूनहि वृद्धिंगत होत आहे. संस्कृतभाषासंभव संस्कृतीचा प्रसार सिंहलद्वीपांत करण्यास लागणारे ब्राह्मण विशेष प्रकारचे पाहिजेत. संस्कृत व इंग्रजी भाषा जाणणारे आमच्या मुंबई युनिव्हर्सिटीचे कांहीं उत्साही पदवीधर सिंहलद्वीपांत जाऊन तेथें सिंहली भाषा शिकून हिंदुस्थानचा इतिहास, हिंदुस्थानीय ग्रंथ व त्यांत सांठवलेलें ज्ञान यांचा प्रसार करूं लागले तर कार्य होण्यासारखें आहे. बुद्धाविषयीं आणि बौद्धांविषयीं व त्यांच्या खाद्यपेयादि आचाराविषयीं त्यांनीं मनांत विकल्प ठेवूं नये; तथापि बुद्धास देव बनविण्याचें कारण नाहीं. संस्कृतसंभव ज्ञानाचा प्रसार करण्यांत सिंहली लोकांची देखील त्यांस सहानुभूति मिळेल.

'दि सिलोनीज' या दैनिकाचे संपादक मि. मार्टिनस यांनीं डॉ० केतकर यांस आपला एक निरोप देशबांधवांस कळविण्यास सांगितला आहे. मार्टिनस म्हणतातः—

"जे सुशिक्षित हिंदुस्थानी लोक आमच्या देशास येतात त्यांनीं आपल्या आगमनाचें वृत्त कृपा करून कोणतरी वर्तमानपत्रकारास कळवावें. त्यांच्या संबंधानें आम्हांस (सिंहली पत्रकारांस) काय महत्त्व असणार हा विचार त्यांनीं मनांत सुद्धां आणूं नये. हिंदुस्थानांत काय चाललें आहे याविषयीं जागरूक राहण्याची आमची फार इच्छा आहे; आणि हिंदुस्थानांतून जे लोक इकडे देश पहाण्यासाठीं येतील त्यांस भेटण्यांत आम्हांस आल्हाद वाटतो. सिलोन हें हिंदुस्थानच आहे असें समजावें. तें जरी भूगोललेखकांच्या दृष्टीनें नसलें तरी अन्तःकरणानें हिंदुस्थानच आहे. पुष्कळ प्रमुख हिंदुस्थानीय या द्वीपांत येतात आणि गर्दीगर्दीनें परत जातात. ते आल्या गेल्याची वातमी देखील आम्हांस लागत नाहीं. यासाठीं जर हिंदुस्थानीय मंडळी आपल्या आगमनाचें वृत्त आम्हांस कळवितील, तर आम्ही सिलोनी पत्रकार त्यांचे आभारी होऊं." असो.

सिंहलद्वीपाचा व आपला परिचय अधिक चांगला व्हावा म्हणून आपण आतां या द्वीपाच्या ऐतिहासिक वर्णनाकडे वळूं.

**सिलोनचा इतिहासः**—सिलोनबेट टॅप्रोबेन या नांवानें ग्रीक व रोमन लोकांनां माहीत होतें; व नंतर सेरेंदिप, सिरिंद्युइल व झेइलन या नांवांनीं पाश्चात्य व पौरस्त्य देशांतील लेखक त्याचा उल्लेख करीत असत. सेरेंदिप हें संस्कृत 'सिंहलद्वीप' याचें अपभ्रष्ट रूप आहे. भारतीय ग्रंथांत सिंहलद्वीप हा शब्द रत्नावली इत्यादि ग्रंथांत वापरला आहे आणि लंका हा शब्द पूर्वीपासून अधिक परिचित आहे. इतर पौरस्त्य देशांतल्याप्रमाणें सिलोनमध्यें जुन्या लेखांचा सांठा मोठा आहे; पण त्यांत खऱ्या गोष्टी व काल्पनिक गोष्टी यांचा गोंधळ केलेला असल्यामुळें त्यांतून ऐतिहासिक व काल्पनिक गोष्टींचा निर्णय करणें कठिण आहे. जार्ज टर्नरनें (१७९९-१८४३) परिश्रमपूर्वक हा गोंधळ दूर केलेला आहे, व त्याच्या महावंश या ग्रंथाच्या आवृत्तीमुळें सिंहली इतिहासाची सामान्य रूपरेषा ठरविण्यास चांगली मदत झाली आहे.

सिंहली शिलालेखांकडे प्रथम जार्ज टर्नरनें लोकांचें लक्ष वेधिलें. सर वुइल्यम ग्रेगरी यांच्या परिश्रमांमुळें या शिलालेखांच्या शुद्ध नकला होऊन भाषांतरहि होऊं लागलें. यांत इ. पू० २ ऱ्या शतकापासूनचे शिलालेख आहेत. यांत सर्वांत जुने लेख म्हणजे अनुराधपूर येथील वेस्सागिरी विहारांतील खडकांतील गुहांतले होत; ते जुन्या ब्राह्मीलिपींत लिहिलेले आहेत. या लेखांवरून सिंहलांत बौद्ध भिक्षू किती प्रबळ होते व राज्यकारभार व लोकांचा जीवनक्रम यांवर त्यांची केवढी छाप असे, हें स्पष्ट दिसतें. या लेखांतील राजांचे हुकुम बहुतेक या बौद्ध भिक्षूंचे हक्क अबाधित राखण्याकरतां सुटलेले आहेत. कांहीं थोडेसे राजकीय कारभाराबद्दलचे आहेत; उ०, ५ वा कस्सप याचा शिलालेख (इ० स० ९२९-९३९). ४ था महिंद (इ० स० ९७५-९९१) याच्या एका शासनांत सिंहली रक्षादैवत असलेल्या बुद्धाच्या प्रसिद्ध दन्तावशेषाचा उल्लेख आहे. हा दन्तावशेष हल्लीं कँडी येथील देवालयांत आहे. सदरील आज्ञालेखावरून अनुराधपुरांतील थुपरामाच्या पूर्वेकडील एका सुंदर दगडी देवालयांत कीर्तिश्री मेघवर्ण याच्या कारकीर्दीत (इ० स० ३०४-३२४) कलिंगाहून हा दंतावशेष आणून ठेवला अशी जी परंपरागत जनकथा आहे तिला पुष्टि मिळते.

सिलोनमधील मूळचे रहिवासी म्हणजे पूर्वेकडील अरण्यांत राहणाऱ्या आजच्या वेद्द नांवाच्या वन्य लोकांचे पूर्वज असावे; आणि तेथील गुहांमध्यें सांपडलेल्या कित्येक प्राचीन दगडी हत्यारांवरून असें दिसतें कीं, या जातीचे हे लोक या बेटांत फार प्राचीन कालापासून राहत असावे.

**भारतीय संस्कृतीचें वर्चस्वः**—त्यानंतर या बेटांत जाऊन राहिलेल्या लोकांबद्दल महाकाव्य जें रामायण त्यांत माहिती मिळते, ती अशी कीं, रावण नांवाच्या तेथील राजाची राजधानी राम नांवाच्या वीरानें आपल्या अनुयायांच्या मदतीनें जिंकून घेतली. ही माहिती कमी महत्त्वाची समजून सिलोनच्या अर्वाचीन इतिहासाला आरंभ इ० स० पू० ५४३ पासून होतो, असें पाश्चात्य शोधक समजतात. त्या सालीं विजय नांवाचा सिंहली राजघराण्याचा मूळपुरुष आपल्या आर्यन् भाषा बोलणाऱ्या अनुयायांसह हिंदुस्थानांतून निघून सिलोनांत जाऊन उतरला. तेथें विजयानें एका तद्देशीय

पुढाऱ्याच्या मुलीबरोबर विवाह करून त्याच्या मदतीनें त्यानें सर्व बेट जिंकून घेतलें व तें आपल्या अनुयायांत वांटून तेथें लहान लहान राज्यें बनविलीं. यानंतर हिंदुस्थानांतील शेतकी वगैरे बरीच सुधारणा सिंहली लोकांनीं आपल्या बेटांत आणली. विजयाच्या नंतरच्या राजानें इ० स० पू० ५०४ चे सुमारास अनुराधापुरानजीक एक मोठा तलाव बांधून कालवे काढले; व त्याच सुमारास हल्लीं बऱ्याच भागांत प्रचलित असलेली ग्रामसंस्थापद्धति सुरू केली.

पाश्चात्य पंडितांचें मत असें आहे कीं, ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकाच्या पूर्वीं येथें फारशी लोकवस्ती नसून विजयाबरोबर आलेल्या लोकवस्तीनें या द्वीपाच्या वसाहतीस खरी सुरुवात झाली असावी. रामायणकालींच येथें बरीचशी लोकवस्ती असावी हें आम्हांस अधिक संभवनीय वाटतें. या विधानास साधक अशीं कारणें आम्ही पुढें देणार आहों.

इ. पू. ३ ऱ्या शतकाच्या आरंभीं बौद्ध सार्वभौम अशोक राजा याचा मुलगा महिंद याच्या उपदेशानें सिलोनमधील लोक बौद्धधर्मी बनले; व त्यानंतर तेथें दाघोवा नांवाच्या चमत्कारिक घंटेच्या आकाराच्या कठिण दगडाच्या अस्थिपेटिका व बौद्ध मठ असंख्य निर्माण झाले. बाकी राहिलेला सिलोनच्या प्राचीन इतिहासाचा भाग मलबारी अथवा तामिळ लोकांच्या स्वाऱ्या, त्यांनीं जिंकलेले प्रांत व अन्यायानें बळकावलेलीं राज्यें यांच्या कंटाळवाण्या हकिकतींनीं भरलेला आहे. असल्या राज्यापहाराचें पहिलें उदाहरण इ. पू० २३७ मध्यें घडलें. या वेळीं सैन्याच्या व आरमाराच्या अशा दोन मुख्य अधिकाऱ्यांनीं तक्ताधीश सिंहली राजाला त्याच्याच तामिळ पगारी सैनिकांच्या मदतीनें पदच्युत करून दोघांनीं मिळून इ. पू० २१५ पर्यंत पहिला सेन व गुत्तिक या नांवांनीं समाइक राज्य केलें. त्यानंतर इ. पू० २०५ पर्यंत सिंहली असेल राजानें राज्य केलें; त्या सालीं तंजावर येथील इलाल नांवाच्या तामिळ वीरानें त्याला पदच्युत करून स्वतः ४४ वर्षे राज्य केलें. इ. पू० १६१ मध्यें इलालचा दुतेगेमुनूनें पराभव करून त्याला ठार मारलें. दुतेगेमुनूची अद्यापहि मोठा सिंहली वीर म्हणून प्रसिद्धि आहे. अनुराधपुरांतील पितळी राजवाडा नांवाच्या मठाचे अवशेष त्याच्या ऐश्वर्याचें व धार्मिक वृत्तीचें स्मरण करून देण्यास अद्याप उभे आहेत. त्याच्यानंतर इ. पू० १३७ पासूनचा इतिहास तामिळ लोकांच्या स्वाऱ्या, कालव्यांचीं कामें व बौद्ध मठसंस्थेचा प्रसार यांनीं भरलेला आहे. या इतिहासांत विशेष सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे सिगिरी येथील सुप्रसिद्ध अवशेषभूत खडक व तलाव यांच्या संबंधाची इ० स. ५ व्या शतकांतील राजघराण्यांतील एक शोकजनक कथा होय. ही कथा अशी आहे. इ. स. ४७७ मध्यें दतुसेनराजाचा मुलगा आपल्या बापाला ठार मारून १ ला काश्यप या नांवानें राजा झाला, पण खुनामुळें चवताळलेल्या लोकांनीं त्याला हांकून दिलें; तेव्हां त्यानें या सिगिरीच्या खडकावर किल्ला बांधून ४९५ पर्यंत राज्य केलें; या सालीं बापाच्या खुनामुळें हिंदुस्थानांत पळून गेलेल्या त्याच्या मुगल्लन नांवाच्या भावानें त्याचा पराभव करून त्याला ठार मारलें.

१० व्या शतकाच्या अखेरीस चोळ राजा राजराज यानें सिलोनवर स्वारी केली, आणि बऱ्याच लढायांनंतर सिलोन बेट १००५ मध्यें आपल्या साम्राज्यास जोडून टाकलें. तथापि या तामिळ सत्तेखालीं सिलोन फार वर्षे टिकलें नाहीं. १०७१ मध्येंच विजयबाहूनें सिंहली घराण्याचें राज्य पुन्हां प्रस्थापित केलें. यानंतर कांहीं काळ सिलोनला परकीयांपासून त्रास झाला नाहीं. विजयबाहूच्या वंशजांपैकीं व एकंदर सिंहली राजांमध्येंहि अत्यंत श्रेष्ठ असा पहिला पराक्रमबाहु नांवाचा राजा (११५५–११८०) होऊन गेला; त्याचा एक भव्य पुतळा पोलोन्नरुव येथें आहे. सिलोनमध्यें अपूर्व शांतता नांदत होती तिचा फायदा घेऊन त्यानें कालवे, तलाव व मठ वगैरे बांधले, इतकेंच नव्हे तर, त्यावेळीं मदुरा येथील पांड्य घराण्यामध्यें गादीबद्दल चाललेल्या एका तंट्याची संधि साधून आपल्या तामिळ शत्रूचें मागील उट्टें काढण्याकरितां त्यानें हिंदुस्थानांत स्वारी केली. महावंशांतील वर्णनावरून पाहतां त्याच्या सेनापतींनां तावडतोब व पूर्ण जय मिळाला असें दिसतें; परंतु कांचीजवळच्या अर्पक्कम येथील एका चोळांच्या मोठ्या शिलालेखावरून असें दिसतें कीं, जरी त्याच्या सैन्याला प्रथम जय मिळाला होता तरी शेवटीं दक्षिणहिंदुस्थानांतील सर्व राजांनीं एक होऊन त्याच्या सैन्याला हांकून लाविलें. कांहीं असलें तरी इतकें खरें कीं, पराक्रमबाहूच्या मरणोत्तर तीस वर्षांतच त्यानें बसवलेली घडी सर्व विसकटली, आणि मलबारी लोकांनीं पुन्हां सिलोनांत पाय रोंवला व त्यामुळें राजधानी दक्षिणेकडे जातां जातां शेवटीं १४१० मध्यें कोलंबोच्या कोट्टे नांवाच्या उपांतभागांत ती स्थापन झाली. १४०८ मध्यें सिंहली घराण्यावर आणखी एक संकट ओढवलें; एका चिनी वकिलाचा तेथें अपमान झाल्याच्या निमित्तानें चिनी सैन्यानें बेटावर स्वारी करून ४ थ्या पराक्रमबाहु राजाला कैद करून नेलें. यानंतर तीस वर्षे सिंहली राजे चीनचे मांडलिक बनलेले होते.

**पाश्चात्यांचा स्पर्श व कबजाः**—१५०५ मध्यें फ्रांसिस्को डी आल्मीडा हा पोर्तुगीज इसम सिलोनांत उतरला, तेव्हां त्याला त्या बेटांत सात निरनिराळीं राज्यें असल्याचें आढळलें. नंतर बारा वर्षांनीं गोव्याच्या व्हाइसरायानें कोलंबो येथें एक किल्ला बांधण्याचा हुकुम दिला व त्याकरितां कोट्टेच्या राजाकडून परवानगी मिळविण्यांत आली. या काळापासून पुढें १७ व्या शतकांत डच लोक तेथें पाय ठेवीपर्यंत पोर्तुगीज लोकांनीं तद्देशीय राजे व यूरोपियन व्यापाऱ्यांच्या चढाओढीमुळें चिडून जाऊन त्या राजांनां मदत करणारे अरब लोक यांच्याबरोबर लढाया चालू ठेवून आपली सत्ता त्या बेटांत प्रस्थापित करण्याचा दीर्घ

प्रयत्न चालविला होता. या प्रयत्नानें शेवटीं किनाऱ्यावर त्यांची सत्ता स्थापित झाली, परंतु बेटाच्या अन्तर्भागांत त्यांचा अम्मल बसला नाहीं. या खटपटीचा प्रत्यक्ष फायदा असा त्यांनां अगदींच अल्प झाला, कारण बेटांतील व्यापार मुळांतच किरकोळ होता. पण सत्तेमुळें सेंट फ्रॅंसिस झेवियर या प्रसिद्ध मिशनऱ्याचें व इतरांचें कॅथॉलिकधर्मप्रसाराचें काम मोठ्या जोरांत चाललें; आणि त्याबद्दलची धार्मिक दृष्टीनें कृतकृत्यता पोर्तुगीजांनां वाटूं लागली.

पोर्तुगीज लोकांच्या या धर्मप्रसाराच्या वेडामुळें व तद्देशीय राजांबरोबर वागण्याच्या त्यांच्या मोठ्या अरेरावीच्या धोरणामुळें तेथील राजांशीं त्यांचें नेहमीं वांकडें असे; आणि यामुळें पुढें १६०२ मध्यें जेव्हां अॅडमिरल स्पिलबर्गच्या नेतृत्वाखालीं डच लोक त्या बेटांत येऊन उतरले आणि तेथील अन्तर्भागांतल्या कँडी येथील राजाबरोबर स्नेह करण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला, तेव्हां त्यांनीं पोर्तुगीज लोकांनां पार हांकलून लावण्याच्या कामीं मदत करावी म्हणून सर्व प्रकारचें आमिष कँडीच्या राजानें व इतरांनीं त्यांस दाखविलें. परंतु अशा खटपटींचा १६३८–१६३९ पर्यंत कांहीं एक परिणाम झाल्याचें दिसून येत नाहीं. त्या सालीं दुसऱ्या एका डच तुकडीनें हल्ला करून किनाऱ्यावरील पोर्तुगीज लोकांचे किल्ले सर्व जमीनदोस्त करून टाकले. पुढल्या वर्षी डच लोक नेगोंबो येथें उतरले, परंतु तेथें त्यांनां कायमचें बळकट ठाणें स्थापन करतां आलें नाहीं. १६४४ मध्यें त्यांनीं नेगोंबो काबीज केलें, व तेथें चांगली मजबूत तटबंदी केली; नंतर १६५६ मध्यें त्यांनीं कोलंबो हस्तगत केलें; आणि शेवटीं १६५८ मध्यें सिलोनमधील पोर्तुगीज लोकांचें शेवटचें ठाणें जें जाफना तें घेऊन त्यांनां समूळ हांकून दिलें.

डच लोकांनीं आपल्यापूर्वीच्या पोर्तुगीज लोकांपेक्षां अधिक शहाणपणाचें धोरण स्वीकारून आपल्या वर्चस्वाखालच्या मुलखांत सुधारणा करण्याची व अंतर्भागावरोबर व्यापार सुरू करण्याची संधि बिलकुल दवडली नाहीं. पोर्तुगीज लोकांपेक्षां अधिक सहिष्णुता दाखवून व आपल्या मोठेपणाचें स्तोम फारसें न माजवितां डच लोकांनीं तद्देशीय राजांनां आदर दाखवून त्यांनां खूप चढविलें व राजकीय गोष्टींपेक्षां व्यापारी गोष्टींनां अधिक महत्त्व दिलें, त्यामुळें त्यांचा उद्देश सफल होऊन त्या बेटावरोबरच्या व्यापारांत हालंडला चांगलाच फायदा होऊं लागला. पुष्कळ नवे नवे धंदे निघाले. शिवाय त्यांनीं सार्वजनिक उपयोगाचीं कामें केलीं, व समुद्रालगतच्या प्रांतांत शिक्षणहि सार्वत्रिक नाहीं तरी सरकारी देखरेखीखालीं बरेंच काळजीपूर्वक चालू केलें. तथापि चाणाक्ष धोरणानें इतकी सुधारणा केलेल्या या मुलखाचें, ब्रिटिश लोकांनीं त्यांच्यावर शस्त्र उगारलें तेव्हां संरक्षण करण्याचें सेनासामर्थ्य त्यांच्याजवळ नव्हतें. एकदीड शतकामध्यें या डच वसाहतवाल्यांच्या शारीरिक व मानसिक स्थितीमध्यें मोठाले फरक झालेले होते. १६५८ मध्यें एवढ्या अप्रतिहत शौर्यानें व चिकाटीनें जो मुलुख त्यांनीं जिंकला होता तोच मुलुख १७९६ मध्यें त्यांच्यांतील कमकुवतपणामुळें व भ्याडपणामुळें त्यांच्या हातून भराभर नाहींसा झाला. इंग्लिशांचा सिलोनशीं संबंध १७६३ मध्यें प्रथम आला; त्यासालीं मद्रासेहून क्यांडीच्या राजाकडे एक वकीलमंडळ पाठविण्यांत आलें होतें; पण त्यावेळीं त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. पुढें १७९५ मध्यें ग्रेटब्रिटन व हालंड यांच्यामध्यें खटका उडाला तेव्हां सिलोनांतील डच मुलखावर सैन्य पाठविण्यांत आलें. त्यावेळीं डच लोकांनीं इतका क्षुल्लक प्रतिकार केला कीं, एका वर्षांतच डचांचे सर्व किल्ले इंग्लिश सेनापतीच्या हातीं पडले.

सिलोनमध्यें पोर्तुगीज व डच यांच्या अंमलापासून जे टिकाऊ परिणाम झाले त्यांचें सर इमर्सन टेनेंटनें वर्णन केलेलें आहे तें असें:—

सिलोनमध्यें नेदर्लंडचें वर्चस्व व पोर्तुगालचें वर्चस्व बहुतेक सारखाच काळ म्हणजे १४० वर्षे होतें. परंतु या दोन देशांच्या धोरणांचे सिंहली लोकांच्या स्वभावावर व संस्थांवर जे परिणाम झालेले आहेत ते मात्र फार भिन्न आहेत. उपयुक्ततेच्या बुद्धीनें हॉलंडनें तेथें जो रोमन–डच कायदा सुरू केला तो अद्यापहि वरिष्ठ न्यायकोर्टांतून चालू आहे; आणि पोर्तुगीज लोकांच्या धर्मप्रसाराच्या वेडामुळें तेथें जो रोमन कॅथॉलिक धर्म सुरू झाला त्याचा कायमचा व वाढता परिणाम अद्याप दिसून येत आहे. हा कॅथॉलिक धर्म फ्रॅन्सिस्कन धर्मोपदेशकांनीं ज्या खेड्यांतून व प्रांतांतून सुरू केला तेथें तो अद्याप चांगल्या स्थितींत आहे; उलट हॉलंडनें आपलीं प्रॉटेस्टंट धर्ममतें आपल्या तटबंदी ठाण्यांच्या बाहेर पसरविलीं नाहींत, यामुळें आज तो धर्मपंथ बहुतेक लुप्त होऊन गेला आहे. फक्त कोलंबोमध्यें तत्पंथी थोडासा समाज असून तोहि दरदिवशीं कमी कमी होत आहे. डच भाषेचा कायद्याच्या जोरावर प्रसार करण्यांत आला होता, पण ती डच लोकांचे वंशजहि आज तेथें बोलत नाहींत; उलट प्रत्येक महत्त्वाच्या गांवांत खालच्या वर्गाच्या लोकांत अपभ्रष्ट पोर्तुगीज भाषा अद्यापहि चालू आहे. नेदर्लंडच्या व्यवहारदक्ष व लोभी सरकारनें फक्त आपल्या व्यापारी हिताच्या दृष्टीनें जरूर इतकेंच लक्ष तद्देशीयांच्या हिताकडे दिलें असल्यामुळें त्यांच्या अंमलाची आठवण सुखासमाधानें कोणीच आज काढीत नाहींत; उलट पोर्तुगीज लोक समानधर्मत्वानें तद्देशीयांशीं अगदीं एकजीव झाल्यामुळें त्यांच्या क्रूर कृत्यांपेक्षां, कांडियन लोकांवरोबरच्या झगड्यांमध्यें त्यांनीं प्रकट केलेल्या शौर्याबद्दल आणि वेढा पडलेल्या किल्ल्यांचें संरक्षण करण्याच्या प्रयत्नांत त्यांनीं दाखविलेल्या साहसाबद्दल ते प्रयत्न निष्फळ झाले तरीहि तद्देशीयांनां अद्यापहि एक प्रकारचें कौतुक वाटत आहे. सखल प्रदेशांतील सिंहली लोक

डच व त्यांचा कारभार यांची आठवणहि बहुतेक विसरून गेलेले आहेत. उलट दक्षिणेकडील व पश्चिमेकडील मुलुखांतल्या सरदारांनीं मोठ्या अभिमानानें त्यांच्या पहिल्या यूरोपीय नेत्यांनीं त्यांनां दिलेली डॉन ही बहुमानासद पदवी अद्यापि चालू ठेविलेली आहे व आपल्या प्राचीन नांवांपूर्वी पोर्तुगीज लोकांतील कर्णमधुर ख्रिस्ती नांवेंहि ते जोडीत असतात.

ज्या ब्रिटिश फौजेनें सिलोन बेट प्रथम जिंकून घेतलें ती फौज ईस्टइंडिया कंपनीची होती व म्हणूनच सिलोनचा कारभार प्रथम कंपनीकडे असून तो मद्रासहून चालत असे. परंतु मद्रासकडील जमीनमहसूलपद्धत तिकडे सुरू केल्यामुळें व बरेच मलबारी कलेक्टर तिकडे नेमल्यामुळें तेथें असंतोष माजला व शेवटीं बंड झालें; त्यामुळें १७९८ मध्यें तें बेट खुद्द ब्रिटिश बादशाही अंमलाखालीं घेण्यांत आलें. १८०३ मध्यें आमीन्सच्या तहानें या बेटांतील डच मुलुखाचा कायदेशीर तावा ग्रेटब्रिटनला देऊन अंतर्राष्ट्रीय कायद्याच्या दृष्टीनें ग्रेटब्रिटनच्या सिलोनमधील अधिकारांत जें वैगुण्य होतें तें दूर केलें. कांहीं काळपावेतों ब्रिटिश सत्ता फक्त किनाऱ्याच्या प्रदेशांतच चालत होती. मध्यभागांतला डोंगराळ प्रदेश दुर्गम अरण्यांनीं व उभ्या पर्वताच्या रांगांनीं व्याप्त होता व तो सिंहली घराण्यांतला शेवटचा राजा श्रीविक्रमराजसिंह याच्या ताब्यांत होता. हा आपल्या प्रजेला यूरोपीय शेजाऱ्यांशीं दळणवळण ठेवण्याला मुळींच उत्तेजन देत नसे. १८०३ मध्यें कांहीं किरकोळ कारणावरून कँडियन मुलखावर ब्रिटिशांनीं स्वारी केली, पण त्यांचा पराजय झाला. पुढें त्या राजाच्या क्रूरपणामुळें व छळामुळें लोकांत राजद्रोह माजला; राजद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल भयंकर शिक्षा देण्यांत आल्यामुळें लोकांचा क्रोध अनावर झाला, आणि या क्रोधामुळें १८१५ मध्यें आदिगार व इतर तद्देशीय सरदारांनीं ब्रिटिशांनां बोलाविलें. या बोलवण्यावरून ब्रिटिश फौजेनें या राजावर चालून जाऊन कँडीनजीक त्याला कैद केलें. पुढें हा राजा हद्दपार होऊन तो हद्दपारींतच मरण पावला. याप्रमाणें सिंहली राजघराण्यांतल्या शेवटल्या राजाचा अंत झाला. हें घराणें दोन हजार वर्षांवर सिलोनमध्यें राज्य करीत होतें.

१८१५ मार्च २ रोजीं कँडियन सरदारांशीं एक तह करण्यांत आला. त्याअन्वयें त्या बेटाची संपूर्ण सत्ता ब्रिटिशांच्या हातांत आली; व ब्रिटिशांकडून लोकांनां धार्मिक व सामाजिक स्वातंत्र्य कायम राखण्याबद्दलची हमी देण्यांत आली. बौद्ध संप्रदायाच्या बाबतींत बिलकुल हात घालणार नाहीं; त्यांतील धार्मिक हक्क, उपदेशक वर्ग व देवालयें यांचें संरक्षण करूं; देशांत पूर्वीचे कायदेकानू चालू ठेवून त्यांची पूर्वापार पद्धतीनेंच अम्मलबजावणी करूं; तसेंच राज्यकारभार चालविण्याकरतां पूर्वींप्रमाणेंच जमीनमहसूल व इतर कर वसूल करूं, असें याच वेळीं जाहीर करण्यांत आलें. पुढें १८१७ मध्यें अन्तर्भागांत एक मोठें बंड झालें, हें एक वर्षांनें मोडण्यांत आलें. १८४३ मध्यें एक व १८४८ मध्यें एक अशीं दोन किरकोळ बंडें झालीं, तीं दोन्हीं सहज मोडून टाकण्यांत आलीं. हे अपवाद वगळतां सिंहली राजाला काढून लावल्यापासून सिलोन येथील राजकीय वातावरण अगदीं प्रशांत राहिलेलें आहे. असो.

येथें सिंहलाच्या इतिहासाची रजा घेऊन त्याच्या वाङ्मयाकडे नजर फेंकूं आणि सिंहली वाङ्मयाचें अवलोकन झाल्यावर सिंहली भाषेचा व तिच्या विकासाचा परिचय करून घेऊं.

**सिंहली वाङ्मयः**—पाली आणि सिंहली यांच्या अन्योन्याश्रयामुळें पाली वाङ्मयाइतकें नसलें तरी बरेंचसें महत्त्व सिंहली वाङ्मयास आहे. सर्व हिंदुस्थानभर अशी एक प्रवृत्ति आहे कीं, पुष्कळदां महत्त्वाचे ग्रंथ किंवा विचार देशी भाषेंत व्यक्त होतात तथापि त्यांस सार्वत्रिकता येते ती संस्कृत भाषेमुळें येते. बौद्ध संप्रदायास हिंदुस्थानांत येऊं लागलेलें महत्त्व त्या संप्रदायाच्या संस्कृत ग्रंथप्रवाहाच्या चढउतारानें मोजतां येण्याजोगें आहे. देश्यभाषा आणि संस्कृतभाषा यांचा जो संबंध आहे तोच संबंध सिंहली भाषा व संस्कृत यांचा आहे. तथापि ज्या अनेक प्रदेशांत पाली भाषा बौद्ध संप्रदायाबरोबर पसरली त्याबरोबर संस्कृत व प्राकृत यांमध्यें दिसून येणारा अन्योन्याश्रय पाली व देश्यभाषा यांमध्येंहि दृग्गोचर होऊं लागला. सिंहली वाङ्मयाचें पृथक्करण करितांना सिंहलांतील निरनिराळ्या भाषांतील वाङ्मयें व त्यांचे परस्परसंबंध आणि सर्व वाङ्मयें मिळून होणारें जें द्वीपवाङ्मय त्याचा द्वीपस्थांच्या सामुच्चयिक आयुष्याशीं संबंध हे तपासले पाहिजेत.

द्वीपाचें वाङ्मय तपासतांना वाङ्मयाचे खालील थर लक्षांत घेतले पाहिजेत.

(१) सिंहलद्वीपस्थांनीं दुसरीकडून उचललेलें आणि त्यांच्या वापरण्यांत असलेलें संस्कृत, पाली व तामिळ वाङ्मय.

(२) सिंहलद्वीपांत तयार झालेलें संस्कृत वाङ्मय.

(३) सिंहलद्वीपांत तयार झालेलें पाली वाङ्मय.

(४) सिंहलद्वीपांत तयार झालेलें सिंहली वाङ्मय.

(५) सिंहलद्वीपांतील तामिळ वाङ्मय.

(६) सिंहलद्वीपांतील मुसुलमानी वाङ्मय.

(७) सिंहलद्वीपांतील इंग्रजी वाङ्मय.

यांचा परस्परांशीं संबंध, भारतीय संस्कृतीला पोषक अशा सर्व वाङ्मयाशीं संबंध आणि द्वीपस्थांच्या सामुच्चयिक आयुष्याशीं संबंध हे सर्व आपणांस ज्ञातव्य आहेत.

सिंहलद्वीपांतील तामिळ, मुसुलमानी आणि इंग्रजी वाङ्मयांनां हिंदुस्थान आणि जग यांच्या प्राचीनकालीं स्थापित झालेल्या संबंधाच्या इतिहासांत स्थान नाहीं म्हणून वर सांगितल्यापैकीं पहिले चारच थर विचारांत घेतों. भारतीय वाङ्मय आणि द्वीपवाङ्मय यांचा संस्कृतिसंशोधनासाठीं तौलनिक अभ्यास

करतांना भारतीय वाङ्मय या समुच्चयामध्यें जे अनेक उपसमुच्चय दृष्टीस पडतात, त्यांपैकीं कोणत्या समुच्चयाशीं विवक्षित प्रकारच्या द्वीपवाङ्मयाचा संबंध आहे याचा विचार करावा. कांहीं संबंध दृष्टीस पडल्यास पुन्हां असा प्रश्न करावा कीं, हा संबंध कोणत्या प्रकारचा आहे? (अ) भारतीय वाङ्मयावर किंवा त्याच्या अंशावर द्वीपवाङ्मयाचा कांहीं परिणाम झाला आहे काय? म्हणजे प्राचीन संस्कृतींत द्वीपवाङ्मयानें काय भर टाकली? (आ) भारतीय वाङ्मय, भारतीय पारमार्थिक विचार किंवा विद्या यांच्या प्रसाराला उपयोगी असें द्वीपवाङ्मय कोणतें? (इ) सिंहली संस्कृति ही भारतीय संस्कृतीची उपसंस्कृति शोभते असें दाखविणारे द्वीपवाङ्मयावर आणि भाषेवर कोणते संस्कार झाले? (ई) सिंहलद्वीपस्थांसच विशेषतः उपयोगी आणि केवळ सिंहलविषयक अगर त्यांची तात्कालिक गरज भागविणारें असें त्यांच्या देशांतील वाङ्मय कोणतें? प्रस्तुत चार प्रश्न सिंहली भाषेचे आणि द्वीपवाङ्मयक्षेत्राचें अवलोकन करतांना लक्षांत ठेवले पाहिजेत. या प्रश्नांचीं उत्तरें सामान्यतः येणेंप्रमाणें येतील. (अ) भारतीय वाङ्मयावर सिंहली वाङ्मयाचा फारच थोडा परिणाम झाला. बौद्धांचें सांप्रदायिक वाङ्मय याला अपवाद आहे. आज बौद्धांचे पाली ग्रंथ जे उपलब्ध आहेत ते सिंहली आवृत्तीच्या द्वारेंच उपलब्ध आहेत. (आ) सिंहलद्वीपामध्यें भारतीय विद्यांच्या स्थानिक प्रसारार्थ उत्पन्न झालेलें वाङ्मय मात्र पुष्कळ आहे. (इ) हें प्रसारार्थ वाङ्मय सिंहली संस्कृती ही भारतीय संस्कृतीचा अंश आहे असें म्हणण्यास प्रवृत्त करतें. भाषेवरील संस्कार हे वाङ्मयमूलक होत पण ते अधिक काळपर्यंत टिकतात. सिंहली भाषेच्या अभ्यासास या दृष्टीनें महत्त्व कमी पण सिंहली जनतेचा भारतीयापासून विभक्त होण्याचा काळ निश्चित करण्याकडे या अभ्यासाचा उपयोग असल्यानें त्याचें महत्त्व आहे. (ई) सिंहली लोकांनीं तात्कालीक उपयोगासाठीं जें वाङ्मय निर्माण केलें तें फारच मोठें आहे.

ऐतिहासिक दृष्टीनें या चवथ्या प्रकारच्या वाङ्मयाचें महत्त्व फारसें नाहीं असें प्रथमतः वाटेल. तथापि हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, जे कांहीं वाङ्मय स्वतःपुरतें म्हणून तयार होतें त्याचा उपयोग पुष्कळदां इतरांनां होतो आणि जें वाङ्मय सार्वलौकिक हेतूनें तयार होतें तें सार्वलौकिक वाङ्मयाच्या महासागरांत बुडूनहि जातें आणि त्याच्याठायीं वैशिष्ट्यहि फारसें नसल्यानें त्याच्याकडे ऐतिहासिक संशोधकाचें चित्त वेधत नाहीं. महावंसो, दीपवंसो यांसारखे ग्रंथ त्यांच्या संप्रदायाच्या दृष्टीनें केवळ स्थानिक महत्त्वाचे म्हणून तयार केले गेले पण आज त्यांचें महत्त्व फार मोठें आहे. उत्पादकाच्या दृष्टीनें सार्वलौकिकत्व आणि भावी इतिहासकाराच्या दृष्टीनें सार्वलौकिकत्व आणि महत्त्व हीं निरनिराळीं आहेत.

सिंहलद्वीपाच्या वाङ्मयाचा ऐतिहासिक विचार करावयाचा झाल्यास आपणांस तामिल ग्रंथांपेक्षां सिंहली ग्रंथांच्या आणि तेथें झालेल्या पाली ग्रंथांच्या उद्भवाकडेसच प्रथम लक्ष दिलें पाहिजे. द्वीपांत तामिळ भाषेचा प्रवेश उत्तरकालीं झाला. त्याच्या अगोदर पाली व सिंहली वाङ्मयें निर्माण होऊं लागलीं होतीं. या उद्भवप्राथम्याच्या दृष्टीनें द्वीपवाङ्मयाचा विचार करतांना पाली व सिंहली वाङ्मयासच अग्रस्थान देणें जरूर आहे. द्वीपांतील तामिळ वाङ्मयाचा इतिहास पुढें तामिळ वाङ्मयाच्या एकंदर इतिहासाबरोबर देणार आहों. येथें पाली व सिंहली वाङ्मयाचें अवलोकन करूं.

**इ. स. १२०० पूर्वींचा काळ**—(तिपिटक, अट्ठकथा, दळदावंसकाव्य, सारत्थसंगह, विसुद्धिमग्ग, दीपवंश, महावंश, जानकी परिणयादि संस्कृत ग्रंथ, कालिदासनिधन–अग्ग–बोधिकविमंडल, दापुलशासनें, दंपिया अटुवा गाटपद सन्नय, हेर नसिक विनिस).

बौद्ध मताचा सिलोनमध्यें प्रवेश होऊन त्याचा तेथें प्रसार होऊं लागल्यावरोबर तेथील वाङ्मयाचीहि वाढ होण्यास सुरवात झाली. तिपिटक नांवाची बौद्ध लोकांची पाली भाषेंत रचलेली संहिता व अट्ठकथानामक तिपिटकावरील टीकात्मक ग्रंथ हे महिंद (ख्रिस्तपूर्व तिसरें शतक) यानें लंकेंत आणले अशी तेथील लोकांत दंतकथा आहे. असेंहि म्हणतात कीं महिंदानेंच स्वतः ह्या दोन्हीहि ग्रंथांचें सिंहलींत भाषांतर केलें. इसवी सनाच्या पांचव्या शतकांत बुद्धघोषानें हे सिंहली ग्रंथ पुन्हां पाली भाषेंत आणले. ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकांत वट्टगामनी (वलंगबाहु) राजाच्या कारकीर्दींत मूळ ग्रंथ व त्याची टीका प्रथम लिहून ठेवण्यांत आली; तोंपावेतों हे दोन्हीहि ग्रंथ मुखद्वारें एका पिढीनें दुसऱ्या पिढीस पढवूनच कायम राखण्यांत आले होते अशी सांप्रदायिक समजूत आहे.

ह्या दंतकथेंतील कांहीं भाग सत्य आहे व कांहीं भाग काल्पनिक आहे. तथापि तिजवरून एक गोष्ट मात्र उघड होते कीं, महिंदाच्या वेळीं सिलोनमधील लोक जी भाषा बोलत होते ती बौद्ध धर्मग्रंथांतील पाली भाषेहून बरीच भिन्न होती. सिंहलाकडे प्रयाण ओरिसाकडून झालें त्या अर्थी महिंदाच्या मागध भाषेशीं सिंहली भाषा महाराष्ट्रीपेक्षां देखील अधिक जवळ असावयास पाहिजे. ती महाराष्ट्रीइतकी जरी भिन्न असती तरी भाषांतर करण्याची मेहनत करावी न लागती. भाषांतराची मेहनत करावी लागली ही गोष्ट सिंहलद्वीपाचे लोक बऱ्याच प्राचीन कालीं वियुक्त झाल्याची द्योतक आहे. कांहीं पदरचे दृष्टान्त देऊन महिंदानें तेव्हांच्या सिंहली तिपिटकाचा अर्थ समजावून सांगण्याचा प्रयत्न केला असावा व अशा रीतीनें दृष्टान्तकथांचा संग्रह होऊन अट्ठकथा ग्रंथ सिंहली भाषेंत तयार झाला असावा. दीपवंश रचला गेला त्यावेळीं अट्ठकथा हा ग्रंथ अस्तित्वांत होता

यांत शंका नाहीं. बहुधा दीपवंश व महावंश ह्या दोन्हीहि ग्रंथांतील जुन्यांत जुना भाग हा अट्ठकथांतील पूर्वेतिहास-कथनावरून घेतला असावा. आणि ज्या अर्थी या दोन्ही पुस्तकांत महासेन ( इसवी सनाच्या चौथ्या शतकाचा आरंभ ) राजापावेतों इतिहास आणून पोंचविला आहे त्या अर्थी हे ग्रंथ ज्या मूळ ग्रंथावरून लिहिले त्या ग्रंथांत इतका इतिहास असला पाहिजे. म्हणजे त्या अट्ठकथांचा लेखनारंभकाल ज्यास्तींत ज्यास्ती बौद्ध धर्माचा सिलोनांतील आद्य प्रचारक जो महिंद त्याच्या पावेतों मागें जाऊं शकत असून त्यांचा लेखन-समाप्तिकाल इसवी सनाच्या चौथ्या शतकाच्या आरंभाला येतो. ह्या अट्ठकथा सिंहली वाङ्मयाचा प्राचीनतम अवशेष म्हणून आपल्या उपयोगी पडल्या असत्या. परंतु दुःखाची गोष्ट ही कीं त्यांचा अद्याप पत्ता लागला नाहीं व बहुतकरून तो आतां लागणें शक्यहि दिसत नाहीं.

दंतकथांवरून आपणांस सिंहली वाङ्मयांतील आज केवळ नामशेष झालेल्या प्राचीन ग्रंथांचीहि माहिती मिळूं शकते.

द्वीपवाङ्मयांतील सर्वांत जुन्या ग्रंथांचा रचनाकाल परंपरागत लोककल्पनेनुसार इसवी सनाच्या चौथ्या शतका-इतका प्राचीन आहे. उदाहरणार्थ कित्तिस्सिरि मेघवन्न ( संशोधकांच्या सांप्रदायिक गणनेनें इ. स. ३०४–३२२ ) राजाच्या कारकीर्दीच्या नवव्या वर्षी सिलोनमध्यें त्याकाळीं आणलेल्या बुद्धाच्या दंतावशेषावर दळदावंसनामक एक काव्य लिहिलें गेलें अशी समजूत आहे. ह्याच काव्याच्या मागून निघालेल्या आवृत्तीचा पुढें उल्लेख येणार आहे. ज्या वृक्षाखालीं बुद्धाच्या अंतःकरणांत ज्ञानाचा प्रकाश पडला त्यासंबंधींची कथा देखील बरीच प्राचीन आहे. हिचेंच पुढें उपतिस्सानें बोधिवंश नांवाखालीं पालींत भाषांतर केलें. ह्या पाली मूळाचें पुन्हां सिंहलींत केलेलें एळु बोधिवंस नांवाचें भाषांतर सिलोनांत चौदाव्या शतकापासून दृष्टीस पडतें.

चौथ्या शतकांतील बुद्धदास राजाच्या वेळीं महाधम्मकथी नांवाच्या विद्वान् भिक्षूनें सुत्तपिटकाचें किंवा त्यापैकीं कांहीं भागाचें सिंहली भाषेंत भाषांतर केलें असें ह्मणतात. यावरून त्यावेळीं लंकेंत वाङ्मयाबद्दल लोकांनां बराच उत्साह वाटत होता असें दिसतें. सारत्थसंगह नांवाचा वैद्यकावर एक ग्रंथ बुद्धदास राजानें स्वतः लिहिला होता असें म्हणतात. याच नांवाचा एक संस्कृत ग्रंथ अद्यापि दृष्टीस पडतो. तथापि ह्या ग्रंथ अस्सल आहे किंवा नाहीं हें खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं.

बौद्ध धर्मशास्त्रावर ज्यानें भाष्य केलें आहे त्या बुद्धघोषानें लंकेंतील वाङ्मयास नवीन चालन दिलें असावें असें वाटतें. पांचव्या शतकाच्या आरंभीं प्रसिद्धीस आलेल्या बुद्धघोषानें स्वतः पाली भाषेचा उपयोग केला; व दक्षिणेकडील बौद्ध लोक धार्मिक बाबतींत याच भाषेचा उपयोग करूं लागले. बुद्ध-घोषाच्या भाष्यावरोबर त्याच्या विसुद्धिमग्ग नांवाच्या बृहत्कोशाचा उल्लेख केला पाहिजे. सिंहली भाषेंत या ग्रंथाचा एकहस्तलिखित अनुवाद आहे.

महावंशांत मूळ ग्रंथाच्या पुरवणीरूप भागांत बुद्धघोषाच्या कार्याची सविस्तर हकीकत दिली आहे. ही हकीकत अशी आहे. बुद्धगयेजवळ एका ब्राह्मणकुलांत बुद्धघोषाचा जन्म झाला. विद्वत्तेबद्दल लहानपणींच त्याची ख्याति झाली. थेर रेवतावरोवर झालेल्या एका वादांत बुद्धाच्या उच्च तत्त्वांची त्याला माहिती होऊन त्यानें तो धर्म स्वीकारिला. तिपिटकाचा अभ्यास करण्यांत तो मग्न होऊन गेला; व रेवताच्या सूचनेवरून सिंहली भाष्याची ( अट्ठकथा ) माहिती करून घेण्यासाठीं तो लंकेंत गेला. महाविहारांतील अनुराधपुरांत ज्या ठिकाणीं पवित्र महिंद वृक्ष आहे, त्या ठिकाणीं त्यानें विसुद्धिमग्ग नांवाचा ग्रंथ लिहिला. नंतर अंथाकर मठांत त्यानें वास्तव्य केलें. तेथें मागधीच्या व्याकरणाप्रमाणें त्यानें सर्व सिंहल अट्ठकथांचें भाषांतर केलें. तो ग्रंथ पुरा केल्या-नंतर तो हिंदुस्थानांत परत आला.

बुद्धघोषानंतर, लवकरच दीपवंश व महावंश हे पाली ग्रंथ झाले असावे.

सहाव्या शतकाच्या आरंभीं, कुमारधातुसेन किंवा कुमार-दास हा राजा लंकेंत राज्य करीत होता. तो रसिक कवि होता अशी तद्देशीय दंतकथा आहे. त्यानें संस्कृतमध्यें जानकीपरिणय हें साधें काव्य लिहिलें असें म्हणतात. याचा ग्रंथ उपलब्ध नाहीं. तथापि, सिंहली अनुवादाच्या आधारानें, धर्मरामानें मूळ संस्कृत ग्रंथ पुनः तयार केला आहे.

कुमारदासाच्या वेळीं कालिदास लंकेंत गेला होता व या राजकवीशीं त्याची फार मैत्री होती अशी एक मनोरंजक दंतकथा आहे. ही निव्वळ आख्यायिका आहे असें डॉ. गैजर म्हणतो. तें कसेंहि असो. सिंहली काव्यावर कालि-दासाचें बरेंच वजन पडलें होतें यांत संशय नाहीं. त्याच्या रघुवंशावरून जानकीपरिणय हें काव्य लिहिण्यास कुमार-दासास स्फूर्ति झाली व त्याच्या मेघदूताचें कित्येक संदेश-काव्यांत वारंवार अनुकरण झालेलें आहे. त्याचा पुढें उल्लेख करण्यांत येईल. कालिदासाचा मृत्यु सिंहलद्वीपांतच झाला आणि कुमारदासानें त्या दुःखामुळें अग्निकाष्ठें भक्षण केलीं असा दोघांच्या मैत्रीसंबंधाच्या दंतकथेचा उत्तरार्ध आहे आणि तेथील लोक त्याची दहनभूमि देखील दाखवितात. डॉ. सतीशचंद्र विद्याभूषण हे ही दंतकथा सत्य असून तिचा उपयोग कालिदासकालनिर्णयाला होईल काय अशी पहिल्या प्राच्यविद्यापरिषदेस पृच्छा करितात.

सहाव्या शतकांत लंकेंत काव्यकलेची किती प्रगति झाली होती हें महावंशांत स्पष्ट सांगितलें आहे. पहिल्या अग्गबोधि राजाच्या वेळीं ( इ. स. ५६३–५९८ ) त्याच्या राज्यांत

अनेक कवी असून त्यांनीं कित्येक सुरस व सुंदर काव्यें सिंहली भाषेंत लिहिलीं असें त्या ग्रंथांत सांगितलें आहे.

नवव्या शतकाच्या आरंभीं दुसऱ्या दापुल राजानें कांहीं महत्त्वाच्या शिक्षांची नोंद करून व त्यांचा संग्रह करून कायदेशास्त्रांत भर टाकिली.

भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें असें जें प्राचीन सिंहली वाङ्मय, त्यापैकीं आतां कांहींएक शिल्लक नाहीं हें दुर्दैव होय. 'दंपिया अटुवा गाटपद सन्नय' हा सिंहली भाषेंतील सर्वांत प्राचीन गद्य ग्रंथ आहे. हा धम्मपदाच्या भाष्याचा कोश छुई डि झोश यानें १८७५ त शोधून काढिला. हा ग्रंथ दहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास लिहिलेला असावा अशी कल्पना आहे.

हेर नसिक विनिस नांवाच्या लहान ग्रंथांतहि अगदीं जुनी सिंहली भाषा आढळते; या ग्रंथांत बौद्धसंप्रदायांत नवीन आलेल्यांच्या कर्तव्यांचें वर्णन केलेलें आहे. परंतु हा ग्रंथ केव्हां रचला गेला हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं.

**बाराव्या शतकापासून चौदाव्या शतकापर्यंत**—( गुरुलु-गोमि, अमावतुर, विनयाचें भाषांतर, थूपवंश, पूजावलिय, बुद्धदंतावर सिंहली काव्य, सुळुराजरत्नाकरय, एळुबोधिवंसय, अट्टनगलुवंसय, सद्धर्मालंकारय, पन्सियपनसजातक, व्याकरण, काव्यें ).

बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांत पहिल्या पराक्रमबाहूच्या ( सिंहली–परकुंब ) कारकीर्दींत सिंहली राज्याच्या उत्कर्षा-बरोबरच सिंहली वाङ्मयाचाहि उत्कर्ष झाला, परंतु या कालां-तील त्याच्या उत्कर्षाचें कालक्रमानुसार वरोबर रीतीनें वर्णन करणें शक्य नसल्यामुळें, जे सिंहली ग्रंथ हस्तलिखितांच्या रूपांत आज आहेत, किंवा जे छापून प्रसिद्ध झाले आहेत त्यांचे कांहीं वर्ग पाडून एकैकशः त्यांचा आपण विचार करूं.

धर्मविषयक गद्यग्रंथ हा वर्ग आपण प्रथम हातीं घेऊं. या वर्गांत अमावतुराचा म्हणजे गुरुलुगोमीच्या अमृतप्रवाहाचा उल्लेख प्रथम करणें योग्य आहे. लंकेमध्यें हा ग्रंथ अत्यंत पूज्य आहे. यांत बुद्धाचीं वचनें व निरनिराळ्या धार्मिक विषयांवर ब्राह्मणांबरोबर झालेले त्याचे वाद आहेत. दाल-व्हिस वगैरे कांहीं लोकांच्या मतें, गुरुलुगोमि हा सहाव्या शतकांत पहिल्या अगबोधीच्या वेळीं असावा व आपल्यापाशीं असलेला त्याचा अमावुतर हा ग्रंथ सिंहली वाङ्मयांतील अगदीं प्राचीन ग्रंथ असावा; परंतु गुरुलुगोमि हा बाराव्या शतकांतील होता हें दुसरें मत डॉ० गेजर यांस अधिक संभवनीय दिसतें. धर्मविषयक प्रश्नांवर प्रमाणभूत असा धर्म-प्रदीपिका हा दुसरा एक ग्रंथ त्यानेंच लिहिलेला आहे. पवित्र बोधि-वृक्षाची गोष्ट ज्यांत आहे, त्या पाली भाषेंतील महाबोधिवंश नांवाच्या ग्रंथाचें धर्म-प्रदीपिका हें भाष्य आहे. धर्म-प्रदीपिका या ग्रंथाची भाषा विशेषत्वेंकरून संस्कृत वळणाची आहे; उलटपक्षीं अमावतुर हा ग्रंथ शुद्ध एळूंत लिहिलेला आहे बुद्धघोषाच्या विसुद्धिमग्गाच्या सिंहली अनुवादाचा या ठिकाणीं पुनः एकदां उल्लेख करूं. तिसऱ्या पराक्रमबाहु ( १३ व्या शतकाचा शेवट ) राजानें हा ग्रंथ लिहिला अशी दंत-कथा आहे.

चौथ्या पराक्रमबाहूच्या वेळीं (सुमारें इ. स. १३००) मेधंकर नांवाचा पंडित राहत होता असा महावंशांत ( १९, ८५ ) उल्लेख आहे. त्यानें विनयाचा सिंहली तर्जुमा व विनयार्थ-समुचय नांवाचें त्याचें भाष्य केलें अशी कल्पना आहे. हा ग्रंथ हस्तलिखित असून, तो अजून प्रसिद्ध झाला नाहीं असें वाटतें. दहंगात मालाव नांवाच्या थोड्या अलीकडच्या ग्रंथांत धर्मविषयक कोड्यांचा संग्रह असून तो ग्रंथ चौथ्या भुवनेक-बाहु राजाच्या वेळीं ( १४ व्या शतकाच्या मध्यास ) झालेला आहे.

ऐतिहासिक व कथानकात्मक गद्यग्रंथांत पराक्रमपंडिताच्या थूपवंशाचा प्रथम उल्लेख केला पाहिजे. पराक्रमपंडित हा पहिल्या पराक्रमबाहूच्या वेळीं राहत असून, त्याच्या मृत्यूनंतर विजयबाहु या नांवानें त्यानें स्वतः एक वर्ष राज्य केलें. थूपवंशांत प्रथमतः लंकेंतील दाघोबांचा इतिहास द्यावयाचा जरी मुख्य उद्देश होता, तरी त्यांत इतक्या ऐतिहासिक टिपा व विविध अप्रस्तुत विषयांवर इतकी माहिती आहे कीं, तो ग्रंथ म्हणजे एक माहितीची महत्त्वाची खाण आहे असें समजण्यांत येतें. मयूरपादाच्या पूजावलियाची हीच गोष्ट आहे. तो ग्रंथ दुसऱ्या पराक्रमबाहूच्या वेळीं ( १३ व्या शतकाच्या उत्तरार्धांत ) लिहिलेला आहे.

हिंदुस्थानच्या व लंकेच्या कित्येक राजांनीं बुद्धाचा कसा सन्मान केला व त्याला कोणत्या देणग्या दिल्या याचा या ग्रंथांत उल्लेख केलेला आहे. सोळाव्या प्रकरणांत विशेषतः लंकेची माहिती दिलेली असून, त्यांत ग्रंथकाराच्या वेळेपर्यंत झालेल्या सिंहली राजांची पूर्ण यादी, त्यांच्या कारकीर्दींचा काल व बौद्ध धर्माशीं त्यांचा संबंध याबद्दल मजकूर आहे.

तेराव्या शतकाच्या पूर्वार्धांत लीलावती राणीच्या कारकीर्दींत होऊन गेलेल्या धम्मकित्तिथेराचें दाठावंसय थोडें अधिक जुनें असून त्यांत क्यांडी येथें जतन करून ठेविलेल्या दंतावशेषासंबंधीं गोष्ट कथन केलेली आहे; व ती दळदावंसय नांवाच्या ज्या सिंहली काव्याचा वर उल्लेख आला आहे, त्यावरून लिहिण्यांत आली आहे. त्याच ग्रंथकर्त्यानें मग तिचें पालींत पद्यमय भाषांतर करून त्या भाषांतराचें पुन्हा सन्नय ह्या नांवाखालीं सिंहलींत रूपांतर केलें. मूळांतील पाली काव्य व त्याचें सिंहलींतील रूपांतर हीं दोन्हीहि आज कित्येक हस्तलिखितांतून लिहून ठेविलेलीं सांपडतात व तीं छापूनहि प्रसिद्ध झालीं आहेत.

येथें एक गोष्ट सांगून ठेविली पाहिजे कीं, चौदाव्या शतकाच्या मध्यांत चौथ्या भुवनेकबाहूच्या कारकीर्दीत 'सुद्ध-राजरत्नाकरय' नांवाचें एक ऐतिहासिक पुस्तक लिहिलें गेलें होतें पण तें अद्यापपर्यंत सांपडलें नाहीं. अठराव्या शतकांत लिहिलेल्या राजरत्नाकरय नांवाच्या ज्या एका अलीकडील ग्रंथाचा उल्लेख पुढें येणार आहे त्याचा उपरिनिर्दिष्ट पुस्तकाशीं कांहीं संबंध नाहीं एवढें विसरतां कामा नये.

येथें सरस सिंहली गद्याचा नमुना म्हणून उम्मनग्ग जातकांतील एक उतारा घेऊन प्रचलित भाषेंत झालेलें त्याचें भाषांतरहि घेऊं. सिंहलद्वीपांतील वाङ्मयाच्या व लौकिक भाषेमधील भेद किती क्षुल्लक आहे हें या भाषांतरावरून दिसून येतें.

## अभिजात ( एळु ) गद्य.

कपुसेनक रक्ना एक स्त्रियक कपु रक्नी, तमा रक्ना सेनेहि सवस पिपि कपु कडागेन, सकस्कोट कडा पोळा वत्तु-कोट सीन हू काट वाति-कोट ए हू-वट इन तवागेन गम-ट एन्नीः "महौषध पण्डितयन-वहंसे विसिन कणवनलद पोकुणेन नहमि" कड गलवा, गोड तवा, कड मत्ते हू-वाटिय तवा, नहन-ट दिय-ट वट अनिक स्त्रियक हू-वाटिय दाक एहि लोल-वु सित-आटिव ए अत-ट गेनः "अहृ, इता यहपत, हूयेहि सीन; अत नगणियनि, तोप विसिन-म कटनालद-दा?" -यि आश्चर्यमत्-व बलन्-नियक मेन इन तवा-गेन, नागी गियाय- पेर गाट-हू-पळन्द-नायेहि परिदेन्-म कलह कोट कोट सालाव समीपयेहि यन देदेना गेन्वा, विचारा तमन-वहंसे की युक्तियेहि "सिद्धुम्ह"-यि की-पसु बोधिसत्त्वयन्-वहंसेः "तो मे हू-वाटिय करन्नी कुमक आतुळे ला कळा-दा?"–यि सोर-तानात्तिय विचाळेय. सोर-तानात्ती कियन्नीः "स्वामीनि, कपु-आटक आतुळे ला वट-केळेमि" किव. आगे वस असा, हू-वाटिय-आति-तात्तातियः "तो कुमक आतुळे ला वट-कळा-दा"-यि विचाल-सेक. ओः "तिंबिरि-आटक आतुळे ला वट-केळेमि" किव. देन्ना-गे वस असा, सभावेहि उन्नवुन गिविस्वा हू-वाटिय गलवा, आतुळे-तुबू तिंबिरि-आट्य दाक, आ सेर-वव गिविस्वू सेक-वोहो देना युक्तिय पसुन नियाव-ट तुटु-पहटु-व दहस्-गणन साधु-कार पावात्-वूह.

## लौकिक गद्य.

कपुहेनक रकिना एक गानीयेक कपु रकिन अतर आ रकिन हेने सवस पिपुनु कपु कडागेन, हरिगसा कडा पोळा वत्तु-कोट सिहिन नूल काट वाटि-कोट ए नूल-बोलय इने तवागेन गम-ट एन अतरः "(मम) महौषध पंडितयन्-वहंसे विसिन हारवापू पोकुणेन नान्वा" किया राद्द गलवा, गोड तवा, राद्द उड नूल-बोलय तबा, नान्-ट बतुरट वास्साय. अनिक गानियेक नूलबोलय दाक एकट आसा-वेला एक अत-ट गेनः "अने, बोहोम होन्दयि, नूल सिहिनियि; अने नंगी, उंब विसिन्-म काटपू एकक्द?" किया पुदुम-वेला बलन्ना- वागे इने तवा-गेन, यन्-ट गियाय. मी-ट इस्सर गाट-नूल- पळन्दना-कथा-वेहि वागेम कोलहल कर कर सालाव लांगिन यन देन्ना गेन्वा, अहला उन्वहंसे कियन तीन्दुवक-ट "अपि कामति-वेनवाय" किया की-पसु बोधिसत्त्वयन्-वहंसेः "उंव मे नूल्-बोलय करद्दी मोकक आतुळे ला कळाद?" किया हेर-गेन आसुवाय. "स्वामीनि कपु आटयक आतुळे ला मम कळाय" किया हेर कीवाय-आ-गे कथाव असा, ऊ नूल्-बोलय आत्ता-गेनः "उंव मोदक आतुळे ला वट-कळा-द?" किया आसुवाय. आः "तिंबिरि-आटयक आतुळे ला वट-कळा" किया कीवाय. देन्ना-गे कथाव असा, सभा-वेहि उन्नु मिनिसुन कामति-करवा नूल बोलय गलवा, आतुळे. तिबुनु तिंबिरि-आटय दाक, आ सेर-वव ओप्पु कळाय. वोहो देना तीन्दु-कळ-हाटिय-ट तुटु-पहटु-व दहस्-गणन साधुकार-शब्द पावात्तुवाय.

## मराठी अर्थ.

एक स्त्री एका कापसाच्या शेतांत कामाला होती; या मळ्यांत काम करीत असतां एके दिवशीं तिला मिळालेल्या कापसाची तिनें संध्याकाळीं सरकी काढून तो साफसूफ व मोकळा करून त्याचा एक गोळा केला व त्याचें सुरेख सूत काढून त्या सुताचा चेंडू बनवून तिनें तो आपल्या खिशांत ठेविला. पंडित महोषधानें हें जें तळें खणलेलें आहे त्यांत आपण स्नान करावें असा विचार गांवांत जातांना तिला सुचला. हा विचार सुचल्यानंतर तिनें आपलीं वस्त्रें फेडून तीं त्या तळ्याच्या कांठावर ठेविलीं व त्यांच्यावर तो सुताचा चेंडू ठेवून, स्नान करण्यासाठीं ती पाण्यांत उतरली. दुसऱ्या एका स्त्रीनें तो चेंडू पाहून तो आपल्यापाशीं असावा अशी तिला इच्छा झाल्यामुळें तिनें तो आपल्या हातांत घेतला. व "हा फार उत्तम आहे; याचें सूत फार सुरेख आहे; ताई, हा तूं तयार केलास का?" असें तिनें विचारलें. तिनें त्या चेंडूची वाखाणणी केली व आपल्याला पाहण्यासाठीं पाहिजे आहे असा वहाणा करून तो चेंडू तिनें आपल्या खिशांत कोंबला, व ती चालती झाली. नंतर गांठी दिलेल्या दोऱ्याच्या डागिन्याची गोष्ट पूर्वीं आली आहे त्या गोष्टीप्रमाणेंच एक-सारख्या भांडत असलेल्या त्या दोन स्त्रिया बोधिसत्त्व ज्या मंदिरांत होता तिकडे आल्या. बोधिसत्त्वानें त्यांना आपल्या-कडे बोलाविलें व मीं जो निकाल देईन तो तुम्ही मान्य कराल का असें त्यानें त्यांस विचारिलें. 'होय' असें त्यांनीं उत्तर दिल्यावर, "तूं तो चेंडू केलास त्यांत काय घातलेंस?" असा प्रश्न त्यानें चोरट्या स्त्रीला विचारिला. "महाराज, मीं त्यांत कापसाची सरकी घातली आहे" असें त्या स्त्रीनें सांगितलें. हें उत्तर ऐकून "तूं त्या कापसांत काय घातलेंस?" असें त्यानें त्या चेंडूची जी खरी मालक होती तिला विचारिलें. "मीं त्यांत लांकडी चेंडू घातला आहे" असें तिनें उत्तर दिलें. त्या ठिकाणीं असलेल्या लोकांच्या संमतीनें त्यानें तो चेंडू उलगडण्यास लाविलें; आंत लांकडी चेंडू आहे असें आढळतांच प्रथम प्रश्न केलेल्या स्त्रीस त्यानें चोर ठरविलें. या निकालानें लोकांनां अत्यंत आनंद होऊन त्यांनीं त्याची फार वाहवा केली.

आतां एळुबोधिवंसय व अट्टनगल्लुवंसय ह्या पाली ग्रंथांच्या भाषांतरांचाच फक्त उल्लेख करावयाचा राहिला असून तेवढें केलें म्हणजे आपण आपल्या दुसऱ्या कालखंडाच्या अखेरीस आलों. यांपैकीं पहिला ग्रंथ उपतिस्स थेर याच्या सिंहली मूळावरून रचलेल्या बोधिवंशनामक पाली ग्रंथाचें सिंहली गद्यात्मक रूपांतर असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. एळुबोधिवंसय हा ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेला कोठें आढळून येत नाहीं. अट्टनगल्लुवंसय हा ग्रंथ हत्तहंगल्लविहारवंशनामक एका पाली गद्यमिश्रित काव्याचें भाषांतर असून तो चौदाव्या शतकाच्या अखेरीस लिहिला गेला. गोठभयाकडून पदच्युत झाल्यावर अट्टनगल्लु मठांत जाऊन राहिलेल्या सिरिसंघबोधि राजाची कथा या पालीकाव्यांत आहे. आणखी थोड्या काळानें म्हणजे इसवी सन १४०० च्या सुमारास सासनावतार किंवा निकाय-संग्रह नांवाचा ग्रंथ रचला गेला. हा ग्रंथ म्हणजे बौद्ध धर्माचा व त्याच्या निरनिराळ्या पंथांचा एक इतिहासच असून त्यांत सिंहली राजांची एक यादी व त्यांतील ज्यांनीं बौद्ध मताच्या प्रसारार्थ खटपट केली त्यांची संक्षिप्त माहितीहि दिली आहे. ह्या पुस्तकांत दिलेली कालविषयक माहिती सिंहली भाषेंतील दुसऱ्या कोणत्याहि ऐतिहासिक ग्रंथापेक्षां अधिक विश्वसनीय मानण्यांत येते.

धम्मसेनथेर याच्या सद्धर्मालंकारय या ग्रंथाचा काल बरोबर ठरवितां येत नाहीं. पण तो या कालांत घालतां येईल. हिंदुस्थान आणि सिंहलद्वीप यांतील बौद्ध इतिहास-पुराणांचा हा एक संग्रह आहे; हीं कथानकें रसवाहिनी-विदेहांत देखील आढळतात. थेरचे ग्रंथ पालीभाषेंत आहेत. सिंहली ग्रंथ आणि पाली ग्रंथ यांचा एकमेकांशीं काय संबंध आहे हें काढण्यास अजूनहि संशोधन केलें पाहिजे. रसवाहिनीच्या प्रस्तावनेंत असें म्हटलें आहे कीं, यांतील कथा संतांनीं या द्वीपाच्या भाषेंत म्हणजे सिंहली भाषेंत मूळ निवेदिल्या असून, सर्व ग्रंथकारांनीं त्यांचें जतन करून मग पालींत त्यांचें भाषांतर केलें. धम्मसेन थेराचा म्हणून मानलेला दुसरा विस्तृत ग्रंथ म्हणजे, धम्मपद अट्ठकथांचें सद्धर्मरत्नावलिय नांवाचें सिंहली रूपांतर; याला थोडक्यांत रत्नावलिय असेंहि म्हणतात.

वाङ्मयाच्या इतिहासांतली फार महत्त्वाची कृति म्हणजे चवथ्या पराक्रमबाहूच्या कारकीर्दीत अजमासें इ. स. १३००सालीं झालेलें, पन्सियपनस्जातक नांवाचें जातक ग्रंथाचें भाषांतर होय. महावंशांतील हकीकतीप्रमाणें ( ९०, ८० व पुढचा भाग ) पाहतां, हें भाषांतराचें काम राजानें करून पुढें त्यानें तें भाषांतर तपासण्यासाठीं विद्वान् आचार्यांच्या सभेकडे दिलें, आणि नंतर तें वर आलेला विनयार्थसमुच्चयाचा कर्ता मेधङ्कर यानें आपल्या शिष्यांत त्यांतील ज्ञानाचा प्रसार करावा म्हणून त्याच्या हवालीं केलें. सिंहलद्वीपांत या जातकाच्या हस्तलिखितांची मुळींच वाण नाहीं; पण आतांपर्यंत हें सबंध प्रसिद्ध झालें नसून याचे फक्त वेगवेगळे अंशच प्रसिद्ध झालेले आहेत.

अलीकडच्या कालांतील शास्त्रीय ग्रंथांमध्यें एळु-व्याकरण सिदत् संगराव हा मुख्य ग्रंथ असून लंकेंत हा अत्यंत पूज्य मानिला जातो. संस्कृतमध्यें पाणिनीस व पालीमध्यें कच्चायनास जसें महत्त्व आहे, तसेंच सिंहलीमध्यें या ग्रंथास महत्त्व आहे. दक्षिण लंकेंतील पालीराज नांवाच्या एका सरदाराच्या आश्रयाखालीं हें व्याकरण रचिलें गेलें. चौथ्या पराक्रमबाहूच्या वेळीं पालीराज नांवाच्या एका प्रधानाचा उल्लेख केलेला आढळतो, त्या अर्थी हा ग्रंथ इ. स. १३०० च्या सुमारास लिहिलेला असावा; दुसऱ्या कांहीं गोष्टींवरूनहि हीच गोष्ट दर्शविली जाते. रसवाहिनी हा ग्रंथ ज्यानें लिहिला त्याच विदेहथेरानें हें सिंहली व्याकरण केलें असावें अशी सामान्य समजूत आहे. सिदत्-संगरावाच्या अनेक आवृत्त्या निघून, त्याचे अनुवाद व भाष्यें एकसारखीं होत आहेत. येथें सिंहली अलंकारशास्त्रावरील सियवस्-लकर नांवाच्या एका ग्रंथाचा उल्लेख करूं. शिलामेघवण्ण नांवाच्या राजानें हा ग्रंथ लिहिला अशी दंतकथा आहे. हा राजा नवव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होऊन गेला. परंतु हा ग्रंथ खात्रीनें बराच अलीकडचा असावा. पूजावलिय हा ग्रंथ ज्यानें लिहिला त्या मयूरपादानें योगार्णव नांवाचा एक वैद्यक ग्रंथ लिहिला आहे असें म्हणतात; परंतु त्या ग्रंथाची यापेक्षां अधिक माहिती उपलब्ध नाहीं.

**सिंहली काव्यग्रंथः**—सरतेशेवटीं १३ व्या व १४ व्या शतकांतील काव्यग्रंथांबद्दल लिहावयाचें. हीं काव्यें निर्यमक असून त्यांतील विषय बहुतेक जातकग्रंथांतून घेतलेले असतात. सर्वांत जुनें काव्य ससदावत हें असावें. तें ससजातकाच्या आधारें लिहिलेलें आहे, आणि तें १३ व्या शतकाच्या आरंभींचें लीलावती राणीच्या कारकीर्दींतलें आहे. काव्यग्रंथामध्यें हा ग्रंथ आदर्शवत् मानतात, त्याची हस्तप्रत उपलब्ध आहे, परंतु ग्रंथ अद्याप छापून प्रसिद्ध झाल्याचें कळलें नाहीं; व त्याचा कर्ता कोण हेंहि माहीत नाहीं. दुसरें काव्य कुसदावत अथवा कवसिलुमिण हें पराक्रमबाहु या राजानें केलेलें आहे असें म्हणतात. हें कुस-जातक याचें रूपान्तर असून सस-दावतानंतर थोड्याच काळानें झालेलें आहे. कवसिलुमिणची एक आवृत्ति कोलंबोमध्यें १८९९ मध्यें निघालेली आहे. मुवदेवदावत हें काव्य त्यानंतर थोड्या वर्षांनीं झालेलें असावें. त्याचें कथानक मखादेवजातकांतून घेतलेलें आहे. याचाहि कर्ता कोण तें माहीत नाहीं. तथापि पूर्वीच्या सिंहली काव्यांची भाषा कृत्रिम व बरीच अतिशयोक्तिपूर्ण असून ती त्या काळींहि पूर्ण विकास पावलेली होती व तसल्याच भाषेचा सामान्यतः उपयोग करीत असत ही

गोष्ट पुढें दिलेल्या कांहीं पद्यांच्या भाषांतरावरून दिसून येईल. या पद्यांत मिथिलानगरीचें वर्णन आहे.

"जंबुद्वीप हा अविमल ( जल ) प्रदेश अनेक नगररूपी पद्मपत्रांनीं सुशोभित झालेला असून त्यांतील सोनेरी कमळाच्या मोठ्या फळाच्या देंठाप्रमाणें ही मिथिला नगरी शोभत आहे.

"या कीर्तिसंपन्न नगरींतील राजवाड्यांच्या खिडक्यांच्या आंतल्या बाजूस सूर्य आपल्या करांनीं जेव्हां सुंदर राजस्त्रियांच्या कमलमुखांस स्पर्श करतो त्यावेळीं ते राजवाडे उंच उंच असल्याबद्दल त्याला फार आनंद होतो.

"जेव्हां हाच कैलासपर्वत कीं काय, असा विचार मनांत येऊन हर, त्या राजवाड्यांतील अगदीं उंच व भव्य खोल्यांच्या सन्निध येतो तेव्हां आंतील प्रकाशामुळें त्याच्या केसांतील चंद्रकोर अत्यंत प्रकाशित दिसूं लागते."

लोकोपकारय व दळदासिरित हीं दोन काव्यें वर उल्लेखिलेल्या काळांतील आहेत किंवा नाहींत याबद्दल शंका आहे. पहिलें काव्य म्हणजे एक दृष्टान्तरूप कथांचा संग्रह असून तो मयूरपाद यानें लिहिलेला असावा असें कित्येकांचें मत आहे. या कल्पनेनें त्याचा काल १३ व्या शतकाचें उत्तरार्ध हा येतो. तथापि कांहींचें मत तो याच्या पुढल्या काळांतला असावा असें पडतें. परंतु या काव्यांतील कविता निर्यमक आहे ही गोष्ट पहिल्या मताला पुष्टिकारक आहे. हीच गोष्ट दळदासिरित या काव्यालाहि लागू आहे; कारण तेंहि निर्यमकच काव्य आहे. त्यांतील विषय दंतावशेषाच्या गोष्टीबद्दलचा असून तें ४ थ्या शतकांतील ( ४ थ्या शतकाच्या आरंभींच्या ) पराक्रमबाहु राजानें लिहिलेलें आहे असें परंपरेनें मानण्यांत येतें. दळदावंसय व दळदासिरित यांचा घोंटाळा करतां कामा नये; हीं दोन्हीं अगदीं भिन्न आहेत. दळदासिरिताची एकहि आवृत्ति असल्याचें आढळत नाहीं.

वाङ्मय-कालाच्या या विभागाच्या अखेरीचें एक काव्य आहे; त्याचा कर्ता माहीत नाहीं; परंतु अनेक कारणांस्तव तें काव्य कात्र लक्ष वेधणारें आहे; त्याचें नांव मयूर-संदेशय. हें काव्य ५ वा भुवनेकबाहु या राजाच्या कारकीर्दींत ( १४ व्या शतकाच्या उत्तरार्धांत ) रचलेलें आहे; व त्यांत त्या राजाच्या नांवाचाहि उल्लेख आहे, तो १४ व्या पद्यांत आहे. सयमक काव्याचा हा सर्वांत जुना मासला आहे. तसेंच 'दूत' ( मेघदूतासारख्या ) काव्यमालेंतील हें अगदीं पहिलें काव्य आहे. या प्रकारच्या काव्यांनां आधार म्हणजे मेघदूतकाव्यांतील नितान्त रमणीयत्त्वास पोंचलेल्या काव्यकल्पनेचा असून त्यावरून सिंहली काव्यकलेवरहि कालिदासाचा किती परिणाम झालेला आहे तें स्पष्ट दिसतें. या काव्यांत तामिळ लोकांबरोबर अलगकोराण हा आपल्या सैन्यानिशीं लढाई करीत असतां त्यांत त्याला जय मिळावा म्हणून त्याचें मंत्रिमंडळ गंगासिरीपुर (गंपोल) येथून निघून देविनुवर(दोंद्र) या श्रीविष्णूच्या पवित्र स्थानाला जाऊन तेथें त्याची विजयप्राप्तीकरतां प्रार्थना करीत आहे असें वर्णन आहे. निकायसंग्रहामध्यें अलगकोराण याचें नांव आलेलें आहे. ५ वा भुवनेकबाहु याच्या पूर्वींच्या कारकीर्दींत रायिगंनुवर येथें तो सरसुभेदार होता.

**१५ व्यापासून १७ व्या शतकापर्यंतः**—( संदेशकाव्यें, काव्यशेखरय, बुधगुणालंकार, लोवाडसंगराव, सारसंग्रह, शब्दकोश, कुसजातक, सुभाषित, परंगिहटन, महाहटन, कोस्तंतीनुहटन, सद्धर्मदास इ० )

या काळांतील वाङ्मयामध्यें देखील काव्यग्रंथांचा निर्देश प्रामुख्यानें येतो. १५ व्या शतकापासून सिंहली काव्यकलेंतील बहारीच्या काळास सुरवात होते. सिलोनांतील कविमंडलरूपी आकाशपटलावर श्रीराहुलथे हा अगदीं पहिल्या प्रतीचा तारा चमकत आहे. हा ६ वा पराक्रमबाहु याच्या कारकीर्दींत ( १५ व्या शतकाच्या पूर्वार्धांत ) होऊन गेला. दक्षिणेकडील प्रांतांतल्या ज्या जिल्ह्यांत तो होता त्या जिल्ह्याच्या नांवावरून त्याला तोटगमुव असें म्हणण्याचा परिपाठ आहे. त्याच्यापूर्वींच ठरून गेलेल्या काव्यकलेंतील नमुन्यावरहुकूम त्यानें जीं उत्कृष्ट काव्यें केलेलीं आहेत त्याबद्दल त्याची प्रसिद्धि आहे. त्यानें कोणताहि नवीन मार्ग घालून दिला नाहीं. मयूरसंदेश या काव्यापासून सयमक कविता लिहिण्यास जो आरंभ झाला तो क्रम सिंहली काव्यांमध्यें पुढें तसाच चालू राहिला. सर्व संदेशकाव्यांतील अत्यंत प्रसिद्ध साळलिहिणि संदेशय हें काव्य तोटगमुव यानेंच निर्माण केलेलें आहे. या काव्यांत १०४ पद्यें आहेत व त्यांतील मजकूर असा आहेः—नुल्लुरुल्लवय नांवाचा प्रधान एका मैनेस जयवर्धनाहून (म्हणजे कोट्टेसो कोलंबोहून ) कालनींय येथें श्रीबिभीषणाच्या देवालयांत पाठवितो व तेथें उलकुद नांवाच्या राजकन्येला मुलगा देण्याबद्दल त्या देवाची प्रार्थना करण्यास सांगतो. ती राजकन्या त्या प्रधानाची बायको असावी. आरंभींच्या पद्यांत त्या मैनेची प्रथम स्तुति केलेली असून नंतर ती मैना ज्या मार्गानें जावयाची त्या मार्गाचें अगदीं मेघदूतकाव्यांतल्या नमुन्यावरहुकूम वर्णन दिलेलें आहे; आणि त्या मैनेनें देवतेची जी प्रार्थना करावयाची ती सांगितलेली आहे.

तोटगमुवाचें परवी-संदेशय म्हणजे पारावत-दूत म्हणून काव्य आहे. मयूरसंदेशकाव्यांतल्याप्रमाणेंच यांत दूताला दोंद्र येथील श्रीविष्णूकडे जयवर्धनानें पाठविलें असून पराक्रमबाहु, त्याचा बंधु व राजाची कन्या चंद्रावती यांच्यावर भगवत्कृपा असावी अशी प्रार्थना करण्यास सांगितलें आहे.

तोटगमुवानें जातकग्रंथांतील माहितीवरून आपलें काव्यशेखरय हें १४ सर्गांचें मोठें काव्य तयार केलें. या काव्यांत बोधिसत्त्वाची तो सेनकपंडित झाला होता, त्या जन्माची कथा (सेनकजातक) आहे. त्यांतच आलेल्या एका वाक्यावरून असें दिसतें कीं, तें काव्य ६ वा परकुंब (पराक्रमबाहु) याच्या

आतां एलुबोधिवंसय व अट्ठनगलुवंसय ह्या पाली ग्रंथांच्या भाषांतरांचाच फक्त उल्लेख करावयाचा राहिला असून तेवढें केलें म्हणजे आपण आपल्या दुसऱ्या कालखंडाच्या अखेरीस आलों. यांपैकीं पहिला ग्रंथ उपतिस्स थेर याच्या सिंहली मूळावरून रचलेल्या बोधिवंशनामक पाली ग्रंथाचें सिंहली गद्यात्मक रूपांतर असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. एलुबोधिवंसय हा ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेला कोठें आढळून येत नाहीं. अट्ठनगलुवंसय हा ग्रंथ हत्तहंगल्लविहारवंशनामक एका पाली गद्यमिश्रित काव्याचें भाषांतर असून तो चौदाव्या शतकाच्या अखेरीस लिहिला गेला. गोठभयाकडून पदच्युत झाल्यावर अट्ठनगलु मठांत जाऊन राहिलेल्या सिरिषंघबोधि राजाची कथा या पालीकाव्यांत आहे. आणखी थोड्या काळानें म्हणजे इसवी सन १४०० च्या सुमारास सासनावतार किंवा निकायसंग्रह नांवाचा ग्रंथ रचला गेला. हा ग्रंथ म्हणजे बौद्ध धर्माचा व त्याच्या निरनिराळ्या पंथांचा एक इतिहासच असून त्यांत सिंहली राजांची एक यादी व त्यांतील ज्यांनीं बौद्ध मताच्या प्रसारार्थ खटपट केली त्यांची संक्षिप्त माहितीहि दिली आहे. ह्या पुस्तकांत दिलेली कालविषयक माहिती सिंहली भाषेंतील दुसऱ्या कोणत्याहि ऐतिहासिक ग्रंथापेक्षां अधिक विश्वसनीय मानण्यांत येते.

धम्मसेनथेर याच्या सद्धर्मालंकारय या ग्रंथाचा काल बरोबर ठरवितां येत नाहीं. पण तो या कालांत घालतां येईल. हिंदुस्थान आणि सिंहलद्वीप यांतील बौद्ध इतिहासपुराणांचा हा एक संग्रह आहे; हीं कथानकें रसवाहिनीविदेहांत देखील आढळतात. थेरचे ग्रंथ पालीभाषेंत आहेत. सिंहली ग्रंथ आणि पाली ग्रंथ यांचा एकमेकांशीं काय संबंध आहे हें काढण्यास अजूनहि संशोधन केलें पाहिजे. रसवाहिनीच्या प्रस्तावनेंत असें म्हटलें आहे कीं, यांतील कथा संतांनीं या द्वीपाच्या भाषेंत म्हणजे सिंहली भाषेंत मूळ निवेदिल्या असून, सर्व ग्रंथकारांनीं त्यांचें जतन करून मग पालींत त्यांचें भाषांतर केलें. धम्मसेन थेराचा म्हणून मानलेला दुसरा विस्तृत ग्रंथ म्हणजे, धम्मपद अट्ठकथांचें सद्धर्मरत्नावलिय नांवाचें सिंहली रूपांतर; याला थोडक्यांत रत्नावलिय असेंहि म्हणतात.

वाङ्मयाच्या इतिहासांतली फार महत्त्वाची कृति म्हणजे चवथ्या पराक्रमबाहूच्या कारकीर्दीत अजमासें इ. स. १३००सालीं झालेलें, पन्सियपनस्जातक नांवाचें जातक ग्रंथाचें भाषांतर होय. महावंशांतील हकीकतीप्रमाणें ( ९०, ८० व पुढचा भाग ) पाहतां, हें भाषांतराचें काम राजानें करून पुढें त्यानें तें भाषांतर तपासण्यासाठीं विद्वान् आचार्यांच्या सभेकडे दिलें, आणि नंतर तें वर आलेला विनयार्थसमुच्चयाचा कर्ता मेधङ्कर यानें आपल्या शिष्यांत त्यांतील ज्ञानाचा प्रसार करावा म्हणून त्याच्या हवालीं केलें. सिंहलद्वीपांत या जातकाच्या हस्तलिखितांची मुळींच वाण नाहीं; पण आतांपर्यंत हें सबंध प्रसिद्ध झालें नसून याचे फक्त वेगवेगळे अंशच प्रसिद्ध झालेले आहेत.

अलीकडच्या कालांतील शास्त्रीय ग्रंथांमध्यें एलु–व्याकरण सिदत् संगराव हा मुख्य ग्रंथ असून लंकेंत हा अत्यंत पूज्य मानिला जातो. संस्कृतमध्यें पाणिनीस व पालीमध्यें कच्चायनास जसें महत्त्व आहे, तसेंच सिंहलीमध्यें या ग्रंथास महत्त्व आहे. दक्षिण लंकेंतील पालीराज नांवाच्या एका सरदाराच्या आश्रयाखालीं हें व्याकरण रचिलें गेलें. चौथ्या पराक्रमबाहूच्या वेळीं पालीराज नांवाच्या एका प्रधानाचा उल्लेख केलेला आढळतो, त्या अर्थी हा ग्रंथ इ. स. १३०० च्या सुमारास लिहिलेला असावा; दुसऱ्या कांहीं गोष्टींवरूनहि हीच गोष्ट दर्शविली जाते. रसवाहिनी हा ग्रंथ ज्यानें लिहिला त्याच विदेहथेरानें हें सिंहली व्याकरण केलें असावें अशी सामान्य समजूत आहे. सिदत्-संगरावाच्या अनेक आवृत्त्या निघून, त्याचे अनुवाद व भाष्यें एकसारखीं होत आहेत. येथें सिंहली अलंकारशास्त्रावरील सियबस्-लकर नांवाच्या एका ग्रंथाचा उल्लेख करूं. शिलामेघवण्ण नांवाच्या राजानें हा ग्रंथ लिहिला अशी दंतकथा आहे. हा राजा नवव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होऊन गेला. परंतु हा ग्रंथ खात्रीनें बराच अलीकडचा असावा. पूजावलिय हा ग्रंथ ज्यानें लिहिला त्या मयूरपादानें योगार्णव नांवाचा एक वैद्यक ग्रंथ लिहिला आहे असें म्हणतात; परंतु त्या ग्रंथाची यापेक्षां अधिक माहिती उपलब्ध नाहीं.

**सिंहली काव्यग्रंथः**—सरतेशेवटीं १३ व्या व १४ व्या शतकांतील काव्यग्रंथांबद्दल लिहावयाचें. हीं काव्यें निर्यमक असून त्यांतील विषय बहुतेक जातकग्रंथांतून घेतलेले असतात. सर्वांत जुनें काव्य ससदावत हें असावें. तें ससजातकाच्या आधारें लिहिलेलें आहे, आणि तें १३ व्या शतकाच्या आरंभींचें लीलावती राणीच्या कारकीर्दीतलें आहे. काव्यग्रंथामध्यें हा ग्रंथ आदर्शवत् मानतात, त्याची हस्तप्रत उपलब्ध आहे, परंतु ग्रंथ अद्याप छापून प्रसिद्ध झाल्याचें कळलें नाहीं; व त्याचा कर्ता कोण हेंहि माहीत नाहीं. दुसरें काव्य कुसदावत अथवा कवसिलुमिण हें पराक्रमबाहु या राजानें केलेलें आहे असें म्हणतात. हें कुस–जातक याचें रूपान्तर असून सस-दावतानंतर थोड्याच काळानें झालेलें आहे. कवसिलुमिणची एक आवृत्ति कोलंबोमध्यें १८९९ मध्यें निघालेली आहे. मुवदेवदावत हें काव्य त्यानंतर थोड्या वर्षांनीं झालेलें असावें. त्याचें कथानक मखादेवजातकांतून घेतलेलें आहे. याचाहि कर्ता कोण तें माहीत नाहीं. तथापि पूर्वीच्या सिंहली काव्यांची भाषा कृत्रिम व बरीच अतिशयोक्तिपूर्ण असून ती त्या काळींहि पूर्ण विकास पावलेली होती व तसल्याच भाषेचा सामान्यतः उपयोग करीत असत ही

गोष्ट पुढें दिलेल्या कांहीं पद्यांच्या भाषांतरावरून दिसून येईल. या पद्यांत मिथिलानगरीचें वर्णन आहे.

"जंबुद्वीप हा अविमल (जल) प्रदेश अनेक नगररूपी पद्मपत्रांनीं सुशोभित झालेला असून त्यांतील सोनेरी कमळाच्या मोठ्या फळाच्या देंठाप्रमाणें ही मिथिला नगरी शोभत आहे.

"या कीर्तिसंपन्न नगरींतील राजवाड्यांच्या खिडक्यांच्या आंतल्या बाजूस सूर्य आपल्या करांनीं जेव्हां सुंदर राजस्त्रियांच्या कमलमुखांस स्पर्श करतो त्यावेळीं ते राजवाडे उंच उंच असल्याबद्दल त्याला फार आनंद होतो.

"जेव्हां हाच कैलासपर्वत कीं काय, असा विचार मनांत येऊन हर, त्या राजवाड्यांतील अगदीं उंच व भव्य खोल्यांच्या सन्निध येतो तेव्हां आंतील प्रकाशामुळें त्याच्या केंसांतील चंद्रकोर अत्यंत प्रकाशित दिसूं लागते."

लोकोपकारय व दळदासिरित हीं दोन काव्यें वर उल्लेखिलेल्या काळांतील आहेत किंवा नाहींत याबद्दल शंका आहे. पहिलें काव्य म्हणजे एक दृष्टान्तरूप कथांचा संग्रह असून तो मयूरपाद यानें लिहिलेला असावा असें कित्येकांचें मत आहे. या कल्पनेनें त्याचा काळ १३ व्या शतकाचें उत्तरार्ध हा येतो. तथापि कांहींचें मत तो याच्या पुढल्या काळांतला असावा असें पडतें. परंतु या काव्यांतील कविता निर्यमक आहे ही गोष्ट पहिल्या मताला पुष्टिकारक आहे. हीच गोष्ट दळदासिरित या काव्यालाहि लागू आहे; कारण तेंहि निर्यमकच काव्य आहे. त्यांतील विषय दंतावशेषाच्या गोष्टीबद्दलचा असून तें ४ थ्या शतकांतील (४ थ्या शतकाच्या आरंभींच्या) पराक्रमबाहु राजानें लिहिलेलें आहे असें परंपरेनें मानण्यांत येतें. दळदावंसय व दळदासिरित यांचा घोंटाळा करतां कामा नये; हीं दोन्ही अगदीं भिन्न आहेत. दळदासिरिताची एकहि आवृत्ति असल्याचें आढळत नाहीं.

वाङ्मय-कालाच्या या विभागाच्या अखेरीचें एक काव्य आहे; त्याचा कर्ता माहीत नाहीं; परंतु अनेक कारणांस्तव तें काव्य फार लक्ष वेधणारें आहे; त्याचें नांव मयूर-संदेशय. हें काव्य ५ वा भुवनेकबाहु या राजाच्या कारकीर्दींत (१४ व्या शतकाच्या उत्तरार्धांत) रचलेलें आहे; व त्यांत त्या राजाच्या नांवाचाहि उल्लेख आहे, तो १४ व्या पद्यांत आहे. सयमक काव्याचा हा सर्वांत जुना मासला आहे. तसेंच 'दूत' (मेघदूतासारख्या) काव्यमालेंतील हें अगदीं पहिलें काव्य आहे. या प्रकारच्या काव्यांनां आधार म्हणजे मेघदूतकाव्यांतील नितान्त रमणीयत्त्वास पोंचलेल्या काव्यकल्पनेचा असून त्यावरून सिंहली काव्यकलेवरहि कालिदासाचा किती परिणाम झालेला आहे तें स्पष्ट दिसतें. या काव्यांत तामिळ लोकांवरोवर अलगकोराण हा आपल्या सैन्यानिशीं लढाई करीत असतां त्यांत त्याला जय मिळावा म्हणून त्याचें मंत्रिमंडळ गंगसिरीपुर (गंपोल) येथून निघून देविनुवर (दोंद्र) या श्रीविष्णूच्या पवित्र स्थानाला जाऊन तेथें त्याची विजयप्राप्तीकरतां प्रार्थना करीत आहे असें वर्णन आहे. निकायसंग्रहामध्यें अलगकोराण याचें नांव आलेलें आहे. ५ वा भुवनेकबाहु याच्या पूर्वीच्या कारकीर्दींत रायिगंनुवर येथें तो सरसुभेदार होता.

**१५ व्यापासून १७ व्या शतकापर्यंतः**—(संदेशकाव्यें, काव्यशेखरय, बुधगुणालंकार, लोवाडसंगराव, सारसंग्रह, शब्दकोश, कुसजातक, सुभाषित, परंगिहटन, महाहटन, कोस्तंतीनुहटन, सद्धर्मदास इ०)

या काळांतील वाङ्मयामध्यें देखील काव्यग्रंथांचा निर्देश प्रामुख्यानें येतो. १५ व्या शतकापासून सिंहली काव्यकलेंतील बहारीच्या काळास सुरवात होते. सिलोनांतील कविमंडलरूपी आकाशपटलावर श्रीराहुलथे हा अगदीं पहिल्या प्रतीचा तारा चमकत आहे. हा ६ वा पराक्रमबाहु याच्या कारकीर्दींत (१५ व्या शतकाच्या पूर्वार्धांत) होऊन गेला. दक्षिणेकडील प्रांतांतल्या ज्या जिल्ह्यांत तो होता त्या जिल्ह्याच्या नांवावरून त्याला तोटगमुव असें म्हणण्याचा परिपाठ आहे. त्याच्यापूर्वीच ठरून गेलेल्या काव्यकलेंतील नमुन्यावरहुकूम त्यानें जीं उत्कृष्ट काव्यें केलेलीं आहेत त्याबद्दल त्याची प्रसिद्धि आहे. त्यानें कोणताहि नवीन मार्ग घालून दिला नाहीं. मयूरसंदेश या काव्यापासून सयमक कविता लिहिण्यास जो आरंभ झाला तो क्रम सिंहली काव्यांमध्यें पुढें तसाच चालू राहिला. सर्व संदेशकाव्यांतील अत्यंत प्रसिद्ध साळलिहिणि संदेशय हें काव्य तोटगमुव यानेंच निर्माण केलेलें आहे. या काव्यांत १०४ पद्यें आहेत व त्यांतील मजकूर असा आहेः—मुल्लुरुलुवय नांवाचा प्रधान एका मैनेस जयवर्धनाहून (म्हणजे कोट्टेसो कोलंबोहून) कालनीय येथें श्रीबिभीषणाच्या देवालयांत पाठवितो व तेथें उलकुद नांवाच्या राजकन्येला मुलगा देण्याबद्दल त्या देवाची प्रार्थना करण्यास सांगतो. ती राजकन्या त्या प्रधानाची बायको असावी. आरंभींच्या पद्यांत त्या मैनेची प्रथम स्तुति केलेली असून नंतर ती मैना ज्या मार्गानें जावयाची त्या मार्गाचें अगदीं मेघदूतकाव्यांतल्या नमुन्याबरहुकूम वर्णन दिलेलें आहे; आणि त्या मैनेनें देवतेची जी प्रार्थना करावयाची ती सांगितलेली आहे.

तोटगमुवाचें परवी-संदेशय म्हणजे पारावत-दूत म्हणून काव्य आहे. मयूरसंदेशकाव्यांतल्याप्रमाणेंच यांत दूताला दोंद्र येथील श्रीविष्णूकडे जयवर्धनानें पाठविलें असून पराक्रमबाहु, त्याचा बंधु व राजाची कन्या चंद्रावती यांच्यावर भगवत्कृपा असावी अशी प्रार्थना करण्यास सांगितलें आहे.

तोटगमुवानें जातकग्रंथांतील माहितीवरून आपलें काव्यशेखरय हें १४ सर्गाचें मोठें काव्य तयार केलें. या काव्यांत बोधिसत्त्वाची तो सेनकपंडित झाला होता, त्या जन्माची कथा (सेनकजातक) आहे. त्यांतच आलेल्या एका वाक्यावरून असें दिसतें कीं, तें काव्य ६ वा परकुंब (पराक्रमबाहु) याच्या

कारकीर्दीच्या ३४ वें वर्षी पूर्ण झालें. ६ वा पराक्रमबाहु राजा याच्या स्तुतिपर असलेलें परकुंब-सिरित या नांवाचें काव्यहि याच कवीचें असें मानतात. परंतु तें त्यानेंच केलेलें आहे अशाबद्दल खात्री नाहीं. तथापि वर दिलेल्या राजाच्याच कारकीर्दीत तें झालेलें आहे यावद्दल मात्र शंका नाहीं. या काव्याची एखादी आवृत्ति प्रसिद्ध झालेली आहे किंवा काय तें कळत नाहीं.

तोटगमुव याचे समकालीन पण त्याच्याहून जरा वयानें लहान असे विदागमथेर व वात्ताव हे होत. त्यांपैकीं विदागमथेर बुधगुणालंकार याचा कर्ता आहे. त्यांत ६१२ कवितांमध्यें बुद्धाची स्तुति व त्याचीं तत्त्वें दिलेलीं आहेत. त्यांतील ६०९ व्या कवितेंत असें दिलेलें आहे कीं, बुद्धानंतर २०१५ वर्षांनीं व ६ वा भुवनेकबाहु याच्या कारकीर्दीतील तिसऱ्या वर्षी इ. स. १४७२ मध्यें तें काव्य पूर्ण झालेलें आहे. वात्ताव हा तोटगमुवाचा शिष्य व कुळुनागल प्रांतांतील धर्मोपदेशक असून तो गुत्तिल-काव्य याचा कर्ता आहे; व हें काव्य म्हणजे एळु-वाङ्मयांतील एक नमुनेदार ग्रंथ आहे. यांत एकंदर ५११ सयमक कविता असून तें गुत्तिलजातकाचें पद्यमय रूपांतर आहे.

आतां ज्या काव्यांचे कर्ते कोण यावद्दल निश्चित माहिती नाहीं आणि ज्यांचे कर्ते अजिबातच माहित नाहींत अशा कांहीं काव्यांकडे वळूं. लोवाडसंगराव हें काव्य १३५ कवितांचें असून सामान्य लोकभाषेंत लिहिलेलें आहे; त्यांत बुद्धाच्या उपदेशाप्रमाणें वागण्यास सांगितलें आहे; व तें विदागम येथील मठांतल्या एका भिक्षूनें केलेलें आहे. परंतु पूर्वी सांगितलेल्या विदागम कवीचें नांव ह्यावरूनच पडलेलें आहे किंवा काय हें निश्चित ठरविणें फार कठिण आहे. तसें ठरल्यास बुधगुणालंकारण याचा कर्ता आणि हा एकच असें म्हणतां येईल. या अनिश्चित वर्गांतच खालील तीन संदेश-काव्यांचा उल्लेख केला पाहिजे. यांतील अद्याप अप्रकाशित असें जें तिसर संदेशय म्हणजे हंस–दूत काव्य त्याला विशेषसा मान नाहीं. दुसरें गिर–संदेशय (कीरसंदेश), यांत एक दूत बनविलेला पोपट, तोटगमु मठांमधील श्रीराहुलाकडे जातो व तेथें त्या मठांतला मुख्य भिक्षु श्रीनाथ याच्याजवळ पराक्रमबाहु व त्याचें घराणें यांवर भगवत्कृपा असावी अशी प्रार्थना करण्याबद्दल त्याची याचना करतो. हें काव्य तोटगमुवाचा शिष्य व अनुकरणकर्ता अशा एखाद्या इसमाचें असावें. जयवर्धनापासून श्रीराहुलाच्या मठापर्यंतच्या मार्गाचें मोठें सुंदर वर्णन यांत केलेलें आहे. जयवर्धनाकडे स्वतः काव्य-कर्त्यानें प्रवास केलेला आहे. कोवुल-संदेशय म्हणजे "कोकिळ–दूत" हें काव्य अद्यापि हस्तलिखित स्थितींत असून तें देविनुवर (दोंद्र) येथील मठांतल्या एका भिक्षूनें ६ व्या पराक्रमबाहूचा मुलगा युवराज सपुमकुमरू याला उद्देशून लिहिलेलें आहे. त्यांत यापापतुन (जाफना) जिंकून घेतल्याबद्दल त्या युवराजाचें अभिनंदन केलेलें आहे; तें शहर काबीज केलें त्या प्रकाराचें सुंदर वर्णन व सिलोन-मधील दोंद्रपासून जाफनापर्यंतच्या सर्व मार्गाचें सविस्तर वर्णन यांत आहे.

**गद्यवाङ्मयः**—सिंहली वाङ्मयांतील या पहिल्या बहाराच्या काळांतील गद्यग्रंथांमध्यें पहिला ग्रंथ सद्धर्मरत्नाकरय अथवा सारसंग्रह या नांवाचा बौद्धधर्माबद्दलचा असून तो ६ वा पराक्रमबाहु याच्या कारकीर्दींत (१४१०–१४६२) लिहिलेला आहे. याच वेळचे तीन एळु–शब्दकोश पिदुम्मल, रुवनमल आणि नामावलिय असे आहेत. या शेवटल्या शब्द-कोशाला त्याच्यानंतरच्या नव-नामावलिय यापासून निराळा दाखविण्याकरतां पुराणनामावलिय असें म्हणतात. रुवनमल हा शब्दकोश ६ वा पराक्रमबाहु या राजानें स्वतः केला असें म्हणतात; आणि नामावलिय हा त्या राजाचा प्रधान नल्लूरुतुमय यानें लिहिला असा समज आहे. नल्लूरुतुमय हा राजकन्या उलकुद हिचा पति असून त्याचें नांव त्या काळांतील काव्य-ग्रंथांमध्यें पुष्कळ वेळां आलेलें आहे. शेवटीं व्याकरण-ग्रंथांपैकीं मोग्गल्लायन–पञ्चिका–प्रदीपय यावद्दल कांहीं सांगितलें पाहिजे. मोग्गल्लायन हा पाली-व्याकरणाचा कर्ता असून त्यांतील पद्धत कच्चयनाच्या पद्धतीहून भिन्न आहे. तो १२ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला अशी समजूत आहे. त्यानें मोग्गल्लायनवुत्ति अथवा मोग्गल्लायन-व्याकरण या नांवाच्या आपल्या व्याकरणग्रंथाला पारिभाषिक शब्दांचा कोश जोडलेला आहे. वर दिलेला ग्रंथ कांहीं पालीभाषेंत व कांहीं सिंहली-भाषेंत लिहिलेला आहे; व तो मोग्गल्लायनाच्या व्याकरणावरील टीकाग्रंथ असून पालीभाषेवरील अत्यंत विद्वत्तापूर्ण व साग्र ग्रंथांमध्यें त्याची गणना आहे.

यांशिवाय आणखी बुतसरणय आणि दहम् सरणय असे दोन ग्रंथ आहेत; त्यांपैकीं पहिल्याच्या नांवावरून तो बुद्धा-संबंधाचा ग्रंथ असावा व दुसऱ्याच्या नांवावरून तो त्याच्या धर्माबद्दलचा ग्रंथ असावा असें दिसतें; पण यापलीकडे त्यांची अधिक कांहीं माहिती मिळालेली नाहीं.

१६ व्या शतकाच्या अखेरची सिंहली वाङ्मयासंबंधानें फार महत्त्वाची गोष्ट अशी कीं, पहिला राजसीह हा राजा ब्राह्म-णधर्माकडे वळला व त्यानें बुद्धधर्म व त्याचे अनुयायी यांचा छळ केला. त्याला जेवढे बौद्ध ग्रंथ सांपडले तेवढे सर्व त्यानें जाळून टाकले; यामुळें पूर्वीच्या काळांतील पुष्कळ ग्रंथ नाहींसे झाले असें म्हणतात तें बहुधा खरें असावें.

तथापि या वाईट काळानंतर १७ व्या शतकाच्या आरंभीं बुद्धधर्माची पुनर्जागृति होऊन तेथील वाङ्मयाला दुसरा बहार आला; या बहारांतील अलगियवन्न मोहोट्टाल अथवा मुकवेटि या नांवाचा कवि विशेष महत्त्वाचा आहे. त्याचा मुख्य ग्रंथ कुसजातक हा असून तो याच नांवाच्या जातक-ग्रंथाचें पद्यात्मक रूपांतर आहे; व त्यांत बोधिसत्त्वानें

कुसराजाचा जन्म घेतला होता त्या जन्माची हकीकत आहे. कुसजातकाची भाषा सुंदर आहे, लेखनपद्धति कुशल कारागिरीची असून फारशी कृत्रिम भासत नाहीं. याचा तोटगमुवाशीं निकट संबंध असला पाहिजे असें वाटतें. त्या काव्याच्या शेवटल्या कवितेंत १५३२ शक म्हणजे इ. सन १६१० हें ग्रंथसमाप्तीचें साल म्हणून दिलेलें आहे. त्यांतील प्रस्तावनेवरून असें दिसतें कीं, तो राजसीह राजाचा प्रधान अत्तनयक याची वायको मानिक् असमी हिच्या सांगण्यावरून लिहिला गेला. त्यांत आरंभीं सावात (श्रावस्ती) नगरीचें वर्णन दिलेलें आहे.

सुभाषित काव्य नांवाचा एक दृष्टांतकथांचा व पद्यात्मक वचनांचा संग्रह असून तो मोहोट्टाल यानें केलेला आहे. साळुल-संदेशय अथवा कुक्कुटदूत हें काव्य व दुसरे अनेक आपणांस दुर्मिळ असलेले ग्रंथ त्यानेंच केलेले आहेत असें म्हणतात. दहमूसोंड-जातक हें जातक-नीतिसारय याचें पद्यात्मक रूपांतर असून त्यांत नीतिवचनांचा संग्रह आहे; मुनिगुण-रत्नमालय यांत बुद्धाच्या गुणांची स्तुति आहे; आणि दुस्सील-वत यांत बुद्धसिक्षूंच्या दुर्वर्तनाचें वर्णन आहे.

परंगि-हटन आणि महा-हटन हे ग्रंथ मोहोट्टालनें केले असें कांहींजण मानतात, परंतु ते त्यानें लिहिलेले खास नाहींत. त्यांपैकीं परंगिहटन यांत २ रा राजसीह राजा यानें पोर्तुगीज लोकांबरोबर केलेल्या युद्धांत मिळविलेल्या विजयांचें पद्यांत वर्णन केलेलें आहे; आणि महाहटन या ग्रंथांत डच व सिंहली यांच्यामध्यें झालेल्या लढायांचें वर्णन आहे. यांशिवाय १७ व्या शतकाच्या आरंभीं लिहिलेलें कोस्तंतीनु-हटन हें तिसरें युद्ध-विषयक गाण्यांचें पुस्तक आहे. याचा कर्ता कोणी नेटिव्ह ख्रिस्ती इसम असावा असें प्रास्ताविक कवितांमध्यें इतर काव्यांप्रमाणें बुद्धाची प्रार्थना नसून ख्रिस्ताची प्रार्थना आहे यावरून दिसतें. पोर्तुगीज सेनापति कान्स्टंटिनो ड सा यानें बंडखोर मयदुन्न याच्यावर स्वारी करून त्याला लिह्नोपिलिय येथें ठार मारलें, या प्रकाराचें या काव्यांत वर्णन आहे. यांतील भाषासरणी सुंदर आहे. या सरणीच्या स्वरूपा-वरून या कवीनें मोहोट्टालाच्या काव्यांचा चांगला अभ्यास केलेला असला पाहिजे असें वाटतें. मोहोट्टालाच्या भाषाशैलीचें प्रतिबिंब या काव्यांत जागोजाग स्पष्ट दिसतें.

अर्वाचीन काळांतील गद्यग्रंथांमध्यें सद्धर्मदास नांवाच्या ग्रंथाचा प्रथम उल्लेख केला पाहिजे. मिलिंद-पन्हाचा तो सिंहली तरजुमा असून, अनेक हस्तलिखित प्रतींच्या द्वारा त्याचा फैलाव झालेला आहे. परंतु हा ग्रंथ कोणीं लिहिला ती माहिती मिळत नाहीं. सतराव्या शतकाच्या अखेरीस व अठराव्या शतकाच्या आरंभीं, राजवलिय व राजरत्नाकरय असे दोन ऐतिहासिक ग्रंथ तयार झाले. मुख्यतः महावंशाच्या आधारानें ते लिहिलेले असल्यामुळें, स्वतंत्र इतिहास या दृष्टीनें ते फारसे महत्त्वाचे नाहींत. तथापि त्यांतील कांहीं मजकूर सरकारी दप्तरांतून घेतला असल्यामुळें त्यांनां महत्त्व आलें आहे.

**अठरावें व एकोणिसावें शतकः**—लंकेंत वाङ्मया-संबंधीं अद्यापि उत्साह दिसून येतो, व पूर्वीप्रमाणेंच हल्लींहि सर्व काव्यांत एळु भाषाच वापरली जाते. गेल्या दोन शतकां-तील ग्रंथांची सविस्तर माहिती दिल्यास हें प्रकरण फार वाढेल, यामुळें फक्त महत्त्वाच्या ग्रंथांच्या व ग्रंथकारांच्या नांवांचा येथें आपण उल्लेख करूं. या कामीं एल्. डी. झोयझा यांची यादी उपयुक्त आहे.

सिंहली वाङ्मयाच्या या लहानशा कालावधींत भाषा-शास्त्रज्ञ व इतिहासकार यांनां महत्त्वाचे असे फारसे ग्रंथ सांपडणार नाहींत.

तोटगमुव, वात्ताव व मोहोट्टाल यांच्या धर्तींवर जातकांचे पद्यात्मक तरजुमे करण्याचा या वेळीं फार प्रचार पडला होता. पंडित कुलतुंगानें इ. स. १८१४ त एक मुनिचार-जातकय व राजाधिराजसीह राजानें (१७८०–१७९८) एक असदिस-जातक लिहिलें. समरजीव पत्तायमे लियन आरची (१७७१) याचा कवमिणिकोंडल हा ग्रंथ अलिनचित्त-जातकाचा पद्यात्मक तरजुमा असून, समरसेकर दिसानायकाचा (१७७३) कवमिणि मल्दम हा ग्रंथहि सोनक-जातकाचा अशाच प्रकारचा तरजुमा आहे. सालिआल्लेमणिरतन तेरुन्नान्से (१७८४) याचा कवमुतुहर हा ग्रंथहि दसरथ-जातकाचा तरजुमा आहे. तररंबे धम्माक्खंध तेरुन्नान्से (१८२६) याचा कवसिळुमिण हा अंधभूत-जातकाचा पद्यात्मक तरजुमा व मडिहे-श्री-सुमित्त-धम्मक्खंध तेरुन्नान्से (१८३२) याचा कवमिणिरंदम हे दोन्ही ग्रंथ एकोणिसाव्या शतकांत झालेले आहेत. इ. स. १८५६ त सिंहवा नांवाच्या कवीनें तलपत्त-जातकय नांवाचा एक ग्रंथ लिहिला.

संदेशकाव्यांमध्येंहि या काळांत चांगली भर पडलेली आहे. कित्ति-सिरि-राजसीह या राजाच्या कारकीर्दींत होऊन गेलेला बरम गणितया या कवीनें नीलकोवो-संदेशय हें काव्य केलें आहे. यांत कवीनें निळ्या कवुतराला दूत बनविलें आहे, व या दूताला कतरगम नांवाच्या देवतेची आपणावर कृपा व्हावी म्हणून प्रार्थना करण्याकरतां तिच्याकडे पाठविलें आहे. शेवटचें संदेशकाव्य म्हणजे १८०६ सालांतील अत्थदस्सि तेरुन्नान्से याचें सुव-संदेशय हें काव्य होय. यांत दूत बनवलेल्या पोपटाला कवीचें राहण्याचें ठिकाण जें बेदिगम विहार तेथून मुलगिरिगल विहार येथें पाठविलें आहे.

या काळांतलीं कांहीं शृंगारिक काव्यें ज्या नमुन्याचीं आहेत तसल्या नमुन्याचीं काव्यें जुन्या सिंहली वाङ्मयांत आढळत नाहींत. पूर्वी उल्लेख केलेल्या पत्तायमे लियन आरची याचें वियोवगरत्नमालय आणि दुनुविल गजनायक निलमे (१८११) याचें रतिरत्नालंकारय हीं अलीकडील दोन

रतिकाव्यें प्रसिद्ध आहेत. जुन्या काव्यग्रंथांत शृंगारिक काव्यें फारशीं नाहींतच; आणि संस्कृत वाङ्मयामधील अनेक ग्रंथांमध्यें जी कामासक्ति दिसून येते तसली कामासक्ति या काव्यांतून कधींच आढळत नाहीं.

बौद्धधर्मांतील विचारांची परंपरा दाखविणाऱ्या ग्रंथांत गेल्या शतकाच्या शेवटीं निर्माण झालेल्या सुमन थेराच्या तिरतनमालाव या काव्याचा, आणि बौद्धधर्मांतील "तीन रत्नें" ( बुद्ध, धम्म व संघ ) या स्तुतिपर ग्रंथाचा व बुद्धाच्या अवशेषांसंबंधींच्या वालिगल दाठागोत् पदिपय या काव्याचा समावेश केला पाहिजे. मातराचा किरम-तेरुन्नान्से (१८२०) हा ग्रंथ व विजयाचा पिता सीहबाहु याची गोष्ट ज्यांत सांगितली आहे असा त्याचाच सियबस्मल्दम हा ग्रंथ यांचा समावेश जुन्या सिंहली राष्ट्रीय-आख्यायिका-वाङ्मयांत होतो.

सिंहली वाङ्मयाचें अवलोकन येथपर्यंत झाल्यानंतर थोडेंसें सिंहली कोरींव लिखाणांचें वगैरे अवलोकन करूं. कारण हीं लिखाणें हें एक प्रकारचें वाङ्मयच आहे.

**सिंहली शिलालेखः**—सिंहली शिलालेखांचा सर्वांत जुना काळ म्हणजे इ. पू० च्या शेवटच्या शतकापासून तों इ. स. च्या ५ व्या शतकापर्यंतचा होय. या काळांतील सर्व शिलालेख अशोकाच्या शिलालेखांतल्या ब्राह्मी लिपीमध्येंच लिहिलेले आहेत; व याच लिपीमधून नंतरच्या शिलालेखांची लिपी व पुढें झालेल्या ग्रंथांतील लिपी तयार झालेली आहे. हे शिलालेख लेण्यांमध्यें किंवा खडकावर कोरलेले आहेत.

गुहालेखांची एकंदर संख्या मोठी आहे. हे लेख पूर्वी ज्यांत बौद्ध भिक्षू राहत असत परंतु आतां जीं रिकामीं पडलेलीं आहेत अशा लेण्यांच्या प्रवेशद्वारांवर लिहिलेले आहेत. त्या सर्व लेखांत थोडक्यांत प्रथम ज्यांनीं लेणें तयार करून तें बौद्ध भिक्षूंच्या उपयोगाकरितां त्यांच्या स्वाधीन केलें त्यांचीं नांवें, किंवा त्यांच्या मालकांचीं नांवें दिलेलीं असतात. उदाहरणार्थ दंबूल येथील पहिल्या लेण्यावर पुढील शिलालेख आहेः—

देव न पिय महा राजस गमी नितिस स महा लेने अ ग त अ न ग त च तु दिस स गस दिने

"देवांचा आवडता गमिनितिस्स या महाराजाचें हें मोठें लेणें असून तें हल्लींच्या व पुढील काळांतल्या पृथ्वीच्या पाठीवरील चारी ( प्रदेशांतल्या ) दिशांतल्या भिक्षूंना अर्पण केलेलें आहे".

इ. मुल्लर म्हणतो कीं, "गमिनीतिस्स" हा "गमिनीचा मुलगा तिस्स" या शब्दांचा संक्षेप असावा, व त्यावरून इ. पू० १ ल्या शतकांतील वट्टगामनी अभय याचा पुत्र महाचूल तिस्स या राजाचा हा लेख असावा. हें मुल्लरचें अनुमान बरोबर असावें असें वाटतें.

हिनतिपोने ( कागल्ला ) येथील लेण्यांतील शिलालेख तर याहूनहि ल्हान आहे.

उ पा स क अ स ह ले ने

"अस या उपासक-बंधूचें हें लेणें आहे"

दुसरा एक विशेष लक्षांत घेण्यासारखा शिलालेख आहे; त्यांत उजवीकडून डावीकडे अक्षरें वाचावीं लागतात; हा लेख अंबलकंद येथील लेण्यावर आहे.

खडकांवरील लेख हे मठांनां दिलेल्या जमिनींच्या देणग्यांसंबंधानें व भिक्षूंनां दिलेल्या देणग्यांसंबंधानें व असल्या इतर गोष्टींसंबंधानें आहेत. या शिलालेखांतील व त्या बेटांतील एकंदर शिलालेखांतहि सर्वांत जुना लेख म्हणजे तिस्समहाराम ( दक्षिणेकडील प्रांतांतल्या हंबंतोलाच्या उत्तरेस) येथील शिलालेख होय. हा इ. मुल्लर याच्या यादींतील ४ थ्या नंबरचा शिलालेख होय. त्यांत आलेल्या नांवांचे मुल्लरनें दिलेले अर्थ सर्व बरोबर आहेत. महनक राजाचा पुत्र अलुणक राजा हा यांचा उत्पादक असें सांगितलेलें आहे; हा महनक राजा म्हणजेच देवानंपिय तिस्स याचा धाकटा बंधु महावंश ग्रंथांतील महनग राजा होय असें मानणें बरोबर होईल किंवा नाहीं यावद्दल संशय आहे. पण तसें मानल्यास मात्र हा शिलालेख इ. पू० ३ ऱ्या शतकांतला आहे असें ठरेल.

पहिल्या कालखंडांतील शिलालेखांपैकीं विशेष मोठा म्हटला तर मिहिंतलेचा शिलालेख होय. ( इ. म्यु. नं. २० ). अंबत्थल दाघोबाकडे जाण्याचा जो दरवाजा आहे त्याच्यापुढें रस्त्याच्या उजव्या बाजूला हा शिलालेख आहे. खडकाळ व किंचित् उतरत्या जमिनींतील एका मोठ्या वक्रतुण्ड शिळेवर हा लेख खोदलेला आहे. परंतु यांत नुसती धार्मिक देणग्या वगैरेसंबंधींच माहिती आहे. हा लेख पहिला मेघवण्ण अभय ( इ. स. पूर्वी ३ तिसऱ्या शतकाचा उत्तरार्ध ) याच्या कारकीर्दींतील असावा असें इ. मुल्लर याचें म्हणणें आहे; परंतु येथें मतभेद आहे. रत्नलगलच्या ( नं. ६ ) शिलालेखाप्रमाणें हाहि त्याच नांवाच्या राजाचा शिलालेख असावा असें गायजरला वाटतें. रुवणवली दाघोबाच्या गच्चीवर खोदलेले जे २१ नंबरचे शिलालेख आहेत—हे शिलालेख काळाच्या तडाक्यांत सांपडून बरेच खराब झाले आहेत—ते शिलालेख निःसंशय पहिला मेघवण्ण अभय (३ ऱ्या शतकाचा उत्तरार्ध) याच्या कारकीर्दींतील किंवा तिसरा मेघवण्ण अभय ( ४ थ्या शतकाचा पूर्वार्ध ) याच्या कारकीर्दींतील असावेत. पी. गोल्डश्मिट यानें हवरणें येथील सुंदर शिलालेख (इ. म्यु. नं. ६१) वरील दोहोंपैकीं शेवटल्या मेघवण्ण अभयाचा आहे असें म्हटलें आहे, परंतु त्यानें या बाबतींत खात्रीलायक पुरावा दिला नाहीं.

सर्वांत जुन्या शिलालेखांत जीं राजांचीं नांवें आलीं आहेत त्यांपैकीं कांहींचा उल्लेख केला पाहिजे. गामिनी अभय ( वट्टगामनी अभय ) हा इ. स. पूर्वी पहिल्या शतकांत होऊन

गेला; (इ. म्यु. नं. १ व ८); वहव (=वसभ) हा इ. स. च्या पहिल्या शतकांत झाला. (नं. ७ व १०); व गजबाहु गामिनी अभय (पहिला गजबाहु) हा इ. सनाच्या दुसऱ्या शतकाच्या आरंभीं होऊन गेला (नं. ५). त्याच नांवांचा वारंवार उल्लेख आल्यामुळें कोणचें नांव कोणाचें हें ठरविणें हें नेहमींच फारसें सोपें नसतें.

प्राचीन शिलालेखांत खरोखरी ऐतिहासिक अशी माहिती कांहीं मिळत नाहीं. भाषाविषयक दृष्टीनें मात्र ते पुष्कळ उपयोगी आहेत. कारण, या लेखांत सिंहलीभाषा तिच्या प्राकृत पायाभूत रूपांतून विकास पावून उच्च अभिजात वाङ्मयाच्या काळांतील सिंहलीचें स्वरूप तिला कसें प्राप्त होत गेलें हें आपणास पहावयास सांपडतें.

इसवी सनाच्या पांचव्या शतकापासून पुढें शिलालेख फारसे आढळून येत नाहींत, याचें कारण इ. मुल्लर याच्या मतें त्या वेळीं राजकीय अंदाधुंदी माजली होती हें होय. हें मुल्लरचें म्हणणें बरोबर आहे असें वाटतें. आतां आपणांस इ. सनाच्या ५ व्या शतकापासून ९ व्या शतकापर्यंत जो संक्रमणाचा काल आहे त्याकडे पहावयाचें. या काळांतील शिलालेख सुमारें १२ असावेत असें कांहींचें म्हणणें आहे. कारण, यांतील लिपी अशोकाच्या काळांतील वर्णलिपीहून किंचित् निराळी आहे. या लेखांतील अक्षरांनां वाटोळें वळण विशेष मिळालें आहे, हीं काळजीपूर्वक लिहिलेलीं नाहींत, यांचा आकार मोठा नाहीं व प्राचीन लेखांप्रमाणें हीं खोल खोदलेलीं नाहींत; तथापि जिच्या योगानें कालनिर्णय करितां येईल अशी कोणतीहि माहिती यांपैकीं एकाहि लेखांत आढळून येत नाहीं, हें येथें स्पष्टपणें सांगितलें पाहिजे. प्राचीन लिपिशास्त्राच्या दृष्टीनें विचार केला असतां या लेखांतील जुन्या लिपीवरून ते दहाव्या शतकापासून आरंभ होणाऱ्या दुसऱ्या कालखंडामध्यें न जातां त्या पूर्वींच्या पहिल्या कालखंडांतच जाऊं शकतात. ह्या प्रथमकालखंड व द्वितीयकालखंड यांच्या मध्यें बरीच मोठी फट पडली आहे. प्रथमकालखंडांतील अलीकडील शिलालेखांत जी लिपी आहे तिच्यांत व अशोक लिपींत फारसे महत्त्वाचे फरक नाहींत. उलटपक्षीं द्वितीयकालखंडांतील अगदीं जुन्या लेखांतहि सध्याची सिंहली लिपी लिहिण्याची जी मोडी पद्धति आहे ती पूर्णत्वानें दृष्टीस पडते.

पांचव्या आणि नवव्या शतकाच्या मध्यंतरींचा संक्रमण-काल भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा होता. या कालामध्यें अभिजात सिंहली भाषेचे वैशिष्ट्यबोधक उच्चार-विशेष बनले गेले.

द्वितीय कालखंडाच्या सुरवातीस जो शिलालेखसमुच्चय दृष्टीस पडतो त्याची भाषा मागाहून रूढ झालेल्या सिंहली भाषेप्रमाणें संस्कृतमिश्र नाहीं. या १० व्या शतकांतील शिलालेखांत खालील नांवें सांपडतात. हीं नांवें अमुक अमुक राजांचीं आहेत हें गोल्डस्मिटनें निश्चित केलें आहे.

१. सिरि संगवो=चवथा कस्सप (९१२–९२९).
२. अवा सिरिबो=पांचवा कस्सप (९२९–९३९).
३. अवा सलमेवन(दापूळ)=पांचवा दापूळ(९४०–९५२).
४. महिंद(अथवा सिरिसंगवो)=चवथा महिंद(९७५–९९१).

'सिरिसंगवो' हें कोणाचेंहि नांव नसून ही एक पदवी आहे व ती राजाला लावीत असत, ही गोष्ट गोल्डस्मिटच्या नजरेस प्रथम आली, व त्या योगानें लेखांच्या कालनिर्णयाचें काम सोपें झालें. जरी गोल्डस्मिटचे वरील सर्वच अर्थ निर्दोष नाहींत तरी त्यापेक्षां चांगले अर्थ सुचविणें कठिणच आहे.

कोलंबोच्या वस्तुसंग्रहांत सध्यां असलेला महाकलत्तनाचा स्तंभलेख (नं. ११०) चवथ्या कस्सपाच्याच कारकीर्दींत झाला असला पाहिजे. इल्लवावचे शिलालेख (नं. ११६) व आतवीरगोल्लावचे शिलालेख (नं. ११७) हे पांचव्या दापूळच्या कारकीर्दींत झाले. उत्तरोक्त शिलालेखामध्यें दापूळचा बाप अलअवासिरिसंग याचा उल्लेख आहे व हा राजा दक्षिण हिंदुस्थानांतील पांडी नांवाच्या जातीच्या लोकांवर चालून गेला असें त्यांत म्हटलें आहे. पांचव्या कस्सपानें पांडी राजांच्या मदतीनें चोलांवर स्वारी केल्याचा उल्लेख महावंशांत आहे. वरील यादींतील शेवटचा चवथा महिंद याच्या कारकीर्दींतला शिलालेख म्हटला म्हणजे मेजलगस्तोत हा होय. हा तिस्स महारामच्या शिलालेखाच्या (नं. १२०) जवळच आहे. या शिलालेखाच्या वेळीं महिंद राजा रोहणचा सुभेदार होता. या शिलालेखांत अवा सलमेवन व गोन ह्यांचा मीं मुलगा आहें असें तो म्हणतो.

परंतु मिहिंतले येथील शिलालेख (नं. १२१) मागील सर्वांपेक्षां विस्तृत आहे व या सर्वांपेक्षां ज्यास्त चांगल्या स्थितींत आहे. ते लेख दगडी शिलांवर खोदून त्या शिला टेंकडीच्या मध्यावर वसविल्या आहेत. येथून जवळच अंबत्थल दागोबाला जाणाऱ्या पायऱ्या लागतात. शिलालेखा-मधील तिसऱ्या ओळीमध्यें सिरिसंगबोग अबहे हें नांव आल्यामुळें कांहीं लोकांनां तो शिलालेख ३ तिसऱ्या शतकांतला आहे असें वाटलें. अलविन्सनें हेंच मत स्वीकारलें आहे, परंतु हें मत प्राचीन लिपिशास्त्राच्या दृष्टीनें चूक आहे. गोल्डस्मिटनें आपले शोध प्रसिद्ध करण्यापूर्वी अलविन्सचेंच मत लोकांनां खरें वाटत होतें. चवथ्या महिंदाच्याच कारकीर्दींत हा शिलालेख लिहिला गेला ही गोष्ट, महिंदानें आपल्या आईबापांचा जो येथें नामनिर्देश केला आहे तो व मेजलगस्तोत शिलालेखांतील नामनिर्देश हे दोन्ही एकच आहेत ह्या गोष्टीवरून सिद्ध होतें. मिहिंतले शिलालेख महिंद राजाच्या कारकीर्दींतल्या शेवटल्या वर्षांत

म्हणजे आपल्या हिशोबानें इ. स. ९९१ मध्येंच लिहिला गेला असें ठरतें. त्या लेखावरून कालनिर्णयाला मुळींच मदत होत नाहीं, कारण त्यांत आतविहारच्या भिक्षुकांचे नियम दिले आहेत, दुसरें कांहीं नाहीं.

सिलोनमधील १२ व्या व १३ व्या शतकांतील शिलालेखांचा विचार करावयास लागलों म्हणजे सिलोनचा अत्यंत बलाढ्य राजा जो पहिला पराक्रमबाहु (इ. ११६४–११९७) त्याचे दोन लेख प्रामुख्यानें पुढें येतात.

पहिला म्हणजे गलविहारचा होय (नं. १३७). गलविहार पोलोन्नरुवमध्यें आहे. त्याचा काल "भगवान् बुद्धाच्या नंतर ४५४ वर्षांनीं जो वलगम नांवाचा राजा झाला त्या राजाच्या नंतर १२५४ वर्षांनीं" असा सांपडतो; म्हणजे बुद्धानंतर, १७०८ व्या वर्षी अथवा इ. स. ११६५ मध्यें हा लेख लिहिला गेला. ह्या शिलालेखामध्यें आपण बुद्धाचे नियम व त्याचें धर्मशिक्षण पुन्हा सुरू केलें अशी पराक्रमबाहूची दर्पोक्ति आहे यावरून त्यानें वरींच वर्षे राज्य केलें असें दिसतें आणि त्यावरून पराक्रमबाहु राजाचा राज्याभिषेक इ. स. ११६४ चे पूर्वी झाला असें धरून चाललें पाहिजे.

सामान्य लोकांचें मत ११६४ हेंच राज्याभिषेकवर्ष असावें असें आहे. पण वरील कारणांसाठीं तें चुकीचें दिसतें. ह्याच राजाचा दुसरा म्हणजे देवनगलचा शिलालेख फारच महत्त्वाचा आहे. इतिहासाच्या दृष्टीनें तो सिलोनमधील सर्व लेखांत श्रेष्ठ आहे. त्यामध्यें पहिल्या पराक्रमबाहूनें अरमण अथवा पालिरामण्ण म्हणजे पेगु देशावर जी स्वारी केली तिचा उल्लेख आहे; आणि महावंशामध्यें (अ. ९६, १०–७५) ह्या लढाईची जी हकीकत आहे तिला हा लेख पुष्टि देतो. ती गोष्ट ऐतिहासिक आहे, हें तर त्या लेखावरून दिसतेंच, परंतु किरकोळ बाबतींतसुद्धां महावंशांतील आणि या लेखांतील हकिकती जुळतात. दोन्ही ठिकाणीं सिंहली सेनानायकांनीं काबीज केलेल्या कुसुमी शहराचा उल्लेख केलेला आहे, त्याचप्रमाणें कित्ति व नगरगिरि ह्या दोन सेनापतींचा उल्लेख दोन्हींकडे आहे. हा लेख सेनापतीच्या सन्मानार्थ कोरलेला आहे व त्याचा विषय राजानें ह्या सेनापतींचा केलेला अपूर्व गौरव हा होय.

देवनगल लेखाचें महत्त्व किती आहे हें प्रथम बेलनें 'कागल जिल्ह्याचा रिपोर्ट' (पृ. ७३) (Bell's Report of the Kagall District) ह्या पुस्तकांत लोकांच्या नजरेस आणलें, परंतु मुल्लरच्या पुस्तकांत पहिल्या पांचच ओळी दिल्या आहेत व बेलचा रिपोर्ट मिळत नाहीं.

ह्याहून अधिक विस्तृत व संख्येनें ज्यास्त असे निःशंक मल्ल (११९८–१२०७) याचे शिलालेख आहेत. त्यानें बरेच विहार बांधले व तो समंतकूट (अडॅम्सपीक) येथें यात्रेकरतां गेला एवढेंच महावंशांत सांगितलें आहे.

त्या राजाच्या शिलालेखांतील बहारदार वर्णनें महावंशांतील हकिकतीशीं मुळींच जुळत नाहींत, यामुळें महावंशांतील हकिकतीवर कितपत विश्वास ठेवावयाचा असा संशय उत्पन्न होतो.

दांबूळ आपल्या शिलालेखामध्यें (नं. १४३) आपण सिलोनमध्यें शांतता व सुरक्षितता स्थापिली असें म्हणतो; आणि आपण कांहीं धर्मार्थ इमारती बांधल्या व बुद्धाचे पुतळे दांबूळ विहारामध्यें उभे केले आणि तेथील देउळाचें नांव 'सुवर्णगिरिगुहा' असें ठेवलें असेंहि तो सांगतो. ह्याच तऱ्हेचा रुवणवलिदागोबा येथील लेख आहे. ही शिला वरीच मोठी असून प्रार्थनास्थानाच्या पूर्वबाजूस आहे. ह्या लेखाची भाषा अर्वाचीन असून ती सुशिक्षित सिंहली माणसास वाचतां येण्याजोगी आहे. ह्या लेखामध्यें राजानें आपल्या कारकीर्दींतील चवथ्या वर्षी पुलस्तिपुराहून अनुराधपुरापर्यंत केलेल्या यात्रेचें वर्णन आहे. पोलोन्नरुव येथील "गलपोत" (शिलापुस्तक) नांवाचा शिलालेख विशेष महत्त्वाचा आहे. तो एका वज्रतुंड दगडाच्या तीन बाजूंवर कोरलेला आहे; त्याची लांबी २३ फूट ४ इंच, रुंदी ४० इंचांहून अधिक व जाडी २० इंच आहे. निस्संक मल्लानें त्यांत आपल्या राज्याभिषेकाचा उल्लेख केला आहे; त्याचप्रमाणें त्यानें स्वतःच्या प्रजेकरितां व धर्माकरितां केलेल्या प्रयत्नांचा उल्लेख त्यांत आहे. तसेंच त्यानें हिंदुस्थानावर केलेल्या एका स्वारीचें तेथें वर्णन आहे, व अनेक राजांशीं त्याचे झालेले करारनामे व तह ह्यांचाहि उल्लेख त्यांत आहे; परंतु ह्या बाबतींत महावंश मूकवृत्ति स्वीकारितो ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

दक्षिण सिलोनमध्यें सुद्धां निस्संकमल्लाचे शिलालेख आहेत. त्यांपैकीं दोन लेखांमध्यें (नं. १५२, १८२) त्यानें उपरिनिर्दिष्ट हिंदुस्थानांतील स्वारीचा उल्लेख केलेला आहे, आणि तिसऱ्या लेखामध्यें (नं. १५३) दांबूल लेखामध्यें म्हटल्याप्रमाणेंच, त्या द्वीपांतील निरनिराळ्या शहरांची आपण तपासणी केली व हें द्वीप आपल्यामुळें भरभराटीस आलें असें तो म्हणतो.

ह्याच संबंधांत साहसमल्लाचा म्हणजे निस्संकमल्लाच्या सावत्र भावाचा शिलालेख (इ. म्यु.नं.१५६) आपणांस विचारांत घेतला पाहिजे. ह्या लेखांत निस्संकमल्लाच्या राज्याभिषेकाची मिति दिलेली आहे. ती बुद्धशकाचें १७४३ वें वर्ष म्हणजे इ. स. १२०० हें वर्ष होय. हा लेख हाट-दा-गे-च्या उत्तरेस असणाऱ्या पोलोन्नरुव येथें सांपडला. यांत लागविजयसिंग कित् ह्या सेनापतीचा उल्लेख केलेला आहे. हें नांव 'गलपोत' लेखामध्यें सांपडतें. या लाग-विजयानेंच नं. १५७ चा शिलालेख करविला. हा शिलालेख अनुराधपुरांतल्या अबयवाव्याच्या जवळ एका शिलास्तंभावर आहे.

दुसऱ्या पराक्रमबाहूचा (इ. स. १२५०) कागल जिल्ह्यांतील नरनबेद्द येथील शिलालेख ऐतिहासिकदृष्ट्या

तितक्याच महत्त्वाचा आहे. तामिळ राजांवर ह्या राजानें जी चढाई केली तिचा आणि यानें आपल्या नांवाचा जो एक मठ स्थापन केला त्याचा महावंशाप्रमाणेंच या लेखांत उल्लेख आहे. द्वितीय पराक्रमबाहूचा आणखी एखादा लेख आहे किंवा नाहीं, हें कांहीं खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं. कारण, रुणवली ( नं. १५८ ) व दोन्द्र ( नं १५९ ) येथील शिलालेखांत 'सिरिसंगवो' (पराक्रमबाहु) ह्या नांवानें कोणत्या पराक्रमबाहूचा निर्देश केला आहे, हें निश्चित सांगतां येत नाहीं.

तेराव्या शतकानंतरचे शिलालेख आहेत त्यांमध्ये पहिला, तिसऱ्या विक्रमबाहूचा गंपोल येथील शिलालेख होय. हा शके १२८२ म्हणजे इ. स. १३६० मध्यें लिहिला गेला आहे. यानंतरचे शिलालेख ई. मुल्लरचे प्राचीन शिलालेख पृष्ठ ७० ( Muller's Ancient Inscriptions, Page 70 ff. ) व बेलचा कागल जिल्ह्याचा रिपोर्ट, पृष्ठ ७९ ( Bell's report of the Kagall District Page 79 ff.), या दोन ग्रंथांत सांपडतात. यांतील थोडे खालीं देत आहों:—

( १ ) कोट्टमध्यें ( १५ व्या शतकाच्या सुरवातीस ) राहणाऱ्या सहाव्या पराक्रमबाहूनें कोट्टाच्या जवळच पापीलियान चा शिलालेख ( नं. १६० ) लिहविला. कारगल ( न. १७० ई. मु. ) व हरकगोड ( बेल, पृष्ठ ८१ ) येथील लेखहि त्यानेंच लिहविले.

( २ ) पंधराव्या शतकांतील उत्तरार्धामध्यें उदयास आलेल्या सहाव्या भुवनेकबाहूचे वालीगम ( १६१ ई. मु. ) आणि देदिगम ( पृ. ८३–८५ ) असे दोन शिलालेख आहेत.

( ३ ) धर्मपराक्रमबाहु नांवाच्या राजाचा ( सोळाव्या शतकाचा आरंभ ) उल्लेख कालनी देवळांत असणाऱ्या शिलालेखांत आहे. त्यांतच या राजाचा राज्याभिषेक बुद्धानंतर २०५१ वर्षांनीं म्हणजे इ. स. १५०८ मध्यें झाला असा उल्लेख आहे.

या राजाचें नांव महावंशांत मुळींच नाहीं. परंतु राजावलीयामध्यें तें सांपडतें. तो बहुतकरून सातव्या विजयबाहूचा शत्रू असावा. दोन्द्र शिलालेख ( नं. १६३ मुल्लर ) व कप्पगोडमधील शिलालेख ( बेल पृ. ८६, ८७ ) याचेच आहेत.

(४) देवनगल नं. २ हा शिलालेख ( बेल पृ. ८७–८८ ) पहिल्या विमलसूर्याचा ( १५९२–१६२० ) आहे.

(५) सेलवचा शिलालेख ( बे. पृ. ८९–९० ) हा बहुतकरून शेवटचा सिंहली शिलालेख होय. हा राजसिंहाच्या कारकीर्दीत कोरला गेला असून त्याच्यावर बुद्धानंतर २३४९ वर्षांनीं म्हणजे इ. स. १८०६ असा काल आहे.

आतां सन्नसांसंबंधानें म्हणजे राजांच्या दानलेखांसंबंधानें चार शब्द सांगणार आहों. दानासंबंधींच्या शिलालेखाला सन्नस म्हणतां येईल परंतु या शब्दाचा जो संकुचित अर्थ आहे, त्याप्रमाणें सन्नस म्हणजे ताम्रपट, सुवर्णपट किंवा रजतपट अथवा भूर्जपत्रावरील लेख असा अर्थ घेतात. ह्या सन्नसांपैकीं बऱ्याच लेखांच्या नकला करण्यांत आल्या असून त्यांविषयीं बराच ऊहापोह झालेला आहे. उपरिनिर्दिष्ट बेल साहेबांच्या कागल जिल्ह्याच्या रिपोर्टांत तेथील सन्नसांसंबंधानें विचार केला गेलेला आहे. ( बेल पृ. ९१ ). अशा तऱ्हेचे दानलेख करून भिक्षुकांनां किंवा गृहस्थांनां देणग्या देण्याची पद्धति बौद्ध लोकांच्या चांगलीं कर्मे केल्यानें पुण्य मिळतें ह्या मतावरून आली असावी किंवा राज्याची उत्कृष्ट सेवा केल्याबद्दल कांहींतरी बक्षिस द्यावें हाहि या दानांचा उद्देश असेल. ह्या दानपद्धतीचा आरंभ १४ व्या शतकाइतका जुना आहे किंवा त्याहून आधींचा असेल, आणि ही पद्धति सिंहली राज्याच्या नाशापर्यंत चालू होती. बेलसाहेबांच्या यादीप्रमाणें ३२ सन्नसांचा आतांपर्यंत कागल जिल्ह्यांतच शोध लागला आहे. ह्यांपैकीं अतिशय जुना सन्नस म्हटला म्हणजे पांचव्या भुवनेकबाहू राजाचा गणेगोड सन्नस ( १३९७ ) हा होय व सर्वांत अलीकडील म्हणजे विक्रमराज सिंहाचा १८१३ सालांतला मोल्लिगोड सन्नस हा होय. हा दुसरा सन्नस धातूवरचें उत्कृष्ट काम ह्या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. सन्नसाचें एक चांगलें उदाहरण म्हणून १६४४ सालीं भूर्जपत्रावर लिहिलेल्या मंगलगमसन्नसाचा उल्लेख करितां येईल.

सिंहली चिरजीवि लिखाणांचें म्हणजे लेण्यांतील लेख, खडकांवरील लेख, स्तंभलेख, ताम्रपट इत्यादिकांचें अवलोकन आतांपर्यंत झालें तेवढें आपल्या स्थलावकाशाच्या दृष्टीनें पुरेसें झालें आहे. आतां सिंहली ग्रंथ-वाङ्मयाचें सिंहावलोकन करून या वाङ्मयाच्या स्वरूपावरून जे प्रश्न सुचतात त्यांजकडे वळूं.

सिंहलद्वीपामध्यें बौद्धसंप्रदायाच्या प्रवेशाबरोबर ज्या भारतीय संस्कृतीचा व परंपरांचा प्रवेश झाला त्यांचें उत्तररूप आपणास तेथें तयार झालेल्या सांप्रदायिक व टीकात्मक वाङ्मयांत पहावयास सांपडतें. अशा तऱ्हेच्या वाङ्मयांत मुख्यत्वेंकरून पुढील ग्रंथ मोडतात. अट्ठकथा, विसुद्धिमग्ग, बुद्धघोषभाष्य, दंपिया–अटुवा–गाटपद–सन्नय ( धम्मपदभाष्य ), अमावतार ( अमृतप्रवाह-बुद्धवचनें ), धर्मप्रदीपिका, विनयार्थसमुच्चय, मालाव ( धर्मविषयक कोडीं ), रसवाहिनी, सद्धर्मरत्नाकरय, सद्धर्मरत्नावलिय ( धम्मपद अट्ठकथा ), तिरतनमालाव, वालिगलदाठागोत्पदीय आणि सियवस मलदम.

सांप्रदायिक दृष्टान्तकथा, दंतकथा, बुद्धस्तुतिपरकाव्यें इत्यादि विषयांवरील ग्रंथ म्हटले म्हणजे दळदावंस ( बुद्धाच्या दांताची कथा ), बोधिवंस, दाठावंसय ( दळदावंसवरून पाली भाषेंत ), सन्नय ( दाठावंसय याचेंच त्याच कर्त्याचें सिंहली रूपांतर ), एळुबोधिवंसय, सद्धर्मालंकारय ( बौद्धपुराणकथा ), निकायसंग्रय ( बौद्धसंप्रदायेतिहास ), लोकोपकारय ( दृष्टान्त-

कथा), दळदासिरित (दंतकथा), बुधगुणालंकार, लोवाडसंगराव, मुनिगुणरत्नमालय इत्यादि.

सिंहली वाङ्मयांतील सांप्रदायिक ग्रंथांचा तिसरा वर्ग म्हटला म्हणजे पाली धर्मशास्त्रीय ग्रंथांचीं व जातककथांचीं भाषांतरें व रूपांतरें यांचा. या वर्गांत पुढील ग्रंथ मोडतात. सुत्तपिटक, विनय, सद्धर्मदास (मिलिंदपन्हावरून), पन्सियपनरुजातक, उम्मग्गजातक, ससदावत (ससजातकावरून), कुसदावत अथवा कव्सिळुमिण (कुसजातकावरून), मुवदेवदावत (मखादेव जातकावरून), काव्यशेखरय (जातकग्रंथावरून बोधिसत्त्वकथा), गुत्तिलकाव्य (गुत्तिल जातकावरून), कुसजातक, दहमसोंडजातक (जातकनीनिसारय याचें रूपांतर), मुनिचोरजातकय, असिदसजातकय, कव्मिणिकोंडल (अलिनचित्तजातक), कव्मिणिमल्दम (सोनकजातक), कव्सुवुहर (दसरथजातक), कव्सिळुमिण (अंधभूतजातक), कव्मिणिरंदम आणि तलपत्तजातकय.

सिंहली ऐतिहासिक ग्रंथांमध्यें दीपवंस व महावंस या दोन ग्रंथांस आद्यस्थान दिलें पाहिजे. कारण सिंहलद्वीपाचा प्राचीन इतिहास जाणण्यास हेंच कायतें साधन आहे. त्यानंतर 'दापुलाचीं शासनें' हीं महत्त्वाचीं आहेत. पण तीं उपलब्ध नाहींत. थूपवंस हा ग्रंथ सरकारी लिखाणाच्या आधारें रचला असल्यामुळें महत्त्वाचा आहे. पूजावलिय यांत मध्यंतरींच्या राजांची हकीकत सांपडते. सुळुराजरत्नाकरय हा त्यानंतरचा ऐतिहासिक ग्रंथ सध्यां उपलब्ध नाहीं. अट्टनगलुवंसय हा त्या सुमाराचाच ग्रंथ असून त्यामध्यें हत्तहंगल विहाराचा इतिहास आहे. यावरून कांहीं तत्कालीन इतिहास कळतो. परकुंबसिरित या ग्रंथांत पराक्रमबाहु (सहावा) याचें चरित्र व तत्कालीन इतिहास आढळतो.

परंगिहटन व महाहटन या दोन अर्वाचीन काव्यग्रंथांत सिंहली लोकांच्या अनुक्रमें पोर्तुगीज व डच लोकांशीं झालेल्या लढायांचा इतिहास आहे. त्याहून अर्वाचीन कोस्तंतीनुहटन या एका देशी ख्रिस्त्यानें केलेल्या काव्यांत एका बंडाचें वर्णन आहे. राजवलिय व राजरत्नाकरय हे दोन अर्वाचीन गद्य ऐतिहासिक ग्रंथ आहेत.

यानंतरचा महत्त्वाचा वर्ग म्हटला म्हणजे सर्वसामान्य भारतीय वाङ्मयांत अंतर्भूत होणारा व भारतीय काव्यांचें अनुकरण करणाऱ्या सिंहली काव्यग्रंथांचा होय. या वर्गांतील बरेचसे ग्रंथ कालिदासाच्या मेघदूत काव्यांचें अनुकरण करून लिहिलेले आहेत. या वर्गांत जानकीहरण, मयूरसंदेशय, साळलिहिणिसंदेशय, परविसंदेशय (पारावतसंदेश), तिसरसंदेशय, गिरासंदेशय, कोवुलसंदेशय हे ग्रंथ येतात. वियोवगरत्नमालय आणि रतिरत्नालंकारय हीं दोन शृंगारिक काव्यें आहेत. भाषाशास्त्रीय ग्रंथांमध्यें सिदतसंगराव नांवाचें एळुव्याकरण, मोग्गलायन पञ्चिकाप्रदीपय हा अर्धपाली अर्धसिंहली टीकाग्रंथ, हे दोन व्याकरणावरील ग्रंथ, सियवसलकर हा अलंकारावरील ग्रंथ आणि पियुम्मल, रुवनमल, पुराण नामावलिय हे शब्दकोश हे अंतर्भूत होतात.

याखेरीज वैद्यकावर सारत्थसंग्रह आणि योगार्णव हे दोन ग्रंथ आहेत.

हा जो सिंहलद्वीपांतील वाङ्मयाचा इतिहास वर दिला आहे त्या इतिहासाच्या निरीक्षणानें एक गोष्ट स्पष्ट दिसते ती ही कीं, श्रौतधर्मविषयक वाङ्मयाचा तेथें अभाव आहे. सिंहलद्वीपांत सिंहलांचें विशिष्ट असें एकहि श्रौतसूत्र नाहीं. बुद्धपूर्वकालीन धर्माचें द्योतक वाङ्मयच नाहीं. आज सिंहलद्वीपांत ब्राह्मणजातीचा जसा अभाव आहे तसा तो पुरातन काळपावेतों इतिहासाचें आलोडन केलें असतांहि सांपडतो. यांतील इंगित काय? पौलस्त्य रावण हा ब्राह्मण होता अशी जी आख्यायिका आहे ती कशी उत्पन्न झाली? सिंहलद्वीपांत ख्रिस्तपूर्व पांचव्या, सातव्या किंवा आठव्या शतकांत भारतीय लोक वसाहतीसाठीं प्रथम गेले असें जें अंदाजी विधान अर्वाचीन संशोधकांकडून झालेलें आढळतें तें जर खरें असेल तर आजच्या सिंहली लोकसमाजांत ब्राह्मण्याचा अत्यंताभाव आहे त्याचें स्पष्टीकरण कसें करितां येईल? सध्यां केवळ हिंदी मजूर न्यावयाचे अशा हेतूनें हिंदूंचें परदेशगमन इंग्रजी भांडवलानें करविलें तें परदेशगमन देखील ब्राह्मणांशिवाय झालें नाहीं. जर ब्राह्मणांची जात पहिल्या सिंहलार्थ प्रयाणकाळीं अस्तित्वांत असती तर तिचेंहि गमन तेथें झालेंच असतें आणि त्या जातीचें पृथक्त्व टिकलें असतें.

बौद्ध भारतीय सिंहलद्वीपांत आले तेच खुल्या समाजपद्धतीचे पुरस्कर्ते असल्यानें ब्राह्मणांसह हिंदुसमाज तेथें गेला असेल आणि तेथील ब्राह्मण इतरांत मिसळले असतील व या रीतीनें सहजच या द्वीपांतील लोक-स्थिति भारतीय लोकस्थितीहून ब्राह्मण्य, यज्ञकर्म, पौरोहित्य वगैरे बाबतींत भिन्न झाली असेल, हें मत अग्राह्य ठरविण्यास कारणें येणेंप्रमाणें:—

बुद्धानें वेदांतासारखा एक तत्त्वविचार मात्र स्वतःचा उभारला. बाकीच्या जातिविषयक गोष्टींत कांहींहि विशेष फरक करण्याचा त्यानें प्रयत्न किंवा विचार देखील केला नाहीं. ब्राह्मणांचा नंबर दुसरा, क्षत्रियांचा पहिला, असा आग्रह त्यानें धरिला. यापलीकडे ब्राह्मण नकोत, संस्कार नकोत, यज्ञकर्म नको, देवता नकोत इत्यादि कसलाहि आग्रह त्याच्या पंथांत नव्हता. चित्तशुद्धीचें महत्त्व म्हणजे वासना–निर्मूलन–धर्माचें महत्त्व तो गाई. पण तें मत एकंदर समाज–व्यवस्थेशीं अविरुद्ध असल्यानें समाजरूप–नाशक झालें नाहीं. ही बुद्धपंथाची भारतांतील चळवळ लक्षांत घेतली म्हणजे बुद्धमत–प्रसार होऊनहि ब्राह्मणजातीचें पृथक्त्व राहूं शकतें, हें दिसतें. सिंहलांत ब्राह्मण असतां बौद्धमत पसरलें असतें तर

ब्राह्मणांस समाजांत फारतर द्वितीयपद आलें असतें, ब्राह्मण-जात अजीवात नष्ट झाली नसती. सिंहलद्वीपांतील आजची नजरेसमोरची ब्राह्मण्य-विहीन समाज-स्थिति बौद्धांच्या आगमनानें व त्यांच्या पंथाच्या प्रसारानें उत्पन्न झाली असें या वरील कारणांस्तव म्हणतां येणार नाहीं. आज जशी समाजस्थिति आहे तसल्याच प्रकारची समाजस्थिति ख्रिस्तपूर्व चवथ्या पांचव्या शतकांत व तत्पूर्वींहि होती असें दाखविणारें वाङ्मय उपलब्ध आहे. सिंहलद्वीपांतील ब्राह्मणाभावाचें वैशिष्ट्य बौद्धपंथी भारतीयांचें तेथें प्रयाण झाल्यानें उत्पन्न झालें नसून ब्राह्मणजाति-विकासापूर्वी भारतीयांची या द्वीपावर वसति झाल्यानें उत्पन्न झालें असावें. अव्यवस्थित व चिरवाङ्मयरहित श्रौतधर्मापासून वेदयुक्त श्रौतधर्माचा विकास आणि त्यावरोबर झालेला ब्राह्मणजातीचा विकास यांचें विवेचन वेदांच्या विवेचनाच्या अंगानें पुढें येईलच.

रामायणांतील कथासूत्र अवलोकन केल्यास आपल्या नजरेस असें येतें कीं सिंहलद्वीपांत जे लोक रहात होते त्यांच्या आचारांत यज्ञधर्म व शैवधर्म यांचें ऐक्य होतें, आणि भारतीय फक्त यज्ञधर्म आचरणारे होते. सिंहली लोक व त्यांचे विरोधी रामपक्षीय लोक यांच्यांत यज्ञाच्या म्हणजे वैदिक धर्माच्या मुख्य कल्पनेच्या बाबतींत एक प्रकारचें मतैक्य व बरेंचसें आचारैक्य होतें. तुमच्या यज्ञाचा आम्ही ध्वंस करणार एवढाच आग्रह राक्षसांचा असे. स्वतः ते यज्ञ करणारेच होते. म्हणजे अथर्व वेदांत जी एक जुनी सामान्य आर्यांची यज्ञप्रवणता व तिजवरोवर अभिचारादिप्रवणता दिसून येते ती सिंहलद्वीपस्थांत राम-कालीं दिसून येते. शिवाय रावण हा पुलस्तिऋषीचा पुत्र दाखविला आहे आणि तेथें भारतीयांस भरभराट दिसली असें वर्णन आहे. ह्यावरून सिंहली वसाहत वरीच जुनी असावी असें दिसतें. रामकालाच्या पूर्वी निदान एक दोन शतकें आर्यन् लोक सिंहलद्वीपांत पोंचले होते, असें विधान वरील गोष्टीवरून करतां येतें. तैत्तिरीय आरण्यक व ऐतरेय ब्राह्मण यांतील दाक्षिणात्य राष्ट्रांसंबंधींच्या उल्लेखांकडे पाहतां या आरण्यकाच्या व ब्राह्मणाच्या काळांत दक्षिणेकडे आर्यन् वसाहती होऊन गेल्या होत्या, तद्देशस्थांचें व आर्यन् लोकांचें वंशमिश्रण आर्यन् लोक विसरले होते, आणि तद्देशस्थांविषयीं सामाजिक विचार प्रकट करण्याची त्यांस इच्छा झाली होती इतकें स्पष्ट दिसतें. या दाक्षिणात्य आर्यन् वसाहतींतूनच पलीकडे सिंहल-द्वीपांत आर्यन् लोकांचें प्रथम प्रयाण वर सांगितल्याप्रमाणें ब्राह्मण्यविकासापूर्वीं झालें असलें पाहिजे.

सिंहली वाङ्मयांतील विशेषांवरून सिंहलच्या अति प्राचीन पूर्वजांसंबंधानें जो तर्क करतां येतो तो वर दिला आहे. आतां सिंहली भाषेसंबंधानें जें संशोधन झालेलें आहे त्याजकडे वळूं. या संशोधनाच्या पूर्वस्थितींत सिंहली भाषेचा संबंध आर्यन् खेरीज इतर भाषा-कुलाकडे जोडण्यांत येत होता. परंतु आतां सिंहली ही आर्यन् भाषा आहे असें खात्रीपूर्वक म्हणतां येण्या-सारखी सामग्री जुळविली गेली आहे. या संबंधांत गैजर या जर्मन भाषापंडितानें विशेष परिश्रम केले आहेत.

**सिंहली भाषाः**—या भाषेच्या अभ्यासकानें प्रथम हातीं घेण्यासारखे कांहीं ग्रंथ व लेख खालीं टिपेंत दिले आहेत.* गैजरनें या सामग्रीचा व इतर स्वतःच्या परिश्रमानें मिळविलेल्या साधनांचा उपयोग करून सिंहलीसंबंधाचा आपला सिद्धान्त स्पष्ट करून सांगितला आहे.

गैजरनें आपल्या ग्रंथांत सिंहली ही प्राकृत भाषेपासून निघाली आहे हा मुद्दा प्रथम घेतला आहे. या मुद्यासाठीं सिंहलीचे वर्णोच्चारणविषयक व शब्दसिद्धिविषयक नियम त्यानें आरंभीं दिले आहेत. सर्व प्रकारची भाषासामग्री यानंतर संगृहीत करून शेवटीं सिंहली भाषेचें विशेष स्वरूप व तिचें कुल या संबंधानें आपलें मत त्यानें विशद केलें आहे. या ग्रंथांत उपयोगिलेली व्युत्पत्तिविषयक सामग्री गैजरनें बहुतेक

* सिंहलीविषयक प्रास्ताविक ग्रंथ व लेखः—(१) जे. डी. आलविस-सिंहली भाषेच्या उत्पत्तिविषयीं J. R. A. S. C.B. V no. 13 p. 143 ff. (1865–66) & no. 14 p. 1 ff. (1867–70). (२) आर्. सी. चाइल्डर्स-सिंहली भाषेवरील नोट्स् (१) नपुंसकलिंगी नामाच्या अनेकवचनी रूपांच्या घटने-बद्दल J. R. A. S. N. S. VII p. 35 ff. (1874–75), (२) सिंहली भाषेच्या संस्कृतपासूनच्या उत्पत्तिविषयीं पुरावा J. R. A. S. N. S. p. 131 ff (1876–77). (३) इ. कोहन-सिंहली शब्दसंग्रहांतील सर्वांत जुना आर्यन् भाग S. K. B. A. W. Phil. Hist. Cl. 1879 II p. 399 ff. (४) इ. मुल्लर-सिंहली व्याकरणावरील लेख Colombo, Sessional Papers no. XXI for 1880, reprinted in I. A. XI. p. 198–220. या लेखांत विशेषतः वर्णो-च्चारणविषयक नियमांविषयीं विवेचन आहे, (५) इ. मुल्लर-सिलोनमधील जुने अंकित लंडन १८८३ प्रस्तावना, पा. ८–१६. (६) राणासिंह-सिंहली भाषेचा हिंदुस्थानांतील अर्वाचीन आर्यन् भाषांशीं संबंध J. R. A.S.C.B.VII no. 25 p.234 ff. (1882), (७) डु.गुने टिल्के सिंहली भाषेंतील विशेष प्रकार-अनियमित उपपद The Orientalist I. Part 4 pp. 73–80 (1880), (८) फ्रेड् मुल्लर-भाषाशास्त्राचा पाया, पुस्तक तिसरें पृ. १३६–१६१, विएन्ना १८८४; यांत सिंहली लोकांची भाषा या प्रकरणांत सिंहलीचें व्याकरण विस्तरशः दिलें आहे. (९) ए. मेंडिस गुणशेखर-सिंहली भाषेचें सविस्तर व्याकरण; यांत भाषाविषयक साधनांचा उपयुक्त संग्रह देऊन मधून मधून भाषेच्या इतिहासाची संक्षिप्त माहिती दिली आहे.

प्राकृत भाषेसंबंधीं सी. आलविसचें 'रोमन लिपींत सिंहली हँडबुक' कोलंबो १८८०; व सी. छोनावेलचें 'यूरोपियन विद्यार्थ्यां-करितां सिंहली भाषेचें व्याकरण', कोलंबो १८८६; हीं पुस्तकें उपयुक्त आहेत.

शब्दकोशः-बी. क्लोघची सिंहली-इंग्लिश डिक्शनरी, कोलंबो १८८२; व कार्टरची इंग्लिश-सिंहली डिक्शनरी, कोलंबो १८९१.

आपल्या 'सिंहली भाषेची व्युत्पत्ति' (A. K. B. A. W. 1 Ci. Vol. 21, part 2, Munich 1877.) या ग्रंथांतून घेतलेली आहे. सिंहली भाषेची उत्पत्ति व विकास या गोष्टींचा उलगडा करण्यासाठीं गैजरनें आजच्या आर्यवंशीय सिंहली लोकांच्या बोलण्याच्या भाषेकडे जसें लक्ष दिलें आहे तसें प्राचीन कालच्या भाषेकडे म्हणजे प्राचीन कोरींव लेख आणि वाङ्मय-ग्रंथ यांतील 'एळू' भाषेकडेहि लक्ष दिलें आहे. 'एळू' या शब्दाला दोन अर्थ आहेत. एक अर्थ, प्राचीन काळची सिंहलाची राष्ट्रीय भाषा. ही भाषा इ. स. पूर्वी ५०० च्या सुमारास झालेल्या आर्य लोकांच्या सिंहल-प्रवेशापासून सिंहलभूमीवर हळू हळू तयार होत गेली. 'एळू' शब्दाचा दुसरा अर्थ, सिंहली लोकांच्या काव्यग्रंथांची भाषा असा आहे. वर्तमानकाळीं सुद्धां कविता रचणारे एळू भाषेचाच उपयोग करितात. प्राचीन राष्ट्रीय एळू भाषा सध्यांच्या सिंहलींहून बरीच भिन्न आहे. सध्यांच्या सिंहलींत आढळत नाहींत अशीं पुष्कळ प्राचीन व्याकरणरूपें एळू भाषेंत येतात. हीं रूपें प्रचारांतील सिंहलींत फार क्वचित् येतात, व येतात तेव्हां कांहीं विशिष्ट संबंध अथवा कथानक दर्शविण्याकरितां येतात.

काव्यग्रंथांची एळू भाषा ही परिभाषेच्या स्वरूपाची आहे. संस्कृत आणि पाली भाषांचा हिजवर पुष्कळ परिणाम झालेला दिसून येतो. हा परिणाम लेखनशैलींत विशेष नजरेस येतो.

संस्कृत आणि पाली शब्द सिंहली काव्यवाङ्मयांत वारंवार शिरतांना दिसून येतात. अशा पुष्कळ शब्दांचें पूर्णपणें सिंहलीभवन झालेलें आहे. कित्येकांचें सिंहलीभवन अर्धवट झालेलें आहे. या प्रकारचे संस्कृत-पाली शब्द व मूळ एळू शब्द हें आजच्या कवीचें मुख्य भांडवल असतें. या भांडवलाचा उपयोग करून आपली कृति करतांना कवि नवीं रूपें व नवे शब्दहि निर्माण करीत असतो व अशा रीतीनें आपल्या भांडवलांत भर टाकीत असतो.

संस्कृत आणि पाली या भाषांतून शब्द घेण्यांत आले आहेत ते अमुक एका काळांत घेण्यांत आले असें नाहीं, व केवळ वाङ्मयांतच त्यांचा प्रवेश झाला असेंहि नाहीं. या शब्दांचा प्रवेश बोलण्याच्या भाषेंत देखील झालेला आहे, व पूर्वकाळापासून सर्वकाळीं यांचा प्रवेश वाङ्मय-ग्रंथांत व प्रचारांतील भाषेंत होत आलेला आहे. यामुळें सिंहली भाषेस फारच मोठ्या प्रमाणावर चित्रविचित्र स्वरूप प्राप्त झालें आहे. प्रचारांत घोड्याला 'अस्वया' असा शब्द आहे. एळूमध्यें घोड्याला 'अस' म्हणतात. या 'अस्वया' शब्दाप्रमाणें अनेक विद्वत्ता-दर्शक संस्कृतसंबद्ध शब्द प्रचारांत घेऊन जुनीं रूपें टाकून दिलेलीं आहेत.

सिंहलींत मूळ भाषा व उसनी भाषा असे भेद करूनच सिंहलींतील वर्णविकारविषयक नियमांची रचना केलेली आहे. सिंहलींतील मूळ शब्द कोणते व उसनवारीचे कोणते हें ठरवितांना कांहीं निर्णायक लक्षणांवर भर द्यावा लागतो. हीं लक्षणें नेहमींच उपयोगी पडतात असें नाहीं. उदाहरणार्थ, एखादा पूर्ण सिंहली पेहरावाचा शब्दहि वस्तुतः उसनवारीचा शब्द असूं शकतो. कारण, विद्वान् लोक सिंहलींतील वर्णविकारनियमानुसार उसनवार शब्दाला बेमालूम असा सिंहली पेहराव चढवूं शकतात, व चढवितात. मात्र, एखादा शब्द एळूंत असून चालू सिंहलींत असेल आणि शिवाय सिंहलीशीं संलग्न अशा ज्या मालदिवी व वेद्द पोटभाषा यांतहि सांपडेल तर तो मूळ भाषेपैकीं आहे याबद्दल संशय रहात नाहीं.

गैजरनें आपल्या 'सिंहलीची व्युत्पत्ति' या ग्रंथांत मूळ सिंहली शब्दांची व उसनवार शब्दांची फोड चांगल्या तऱ्हेनें केली आहे.

खालीं कांहीं कोष्टकें देत आहों त्यांवरून सिंहलीचें प्राकृत, पाली व संस्कृत या भाषांशीं कसें नातें आहे तें स्पष्ट होईल.

## १. सिंहलींतील स्वर-त्यांचें स्वरूप व घटना.

( खालील कोष्टकांतील शब्दांवरून सिंहली शब्दांचीं मूळ रूपें पाली व प्राकृत शब्दांशीं अगदीं सदृश आहेत असें दिसून येईल. अँग वगैरे कांहीं शब्द मूळ पाली व प्राकृत शब्दांहून बरेच निराळे झालेले आहेत. याचें कारण सिंहलीचे विशिष्ट वर्णविकारविषयक नियम होत. 'अतुळ' पासून खालचे शब्द जे आहेत त्यांचीं मूळ सिंहली रूपें यांहून निराळीं होतीं तीं उत्तरकालीन सिंहलीच्या वर्णविकारनियमानुसार बदलून खालीं दिल्याप्रमाणें झालीं. )

| मराठी | संस्कृत | पाली | प्राकृत | सिंहली(एळू) |
|---|---|---|---|---|
| केलेले | कृत | कट | कअ | कळ |
| नेलेले | हृत | हट | हअ | हळ |
| घट्ट | दृढ | दळ्ह | दढ | दळ |
| उच्चता | उत्कृष्ट | उक्कट्ठ | | उकट |
| मऊ केलेला | मृष्ट | मट्ठ | मट्ठ | मट |
| संतुष्ट | प्रहृष्ट | पहट्ठ | पहट्ठ | पहडु |
| जन्म, मूळ | निर्वृत्ति | निव्वत्ति | निव्वत्ति | निवत |
| निसर्ग | प्रकृति | पकति | पअइ | पिपवि |
| वर्तुल | वृत्त | वत्त | वत्त | वत |
| क्षुद्र, गरीब | कृपण | कपण | | कवण |
| पाठ | पृष्ठ | पिट्ठ | पिट्ठ | पिट |
| लोभी | गृध्र | गिद्ध | | गिदु |
| कृत्य | कृत्य | कृत्य | किच्च | किस |
| कोल्हा | शृगाल | सिगाल | सिआल | हिवालु |
| भुंगा | भृंग | भिंग | भिंग | बिगुँ |
| चटई | बृसी | मिसी | | बिसि |
| झाड | वृक्ष | रुक्ख | रुक्ख | रुक |
| सरळ | ऋजु | उजु उज्जु | उज्जुअ | उदु |
| अस्वल | ऋक्ष | रिच्छ | अच्छ | अस |

[ कोष्टक (१) पुढें चालू ]

| | | | | |
|---|---|---|---|---|
| फायदा | वृद्धि | वद्धि | वुद्धि | वाड |
| शिंग | शृंग | सिंग | सिंग | अँग, सिगुँ* |
| गवत | तृण | तिण | तिण | तण |
| तूप | घृत | घत | घअ | गी |
| पसरलेले | | अत्तथत | | अतुळ |
| कृत्तिका | कृत्तिका | कत्तिक | कत्तिआ | काती(कती) |
| माती | मृत्तिका | मत्तीका | मट्टीआ | माती |
| हरिण | मृग | मिग | मिअ | मुव |
| पाहिलेले | दृष्ट | दिट्ठ | दिट्ठ | दुटु |
| जुनें | जीर्ण | जिण्ण | जिण्ण | दुणु |
| विभागलेले | भिन्न | भिन्न | | बुन |

२ मूळच्या दीर्घ स्वरांचें ऱ्हस्वीकरण [ सिंहली भाषेंत मूळचे दीर्घ स्वर नाहींतच. ]

| मराठी | सिंहली (एळू) | पाली | संस्कृत |
|---|---|---|---|
| चुलता | मयिल | मातुल | मातुल |
| दूध | किरि | क्षीर | क्षीर |
| धूर | दुम | धूम | धूम |
| तेज | तेंद † | तेज | तेजस् |
| झरा | ओय † | सोत | स्रोतस् |

३ सिंहली भाषेंतील दीर्घ स्वर [ हे बहुतेक केवळ वर्णसंक्षेपानें उद्भवले आहेत ] सिंहलींत सारखे स्वर एकमेकांत मिळून दीर्घ स्वर होतो.

| मराठी | सिंहली (एळू) | पाली | संस्कृत |
|---|---|---|---|
| आलेला | आअअ | आगत | आगत |
| उघड | पाल (पहल) | पकट | प्रकट |
| थंडी | हील (हूल) | सिशिर | शिशिर |
| सांगितलेलें | की | कथित | कथित |
| दही | दी | दधि | दधि |
| तो खातो | का, कयि | खादति | खादति |
| | कवा, कवयि | | खादयति |
| रात्र | रा, रायि | राति, रत्ति | रात्रिः |
| अशक्य | बा (बा हिअ) | बाधित | बाधित |
| खैर झाड | खैर | | खदिर |
| मुकुट | मउड | | मुकुट |

* ँ=अर्धानुनासिक हा सिंहलींतला एक विशेष आहे.

† =ऱ्हस्व 'ए', 'ओ'

[ कोष्टक (३) पुढें चालू ]

| | | | |
|---|---|---|---|
| बाण | ई (इय) | सित | शित |
| दूत | दू | दुत | दूत |
| मुलगी | दू | धूता | दुहिता |
| खेळ | दू | जूत | द्यूत |
| डुक्कर | ऊरु (हुअर) | सूकर | सूकर |
| मूत | मू | मूत (मुत्त) | मूत्र |
| केतकीवृक्ष | की | केतक | केतक |
| पूल | ई-दण्ड | सेतु | सेतु |
| नगरांत | नुवरी (नुवरेहि) | नगरंहि | नगरे |
| लोक | लो (लोव) | लोक | लोक |
| ज्ञान | बो | बोधि | बोध |
| पिवळा | पीला | पीतल | पित्तल |
| रक्षिलेले | राकि | रक्षित | रक्षित |
| भाजलेले | बादि | भज्जित | भर्जित |
| भाऊ | बा | भाता | भ्रातृ |
| अनुक्रम | आवाम | अपगम | अपगम |
| आयुष्य | आ | आयु (आ-उ) | आयुस् |
| शरीर | का | काय | काय |
| ओरडणें | रा | रव | रव |
| नवें | ला (लव) | नव | नव |
| तूं | तो | तव | त्वं |
| घर | गे | गेह | गेह |
| धातु | लो | लोह | लोह |
| सिंह | सी | सीह | सिंह |
| लसूण | लूनु (लुसुनु) | लसुन | लशुन |
| राजवाडा | पा (पहय) | पासाद | प्रासाद |
| समुद्र | मूदु (हुमुदु) | समुद्द | समुद्र |
| सर्वत्र | हात्पस (हवत) | सव्वथ | सर्वत्र |
| खेद | केवेनु | खेद | खेद (प्राकृत खेअ) |
| आचारी | सुवरु (सूवरु) | सूपकार | सूपकार |

[ कोष्टक (३) पुढें चालू ]

| | | | |
|---|---|---|---|
| हंस | से-पत | | ( शुभ्रपतत्रिन् ) |
| स्फटिक | से-मिणि | | शुभ्र-मणि |
| लहान मूल | ला-दरु | | |
| लहान अंकुर | लदळु ( ला-दळु ) | | अल्पदल |
| ओरडणें | मोर ( मुवर ) | मुखर | मुखर |
| दरवाजा | दोर ( दुवर ) | | द्वार ( प्रा. दुवार ) |
| तोडलेल्या झाडांचा बंधारा | नियर | निवार | निवारण |
| दूर नेणें | नेरणु | नीहरणि | निर्हरण |
| नारळीचें झाड | नेरळु | नळिकेर ( नळियेर नयिलेर नयीरेळ नेयिरळ ) | नालिकेर |

४ शब्दांशावरील जोराचा परिणाम—आद्यवर्णलोप.

| मराठी | सिंहली(एळू) | पाली | संस्कृत |
|---|---|---|---|
| सारखा,प्रमाणें | मेन | समॆन | समान |
| सोनें | रण | हिरॆञ्ञ | हिरण्य |
| गर्दी,समुदाय,ढीग | मुळु | समूढ | समूह |
| जवदा | तुदस | चतुद्दस | चतुर्दश |
| झाड (उंबराचें) | दिंवल दुंवल | उदुम्बर | उदुंबर |
| चंद्राच्या फरकाचा दिवस | पोहो दिन | उपोसथ प्राकृत=पोसह | |
| अरण्य | रण | अरॆञ्ञ | अरण्य |
| एक प्रकारचें झाड | रिठी | अरिट्ठी | अरिष्ट |
| ,, | हो | असोक | अशोक |
| सुकाणूं | रिटी | अरित्त | अरित्र |
| अनंत | नत | अनॆंत | अनंत |
| अनेक | ने | अनेक | अनेक |
| प्रेम | नुरा | अनुराग | अनुराग |
| दृष्टान्त | नुरू | अनुरूप | अनुरूप |
| परंतु, तत्रापि | नुमुत | अनुमत | अनुमत |
| विखरणें, पसरणें | वगुरणू | अवघॆर | अवकिरति |
| एकीकडे | इवत | | अतिवृत् |
| टिकाव धरणें हट्ट धरणें | इततु | | अतितन् |

टीपः—शब्दांशावरील जोर दर्शविण्याकरितां जोर असलेल्या अक्षरावर उभी रेघ मारली आहे.

[ कोष्टक (४) पुढें चालू ]

| | | | |
|---|---|---|---|
| अग्नि | नल | अनॆल,अनिल | अनल |
| लोखंड | य | अयॆस् | आयस |
| दुसरें पीक | यल | अकाॅल | अकाल |
| खालीं | यत | | अधस्तात् |
| सारखा (तत्सदृश) | युरु | अयुॆरु | |

५ शब्दांशावरील जोराचा परिणाम—स्वरविपर्यय. जोरानंतरच्या स्वरांत बदल होतो.

| मराठी | सिंहली(एळू) | पाली | संस्कृत |
|---|---|---|---|
| सुंदर | ओविन | सॊभन | शोभन |
| तत्संबंधी | आयिती | आॅयत्त | आयत्त |
| मांजर | मादिर | मॆज्जार | मार्जार |
| उखळ | इकिली | उॅखली | उलूखल |
| नांगर | नागुल | नॅंगल | लांगल |
| वळकट | थवुर | थाॅवर | स्थावर |
| कोळी (कीटक) | मकुल | मॅक्कट | |
| गवत | पिदुरु | पिंजॆर | |
| पट्टा (मेखला) | मेउल | मॆखला | मेखला |
| पाणी | वातुरु | विठॊर | |
| सूर्य | दिवायुरु | दिवाॅकर | दिवाकर |
| चंद्र | निशायुरु | निशाॅकर | निशाकर |
| स्तन | पियायुरु | पयॊधर | पयोधर |
| स्तुति | पाससुम | पसॆसन | प्रशंसन |
| आंत | अभतुर | अब्भॆन्तरम् | अभ्यंतरम् |
| जात, वंश | परपुरा | परॆम्परा | परंपरा |
| मुकुट | किरुट्ट | किॅरीट | किरीट |
| मलिन | किलुट्ट | किॅलिट्ठ | क्लिष्ट |
| तीक्ष्ण | तियुणु | तिॅखीण | तीक्ष्ण |
| उजवा | दकुणु | दॅक्खिण | दक्षिण |
| हंवरणें | आळुन | — | आरवण |
| खोल, गंभीर | गाम्बुर | — | गभीर |
| नवा | किसुणु | कॅसिण | |
| जटिल, तपस्वी | डुटुल्ल | जॅटिस | जटिल |
| आश्चर्य | असिरी | अॅच्चेर | आश्चर्य |
| समाधान | अपिस | अॅप्पेच्छा | अपेच्छ |
| मधून, आंत | विसिन | वॅसेन | विहीन |
| उटणें,विलोपन | विलवून | विॅलेपन | विलेपन |
| कठिण,निर्दय | कुरिरु | कुॅरूर | क्रूर |

येणेंप्रमाणें अपभ्रंशविषयक अनेक उदाहरणें व नियम डॉ. गैगर यांनीं दिले आहेत. येथें शब्दविषयक अधिक

विस्तार करण्यास आपणांस अवकाश नाहीं, तथापि एवढ्यावरून शब्दसादृश्य लक्षांत येईल.

भाषासादृश्य म्हणजे केवळ शब्दसादृश्य नव्हे. भाषेंत नवीन शब्द लवकर येतील पण नवीन प्रत्यय येत नाहींत. यासाठीं भाषेंतील नामें, क्रियापदें वगैरेंचीं रूपें तपासलीं पाहिजेत. तीं तपासून डॉ. गैजर आपल्या निबंधांत असें मत देतात कीं, सिंहली नामांचे व क्रियापदांचे प्रत्यय प्राकृतांतीलच आहेत. सिंहलींतील सर्वनामें व संख्यावाचकें शुद्ध आर्यन् आहेत. सर्वनामें व संख्यावाचकें अनार्यन् भाषांतून घेतलीं असावींत असें कांहींचें म्हणणें आहे तें चुकीचें आहे. या सर्वनामांचें व संख्यावाचकांचें जें विशिष्ट स्वरूप दिसतें तें सिंहली वर्णविकारशास्त्राच्या नियमांप्रमाणें मूळ आर्यन् शब्दांचें रूपांतर झाल्यानें दिसतें. क्रियापदांच्या कांहीं रूपांवरून अडचणी उत्पन्न होतात. परंतु हीं दिसण्यांत चमत्कारिक रूपेंहि आर्यन् भाषेंतून आलीं असें बऱ्याच अंशांनीं सिद्ध करणारा पुरावा डॉ. गैजर यांनीं दिला आहे.

ऐतिहासिक दृष्ट्या ज्यांचा खुलासा करतां येत नाहीं अशीं थोडींबहुत रूपें प्रत्येक भाषेंत आढळतात. तरीपण अशा रूपांवरून सामान्य सिद्धान्ताला बाध येतो असें कोणी समजत नाहीं. सिंहली भाषा व तिचें व्याकरण हीं एकदम समोर ठेवून विचार केल्यास सिंहली ही प्राकृत भाषेच्या आधारावर बनली असून शुद्ध आर्यन् कुलांतील भाषा आहे हा गैजरचा सिद्धान्त कोणालाहि पटेल यांत संशय नाहीं.

सिंहली भाषेंत कांहीं अनार्यन् भाषांतील शब्द वगैरे आहेत परंतु इतर भाषांतून निघालेल्या शब्दांच्या समावेशामुळें जर्मानिक भाषा जशा इंडोजर्मानिक कुलापासून भिन्न होत नाहींत, त्याचप्रमाणें परकीय शब्दांच्या अंतर्भावामुळें सिंहलीच्या आर्यन् स्वरूपास कांहीं बाध येत नाहीं.

हे उसनवारीचे शब्द मूळ आर्यन् भाषेंत पूर्णपणें आत्मसात् केलेले आहेत. याचें प्रत्यंतर म्हणजे त्यांनां विभक्तिप्रत्यय लावतांनां शुद्ध एळु शब्दांप्रमाणें त्यांचें रूपांतर झालेलें आहे.

यावरून हें उघड होतें कीं, इंग्रजीला जर्मानिक भाषा म्हणावयास जितपत आधार आहे, तितपत तरी खास सिंहलीला आर्यन् म्हणावयास आधार आहे. इंग्रजींत इतर कित्येक भाषांतील शब्द आलेले आहेत तरी ती मूळ जर्मानिक भाषा आहे व तिचें भाषाशास्त्र जर्मानिक भाषाशास्त्राच्या पोटांत येतें असें आम्ही म्हणतों. इंग्रजींत जितके अन्-जर्मानिक शब्द आहेत तितके कांहीं सिंहलींत अनार्यन् शब्द नाहींत. तेव्हां सिंहलींत परकीय शब्द असले तरी वर वर्णिलेल्या तिच्या सामान्य स्वरूपामुळें ती मूलतः आर्यन् भाषा आहे व अर्वाचीन इंडो-आर्यन् भाषांमध्यें हिंदी किंवा मराठी इतकेंच तिला महत्त्वाचें स्थान आहे हें कबूल करणें प्राप्त आहे.

सिंहली भाषेंत अनार्यन् व विदेशी शब्द आहेत त्यांची आतां थोडीशी ओळख करून घेऊं.

**सिंहली भाषेंतील विदेशीय शब्द**—या शब्दांपैकीं कांहींची व्युत्पत्ति पुढें मागें आर्यन् भाषांतूनच लागूं शकेल व दुसरे कांहीं शब्द द्राविड भाषांतून आले असल्याचें आढळून येईल. सर्वच गोष्टींचा पहिल्या तडाख्यांत उलगडा होत नसतो. तथापि कांहींहि झालें तरी ज्यांची व्युत्पत्ति कोणत्याच भाषेंतील शब्दांपासून लावतां येत नाहीं असे कांहीं तरी शब्द शेवटीं शिल्लक राहतीलच. हे शब्द भारतीयांची सिंहलद्वीपांत वसाहत होण्यापूर्वी तेथें जे इतर लोक राहत होते त्यांच्या मूळ भाषेंतील असले पाहिजेत असें अनुमान करणें युक्त होईल. असो. ज्यांची व्युत्पत्ति आर्यन् भाषांपासून लागूं शकत नाहीं असे कांहीं शब्द पुढें दिले आहेतः—

अंड=गलबला, ओरडणें ( धातु—अंडणु=ओरडणें ); इदिबु, इडुब, इब्ब=कासव; इंग (ला. इम्)=जघन; इलु=जंगल, अरण्य; कस=नारळ; कोंड=फळ; किदु, किंदि=मिरें; कोल=पान; दोडनु=बोलणें ( क्रि. ); देल=एक भाकरीचें जंगली फळ; बेली=शुक्ति, मोत्याचे शिंपले; बेलि=मान; महनु=शिवणें ( क्रि. ); मोल=मेंदु; मुहुसु=विंचू; रिका, रिळव्=वानर; लिंद (ला. लिन्)=झरा, कारंजें; रळ्=कठिण, मजबूत, बळकट; राउल्=दाढी; लोकु=मोठा; वरल=डोक्याचे केस; सवस=संध्याकाळ; हलळ, हल्ला=काजवा; हिबिलि=टोपली (मासे धरण्याकरितां); हिसा=मोत्याचे शिंपले; हुलंगि ( ला. हुलं)=वारा, हवा; हुसु=मासा, शिजवून तयार केलेला मासा.

कांहीं शब्द तामिळ भाषेंतून घेतले आहेत. उदाहरणार्थ, अडि=पाय, पाया; अलि=हत्ती; काडि=सिरका; तक्कडि=लबाड; टेक्क=सागवानाचें झाड; पंगु=भाग घेणें ( नाम ); पुंचि=लहान; मल्=धाकटा भाऊ; वेल=भाताचें शेत.

पोर्तुगीज भाषेंतील शब्दांपासून तयार झालेले शब्दः— इस्ताल=तबेला ( पो. एस्तल्ल ); कडदासि किंवा करदासि=कागद ( पो. कार्टाझ ); लन्स=भाला ( पो. लान्सो ).

डच शब्दापासून झालेले शब्दः—तरप्पु=जिना ( ड—ट्रॅप ); ते=चहा ( ड थी. ); बक्किया=दोण, टांकी ( ड. बक्जे ); अक्कर=परिमाण ( इं. एकर ), पोनि=घोड्याचें शिंगरूं; वगैरे.

व्यापारी व सरकारी कामकाजांत वापरले जाणारे शेंकडों शब्द इंग्रजी भाषेंतून घेतले आहेत.

येणेंप्रमाणें सिंहलींतील विदेशीय शब्दांचा थोडासा परिचय केल्यानंतर आतां सिंहली संलग्न पोटभाषा जी मालदिवी तिजसंबंधी कांहीं ज्ञान करून घेऊं.

मालदिव बेटांतल्या भाषेसंबंधाचीं साधनें डॉ. गैजरनें पुष्कळशीं स्वतःच सिलोनांत मिळविलीं. नंतर ए. गुणशेखर यांच्या साहाय्यानें त्यांस आणखी साधनें मिळालीं. या

साधनसंग्रहांत सिंहली वाक्यांचीं व लहान कथानकांचीं मालदिवी भाषेंतील भाषांतरें आहेत. मालदिवीच्या वर्णशास्त्रावरून असें दिसून येतें कीं, सिंहलीचा विकास होऊन तिच्यांतील विशेष बनल्यानंतर तिच्यापासून मालदिवी भाषा विभक्त झाली. याचा अर्थ भारतीय रक्ताचें मालदीव बेटांत प्रयाण बरेंच अलीकडे झालें असा होतो. असो.

खालीं जीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांवरून सिंहलीचें मालदिवीशीं साम्य किती आहे, व असाम्य किती आहे तें लक्षांत येईल.

१ स्वरविकारः—

| मराठी | मालदिवी | सिंहली | पाली |
|---|---|---|---|
| पृथ्वी | विन | विम | भूमि |
| मिरीं | मिरस | मिरिस | मरिच |
| माशी | मेहि | मासि | मच्छिआ (प्रा.) |
| नंतर | देन | दान | दानि |
| मध्य | मेडु | मादि | मज्झ |
| फिरणें | एवुरेण | आँवुरेणु | |
| बोट (हाताचें) | इगिलि | आँगिलि | अंगुली |

२ व्यंजनविकारः—

| मराठी | मालदिवी | सिंहली | पाली |
|---|---|---|---|
| पांढरा | हुदु | हुदु | सुद्ध |
| लांब | दिगु | दिगु | दिग्घु |
| चंद्र | हंदु* | हँदु | [ ँ = अर्धानुनासिक ] |
| झाड | गस | गस | गच्छ |
| मासा | मस | मस | मच्छ |
| झाडाचें पान | गहु-फत | शब्दाच्या पोटांतील 'स्' चा 'ह्' होतो. | |
| माशाचें तेल | महु-तेउ | | |
| चार | हतरु | शब्दाचे आरंभीं 'स्' चा केव्हां केव्हां 'ह्' होतो. | |
| चौतिस | सउर-तिरीस | | |
| निशाण | दिद | दद | धज |
| जीभ | दू | दिव | जिव्हा |
| आठ | अर. | अट | अट्ठ |

'र.' हा मालदिवीमधील वर्ण सिंहलींत नाहीं. ड्, ह्, स्, या तीन वर्णांची थोडी थोडी भेसळ या 'र.' मध्यें आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| खालीं | अरि. | यट | हट्ठ |
| मी पाहिलें | दुरि.ण | दुट्ठ | दिट्ठ |
| हाणून पाडणें | कोरा.ण | कोटानु | कोट्टेटि |
| फूल | म(उ)† | मल | माला |
| दगड | ग(उ)† | गल | |

*लंडन प्रतींत 'हदु' व ख्रिस्तोफर प्रतींत 'हडु' अशीं रूपें आहेत.

† (उ) हा उगीच थोडा 'अ' बरोबर उच्चारावयाचा.

[ व्यंजनविकार, पुढें चालू ]

| | | |
|---|---|---|
| दांत | *दई, | दत |
| पान | *फई, | फत |
| उंट | †ओ(र.)‡ | ओट्ठु |
| हत्ती | ‖एग | एत |

या वरील कोष्टकांवरून मालदिवींतील वर्णविकारनियमांची थोडीशी कल्पना येईल. पाली 'ऊ' बद्दल सिंहलीप्रमाणें मालदिवींत 'इ' येतो; जेथें सिंहलींत 'आ' येतो तेथें मालदिवींत 'ए' येतो, क्वचित् 'इ' येतो; पालींत जेथें जोडाक्षर असतें तेथें सिंहलींत व मालदिवींत साधें अक्षर येतें; सिंहलींत अर्धानुनासिक असतें तेथें मालदिवींत पूर्णानुनासिक येतें; पाली 'च्' 'छ्' बद्दल सिं. व मा. दोहोंतहि 'स्' आदेश होतो व पाली 'ज्' बद्दल 'द्' होतो; सिं. 'ट' चा मा. त 'र.' होतो; सिं. तील 'ल' सारखीं कांहीं व्यंजनें लोप पावून मागील स्वरांत किंचित् बदल होतो; इत्यादि नियमांचीं उदाहरणें वर दिलीं आहेत. गैजरनें गोळा केलेल्या साधनांत व तत्पूर्वींच्या ख्रिस्टॉफर व पिरार्ड यांच्या प्रतींत आणि 'लंडनप्रत' म्हणून गैजरनें उल्लेखिलेल्या प्रतींत थोडीशी तफावत आढळते तीहि वर दर्शविली आहे.

मालदिवी भाषेंत पूर्वीं जेथें 'प' असे तेथें आतां 'फ' येतो असें गैजरच्या नजरेस आलें. याचीं दोन उदाहरणें गैजरनें दिलीं आहेत तीं फस्, फहेइ (=पांच) व फा (=तंगडी) हीं होत. या शब्दांचीं पिरार्डच्या प्रतींत 'पहेत' व 'पाए' अशीं रूपें आढळतात. पिरार्ड हा १७ वे शतकाच्या आरंभीं होऊन गेला. तेव्हां अलीकडील २।३ शतकांतच 'प' चा 'फ' झाला असें दिसतें.

मालदिवींतील कांहीं शब्द सिंहलींतील समान शब्दांहून जुन्या व्युत्पत्तीचे आहेत. उदाहरण, हाहे (=हजार) हा मालदिवी शब्द जुन्या 'सहस्स' शब्दावरून आला आहे, व तत्समान 'दहस' हा सिंहली शब्द अलीकडचा आहे.

मालदिवी व सिंहली यांचा प्रत्ययांच्या बाबतींत पुष्कळच भेद आहे.

सिंहलीशीं संलग्न असलेल्या मालदिवी भाषेचें स्वरूप वरील वर्णनावरून आपणांस कळलें आहे. यापेक्षां अधिक विस्ताराचें येथें प्रयोजन नाहीं.

सिंहलींतील अनार्यन् व विदेशी शब्द पूर्वीं दिलेच आहेत व तिच्या मुख्य शब्दसंग्रहाचें स्वरूपहि वर दाखविलें आहे.

गैजरनें या सर्व सामग्रीचा विचार करून सिंहली ही शुद्ध आर्यन् भाषा आहे असें ठरविलें व हेंच मत वस्तुस्थितीस धरून आहे. तरी पण सिंहली ही आर्यन् भाषा आहे काय

* लं. प्रत-दत, फत; ख्रि. प्रत-दई; फई. † लं. प्रत-ओर. ख्रि. प्रत-ओग. पिरार्ड, ओल. ‡ (र.) या 'र.' चा उच्चार करीत नाहींत. ‖ लं. प्रत-एग. ख्रि. प्रत-एग.

या प्रश्नाचें उत्तर सध्याप्रमाणें नेहमींच होकारार्थी देतां येत असें असें नाहीं. सिंहली ही द्राविडी भाषा आहे असें रास्क याचें म्हणणें होतें. फ्रेड मुल्लर यानें सिंहली भाषेला द्राविड भाषांच्या सदरांतच घातलें आहे, परंतु हिंदुस्थानच्या भाषांपैकीं सिंहली ही एक स्वतंत्र भाषा आहे असेंहि त्याला वाटलें. लॅसेनचें मत ही मलायी भाषेपासून झाली असावी असें होतें. सिंहली भाषेच्या आर्यन् कुलाचें समर्थन प्रथम डी. आल्विस यानें केलें परंतु त्याजवळ यावद्दल भरपूर पुरावा नव्हता. सिंहली व तामिळ या दोन भाषांत फरक आहे या मुद्यावर त्यानें विशेष जोर दिला. या दोन भाषांत मुळींच संबंध नाहीं असें कॉल्डवेल याचेंहि ठाम मत होतें.

सिंहली भाषेचें आर्यन् कुल सशास्त्र सिद्ध करण्याचें काम प्रथम चाइल्डर्स व ऱ्हिस डेव्हिस यांनीं हातीं घेतलें, व त्यांच्या पक्षास गोल्डश्मिट व ई. मुल्लर हे विनशर्त येऊन मिळाले. सिंहली ही आर्यन् भाषा आहे हें निर्विवाद आहे व अशोकाच्या शिलालेखांत ज्या भाषा येतात त्यांपैकीं कांहीं भाषांशीं व महाराष्ट्री-भाषेशीं सिंहलीचें निकट साम्य आहे; आणि कांहीं महत्त्वाच्या बावतींत प्राकृत भाषांत व या भाषेंत फरक आहे असें गोल्डश्मिट यानें ठरविलें. मुल्लरनेंहि असाच सिद्धान्त केला कीं सिंहली भाषेचा अशोककालीन शिलालेखांच्या भाषेशीं निकट संबंध आहे.

हास व इ. कुह्न् यांचीं मतें याच्याविरुद्ध आहेत. हासचें म्हणणें सिंहली ही आर्यन् भाषा आहे असें ठरविण्यास पुरेसा पुरावा नाहीं. इ. कुह्न् म्हणतो, "सिंहली भाषा बरीचशी आर्यन् भाषेसारखी दिसते, परंतु ती मिश्र भाषा आहे. तिच्यांतील कांहीं दृढमूल विशेष अंश अनार्यन् भाषांतून आले आहेत असेंच म्हणावें लागतें. या विशेष अंशांची याशिवाय दुसरी उपपत्तीच बसत नाहीं, व म्हणून सिंहली ही मिश्र भाषा आहे असें म्हणावें लागतें."

या सर्व मतांचा उल्लेख करून डॉ. गैजर म्हणतात, "मीं सिंहली भाषेसंबंधींचा पुरावा बऱ्याच विस्तारानें मांडला आहे. या पुराव्यावरून सिंहली ही शुद्ध आर्यन् भाषा आहे व इतर इंडो-आर्यन् लोकभाषांचा जो दर्जा आहे तोच हिचाहि दर्जा आहे, हें माझ्या मतें निःसंशय सिद्ध होत आहे. सिंहलींतील वर्णशास्त्र प्राकृताच्या वर्णशास्त्रावर आधारलेलें आहे, स्वरविकाराचे जे विशेष सिंहलींत आहेत तत्समान विकारविशेष मालदिवी वगैरे संलग्न भाषांत आहेत, वगैरे गोष्टी ज्यांनां स्पष्ट झाल्या आहेत त्यांनां माझें मतच ग्राह्य वाटेल. सिंहलींत महाप्राणोच्चार्य ख, झ, ढ, घ, भ हे वर्ण नाहींत ही अडचण ज्यांनां भासते, त्यांस माझें सांगणें आहे कीं, हे वर्ण पूर्वी सिंहलींत होते व पुढें तिच्या विशिष्ट विकासाच्या पहिल्या कालखंडांत ते नाहींसे झाले ही गोष्ट सिद्ध करतां येण्यासारखी असल्यानें सिंहली ही आर्यन् भाषा आहे या सिद्धांताला सदर अडचणीनें बाध येत नाहीं."

सिंहलद्वीपस्थांची सामाजिक स्थिति, त्यांचा राजकीय व वाङ्मयात्मक इतिहास आणि त्यांच्या सिंहली भाषेचें स्वरूप व मूळ यासंबंधानें आपल्याला आतां बरीच माहिती झाली आहे आणि त्यांचा व आपला हिंदूंचा व भारतीयांचा जुना व नवा संबंध कशा प्रकारचा आहे याचाहि शक्य तेवढा खुलासा झाला आहे तेव्हां आतां या विषयाची येथें रजा घेण्यास हरकत नाहीं.

**ब्रह्मदेश**—अगदीं जवळचा आणि आधुनिक व प्राचीन अशा दोन्ही प्रकारच्या भारतीय लोकांनीं भरलेला व कित्येक शतकें ब्राह्मणानुयायी हिंदूंच्या शासनसंस्थांनीं शासित झालेला सिंहल देश सोडून आतां आपण पूर्वेस ब्रह्मदेशाकडे जाऊं. ब्रह्मदेश हा आज बऱ्याच हिंदूंचें आश्रयस्थान झाला आहे, तथापि ब्रह्मदेशांतील हिंदूंची वस्ती आजकालची नाहीं. अनेक शतकांपूर्वी येथील व्यापारी आणि साहसी लोक ब्रह्मदेशास जाऊन त्यांनीं तेथील लोकांस सुसंस्कृत बनविलें. भारतांतून प्राचीन कालीं देशाच्या उत्तरेकडून आसामच्या मार्गानें आणि दक्षिणेकडून पेगूच्या मार्गानें असे दोन प्रवाह ब्रह्मदेशांत आले असें तेथील इतिहासग्रंथ सांगतात. पेगूंत वस्ती करणारे तलैंग लोक हे मूळचे तेलंगी, परंतु त्यांची भाषा लवकरच नष्ट होऊन एक निराळीच भाषा तलैंग या नांवानें लोकपरिचित झाली. भाषांचा अभ्यास लोकांच्या स्थानांतराच्या इतिहासास पोषक आहे, आणि यासाठीं भाषाविषयक विवेचन आणि तन्मूलक इतिहास पुढें येईलच. येथें सामान्यतः इतकेंच सांगतों कीं, ब्रह्मदेशांतील भाषा संस्कृत भाषेशीं द्राविडी भाषांप्रमाणेंच असंबद्ध असून त्यांवर संस्कृत भाषेचा संस्कार मात्र झाला आहे. म्हणजे ब्रह्मी जनता मूळची भिन्नजातीय असून संस्कृतीनें मात्र आपणांस स्वकीय झाली आहे.

हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांची सरहद्द आज जी आहे तीच पूर्वी नव्हती. आसाम, आराकान आणि तेनासरीम या तीन प्रांतांचा संबंध ब्रह्मदेशाशीं फार जुना आहे; आणि कांहीं बौद्धिक परिस्थिति लक्षांत घेतां ब्रह्मदेश आणि आराकान इत्यादि भाग हे एकच स्वरूपाचे होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. जेथें जेथें ब्राह्मणांचें महत्त्व नसून क्षत्रियांचें व त्यांच्या आश्रयानें बौद्धांचें महत्त्व असेल तेथें तेथें इतिहासविषयक लेखनाकडे प्रवृत्ति अधिक दिसून येईल असें विधान ब्रह्मदेशाच्या इतिहासांत फायर ( Phayre ) यानें केलें आहे, तें सर्वांशीं खरें नसलें तरी अशा तऱ्हेचें विधान करण्यास एखाद्या गैरसावध लेखकास स्फूर्ति होईल इतकें सत्य त्याच्या मुळाशीं आहे हें खचित. आसाम, आराकान आणि ब्रह्मदेश येथील राजघराणीं बौद्ध होतीं आणि त्यांनीं इतिहासलेखनास उत्तेजन देण्याच्या कामीं बरीच खटपट केली. यामुळें या तिन्ही ठिकाणीं कांहीं ऐतिहासिक वाङ्मय आहे. तें पद्धतशीर रीतीनें हुडकून काढण्याचा व चाळण्याचा प्रयत्न अजून झालेला

नाहीं. मलबार प्रांतांत आणि ब्रह्मदेशांत वास्तुविषयक कांहीं सादृश्यें सांपडतात; आणि तीं तिकडून इकडे आलीं कीं इकडून तिकडे गेलीं याविषयीं संशोधकांमध्यें तर्क वितर्क चालू आहेत. ब्रह्मदेशाशीं दळणवळण पूर्वापार आहे ही गोष्ट खरी, तथापि आज ब्रह्मदेशाकडे जितकीं माणसें जातात तितकीं पूर्वी जात असल्याचें दिसत नाहीं. सिंहलद्वीप ज्याप्रमाणें रामायण, रत्नावली, पद्मिनी इत्यादि काव्यनाटकादि ग्रंथांनीं व स्त्रियांच्या मनोहर कथांनीं भारतीय अंतःकरणाशीं बद्ध झालें आहे त्याप्रमाणें ब्रह्मदेश झालेला नाहीं; आणि सर्वसामान्य वाङ्मयाच्या द्वारा तो आमच्याशीं बद्ध झाला नसल्यामुळें आमच्या देशास चिकटलेला असूनहि तो आह्मांस दूरचा वाटतो. ब्रह्मदेशाचा पदच्युत राजा थीबा रत्नागिरि येथें आणून ठेवला तो तेथें मरेपर्यंत होता, तरी त्याच्याविषयीं अगर त्याच्या देशाविषयीं आपल्या देशांत ग्रंथरूपानें जिज्ञासा फारशी व्यक्त झाली नाहीं. असो.

**ब्रह्मदेशाच्या इतिहासाचे घटकावयव.**— ब्रह्मदेशाच्या इतिहासांतील उदय आणि अस्त पावलेलीं राजघराणीं दुर्लक्षिलीं तरी तेथील मनुष्यसमूहाची घटना आपणांस लक्षांत घेतली पाहिजे. राजघराण्याचा इतिहास किंवा संस्थानाच्या सरहद्दींचा इतिहास म्हणजे राष्ट्राचा इतिहास नव्हे. राष्ट्राचा इतिहास म्हणजे तेथील रक्ताचा इतिहास होय किंवा राष्ट्रांत आयुष्यक्रमाच्या सादृश्यासादृश्यामुळें जे समुच्चय बनतात त्यांच्या विस्तारसंकोचाचा इतिहास होय. ब्रह्मदेशाचा इतिहास या दृष्टीनें सांगावयाचा म्हणजे या भूमीवर कोणकोणते लोक दिसूं लागले, त्यांत शासनप्रामुख्य कोणी मिळविलें, निरनिराळ्या लोकांनीं भरलेल्या या प्रदेशास राष्ट्रीयत्व अथवा समाजवैशिष्ट्य कसें आलें, त्या देशांत किती भाषा बोलणारे लोक मिसळले, भारतीय जनतेचा त्यांच्या लोकसमूहाशीं संबंध काय इत्यादि गोष्टींचें विवरण करावयाचें. या गोष्टींची ओळख होण्यास उत्तम साधन म्हणजे तेथील जाती व तेथें प्रचलित असलेल्या भाषा व त्या भाषांचा इतिहास आणि त्यांचा भारतीय किंवा इतर भाषांशीं संबंध यांचें ज्ञान हें होय.

तेथील प्रमुख भाषा व त्या भाषांतील महत्त्वाचें वाङ्मय यांची थोडक्यांत पुढें माहिती दिली आहे तीवरून ब्रह्मदेश व भरतखंड यांच्यामध्यें प्राचीन कालापासून असलेल्या संबंधाचें कांहींसें अनुमान करितां येईल.

आज आपण ब्रह्मदेशाच्या नकाशाकडे पाहिलें तर भाषांचे पट्टे तेथें अनेक दिसून येतात. देशांत लोकवस्ती थोडी पण भाषांचे प्रकार मात्र पुष्कळ. चिनी सरहद्द जेथें ब्रह्मदेशास भिडते तेथें काचिन जात व तिची विशिष्ट भाषा दृष्टीस पडते. हिंदुस्थानाकडून निराळ्याच भाषांची पाचर देशांत घुसलेली दिसते आणि मार्तावानच्या आखाताच्या आसपास मोनख्मेर, पेगू अगर तलैंग भाषेचें प्रामुख्य दिसून येतें. उत्तरेकडून आणि पूर्वेकडून शान भाषा चिकटलेली दिसते तर तलैंगच्या क्षेत्राभोंवतालीं करेण भाषेचें प्रामुख्य दिसतें. केवळ भाषेच्या दृष्टीनें राष्ट्रें मोजावयाचीं व त्यांचें नामकरण करावयाचें तर आपणांस निरनिराळ्या लोकसमूहांस ब्रह्मी, करेण, तलैंग, शान, काचिन, व कुकिचिन अशीं नांवें देतां येतील. या निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्यांची राजकीय व आर्थिक खळबळ आपणांस या प्रदेशांत नजरेस येते. करेण लोकांनीं दक्षिणकिनारा व्यापिला, परंतु त्यांच्यापासून बराचसा अंश तलैंग लोकांनीं जिंकून घेतला. पण त्या तलैंग लोकांस तेथें स्थाइक होण्यास स्वतःची भाषा सोडून एका निराळ्याच भाषेचा आश्रय करावा लागण्याइतकें स्वत्व सोडावें लागलें. इरावतीच्या उत्तर भागापासून तों बंगालच्या उपसागराच्या पूर्वकिनाऱ्यापर्यंत ब्रह्मी भाषेनें आपलें स्थान कायम राखिलें तर त्यांत हिंदुस्थानांतील आराकानी वगैरे लोकांनीं आपल्या लोकसमूहाची पाचर घातली.

भाषा कायम राहून तिला परकीय संस्कार झाला तर ती भाषा बोलणारांच्या राष्ट्राचाच सामाजिक व आर्थिक विकास झाला असें होतें; भाषेस संस्कार करणारे नवीन आलेले परकीय लोक देश्य समाजाचेच पुढारी व हितकर्ते बनतात. असो.

ब्रह्मदेशाची सोंवळ्या ओंवळ्याच्या कल्पनांपासून अलिप्तता, ब्रह्मी स्त्रियांची वाटेल त्याजबरोबर लग्न करण्याची प्रवृत्ति, इत्यादि गोष्टींवरून तेथें राष्ट्रीकरण फार सोपें असावें अशी आपणांस कल्पना येईल परंतु या बाबतींत आपली निराशा होते. निरनिराळ्या भाषा बोलणारे लहान लहान पृथक् लोकसमूह ब्रह्मदेशांत जेवढे दिसतात तेवढे हिंदुस्थानांत दिसत नाहींत. ब्रह्मदेशाच्या डोंगराळपणामुळें लोकांचें पृथक्त्व अधिक झालें असावें. तसेंच चीन, तिबेट, सयाम आणि हिंदुस्थान येथील निरनिराळे लोक ब्रह्मदेशांत आल्यानें त्यांचें राष्ट्रीकरण कठिण झालें असावें किंवा निरनिराळ्या लहानलहान राष्ट्रकांचें वैशिष्ट्य नाहींसें करून आत्मसंस्कृतिमूलक एकत्व सर्व प्रदेशावर लादण्यास जबरदस्त डोक्याचा वर्ग तेथें निर्माण झाला नसावा अथवा झाला असल्यास त्यास आपलें कार्य पूर्ण करण्यास अवसर सांपडला नसावा. कांहीं असो, आज या प्रदेशांतील अनेक राष्ट्रकांस एकत्र करण्याच्या कामांत विघात आणणारें भाषांचें विविधत्व तेथें फार प्रचुर दिसतें यांत शंका नाहीं.

हें विविधत्व भाषा व जाती यांच्या खालीं दिलेल्या कोष्टकावरून लक्षांत येईल.

एकंदर जनसमूहाचें जगांतील एकंदर मानवजातीशीं नातें काय आहे हें भाषांच्या सादृश्यासादृश्यावरून ठरविलें पाहिजे. आज त्यासंबंधानें निश्चयात्मक विधान करतां येत

नाहीं. ब्रह्मदेशाच्या भाषा आणि त्यांचें वर्गीकरण वारंवार होऊन शेवटीं भाषाविषयक पाहणी (Linguistic Survey) वरून जें वर्गीकरण ठरविण्यांत आलें आहे तें येथें देतों.

**ब्रह्मदेशीय भाषांचें स्थूल वर्गीकरण.**

| १९०१ सालचें वर्गीकरण | | | १९११ सालचें वर्गीकरण | | |
|---|---|---|---|---|---|
| भाषागोत्र | कुळ | संघ अथवा गण | संघ अथवा गण | कुळ | भाषागोत्र |
| | तिबेटो ब्रह्मी | ब्रह्मी<br>कचिन<br>कुकिचिन | ब्रह्मी } लोलो<br>कचिन<br>कुकिचिन | तिबेटो ब्रह्मी | तिबेटो-चिनी |
| इंडोचिनी | सयामीचिनी | ताइ<br>करेण | ताइ<br>सिनिटिक | सयामी चिनी | |
| | मोन अनाम | उत्तर कांबोजी<br>वा-पलौंग | तॅलैंग<br>पलौंग-वा<br>मिया ओ-याओ | मोनख्मेर | आस्ट्रो-एशिआटिक |
| मलयी | ........ | मलयी | मलयी | | मलयो-पॉलिनेशिअन |

Census of India-Burma- Vol. IX pt. Ip. 187.

ह्या स्थूल वर्गीकरणावरून देशांतील एकंदर जातिभेदाची आणि जातिमूलक भाषाभेदाची बरोबर कल्पना येणार नाहीं. एका ठिकाणचे आणि एक भाषा बोलणारे लोक वियुक्त झाले म्हणजे त्यांच्या निरनिराळ्या राष्ट्रस्वरूपी जाती बनतात. हेच वियुक्त झालेले सदृश लोक त्यांच्यांतीलच एका मोठ्या संघाच्या, जातीच्या किंवा राष्ट्राच्या तावडींत आले आणि त्यांच्यामध्यें दळणवळण वाढलें म्हणजे त्यांच्या उपभाषांचें वियुक्तत्व नाहींसें होऊन त्यांचें पुन्हा मोठें राष्ट्र बनण्यास सुरुवात होते. कोणत्याहि भाषेस जितका संस्कार अधिक तितकें तिचें मर्त्यत्व कमी, आणि ती बोलणाऱ्यांचा मोठ्या समूहांत समावेश होऊन त्यांचें विशिष्टत्व नाहींसें होण्याचा संभव कमी. पण लहान लहान टोळ्यांस संस्कार झाला नाहीं तर कालांतरानें अधिक संस्कार पावलेल्या दुसऱ्या भगिनी-रूपी उपभाषा बोलणाऱ्या शेजारच्या एखाद्या समूहांत त्यांचा सहज अंतर्भाव होतो. यासाठीं निरनिराळ्या जाती आणि त्यांच्या उपभाषा यांच्या वृद्धिसंकोचाकडे पाहिलें पाहिजे. जाती आपली विशिष्ट उपभाषा टाकून सर्वसामान्य भाषेचा आश्रय कितपत करतात हें दाखविण्यासाठीं जातींची लोक-संख्या आणि जातीची भाषा बोलणारांची संख्या यांची तुलना केली पाहिजे.

***ब्रह्मदेशांतील जातींची संख्या व त्या जातींची भाषा बोलणारांची संख्या दाखविणारें कोष्टक.**

| जात | जातीची लोकसंख्या | जातीची भाषा बोलणारांची संख्या. |
|---|---|---|
| **ब्रह्मी संघ** | | |
| ब्रह्मी | ७४,७९,४३३ | ७८.८३,२९९ |
| आकारानी | ३,४४,१२३ | ३,२३,९६२ |
| तौंग्यो | १९,६५६ | १९,३१७ |
| इन्था | ५२,६८६ | ५५,८८० |
| दनु | ७०,९४७ | १८,६९४ |
| हपोन | ३७८ | ३४२ |
| तव्हॉयान | ५२३ | ४६ |
| कडु | ११,१९६ | ११,०६९ |
| चौंग्था | २,५०६ | २,५१५ |
| म्रो अथवा म्रु | २,७०८ | २,७१८ |
| तामन | ५२७ | ... |
| यबेन | १,५४९ | ... |
| याव | ९६ | ... |
| **कुकि-चिन संघ** | | |
| **जुनी कुकि** | | |
| क्यॉ (च्यॉ) | २४९ | २४९ |
| **उत्तरचिन** | | |
| थाडो | १,००९ | १,००९ |
| यो | ३,९१८ | ३,९१८ |
| न्विति | ८३२ | ८३२ |
| सोक्ते | ११,३६८ | ११,३६८ |
| कन्हौ | १०,८८२ | १०,८८२ |
| सियिन | ३,१२७ | ३,१२७ |
| **मध्यचिन** | | |
| तशोन | १०,६०६ | १०,६०६ |
| यहौ | १३,५६८ | १३,५६८ |
| न्गाव्न् | ३,८३१ | ३,८३१ |
| व्हेनोह | ३,३८३ | ३,३८३ |
| क्वांगलि | ३,७०१ | ३,७०१ |
| बौंग्शे(लाइ) | १२,४१६ | १२,४१६ |
| क्वंग | ६,९२६ | ६,९२६ |
| योक्वा | २,८४९ | २,८४९ |
| शिन्तौंग | ७,९१८ | ७,९१८ |

* Census of India, Burma. Vol. IX.

[ब्रह्मदेशी जाती व भाषा—पुढें चालू]

| | | |
|---|---|---|
| लइयो | ६,४०३ | ६,४०३ |
| योतुन | ८,९४९ | ८,९४९ |
| मिश्र | ५,९०२ | ... |
| **दक्षिणचिन** | | |
| चिन | ... | २,३३,६६१ |
| चिनबोक | १८,१७९ | १८,१७९ |
| चिनबोन | १,६०० | १,६०० |
| यिंडु | ४,३४८ | ४,३४८ |
| तौंग्था | १७,४६२ | १७,२४४ |
| थात | ७९ | ८० |
| अनु | ४७९ | ४७४ |
| खमि | १६,३७२ | १६,४३१ |
| दैंमेत | ९५४ | ९१९ |
| म्हंग | २३ | २३ |
| **काचिन ब्रह्मीमिश्र** | | |
| स्झी | ३,००३ | २०५ |
| लाशि | २,९०८ | ० |
| मरु | ३,८५५ | २०९ |
| मरिंग्था | ४०१ | ३१६ |
| **लोलो संघ** | | |
| लिसु (लिसाव) | ८,४८७ | ९,०६६ |
| लहु (मुहसो) | १८,१०३ | १८,५०० |
| कि (लहुस्सि) | ३,१८९ | ३,९२४ |
| अखा (काव) | ३३,१८१ | ३२,९२५ |
| अको | ४,११९ | ७९४ |
| लोलो (म्येन) | ३३९ | ३३९ |
| काचिन | १,६२,३६८ | १,६९,४१४ |
| **थइ** | | |
| सालविनच्या पश्चिम किनाऱ्यावरील | | |
| शान | ९,२६,८७९ | ८,९७,५७८ |
| दये | २०१ | २२५ |
| सालविनच्या पूर्वकिनाऱ्यावरील | | |
| लु | १७,३३१ | १३,२६२ |
| हकुन | ४२,३६६ | ४८,४०८ |
| सयामी | ९,६४३ | ८,९०२ |
| **सिनिटिक-करेण** | | |
| करेण (स्गाव व घो) | ८,७२,८२५ | ८,५०,७५६ |
| तौंग्यु | १,८३,०५४ | १,८३,०५४ |
| करेण्णि | १२,००८ | २१,२०३ |
| करेण्णेत | ३,७२१ | ७२८ |
| करेण्ब्यु | ७९० | ७७७ |
| झयेन | ४,९८१ | ४,८९२ |
| सिनसिन | ५३३ | ८९९ |
| ब्रे | ६,९११ | ६,९१२ |

[ब्रह्मदेशी जाती व भाषा—पुढें चालू]

| | | |
|---|---|---|
| मनो | १,४४५ | २,१८२ |
| यिनबाव | ९११ | २,१६६ |
| पदौंग | ८,५१६ | ८,५१६ |
| **मोनख्मेर संघ** | | |
| तलैंग | ३,२०,६२९ | १,७९,४४३ |
| **पलौंग-वा** | | |
| पलौंग | १,४४,१३९ | १,४४,२४८ |
| दानव | १,७२४ | ... |
| यिन (रिअंग) | ७,९२८ | ५,००४ |
| वा | १४,६७४ | १२,५४८ |
| एन | ३,४५५ | ३;६८४ |
| प्यिन | २७५ | २७३ |
| पले | ६८ | ... |
| **मियाओ-याओ** | | |
| मियाओ | ६४६ | ६४६ |
| याओ | ५१२ | २७४ |

संख्यामहत्त्वाशिवाय ज्या दुसऱ्या मुद्याकडे लक्ष द्यावयाचें तो मुद्दा म्हटला म्हणजे समुच्चयाचें ऐतिहासिक महत्त्व हा होय. हें महत्त्व मोजतांना जातीचें एकंदर कार्य लक्षांत घेतलें पाहिजे; जातीचा अधिकार किती प्रदेशावर होता, तिचें वाङ्मय किती आहे, त्या जातीच्या उत्कर्षाबरोबर कोणत्या कला कितपत वृद्धिंगत झाल्या हें मोजलें पाहिजे. अशी मोजणी करतां ब्रह्मी जातीस आणि ब्रह्मी भाषेसच अधिक ऐतिहासिक महत्त्व आहे हें दृष्टीस पडतें. ब्रह्मी भाषा ब्रह्मदेशांतील इतर भाषांपेक्षां अधिक सुसंस्कृत आहे. त्यामुळें भारतीय संस्कृतीचा ठसा ब्रह्मी जातीवर इतर जातींपेक्षां अधिक आहे. शान, करेण, काचिन इत्यादि जाती देखील बौद्ध आहेत, पण त्यांच्या उपासनापद्धतीस ज्ञानाचा जोर नाहीं, यामुळेंच करेणसारख्या लोकांस खिस्ती करण्यास मिशनरी मंडळीस बरेंच सोपें गेलें. आराकानी, काचिन आणि करेण यांचीहि सविस्तर माहिती आपणांस अवश्य आहे. आतां प्रत्येक महत्त्वाच्या जातीकडे वळूं.

**काचिन.**—उत्तर ब्रह्मदेशांतील काचिन डोंगरांतून हे काचिन किंवा चिंगपा लोक राहातात. आसाम सरहद्दीवर यांनां सिंग्फो असेंहि नांव आहे. या लोकांच्या पुष्कळ जाती, पोटजाती व कुळें असल्यानें, मिस्किना व भामो या जिल्ह्यांच्या राज्यव्यवस्थेखालीं येणाऱ्या काचिनपर्वतप्रदेशाचे ४० लहान भाग करण्यांत आले. (नुकतेच या चाळिसांचे पांच मोठे भाग केले आहेत.) या भागांखेरीज कथ, मॉंगमिट आणि उत्तरेकडील शान संस्थानें यांतून पुष्कळ काचिन लोक आहेत. १९०१ सालच्या खानेसुमारींत काचिन लोकांची संख्या ६४,४०५ भरली, व १९११ मध्यें १,६२,३६८ दाखविली आहे. शब्दशास्त्रीय शोधांवरून असें दिसतें कीं, काचिन किंवा चिंगपा या लोकांचे मूळ उत्पादक भारत-चिनी वंशांतील

असून, प्रागैतिहासिक कालांत भारत-चीनांत मोन-अनामची लाट पसरल्यावर, पश्चिम चीनमधील आपलीं घरेंदारें सोडून ज्या ठिकाणीं तिबेट, असाम, ब्रह्मदेश व चीन या देशांच्या हद्दी मिळतात त्या प्रदेशांत ते आले. तेथें त्यांच्या तिबेटी, नागो, ब्रह्मी व कुकी-चिनी अशा शाखा होऊन त्या पश्चिमेकडे व दक्षिणेकडे जेव्हां गेल्या तेव्हां इरावती व चिन्द्विन या नद्यांच्या दरम्यान मूलस्थानीं अवशिष्ट राहिलेले लोक तेच हे चिंग्पा होत. १९ व्या शतकाच्या मध्यकालीं, काचिन लोकांची दक्षिण सरहद्द हल्लीं आहे त्यापेक्षां २०० मैल उत्तरेस होती. तेव्हांपासून ही जात आपल्या मोठ्या समुदायानिशीं हळू हळू दक्षिणेकडे व पूर्वेकडे सरकत चालली आहे. समायिक शासनपद्धतीमुळें हीं लहान स्वतंत्र कुळें एकत्र होऊन यांचा मोठा समुदाय झाला आहे असें नसून आपलें मूलस्थान सोडून, ज्यांत अगदीं कमी अडथळा येईल अशा मार्गानें बाहेर जाण्याची त्यांची सामान्य प्रवृत्ति याला कारण आहे. हल्लीं काचीन लोक उत्तरब्रह्मदेशाच्या सरहद्दीच्या दोन्ही बाजूंस आहेत व त्यांचें बळ इतकें आहे कीं, शासननियमांच्या बाबतींत सरहद्दीवरील राज्यशास्त्र्यांनां तें चांगलें विचारांत घ्यावें लागतें. काचिन डोंगरांतून राहणाऱ्या जातींसाठीं केलेल्या १८९५ च्या कायद्यान्वयें, इरावतीच्या डाव्या किनाऱ्यावरच्या ब्रिटिश सरकारनें न्मइखाच्या दक्षिण प्रदेशासंबंधीं शासनाची जबाबदारी आपणाकडे घेतली; व मलिखा आणि न्मइखा यांच्या संगमापासून निघून लावन जिल्ह्याच्या उत्तरसरहद्दीमधून (यांत मर्गझच्या खाणी येतात) जाणाऱ्या रेषेच्या दक्षिणेकडील प्रदेशासंबंधीं जबाबदारी उजव्या किनाऱ्यावरच्या सरकारनें आपणाकडे घेतली. या रेषेच्या उत्तरेकडे राहाणाऱ्या जातींनां असें सांगण्यांत आलें होतें कीं, त्यांच्या दक्षिणेवर स्वाऱ्या करण्याचें जर त्यांनीं बंद ठेविलें तर त्यांनां कांहीं अडथळा करण्यांत येणार नाहीं. या रेषेच्या दक्षिणेला शांतता स्थापण्यांत येऊन, तेथील लोकांच्या खाजगी व्यवहारांत शक्य तितका कमी हात घालून, कांहीं थोडीशी खंडणी त्यांच्याकडून घेण्यांत आली. सरहद्दीवरच्या ब्रिटिश हद्दींत मुख्य धोरणें जीं ठेवण्यांत येतात तीं म्हटलीं म्हणजे या जातींनां निःशस्त्र करावयाचें व सरहद्द आणि अंतर्भाग यांतून रस्ते काढावयाचे. यांजकडून थोडीशी खंडणीहि घेण्यांत येते.

**करेण**—ब्रह्मदेशांतील डोंगरांत राहणाऱ्या मुख्य जातींपैकीं करेण ही एक जात आहे. हे लोक सितांग व इरावती या नद्यांनां विभागणारी पेगु योमाची मधली रांग, सितांग आणि सालविन यांमधील पौंगलौंगची रांग आणि इरावती डुंदरबनाच्या पश्चिमेस असणाऱ्या आराकन योमा पर्वतांच्या पूर्वबाजूचे उतार, यांतून वस्ती करून राहातात. मोन सत्तेच्या वाढीमुळें पुन्हां एकवार दऱ्याखोऱ्यांत जाऊन राहण्यापूर्वीं ज्या चिनी लोकांच्या जाती शान लोकांनीं नेट लावल्यामुळें दक्षिणेकडे आल्या, त्यांचेच वंशज हे लोक (करेण) असावेत असा समज आहे. त्यांच्या परंपरागत कथांवरून, चीन आणि तिबेट यांमध्यें पसरलेल्या गोबीच्या वाळवंटाच्या पश्चिमेस यांचें मूलस्थान असावें असा तर्क करण्यांत आला आहे. १९०१ सालच्या खानेसुमारींत ब्रिटिश हिंदुस्थानांत यांची संख्या एकंदर ७२७,२३५ होती; त्यापैकीं ८६,४३४ स्गॉ लोक, १७४,०७० पो लोक, ४९३६ भाइ लोक व "अनिर्दिष्ट" असे ४५७,३५५ लोक होते.* स्गॉ आणि पो यांनां संघशः "श्वेतकरेण" असें नांव असून, ते विशेषतः ब्रिटिश मुलुखांत राहातात. त्यांच्या कपड्यांच्या रंगावरून त्यांचीं नांवें पडतात. भाइ किंवा "रक्तकरेण" लोकांनां कांहीं जण अगदीं भिन्न वंशाचे समजतात; ते मुख्यत्वेंकरून परे-न्नि या स्वतंत्र डोंगरी संस्थानांत राहातात. करेण मनुष्य ब्रह्मी मनुष्यापेक्षां जास्त आडव्या अंगाचा व पांढऱ्या कातडीचा असतो; त्याच्या ठिकाणीं डोळ्यांतील मंगोली तिरवेपणा जास्त प्रमाणांत असतो. स्वभावांत सुद्धां हे लोक ब्रह्मी लोकांपेक्षां निराळे आहेत. विनोदवृत्तीचा यांच्या ठिकाणीं अगदींच अभाव आहे. ते अति मंद व सावधान असतात व ब्रह्मी लोकांत वास करणारा उल्लास व मोहकता यांच्यांत मुळींसुद्धां नाहीं. स्वच्छता व सत्यप्रियता या गुणांत त्यांची ख्याति आहे तरी ते घाणेरडे व दारूबाज आहेत. ब्रिटिश साम्राज्यांत देशी जातींपैकीं ख्रिस्ती कळपांत शिरण्यास उत्सुक असणारी पहिली जात म्हणजे श्वेत लोकांची. मिशनरी लोकांनीं त्यांच्यापुढें केलेल्या नवीन संप्रदायास ते फार उत्कटतेनें कवटाळतात याचें कारण त्यांच्यांत प्रचलित असलेल्या भविष्यांनीं त्यांचीं मनें अगोदरच तयार झालेलीं असतात हें होय. त्यांच्या चमत्कारिक परंपरागत कथा बायबलच्या धर्तीवर असतात व याशिवाय प्रबल ब्रह्मी लोकांशीं त्यांचें हाडवैर असतें. १९०१ सालच्या खानेसुमारींत ब्रह्मदेशांतील १४७,५२५ ख्रिस्त्यांपैकीं १ लाखाच्यावर नुसते करेण लोकच होते. रक्तकरेण लोक श्वेतकरेणांपेक्षां फारच भिन्न असतात. सर्व करेण जातींत यांच्या इतके रानटी, क्रूर व बेकायदेशीर दुसरे कोणीच नाहींत. कुळांतील प्रत्येक पुरुषाच्या पाठीवर उगवता सूर्य भडक शेंदरांत गोंदण्याची चाल असे. हीं माणसें लहान व खुरकुल्या पडलेलीं असतात तरी तीं सशक्त असतात. त्यांचे चेहरे रुंद व पिंगट रंगाचे असतात. त्यांचा पेहराव म्हणजे एक आंखूड चोळणा (याचा रंग बहुधा लालसर असून त्याचे पट्टे पांढरे काळे किंवा टार्टन कापडासारखे असतात) आणि डोक्याभोंवती एक हातरुमाल गुंडाळलेला असतो. करेण भाषा स्वरप्रधान आहे व भारत-चीन वंशाच्या सयामी-चीन शाखेंत हिचा अन्तर्भाव होतो.

**आराकानीः**—आराकानमधील लोकांनीं आपली ऐतिहासिक परंपरा मागें इ० पू० २६६६ सालपर्यंत नेऊन

* या लोकांची बेरीज वरील लोकसंख्येइतकी येत नाहीं.

पोंचविली असून आपल्या देशांतील २२७ स्वकीय राजांची सारखी ओळीनें वंशावळी तयार केलेली तें दाखवूं शकतात. शिवाय त्यांचें असेंहि म्हणणें आहे कीं, एकेकाळीं त्यांचें साम्राज्य बरेंच विस्तृत होतें, व आवाप्रांत, चीनचा कांहीं भाग व बंगालचा कांहीं प्रदेश इतक्या दूरवर त्यांची सत्ता पसरलेली होती. निरनिराळ्या काळीं मोंगल लोकांनीं व पेगूमधील लोकांनीं आराकानांतील अगदीं मध्यप्रदेशापर्यंत शिरून हल्ले केलेले आहेत. आशियाखंडांत पोर्तुगीज लोकांचें प्रावल्य होतें त्याकाळीं त्यांनींहि आराकानमध्यें आपलें तात्पुरतें ठाणें वसविलें होतें. १७८२ मध्यें तो प्रांत शेवटीं ब्रह्मी लोकांनीं जिंकून घेतला, आणि तेव्हांपासून १८२६ मध्यें येंदाबूच्या तहाअन्वयें तो प्रांत ब्रिटिशांनां मिळाला त्यावेळेपर्यंतचा आराकानचा इतिहास ब्रह्मदेशाच्या इतिहासांत मोडतो. आराकान हें प्राचीन शहर पूर्वी त्या प्रांताची राजधानी होतें. तें कोलाडेंग नदीच्या एका लहान फांट्यावर वसलेलें आहे. परंतु त्या देशांतील लहानमोठ्या बंदरांपासून तें फार दूर असल्यामुळें आणि तेथील हवाहि अत्यंत रोगट असल्यामुळें अलीकडे अक्याब येथें वस्ती वाढत गेली व त्यावरोवर आराकान हळू हळू मोडकळीस आलें; आणि सध्यां तर अक्याब हेंच त्या प्रांताचें मुख्य शहर झालेलें आहे. जुनें शहर (हल्लींचें म्योहौंग) हें अक्याबच्या ईशान्येस ५० मैलांवर आहे. या प्रांतांत बहुतेक सर्व वस्ती माघ लोकांची असून ते बौद्ध आहेत, व तोच संप्रदाय ब्रह्मदेशांतहि सर्वत्र पसरलेला आहे. भिक्षूंची निवड सर्व वर्गांच्या लोकांमधून करण्यांत येते, व त्यांचें मुख्य काम म्हणजे मुलांनां शिक्षण देणें हें होय. त्यामुळें तेथें शिक्षणाचा प्रसार पुष्कळ झालेला असून एकंदर प्रांतांत अगदीं लिहितांवाचतांसुद्धां येत नाहीं असे लोक थोडे आहेत. भिक्षु बनावयास लायकी लागते ती सदाचरण व साधारण शिक्षण या दोन गोष्टींची. भिक्षूचे ठिकाणीं सदाचरण म्हणजे बौद्धधर्मांच्या नियमांप्रमाणें चांगली ठरलेली वागणूक असावी लागते, आणि त्याचें शिक्षण तेथील पंडिताकडून मानमान्यता मिळेल इतकें असावें लागतें.

आराकानी लोक मूळ ब्रह्मी लोकांचेच वंशज आहेत; परंतु मध्यें आराकान योम पर्वतांच्या रांगा असल्यामुळें ते आपल्या मूळ लोकांपासून निराळे झालेले आहेत, व त्यामुळें त्यांची भाषा व चालीरीती याहि अगदीं निराळ्या वनल्या आहेत. जरी त्यांनां ब्रह्मी लोकांनीं जिंकलें होतें तरीसुद्धां ते जेत्या ब्रह्मी लोकांपासून अगदीं निराळेच राहिलेले आहेत.

आतां प्रत्यक्ष ब्रह्मी लोकांकडे वळूं. त्यांचा विस्तृत इतिहास येथें देतां येत नाहीं तथापि त्यांच्या नेतृत्वाखालीं सर्व देश असतां देशाची स्थिति कशी काय होती हें लक्षांत घेतलें पाहिजे.

ब्रह्मदेश इंग्रजांच्या हातीं येऊन हिंदुस्थानास जोडला जाण्यापूर्वी ब्रह्मदेशामध्यें जी राज्यपद्धति प्रचलित होती त्या पद्धतीचें वर्णन जॉन क्रॉफर्ड याच्या "आवा येथील वकिलातीची हकीकत" (१८२७) या लेखावरून लासेन यानें दिलें आहे. त्याचाच येथें अनुवाद केला आहे.

**ब्रह्मदेशांतील सात वर्गः**—ब्रह्मी राज्यपद्धति पूर्णपणें एकतंत्री आहे. तथापि ब्रह्मदेशांतील कित्येक वर्ग अगदीं भिन्न असल्यामुळें थईच्या राज्यपद्धतीहून ही राज्यपद्धति थोडी निराळी आहे. राजघराणें, अधिकारीमंडळ, पुरोहितवर्ग, व्यापारी किंवा धनिक लोक, शेतकरी, गुलाम व बहिष्कृत लोक, असे सात वर्ग किंवा जाती या देशांत आहेत. पेगू येथील लोकांमध्येंहि फक्त लहान लहान मांडलिक राजांनांच वंशपरंपरेनें पदव्या असतात. त्यांनां शुभव किंवा सुन्ह्व (सुभव) असें उपपद असतें. त्याचा अर्थ 'कुलीन घराण्यांतील' असा दिसतो. वरिष्ठ अधिकार देणें किंवा काढून घेणें हें राजाच्या इच्छेवर अवलंबून असतें. वडिलोपार्जित जिंदगी हिरावून घेतल्याचीं अनेक उदाहरणें आढळतात. ब्रह्मी राज्यव्यवस्थेच्या या संक्षिप्त इतिहासांत, प्रथम तेथील कित्येक जातींची माहिती देऊन नंतर राज्यव्यवस्था, कर, जमावंदी, सैन्य, कायदे, व न्यायखातें या निरनिराळ्या खात्यांची क्रमवार माहिती दिली आहे.

या ठिकाणीं पुरोहित वर्गाबद्दल फारसें वर्णन देत नाहीं. ब्रह्मदेशांत त्यांची संख्या बरीच असून त्यांची राहणी सामान्यतः त्यांच्या धर्मशास्त्रांतील नियमाप्रमाणें असते. इतर ठिकाणांप्रमाणेंच येथेंहि अधिकाराप्रमाणें ब्रह्मी भिक्षूंच्या पायऱ्या आहेत; इतर बौद्धदेशांप्रमाणेंच येथेंहि मठ असून ब्रह्मी देशांत भिक्षू व भिक्षुणी आहेत. गौतमाच्या अनेक देवळांपैकीं, प्रत्यक्ष ब्रह्मदेशांतील अमरपूर, सगेंग, रंगून व पेगू येथील देवळें, पावित्र्यानें व भव्यतेनें विशेष प्रसिद्ध आहेत. येथील भिक्षूंनां राजसंरक्षण असतें, परंतु राजकीय बावतींत पडण्याची त्यांनां मनाई असते.

एखाद्या व्यापाऱ्यानें मोठा धनसंचय केल्यास त्याला राजाज्ञेनें 'थु-थे' (धनवान) अशी पदवी देण्यांत येते; अशा व्यापाऱ्यांनां राजसंरक्षणाचा फायदा मिळतो; तथापि, ही पदवी आनुवंशिक नसून वाटेल तेव्हां काढून घेतां येत असल्यामुळें, वेळोवेळीं नजराणे देऊन राजाची मर्जी या व्यापाऱ्यांनां संपादावी लागते. राजाची धनतृष्णा शांत करण्यासाठीं या थु-थेनीं त्याला हजारों टिकेल (एक प्रकारचें नाणें) दिल्याचीं उदाहरणें आहेत. ब्रह्मी मजूरवर्गापैकीं फार थोड्या लोकांच्या मालकीच्या जमिनी असून ज्यांच्या स्वतःच्या जमिनी नाहींत अशा मजुरांची संख्या फार मोठी आहे. धर्माधिकारी लोकांशिवाय बाकीची सर्व प्रजा ही आपली एक प्रकारची मालमत्ता असून, तिची आपल्याला वाटेल तशी विल्हेवाट लावण्याचा आपणांस अधिकार आहे अशी ब्रह्मी राजांची समजूत आहे, यामुळें सरकारच्या विशिष्ट परवानगीशिवाय या प्रजाजनांनां

आपलें वसतिस्थान सोडतां येत नाहीं, आणि कांहीं काळपर्यंत व विशिष्ट कारणासाठींच अशी परवानगी देण्यांत येते. परंतु स्त्रियांनां बहुधा अशा प्रकारचा प्रतिबंध नसतो. लोकवस्ती अगदीं कमी असल्यामुळें येथें मजुरीचे दर फार भारी आहेत. खासगी लोकांस मजूर कामावर लावण्याची परवानगी त्यांच्या जवळून पैसे घेऊन देण्यांत येते व अशा तऱ्हेनें मजुरांच्या अल्पतेचा दरबार गैरवाजवी फायदा घेतो.

कांहीं विशिष्ट कर्जाबद्दल कुळानें सावकाराची नोकरी केलीच पाहिजे, असा सयामप्रमाणें येथें कायदा नाहीं. ज्या ज्या वेळीं सरकारला मजुरांची गरज लागेल त्या त्या वेळीं अमुक मजूर पाहिजेत असा प्रांतिक अधिकाऱ्यांनां राजाचा हुकूम सुटतो.

सावकारापासून काढलेल्या कर्जाच्या मानानें त्याची नोकरी करण्याचा जे ठराव करितात ते व वंशपरंपरेचे असे दोन प्रकारचे गुलाम असतात. पहिल्या प्रकारच्या गुलामांची संख्या मोठी आहे; परंतु सावकाराचें काम करून कर्ज फिटल्यावर ते पुनः स्वतंत्र होतात. या गुलामांपासून काम करून घेण्यासाठीं त्यांनां शारीरिक शिक्षा करण्याची धन्यांनां मोकळीक असते; परंतु शरिरांतून रक्त निघेपर्यंत त्यांनीं त्यांनां शिक्षा करतां कामा नये. तशी गोष्ट झाल्यास कर्जाची फेड झाली असें समजण्यांत येतें. पंचवीस टिकेलपेक्षां अधिक कर्जाबद्दल ज्या स्त्रिया गहाण ठेविलेल्या असतात, त्यांचा सावकाराला उपस्त्रियांसारखा उपयोग करतां येतो; परंतु ते असले हक्क कधींहि बजावीत नाहींत. या रकमेपेक्षां कमी कर्ज असल्यास स्त्रियांनां त्यांचें स्वातंत्र्य परत मिळतें. सावकारापासून या स्त्रियांनां पुत्र झाले तरीहि त्यांनां स्वातंत्र्य मिळतें. ऋणको आईबाप आपल्या मुलांनांहि गहाण टाकतात. अशा प्रकारच्या गुलामांची विक्री करतां येते. दुसऱ्या प्रकारच्या गुलामांत बहुतेक लढाईंत धरून आणिलेल्या कैद्यांचाच समावेश होतो. आसाम, काचार व शेजारचे देश यांबरोबर झालेल्या युद्धांत अशा प्रकारचे अनेक गुलाम ब्रह्मी लोकांनीं आणिलेले होते. सयामी लोकांपेक्षां ब्रह्मी लोक गुलामांनां चांगल्या तऱ्हेनें वागवितात. गुलामांचा आपल्या धन्यांशीं कोणत्या प्रकारचा संबंध असावा याविषयीं ब्रह्मी धर्मशास्त्रांत नक्की नियम दिलेले आहेत. देवळांच्या कामावर लाविलेले गुलाम, प्रेतदहन करणारे लोक, कैद्यांवर देखरेख करणारे लोक, मांग, महारोगी व त्यांसारखे इतर असाध्य रोगी, लुळेपांगळे व वारांगना या सर्व लोकांनां बहिष्कृत समजण्याची ब्रह्मदेशांत चाल आहे. या लोकांनां नागरिकत्वाचे हक्क नसून धार्मिक विधींत त्यांनां भाग घेतां येत नाहीं. त्यांनां शहरांत राहतां येत नाहीं; आसपासच्या खेड्यांत व दूर ठिकाणीं त्यांनां राहवें लागतें. वेश्यावृत्तीच्या दुराचारी स्त्रियांचाच या निंद्य वर्गांत समावेश होतो. त्यांनीं तो धंदा सोडून दिल्यास त्यांनां पुनः गरती समजण्यांत येतें, कारण ब्रह्मी लोक पातिव्रत्यास फारसें महत्त्व देत नाहींत. याप्रमाणें माहिती देऊन लासेन असें म्हणतो कीं, या बाबतींतील ब्रह्मी कायदे हिंदी कायद्यांसारखे आहेत असें या आचारभ्रष्ट वर्गाच्या माहितीवरून दिसून येतें. आचारभ्रष्ट लोकांमध्यें अतिशय नीच असे जे चाण्डाल त्यांनीं गांवाबाहेर रहावें असा हिंदू लोकांचा कायदा आहे. लासेन पुढें म्हणतो: ब्रह्मी राज्यपद्धतीवरून तेथें अगदीं बेबंदशाही होती असें दिसून येतें; व अशा प्रकारच्या राज्यपद्धतीपासून होणारे सर्व अनर्थ तेथें झालेले आहेत. सरकारी जाहीरनाम्यांत "सर्व प्रजेच्या मालमत्तेचा व जीविताचा मालक" असें राजाला म्हटलें आहे. त्याच्या इच्छेप्रमाणें सर्व लोकांची व जमिनीची त्याला विल्हेवाट लावतां येते. स्वतःचा व आपल्या प्रधानमंडळाचा जीव धोक्यांत न घालतां तो आपल्या या हक्काची शक्य तेवढी अंमलबजावणी करतो; फक्त बंड होण्याची भीति हीच कांहीं अंशीं त्याच्या जुलमी वर्तनास आळा घालिते.

**ब्रह्मी लोकांची राज्यपद्धतिः—**वझीराच्या किंवा मुख्य प्रधानाच्या हातीं वरिष्ठ अधिकार असतो. एक सार्वजनिक व एक खासगी असे राजापाशीं दोन मंत्री असतात. यांच्या मार्फतीनें राजाच्या सर्व हुकुमांची अंमलबजावणी होते. पहिला मंत्री सर्वांत वरिष्ठ असून, तो ज्या ठिकाणीं आपलें मंत्रिमंडळ भरवितो त्या ठिकाणावरून त्याला 'लोत्थान' असें नांव पडलें आहे. सामान्यतः या मंडळांत चार सभासद असतात, त्यांनां वान्–जी किंवा वान्–क्री असें म्हणतात. या शब्दाचा अर्थ उच्च अधिकारी असा होतो. कायदे करणें, त्यांची बजावणी करणें व न्याय देणें हे सर्व अधिकार या लोकांकडे असतात. मताधिक्यानें ते खटल्याचा निकाल करितात. मंत्रिमंडळाच्या निरनिराळ्या सभासदांनांहि न्यायाधीश या नात्यानें शिक्षा फर्मावितां येतात; परंतु त्यांनीं दिलेल्या निकालावर मंत्रिमंडळाकडे अपील करितां येतें. राजाच्या हुकुमांनां मंत्रिमंडळाची संमति मिळाली पाहिजे असा कायदा नसला तरी वहिवाट आहे. वरिष्ठ मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें स्वतः राजाहि कधीं कधीं मंत्रिमंडळांत काम करितो. या मंत्रिमंडळाच्या चार सभासदांचे प्रतिनिधीहि आपल्या वरिष्ठांप्रमाणेंच खटले चालवितात. दुसऱ्या म्हणजे खासगी मंत्रिमंडळांतहि चार सभासद असतात; ते राजाचे सल्लागार असून, पहिल्या प्रकारच्या मंत्रिमंडळाप्रमाणेंच मताधिक्यानें दिलेल्या निकालावर ते राजाचा अभिप्राय घेतात. त्यांचें कार्यक्षेत्र लोत्थान इतकेंच विस्तृत आहे. या मंडळामध्यें राजानें केलेल्या सर्व हुकमांची चर्चा करण्यांत येते. या मंडळाच्या सभासदांस राजाकडे जाण्याची मोकळीक असल्यामुळें, त्याच्यावर यांचें बरेंच वजन असतें. या दरबारी मंत्रिमंडळांत सुमारें तीस चिटणीस असून, मंडळांतील चर्चेची नोंद ठेवणें व राजांच्या हुकमांची अंमलबजावणी करणें हीं त्यांचीं कामें असतात. याशिवाय, त्या मंडळांत राजाचे दूत असून, सरकार त्यांच्याकडून गुप्त हेरांचेंहि काम करून घेतें. हीं मंत्रिमंडळें ब्रह्मीराजाच्या जुलमी वर्तनास आळा घालीत असतील अशी कल्पना करणें चुकीचें आहे. कारण तीं मंडळें राजावर फार अवलंबून असतात. ब्रह्मी राज्याचा चांगुलपणा किंवा वाईटपणा सर्वस्वीं राजाच्या वैयक्तिक स्वभावावर अवलंबून असतो.

ब्रह्मी राज्याची विभागणी खालीं दिल्याप्रमाणें आहे. प्रथमतः त्याचे लहान मोठे प्रांत पाडलेले आहेत; त्या प्रत्येकाचे जिल्हे किंवा नगरसंघ केलेले असून, प्रत्येक जिल्ह्याचे पोटजिल्हे पाडलेले असतात. या पोटजिल्ह्यांत कित्येक गांवें असतात. प्रांत व राजधानी असे म्यो या शब्दानें दोन्ही अर्थ ध्वनित होतात. परंतु तटबंदी

केलेलें शहर असा त्या शब्दाचा खरा अर्थ आहे. मोठ्या शहरांचीं नांवें प्रांतांना दिलेलीं आहेत. मोठमोठ्या खेड्यांच्या नांवांवरून खेड्यांच्या समुदायांचीं नांवें पडलेलीं आहेत. इलाखाधिपतीस 'म्यो वन' असें म्हणतात. मुलकी सुभेदार, सेनापति, न्यायाधीश व जिल्हाधिकारी या सर्वांचीं कामें त्याच्याकडे असतात. त्याच्या हाताखालीं त्याचा एक प्रतिनिधि असतो. कर वसूल करणारे व जकाती वसूल करणारे हे याच्या खालचे अधिकारी आहेत. यांशिवाय, एका अधिकाऱ्याकडे कायद्याची अंमलबजावणी करण्याचें व दुसऱ्याकडे बंदोबस्त ठेवण्याचें काम असतें; यांचा खालीं उल्लेख करूं. म्यो वन याला देहान्त शिक्षा देण्याचा अधिकार असतो. दिवाणी खटल्यांतील यानें दिलेल्या निकालावर राजधानींतील वरिष्ठ मंत्रिमंडळाकडे अपील करितां येतें. जिल्हे, पोटजिल्हे व खेडीं यांमध्येंहि अशीच व्यवस्था असते. न्यायखातें व वजावणीखातें यांचें एकीकरण हा ब्रह्मी राज्यांतील मोठा दोष आहे. कोणत्याहि ब्रह्मी अधिकाऱ्याला पगार मिळत नाहीं; वरिष्ठ अधिकाऱ्यांनां कांहीं जमीन तोडून दिलेली असते, व त्यांच्या तैनातीला कांहीं नोकर दिलेले असतात. खालच्या अधिकाऱ्यांनां नोकरीबद्दल कांहीं जहागीर व अनियत उत्पन्न मिळतें. यामुळें जुलूम व लांचलुचपत या गोष्टी ब्रह्मी राज्यांतून सामान्य व अपरिहार्य झालेल्या आहेत. ब्रह्मी राज्यांतील इतर खातीं व एकंदर राज्यव्यवस्था यांप्रमाणें, कराच्या बाबतींतहि कठोरता व अव्यवस्था आढळून येते. अनिश्चितता, लांचाची इच्छा व जुलूम हे दोष येथेंहि वास्तव्य करितात.

शेतकीकरितां घेतलेल्या सर्व जमिनी शेतकऱ्यांच्या मालकीच्या आहेत असें सरकार मानतें, पण त्यांच्या विगारकामाची मागणी करतें; म्हणजे अर्थातच जमिनीवरील कराची मागणी करतें. बहुतेक जमिनी अधिकाऱ्यांनां पगारादाखल दिल्या गेल्यामुळें पौरस्त्य राजांची ही मुख्य जमिनीपासून मिळणाऱ्या उत्पन्नाची बाब अजीबात नाहींशी होते. या पगारादाखल दिलेल्या जमिनींचे मालक बहुधा राजधानींतच राहत असल्यानें त्यांचे गुमास्ते या जमिनींची व्यवस्था पाहतात व त्यांत राहणाऱ्या लोकांनीं कोणतें काम करावयाचें व किती सारा द्यावयाचा हें ते ठरवितात. हे प्रतिनिधी साहजिकच शेतकऱ्यांच्या अडचणींकडे दुर्लक्ष्य करून मालकांचें हित पाहतात. शिवाय या जमिनी मिळविण्याकरितां दरबारांत पुष्कळ लांच द्यावा लागतो. यामुळें शेतकऱ्यांकडून वराच पैसा उकळण्यांत येतो. अशा जहागिरी-दाखल दिलेल्या जमिनी पुष्कळ वेळां राजाची मर्जी खप्पा झाल्यास तो काढून घेतो. कांहीं प्रसंगीं, चांगली कामगिरी केलेल्या अधिकाऱ्यांनां गांवांचें उत्पन्न बक्षीस देण्यांत येतें. अशा रीतानें बक्षीस मिळालेल्या लोकांनां, 'म्यो-थु जी' ही पदवी मिळते; त्या पदवीचा अर्थ लहान जिल्हे आणि गांवें यांवरील अधिकारी असा आहे. अशा तऱ्हेचे अधिकार कांहीं सरकारच्या दुर्लक्ष्यामुळें व कांहीं फार दिवस लोटल्याकारणानें कधींकधीं वंशपरंपरा चालतात. या अधिकारांवर असलेल्या लोकांनां, आपले जमीनहक्क दुसऱ्याला विकून किंवा बक्षीस देऊन, आपली मालकी त्याच्याकडे सोंपवितां येते; अशा अधिकाराबद्दल त्या ठिकाणीं स्पष्ट नियम आहेत. हिंदुस्थानांत ज्याप्रमाणें पुष्कळदां भूमिदान दिलेलें पहाण्यांत येतें तसें ब्रह्मी राज्यांतून फारच क्वचित् आढळतें व तें फक्त विशेष पवित्र मानलेल्या देवळांसच देण्यांत येतें; हें दान कायमचें असून देवांनां दिलेल्या जमिनींत राहणारे लोक देवस्थानचे कायमचे दास बनतात व त्यांनां स्वतंत्रता कधींहि मिळूं शकत नाहीं. या जमिनींचें उत्पन्न पुरोहित स्वतःकरितां घेत नाहींत, तर पवित्र इमारतींचें रक्षण करण्याच्या कामीं किंवा उत्सवांकरितां त्याचा उपयोग करण्यांत येतो. पुरोहित भिक्षेवर आणि प्रतिग्रह घेऊन आपला उदरनिर्वाह करितात.

शेतकऱ्यांनां हंगामी मालकाला पट्टी द्यावी लागून शिवाय वेळोवेळीं सरकारांत पट्टी भरावी लागते. अशा पट्ट्या सरकारच्या जरूरीप्रमाणें एकेका ठिकाणाहून किंवा सबंध जमिनींतून वसूल करण्यांत येतात. फक्त जमिनीवरच पट्टी असते असें नाहीं, तर उत्पन्नावर देखील असते व तीहि बेसुमार असते. व्यापारी शहरांतून किंवा ज्या ठिकाणीं गिरण्या, कारखानें आहेत अशा शहरांतून, कुटुंबांतील निरनिराळ्या माणसांवर पट्टीची रक्कम किती जमते हें समजण्यास, कांहीं कांहीं शहरांना १२७ हजार टिकेल सरकारांत भरावे लागतात, एवढें सांगितल्यास पुरे होईल. या पट्टीचें ओझें, ब्रह्मी लोकांस, तलैंग किंवा पेगु लोकांस व ब्रह्मीराज्यांत राहण्याऱ्या यूरोपीय लोकांस फार जाणवतें. आपआपल्या मांडलिक अंमलाखालीं राहणाऱ्या करेण लोकांनां, त्यांच्या कायद्यान्वयें सर्व प्रत्यक्ष करांपासून सुटका असते, पण त्यांच्या राजांनां वेळोवेळीं वरिष्ठ सरकारला खंडणी द्यावी लागते. जेव्हां सरकारचा खजिना रिकामा होत आला असेल, तेव्हांच फक्त घरपट्टीसारखा जादा कर बसविण्यांत येतो. पांग-का-चा (याला मांगमांग या नांवानें बहुधा ओळखीत. तो इ. स. १७८३ त राज्यारूढ झाला) या ब्रह्मी राजानें १७९८ सालीं सर्व घरांवर ही घरपट्टी बसवून ४८० लक्ष टिकेल किंवा ४८ हजार पौंड इतका पैसा वसूल केला. ब्रह्मी सरकारच्या या वरील उत्पन्नांच्या बाबींखेरीज, कांहीं विशेष उपयोगी झाडें, मच्छीमारी, सोन्याच्या खाणी आणि इतर नैसर्गिक उत्पन्नावरील करांच्या रूपानें सरकारी खजिन्यांत भरपूर पैसा जमतो. याशिवाय पुष्कळ जकातीहि आहेत. पण आपल्याला फक्त ब्रह्मीराजांच्या वेळच्या राजकीय शासनसंस्थेची थोडीशी माहिती करून घ्यावयाची असल्यानें, आवश्यक खर्च वजा जातां ब्रह्मी राजाला आपल्या घरखर्चाकरितां दर वर्षी जवळ जवळ २५ हजार पौंड इतका पैसा राहतो एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

**ब्रह्मी सैन्य**–ब्रह्मी लोकांच्या सैन्यव्यवस्थेकडे दृष्टि वळविली असतां आपणांस तींत बरेच दोष असल्याचें दिसून येतें. त्यांपैकीं मुख्य दोष असा आहे कीं, न्यायाधीश किंवा करवसुली करणारा अंमलदार, किंवा इतर दिवाणी अधिकारी या सर्वांनां लष्करामध्येंहि हुद्याच्या जागा मिळूं शकतात; कारण या देशांत मुलकी कामें व लष्करी कामें असा भेद करण्याचा प्रघातच नाहीं. वयांत आलेल्या सर्व पुरुषवर्गास लष्करांत नोकरी करणें भाग असतें, परंतु ती नोकरी करावयास भाग पाडण्याकरितां जुलूमच करावा लागतो. अशा रीतीनें बळजोरीनें जमवलेल्या लोकांनां लढाईच्या कामावर पाठवावयाचें, किंवा इमारती

बांधणें वगैरे इतर कामावर लावावयाचें हें त्या त्या वेळच्या परिस्थितीवर अवलंबून असतें. जेव्हां ब्रह्मी शेतकऱ्यांना लढाईच्या कामावर जाण्याकरतां बोलावतात तेव्हां ते ग्रामाधिकाऱ्यांच्या व प्रांतिक सुभेदारांच्या हुकुमाखालीं असतात. सरकारकडून त्यांनां पगार नसतो, मात्र लढाईचें सामान व अन्न हीं पुरविलीं जातात. सामान्यतः ब्रह्मी लोक शांतताप्रिय व शेतकींत विशेष मन घालणारे असल्यामुळें ही लष्करी नोकरी करण्यास ते नाखुष असणार हे साहजिक दिसतें. पण ते लोक काटक, आज्ञाधारक व हालअपेष्टा सोसणारे असून युद्धांत चांगले तरबेज होण्यासारखे असतात. त्यांचें देशी शस्त्र दास हें वापरण्यास मोठें कठिण असतें; शिवाय दुमुठी तरवार व भाले असतात; आणि परराष्ट्रांपासून बंदुकी वापरण्याचेंहि त्यांनीं उचललेलें आहे. ते चिलखतें कधींच वापरीत नाहींतसें दिसतें, आणि आपल्या अपुऱ्या पोषाखांत व सैल बांधल्यामुळें उडणाऱ्या केसांनिशीं ते लढाईवर जातात. पूर्वीं ब्रह्मी लोकांत घोडदळ मुळींच नसे; परंतु मणिपूर व इतर उत्तरेकडील प्रांत जिंकून घेतल्यानंतर घोडदळ ठेवण्यास सुरवात झाली. १७९५ मध्यें या देशांतले सुमारें २००० घोडेस्वार राजानें ठेविले होते. घोडे ठेंगणेच पण चांगले मजबूत व दमदार असतात. ब्रह्मी राज्यांत हत्तींचा उपयोग लढाईचे कामाकडे करीत असल्याचें कधींच दिसत नाहीं. जातां जातां एवढें सांगतों कीं, राज्यांतल्या सर्व पशूंवर आपली पूर्ण मालकी आहे असें ब्रह्मी राजा समजत असतो. ब्रह्मी लोकांच्या युद्धपद्धतींत उत्तरभारतांतील इतरांच्या पद्धतींहून असा एक भेद आहे कीं, ब्रह्मी लोक मेढेकोटांचा उपयोग करतात. मेढेकोट म्हणजे किल्ल्यासारख्या चौकोनी इमारती असून त्यांनां बाहेर पडण्यास नऊ वाटा असतात व गोळ्या झाडण्याकरतां भोंकें ठेविलेलीं असतात. हे कोट वळकट टेक झाडांच्या बुंध्यांचे बांधतात. ब्रह्मी लोक असली तटबंदी करण्यांत चांगले वाकबगार असून त्यांकरितां ते चांगल्या सोईच्या जागा विशेषतः दलदलीच्या प्रदेशानजीक निवडून काढतात; व तेथें जातांना बरोबर सर्व सामग्री घेतात. तथापि इंग्लिशांबरोबर झालेल्या त्यांच्या युद्धांत इंग्लिशांच्या जोराच्या हल्ल्यांपुढें त्यांनां फार वेळ टिकाव धरवला नाहीं.

**कायदे व न्यायपद्धतिः**—आतां ब्रह्मी लोकांच्या राज्यव्यवस्थेंतील शेवटल्या म्हणजे कायदेरचना व न्यायपद्धति या गोष्टींची माहिती द्यावयाची. ब्रह्मी लोकांचे कित्येक कायदेग्रंथ असून त्यांचीं नांवें मनु, नंदन व धम्मवलिय इत्यादि आहेत. पहिल्या नांवावरून असा अर्थ होतो कीं, तो ग्रंथ मानवधर्मशास्त्राच्या आधारें झालेला आहे; व हा अर्थच बरोबर आहे. या ग्रंथाला धर्मशास्त्र असें म्हणतात व हल्लीं चालू असलेल्या अत्यंत जुन्या हिंदुधर्मशास्त्रांचें हें विवरण आहे. ब्रह्मी लोकांच्या न्यायपद्धतींत चांगल्या म्हणण्यासारख्या अशा गोष्टी फारच थोड्या आहेत. कायद्याप्रमाणें न्यायनिवाडा देणें ही गोष्ट राज्यकारभारांतील इतर गोष्टींपासून अलिप्त ठेविलेली नसते. बहुतेक न्यायाधीश लांचखाऊ असतात, त्यामुळें दाव्यांत जो कोणी अधिक पैसा देईल त्याच्या बाजूचा निकाल होतो. यांत शेने नांवाच्या जातींतल्या न्यायाधिशांचा कायद्यांचा अभ्यास चांगला असून ते मोठे सन्मान्य असतात व ते इतर न्यायाधिशांइतके लांचखाऊ नाहींत. प्रथम साक्षीदारांनां ठरलेल्या पद्धतीप्रमाणें शपथ देतात. अगदीं महत्त्वाच्या खटल्यांत कबुलीजबाब मिळविण्याकरतां त्यांचा छळहि करतात. सर्व उपाय योजूनहि खरें काय तें बाहेर न येईल तर ईश्वरी न्याययोजनाहि शेवटीं करतात. या न्यायाचा प्रकार असाः फिर्यादी व आरोपी यांनां आपल्या बोटांचीं टोकें कढत शिशयावर किंवा जस्तावर ठेवण्यास लावतात. त्यानंतर तीन दिवसांनीं त्या बोटांनां टांचण्यांनीं टोंचतात, आणि ज्याच्या जखमेंतून रक्त निघेल त्याला निर्दोषी समजतात आणि ज्याच्या जखमेंतून रक्तेतर कांहीं द्रव्य निघेल तो गुन्हेगार असें ठरवितात.

तुरुंग असतात ते अगदीं गैरसोयीचे व तसेच धोक्याचे असतात. कैदी लोकांनां पहारेकरी लोक फार कडक रीतीनें वागवतात. या पहारेकऱ्यांनां सरकारकडून पगार मिळत नसतो; तर कैद्यांनांच तो द्यावा लागतो; आणि त्यांनां लागणाऱ्या अनेक प्रकारच्या वस्तूंचा त्यांनां लागेल तेवढा पुरवठा कैद्यांनीं केला नाहीं तर त्याबद्दल सूड उगवण्याच्या बुद्धीनें ते कैद्यांचे फारच हाल करतात. ब्रह्मी कायद्याप्रमाणें ज्या शिक्षा सांगतात त्याहि फार कठिण व क्रूरपणाच्या असतात. अगदीं सौम्य शिक्षा म्हटल्या म्हणजे दंड, कैद, व फटके. त्याशिवाय अंगविच्छेद करणें, देवळांमध्यें आजन्म चाकरी करण्यास लावणें या शिक्षा देतात. सर्वांत कडक शिक्षा म्हणजे मरणाची, आणि निरनिराळ्या गुन्ह्यांच्या प्रकारानुसार ही मरणाची शिक्षा निरनिराळ्या प्रकारची असते. शिरच्छेद करणें हा अगदीं नेहमींचा प्रकार; पण यापेक्षां क्रूर प्रकार म्हणजे माणसाला जिवंत पुरणें, किंवा पाण्यांत बुडविणें, किंवा अरण्यांत हिंस्रपशूंच्या भक्ष्यस्थानीं पडेल अशा ठिकाणीं हांकलून देणें. मरणाच्या शिक्षेचा वारंवार अम्मल केल्याचें ब्रह्मी राज्यांतील उदाहरण म्हणजे रंगून शहरांतलें आहे. त्या ठिकाणचा न्योवन अथवा सुभेदार हा दरसाल २५ ते ३० पर्यंत इसम फांशीं देत असे.

**ब्रह्मीलोकांची संस्कृतिः**—एकंदरींत ब्रह्मी लोकांतील संस्कृति थई किंवा सयामी लोकांतील संस्कृतीच्या दर्जाचीच आहे; मात्र ब्रह्मी लोकांच्या राज्यपद्धतींत असे कांहीं दोष आहेत कीं ते सयामी राज्यपद्धतींत आढळत नाहींत. ब्रह्मी लोकांत स्वाभिमानाची कल्पना फार कमी असून ते लोक वरिष्ठांच्या तंत्रानें चालणारे फार आहेत. युद्धापेक्षां त्यांनां शेतकीच फार आवडते. त्यांच्यामध्यें गोंदण्याची रानटी चाल कायम आहे. ब्रह्मी राज्यांतले सर्व स्त्रीपुरुष रहिवाशी कानांनां भोकें पाडून त्यांत सोन्यारुप्याचे दागिने घालतात. गरीब लोक त्यांच्या ऐवजीं लाकूड किंवा कागद यांचे तुकडे वापरतात. त्यांच्यांत सुपारी खाण्याचा फार शोक आहे. तंबाखूचें व्यसनहि सर्व दर्जांच्या लहानमोठ्या वयाच्या स्त्रीपुरुषांत आढळतें. इतर बाबतींत मात्र ते लोक बहुतेक नेमस्तपणानें वागतात. उपयुक्त कलांत व ललितकलांत ब्रह्मीलोकांची प्रगति बेतावाताचीच झालेली आहे. शास्त्रीय विषयांत त्यांची बुद्धि अगदींच कमी चालते. धर्मोपदेशक खगोलशास्त्राचा अभ्यास करतात पण तो फलज्योतिषाला मदत व्हावी म्हणून आणि वार्षिक पंचांगें वगैरे करण्याकरितां तात्पुरता करतात. त्या देशांत मठ इतके पुष्कळ आणि जिकडेतिकडे

पसरलेले आहेत कीं त्यामुळें सर्व लोकांच्या मुलांनां वाचन, लेखन व बेरीज वजाबाकी इत्यादि गणित इतक्या विषयांचें शिक्षण सहज मिळतें. बौद्ध भिक्षू या विषयांचें शिक्षण व धार्मिक शिक्षण देण्याचें काम करतात; व या विद्यादानाबद्दल दक्षिणा म्हणून त्या मुलांनां मठांतील व देवाल्यांतील कामें करावीं लागतात. त्यांचें एकंदर वाङ्मय पालीभाषेंतील ग्रंथ वगळले तर फारसें महत्त्वाचें नाहीं. यांचे पाली ग्रंथ व दक्षिणेकडील जे बौद्ध लोक पाली भाषेला पवित्र मानतात त्यांचे ग्रंथ एकच आहेत. ब्रह्मी लोकांचें विशिष्ट वाङ्मय म्हणजे गाणीं, धार्मिक कथा व बखरी एवढेंच आहे. यांपैकीं दुसऱ्या प्रकारच्या ग्रंथांची काव्यग्रंथ या दृष्टीनें बरीच योग्यता आहे. पहिल्या प्रकारांत मात्र ह्या काव्यमयत्त्वाच्या गुणाची उणीव दिसते. बखरींकडे अर्थातच त्यांतील हकिकतीपुरतेंच लक्ष द्यावयाचें असतें. ब्रह्मी वाङ्मयांतील एका नाटकाचें भाषांतर इंग्लिशमध्यें झालेलें आहे. ह्या एका नाटकावरून पाहतां ब्रह्मी लोकांत नाट्यकला मोठ्या उच्च दर्जाला पोंचल्याचें दिसत नाहीं. त्यांत नाटककारांनीं पात्रानें स्वगत बोलण्याचीं भाषणें, कांहीं संभाषणें व कांहीं पदें इतकें लिहिलेलें असतें व बाकीचीं भाषणें पात्रांनीं आपआपलीं तयार करून घ्यावयाचीं असतात; या ब्रह्मी लोकांच्या नाटकांतील कथानकें बहुतकरून रामायण व महाभारत या हिंदू लोकांच्या महाकाव्यांतून घेतलेलीं असतात. तथापि त्यांत दोष असा असतो कीं प्रयोगस्थळें खरीं अस्तित्वांतलीं घेतलेलीं नसून कीं कल्पित अद्भुत देशांतील असतात व नाटकाच्या गोष्टींतील परस्परसंबंध व शेवट योग्य प्रकारें दाखविलेला नसतो.

सरतेशेवटीं हें लक्षांत घ्यावयाचें कीं, मुग किंवा आराकानी या निकटसंबंधी लोकांप्रमाणेंच ब्रह्मी लोक गौतमबुद्धाच्या धर्माचे मोठे उत्साही व श्रद्धावन्त अनुयायी आहेत; आणि त्यांच्यांतील धार्मिक चालीरीती लंकेमधून या धर्माची प्राप्ति ज्यांनां झाली त्या भारतसंलग्न पूर्वदेशांतल्या इतर लोकांच्या चालीरीतींहून महत्त्वाच्या मुख्य बाबतींत निराळ्या नाहींत.

आतां ब्रह्मदेशांतील निरनिराळ्या भाषा व वाङ्मयें यांचें स्थूल अवलोकन करूं. त्यांच्या संबंधानें माहिती देतांना कांहीं जातिरूपी राष्ट्रांच्या इतिहाससंबंधानें माहिती येईलच.

ब्रह्मी—ही भाषा प्रथम एकाक्षरी असावी. पुढें तींत पाली भाषेचें मिश्रण होऊन तिच्यांतील मूळ शब्द एकाला एक असे चिकटवून नवेच शब्द बनविलेले आढळतात. या भाषेंत शब्दांचीं स्वरूपें मुळींच बदलत नाहींत. त्यामुळें शब्दांचा अर्थ केवळ त्यांच्या वाक्यांतील स्थानांवरून अगर शेजारच्या शब्दांवरून निश्चित होतो. याप्रमाणें या भाषेची रचना अगदीं रुखेंगप्रमाणें साधी आहे. परंतु या भाषेंत निरनिराळ्या दर्जांच्या माणसांनीं निरनिराळे शब्द वापरावयाचे असतात. हें सर्व भाषावैशिष्ट्य ब्रह्मी लोकांचें भारतीयांपासून भिन्नत्व दाखवितें.

ब्रह्मी भाषेची लिपी मात्र भारतीय आहे. या लिपींतील वर्णांचा आकार कांहींसा कानडी, सिंहली अथवा तुलैंग लिपीसारखा पण त्यांहून थोडासा साधा आहे. या लिपीचें भारतीयत्व नेहमींच मान्य झाले होतें असें मात्र नाहीं. कदाचित् चुकून आपण सत्याजवळजवळ विधान करूं, ही जणूं काय भीति धरून मुद्दाम आडरानांत जाऊं पहाणाऱ्या एका पाश्चात्यानें (कार्पानिअस यानें*) ही मातृकामाला हिब्र्यूपासून फारसींत येऊन नंतर जावांतील बलिभाषेशीं योग होऊन बनली असावी असा मौजेचा तर्क व्यक्त केला होता. दुसऱ्या एका अमेंदुतिअस या यूरोपीयानें ही लिपी आणि मल्याळम् लिपी या आर्मेनिअन लिपीपासून निघाल्या आहेत असा तर्क केला होता; परंतु या मातृकांचें आर्मेनियनशीं मुळींच साम्य नाहीं असें लेडेन म्हणतो.

ब्रह्मी लिपीचा त्या भाषेंतील वाङ्मयावर बराच परिणाम झाला आहे. या भाषेंतील काव्यांत यमक व प्रास फार आढळतात असें जें कार्पानिअस यानें म्हटलें आहे त्याचें कारण या भाषेंतील शब्दच असे आहेत कीं, त्यामुळें आपोआप यमकें साधतात. बरेचसे ब्रह्मी भाषेंतील ग्रंथ गद्य आहेत; परंतु त्यांत कांहीं ठिकाणीं शब्दांवर जो जोर द्यावा लागतो तो सामान्यतः नियमित स्थळीं येत असल्यामुळें तें गद्य कानाला पद्याप्रमाणें वाटतें.

ब्रह्मी भाषेंत ग्रंथसंख्या बरीच आहे. विशेषतः सांप्रदायिक व शास्त्रीय विषयांवर ग्रंथ अनेक आहेत. त्यांत पौराणिक, फलज्योतिषविषयक, वैद्यकीय व धर्मशास्त्रीय ग्रंथ हे प्रमुख आहेत. धर्मशास्त्रांमध्यें 'दम्मसत्वयी' हा ग्रंथ सर्वांत महत्त्वाचा आहे. बुकॅनन म्हणतो कीं, ब्रह्मी वाङ्मयांत ऐतिहासिक ग्रंथ अनेक असून त्यांत 'महाराजा वयंगी' हा ग्रंथ मुख्य आहे. ब्रह्मी लोकांनीं चिनी व सयामी लोकांचे इतिहास व त्याप्रमाणेंच काथी, कोपनपयी, पगू, सायम्मय, आणि लयनझयन इत्यादि राष्ट्रांच्या इतिहासांचीं भाषांतरें केलीं आहेत असेंहि बुकॅनन यानें म्हटलें आहे. ब्रह्मी वाङ्मयांत बरींचशीं लहान लहान काव्यें, गाणीं व नाटकेंहि आहेत. त्यांपैकीं बरींचशीं संस्कृतवरून आलीं असावीं असें वाटतें. यांच्या नाटकांच्या विषयांत रामाची लंकेवरील स्वारी हा विषय प्रमुख आहे. पुढें दिलेले ग्रंथ ब्रह्मी लोकांचे विशेष आवडते असून त्यांपैकीं बरेचसे रुखेंग, सयामी व मलयु भाषेंतहि आहेत. यांपैकीं बरेचसे ग्रंथ पौराणिक आहेत तथापि यांत कांहीं चरित्रें व ऐतिहासिक ग्रंथहि आहेत.

ब्रह्मी लोकांचे विशेष आवडते ग्रंथः—

(१) जिनमन (२) नन्दजिन (३) नन्दगम (४) चंडगम (५) नारद (६) तेमी (७) नेमी (८) धम्मपद–कायद्यावरील ग्रंथ (९) नमगर–विधि व प्रार्थना (१०) लोगसर–नैतिक ग्रंथ (११) लोगनिधि–नैतिक ग्रंथ (१२) महोसुध (१३) वेसंदर अथवा वेसंदर कथा (१४) परमिखन (१५) चुडोंगखन (१६) बुंगखन (१७) कदोखन–प्रायश्चित्तविधि (१८) चतुदमसर (१९) संगवर (२०) भूरिदत (२१) किनरप्ये किन्नरचरित्र (२२) मलिन्मेंग द्रुधु–मलिन राजाचें चरित्र (२३) जिनक-जनक राजाचें चरित्र; सयामीमध्यें यास महाचिनोक म्हटलें आहे. (२४) युवजी (२५) खिप्रिवेंगखन (२६) तो त्वेक्खन (२७) म्निगुंग्सल (२८) अनुसासन (२९) सुअन्नशन (३०) विथोर (३१) कगिलेंग (३२)

* Alphabetum Barmanum sen Bomanum.

सदसिच्छौंग (३३) अनगत्वेंग (३४) न्गरेखन–नरकाचें वर्णन (३५) अत्तगत्तलेंग (३६) म्हत्त्वौवोंग (३७) जैन्दमन भिखु–जैन्दमन भिक्षुणीची कथा (३८) नन्दजैन–आनन्ददेव याची कथा.

ब्रह्मी भाषेचा यूरोपीयांपैकीं मिशनऱ्यांशिवाय कोणींहि विशेषसा अभ्यास केलेला आढळत नाहीं. कार्पानिअस याचा ग्रंथ* रोममध्यें १७७६ सालीं प्रसिद्ध झाला. यानंतर बुकॅनन वगैरेंचे ग्रंथ आढळतात. डॉ. बुकॅनन यानें तर आपल्या ग्रंथांत ख्रिस्ती वगैरे लोकांस बुद्धाचा खरा धर्म आचरण्याचा उपदेश केला आहे.† हा ग्रंथ अतुलि झरदो यानें मुद्दाम ख्रिस्ती लोकांचें परावर्तन करण्याकरितां लिहिला होता. त्याचें ग्हिन्सेंटिअस संगरमेंनो यानें भाषांतर केलें व तें बुकॅनन यानें छापून काढलें.

रुखेंगः—ही भाषा एकाक्षरी आहे. तथापि हींत पाली भाषेंतील वरेच अनेकाक्षरी शब्द मिसळले आहेत. पण त्यांतील प्रत्येक अक्षर निराळें लिहिण्याच्या पद्धतीमुळें ते शब्दहि कांहींसे एकाक्षरी वनले आहेत. ही भाषा आराकानमधील मूळ रहिवाशांची भाषा होय. हे सर्व बौद्धसांप्रदायी आहेत. आराकान हा प्राचीन काळीं मगध राज्याचा भाग असावा व त्यामुळेंच तेथील लोकांस बंगाली लोकांनीं मग अथवा मौग हें नांव दिलें असावें. यांची भाषा केवळ एकाक्षरी अगर अनेकाक्षरी नसून या दोहोंच्या मधील दुव्यासारखी आहे. रुखेंग लोक हे ब्रह्मी लोकांच्याच मूलवंशापासून निघाले असून त्यांची संस्कृति ब्रह्मी लोकांच्या पूर्वींच वाढली होती ही गोष्ट सर्वमान्य आहे. त्याप्रमाणेंच रुखेंग भाषेंतील शब्दांचे उच्चार ब्रह्मीइतके अपभ्रष्ट नसल्यामुळें भाषांचा इतिहास लिहिणाऱ्या भाषाशास्त्रवेत्त्यांस ब्रह्मी भाषेपेक्षां या रुखेंग भाषेचा जास्त उपयोग होईल. त्याप्रमाणेंच ब्रह्मी लोकांनीं त्यांनां जिंकीपर्यंत रुखेंग लोक हे स्वतंत्र होते त्यामुळें त्यांची भाषा जास्त शुद्ध राहिली आहे. ब्रह्मी लोकांवर पूर्वी अनेक स्वाऱ्या झाल्या त्यामुळें रुखेंग भाषेंत जर कोणत्या दुसऱ्या भाषेचें मिश्रण झालें असेल तर तें पालीचेंच होय; कारण ही भाषा म्हणजे त्या वेळच्या विद्वान् लोकांची पंडिती भाषा असून सर्व सांप्रदायिक ग्रंथ त्याच भाषेंत असत. यामुळें रुखेंग भाषेंत बरेचसे पाली शब्द आले आहेत व ते तसेच शुद्ध स्वरूपांत कायम आहेत.

रुखेंग भाषेंतील वर्णमाला रचनेच्या व अनुक्रमाच्या बाबतींत अगदीं देवनागरीसारखी आहे. मात्र ऱ्हस्व दीर्घ स्वरांच्या बाबतींत कांहीं फरक आहे. या वर्णमालेंतील अक्षरांचें स्वरूप मात्र कांहींसें ब्रह्मी अक्षरांसारखें आहे. या भाषेचें रचनेच्या बाबतींत मलयु भाषेशीं बरेंचसें साम्य आहे. हिची रचना अगदीं साधी असून तींत वचनें, विभक्त्या वगैरे विकृति किंवा अर्थ, काल, पुरुष इत्यादि क्रियापदांचीं निरनिराळीं रूपें नाहींत. बऱ्याचशा शब्दांचे नाम, विशेषण व क्रियापद या सर्वांचीं कार्यें करणारे अर्थ होतात व विशिष्ट अर्थ संदर्भावरून करावयाचा असतो. परंतु सामान्यतः निरनिराळे पदार्थ, गुण, क्रिया यांनां स्वतंत्र व पृथक् शब्द आहेत.

रुखेंग भाषेंत ग्रंथसंग्रह बराच आहे असें सांगतात. परंतु त्यांतील बरेचसे ग्रंथ पाली ग्रंथांचीं भाषांतरें आहेत. 'तिल्लवेर-चरित' या ग्रंथांत रुखेंग राष्ट्राचा इतिहास आहे. अंगुलिमाल यानें लिहिलेला 'करिक' नांवाचा ग्रंथ व धम्म-सत्' (धर्मशास्त्र) हा ग्रंथ हे दोन धर्मशास्त्रावरील ग्रंथ आहेत. याखेरीज विशेष प्रचारांतील ग्रंथ म्हटले म्हणजे पुढें दिलेले होतः—(१) राज-बुत्झ (२) राज-वोग्त्झ (३) तेमि (४) नेमि (५) जनक (६) सुवन्न असंग (७) भूरिदत (८) झैंगद-गुंग्म (९) सद इयेइ च चोगे (१०) महो (११) उनिंग ग्यइंग (१२) सोप सौंग म्यंग (१३) भूरिदत काप्य (१४) वोधिह मैंदेइ (१५) वेसइंग दर (१६) सइंगवेर (१७) कौकचे (१८) नरचो (१९) अधिकवल (२०) अभिधम्म (२१) सुनेइच क्येंग (२२) परम सइंग गौळ क्येंग (२३) महारग थक्येंग (२४) सपक्येंग (२५) धम्मसत् क्वेइंगरल्य (२६) धम्मसत् मनु (२७) धम्मसत् क्रकु (२८) धम्मसत् क्रुदेंग (२९) लोगसर (३०) सम्रिह्र (३१) तइंगतहो (३२) रदनन्हे खि (३३) रदनपइंग गुंग (३४) रदन पहेंग (३५) रदनकेंगरल्य (३६) रदनपौंग ख्वोक (३७) वनत्स (३८) कइंग्म तेइच्फक् पौंग वत्थु (३९) क्क्षिसाद प्रिंगदो (४०) गप्फ क्येंग (४१) लखनदिव (४२) नोमकप्य (४३) क्चैंगब्रैंग (४४) रामवत्थुच (४५) ब्रमसर (४६) बुद्धोवद (४७) पेदसौत (४८) मुंगलसौत (४९) खुनेइचरक (५०) खुनेइचरक परेइप (५१) पथविजेय (५२) सग्रउछौंग (५३) लेकेवेंग उछौंग (५४) सित्थदनु (५५) सत्पौंग (५६) सत्येंग (५७) सत् ह्वेंग (५८) सन्ह्वेखे (५९) मोएतो क्रंगच (६०) गुवैंग पोदि मौंगच (६१) हितोपदेस (६२) नोमको गथ (६३) ताचे हेइ चरसि (६४) ख्वोंगरि (६५) ख्वोंगलप (६६) ख्वोंगत्र्रे (६७) तहौंगग्र (६८) मेथौंगग्र (६९) सुमेथ (७०) रेवत्तच (७१) अश्वपिड (७२) प्रौंगब्र (७३) औंगपदिच (७४) पइंगमुच (७५) उग (७६) मौंगच्वच (७७) चोरे (७८) यंत्रे (७९) लुंगदिच.

वरील नांवांवरून स्पष्ट दिसतें कीं यांपैकीं कांहीं ग्रंथ संस्कृत भाषेंतील पुराणांतील व्यक्तींच्या चरित्रपर आहेत. 'रामवत्थुच' हा रामचरित्रावरील व बुद्धोवद हा बुद्धचरित्रावरील ग्रंथ आहे हें स्पष्ट दिसतें. इतर कांहीं ग्रंथ म्हणजे संस्कृत ग्रंथांचींच रूपांतरें आहेत. उदाहरणार्थ, हितोपदेस–हितोपदेश; धम्मसत् मनु–धर्मशास्त्र मनूचें; सुवन्न अस्यंग–सुवर्णश्रृंगीची गोष्ट, मुंबुकर मिश्र यानें एक सोन्याची गाय केली होती व ती राजा मुकुंददेव गजपति यास अर्पण केली होती त्या गाईची कथा; भूरिदत–भूरिदत्त, ही महाभारतामध्यें आलेल्या मगधदेशाच्या भूरिदत्त राजाची कथा आहे; भूरिदत काप्य–भूरिदत्त काव्य, हें वरील गोष्टीचेंच पद्यात्मकरूप आहे; राज बुंत्झ हें राजवंशावलीचें रुखेंग रूपांतर आहे; राजवोंग्त्झ हें त्याच विषयावरील दुसरें एक पुस्तक आहे; पथविजेय हें पृथुविजय असावें. या ग्रंथांतील मूळ कथांमध्यें व त्यांच्या स्वरूपांमध्यें बौद्ध जीवितक्रमास लागू पडतील अशा तऱ्हेचे फरक केले आहेत असें समजतें.

रुखेंग भाषेचा अभ्यास यूरोपीयांनीं विशेषसा केलेला दिसत नाहीं. डॉ. बुकॅनन यानें या भाषेंतील कांहीं शब्दांचा कोश

* **Alphabetum Barmanum.**

† **A View of the Religion of Godama.**

दिला आहे.* बुकॅनन यानें आणखीहि दोन भाषांचे नमुने दिले आहेत. एक रुइंगा. ही आराकानमधील मुसुलमान लोक बोलतात. ही अरबी, हिंदी आणि रुखेंग यांच्या मिश्रणानें तयार झाली आहे. दुसरी रुसन. ही आराकानमधील ब्राह्मणी धर्मांतील हिंदू लोक वापरतात. ही बंगाली व संस्कृत यांच्या मिश्रणानें आणि अपभ्रंशानें तयार झाली आहे. रुखेंग लोक ज्या प्रांताला रो असें म्हणतात व ब्रह्मी लोक ज्याला यो असें म्हणतात त्या प्रांतांतील भाषा रुखेंगचीच एक पोटभाषा आहे. त्याप्रमाणेंच रुखेंगच्या उत्तरेस व पूर्वेच्या बाजूस एक खेंग नांवाची जात आहे. त्यांची भाषाहि रुखेंगसारखीच आहे व या रो आणि खेंग शब्दांपासूनच या लोकांनां रुखेंग असें नांव मिळालें असें म्हणतात. यांचें मूळचें नांव 'मरुम्म' असें होतें व हा शब्द महावर्म याचा अपभ्रंश असावा असा लेडेन यांचा तर्क आहे. वर्म हें उपपद क्षत्रियांनां लावतात ही गोष्ट प्रसिद्धच आहे.

**मोन अथवा तलैंगः**—ही भाषा पेगू प्रांतांतील मूळ रहिवाशी वापरतात. हे आपणास मोन म्हणवितात पण ब्रह्मी लोक त्यांना तलैंग असें म्हणतात, व सयामी मिंगमोन असें म्हणतात.

या भाषेचा यूरोपीयांनीं अभ्यास केलेला दिसत नाहीं. फक्त बुकॅनन यानें या भाषेंतील कांहीं उतारे प्रसिद्ध केले आहेत.† ही अगदीं स्वतंत्र भाषा असून तिचा ब्रह्मी अथवा सयामी भाषांशीं कांहीं संबंध नाहीं असें ते म्हणतात. या भाषेंत बरेचसे ऐतिहासिक ग्रंथ आहेत अशी लेडेन यास माहिती मिळाली व ती खरी असावी असें त्याचें म्हणणें आहे. कारण त्यांच्यामध्यें ब्रह्मी लोकांपेक्षां वरीच अगोदर संस्कृतीची वाढ झाली होती व नंतर जरी त्यांची सत्ता बरीच आकुंचित झाली होती तरी पूर्वीं तें फार बलाढ्य राष्ट्र होतें. पोर्तुगीजांच्या प्राचीन इतिहासांत या राष्ट्राचें नांव मोव येथील पंडालु असें उल्लेखिलेलें आढळतें व त्यांनीं प्राचीन काळी कलमिन्हय साम्राज्याची स्थापना केली असें म्हणतात.

या भाषेची लिपी ब्रह्मी लिपीसारखीच आहे. या भाषेसंबंधी लेडेन यानें विशेषसें संशोधन केलें नाहीं.

तलैंग भाषेबद्दल डॉ. फ्रान्सिस मेसन (अमेरिकन ओरि. सो. ज. पुस्तक ४ थें) लिहितातः—

तलैंग भाषेंतील उच्चार चिनी भाषेंतील शब्दांच्या उच्चारांसारखे आहेत. बहुतेक धातू एकावयवी आहेत, परंतु ब्रह्मी व करेण भाषांप्रमाणें ते अनेकावयवी तत्त्वावर बनलेले आहेत. व्यंजन व मूळचा स्वर मिळून एक अक्षर होतें व हें अक्षर एकावयवी धातूला जोडून नवा शब्द होतो; जसें—कामी (नवीन), खामिंग (पागोटें), ताला (धनी), पॅरे (कुरुप), येमू (नांव). हे सर्व शब्द इंडो-यूरोपियन भाषांतील अनेकावयवी शब्दांहून भिन्न नाहींत.

संयुक्त व्यंजनांबद्दल तलैंग भाषा प्रसिद्ध आहे; यांपैकीं पुष्कळ व्यंजनें चिनी किंवा इंडोचिनी भाषांमध्यें आढळत नाहींत. बहुतेक मृदु व मूक व्यंजनांचा म् व न् या अनुनासिकांशीं संयोग करितात.

या भाषेचें व्याकरण अगदीं सोपें आहे. क्रियापदापूर्वी कर्ता व क्रियापदानंतर कर्म येतें. इतर इंडो-चिनी भाषांप्रमाणें प्रत्यय लावून शब्दांचीं निरनिराळीं रूपें बनवितात. परंतु अशीं रूपें, थई, ब्रह्मी किंवा करेण भाषांपेक्षां तलैंग भाषेंत थोडीं आहेत. तलैंग भाषेंतील शब्दसंग्रह अगदीं स्वतंत्र आहे.

**तलैंग व कोलः**—या भाषेंतील धातू थई, ब्रह्मी, करेण, नाग वगैरे भाषांतील धातूंसारखे नाहींत. त्याप्रमाणेंच ही भाषा चिनी, तिबेटी किंवा इतर दुसऱ्या कोणत्याहि तार्तर भाषेहून स्वतंत्र आहे. संस्कृत हिंदी, तेलुगु, तामिळ वगैरे कोणत्याहि भाषेचें तलैंग भाषेशीं साम्य नाहीं. तलैंग भाषेचा शब्दसंग्रह इतर सर्व भाषांच्या संग्रहांहून भिन्न आहे. मध्यहिंदुस्थानांत डोंगराळ प्रदेशांत रहाणाऱ्या, कोल, ओराओन, गोंड वगैरे रानटी जाती आहेत; व सोनताल, मुमिजा, मुंडा वगैरे अनेक पोटजाती आहेत. यांच्या भाषांची व तलैंग भाषेची व्युत्पत्ति एकच आहे. ले. टिकेल यानें इ. स. १८४० त एक लेख प्रसिद्ध केला. त्या लेखावरून असें दिसतें कीं तलैंग व कोल या भाषांमध्यें निकट साम्य आहे. पहिल्या सहा आंकड्यांचीं नांवें, पुरुषवाचक सर्वनामें, शरीराच्या निरनिराळ्या अवयवांचीं नांवें वगैरे शब्दांची व्युत्पत्ति एकच आहे. कांहीं शब्दांत थोडें साम्य आहे; ते शब्दहि एकाच धातूपासून निघाले असावे. खालील कोष्टकावरून या गोष्टी स्पष्ट होतील.

**तलैंग व कोल भाषांमधील साम्य.**

| मराठी | तलैंग | कोल |
|---|---|---|
| पुरुष | म्रिह् | मेल |
| डोकें | क्दोप | क्यूप |
| डोळा | मीट | मेट |
| नाक | मुह् | मुआ |
| कान | क्तो | खेत्वे |
| तोंड | पेंग | वई |
| जीभ | लेतइक | अलँग |
| हात | टो | टी |
| छाती | तो | तोआ |
| आई | याई | आया |
| ,, | मि | माई |
| तेल | क्निंग | निंग |
| चन्द्र | केतु | चान्दु |
| दगड | त्मोम् | तांगी |
| पाणी | डाई | दाह् |
| रडणें | यीम | याम |
| ऐकणें | मिंग | मेना |
| घेणें | कीट | किन्दा |
| भूक | क्नो | कायर |
| हें | नाव् | नोआ |
| एक | म्नोआ | मोय |

* Dr. F. Buchanan-Comparative Vocabulary of some languages spoken in the Burma Empire, Asiatic Researches Vol. V.

† Asiatic Researches.

| मराठी | तलैंग | कोल |
|---|---|---|
| दोन | या | बई |
| तीन | पि | पिआ |
| चार | पोन | पोनिआ |
| पांच | मेसन् | मोनया |
| सहा | तरिओ | तुरिया |
| असणें | नम् | मिन्ना |

चिनी, थई, ब्रह्मी, करेण, आसामी वगैरे भाषांमध्यें संख्यावाचक प्रत्ययांचा उपयोग केला जातो; परंतु तलैंग भाषेची गोष्ट निराळी आहे. पाश्चात्त्य भाषांप्रमाणें तलैंग भाषेंत नामाला संख्यावाचकें लावतात; जसें, त्माम् पि (तीन दगड). चिनी व इतर इन्डोचिनी भाषांमध्यें प्रत्ययाला संख्यावाचकें जोडतात. कोल भाषेंत नामाच्या एकवचनाला 'को' हा प्रत्यय लावून अनेकवचन बनवितात; परंतु तलैंग भाषेंत 'तौ' हा बहुवचनार्थी प्रत्यय लावतात; तलैंग व कोल यांच्या नांवांवरून या भाषांची उत्पत्ति एकच असावी असें वाटतें. कोल लोकांच्या एका जातीस ओराओन असें म्हणतात. या लोकांनां फार प्राचीन काळीं गंगेच्या जवळील प्रदेशांतून ब्राह्मण लोकांनीं घालवून दिलें. ले. टिकेल म्हणतो, "मुंडा लोकांची हकीकत प्रथमतः या ओराओन लोकांनींच दिली. मुंडा हे लोक पूर्वी छोट्या नागपुरांत रहात असत." या मुंडा लोकांनां 'हो' असें म्हणतात; परंतु कोल या नांवानें हे जास्त प्रसिद्ध आहेत. मुंडा व मोन हीं नांवें जवळजवळ एकच आहेत. तलैंग लोक आपल्याला मोन असेंच म्हणवितात. ज्या दोन राष्ट्रांचीं नांवें इतकीं सारखीं आहेत त्यांची उत्पत्ति भिन्न असणें अशक्य आहे.

ब्रह्मी व तलैंग इतिहासांवरून असें समजतें कीं, तलैंग जातीचे लोक सुसंस्कृत असून फार प्राचीन काळीं यांच्यापाशीं बौद्धधर्माचे ग्रंथ होते. सोना व उत्तरा यांनीं खिस्ती शकापूर्वी ३०७ वर्षें थाटुंग येथें बौद्ध संप्रदायाची स्थापना केली. परंतु इ. स. १०५७ पर्यंत या संप्रदायाचा प्रसार ब्रह्मदेशांत पूर्णपणें झाला नाहीं. इ. स. १०५७ सालीं ब्रह्मदेशच्या राजानें थाटुंग येथून विद्वान् लोक आणविले व पुगन येथें बौद्ध संप्रदायाची स्थापना केली. स्वर्णभूमि ही बुद्धघोसाची जन्मभूमि होती व हिलाच पूर्वी पेगू हें नांव होतें. बुद्धाच्या ९३० व्या वर्षी बुदोथेगूसेक तेरुन वहान्स या नांवाचा धर्मोपदेशक सिलोनमध्यें येऊन त्यानें विसुद्धिमाग्ग वगैरे पुस्तकें लिहिलीं. स्वर्णभूमीस परत आल्यावर त्यानें तुर्णपिटक हा ग्रंथ तयार केला व तो बुद्धाच्या मतांचा प्रसार करूं लागला.

हिंदू लोकांनीं प्राचीन काळीं पेगू येथें वसाहत केली असावी. मलाकांत पाली व संस्कृत लेख सांपडले आहेत, यावरून हिंदूंच्या वसाहती तेथें होत्या असें वाटतें. पेगूंतील हिंदू वसाहतवाले तेथील लोकांशीं मिसळून गेले. आराकानच्या इतिहासावरून असें समजतें कीं थोदुन नांवाच्या जातीचे लोक तलैंग लोकांशीं पूर्णपणें मिसळून गेले. पेगू, ब्रह्मदेश व थई वगैरे देशांत पाऊ किंवा तुंगघुस या जातीचे लोक आहेत, ते पेगूंतील मूळचे रहिवाशी असावे. परंतु या लोकांचा तलैंग लोकांशीं संबंध असावा असें यांच्या भाषेवरून वाटत नाहीं. जरी तलैंग भाषेंतील कांहीं शब्दांचें या भाषेंतील कांहीं शब्दांशीं साम्य आहे, तरी तेवढ्यावरून तलैंग भाषेशीं या भाषेचा संबंध असावा असें सिद्ध होत नाहीं; कारण, दुसऱ्याहि कित्येक भाषांतील शब्दांशीं या भाषेंतील शब्दांचें अशा प्रकारचें साम्य आढळतें.

**तलैंग व मलाकीः**—बौद्ध ग्रंथांचा प्रवेश होण्यापूर्वी तलैंग भाषेचा लेखनाकडे उपयोग होत नसे; नाहींतर, पूर्वीची बरीच माहिती मिळाली असती. गौतम व अशोक यांचे प्रचारक संप्रदायप्रसारार्थ फिरत असत त्यावेळीं तलैंग लोक मार्तवानच्या आखातांशीं रहात होते. थाटुंग ही त्यांची राजधानी होती. हल्लींची त्यांची लिपी खिस्ती शकापूर्वी तीनशें वर्षें प्रचारांत असलेल्या लिपीवरून निघाली असावी. अमरावती येथील लेखांवरून या जुन्या लिपीचें तलैंग लिपीशीं असलेलें सादृश्य दिसून येतें. मलाकांतील तोकून येथील लेखांतील लिपीचें अमरावती येथील लेखांच्या लिपीशीं साम्य आहे. मलाकांतील केद्दाजवळ सांपडलेल्या लेखाची लिपीहि तलैंग लिपीशीं जुळते. यावरून मलाकांतील लोक व तलैंग लोक यांचा पूर्वी संबंध असावा असें वाटतें. मलाकाच्या लेखांतील अक्षरें नवव्या व दहाव्या शतकांतील कुतिलाच्या अक्षरांसारखीं आहेत.

क् हें अक्षर पहिल्यानें आडवें लिहीत असत. ज्या वेळीं अलाहाबाद येथील स्तंभावर लेख लिहिला गेला त्यावेळीं आडव्या ओळीला थोडें खालच्या बाजूला वळण दिलें गेलें. व केद्दा लेखांत त्या वळणास अर्धवर्तुळांचा आकार मिळाला. न् बद्दल पूर्वी लंबक काढीत असत परंतु गया लिपींत त्याबद्दल लंबक व वांक काढूं लागले. मलाका लेखांत हें अक्षर असेंच लिहिलें आहे. हल्लींच्या तलैंग भाषेंत हें अक्षर ओळीच्या खालीं लिहितात. अस्सल पाली भाषा यानंतर झाली असली पाहिजे; कारण या अक्षराला वरील भागीं दुहेरी ओळ जोडतात.

**तलैंग व लाओ वगैरे.**—पूर्वद्वीपकल्पाच्या अन्तर्भागांतील लिपींची उत्पत्ति तलैंग लिपी पासून झालेली आहे. लाओ भाषेंत ही गोष्ट स्पष्ट दिसते; कारण त्या भाषेंत व्यंजनोच्चार दर्शविणारीं अशीं दोन चिन्हें आहेत. 'गा' या अक्षराबद्दल तलैंग भाषेंत 'के' हें अक्षर येतें; व 'वा' याचा उच्चार 'पे' असा होतो. अहोम, खाम्ती व श्यान या लिपी ब्रह्मी लिपीपासून झालेल्या नाहींत; यांची उत्पत्ति तलैंग लिपीपासूनच असली पाहिजे. कारण ऑ हा स्वरसंयोग तलैंगभाषेप्रमाणेंच व्यंजनावर उजव्या बाजूकडे जोडरेघ काढून दर्शवितात; परंतु ब्रह्मी भाषेंत अशा प्रकारचें चिन्ह नाहीं. अशाच प्रकारची जोडरेघ (–) चवथ्या व पांचव्या शतकांतील संस्कृत लेखांत आढळते. मलाकांतील लेखांत संस्कृतचें मिश्रण आहे; परंतु अशा प्रकारचें मिश्रण सिलोनमधील लेखांमध्यें आढळत नाहीं. मलाकाच्या प्रत्येक लेखांत एका ओळीमध्यें तेच ते शब्द आले आहेत. प्राचीन लिपीमध्यें ज्या ठिकाणीं शेवटीं 'म्' हें व्यंजन येतें, त्या ठिकाणीं पुढच्या शब्दाचें शेवटचें व्यंजन खालीं लिहून शेवटीं संस्कृत अनुस्वार लिहितात. शब्दाच्या शेवटचा मूळचा स्वर ज्या ओळींत नाहींसा होतो, ती ओळ संस्कृतप्रमाणें व्यंजनाच्या खालीं लिहितात. तलैंग भाषेंत हल्लीं त्याच चिन्हाचा उपयोग केला जातो; फक्त तें चिन्ह अक्षराच्या वरच्या भागीं करतात.

पूर्वकिनाऱ्यावरील लिपीची सिंहलीपासून उत्पत्ति झाली असावी. कांबोजी लोकांची लिपी पश्चिमेकडील लिपीपेक्षां अगदीं भिन्न आहे; परंतु सिंहली लिपीशीं तिचें निकट साम्य आहे. सयामी लिपी गेल्या चार पांच शतकांत कांबोजी लिपीच्या धर्तीवर बनविली गेली. पूर्वीच्या सिंहली भाषेचे सात घटकावयव होते. परंतु हल्लींची सयामी भाषा फारच सोपी आहे. सयामी लिपीचें फारच थोडे घटकावयव आहेत.

या वरील विवेचनावरून असा सिद्धान्त निघतो कीं सयाम व कांबोज येथील लोकांनीं आपला धर्म व वाङ्मय सिलोनपासून घेतलें; व पुरातन कलिंगराज्यापासून हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्याकडील लोकांस शिक्षण मिळालें.

सदरहू डॉ. मेसन यांच्या निबंधाचें व इतर ग्रंथांचें अवलोकन करून प्रो. के. अमृतराव, मद्रासच्या विश्वविद्यालयांतील द्राविड शब्दव्युत्पत्तिशास्त्राचे अध्यापक, हे तलैंग भाषेसंबंधानें लिहितातः– "अमेरिकन ओरिएंटल सोसायटीच्या १८५४ सालच्या एका वृत्तपत्रिकेंत तलैंग भाषेविषयीं कांहीं मनोरंजक माहिती प्रसिद्ध झाली आहे (पान २७९ पहा). हा निबंध रेव्हरंड फ्रान्सिस मेसन नांवाच्या ब्रह्मदेशांतील एका अमेरिकन पाद्र्यानें १८५३ सालच्या मे महिन्यांत त्या मंडळासमोर वाचला होता. तेनासरिम प्रांताच्या दक्षिणेस सुमारें दोनशें मैलांवर असलेल्या मलाक्कामध्यें जे पाली व संस्कृत शिलालेख सांपडले आहेत, त्यांवरून पाद्रीमजकुराचें असें मत झालेलें दिसतें कीं, पेगूमध्यें हिंदू लोकांची वसाहत बरीच अगोदर झाली असली पाहिजे; व हे आरंभीं आलेले हिंदू लोक त्या देशांतील कांहीं स्थानिक राष्ट्रजातींत मिसळून हल्लींचा तलैंग लोकांचा समाज बनला असावा. जिला ब्रह्मी लोक थोदुन असें म्हणतात अशा एका स्थानिक राष्ट्रजातीचा ह्या तलैंग लोकांतच अंतर्भाव होऊन ती विलुप्त झाली आहे असें कॅप्टन फायर यानें आराकानच्या इतिहासांत म्हटलें आहे."

प्रो. के. अमृतराव यांच्या माहितीवरून असें दिसतें कीं दक्षिण हिंदुस्थानांत प्राचीन तलैंग लिखाणांचा अभ्यास अद्याप कोणाकडूनहि झालेला नाहीं.

रंगून येथें १८७९–८० सालीं प्रसिद्ध झालेल्या 'ब्रिटिश बर्मा गॅझेटिअरच्या' दुसऱ्या खंडांतहि तलैंग भाषेविषयीं कांहीं संक्षिप्त माहिती दिलेली आढळून येते. ती माहिती तेथें 'अमेरिकन ओरिएंटल सोसायटीच्या जर्नलमधूनच' घेतलेली आहे.

मेसनच्या तलैंग भाषेवरील निबंधांत थोडेसे तलैंग भाषेंतील शब्द व त्या भाषेच्या व्याकरणांतील कांहीं विशेष लक्षणें दिलीं आहेत. तलैंग व तेलुगु ह्या दोन भाषांचा एकमेकींशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध असेल असें दिसत नाहीं. मोन ( तलैंग ) शब्दांसारखेच शब्द कोल, गोंड, कुरुख (कोरकु) आणि माल्टो भाषांत आहेत असें दाखविण्याचा मेसननें प्रयत्न केला आहे. त्यानें दिलेली शब्दांची यादी फ्रेंच 'रिव्हयू दी लिंग्विस्टिक'च्या १७ व्या खंडांतहि दिली आहे ( पान १६७ व पुढील पानें ). मेसन म्हणतो कीं, ह्या भाषांतील प्राथमिक अंक, पुरुषवाचक सर्वनामें शरिराच्या अवयवांचे वाचक शब्द, निसर्गांतील कित्येक पदार्थांचीं नांवें व थोडीशीं क्रियापदें हीं सर्व निःसंशय एकाच मुळापासून निघालीं असलीं पाहिजेत व ज्यांचें परस्परांशीं जरा दूरचें सादृश्य आहे असे दुसरे शब्द बहुधा एकाच धातूपासून बनले असावे.

**मुंडा व मोनख्मेरः**—मुंडा व मोनख्मेर कुळें यांच्यामधील संबंध 'इंडियन आर्किपेलेगो जर्नल' मध्यें प्रसिद्ध केलेल्या 'इंडो पासिफिक द्वीपांतील मानववंश' नांवाच्या लेखमालिकेंत लोगन यानें प्रथम निदर्शनास आणला. प्रोफेसर ई. कुहन यांनीं मोन-ख्मेर व मुंडा शब्दांच्या सादृश्यासंबंधीं विचार करीत असतांना एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, एकाक्षरी खासी-मोन-ख्मेर भाषा व कोल भाषा यांच्या मधला संबंध दाखविणाऱ्या कित्येक गोष्टी कोणाच्याहि अचूक ध्यानांत येण्यासारख्या आहेत. हिंदुस्थानांत काय किंवा ब्रह्मदेश, टॉंगकिंग, सयाम, आनाम व कांबोज ह्या हिंदुस्थानच्या पूर्वेकडील भागांत काय, तेथील वन्याचशा जनतेच्या खालीं मूळ रहिवाशांचा एक सर्वसाधारण थर असून त्यावर मागून आलेल्या वसाहतवाल्यांचे थरावर थर बसले आहेत. या मूळ थराच्या खाणाखुणा अद्यापहि स्पष्ट दिसत आहेत. डॉ. स्टेन कोनाउ यांनीं देखील मुंडा व मोनख्मेर भाषांच्या परस्पर संबंधाविषयीं बरेंच सविस्तर विवेचन केलें आहे. (ग्रियर्सनचें 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ् इंडिआ' पुस्तक, खंड ४, पान ११ व पुढील पानें पहा ).

**मोन व कोलेरिअनः**—रॉयल एशिआटिक सोसायटीच्या १८७८ सालच्या जर्नलमधील 'आर्यन्व्यतिरिक्त भाषा' नांवाच्या निबंधांत ई. एल्. ब्रँडेथ म्हणतो कीं, "मोन भाषेस तलैंग आणि पेगुई अशींहि नांवें आहेत. मोन लोकांचें पेगू हें मूळचें वसतिस्थान होतें, परंतु सुमारें १०० वर्षांमागें ब्रह्मी लोकांनीं त्यांनां त्या प्रांताच्या वन्याचशा भागांतून हांकून लाविलें. प्राथमिक अंक व दुसरे कांहीं शब्द यांच्या सादृश्यावरून मोन व कोलेरिअन भाषासंघांत कांहीं संबंध असावा असें मानण्यांत आलें आहे. परंतु उपरिनिर्दिष्ट संघ असल्या क्षुल्लक पुराव्यावरून बनविलेले नाहींत. ते बनवितांनां यांपेक्षां वन्याच अधिक शब्दांचें सादृश्य विचारांत घेतलें आहे एवढेंच नव्हे, तर त्यांची उभारणी व्याकरणविषयक सादृश्याच्या पायावर झाली आहे. पण इकडे मोन व कोलेरियन भाषांच्या व्याकरणांकडे जर नजर फेंकली तर त्यांत जितकी भिन्नता दिसते तितकी दुसऱ्या कोणत्याहि भाषांच्या व्याकरणांत आढळून येणार नाहीं" (पान २८ पहा).

**मोन व कोलः**—रॉयल एशिआटिक सोसायटीच्या सन १८७८ सालच्या जर्नलमधील 'पेगूचे मोन व मध्यहिंदुस्थानांतील कोल यांचा संबंध' या नांवाच्या निबंधांत फोर्ब्स म्हणतो कीं "पेगूचे मोन व मध्यहिंदुस्थानांतील कोल यांचा परस्परांशीं कांहीं संबंध असेल असें मानावयास जरी कांहीं आधार नाहीं, तरी त्यावरून ह्या दोघांत इतिहासपूर्वकालीं कोणत्याहि प्रकारचें दळणवळण नव्हतें असें कांहीं निष्पन्न होत नाहीं. १८७२ सालच्या ब्रिटिश ब्रह्मदेशाच्या खानेसुमारीवरील अहवालांत तलैंग राष्ट्र हें हिंदुस्थानांतून निघून ब्रह्मदेशांत एकत्र झालेल्या दोन परस्परभिन्न कुलांपासून बनलें असल्याचें दाखविलें आहे. तलैंग हें नांव तेलिंग किंवा तेलिंगण शब्दाचेंच भिन्न स्वरूप असून ज्यांनां तें आरंभीं लावण्यांत येत होतें ते लोक समुद्रमार्गानें येऊन आणून येथें वसाहत करून राहिलेले द्राविड लोक होते

असें मानण्यांत येतें. आर्य लोक येण्यापूर्वी मध्यहिंदुस्थानांत जे कोल लोक होते तेंच तलंग राष्ट्रांतील दुसरें व बहुधा मोठें कुल असावें. हे लोक हल्लीं स्वतःस 'मून' म्हणवितात असा समज आहे."

ब्रह्मदेशांत इकडून पूर्वी गेलेल्या लोकांचा प्रथमपासूनचा इतिहास देण्यास येथें अवकाश नाहीं. म्हणून आतां आपण एकदम उत्तरकालीन प्रयाणाकडे वळूं.

ब्रिटिश लोकांनीं ब्रह्मदेश जिंकल्यानंतर जी एकंदर शेतकीची, व्यापाराची आणि उद्योगाची वृद्धि झाली तीमुळें येथून ब्रह्मदेशांत बऱ्याच लोकांचें प्रयाण झालें. कांहीं लोकांचें असें मत आहे कीं, ज्या अर्थी तें हिंदूंच्या स्वयंप्रेरणेनें फारसें झालें नाहीं, त्या अर्थी तें अस्वाभाविक आणि अनित्य आहे. कित्येक लोकांचें असें मत आहे कीं, परकीय लोकांच्या या ओघामुळें ब्रह्मी लोक नाहींसे होऊन जातील. तथापि हीं दोन्हीं मतें खरीं नाहींत. बरेचसे लोक आपलें भाडें खर्चून जातात आणि ते जाण्यास कारण म्हटलें म्हणजे ब्रह्मदेशांत मिळणारे मजुरीचे दर आणि व्यापारी किफायत हीं अधिक चढाओढ असलेल्या हिंदुस्थानांतील दरांपेक्षां व किफायतीपेक्षां अधिक आहेत हें होय. 'स्वाभाविक' हा शब्द थोडासा भ्रामक आहे. साहसी भावना किंवा स्वयंप्रेरणा किफायतीची दृष्टि असेल तरच जागृत होते, एरवीं होत नाहीं. आणि किफायतीची दृष्टि स्वाभाविक नव्हे असें कोण म्हणेल? यासाठीं किफायतीकरितां जे लोक आले ते स्वयंप्रेरणेनें आलेले नव्हत असें जें मत तद्देशस्थ कित्येक यूरोपीय अधिकाऱ्यांनीं व्यक्त केलें आहे तें त्यांच्या मनुष्यस्वभावाच्या अज्ञानाचें द्योतक आहे. ब्रह्मी लोक वाहून जातील काय म्हणून ज्यांस फिकीर वाटते ते लोकहि एक गोष्ट विसरतात. ती ही कीं, ब्रह्मी लोक अधिक किफायतशीर धंद्यांकडे वळत असल्यामुळें परकीय येतात म्हणून त्यांच्या आगमनामुळें ब्रह्मी जातींचा संकोच होत नाहीं. शिवाय आलेल्या लोकांपैकीं बरेच लोक ब्रह्मी स्त्रियांशीं लग्नें देखील करितात आणि त्यामुळें बाहेरून आलेल्या लोकांचा ओघ ब्रह्मी लोकांच्या संवर्धनास कारण होतो. मुसुलमानांचा ओघ आणि त्यांचीं ब्रह्मी स्त्रियांशीं लग्नें होऊन मिश्र अशा जेरबादी जातीची झालेली वृद्धि या गोष्टी कदाचित् बऱ्याच अंशांनीं ब्रह्मी लोकांच्या ऐक्यास विघातक होतील हें खरें; तथापि हिंदूंचें प्रयाण तसें विघातक होईलसें दिसत नाहीं. बाहेरून आलेले चिनी लोक हे देखील ब्रह्मी लोकांशीं लग्नव्यवहार करितात आणि त्यांपैकीं पुष्कळ लोकांचे ब्रह्मी स्त्रियांपासून होणारे पुरुषवंशज जरी आपण चिनीच आहों असें सांगतात तरी बौद्धसंप्रदाय, ब्रह्मी स्त्रियांशीं जडलेला संबंध आणि स्त्रीवंशज आपण ब्रह्मी आहों अशीच भावना जागृत ठेवतात ही गोष्ट, या सर्व गोष्टी ब्रह्मी लोकांच्या राष्ट्रांत चिनी रक्त भविष्यकाळीं पूर्णपणें समाविष्ट होईल हें सुचवितात.

हिंदूंचें प्रयाण अथवा निवास त्या देशांतील भावी परिस्थिति कशी बनवील हें सांगावयाचें म्हटल्यास कल्पनेचाच आश्रय करावा लागतो. बरेचसे हिंदू ब्रह्मी लोकांत समाविष्ट होत आहेत किंवा पुढेंमागें होणार. हिंदू पुरुषांबरोबर हिंदू स्त्रिया तिकडे जात नाहींत या गोष्टीमुळें, ब्रह्मी स्त्रियांच्या मोकळेपणामुळें आणि तेथें गेलेल्या हिंदूंवरील जातिनिर्बंधांच्या दुर्बलतेमुळें हें टाळतां येण्याजोगें नाहीं. या परिस्थितीबद्दल हिंदूंनीं खेद करण्याचें कारण नाहीं. तिचा एक निराळा इष्ट परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं. असेंहि म्हणतां येईल कीं हिंदूंची स्वतंत्रसमाजरक्षणाच्या बाबतींतील दुर्बलता ही एक शक्ति आहे. हिंदु ही कल्पना केवळ सामाजिक असल्यामुळें आणि परमार्थसाधनपर नसल्यामुळें पुढेंमागें ब्रह्मदेशांतील सर्वच ब्रह्मी लोकांस आपण हिंदू आहों ही भावना उत्पन्न होऊं शकेल. ब्राह्मणपौरोहित्याची परंपरा प्रथमतः मिश्र लोकांत येईल आणि कदाचित् सर्व ब्रह्मी लोकांतहि पसरेल. ती पसरण्यास अनुकूल अशी गोष्ट म्हटली म्हणजे तेथें असलेली देश्य ब्राह्मणांची वस्ती आणि त्यांचा ब्रह्मी जनतेस उपयोग ही होय. हिंदूंची वृद्धि ब्रह्मदेशांत तीन कारणांमुळें होते. पहिलें कारण नवीन लोकांचें येणें, दुसरें कारण मृत्यूपेक्षां जननाचें आधिक्य, आणि तिसरें कारण ब्रह्मी स्त्रियांशीं विवाह. यांपैकीं पहिलें कारण सर्वांत अधिक प्रबल आहे. हिंदू आणि ब्रह्मी स्त्रिया यांचीं लग्नें झाल्यामुळें आणि दोन हिंदू जातींमध्येंच अनेक लग्नें झाल्यामुळें ज्या हिंदूंस आपली जात सांगतां येत नाहीं अशांची संख्या बरीच आहे आणि ती सारखी वाढत आहे. आपली जात कोणती हें सांगण्यास नाखूष किंवा असमर्थ होते अशांची संख्या १९०१ सालीं ५८००० होती ती १९११ सालीं सुमारें एक लक्ष झाली आहे. हिंदूंची वस्ती शहरांत अधिक आहे आणि आज रंगून येथें बौद्धांपेक्षां हिंदू सुमारें अकरा हजारांनीं अधिक आहेत. रंगून येथें त्यांची वस्ती शेंकडा सदतीस आहे आणि सर्व शहरें घेतलीं तर ते शेंकडा अठरांहून अधिक भरतील. रंगून येथील वस्तींत हिंदूंचें प्रमाण किती आहे तें पुढील कोष्टकावरून कळून येईल.

**रंगून येथील वस्तींत हिंदूंचें प्रमाण.**

| रंगून येथील एकंदर वस्तीचें शेंकडा प्रमाण | | |
|---|---|---|
| वर्ष | बौद्ध | हिंदु |
| १८८१ | ५०·०३ | २६·७४ |
| १८९१ | ४४·२८ | ३२·०८ |
| १९०१ | ३५·६० | ३५·३३ |
| १९११ | ३३·२३ | ३६·९४ |

पवित्र तरवार हीं बकूंच्या ताब्यांत असतात. वास्तविकपणें हे वरील पौरोहित्याचे अधिकार सर्व बकु जातीच्या लोकांस असतात, पण त्यांच्यापैकीं बरेचसे शेतकी वगैरे धंदे करितात त्यामुळें त्यांच्यापैकीं मुख्य सात आठ असामीच कायते पौरोहित्य करितात.

राजास राज्याभिषेक करणें, वार्षिक समारंभामध्यें राजास शंखोदक देणें, राजपुत्राच्या जन्माच्या प्रसंगीं त्यावर शंखोदक प्रोक्षण करणें, राजपुत्रांचे चौलविधी करणें, इत्यादि सर्व कामें या पुरोहितांकडेच असतात. युद्धप्रसंगीं ते इन्द्रानें दिलेली पवित्र तरवार, देवांच्या मूर्ती वगैरे सैन्याबरोबर नेतात व राजास जय मिळण्याकरितां अभिषेक करून कांहीं पाण्यानें सैन्याचें प्रोक्षण करितात. सर्व शुद्धीचे विधी करावयाचा यांचाच अधिकार असल्यामुळें जंगलांतून नवीन पांढरा हत्ती धरून आणला म्हणजे नगरप्रवेशाचे वेळीं त्यावर हे उदकप्रोक्षण करितात. राणी गर्भवती झाली म्हणजे गर्भाचें रक्षण करण्याकरितां हे तिच्या गळ्यांत एक सोन्याची सांखळी घालतात.

बकूंनंतर दुसरी महत्त्वाची जात म्हटली म्हणजे आचार (आचार्य) ही होय. हा गृहस्थांचा वर्ग असून केव्हां केव्हां बकूंच्या ऐवजीं चौल वगैरे विधी करितो. हे वेदांत वगैरे बाबतींत व प्राचीन कथांमध्यें निष्णात असून आचारानें फार शुद्ध असल्यामुळें यांनां इतर जनतेकडून चांगला मान मिळतो.

ब्राह्मणानुयायी हिंदू सयामकडे किती गेले, कोणत्या कारणांमुळें गेले, हें समजण्यासाठीं आपणांस थोडासा तर्क केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. अशी कल्पना होते कीं, ते दक्षिणेकडील जलमार्गानें तसेच आसामकडून भूमार्गानेंहि गेले असावेत. दक्षिणेकडून जलमार्गानें जातांना त्यांनीं मध्यंतरीं जावा येथें थोडेंसें प्रस्थान ठेवलें असावें. त्यांचा समुदाय किती मोठा असावा हें निश्चयानें सांगतां येत नाहीं; तथापि सयाममधील दैवतें, पारमार्थिक विचार, भाषा, कला आणि शासनसंस्था यांवर ज्या अर्थी भारतीय शिक्का दृष्टीस पडतो त्या अर्थी यांचा समुदाय बराच मोठा असला पाहिजे, आणि तद्देशीयांची संस्कृति भारतीय संस्कृतीच्या मानानें दुर्बल असली पाहिजे.

**ब्राह्मणी संस्कृतीचा ऱ्हासकालः**—पूर्वेकडील या ब्राह्मणी साम्राज्याचें वैभव शिखरास पोंचण्याचा काल व इकडे पश्चिम आशियामध्यें नवा पैगंबर उत्पन्न होऊन त्याच्या संप्रदायाचा पौरस्त्य देशांत उपसर्ग पोंचण्यास सुरवात होण्याचा काल हे जवळ जवळ एकच होते. महंमदानुयायांनीं भारतीयांवर मिळविलेल्या विजयांचा परिणाम अर्थातच इंडोचीनांस लवकरच जाणवूं लागला. कारण भरतखंडांतून त्या देशास जाणाऱ्या लोकांचा प्रवाह बंद झाला. येथूनच इंडोचीनमधील ब्राह्मणी साम्राज्यास उतरती कला लागून तें साम्राज्य लवकरच उत्तरेकडून येणाऱ्या 'थई' लोकांच्या हस्तगत झालें. थई लोकांच्या या स्वाऱ्यास ख्रि. श. च्या दहाव्या शतकांत आरंभ होऊन त्यांनीं लवकरच सर्व ब्राह्मणी वसाहती पादाक्रान्त केल्या. एक एक वसाहत घशांत टाकीत टाकीत ते बरेच बलिष्ठ झाले. याच वेळीं त्या वसाहतींत बौद्ध संप्रदायाचा पालीभाषेसह प्रवेश होत होता. या संप्रदायांतील लोकांचें ध्येय संप्रदायप्रसार हें असल्यामुळें व त्याचे प्रवर्तकहि सामान्य जनतेपैकींच असल्यामुळें तो सामान्य जनांस विशेष आवडत असे व ब्राह्मणी धर्माच्या ऱ्हासामुळें रिकाम्या पडलेल्या क्षेत्रांत या संप्रदायास यथेच्छ वावरण्यास अवसर सांपडला. या थई लोकांच्या स्वाऱ्यांच्या सपाट्यांत प्रथमच सयाम देश सांपडला व तेथें ब्राह्मणी साम्राज्याची जागा थई साम्राज्यानें घेऊन सुखोदय शहर या साम्राज्याची राजधानी बनलें.

या थई लोकांच्या स्वारीचा ब्राह्मणांनीं इतके दिवस जोपासना करून वाढविलेल्या संस्कृतीवर फार महत्त्वाचा परिणाम झाला. तेराव्या शतकाच्या सुमारास ब्राह्मणी धर्माचा अस्त झाल्यामुळें शिवाची जागा बुद्ध या देवतेनें घेतली, शिल्पकारांचा वर्ग नाहींसा झाला व त्यांचेबरोबर वास्तुसौंदर्याच्या कल्पनांचा लय झाला. पूर्वीच्या इमारतींचें स्वरूप बदलून टाकण्यांत आलें व कांहींचें सामानहि काढून नेण्यांत आलें. थई किंवा ब्रह्मी लोकांनां ब्राह्मणी शिल्पकामाचें अनुकरण कसें करावें हें मुळींच समजेना आणि ख्मेर लोकांनां तर हें सर्व केवळ गौडबंगालच होतें.

सयाममध्यें रिअप व सायेम या प्रांतांत जरी बौद्ध देवालयें आढळत नाहींत तरी कांहीं बुद्धाच्या मूर्ती आढळतात यावरून असें दिसतें कीं, बौद्ध संप्रदायाचा प्रवेश तेथें ब्राह्मणी धर्माच्या ऱ्हासापूर्वी होऊन बुद्धास दैवतांमध्यें जागा मिळाली असावी किंवा ब्राह्मणी देवालयांतून बुद्धाच्याहि मूर्ती बसविण्याची चाल असावी. लोफबुरी (लोणवो) येथील एका ख्मेर शिलालेखावरून असें समजतें कीं, ख्रि. श. च्या दहाव्या शतकांत कांबोजमध्यें बौद्धसंप्रदायाचा प्रवेश झालेला असून कांहीं हिंदू ब्राह्मणहि त्या संप्रदायांत शिरलेले होते; आणि या संप्रदायांतील लोकांस राजानें कांहीं विशिष्ट हक्क दिलेले होते. हे दोन्ही संप्रदाय एका शेजारीं एक सलोख्यानें वागत असून शिल्पकार हे राजाच्या आज्ञेवरून दोघांचींहि कामें करीत असत. बुद्धमूर्तीनें याप्रमाणें प्रथमतः सलोख्यानें ब्राह्मणी देवळांत प्रवेश करून नंतर हळू हळू परिस्थितीच्या जोरावर तेथून मूळच्या देवांस हुसकून लाविलें असावें. ब्राह्मणी देवांप्रमाणेंच ब्राह्मणांची पदच्युति घडून आली. ब्राह्मण वर्ग हा क्षत्रिय जेत्या लोकांहून श्रेष्ठ असून तो जित लोकांपासून फार दूर असे. परंतु बौद्धसंप्रदायानें स्वतः लवकरच तेथील लोकांच्या चालीरीतींचा स्वीकार करून, जातिभेदाचा मोड करून, सर्वांनां सारखेंच वागवून व

राजांनांच धर्माध्यक्ष बनवून, सर्व लोकांस सर्व देवालयें व मठ खुले ठेवून आपल्या संप्रदायामध्यें सर्व लोकांस गुरफटून टाकलें; आणि सर्वांना एका संस्कृतींत आणण्याचें काम जें 'थई' राजांनां तरवारीच्या जोरावर करतां येणें अशक्य होतें ती गोष्ट या बौद्ध सिक्षूंनीं फारच थोड्या श्रमांनीं करून दाखविली.

सयाममध्यें इ० स० १५१० तील एक शिलालेख आहे, त्यामध्यें धर्मशोकराज यानें एका शिवमूर्तीची पुनः-स्थापना केल्याचा उल्लेख आहे. ही शिवमूर्ति व आणखी एक विष्णुमूर्ति या 'सज्जनालय' नांवाच्या मंदिराचा नाश झाल्यानंतर कोठें तरी पडून राहिल्या होत्या. या वर उल्लेखिलेल्या राजानें दोन्ही धर्माचें ऐक्य करण्याचा प्रयत्न केला होता. त्यानें बौद्ध विहारांचे जीर्णोद्धार केले व हिंदू मूर्तींचीहि स्थापना केली.

**भारतीय-चिनी.**—हिंदुस्थान व चीन या देशांच्या मध्यंतरीं असलेल्या देशांतील व बेटांतील लोक जरी परस्परांपासून आचारविचार व भाषा या बाबतींत बरेच भिन्न असले तरी त्या सर्वांस 'इंडो-चायनीज', भारतीय-चिनी, हें नांव सामान्यपणें लावतां येईल. त्यांनीं आपले पारमार्थिक संप्रदाय, धर्मशास्त्र, आचारविचार हे आपल्या शेजाऱ्यांपासून घेतलेले आहेत. परंतु या गोष्टी प्रत्येक देशानें निरनिराळ्या काळीं घेतल्यामुळें त्यांमध्यें निरनिराळे संस्कृतीचे थर दृष्टीस पडतात; आणि या नव्या आचारविचारांचें जें मूळ आचारविचारांशीं मिश्रण झालें त्यामुळें त्यांत बरीच परस्पर-भिन्नता दृष्टीस पडते.

या प्रदेशाशीं संबंध येणारें पहिलें यूरोपीय राष्ट्र म्हटलें म्हणजे पोर्तुगीज होय. परंतु यांनीं तद्देशीय लोकांच्या राहणीबद्दल अथवा भाषा किंवा वाङ्मय याबद्दल फारशी माहिती मिळविली नाहीं.

पुढील माहिती जे. लेडेन यानें १८०५ सालीं केलेल्या प्रवासामध्यें जमविली असून ती १८०८ च्या 'एशियाटिक रिसर्चेस'* या नियतकालिकांत प्रथम प्रसिद्ध झाली होती.

या प्रदेशांत बऱ्याच प्राचीन काळीं बौद्धसंप्रदाय प्रचलित असावा असें वाटतें. परंतु ऐतिहासिक लेखांच्या अभावीं त्याचा प्रवेश केव्हां झाला असावा याची केवळ कल्पनाच केली पाहिजे. १८०५ च्या सुमारास बौद्धसंप्रदाय फक्त मुख्य प्रदेशांत म्हणजे मलाया द्वीपकल्पाच्या अंतर्भागांत चालू असावा. त्या द्वीपकल्पाचा किनारा व वरींचशीं पूर्वेकडील बेटें महंमदीयांनीं व्यापिलीं होतीं; आणि अंतर्भागाशीं यूरोपीयांचा संबंध फारच थोडा येत असल्यामुळें त्या भागांत बौद्धसंप्रदाय आहे कीं हिंदुधर्म आहे याची त्यांनां नीटशी कल्पना येणें संभवनीयहि नव्हतें; परंतु त्या लोकांत प्रचलित असलेल्या उपास्यांचीं जीं नांवें ऐकूं येत त्यांवरून ते हिंदू असावेत अशीच कल्पना होत असे. तथापि यूरोपीयांचे आचारविचार पौरस्त्य आचारविचारांपेक्षां इतके भिन्न आहेत कीं, पुष्कळसे यूरोपीय ग्रंथकार आपल्या निवळ कल्पना वस्तुस्थितिदर्शक गोष्टी म्हणून केव्हां केव्हां दडपून देतात आणि ज्यांनां तद्देशीय लोकांचे आचारविचार निरीक्षण करण्याची संधि मिळते ते आपल्याला त्यांच्यापेक्षां फार श्रेष्ठ समजून त्यांच्याकडे तुच्छतादर्शक दृष्टीनें पाहतात व त्यामुळें पुष्कळ पौराणिक व इतर गोष्टी काल्पनिक म्हणून त्याज्य ठरवितात व या कारणानें अनेक गोष्टींच्या ज्ञानास ते मुकतात असें लेडेन यानें म्हटलें आहे.

मलायी लोक व कांहीं डोंगरी जाती सोडून दिल्या तर भरतखंड व चीन यांच्या मध्यंतरीं असलेल्या सर्व देशांतील बाकीचे लोक बौद्धसंप्रदायी आहेत. त्यांच्या विधी व आचारांमध्यें कांहीं फरक आहेत. सर्वांचीं सामान्य तत्त्वें बहुतेक सारखींच आहेत. हा संप्रदाय नेपाळ, भूतान, तिबेट इत्यादि प्रदेशांत चालत असून चीन, तार्तरी, जपान इत्यादि देशांतून पसरला आहे. त्याप्रमाणेंच या मोठ्या प्रदेशांतील सर्वच राष्ट्रांचे धार्मिक ग्रंथ एकाच भाषेंत आहेत असें जरी निश्चयानें सांगतां येत नाहीं तरी बहुतेक बौद्धसांप्रदायिक ग्रंथांची भाषा सिंहलद्वीपाप्रमाणेंच येथेंहि पाली हीच आढळते. पाली ही येथील लोकभाषा नाहीं. भरतखंडांतील संस्कृत भाषेप्रमाणेंच या देशांत पाली भाषा ही पंडिती भाषा म्हणून धार्मिक व शास्त्रीय ग्रंथांत वापरतात.

मलायी भाषा व पूर्वेकडील बेटांतील भाषा या संस्कृत भाषेप्रमाणेंच मूळच्या अनेकाक्षरी भाषा असाव्यात. या भाषांवर संस्कृत भाषेचा परिणाम विशेष झालेला दिसतो. तथापि पालीचाहि परिणाम बराच झाला असावा. महंमदी संप्रदायाच्या प्रसारानंतर या भाषांवर अरबी भाषेचाहि परिणाम झालेला दिसतो.

इंडोचीनमधील मूळच्या लोकभाषा चीन देशांत प्रचलित असलेल्या भाषांप्रमाणें एकाक्षरी भाषा असाव्यात व ज्या कांहीं अनेकाक्षरी भाषा असतील त्या पाली भाषेवरून किंवा मूळ अक्षरें एकमेकांस जोडून बनल्या असाव्यात.

इंडोचीनमध्यें ऐतिहासिक शोध करण्याकरितां उपयुक्त अशा अवशेषांच्या अभावामुळें केवळ तेथील भाषांच्या परीक्षणावरच भिस्त ठेवावी लागते. या भाषांचा चिकित्सक दृष्टीनें अभ्यास केल्यास त्यांचेवर निरनिराळ्या काळीं कोणकोणते व कसकसे बाह्य परिणाम झाले हें लक्षांत आल्यांवाचून रहात नाहीं. त्यानंतर आपली दृष्टि त्यांतील वाङ्मयाकडे व इतर अवशेषांकडे वळविली असतां आपणास त्या प्रदेशांच्या इतिहासाचें बरेंचसें ज्ञान होईल.

इंडोचीनमधील भाषांचें पुढें दिल्याप्रमाणें वर्गीकरण करतां येईल.

**अनेकाक्षरी भाषा.**-(१) मलयु (२) जावा (३) बूगी (४) बिम (५) बत्ता (६) गाल अथवा तागाल. **एकाक्षरी भाषा.**-(७) रुखेंग (८) ब्रह्मी (९) मोन (१०) तहइ (थइ) (११) खोहमेन (१२) लाव (१३) अनाम. **पंडिती भाषा.**-(१४) पाली.

**मलयु.**—या भाषेला मलाया द्वीपकल्पांत मलयु असें नांव आहे. परंतु यूरोपीय लोक मॅले असा त्याचा उच्चार करतात. ही

* Asiatic Researches Vol X. (1808) pp. 158-289.

भाषा वापरणाऱ्या मलायी लोकांस सयामी लोक 'खेक' असें म्हणतात व ब्रह्मी लोक 'मासु' असें म्हणतात. या भाषेला तिच्या माधुर्यावरून यूरोपीय लोक पूर्वेकडील इटालियन असें म्हणतात व तिच्या प्रसारावरून पूर्वेकडील हिंदुस्थानी असें नांव देतात. इचें एकाक्षरी भाषांशीं जरी बरेंच साम्य आहे तरी ती मूळची अनेकाक्षरी भाषा आहे. या भाषेची व्याप्ति फार मोठ्या प्रदेशावर असल्यामुळें व हिचा प्रसार पंडितवर्गापेक्षां तरवारबहाद्दरांनींच विशेष केला असल्यामुळें हिचें निरनिराळ्या प्रदेशांतील देश्य अथवा लोकभाषांशीं मिश्रण होऊन हिच्यापासून अनेक पोटभाषा किंवा उपभाषा निघाल्या आहेत. यामुळें मूळची मलयु भाषा कोणती हें शोधून काढणें बरेंच श्रमाचें झालें आहे. हा शोध करण्याकरितां प्रत्येक राज्यांतील भाषेची रचना व त्या राज्याचा इतिहास या दोहोंचाहि अभ्यास करावा लागतो. यद्यपि ही भाषा उपयोगांत आणणारें राष्ट्र बरेंच अर्वाचीन आहे तथापि त्या राष्ट्राच्या इतिहाससंशोधनास लागणारी अनेक प्रकारची सामग्री उपलब्ध असूनहि तिचें संशोधन न झाल्यामुळें त्या राष्ट्राचा इतिहास बराचसा अज्ञातच राहिला आहे; आणि यामुळें मलयु भाषेची उत्पत्ति व वाढ यांच्यावरहि या अज्ञानांधकाराची छाया पडली आहे. बोलण्याच्या लोकभाषांत (बस ददंग) जरी निरनिराळ्या प्रदेशांत बराच फरक आहे तरी लिहिण्याची भाषा (बस जवि) बहुतेक सर्व राज्यांतून एकच आहे आणि यामुळें जी लोकभाषा लेखनभाषेशीं विशेष जुळते ती सर्वांत उच्च समजली जाते.

वास्तव लेखनभाषा ही आपण तुलनेकरितां प्रमाणभाषा म्हणून धरून चालूं. या भाषेमध्यें तीन निरनिराळे अंश दिसतात. त्यांपैकीं महत्त्वाचा म्हटला म्हणजे संभाषणामध्यें व सामान्य व्यवहारामध्यें जे शब्द वरचेवर प्रचारांत आढळतात त्या शब्दांचा होय. अशा शब्दांचा भरणा विशेष असून ते बहुतकरून येथील मूल देश्य भाषेंतील असावेत. या भाषेचा सभोंवतालच्या बेटांतील भाषांशीं संबंध असावा एवढेंच नव्हे तर ब्रह्मी, तइ इत्यादि एकाक्षरी भाषांशींहि तिचा संबंध असावा असें लेडेन याचें मत आहे. या भाषेंतील दुसरा महत्त्वाचा अंश म्हटला म्हणजे संस्कृत भाषेचा. संस्कृत भाषेंतील शब्दांचा अथवा तत्साधित शब्दांचा भरणा जरी वरील भाषेंतील शब्दांपेक्षां कमी असला तरी या भाषेंतील तिसरा अंश जो अरबी भाषेपासून आला आहे त्यापेक्षां बराच अधिक व महत्त्वाचा आहे. मलयु भाषेचा विशेष प्रचार म्हटला म्हणजे मलाया द्वीपकल्पांत आहे. ही भाषा उत्तरदिशेकडे पतनीपर्यंत चालते व तेथून सयामी सुरू होते. त्यांतल्या त्यांत पश्चिमेच्या बाजूला हिचें स्वरूप पूर्वेकडील बेटांपेक्षां अधिक शुद्ध आढळतें. सुमात्रा बेटाच्या किनाऱ्यावर पुलौ पुरिचु येथून तींत बत्ता भाषेचें मिश्रण होतें. सुमात्रा बेटांतील मेनंगकबौ ही जात मलयु भाषेची एक निराळीच पोटभाषा वापरते. या भाषेचें लेडेन याच्या मतें जावा भाषेशीं बरेंच साम्य आहे.

मलायी लोकांच्या शौर्यामुळें व धाडशी स्वभावामुळें मलयु भाषेचा प्रसार विस्तीर्ण प्रदेशावर झाला व संस्कृत भाषेचा ज्याप्रमाणें भरत खंडामध्यें व पाली भाषेचा जसा इंडोचीनमध्यें इतर स्थानिक भाषांवर महत्त्वाचा परिणाम झाला त्याप्रमाणेंच मलयु भाषेचा पूर्वेकडील बेटांवर झाला. यामुळें या भाषेबद्दल थोडेंसें विस्तृत विवेचन करणें अवश्य आहे.

**मलयु स्वयंभू कीं मिश्र?**—मार्सडेन याचें या भाषेबद्दल असें मत आहे कीं ही भाषा पूर्वी या पूर्व द्वीपसमूहामध्यें सर्वत्र प्रचलित असलेल्या एका मातृभाषेची शाखा अथवा पोटभाषा आहे. ही मातृभाषा प्राचीनकाळीं सुमारें २०० रेखांशांमध्यें मावेल इतक्या मोठ्या प्रदेशावर चालत होती व तिच्या क्षेत्रांत सध्या मादागास्कर या नांवानें प्रसिद्ध असलेल्या बेटापासून पूर्वेकडे 'ईस्टर बेटें' म्हणून प्रसिद्ध असलेलीं बेटें इतका पृथ्वीचा भाग येत असे; आणि एवढ्याच कारणावरून देखील ही भाषा बरीच प्राचीन व स्वयंभू (मूल भाषांपैकीं एक) असावी असें मानण्यास हरकत नाहीं. हिच्या पोटभाषांवर काल, संबंधाभाव व इतर आकस्मिक कारणांचा परिणाम झाल्यामुळें, त्यांच्या मध्यें एक प्रकारचें मूलतत्त्वविषयक साम्य असलें तरी त्यांच्या बाह्य स्वरूपांमध्यें पुष्कळ फरक झाला आहे. त्यामुळें त्यांचा परस्परांहून भिन्न अशा अनेक भाषांत समावेश केला जातो.* मार्सडेन यानें एका लेखांत मलयु भाषा व इतर पौरस्त्य उपभाषा यांतील साम्याचीं अनेक उदाहरणें दिलीं आहेत.† परंतु लेडेन याच्या मतें हीं साम्याचीं उदाहरणें पुरेशीं नसून तीं एकाच मूलभाषेपासून आलीं असण्याचा संभव आहे. याच्या मतें सर डब्ल्यू. जोन्स यानें या सर्वांची मूलभाषा संस्कृत असावी असें जें अनुमान केलें आहे तेंहि तितपतच चूक आहे. जगाचा इतिहास (युनिव्हर्सल हिस्टरी) या ग्रंथामधील सयामच्या वर्णनांत असें म्हटलें आहे कीं "मलयु भाषा ही अनेक भाषांतील शब्द निवडून घेऊन बनलेली आहे त्यामुळें येथें येणारे सर्व लोक हीच भाषा बोलतात व सर्व पूर्वद्वीपांत हीच भाषा सर्व लोकांस बरी वाटते व व्यापारी लोक सर्वत्र हीच भाषा वापरतात आणि म्हणून तिचें अध्ययन करितात." लेडेनच्या मतें अशा तऱ्हेनें भाषा बनणें हें राष्ट्रांच्या इतिहासांतील पहिलेंच उदाहरण म्हणावें लागतें. तथापि या म्हणण्यांत निःसंशय सत्याचा अंश आहे, कारण मलयु भाषा ही स्वयंभू नाहीं हें लक्षांत यावयास तिचें अध्ययन फारसें सूक्ष्मतेनें करावयास लागत नाहीं. जी एक सामान्य भाषा पूर्वद्वीपसमूहामध्यें प्रचलित आहे ती व इतर पोटभाषा यांचा समावेश सामान्यतः मलयु या नांवाच्या भाषेंतच होतो.

मलयु भाषेमध्यें दोन परकीय भाषांतील शब्द आलेले आहेत. त्या भाषा म्हटल्या म्हणजे संस्कृत आणि अरबी या होत.

**मलयु व संस्कृत.**—मलयु भाषा व संस्कृत भाषा यांचा संबंध प्रथम सर डब्ल्यु. जोन्स यानें निदर्शनास आणला व याच गोष्टीस दुजोरा देतांना मार्सडेन यानें मलयु भाषेंत शिरलेल्या संस्कृत शब्दांचीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत व अशीं हजारों उदाहरणें देतां येतील असें म्हटलें आहे. याखेरीज त्यानें असें म्हटलें आहे कीं कल्पना, विचार व मनुष्याचे स्वभावधर्म दाखविणारे शब्द, तसेच समाजांतील व्यक्तींचे परस्परसंबंध इत्यादि गोष्टींचे

*Asiatic Researches Vol. IV.
† Archaeologia Vol. VI.

वाचक शब्द संस्कृत भाषेंतून घेतलेले आहेत. परंतु मलयु भाषेंतील अगदीं कांहीं साध्या पण भाषेच्या दृष्टीनें अवश्यक अशा गोष्टी संस्कृतवरून मुळींच घेतलेल्या दिसत नाहींत व या गोष्टीवरून ती भाषा मूळची अगदीं वेगळी असावी असें दिसतें.

**मलयु व अरबी.**—मलयु आणि अरबी या भाषांच्या संबंधावद्दल मार्सडेन याचें असें म्हणणें आहे कीं "मलयु भाषेमध्यें जे अरबी शब्द आढळून येतात ते मुख्यत्वेंकरून ग्रंथकारांनीं आपल्या सांप्रदायिक बाबतींतील विद्वत्त्वाचें प्रदर्शन करण्याकरितां घुसडून दिलेले दिसतात. अरबी शब्द बहुतेक कायदा व पारमार्थिक बाबतींमध्येंच दिसून येतात. ते साध्या व रोजच्या व्यवहारांतील गोष्टी दाखविण्याच्या कामीं क्वचितच उपयोगिले जातात. संभाषणांमध्येंहि त्यांचा उपयोग क्वचितच दृष्टीस पडतो. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अरबी शब्द मलयु भाषेंत पूर्णपणें अद्यापि मिसळलेच नाहींत." यावर लेडेन याचें असें म्हणणें आहे कीं वरील गोष्ट जरी सामान्यतः खरी असली तरी विद्वान् लोकांच्या संभाषणामध्यें अरबी शब्द आढळून येतात. त्याप्रमाणेंच मलयु ग्रंथांमध्यें अरबी शब्दांचा भरणा जरी संस्कृत व तज्जन्य शब्दांपेक्षां बराच कमी असला तरी तो वर लिहिल्याप्रमाणें अगदींच अनुल्लेख्य नाहीं. मार्सडेन यानें या बाबतींत आणखी एक गोष्ट नमूद करून ठेविली आहे कीं अरबी शब्दांतील उच्चाराचें काठिन्य तसेंच कायम ठेवण्यांत आलें आहे, परंतु संस्कृत शब्दांच्या रूपांत फरक करून त्यांच्या उच्चारांत माधुर्य आणलें आहे. परंतु येथेंहि लेडेन याचा प्रमाणाच्या बाबतींत मार्सडेनशीं थोडासा मतभेद आहे.

**मलायी व कलिंग.**—मार्सडेन यानें असेंहि म्हटलें आहे कीं, "संस्कृत व भारतीय भाषांचा परिचय मलायी लोकांस प्रथम गुजराथी लोकांनीं करून दिला व तोहि अरबांचा भरतखंडाशीं संबंध येण्याच्या पूर्वीं करून दिला; ही गोष्ट डी बॅरॉस व इतर विश्वसनीय ग्रंथकारांनीं गुजराथी लोकांचा मलाक्काशीं संबंध असल्याचे जे उल्लेख केले आहेत त्यांवरून स्पष्ट होते," परंतु लेडेन याचें म्हणणें असें आहे कीं, अरबी भाषेच्या मिश्रणामुळें जर कोणती भारतीय भाषा प्रथम दूषित झाली असेल तर ती गुजराथी होय व तीहि डी बॅरॉस व इतर ग्रंथकारांनीं उल्लेखिलेल्या काळाच्याहि बऱ्याच पूर्वीं दूषित झालेली होती. मलयु भाषेंत संस्कृतजन्य शब्दांचा भरणा व्हावयास जर कोणती भारतीय उपभाषा विशेष कारण झाली असेल तर ती बंगाली होय असें लेडेनचें मत आहे. बरेचसे संस्कृत शब्द ज्या रूपानें बंगाली भाषेंत आढळतात त्याच रूपानें ते मलयु भाषेंत आढळतात. त्यांतील ठळक उदाहरणें येणेंप्रमाणें:—

| बंगाली | मलयु | मराठी |
|---|---|---|
| तत्हापि | ततापि | तथापि |
| पुनः | पुन | पुन्हा |
| तत्काले | तत्काल | तत्काल |
| बंग्श | बंग्स | वंश |
| किच्छु अ० किञ्छि | किचि | (थोडें)किंचित् |
| इंगित | इंगत | स्मरण, लक्ष |
| वरंग | वरंग वरंग | कांहींतरी |

परंतु अशा तऱ्हेचीं उदाहरणें अधिक देण्याचें कारणच नाहीं. कारण मलाया देशाचा व भाषेचा इतिहासहि आपणास असेंच दाखवितो कीं, मलायी लोकांचा प्राचीन काळापासून ज्या प्रांताशीं विशेष संबंध होता व ज्या प्रांताचा त्यांच्या भाषेवर विशेष परिणाम झाला तो प्रांत म्हटला म्हणजे कलिंग राज्य हा होय. तथापि मार्सडेनचें असें म्हणणें आहे कीं, तेलंग अथवा तमुल देशापासून मलायी लोकांस कोणतीच सांस्कृतिक सुधारणा मिळाली नाहीं. परंतु लेडेन याचें मत याच्या अगदीं उलट आहे. कारण मलायी लोकांनां त्या कालीं कारोमांडल किनारा कलिंगांचा देश (तन्न कलिंग) या नांवानेंच ठाऊक होता. त्याप्रमाणेंच त्यांच्या देशांत प्रचलित असलेले बरेचसे ग्रंथ कलिंग भाषेंतील (बस कलिंग) ग्रंथांचीं भाषांतरें म्हणूनच प्रसिद्ध होते; आणि सध्याहि मलयु भाषेंत बरेचसे तामिळ, तेलुगु व मल्याळम् भाषेंतील शब्द आहेत, परंतु गुजराथी, हिंदी शब्द आढळत नाहींत.

**मलायी व जावानी.**—मलायी लोक व कलिंग देशांतील लोक यांचा ज्या कारणांमुळें संबंध होता असें वर म्हटलें आहे त्याच कारणामुळें मलायी व जावानी लोकांचा संबंध असावा असें वाटतें. मलायी लोकांच्या पौराणिक कथा पूर्वीं जावांतूनच त्यांच्याकडे आल्या व बरेचसे मलायी ग्रंथ जावांतील ग्रंथांचीं भाषांतरेंच आहेत; आणि जे ग्रंथ कलिंग भाषेंतील ग्रंथांवरून भाषांतर केलेले आहेत त्यांमध्येंहि त्या कथांचीं जावांतील नांवें दिलेलीं आहेत. त्याप्रमाणेंच मलयु भाषेंत जेवढे संस्कृत शब्द आढळतात ते सर्व उच्च जावा भाषेंत सांपडतात परंतु जावा भाषेंतील सर्व संस्कृत शब्द मलयु भाषेंत आढळत नाहींत. शिवाय, बऱ्याचशा मलायी संस्थानांची स्थापना अरब येण्यापूर्वींच जावांतील कांहीं धाडशी प्रवाश्यांनीं केली होती; आणि मलायी लोकांतील ऐतिहासिक आख्यायिकांचें जर अधिक ज्ञान होईल तर अनेक मलायी संस्थानें अशाच प्रकारचीं असल्याची माहिती मिळेल.

**मलयूचें मूळ.**—मलयु भाषेंत जे संस्कृतजन्य शब्द आढळतात ते पाली भाषेंतून आलेले दिसत नाहींत. कारण बरेचसे मलयु भाषेंतील शब्द पाली भाषेंतील शब्दांपेक्षां संस्कृत शब्दांशीं अधिक सदृश दिसतात व बऱ्याचशा पौराणिक कथा व पुरुष मलयु भाषेंत आढळतात पण तेच पाली किंवा इतर इंडोचिनी भाषांत आढळत नाहींत असेंहि दृष्टोत्पत्तीस येतें.

परंतु संस्कृत व अरबी भाषांतील शब्द व तद्भव शब्द सोडून दिले तरी बरेचसे शब्द या भाषेंत शिल्लक राहतात व ते साध्या रोजच्या व्यवहारांतील गोष्टी व साध्या कल्पना यांचे वाचक आहेत; आणि हे शब्द हेच येथील मूळ भाषेचे अवशेष अथवा मार्सडेनच्या मताप्रमाणें दक्षिणसागरांतील देशांच्या मूळ भाषेचे अवशेष होत.

परंतु ज्या मलयु भाषेच्या भागाला आपण मूळ अथवा साधा भाग असें म्हटलें आहे तो संस्कृत अथवा अरबी

यांच्यापासून बनलेल्या भागापेक्षां बराचसा विकृत व मिश्रणसंभव असावा असें मानण्यास अनेक कारणें आहेत असें लेडेन याचें मत आहे. त्याच्या मतें जे शब्द अगदीं साध्या पदार्थांचे वाचक आहेत ते केवळ जावा, बूगी, तहह, ब्रह्मी इत्यादि अधिक प्राचीन पौरस्त्य भाषांतील शब्दांवरूनच श्रवणदोषमूलक अपभ्रंशानें बनलेले आहेत.

वॅरो व इतर कांहीं प्रसिद्ध ग्रंथकारांच्या मतें मलायी लोक हे चिनी लोकांचीच एक जात आहे; व वॅरो यानें सुमात्रांतील बरेच शब्द चिनी शब्दांसारखे आहेत असें म्हटलें आहे. परंतु चिनी भाषांचें ज्ञान अद्यापि फारसें वाढलें नसल्यामुळें या गोष्टीवर मत देतां येत नाहीं.

मलयु भाषेंतील सुलभ व मधुर वर्णोच्चारांमुळें व तिच्या रचनेच्या सौकर्यामुळें ती पूर्वेकडील द्वीपसमूहांची सामान्य भाषा होण्यास फारच योग्य आहे. परंतु तिच्या ज्या पोटभाषा आहेत त्या अधिक क्लिष्ट आहेत. कोणत्याहि मलयु उपभाषेची शुद्धता मापावयास तिचें सौंदर्य, माधुर्य व साधेपणा हींच प्रमाणें आहेत.

**मलायी ग्रंथ.**—मलयु भाषा जरी काव्य करण्याच्या विशेष लायकीची असली तरी तींत स्वतंत्र ग्रंथ फारच थोडे आहेत. मलायी लोकांत 'पान्तुन' नांवाच्या सुभाषितांसारख्या श्लोकांचा प्रचार फार आहे. या श्लोकांचें आपणांकडील दोहऱ्यांशीं बरेंच साम्य दिसतें. सायेर या नांवाची एक प्रकारचीं नैतिक काव्यें अथवा उपदेशपर कथाहि या लोकांत प्रचलित आहेत. चेरित्र अथवा हिकायत हे ग्रंथ बहुतकरून गद्य असतात, परंतु कांहींत मधून मधून 'पान्तुन' अथवा 'सायेर' चालीचीं पद्येंहि आढळतात. या चेरित्रांत मलायी लोकांत प्रचलित असलेल्या पौराणिक कथा, ऐतिहासिक दंतकथा व आख्यायिका इत्यादि विषय असतात. याखेरीज एक प्रकारच्या कथा मलायी लोकांत प्रचलित आहेत त्यांना सुसुपन असें म्हणतात. या एका प्राचीन जावानी राजघराण्याबद्दल असून त्या घराण्याचेंच नांव त्यांनां मिळालें असावें असें दिसतें. यांपैकीं कांहीं गोष्टी कांहीं सयामी गोष्टींशीं जुळतात. जेव्हां संस्कृत पुराणांतील व्यक्तींचा संबंध मलायी गोष्टींत येतो तेव्हां त्या गोष्टी जावा बेटाच्या अंतर्भागांत घडल्या असें दाखविलेलें असतें. त्याप्रमाणेंच कांहीं अरबी व्यक्तींचींहि पराक्रमाचीं कृत्यें मलायामध्यें घडल्याचें वर्णन आढळतें. या कथांपैकीं कांहीं गद्यांत व कांहीं पद्यांत आढळतात. कांहीं कथांचे भिन्न पाठ आढळतात, एक जावा भाषेवरून घेतलेला व दुसरा संस्कृत व तैलंग भाषेवरून घेतलेला.

**संस्कृत अथवा तैलंग कथांवरून घेतलेल्या कथा.**—यांपैकीं प्रमुख म्हटल्या म्हणजे हिकायत पिंडव अथवा पांडवकथा होत. या महाभारताच्या निरनिराळ्या भागांच्या संक्षिप्त आवृत्ती आहेत. यांमध्यें कांहीं कथा अगदीं मराठींत आढळतात त्याप्रमाणेंच आहेत असें लेडेन म्हणतो. या कथांपैकीं कांहींचीं नांवें द्यावयाचीं म्हणजे 'पिंडव लिम' (पांच पांडवांची कथा), 'पिंडव जय' (पांडवविजय), 'पिंडव बर्जुदि' (पांडवद्यूत), 'पिंडव पिंजम बलि' (पांडव वाडा उसना घेतात), 'पिंडव बेंजवल कपुर' (पांडव चुना विकतात) ... हिकायत ... निकस्सनचा महाराजा बूम याची हिकायत ही कलिंग नाटककार मुंगकर्त निगर याच्या ग्रंथावरून घेतलेली असून तींत ब्रह्मा आणि विष्णु यांच्यामधील वादाची हकीकत आहे असें म्हणतात. 'साह सिंपुदिअ' ही एका कलिंग राजाची कथा त्या देशांतूनच आलेली असावी. 'हिकायत श्रीराम' हें सुसुपन वर्गांतील काव्य आहे. त्याप्रमाणेंच 'कुसोम इन्द्र' (इन्द्राची कथा); 'बलित सेन'; 'साह कोवुत' (वानरांच्या युद्धाची कथा); 'राजहुलर निग्गवोंग; 'हिकायत विद श्री'; 'हिकायत राजा पिकेरमदि' (विक्रमादित्यचरित्र); 'हिकायत दर्मा राजा'; व 'हिकायत कलिल ओ दम्म' (कलिल व दम्म यांची गोष्ट) या आणखी कांहीं कथा आहेत.

**जावामधील कथांवरून घेतलेल्या कथा.**—'हिकायत चिकिल बुवंगपुत्ति (कुरिपनच्या राजाची कथा); 'हिकायत जरन तमस' (अंदिकक्रत मजपहित येथील एका राजाच्या प्रेमकथा); 'किलन पेर्बुजय चेरित्र' (कुरिन येथील राजाची कथा); 'मिस पेर्बुजय चेरित्र', 'मिस किआमांगचेरित्र' (दह येथील राजकन्या तिमु गुंग बपंग चकर बिम यानें पळवून नेली होती तीस बितर कल यानें सोडविल्याबद्दल कथा); 'जरन किलिनंग चेरित्र'; 'रतु बदेर किश चेरित्र'; 'पंज बितिन' (इनु कुर्वपुत्ति याची कथा); 'गंबर बिर-पुत्र'; 'गंबर श्री रतु अनुम अनि मलयु' (दह येथील राजकन्या गंबर आणि मलय येथील राजा अनुम यांची कथा); 'नाग बिसरु' (दह येथील एक राजकन्या सर्पाचें रूप देऊन तळ्यांत बंदिवासांत ठेविली होती तिची कथा); 'पुत्ति कोल बिस्नु' (विष्णु-कथा); 'किंत बुहिन्' (जावामधील बंजरकुलिन येथील राजाची कथा); 'किलन जयंग सित्र' (रदिन जरन तिनंग्लु याची कथा); 'अंग्लिग दर्मविराज चेरित्र'; 'हिकायत परंग पुतिंग' (मुठीशिवाय कुऱ्हाडीची गोष्ट). त्याप्रमाणेंच पुढील गोष्टीहि जावांतूनच आलेल्या असाव्या (या स्वतंत्र मलयुकथा असणेंहि संभवनीय आहे): 'हिकायत पेलंदुक जिनक' (एक धूर्त मृगाची गोष्ट); 'हिकायत बुरंग पिंगे' (एका विचित्र पक्ष्याची गोष्ट); 'देव मंदु चेरित्र'; 'सायेर श्री बतिन' 'हिकायत बिआन'; 'हिकायत राजा बूदक'.

**अरबी भाषेंतून रूपांतर करून घेतलेल्या कथा.**—

'हिकायत अमिर हुमदा'; 'हिकायत राजा खैबर' (अरबस्थानांतील खैबर येथील यहुदी राजाची कथा); 'हिकायत राजा हिंदुक'; 'हिकायत महमद हनीफा'; 'हिकायत खाजे मैमुन'; 'हिकायत एव्लिस'; 'हिकायत राजा शाह मर्दान'; 'हिकायत सुलतान इब्राहिम इब्न अधेम'; 'हिकायत सेकंदर दुलखरनैनी.' फारसी भाषेंतील भाषांतराप्रमाणें मलयु भाषेंतहि कुराणाचें भाषांतर झालें आहे.

**ऐतिहासिक ग्रंथ.**—याखेरीज मलयु भाषेंत कांहीं ऐतिहासिक ग्रंथहि आहेत. 'हिकायत राना बंग्यु' या ग्रंथांत मलायी राजांचा वंशेतिहास आहे असें म्हणतात. 'हिकायत मलाका' या ग्रंथांत एका जावानी धाडशी गृहस्थानें त्या शहराची स्थापना केल्यापासून पुढें पोर्तुगीज लोक येऊन मलायी लोकांचीं अल्बुकर्क व पोर्तुगीज सरदार यांच्याशीं युद्धें झालीं तेथपर्यंतची हकीकत आहे. 'हिकायत पित्रजय पुत्ति' (एका मलाका येथील

मलयु लोकांची १०० वर्षांपूर्वीची गृहरचना.





प्राचीन राजाची हकीकत); 'हिकायत अचि' ( मलाक्कामधील अचि अथवा अचिनचा इतिहास ); 'हिकायत हंग तुह' ( मलाक्का येथील शेवटच्या राजाच्या कारकीर्दींतील एक सरदाराचे पराक्रम आणि पोर्तुगीज लोकांच्या विरुद्ध मदत मागण्याकरितां मक्का व कॉन्स्टँटिनोपल येथें पाठविलेल्या वकिलातीची हकीकत ); 'हिकायत देव राजा'; 'हिकायत दतु पेरङ्ग'; 'हिकायत राजा बोसमन दन लोकमन'; 'हिकायत राजा तंबिक बज'; 'हिकायत राजा कुरि पन'; 'हिकायत राजा कंबयु'; 'हिकायत राजा निल दतु कवज'; 'हिकायत रंग ररि'; इत्यादि. अशा प्रकारचे किरकोळ ऐतिहासिक ग्रंथ बरेच आहेत. प्रत्येक राज्याचा अथवा जातीचा अशा प्रकारचा एक एक ग्रंथ असावा असें वाटतें, आणि या ग्रंथांतून जरी काल्पनिक भाग मधूनमधून असला तरी मलाया देशाचा इतिहास समजण्यासाठीं मुख्य सामग्री म्हणजे हेच ग्रंथ होत. या देशांतील कायदेकानू व चालीरीती आणि परंपरा यांचेंहि कांहीं ग्रंथांत एकत्र ग्रथन केलेलें आहे. अशा प्रकारचे महत्त्वाचे ग्रंथ म्हटले म्हणजे 'उंदंग उंदंग' आणि 'आद्त मलयु' हे होत. यांतील जे जुने नियम आहेत ते बहुतेक जावा व बुगीस या भाषांतून घेतलेले दिसतात. या खेरीज निरनिराळ्या राज्यांमध्यें केव्हां केव्हां स्वतंत्र नियमसंग्रह करण्यांत येत असत. अशा प्रकारचा एक संग्रह राजा शाह अलम यानें केलेला 'आद्त किदेह' म्हणून प्रसिद्ध आहे.

लेडेन यास मलयु भाषेंतील एकहि नाट्यग्रंथ उपलब्ध झाला नाहीं. परंतु अशा प्रकारचे पुष्कळ ग्रंथ आहेत असें म्हणतात. 'वयंग वयंग' नांवाचे खेळ कांहीं कालापूर्वी करीत असत. परंतु ते हळूहळू मागें पडले. मलयु नाटकांचे विषय म्हणजे त्यांच्या ऐतिहासिक व अद्भुत कथा हेच होते. त्यांच्या नाटकांत संभाषणें व आत्मगत भाषणेंहि असत.

**मलयु लिपी, कोश, इ०.**—मलयु भाषा लिहिण्याकरितां अरबी लिपी वापरतात. मात्र त्या लिपींतील अक्षरांपेक्षां सहा अक्षरें अधिक वापरतात. जावांतील मलायी लोक जावानी लिपी वापरतात. मोलक्कामध्यें लॅटिन लिपी वापरण्याचा कोठें कोठें प्रघात आहे.

यूरोपीय लोकांनीं ज्या पौरस्त्य भाषांचा प्रथम अभ्यास सुरू केला त्यांपैकीं पहिली मलयु भाषा ही होय. या भाषेचें व्याकरण रचण्याचा पहिला प्रयत्न डेव्हिड हीक्स यानें एक मलयु व डच भाषेंत कोश करून व त्याला व्याकरणाच्या टीपा जोडून केला. याचें लॅटिन भाषेंत भाषांतर झालें आहे ( १६३१ ). यानंतर या भाषेसंबंधीं यूरोपीयांनीं केलेले ग्रंथ म्हटले म्हणजे कोशसंग्रह ( वटेव्हिआ, १७०७–८ ); डच मलायी कोश ( १७०८, वटेव्हिया ); मलायी व्याकरण ( ॲमस्टरडॅम, १७२६ ); कोश ( वटेव्हिया, १७८० ) हे होत. इंग्रज ग्रंथकारांपैकीं बॉवरे याचें व्याकरण व कोश (१७०१); हॉविसन याचा कोश व व्याकरण (१८०१); कलकत्ता येथें प्रसिद्ध केलेला एक इंग्रजी-मलायी कोश (१७९८) हे महत्त्वाचे आहेत. या छापलेल्या ग्रंथांखेरीज हस्तलिखित ग्रंथ इंग्रजी, डच, पोर्तुगीज इत्यादि भाषांतून बरेच आहेत. याखेरीज प्रवासी लोकांनीं प्रसिद्ध केलेले किरकोळ कोश वगैरे आहेत, पण त्यांत बरेच दोष असतात.

ख्रिस्ती 'पवित्र शास्त्रा'चींहि मलयु भाषेंत बरींच भाषांतरें झालीं आहेत.

वर दिलेल्या माहितीमध्यें मलाया द्वीपकल्पांत ऐतिहासिक ग्रंथांचें अस्तित्व वाचकांचें लक्ष वेधीलच. भावी इतिहाससंशोधकांनीं आपलें अवलोकनक्षेत्र अधिक विस्तृत केल्यास त्या ग्रंथांचा उपयोग होऊन हिंदुस्थानच्या इतिहासावर अधिक प्रकाश पडणार आहे.

याखेरीज लंडन येथील रॉयल एशियाटिक सोसायटीच्या ताब्यांत असलेल्या हस्तलिखित ग्रंथांवरील कांहीं टीपा पुढें देत आहों, त्यांचाहि या कामीं बराच उपयोग होईल.

**मलायी ग्रंथांविषयीं कांहीं टीपाः**—या टीपा व्हान देर तुक ( H. N. Van der Tuuk ) याच्या 'जर्नल रॉयल एशियाटिक सोसायटी' मधील एका लेखाच्या ( मिसलेनिअस पेपर्स रिलेटिंग टु इंडो चायना ) १८८७ मध्यें छापलेल्या पुनरावृत्तीवरून घेतलेल्या आहेत. इतिहासविषयक ग्रंथ येथें दिले आहेत. तथापि इतिहास या सदरामध्यें बऱ्याच संशयित दंतकथांचा आणि अद्भुत गोष्टींचा समावेश होतो असें समजावें. लेखामधील पुष्कळ हस्तलिखितांस नांवें नाहींत; आणि कांहींचीं नांवें संपादकानें अंदाजी धरलीं आहेत. म्हणून प्रत्येक पुस्तकाचें नांव दिलें नाहीं. अनुक्रमदर्शक आंकडे मात्र दिले आहेत.

(१) मलाक्का येथील राजा, सिगुंतांग पर्वतावरील राज्य आपल्या एका मुलास देण्याचा प्रयत्न करितो, असा एका ग्रंथाचा प्रारंभ आहे, आणि त्यांत मलायी लोकांचें आयुष्य चित्रित करणारीं वर्णनें आहेत. हा शुद्ध मलयूमध्यें लिहिलेला आहे.

(२) भारतयुद्धाची कथा यांत जावानीवरून दिली आहे आणि त्यांत शेवटीं हिकायत पांडवजय म्हणून एक कथा घातली आहे. त्यास मलायी भाषांतरकार जावा येथील नाट्यविषयभूत होणाऱ्या सुंदर कथा आहेत असें म्हणतो. यांत कंस पाण्डूच्या पांच पुत्रांपाशीं अर्धराज्य मागतो; आणि चार ऋषी मध्यस्थी करण्याकरितां कंसाबरोबर जातात. याशिवाय पुढें असें दाखविलें आहे कीं 'ते सर्व रणभूमीवर यज्ञ करितात. पाण्डव राजांच्या यज्ञिय पशूचें नांव रावण होतें आणि कुरूंचा पशु एक ब्राह्मण होता. तेथें द्विजांनीं त्याला सहकुटुंब युद्धांत मरशील असा शाप दिला.*

(३) इनुकर्तपतीचीं साहसकृत्यें. कुरिपनच्या राजास पुत्र होतो. त्याचें नांव असारनिंगरत् ओंदकजय लसिनिंगपुरिचंद्रकिरण. दहराजकन्या इच्या जन्माची कथा. तिला रानांत बतार काल यानें पळवून नेलें आणि तिचें व तिच्या दासीचें नांव बदललें, तिच्या शोधार्थ कुरिपनचा राजपुत्र जातो आणि त्या प्रसंगीं रंग अरिय कुद नष्टप हें नांव धारण करितो.

(४) शुकानें सांगितलेल्या कथा.

(५) एका जावानी कथेची पुनरावृत्ति.

(६) नंबर ३१ पहा.

(७) राजाचें नांव सरिनरइन्दर दिचंपक जजर. स्त्रीपात्रांचीं नांवें किन् नदहान, किन् पंगलिपुर. पुरुष पात्रांचीं

* याचा अर्थ काय असावा म्हणून व्हान तुक पृच्छा करितो.

नांवें, वीर दंडनि, वीर पंडप, वीरकर्ता. नायक नायिकेवर प्रेम करितो. नायिकेचें नांव पुष्पकंचना. तिचें सौंदर्य प्रेमदेवता (यंग् यंग् कसुम) जनुवति आणि स्वर्गीय अप्सरा निल उतमा यांसारखें होतें. निरोप पाठविण्यास पंगलसन् याची योजना होते. पदुक लिकु, पदुक महादेवी, पदुक मतुर या त्याच्या पूर्वीच्या बायका होत्याच. इन्द्र प्रेम्यजनांस एकत्र करितो.

(८) नंबर १७ पहा.

(९) बकरम पुस्प याचा मुलगा इन्दर पुतर याचीं साहसकृत्यें. बकरम पुस्प हा सामन्त पुराचा राजा. एका सुवर्णमयूरानें नायकास पळवून नेलें. नायकास शाहसियायनें वर्मसत्तीकडे पाठविलें. इन्दर किल पर्वतावर तो राक्षस मारतो. जगांतच एक चमत्कारिक समुद्र पाहतो. कुमाल रत्नसारी नामक राजकन्येला भेटतो. लेलामंगरण नामक प्रतिस्पर्धि राजपुत्रास राजकन्याग्रहणयोग्यतासिद्ध्यर्थ आपल्या अमानुष शक्ती दाखवितो. एक राक्षस त्यास नेतो. त्याच्या मुलास तो मारतो. सोन्याचे व रत्नांचे पर्वत पाहतो. चमत्कारांचे व प्रेमाचे समुद्र पाहतो. एका गुहेंत एक महिना प्रवास करितो. एक मोठा साप व एक मोठा राक्षस मारतो. त्यास धर्मगंग भेटतो. तो त्यास शत्रूस जिंकण्याचीं अमानुष साधनें शिकवितो. शेवटीं तो घरीं येतो आणि इन्दर मगिन्दर नांव धारण करून समन्तपुराचा राजा होतो.

(१०) डच ईस्ट इंडिया कंपनीशीं झालेले तहनामे.

(११) नंबर ५ पहा.

(१२) ही एक गोष्ट असून तिचीं सोळा प्रकरणें आहेत. आरंभीं कथेचा थोडक्यांत सारांश दिला आहे. नायक एक मोठा राजा होता. तो काफ पर्वतावर (चीन देशांत) व देवलोकांत जाऊन येतो. तो मनुष्यें, पिशाच्चें वगैरे आपल्या सत्तेखालीं आणतो. समन्द पुरी नांवाचें राज्य होतें. तेथील राजा सरियवन नांवाचा होता. तो इन्दरदेव महरम रुप या राजाचा पुत्र होता. त्याची राणी एक मानवी होती. त्याला राजा अर्दान व राजा मर्सदन नांवाचे पुत्र होते. ते दोघे राजपुत्र समन्त वरन्त नांवाच्या अरण्यांत गेले. तेथें सरम देव हा विहार करण्याकरितां येत असे. हा देव त्या राजपुत्रांच्या पित्याचा द्वेष करीत असे. कारण त्यानें पूर्वीं त्याच्या घराचा नाश केला होता. त्या देवानें म्हाताऱ्याचें रूप घेऊन त्या राजपुत्रांची आपल्याला चाकरीस ठेवण्याविषयीं प्रार्थना केली. पुढें त्या राजपुत्रांस त्यांच्या लोकांपासून दूर नेल्यावर त्या देवानें एका हत्तीचें रूप घेतलें. त्याच्या पाठीस लागून अर्दान हा आपल्या भावापासून बराच दूर गेला. तेव्हां तो देव त्याला उचलून आकाशांत उडाला; परंतु त्या राजपुत्रानें त्यास ठार मारिलें. नंतर अर्दान खालीं उतरल्यावर त्याची व वायु राम नांवाच्या ऋषीची भेट झाली. त्या ऋषीनें त्याला सर्व अमानुष विद्या शिकविल्या. मर्सदन आपल्या भावाचा शोध करीत इन्द्पुर येथें येतो व तेथील राजाच्या एकुलत्या एक मुलीशीं लग्न लावतो आणि सासऱ्याचें सिंहासन पटकावतो. अर्दान याजकडून अनेक साहसकृत्यें होतात. उदाहरणार्थ, एका राजकन्येची तिच्या दासीकडून सोडवणूक. या कथेचा नायक वर्म शेहदंग हा कलिंगदेव येथील राजा मर्सदनशाह याचा मुलगा होता आणि याच्या ज्येष्ठ बंधूचें नांव राजादिराज असें होतें.

(१३) सांपडत नाहीं.

(१४) पंजि कथासंग्रहांतील एक कथा. कुरिपनचा राजपुत्र आणि दह राजकन्या यांजविषयीं.

(१५) भौम काव्याचें जें संविधानक तेंच याचेंहि आहे. भौम हा पृथ्वीला विष्णूपासून झालेला पुत्र होता. तो बलवान झाला. देव त्यास भिऊं लागले. तो तपस्व्यांस त्रास देऊं लागला म्हणून कंसानें (कृष्णानें) त्याजवर आपला पुत्र सांब यास पाठविलें. भौमास शेवटीं हनुमानानें मारलें. भौमानें सांबास व अर्जुनास मारिलें होतें, पण नारदानें त्यांस जिवंत केलें. धर्मदेव व धर्मदेवी यांची कथा यांत आली आहे.

(१६) धर्मदेव विष्णूच्या आराधनेनें सांब होतो व धर्मदेवी जनुवती होते.

(१७) ग्रंथकाराचें नांव नुरुद्दिन इब्न अली इब्न हसनजी. हमिद जातीच्या महंमदाचा मुलगा. १०४० हिजरीमध्यें हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाचीं पुस्तकें सात आहेत. पहिलें पुस्तक–जग आणि पृथ्वी यांची उत्पत्ति. दुसरें पुस्तक–अनेक प्रकरणांचें–द्रष्टे व राजे यांविषयीं. तिसरें पुस्तक–सहा प्रकरणांचें–चांगले राजे आणि हुषार मंत्री यांविषयीं. चवथें पुस्तक–दोन प्रकरणांचें–चांगले राजे आणि सदाचरणी लोक यांविषयीं. पांचवें पुस्तक–दोन प्रकरणांचें–वाईट राजे आणि अन्यायी मंत्री यांविषयीं. सहावें पुस्तक–दोन प्रकरणांचें–उदार माणसें व थोर पुरुष यांविषयीं. सातवें पुस्तक–पांच प्रकरणें–सर्व शास्त्रें, वैद्यक, सामुद्रिक, इतिहास इत्यादि.

या ग्रंथांत मलायी वाङ्मयाच्या नवीन वाचकांस उपयुक्त अशा बऱ्याच कथा आहेत. दुसऱ्या पुस्तकाच्या बाराव्या प्रकरणांत बराच इतिहास आलेला आहे आणि तेराव्या प्रकरणांत अचिन संस्थानचा इतिहास आलेला आहे.

(१८) मलायी ऐतिहासिक कथांचा संग्रह–शेवटचें प्रकरण मलाका येथील पोर्तुगीजांच्या विरुद्ध नयांचा कट हें आहे.

(१९–२०) राजपुत्र कुरिपन यास बतर इन्दर यानें स्त्री करून टाकलें त्याची हकीकत.

(२१) कौरवपाण्डवयुद्ध.

(२१) मलायी रामायण.

(२३) हिकायत दरंग इन्दर केसरी. पुस्तकाचे अनेक भाग असून प्रत्येक भागांत एक गोष्ट आहे; व ती मुख्य गोष्टीशीं संबद्ध आहे. दह राजकन्येच्या गोष्टीभोंवतींच या सर्व गोष्टी विस्तारलेल्या आहेत.

(२४) शंभु, ब्रह्मा, महादेव, विष्णु, देवी सारी, हे चार पुरुष व एक कन्या यांची उत्पत्ति गुरुनामक एका अडामच्या वंशजापासून वर्णिली आहे.

(२५) कुरिपन राजपुत्र व दह राजकन्या यांची कथा.

(२६) वरील विषयावरच दुसरी कथा.

(२७–२८) वरील विषयावरील कथा.

(२९) दह राजकन्येला सर्प केलें आणि एका सरोवरांत रहावयास पाठविलें.

(३०) चेरिबोन येथील राजे यांची नुरुद्दिन नांवाच्या एका महंमदाच्या वंशजापासून उत्पत्ति. चेरिबोन येथील राजांचा सुलतान अनामपर्यंतचा वृत्तांत. यांत जरी मूर्खपणा बराच भरला आहे तरी ऐतिहासिक माहिती सांपडणें अशक्य नाहीं.

(३१) थरफचा राजा शाह प्रस्ताद इन्दर लक्षण याचा मुलगा हा नायक आहे. राजा बलाढ्य परंतु वानर राजा वलिय इन्दर यास खंडणी देणारा. वलिय इन्दराचें राहणें कुर्दरि येथें असे. ज्येष्ठ राजपुत्राचें नांव कुवाद लेला इन्दर असें आहे आणि पुढें शाह कुवाद जहिम अरिफिन असेंहि आहे. मुलास बापाला खंडणी द्यावी लागते यावद्दल वाईट वाटतें व तो बापास मुक्त करण्याचा प्रयत्न करितो. या कामांत त्याला एका राक्षसाचें साहाय्य होतें व तो राक्षस पुढें त्याचा नातेवाईक ठरतो.

(३२)–(अ) रीतीभाती आणि राजे व मंत्रिमंडळें यांचे विधी, निशाणें वगैरे बद्दल.

(आ) तोडक नांवाच्या माशानें इन्दर पुरावर केलेला हल्ला आणि त्यापासून इन्दर पुराची सोडवणूक.

(इ) पोर्तुगीजांचें आगमन आणि त्यांची मलाका घेण्याकरितां खटपट.

(ई) निशाणांवरील चिन्हांचे अर्थ.

(उ) राजपुत्र देव विष्णु याचीं साहसकृत्यें.

वर दिलेल्या माहितीवरून मलायी वाङ्मयाची बरीचशी कल्पना वाचकांस येईल. इकडील भाषांचें मिश्रण तिकडील भाषांत कसें झालें आहे तें दाखविलेंच आहे. वरील कथांमधून अॅडाम व भारतीय पौराणिक व्यक्ति यांचे संबंध कसे जोडण्यांत आले आहेत व पौराणिक व इतर कथांचीं रूपें कशीं पालटण्यांत आलीं आहेत तेंहि या वर्णनावरून दिसून येईल.

**तागाल**—तागाल, ता-गाल अथवा गाल भाषा ही, ज्याप्रमाणें मलाया द्वीपकल्पांत व बेटांत मलयु अथवा हिंदुस्थानांत हिंदुस्थानी सर्वत्र आढळतात, त्याप्रमाणें फिलिपाइन बेटांत सर्वत्र आढळते. या भाषेंत ग्रीक भाषेप्रमाणें उपपदें आहेत, ती लॅटिनप्रमाणें प्रौढ असून तींत शब्दसंग्रह मोठा आहे, ती हिब्रूप्रमाणें गूढ आहे आणि इटालियनप्रमाणें व्यापाराच्या व आदरसत्काराच्या बाबतींत मधुर आहे, असें एका स्पॅनिश मिशनऱ्यानें तिचें वर्णन केलें आहे. थिवेनॉट यानें एका स्पॅनिश मिशनऱ्याच्या ग्रंथांतील माहिती आपल्या प्रवासावरील ग्रंथांत घेतली आहे, तींत असें म्हटलें आहे कीं, जरी फिलिपाइन बेटांत प्रत्येक जिल्ह्यांत स्वतंत्र भाषा आहे तरी त्या सर्वांमध्यें परस्परसंबंध असून एकसूत्रीपणा आहे. या सर्व भाषांमध्यें तागाल हीच जराशी संस्कृत भाषा दिसते. दुसरी एक विसाय हीहि बरीच सामान्य आहे पण ती रानटी आहे.

तागाल भाषेचा अभ्यास यूरोपीयांपैकीं प्रथम स्पेनमधील मिशनरी लोकांनीं केला. फ्रा. गास्पर यानें एक व्याकरण लिहिलें त्याच्या १७०३ व १७८७ मध्यें दोन आवृत्ती निघाल्या. याखेरीज त्यानें तागाल भाषेंत कांहीं ख्रिस्तसांप्रदायिक ग्रंथ लिहिले. यानंतर फिलिपाइन भाषेंतील ग्रंथांची एक यादी प्रसिद्ध झाली आहे * (१८८२); आणि कांहीं व्याकरणेंहि प्रसिद्ध झालीं आहेत.

तागाल भाषेंत १४ व्यंजनें व तीन स्वर मिळून १७ वर्ण आहेत. ही भाषा वांबू अथवा ताडपत्र यांवर लोखंडाच्या अणकुचीदार खिळ्यानें लिहितात. ही भाषा चिनी भाषेप्रमाणें वरून खालीं लिहीत असें स्पॅनिश मिशनरी म्हणतात, पण वांबू व खिळा या साधनांवरून व यांतील वर्ण वक्ता वर्णांप्रमाणें दिसतात यावरून ती वक्ताप्रमाणेंच खालून वर लिहीत असावे असा लेडेन याचा तर्क आहे. जे लोक अजून ख्रिस्ती कळपांत शिरले नाहींत ते अद्यापीहि तागाल भाषा वापरतात. व कांहीं बाटलेले ख्रिस्तीहि पत्रव्यवहारांत तागाल भाषाच वापरतात. ही भाषा मलयु, बुगीस, जावानी या भाषांच्याच वर्गांतली आहे.

तागाल भाषेंतील वाङ्मयासंबंधीं जी माहिती निरनिराळे मिशनरी देतात त्यांच्या हकिकतींत बराच विरोध दिसतो. कांहीं म्हणतात कीं, त्या भाषेंत ऐतिहासिक अथवा शास्त्रीय वाङ्मय मुळींच नाहीं; तर कांहींचें म्हणणें आहे कीं, त्यांच्यामध्यें ऐतिहासिक काव्यें बरींच प्रचलित आहेत. त्यांनीं स्वतः लेडेन यास दिलेल्या माहितीवरून असें दिसतें कीं, त्यांच्या पूर्वींच्या सांप्रदायिक व परंपरागत कथा, त्यांचे वंशेतिहास आणि त्यांच्या पौराणिक कथा व देवतांच्या पराक्रमाविषयीं गोष्टी त्यांच्या काव्यांतून व गाण्यांतून भरपूर आहेत. हीं गीतें सर्व लोक लहानपणीं पाठ करतात व समारंभांच्या आणि विधींच्या वेळीं म्हणतात. ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं तेथील लोकांच्या आत्म्याबद्दल वाटणाऱ्या कळकळीनें हीं जुनीं गाणीं नाहींशीं करण्याचा व त्यांच्या जागीं आपल्या सांप्रदायिक विषयांवर तागाल भाषेंत गाणीं रचून तीं प्रचारांत आणण्याचा पवित्र उद्योग चालविला आहे व अशा रीतीनें त्यांच्या राष्ट्रीय वाङ्मयाचे अवशेष नाहींसे करण्याचा स्तुत्य उपक्रम केला आहे असें लेडेन म्हणतो! लेडेन यास तागाल काव्यें उपलब्ध न झाल्यामुळें त्यानें त्यांचा नमुना किंवा नांवें दिलीं नाहींत.

विसय व इतर अनेक किरकोळ भाषा या बेटांत व आसपास प्रचलित आहेत पण त्यांची विशेषशी माहिती उपलब्ध नाहीं.

बोर्निओच्या ईशान्य किनाऱ्यावर तिरुन अथवा तेडॉंग नांवाच्या एका जातीचे लोक राहतात ते नरमांसभक्षक आहेत. ते इदान नांवाच्या एका जातीपैकींच एखाद्या पोटजातीचे असावेत व डच लोक ज्यांनां हरफोर म्हणून म्हणत ते हेच असावेत. इदान लोकांस कांहीं ठिकाणीं मरुत असें म्हणतात. या शब्दाचा मरुद्गणांशीं किंवा मारुति, वानरांचा सेनापति, याच्याशीं कांहीं संबंध असेल कीं काय अशी शंका लेडेन यानें घेतली आहे.

इदान, तिरुन, पापुआ इत्यादि या बेटांत सांपडणाऱ्या जाती अतिशय रानटी आहेत. त्यांच्या पैकीं प्रत्येक मनुष्यास आयुष्यामध्यें एक तरी शत्रूची कवची मिळवावी लागते. यांपैकीं कांहीं

* In Bibliotheca Philippina by F. Blumentritt pp. 83–7

अगदीं दिगंबर स्थितींत रहातात. अरब प्रवाश्यांनीं यांचीं वर्णनें केवळ राक्षसांप्रमाणें केलीं आहेत.

**थइः**—थइ अथवा तइ ही भाषा सयामी लोक वापरतात आणि आपल्या भाषेंत ते आपणां स्वतःस तइय असेंच म्हणवितात. ब्रह्मी लोक त्यांनां 'स्यन' असें म्हणतात. त्याचाच पोर्तुगीज लोकांनीं सिअम, सिअओम असा अपभ्रंश केला व शेवटीं सयाम हें सर्व सामान्य नांव या लोकांस मिळालें.*

फ्रान्सच्या बादशहाचा खास वकील म्हणून ल लुबेर हा फ्रेंच मनुष्य १६८७–८८ मध्यें सयामला गेला होता. त्यानें या राष्ट्राची फार बिनचूक माहिती लिहून ठेविली आहे. हें राष्ट्र भरतखंडाच्या पूर्वेकडील फार संस्कृत राष्ट्र समजलें जात असे. या राष्ट्राचे ल लुबेरच्या माहितीप्रमाणें दोन भाग होते. एक तइ लोकांचा व दुसरा तइ यइ लोकांचा. 'तइ यइ' हे रानटी लोक होते, परंतु ते आपणास 'तइ यइ' म्हणजे 'महा तइ' असें म्हणवीत व म्हणून दुसरे तइ आपणास 'तइ नोश' म्हणजे 'लहान तइ' म्हणवीत. बुकॅनन यानें या देशांत अनेक जातींचे लोक होते असें म्हटलें आहे व त्यापैकीं तिहींच्या भाषांचे नमुने व शब्दकोश दिले आहेत. ल लुबेर याचा ग्रंथ, बुकॅननचे कोश व कांहीं मिशनऱ्यांनीं त्यांच्या म्हणी गोळा करून केलेलीं भाषांतरें, एवढेंच काय तें वाङ्मय सयामी लोकांविषयीं यूरोपीय भाषांत उपलब्ध आहे.

लेडेन यानें तेथील लोकांपासून बरीच माहिती मिळविली आहे. या लोकांत ज्या मुख्य दोन जाती आहेत त्यांचीं नांवें तइय आणि 'तइय जइय' अशीं आहेत. यांपैकीं दुसरें राष्ट्र फार जुनें असून त्रंगपासून पांच दिवसांच्या वाटेवर लिगोर येथें एका जुन्या देवळाच्या अवशेषांत त्यांचे कांहीं जुनाट शिलालेख आहेत, परंतु ते अलीकडच्या लोकांस वाचतां येत नाहींत. या दोन्हीं राष्ट्रांची लिहिण्याची भाषा सारखीच आहे पण बोलण्याच्या भाषांत मात्र फरक आहे. तइय जइय हे लोक मेनाम आणि मेकॉन (कांबोजची नदी) यांच्या दरम्यान रहातात; आणि तइय हे लोक मेनाम नदीच्या पश्चिमेकडे राहतात.

थइ अथवा सयामी भाषा स्वतंत्र असून या भाषेंत बहुतेक एकाक्षरी शब्दांचाच भरणा आहे. हिचा चिनी भाषेशीं कांहींसा संबंध दिसतो. विशेषतः या भाषेंतील अंक चिनीसारखेच आहेत. कांहीं शब्द पाली भाषेंतूनहि आले आहेत पण त्यांच्या स्वरूपांत संक्षेप फार आढळतात. हिचें ब्रह्मी किंवा रुखेंग भाषांपेक्षां चिनी पोटभाषांशींच विशेष साम्य आहे ही गोष्ट या भाषेंतील, बोलणारांच्या दर्जाप्रमाणें सर्वनामांचा उपयोग, शिष्टाचाराची भाषा, दुसऱ्याची वाहवा करण्याची पद्धति, इत्यादि गोष्टींवरून सिद्ध होते. हिची रचनाहि अगदीं साधी आहे.

सयामी लोकांचीं काव्यें पठण करण्याची पद्धति कांहीं लोकांच्या मतें अगदीं सामवेदपठनासारखी आहे, परंतु लेडेनच्या मतें ती चिनी पद्धतीप्रमाणें आहे.

थइ भाषेंत कांहीं शब्द ब्रह्मी किंवा मलयूसारखे आहेत पण यांची संख्या फार थोडी आहे.

थइ भाषेची वर्णमाला आकारानें व उच्चाराच्या बाबतींतहि पालीप्रमाणेंच आहे. या भाषेंत स्वरोच्चार वीस आहेत पण प्रत्येक उच्चारास स्वतंत्र वर्ण नाहीं. व्यंजनें ३७ आहेत. थइ भाषेंत प्रत्येक विषयावर बरेंच वाङ्मय आहे. या भाषेंत काव्यें, चरित्रें, ऐतिहासिक व पौराणिक कथा यांचा भरणा पुष्कळ आहे. कांहीं सयामी राजे नामांकित कवी होते आणि त्यांचीं पुष्कळ काव्यें उपलब्ध आहेत. त्यांचे वैद्यकीय ग्रंथ फार प्राचीन आहेत. सयाममधील धर्मशास्त्रीय ग्रंथ पूर्वेकडील देशांत फार प्रसिद्ध आहेत. ल लुबेर यानें त्यांपैकीं तिहींचा उल्लेख केला आहे. 'प्र तम नोन', 'प्र तमर', 'प्र राज कम मनोत' हे ते ग्रंथ होत. यांपैकीं पहिल्या ग्रंथांत प्राचीन सयामी राजांचे कायदे संगृहीत आहेत. दुसऱ्यांत निरनिराळ्या अधिकाऱ्यांचे अधिकार व त्यांचीं कामें, त्यांचीं नांवें, इत्यादि असून राज्यव्यवस्थेसंबंधीं नियम आहेत. तिसऱ्यांत पुरवणीदाखल नियम आहेत. यांपैकीं पहिला फार महत्त्वाचा आहे.

सयामी इतिहासामध्यें गेल्या एक हजार वर्षांत सयाम व त्याचे आसपासचे प्रांत यांमध्यें जेवढ्या गोष्टी घडल्या त्यांचें सविस्तर व कांहीं ठिकाणीं अतिशयोक्तिपूर्ण वर्णन आढळतें. या हजार वर्षांपूर्वीच्या ४०० वर्षांची हकीकतहि नखोव शहराच्या स्थापनेपासून या ग्रंथांत आढळते, पण ती जास्त त्रोटक आहे. तइयजइय घराण्याच्या इतिहासाचेहि कांहीं ग्रंथ अद्यापि आहेत असें म्हणतात व ते सांपडल्यास त्यांतून कांहीं माहिती मिळण्याचा संभव आहे.

**सयामी चरित्रग्रंथ.**—चरित्रग्रंथहि सयाममध्यें अनेक आहेत. परंतु राम व रामायणांतील इतर व्यक्ति यांच्या विषयींचे ग्रंथ सोडून दिल्यास या ग्रंथांत भारतीय ग्रंथांशीं सदृश ग्रंथ फारच थोडे आढळतात. रुखेंग, मलयु व ब्रह्मी या भाषांतील ग्रंथांसारखे महत्त्वाचे ग्रंथ पुढें दिले आहेत.

(१) राम किएन (२) रादिन (३) सुम्मत्त कोदोम (४) वेत्ज सुंदोन (५) वोरवोंग (६) उन्नरुत (७) मेलय (८) महोसोत (९) चत्रि (१०) चलवल (११) कुमहोम (१२) प्रथोम (१३) सुथोन (१४) पोखवद्दि (१५) तेंगोन (१६) लिंथोंग (१७) नोक्खुम (१८) फनोन सोन पज (१९) मक्कलिफोन (२०) सुंफसित (२१) सुअन्न होंग (२२) प्रंगथोंग (२३) नंग सिपसोंग (२४) राम (२५) चंपाथोंग (२६) लुकस्वाको (२७) फिमस्वन (२८) पजफलि (२९) थ्व कंग सोन (३०) खुनफेन (३१) त्रेइवोंग (३२) थिन नरत (३३) फोवित् हत (३४) सुथिन (३५) होइसंग (३६) संगसिंचय (३७) वोरनुत (३८) चित्रकन (३९) नंगुथय (४०) म्लेकथोंग (४१) महा-चिनोक.

हे चरित्रग्रंथ, लेखनपद्धति व भाषाशैली या बाबतींत ब्रह्मी, मलयु किंवा रुखेंग ग्रंथाप्रमाणेंच आहेत व त्यावरून सयामी

* ब्रह्मी 'शन' या उच्चाराचा जो (न्हम) शब्द आहे तो शान लोकांस उद्देशून ब्रह्मी लोक वापरतात व सयामी लोकांस 'योधया' असें म्हणतात. योधया हा शब्द सयामची राजधानी 'अयुथ्य' या शहराच्या नांवावरून निघाला आहे. तथापि सयामी भाषेंत 'स्येम' 'सायम्' हे संस्कृत 'श्याम' शब्दापासून निघालेले दोन्हीहि शब्द प्रचारांत आहेत. परंतु सयामी लोक स्वतःस 'थइ' असें म्हणवितात—मॅक्सवेल.

लोकांचा आयुष्यक्रम जो दृष्टीस पडतो तोहि इतर इंडोचिनी राष्ट्रांप्रमाणेंच आहे व पौराणिक कथाहि तशाच प्रकारच्या आहेत. यांपैकीं रामकिएन हा ग्रंथ रामायणाचीच एक आवृत्ति आहे. यांत प्राम अथवा प्रराम व त्याचा बंधु प्रलक अथवा लक्ष्मण यांच्या पराक्रमांचें वर्णन असून त्यांनीं नंगसेद अथवा सीता इचें हरण करणाऱ्या तोत्सकन अथवा दशकंठ या राक्षसास युद्धांत मारल्याची कथा आहे. ही कथा अगदीं संस्कृत रामायणाप्रमाणेंच असून ज्याप्रमाणें 'यममेंग' या ब्रह्मी रामायणांतील प्रसंगांवर ब्रह्मदेशांत नाट्यरचना आढळते त्याप्रमाणें सयाममध्येंहि रामायणांतील सर्व प्रसंगांवर नाटकें रचलेलीं आहेत. सुम्मत कोदोम हा सोमोनकोदोम राजाचा इतिहास आहे; व तो पाली भाषेंतून संक्षेपरूपानें घेतलेला आहे. रादिन हें एका जावानी गोष्टीचें रूपांतर आहे. वेत्ज सुंदोन हें एका राजाचें चरित्र आहे. यांत, राजा एकदां बागेंतून चालत असतांना एका मेलेल्या आंब्याच्या झाडास पाहून त्याला उपरति झाल्याची कथा आहे. वोरवोंग या ग्रंथांत अशी कथा आहे कीं, एक राजा एका स्त्रीवर आसक्त होऊन तिच्या महालाच्या खिडकीकडे चढून जात असतां तिच्या रक्षणाकरितां ठेवलेल्या एका भारलेल्या भाल्याच्या योगानें मृत्यु पावतो. या कथानकावर एक नाटकहि आहे. महोसोत या ग्रंथांत महोसोत आणि चोर्नि यांमधील युद्धांचें वर्णन आहे. हा ग्रंथ ब्रह्मी 'महोसथ' ग्रंथाप्रमाणेंच आहे. 'उन्नरुत' या ग्रंथांत अनिरुद्धाची कथा आहे. मेलय या ग्रंथांत नरकाच्या यातनांपासून सोडविणाऱ्या मलयाची स्तुति आहे. 'चलवल' या ग्रंथांत एका मगराचें एका राजकन्येवर प्रेम बसून तिला त्यानें आपल्या समुद्रांतील गुहेंत नेलें व पुढें तिची सुटका झाली अशी कथा आहे. 'क्रुमहोम' ही एका दुसऱ्या राजकन्येची गोष्ट असून तिच्यावर प्रेम करणाऱ्या एका हत्तीपासून तिची सुटका झाल्याचें हें वर्णन आहे. 'प्रथोम' या ग्रंथांत बौद्धमताप्रमाणें जगदुत्पत्ति वर्णन केली आहे. 'नोक्खुम' यामध्यें पौराणिक हंसाची कथा आहे. 'पोखवदि' यांत भगवतीचरित्र आहे. 'फनोन सोन पज' यामध्यें 'फनोन' या वानरानें केलेला बोध दिला आहे. 'मक्कलिफोन' या ग्रंथांत एका राजपुत्राजवळ कामधेनूप्रमाणें एक गाय होती तिची गोष्ट आहे. 'सुंफसित' हें नीतिशास्त्रावरील पुस्तक आहे. 'प्रंगथोंग' यांत अशी गोष्ट आहे कीं, एका राजकन्येस एका फळाचे डोहाळे लागले होते तें फळ एका राक्षसाजवळ होतें. तेव्हां कांहीं लोकांनीं राक्षसाच्या देशास जाऊन तें फळ आणलें; परंतु त्या राक्षसानें अशी अट घातली कीं पुढें होणारा मुलगा त्यास मिळावा. त्याप्रमाणें त्या राक्षसानें तो मुलगा नेला व पुढें तो मोठा झाल्यावर तेथून निघून आला. 'लुकस्वाको' यांत, एका बैलाची आणि वाघाची मैत्री होती व पुढें त्यांनां एका ऋषीनें मनुष्यत्व दिलें अशी कथा आहे. 'पजफलि' यांत सुग्रीवाचा बंधु वाली याच्या पराक्रमांचें वर्णन आहे. 'होइसंग' या ग्रंथांत एका शंखांत जन्मून वाढलेल्या राजपुत्राची गोष्ट आहे. 'संगसिंचय' या ग्रंथांत एका वीराचा वृत्तांत आहे. तो असा कीं, त्याचा जन्म झाला त्यावेळीं त्याच्या हातांत शंख व धनुष्य होतें. तो लागलाच सिंहावर बसून निघाला व त्यानें पुष्कळ राक्षस, यक्ष वगैरेवर विजय मिळविले. 'वोरनुत' या ग्रंथांत वोरनुत आणि वोरनेत या दोन भावांची कथा आहे. 'नंगुथय' या ग्रंथांत एका राजानें पळवून नेलेल्या एका नाग राजकन्येची कथा आहे. यांतील बऱ्याच कथा संस्कृतमधील असून त्या पालींतून या भाषेंत आल्या असाव्या असें लेडेनचें मत आहे. 'महाचिनोक' या ग्रंथांत जनक राजाची कथा आहे. ही जरी मूळरामायणावरून घेतली असली तरी तिचें स्वरूप बरेंच पालटलें आहे कारण तींत फ्रेंच व फ्रँक्स यांचा उल्लेख आढळतो.

**अनाम.**—अनाम ही भाषा कोचिनचीन आणि टाँकिन या प्रांतांत चालते. कॅथॉलिक मिशनरी सांगतात कीं ही भाषा चंपा व कौंबंग या देशांत व लाव, कांबोज आणि सयाम या देशांतहि चालते. पण या दुसऱ्या देशांच्या बाबतींत त्यांचें म्हणणें बहुंशीं खरें दिसत नाहीं. अनाम भाषा व देश यांनां सयामी व मलायी लोक जुआन असेंहि म्हणतात. कॅथॉलिक मिशनऱ्यांनीं सर्व पौरस्त्य भाषांपेक्षां या भाषेचा अभ्यास विशेष केलेला दिसतो. इ. स. १६५१ मध्येंच अलेक्झांडर डी ऱ्होड्स या जेसुइट पंथाच्या पाद्र्यानें रोम येथें या भाषेचा एक कोश प्रसिद्ध केला. हा कोश सध्या जरी अपुरा वाटत असला तरी बराच महत्त्वाचा आहे. यांत लाटिन लिपीच वापरली आहे व उच्चार बरेच सदोष आहेत. यानंतर बरेच कोश व व्याकरणें तयार झालीं आहेत. पॅरिसमध्यें अनाम भाषा शिकविण्याकरितां एका प्रोफेसराची नेमणूक झालेली आहे.

कोचिनचीन व टाँकिन हे प्रदेश चीनपासून फार जवळ असल्यामुळें चिनी लिपी व वाङ्मय यांचा प्रवेश तेथें बराच झाला आहे. चिनी लिपीस ते लोक 'चूव' असें म्हणतात. ते व्यवहारांत व खाजगी बाबतींत एक निराळीच लिपी वापरतात. ती चिनीपासून निराळी असून चिनी लोकांस ओळखूं येत नाहीं व अनामी भाषा आल्याशिवाय वाचतां येत नाहीं. हिला 'नोम' असें म्हणतात. या लिपीचा थइ लिपीशीं संबंध असावा.

अनाम भाषेंत लिंग, वचन, विभक्ति, किंवा अर्थ, काळ, प्रयोग इत्यादि भेद नाहींत. हीं सर्व कार्यें अव्ययांकडून होतात. बऱ्याच ठिकाणीं शब्दांचा अर्थ केवळ संदर्भावरून करावयाचा असतो. शब्दावरील जोराचाहि अर्थ फिरविण्याच्या कामीं फार उपयोग होतो.

यांचे सांप्रदायिक ग्रंथ व धर्मशास्त्रादि ग्रंथ चिनी ग्रंथांसारखेच दिसतात. चीनमधील बौद्ध संप्रदायासारखींच यांचीं सांप्रदायिक तत्त्वें दिसतात. परंतु या लोकांत कांहीं समजुती विशेष दिसतात. उदाहरणार्थ, हे कुत्र्याची पूजा करतात व त्यास विष्ठा खावयास घालतात. त्याप्रमाणेंच वाघाची पूजा करतात व त्यास नरमांस खावयास देतात.

**खोहमेन.**—कांबोजमधील जी 'ख्मेर' भाषा तिचेंच हें सयामी नांव आहे. या भाषेचा फ्रेंच लोकांनीं बराच अभ्यास केला आहे. ही भाषा मेकॉन अथवा कंबुचतची कांबोज नदी इच्या तीरावर राहणारें याच नांवाचें एक राष्ट्र वापरतें. लेडेन याच्या कालीं या भाषेचा फारसा अभ्यास झाला नव्हता. ही भाषा थइ, अथवा कोचिनचीनमधील भाषा जुआन यांच्याहून भिन्न आहे. हें राष्ट्र प्राचीन कालीं फारसें संस्कृत नव्हतें. यांनां पोर्तुगीज इतिहासकारांनीं 'ग्वो' असें उल्लेखिलें आहे. हे

नरमांसभक्षक असून आपलीं शरीरें गोंदवीत असत असें सांगतात. डी बॅरॉस यानें कोमो व कांबोज अशीं या ठिकाणीं समुद्रकिनाऱ्यावर दोन राष्ट्रें होतीं असा उल्लेख केला आहे.

**लाओ.**—ही भाषा समुद्रकिनाऱ्यापासून दूर राहणारें एक राष्ट्र वापरतें. यांनां पोर्तुगीज लोक लाओ असें म्हणत व तेंच नांव पुढें प्रचारांत आलें. या भाषेचा अभ्यास यूरोपीयांनीं मुळींच केलेला आढळत नाहीं. अलेक्झांडर डी ऱ्होडस नांवाचा एक मनुष्य पूर्वीं या प्रांतांत गेला होता. कोहांफर* यानें दिलेल्या माहितीवरून लाओ (लाव) राष्ट्र हें सयामी राष्ट्रापासून भाषा व लिपी या बाबतींत फारसें भिन्न नाहीं.

ब्रह्मी व सयामी लोक आपला धर्म, शास्त्रें इत्यादि सर्व संस्कृति लाव राष्ट्रापासून मिळालीं असें म्हणतात. लाव लोकांच्या देशांत बौद्ध संप्रदायाच्या संस्थापकांनीं आपल्या अस्तित्वाचे बरेच अवशेष ठेवले आहेत असें त्यांचें म्हणणें आहे. सिंहलद्वीपांत ज्याप्रमाणें अमलश्रीपाद पर्वतावर बुद्धाच्या डाव्या पायाची खूण आहे असें सांगतात, त्याप्रमाणें त्याच्या उजव्या पायाची खूण सयाममध्यें 'स्वन्नबपतो' (सुवर्णपर्वत) या पर्वतावर आहे असें सांगतात. दुसरीं कांहीं पावलें पेगु, आवा, आराकान यांमध्यें आहेत असें म्हणतात. परंतु लाव देशामध्यें सर्व खुणा एकत्र आढळतात व बरेच यात्रेकरू या देशांत 'प्रकुकुसोन,' 'प्रकोन्नकोन,' 'प्रपुत्थकत्सोप,' आणि 'प्रसमुत्तकोदोम' यांच्या पादुकांचें दर्शन घेण्यास येतात. हीं सर्व नांवें हेमचंद्राचार्यांच्या अभिधानचिंतामणीमध्यें जीं शेवटच्या चार बुद्धांचीं क्रुकुच्छन्द (ककुच्छन्द), कांचन, काश्यप आणि शाक्यसिंह† अशीं संस्कृत नांवें आहेत त्यांचींच अपभ्रष्ट रूपें असावीं. लाव लोकांच्या भाषेंत बरेच ग्रंथ आहेत असें म्हणतात.

**जावानी.**—जावा अथवा जावानी भाषा ही मलायी राष्ट्रापेक्षां एका जुन्या राष्ट्राची भाषा असून ती थोड्या कालापूर्वींच सर्व जावा बेटावर प्रचलित होती ही गोष्ट मलायी लोकांसहि मान्य आहे. जावा अथवा यवद्वीप हें पूर्वीं एकाच राजाच्या सत्तेखालीं होतें. हे राजे सुसुपन वंशांतील असून त्यांस रतु अगोंग अथवा सुसुहुनंग असें उपपद असे. त्यांची राजधानी कुरिपन, सूर्यकर्त येथें असे. हें राष्ट्र बलाढ्य, धाडशी व दाट वस्तीचें असून मुसुलमानांनीं खि. श. १४०० च्या सुमारास आपली सत्ता स्थापण्यापूर्वीं या राष्ट्राची पूर्वसमुद्रांत अप्रतिहत सत्ता असून त्यांनीं सुमात्रा, बोर्निओ व मोलक्कापर्यंत स्वाऱ्या करून विजय संपादन केले होते. यूरोपीयांचा त्यांच्याशीं संबंध आला तेव्हां त्यांच्या सत्तेस उतरती कळा लागली होती, परंतु तेव्हां सुद्धां त्यांनीं मलाक्कामधील पोर्तुगीज सत्तेलाहि वरचेवर डळमळावयास लाविलें.

जावामधील भाषांचे अन्तःप्रदेशस्थ भाषा व तीरप्रदेशस्थ भाषा असे दोन मुख्य वर्ग करतां येतील. तीरप्रदेशस्थ म्हणजे किनाऱ्यावरील प्रदेशांतील भाषा या ज्यास्त अपभ्रष्ट आहेत. परंतु अन्तःप्रदेशस्थ म्हणजे बेटाच्या मध्यभागीं असलेल्या प्रदेशांतील भाषा या संस्कृत भाषेशीं फारच सदृश आहेत. त्या भाषांतून अगदीं साध्या पदार्थांनांहि संस्कृत शब्दच आढळतात. जो थोडा उच्चारामध्यें फरक आढळतो तो तेथील लिपीच्या अपूर्णत्वामुळें झालेला दिसतो.

जावा भाषेची मातृकामाला फारच चमत्कारिक असून तिचें देवनागरीशीं मुळींच साम्य नाहीं. या मालेंत २० वर्ण आहेत व ए, इ, उ, ओ हे चार स्वर आहेत. परंतु उच्चारांची संख्या बरीच मोठी आहे. हे वर्ण उजवीकडून डावीकडे लिहीत जातात.

जावाबेटाच्या अंतर्गत भागांत बरेच प्राचीन शिलालेख सांपडतात. असाच एक शिलालेख थुनवर्ग यास नीलपर्वताजवळ पदितुलिस येथें सांपडला होता. त्यामध्यें साडेआठ ओळी असून तो दोन फूट रुंदीच्या एका दगडी स्तम्भावर खोदलेला होता. त्यांतील अक्षरें उजवीकडून डावीकडे लिहिलेलीं होतीं, परंतु तीं कोणासच लावतां आलीं नाहींत. जावा बेटांत असलेल्या बागेलेन आणि सुंदा या भाषा जावा भाषेहून अगदीं भिन्न आहेत. बागेलेन भाषेपासून सुंदु भाषा निघाली असें म्हणतात परंतु या बाबतींत लेडेन यानें कांहीं संशोधन केलेलें नाहीं. जावा भाषेंतील वाङ्मय मलायी वाङ्मयाप्रमाणेंच आहे आणि या वाङ्मयापासूनच मलयु भाषेंतील वाङ्मय तयार झालें आहे ही गोष्ट वरती सांगितलीच आहे. या भाषेंतील 'कुग्गविन' अथवा 'चरित्र ग्रंथ' यांमध्यें पौराणिक कथा व तद्देशीय वीरपुरुषांच्या कथा असतात व हे ग्रंथ अगदीं भारतीय पुराणांसारखे असतात. जावानी धर्मशास्त्रग्रंथ अथवा कायद्यांचे ग्रंथ फारच प्राचीन असून ते सर्व पूर्वद्वीपांत प्रसिद्ध आहेत. जावामधील वाङ्मयाचें विस्तृत वर्णन पुढें यवद्वीपसंस्कृतीच्या प्रकरणांत* केलें आहे.

मलयु भाषेप्रमाणें जावा भाषेचा अभ्यास यूरोपीयांनीं विशेषसा केलेला दिसत नाहीं. जावामधील पौराणिक कथांचीं संविधानकें वगैरे व कांहीं शब्दकोश बटेव्हिया येथील एशियाटिक सोसायटीनें प्रसिद्ध केले आहेत. 'ईस्ट इंडिया कंपनीचा उदय आणि वाढ' या डच ग्रंथांत मलयु आणि जावा या भाषांची तुलना केली आहे. मुसुलमानांनीं कुराणाचें जावानी भाषेंत भाषांतर केलें आहे.

बलि व मदुरा द्वीपांत प्रचलित असलेल्या त्याच नांवांच्या भाषा या जावा भाषेच्याच पोटभाषा असाव्या. या बेटांतील बहुतेक लोक आपले परंपरागत धर्म पाळतात. ते दिसण्यांत हिंदूंसारखे दिसतात. कपाळावर गंध व कुंकू लावतात व हिंदूंप्रमाणेंच तेथील बायका सती जातात. ते इन्द्र, सूर्य आणि विष्णु यांची उपासना करितात. जावांतील लोकहि जे अद्याप ख्रिस्ती कल्पांत शिरले नाहींत ते वरील उपास्यांची पूजा करितात. या लोकांसंबंधीं व त्यांच्या धर्मशास्त्रासंबंधीं माहितीचीं साधनें लेडेन याजवळ नसल्यामुळें त्यानें यांचें फारसें वर्णन दिलें नाहीं.

**बूगी.**—ज्याप्रमाणें जावा बेटाची मूळची भाषा जावा अथवा जावानी मानतात त्याप्रमाणेंच सेलिबिस बेटाची मूळची भाषा बूगी ही होय. या शूर आणि लढवय्ये लोकांच्या प्राचीन राष्ट्राची ओळख यूरोपीयांस त्यांच्या ऱ्हासकालींच झाली तथापि

* History of Japan p. 26. † हेमचंद्र ४.२३३. * प्रकरण ६ वें.

बऱ्याच गोष्टींवरून हें राष्ट्र जावापेक्षांहि प्राचीन असावें अशी कल्पना होते. धैर्य, धाडस, विश्वास, व्यापारांतील सचोटी या बाबतींत ते सर्व पौरस्त्य लोकांत श्रेष्ठ आहेत असें मलायी व जावानी लोकहि सांगतात; आणि यांची चिनी अथवा इंडोचिनी लोकांशीं तुलना करावयाची म्हणजे एखाद्या सोनेरी खोगीर घातलेल्या गाढवाची एखाद्या उमद्या घोड्यावरोबर तुलना करण्यासारखें आहे असें ह्मणण्यापर्यंत लेडेन या लोकांवर फिदा झाला होता. या राष्ट्रामध्यें आणि जपानी लोकांत बरेंच साम्य आहे परंतु त्यांच्या भाषांत साम्य आहे किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं.

सेलिबिस बेटांत प्रथम लहान लहान संस्थानें होतीं परंतु पुढें तीं एकत्र होऊन एका नियतसत्ताक व लोकनियुक्त राजाच्या सत्तेखालीं आलीं. यानंतर हें बेट म्हणजे पूर्वेकडील व्यापाराचें केंद्र बनलें आणि त्यांनीं बलीपासून मोलक्कापर्यंत आपली सत्ता पसरली. बूगी भाषेच्या वृद्धीसाठीं बरेच परिश्रम करण्यांत आले आणि त्यांचीं पुराणें, परंपरागत कथा, कायदेकानू व धर्मशास्त्र व इतिहास यांचा ग्रंथांमध्यें समावेश करण्यांत आला. या ग्रंथांपैकीं बरेचसे ग्रंथ या बेटाच्या अंतस्थ भागांत व जे लोक आपले प्राचीन धर्म पाळतात त्या लोकांत अद्यापीहि उपलब्ध आहेत. किनाऱ्यावरील प्रदेशांत मात्र महंमदी संप्रदाय प्रचलित आहे आणि या प्रदेशांतील ग्रंथ मलायी लोकांतील नंतरच्या चरित्रग्रंथांप्रमाणें आहेत. खि. श. १६०३ या वर्षी मंकासर राजानें मक्कासर राष्ट्राच्या साहाय्यानें विलक्षण क्रांति करून जुन्या धर्माचा त्याग केला व महंमदी संप्रदायाचा स्वतः स्वीकार करूत इतर राष्ट्रांसहि त्यानें आपलें अनुकरण करावयास लावलें.

किनाऱ्यावरील प्रदेशांतील बूगी भाषा बरीचशी पूर्वेकडील मलयु भाषेशीं मिश्र झाली आहे. हिचें शुद्ध स्वरूप प्राचीन धर्मग्रंथांत व अंतर्देशांत मात्र सांपडतें. या भाषेंतील शब्दांवरून ही स्वतंत्र भाषा असावी अशी कल्पना होते पण हिची रचना मलयु व तागाल या भाषांसारखी आहे. या भाषेचें एकंदरींत मलयु, जावानी, व तागाल या भाषांशीं साम्य आहे. परंतु हिच्या मूळच्या स्वरूपांत संस्कृतजन्य शब्द मुळींच सांपडत नाहींत. तेरनत अथवा मोलक्का या भाषेशीं देखील बूगी भाषेचें थोडेंसें साम्य आहे, परंतु या दोन्ही भाषांचा विशेष अभ्यास झाल्यावर या बाबतींत निश्चित मत देतां येईल. मलयु व जावानी भाषांपेक्षां ही भाषा अधिक स्वतंत्र दिसते.

बूगी भाषेंत बावीस वर्ण असून त्यांचे अ, उ, इ, ए, ओ, उंग अशा सहा स्वरांनीं निरनिराळे उच्चार होतात. वर्णांचा आकार चमत्कारिक दिसतो पण ते बत्ता व तागाल भाषांच्या वर्णांप्रमाणें कांहींसे दिसतात. परंतु या वर्णांचे आकार निरनिराळ्या राज्यांत निरनिराळे असून कांहीं ठिकाणीं त्यांच्या अनुक्रमांत व संख्येंतहि फरक आहे. यांची संख्या १७ पासून २२ पर्यंत आहे. हीं अक्षरें छापलेलीं अशीं फारेस्ट यानें आपल्या 'मेर्गुइ द्वीपसमूहाचा प्रवास' या ग्रंथास जोडलेल्या नकाशांत पहावयास सांपडतात. मलयु ग्रंथांतहि बूगी लिपीचा उपयोग केलेला आढळतो.

बूगी भाषेंतील जुन्या ग्रंथांमध्यें सर्वत्र सामान्यतः एकच भाषा आढळते. परंतु सध्याच्या भाषेमध्यें व संभाषणांतून पाहिल्यास निरनिराळ्या संस्थानांतील भाषांत बराच फरक आढळतो. मंकासर अथवा मकासर या सर्वांत शूर व प्रसिद्ध बूगी राष्ट्रजातीची भाषा मूळ बूगी भाषेपेक्षां बरीच निराळी आहे. त्याप्रमाणेंच लुवु, एनरेकंग, मन्दर, व विशेषतः तरज्ज या जातींच्या भाषा जवळ जवळ अगदीं स्वतंत्र दिसतात.

बूगी भाषेचा यूरोपीयांनीं फारसा अभ्यास केलेला दिसत नाहीं. डच लोकांनीं त्यांच्या ऐतिहासिक कथांपैकीं कांहींच्या संक्षिप्त आवृत्त्या काढल्या आहेत. लेडेन यानें एक बूगी व मंकासर भाषेचा लहानसा शब्दकोश केला आहे पण तो त्याच्याच म्हणण्याप्रमाणें अपुरा व चुकीचाहि असावा कारण तो त्यानें किनाऱ्यावरील लोकांच्या माहितीवरून तयार केला आहे. त्याला मिळालेल्या माहितीवरून त्यानें बूगी भाषेंतील कांहीं ग्रंथांचीं नांवें दिलीं आहेत तीं अशीं आहेत.:—

(१) नाम सगुनि (२) बतर गुरु (३) गुरु दे सिलंग (४) तोजोरिसुंपा (५) लसिनि लेले (६) बतर लतो (७) ओपुतोलग (८) अरौलंगी (९) पनोरि तवगे (१०) लजिरि होइ (११) जमुरि चिन (१२) लौरुपोयसि (१३) रोतुन नरि-तत्त, दतु नगिम (१४) लमपुतोद तुरिपो (१५) लतुम मुळुलंग (१६) लौधुन रेओ (१७) लप बिचर लरि सिंदेनरे (१८) गुतुपत लोतोपलगुन (१९) लप्पंग डरिसंग (२०) ओपुसंगमुद (२१) ओपुल मरु दतुन सोपेंग (२२) लातु गेतान पजु लिंपोय (२३) सविर गदिंग (२४) अदेवत (२५) रोतुन दिलिविंग (२६) दतपमुसु (२७) लगन लदुंग (२८) रोतुन रिसोलु (२९) ल गलिगो (३०) तोवल ओंजि (३१) रदओंग लवे (३२) लमद रोमंग (३३) पलवगो (३४) लवजुलंगि (३५) लमप पुलि (३६) दतु मोबुनले (३७) ललुंपंगमेग (३८) लसवुगं लंगि (३९) रोतन दि पपंग (४०) अजि लेदे (४१) लमपंग अनिरो (४२) लतन नरिजिवि (४३) बयपगुलि (४४) लतुपु सलौ (४५) लतुपुगुलु (४६) लतन नरि पुलंग (४७) सलबोंग (४८) लसतुंगपुगे (४९) लगलिगो तोकोलिंगेंघ (५०) लतन नरौगि (५१) दतुल किल (५२) लपनदोर (५३) रोतन दि तिमंग तोअन लनिउ.*

या सर्व ग्रंथांत त्यांच्या ऐतिहासिक पुरुषांच्या कथा आहेत. वरील ग्रंथांखेरीज 'अद्त' अथवा नियमसंग्रह म्हणून जे कायद्याचे ग्रंथ आहेत ते फार जुने असून सर्व पौरस्त्य जातींत प्रसिद्ध आहेत. यांपैकीं कांहीं ग्रंथांचीं मलयु व जावा भाषांत भाषांतरें झालीं आहेत. बूगी भाषेंत कुराणाचें भाषांतर झालें आहे.

बूगी भाषेंतील गाणीं व अद्भुत कथा या सर्व पूर्वेकडील बेटांत प्रसिद्ध आहेत; व त्यांतील कल्पना आणि प्रतिभा हींहि वाखाणण्याजोगीं आहेत असें लेडेन याचें मत आहे. यांच्या गाण्यांत यमकाचा उपयोग फारसा नाहीं. यांच्या गाण्यांतलें

* याखेरीज डॉ. बी. एफ्. मत्थेस (B. F. Matthes 1815, 1881, 1883) यानें बूगी व मकासर वाङ्मयांतील ग्रंथांच्या वर्णनात्मक सूची तयार केल्या आहेत, आणि व्याकरणें व कोश लिहिले आहेत. त्याप्रमाणेंच के. जी. नीमन (K. G. Niemann) यानें अलफुरु म्हणून किनाऱ्यावर प्रचलित असलेल्या भाषांवर एक ग्रंथ लिहिला आहे तो ॲम्स्टरडॅम येथें १८६६ सालीं छापला आहे.

माधुर्य तालावर अवलंबून असतें. ऐतिहासिक काव्यांतील वृत्तें बरींचशीं संस्कृतसारखीं असतात. या भाषेंतील गाण्यांचे पुष्कळ प्रकार आहेत. कांहीं गाणीं दोहरे किंवा सुभाषित श्लोकांसारखीं लहान लहान असतात. तीं मलयु भाषेंतील पतुनइतकीं सुंदर नसतात. परंतु यांवरून त्यांच्या आयुष्यक्रमाची व स्वभावाची बरीच ओळख पटते.

मकासर काव्येंहि बूगी भाषेंतील काव्यांप्रमाणेंच असतात व त्यांचा आवडता विषय म्हणजे त्यांच्या डच लोकांबरोबर झालेल्या लढाया हा होय.

**बिम.**—बिम भाषा ही बिम नांवाच्या एका स्वतंत्र राज्यांत प्रचलित आहे. या राज्यामध्यें सुंबावा बेटाचा पूर्वभाग आणि फ्लोरेस बेटाचा पश्चिमभाग हे येतात. पहिल्या पहिल्या पोर्तुगीज प्रवाशांनीं व त्यांच्या मागून आलेल्या कांहीं प्रवाशांनीं व भूगोलवेत्त्यांनीं या एन्डे बेटासच फ्लोअर्स असें म्हटलेलें आढळतें. एन्डे बेटाच्या बहुतेक भागावर बिम भाषा प्रचलित आहे असें लेडेन याचें मत आहे. बिम भाषेचा बूगी व जावानी भाषांशीं संबंध असावा असें दिसतें व किनाऱ्यावरील भाषेमध्यें मलयु भाषेचें मिश्रण झालेलें आढळतें. बूगी भाषेशीं जो संबंध दिसतो तो वास्तविक बूगी भाषेशीं नसून मकासर भाषेशीं आहे. सुंबावा बेटाचा जो भाग बिम येथील सुलतानाच्या ताब्यांत नाहीं त्या भागांतील भाषा बिम, जावानी व बूगी यांच्या मिश्रणानें बनलेली आहे. बिम किंवा सुंबावा या दोन्ही भाषांस स्वतंत्र लिपी नसून त्या बूगी किंवा मलयु भाषेचीच लिपी वापरतात.

**बत्ता.**—बत्ता भाषा ही लेडेन याच्या मतें सुमात्रांतील सर्वांत जुनी भाषा आहे. सुमात्रा बेटाच्या मध्यभागीं राहणारे बत्ता लोक ही भाषा वापरतात. हे लोक कांहीं कांहीं बाबतींत मलायी लोकांपेक्षांहि सुधारलेले असून त्यांच्यामध्यें नरभक्षणाचा प्रघात असल्यामुळें या लोकांकडे फार प्राचीन काळापासून यूरोपीय लोकांचें लक्ष गेलें आहे, परंतु त्यांच्याबद्दल अद्यापि विशेषशी माहिती मिळत नाहीं. यांच्याबद्दल मार्सडेन यानें आपल्या 'सुमात्राच्या माहितीचा इतिहास' या ग्रंथांत कांहीं माहिती दिली आहे परंतु लेडेन याच्या माहितीचा त्या माहितीशीं विरोध आहे. मार्सडेन यानें असें म्हटलें आहे कीं हे लोक फक्त गुन्हेगार व शत्रूकडील कैदी यांनाच खातात, परंतु लेडेन याच्या माहितीप्रमाणें ते स्वतः असें सांगतात कीं ते केव्हां केव्हां स्वतःचे नातलगहि वृद्ध व अशक्त झाले म्हणजे खातात व तें केवळ नरमांसाची चटक लागल्यामुळें नव्हे तर धार्मिक विधीचा भाग म्हणून खातात. जेव्हां एखादा मनुष्य वार्धक्यामुळें या जगास कंटाळतो तेव्हां तो मीठ व लिंबें स्वस्त असतील अशा दिवसांत आपल्या मुलांनां बोलावून स्वतःस भक्षण करण्यास सांगतो. नंतर तो एका झाडावर चढतो व त्या झाडाभोंवतीं त्याचे इष्टमित्र व आप्त जमतात आणि तें झाड हलवतात. झाड हलवतेवेळीं ते एक अंत्येष्टिगीत म्हणतात. त्याचा अर्थ 'ऋतु प्राप्त झाला आहे, फळ पिकलें आहे, तें पडलें पाहिजे' असा असतो. नंतर तो खालीं उतरतो व जे त्याचे अगदीं जवळचे किंवा विशेष लाडके नातलग असतील ते त्याचा जीव घेतात व सर्वजण मिळून मोठ्या गंभीरपणें त्याची मेजवानी झोडतात. ही वरील गोष्ट मार्सडेन यानें सांगितलेल्या हकिकतीपेक्षां अधिक अविश्वसनीय असेल. परंतु ती बत्ता लोकांनींच सांगितलेली आहे व त्यांच्याजवळ राहणारे मलायी लोकहि याप्रमाणेंच सांगतात.*

हिरोडोटस यानेंहि हुबेहुब असेंच वर्णन दिलें आहे मात्र तेथें त्यानें लोकांचें नांव पदय अथवा पदइओइ असें दिलें आहे.† पण पदइओइ हें बत्ता याचाच अपभ्रंश असावा; कारण ग्रीक भाषेंत पालि याचें बालि असें रूप अनेक ठिकाणीं आढळतें.

बत्ता लोकांच्या ज्या निरनिराळ्या जाती लेडेन यास आढळल्या त्या (१) बत्ता सेबलुंगु (२) बत्ता पदेमबनिम (३) बत्ता कवलु (४) बत्ता पन्नइ (५) बत्ता तोइउ (६) बत्ता कुरुलंग (७) बत्ता सिपगडु (८) बत्ता बिल, या होत. बत्ता लोकांतील चालीरीती बऱ्याचशा मलबारमधील नायर लोकांच्या चालींप्रमाणें आहेत. तेथें वंश मातृकन्यापरंपरेनें चालतो असें अनेक लेखक लिहितात, तथापि लेडनच्या लेखाचा पुनरावृत्तिकार मॅक्सवेल ही गोष्ट सध्या चालू असलेला कायदा पाहिला असतां आढळत नाहीं असें म्हणतो.

बत्ता भाषेचा मलयु, बूगी व बिम भाषांशीं जरी विशेष संबंध असला तरी तिच्यांतहि बऱ्याच गोष्टी मूळच्याच आहेत. रचनेच्या बाबतींत ती मलयूप्रमाणेंच साधी आहे, परंतु तिचें बूगीशीं बरेंच साम्य आहे. बूगी लोकांतीलहि बऱ्याचशा चाली बत्ता लोकांप्रमाणेंच आहेत. बूगी लोकांतील रज्ज अथवा तरज्ज जातींतील लोक अद्यापीहि (लेडनच्या काळीं १८०० च्या सुमारास) युद्धांतील कैदी खातात असें सांगतात. सुमात्रा बेटांत ज्या निरनिराळ्या भाषा दिसतात त्यांच्या मुळाशीं बत्ता भाषा हीच आहे. मलायी लोकांमध्यें अचिनी जातीच्या लोकांत व मलबाराकडील मापिळ्ळा लोकांत विशेष साम्य आहे; आणि त्यांच्या भाषेमध्येंहि बरेच मापिळ्ळा शब्द आहेत.

बत्ता भाषेमध्यें फार प्राचीन काळापासून अनेक ग्रंथ तयार झाले आहेत, परंतु लेडेन यास फक्त पुढील ग्रंथांची माहिती मिळाली. (१) शिव मरंगज (२) शिव जरंग मुंदोप (३) राजा इसिरि (४) मलमदेव.

या भाषेची वर्णमाला फार चमत्कारिक असून तींतील अक्षरांच्या आकृती व अनुक्रम हींहि फार विचित्र दिसतात. एकंदर अक्षरें एकोणीस असून बूगीप्रमाणें सहा स्वरांनीं त्यांचे निरनिराळे उच्चार होतात. परंतु बत्ता भाषा लिहिण्याची पद्धति मात्र सर्व परिचित पद्धतींहून निराळी आहे. या भाषेंतील अक्षरें एकापुढें एक डावीकडून उजवीकडे अगर त्याच्या उलट लिहीत

---

* पहा विकमोर १. १. पृ. ४४६; जे. जे. द हॉलंडर लँड एन व्हॉलकेन कुंडे भा. १. पृ. ७९४–६; मार्कोपोलो, भाग २ पृ. २३१,४०,४१.

† Herodotus, Lib III S. 99.

नाहींत व चिनीप्रमाणें वरून खालीं लिहीत येत नाहींत तर त्याच्या उलट खालून वर एकावर एक लिहीत येतात.* मेक्झिकोमधील चित्रलिपीहि अशीच लिहीत असत. त्यांचीं लिहिण्याचीं साधनें म्हणजे बांबूचा तुकडा अथवा झाडाची फांदी आणि काट्याचें टोंक हीं होत. त्यांचे ग्रंथ म्हणजे या बांबूच्या व लांकडांच्या मोळ्या होत. मार्सडेन यानें आपल्या सुमात्राच्या इतिहासांत या भाषेची वर्णमाला दिली आहे. परंतु यानें ते वर्ण आडव्या ओळींत लिहिले आहेत, यामुळें थोडा घोंटाळा होतो. बत्ता लोक केव्हां केव्हां जिवंत झाडावर लिहितात व अशा वेळीं ओळ सरल्यानंतर रिकामी जागा रहाते ती वरच्या बाजूस असते. या भाषेंतील वर्ण बरेचसे बूगी व तागाल भाषांतील वर्णांशीं जुळतात.

**जंत्रीचें प्रयोजन.**—या अनेक भाषांची कंटाळवाणी जंत्री वाचकांच्या पुढें मांडण्याचें प्रयोजन एवढेंच कीं, भारतीय विद्यांचा प्रसार होत असतां निरनिराळीं राष्ट्रें व लोक उर्फ निरनिराळ्या भाषा बोलणारे लोकसमुच्चय हिंदु संस्कृतीच्या प्रसारानें कितपत संस्कृत झाले याची कल्पना यावी. नरमांसभक्षकांपासून कांहीं अंशीं सुधारलेल्या राष्ट्रांपर्यंत सर्व प्रकारचे लोक या पूर्वेकडील द्वीपकल्पांत आणि त्याच्या दक्षिणेच्या द्वीपसमूहांत होते. त्या निरनिराळ्या लोकांचें विविधत्व आणि त्यांच्या संस्कृतींचें स्वरूप हीं विशदपणें मांडावयास भाषाविशिष्ट लोकसमुच्चयांचा हिशोबच फार उपयुक्त असतो. असंस्कृत राष्ट्रांमध्यें राजपद विशेष अस्थिर असावयाचें आणि त्याच्या अधिकाराचें क्षेत्रहि फारच नियमित असावयाचें. यांचा इतिहास म्हणजे तात्पुरता कोण कोणाच्या उरावर बसला याचा इतिहास होय. या प्रकारचा सर्व राजकीय इतिहास उपेक्षणीय होय. या लोकसमुच्चयांत जे जरा प्राधान्य पावलेले आणि राष्ट्रस्वरूपास पोंचलेले असतील त्यांविषयीं तेवढी आपणांस सविस्तर माहिती हवी आणि यासाठीं कांबोज, यवद्वीप, बलि, अनाम, टाँकिन आणि ब्रह्मदेश, यांविषयीं तेवढी सविस्तर माहिती देऊन बाकीच्यांविषयीं नुसत्या भाषाविशिष्ट लोकसमूहांच्या सामुच्चयिक आयुष्याची गोळाबेरीज आह्मीं दिली आहे.

**कांबोज.**—कांबोजमध्यें शिवपूजन व ब्राह्मणमहत्त्व हीं अजून आहेत आणि यामुळें या देशाविषयीं आपणास स्वाभाविकपणें अधिक जिज्ञासा वाटते; आणि तीहि हिंदुत्वाच्या भरभराटीच्या काळासंबंधीं वाटते. पाश्चात्य सत्तेचें दडपण पडल्यामुळें कांबोजाचें हिंदु स्वरूप पूर्वीप्रमाणें अविकृत राहिलें नाहीं. हें अविकृत स्वरूप जाणण्यासाठीं जर आपणास अधिक प्राचीनकाळचें चित्र उपलब्ध होईल तर चांगलें असें जाणून तेराव्या शतकाच्या अंतिम चरणांत काढलेलें एक चित्र आम्ही पुढें देत आहों. या चित्रांत दोष एवढाच आहे कीं, तेथील बौद्ध संप्रदायाची माहिती यांत चांगली दिली आहे तरी ब्राह्मणी संस्कृतीच्या म्हणजे वेदमूलक उपासना, उत्तरकालीन हिंदु उपासना, ब्राह्मणमहत्त्व यांच्या संबंधानें माहिती त्यांत नाहीं. हें चित्र एक चिनी अधिकारी इ. स. १२९५ मध्यें कांबोजला गेला होता त्यानें काढिलें आहे आणि त्याचा अनुवाद लासेन यानें आपल्या 'भारतीय प्राचीन संस्कृती'वरील ग्रंथांत केला आहे. आम्ही हा अनुवादच येथें उद्धृत करीत आहों. कांबोजासंबंधाची थोडीशी माहिती वर आली आहे तिच्यांत या चिनी लेखकानें दिलेल्या माहितीची भर टाकणें उपयुक्त होईल.

**कंफुकी.**—चिनी लेखकानें या देशाला किन-ला-केंला असें नांव दिलें आहे; आणि तद्देशीय लोक याला कं-फुकी असें म्हणतात असें सांगितलें आहे. कं-फुकी हें कांबोज (कांबोग) या नांवाचें चुकीचें वर्णान्तर दिसतें.

या देशाचा विस्तार व राजकीय मर्यादा निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या असल्यामुळें याविषयीं चिनी लेखकानें दिलेली माहिती येथें देण्याचा कांहीं उपयोग नाहीं.

कांबोजांत होणाऱ्या तिन्ही कोटींतील (जीवकोटी, वनस्पतिकोटी व खनिजकोटी) पैदाशीविषयीं या चिनी अधिकाऱ्यानें बरीच परिपूर्ण माहिती दिली आहे. परंतु तिनें आपणास प्रस्तुत असलेल्या माहितींत फारशी नवी भर पडण्यासारखी नसल्यामुळें येथें त्याच्या लेखापैकीं कांहीं महत्त्वाचे भाग मात्र आम्ही देणार आहों.

**मादक पेयें.**—कांबोजी लोकांनां मादक पेयें पिण्याची फार आवड होती; तीं पेयें चार प्रकारचीं असत. पहिला प्रकार मधामध्यें पाणी मिसळून करीत. दुसरा प्रकार फेरी-जांसे नांवाच्या झाडाच्या पानांपासून करीत. तिसरा भात व पेज यांपासून करीत. त्याला पान-लेंग-किओ म्हणत, कारण त्या देशांतील भाषेंत भाताला तें नांव आहे. चौथा प्रकार आपण कडू दवणा ज्याला म्हणतों त्या वनस्पतीच्या पानांपासून करीत. यांशिवाय काकवीपासून रमसारखी दारू करीत असत.

'या मादक पेयांची उत्पत्ति किंवा उपयोग यांवर कांहीं नियंत्रण किंवा निर्बंध नसल्यामुळें लोकांत दारूचें व्यसन फार बोकाळलें होतें.

**पीकपाणी.**—त्या देशांत उन्हाळा व पावसाळा हे ऋतू नियमितपणें उष्णतेचा व पाण्याचा पुरवठा करीत असल्यामुळें एकेका वर्षांतून तीनतीन चारचार पिकें निघतात व त्यामुळें तेथें धनधान्याची अगदीं समृद्धि असे व तीं पिकें ऋतुमानाप्रमाणें अर्थात् निरनिराळ्या प्रकारचीं असत.

**नगररचना.**—या देशांत पुष्कळ तटबंदी नगरें होतीं. तेथें भिंती पक्क्या विटांच्या बांधीत असत. कांहीं भिंती इतक्या रुंद असत कीं त्यांवर झाडांच्या रांगा लावीत. सन १२९५ सालीं

* व्हॉन दर तुक यानें ही भाषा डावीकडून उजवीकडे लिहितात असें म्हटलें आहे. (Tobasche Spraakkunst, I.)

राजधानीच्या शहराचा विस्तार सुमारें सात मैल होता. त्याच्या भोंवतीं खंदक खणून व तट बांधून भक्कम बंदोबस्त केलेला होता. त्याला पांच दरवाजे होते, आणि पुलावरून एकेका बाजूला ५४ दगडी मूर्ती होत्या. या मूर्ती राक्षसांच्या असून त्यांचा वर्णनकर्त्यांच्या दृष्टीनें उद्देश अर्थात् शत्रूंना भिवविण्याचा होता. पूल कमानीवर बांधलेले असून कमानींना नवतोंडी नागांचा आकार होता. दरवाजांवर बुद्धाचे मोठमोठे दगडी पुतळे होते. त्यांना पांचपांच तोंडें होतीं. ते पश्चिमाभिमुख असून मधला पुतळा सोनेरी होता. दरवाजांच्या आंतल्या बाजूस हत्तींच्या आकृती होत्या. बहुतेक नगरांच्या भोंवतीं तटबंदी असून ती व्यवस्थित बांधलेली होती. रात्रीं दरवाजांनां कुलुपें लावीत असत. शिवाय असा कडक नियम असे कीं कोणाहि संशयित इसमाला नगरांत घ्यावयाचा नाहीं.

**देवालयें.**—तो चिनी अधिकारी राजवाड्याजवळील टेंकडीवर असलेलें पवित्रस्थान पाहण्यासहि गेला होता. त्या ठिकाणीं २४ दगडी स्तूप असून एक सर्व सोन्याच्या पट्टयांनीं आच्छादिलेला असा होता. त्या टेंकडीच्या समोर दोन सोन्याचा मुलामा दिलेले सिंह होते. सिंहाच्या आकृतीवरून बुद्धाच्या शाक्यसिंह या नांवाचा बोध होतो. म्हणून अशोकानें आपण बांधलेल्या स्तूपांवर सिंहांच्या मूर्ती बसविल्या आहेत; व त्यावरूनच त्यांनां सिंहस्तंभ म्हणतात. शिवाय भिक्षूंनां राहण्याकरतां इमारती बांधलेल्या होत्या. त्यांच्या पुढें उभारलेल्या बुद्धाचे पुतळे अष्टदेही होते, हें मोठें चमत्कारिक आहे. येथून थोडक्या अन्तरावर तांब्यानें मढवलेला एक उंच स्तूप व भिक्षूंच्या राहण्याच्या इमारती होत्या. त्या चिनी अधिकाऱ्यानें नगराच्या दक्षिणदरवाजाच्या जवळ आणि त्याच्या आग्नेयीस अर्ध्या मैलावर असलेलीं कांबोजच्या राजांच्या पवित्र भावनांची साक्ष पटविणारीं अशीं दुसरीं स्थळेंहि पाहिलीं. त्या ठिकाणीं बुद्धाच्या मूर्ती तांब्याच्या होत्या.

**राजवाडा.**—राजाचा राजवाडा व मोठमोठ्या कामगारांचीं घरें राजधानीच्या पूर्वभागांतील एका विशिष्ट भागांत बांधलेलीं होतीं. खुद्द राजवाडा या भागांतील उत्तरेच्या बाजूला असून तो भाग शहराला एका पुलानें जोडलेला होता. राजवाड्याभोंवतीं असलेला बगीचा सुमारें पाव मैल पसरलेला होता.

राजवाड्याच्या समोर एक स्तंभमय दिवाणखाना होता. तेथील भिंती बुद्धाच्या आयुष्यांतील प्रसंगांचीं चित्रें काढून सुशोभित केल्या होत्या.

प्रधानमंडळीच्या बैठकीकरतां एक मोठा दिवाणखाना होता. राजा राजवाड्याच्या एका टोंकाला असलेल्या एका उंच भागांत निजत असे. राजवाडा पाहण्याची ज्या कांहीं थोड्या लोकांनां सवलत मिळाली होती त्यांनीं दिलेल्या हकिकतीवरून असें दिसतें कीं, राजवाड्यांतील सर्व गोष्टी फारच भव्य व मनोहर असत. तेथें प्रवेश होणें इतर अगदीं परकीयांप्रमाणें त्या चिनी अधिकाऱ्यालाहि फार कठिण पडलें.

**इतर इमारती.**—राजेलोकांच्या व सरदारांच्या इमारती इतर खाजगी लोकांच्या मानानें बऱ्याच मोठ्या होत्या, तथापि त्या सर्वांवर गवताचें छप्पर असे. फक्त राजवाड्यावर व देवालयांवर कौलें असत. न्यायाधीश लोक राहत तीं घरें त्यांच्या दर्जाच्या मानानें लहानमोठीं असत. लोकांचीं घरें अर्थात् त्यांच्या सांपत्तिक स्थितीप्रमाणें असत. तथापि सरकारी इमारतीइतकीं तीं मोठीं बांधण्याची परवानगी नसे.

राजधानीच्या शहरासंबंधानें पाहतां 'लावेक' नांवाचें शहर सर्वांत जुनें राजधानीचें ठिकाण असावें व प्राचीन इतिहासांत तेंच कांबोजच्या राजाचें वसतिस्थान असावें असें दिसतें. तें देशांतील आंतल्या भागांत असावेंसें वाटतें.

**पंडितवर्ग.**—कांबोज देशांतील लोकांच्या धर्माबद्दल पुढील माहिती मिळते. तेथील पंडित स्वतःस पंकी म्हणवीत. त्यांच्या धर्मतत्त्वांचा मूळ कोणी उत्पादक किंवा नंतर होऊन गेलेला गुरु वगैरे ते लोक कांहींच मानीत नसत. तिकडे विद्यालयें वगैरे कांहीं नसल्यामुळें त्यांच्या तत्त्वांचें यथार्थ ज्ञान होणें फार कठिण होतें. चिनी वृत्तलेखकाला त्यांच्या ग्रंथांचीहि कांहीं माहिती नव्हती. पंकीपंडितांच्या पोषाखांत सामान्य लोकांच्या पोषाखांपेक्षां फरक इतकाच कीं, त्यांच्या कपाळावर पांढऱ्या पट्टया असत. त्यांच्यापैकीं जे संसारांत पडत त्यांनांहि पुष्कळ मान असे. ते पांढऱ्या पट्टया आपल्या गळ्याभोवतीं घालीत त्या तेथून कधींहि काढीत नसत. (हें वर्णन तेथील ब्राह्मणवर्गासंबंधानें तर नसेलना, असा आम्हांस संशय येतो.)

**बौद्ध भिक्षु.**—गौतमाचे अनुयायी म्हणून जे असत ते श्मश्रु करीत, पिंवळीं वस्त्रें धारण करीत आणि उजवा हात खांद्यापर्यंत उघडा ठेवीत असत. त्यांच्यांत व सामान्य बौद्धलोकांत फक्त या शेवटल्या बाबतींत फरक असे. त्यांच्यांतील हलक्या दर्जाचे लोक नेहमीं अनवाणी असत. त्यांच्या देवळांतून फक्त एक बुद्धाची मूर्ति असून तिला ते फुकाई म्हणत. या मूर्ती तांबड्या व निळ्या रंगाच्या पत्र्याच्या असून त्यांच्यावर तांबडी वस्त्रें घालीत. स्तूपावरील बुद्धाच्या मूर्ती तांब्याच्या होत्या. हे बौद्ध आपणाला चुकु या नांवानें संबोधीत असत. यांजजवळ घंटा, ढोलकीं, झांजा, पताका, किंवा छत्रें हीं कांहींच नसत. समारंभांतील मिरवणुकींच्या वेळीं मात्र मूर्तींच्या वर छत्रें धरण्याचा प्रघात असे. शाक्यसिंहाच्या धर्मानुयायांची हीहि मोठी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, त्यांच्या देवाप्रीत्यर्थ जीं प्रयोजनें होत त्यांत देखील ते मत्स्य, मांस यांचें भक्षण करीत असत. फक्त मादक पेयें मात्र घेत नसत. ते दररोज आपल्या देवाला हवन करीत असत आणि त्याला लागणारीं द्रव्यें ते धर्मनिष्ठ लोकांपासून मागून आणीत. बुद्धधर्माचा असा कडक नियम आहे कीं भिक्षूंनीं भिक्षेवरच उदरनिर्वाह केला पाहिजे. त्यांचे धर्मग्रंथ ताडपत्रावर लिहिलेले असून त्यांतील स्तोत्रें ते पाठ म्हणत असत. हे ग्रंथ लिहिण्याला ते शाई किंवा कुंचली वापरीत नसत. ते काय घेत हें या चिनी वृत्तकाराला माहीत नाहीं. बहुशः ते हिंदी शाई व बोरू वापरीत असावे. सामान्यतः ते ताडपत्रावर लेखणीनें कोरून लिहीत, तिला ओला म्हणत. बौद्ध धर्मगुरू पालखींत बसून जात व ताडपत्रांच्या छत्र्या वापरीत. या चालीमुळें त्यांनां तलपत्रिन् असें म्हणत असत. बौद्धांनां किंवा बौद्धभिक्षूंनां म्हणा राजा

फार मान देत असे व महत्त्वाच्या कामांत तो त्यांची सल्ला-मसलत घेई.

**पास्सेपंथ.**—तिसरा पंथ पास्से नांवाचा होता. त्या लोकांचा पोषाख इतरांसारखाच असे, पण फरक इतकाच कीं ते डोक्याला तांबडा किंवा पांढरा पट्टा गुंडाळीत. ते बहुतेक बौद्ध लोकांपैकींच असावेत; कारण त्यांचेहि मठ, देवालयें व स्तूप असत. तथापि बौद्ध लोकांच्या मानानें यांच्या इमारती मुळींच भपकेदार नसत. कांबोजमध्यें बौद्धधर्माचे लोकच इतरांच्या मानानें पुष्कळ अधिक असत. पास्सेलोक स्वतः इतरांपासून फार अलिप्त राहत असत. परकीयांबरोबर ते भोजन करीत नसत. तद्देशीयांनांहि ते जेवण्याच्या वेळीं आपणांकडे पाहूं देत नसत. ते स्वतः मादक पेयें कधींहि घेत नसत. ते आपल्या मुलांनां बौद्ध लोकांच्या शाळांतून पाठवीत असत यावरून ते बौद्धांपैकीं असावे असें म्हणण्यास बळकटी येते. त्यांच्या धर्मग्रंथांविषयीं किंवा धार्मिक चालीरीतींविषयीं चिनी प्रवाशाला कांहींच माहिती मिळाल्याचें दिसत नाहीं.

**तलाकपंथ.**—बौद्ध व पास्से यांच्याशिवाय कांबोजमध्यें ९ व्या शतकाच्या आरंभीं लान सू तत्त्वाच्या अनुयायांचा एक पंथ होता. त्यांना तलाक असेंहि म्हणतात, कारण बुद्धीला ते सर्वश्रेष्ठ तत्त्व मानीत. ते प्रेतयात्रेच्या वेळीं गायनवादन करीत असत, व प्रेतें चितेवर जाळीत असत. चिता चांगल्या सुगंधी लांकडांची करीत. राख राहील ती सोन्याच्या किंवा रुप्याच्या भांड्यांत ठेवीत असत. गरीब लोक मडक्यांत ठेवीत; व नंतर ती नदींत टाकून देत. कित्येक वेळीं प्रेतें न जाळतां तीं डोंगर-सपाटीवर टाकून देत व क्रूर श्वापदांकडून खाववीत असत. यांपैकीं पहिल्या प्रकाराचें चिनी लोकांतील अन्त्येष्टीच्या विधीशीं म्हणजे ताओत्सेच्या जन्मदेशांतील पद्धतीशीं पूर्ण ऐक्य आहे. दुसरी पद्धत नैसर्गिक पद्धत आहे. ही इतरत्र फक्त इराणी वंशाच्या लोकांत आढळते. त्यांतले पार्शी लोक व मग भिक्षुक प्रेतें पक्षांकडून व कुत्र्यांकडून खाववितात. बॅक्ट्रियन लोक, ओरिसांतील लोक व सिंधुनदीच्या पश्चिम तीरावरील लोक यांच्यांतहि अशीच चाल होती. बुद्धपूर्वकालीन पंथांतील एक अवशिष्ट चाल कांबोजमध्यें अद्यापहि प्रचारांत आहे. ती अशी कीं, उन्हाळ्याचे दिवसांत वाहणाऱ्या रोगजनक वाऱ्यांपासून देशावर व तेथील रहिवाश्यांवर कांहीं संकट येऊं नये म्हणून शहरांच्या पश्चिम-दरवाज्यांसमोर ते लोक बैल व पांढरीं मेंढरें यांचा बळी देत असतात.

**राज्यव्यवस्था.**—कांबोजमधील राज्यव्यवस्थेसंबंधीं आपणांस जी सामान्य माहिती आहे तीवरून त्या बाबतींत आपणास खरोखर फारच थोडा बोध होतो. त्या देशांत प्रधान, सेनापती, ज्योतिषी व इतर सामान्य लोक असत; परंतु ज्ञानाच्या दृष्टीनें सगळे बहुतेक सारख्याच योग्यतेचे असत. शिवाय न्यायाधीश नेमलेले असत ते बहुधा राजघराण्यांतील पुरुष असत; व जेव्हां पुरुषांचा तोटा पडे तेव्हां स्त्रीन्यायाधीशहि नेमीत असत, असें ही हकीकत देणारे जे चिनी कामगार त्यांनीं लिहून ठेविलेलें आहे.

**मानमरातब.**—हे जे राज्यांतील कामगार सांगितले त्यांचे मानमरातब व पगार त्यांच्या दर्जाप्रमाणें ठरविलेले असत. सर्वांत श्रेष्ठ असत त्यांनां पालखीचा मान असे व सोनेरी पोषाख केलेले भोई पालखी उचलण्यास असत. पहिल्या दोन दर्जांच्या अधिकाऱ्यांनांच काय तो पालखीचा मान असे. यांजवर चार छत्रें धरीत असत. हीं छत्रें तांबड्या चिनी ताफत्याचीं केलेलीं असून त्यांच्या पट्ट्या जमिनीपर्यंत लोंबत असत; व त्यांचे दांडे सोनेरी असत. दुय्यम दर्जाच्या कामगारांनां तीन छत्रें, त्यांच्या खालच्यांनां दोन, आणि चवथ्या दर्जाच्या लोकांनां एक छत्र असे. पांचव्या दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या छत्रांनां सोनेरी दांडे नसत. खालच्या दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या छत्रांनां रुपेरी दांडे असत. याप्रमाणें छत्रांच्या प्रकारांवरून अधिकाऱ्यांचा दर्जा दर्शविण्याची पद्धत ही कांबोजी लोकांतच विशेष दिसते. हिंदुस्थानांतील या भागांतल्या राजघराण्यांतील पुरुषांवर छत्रें धरण्याचा हा मानाचा प्रकार आहे हें महशूर आहेच. सिंधू-पलीकडील वायव्य प्रदेशांत बौद्ध भिक्षूंनां छत्रांचा मान होता व त्यावरून त्यांनां तलपतिन् असें उपपद लावीत असत. याच-प्रमाणें कांबोजी लोकांत अधिकारीवर्गाच्या विशिष्ट मानपान व चिन्हांवरून त्यांचा अधिकार दर्शित होतो हें लक्षांत घेण्या-सारखें आहे.

कांबोजच्या उष्ण प्रदेशांत छत्रें वापरण्याचा हा अधिकार विशेष फायद्याचा गणला जात असला पाहिजे. चिनी लोकांत सुंदर व मनोहर भूषणांची फार आवड आहे, त्यामुळें त्यांच्यां-तील अधिकाऱ्यांचा दर्जा ठरविण्याकरतां निरनिराळे रंगीत खडे शिरोभूषणांतील कळसांत बसविण्याची पद्धत आहे. युद्धप्रिय तुर्क लोकांत घोडदळ हें लढाईतील मुख्य साधन असल्यामुळें घोड्यांचें त्यांनां अत्यंत महत्त्व वाटत असे; आणि या कारणा-मुळेंच त्यांच्यातील पाशांचा दर्जा निशाणावरील ३,२ किंवा १ अशा घोड्यांच्या शेपटांवरून निश्चित करीत असत.

कांबोज देशांत सर्वांत श्रेष्ठ मान राजाला असे. तो सार्व-जनिक रीत्या लोकांच्या दृष्टीस क्वचितच पडे. तो बाहेर पडे तेव्हां त्याच्या बरोबर लवाजमा पुष्कळच असे. त्याच्या पुढें प्रथम घोडेस्वारांची एक तुकडी निशाणें व नौबती घेऊन चाललेली असे. तिच्या मागून राजवाड्यांतील सुमारें तीनशें स्त्रिया रंगीबेरंगी पोषाख करून व हातांत दिवसाहि जळत्या मेणबत्त्या धरून चालत. याच स्त्रिया राजवाड्यांतहि तैनातीला असत व त्यांनां भाले व ढाली देत असत. नंतर राजपुत्र, प्रधान व वरिष्ठ अधिकारी हत्तीवर बसून जात. त्यांच्यावर तांबडीं छत्रें धरीत. त्यांच्यामागून राणीसरकार व बरोबर राजेसाहेबांच्या उपस्त्रियांचा व इतरांचा मोठा घोळका, कोणी पालख्यांतून, कोणी गाड्यांतून, कोणी हत्तीवरून असा चाललेला असे. त्यांच्यामागें राजेसाहेबांची स्वारी हत्तीवर बसून व एका हातांत मोठ्या किंमतीचा खंजीर घेऊन चाललेली असे. हत्तीच्या अंगावर मुलामा दिलेल्या झुली असत. राजाच्या भोंवतीं वीस छत्रें धरीत, त्यांचे दांडे चांगले सोन्यानें मढविलेले असत. राजाच्या पाठीमागून बरेच हत्तीस्वार व घोडेस्वार राजाच्या रक्षणार्थ म्हणून चालत. तसेच राजाच्या पुढें बुद्धाच्या सोनाच्या मूर्ती बसविलेले कित्येक लहान स्तूप घेऊन चालण्याचा नियम असे. याप्रमाणें चाललेली ही राजाची स्वारी पाहण्यास जे लोक येत

ते राजापुढें गुडघे टेंकून जमिनीला डोकें लावीत. याप्रमाणें जे लोक न करतील त्यांनां गुलामांकडून कैद करण्यांत येत असे.

**राजा व कामकाज.**—कांबोजचा राजा दिवसांतून दोन वेळां कामकाज पहात असे. ज्या लोकांनां खुद्द राजापुढें आपलें म्हणणें मांडावयाचें असेल त्यांनां एका दिवाणखान्यांत बसवीत असत. तेथें राजवाड्यांतून गाण्याचा व वाद्यांचा आवाज ऐकूं येऊं लागेपर्यंत त्यांनां वाट पहात बसावें लागे. तो आवाज सुरू झाला कीं राजा आला असें समजावें. स्वतः राजा पडदे लावलेल्या अशा एका खिडकीशीं येत असे; नंतर स्त्रिया ते पडदे दूर सारीत, व राजा हातांत सोन्याचा खंजीर घेऊन तेथें बसे. राज्यांतील वडे लोक व प्रधान हात जोडून जमिनीला डोकें लावीत. शंखाचा होत असलेला ध्वनि बंद पडला कीं, ते वडे लोक व प्रधान उठून उमे राहत व पुन्हां खालीं बसत. ते सिंहाच्या कातड्यावर बसत. (तीं कातडीं तेथें फार दुर्मिळ असत.) कामकाज आटोपलें कीं पुन्हां त्या दोन स्त्रिया पडदा समोर सारीत व राजा व इतर हजर असलेली मंडळी निघून जात.

दरबारच्या बैठकींनां राजा येत असे तेव्हां डोक्यावर रत्नजडित मुकुट घालीत असे. कानांत सोन्याच्या बाळ्या असत; व पोषाख सर्व शुभ्रवस्त्रांचा असे. त्याच्या पट्ट्याला लांबलांब गोंडे बसवलेले असत ते जमिनीपर्यंत लोंबत; आणि त्याचे जोडे निरनिराळ्या रंगाच्या गवताचे असत. त्याच्या प्रधानांनां तीन वेळां सिंहासनापुढें गुडघे टेंकावे लागत. नंतर सिंहासनाच्या पायऱ्या चढून वर येण्यास त्यांनां राजा हुकूम करी; वर आल्यावर पुन्हां ते गुडघे टेंकीत; व नंतर उमे राहून आपआपल्या जाग्यावर जाऊन बसत. याप्रमाणें पूर्वविधि आटोपल्यानंतर दरबारच्या कामास सुरवात होई. पुन्हां तें काम खलास झाल्यावर प्रधान पूर्ववत् गुडघे टेंकून नंतर राजाची परवानगी घेऊन निघून जात.

**फौज.**—कांबोजांत सुमारें ७०० वर्षां पूर्वीं चालू असलेली राज्यकारभाराची पद्धत व कायदेकानू यांबद्दल आपणांस ही मिळालेली माहिती फारशी महत्त्वाची नाहीं. तथापि तीवरून तत्कालीन परिस्थितीची साधारण कल्पना येईल. तेथील सैन्यांत मुख्य घोडेस्वार असून त्यांच्या जवळ मोठाले भाले व ढाली असत. घोडदळाशिवाय युद्धांत हत्तीहि असत व पायदळहि असे यांत शंका नाहीं. पण ही गोष्ट चिनी लेखकानें दिलेली नाहीं. सयामी लोकांबरोबर झालेल्या लढाईत सर्व लोकांनां शस्त्र धारण करून रणांगणावर जावें लागलें होतें. धनुष्यबाणांचा उपयोग करण्याचें त्यांनां माहीत नव्हतें. कांबोजी लोक युद्धविषयक बाबतींत फारसे निष्णात नव्हते.

**राज्याची विभागणी वगैरे.**—सर्व राज्याचे एकंदर एकवीस प्रांत पाडलेले होते व त्यांवर अधिकार चालविणारे राजाचे अधिकारी नेमलेले असत. प्रत्येक नगरांत दुय्यम दर्जाचा अधिकारी असे. प्रत्येक खेड्यांत एकेक पवित्र वस्तु असून तिची नेहमीं काळजी घेण्याचें काम कोणावर तरी सोंपविलेलें असे. खेड्यांतील प्रमुखांनां माहत सीई म्हणत. मोठमोठ्या रस्त्यांवर प्रवाशांकरितां विश्रांतिस्थळें बांधलेलीं असत, व अन्तराअन्तरावर डाकखाने असत. हीं डाकघरें सर्व लोकांच्या सोयीकरतां असत कीं फक्त सरकारी कामापुरतीं असत हें सांगतां येत नाहीं. कसेंहि असलें तरी कांबोजच्या राजांनीं हीं चीनच्या उदाहरणावरून घेतलेलीं होतीं असें दिसतें.

**न्याय.**—या देशांत अंमलांत असलेल्या गुन्हेगारीच्या कायद्यांपैकीं कांहीं फार कडक असल्यामुळें ते फार अनिष्ट वाटतात. ज्या कोणावर राजाची गैरमर्जी होईल त्यांनां कैदेंत टाकणें किंवा फांशीं देणें असल्या शिक्षाहि न करतां त्यांनां नगराच्या पश्चिम दरवाजासमोरच्या भिंतींत चिणून मारीत असत ! इतर कित्येक गुन्हेगारांनां हात, पाय किंवा नाक छाटून टाकण्याची शिक्षा होत असे. फटके मारण्याची शिक्षा त्या देशांत बरीच मागाहून सुरू करण्यांत आली. दुसरा चमत्कार असा कीं, जारिणी व तिचे दोस्त जार यांनां सरकारी रीत्या कांहींच शिक्षा होत नसे. असल्या जारांच्या वित्ताचें हरण करणें हा त्या जारिणींच्या नवऱ्यास एक मार्ग असे. पाजी लोकांनां व ठकबाजांनां अपवाद म्हणून फांशीची शिक्षा देत—म्हणजे शहराच्या दरवाज्यासमोर त्यांनां सुळावर चढवीत आणि एका बाजूला ओढून फेंकून देत. एकंदरींत फिर्यादी कामकाज फार क्वचित उपस्थित होत असे; आणि कुटुंबाकुटुंबांतील गोष्टींबद्दल जेव्हां फिर्यादी लागत तेव्हां त्यांचा निकाल पुढें दिलेल्या चमत्कारिक पद्धतीनें लागत असे. दोन्ही कुटुंबें लहान शिखरांचा राजवाडा या नांवाच्या राजवाड्यांत जात व तेथील एका लहान शिखरभागांतील लहानशा दिवाणखान्यांत तीं सर्व माणसें बसत; व त्यांच्यामध्येंच वकील बसत असत. त्या ठिकाणीं त्यांनां एक दोन तीन किंवा चार दिवससुद्धां तसेंच बसून रहावें लागे. अशा स्थितींत असतां जो कोणी खरा अपराधी असेल तोच आजारी पडून त्याला तेथून परत जाणें भाग पडेल अशी दृढ समजूत असे. उलट ज्या कोणाचा सत्पक्ष असेल त्यास मुळींच कसलेंहि दुखणें यावयाचें नाहीं. या न्यायनिर्णय—पद्धतीला परमेश्वरी न्याय असे म्हणत असत. यूरोपीय मध्ययुगांत यूरोपमध्येंहि असली परमेश्वरी न्यायपद्धति अमलांत असे. ह्या दिलेल्या वृत्तांताबद्दल शंका घेण्याचें बिलकुल कारण नाहीं. यांत असें दिसतें कीं, आजारी पडल्यामुळें नसलें तरी अपराध्याचें मन त्याला खाऊं लागल्यामुळें मात्र तो त्या ठिकाणाहून निघून जात असावा.

कांबोजांतील इतर गोष्टींबद्दल चिनी अधिकाऱ्यानें पुढील प्रमाणें माहिती दिलेली आहे.

**चालीरीती.**—या अधिकाऱ्याच्या मतें येथील रहिवाशांचा वर्ण फारच काळा असून त्यांच्या चालीरीतींवरून पाहतां ते अगदीं रानटी होते व चिनीलोकांच्या व त्यांच्या चालीरीतींत फार फरक होता. वास्तविक पाहतां विशिष्ट आयुष्यक्रमामुळें ज्यांनां सारखें उन्हांत राहूनच काम करावें लागे अशा लोकांचा मात्र अगदीं काळा वर्ण असे. उलट उच्च घराण्यांतील स्त्रिया चांगल्या सुंदर असत. त्यांचा पोषाखहि अत्यंत साधा असे. बहुतेक स्त्रीपुरुष कमरेभोंवतीं फक्त एक वस्त्र गुंडाळीत; पोट व पाय उघडे असत. राजांच्या राण्या सुद्धां पायांत कांहीं

घालीत नसत. या पोषाखाच्या बाबतींत कांबोजी लोक कोचिन-चीन आणि सयाममधील लोकांपेक्षां फारच मागसलेले दिसतात; कारण त्यांचा पोषाख अगदीं भरपूर असतो. स्त्रीपुरुष सर्वच अंगाला चांगलीं सुवासिक तेलें लावीत; तीं तेलें चंदन, कस्तुरी इत्यादि पदार्थांचीं केलेलीं असत. स्त्रिया व पुरुष दोघांच्याहि कानांत बाळ्या असत. सर्व कुटुंबांत बुद्धावर भक्ति फार असे; परंतु त्या बुद्धसंप्रदायांतीलच कित्येक लोक अत्यंत दुराचरणी असत व राजरोस वाईट व्यवहार करीत. बायकांची बाळंतपणांत चांगली शुश्रूषा होत असे.

बायकांमध्यें अनीतीचें आचरण फार असे, असें त्या चिनी अधिकाऱ्याचें मत होतें. कारण ज्या नवऱ्यांनां त्यांच्या बायका आवडत नसत त्यांनां ते बेधडक टाकून देत असत. विवाहित मनुष्य गांवाला गेला कीं लागलीच त्याची बायको दुसरा प्रेमसंबंध जोडण्याच्या मार्गास लागे. कांबोजमधील मुलींचीं हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच लहान वयांत लग्नें होत असत. श्रीमंतांच्या मुलींचीं ७ ते ९ वर्षांच्या दरम्यान लग्नें होत; आणि गरिबांच्या मुलींचीं जरा उशीरां म्हणजे ११ व्या वर्षांच्या सुमारास होत. नीतिभ्रष्टतेचें वरच्याखेरीज दुसरें एक मोठें निदर्शक म्हटलें म्हणजे असें कीं, बुद्धाच्या किंवा तावसी पंथाच्या भिक्षूंनां कुमारिकांचा प्रथमोपभोग घेण्याचा अधिकार मिळे, आणि त्या कृत्याकरितां नेमलेला दिवस अधिकाऱ्याकडून जाहीर करण्यांत येत असे. या कामावर नेमणूक झालेल्या भिक्षूंचा कुमारिकांच्या आईबापांकडून चांगला सत्कार होत असे आणि त्यांनां चांगल्या चांगल्या देणग्याहि मिळत असत. गरीब आईबापांनां तर असल्या देणग्या देण्याची ऐपत येण्यास कित्येक वर्षें काटकसर करून संचय करीपर्यंत वाट पहावी लागे. हें कृत्य त्या लोकांत मोठें पवित्र मानीत असत. ज्या देशांत स्त्रियांच्या विवाहपूर्व ब्रह्मचर्याला इतपतच महत्त्व असे, त्या देशांत अनीतीच्या आचरणाबद्दल गवगवा असलेल्या स्त्रियांनांहि वरण्यास पुरुष तयार असून असे विवाह होत असत, या गोष्टीबद्दल कोणाला मोठेंसें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

एकदां विवाहाचा दिवस नक्की झाला कीं वराकडून वधूकडे पोषाख पाठविण्यांत येई. नंतर वधूला वराच्या घरीं नेत; व तेथें वरवधूपक्षाकडील मंडळी ८ दिवस समारंभसुखोपभोगांत घालवीत. रात्रंदिवस दिवे जळत असत. याप्रमाणें समारंभ पुरा झाला म्हणजे नूतनविवाहित इसमाला त्याच्या बापाच्या संपत्तींतून हिस्सा मिळून तो आपला निराळा संसार थाटीत असे. एखाद्या इसमाचे आई-बाप वारले कीं सर्व संपत्ति त्याला मिळत असे. पण कोणीच वारस नसले तर अर्थात् सर्व मालमत्ता सरकारजमा होत असे.

कांबोजच्या चालीरीतींविषयीं वर दिलेल्या माहितीवरून पाहतां, त्यांची नीतिमत्ता अगदीं निकृष्टावस्थेस पोंचलेली दिसून येते. आपल्या प्रजेला वाईट वळण घालून दिल्याबद्दल तेथील राज्यकर्त्यांच्या माथीं बरेंचसें दूषण येतें. खुद्द राणी व चार वेश्या यांखेरीज राजाजवळ तीन हजारांपेक्षां जास्त स्त्रीपरि-चारिका असत व त्यांनां वेगवेगळीं दर्जे दिलेले असत. त्यांनां राजवाडा सोडून जाण्याला परवानगी नसे. कधीं कधीं राजा आपली राणी व इतर पत्न्या यांच्या समवेत राजवाड्याच्या खिडकीशीं उभा राही व त्याला पाहण्याकरितां आणलेल्या नागरिकांच्या बायका न्याहाळी. त्याच्याकडे आणलेल्या बायका सुंदर असत व त्यांतून तो कांहीं राजवाड्यांत कामावर नेमी; व बाकीच्यांनां काढून लावी. अशा बायकांची संख्या अनेक हजार असे, असें एके ठिकाणीं लिहिलेलें सांपडतें.

राहणी व कलाकौशल्य यांविषयीं म्हणाल तर, तीं हीन अवस्थेंत होतीं. उच्च कुलांतील व धनिक लोकांची गोष्ट सोडून देऊन साध्या लोकांची स्थिति घेतल्यास ते लोक हातानें भात जेवीत व जमिनींत खड्डा खणून त्याचा चुलीप्रमाणें उपयोग करीत असत. ते चटयांवर किंवा कातड्यांवर झोंप घेत. बुद्धाच्या पूजेकरितांच फक्त सोन्याचांदीच्या भांड्यांचा उपयोग करीत. चिनी लोकांशीं त्यांचा संपर्क आल्याकारणानें त्यांनां गृहोपयोगी लांकडी सामानसुमान व भांडीं यांची तरी माहिती झाली. त्यांचें कृषिकर्म फारच साधें असे; कारण ते जनावरें, नांगर व इतर कृषिकर्मसाधनांचा उपयोग करीत नसत. सोनखत अपवित्र मानीत असल्यामुळें, तें उपयोगांत आणीत नसत; व तेथले चिनी रहिवाशी त्याचा उपयोग करून घेत म्हणून त्यांचा तिरस्कार करीत. वरील साधनांची त्या लोकांनां जरुरी देखील नसे, कारण त्यांच्या देशाचा सुपीकपणा आणि उन्हाळा व पावसाळा यांच्या नियमित आवृत्ती त्यांचा शेतकामाचा बोजा बराचसा हलका करीत. चिनी लोकांशीं त्यांचा वारंवार संबंध येत असे तरी, तुतीची लागवड करण्याचा आणि रेशमाचे किडे बाळगून रेशीम काढण्याचाहि त्यांनीं कोठें प्रयत्न केलेला दिसत नाहीं. कांबोजी लोक चलाख, उत्साही, प्रामाणिक व धार्मिक असत, पण आतिथ्यसत्काराच्या कामांत त्यांचा हात आंखडता असे. पाहुणा घरीं आला असतां, त्यास विडा, सुपारी व मधुर सुवासिक द्रव्यें अर्पण करीत व येथेंच त्यांच्या आतिथ्यसत्काराची समाप्ति होई.

ते उजवा हात शुद्ध व डावा हात अशुद्ध मानीत; व म्हणून, ते पवित्र कृत्यें उजव्या हातानें करीत. सकाळीं उठल्यावर पहिल्यानें ते स्नान करीत व नंतर एका झाडाच्या फांदीनें दांत घांशीत व पुन्हां स्नान करीत. जेवणापूर्वीं ते स्तोत्रग्रंथांतून स्तोत्रें म्हणत व नंतर ठराविक पद्धतीनें पुन्हां दांत घांशीत. त्यांच्या खाण्यांत दूध, पिठी साखर, तांदूळ, मिलेट धान्य व निरनिराळ्या प्रकारच्या भाज्या येत.

या देशांतील रहिवाश्यांनां पुष्कळसे रोग, विशेषतः संग्रहणी व कोड, पछाडीत. या रोगांचीं जीं कारणें देण्यांत येतात, त्यांत प्रमुख म्हणजे सर्द हवा व निष्काळजीपणानें नित्य स्नान करण्याची फाजील पद्धत हीं होत. याखेरीज अनिष्ट गोष्ट म्हणजे, त्या ठिकाणीं चांगले हुषार वैद्य नसत व म्हणूनच रोग बरे करण्याकरितां मांत्रिक व नापिक यांची योजना होई.

**गुलाम.**—पूर्वेकडील इतर उपभारतीय देशांतल्याप्रमाणेंच, कांबोजमध्येंहि जातिभेद फारसा नाहीं; कारण या देशांतून आपले कायदे लोकांवर चालविण्याइतके ब्राह्मण सत्ताधीश

झाले नाहींत. परंतु येथें दऱ्याखोऱ्यांतून राहणाऱ्या रानटी जातींतले गुलाम आढळून येतात. चिनी अधिकाऱ्यांनां अगदीं गरीब लोकांच्याच घरांतून कायतें हे गुलाम आढळून आले नाहींत. हे गुलाम इतके भित्रे होते कीं, जर ते शहरांत गेले तर घरांत शिरण्यास किंवा घरांतून बाहेर पडण्यास धजावत नसत. यांचा इतका बेसुमार तिरस्कार होई कीं, "थंग" म्हणजे कुत्रा, या अपमानास्पद नांवानें त्यांनां संबोधिलें जाई. या जातींतील धडधाकट तरुणांनां मात्र कांहीं किंमत असे पण त्यांनां त्यांच्या धन्यांकडून फार कडक व वाईट रीतीनें वागविलें जाई. धन्यापुढें त्यांनां गुडघे टेंकावे लागत. कांहीं गुन्ह्याबद्दल जेव्हां त्यांनां फटके मारण्यांत येत, तेव्हां त्यांचा ते कधीं प्रतिकार करीत नसत.

हे गुलाम आपआपसांतच लग्नें करीत. त्यांचे धनी गुलाम स्त्रीशीं संबंध ठेवण्याचें टाळीत; तसें करणारास इतर नागरिक आपल्या पंक्तीला घेत नसत. हे गुलाम पळून जात; पण पुन्हां सांपडल्यास त्यांच्या तोंडाला निळा डाग लावीत, किंवा त्यांच्या गळ्यांत किंवा दंडाला एक वळें बांधीत. कांहींच्या दंडांनां दोन दोन वळीं बांधलेलीं असत. हे बहुधा दोन वेळां पळून गेलेले असावेत.

**लिपी व भाषा.**—कांबोजी लोकांसारख्या अल्प संस्कृतीच्या लोकांनां शास्त्रांचा व्यासंग असणें जवळ जवळ अशक्य आहे. त्यांचें ग्रंथलेखन व सार्वजनिक लिखाण ताडपत्रांवर होत नसून हरिण आणि काळवीट यांच्या कातड्यांवर होत असे. या कातड्यांनां काळा रंग देऊन, त्यांचे लहान मोठे लागतील तसे तुकडे कापीत. लिहिण्याकरितां चिनी लोकांप्रमाणें शाई वापरीत, ती अर्थातच काळी नसली पाहिजे हें उघड आहे; व लिहिण्यास ज्या लहान काटक्या वापरीत त्या काम झाल्यावर चिनी लोकांप्रमाणें कानावर खोंचून ठेवीत. त्यांची वर्णमाला फार स्पष्ट व सुबोध असे. कांबोजी लिपी व सिरियन जातीची "होएइ–हु" किंवा "उइगुरेस" ही लिपी, या दोन्ही जवळ जवळ आहेत असें चिनी बखरकार म्हणतो व हें विधान चुकीचें आहे असें लासेन म्हणतो. स्वर लिहीत नसत हें बखरकाराचें विधान, सर्व भारतीय वर्णमालांतून व्यंजनांच्या खालींवर स्वर लिहिण्याची चाल आहे हें सांगितल्यानें स्पष्ट होतें. कांबोजी लोक वरून खालीं लिहीत नसत, तर डावीकडून उजवीकडे लिहीत जात असेंहि त्या चिनी गृहस्थानें लिहिलें आहे. चिनी मनुष्याखेरीज दुसऱ्या कोणास यांत विशेषपणा वाटणार?

चिनी अधिकाऱ्यांच्या संशोधनावरून पाहतां, ही भाषा विचित्र असून, कोचिन–चिनी व सयामी भाषांपेक्षां निराळी आहे. यांत अपभ्रष्ट पाली शब्द आहेत व हीस ख्मेर असें नांव आहे. या भाषेंत बरींच व्यंजनें व र् हें व्यंजन असणारे शब्द आहेत. शिवाय हेंहि दिसतें कीं, प्राचीन काळीं कांबोजी लोकांत नाणीं नव्हतीं, व १३ व्या शतकांत ते सयामी आणि कोचिन–चिनी नाणीं वापरीत; हीं नाणीं म्हणजे चांदीच्या टिकल्या व कांड्या होत.

**ज्योतिष.**—कांबोजी लोकांनां अवगत असलेलें एक शास्त्र म्हणजे ज्योतिषशास्त्र; पण त्यांतहि त्यांची फार प्रगति नसे. त्यांनां फक्त चंद्रसूर्यग्रहणांचें भविष्य करितां येई. त्यांनीं वर्षाचे १२ महिने, ७ दिवसांचा एक आठवडा, ४ आठवड्यांचा एक महिना व रात्रीचे चार प्रहर असे कालाचे भाग केले होते. वर्षाचे भाग पाडण्याची रीत कांबोजी लोकांनीं भारतीय लोकांपासून घेतली असली पाहिजे. कारण चिनी लोकांत जरी ही रीत आहे, तरी पण दिवसाचे आठ भाग (प्रहर) व महिन्याचे चार आठवडे मोजण्याची रीत मूळ भारतीयांचीच आहे. वरील कालविभागांखेरीज, कांबोजी लोकांत बारा वर्षांचीं चक्रें आहेत. त्यांतील निरनिराळ्या वर्षांचीं नांवें चिनी नांवांपेक्षां भिन्न आहेत, कारण या दोन भाषांत बराच फरक आहे.

कांबोजांत जसें १२ वर्षांचें वर्षचक्र आहे, तसें वर्षचक्र भारतांत फार पुरातन काळीं प्रचलित असल्याचें आढळून येतें. यावरून कांबोजांतील द्वादशवर्षचक्र भारतांतूनच आलें असें मानण्यास जागा आहे. कांबोजी वर्षांत दोन दिवस विशेष शुभ, चार विशेष अशुभ व तीन शुभाशुभरहित (?) असे मानीत. कांबोजी लोकांत कांहीं वर्ग खेरीज करून फलज्योतिषावर सर्वांचा विश्वास होता. अमुक दिवशीं पूर्वेकडे गमन करूं नये, अमुक दिवशीं पश्चिमेकडे जाऊं नये अशा समजुती कांबोजी लोकांत असत. कांबोजी स्त्रिया या शुभाशुभदिवसाचें गणित करण्यांत कुशल असत. कांबोजी वर्ष चिनी वर्षाप्रमाणें दहाव्या महिन्यांत सुरू होत नसे तर दुसऱ्या महिन्यांत त्याचा प्रारंभ होई. चिनी लोकांचें वर्ष कुंभराशीचे अर्ध्यावर सूर्य आल्यावर सुरू होई, तर इकडे कांबोजी लोकांचें वर्ष भारतीयांप्रमाणें मार्च महिन्याचे मध्याचे सुमारास सुरू होत असे.

**उत्सव.**—प्रत्येक वर्षाचे पाडव्याचे दिवशीं कांबोजचा राजा मोठा उत्सव करीत असे. राजाचे राजवाड्यासमोर एक उच्चासन तयार करीत व या उच्चासनाभोंवतीं गोल रंगीबेरंगी दिवे लावीत. या आसनासमोर एक स्तूप उभा करीत. या स्तूपाजवळ एक २०० फूट उंचीची काठी उभी करीत. या काठीवर २, ४, अथवा ६ दिवे टांगीत. हा उत्सव एक पंधरवडाभर चाले. या उत्सवासाठीं राजाकडून राज्यांतील सर्व बड्या लोकांनां निमंत्रण जाई. या पाहुण्यांनां पुष्कळ सुपाऱ्या वांटीत असत. सायंकाळीं लोकांनां राजदर्शन व्हावें यासाठीं राजा बाहेर निघत असे व या वेळीं नानातऱ्हेचें दारुकाम उडवीत.

कांबोजमध्यें दुसरे जे कित्येक उत्सव करीत त्यांपैकीं एकाचें वर्णन येथें दिल्यास पुरें होईल. हा उत्सव म्हणजे बुद्धाचा जलसंस्कारोत्सव होय. हा पांचव्या महिन्यांत करीत असत. राज्यांत सर्वत्र बुद्ध देवाच्या मूर्तींनां या उत्सवाच्या प्रसंगीं स्नान घालीत. भिक्षुलोकहि या प्रसंगीं स्नान करीत. लांबलांबचे लोक जलमार्गानें व स्थलमार्गानें या उत्सवासाठीं येत. राजधानीचे ठिकाणीं हा उत्सव पाहण्यासाठीं राजाकरितां मुद्दाम उच्चासनयुक्त मंदिर तयार करीत.

**व्यापार.**—कांबोजच्या इतिहासाकडे वळण्यापूर्वीं तेथील व्यापाराच्या स्थितीसंबंधानें दोन शब्द सांगणें इष्ट आहे. पोर्तुगीज आले नव्हते त्या काळीं पूर्वेकडील उपभारतीय देशांत व त्यांनां लागून असलेल्या भागांत चिनी लोकच बहुधा व्यापारांत

अग्रेसर असत. हे लोक कांबोजमधून पुष्कळ माल नेत. कोचिन-चिनी लोक तसेच सयामी लोक हेहि कांबोजशीं व्यापार करीत होते. याशिवाय दुसरीं पूर्वेकडील उपभारतीय राष्ट्रेंहि या देशाशीं व्यापार करीत असावीं असें मानण्यास जागा आहे. अशा प्रकारचा स्पष्ट उल्लेख मात्र कोठें सांपडत नाहीं. या व्यापारांत कांबोजचे लोकहि भाग घेत असावे असें दिसतें, कारण या लोकांनां मोठमोठालीं जहाजें बांधतां येत होतीं ही गोष्ट सिद्ध झालेली आहे.

**इतिहास.**—कांबोजचा अगदीं प्राचीन इतिहास आपणांस उपलब्ध नाहीं. या इतिहासाचा भाग म्हणून कांहीं कल्पना-कथा परंपरेनें चालत आलेल्या आहेत. सयामी लोकांत जी कविता प्रसिद्ध आहे तींत कांबोजांत जन्मलेल्या प्रियकेक नांवाच्या राजाचें वर्णन पुष्कळच आलेलें आहे. यावरून या राजानें उत्तर सयाम व लाओ प्रांत यांत पुष्कळ शौर्याचीं कामें केलीं असलीं पाहिजेत, व या शूर कृत्यांचा काल इ. स. चें पहिलें शतक हा असला पाहिजे असें दिसतें. उलटपक्षीं जर सयामचा नागर शक (Citizen Era) या राजानें सुरू केला ही कथा खरी असेल तर, हा राजा इ. स. ६३८ चे सुमारास होऊन गेला असला पाहिजे असें त्यावरून सिद्ध होईल. परंतु या राजाविषयींच्या कथा फारशा विश्वासार्ह नसल्यानें त्यांच्या-वरून एवढेंच अनुमान काढणें युक्त होईल कीं, सयाममध्यें फार प्राचीन काळीं कांबोजचें वजन असे; व या वजनानें सयामच्या स्थितींत बरावाईट फेरबदल होऊं शके. हें अनुमान खरें असलें पाहिजे. यास पुरावा म्हणून ही गोष्ट सांगतां येईल कीं, शाक्यसिंहाचा संप्रदाय उपभारतीय पूर्वप्रदेशाच्या या (कांबोज) भागांत प्रथम प्रसृत झाला व नंतर तो इतर भागांत पसरला. तशीच दुसरी गोष्ट ही कीं, कांबोज देश हा इतर उपभारतीय पूर्व-देशांच्या अगोदर श्रेष्ठ संस्कृतीचा उपभोग घेत होता. ही स्थिति पुढें राहिली नाहीं. पुढें कांबोज देश हा फुनम अथवा सयाम या देशाचा तावेदार झाला.

**चिनी बखरी.**—चिनी इतिहासकारांनीं कांबोज देशाचीं वर्णनें आपल्या ग्रंथांतून दिलीं आहेत. पण हीं वर्णनें वाचतांना एक गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे ती ही कीं, चिनी सरकारी भाषेंत परदेशचे वकील हे सर्व तावेदार देशांचे दूत म्हणून संबोधिले जात. चिनी इतिहासांतील कांबोजविषयक वर्णनांत कांबोजच्या खऱ्या इतिहासाची माहिती जेणेंकरून होईल असा भाग फार थोडा आढळतो. राष्ट्रवकीलांनीं तयार केलेले अहवाल म्हणून जे भाग चिनी इतिहासांत आहेत त्यांत सांगितलेल्या अनेक गोष्टींस संशो-धक विश्वासार्ह समजत नाहींत म्हणून ते येथें दिलेले नाहींत.

**लगतचीं राष्ट्रें.**—कांबोजच्या राजाकडून चिनी दर-बारांत पहिला वकील आला तो इ. स. ६१६–१७ या सालीं आला. या समयास कांबोजचा राजा, ध्संपम् व चुकिंग येथील राजांशीं परममित्राच्या नात्यानें वागत होता. या राजांशीं कांबोजच्या राजाचे मित्रत्वाचे तह झालेले होते. ध्संपम् हें राज्य कांबोजच्या वायव्येस आहे. चुकिंगराज्य म्हणजे सांप्रत ज्याला चंपा म्हणतात तो टापू असावा. चंपा टापू हा सध्यांच्या कोचिन-चीन राज्याचा अगदीं दक्षिणेकडचा प्रांत होय. वर ज्या काळाचा उल्लेख आला आहे त्या काळीं चिशोन सिअन आय नांवाचा राजा कांबोज येथें राज्य करीत होता. त्याचा पिता पित्रसेन हा फार पराक्रमी असून त्यानें सयामवर अधिराज्य स्थापित केलें होतें. लिन्ये व तोयोनं येथील राजांशीं पित्रसेन राजाच्या नेहमीं लढाया होत असत. हीं दोन राज्यें कांबोजच्या ईशान्यभागीं होतीं. चिशोन राजाचे शत्रू अतिशय रणप्रिय असून त्यांचीं शस्त्रें नेहमीं सज्ज असत. कांबोज राज्यांत अशी चाल होती कीं, राजाच्या निधनानंतर त्याची जी समकुलीन स्त्री असेल तिनें राजपुत्रांपैकीं कोणी गादीवर बसावयाचें तें ठरवावें. या राजपुत्राची निवड झाली म्हणजे इतर राजपुत्रांचें एकेक बोट कापून टाकीत. त्यांनीं रहावयाचें कोठें, त्यांनीं करा-वयाचें काय तें सर्व निश्चितपणें ठरवीत व सरकारी कारभारांत त्यांचें वजन बिलकुल न पडेल अशी तजवीज करीत.

**विभागणी व एकीकरण.**—इ. स. ६२७ या वर्षी सयामी लोकांनीं कांबोजचा राजा शालियिकीर्ण याच्या अंमलाखालून निसटण्याचा प्रयत्न केला पण तो सर्व व्यर्थ गेला. इ. स. ७०७ या वर्षी या राज्याचे दोन विभाग झाले. एका विभागांत समुद्रकिनाऱ्यालगतचा मुलुख व दुस-ऱ्यांत आंतर प्रदेश अंतर्भूत झाला व दोन वेगळ्या राजांच्या ताब्यांत हे दोन मुलुख दिले गेले. हे विभाग इ. स. ७७९ पावेतों असेच कायम राहिले. या शेवटल्या वर्षी समुद्रसन्निध प्रदेशाचा अधिपति (पोमी) आपण होऊन आंतर प्रदेशाच्या (टित्सुंग) राजाच्या दरबारीं स्त्रीसमवेत गेला आणि टित्सुंगला खंडणी देता झाला. टित्सुंगनें त्या खंडणीचा स्वीकार केला. पोमीनें केलेल्या कामाबद्दल बक्षीस म्हणून टित्सुंगनें त्याला राजकुलरक्षक नेमिलें आणि पिन–हम् (प्रासादजन्य) अशी पदवीहि त्याला अर्पण केली.

**चीनशीं संबंध.**—चीनच्या बादशाहांकडे कांबोजच्या राजांचे वकील जात. हे वकील पाठविणें या राजांनां अवश्य व सोईचें वाटे. याचें कारण टांकिन व कोचिनचीन हीं दोन राज्यें कांबोज-च्या राज्याला लागून होतीं आणि चीनचा सम्राट कांबोजच्या राजांनां या शेजाऱ्यांविरुद्ध मदत देण्यासारखा होता. सुंग नांवाच्या चिनी राजघराण्याच्या हातीं देशांतील वरिष्ठ सत्ता असतां इ. स. १११६ या सालीं होई–थूंग नांवाच्या कांबोजच्या राजानें चीनच्या दरबारांत आपला वकील कांहीं नजराणा बरोबर देऊन पाठविला होता. या वकिलानंतर लवक-रच दुसरा वकील कांबोजच्या राजाकडून चिनी सम्राटाकडे गेला, व त्यानें या सम्राटाकडून पुष्कळ मानमरातब मिळवून कांबोजच्या राजाला मित्रत्वाचें भरपूर आश्वासनहि तो बरोबर घेऊन आला. इ. स. ११२८ या वर्षी घडलेली हकीकत वरील हकिकतीपेक्षां अधिक महत्त्वाची आहे. या वर्षी कोचिन-चीनचें राज्य हस्तगत केल्यानंतर चीनच्या राजानें कांबोज येथेंहि आपला एक सुभेदार नेमला व त्याला चिजि ही पदवी दिली, अशी ही हकीकत आहे. या हकिकतींत सत्यांश तितपतच आहे असा संशय कांहीं लोक प्रदर्शित करतात. पण टाँकिन व कोचिनचीन या राज्यांचा या काळांतील इतिहास फारच त्रुटित असा आपणांला उपलब्ध आहे एवढ्यावरून वरील हकीकतीसंबंधानें

संशय घेण्याचें कारण नाहीं. कांबोजमध्यें ही स्थिति, म्हणजे चीनच्या ताबेदारीची स्थिति, इ. स. १२२० पावेतों बदलली नव्हती असें दिसतें. कारण, या वर्षी एक तद्देशीय राजा कांबोजच्या तक्तावर बसला व त्यानें चिनी बादशहाकडे आपला वकील एक पत्र व कांहीं नजराणा बरोबर देऊन पाठविला असा उल्लेख आढळतो. या नजराण्यांत दोन हत्ती होते व कांबोज देशांत उत्पन्न होणाऱ्या विशेष चमत्कृतिजनक अशा जिनसाहि होत्या. मिंग हें चिनी घराणें राज्याधिकार चालवीत असतां १३७१ सालीं कांबोजच्या राजानें कोचिनचीनचें राज्य आपल्या हाताखालीं घातलें. झु–एडल–ना (हा कोचिनचीन राज्याचा एक सरहद्दीचा प्रांत असावा) येथील सत्ताधिपानें कांबोजच्या राजाकडे खंडणी पाठवून त्याचें अधिराज्य कबूल केलें. तथापि कांबोजाधिपाची सत्ता फार थोडे दिवस टिकली. इ. स. १३८५ या वर्षी फ्रा कामा पुएन नांवाच्या थइ देशच्या राजानें कांबोजची राजधानी लाओक हिजवर स्वारी करून तिचा विध्वंस केला. इ. स. १४०३ ते १४१७ पावेतों कोचिनचिनी लोकांच्या स्वाऱ्यांमुळें मध्यराज्य व दक्षिणप्रांत यांच्यामधील दळणवळण बंद झाल्यासारखेंच होतें. चिनी लेखकांनीं लिहिलेलीं जीं इतिवृत्तें सांपडतात त्यांतील शेवटलीं इ. स. १४३२ आणि इ. स. १४५३ या वर्षांतील आहेत. इ. स. १४३२ च्या वृत्तलेखावरून अशी माहिती मिळते कीं, या देशाचा (कांबोजचा) राजा दरवर्षी एक मोठें संमेलन भरवीत असे व या संमेलनांत वानर, मोर, गेंडा, शुभ्र हत्ती व इतर अनेक वन्य पशूंचें प्रदर्शन केलें जात असे. बौद्ध लोक शुभ्र हत्तींस विशेष मानित हें प्रसिद्ध आहे. या १४३२ च्या इतिवृत्तांतील संक्षिप्त माहितींत थोडी भर घालावयाची तर ही एक गोष्ट सांगणें उचित आहे कीं, कांबोजचा राजा दुसऱ्या बुद्धधर्मीय राजांच्या वहिवाटीप्रमाणें दरवर्षी एक मोठा मेळा भरवून भिक्षुकांनां व सामान्य लोकांनांहि उदारपणें देणग्या देत असे. इ. स. १४५२ त चीनच्या बादशहानें कांबोज येथें आपला एक वकील पाठविला होता असें दुसऱ्या वृत्तलेखावरून समजतें. त्यानें राजासाठीं नक्षीदार रेशमी कपडे, सहा भरजरी कपडे व जाळीदार रेशमाचे चार कपडे व राणीसाठीं चार भरजरी व सहा रेशमी जाळीदार कपडे नेले होते. राजानें त्या चिनी वकिलाला व त्याच्या बरोबरच्या दुभाष्याला मोठमोठ्या देणग्या दिल्या. कांबोजच्या राजांचें आपल्याविषयीं चांगलें मत करून घेण्यासाठीं चिनी बादशहा झटत होते हें समजून घेण्याइतकेंच या वृत्तलेखाचें महत्त्व आहे. टॉंकिनी, कोचिनचिनी वगैरे उत्तरेकडील लोकांबरोबर चाललेल्या युद्धांत कांबोजच्या राजांची मदत मिळविण्याचा चिनी बादशहांचा उद्देश असे यांत संशय नाहीं.

कांबोजसंबंधाची १४५३ नंतरची पूर्ण माहिती थइ व सयामी इतिहासकारांच्या मार्फतीनेंच आपल्याला मिळते. सयामच्या राजांनीं इ. स. १५३२, १५३७ व १५३८ सालीं कांबोजच्या राजांशीं युद्ध केलें; या सर्व युद्धांत कांबोजच्या राजांचा पराभव झाला.

यापुढें लवकरच पोर्तुगीजांचा इतिहास सुरू होतो.

**अनामचा इतिहास.**—आतां फक्त पूर्वेकडील उपभारताच्या पश्चिमभागांतील टॉंकिन व कोचिनचीन या राज्यांचा इतिहास सांगण्याचें राहिलें आहे. या दोन राज्यांतील लोक, भाषा, लिपी, राज्यव्यवस्था व चालीरीती, या दृष्टीनीं एकसारखे आहेत. हीं एकाच वंशांतलीं दोन निरनिराळीं राष्ट्रें असावींत अशी भावना होते; पण त्यांचा प्राचीन इतिहास पाहतां, त्या दोघांत सारखा द्वेषभाव होता असें दिसून येतें. दोघांनां सामान्य असें नांव म्हणजे अनाम हें होय. या दोन देशांच्या इतिहाससाधनांविषयीं पाहतां, चिनी इतिहासकारांपासून आपणांस चांगली खरी माहिती मिळूं शकते. या बाबतींत टॉंकिनी लोकांचे सांवत्सरिक-ग्रंथ (year-books) अत्यंत अविश्वसनीय होत. या ग्रंथांत एक काल चार हजार सातशें वर्षांचा व दुसरा दोन हजार वर्षांचा आहे. यांपैकीं पहिल्या भागांत पुराणकथा आहेत, व दुसऱ्यांतील बराचसा भाग संशयास्पद आहे. या सांवत्सरिक ग्रंथांशिवाय इ. स. ९४० ते १८२० पर्यंत झालेल्या राजांची यादी, प्रत्येकाच्या कारकीर्दीसह लिहिलेली सांपडते. प्रत्येकाची कारकीर्द सरासरी १३,१४ वर्षे निघते व वरील कालांत सात राजघराणीं होऊन गेलीं, यावरून या देशांत किती अव्यवस्था व अराजकता असेल याची सहज कल्पना येण्यासारखी आहे. या दोन राज्यांचा इतिहास सादर करितांना त्यांतील निवडक भाग घेऊन महत्त्वाच्या प्रश्नांवर जोर देणें बरें.

**कोचिनचीन.**—इ. स. २३६ पर्यंतच्या, या दोन राज्यांच्या हकिकतींतील मुख्य गोष्ट म्हणजे, कुलिएन नांवाचा कोचिनचिनी मनुष्य चिनी सत्ता झुगारून देऊन, देश्य राजसत्ता स्थापन करण्याच्या कामांत यशस्वी झाला, पण या कामीं त्याला चिनी बादशहास खंडणी देणें भाग पडलें ही आहे. कुलिएननें कौची येथील जुनी राजधानी बदलून ती लिंग येथें म्हणजे हल्लीं सिनोए किंवा सिनोआ आहे त्या ठिकाणीं आणली; आपल्या राज्यालाहि त्यानें हेंच नांव दिलें. नंतर कोचिन-चीनचा राजा व चिनी बादशहाचा सुभेदार यांच्यामध्यें ज्यावेळीं लढाई सुरू झाली तेव्हां कुलिएननंतर गादीवर आलेल्या राजानें, मध्यदेशाच्या राजाचें प्रभुत्व मान्य केलें. या अशांततेचा फायदा घेऊन, दुसऱ्या सुई घराण्यांतील हुशार पण लुटारू बादशहा युंगटी यानें कोचिन-चीनच्या राज्यामध्यें लुटालूट करण्याकरितां मोहीम काढली. सेनानायकत्व लिओफंग या सेनापतीस देण्यांत आलें. लिओफंगच्या हत्तींनीं शत्रूंची बरीच नासधूस केली. लढाई पूर्णपणें जिंकण्यांत येऊन, लिंग राजधानी काबीज करण्यांत आली. त्या वेळीं सिंहासनगृहांत टांगलेले कोचिन-चीनच्या राजांच्या वंशावळीचे १८ तक्ते जेत्यांनीं आपल्या देशांत नेले. त्या वेळचा राजा फंकी म्हणून होता व तो आपल्या घराण्यांतील १८ वा पुरुष होता. राजधानी उध्वस्त झाल्यावर, कोचिन-चीनच्या राजानें सुमारें इ. स. ८०८ मध्यें आपली राजधानी चिन् या समुद्र-किनाऱ्यावरच्या शहरांत नेली. चिन् हें १७ उत्तर अक्षांशावर असून,हुएच्या जरा उत्तरेस चिनचिंग बंदराजवळ आहे; याला कुएचिन असेंहि नांव आहे. पण हें नांव त्या देशाचेंहि आहे, तेव्हां तें कसें पडलें, याविषयींची हकीकत अशी दिसते कीं, पोर्तुगीज लोकांनीं, मलबार किनाऱ्यावरील कोचीन हें एका शहराचें

त्यांच्या ओळखीचें नांव, व हें कुएचिन नांव यांत व्यंजनांच्या दृष्टीनें बरेंच साम्य आढळून आलें; व या दोहोंतील फरक दाखविण्याकरितां त्याला त्यांनीं चीन हें नांव जोडून दिलें; कारण हा प्रदेश चीनपासून फारसा दूर नाहीं व शिवाय येथील लोकांचें व चिनी लोकांचें पुष्कळ बाबतींत साम्य आहे.

यापुढें, इ. स. ११६६ पर्यंत, यादेशाच्या सांवत्सरिक ग्रंथांतून कांहीं इतिहास आढळून येत नाहीं. एवढें मात्र निःसंशय आहे कीं, त्या कालांत चीनचें प्रमुत्व विशेष असे. इ. स. १०७० नंतर संगघराण्यांतील चिंगसौ बादशहाच्या कारकीर्दीत वरिष्ठ चिनी अधिकाऱ्यांनीं बंड केलें होतें पण तें पार मोडण्यांत आलें.

**टाँकिन.**—कोचिनचीनप्रमाणें पुष्कळ दिवसपर्यंत टांकिन हेंहि चिनी बादशहांच्या ताब्यांत होतें. तें पुढें युनानमधील पिलोटो राजांच्या ताब्यांत आलें व इ. स. ९०७ मध्यें जेव्हां तंग राजघराणें लयास गेलें तेव्हां कोठें या देशाला स्वातंत्र्य मिळालें.

चिनी लोकांबरोबर बऱ्याच लढाया केल्यानंतर चिनी लोकांनीं ११६४ मध्यें लिकिएन्झोला त्या देशाचा स्वतंत्र राजा म्हणून मान्य केलें. स्युव्हेनाच्या मुळें कोचिनचीनलाहि ११६६ पासून स्वातंत्र्य मिळालें. कुब्लइखानाच्या कारकीर्दीत मंगोलियन लोकांनीं केलेल्या स्वाऱ्यांमुळें या दोन्ही देशांनां फार त्रास सोसावा लागला. १२७२ मध्यें त्याच्या एका हुटानगोटा नांवाच्या सरदारानें युनान जिंकून घेऊन टांकिनमध्यें एकदम प्रवेश केला व सांगकानदीपर्यंत चाल करून किओची नांवाची अत्यंत जुनी राजधानी उध्वस्त करून टाकली. तथापि तेथील भयंकर उष्णतेमुळें तो परत आपल्या मालकाकडे गेला. १२७७ मध्यें टांकिनचा त्या वेळचा राजा चिंगहिवेन याला ही नवी जुलमी सत्ता मान्य करावी लागली; परंतु पुढें जेव्हां मंगोलियन बादशाहानें जबर खंडणीची मागणी केली तेव्हांमात्र या टांकिनी राजानें धीर करून त्याचा प्रतिकार करण्याचें ठरविलें; तेव्हां त्याच्यावर पुन्हा हल्ला झाला त्यांत तो मरण पावला. पुढें त्याचा मुलगा व गादीचा वारस चिसिवेन याला १२८०, १२८५, १२८७ या सालीं कुब्लइखान यानें केलेल्या हल्ल्यांनां तोंड द्यावें लागलें; आणि त्यांत टांकिनी लोकांनीं दाखविलेल्या धैर्यामुळें आणि त्या देशांतल्या अत्यंत उष्ण हवेमुळें शत्रूचाच पूर्ण मोड झाला. त्यावेळीं कांबोजपर्यंत मंगोली लोक आंत घुसले होते, तथापि त्यांनांच माघार घ्यावी लागली. मंगोलियन बादशाहाच्या सेनापतींनीं असल्या दूरदूरच्या व त्रासदायक स्वाऱ्या करण्याचें सोडून देण्याबद्दल त्याचें मन वळविलें, आणि टांकिनच्या राजानेंहि समेटाचें बोलणें सुरू केलें. त्यानें कैद केलेल्या मंगोली शिपायांस फार दयाळुपणानें वागविलें व त्यांनां मोकळे करून घरोघर जाण्यास परवानगी दिली. शिवाय खंडणीदाखल एक सोन्याचा पुतळा मंगोलियन बादशाहाला नजर करण्याचें त्यानें कबूल केलें. चिसिवेन १२९० मध्यें व कुब्लइखान १२९४ मध्यें मरण पावला; तेव्हांपासून या दोन राज्यांमध्यें शांतता प्रस्थापित झाली. टांकिनच्या राजांनां राजे म्हणून बादशाहांनीं मान्य केलें, व तेहि नियमितपणें बादशाहाच्या दरबारीं खंडणी पोहोंचती करीत असत. चिनी

लोकांनीं दिलेल्या माहितीवरून असें दिसतें कीं, त्यावेळीं त्या राज्याचे एकंदर तेरा प्रांत होते; ३२ शहरें पहिल्या प्रतीचीं व २४० दुसऱ्या व तिसऱ्या प्रतीचीं मिळून होतीं. कोचिनचीनमध्येंहि कुब्लइखानाच्या मरणानंतर सर्व भीति व संकटें नाहींशीं होऊन शांतता नांदूं लागली.

१३६८ मध्यें मिंग घराणें सत्ताधीश झाल्यानंतरहि शूर व उद्योगी हंगौ याच्यामुळें चिनी बादशाहांशीं या दोन संस्थानांच्या असलेल्या नात्यांत कांहीं फरक झाला नाहीं. बादशाहानें टांकिनच्या राजाला स्वतंत्र राजा म्हणून कबूल केलें; व त्या राजानें कोचिनचीन, सयाम व कोरिया येथील राजांप्रमाणेंच चिनी वर्षमानपद्धति ( Calendar ) आपल्या राज्यांत सुरू केली. बादशाहानें शिवाय चिंगाचिंग उर्फ कोचिनचीनच्या इटाटाहा नांवाच्या राजाला आपण तख्तनशीन झाल्याची आनंदाची बातमी कळविली, आणि बुद्ध, टेंकड्या व नद्या यांच्या आत्म्याप्रीत्यर्थ होणाऱ्या एका यज्ञसमारंभास येण्याबद्दल त्या राजाला निमंत्रण पाठविलें; आणि हा समारंभ पार पाडल्यानंतरच चिनी बादशाहानें कोचिनचीनच्या राजानें दिलेल्या सार्वभौमत्वाच्या मान्यतेचा व आभारप्रदर्शनाचा स्वीकार केला. इटाटाहा या कोचिन-चीनच्या राजाच्या हातून पूर्वी बऱ्याच चांगल्या गोष्टी झाल्या होत्या; त्यानें कांबोजच्या राजाच्या ताब्यांतून आपला देश सोडवून स्वतंत्र केला होता; तसेंच आपल्या राज्यांतील किनाऱ्याला उपद्रव देणाऱ्या एका समुद्रावरील लुटारूंच्या ताफ्याचा त्यानें १३७३ मध्यें नाश केला होता; आणि त्यांच्या वीस कुग ( चिनी बोटी ) पकडून त्यांच्या जवळून ७०००० पौंड किंमतीची लूट मिळवून ती त्यानें चीनच्या बादशाहाकडे पाठवून दिली होती. परंतु त्याचा स्वभाव दुष्ट असल्यामुळें सर्व त्याचा द्वेष करीत; आणि त्यांत टांकिन व कांबोज यांच्यामध्यें शत्रुभाव वाढल्यामुळें त्यांच्या चकमकी झडून त्या देशांचा जो बराच नाश होत होता त्यामध्यें इटाटाहा व त्याचे वंशज यांचें नेहमीं अंग असे या गोष्टीची भर पडली होती. मध्यवर्ती राज्यांतील सत्ताधीशांनीं टांकिन व कोचिनचीन येथील आपल्या मांडलिक राजांनां तह करण्याचा सल्ला दिला, परंतु त्यांच्या सांगण्याचा मुळींच उपयोग झाला नाहीं. त्यामुळें १४०३ मध्यें बादशाहीपदावर आरूढ झालेल्या यंगलो किंवा ताईत्संग या बादशाहाला टांकिनवर चंगपो नांवाच्या आपल्या सेनापतीच्या हाताखालीं मोठें सैन्य देऊन पाठवावें लागलें. यानें सर्व देश जिंकून घेतला आणि चिंग राजघराण्यांतला कोणीच वारस न राहिल्यामुळें यालाच त्या देशाचा सुभेदार नेमण्यांत आलें.

**चिनी सत्ता.**—१४०७ मध्यें सुभेदार झाल्यावर त्यानें तेथें पूर्णपणें चिनी राज्यपद्धति सुरू केली. शिवाय त्यानें बादशाहाकडे त्या देशांतील सविस्तर माहितीचा अहवालहि पाठविला; त्यांत एकंदर शहरें व तेथील लोकसंख्या यांबद्दल बरोबर आंकडे दिलेले होते. या देशाचे अगदीं जुने नकाशे या काळापासूनच उपलब्ध आहेत. शिवाय चिनी बादशाहानें ७ हजार टांकिनी लोक आपल्या दरबारांत चिनी शिक्षण घेण्याकरतां आणले होते. शिक्षण घेऊन [illegible] पुढें आपल्या जन्मदेशांत त्यांनीं प्रसार

करावा असा उद्देश होता. या असल्या उपायांनीं टांकिन हा पूर्णपणें अगदीं चिनी प्रांत बनला.

**पुनः स्वातंत्र्य.**—तथापि ही केवळ तरवारीच्या जोरावर प्रस्थापित झालेली शांतता अर्थात् थोडाच काळ टिकली. टांकिनी लोकांनां हा झालेला आपल्या स्वातंत्र्याचा नाश सहन होईना, त्यामुळें ते वरचेवर या परकीय सत्तेविरुद्ध बंडें करीत असत, आणि या त्यांच्या प्रयत्नांनां शेजारच्या कोचिनचीन वगैरे ठिकाणच्या लोकांकडून मदत मिळत असे. १४२२ मध्यें लिली नांवाच्या एका टांकिनी राजपुत्रानें एका लढाईमध्यें पूर्ण जय मिळविला, आणि आपण पूर्वीच्या चिनघराण्यांतील वंशज राजे आहोंत असें जाहीर केलें. ही गोष्ट घडली तेव्हां चीनमध्यें चिंगहोवा राज्य करीत होता. लिलीनें टी म्हणजे सत्ताधीश राजा अशी पदवी धारण केली आणि नवें घराणें सुरू केलें. सिंगहोफू या राजधानीला त्यानें सिट्रू असें नांव दिलें, त्याचा अर्थ पश्चिम-वसति-स्थान आहे. शिवाय जुन्या किऔची याला टांकिन असें नांव दिलें. पुढें सर्व देशाचें पूर्वीचें जुनें न्गानग अथवा गेनन हें नांव जाऊन त्याला टांकिन हेंच नांव पडलें. या ली राजांनीं आपलें स्वातंत्र्य कायम राखलें; व शिवाय १४६८ व १४७१ मध्यें लिहोआनें कोचिनचीन व युनान हे प्रांत आपल्या अम्मलाखालीं आणले, परंतु पुढें ते त्याच्या हातांतून गेले. १५४० मध्यें टांकिन येथें क्रान्ती होऊन तेथें पुन्हां चिनी लोकांचा हात शिरला; व टांकिनी लोकांनां चीनला खंडणी देणें भाग पडलें. १५५८ मध्यें कोचिनचीननें टांकिनी लोकांच्या सत्तेचें जूं झुगारून देऊन पुन्हां स्वातंत्र्य मिळविलें. याच सुमारास एका टांकिनी प्रधानानें जपानमध्यें व मराठे लोकांमध्यें प्रचलित असलेली एक नामधारी व एक खरा सत्ताधारी अशा दोघांच्या नांवानें राज्यकारभार चालविण्याची पद्धति टांकिनमध्यें सुरू केली. पहिल्या नामधाऱ्याला डोंवावोमा असें नांव असून तो देशांतील जुन्या राजघराण्यांतील वंशज असे; पण देशाच्या राज्यकारभारांत त्याला कोणताहि भाग घेतां येत नसे; आणि दुसरा खरा सत्ताधारी खान ह्या नांवाच्या विजयी बंडखोराचा वंशज असून त्याच्याकडे राज्यकारभाराचा सर्व अधिकार असे. या प्रकारची राज्यकारभारपद्धति १७४९ पर्यंत चालू होती.

**पोर्तुगीज व्यापार.**—या वरील राज्यांशीं पोर्तुगीज लोकांच्या जडलेल्या संबंधाविषयीं सांगावयाचें म्हणजे असें कीं पोर्तुगीजांनीं, आलफान्सो डी आलबुकर्क यानें १५११ मध्यें मोलक्का जिंकून घेतल्यानंतर, लवकरच कोचिनचीनशीं व्यापारी दळणवळण सुरू केलें. हा व्यापार ह्या बेटांतील पोर्तुगीज गव्हर्नरांनीं चालविला होता; दरसाल ते लोक ह्या देशांत एक जहाज पाठवीत असत व त्या जहाजांतून परत इतर जिन्नसांबरोबर आंबोयना अथवा अघिला नांवाचें लाकूड आणीत असत; कारण हें लाकूड म्हणजे ह्या देशांतील एक अत्यंत मौल्यवान माल म्हणून प्रसिद्ध आहे.

**राज्यव्यवस्था.**—या पूर्वेकडील उपभारतीय राज्यांच्या इतिहासामध्यें असा एक मोठा दोष आहे कीं, त्या इतिहासांत उगीच निरुपयोगी गोष्टींचें भारूड फार असून जगाच्या इतिहासाच्या दृष्टीनें त्याला फारसें महत्त्व नाहीं असें लासेन यानें मत प्रदर्शित केलें आहे; व या बाबतींत वाचकांची होणारी निराशा थोडीफार दूर करण्याकरितां या राज्यांची ऐतिहासिक माहिती देण्याचें थांबवून येथें त्याला जोडून तेथील राज्यपद्धतीसंबंधाची थोडीशी चर्चा त्यानें केली आहे; व सुमारें १०० वर्षांपूर्वीच्या तेथील राज्यव्यवस्थेचें त्यानें पुढें दिल्याप्रमाणें वर्णन दिलें आहे. "राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें पाहतां या संस्थानांचे दोन विभाग पडतात. पहिला विभाग म्हणजे ज्यांत चिनी राज्यपद्धति प्रचारांत आली अशा संस्थानांचा, व दुसरा ज्यांत ती पद्धति नव्हती अशा संस्थानांचा. पहिल्यांत टांकिन व कोचिनचीन हीं येतात; व दुसऱ्यांत कांबोज, सयाम, पेगू, ब्रह्मदेश व आराकान इतक्यांचा समावेश होतो. यांपैकीं कांबोजची राज्यपद्धति वर दिलेलीच आहे; म्हणून त्याबद्दल पुनरावृत्ति नको. पेगू हें बऱ्याच काळापूर्वीपासून स्वतंत्र राज्य असें नाहींच; आणि आराकानमधील राज्यपद्धतींत ब्रह्मी राज्यसत्तेमुळें बऱ्याच बाबतींत भर पडली आहे. तेव्हां आतां टांकिन, कोचिनचीन, सयाम आणि ब्रह्मदेश एवढेच प्रदेश विचारांत घ्यावयाचे.

**भारतीय व पूर्वेकडील राज्यपद्धति.**—पूर्वेकडील उपभारत व भरतखंड येथील राज्यपद्धतींत दोन महत्त्वाच्या गोष्टींमुळें फार फरक पडलेला आहे. एक गोष्ट म्हणजे हिंदुस्थानांत रूढ असलेला जातिभेद व ग्रामसंस्था यांचा टांकिन वगैरे देशांत असलेला अभाव ही होय. पूर्वेकडील देशांतील बहुतेक राज्यांत कित्येक रानटी वर्ग व टांकिन व कोचिनचीन येथील बहुजनसमाज हे अपवाद खेरीजकरून सामान्यतः सर्वत्र प्रचलित असलेला जो बौद्धसंप्रदाय त्याचा संस्थापक बुद्ध यानें आपल्या संप्रदायांतून जातिभेद काढून टाकला इतकेंच नव्हे, तर आपल्या संप्रदायांत सर्व लोकांचा त्यांच्या जन्मकुलादि गोष्टींकडे लक्ष न देतां समावेश करून जातिभेद समूळ नष्ट केला. जातीजातींतील नियमांमुळें प्रत्येक विशिष्ट जातीच्या हक्कांचें संरक्षण होत असे, व या जातिनियमामुळें राजकर्त्यांनां लोकांच्या हक्कांमध्यें ढवळाढवळ करण्यास मोठा अडथळा येत असे, कारण जातीजातींतील कायद्यांनां पवित्र धार्मिक स्वरूप असल्यामुळें त्यांचा मजबूत तटबंदीप्रमाणें उपयोग होत असे. उलट जातिविशिष्ट कायद्यांचा असलेला अभाव हें पूर्वेकडील देशांत तिकडे सर्व ठिकाणीं जी अरेरावी राज्यकारभारपद्धति दिसून येते, त्याचें एक कारण आहे. दुसरी गोष्ट अशी आहे कीं, पूर्वेकडील देशांतील लोकांचा मूळ स्वभावच असा कांहीं आहे कीं ते स्वतःच्या अक्कलेवर स्वतःची उन्नति करून घेण्यास असमर्थ दिसतात आणि त्यांनीं स्वतः होऊन कोणती राज्यकारभारपद्धति निर्माण केली असें मुळींच कधीं झालेलें नाहीं; म्हणून त्यांच्या राज्यकर्त्यांनीं अरेरावी राज्यकारभार करण्याचा जेथें जेथें उपक्रम केला तेथें तेथें तो यशस्वी झाला. कारण तो हाणून पाडण्याची पात्रता त्यांच्या आंगीं नव्हती. हिंदुस्थानामध्यें अगदीं प्राचीन काळापासून असलेली ग्रामसंस्थापद्धति व त्याकरतां गांवकऱ्यांनीं नेमलेले कामगार व धंदेवाले लोक व त्या त्या कुटुंबांतच वंशपरंपरा चालत आलेले अधिकार व धंदे या सर्व गोष्टींचा असा एक मोठा फायदा झालेला आहे कीं, अनेक युद्धें व अनेक राज्यक्रान्ति जरी होऊन गेल्या तरी गांवकरी लोक आपल्या

सुव्यवस्थित ग्रामव्यवस्थेखालीं सुखासमाधानांत राहिलेले असत आणि त्यांचे शेतकी व इतर उद्योगधंदे चांगल्या तऱ्हेनें चाललेले असत. ही ग्रामसंस्थापद्धतिच पूर्वेकडील देशांत नसल्यामुळें सुव्यवस्थित राज्यघटनेच्या पायालाच ते अन्तरलेले होते. टांकिन आणि कोचिन-चीन येथील राज्यव्यवस्था एकसत्ताक असून जुलमाची जरी आहे तरी ती पितृसत्ताक अर्थात वात्सल्यपूर्ण म्हणून सांगण्यांत येते. खाजगी कुटुंबांतल्याप्रमाणें, देशांतील राज्यव्यवस्था आहे अशा तऱ्हेचा वहाणा करण्यांत येतो, पण राज्यशकट हांकण्याला मुख्यत्वेंकरून दंडुक्याचाच उपयोग होतो. राज्यसत्तेला आळा घालण्यास फक्त बंडाची भीति व अनेक शतकांपासून सर्व देशांतून, मग त्या देशांतील राज्यव्यवस्था कितीकां वाईट असेना, रूढ असणाऱ्या चालीरीती अतिक्रमण करण्याची धास्ती हींच कांहीं अंशीं कारणीभूत होतात. सरदारवर्गहि फक्त सेवावृत्ती असल्याकारणानें, त्याचें बरेंवाईट करण्याची सत्ता सर्वस्वी राजाच्या इच्छेवर अवलंबून असे.

**पूर्वेकडील राज्यपद्धति.**—या पूर्वेकडील देशांत दोन अधिकारीवर्गाकडून राज्य चालविण्यांत येतें; या वर्गांत चीन देशांतल्याप्रमाणें दिवाणी व लष्करी अंमलदार येतात व त्यांनां म्यान्डारिन्स असें नांव आहे. या दोन वर्गांतील वरिष्ठ लोक राजाच्या मंत्रिमंडळांत असतात. प्रत्येक प्रांताला एक दिवाणी सुभेदार (प्रांताधिकारी) आणि एक लष्करी अधिकारी (सेनानायक) असतो; त्यांच्या मदतीला एक राजप्रतिनिधि व एक दुय्यम प्रांताधिकारी असतो. लष्करी बाबी सोडून इतर सर्व बाबतींत तीन मुलकी अधिकाऱ्यांनीं एकत्र काम केलें पाहिजे, असा कायदा आहे. पुष्कळ वेळां असें होतें कीं, खालच्या अंमलदारांनां विषयाचें चांगलें व्यावहारिक ज्ञान असल्यानें, वरिष्ठांपेक्षां त्यांचेंच जास्त वजन पडतें. बंड किंवा लढाई उपस्थित झाल्यास सेनानायक स्वतंत्रपणें अधिकार चालवितो त्या वेळीं त्याचा अधिकार अप्रतिहत असून त्याच्या हातीं सर्वांच्या जीवितमरणाची सत्ता असते. राज्यव्यवस्थेकरितां प्रत्येक प्रांताचे तीन जिल्हे पाडतात; त्यांना हुयेन असें म्हणतात. प्रत्येक जिल्ह्यांत तीन चार तालुके असतात व प्रत्येक तालुक्यांत कांहीं गांवें असतात. टांकिन आणि कोचिन-चीनमध्यें चिनी लोकांनीं शहरांचे तीन वर्ग पाडण्याची पद्धत पाडली. या विभागणीमुळें व शहराच्या नांवाला फू, चू, हि आन हीं दर्जाप्रमाणें उपपदें लावल्यानें, त्यांचा दर्जा ओळखतां येतो. जिल्ह्यावर दोन मुलकी अधिकारी नेमण्यांत येतात; प्रांताधिपतीच्या शिफारशीवरून दरबारकडून यांची नेमणूक होते. इतर मुलकी अधिकारी यांच्या हाताखालीं असतात. जुन्या चालीस अनुसरून, गांवकरी गांवचा मुख्य निवडतात व सरकारहि तो कबूल करितें. कारण यांचा विशेषतः करवसूली व सैन्यभरती करण्याकरितां बराच उपयोग होतो.

**शासनसंस्था.**—वरिष्ठ शासनयंत्रांत, एक महासभा (State Council) आणि सहा मंत्री असतात. पौरोहित्य, युद्ध, न्याय, सार्वजनिक कागदपत्र व लिखाण यांचें रक्षण, कोश, आणि सरकारी जंगल यांसंबंधीं निरनिराळीं कामें वरील मंत्र्यांकडे असतात; जंगलखात्यावरील मंत्री सार्वजनिक इमारती व आरमार यांवर देखरेख ठेवतो. सहा मंत्री व महासभा याखेरीज या राज्यास, इतर वरिष्ठ अधिकारी असतात; त्यांना 'कूम' असें नांव देतात. यांत, प्रांताधिपति, टांकिनचा राजप्रतिनिधि आणि कांबोजचा राजप्रतिनिधि येतात; कांबोजचा राजप्रतिनिधि पीलखाना आणि परराष्ट्रांसंबंधी कारभार, यांवर देखरेख करतो. राज्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांतून सहा मंत्री घेण्याची ही पद्धत चिनी आहे. फक्त कोचिन-चीनमध्यें, कांहीं थोडा फरक आहे, पण तो फारसा महत्त्वाचा नसल्यानें, येथें दिला नाहीं. मंत्रिसभा व महासभा राजा त्याला आवश्यकता भासेल त्या वेळीं बोलावितो. हे सर्व अधिकारी व त्यांच्या हाताखालील दुय्यम अधिकारी मिंग या चिनी राजघराण्याच्या दरबारी पोषाखासारखा पोषाख करितात; व चीन देशांतल्याप्रमाणें यांचेहि दहा दर्जे आहेत. चिनी पद्धतीपेक्षां अजीबात निराळें वळण म्हणजे कोचिन-चीनमध्यें लष्करी अधिकाऱ्यांनां विद्वानांपेक्षां व धर्माध्यक्षांपेक्षांहि जास्त मान देण्यांत येतो. या राज्यांत शास्त्रज्ञांपेक्षां लष्कराला जास्त महत्त्व आहे एवढें सांगितल्यास वरील गोष्टींचें आश्चर्य वाटणार नाहीं.

**लष्करी खातें.**—राज्यांतील निरनिराळ्या खात्यांविषयीं विचार करितांना प्रथम लष्करीखातें घेणें उत्तम; कारण कोचिन-चीनमध्यें लष्कर विशेष श्रेष्ठ आहे. प्रत्येक प्रजाजन १८ ते ६० वर्षें पावेतों लष्करी नोकरी करण्यास बांधलेला आहे. तथापि, हा कायदा कडक रीतीनें अंमलांत आणीत नसून, व्यवहारांत कोचिन-चीन व तेथील राजाचे परंपराप्राप्त प्रदेश यांतून, प्रत्येक तिसरा मनुष्य लष्करी नोकरीस बोलावण्यांत येतो; टांकिनांत तर यापेक्षांहि जास्त सवलती आहेत; कारण, हें जित राष्ट्र जास्त दयाळूपणानें वागविलें जातें. तीन वर्षें नोकरी केल्यावर सामान्य शिपायानें आपल्या घरीं परत जावें. अधिकाऱ्यांनां जास्त दिवस नोकरी करावी लागते. एकंदर लोकसंख्येंत शस्त्रें धारण करण्यास लायक असे किती पुरुष आहेत, याची बरोबर यादी ठेवलेली असते. याच लोकांनां आरमारावर काम करावें लागतें, शिवाय यांची योजना देशांतील रस्ते, तलाव, पूल वगैरे बांधण्याच्या कामींहि होते. पण या योगानें शिस्त बिघडते. कोचिन-चीनच्या राजाचें लष्कर म्हणजे, राजसंरक्षक (हें पायदळ असतें), पायदळ, घोडेस्वार आणि लढाऊ-जहाजें इत्यादि प्रकारचें असतें. हत्तींचा फक्त ओझ्याकरितां व बसण्याकरितां उपयोग करतात. कोचिन-चिनी लष्करी व आरमारी बलाविषयींची माहिती, फार अलीकडच्या काळांतली असल्यामुळें, ती येथें देण्याचें प्रयोजन नाहीं; तसेंच, लष्कररचनेंतील पलटणी, पथकें वगैरे प्रकार अलीकडच्या काळचेच आहेत; व कोचिन-चीनच्या राजांच्या पदरीं असलेल्या फ्रेंच सैन्याधिकाऱ्यांनीं हे प्रकार पाडले आहेत. पगाराचें मान कमी आहे; व तोहि कांहीं पैशाच्या रूपानें व कांहीं तांदुळाच्या रूपानें देतात. सामान्य शिपायाचा पेहराव म्हणजे शंकूसारखी हाथरीची टोपी, गुडघ्यापर्यंत लांब आंगरखा व लांब विजार, पायांत कांहीं नसतें. अधिकारीवर्ग लष्करी पेहेराव करीत नाहीं तर त्या देशाच्या रिवाजाप्रमाणें, पगडी, अंगरखा आणि विजार असा नेहेमींचा पोशाख करतो. पायदळाचा सरंजाम पाश्चात्य पद्धतीचा असे म्हणजे त्यांजवळ संगिनीच्या बंदुकी असत. इंग्लंडच्या वकीलानें दिलेल्या

माहितीवरून असें समजतें कीं, कोचिन-चिनी लष्कराचा डौल फार छान असे.

**कर.**—कोचिन-चिनी राज्यांत कराच्या बाबतींत, खालील गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. खजिन्यांत संपत्ति, कांहीं नगद व कांहीं ऐनजिनसी कर, शिल्पकारांवरील एक प्रकारची पट्टी आणि मक्ते देण्याबद्दलचें द्रव्य अशा तऱ्हेनें येते. जमिनी खाजगी मालकीच्या किंवा राजाच्या मालकीच्या आहेत; त्यांतल्या त्यांत राजाच्या मालकीच्या जमिनी फार; व त्या गांवकऱ्यांना खंडानें दिल्या आहेत व त्यांवर ३० चौरस टाइस* जमिनीबद्दल, दोन हंड्रेडवेट तांदूळ इतका सारा असतो; खाजगी जमिनीवर यापेक्षां जरा जास्त सारा असतो. प्रत्येक वयांत आलेल्या कोचिन-चिनी मनुष्याला, जर तो सरकारी वेठ करीत नसेल तर, सुमारें दीड रुपया डोईपट्टी द्यावी लागते. कारण कोचिनचीनमध्यें खेडेगांवांतून सरकारी वेठ असते. या कामावरील मनुष्याला रस्ते, कालवे, पूल वगैरे बांधकामें करावीं लागतात. आयात मालावरील जकातीखेरीज तेथील सरकार लवंगा, वेलदोडे, दालचिनी आणि इतर मौल्यवान् माल यांचे मक्ते देऊन बराच पैसा मिळवितें. नवीन कर शोधून काढण्यांत राजाचे मंत्री फार हुशार आहेत. ते प्रजेच्या निकृष्ट स्थितींत देखील जितकें त्यांच्याकडून काढतां येईल तितकें काढीत असतात. अशा रीतीनें घेतलेला पैसा खजिन्यांत अपरंपार भरलेला असे व इतका पैसा लोकांना वापरावयास मिळत नसे. ज्याच्याकडून ही माहिती मिळाली तो इंग्रज वकील या दरबारीं असतांना, खजिन्यांत सत्तर लक्ष डॉलर्सपेक्षां जास्त पैसा शिल्लक होता. तेव्हां लोकांना सरकार फार अप्रिय असून त्यांची बंडाकडे प्रवृत्ति असे यांत विशेषसें आश्चर्य नाहीं. जेव्हां अशी वेळ येते, तेव्हां लोक खजिना लुटतात व सरकारला तो पुन्हां भरण्यासाठीं अन्यायी साधनांकडे धांव घ्यावी लागते.

**न्यायपद्धति.**—न्यायशासनाविषयीं पाहतां, या देशांत कायद्याची अक्षरशः अंमलबजावणी करण्यांत येते; पण पुष्कळ वेळां या कामांत फार अनियंत्रितपणा दिसून येतो.

चीनप्रमाणेंच येथेंहि वांबूच्या काठीनें फटके मारण्याच्याच बहुतेक शिक्षा असतात; प्रत्येक वरिष्ठ अधिकाऱ्याला शिक्षा देण्याचा अधिकार आहे असें दिसतें; लांकडी खोडा गळ्याभोंवतीं अडकविण्याचा दुसरा एक शिक्षेचा प्रकार आहे. या देशांत दंड म्हणून पैसे घेण्याची चाल नाहीं. इतर शिक्षा चिनी लोकांप्रमाणेंच आहेत.

तुरुंग म्हणजे भयप्रद गलिच्छ संस्था आहेत. अलीकडे देहान्त शिक्षा बहुधा दिली जात नाहीं. ही शिक्षा देण्यांत आल्यास प्रथम तो खटला स्टेट काउन्सिलकडे तपासणीसाठीं जाऊन राजानें अनुमोदन दिल्यानंतरच ही शिक्षा कायम होते हें स्तुत्य आहे. लहानसहान खटल्यांचा निकाल ग्रामाधिपति करितो. खेड्यांतील लोकांचें या निकालानें समाधान न झाल्यास, फिरत्या कोर्टाकडे त्यांना अपील करितां येतें व हाहि निकाल बरोबर नाहीं असें वाटल्यास जिल्हाकोर्टाकडेहि अपील करितां येतें. प्रांतांतील लष्करी अधिकाऱ्याकडे केलेलें अपील शेवटचें असतें; परंतु ते अधिकारी लांचखाऊ असतात; एकंदरींत न्यायाधीश मात्र स्तुतीस पात्र असतात, कारण, सर्व महत्त्वाच्या फिर्यादी पूर्णपणें व सदसद्विवेकबुद्धीनें तपासून, साक्षीदारांचें म्हणणें काळजीपूर्वक ऐकून घेतल्यानंतरच ते खटल्याचा निकाल देतात.

**परमार्थसाधन आणि तत्त्वज्ञान.**—कोचिन-चीनमध्यें प्रचलित असलेल्या परमार्थसाधनविषयक गोष्टींची सविस्तर माहिती येथें देणें अशक्य असल्यामुळें, त्या विषयावरील फक्त कांहीं गोष्टींचा आपण विचार करूं. या बाबतींत बहुतेक पौरस्त्य राष्ट्रांहून अनामी लोक बरेच भिन्न आहेत. चिनी लोकांच्या धर्माशीं त्यांच्या धर्माचें पुष्कळ साम्य आहे, परंतु चिनी लोकांपेक्षां त्यांचें परमार्थाकडे फारच कमी लक्ष आहे. चिनी लोकांप्रमाणेंच पितृपूजा ही यांच्या धर्मांतील मुख्य गोष्ट आहे. चीनप्रमाणेंच येथील अधिकारी कन्फ्यूशसच्या तत्त्वाचे अनुयायी आहेत. या देशांत गौतमबुद्धाचे अनुयायी अगदीं थोडे आहेत. या लोकांचीं फारच थोडीं देवालयें असून यांचे उपाध्याय बहुतेक बाबतींत चिनी उपाध्यायांसारखेच आहेत. पूर्वेकडील उपभारताच्या या भागांत अगदीं अलीकडे म्हणजे इ. स. १५४० त या संप्रदायाचा प्रवेश झाला.

**स्वभाव.**—अनामी लोकांच्या स्वभावांत, त्यांच्या विशिष्ट अप्रौढतेचें व परकीय म्हणजे यूरोपियन लोकांच्या संस्कृतिवर्चस्वाचें मिश्रण दिसून येतें. जुलमी राजाच्या अंमलाखालीं असूनहि ते हुषार, बुद्धिवान् व संतुष्ट आहेत; परंतु याबरोबरच, ते हट्टी व गलिच्छ असून यांचें खाद्यहि ओबडधोबड असतें; उदाहरणार्थ, ते जीवजन्तु व सुसरीचें मांस खातात. खालच्या वर्गांतील लोक आतिथ्यपर व सलोख्यानें वागणारे आहेत, परंतु सरदारलोक मितभाषणी व गर्विष्ठ असून लोभी आहेत. हे दुर्गुण सामान्य लोकांत आढळून येत नाहींत. चिनी व इतर पूर्वेकडील लोकांप्रमाणें हे लोक इतर राष्ट्रांतील लोकांनां रानटी समजून त्यांनां तुच्छ मानतात; तथापि परकीय म्हणजे यूरोपियनांच्या युद्धकलेचें व कापड तयार करण्याच्या कलेचें अनुकरण करण्यास ते मागें पुढें पाहत नाहींत. त्यांनीं तयार केलेल्या दुबारी बंदुका व रेशमाचें काम हीं यूरोपियन कामासारखीं चांगलीं होतात. अनामी लोकांच्या या कौशल्यानें त्यांच्या मूळच्या गर्विष्ठपणांत बरीच भर पडली आहे.

**सयामची राजसत्ता.**—पूर्वेकडील उपभारतीय राज्यपद्धतींत सुमारें १०० वर्षांपूर्वी विशिष्टपणें आढळून येणारें जुलमी धोरण, थइ संस्थानांतहि त्या काळीं तसेंच आढळतें असें लासेन यानें वर्णन केलें आहे. तेथील अधिकारी आपल्या फाजील मानपानांस व अनियंत्रित सत्तेस आणि तलपत्री (छत्रधारी) यांच्या धार्मिक सत्तेस काडीमात्र आळा घालीत नाहींत. सयामचा इल्हे राजा हा तलपत्रींचा वरिष्ठ आहे. त्याच्याकडूनच या तलपत्रींनां त्यांचा अधिकार व देणग्या वगैरे मिळतात. मुलकी कामगारासारख्या यांच्या नेमणुका होत असून त्यांनां काढूनहि टाकितां येतें. अशा प्रकारें उपाध्याय लोक राजावर सर्वस्वीं अवलंबून असून लोकांनां त्रास देण्याच्या व सर्व गोष्टी आपल्या मनाप्रमाणें

* जमीन मोजण्याचें चिनी माप.

करण्याच्या कामीं पारमार्थिक वावतींत तो यांचा उपयोग करूं शकतो. 'शाअ-फेन-डिन्' म्हणजे पृथ्वीपति, 'शा-अ-जेव्हिट' म्हणजे जीवितेश व 'फा-नाह-खासट' म्हणजे अतिशय वैभवशाली अशा अगदीं अर्थपूर्ण पदव्या सयामच्या राजाला आहेत. याशिवाय या राजाला इतर अनेक लहान लहान पदव्या असतात; परंतु त्यांचा येथें उल्लेख करितां येत नाहीं.

**राज्याभिषेक.**-नवीन राजाला राज्याभिषेक यथासांग व मोठ्या थाटानें करण्यांत येतो; यासाठीं ज्योतिष्याकडून एका शुभदिवसाची योजना होते. राज्याभिषेकाच्या दिवशीं संध्याकाळीं तेथील सर्व घरांत रोषनाई करण्यांत येते; व प्रत्येक दरवाजासमोर लहान वेदी तयार करून तेथें होमहवन करण्यांत येतें. ज्याला राज्याभिषेक व्हावयाचा असतो, तो राजपुत्र सर्व राजचिन्हांनीं सुशोभित होऊन दिवाणखान्यांत येतो. नंतर सर्व मोठमोठ्या अधिकाऱ्यांनां घेऊन पुरोहित लोक विजयदेवतेची एक मूर्ति तेथें आणतात. तो राजपुत्र मूर्तीच्या पायां पडतो. प्रास्ताविक कृत्यें झाल्यानंतर तो राजपुत्र एका सोनेरी सिंहावर आरूढ होतो. तेथें बसल्यावर त्या नवीन राजाला सर्व लोक आशीर्वाद देऊन कित्येक नजराणे देतात; त्यांमध्यें सर्वप्रकारचीं शस्त्रें व त्या देशांतील सुंदर सुंदर फळें व फुलें हे मुख्य नजराणे असतात. नंतर तो अभिषिक्त राजा त्या समारंभाच्या जागेंतून सभागृहांत जातो; त्या ठिकाणीं राज्यांतील वरिष्ठ अधिकारी आपापल्या हुद्यांप्रमाणें त्याला देणग्या देऊन त्याचें स्वामित्व कबूल करितात. राज्याभिषेकाच्या दिवशीं मांडलिक राजेहि नजराणे देऊन त्याचें स्वामित्व कबूल करितात. नंतर कांहीं दिवसांनीं सुशोभित अशा त्या राजधानीच्या रस्त्यांतून मोठ्या थाटानें राजाची मिरवणूक काढण्यांत येते. आणखी थोड्या दिवसांनीं, सुशोभित केलेल्या क्रीडानौकेंत बसवून नदींतून दुसरी मिरवणूक काढण्यांत येते.

**राजाची दिनचर्या.**—थईच्या राजाबद्दल दर्शविण्यांत येणाऱ्या अत्यंत पूज्यबुद्धीला अनुसरूनच त्याच्याशीं त्याच्या प्रजेचें वर्तन असतें. तो क्वचित् प्रसंगीं जेव्हां लोकांच्या दृष्टीस पडतो तेव्हां रस्त्यामध्यें लोकांनां त्याच्यापुढें साष्टांग प्रणिपात करावा लागतो; व त्यांनां त्याच्याकडे पहाण्याचीहि परवानगी नसते; त्यांनीं त्याला स्पर्श केल्यास त्यांनां देहान्त शासन मिळतें. तो एकटा कधींहि जाहीरपणें लोकांच्या दृष्टीस पडत नाहीं; त्याच्या बरोबर नेहमीं बराच मोठा परिवार असतो. त्याची सत्ता अनियंत्रित आहे, तथापि सकाळपासून संध्याकाळपर्यंतचा त्याचा रोजचा सर्व कार्यक्रम अगदीं नियमबद्ध आहे. या सर्व नियमांचा येथें उल्लेख करितां येत नाहीं; परंतु हिंदु धर्मशास्त्रांत ज्याप्रमाणें व्यापक अशा नियमांनीं राजाचा दिनक्रम बद्ध आहे, त्याप्रमाणेंच बहुतेक येथें स्थिति आहे एवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे.

सयामच्या राजापाशीं जरी पुष्कळ उपस्त्रिया असतात तरी त्याची धर्मपत्नी एकच असते. राजाशीं बहुधा तिचा निकट सहवास असून ती एका स्वतंत्र राजवाड्यांत राहते. आपल्या एका भावाला किंवा नातलग मांडलिक राजाला, उपराजाची जागा देण्याची सयामच्या राजाची चाल आहे. या [illegible] अर्थ दुय्यम राजा असा आहे; परंतु 'उपराजा' या पदवीच्या ऐवजीं अलीकडे 'वनस्रा' नांवाच्या दुसऱ्या एका पदवीचा उपयोग करण्यांत येतो; सयामी भाषेंत वनस्रा व उपराजा यांचा अर्थ बहुधा एकच आहे. हा एका मोठ्या राजवाड्यांत राहतो; त्याला रोज राजाला भेटावें लागतें; बहुधा त्याच्याकडे सेनापतित्व असून राजाचा खजिनाहि त्याच्याच ताब्यांत असतो. वनग्लिंग किंवा राजप्रतिनिधि या नांवाचा दुसरा एक राजपुत्र असतो; सर्व मांडलिक राजांत हा वरिष्ठ असून त्यांनीं किंवा मोठमोठ्या अधिकाऱ्यांनीं केलेल्या अपराधांची चौकशी करण्याचीं वगैरे महत्त्वाचीं कामें याला करावीं लागतात. थई राज्यांत यांशिवाय कित्येक राजपुत्र असतात; मुख्य राजा अनेक उपस्त्रिया ठेवतो त्याचा हा अपरिहार्य परिणाम आहे. आपल्या उपजीविकेसाठीं शेतकीसारखे हलके धंदे त्यांनां कधीं कधीं करावे लागतात; व सुंदर मुलींनां भ्रष्ट करण्यासारख्या चीड आणणाऱ्या कृत्यांनीं ते लोकांनां पीडाहि देतात. सयामच्या राजाला सोन्याचा (Golden) किंवा पवित्र महाराजा असें म्हणतात व त्याच्या प्रकृतीबद्दल कोणीहि चौकशी करावयाची नाहीं असें असल्यामुळें राजाच्या मृत्यूविषयीं खबर कोणाला कधींच मिळत नाहीं; व त्याबद्दल कोणी विचार करावयाचा नसतो. यामुळें एक राजा जिवंत असतां त्याचा वारस नेमण्याची पद्धत नाहीं.

**अधिकारी वर्ग.**—सयामच्या राज्यांत वरिष्ठ सरकारी कामगार पुढीलप्रमाणें असतात: घोडे व हत्ती यांवरील, सक्तीच्या नोकरीवरील, परराष्ट्रांसंबंधी, शेतकी कामगार, न्यायमंत्री, वरिष्ठ न्यायाधीश, घोडे व हत्ती यांवरील दुय्यम कामगार, दवाखान्यावरील अधिकारी, कालव्यावरील कामगार, सार्वजनिक इमारती व कामें यावरील वरिष्ठ अधिकारी, पितळी कामाच्या भट्ट्यांवरील अधिकारी व तलपत्रींचा मुख्य म्हणजे पारमार्थिक बावतींत धर्माध्यक्ष. या यादीवरून दिसून येईल कीं, सयामी राज्यांत राज्यकारभाराच्या प्रत्येक खात्यावर योग्य सरकारी कामगार नेमलेला असे. एकंदर कामगारांचे त्यांच्या हुद्यावरहुकुम पांच वर्ग पडतात, परंतु त्यांच्या पदव्यांसंबंधीं येथें उल्लेख करण्याची जरूर नाहीं, कारण येथें सयामी राज्यपद्धतीबद्दलची सामान्य माहिती देण्याचाच उद्देश आहे. त्या उद्देशानुसार सयामी राज्याचे विभाग व त्यांतील राज्यकारभार यांची माहिती थोडक्यांत देऊन नंतर लष्कर, खजिना, न्यायखातें, व कायदेकारण यांची माहिती द्यावयाची आहे.

आतां या गोष्टींची माहिती देण्यापूर्वीं अगोदर ही गोष्ट सांगितली पाहिजे कीं, थइ राज्यपद्धति पूर्वीं फारच साधी होती. पूर्वीं मुख्य सरकारी कामगार दोनच असत, पहिला व सर्वोच्च असे त्याला कोहोम व त्याच्या खालचा दुय्यम असे त्याला चक्री असें म्हणत. पहिला सर्व लोकसमाजाच्या दक्षिण भागाचा पुढारी असे व त्याच्या ताब्यांत खजिना, परदेशबद्दलचें कामकाज व व्यापार इतक्या गोष्टी असत; त्याप्रमाणेंच राज्यांतील सर्व प्रांतांवर व राज्यकारभारांतील व न्यायखात्यांतील सर्व कामगारांवरील तो मुख्य असे; लष्करी बावतींतहि वरिष्ठ देखरेखीचा अधिकार त्याजकडेच असे, आणि सैन्याचा मुख्य सेनापतीहि बहुधा तोच असे; तथापि राजाला त्याच्याजागीं दुसरा कोणी

सेनापति नेमतां येत असे. चक्री हा राजधानींतील सुभेदार व राजवाड्यांतील मुख्य कामगार असून त्याच्या हाताखालीं जकाती व कर वसूल करणारा अधिकारी असे; तेव्हां व्यापारी धोरणाचे प्रश्न परदेशकारभाराच्या खात्यांत पडत असल्यामुळें त्यामध्येंहि या चक्रीला हजर राहून भाग घेतां येत असे.

**राजकीय विभाग.**—त्या राज्याचे प्रांत पाडलेले असत, त्यांची संख्या निरनिराळ्या काळीं निरनिराळी असे. याकरितां यूरोपियन लेखकांनीं सयामी राज्यांतील प्रांतांच्या ज्या याद्या दिलेल्या आहेत त्यांचा आपणास फारसा उपयोग होण्यासारखा नाहीं. प्रांतांवरील सुभेदारांच्या हातांत अमर्याद सत्ता असे, तिचा त्यांच्या हातून कित्येक वेळां गरीब लोकांनां त्रास देण्याच्या कामीं दुरुपयोगहि होत असे; आणि त्याबद्दल त्यांच्यावर कोणी खटले केल्यास राजाकडे किंवा मुख्यप्रधानाकडे मोठमोठ्या रकमा भरून ते आपणांस त्यांतून सोडवून घेत व त्याच अधिकारावर राहात असत. ह्या जागा बहुधा वंशपरंपरेनें चालत असत. सर्व कामगारांनां वर्षांतून दोनदां शपथविधि करावा लागे, व त्या विधींत जलपान हें मुख्य असे. एखादा अधिकारी हें करण्यास चुकल्यास त्याची नोकरी जाई, व राजद्रोहाचा आरोप येऊन त्याला तुरुंगांत पडावें लागत असे. सर्व कामगारांनां वर्षांतून एकदां पगार मिळत असे; आणि हे पगार वांटण्याचें काम पंधरा दिवस चाले. कामगारांच्या दर्जाप्रमाणें त्यांचे पगार कमज्यास्त असत. थई-राज्यांत सर्व अरेरावी कारभार असल्यामुळें नोकरांच्या बढत्या वगैरे गोष्टी निव्वळ राजाच्या मर्जीवर अवलंबून असत. राज्यांतील नगरांचे चार प्रकार असत. त्यांचीं नांवें मुआंग-एक, मुआंग-थो, मुआंग-त्रि, व मुआंग-शतव अशीं असत. पहिल्या प्रकारचीं शहरें म्हणजे राज्यांतील राजधान्या अथवा मांडलिक राजांच्या राज-धान्या; दुसऱ्या प्रकारांत प्रांतांच्या राजधान्या अथवा मुख्य शहरें मोडत; व तिसऱ्या व चवथ्या प्रकारांत अनुक्रमें जिल्ह्यांचीं व तालुक्यांचीं ठाणीं येत. हीच पद्धति खालीं खेडेगांवापर्यंत पोहोंचलेली असून तेथील कामें गांवांतील मुख्य पहात असत.

थईराज्यांत राजाचे हुकूम बजावणारा असा दरबारांत कोणी दिवाण नसे, तर प्रत्येक अधिकाऱ्याजवळ राजानें दिलेला श्रा किंवा शिक्का असे, व त्या शिक्क्यानिशीं तो राजाज्ञा जाहीर करीत असे. त्या देशच्या राजाचे निरनिराळ्या आकाराचे व छापाचे पोटशिक्के असत. मुख्य शिक्क्यावर सिंहाचा छाप असे; कारण सिंह सर्वांत श्रेष्ठत्वाचा द्योतक आहे. या शिक्क्याचा उपयोग राजा इतर राजेरजवाड्यांनां लिहितांना करीत असे, व इतर शिक्क्यांचा उपयोग खालच्या दर्जाच्या लोकांनां लिहितांना करीत असे.

**सयामी समाज.**—सयामांतील थइ राज्यांतील व तत्पूर्व समाजस्थितीचें त्रोटक वर्णन पूर्वीं* दिलेंच आहे त्यापेक्षां थोडें विस्तृत द्यावयाचें म्हणजे सुमारें १०० वर्षांपूर्वीच्या सयाममधील समाजस्थितीचें वर्णन द ला लबेर, जॉन क्राफर्ड व पलेगोइ इत्यादि ग्रंथकारांच्या आधारें लासेन यानें पुढें दिल्याप्रमाणें केलें आहे. सयाममधील जनतेचे पांच वर्ग आहेत. पहिला वर्ग सैनिकांचा, दुसरा सक्तीनें निरनिराळीं कामें करणारांचा, तिसरा कर देणारांचा, चवथा मुदतीच्या चाकरांचा आणि पांचवा गुलामांचा. सैनिकांसंबंधीं वर्णन पुढें येईल. सक्तीची चाकरी करणारांनां खाव-ब्यूएम म्हणतात, व त्यांनां किल्ले, कालवे, धरणें, इत्यादि बांधण्याचीं कामें करावीं लागतात. त्यांनां वर्षांतून तीन महिने काम करावेंच लागतें, व नंतर सुटका करून घेणें असल्यास १० टिकेल द्यावे लागतात. त्यांनां मजुरीनें बदली देतां येतात. जे अधिकारी सरकारा-च्या असल्या कामावर असतात ते स्वतःचे खिसे भरण्या-करितां आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करितात. तिसऱ्या कर देणाऱ्या वर्गांतल्या लोकांनां ८ ते १६ टिकेलपर्यंत कर द्यावा लागतो. या वर्गांतले कित्येक लोक आपल्यावरील कर आपल्या जमिनींतील पिकांच्या रूपानें किंवा आपल्या धंद्यांतल्या मालाच्या रूपानें देतात. वरच्यापेक्षां याच वर्गाची स्थिति बरी असते, कारण एकदां द्यावयाचे तेवढे कर नियमितपणें दिले म्हणजे वर्षभर स्वेच्छेप्रमाणें वाटेल तें करण्यास ते स्वतंत्र असतात. मुदतीच्या चाकरांनां लेक असें नांव आहे. त्यांनां राजाचीं किंवा अधिकाऱ्यांचीं घरगुती कामें करावीं लागतात. अधिकाऱ्यांच्याबरोबर नेहमीं त्यांचे हे मुदतीचे चाकर किंवा गुलाम असतात. या दोन्ही वर्गांनां कांहीं हलके कर खजिन्यांत भरावे लागतात. राजे व अधिकारी लोकांच्या चाकरीस अशा तऱ्हेचीं कुटुंबें असतात. कारण हे लोक अगदीं गरीब असतात आणि कर भरण्याकरितां जवळ पैसा नसल्यामुळें त्यांनां कर्ज काढावें लागतें व त्या कर्जापायीं शेवटीं ते गुलाम होतात. या नोकरांचा त्यांच्या धन्यांनां शेतकी व इतर कामें करण्याकडे फार चांगला उपयोग होतो. पांचवा म्हणजे समायीलोकांतील गुलामांचा वर्ग. यांत तीन प्रकारचे लोक येतात. युद्धकैदी, कायमचे गुलाम, व आईबापांनीं विकलेलीं मुलें. यांपैकीं पहिल्या युद्धकैद्यांनां खंडणी भरून पुन्हां आपलें स्वातंत्र्य मिळवितां येतें; परंतु दुसऱ्या प्रकारचे कायमचेच गुलाम रहातात. तिसऱ्या प्रकारचे गुलाम कर्जामुळें सुमारें वीस वर्षेंपर्यंत आपल्या साव-काराची गुलामगिरी केल्यावर मोकळे होऊं शकतात. पण त्यांनां विकण्याचा सावकारांनां हक्क असतो व त्यांची किंमत त्यांच्या वयाच्या व उपयुक्ततेच्या मानानें २४ पासून १६० टिकेल-पर्यंत येते. वसाहतवाले नीग्रोंनां वागवितात तसल्या कडकपणानें व क्रूरपणानें त्यांनां फारच क्वचित वागविण्यांत येतें. तथापि त्यांनां अत्यंत हलके समजतात व अगदीं खालच्या वर्गांच्या लोकांतहि त्यांचा समावेश होत नाहीं. सयामीलोकांपैकीं बऱ्याच जणांबद्दल अत्यंत तिरस्कार दर्शविण्यांत येतो व ते लोक तो निमूटपणें सहन करतात त्यामुळें थईलोकांत ही गुलामगिरीची वृत्ति उत्पन्न झाली असावी.

**सयामी लष्कर.**—आतां सयामीलोकांतील लष्करी बाबीचा विचार करूं. हे लोक विशेषतः शेतकी व व्यापार करणारे असल्यामुळें त्यांच्यामधील युद्धकलेचें ज्ञान फारसें वाढलेलें असणें संभवनीय नाहीं. शिवाय दुसरें असें कीं अलीकडील काळांत जवळपासच्या राष्ट्रांशीं मोठाल्या लढाया त्यांनीं मुळींच केल्या नाहींत व त्यामुळें अर्थात युद्धकलेची वाढ करण्याकडे त्यांचें

* पृष्ठ १७४ व पुढें.

दुर्लक्ष झालें आहे. सुमारें १०० वर्षांपूर्वी थई राजानें इंग्रज अंमलदारांकडून आपल्या सैन्याला शिस्त व कवाईत चांगली शिकविण्यास आरंभ केला. पण यावरून हें उघड ठरतें कीं, त्यांच्या अलीकडील लष्करी तयारीवरून पूर्वीच्या लष्करी स्थितीबद्दल मत ठरवितां येत नाहीं.

सयामी राष्ट्राच्या मूलभूत तत्त्वाप्रमाणेंच अधिकारी लोक खेरीज करून सर्व सयामी लोकांस लष्करांत नोकरी करणें सक्तीचें असे. दुसरा अपवाद म्हणजे पुरोहितवर्गाचा, तिसरा अपवाद सक्तीची चाकरी करणाऱ्यांचा, आणि चवथा जे लोक कर भरून त्या रूपानें सरकारासंबंधीं आपलें कर्तव्य पूर्णपणें बजावतात त्यांचा. या अर्थानें पाहिलें म्हणजे सयाममध्यें राष्ट्रीय शिबंदीची पद्धत होती असें म्हणतां येईल. अलीकडील सुधारणा सुरू केल्यानंतरच्या सयामी लष्कराचें वर्णन सामान्यतः पुढें दिल्याप्रमाणें लासेन यानें केलें आहे. लष्करी नोकरींतल्या लोकांचे दोन मोठाले वर्ग पाडतात. त्यांपैकीं एकाला उजवी तुकडी व दुसऱ्याला डावी तुकडी असें म्हणतात. ह्या मुख्य दोन तुकड्यांचे नंतर पोटविभाग करितात, त्या प्रत्येकांत हजार सैनिक असून त्यांचे पुन्हां शंभराशंभराचे भाग पाडतात व त्यांच्याखालीं दहादहाचे अगदीं लहान भाग पाडतात. त्यांच्यावरच्या अधिकाऱ्यांनां नाई ह्या पदवीला आणखी शब्द जोडून नांवें देतात तीं: दहा शिपायांवरच्या अधिकाऱ्याला नाई-सिप, शंभरावरील अधिकाऱ्यास नाई-रोव, हजारावरील अधिकाऱ्यास नाई-पोऊ, अशीं असतात. नाईलोक आपल्या हाताखालच्या शिपायांनां कर्जाऊ पैसे देतात व या रीतीनें त्यांनां आपले गुलाम बनवितात. सर्व वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या मदतीस पगारमास्तर दिलेले असतात. या पगारमास्तरांनां आपल्या लायकीची खात्री करून द्यावी लागते. प्रत्येक विभागांत अनेक पगारमास्तर असतात. राज्यांतील प्रत्येक प्रांतांत सेनापति प्रांतातील सैन्यांत नोकरी करण्यालायक अशा लोकांची बरोबर नोंद ठेवितात. अशा लोकांनां १९ व्या वर्षापासून सरकारची चार महिने नोकरी करावी लागते. सैनिकांनां पोषाख व हत्यारें सरकार पुरवितें. पण अन्नसामुग्री मात्र ज्याची त्यानें घ्यावयाची असते. हत्यारांमध्यें तरवारी, खंजीर, भाले, धनुष्यबाण, बंदुकी, पिस्तुलें व निरनिराळ्या पल्ल्याच्या तोफा इतक्यांचा समावेश होतो. पोषाख अगदीं साधा असतो. डोक्याला गवताची किंवा बांबूची विणलेली टोपी, खालीं गुडघ्यापर्यंत आंगरखा, व गुडघ्यापासून पायांनां बांधण्याच्या पट्ट्या, निरनिराळ्या तुकड्यांचे निरनिराळ्या रंगांचे ओव्हरकोट आणि खालीं पाय अगदीं उघडे असा पोषाख असतो. सैनिकांपासून ओळखूं येण्याकरितां सेनापतींनां रेशमी फीत लावलेले ओव्हरकोट असतात. जेव्हां लटक्या लढायांवर किंवा खऱ्या लढायांवर जावयाचें असेल त्या वेळीं बरोबर एक महिना पुरतील इतके तांदूळ प्रत्येकाला घ्यावे लागतात. सयामी सेनापतींनां लढाईंतले डावपेंच वगैरे फारसे माहीत नसतात, त्यामुळें लढाई म्हणजे लहानसहान चकमकीवजा होते. अगदीं अलीकडील काळांत सुद्धां एकंदर सयामी सैन्य कायतें ३० हजार आहे; व तें बहुतेक पायदळ असून घोडदळ फारसें महत्त्वाचें नाहीं व तोफखाना तर अगदींच टाकाऊ आहे. हत्तींचा उपयोग मोठाल्या अधिकाऱ्यांनां बसून जाण्यापुरता करितात.

**आरमार.**—थई राजांच्या आरमारांत लहानमोठ्या आकाराच्या मिळून सुमारें ५०० गनबोटी, आणि कोर्व्हेटी (एक प्रकारच्या बोटी) व यूरोपियन पद्धतीच्या १६ ते ४० पर्यंत तोफा असलेल्या फ्रिगेटबोटी मिळून सुमारें ८०० पर्यंत आहेत. १८३४ मध्यें असलेल्या या आरमाराच्या मदतीनें सयामी लोकांनीं कोचिनचीनच्या आरमारावर जय मिळविला होता हें जरी खरें आहे तरी यूरोपियन आरमाराच्या हल्ल्यानें त्याचा सहज पराजय होण्यासारखा आहे. समुद्रावरील त्यांची सत्ता फारशी मोठी कधींच नव्हती; आणि १७ व्या शतकाच्या अखेरीस तर सयामी राजाजवळ फक्त पांचसहा लढाऊ जहाजें होतीं.

**खजिना व कर.**—सयामी राजांच्या उत्पन्नांच्या बाबीसंबंधानें अशी माहिती आहे. खजिन्यांतील एकंदर जमेच्या बाबी अशा—मादकपेयांवरील कर; जुगारावरील कर; मेनामनदींतील मासेमारीवरील कर; व्यापारी जिन्नसावरील कर; मक्ते; व्यापारी नफ्यावरील कर; जकाती; फळझाडांवरील कर; जमीनमहसूल; सक्तीच्या नोकरींतून मुक्तता होण्याकरतां भरलेली रक्कम; चिनीलोकांनां सक्तीच्या लष्करी नोकरींतून सुटका होण्याकरितां द्यावी लागणारी डोईपट्टी, व मांडलिकांकडून येणारी खंडणी इ. येथें या सर्व विषयांची भरपूर माहिती देण्यास जागा नसल्यानें यासंबंधाच्या कांहीं महत्त्वाच्या गोष्टींचा फक्त उल्लेख करितों. ज्या बाबींचे मक्ते दिले जातात त्या येणेंप्रमाणें—कथिल, हस्तीदंत, वेलदोडे, आंबोयना लाकूड, कांबोजी डीक, खाण्याचीं पाकोळ्यांचीं घरटीं, हिरव्या कांसवांचीं अंडीं व साप्पन लांकूड. सुमारें ४० वर्षांपूर्वी थईराजानें यांशिवाय आणखी ४० जिन्नसांची वरच्या यादींत भर घातली, व त्याचवेळीं एका इंग्रजी वकिलाच्या सल्ल्यावरून पूर्वी खाजगी लोक व्यापार करीत अशा बऱ्याच जिन्नसांचा व्यापार स्वतःच करण्याचें ठरवून स्वतः श्रीमंत बनण्याचा बेत केला. या ठिकाणीं राजानें स्वतः व्यापारी हक्क घेतलेल्या सर्व जिनसांची याद देण्याचें प्रयोजन नाहीं, कारण पहिल्या विधानावरून सयामी राजानें आपल्या प्रजेचें व्यापारी बाबतींत नुकसान केलें आहे हें स्पष्ट दिसत आहेच. द ला लुबेर या फ्रेंच वकिलानें दिलेल्या माहितीवरून १६८७ मध्यें सयामी राज्याचें एकंदर उत्पन्न ५१,९५,४६८ टिकेल अथवा ६,४४,९३८ पौंड इतकें होतें. १८२० मध्यें तें बरेंच वाढलें होतें. एकंदर उत्पन्न २०,९१,१३० टिकेल अथवा २,६०,८९१ पौंड रोख व शिवाय ५२,६४,१३० टिकेल किंवा ६,५८,०१६ पौंड इतक्या किंमतीचें इतर उत्पन्न इतकें होतें.

**कायदे व न्यायपद्धति.**—आतां शेवटीं सयामी राज्यव्यवस्थेंतील कायदे व न्यायपद्धति या दोहोंबद्दल लिहावयाचें. थई राजाजवळ कित्येक कायदेग्रंथ आहेत. त्या सर्वांचा मूळ आधार असा एक अगदीं जुना कायदेग्रंथ आहे, तो हिंदू मूळग्रंथांवरून जरी प्रत्यक्ष लिहिलेला नाहीं, तरी हिंदुस्थानांतील कायद्यांशीं त्याचा निकट संबंध आहे. या आधारभूत कायद्यामध्यें पुष्कळच फेरफार केलेला आहे, कारण सयामी कायदेग्रंथांचे कर्ते बौद्ध होते, त्यामुळें त्यांच्या पालीभाषेंतील धर्मनियमांनां धरून त्यांनां आपले कायदेग्रंथ लिहावे लागले. त्यांपैकीं तीन विशेष मान्य

अशा कायदेग्रंथांचीं नांवें अशीं आहेत. फ्रादर्मा, फ्राथामान आणि फ्राकामेनाट यानंतर कित्येक नव्या कायदेग्रंथांची त्यांत भर पडली आहे. त्यांत सर्व प्रकारचे कायदे व राज्यव्यवस्थेचे नियम आहेत. सर्वांत महत्त्वाच्या धर्मशास्त्राला (कायदेग्रंथाला) फ्रादर्मा असें म्हणतात. त्यांत अधिकारांच्या संबंधाचे नियम व अधिकाऱ्यांचे विशिष्ट हक्क यांबद्दलची माहिती आहे. दुसरा ग्रंथ फ्राथामान यांत पूर्वींच्या राजांनीं अम्मलांत आणलेल्या राज्यपद्धतींची माहिती आहे. तिसऱ्या ग्रंथाचें संपूर्ण नांव फ्रारक्षा कामेनाट असें असून त्यांत सयामच्या अलीकडील फार प्रसिद्ध असलेल्या फ्रानारेट यानें केलेले कायदे दिलेले आहेत. हीं तिन्हीं पुस्तकें म्हणजे एकाच कायदेग्रंथाचे भाग असून तिसऱ्या भागाचे आणखी कित्येक पोटभाग आहेत व त्यांत कायद्यांच्या निरनिराळ्या शाखांवरील नियम दिलेले आहेत. यांशिवाय आणखी आलीकडील १६१४ आणि १७७४ या सालांतले दोन कायदेग्रंथ आहेत. लाओमध्यें अमलांत असलेला कायदेग्रंथ हिंदुकायदेग्रंथांवरून केलेला आहे, कारण तो मूळ मानवधर्मशास्त्राच्या पालीभाषांतरावरून तयार झालेला आहे.

**न्यायासनें.**—थईलोकांच्या देशांत तीन प्रकारचीं न्यायासनें आहेत, तीं प्रांतांतील राजधान्यांतले सुभेदार, राजपुत्र व राजा हे चालवितात. पहिल्या प्रकारच्या न्यायकचेरींत सुभेदाराचा प्रतिनिधि व एक सरकारी वकील असतो. यांचें काम वरिष्ठ अधिकाऱ्यांवर देखरेख ठेवणें हें आहे. या कचेरींत तिसरा एक लोकप्रतिनिधि असून त्यानें सैन्यभरती व सुभेदाराच्या हुकुमांची अंमलबजावणी करावयाची असते. शिवाय एक नोंदणीकामगार, एक कायदेग्रंथांचा व्यवस्थापक, एक पोलीसअधिकारी आणि सामान्य अधिकाऱ्यांवरचा मुख्य इतके अधिकारी असून शिवाय प्रत्येक कचेरींत आणखी कित्येक नोकर असतात. यावरून असें दिसून येईल कीं या खरोखर केवळ न्यायकचेऱ्या नसून राज्यकारभार व देखरेख करणाऱ्या कचेऱ्या आहेत. सर्व प्रांतांत जादा अथवा विशेष न्यायासनें आहेत. त्यांमध्यें राजपुत्रांनां स्थान असून शिवाय जरूर तेवढे दुसरे न्यायाधीश नेमलेले असतात. या न्यायासनांपुढें राजघराण्यांतील माणसांबद्दल किंवा मोठाल्या अधिकाऱ्यांसंबंधीं फिर्यादींचीं कामें त्यांनां पसंत नसल्यास चालत नाहींत. वरिष्ठ अथवा राजाच्या न्यायकचेरींत न्यायमंत्री हा अध्यक्ष नसतो, तर तेथें एक वेगळाच अध्यक्ष नेमलेला असून त्याच्या मदतीला कित्येक न्यायाधीश असतात. या न्यायकचेरींत कित्येक विभाग असून एका विभागांतील न्यायाधीश खटल्यांची तयारी करतात व दुसरे निकाल देतात. न्यायाचें काम जाहीर रीतीनें चालतें. दाव्याचे कामांत साक्षीदार तपासण्याचें काम व्यवस्थित चालतें. साक्षीदाराला शपथ घ्यावी लागते व तीमध्यें खोटी साक्ष दिल्यास फार भयंकर शिक्षा होईल असा धाक घातलेला असतो. लांच घेऊन न्यायाविरुद्ध निकाल न्यायाधीश देतात असेंहि बरेच वेळां घडतें. कित्येक दिवाणी दावे बराच काळ चाललेले असतात.

**तुरुंग.**—तुरुंगांत सर्वत्र अंधार व घाण सांचलेली असल्यामुळें ते अत्यंत भयंकर वाटतात. ज्यांनां तुरुंगांत टाकतात त्या लोकांनां तेथें दिवसा मोठीं कष्टाचीं कामें करावीं लागतात व रात्रीं सर्वांनां एकत्र एका मोठ्या लोखंडाच्या सांखळीनें इतकें घट्ट आंवळून बांधून ठेवतात कीं त्यांनां जरा सुद्धां हालतां येत नाहीं. त्यांनां अन्न म्हणजे फक्त मीठ व भाकर देतात. ज्यांनां कर्जामुळें कैद झालेली असते त्यांनां कर्जाची फेड केल्यास सोडून देतात.

**दिव्य.**—कित्येक फारच अवघड प्रकारचे खटले असल्यास त्यांत ईश्वरीन्याय अथवा दिव्याचा आश्रय करितात. कोणा दोन इसमांचें परस्पर भांडण झाल्यास त्या दोघांनांहि पाण्यांत टाकून देतात, किंवा उकळणाऱ्या तेलांत किंवा कथिलांत हात बुचकळावयास लावतात; आणि जो कोणी पाण्यावर अधिक काळ राहील किंवा त्या उकळणाऱ्या द्रव्यांत अधिक काळ हात बुडवून ठेवील त्याच्यासारखा न्याय देतात. तसेंच जेव्हां कित्येक इसमांवर चोरीचा आरोप असतो तेव्हां अशाच विचित्र पद्धतीनें न्याय करितात. त्या सर्वांनां वैद्याकडून वांतीचें औषध देतात व ज्याला प्रथम ओकारी येईल तो चोर असें ठरवितात. ही दिव्याची पद्धति भारतीयांपासून घेतलेली असण्याचा बराच संभव आहे.

**शिक्षा.**—या ठिकाणीं सयामी कायद्यांची संपूर्ण माहिती देण्यास अवकाश नसल्यामुळें लासेन यानें दिलेले त्यांतील कांहीं विशेष चमत्कारिक किंवा लहरी प्रकार दिसतात तेवढेच येथें देतों. जो कोणी देवळांतील सोन्याची किंवा रुप्याची मूर्ति चोरील किंवा वितळवील त्याला जिवंत जाळतात. जारकर्माचा गुन्हा क्वचित आढळतो; व हा गुन्हा शाबीत होईल त्या इसमाला हनुवटीवर तापून लाल झालेल्या लोखंडानें डाग देतात; गुन्हेगार नवऱ्यास किंवा बायकोस सोडून देण्याचा हक्क प्रतिपक्षाला असतो. पुरोहितवर्गापैकीं कोणी असला गुन्हा केल्यास त्याचा धार्मिक पोषाख काढून घेऊन त्याला छड्यांनीं फटके मारतात; व नंतर त्याला हत्तींकरतां खाणें जमविण्याचें काम करण्याची शिक्षा देतात. ही शिक्षा सक्तमजुरीच्या शिक्षेच्या तोडीचीच आहे; व या कृत्याला सर्वांत भयंकर गुन्हा मानतात. या गुन्ह्याला टा—फून म्हणतात. याला फार कडक शिक्षा ठेवून तो केला जाणार नाहीं असा बंदोबस्त केलेला असतो. असली शिक्षा झाल्यास तींतून कोणाची सुटका होत नाहीं किंवा माफी मिळत नाहीं. दुसरी अशीच एक मोठी लाजीरवाणी शिक्षा देत असतात तिला टा—व्हान असें म्हणतात. तिचा प्रकार असा किं, गुन्हेगाराच्या पायांत लोखंडी बिडी व गळ्यांत लांकडी खोडा घालतात व टाळ वाजवीत वाजवीत, कित्येक पोलिस अंमलदारांबरोबर राजधानींतून त्याला फिरवितात. ज्या ज्या वेळीं टाळ वाजविण्यांत येतात त्या त्या वेळीं त्यानें उभें राहून "मीं अमुक प्रकारचा गुन्हेगार आहें; माझें अनुकरण न करण्याची सावधगिरी ठेवा" असें लोकांनां मोठ्यानें सांगावें लागतें. असें करण्याला त्यानें कां कूं केल्यास, शिपाई त्याला चाबकाचे फटके देतात. लागोपाठ तीन दिवस राजधानींत व राजधानीसभोंवतीं त्याला अशा प्रकारें हिंडवण्यांत येतें. राजद्रोह व बंड करण्याबद्दल अलीकडे देहान्त शासन करण्यांत येतें. राज्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं काळजीपूर्वक चौकशी करून, आपली संमति दिल्यानंतरच देहान्त शिक्षा हुकूम देण्यांत येतो; नंतर ती शिक्षा राजापुढें मांडण्यांत येते;

बहुधा तो असली शिक्षा माफ करितो; त्यानें माफी न दिल्यास मांग त्या गुन्हेगाराला फांशी देण्याच्या जागीं घेऊन जातो; तेथें तरवारीनें त्याचा शिरच्छेद करण्यांत येतो किंवा भाल्यानें त्याचें शरीर भोंसकण्यांत येतें. नंतर तें प्रेत पक्ष्यांच्या भक्ष्यस्थानीं पडावें म्हणून, एका खांबाला बांधण्यांत येतें. चीनप्रमाणेंच येथेंहि लहानलहान गुन्ह्यांबद्दल वांबूच्या काठीनें मारण्याची शिक्षा असते. चोरांनां देण्यांत येणाऱ्या शिक्षेचा प्रकार खालीं दिल्याप्रमाणें आहे. चोराजवळून त्यानें नेलेल्या मालाच्या किंमतीच्या दुप्पट किंवा तिप्पट किंमत घेण्यांत येते. न्यायाधीश व दोन्ही पक्ष यांमध्यें ती रक्कम सारखी वांटून देण्यांत येते. कायद्याविरुद्ध कोणतीहि वस्तु घेतल्यास त्याला चोरी असें म्हणण्याची चाल सयाममध्यें आहे, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. दुसऱ्याचें वतन एखाद्यानें घेतल्यास त्याला तें परत द्यावें लागतें, इतकेंच नाहीं, तर त्याच्या दुप्पट किंमत द्यावी लागते; त्याचा अर्धा भाग न्यायाधिशाला व अर्धा भाग मूळ मालकाला देण्यांत येतो.

**स्वभाववर्णन.**—थई लोकांचें थोडेंसें स्वभाववर्णन देऊन, सयामच्या राजपद्धतीची ही संक्षिप्त माहिती पुरी करूं. त्यांच्या एकंदर स्वभावांत गुलामगिरीची वृत्ति दिसून येते; यामुळें सर्व वर्गाचे लोक अगदीं समानदर्जाचे आहेत असें दिसतें. सयामी लोक सरदारांची खुशामत करणारे असून ते नेहमीं आदरशील असतात; ते हट्टी व आळशी आहेत. इतर पूर्वेकडील उपभारतीय लोकांप्रमाणें त्यांनां आपल्या देशाबद्दल फाजील गर्व वाटत असल्यामुळें ते परकी राष्ट्रांनां तुच्छ मानतात. ते बढाईखोर असून, सोन्याच्या व चांदीच्या अलंकारांची त्यांनां आवड आहे. परंतु ते प्रामाणिक असून चौर्यकर्म करण्यापेक्षां मरण बरें असें त्यांनां वाटतें. ते नेमस्त व संयमी असून अगदीं आज्ञाधारक व शांतताप्रिय आहेत. त्यांचें कौटुंबिक वर्तन अनुकरणीय आहे; परंतु स्त्रियांच्या पातिव्रत्यास सयामी लोक फारसें महत्त्व देत नाहींत. शेतकी व उपयुक्त आणि ललित कला यांमध्यें त्यांची विशेष प्रगति झालेली नाहीं; तथापि या बाबतींतहि कांहीं कांहीं गोष्टींत त्यांनीं बरीच कुशलता दाखविली आहे. ज्योतिःशास्त्र व वैद्यकशास्त्र या दोनच शास्त्रांकडे त्यांनीं लक्ष दिलें आहे. गौतमाच्या धर्माचे ते कट्टे अनुयायी आहेत; सयाममध्यें गौतमाचें मुख्य स्थान असून त्या ठिकाणीं भिक्षूंचीं कित्येक देवळें व मठ आहेत. शिवाय, सयामी लोकांचें बौद्धधर्मविषयक उत्तम वाङ्मय आहे. सयामी लोकांच्या मनोवृत्तीवर ताबा असल्याबद्दल जरी तलपत्री लोक आनंद दर्शवितात तरी तिबेट व जपान या देशांप्रमाणें धार्मिक बाबतींत व कायदेकानूच्या बाबतींत या देशांतील राजावर त्या लोकांचें तितकें वर्चस्व नाहीं.

सयाममध्यें धार्मिक बाबी सर्वस्वीं राजाच्या ताब्यांत असून पुरोहितवर्ग त्याच्यावर अवलंबून असल्यामुळें लोकांवर जुलुम करण्यासाठीं तो त्यांचा उपयोग करतो वगैरे गोष्टींचा उल्लेख पूर्वींच केलेला आहे. शिक्षेच्या बाबतींत सयामी पुरोहितवर्गास कांहींएक विशेष हक्क दिलेले नाहींत; त्यांनीं एखादा गुन्हा केला तर त्यांच्या पवित्र आचरणामुळें ते अधिक दूषित होतात अशी त्यांची सयुक्तिक कल्पना आहे. ते पुरोहित असल्यामुळें त्यांच्या वरील खटला गृहस्थ लोकांच्या खटल्याप्रमाणें चालवितां येत नाहीं. त्यांचा प्रथम धर्माधिकारदर्शक पोषाख काढून घेण्यांत येतो व अशा रीतीनें त्यांचा अधिकार निघाल्यानंतर त्यांनां सामान्य न्यायासनाच्या स्वाधीन करण्यांत येतें.

---

## प्रकरण ६ वें.

### यावद्वीप संस्कृति.

आतां बलि, लॉंबाक व जाव्हा या तीन द्वीपांची साकल्यानें माहिती देतों. हीं बेटें एका संस्कृतीचाच विभाग आहेत. या संस्कृतीस यावद्वीपसंस्कृति म्हणणें रास्त होईल. कां कीं यांचें केंद्र यवद्वीप होतें. या तीनहि बेटांचा इतिहास एकमेकांशीं संबद्ध आहे; फरक एवढाच कीं, गेल्या चारशें वर्षांत जाव्हा बेटाचें हिंदुत्व नष्ट होऊन तें मुसुलमानी बेट बनलें आहे आणि तें डच लोकांच्या ताब्यांत गेलें आहे. जाव्हा येथील स्त्रिया अद्यापि हिंदूंचे धर्म पाळतात आणि पुरुष मुसुलमानी धर्म पाळतात असें श्रीमंत इचलकरंजीकरांच्या बरोबर गेलेले पुण्याचे डॉ. सरदेसाई म्हणतात. जाव्हा या बेटाचें मूळ नांव यवद्वीप हें आहे. यव हें डच भाषेंत 'Java' असें लिहिलें जातें. आणि डच भाषेंत त्याचा उच्चार 'यावा' असा होतो, कां कीं जर्मन व डच भाषांमध्यें 'य' हा उच्चार लिहिण्याकरितां 'J' हें अक्षर वापरतात. डच लोकांनीं 'यावा' लिहिण्यासाठीं Java अशीं अक्षरें वापरलीं त्याचा इंग्रजी उच्चार 'जाव्हा' झाला. तोच उच्चार इंग्रजी शिकलेल्यांच्या मराठींत आला आहे. बलि व लॉंबाक या बेटांतील हिंदुत्वाचे परिणाम एका वाक्यांत सांगण्यासाठीं असें म्हणतां येईल कीं, या बेटांत चातुर्वर्ण्य अजून कायम आहे. तेथील लोकांत वेदाविषयीं पूज्यबुद्धि आहे, तथापि वेदपठण तेथें फारसें नाहीं. तेथील लोकांचा महत्त्वाचा ग्रंथ म्हटला म्हणजे ब्रह्मांडपुराण होय.*

बलि बेटामध्यें कांहीं भाग डच लोकांच्या ताब्यांत आहे, आणि कांहीं संस्थानें अजून स्वतंत्र आहेत. बलि बेटांतील हिंदूंची वसति ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकांत झाली असावी, असा अर्वाचीन डच संशोधकांचा तर्क आहे. बलीशेजारचें बेट लॉंबाक याचें तद्देशीय नांव 'ससक' असें आहे. ससक

* बलि बेटांत अवगत झालेल्या ब्रह्मांडपुराणाची हिंदुस्थानांतील ब्रह्मांडपुराणाशीं तुलना करण्याची डॉ॰ फ्रेडरिक यांची इच्छा होती, पण त्यांस हिंदुस्थानी ब्रह्मांडपुराण त्या वेळीं उपलब्ध झालें नाहीं. १९०४ सालीं हिंदुस्थानी ब्रह्मांडपुराण व्यंकटेश्वर छापखान्यानें प्रसिद्ध केलें. तदनंतर १९११ सालीं डॉ॰ फ्रेडरिक यांची बली बेटांतील प्रत तुलनेसाठीं मिळविण्याचा प्रयत्न डॉ॰ केतकर यांच्यासाठीं इंडिया-ऑफिसनें केला, पण इंडिया-ऑफिसला तें पुस्तक मिळविण्याच्या बाबतींत यश आलें नाहीं.

बेटांतील लोकांस 'ससक' असेंच म्हणतात, आणि ससक बेटांतील भाषा बलि भाषेशीं सदृश आहे. ससक लोक व बलि बेटांतील लोक हे एकाच मानववंशांतील आहेत; तथापि त्यांच्यांत असा एक फरक आहे कीं, ससक हे मुसुलमान आहेत व बलि बेटांतील लोक हिंदु आहेत. ससकांची लोकसंख्या सुमारें तीन लक्ष वीस हजार आहे. ससक बेटांतीलच बलिद्वीपस्थ हिंदूंची संख्या ५० हजार आहे, असें ब्रिटानिका म्हणतो पण ती माहिती ताडून पाहतां येत नाहीं. तेथील आंकड्यांसंबंधानें एकंदर फारच घोंटाळा आहे.

**स्थूल अवलोकन.**—१९ व्या शतकाच्या प्रारंभीं बलिद्वीपांतील हिंदूंनीं ससकांवर स्वारी करून त्यांस जिंकलें आणि ससक हें बेट बली बेटांतील हिंदु राजांचें मांडलिक १८३९ सालीं झालें. इ. स. १८९४ सालीं डच लोकांनीं ससक बेटावर स्वारी करून तेथील हिंदूंचें वर्चस्व नष्ट केलें आणि तेव्हांपासून आतांपर्यंत तें डच लोकांच्या ताब्यांत आहे.

यवद्वीपाचा हिंदुस्थानच्या इतिहासाशीं पुष्कळ संबंध येतो. तेथील हिंदु राजघराण्यांचा लग्नसंबंध सिंहलद्वीपांतील हिंदु राजघराण्यांशीं होत असे व राजकन्यांच्या प्राप्त्यर्थं लढायाहि होत असत, हें एका प्राचीन अरब प्रवाशानें लिहून ठेविलें आहे. (इलियटच्या 'इतिहाससाधनांचा पहिला खंड' पहा.) जाव्हा, बलि येथील ग्रंथांच्या भाषेला 'कवि' असें म्हणतात. कवि भाषेमध्यें भारतयुद्ध, अर्जुनविवाह इ० अनेक ग्रंथ आहेत, व जावानीज लोकांच्या कायद्यांचे मूळ ग्रंथ हिंदुच आहेत आणि आज लोक जरी मुसुलमान झाले आहेत, तरी ते पूर्वीचा हिंदु कायदाच वापरतात. मुसुलमान झाल्यामुळें जावानीज लोकांची सुधारणा झाली असें नव्हे. कां कीं, आज ते इतके दुर्बल आहेत कीं, प्राचीन मोठमोठालीं हिंदु देवालयें पाहून अर्वाचीन जावानीज हीं कांहीं मानवी कृत्यें नाहींत असें समजतात. जावामधील कांहीं गांवांचीं आणि संस्थानांचीं नांवें देखील तेथील हिंदु संस्कृतीचे अवशेष आहेत. उदाहरणार्थ, इंद्रमय हें गांव आणि सुरकर्ता आणि जुग्जकर्ता (युद्धकर्ता) हीं संस्थानें लक्षांत घ्यावींत. जावानीज जरी मुसुल्मान झाले आहेत तरी तेथें ससक, सेलिबिस इत्यादि बेटांमध्यें असलेल्या मुसुलमानांप्रमाणें त्यांचा मुसुलमानीपणा दुर्बल आहे; म्हणजे त्यांच्यामध्यें पुष्कळ जुनीं दैवतें शिल्लक आहेत; आणि त्यांच्या चालीरीति इतर मुसुलमानांहून बऱ्याच भिन्न आहेत.

**एतद्विषयक अज्ञानाची सीमा.**—या द्वीपांतील अर्वाचीन सामाजिक स्थितीविषयीं आपणांस जवळजवळ कांहींच माहिती नाहीं असें म्हणावें लागेल. अर्वाचीन स्थितीविषयीं ग्रांथिक माहिती फार सदोष आहे. बलि आणि लाँबाक या बेटांमध्यें अर्वाचीन भारतीयांचें गमन कितपत होतें याचे आंकडे मिळत नाहींत. एकंदर एशियांतील डच मुलखांत गेलेल्या इतर एशियाटिकांचा हिशोब देतांना ५,६३,००० चिनी, २९,००० अरब आणि २३,००० एशियांतील इतर लोक असा हिशोब 'स्टेट्स्मन्स इअर बुक' (१९१९) देतें.

तद्देशस्थ हिंदूंचे आंकडे मुळींच मिळत नाहींत. बलि आणि लाँबाक बेटांतील लोकवस्तीचे आंकडे बरेच अनिश्चित आहेत. ३१ डिसेंबर १९०५ रोजीं जी शिरोगणती झाली तींत या बेटांची लोकसंख्या ५,२३,५३५ अशी दिली आहे आणि त्या आंकड्यांवर 'अजमासानें' असा शेरा स्टेट्स्मनच्या वार्षिकानें मारला आहे. पुढें बारा वर्षांनीं म्हणजे ३१ डिसेंबर १९१७ सालचा जो सरकारी अंदाज केला त्याचा आणि पूर्वीच्या शिरोगणतीचा कांहींच मेळ बसत नाहीं. त्या दिवसाच्या लोकसंख्येचा अंदाज १३,४४,८८० असा केला आहे. एवढी मोठी तफावत ज्या आंकड्यांत दिसून येते त्यांची विश्वसनीयता किती समजावी हें लिहावयास नकोच.

सेलिबिससंबंधानें तीच भानगड आहे. सेलिबिस बेटांतील सेलिबिस विभागाची लोकसंख्या ३१ डिसेंबर १९०५ मध्यें जर ४ लक्ष भरते तर बारा वर्षांनीं २३ लक्ष भरते. इतक्या मौजेचे आंकडे इतरत्र मिळतील काय?

बलि बेटांतील हिंदूंच्यासंबंधानें कांहींच माहिती 'स्टेट्स्-मन्स इयर बुक'मध्यें मिळत नाहीं. डच ईस्टइंडीजमध्यें बहुतेक लोक मुसुलमान आहेत, कित्येक दशलक्ष नवीन बनविलेले ख्रिस्ती आहेत आणि थोडेसे बौद्ध आहेत एवढीच माहिती दिली आहे. हिंदूंच्या अस्तित्वाविषयीं माहिती चोहोंकडून मिळत असतां या "माहिती"चा अर्थ काय करावयाचा हें एक कोडेंच आहे.

यावद्वीप संस्कृतीची जी माहिती आम्हीं येथें देणार तींत अर्वाचीन माहितीचा जवळजवळ अभाव असेल. सुमारें ऐशीं वर्षांपूर्वी झालेलें सामाजिक संशोधन आणि होतां होईतों आजपर्यंतचें वाङ्मयविषयक आणि ऐतिहासिक संशोधन यांच्या पलीकडे आम्हांस फारसें जातां येणार नाहीं.

जावाच्या इतिहासाचे तीन भाग पडतात. हिंदुसत्तेचा काल, मुसुलमानी सत्तेचा काल व यूरोपीय सत्तेचा काल. हिंदुसत्तेच्या कालाचेहि तीन भाग पडतात. पहिला काल म्हणजे बौद्ध प्रामुख्याचा, दुसरा शैवप्रामुख्याचा व तिसरा दोहोंच्याहि धर्मांच्या व समजुतींच्या एकीकरणाचा काल. दोहोंचें एकीकरण झालें आहे तेंहि मजेदार रीतीनें झालें आहे. त्यांत बुद्ध ही देवता मान्य होऊन तिला शिवाचा धाकटा भाऊ केलें आहे, अशा तऱ्हेचीं विधानें पुष्कळ संशोधकांच्या लेखांतून आढळतात, आणि ब्रिटानिकानें तींच उद्धृत केलीं आहेत. त्या विधानांचें परीक्षण पुढें होईलच. हिंदूंचा व बुद्धाच्या संप्रदायाचा इतिहास या द्वीपसमूहाच्या इतिहासाशीं संबद्ध आहे एवढें मात्र खरें. या द्वीपाचा

राजकीय इतिहास देखील आपणांस अवश्य आहे. जावा येथें हिंदूंचीं राज्यें अनेक होतीं त्यांत मयपहित हें संस्थान फार मोठें होतें; आणि हें संस्थान पुढें वाढत जाऊन यानें जावांतील इतर संस्थानांवर तावा चालविला एवढेंच नव्हे, तर इतर आसपासच्या बेटांवरहि तावा चालविला. या माहिती-वरून यावद्वीप इतिहासाचा प्रदेश व त्याचें क्षेत्र लक्षांत येईल.

**समाजव्यवस्थाः**–समाजांत चार वर्ण आहेत ही भावना बलिद्वीपांत अजूनहि आहे. चातुर्वर्ण्य तेथें भारतीय समाजा-पेक्षां अधिक प्राचीन स्वरूपांत सांपडतें व तें चातुर्वर्ण्याच्या मूळकल्पनेस धरून आहे. चार वर्ण हेच समाजाचे वर्ग आहेत त्यांकडे लक्ष द्यावयाचें आणि जातींकडे लक्ष द्यावयाचें नाहीं ही भावना तेथें आज जितकी स्पष्ट आहे तितकी भारतीय समाजांत नाहीं. आपलेकडे चार वर्ण नसून दोनच वर्ण आहेत ही कल्पना वाढली आणि वर्णविषयक भावना प्रज्वलित होऊन जातिविषयक भावनांस दुर्बल करावयाची क्रिया झाली नाहीं. आपलेकडे वर्ण म्हणजेच जाती ही कल्पना लोकांच्या डोक्यांत शिरून धर्मशास्त्रांतर्गत तत्त्वांस बाजूस ठेवण्याचें कार्य करीत आहे.

मन्वादि धर्मशास्त्रकारांनीं उपदेशिलेलें आणि बलिद्वीपांत चालू असलेलें चातुर्वर्ण्य यांत मुख्य फरक हाच आहे कीं, ब्राह्मणादि वर्णांनीं खालच्या वर्णांच्या स्त्रियांशीं लग्नें लाविलीं तर त्यांच्या पुत्रांचा वर्ण बापाच्या वर्णाहून निराळा आहे असें धर्मशास्त्रकार सांगतात. बलिद्वीपांतील रिवाजाप्रमाणें त्यांचा वर्ण बापाचाच जो असेल तो राहतो. ब्राह्मण किंवा क्षत्रिय वर्णांच्या स्त्रियांनीं खालच्या वर्णांच्या पुरुषांबरोबर प्रेमसंबंध जुळविला तर दोघांसहि मृत्यूची किंवा मृत्युकल्प शिक्षा होते. नेपाळांत ब्राह्मण आणि वैश्या यांच्या पुत्रास क्षत्रियत्व प्राप्त होतें. या दोन टोकांच्या दोन नियमांवरून अशी शंका येते कीं ब्राह्मण व इतर वर्णांच्या स्त्रिया यांच्या लग्नांपासून झालेल्या संततीस कसें काय लेखावें या संबंधाचें मत सर्वमान्य तरी नव्हतें किंवा ग्रंथकाराचा मिश्रविवाहाच्या संततीची व्यवस्था लावण्याच्या हेतूपेक्षां नवीन ठाऊक झालेल्या जातीच्या उत्पत्तीसंबंधाचें इतर स्पष्टीकरणाच्या अभावीं कांहीं तरी स्पष्टीकरण द्यावयाचें असा इरादा होता.

वर्णानुक्रमानें समाजांत पदवी जावामध्यें प्राचीनकाळीं होती हें उघड आहे. बलिद्वीपांत अजूनहि ती आहेच. व्यक्तींचें पुष्कळ लहानसहान बाबतींत वर्णविशिष्ट समाजांतील स्थान शिष्टसंप्रदायांच्या नियमांनीं व्यक्त होतें.

बलिद्वीपामध्यें ब्राह्मण ज्या खालच्या जातींचा तिरस्कार करितात त्यांत मुसुलमानी संप्रदाय वाढत आहे असें कॅवेंटन म्हणतो. आणि तेथील ब्राह्मण ब्राह्मणेतर जातीच्या स्त्रियांशीं लग्नें करीत असल्यामुळें समाजाचें एकीकरण व्हावयास बरीच मदत झाली आहे असेंहि सांगतो.

**भारतीय संस्कृतीचा यवद्वीपांत जो प्रसार झाला, तो केव्हां झाला, आणि कोणी केला, आणि कोणत्या प्रयोजनामुळें झाला हे प्राचीन यावद्वीप संस्कृतीच्या अभ्यासांतील पहिले प्रश्न होत. आणि ते प्रश्न सोडविण्यासाठीं आपणांस त्यांच्या भारतीय संस्कृतीचा आणि मुख्य भारतीय संस्कृतीचा तौलनिक अभ्यास केला पाहिजे. त्या तौलनिक अभ्यासाचीं (१) भाषेचें परीक्षण (२) ग्रंथांची तुलना (३) आचारांची व उपास्यांची तुलना (४) समाजव्यवस्थेची तुलना हीं उपांगें आहेत.**

**या संस्कृतीच्या अभ्यासाची स्थिति.**—जावा येथील हिंदुसंस्कृतीच्या प्रसाराचा इतिहास जितका अभ्यासा-वयास पाहिजे तितका अभ्यासला गेला नाहीं. भारतीय संशोधनाशीं डच लोकांतील पौरस्त्य विषयावरील पंडित जितके परिचित असावेत तितके दिसत नाहींत. त्यामुळें यांच्या ग्रंथांतून पुष्कळ मागसलेल्या पांडित्याचीं दर्शक विधानें दृष्टीस पडतात.

यवद्वीपांत अनेक शिलालेख आहेत त्यांपैकीं कांहींचा अर्थहि लावला गेला आहे. तथापि जावा बेटांतील वाङ्मयाचें सूक्ष्म परीक्षण व्हावयास पाहिजे; पण वाङ्मयाकडे लक्ष नुकतेंच कोठें जाऊं लागलें आहे. तेथें उपलब्ध झालेल्या नवीन माहितीचे धागे हिंदुस्थानी माहितीशीं जोडण्याचें कांम अजून बाल्यावस्थें-तच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. डॉ० फ्रेडरिक, डॉ० ब्रँडिस, डॉ० ग्रूट व डॉ० कर्न यांसारखे पंडित भारतीय वाङ्मयाशीं परिचित व जावा बेटांतील वाङ्मयाशीं पूर्ण परिचित दृष्टीस पडतात. तथापि हा पंडितवर्ग फार अल्प आहे हें कबूल केलेंच पाहिजे. हिंदुस्थानामध्यें महाराष्ट्रांत या विषयाकडे लक्ष ओढण्याचें कार्य थोडेंसें डॉ० सरदेसाई यांनीं केलें पण महाराष्ट्राबाहेर तें मुळींच झालें नाहीं. यूरोपीय अभ्यासकांच्या लेखांतील निरनिराळे तुकडे जमा करून आम्हास जेवढी माहिती मिळाली तेवढी आम्ही पुढें मांडित आहों.

जावामध्यें शालिवाहन शक चालतो, आणि शालिवाहना-विषयीं दंतकथा बऱ्याच निराळ्या प्रकारानें तेथें दिसून येतात. त्यांची अशी कल्पना आहे कीं, ख्रिस्ती शकाच्या ७५ व्या वर्षाच्या सुमारास म्हणजे शालिवाहन शकाच्या आरंभाच्या पूर्वी दोन तीन वर्षें आदिशक नांवाचा कोणी तरी द्वीपविजेता येऊन गेला असावा. त्या आदिशकाचा अशोकाशीं अक्षर-सादृश्यावरून संबंध जोडण्याचा प्रयत्न केला आहे. पंधराव्या शतकाच्या शेवटास जावा मुसुलमानांकडून जिंकलें गेलें. म्हणजे सुमारें चवदाशें वर्षांचा इतिहास हा जावांतील हिंदूंचा इतिहास होय.

**यावद्वीप संस्कृतीच्या अभ्यासाचा प्रारंभ.**— इ. स. १८४६ मध्यें डच हिंदुस्थानच्या सरकारनें ज्या वेळीं बलिलिंग येथील सुलतानावर फौज पाठविली त्या वेळीं त्या स्वारीबरोबर आर्. फ्रेडरिक नांवाचा एक मनुष्य गेला होता. त्यानें संस्कृत भाषेचा अभ्यास केलेला होता; आणि या ज्ञानाचा उपयोग त्यानें जावाकडील प्राचीन भाषांचें ज्ञान मिळविण्याच्या कामीं केला. तो कांहीं दिवस बलिद्वीपांत राहिला. तेथें त्यानें बरीच मेहनत घेऊन कांहीं हस्तलिखित ग्रंथ मिळविले आणि शब्दशास्त्रविषयक अभ्यासाच्या बाबतींत तेथील पुरोहितवर्गांचें साहाय्य घेऊन त्यांच्या धर्माचें बरेंचसें ज्ञान संपादन केलें. या सर्व संशोधनाचा सारांश त्यानें बटेव्हिया येथील संशोधक संस्थेच्या नियतकालिकांत* अहवालरूपानें प्रथम प्रसिद्ध केला. याचा पहिला भाग सिंगापुर येथील नियतकालिकांत त्याच सुमारास प्रसिद्ध झाला होता.† या दुसऱ्या नियतकालिकावरून व Tijdschrift या नांवाच्या जावामध्यें निघणाऱ्या नियतकालिकावरून वेबर यानें आपल्या Indische Studien Vol II या ग्रंथांत यासंबंधीं माहिती दिली आहे. हा फ्रेडरिकचा स्वतःचा लेख रॉयल एशियाटिक सोसायटीच्या नियतकालिकांत प्रसिद्ध झालाच आहे. तो अहवाल, वेबरचा लेख, लायडन युनिव्हरसिटींतील जावानीज आणि बलिनीज हस्तलिखितांची डच यादी, ब्रँडिस याचा जावानीज शब्दकोश या प्रकारच्या साहित्यावरून आपणांस सुमारें पांचशें ग्रंथांचा पत्ता लागतो. या प्रकारच्या साहाय्यावरून पुढील मजकूर तयार केला आहे.

फ्रेडरिकच्या अहवालास 'बलिद्वीपासंबंधीं थोडी माहिती' अशा अर्थाचा मथळा असून त्यांत तीन भाग आहेत. (१) भाषा आणि वाङ्मय (२) संप्रदाय, पंथ, संस्कार, प्रेतविधि इ. (३) जाती व राजघराणीं.

प्रथमतः फ्रेडरिकनें घेतलेल्या पहिल्या विषयाचाच विचार करूं. म्हणजे फक्त जावा व बलि या द्वीपांतील भाषा आणि वाङ्मय यांसंबंधींच उपलब्ध माहिती विचारास घेऊं.

बलिद्वीपांत दोन लौकिक म्हणजे प्रचारांतील बोलण्याच्या भाषा आहेत आणि दोन पण्डिती म्हणजे लेखनाच्या भाषा आहेत.

(१) मूळच्या देश्य रहिवाशांची भाषा, मलायी, सुदानी व इतर जावाच्या पूर्वेकडील पॉलिनेशियांतील भाषांसारखीच असून त्यांच्याशीं संबद्ध आहे.

(२) जावानी ग्रांथिक भाषा ही सध्याच्या जावानी भाषेपासून अगदीं निराळी असून जावांत मुसुलमानांचा प्रवेश झाल्यामुळें सुमारें ४०० वर्षांपूर्वी जे हिंदु लोक बलिद्वीपांत गेले त्यांनीं या भाषेचा तेथें प्रचार केला व ही त्यांची लौकिक म्हणजे बोलण्याची भाषा होती.

(३) कवि व (४) संस्कृत या दोन्ही भाषाहि जावांतून हिंदु लोकांनीं बलिद्वीपांत नेल्या.

जे हिंदु व विशेषतः ब्राह्मण जावा बेटांत आले त्यांनीं आपल्या धर्मशास्त्रविषयक ग्रंथांबरोबर संस्कृत भाषा आणली; परंतु त्या लोकांची बोलण्याची भाषा एखादी प्राकृत पोटभाषा असली पाहिजे. कारण ज्या कालीं म्हणजे ख्रिस्ती शकाच्या पांचव्या शतकांत ते जावा बेटांत आले त्या कालीं भरतखंडांत संस्कृत भाषा जर कदाचित् कधीं काळीं बोलण्याची भाषा असलीच तर ती प्रचारांतून गेल्यास निदान १००० वर्षें होऊन गेलीं होतीं. उत्तरकालीन वसाहतीच्या कल्पनेविरुद्ध एक शक्य प्रमाण म्हणून वेबरनें पुढें आणलें आहे तें हें कीं पॉलिनेशियांतील भाषांमध्यें एकहि प्राकृत शब्द आढळत नाहीं. त्याप्रमाणें कविभाषेंतील भारतीय शब्दांत प्राकृत भाषेचीं चिन्हें शब्दांचें मिश्रण होऊन, त्यांचीं लघुरूपें होऊन, किंवा त्यांतील कांहीं अक्षरांचा लोप होऊन इत्यादि प्रकारांनीं घडून आलेलीं दिसत नाहींत. त्याचेंहि पुढें वेबरनें खंडन केलें आहे. तो म्हणतो जर जावामध्यें आलेल्या भारतीयांची भाषा प्राकृत असेल, आणि ती तशी असावी असें अनुमान त्यांच्या आगमनाच्या कालावरून करतां येण्यास हरकत नाहीं, तर ती त्यांनीं जावामध्यें आल्यावर टाकून देऊन जावामधीलच देश्य लौकिक भाषेचा स्वीकार केला असला पाहिजे; आणि या गोष्टीस त्यांचें अल्पसंख्याकत्व कारण झालें असेल. याशिवाय ही एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, भारतीय पंडितांच्या दृष्टीनें प्राकृत भाषांचें महत्त्वच नव्हतें. पंडित वाङ्मय संस्कृतमध्येंच असे आणि प्राकृत भाषेचा आश्रय व्यवहाराकरितां करीत पण प्राकृत भाषा त्यांच्या दृष्टीनें सोंवळ्या नसून ओंवळ्या होत्या.

जावामध्यें ऐतिहासिक ग्रंथ थोडेबहुत आहेत, पण त्यांचा ऐतिहासिक अर्थ लावला गेला नाहीं. जो कांहीं अर्थ लावला गेला आहे त्यावरून हे ग्रंथ बरेचसे अविश्वसनीय असावेत आणि संशोधनाच्या कामास निरुपयोगी असावेत अशी समजूत झाली आहे.

हिंदु संस्कृतीचें जावा येथील स्वरूप आपणांस समजून आलें म्हणजे संस्कृतीचा प्रसार कसा काय होत होता त्याचें स्वरूप समजतें. जावा येथील भारतीयत्वाचे धागे आपणांस समजण्यासाठीं आपण जावांतील संस्कृतीचीं निरनिराळीं अंगें तपासलीं पाहिजेत. प्रथमतः हिंदुस्थानाशीं ऐतिहासिक संबंध जावा येथील ग्रंथ आपल्या वाङ्मयांत कोणत्या तऱ्हेनें व्यक्त करतात तो पाहूं.

* Verhandlungen der Batavischen Gesellschaft. † Journal of the Indian Archipalago 1849. Published by Logan in Singapore.

एक संबंध म्हटला म्हणजे आपले पूर्वज हिंदुस्थानांतून आदिशकावरोबर आले अशी भावना त्यांनीं ठेविली होती हा होय. यवद्वीपाचा हिंदुस्थानाशीं एकसारखा संबंध दाखविणारे उल्लेख तपासून अजून काढले गेले नाहींत.

जावा येथील इतिहासग्रंथ हिंदुस्थानांतून जावामध्यें झालेल्या प्रयाणाची माहिती देत नाहींत किंवा त्या विषयावर ग्रंथहि नाहींत. बलिद्वीपांत एक ब्राह्मण पहिल्या प्रथम गेला त्याचें नांव "निरर्थ" म्हणून प्रसिद्ध आहे, आणि त्याच्या नांवावर एक काव्यसमुच्चय खपत आहे, त्यास हन्यंग निरर्थ हें नांव आहे.

जावा येथील हिंदूंच्या संस्कृतीचे ठसे सामुच्चयिक आयुष्यक्रमाच्या ज्या अनेक अंगांवर दिसून येतात तीं अंगें येणेंप्रमाणें:—

राज्यव्यवस्था हिंदुस्थानांत आणि जावा येथें सारखीच होती असें दिसतें. राजा, महिषी व इतर राण्या हें स्वरूप भारतीय राजगृहाचें आहे तसेंच राजा आणि अनेक मंत्री यांनीं संयुक्त अशी राज्यव्यवस्था हें स्वरूप हिंदुस्थानी दरबाराचें आहे. जावामध्यें हेंच दिसून येतें. एवढेंच नव्हे, तर अनेक राज्यांतील अधिकाऱ्यांचीं नांवें देखील भारतीय आहेत. नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या "नागरकृतागम" नांवाच्या जावानीज काव्यांत अशीं त्रेचाळीस नांवें आलीं आहेत. अमात्य, मंत्री, पुरोहित, धर्माध्यक्ष हीं नांवें आपणांस परिचित दिसतात. अधिकारपदाचीं अनेक नांवें तर संस्कृत शब्दापासून झालेलीं दिसतात. जाव्हा येथील राजकार्ये कांहीं अंशीं भिन्न असणार आणि त्यामुळें कांहीं अधिकाराचीं नवीन नांवेंहि उत्पन्न होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, "जलधिमंत्री" हें पद घ्यावें. हिंदुस्थानांतील समुद्रकांठ नसलेल्या संस्थानांस एक जलधिमंत्री ठेवण्याची जरूर नाहीं हें उघड आहे. प्रत्येक अधिकाऱ्याचे अधिकार कोणते होते हें सांगण्यास अधिक खोल संशोधन झालें पाहिजे. आम्ही येथें त्या ग्रंथांतील अधिकाऱ्यांच्या नांवांची यादी देऊन मोकळे होतों.

अध्यक्ष, अमात्य, आत्मराज, आधिमंत्री, आर्य्य, उपपत्ति, कण्डमोहि, कनुरुहन्, गुप्ति, जलधिमंत्री, तंगर, तण्ड, तुमेंग्गुंग, देमुंग, धर्माध्यक्ष, पञ्जि, पतिः, पमेगेत, पुरोहित, मंधुरि, मञ्चनगर, मंत्री, मंत्रिहरह्जि, महागुरु, महाधिकार, युवमंत्री, रंग, राजपराक्रम, राजाध्यक्ष, राणाधिकार, रामाधिराज, वंग्शाधिराज, वदन, वद्वहजि, वीरप्राण, वीरमंडलिक, वीराधिकार, वृद्धमंत्री, शूराधिकार, सिंघाधिकार, सुजनोत्तम, सुधर्म्मोपपत्ति, स्थापक.

धर्माध्यक्ष आणि महागुरु हे दोन अधिकारी निरनिराळे होते हें वरील यादीवरून दिसून येईल. धर्माध्यक्षाचें काम न्यायाचें होतें हें त्या ग्रंथांत आलेल्या वर्णनावरून दिसतें. महागुरु हा राजाचा केवळ पारमार्थिक हित पहाणारा अधिकारी असे.

पारमार्थिक व शास्त्रीय विषयांच्या बाबतींत तेथील लौकिक भाषेंत तुल्य अगर मुळींच शब्द नसल्यामुळें तेथील लौकिक भाषेंत शब्दांची भर घालणें अवश्य झालें. अशा रीतीनें पारमार्थिक उपदेशकांनीं वरचेवर उपयोगिलेले संस्कृत शब्द तेथील लोकांस हळू हळू परिचित होत जाऊन अनेक संस्कृत शब्द तेथील भाषेंत शिरले. भारतीय प्राकृत भाषेचा पगडा जावानीज लोकांवर पडला नाहीं याचें श्रेय वेबरनें बौद्धांस दिलें आहे. तो म्हणतो कीं, जेथें बौद्ध जाऊन राहत तेथें तद्देशीय लोकांशीं तादात्म्य पावत, आणि आपलेपणा त्यांवर गाजवीत नसत. बौद्धांनीं अशी चाल घातली त्यामुळें पुढें ब्राह्मणांनां भारतीय भाषा जावा येथील लोकांवर लादतां आल्या नाहींत. बौद्ध डेमोक्रेटिक् ( उदारवृत्ति ) होते आणि ब्राह्मण अरिस्टोक्रेटिक ( अहंकारवृत्ति ) होते, या पूर्वकालीन निराधार समजुतीस बळी पडून वेबरनें हीं विधानें केलीं आहेत. हीं विधानें अनेक चुकांनीं भरलीं आहेत. त्यांतील मुख्य येणेंप्रमाणें:—

बौद्ध ज्या ज्या ठिकाणीं जातील त्या त्या ठिकाणच्या देश्यभाषांचे ते ब्राह्मणांपेक्षां अधिक अभिमानी होते असें दिसत नाहीं. ब्राह्मण संस्कृतचा प्रसार करीत तर बौद्ध पाली भाषेचा प्रसार करूं पहात. तथापि या प्रयत्नांत त्यांस यश येत नसे एवढेंच. कां कीं, बौद्ध ग्रंथ म्हणजे भारतीय संस्कृतीचा केवळ एक अंश होय. त्यांतील पौराणिक पुरुषांचे, नक्षत्रांचे, भैषजांचे, छंदांचे उल्लेख समजण्यास संस्कृत ग्रंथांशिवाय गति नाहीं, आणि त्यामुळें बौद्धांस देखील संस्कृत ग्रंथांचा परिचय करून घ्यावा लागे आणि संस्कृत भाषा पसरवावी लागे. संस्कृत शब्द म्हणजे मूळ किंवा शुद्ध आणि प्राकृत शब्द अशुद्ध किंवा लौकिक होय अशीच कल्पना जेथें असते तेथें प्राकृत शब्दाच्या ऐवजीं संस्कृत शब्दच वापरण्याची प्रवृत्ति होणार. पाली भाषेनें ज्या प्रदेशावर फार मोठी छाप टाकली असा प्रदेश म्हणजे सिंहलद्वीप होय. पण तेथील वाङ्मयांत देखील पाली शब्दांऐवजीं संस्कृत शब्दच वापरण्याकडे फार प्रवृत्ति दिसते, हें सिंहली भाषेचा एक देखील नमुना ज्यानें पाहिला असेल त्यास सहज दिसून येईल. संस्कृत भाषेचा द्वेष करावयाचा आणि होतां होई तों तिच्यांतील शब्द येऊं द्यावयाचे नाहींत ही वृत्ति ठेवल्याखेरीज प्राकृत शब्दांऐवजीं संस्कृत शब्द शिरल्याशिवाय राहणार नाहींत, मग लेखक बौद्ध असो अगर ब्राह्मणानुयायी असो.

बौद्ध यवद्वीपांत अगोदर गेले आणि ब्राह्मण नंतर गेले असें खात्रीपूर्वक म्हणतां येत नाहीं.

आर्यांचा प्रसार बौद्ध संप्रदायापूर्वीच सिंहलद्वीपांत झाला होता. यवद्वीपांत झालेलें गमन कोणच्या काळचें होतें याविषयीं खात्रीपूर्वक माहिती देतां येत नाहीं. सिंहलद्वीपांत प्रयाण आणि यवद्वीपांत प्रयाण हे प्रश्न अगदीं निरनिराळे

आहेत. सिंहलद्वीपांत आर्य जातीचे लोक जाऊन त्यांनीं वसाहत केली असावी आणि ती देखील इतक्या प्राचीन-काळीं केली असावी कीं, ब्राह्मणी संस्कृति आणि ब्राह्मणी जातहि उदयास आली नसावी. लंकाद्वीपांत जें प्रयाण झालें तें हिंदुस्थानांतील दक्षिण भाग आर्यांनीं तुडविण्यापूर्वी झालें असें गृहीत धरलें आहे. जर आर्यांबरोबर ब्राह्मण गेले असते तर त्यांची जात स्वतंत्रपणें सिंहलद्वीपांतील सिंहली समाजांत आजपर्यंत असती पण तशी असल्याचें दिसत नाहीं. आर्यांमधील ब्राह्मण या वर्णास जातीचें स्वरूप येण्यापूर्वी म्हणजे खिस्तीशकापूर्वी सुमारें कमींत कमी १००० वर्षें आर्यांची सिंहलद्वीपांत वसाहत झाली, आणि त्या समाजांतील पुरोहित-वर्गास आपलें पृथक्त्व निर्माण करण्यामध्यें यश आलें नाहीं.*

यवद्वीपांतील स्थिति निराळ्या प्रकारची आहे. तेथील वसाहत बरीच उत्तरकालीन झाली असावी. भारतीय संस्कृतीचें स्वरूप आणि यावद्वीप संस्कृति या दोहोंस सामान्य अशी भारतीय संस्कृति ज्या कालीं असेल त्या कालीं प्रयाण झालें असावें असा एक पक्ष घेतां येईल, आणि या दृष्टीनें या दोहोंची तुलना विशेष फलप्रद आहे.

अर्वाचीन भारतीय संस्कृतीपासून भिन्न अशीं यावद्वीप संस्कृतीचीं स्वरूपें आणि भारतीयांच्या स्थलांतराच्या कालाच्या निदर्शक गोष्टी येणेंप्रमाणें:—

(१) यवद्वीपांत चातुर्वर्ण्य हें जिवंत समाजघटनातत्त्व होतें आणि जातिभेदाच्या तीव्रत्वाखालीं या तत्त्वाचा मृत्यु झाला नव्हता आणि तें तत्त्व शुद्ध स्वरूपांत तेथें व तदनंतर बलिद्वीपांत राहिलें.

(२) बौद्ध आणि ब्राह्मण यांची तडजोड जी व्हावयाची ती बुद्धास विष्णूचा अवतार न करितां शिवाचा भाऊ करून झाली.

(३) महाभारताचें आजचें स्वरूप पूर्णपणें निश्चित झालें नव्हतें. रामायणाचें उत्तरकांड जोडलें गेलें नव्हतें.

(४) दक्षिण द्वैपायन संस्कृतींत नाटकांच्या ग्रंथांचा अभाव असून कळसूत्री बाहुल्यांच्या खेळापलीकडे तिकडे नाटकें गेलीं नाहींत.

(५) वर्षगणनेसाठीं शालिवाहनाचा शक तेथें चालू आहे.

(६) छंद पुष्कळ गेले आहेत; आणि ते उत्तरकालीन आहेत.

(७) कामंदकीय नीतिसाराचें अस्तित्व तेथें दिसतें.

उत्तरकालीन वाङ्मय परद्वीपांत लौकर जाईल पण उत्तर-कालीन समाजघटना जाणार नाहीं; आणि यामुळें द्वैपायन छंदःशास्त्र हें पूर्णपणें कालसूचक नाहीं त्याप्रमाणेंच कामंदकाचाहि ग्रंथ गमनकालसूचक नाहीं. नाटकांचा अभाव मात्र कालसूचक आहे. असें शक्य आहे कीं कालिदासादि कवींची किंवा भासाचीहि कृति उद्भवण्याच्यापूर्वी हें परदेशगमन झालें असावें. बुद्धास विष्णूशीं जोडण्याऐवजीं शिवाच्या एकंदर कथानकाशीं जोडलें याचें कारण असें देतां येईल कीं तेथें गेलेले लोक शैव होते. तथापि तेथें वैष्णव दैवतेंहि दृष्टीस पडतात. कांहीं असो पौराणिक ब्राह्मणी ग्रंथांचा उदय होऊन त्यांचा परिणाम पुष्कळसा होण्यापूर्वीच हें परदेशगमन झालें होतें हें खास. वेबरनें हें परदेशगमन पांचव्या शतकांत झालें असावें असें म्हटलें आहे; आणि आदिशकाच्या निव्वळ अविश्वसनीय दंतकथेवरून खिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत हें परदेशगमन झालें असावें असें डच ग्रंथकार समजतात. सध्यांच्या शोधाच्या स्थितीवरून हा काल आंकड्यांनीं सांगतां येणार नाहीं पण ज्या कालांत हें प्रयाण झालें त्या काळची बौद्धिक परिस्थिति कशी काय होती हें समजण्यास वरील विधानें उपयोगीं पडतील. तेथें ज्योतिर्विषयक कांहीं ग्रंथ उपलब्ध झाल्यास आणि उपलब्ध असलेल्या तेथील व आपल्याकडील वस्तूंचा तौलनिक अभ्यास झाल्यास आणखी महत्त्वाचीं तत्त्वें हातीं येतील.

बौद्ध आणि इतर भारतीय हे कांहीं भिन्न लोक नव्हते आणि त्यामुळें एकच लोक अगोदर जाणें आणि दुसरे न जाणें हें शक्य नाहीं. बौद्ध अगोदर गेले कीं इतर लोक व बौद्ध हे बरोबर गेले हें गमनकालावरून व प्रयोजनावरून ठरेल. ज्या कालीं भारतीय गेले तो काल पौराणिक देवतांच्या उत्पत्तीच्या पूर्वीचा असला आणि त्या वेळेस बौद्धांचें वर्चस्व किंबहुना हिंदुस्थानपुरतें पण सर्वव्यापित्व असलें तर बौद्ध अगोदर गेले असें होईल पण असा काल कधीं तरी होता असें वाटत नाहीं. बौद्धांचें सर्वव्यापित्व हिंदुस्थानांत कधींच नव्हतें. बौद्धांचें गमन अगोदर झालें ही कल्पना दुसरी आणखी एक कल्पना केली असतां शक्य होईल. ती कल्पना म्हटली म्हणजे संप्रदायाचे प्रचारक तेवढे गेले ही होय पण तीहि शक्य नाहीं. बौद्ध भिक्षू उपदेशाला गेले तरी ते तेथें येथील समाजव्यवस्था नेऊं शकणार नाहींत, हें तिबेट, चीन व जपान या बौद्धसंप्रदायप्रविष्ट प्रदेशांच्या उदाहरणांवरून स्पष्ट होत आहे. ज्याअर्थी समाजव्यवस्था तेथें नेली त्याअर्थी भारतीयांचा बराच मोठा समुदाय ब्राह्मण व क्षत्रियवर्गासह गेला असावा आणि भारतीयांचा यवद्वीपांत प्रवेश हा बौद्ध संप्रदायाच्या प्रचाराच्या इतिहासांतील भाग नसून हिंदूंच्या जगद्व्यापी चळवळीच्या इतिहासाचा भाग होय असें दिसतें.

संस्कृतिप्रसाराच्या दृष्टीनें सिंहलद्वीप, यवद्वीप आणि महायान-संप्रदायप्रविष्ट प्रदेश यांत संस्कृतीचे तीन भिन्न प्रकार दृष्टीस येतात.

* नीतिनिगंडुव ग्रंथांत गोवीयांची ब्राह्मणांपासून उत्पत्ति सांगितली आहे तथापि गोवीयांस प्रामुख्य देण्यासाठीं तें विधान असल्यामुळें जमेस धरतां येत नाहीं.

## बोरोबुदोर येथील देवालयांती पौराणिक कथांचें देखावें.

CRAWFORD.

देखावा नं. ४.




बुद्ध उपहारांचा स्वीकार करीत आहे.

सिंहलद्वीपांत जनताच प्रामुख्यानें भारतीय आहे; आणि त्यामुळें तेथें आपली भाषा पसरली. यवद्वीपांत देश्य संस्कृति अल्प असून सर्व संस्कृति आणि समाजव्यवस्था या सर्वांस आपलें स्वरूप देण्याइतका व मूळच्या लोकांची भाषा संस्कारावयास समर्थ तथापि तीस नष्ट करावयास असमर्थ इतका जनसमूह तेथें गेला होता असें दिसतें. तिबेट, चीन, जपान येथें आपली जनता फारशी गेली नसून केवळ उपदेशक वर्ग मात्र गेला असावा असें दिसतें. हा उपदेशक वर्ग अर्थात् बौद्ध होता.

वेबर आणि त्याचे अनुयायी कित्येक लेखक यांची कल्पना साधारण अशी दिसते कीं, कोणत्या तरी काळीं बौद्ध संप्रदाय प्रचाराचें काम मोठ्या जोरानें करीत असावा आणि जावा, बोर्निओ, सेलिविस इत्यादि बेटें आणि सयाम, चीन, तिबेट इत्यादि देश त्या प्रचारानें संस्कारले. त्यांच्या या कल्पनेस आधार नाहीं. प्रत्येक ठिकाणीं दृश्य होणाऱ्या अल्प अगर दीर्घ भारतीयत्वाचीं कारणें भिन्न आहेत. संस्कृतिप्रसाराच्या इतिहासांतील प्रश्नांवर प्रकाश पाडण्यासाठीं बुद्धसंप्रदायाच्या स्तुतिपाठकांनीं दिलेल्या उत्तरांसारखीं सोपीं उत्तरें देण्याची प्रवृत्ति दिवसानुदिवस कमी होत जाईल तर बरें.

देश्यभाषा कायम राहून संस्कृत भाषेनें तीवर संस्कार मात्र करावा आणि त्या भाषेंत निदान स्त्रीशूद्रांसाठीं वाङ्मय उत्पन्न करावें हा प्रकार ज्याप्रमाणें द्राविड देशांत झाला त्याप्रमाणेंच यवद्वीपांतहि झाला; आणि ज्याप्रमाणें तामिळ भाषेंत वाङ्मय तयार झालें त्याप्रमाणेंच यावद्वीप भाषांत तयार झालें. पंडितांच्या मनांत सामान्य जनांनां कांहीं तरी सांगावयाचें होतें. तें सांगणें अवश्य झालें तेव्हां यवद्वीपांतील भारतीय जेतृवर्गाची भाषा बदलली असल्यामुळें भारतीय पंडितांस जें काय सांगावयाचें तें स्थानिक भाषेंत सांगावें लागलें.

वरचेवर अनेक संस्कृत शब्दांचा भरणा जाव्हाच्या देश्य भाषेंत होऊन एक नवीनच भाषा तेथें तयार झाली तिचें नांव कवि. ही भाषा बहुधा पारमार्थिक शिक्षण अथवा उपदेश आणि ग्रंथलेखन या कामींच उपयोगांत येत असे.

कविभाषा बहुत करून जे देश्य लोक भारतीयांच्या पारमार्थिक संप्रदायांत शिरत किंवा यांच्या संस्कृतीचा व संस्कारांचा स्वीकार करीत त्यांनांहि उपयोगी पडे. धर्मशास्त्रीय ग्रंथ संस्कृत भाषेंतच असत. ज्या पौराणिक कथा किंवा इतर पारमार्थिक गोष्टी लोकांस कळवावयाच्या असत तेवढ्याच कविभाषेंत आणीत असत. यामुळें कविभाषा ही सामान्य लोकांस पवित्र भाषा वाटे पण पुरोहितांनां केवळ सोपी व साधी अशी वाटे व ते तिचा काव्यें लिहिण्याकडे उपयोग करीत व अजूनहि करितात. ते कवि आणि श्लोक यांमध्यें फार अंतर मानीत. कवि भाषेच्या इतिहासाचे पुरोहितांच्या दृष्टीनें व तींतील संस्कृत शब्दांच्या मिश्रणाच्या प्रमाणावरून तीन कालविभाग पंडितांनीं पाडले आहेत पण त्यांकडे आपणास या ठिकाणीं लक्ष देण्यास सवड नाहीं.

**यावद्वीप वाङ्मय.**—चार वेद ऐकून ठाऊक–ब्रह्मांडपुराण–तंत्रग्रंथ, तात्त्विक व शासनविषयक–कविरामायण–उत्तरकांड–महाभारत–पौराणिक इतर ग्रंथ–हरिवंश–मानवधर्मशास्त्र–पौराणिक काव्यें–बावद ग्रंथ, ऐतिहासिक, पौराणिक व काल्पनिक–लौकिक काव्यें–नीतिशास्त्र–छंदःशास्त्र–कामशास्त्र–कलाकौशल्यावरील ग्रंथ.

बलिद्वीपांतील कविवाङ्मयावरील फ्रेडरिकची माहिती येणेंप्रमाणें:—तेथील पुरोहितांच्या सांगण्यावरून बलिद्वीपांत चारी वेदांच्या संहिता पूर्ण नाहींत परंतु चारहि वेदांतील बराच आणि महत्त्वाचा भाग आहे. जावा बेटांतून हे पुरोहित आले तेव्हां जावामध्यें त्यांच्या पूर्ण संहिता असण्याचा संभव आहे अशी फ्रेडरिक यांची समजूत होती. फ्रेडरिक यानें असें म्हटलें आहे कीं, हे सर्व वेदांचे भाग श्लोकबद्ध आहेत परंतु हें त्याचें विधान पुरोहितांच्या सांगण्यावरून केलेलें असून त्याच्या स्वतःच्या माहितीवरून केलेलें नाहीं, आणि तेथील पुरोहित वेदांस फार गुप्त ठेवतात व ते शिकवितांनाहि गुप्तपणाची फार काळजी घेतात. त्यांच्या कांहीं भागावर बलि अथवा कविभाषेंतील टीका असावी असें दिसतें, असें फ्रेडरिक म्हणतो परंतु ज्याअर्थी तेथील लोकांनां वेदांतील कांहींहि समजत नाहीं त्याअर्थी फ्रेडरिकचें वरील विधान चुकीचें असावें असें वेबरनें म्हटलें आहे. फ्रेडरिकला एका हस्तलिखित ग्रंथाची नुसती बाहेरील बाजू पहावयास सांपडली होती. त्या ग्रंथाचें नांव सूर्यसेवक असें असून त्यामध्यें सूर्योपासनेबद्दलचे वेदांतील मंत्र होते अशी त्यास माहिती मिळाली.

वेदाखालोखाल बलिमध्यें ब्रह्माण्डपुराण हा ग्रंथ आढळतो. याची एक पूर्ण प्रत फ्रेडरिक यास देण्यांत आली होती पण त्यांत अशी अट होती कीं, त्यानें तो ग्रंथ अनधिकृत मनुष्यास दाखवितां कामा नये. बलिद्वीपांत भारतवर्षीय ब्राह्मणांतील फक्त एक पंथ (शैव) होता आणि त्यांचे जे पूर्वज प्रथम जावामध्यें आले त्यांनीं ब्रह्माण्डपुराण हाच आपला काय तो पुराणग्रंथ मानिला असावा, कारण त्यांनां अद्यापिहि इतर पुराणांचीं नांवें माहित नाहींत. बलिद्वीपांतील पुरोहित हा ग्रंथ फार पवित्र मानतात व तो फार गुप्त ठेवतात. वेदाप्रमाणें या ग्रंथावरहि बलिभाषेंत टीका आहे.

ग्रंथमहत्त्वविषयक सोपानपरंपरेंत वरील ग्रंथांनंतर तुतुर अथवा तात्त्विक ग्रंथ (तन्त्र) येतात. यांचे दोन वर्ग आहेत. (१) पुरोहित वर्गाकरितां (२) इतर वर्णांकरितां, विशेषतः दुसऱ्या व तिसऱ्या वर्णांकरितां.

पहिला वर्ग. (१) बुवनसंक्षेप (२) बुवनकोस (३) बृहसतितत्त्व (४) सारसमुच्चय (५) तत्त्वज्ञान (६) कदपत (?) (७) सजोक्लान्ति (८) तंत्रकमोक्ष.

दुसरा वर्ग. (१) राजनीति (२) नीतिप्रय अ० नीतिशास्त्र (३) कामन्दकनीति (४) नरनाव्य (५) रणजन्य(? रणयज्ञ) (६) तिथिदशगुणित.

यानंतर संस्कृत ग्रंथांचीं कविभाषेंतील भाषांतरें येतात. त्यांत प्रथम रामायणाचें रूपांतर व इतर महाकाव्यांचीं रूपांतरें हीं येतात. यांतील रामायणाचें रूपांतर म्पोए तनकुंग (M'poe Tanakung) याचा पिता म्पोए राजकुसुम योगीश्वर (M'poe Rajakusum Yogis'vara) याच्या व 'स्मरदहन' काव्याचा कर्ता म्पु दर्मय (M'pu D'armaja) या कवीच्या हातून झालें. भारतीय रामायणांत ७ काण्डें आहेत परंतु कवि रामायणांत पहिल्या सहा कांडांतीलच मजकूर आहे व त्याचे २५ सर्ग केले आहेत. ७ वें उत्तर-काण्ड हें कथेचा भाग नसून निराळाच ग्रंथ असून त्याचा कर्ताहि वाल्मीकिच आहे अशी समजूत आहे. वाकीच्या रामायणापासून हा भाग अलग राहिला आहे, यावरून तो भाग भरतखंडांतूनच रामायणाचा भाग म्हणून आला नसून निराळा ग्रंथ म्हणून आला असावा असें फ्रेडरिक याचें मत आहे. यावरून वेबरनें असें अनुमान काढलें आहे कीं, ज्यावेळीं जावामध्यें रामायणाचा प्रवेश झाला त्यावेळीं भरत-खंडांतील रामायणास उत्तरकाण्ड जोडलें गेलें नव्हतें.

जावामध्यें कवि भाषेंतील रामायणाचें 'रोमो' या नांवाचें जावानी भाषेंतील रूपांतर काय तें अस्तित्वांत आहे, आणि तें भाषेच्या व लेखनशैलीच्या दृष्टीनें बरेंच कमी प्रतीचें असून बलिद्वीपांतील लोक त्यास अपभ्रष्ट समजतात. 'रोमो' हा ग्रंथ बहुतकरून मुसुलमानी काळांतील असावा व त्याची रचना झाली त्यावेळीं बहुतकरून धार्मिक बाबतींतील उत्साह बराच कमी झाला असावा; व त्यावेळीं जुनें उत्तम उत्तम वाङ्मय एकत्र करण्यांत आलें असावें परंतु कवि भाषा विसरून गेली असावी.

फ्रेडरिकनें जी कविरामायणांतील कथा दिली आहे ती मूळ भारतीय रामायणाशीं जुळते. प्रथम विष्णु अयोध्येचा राजा दशरथ याच्या वंशांत अवतार घेतो. तो दशरथाची स्त्री कोसया इच्या पोटीं जन्म घेतो. त्याला कैकया इचा भरत आणि सुमित्रेचा लक्ष्मण हे सावत्र भाऊ असतात. त्याचा गुरु वसिष्ठ मुनि असून तो त्याला विशेषतः धनुर्वेद शिकवितो. तो लहान असतांनाच राजर्षिकुळांतील (बलिद्वीपांतील राज-घराणें राजर्षि या नांवाचें असून तें यापासूनच निघालें अशी तेथें समजूत आहे.) राजा विश्वामित्र यानें तो विष्णूचा अवतार आहे हें ओळखून आपल्या आश्रमाचें राक्षसांपासून रक्षण करण्याकरितां त्यास विनंति केली. रामानें त्याप्रमाणें करून परशुरामाचें धनुष्य वांकविलें. नंतर त्याचा सीतेबरोबर विवाह झाला. यानंतर कैकयीचीं आपल्या मुलास गादीवर बसविण्या-बद्दलचीं कारस्थानें वर्णन केलीं आहेत. त्यानंतर राम आपण होऊनच (?) सीता व लक्ष्मण यांसह आश्रमांत जातो व तेथून दण्डकारण्यांत जातो. लक्ष्मण त्याच्यावर प्रेम करणाऱ्या शूर्पणखा नांवाच्या राक्षसीस विद्रूप करितो व त्यामुळें तिचा भाऊ रावण याचा द्वेष संपादन करितो. रावण सीतेस पळवून नेतो व राम तिचा व्यर्थ शोध करितो. नंतर तो वानरांचा राजा सुग्रीव व त्याचा आप्त चपल हनुमान यांच्याशीं सख्य करितो. हनुमान सीतेस लपवून ठेवलेल्या जागेचा शोध लावतो. नंतर राम, त्याचें वानरसैन्य व लंकापुरांतील राक्षस यांचें युद्ध होतें. मधून मधून वानरांचे राजे आणि राम यांच्यामधील संभाषणें व राम आणि रावणाचा बंधु बिभीषण यांमधील संबंध यावद्दल हकीकत आहे. अखेरीस रावणाचा वध रामाकडून होतो. त्याच्या चक्रामुळें त्याचीं दहा शिरें तुटून पडतात. सीता अग्नीपासून शुद्ध होते व भूमातेच्या पोटांत जाते. राम अयोध्येचा राजा होतो व वृद्धपणीं अरण्यांत आश्रमांत रहाण्यास जातो, व तेथें निजधामास जातो.

उत्तरकाण्डामध्यें रामाच्या बंधूंविषयीं कथा व इतर रामाच्या घराण्याशीं कांहीं संबंध नाहीं अशा अनेक कथा आहेत. या उत्तरकाण्डांतीलच कथाभाग घेऊन एक बराच अलीकडे कवि भाषेंत ग्रंथ झाला आहे. त्याचें नांव अर्जुन-विजय असें असून त्याचें वर्णन पुढें दिलें आहे.

कविवाङ्मय पुष्कळसें उपलब्ध आहे, परंतु या वाङ्मयाचा इतिहास लिहिणें शक्य नाहीं. कारण या वाङ्मयांतील बहुतेक ग्रंथ केव्हां रचले गेले व ते कोणीं रचले यासंबंधानें आज कांहींच माहिती नाहीं. कवि वाङ्मयांत ब्रत युद (भारतयुद्ध) या ग्रंथाला अग्रस्थान देणें उचित दिसतें. हें 'ब्रतयुद' काव्य वीरकाव्य असून यांत 'ह्यास्तिन' चे सिंहासनाबद्दल पांडव कौरव यांजमध्यें जें युद्ध झालें त्याचें वर्णन आहे. हें युद्ध महाभारताचीं पर्वें ५–१० यांत वर्णिलें आहे. आजचे जाव्हानी लोक हें काव्य जाव्हांतील रहिवाशांचेंच आहे असें मानतात. या काव्यांत ज्या वीरांचें व राजांचें वर्णन आहे त्यांचीं चरित्रें जाव्हानी लोकांच्या इतिहासांत प्रविष्ट केलीं असून आजच्या जाव्हानी खानदानी सरदार घराण्यांचे सदरील राजे व वीरपुरुष हेच मूळ पुरुष होत असें मानलें जातें. 'ब्रतयुद' या काव्यग्रंथापेक्षां जुना म्हणतां येईल असा कविवाङ्मयांतील ग्रंथ म्हणजे 'अर्दृजुनविवाह' (अर्जुन-विवाह) हा होय. इ. स. च्या ११ व्या शतकाच्या पूर्वार्धांत हा ग्रंथ रचला गेला असावा असें प्रो. कर्न यांचें मत आहे. नांवा-वरूनच हा ग्रंथ महाभारतापासून रचला गेला असला पाहिजे हें उघड होतें.

सगळ्यांत जुनें काव्य म्हणजे 'कांड' (परंपरा) हें असावें. या काव्याचा थोडासा अंश आज त्याचें जें जावानीज रूपांतर आहे त्यावरून कळतो.

बोरोबुदोर येथील देवालयांतील
पौराणिक कथांचें देखावें.








देखावा नं. १

CRAWFURD.

जावांतील शिवकल्पना.

क्राफर्डच्या ताब्यांतील एका पितळी मूर्तीवरून.

वलिद्वीपामध्यें महाभारताचें नांव अज्ञात दिसतें म्हणजे कदाचित् ज्या वेळीं ख्रिस्ती शकाच्या ५०० या वर्षाच्या सुमारास भारतीय लोक जावामध्यें आले त्या वेळीं भरतखंडामध्यें महाभारताचें नांव अज्ञात असण्याचा संभव आहे असें वेबर म्हणतो. परंतु महाभारताच्या कर्त्याचें नांव व त्याचीं १८ पर्वांचीं नांवें जावामध्यें माहित असून त्यांपैकीं ६ पर्वें पूर्ण होतीं व २ अर्धवट होतीं. त्या पर्वांचा अनुक्रम येणें-प्रमाणें होता. आदिपर्व (१)* विराटपर्व (४) भीष्मपर्व (६) मुसलपर्व (१६) प्रस्थानिकपर्व (१७) स्वर्गारोहणपर्व (१८) हीं पूर्ण होतीं आणि उद्योगपर्व (५) आणि आश्रमवासपर्व (१५) हीं अर्धवट होतीं. तेथील पुरोहितांनीं वाकीच्या पर्वांचीं नांवें पुढीलप्रमाणें सांगितलीं—सभापर्व (२) आरण्यक-पर्व (३) द्रोणपर्व (७) कर्ण (८) शल्य (९) गदापर्व (?) खतमपर्व (अश्वत्थामापर्व?) सौप्तिकपर्व (१०) स्त्रीपलाप (स्त्रीप्रलाप) (११) अश्वमेधयज्ञपर्व (१४) या वरोवरच त्यांनीं शांतिकपर्वा (शांतिपर्वा) चा उल्लेख केला. परंतु एकंदर पर्वें अठराच आहेत असें तेथील पुरोहितांनीं सांगितलें. शांतिपर्व हें भारतीय महाभारतांतील बारावें पर्व आहे; आणि भारतीय महाभारतांतील अनुशासनपर्वाचें नांव वरील यादींत दिसत नाहीं. वर दिलेल्या यादींतील नांवें बहुतेक भारतीयच आहेत. खतम हें अश्वत्थामा याचें अपभ्रष्ट रूप असावें. गदापर्व हें महाभारताच्या कोणत्याहि पर्वाला नांव दिलेलें आढळत नाहीं. गदापर्व हें शल्यपर्वांतील भीम आणि दुर्योधन यांच्या गदायुद्धाच्या कथाभागाला नांव दिलेलें असावें; आणि अश्वत्थामापर्व हें द्रोणपर्वांतील अश्वत्थाम्यानें केलेला नारायणास्त्रमोक्ष या कथाभागाला नांव दिलेलें असावें किंवा कर्णपर्वामध्यें अश्वत्थाम्यानें केलेला पाण्ड्य राजांचा पराजय या भागाला दिलेलें असावें. आपणाला गदापर्व हें एका पर्वाला नांव दिलेलें असावें असें म्हणतां येत नाहीं, कारण ज्या अर्थी तेथील पुरोहितांस शांतिपर्व हें नांव ठाऊक होतें, त्या अर्थी जावामध्यें शांतिपर्व अस्तित्वांत होतें हें उघड आहे. कदाचित् अश्वत्थामापर्व हें प्रथम स्वतंत्र पर्व असावें व पुढें अनुशासनपर्व अस्तित्वांत आल्यानंतर पर्वांची १८ ही संख्या कायम ठेवण्याकरितां अश्वत्थामापर्व हें दुसऱ्या एखाद्या पर्वांत सामील करण्यांत आलें असावें; आणि वलिद्वीपांत अनुशासनपर्वाचें नांवहि ठाऊक नाहीं या गोष्टी-वरून महाभारताचें जावांत आगमन झालें त्या वेळीं त्यांत अनुशासनपर्व नव्हतें असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. बालभारतामध्यें हें पर्व आढळत नाहीं व तसेंच शांतिपर्वहि आढळत नाहीं; आणि त्या दोन्ही पर्वांत केवळ तात्त्विक विषय असल्यामुळें हीं दोन्हीं पर्वें मागाहूनचीं आहेत असेंच मानण्यांत येतें. त्यामुळें तीं बलि किंवा जावा यांमध्यें ख्रि. श. ५०० च्या सुमारास नसावीं असें मानण्यास हरकत नाहीं. परंतु फ्रेडरिक यास ही गोष्ट माहित असावीसें दिसत नाहीं कीं, महाभारताची २० पर्वांची दुसरी एक प्रत उपलब्ध आहे. चेंबरच्या संग्रहामध्यें बनारस येथील संवत् १७४४ मधील एक हस्तलिखित प्रत आहे तींत ९ ते ११ हीं पर्वें ९ ते १४ अशीं घातलीं आहेत. त्यांचीं नांवें शल्यपर्व (९), गदापर्व (१०), सौप्तिकपर्व (११), ऐषीकपर्व (१२), विशोकपर्व (१३), स्त्रीपर्व (१४), आणि अनुशासनपर्व हें निराळें नसून पंधराव्या शांतिपर्वाचाच एक भाग होतें.

फ्रेडरिकजवळ कविभाषेंतील ग्रंथाशीं तुलना करण्या-करितां भारतीय महाभारताची प्रत नव्हती. कविभाषेंतील महाभारताच्या पर्वांतील श्लोकसंख्याहि भारतीय महाभारताच्या श्लोकसंख्येहून निराळी आहे.

वर दिलेलीं काण्डें किंवा पर्वें मुख्य असून विशेषतः पवित्र व धार्मिक मानण्यांत येतात. परंतु कांहीं ग्रंथांनांहि पर्व अशी संज्ञा आहे पण त्यांनां पवित्र मानण्यांत येत नाहीं.

क पि प र्व—यामध्यें सुग्रीव, हनुमान व त्यांचे पूर्वज यांच्या कथा आहेत.

अ ग स्ति प र्व—यांत अगस्तीनें आपला पुत्र द्रेदस्य (?) यास उपदेश केला आहे.

चं त क अथवा के ता का प र्व (?)—यामध्यें सर्व समाना-र्थक शब्द एकत्र जमविले आहेत. हा एक प्रकारचा कोश असून जावांतील व्यासाचा शिष्य कविदसि यानें केलेल्या दसनाम ग्रंथाप्रमाणें आहे. याच्या आरंभींच अनेक देवतांचीं नांवें दिलीं आहेत. त्यांचा तेथील पौराणिक कथा समजण्यास फार उपयोग होतो. (हा आपणाकडील अमरकोशासारखा असावा असें दिसतें.)

कविभाषेंतील धार्मिक ग्रंथांतील दुसऱ्या प्रतीचें वाङ्मय हें अंशतः संस्कृत ग्रंथांच्या आधारें व अंशतः भारतवर्षांतून तेथें गेलेल्या हिंदूंनीं रचलेलें वाङ्मय आहे. त्यांतील पुढील ग्रंथांस विषयांच्या दृष्टीनें पर्वांनंतरचें स्थान आहे.

बा र त यु द्ध (भारतयुद्ध)—प्रथमतः महाभारतासंबंधीं कविभाषेमध्यें हा एवढाच ग्रंथ आहे अशी समजूत होती आणि हंबोल्ट यानें आपल्या कविवाङ्मयावरील संशोधनामध्यें याचा बराच उपयोग केलेला होता. यांतील कथाभाग महाभारताच्या ४ पर्वांवरून घेतलेला आहे. हीं पर्वें म्हणजे ज्यांत प्रत्यक्ष युद्धाचें वर्णन आहे तींच भीष्म, द्रोण, कर्ण आणि शल्य (६–९) हीं होत. हा ग्रंथ कविवाङ्मयाच्या दुसऱ्या काल-विभागांत म्हणजे केदिरिचा राजा जयवय याच्या कालांत मोडतो. परंतु हा लौकिक अथवा दुसऱ्या प्रतीच्या धार्मिक ग्रंथांमध्यें अग्रस्थानीं समजला जातो व याचें मुख्य कारण त्यांतील विषय हें होय. कारण तो बराच नंतरचा असून

* कंसांतील आंकडे भरतखंडांतील महाभारताच्या पर्वांच्या अनुक्रमाचे निदर्शक आहेत.

इतर बाबतींतहि त्याला कांहीं दुसऱ्या कविग्रंथांपेक्षां विशेषतः विवाह या ग्रंथापेक्षां बराच कमी मान मिळतो. या ग्रंथाची भाषा शुद्ध कवि नसून तींत बरेंचसें लौकिक भाषेचें मिश्रण झालें आहे.

वि वा ह—या ग्रंथाची माहिती जावानी भाषेमध्यें एक रूपांतर झालें आहे त्यावरून बरीच मिळते. या रूपांतराची रचना व विषयानुक्रम मूळ कविग्रंथाप्रमाणेंच आहे. यांतील कथाभाग इन्द्रलोकागमनम् आणि अर्जुनसमागम या ग्रंथांप्रमाणेंच आहे, आणि या ग्रंथाला अर्जुन व अप्सरा यांच्यामध्यें घडलेल्या प्रसंगाच्या बहारीच्या वर्णनावरूनच नांव दिलेलें आहे. या ग्रंथाची भाषा सुरस व शुद्ध कवि आहे. यांतील वृत्तें जावानी नसून भारतीय आहेत. या ग्रंथाचा कर्ता केदिरि येथील हेंपु कण्व या नांवाचा कवि असून तो कविवाङ्मयाच्या पहिल्या कालविभागांत म्हणजे जयवय याचा पूर्वज अयर लंग्गिअ याच्या कारकीर्दींत होऊन गेला असावा. हेम्पु सदह् ( बारत-युद्धाचा कर्ता ) आणि हेम्पु कण्व हे दोघेहि शैवपंथी असावेत. कारण त्यांच्या ग्रंथांत बौद्धसंप्रदायाचीं चिन्हें क्वचितच दृष्टीस पडतात, किंबहुना मुळींच नाहींत म्हटल्यास चालेल.

स्म र द ह न—हा ग्रंथहि अयर लंग्गिअ याच्या काळचाच असून कविरामायण ग्रंथाचा कर्ता रायकुसुम याचा पुत्र हेम्पु दर्मय यानें रचलेला आहे. हें काव्य बहुतकरून कुमारसंभव काव्याचें रूपांतर असावें.

सु गा न सं त क—हा ग्रंथहि त्याच कालचा असून हेम्पु मौनगुन यानें रचला आहे. हें काव्य भारतीय रघुवंशाचें रूपान्तर आहे असें वेबर म्हणतो. यांतील कथानक असें आहे. रामाचा पूर्वज रघु यास अदिआ (?) नांवाची एक कन्या होती. तिचें स्वयंवर होतें. पुढें तिचा पति देविन्दु हा मृत्यु पावतो. नंतर तिला रामाचा पिता दशरथ हा पुत्र होतो.

बो म का व्य.–(भौमकाव्य) या ग्रंथाचा कर्ता म्पु ब्रदः बोद ( बौद्ध ) हा असून या ग्रंथाचा काल केदिरिचा राजा जयवय याच्या कारकीर्दीच्या सुमाराचा असावा. यांतील कथानक–भौम हा विष्णु आणि पृथ्वी यांचा पुत्र होता. हा दानव असून त्यानें इंद्राचा पराजय केला. तेव्हां कृष्णानें त्यास ठार मारिला. तो जोंपर्यंत जमिनीवर असे तोंपर्यंत बलाढ्य असे परंतु जमिनी-पासून पाय सुटतांच निर्बल होई. येथें पाश्चात्यांस कृष्णाचें हर्क्युलीस याशीं आणि भौमासुराचें अँटिअस या दैत्याशीं साम्य दिसतें.

अ र्जु न वि ज य–याचा विषय रामायणाच्या उत्तरकांडांतील आहे. महाभारताच्या ४ पर्वांवरून भारतयुद्ध या ग्रंथाची रचना केली त्याप्रमाणेंच रामायणावरून याची केलेली आहे. यामध्यें अर्जुनानें रावणाशीं युद्ध करून त्याचा पराजय केल्याची कथा आहे. या ठिकाणीं रावणाला फक्त बद्ध केला आहे, ठार मारला नाहीं, कारण त्याची वेळ अद्यापि भरली नव्हती. त्याला बळरामाकडून मृत्यु यावयाचा होता. या ग्रंथांत जें वर्णन आहे तें रामाच्या दक्षिणेवरील स्वारीपूर्वी होऊन गेलेल्या एखाद्या ब्राह्मणी स्वारीचें वर्णन आहे काय हें नक्की ठरविण्यास अद्यापि संशोधन करावें लागेल. या ग्रंथाच्या कर्त्याचें नांव म्पु तन्तुलर बोद ( M'pu Tantular Boda ) अथवा बौद्ध नांव केदितीस जयवय असें आहे.

सु त सो म—वरील कर्त्यानेंच लिहिलेला. रतु दैत्य पुरुसद यानें भारतवर्षाचे सर्व राजे बंदींत टाकून रतु धर्म यास जिंकलें होतें. त्याचा सुतसोम व त्याचा नातेवाईक प्रद्युम्नकेतु ( प्रभूमकेतु ) यांनीं पराजय केला. यामध्यें रामाची व इतर बऱ्याच कथा आल्या आहेत. यांतील विषय बहुतकरून केतकपर्वन् या ग्रंथांतून घेतला असावा परंतु त्या ग्रंथाच्या स्वरूपावरून तसें वाटत नाहीं.

हे वरील तीन ग्रंथ हिंदुस्थानांतील ग्रंथांचींच रूपांतरें असून मूळचे हिंदुस्थानांतील ग्रंथ नष्ट झाले असावे असा वेबरचा तर्क आहे. भौम हें मंगळग्रहाचें नांव आहे आणि कार्तवीर्य अर्जुन याबद्दल पुराणांत बऱ्याच कथा आहेत, आणि कल्माषपाद पुरुषादक याचा रामायणामध्यें रघूचा पुत्र म्हणून उल्लेख आहे.

जावामध्यें हरिवंश या ग्रंथाचें आगमन मयपहित राज्या-मध्यें म्हणजे बऱ्याच अलीकडील काळांत झालें आणि तो ग्रंथ म्पु पेनुलु बोद ( M'pu Penulu Boda ) या बौद्ध भिक्षूनें नेला असावा. त्यावेळीं मयपहित येथील राजा ब्रविजय याचा पिता होता आणि ब्रविजय हा जावांतील रूढ समजुती-प्रमाणें शेवटचा हिंदु राजा होता. मयपहित राज्याचा काळ म्हणजे जावांतील कविवाङ्मयेतिहासाच्या कालविभागांतील तिसरा म्हणजे शेवटचा कालविभाग होय. या कालविभागामध्यें कविभाषेमध्यें जें लौकिक भाषेचें मिश्रण झालें त्यामुळें तो दुसऱ्या कालविभागापासून पृथक्पणें दिसून येतो.

यानंतरचा वाङ्मयेतिहासांतील कालविभाग म्हटला म्हणजे बलिबेटांतील कविवाङ्मयाचा होय. या कालांत वाङ्मयपरंपरा भिक्षु व कांहीं राजे यांनीं पुढें चालविली. या भिक्षूंनीं कवि-भाषा जिवंत ठेविली एवढेंच नव्हे, तर तींत संस्कृत भाषेंतील धर्मशास्त्रीय ग्रंथांची भर घातली. बहुतकरून बलिबेटांत गेलेले पुरोहित मयपहित राज्यांतून गेलेले नसून केदिरि प्रांतांतून गेलेले असावे असा वेबरचा तर्क आहे. मयपहित राज्याचा नाश होण्यापूर्वी कांहीं शैव ब्राह्मण जावांत आले. ही हकीकत बलिमध्यें सर्वथा अज्ञात आहे. परंतु इतक्या थोडक्या काळांत या ब्राह्मणांनां कविभाषेचें ज्ञान कसें झालें असेल याची कल्पना करतां येत नाहीं. मात्र ते केदिरि प्रांतांत प्रथम येऊन नंतर मयपहित राज्यांत जाऊन तेथून बलि

बेटांत गेले असें धरून चालल्यास त्यांचें कविभाषेचें ज्ञान शक्य आहे.

वर उल्लेखिलेल्या ग्रंथांखेरीज इतर कांहीं ग्रंथ आहेत ते कांहीं मूळ हिंदुस्थानांतील ग्रंथांच्या रूपांतरांच्या व कांहीं स्वतंत्र अशा स्वरूपाचे आहेत पण ते गद्यांत असल्यामुळें कवि-वाङ्मयाचें जें मुख्य लक्षण कीं ग्रंथ पद्य असावयाचे तें यांस लागू पडत नाहीं, पण त्यांची भाषा इतर जावांतील व बलि-बेटांतील भाषेपेक्षां निराळी असल्यामुळें त्या ग्रंथांस कवि-वाङ्मयांत घालण्यास हरकत नाहीं. हीं बहुतेक कायद्याचीं पुस्तकें उर्फ धर्मशास्त्रें आहेत.

मा न व ध र्म शा स्त्र—मनुप्रणीत ग्रंथ वास्तविक येथें आढळत नाहीं, पण जावांतील लोकांचें असें म्हणणें आहे कीं, आमचें धर्मशास्त्र प्रभु मनु यानें केलेलें आहे. आणि पूर्वादिगम अथवा शिवानुशासन हा ग्रंथ त्याच्या नांवावर मोडतो असें फ्रेडरिक यानें एका ठिकाणीं म्हटलें आहे. परंतु दुसऱ्या एका ठिकाणीं त्यानेंच असें म्हटलें आहे कीं, मनुप्रणीत धर्मशास्त्र हा ग्रंथ 'धर्मशास्त्र कुतर मनवादि' या शब्दांनीं वरील ग्रंथांत आला आहे. नंतर फ्रेडरिकनें या शब्दांच्या अर्थाबद्दल खल केला आहे. व शेवटीं त्यानें असा तर्क केला आहे कीं, 'धर्मशास्त्र-कुतर मनवादि' यांनीं निर्दिष्ट होणारा 'मानवधर्मशास्त्र' ग्रंथ बलिमध्यें असून अद्यापि अज्ञात आहे किंवा तो जावामध्येंच नष्ट होऊन गेल्यामुळें बलिमध्यें आलाच नसावा. याचा उल्लेख सारस मुस्चय ( सारसमुच्चय ) व कामन्दक या ग्रंथांबरोबर शिवशासन ग्रंथांत आहे. शिवशासनाची प्रत फ्रेडरिक यास ब्रह्माण्डपुराणाप्रमाणेंच कोणाहि अनधिकारी मनुष्यास न दाखविण्याच्या अटीवर मिळाली होती. त्यांतील त्यानें आरंभींचा व शेवटचा भाग दिला आहे.

फ्रेडरिक यास इतर धर्मशास्त्रीय ग्रंथ पहावयास मिळाले नाहींत पण त्यांचीं जीं नांवें त्यास कळलीं त्यांवरून ते ग्रंथ क्राफर्ड, रॅफल्स, हंबोल्ट यांनीं उल्लेखिलेलेच आहेत.

राजा कासिमन यानें त्यांचीं नांवें पुढें दिल्याप्रमाणें दिलीं आहेतः—( १ ) आगम ( २ ) आदिगम ( ३ ) देवागम ( ४ ) सारस्-मुस्चेय ( सारसमुच्चय ) ( ५ )* दुस्तकलवय ( दुस्तरकालभय ) ( ६ ) स्वरजंबु ( जुंबुस्वर-जंबुद्वीपाचा धर्म ) या नांवाचा एक ग्रंथ बलिमध्यें होता पण तो हाच होता कीं काय हें फ्रेडरिक यास निश्चित करतां आलें नाहीं. ( ७ ) देवदण्ड ( प्राचीन भाषेंत ) विष्णूचा जेव्हां पृथ्वीवर अवतार होतो तेव्हां हा धर्म चालू असतो. ( ८ ) यज्ञसद्म याचा अर्थ कदाचित् याज्ञवल्क्य असावा (?) फ्रेडरिक यानें याबद्दल कांहींच मत दिलें नाहीं.

*यामध्यें मुलांनीं केलेल्या अपराधांस दण्ड सांगितले आहेत. हें खरें असल्यास पाणिनीमध्यें उल्लेखिलेल्या शिशुक्रंदियम् या ग्रंथाची आठवण होते.

परंतु तमन् इन्तरम् ( Taman Intaram )मध्यें पंडितांनीं निराळीच यादी दिली आहे. ( १ ) आगम ( २ ) आदिगम ( ३ ) पूर्वदिगम ( पूर्वाधिगम ) अथवा शिवशासन. शिवशासन हा पूर्वादिगममधील एक भाग आहे. ( ४ ) देवागम ( ५ ) स्वजम्बु=स्वरजम्बु ( जम्बुस्वर ).

यांशिवाय पौराणिक स्वरूपाचे ग्रंथ पुढें दिले आहेत. हे लायडन युनिव्हरसिटीच्या यादींत आढळून येतात.

अ ग स्त्य प र्वः—गद्य ग्रंथ. यांत ऋषींच्या कुलांची माहिती दिली आहे. यांतील कांहीं भाग आदिपर्वाशीं जुळतो, परंतु यांत बरीच निराळी माहिती आहे.

अ र्जु न प्र ल ब्धः—यांत अर्जुनास कालीनें मारलें व शिवानें जिवंत केलें अशी कथा आहे.

अ र्जु न स ह स्र बा हुः—सहस्रबाहु अर्जुनाची गोष्ट.

अ र्जु न वि ज यः—काव्य. बौद्ध ग्रंथ. यांत सहस्रार्जुनाची गोष्ट आहे.

अ र्जु न वि वा हः—याचें वर्णन दुसरीकडे दिलें आहे.

भा र त यु द्धः—यावर बरींच काव्यें आहेत.

भी ष्म प र्वः—भीष्म शरपंजरीं पडला असतां नारदाचा व त्याचा संवाद. यांतील वर्णन शांतिपर्वाप्रमाणें आहे.

भौ म का व्यः—विष्णु आणि पृथ्वी यांचा पुत्र भौमासुर याची कथा.

ब्र ह्मां ड पु रा णः—याची माहिती दुसरीकडे दिली आहे.

कुं ति य ज्ञः—इन्द्रकील येथें अर्जुन कुंतीच्या दृष्टीस न पडल्यामुळें तिचा इतर चार पुत्रांशीं झालेला संवाद.

न व रु चि अथवा अ व रु चि. यांत द्रोणानें भीमाचा विश्वास-घात केल्याबद्दल कथा आहे. द्रोणापासून भीमास अमृत पाहिजे होतें.

वर वर्णन केलेल्या संस्कृत व कवि वाङ्मयाखेरीज बलि-बेटामध्यें बरेंचसें जावा-बलि-वाङ्मय आहे. तें हिंदुस्थानांतील ग्रंथांच्या आधारें रचलेलें नसून जे हिंदु लोक जावा व बलि बेटांत गेले त्यांनीं स्वतःच रचलेलें आहे. यामध्यें निरनिराळ्या प्रकारचे ग्रंथ येतात. प्रथम बावद किंवा ऐतिहासिक बखरी हा वर्ग येतो. हे ग्रंथ अंशतः गद्यांत व अंशतः किडुंगमध्यें ( जावा-बलि बेटांतील काव्यांचा एक नवीन छन्द ) असतात.

याखेरीज पॉलिनेशियामधील पुराणकथा किडुंग छन्दोबद्ध आढळतात. याखेरीज आत्म्याचें पुनरवतरण ( जन्मपरंपरा ) या विषयावर व कांहीं तात्त्विक विषयांवर किरकोळ ग्रंथ आहेत. शेवटीं बलिबेटांतील पंचांग या महत्त्वाच्या ग्रंथाचा उल्लेख केला पाहिजे.

गद्य बाबद ग्रंथांपैकीं महत्त्वाचे ग्रंथ—

(१) केन्द्रंग्रोक—हा ब्रह्मयाचा पुत्र असून केदिरिं, मयपहित आणि बलि येथील राज्यांचा संस्थापक होता. त्याची

आई केन्हंडोक ही शेतांत असतांना तिला एका ब्राह्मणापासून हा पुत्र झाला.

(२) रंगलवे—तुमपेल येथील राजा शिवबुद्ध याचा केदिरि येथील राजानें पराजय केल्यानंतर, त्याचा प्रधान रंगलवे हा आपल्या धन्यापासून वेगळा पडला व त्याचाहि पराजय होऊन तो मारला गेला. या ग्रंथांत केदिरि येथील दरबाराचें फार सूक्ष्म तऱ्हेनें वर्णन केलेलें आढळतें.

(३) उसनजव-(Usana Jawa) जावांतील प्राचीन संस्था (?) या ग्रंथांत मयपहित येथील जावानी लोकांनीं बलिद्वीप काबीज केल्याचें वर्णन आहे.

(४) उसनबलि–याचा उल्लेख फ्रेडरिकच्या Tijdschrift वर्ष ९ या नियतकालिकांत आढळतो. यांत उल्लेखिलेल्या हस्तलिखित प्रतीचा शक १३३५ हा आहे.

(५) पमेन्दंग–बलिद्वीपाचा अलिकडील इतिहास.

फ्रेडरिक असें म्हणतो कीं, 'याखेरीज प्रत्येक राजघराण्यांत बरेच बावद ग्रंथ उपलब्ध होण्यासारखे आहेत व ते एकमेकांशीं ताडून पाहिल्यास पुष्कळ इतिहाससाहित्य उपलब्ध होईल,' परंतु संस्कृत कविवाङ्मयाचा अभ्यासहि बराच उपयुक्त होईल यांत शंका नाहीं. दुसरा 'मलत' या नांवाचा किडुंग वृत्तांत एक ग्रंथ आहे. तो बराच मोठा असून त्यांत रामायणांतील कथांसारख्या कथा आहेत. रामायण आणि भारतयुद्धांतील प्रसंगांप्रमाणेंच या काव्यांतील प्रसंगांवर कळसूत्री बाहुल्यांचे खेळ करितात. मलत्, वसॅंग्, वंगवहंग विदेथ हे तीन ग्रंथ किडुंग वृत्तांत लिहिलेल्या ग्रंथांत फार प्रसिद्ध आहेत. हे तीनहि ग्रंथ बरेच लठ्ठ आहेत. कुरिपनच्या राजपुत्राचे पराक्रम आणि त्याची प्रिया दह येथील राजकन्या हिचा वियोग या गोष्टी आल्या आहेत. संविधानक जवळ जवळ तेंच आहे पण पात्रांत नांवामध्यें आणि त्यांच्या चर्येमध्यें फरक आहे. मलत्मध्यें नायकाचें नांव तुसापति असें आहे. हा कुरिपनच्या राजाचा सर्वांत मोठा मुलगा होता. राजकन्या अनरंग केसरि हरवल्यानंतर तो "अमलत् रश्मि" हें नांव धारण करून हिंडतो. या नांवाचेंच संक्षिप्तरूप मलत् हें आहे. वेबर वगैरे लेखकांनीं याचें नांव 'पंजि' असें दिलें तें चूक आहे. हें नांव नसून त्याला दिलेल्या विशेषणावरून पडलेलें नांव असावें. राजकन्येच्या नांवासहि असाच संक्षेप मिळाला आहे. अनरंग केसरीच्या ऐवजीं रंगकेसरि हा शब्द वापरण्यांत येतो.

वर सांगितलेले ग्रंथ आज बरेच दिवस पंडितवर्गास परिचित आहेत तथापि लायडन यादीमध्यें आणखी अनेक ग्रंथांचीं नांवें दिसून येतात. त्या यादींतील कांहीं बावद ग्रंथांत अधिक अर्वाचीन इतिहास आला आहे. "बावद बलि" या पुस्तकांत बलिद्वीपांतील डच लोकांचा इतिहास आला आहे. "बावद नेगारी" या पुस्तकांत गव्हर्नर जनरल सल येथें आला त्याचें वर्णन आहे. बावदशक्र यांत शक्र उर्फ लाँबाक बेटांत झालेल्या बंडाचें वर्णन आहे. 'बावद वय' यांत बंजुवंगीचा इतिहास आलेला आहे.

पौराणिक तऱ्हेचा 'बावद संग्कल' नांवाचा एक ग्रंथ प्रसिद्ध आहे. यांत पृथ्वीच्या उत्पत्तीपासून जावामध्यें भारतीयांच्या वसाहतीचे काल्पनिक इतिहास दिले आहेत. यांत विशेषेंकरून विष्णूचे अवतार दिले आहेत. प्रथमतः विष्णूचे जे अवतार हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहेत ते दिले आहेत. नंतर सिंहलद्वीपांतील विष्णूचे अवतार दिले आहेत. (असें ब्रँडिस म्हणतो. पण ते अवतार कोणते हें सांगितलें असतें तर बरें झालें असतें.) आणि नंतर जावा येथील विष्णूचे अवतार उदाहरणार्थ कानोअर्जुनविजय, रामविजय, जयवय, अंगलिंगदर्म, कुडाराविसरेंग हे अवतार दिले आहेत. दोहोंकडचे पौराणिक व दंतकथांपासून उपलब्ध झालेले "इतिहास" जोडण्यास फारसा पक्षपात दाखविला नाहीं. त्यांत पुढें आदाम, नूह (नोहा), मूसा (मोझेस) आणि ऱ्हीसा यांचाहि वृत्तांत दिलेला आहे आणि पुढें रामाला यवद्वीपाची वसाहत करण्यासाठीं पाठवून दिलें आहे. यांतच पुढें स्वर्गसौख्यांचें वर्णन आलें आहे.

बावद सुरपतिः—बलि संस्थानाचा इतिहास यांत आहे. बावद या सदराखालीं या प्रकारचें जितकें वाङ्मय डॉ. ब्रँडिस यानें घातलें आहे त्यापेक्षां अधिक वाङ्मय त्याच्याच ग्रंथवर्णनपर यादींत सांपडतें. त्यापैकीं कांहीं आम्ही येथें देतों.

(१) अगस्त्यपर्वः—दक्षिण हिंदुस्थानांत अगस्त्य ऋषीस फारच मोठें महत्त्व आहे. संस्कृतीच्या अनेक अंगांच्या प्रसाराचें श्रेय (तामिलचें व्याकरण इ.) अगस्त्यास दिलें आहे. तसेंच महत्त्व या द्वैपायनांनीं दिलें असावें असें दिसतें. दक्षिणेप्रमाणेंच शैवधर्माचें यवद्वीपांत महत्त्व, डोंगरांनांच संस्कार करून देवळें बनविणाऱ्या महाराष्ट्रीय पद्धतीचा यवद्वीपांत उपयोग, शालिवाहन शकाचा उपयोग आणि अगस्त्यास महत्त्व या गोष्टी दक्षिणेची संस्कृति यवद्वीपाच्या संस्कृतीशीं अधिक सदृश आहे असें दाखवितात. अगस्त्यपर्व या ग्रंथांत "ऋषींच्या कुलांचा इतिहास" दिला आहे. यांतील माहिती आदिपर्वांतील माहितीशी थोडी बहुत जुळते. हें वर म्हटलेंच आहे.

(२) अर्जुनप्रलब्धः—अर्जुनास कालीनें मारलें आणि शिवानें जिवंत केलें अशी यांत कथा आहे. याचा उल्लेख वर आलाच आहे.

जावा येथील वाङ्मयामध्यें आणखी एक महत्त्वाचा प्रकार म्हटला म्हणजे अद्भुत वाङ्मय होय. आपल्याकडील कादंबरी किंवा कथासरित्सागरांतील भाग किंवा मुसुलमानी हातीमताई

कुंजरकर्णः—या बौद्ध गद्य ग्रंथांत नरकांतील यातनांचें वर्णन केलें आहे. या यातना कुंजरकर्ण या यक्षानें राजा बिंबिसार याच्या विरुद्ध बंड केल्यामुळें त्यास भोगाव्या लागतात. त्याला शंकरानें राक्षसाचें रूप दिलें व त्या स्वरूपांत त्यानें मनुष्यांवर पुष्कळ उपकार केले.

मंत्रिवडकः—हा कुरिपनचा राजपुत्र होता. त्याचा जन्म नन्दिरूपानें झाला होता. तो शिवलोकांत असतां त्यास मानवरूप प्राप्त होतें व त्यास सुर अथवा विरसुजय हें नांव मिळतें.

मेजुर विलिसः—नायकास अन्नसर असें नांव होतें. तो एका मठांत राहणाऱ्या विधवेच्या रत्नसरी नांवाच्या कन्येशीं विवाह करितो.

पकंगररसः—कुरिपनचा एक राजपुत्र. याचें वर्णन सत्वगंबु आणि अर्ज या ग्रंथांतहि आहे. याचें पालनपोषण दह येथील राजकन्येनें केलें. तिच्याशीं त्याची मैत्री जमली. पुढें तिच्या पित्यानें त्यास ठार मारविलें. परंतु त्या राजास कवि नदीवर आपल्या मुलीबरोबर तो लपलेला आढळला. कारण त्याला भगवानाच्या आज्ञेवरून नारदानें जिवंत केलें होतें.

पसंज जगंह मनिक अंकेरनः—हें एका ब्राह्मणाचें नांव असून तो सिदिमन्ल याचा पुत्र होता. त्यानें वासुकी-जवळून तेगेर नांवाचें शस्त्र मिळविलें.

पन ब्रयुतः—नायक दरिद्री असून त्यास पुष्कळ म्हणजे १८ मुलें होतीं. यांच्यापैकीं दोन मुलांचें वर्णन दुसऱ्या एका ग्रंथांत आलें आहे.

हिंदुस्थानांतील वाङ्मय आणि यावद्वीप वाङ्मय यांत एक फरक दिसून येतो तो ऐतिहासिक काळांतील स्त्रीपुरुषांच्या गोष्टींचा पौराणिक स्त्रीपुरुषांशीं संबंध हा होय. पुराणें आणि महाभारत यांतील कथांचा उत्तरकालीन कालविनोदनासाठीं तयार झालेल्या वाङ्मयापासून भरतखंडामध्यें जसा तुटकपणा दिसतो तसा येथें दिसत नाहीं, तर उलट कथावाङ्मयस्वरूपाचें सातत्य तेथें दिसून येतें. पुष्कळसें कथावाङ्मय आणि इतिहास-स्वरूपी बाबदवाङ्मय यांचें द्विधाकरण व्हावयास सुरवात झाली तथापि तें पूर्णपणें झालें नाहीं. रामायणांतील कथा पुराणें व कादंबऱ्या यांच्या तोडीला न बसतां "इतिहास" या मालिकेंत बसल्या ही गोष्ट आणि बाबद नांवाखालीं मोडणाऱ्या अनेक कथांतील अद्भुत भाग हीं लक्षांत घेतलीं तर इतिहास आणि अद्भुत वाङ्मय यांचें द्वैत स्थापित झालें नव्हतें हें सहज दिसून येतें. कांहीं अंशीं मराठी बखरी व बाबद यांची तुलना करतां येईल. मराठी बखरीस पुराणांतील कथांचेंच भविष्यकालीन उपबृंहण बनविण्याचा प्रयत्न शिवदिग्विजयादि बखरींत दिसून येतो.

नीति या विषयावर वाङ्मय जावा व बली येथें पुष्कळ आहे. नीतित्रित आणि नीतिसार हीं दोन पुस्तकें ठळकपणें नजरेस येतात. नीतिसारामध्यें म्हणी पुष्कळ आहेत.

देगुणाति.—हें एक उपदेशपर काव्य आहे. मागील जन्मींच्या पापपुण्यांचें फल या जन्मीं काय भोगावें लागतें हें यांत सांगितलें आहे. यांतच पुढें राजधर्महि सांगितला आहे. "राजनीति" या विषयावरहि एक दोन ग्रंथ दृष्टीस पडतात. "इन्द्रलोक" नांवाचा एक ग्रंथ राजनीतिपर आहे. इन्द्रलोक हा मुत्सद्दीगिरीचा एक आचार्य होऊन गेला. हा कुमारज्ञय नांवाच्या एका प्रसिद्ध शिष्याचा गुरु होता. ज्याप्रमाणें पंचतंत्र हा नीतिशास्त्रावर ग्रंथ आहे त्याप्रमाणेंच तेथेंहि ग्रंथ आहेतच.

**छंदःशास्त्र.**—जावा येथील वाङ्मयाचें भारतीयत्व दाखविणारी एक गोष्ट म्हटली म्हणजे त्यांचें छंदःशास्त्र होय. त्यांच्या वाङ्मयामध्यें अनेक महत्त्वाच्या कल्पनांस व्यक्त करण्या-साठीं संस्कृत शब्द शिरले आणि संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें व संस्कृत धर्तीवर वाङ्मय करावयाच्या प्रयत्नाबरोबर भारतीय वृत्तें देखील जावामध्यें जाणें अगदीं साहजिकच होतें. छंदः-शास्त्रावर त्यांच्यांत ग्रंथ झाले आहेत. त्यांच्या छंदःशास्त्रावरील ग्रंथांमध्यें अजरपिकतन्, अजिकेनांग इत्यादि प्रमुख आहेत. यांपैकीं पहिल्या ग्रंथांत जुरंगदनु, मनुक्, अभ, वसि, तम्तम्, कदिरि, पंजीमार्ग, देसुंग, वसेंग, पांकुर, सिमोम, इस्वि, तंजुंग इत्यादि उत्तरकालीन वृत्तांचें विवेचन केलें आहे. याशिवाय गिनाद इत्यादि वृत्तांत अनेक ग्रंथ आहेत. नागरकृतागम काव्यांत अनेक वृत्तें आलीं आहेत त्या वृत्तांच्या नांवावरून आणि लक्षणांवरून त्यांत भारतीय वृत्तें किती आहेत आणि नवीन वृत्तें तेथें कशीं तयार झालीं याची कल्पना येईल. नागरकृतागमांतील ( ३·१ ) एका शार्दूलविक्रीडिताचें उदाहरण घेऊं.

तिक्वन् भक्ति सिरान् मकेबु रिसिरा श्रीराजपत्नीश्वरी।
सत्यानूतव्रत पक्ष सोगत ससंस्कारे दगन्संग्पिजाः॥
तंसाः श्रीकृतवर्धनेश्वरपिता दे श्रीनरेंद्राधिप।
सेदंपत्यपगेः सिरेंग्सुगतमार्गांग्देसुकानिंग्जगत्॥ १॥

शार्दूलविक्रीडित—म, स, ज, स, त, त, ग.*
कृतिसूर्त—म, स, ज, स, त, त, ग ग.
अत्यष्टिसूर्त—म, स, ज, स, य, ल, ग.
धृतिसूर्त—म, स, ज, स, ज, ल, ल, ग.
अतिधृतिसूर्त—म, स, ज, स, न, न, ग.
जगद्धित—म, स, ज, स, न, न, र, ल, ग.
अभिकृतिसूर्त—म, स, ज, स, न, न, र, न, ग.
सुवदना—म, र, भ, न, य, भ, ल, ग.
स्रग्धरा—म, र, भ, न, य, य, य.

* अन्त्य वर्ण गुरू किंवा लघु कोणताहि असला तरी चालतो.

अतिजगतीसूर्तें—म, भ, न, म, ग.
मन्दाक्रान्ता—म, भ, न, त, त, ग, ग.
वसन्ततिलका—त, भ, ज, ज, ग, ग.
कृतिसूर्तें—त, भ, ज, भ, ज, भ,ल, ग.
संकृतिसूर्तें—ज, स, ज, स, ज, स, ज, स.
पृथ्वी—ज, स, ज, स, य, ल, ग.
विकृतिसूर्तें—ज, स, ज, स, न, न, र, ल, ग.
विकृतिसूर्तें—त, न, स, ज, स, न, न, ग.
कृतिसूर्त—त, न, त, न, त, न, ग, ग.
प्रहर्षिणी—म, न, ज,र, ग.
स्वागता—र, न, भ, ग, ग.
वंशपत्रपतित—भ, र, न, भ, न, ल, ग.
मद्रक—भ, ज, न, र, न,र, न, ग.
कृतिसूर्त—भ, भ, भ, न, ज, ज, ल, ग.
शिखरिणी—य, म, न, स, भ, ल, ग.
भुजंगप्रयात—य, य, य, य.
वंशस्थ—ज, त, ज, र.
तोटक—स, स, स, स.
आर्यगतीसूर्तें—स, स, न, न, ग.
कृतिसूर्तें—स, न, ज, न, भ, स.
विलासिनी—न, ज, भ, ज,भ, ल, ग.
आकृतिसूर्तें—न, ज, भ, ज, भ, ज,त, ग.
अश्वललित—न, ज, भ, ज, भ, ज, भ, ल, ग.
धृतिसूर्तें—न, ज, भ, ज, न, स.
संकृतिसूर्तें—न, ज, भ, ज, न, स, ज, स.
नर्कुटक, रजनी—न, ज, भ, ज, ज, ल, ग.
अभिनवतामरस—न, ज, ज, य.
हरिणी—न, स, म, र, स, ल, ग.
महामालिका—न, न, र, र, र, र.
विपुलवक्त्रा—य, स, ग, ग। ग्ल, ल्ग, ग, ग, ल, ग, ल, ग.
विपुलवक्त्रा—स, स, ग, ल। ग्ल, ग, ग, ल, ल, न, ल, ल.

जावा येथें आपलें वैद्यक कितपत प्रसार पावलें हें कळत नाहीं. तेथील वैद्यकासंबंधानें फारच थोडी माहिती मिळते. ब्रँडीसच्या यादीमध्यें 'अंदा' नांवाचा देवीच्या उपचारासंबंधीं ग्रंथ सांपडतो.

भारतीय कामशास्त्राचा थोडाबहुत प्रसार तेथें झालासें दिसतें. "अंगुलिप्रवेश" नांवाचा एक अश्लील ग्रंथ ऋषि संविन्न याच्या नांवानें प्रसिद्ध आहे. स्त्रियांशीं प्रेम करण्यास सुरवात कशी करावी हें यांत सांगितलें आहे.

कलाकौशल्यावर ग्रंथ निरनिराळे असतील असें दिसतें. अजिअष्टकोशली नांवाचा अनेक कौशल्यशिल्पांवर ग्रंथ यादींत सांपडतो. मुरगेलढाऊपणावर देखील वाङ्मय जावांत अवतीर्ण झालें आहे. 'अविगाविग' नांवाच्या गद्य ग्रंथांत वीरसिंग नामक देशांत चालू असलेले मुरगे लढविण्यासंबंधाचे नियम दिले आहेत. याच विषयावर दुसरें एक पुस्तक पखर या नांवाचें आहे. शिवाय हत्यारें, आउतें यांचा उपयोग सांगणाऱ्या ग्रंथाचें अस्तित्वहि दिसून येतें. अशा एका ग्रंथाचें नांव 'पंगे लिंगे लिंग पदर्तेन इ तरु' असें आहे.

यवद्वीपाच्या इतिहासास सुरुवात करण्यापूर्वी तेथील कांहीं स्थलनामांची ओळख करून घेणें अवश्य आहे; आणि ती करून घेतल्यास जावांतील सध्यांच्या मुसुलमानांच्या पूर्वजांविषयीं आपणांस आपलेपणा खास अधिक वाटेल म्हणून तीं येथें देतों.

अन्तःपुर, अन्तरशशी, अन्यवसुधा, अमृतवर्द्धनी, अमृतसभा, अयोध्यापुर, आधिराज्य, आर्य्य, ईशानवज्र, ईश्वरगृह, कण्डववन ( खाण्डववन ), कण्डिः, कमलपण्डक, कमलसन, कर्णातक, कविरि, कांचि, कांचीपुरी, काम्पर, काम्पुद, कांपे, काम्बोज, कुटराज, कुटिजाति, कुटिपंकज, कुटिरत्नपंकज, कुटिसंग्रह, कुमुद, कुलनन्दन, कुलुर, कुवराह, केट, केतकी, गुन्तुर, गुरुंगुरुंग, गुहा, गृहस्थधर, चण्डिलिम, चण्डिवुक्कल, चम्पा, जग, जगद्धित, जंगाल, जम्बल, जम्बुद्वीप, जय, जयकृत, जयमनल्लु, जयमुक, जयशिका, जलगिरि, जवजव, जाति, जातिगुम्लुर, जाम्बि, जालाधिप, जीवन, जोयानवज्र, डुरी, तजुंग नगर, तण्डर, तथागतपुर-( गृहस्थधर ), तरुण, तलध्वज, ताम्पकडुरी, ताल, तिक्तविल्व, तिक्तमालूर, तिक्तश्रीफल, तिमूर, तीर, त्वस वासिष्ठ, दह, देवरमे, धर्म्मनगरी, नदी, नन्दनवन, नन्दिनगर, नशोर, नीलकुसुम, नैरंजना, न्युदन्त, पंकज, पंचर, पंचासर, पडलि, पलब्धि, पाण्डकन, पाण्डवाद्रि, पूर्वनागर, प्रज्ञापारमितापुरी, वकुलपुर, वज्रक, वज्रपुर, वज्रलक्ष्मी, वज्रासन, वलितर, वालि, बुड्डर, बुद्धाधिष्ठान, बुद्धिकुञ्चिर, बोधिमूल, भीम, मयपहित, मदकरीपुर, मधुर, मन्दर, मरुत्म, मेरु, यवन, यानत्रयराजधान्य, रंगपुर, रतिमन्मथाश्रम, रत्न, रत्नपंकज, राजपुर, लोचनपुर, वत्सरि, वनाश्रम जेनर, विजयवक्र, विपुलाराम, विल्वतिक्त, विशेषपुर, विष्णुवाल, विहार, विहारबाहु, वृषभपुर, वेशपुरी, वैशपुरी, व्वतन, शिलापेटक, शिलाभंगो, शिलाहृत, शुचि, शूरवाण ( शूरभाण ), शोभ, श्रीफलतिक्त, श्रीरंगपुर, षड्विहार, सगडा, सगल, समीची, समुद्र, समुद्रवेला, साक्षक, सागर, साम्बक, सिंधनगरी, सिद्ध, सिद्धयात्र, सीम, सुकलील, सुकविजय, सुगतासन, सुष्ट, सुरभ, सुरभय, सुरयश, सूंब, हरशालन, हरिनन्दन, हरिभवन, हिमवान्, हुजुंग् मेदिनी इ०.

**ऐतिहासिक माहितीचे तुकडे.**—जावानीज बावद ग्रंथ, चिनी ग्रंथ, शिलालेख, ताम्रपट इत्यादि साधनांनीं आज यवद्वीपाचा इतिहास लिहिला जात आहे. बावद ग्रंथ जर मनोरंजक कथा आपल्या पुढें ठेवतात, तर त्यांच्या विश्वसनीयतेविषयीं चिनी ग्रंथ व शिलालेख संशय उत्पन्न करितात. इतिहास आणि काव्य यांची भेसळ ज्याप्रमाणें रामायण

व पुराणें यांमध्यें दृष्टीस पडते त्याप्रमाणें बावद ग्रंथांतहि दृष्टीस पडते. जगदुत्पत्तीविषयक विचार आणि प्राचीन कथा यांचा व खऱ्या इतिहासाचा मेळ बसविण्याविषयीं उदाहरणार्थ राजघराण्यांचा संबंध ब्रह्मदेवाशीं जोडण्याविषयीं धडपडी या बावद ग्रंथांत दिसतात; बावद ग्रंथांनीं वर्णिलेलीं स्त्रिया मिळविण्याकरितां युद्धें हीं देखील फार प्राचीन कालाच्या इतिहासाची छटा त्या ग्रंथांस देतात.

यवद्वीपांतील प्रबल संस्थान जें मयपहित त्याचा संबंध तुमपेल व केदिरि या संस्थानांशीं, बलिद्वीपाशीं, सुमात्राशीं व आसपासच्या जिंकलेल्या मुलखांशीं तर येतोच, पण चिनी व तार्तार यांसारख्या दूर देशच्या लोकांशींहि येतो. हिंदुस्थानांतील राज्याशीं राजकीय संबंध शोधण्यासाठीं झालेल्या प्रयत्नांस अजून यश आलें नाहीं.

मयपहितसंबंधीं जावानीज इतिहासग्रंथांत जी माहिती मिळते ती फारच अपूर्ण आणि अविश्वसनीय आहे. 'परारतन' नामक ग्रंथांत जी माहिती आहे ती सर्वांत चांगली आहे. हा ग्रंथ डॉ० ब्रॅंडिस यानें लोकांच्या नजरेस आणला.

एकांत तुमपेल येथील राजांविषयीं माहिती आहे. यावर डॉ० ब्रॅंडिस यानें ऐतिहासिक भाष्य केलें असून त्यासाठीं त्यानें जावानिज बावद नामक ग्रंथ, चिनी ग्रंथ आणि जावा येथील प्राचीन शिलालेख इत्यादि साहित्य वापरलें आहे.

परारतन या महत्त्वाच्या ग्रंथांतील मुख्य भाग येथें देतों. या ग्रंथांत प्रारंभीं मयपहित राजघराण्याचा प्राचीन दंतकथात्मक इतिहास दिला आहे.

या घराण्याचा संस्थापक केन अंगरोक हा होय. त्याविषयीं माहित असलेल्या कथा येणेंप्रमाणें:-

तुंगल अमेतुंग हा केन अंगरोक याच्या देदीस नामक पत्नीला पळवून नेतो-त्याचा मृत्यु कट्यारीनें होईल आणि त्याप्रमाणें त्या मुलांचा आणि नातवंडांचा अंतहि कट्यारीनेंच होईल असें भविष्य-तुंगल अमेतुंग याचा खून-तुंगल अमेतुंग याच्यापासून अनुशपति नामक पुत्रास देदीस ही प्रसवते-अंगरोक राजा होतो-श्रीराजस आणि अमूर्वभूमी हें नांव धारण करतो-तुमपेल देश "दह" (केदिरि)पासून स्वतंत्र होतो. दहविरुद्ध युद्ध-दहनृपतीचा पराभव (शकें ११४४). पुढें २७ वर्षें राज्य करून म्हणजे शक ११६९ मध्यें राजा केन अंगरोक हा भविष्याप्रमाणें गुप्त कट्यारीनें ठार होतो. त्याची रक्षा कागे निंग येथें रक्षिली आहे.

अंगरोक याची उत्पत्ति ब्रह्मदेवापासून वर्णिली आहे. त्याच्यानंतर त्याचा सावत्र मुलगा अनुशपति हा गादीवर आला. पुढील वर्षी अंगरोकच्या देदीस खेरीज दुसऱ्या एका पत्नीपासून झालेल्या रादेन्तोहजय नामक मुलानें त्यास ठार केलें. त्याची रक्षा कीडल येथें रक्षिली आहे. रादेन्तोहजय यास शके ११७१ मध्यें गादी मिळाली पण त्यास फार थोडा काळपर्यंत राज्य करतां आलें. त्यानंतर रंगवूनी यास गादी मिळाली. रंगवूनी हा अंगरोक व देदीस यांचा मुलगा होता, त्यानें विष्णुवर्धन हें नांव धारण केलें.

महिषचंपक रंगवूनीचा मित्र आणि संबंधी यास राज्याचा चालक केलें. भट्टार नरसिंह हें नांव त्यानें धारण केलें. शके ११९४ त रंगवूनी वारला, त्यानंतर कृतनगर (दुसरें नांव भट्टार शिवबुध) हा गादीवर बसला. हा छांदिष्ट आणि निष्काळजी राजा होता. याची कारकीर्द मोठी आणीबाणीची होती. गादीवर बसल्यानंतर थोडक्याच दिवसांत मलयु (म्हणजे सुमात्रा) देशाशीं यानें युद्ध सुरू केलें, आणि यामुळें राज्यरक्षणासाठीं अवश्य असें सैन्य उरलें नाहीं. त्यामुळें दहचा राजा जयकटोंग यास फावलें. त्यानें चीनच्या मंगोलियन बादशहाशीं देखील युद्धास सुरवात केली. त्याचा सेनापती रादेन (रत्न) विजय (महिषचंपकाचा पुत्र) हा होता.

जयकटोंग यानें तुमपेलच्या उत्तरेवर स्वारी केली. त्यास रादेनविजय यानें मोठ्या यशस्वी रीतीनें अडथळा केला, तथापि कृतनगर हा दुसऱ्या एका युद्धांत पडला. रादेनविजय यानें राजाच्या मृत्यूचें वर्तमान ऐकतांच तो घाईनें परत आला आणि एका राजकन्येला सोडविलें. तो पुढें मदुरा येथें गेला आणि तेथें वीरराज (उर्फ वाणकविदे) याच्या आश्रयास राहिला. वीरराज हा त्यांचा शत्रू जो जयकटोंग त्याचा मित्र होता, तथापि वीरराज यानें त्याचें स्वागत केलें, आणि राजकन्येची काळजी घेतली. एवढ्या काळांत म्हणजे शके ११९८ मध्यें जयकटोंग यानें तुमपेल घेतलें. जयकटोंग यानें हें शहर ११९८ मध्येंच घेतलें किंवा नाहीं याबद्दल वाद आहे, आणि यावर डॉ० ब्रॅंडिस यानें टीपा लिहिल्या आहेत. रादेनविजयास दह येथील राजानेंच ठेवून घेतलें. जयकटोंग यास ट्रिक येथील जमिनी अधिक सुपीक करण्यासाठीं वीरराज यानें सल्ला दिला. मदुरा येथील कांहीं लोक विजय यानें आणले होते. ते भुकेले झाले. त्यांनीं मय नांवाचें फल खाल्लें, तें त्यांनां कडू लागलें आणि त्यामुळें त्या प्रदेशास मयपहित (कडूमय) हें नांव पडलें.

१२१५त तार्तार लोक या बेटांत उतरले त्यांस रादेनविजय जाऊन मिळाला अर्थात् त्यानें दहविरुद्ध बेमानी केली. जयकटोंग याचा पराभव झाला आणि तार्तारांनीं त्यास पकडलें. रादेनविजय यानें कृतनगर राजाची दुसरी पुत्री सोडविली; आणि तिला घेऊन तो मयपहित येथें गेला. नंतर त्यानें तार्तारांच्या विरुद्ध जाऊन त्यांस हांकून दिलें आणि ते चीनला गेले.

अशी कथा व्यक्त केली गेली आहे कीं, तार्तार लोक रिक्त हस्तानें परत जाऊं नये म्हणून तेथील दोन सुंदर राजकन्या चीनच्या बादशहास नजर करण्यासाठीं घेऊन गेले. तथापि चिनी ग्रंथकार याविषयीं कांहींच लिहीत नाहींत. त्यांस

पराभव नमूद करणें मोठें महत्त्वाचें वाटलें नसावें. इकडे जे जावा येथील सैन्य सुमात्रा येथें लढत होतें त्यांनीं देखील दोन राजकन्या पकडून आणल्या.

तार्तारांनीं पकडलेला जयकटोंग हा १२१५ किंवा १२१६ मध्यें मरण पावला.

१२१६ मध्यें रादेनविजय हाच कृतराजस जयवर्धन हें नांव धारण करून राजा बनला. त्याच्या सर्वांत अधिक मानाच्या पत्न्या म्हणजे कृतनगर राजाच्या मुली होत्या, हें त्याच्याच एका लेखांत सांगितलेलें आहे. या लेखांत वरीचशी माहिती आहे, आणि त्यांतून किलेक उतारे ब्रँडिस यानें घेतले आहेत. त्यानें कांहीं पूर्वोपकारस्मृतीदाखल कुदादु येथील जमीन कुदादु येथील लोकांस बक्षीस दिली आणि त्याचें एक लेखपत्रहि करून दिलें. कृतराजस यानें फार थोडा काळ राज्य केलें, तो बहुतेक शके १२१७ मध्यें वारला असावा. त्याची रक्षा अंतपुर येथें नेली.

मयपहित येथील दुसरा राजा म्हटला म्हणजे रादेन काल गेमेत हा होय. हा विरोदनविजय आणि मलयु देशची राजकन्या दारा फेतक यांचा मुलगा होता. राजपदावर असतां याचें नांव भट्टार जयनगर असें होतें. त्याच्या कारकीर्दीत बंडें पुष्कळ झालीं. त्यास त्याची प्रजा फारशी मानीत नव्हती. क्षत्रिय त्याचे वैरी बनले. त्यानें आपल्या चुलत्यास उपद्रव दिला आणि तंगशा याच्या पत्नीस दूषित केलें. तंगशा यानें त्याचा सूड असा घेतला कीं, राजा आजारी असतां तंगशा शेजारीं बसला होता तेव्हां त्यानें राजास खुपसून ठार मारलें ( १२५० ).

त्याच्यानंतर राज्य ब्रेंग जीवन नांवाची त्याची सावत्र वहीण हिच्या हातीं गेलें.

राज्यकर्ती या नात्यानें तिचें नांव जयविष्णुवर्धिनी होतें. ती आपल्या हयं वुरुकनामक अल्पवयस्क पुत्रासाठीं कारभार करीत होती. हयं वुरुकच्या वापाचें नांव कृतवर्धन हें होतें. ( चक्रधर असें नांव परारतन या ग्रंथांत आहे तें चुकीचें आहे असें डॉ० कर्न म्हणतो. परारतन या ग्रंथांत पदवी व नांव यांत घोंटाळा केला असावा. )कृतवर्धन हा न्यायाधिकारी होता. हें नांव ब्रँडिस यानें विवेचनार्थ घेतलेल्या एका जुन्या लेखांत आढळतें. जयविष्णुवर्धिनी या राज्ञीनें जाव्हा, बलि व इतर अनेक बेटांचें स्वामित्ववाचक शब्द वापरले आहेत. मयपहितच्या राज्याचें सर्वांत श्रेष्ठत्व आणि विस्तृतत्व हयं वुरुकच्याच राज्यांत वाढलें.

[ ब्रँडिस यानें असें म्हटलें आहे कीं, सुमात्राद्वीपाचा राजा आदित्यवर्मन् यानें शक १२६५ मध्यें ज्या राणीस राज्यावर बसविलें, व मञ्जुश्रीमध्यें ज्या जावा येथील राणीचा उल्लेख आहे ती जयविष्णुवर्धिनी राणीच असावी. आदित्यवर्मन्चें तिच्याशीं कांहीं तरी नातें असून कदाचित् त्यांचा प्रेमसंबंध असावा. आदित्यवर्मन् हा बौद्धसंप्रदायी होता. ] हयं वुरुक याचा जन्म शक १२५० मध्यें झाला असावा व त्यानें शक १२७२ मध्यें आपल्या आईच्या हातून अधिकारसूत्रें घेतलीं असावीं. तो शक १३११ मध्यें मृत्यु पावला. हयं वुरुक याच्या कारकीर्दीमध्यें मयपहित वैभवशिखरास पोंचलें. या राजाला राजसनगर व संग हयंग वेकसिंग मुख अशींहि नांवें होतीं.

परारतन आणि नागरकृतागम या दोन्हीहि ग्रंथांत जावाच्या साम्राज्याखालीं असलेल्या सर्व प्रदेशांची माहिती दिलेली आहे. पैकीं एका ग्रंथांतील माहिती विशेष विस्तृत आहे.

परारतन या ग्रंथांत पुढील नुसती यादी आहे.

बली, दोम्पो, सेरन, गुरुन, तंजुंगपुर, सुण्ड, पलेंबगं, हरु, पहंग, तुमसिक.

नागरकृतागमांतील पुढील यादी अधिक विस्तृत आहे.

१. सुमात्रा ( याला जावांतील लोक मलय म्हणत )—जांबि, पलेंबगं, तेब, धर्मांश्रय, कंडिस्, कह्वस्, मनंगकवो, सियक, रेकान, कांपर, पने, कांपे, हरु, मण्डहिलिंग, तुमिहगं, पर्तक, बरत, ल्वस, समुद्र, लमुरि, बतन, लांपुगं, बरुस्, हे आणि मलयमधील इतर भाग.

२. बोर्निओ ( तंजुंगनगर )—कपुअस, कतिंगान, सांपित, कुट, लिंग्ग, कुट बरिंगिन, संवस, लवइ, कंडगंडगंन, लंड, समेडंग, तिरेम, सेडु, बुरुने, कल्कस अलुडुंग, सोलोत, पसिर, बरितु, सवकु, तबलुंग, तुंजुंकुते, मलनो, राजधानी—तंजुंगपुरी.

३. मलाक्का—पहंग, हुजुंग, तनः, लेंका-सुक, सेमोंग, कलंतेन, त्रिंगगनो, नगोर, पकमुवर, डुंगुन, तुमसिक, संगह्यंग हुजुन, केलंग, केड, जेरे, कंजपिनिरन्, व इतर द्वीपसमूह, इत्यादि.

या काव्यामध्यें परारतन या ग्रंथापेक्षां ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचा भाग बराच आहे; आणि परारतन या ग्रंथामध्यें असणारी माहितीहि यांत अधिक विस्तृत दिलेली आहे. या काव्यांत वर्णन केलेल्या हकीकती कवीच्या समकालीनच आहेत. याच्यामुळेंच आपणाला तेथील राजघराणें, तेथील राजांचे परकीय राजांशीं विशेषतः चंपा, कांबोज, व सयाम येथील राजांशीं संबंध, त्यांच्या देणग्या, वर्षासनें, इ. व त्यांचीं सर्व लोकांच्या कल्याणासाठीं केलेलीं कामें वगैरे बाबींचें व राजधानी मयपहित व इतर देवालयें यांचें विस्तृत वर्णन वाचावयास मिळतें.

परारतन ग्रंथांत तेथील राजघराण्याबद्दल अशी माहिती मिळते कीं, हयम् वुरुक याच्या आईस आणखी दोन मुली होत्या. त्यांपैकीं वडील मतहुन येथील राजास व धाकटी पगुहन

येथील राजास दिल्या होत्या. वडील मुलीचें नांव रोदन लरंग असें आढळतें.

प्रस्तुत काव्यावरून अशी माहिती मिळते कीं, हयं वुरुक याची धाकटी वहीण लासेमची राजकन्या मतहुन येथील राजा राजसवर्धन यास दिली होती. परारतनमध्यें हयम् वुरुक याची सर्वांत धाकटी वहीण पजंग येथील राजकन्या इचें सुमन याजवरोबर लग्न झाल्याचा उल्लेख आहे. परंतु या काव्यांत तिच्या नवऱ्याचें नांव पगुहन् येथील राजा सिंघवर्धन असें आहे. या काव्यांत असें आहे कीं, या राजाच्या आईस म्हणजे दह येथील राजकन्येस, तिची वडील वहीण कुरिपन अथवा जीवन येथील राजकन्या हीच राज्यकर्ती जयविष्णुवर्धिनी राणी (इचें पूर्ण उपपद हजि राजदेवी महाराजसा) असून, तिच्या बरोबरचा मान मिळत असे. तिच्या नवऱ्याचें नांव विजयराजस असें वखरींत आहे व तेंच काव्यांतहि आढळतें व तो वेंगकेर येथील राजा होता.

इतिहासावरून आपणास असें कळतें कीं, हयम् वुरुक याचा द्वितीय विवाह त्याच्या सख्या मावस वहिणीशीं म्हणजे दह येथील राजकन्येच्या मुलीशीं झाला असून तिचें उपपद पदुकचोरि असें होतें. या काव्यांत तिचें सुसुमनदेवी असें नांव आढळतें व तिला परमेश्वरी हें उपपद आढळतें व ती सर्व राण्यांत योग्य व श्रेष्ठ होती असें वर्णन आढळतें.

परारतन ग्रंथांत शक १२८४ (खि. श. १३६२–६३) मध्यें एका मोठ्या श्राद्धसमारंभाचा उल्लेख आहे. या काव्यांत कवीनें ६७ व्या सर्गामध्यें पितृश्राद्धाचें वर्णन केलें आहे.

परारतन या ग्रंथावरून हयम् वुरुक यास नाट्याची आवड असून त्याचें अभिनयकौशल्य अप्रतिम असल्याचें कळतें. याच्या नाट्याचें वर्णन प्रस्तुत काव्याच्या ९१ व्या सर्गांत आलें आहे.

आठव्या सर्गामध्यें मयपहित राजधानीचें वर्णन असून तेथील इमारती, देवालयें व इतर स्थलांचें वर्णन आहे. सध्यां हें वर्णन कदाचित् आपणाला सत्यापासून किंचित् दूर वाटेल परंतु कवीनें तें आपल्या समकालीन देशबांधवांकरितां लिहिलें होतें ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. तरीसुद्धां राजधानींतील इमारतींचें वर्णन आपल्याला फार महत्त्वाचें आहे. कारण त्यावरून आपला भारतीय-जावानीशिल्पकलेचा इतिहास अजमावतां येतो.

हयम् वुरुक स्वतंत्रतेनें कारभार पाहूं लागल्यानंतर प्रथम त्यानें सर्व देशाची माहिती करून घेण्याकरितां आणि आपल्या प्रजेस दर्शन द्यावें म्हणून सर्व राज्यांत प्रवास केला; यापैकीं एका प्रवासाच्या वेळीं या काव्याचा कर्ता त्याजवरोबर होता. त्यामुळें त्याला स्वतः पाहिलेल्या स्थळांचें, इमारतींचें व तत्संबद्ध ऐतिहासिक गोष्टींचें वर्णन विस्तृततेनें देण्याची संधि मिळाली. या प्रवासवर्णनावरून आपणास जावाची १४ व्या शतकांतील भौगोलिक स्थिति कळून येते व तिची सध्यांच्या स्थितीशीं तुलना करतां येते.

मधून मधून कवीनें स्वतःबद्दलचेहि कांहीं कांहीं प्रसंग वर्णिले आहेत. उदाहरणार्थ एका ठिकाणीं त्यानें एका वृद्ध बौद्ध भिक्षूच्या भेटीची हकीकत दिली आहे. हा भिक्षु ८३ वर्षांचा असून तो राजाचा आप्त होता व त्याच्याकडे राजकीय पुरुषांच्या समाधिस्थानांचें रक्षण करण्याची कामगिरी होती. कगेनेंगन येथें पहिली समाधि या वंशाच्या संस्थापकाची होती.

परारतनमध्येंहि त्याची समाधि याच ठिकाणीं असल्याचा उल्लेख आहे. प्रपंच कवीला या ठिकाणीं जाऊन त्या भिक्षूची गांठ घेण्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे केन अंग्रोक या राजाचा व त्याच्या वंशजांचा इतिहास माहित व्हावा हें होय. त्याची माहिती मिळविण्याची इच्छा त्या भिक्षूनें पूर्ण केली. तेव्हां ४० ते ४९ पर्यंतच्या सर्गांत कवीनें केन अंग्रोक राजाच्या उदयापासून (येथें त्याचें नांव रंगः राजस असें आहे.) भटार कगोनेंगन या ठिकाणीं तो समाधिस्थ होईपर्यंतची सर्व हकीकत देऊन हयम् वुरुक याच्या कारकीर्दीपर्यंतची सर्व कथा गोष्टीच्या रूपानें दिली आहे. मयपहित येथील राजवंशाची उत्पत्ति ब्रह्मा, गिरींद्र, शिव यांपासून झाल्याचें वर्णन केलें आहे. इतिहासग्रंथांत केदिरिच्या अस्ताचा शक ११४४ हा दिलेला आहे. इतिहासाच्या आरंभीं आपणास शक ११०४ सांपडतो. तो बहुतकरून राजस या राजाचा जन्मशक असावा परंतु कवीनें त्याबद्दल स्पष्टपणें कांहींच लिहिलें नाहीं. या काव्यामध्यें त्याचा मृत्युशक ११४९ हा दिला आहे परंतु परारतनमध्यें ११६९ हा दिला आहे. याच्यानंतर त्याचा पुत्र अनूषनाथ हा गादीवर आला. अनूषनाथ व अनूषपति हे दोन्ही शब्द समानार्थीच आहेत. हा शके ११७० मध्यें मरण पावला. त्याची समाधि किदल येथें असून तेथें एक शिवालय बांधिलें आहे. तो शैव होता म्हणून तो शिवालयांतच मृत्यूच्या वेळीं आला असें लोक म्हणत.

त्याच्यानंतर त्याचा पुत्र विष्णुवर्धन हा गादीवर बसला. तोहजय यानें चांगलें पण फार थोडा वेळ राज्य केलें म्हणून त्याच्याबद्दल फारशी हकीकत दिली नाहीं. परंतु यावरून तोहजयाच्या कृत्यांचें जें वर्णन इतिहासग्रंथांत आलें तें चुकीचें आहे असें म्हणतां येत नाहीं. प्रपंचानें (नागरकृतागम) दिलेली हकीकत त्याच्या कालापुरती खरी व पुराव्याकरितां ग्राह्य मानण्यास हरकत नाहीं.

विष्णुवर्धनाच्या हकीकतींत मात्र या दोन्ही ग्रंथांत फारच साम्य आहे. परारतन या ग्रंथांत विष्णुवर्धन आणि भटार नरसिंघ यांच्यामधील प्रसंगांचें व लिंगपति याला केलेल्या शासनांत जें वर्णन आलें आहे त्या वर्णनास या

काव्यावरून पुष्टि मिळते. विष्णुवर्धन अथवा विष्णु हा शक ११९० किंवा ११९४ मध्यें मृत्यु पावला. त्याचे अवशेष अंशतः वलेरि येथील शिवालयांत व अंशतः जगहु येथें बौद्ध म्हणून पुरण्यांत आले. त्याच्यानंतर लवकरच त्याचा मित्र नरसिंघ मृत्यु पावला व त्याच्या नांवचें कुमित्र येथें एक शिवालय वांधिलें.

यानंतर कृतनगर हा गादीवर आला. त्यानें शक ११९७ मध्यें मलय देशाशीं युद्ध केलें. लवकरच यानें सुमात्रा व पहंग या देशांवर स्वामित्व स्थापित केलें आणि सुण्डदेश, मधुर व इतर कांहीं भागांस जावाचें वर्चस्व कबूल करावयास लाविलें. या राजाच्या स्वभाववर्णनामध्यें काव्यांत आणि परारतन या ग्रंथांत विरोध दिसतो. काव्यामध्यें त्याला केवळ चांगुलपणाची मूर्ति कल्पिली आहे. परंतु हा कवि बौद्ध होता व तो राजा कट्टा बौद्ध होता यावरून या कवीपेक्षां परारतन या ग्रंथावरच जास्त विश्वास ठेवण्यास हरकत नाहीं.

कृतनगर शक १२१४ मध्यें निर्वाणास गेला. परारतन-मध्यें याचा मरणशक दिलेला नाहीं. (ब्रँडिस याच्या मतें याचा मृत्युशक ख्रि. श. ११९७ हा असावा. परंतु कर्नच्या मतें ही गोष्ट अशक्य दिसते. कारण चीन देशाचा मंगोलियन बादशाह कुब्लइखान यानें चीनच्या विजयानंतर जी जावावर स्वारी केली ती करण्यास त्यानें १७ वर्षें वाट पाहिली असण्याचा मुळींच संभव नाहीं. या स्वारीच्या वेळीं कृतनगर राजा मृत्यु पावून फारशीं वर्षें लोटलीं नव्हतीं असा उल्लेख चिनी बखरींतून आढळतो). कृतनगर मेल्यानंतर शिवबुद्ध लोकास गेला असें वर्णन आहे. त्याचे अवशेष ज्या गांवीं आहेत त्यास शिवबुद्ध असेंच नांव आहे तेथें त्याची मूर्ति स्थापन केली आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं त्याची एक जिनरूपी मूर्ति स्थापन केली आहे.

या राजाच्या मरणानंतर केदिरीचा मांडलिक राजा जय कतोंग यानें वंड केल्यामुळें फार वाईट काळ आला. या राजाचें वर्णन कवीनें फार वाईट म्हणून केलें आहे. या दुःस्थितींतून देशाला कृतनगर राजाचा पुत्र विजय यानें सोडविलें. त्यानें कुब्लइखानानें पाठविलेल्या तार्तार लोकांशीं सख्य करून त्यांच्या मदतीनें जय कतोंग याचा पराजय केला. व शेवटीं तार्तार सैन्यावर उलटून त्यांची कत्तल केली तेव्हां बाकी राहिलेले तार्तार चीन देशास परत गेले. त्यांनीं जातांना जय कतोंग याचें बुणगें मात्र आपल्यावरोवर नेलें असें चिनी बखरींत वर्णन आहे.

जय कतोंग याच्या मरणानंतर शक १२१६ मध्यें विजय गादीवर बसला. यानें कृतनगर जयवर्धन असें नांव धारण करून मयपहित येथें आपली राजधानी स्थापिली. यानें फारच थोडे दिवस राज्य केलें. तो शक १२१७ मध्यें मृत्यु पावला. काव्यामध्यें याचा मृत्युशक १२१६ म्हणून दिला आहे परंतु तो वरील गोष्टींशीं विसंगत दिसतो. परारतनमध्यें शक १२१७ दिला आहे. त्याला कतोन येथें पुरिलें असून तेथें त्याचें बुद्धमंदिर आहे. या देवालयाचें नांव अन्तःपुर असेंहि आहे. सिंपिंग येथें त्याचें एव शिवरूपी मूर्तीचें देवालय आहे.

जयनगर हा त्याच्यानंतर गादीवर आला. तो शक १२५० पर्यंत राज्य करून विष्णुलोकास गेला. तो वैष्णव होता. त्याचे अवशेष दलेम येथें असून तेथें विष्णुरूपी मूर्तीचें देवालय आहे. अशींच देवालयें इतर दोन ठिकाणीं आहेत. हीं ठिकाणें शिलपेटक आणि बुवत हीं होत. या ठिकाणींहि विष्णूच्या मूर्ती आहेत. सुकलील येथें त्याची ध्यानिबुद्ध अमोघसिद्धि या नांवाची बौद्धमूर्ति आहे. परारतन या ग्रंथांत फक्त एवढेंच सांगितलें आहे कीं, त्यास चोपोंगन येथें पुरलें व त्या गांवास शृंगापुर असेंहि नांव आहे.

या राजाचें एक पराक्रमाचें कृत्य म्हणून या कवीनें वर्णन केलें आहे तें म्हटलें म्हणजे लुमजंग येथील नंबि राजाचा त्यानें केलेला पराजय हें होय. हीच हकीकत परारतन ग्रंथांत विस्तारानें सांगितली आहे.

जयनगर याच्या मागून त्याची वहीण जीवन (कुरिपन) येथील राजकन्या गादीवर बसली अशी माहिती मिळते. जरी तिच्या हातांत सार्वभौम सत्ता होती तरी ती वास्तविकपणें आपल्या अज्ञान मुलाच्या वतीनें प्रतिनिधि म्हणून राज्य करीत होती. राज्याचा मुख्य भार सेनापति पतिः गजमद याच्यावर होता. यानें पुष्कळ विजय मिळविले. यानें खऱ्या राजापेक्षांहि सार्वभौमत्व गाजविलें. अलीकडील सम्राटांस त्याचें उदाहरण घेतां येईल. परंतु त्याच्या स्वभावांत क्षुद्रपणा अणुमात्रहि नव्हता. या राणीच्या कारकीर्दींतील महत्त्वाची गोष्ट म्हणून या काव्यांत शक १२५३ तील सडेंगवरील स्वारीचें वर्णन केलें आहे. परारतनमध्येंहि या स्वारीचें वर्णन आहे.

या ठिकाणीं त्या बौद्ध भिक्षूच्या मुखानें सांगितलेली हकीकत संपते.

मधून मधून कवीनें कांहीं स्थलांचें वर्णन केलें आहे परंतु तीं स्थलें म्हणजे वहुतेक समाधिस्थानें आहेत. सिंघसरी येथील शेवटचा राजा कृतनगर यानें देणगी दिलेलें उसान येथें एक देवालय आहे तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. हा राजा शैव आणि बौद्ध दोन्हीहि धर्म सारखेच मानित असे म्हणून त्यानें या देवळाचा खालचा भाग शैव धर्तीचा व वरचा भाग बौद्ध धर्तीचा बांधिला आहे, आणि खालीं शिवाची प्रतिमा स्थापन करून वरतीं मुकुटधारी ध्यानिबुद्ध अक्षोभय याची मूर्ति स्थापन केली आहे.

**नजराणे.**—येथील राजांस येणाऱ्या नजराण्याचे पदार्थ म्हणून हत्ती, हस्तिदंत, जंगल आणि केदिरि येथून नारळ व राण्यांस खाण्याकरितां सुपारी यांचा उल्लेख आढळतो.

शंख व शिंपा हीं राजगृहासाठीं खलाशी आणीत, भोज्य पदार्थ. पगुहन येथील मांडलिक राजाकडून आणि चित्रें हुण्डिव हुण्डिव याजकडून, तसेंच इतरांकडून दुकूल व सुपारीच्या झाडाचीं वस्त्रें देणगीच्या रूपानें राजगृहांत आलेलीं दृष्टीस पडतात. मतहुन येथील राजानें एक कळीचें चित्र दिलें त्याच्या तोंडांतून पक्वान्नें व द्रव्य निघत असे, असाहि इतिहासाला कादंबरीचें स्वरूप देणारा मौजेचा उल्लेख आढळतो. या देणग्यांचा कांहीं भाग पुरोहित व ब्राह्मण यांच्या स्त्रिया यांस मिळे व उच्च दर्जाचे क्षत्रिय, राजाचे आप्त, यांसहि ब्राह्मणांप्रमाणेंच भोज्य पदार्थांचा वांटा मिळत असे. नंतर उरलेलें सैनिकांस देत असत. यावरून देणग्यांचे मालक ब्राह्मणांप्रमाणें क्षत्रियहि झाले होते असें दिसतें.

**राजधानींतील घरांची व्यवस्था.**—राजवाड्याच्या उत्तरेच्या वेशीजवळ राजसंरक्षक व उच्च दर्जाचे क्षत्रिय रहात असत. दक्षिणेकडच्या दरवाजाजवळ क्षत्रिय व पंडित यांचे वाडे असत. वायव्येस व पश्चिमेस प्रमुख मंत्र्यांच्या इमारती असत. इतरांचीं घरें दक्षिणेकडे असत.

शहरांतील घरांची व्यवस्था अशी होती. पूर्वेकडे शैव ब्राह्मणांची वस्ती असून ब्रह्मराज हा त्यांत प्रमुख होता. दक्षिणेकडे बौद्धांची वस्ती होती. त्यांत स्थविर रंगकन्दि हा संघांतील प्रमुख होता. पश्चिमेकडे क्षत्रिय, मंत्री व राजाचे आप्त यांची वस्ति होती. राजवाड्याच्या दक्षिणेकडे धर्माध्यक्षाची सुंदर इमारत होती. तिच्या पूर्वेस एक भव्य शैवमंदिर होतें. पश्चिमेकडे एक मोठें बौद्धमंदिर होतें.

**राजाची स्वारी.**—हिंवाळा संपूर्ण होऊन गेल्यानंतर राजा प्रत्येक महिन्यास बाहेर फिरावयास निघतो. राजधानीच्या पूर्वेस जलगिरीच्या दक्षिण बाजूस एक सीम नांवाचें खेडें आहे. तेथें यात्रा भरते व तेथें लोक नवस फेडण्यास येतात.

शक १२८१ मध्यें वर्षाकाळीं भाद्रपद महिन्यांत राजानें लमजुंग जिल्ह्यांत स्वारी काढली त्या वेळीं जावांतील सर्व मांडलिक राजे आपआपल्या परिवारासह त्याजबरोबर होते. त्याप्रमाणें पुष्कळ नोकरचाकर, वाहनें, लहानमोठे अधिकारी विल्वतिक्त ( मयपहित ) येथील सर्व सरदार, कविराज वगैरे सर्व लवाजमा त्याजबरोबर होता.

**दरबार.**—एका दिवशींच्या दरबाराचें वर्णन असें आढळतें. पौर्णिमेच्या दिवशीं सकाळीं राजा सभेंत येण्याकरितां निघाला त्या वेळीं नाना तऱ्हेचीं वाद्यें वाजूं लागलीं सर्वांपेक्षां उच्च ठिकाणीं स्थापन केलेल्या भव्य सिंहासनावर तो बसल्यानंतर त्यानें सर्व लोकांचे मुजरे घेतले. सर्व लहानथोर, वृद्ध, तरुण, बौद्ध भिक्षू त्याला मुजरा करण्याकरितां आले. नंतर सर्व राजांनीं आपल्या बायकांमुलांसह त्यास मुजरा केला. नंतर सरदार मुजरा करावयास आले त्यांच्या अग्रभागीं गजमद हा होता. त्याप्रमाणेंच समुद्रकिनाऱ्यावरील निरनिराळ्या प्रांतांवरील प्रतिनिधी आणि मांडलिक राजे यांनीं मुजरे केले. नंतर ते यथाक्रम आपापल्या स्थानावर जाऊन बसले. नंतर सर्वांनीं आपआपले नजराणे पुढें ठेविले व याप्रमाणें दररोज नवीन नवीन नजराणे पाठविण्याच्या बाबतींत त्यांच्यामध्यें अहमहमिका लागली होती.

चैत्रांतील अमावास्येच्या दिवशीं एकत्र विचार करण्याकरितां एक मोठी सभा भरत असे. मंत्री व मुख्य मुख्य अधिकारी ( तण्ड ) व सर्व गुस्ती म्हणजे राजाचा सर्व लवाजमा ( वडव हजि ) त्यावेळीं एकत्र जमत असे. ग्रामांतील मुख्य, शिष्ट लोक व निरनिराळ्या दर्जाचे लोक, सर्व क्षत्रिय व इतर वर्णांचे लोक व त्यांच्या प्रमुख स्थानीं ब्राह्मण असे एकत्र जमत असत. नंतर एकत्र विचार होत असे व राजाचे सैनिक विशेष सतृष्ण होऊं नये, त्यांनीं राजाज्ञा बरोबर पाळाव्या, व त्यांनां प्रत्येक वर्षी चैत्रांत वाचून दाखविलेले नियम त्यांनीं बरोबर अमलांत आणावे, त्यांचें वांकडें पाऊल पडूं नये व त्यांनीं नीट काळजी घ्यावी, त्यांनीं देवस्थानच्या किंवा ब्राह्मणांच्या वित्ताचा अपहार करूं नये व अशा रीतीनें राज्याची अभिवृद्धि व्हावी म्हणून त्यांस उपदेश करण्यांत येत असे व नियम वाचून दाखविण्यांत येत असत.

यवद्वीप संस्कृतीसंबंधानें आपणांस अधिकाधिक माहिती झाली पाहिजे आणि तेथें सुशिक्षित भारतीय गेले पाहिजेत. तेथें आपला कांहीं वैश्यवर्ग आहेच. हिंदुस्थानाचा ज्या देशाशीं व्यापार मोठा आहे अशा देशांत जावाचा दुसरा नंबर लागतो. या विषयाकडे लक्ष देण्यासाठीं आपल्या विद्वानांनां डच भाषेशीं देखील ओळख करून घ्यावी लागेल. जावामधील वाङ्मयांत अद्भुत कथा पुष्कळ आहेत त्यांचें एकीकरण केलें तर अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी यासारखाच, निदान कथासरित्सागरासारखा सुरस ग्रंथ होईल अशी कल्पना आहे. आम्हांस जी माहिती देतां आली तिच्या योगानें जिज्ञासा तरी उत्पन्न झाल्यास लेखनाचें सार्थक झालेंसें वाटेल.

**ब्राह्मण व बौद्ध.**—तेथील ब्राह्मण बौद्धांचा तिरस्कार करितात आणि गोमांसभक्षणाचा त्यांवर आरोप करितात. तथापि शैव व बौद्ध या दोन्ही संप्रदायांचें ऐक्य खालील बाबतींत दिसून येतें. बुद्धास शंकराचा धाकटा भाऊ बनविलें आहे. पंचवलिक्रम नांवाच्या उत्सवामध्यें चार शैव पंडित व एक बौद्ध पंडित असे पांचजण कार्यकारी असतात. राजे लोकांच्या मृत्युप्रसंगीं व युद्धप्रसंगीं शैव ब्राह्मण व बौद्ध या दोघांनीं अभिमंत्रित केलेलें पाणी एकत्र केलें जातें. सामान्य काव्यामध्यें बुद्धाची व शिवाची स्तुती एकत्रच आढळते. सध्यां बलिद्वीपांत वैष्णवांचें



ब्रंबनन येथील देवालयांतील विष्णूची भग्न मूर्ति (गरुडासह)

...आवांतील कलाकिराच्या चित्रावरून उतारा.



शिवाची यतिवेशात्मक कल्पना.

...येथील देवालयांतील



रंगून येथील मोठ्या देवालयांतील अलोंप्रा-राजाची म्हणून मानलेली मूर्ति.

अस्तित्व नाहीं. ब्राह्मणांमध्यें अग्निपूजन नाहीं पण 'सूर्यसेवन' आहे. पण या सूर्यसेवनप्रसंगीं सूर्यास शिवस्वरूपीच कल्पितात आणि त्याला शंकराचा तृतीय नेत्र समजतात. सामान्य लोकांच्या उपासनांमध्यें व दैवतांमध्यें ब्राह्मणांनीं आपलें अंग राखिलें नाहीं. दर्शपौर्णिमाप्रसंगीं उपवासयुक्त कांहीं कर्में करितात. दर पांच दिवसांनीं देखील कांहींजण उपवास करितात. कां कीं, पोलिनेशियन लोकांचा आठवडा पांच दिवसांचा आहे. त्यांत पांचव्या दिवसाला कलिवोन म्हणतात. दैनिक उपासना सर्वांत लहान, कलिवोनची त्याहून मोठी आणि दर्शपौर्णिमेची त्याहून मोठी असा क्रम आहे. दर्शपौर्णिमाप्रसंगीं उपासनेस अभियुक्त असा स्वतंत्रच पोषाख ब्राह्मण करितो. कमरेच्या खालीं पांढरा पोषाख व वर उघडा असा त्याचा पोषाख असतो. घंटानाद दर्शपौर्णिमाप्रसंगीं किंवा मार्तिकाच्या प्रसंगींच करण्यांत येतो. ब्राह्मण आपल्या घरीं जी वेदमंत्रयुक्त उपासना करितो त्याच्या योगानें त्याच्या घरचें पाणी पवित्र होतें आणि तें 'तोयतीर्थ' घ्यावयास इतर लोक येतात आणि त्यामुळें ब्राह्मणांस प्राप्ति होते. लोकांस बलिदानासाठीं किंवा संस्कारासाठीं हें वेदमंत्रानें अभिमंत्रित पाणी उपयोगी पडतें. ब्राह्मणांचा समाजास उपयोग येणेंप्रमाणें वर्णिला आहे. गृह्य संस्काराखेरीज तो सार्वजनिक उत्सवांत भाग घेतो. तो लहान मुलांस व राजेलोकांस कविवाङ्मय शिकवितो, पंचांग करितो, ज्योतिष सांगतो, आयुधें पवित्र करितो आणि त्यानें ॐकाराची खूण शस्त्रावर केली म्हणजे तें शस्त्र कार्यास विशेष उपयुक्त होतें.

**उपास्यें.**—सामान्य लोकांचे उत्सव निराळेच आहेत. त्यांचीं देवळें शिवालयेंच आहेत पण तीं निरनिराळ्या नांवांनीं व्यक्त होतात. वासुकी, वतुकहुं, उलुवतु, येह्जेरुक, गिरलव, पकेन्दुन्गन, हीं स्थानें प्रसिद्ध आहेत. सकेनान आणि जेंपुल येथें इन्द्राचीं देवालयें आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे आणि या गोष्टीचें अस्तित्व हिंदूंचा बलीकडे प्रयाणाचा काल वराच जुना असावा असा स्वाभाविक संशय उत्पन्न करितें. दुर्गा, काल आणि भूत यांसहि वली मिळतात. पितरांचें अस्तित्व लोकांस मान्य आहे. त्यांच्या पौराणिक कथांतून मेरु वगैरे स्थानें आहेतच. विष्णूचें अस्तित्व दिसतें पण विष्णूची उपासना दिसत नाहीं; आणि जलदेवता या नांवानें विष्णूला जरी कांहींसें स्थान आहे तरी तें वरुणापेक्षां कमी महत्त्वाचें आहे. विष्णूचीं नांवें इकडे शिवासच लाविलीं जातात. हरिहराभेद त्यांनीं हरीचें वैशिष्ट्य हरासच देऊन केला. यमाचीहि उपासना होते; आणि उपासनेचा अंश इंद्रावरोबर वराप्सरः ( चांगल्या अप्सरा ) आणि विद्याधर व ऋषी यांसहि मिळतो, ही गोष्टहि विशेष लक्षांत ठेवण्याजोगी आहे. कां कीं, भारतीय वाङ्मयामध्यें विद्याधरांचें अस्तित्व जैनग्रंथ आणि कथासरित्सागरासारखा निवळ गोष्टींचा ग्रंथ यांच्यावाहेर कोठेंहि प्रामुख्यानें आलेलें नाहीं.

**दैवतकल्पना.**—ब्रह्मदेवाला चार तोंडें नसून एकच तोंड आहे. त्यापासून शिवाची उत्पत्ति झाली खरी पण शिवाच्या उत्पत्तीवरोबर हा फिका पडला. विष्णूचें महत्त्व देवळांच्या संख्येच्या दृष्टीनें नाहीं पण विष्णूचे अवतार कविवाङ्मयांत गायिले आहेत. मत्स्यादि अवतारांशिवाय दोन अवतार हिंदुस्थानांतील लोकांस अपरिचित असे तेथील लोकांच्या परिचयाचे आहेत. ते अवतार पतिः गजमद हा करेंग असेम घराण्याचा संस्थापक, आणि सिलिसिन मुरगे लढाऊपणाचा देव हे होत. विष्णूच्या कपाळावर जो टिळा आहे तो तृतीयनेत्रस्वरूपी आहे. विष्णूच्या वायकोचें नांव श्री असें आहे, लक्ष्मी हें नांव अपरिचित आहे. श्री ही शिवाची वायको म्हणून देखील मानिलेली आहे. लोकपाल त्यांस ठाऊक आहेत. सूर्य आणि शिव एकच हें वर दाखविलेंच आहे. कुबेर, गणेश आणि कार्तिकेय यांचीं स्वरूपें आपल्यासारखींच आहेत. स्मर, अनंग, काम आणि मनोभव या चार नांवांनीं ज्ञात असलेला कामदेव आणि त्याची पत्नी रति यांस वलि बेटांतील लोक तरी कसे विसरतील? त्यांच्या ब्रह्माण्डपुराणांतील विषय वहुतेक आपल्या परिचयाचेच आहेत. रक्तस्रावयुक्त यज्ञ वलिद्वीपांत शिवासाठीं होत नसून काल, दुर्गा आणि भूतें यांच्या प्रीत्यर्थ होतात.

वलिद्वीपांत असणारे सण व उत्सव आपल्या सण व उत्सवांपेक्षां भिन्न आहेत आणि त्यांचें पंचांगहि आपणाहून भिन्न आहे. तेथें नवीन यज्ञ नुकतेच झाले असल्याची डॉ. फ्रेडरिकची खात्री झाली होती. तेथें दहनविधीहि वऱ्याच भपक्याचा होतो.

**वलिद्वीपस्थ ब्राह्मणांची उत्पत्ति.**—वलिद्वीपांतील ब्राह्मण आपली उत्पत्ति पादण्ड वाहु रावु यापासून सांगतात. यांची उत्पत्ति केदिरीपासून दिसते. त्याचे वंशज मयपहित येथें गेले व तेथून वलिद्वीपांत गेले. जावानी माहिती अशी आहे कीं मयपहितच्या पाडावापूर्वीं कांहीं काल शैवब्राह्मण तेथें आले होते ते त्या शहराच्या नाशानंतर पूर्वेकडे आणि वलिद्वीपाकडे निघून गेले.

वलिद्वीपस्थांची माहिती फार संशयास्पद आहे. त्यांच्या समजुतीप्रमाणें केदिरि हें भारतवर्षांत आहे. परंतु याला विरुद्ध प्रमाण असें आहे कीं जयबय राजा हा भारतवर्षांतील राजा होता असें वलिद्वीपस्थ समजतात आणि जावानीज इतिहासकार जावामधील केदिरि येथील हा राजा आहे असें समजतात. बाहु अथवा बाहु रावु याचा अर्थ नवीन आलेला असा आहे. पादण्ड बाहु रावु याला दुसरें नांव भगवान द्विजेंद्र असेंहि आहे. याच्या केदिरि, मयपहित आणि बलि येथील स्थानांतरांचें वर्णन संदिग्ध आहे. ब्राह्मणांच्याच मताप्रमाणें बलि येथील ब्राह्मणांत जे पांच भेद आहेत ते त्याच्या पांच बायकांपासून झाले आहेत. पहिला भेद

ब्राह्मण कामेनु हा होय. हा बाहु रावूच्या ब्राह्मणस्त्रीवंशापासून झालेला आहे. गेलगेल ब्राह्मण हा क्षत्रियस्त्रीपासून झाला आहे असें मानण्यांत येतें. ब्राह्मण नौवा हा बाहु रावूच्या क्षत्रिय-विधवा स्त्रीपासून झाला आहे असें म्हणतात. चवथा भेद ब्राह्मणमस हा ब्राह्मण आणि वैश्यकन्या यांपासून झाला आहे आणि पांचवा ब्राह्मण कयुशून्य हा ब्राह्मण व शूद्रस्त्रीपासून झाला असें म्हणण्यांत येतें. तथापि हीं सर्व विधानें बाष्कळ होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण कामेनु, गेलगेल, नौवा इत्यादि सर्व स्थाननामें आहेत आणि ज्याप्रमाणें सर्व ब्राह्मण एका ब्राह्मणापासून झाले हें विधानच बाष्कळ आहे, त्याप्रमाणेंच त्या विधानाची ही पत्नीवर्णभेदात्मक पुरवणीहि आहे. ब्राह्मणाचें निरनिराळ्या वर्णांच्या स्त्रियांशीं लग्न झालें तर मुलें ब्राह्मणच राहतात तथापि त्यांत जर शूद्ररक्त फार मेसळलें गेलें तर राजा त्यांचें ब्राह्मण्य हिरावून घेऊन त्यांस शूद्रवर्णांत टाकतो यासाठीं दोन तीन पिढ्यांनीं तरी ब्राह्मण ब्राह्मणस्त्रीबरोबर लग्न करण्याची खटपट करितो. तेथें शुद्ध रक्ताचा ब्राह्मण कोणीहि नाहीं असें फ्रेडरिक म्हणतो.

ब्राह्मणांचा पोषाख धोतर, उपरणें व तांबडी टोपी हा होय. जानवें, रुद्राक्षमाला, व इतर कर्णाभरणें व केशाभरणें हीं ब्राह्मणांच्या अंगावर दिसतात. ते माणिकांच्या आंगठ्या वापरतात. येथें माणिकांस हिऱ्यांपेक्षां अधिक महत्त्व आहे; कारण त्यांच्या अंगीं अधिक दैवी शक्ति आहे.

तेथें उच्चवर्णांतील स्त्रियांस वेदाधिकार आहे. ब्राह्मणांच्या ज्या हलक्या वर्णांच्या स्त्रिया असतील त्यांस नवऱ्यांच्या योगानें थोरपणा प्राप्त होतो. ब्राह्मणाच्या इतर वर्णांच्या बायकांनां स्वतःचें व मुलांचें पोट स्वतःच भरावें लागतें तथापि त्यांच्या मृत्यूनंतर त्यांची क्रिया ब्राह्मणस्त्रियांप्रमाणें होते आणि त्यांचा पितृगणांत प्रवेश होतो.

**क्षत्रिय.**—बलिमध्यें क्षत्रिय फारच थोडे आहेत. देव अगुंग आणि त्याच्या घराण्यास क्षत्रिय म्हणतात पण इतर घराणीं वैश्य समजलीं जातात. उशना जावा ग्रंथामध्यें चार क्षत्रियघराणीं दिलीं आहेत. तीं कुरिपन, गग्लंग, केदिरि, आणि जंगल हीं होत. जावा आणि केदिरि येथील दरबारांत जे क्षत्रिय आणि वैश्य होते त्यांचा उल्लेख रंगलवे या ग्रंथांत आहे. हें राज्य मोठें होतें पण त्यांत क्षत्रिय फार नव्हते. तेथील क्षत्रियांचीं नांवें अशीं होतीं—महिस बुंगलन, क्वो विललुंगन, क्वो सिळुमन, क्वो जेरंग, क्वो कनिगर, क्वो चलुक, क्वो कि, क्वो तलुक्तक, कि महिस सपति, क्वो मुंदरंग, रंगसि, रंग मयंग, रंग पलन, रंग रलॅंग्सोंग, रंग पशुंग, रंग विरद, रंग रबेते, रंग सुंबि, रंग संपन, अजुरंग झुंतिंग, हींच काय तीं जावामध्यें क्षत्रिय कुलें होतीं. यांपैकीं बहुतेक सर्व क्षत्रिय कुलें युद्धांमध्यें व मयपहित (?) शहराच्या नाशाबरोबर नष्ट झालीं असावीं. देव अगुंग याचें कुलहि एका कालीं नष्टप्राय झालें होतें. कारण त्या कुलांतील तरुण राजा यास संतति नव्हती त्या वेळीं दंग ह्यंग कपकिसन या पुरोहितानें बतु हॅंगोंग या दगडापासून संतति उत्पन्न केली (उशना बलि पृ. ३४४). बलिद्वीपांतील राजघराणें या बतु हॅंगोंगच्याच वंशांतील होतें. देव अगुंग याचा एक आर्य दमर नांवाचा सावत्र भाऊ होता त्याचे वंशज पुढें वैश्य झाले. सध्या बलीमध्यें असलेले सर्व क्षत्रिय देव अगुंग याचेच वंशज आहेत असें म्हणतात. फ्रेडरिकच्या कालीं क्लोंग्कोंग, बंग्लि, आणि ग्यानयर येथेंच काय तीं क्षत्रिय घराणीं राज्य करीत होतीं. बोलेलेंग येथेंहि देव अगुंग याच्या वंशजांचें एक घराणें पूर्वीं राज्य करीत होतें पण तें पुढें बदोंगमध्यें गेलें, व त्यांचें राज्य वैश्यांनीं घेतलें.

इ. स. १६३३ च्या सुमारास बलिद्वीपांतील सर्व क्षत्रिय व राजघराणीं देव अगुंग याच्या सत्तेखालीं होतीं, परंतु पुढें युद्धांमुळें ही सत्ता बरीच नष्ट होत गेली व पुढें केवळ नामधारी सत्ता आणि ती देखील कांहीं थोड्या राजघराण्यांवर कायम राहिली.

ज्या क्षत्रियांमध्यें शूद्र रक्ताचा अंश घराच असतो त्यांस देस्सक, प्रदेव आणि पुंगकन अशीं नांवें आहेत.

**राजघराणीं.**—सर्व क्षत्रियवर्ग देव अगुंगचा वंशज म्हणवितो. बलिद्वीपांतील पहिला देव अगुंग कोण होता याबद्दल उशना जावामध्यें कांहीं माहिती आढळत नाहीं. त्याचें नांव देव अगुंग कुत असावें असा अन्यत्र उल्लेख सांपडतो. रॅफल्स यानें तेंच नांव दिलें आहे. तवनन आणि बदोंग येथील राजे आर्य दमर याचे वंशज आहेत. बलिद्वीपांत सध्यां (१८४९–५०) निरनिराळीं ७ घराणीं निरनिराळ्या प्रांतांवर राज्य करीत आहेत. त्यांचे सध्यांचे राज्यकर्ते प्रदेशवार येणेंप्रमाणें आहेत. (१) क्लोंगकोंग–देव अगुंग ग्दे पुत्र; हें सर्वांत लहान राज्य असून सधनहि नाहीं. (२) ग्यानयर–देव पहन, हा इ. स. १८४७ सालीं मृत्यु पावलेल्या देव मंगिसचा पुत्र होय. (३) बंगलि–देव ग्दे पुतु तंग्केबन. (४) मेंगुई–अनक अगुंग कुत अगुंग. (५) करेंग असेम–न्गुरः ग्दे करेंग असेम; हा पतिः गजमद याचा वंशज आहे. या राज्याची स्थापना पतिः गजमद यानेंच केली. (६) बोलेलेंग–न्गुरः मदे करेंग असेम. (७) बदोंग–या राज्यांत तीन निरनिराळे स्वतंत्र राजे आहेत. (अ) न्गुरः ग्दे पंचुत्तन; (आ) मदे न्गुरः (देन पस्सरमध्यें); (इ) न्गुरः ग्दे (कस्सिमनमध्यें) यांपैकीं बदोंग येथील मूळ राजघराणें व कलेरनपासून पुढें देन पस्सरमध्यें राज्य करणारें घराणें यांची वंशावळ पुढें दिली आहे.




दक्षिणद्वैपायन सिद्दी.




बलिद्वीपस्थ
सामान्य मनुष्य.




बलिद्वीपस्थ ब्राह्मण.

## वदोंग येथील राजघराणें.

(१) गुस्ति न्गुरः बोल

(२) अनक अगुंग कुत मन्देस

(३) अनक अगुंग पडिडिकन

- गुस्ति वयहन तेगेह्र
- (४) गुस्ति न्योमन तेगेह्र उर्फ अनक अगुंग दि पुले
- गुस्ति कुतक्दि

(५) गुस्ति न्गुरः फंबे मिहिक

- अनक अगुंग ग्दे गलोगोर
  - गलोगोर येथील राजघराणें
- (६) अनक अगुंग त्लस रिंगवतु क्रोटोक (पमूचुत्तनमध्यें)

(६) चे पुत्र:

- (७) अनक अगुंग रिंग पमूचुत्तन उर्फ न्गुरः सक्ति पमूचुत्तन यास ५०० स्त्रिया होत्या.
- गुस्ति मदे त्गल
- गुस्ति कुत् त्लवः

(७) चे पुत्र:

- (८) न्गुरः ग्दे पमूचुत्तन देवत दि उकिरन्
- न्गुरः मथुन्
  - याची मुलगी न्गुरः पुतु इचें (८) शीं लग्न झालें.
- न्गुरः कलेरन्

(८) चे पुत्र:

- (९) न्गुरः ग्दे पमूचुत्तन देवत दि मुञ्जुक
  - (१०) न्गुरः ग्दे पमूचुत्तन देवत दि ग्दोंग
    - मुली
      - सगुंग अदि
      - सगुंग ओक
      - सगुंग मदे
      - सगुंग रक
      - इत्यादि
- अनक अगुंग लनंग
  - (११) अनक अगुंग लनंग
    - (१२) न्गुरः ग्दे पमूच
    - न्गुरः मदे पमूच
      - न्गुरः पुतु–एका हलक्या कुळांतील स्त्रीपासून झालेला एकुलता एक मुलगा
- कलेरन वंशावळ पहा.

## कलेरन वंशावळ.—देन पस्सर.




( ३ ) न्गुरः मदे पमूचुत्तन देवत दि क्षत्रिय
पमूचुत्तन आई, पमूचुत्तन स्त्री
तवनन घराण्यांतील.

न्गुरः कस्सिमन
उर्फ न्गुरः ग्दे
वदोंगचा राजा
आई एक गुस्ती स्त्री
वायको सगुंग रक

न्गुरः जम्ब्रे
क्षत्रिय
आई आणि
पमू चुत्तन
वायको

अनक अगुंग अलित
ग्दे

न्गुरः ग्दे पुत्र | +न्गुरः ग्दे ओक | +( ४ ) मदे न्गुरः | कुत न्गुरः | न्गुरः कुत, कस्सिमन चा भावी वारस

कस्सिमन याचे आणखी भाऊ पुढें दाखविले आहेत.

न्गुरः ग्दे दंगिन
अनक अगुंग
अलित गृह

देवत अनक
अगुंग दौह
पमू चुत्तन वायको,
बेला झालें.
अनक अगुंग रहि
बेलुअनमध्यें
न्गुरः कजनन

+देवत वन्यर
अनक अगुंग पुत् मेरंगि
आणि
अनक अगुंग रक

अनक अगुंग इक
पुपुअन उगुंग
अनक अगुंग अलित
रक

+या सर्व राजपुत्रांच्या माता हलक्या जातीच्या होत्या. बेलुअन या घराण्यानें उच्च जातीच्या स्त्रियांबरोबर विवाह करून आपल्या जातीला उच्चत्व आणलें. बाकीचे आतां यापुढें एका पिढीनें हलक्या जातीच्या स्त्रीवरोबर विवाह केल्यास गुस्ती जातींत जातील.

करेंग असेम, बोलेलेंग, मेंगुइ आणि लॉंवाक येथील राजघराणीं पतिः गजमद यापासून आपली उत्पत्ति सांगतात. ज्या कालीं मयपहित येथील यावद्वीपांनीं वलिवेट जिंकलें तेथपर्यंत ऐतिहासिक माहिती जुळविण्यांत येते. उशना वलिग्रंथांत असें म्हटलें आहे कीं वलिद्वीप पूर्वी भुताखेतांच्या व राक्षसांच्या ताब्यांत होतें आणि तेथें मय दानवाचा पराभव होऊन सध्याची लोकवस्ती स्थापित झाली. आर्य दमर व पतिः गजमद यांस वलिद्वीपांतील वंडें मोडण्यास मयपहित येथून पाठविण्यांत आलें. आर्यदमर उत्तर दिशेस गेला व दुसरा दक्षिणेकडे गेला. जेव्हां आर्य दमर हा मयपहित येथें होता तेव्हां त्यास असें कळलें कीं मयदानव हा वलिद्वीपास त्रास देत आहे. तेव्हां मयपहितचा राजा आर्य दमरसह सैन्य घेऊन निघाला व राक्षस आपला पराभव झाला असें पाहून आकाशांत उडून पळून गेला.

**वैश्य.**—वलिद्वीपांत राजकीय सत्ता वैश्य जातीच्या हातांत वरीच गेली होती. करेंग असेम, वोलेलेंग, मेंगुइ, तवनन आणि वदोंग व लॉंवाक येथील राजे वैश्य जातीचे होते. त्यांची संख्याहि क्षत्रियांपेक्षां अधिक आहे. करेंग असेम, वोलेलेंग मेंगुइ, आणि लॉंवाक येथील राजघराण्यांची उत्पत्ति पतिः गजमद या वैश्यापासून झालेली आहे. वलिद्वीप विजेता आर्य दमर हा क्षत्रिय असून देव अगुंग याचा सावत्र भाऊ होता. गजमद हा मयपहित येथील दुय्यम सेनापति असून त्यानेंच आर्य दमर यास वलिद्वीप जिंकण्याच्या कामीं मुख्य साहाय्य केलें होतें. तवनन आणि वदोंग येथील राजे आर्य दमर याचेच वंशज होते पण ते आपले केश वैश्यांप्रमाणें राखीत यामुळें त्यांस देव अगुंग यानें वैश्य जातींत टाकलें. सध्या केशरचनेच्या वावतींत वैश्य व क्षत्रिय यांमध्यें फारसा फरक नाहीं. परंतु वरील गोष्टीस कांहीं तरी राजकीय कारण असावें असा फ्रेडरिकचा तर्क आहे.

दह आणि मयपहित येथील क्षत्रिय महिस, क्वो आणि रंग अशीं उपपदें लावीत हें आपणांस वर दिसून आलेंच आहे. पतिः, देसंग आणि तुमेंग्गुंग हीं उपपदें वैश्यांस लावीत असत. जावामध्यें सर्वांत कनिष्ठ प्रतीच्या राजांस मंत्री असें म्हणत. वलिद्वीपांत मंत्री हा क्षत्रिय किंवा वैश्य यांपैकीं कोणत्याहि जातीचा असूं शकतो. पतिः हें उपपद फार मानाचें द्योतक असे. गजमद हा विष्णूचा अवतार समजला जात असे व त्याला पतिः हें उपपद असे.

दह (केदिरि) दरवारांतील प्रमुख वैश्यांचीं नांवें येणेंप्रमाणें होतीं—मंत्रि ववोंग, कलमुदोंग, तुमेंगुंग परुंगसरि, दमंग द्रवलिक, गेबोववसह, कल लिंपुंग, वुत विलिस, वुबर बलेमन, जलक कतेंगेंग. या कुलांपासून आणि आर्य दमर याच्या सख्या भावांपासून बरींचशीं वैश्य कुलें बलीमध्यें उत्पन्न झालीं होतीं. परंतु आर्य दमर आणि पतिः गजमद यांच्या वंशजांशिवाय वाकीचे महत्त्वाचे नाहींत व बहुतेक हळूहळू शूद्र बनले आहेत.

इड, देव व गुस्ती हीं अनुक्रमें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांनां उपपदें लावतात. या जातींची लोकसंख्या वरीच असून त्यांनीं आपलें महत्त्व कायम राखिलें आहे. विशेषतः यांतील शेवटच्या दोन जाती श्रम करून पोटाला मिळविणें हलकें समजतात, व भलतेच हक्क सांगतात. ते प्रजेला अमर्यादपणें लुटतात. वास्तविक उच्च कुलांतील राजे व राजपुत्र असे अत्याचार फारसे करीत नाहींत पण हे लोक त्यांचे नातलग असल्यामुळें त्यांच्या दुष्कृत्यांकडे राजे लोक कानाडोळा करितात. जेथें वैश्य राजे असतात तेथें बहुतकरून गुस्ती व क्षत्रिय राजे असतात तेथें बहुतकरून देव या जातींकडे सर्व अधिकाराच्या जागा असतात. या जागांपासून जरी त्यांनां वराच मान मिळतो तरी वेतन अगदींच थोडें असतें.

वलिद्वीपांत अधिराज, त्याचे मांडलिक (पुंगव), राजकुलांतील इतर पुरुष व नंतर गुस्ती असा क्रम असतो. गुस्ती यांचा दर्जा जवळजवळ पुंगवांसारखा असतो. यांनां मरणांत शिक्षा देण्याचा अधिकार असतो. सरंजामी पद्धति चालू असून किरकोळ बाबतींत मांडलिक व अधिराजा हे लक्ष देत नाहींत. पुंगवांच्या वसूलावर व्यापारी, जकात, रस्ते व पूल यांचेसंबंधीं इत्यादि कर असतात. गुस्ती, देव आणि इड यांनां व्यापारावरील कर माफ असतात. मात्र त्यांच्याकडे पाटबंधाऱ्यांचें काम सोंपविलेलें असतें; परंतु त्याबद्दल ते वेगळें उत्पन्न शेतकऱ्यांपासून काढितात.

**शूद्र.**—शूद्रांवर मात्र बऱ्याच कामांची सक्ति असून त्यांनां हक्क मुळींच नाहींत. राजा अथवा पुंगव यांनां शूद्रांच्या घरांतून वाटेल ती वस्तु नेण्यांचा हक्क आहे. प्रव्केल, पम्वकेल आणि पर्वकेल या जाती शूद्रांपेक्षां वरच्या दर्जाच्या आहेत. हाच दर्जा यूरोपीय लोकांसहि देण्यांत आला आहे, परंतु त्यांचें स्थान वरील तीन जाती आणि शूद्र यांच्या दरम्यान आहे, कारण ते द्विज नाहींत.

वलिद्वीपांतील शूद्र ही जावा व बलिद्वीपांतील शूद्रांची संतती आहे. जावांतील शूद्रांचा वर्षारंभ वलिद्वीपांतील शूद्रांपेक्षां सहा दिवस लवकर होतो पण राजदरबारांत वलिवर्षारंभच मान्य आहे.

वलिद्वीपांत सर्वच जाती एकएक पायरी खालीं आल्या आहेत. मूळ ब्राह्मणांची उत्पत्ति पादण्ड दंग ह्यंग कपकिसन यापासून झाली व त्याच्या शापानेंच ते क्षत्रिय बनले व खालचे सर्व वर्ग एकएक पायरी खालीं आले असें म्हणतात.

ब्राह्मण ब्राह्मणत्वापासून चुने (च्युत) होतो तरी त्याला (ब्राह्मणच्युताला) बराच मान मिळतो.

शूद्रांचें पौरोहित्य सामान्य पुरोहित किंवा शूद्रांतील वेद जाणणारे 'संगुहु' हे करितात. या संगुहूनां जर वेदांचें ज्ञान खरोखरीच असेल तर हे पूर्वी ब्राह्मण असले पाहिजेत. उशना जावामध्यें असें म्हटलें आहे कीं संगुहु यांची उत्पत्ति ब्राह्मणब्राह्मणीपासूनच झाली परंतु ते दलेम मुर नांवाच्या कालदेवतेची उपासना करूं लागले म्हणून त्यांचा दर्जा हलका समजूं लागले. परंतु हल्लींचे ब्राह्मण असें म्हणतात कीं हे लोक एका पादण्डाच्या दासाची संतति आहेत. त्या दासानें एकदां लपून बसून वेद ऐकले. पुढें त्या पादण्डानें त्याला स्वातंत्र्य दिलें व त्याची संतति हे संगुहु लोक होत.

शूद्र जातींवर उच्च जातींचा विशेषतः अधिकारी वर्गांचा जुलुम फारच होतो. या जुलमापासून सुटका करून घेण्याचा एकच मार्ग म्हणजे राज्यांतून पळून जाणें. पण दुसऱ्या राज्यांतहि त्यांच्यापुढें तेंच दुःखाचें ताट वाढलेलें असतें. त्यांच्याबरोबर जर बायकापोरें नसलीं तर राजे लोक त्यांस कोणास तरी विकून टाकून पैसे काढतात. या संकटांपासून बचाव करून- घ्यावयाचा उपाय म्हणजे एखाद्या पादण्डाचा आश्रय करावयाचा. हे पादण्ड मात्र त्यांस बरेच मायाळूपणानें वागवितात व त्यांच्याकडे आश्रयार्थ आलेल्या शूद्रास विकण्याचा राजास अधिकार नाहीं. परंतु कांहीं तद्देशीय पादण्ड या संधीचा फायदा घेऊन शूद्रविक्री करून गबर होण्यास मागेंपुढें पहात नाहींत. रॅफल्स यानें वलिद्वीपांतील लोकांविषयीं असे उद्गार काढले आहेत, "हे लोक जावांतील लोकांपेक्षां जास्त प्रामाणिक, विश्वासू व श्रम करणारे आहेत; आणि ते इतर सर्व आजूबाजूंच्या लोकांपेक्षां शूर आहेत पण ते यूरोपीय लोकांस मात्र वाघाप्रमाणें भितात."

बलिद्वीपामध्यें शालिवाहन शक चालू आहे व तेथें सण व उत्सव ठरविण्याच्या कामीं हिंदी पंचांगाचाच उपयोग करितात. त्यांचे महिने चांद्र असून वर्षारंभ इकडीलप्रमाणें मार्च महिन्यांतच बहुधा होतो. तथापि त्यांनां सौर वर्षा-बरोबर मेळ बसविणें आतां बरोबर ठाऊक नाहीं. त्यांच्या महिन्यांच्या नांवांपैकीं ज्येष्ठ व आषाढ हीं इकडीलच आहेत. बाकीचीं क्रमवाचक संख्याविशेषणें आहेत. इतर बाबतींत ते वर्लीतीलच एक निराळें पंचांग वापरतात. यांत ३५ दिवसांचा एक असे १० महिने आहेत म्हणजे हें सरासरी चांद्र वर्ष आहे.

राहूनें सूर्याला ग्रासिलें म्हणजे ग्रहण लागतें अशीच कल्पना आहे.

तेथें एक 'भृग गर्ग' नांवाचा करणग्रंथ आहे. परंतु त्याबद्दल विशेष माहिती उपलब्ध नाहीं. गर्गसंहितेशीं या ग्रंथाचा कदाचित् कांहीं संबंध असेल.

यवद्वीपाची माहिती करून देणारे महत्त्वाचे आधारग्रंथ म्हटले म्हणजे पुढें दिलेले होत.

(1) Java, Sumatra and the other Islands of the Dutch East Indies. By A. Cabaton. T. Fisher Unwin London. 1911.

(2) Encyclopaedie van Nederlandsch-Indie, By Dr. Paulus. The Hagne 1917.

(3) Beschrijving der Javaansche, Balineesche eu Sasaksche Handschriften, Two Vols. By Dr. J. Brandes. Batavia 1903.

(4) History of Java. By Sir. T. S. Raffles. 2 Vols. London 1817.

(5) Kawi-Balineesche-Nederlandsche Woordenbook. By Dr. H. N. Van der Tuuk. 4 Vols. Batavia 1897.

(6) An Account of the Island of Bali, By Dr. R. Friederich, in JRAS. N. S. Vol. VIII. pp. 157-218; Vol. IX. pp. 59-120; Vol. X. pp. 49-97.

(7) Het oud-Javaansche Lofdicht Nāgarkṛtā.-gama Van Prapañca Van Prof. Dr. H. Kern. 1919. या ग्रंथाची प्रस्तावना चांगली आहे व महत्त्वाच्या टीपाहि आहेत.

---

## प्रकरण ७ वें.

### हिंदुस्थान आणि चीन, जपान व तिबेट.

**चीन.**—आतांपर्यंत सांगितलेला भारताचा इतर सर्व देशां-वरील परिणाम एकत्र केला तरी तो ज्याच्या पासंगास पुराव-याचा नाहीं असा भारतीय संस्कृतीचा सर्वांत थोर विजय म्हटला म्हणजे चिनी साम्राज्यावर झालेला बौद्ध संप्रदायाचा परिणाम होय. हा परिणाम कसा काय होत गेला याचा साग्र इतिहास आपणांपाशीं उपलब्ध नाहीं. तथापि शालिवाहन शकाच्या प्रारंभासच चिनी राष्ट्रांत बौद्ध संप्रदायास बादशहाच्या बुद्ध-संघप्रवेशामुळें प्रामुख्य आलें, इतकें निःसंशय आहे. या काळचे चिनी ग्रंथ म्हणजे हान बखरी होत. यांचा उपयोग थोडाबहुत शकाचें परिभ्रमण शोधण्यासाठीं डॉ. फ्रांके यानें केला आहे. पण शोध लावल्यास आणखी पुष्कळ माहिती या बखरींपासून मिळण्याजोगी आहे. भारतीय सुशिक्षित वर्गांत कर्नल वरळीकर यांखेरीज चिनी भाषांचा अभ्यासक कोणी झाला नाहीं. पण डॉ. वरळीकर यांनीं चिनी भाषांचा अभ्यास करूनहि जुन्या चिनी ग्रंथांत अवगाहन करून तद्विषयक लेख कोठें प्रसिद्ध केलेले दिसत नाहींत. चिनी भाषेचा अभ्यास तेथील बौद्ध ग्रंथ वाचण्यासाठीं ज्या यूरोपीयांनीं केला त्यांत बील याचा प्रामुख्यानें निर्देश केला पाहिजे. तसेंच संस्कृत शब्द चिनी भाषेंत कसे लिहिले जातात हें तपासून त्यांच्यावरून पुन्हा संस्कृत शब्द शोधून काढण्याची पद्धति स्टॅनिलास जुलिआं या फ्रेंच पंडितानें बसविली आहे.

चीनमध्यें भारतीय लोक गेले त्यांचा जीवितक्रम काय असे, केवळ बौद्ध भिक्षूच तिकडे जात किंवा इतर लोकहि जात, इत्यादि विषयांची माहिती आपणांस अजून मिळवायाचीच आहे. मनुस्मृतींत उल्लेखिलेल्या चुंचु नामक जातीचें नांव मंगोलियांतील एका आयुधजीवी लोकांस लावलेलें आढळतें, परंतु या दोहोंमध्यें कांहीं संबंध आहे किंवा काय ही गोष्ट अनिश्चित आहे. सध्यां उत्तर हिंदुस्थानांत चुंचुनामक जात आढळून येत नाहीं. बौद्ध संप्रदायाचा चीनमध्यें प्रवेश होण्यापूर्वी 'लाउत्से'नें स्थापन केलेल्या 'ताओ' विचारपद्धतींत आणि आपल्या औपनिषद् तत्त्वज्ञानांत जें सादृश्य आढळतें तें हिंदुस्थानचा प्रकाश चीनवर पडून उत्पन्न झालें आहे असा वील यास संशय येतो.

शक हे जर चीनमधून हिंदुस्थानांत आले असले तर शकांबरोबर हिंदुस्थानांत कांहीं चिनी विद्याहि आली असण्याचा संभव आहे. आशिया खंडांतील निरनिराळ्या भागांत जो आपला प्रवेश झाला त्याचा परिणाम आपल्या राष्ट्रावर काय झाला हें सांगणें आज कठिण आहे. कां कीं आपल्या देशांतीलच संस्कृतीच्या निरनिराळ्या अंगांचें परीक्षण होऊन ग्रंथांत व्यक्त होणारे आणि समाजांत मूर्त किंवा स्मृतिस्वरूपानें दिसणारे जे अवशेष आज आहेत त्यांचें स्वकीय परकीय भावानें पृथक्करण झालें नाहीं. जर पृथक्करण झालें असतें तर आपणांस इतर देशांचे व हिंदुस्थानचे धागे जोडण्यास सुलभ गेलें असतें. भारतीय आणि चिनी समाज या दोघांसहि अवलोकनक्षेत्रांत जवळ जवळ ठेवून तौलनिक पद्धति वापरून त्यांचें निरीक्षण करण्याचें आणि नंतर त्यांमध्यें ज्ञानविषयक आणि आचारविषयक गोष्टींची देवघेव कितपत झाली आहे हें पाहण्याचें काम भावी पिढ्यांचें आहे. आमचा असा तर्क आहे कीं, चीन व हिंदुस्थान हीं दोन्हीं अभ्यासक्षेत्रें अवलोकिलीं गेलीं म्हणजे इतिहासविषयक अनेक महत्त्वाचीं सत्यें हातीं लागतील. हेंच विधान भारतांतील दुसऱ्या अनेक विषयांसंबंधानें करितां येईल. तथापि आज हा विचार करण्यास अवकाश नाहीं.

चित्रकलेसंबंधानें असें म्हणतां येईल कीं, चिनी किंवा तार्तार हे इटालियन किंवा पोर्तुगीज लोकांप्रमाणेंच भारतीय लालित्याच्या संवर्धनास साहाय्यक झाले आहेत.

आपणांस दिव्य समजणाऱ्या चिनी लोकांचा परिणाम इतर बाबतींत आपणांवर फारसा झाला नाहीं असें आज पुराव्याच्या अभावीं गृहीत धरावें लागतें.

**जपान.**—जपानांतील वाङ्मयास, विचारास, चित्रकलेस आणि आचारनियमनास भारतीय संस्कृतीचें आवेष्टन कारण झालें. हें आवेष्टन कोणत्या प्रकारानें जपानच्या अंगावर बसलें याची थोडक्यांत कल्पना देतों. जपानांत लहान थोर भौतिक शक्तींची उपासना असे. तारे, आकाश, चन्द्र, वादळ, पाऊस, वीज, जननेंद्रिय हीं सर्व पूज्य होतीं; दुसरींहि अनेक दैवतें देशांत उत्पन्न झालीं होतीं. त्या दैवतांत कांहीं पितृगणांचा म्हणजे गतकालीन थोर पुरुषांचा देखील समावेश झाला होता आणि या दैवतांस धान्य, मद्य, आणि प्रसंगीं घोडा, तलवार व वायको हीं देखील समर्पण होत असत. या मूळ स्वरूपास चालन दोन गोष्टींनीं मिळालें. एक गोष्ट म्हणजे तेथें झालेला चिनी वाङ्मयाचा व कल्पनांचा प्रवेश ही होय, आणि दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे भारतीय संस्कृतीचा व बौद्ध संप्रदायाचा प्रसार ही होय. हा प्रसार विशेषतः कोरियामार्फत झाला* तथापि भारतीयांचा तेथें प्रवेश झालानसेलच असें म्हणतां येत नाहीं. जपानमध्यें भारतीयांचा प्रवेश झाला असावा असा संशय येण्यास दोन कारणें आहेत. एक कारण म्हटलें म्हणजे जपानी मातृकारचनेंत आपल्या वाराखडीप्रमाणें व्यंजनांचे पांच विकार आढळून येतात ही गोष्ट होय. उदाहरणार्थ गचे, गा, गी, गू, गे, गो असे विकार जपानींत दृष्टीस पडतात, शिवाय जपानांतील कांहीं मूर्तींचे तोंडवळे जपानी स्वरूपाचे नसून भारतीय स्वरूपाचे आहेत ही गोष्ट देखील लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तथापि हें कबूल केलें पाहिजे कीं, भारतीय संस्कृति चिनी संस्कृतीच्या प्रवाहाबरोबरच जपानांत शिरली, आणि चिनी संस्कृतीचा परिणाम त्यांच्या वाङ्मयावर जो झाला तोच जपानचें आपणाशीं सादृश्य जुळविण्यास कारण झाला. मोठमोठीं देवालयें आणि देवालयांत असलेले प्रचंड नगारे, मोठमोठाल्या घंटा, यांचें जपानांतील अस्तित्व जपानी लोकांचें आपणाशीं सादृश्य असल्याचें बोधक आहे. नवीन बौद्धसंप्रदायानें जुनीं उपास्यें मारून टाकलीं नाहींत तर तीं दैवतें बुद्धाचेच अवतार आहेत असा लोकांस उपदेश केला. लोकांस त्या वेळेस आपण कांहीं परकीय संस्कृति घेत आहोंत असा भासच झाला नाहीं, तर आपण जुन्याच उपास्यांस कां मानावें हें सांगणारें नवीन तत्त्वज्ञान आपणांस मिळालें असें त्यांस वाटलें.

जपानमध्यें भारतीय संस्कृतीची छाप कांहीं अंशीं चीनपेक्षां अधिक पडली. बौद्धसंप्रदाय मांसनिवृत्तिकारक नाहीं असें असून अर्वाचीन काळाचा परिणाम होण्यापूर्वी मांसनिवृत्ति

* **टीपः**—जपानमध्यें बौद्धसंप्रदायाचा प्रवेश कोरियामार्फत झाला व त्याबरोबरच चिनीसंस्कृतीचाहि प्रवेश झाला. भारतीय संस्कृतीचाहि कांहीं परिणाम जपानवर व जपानी नाटकांवर झालेला आहे पण तो फारसा प्रत्यक्ष नसून बौद्धसंप्रदायामार्फत झालेला आहे. जपानी नाटकांवर बौद्धधर्माचा बराच परिणाम झालेला दिसतो. किंबहुना त्यांच्या धार्मिक नाटकांचा आरंभ बौद्धसंप्रदायाच्या प्रवेशापासूनच व त्यांतील सांप्रदायिक उत्सवांपासूनच झाला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. Theatre au Japon—Annales du Musee Guimet Vol. XXX.

बऱ्याच प्रमाणानें जपानांत शिरली हें बौद्धसंप्रदायाच्या अनुषंगानें गेलेल्या भारतीय संस्कृतीचें फल होय. चीनमध्यें विद्वानांचा दर्जा फार मोठा होता व युद्ध करणाऱ्या शिपायाचा सामाजिक दर्जा कनिष्ठ प्रतीचा होता. उलटपक्षीं जपानांतील सामुराईंचा दर्जा उच्च प्रकारचा होता आणि तेथील क्षत्रियधर्मविषयक विचार "बुशिडो" या नांवाखालीं बरेच प्रगल्भ झाले होते. शिवाय चीनमध्यें चित्रलिपीच आजपर्यंत कायम राहिली आहे, मातृकालिपी शिरलेली नाहीं. उलट, जपानांत बाराखडीप्रमाणें का, की, कु, के, को अशीं निरनिराळीं स्वरव्यंजनांचीं युग्में लोकांस परिचित होऊन त्यांचा लिपीवर परिणाम झाला. पारमार्थिक संप्रदाय आणि राष्ट्रीय संस्कार यांचें मिश्रण ज्याप्रमाणें आपल्यामध्यें आहे त्याप्रमाणें त्यांच्यांतहि स्थापन झालें. ब्राह्मणाची पदवी पारमार्थिक मार्गदर्शक या नात्यानें फारशी महत्त्वाची नाहीं, तथापि व्यक्तींस संस्कार करणारा आणि धर्मशास्त्र म्हणजे कायदा सांगणारा या नात्यानें ब्राह्मणाचें कर्तव्य महत्त्वाचें आहे. "शिंतो"च्या आचार्यांचें स्वरूप यासारखेंच आहे. हे आचार्य केवळ संस्कर्ते आहेत आणि शिंतो म्हणजे केवळ राष्ट्रीय म्हणजे राजकीय स्वरूपाचे विधि आहेत असें जपानच्या सरकारनें प्रसिद्धहि केलें आहे.

जपानमध्यें कांहीं संस्कृत ग्रंथहि आहेत हें आपणांस "जपानांतील संस्कृत ग्रंथांसंबंधानें चार शब्द" अशा मथळ्याच्या एका फ्रेंच भाषेंत असलेल्या लेखावरून समजतें.* या बाबतींत जास्त संशोधन झाल्यास भारतीयांच्या जपानमधील कार्यावर अधिक प्रकाश पडेल.

**बौद्ध संप्रदायाचा चीन देशांत प्रसार.—** बौद्ध संप्रदायाचा विस्तार चीनमध्यें कसा झाला हा एक मोठा विचाराचा प्रश्न आहे. या प्रश्नाचें परीक्षण करतांना अनेक महत्त्वाचीं तत्त्वें निघतील आणि कोडीं उलगडतील. जाव्हा, सयाम यांसारख्या कमी संस्कृतीच्या देशांत भारतीय विचार आणि उपासनासंप्रदाय प्रसृत झाले तर त्याचें फारसें नवल नाहीं. जपानांत भारतीय संप्रदाय पसरला त्याचेंहि मोठेंसें नवल नाहीं. कारण या सर्व प्रदेशांस जंगलीपणांतून सुसंस्कृतींत आणण्यास हे संप्रदायच कारण झाले. ख्रिस्ती शकापूर्वील वाङ्मयाचा अभाव, आजपर्यंत स्त्रियांच्या ब्रह्मचर्याविषयीं असलेली अनास्था, स्त्रीपुरुषांचें परवांपर्यंत टिकलेलें आणि आजहि खेड्यापाड्यांत दिसून येणारें एकत्र नग्नस्नान व घटस्फोटाचें अतिसौकर्य या सर्व गोष्टी बौद्ध संप्रदायाच्या आगमनापूर्वीची जपानची बौद्धिक व नैतिक स्थिति किती मुग्धपणाची होती हें दाखवितात. चीनची गोष्ट अशी नाहीं. कनफ्यूशिअस, मेनशिअस, लाउत्से यांच्यासारखे थोर नीतिवेत्ते व ब्रह्मवादी फार प्राचीन काळापासून चीनमध्यें आपल्या तत्त्वज्ञानाचा प्रभाव पाडतांना दिसतात. शिवाय कलाकौशल्य, यांत्रिक सुधारणा, तवारिखांच्या स्वरूपांचीं वर्तमानपत्रें, इतिहास इत्यादि बाबतींत सर्व जगास अपूर्व वाटणारे संस्कृतीचे अंश ज्या चिनी लोकांत दृग्गोचर होतात त्या चिनी लोकांवर बौद्धांच्या संप्रदायानें छाप कशी पाडली आणि या संप्रदायाचा प्रसार सर्व साम्राज्यभर कसा झाला याचा साद्यंत इतिहास तयार झाल्यास समाजशास्त्राचें विचारप्रसारविषयक ज्ञान जगास लाभेल. या प्रसाराच्या बाबतींत कांहीं स्थूल गोष्टी आपणांस दिसतात. कोणाची जर अशी कल्पना असेल कीं, केवळ राजानें बौद्ध संप्रदायाचा स्वीकार केला म्हणून शिष्टाचाराप्रमाणें किंवा एखाद्या रोगाच्या सांथीप्रमाणें बौद्धमतें आणि धर्म हीं चीनच्या साम्राज्यभर पसरलीं तर ती चुकीची आहे. कारण विचारप्रसाराचा इतिहास तेवढ्यानेंच स्पष्ट होत नाहीं. शिष्टाचार (फॅशन) म्हणून किंवा सांसर्गिक अनुकरणानें परकीय संस्कृतीचें केवळ पातळसें आवरण लोकांवर बसूं शकेल, तथापि तसलें तें पटल चिरकाल टिकणार नाहीं. दोन हजार वर्षें जो परिणाम टिकला तो परिणाम उत्पन्न करण्यास कांहीं कर्तव्यनिष्ठ, निग्रही मनुष्यांची परंपरा कारण झाली असली पाहिजे. त्या परंपरेचा आपणांस साद्यंत इतिहास देतां येत नाहीं. परंतु या क्षेत्रांत परिश्रम करणाऱ्या कांहीं व्यक्तींचीं नांवें देतां येतील. यास साधन म्हटलें म्हणजे ब्यूनिओ नँजिओ (Bunio Nanjio) यांची ग्रंथसूची होय. ही ग्रंथसूची या कर्त्यानें (१) चिनांतील निरनिराळ्या राजघराण्यांच्या वेळीं प्रसिद्ध झालेलीं धर्मोपदेशकांचीं चरित्रें व बौद्ध पुस्तकांच्या सूची, (२) बील (Beal. 1876.) यानें तयार केलेली चीनमधील बौद्ध तिपिटकाची ग्रंथसूची (३) मायर्स याचें "Chinese Reader's Manual" (चरित्रात्मक, ऐतिहासिक, पौराणिक, व सामान्य वाङ्मयात्मक संदर्भग्रंथ), (४) एड्किन्स याचें "चीनमधील बौद्धधर्म" (ऐतिहासिक, वर्णनात्मक व टीकात्मक लेखसंग्रह), वगैरे पुस्तकांच्या आधारें तयार केली आहे. चिनी बौद्ध तिपिटकाच्या प्रथम व द्वितीय परिशिष्टांत अनुक्रमें ज्या भारतीय ग्रंथकारांच्या ग्रंथांचीं चिनींत भाषांतरें झालीं आहेत, व ज्या भारतीय ग्रंथकारांनीं चिनी भाषेंत भाषांतरें केलीं आहेत अशा दोन्ही प्रकारच्या ग्रंथकारांची व भाषांतरकारांची यादी दिली आहे. ज्या भारतीय ग्रंथकारांच्या ग्रंथांचीं चिनी भाषेंत भाषांतरें झालीं त्यांपैकीं फक्त मुख्य मुख्य व प्रसिद्ध ग्रंथकारांचाच या यादीमध्यें समावेश केला आहे. याखेरीज दुय्यम प्रतीच्या कित्येक ग्रंथकारांचीं नांवें आपणांस विस्मृतीमुळें अगर संशोधनाच्या अभावीं अज्ञात असण्याचा संभव आहे. या यादीवरून आपणास मुख्य १३ भारतीय ग्रंथकारांचीं नांवें उपलब्ध होतात व त्यांच्या एकंदर १०४ ग्रंथांचीं चिनी

* L. de Milloue' Report of the 6 th International Congress of Orientalists, Leide 1885.

भाषेंत भाषांतरें झालीं होतीं एवढी माहिती मिळते. त्याप्रमाणेंच दुसऱ्या यादीवरून बौद्धसंप्रदायाचा मुख्य ग्रंथ जो तिपिटक त्याचीं भाषांतरें भारतीय ग्रंथकारांनीं चिनी भाषेंत केल्याबद्दलची माहिती मिळते. ज्या देशांत आपल्या संप्रदायाचा प्रसार करावयाचा त्या देशांतील लोकांस आपलीं सांप्रदायिक तत्त्वें कळण्यासाठीं व आपला संप्रदाय तेथें दृढमूल होण्यासाठीं त्या देशाच्या भाषेंत आपले सांप्रदायिक मुख्य ग्रंथ असणें अत्यावश्यक असतें. कोणताहि संप्रदाय एखाद्या देशांत चिरकालीन टिकण्यास त्या देशांतील देश्य-भाषेंत त्या संप्रदायाचें वाङ्मय तयार होणें फार जरूर असतें. या दृष्टीनें अनेक ग्रंथकारांनीं तिपिटकाचीं चिनी भाषेंत भाषांतरें केलीं व तन्मूलक वाङ्मयाचा पाया घालून दिला. अशा ग्रंथकारांपैकीं प्रमुख भारतीय ग्रंथकारांची संख्या ७५ असून त्यांनीं ६७५ हून अधिक ग्रंथरचना केली असें आपणांस आढळून येतें.

### ज्यांच्या ग्रंथांचीं चिनी भाषेंत भाषांतरें झालीं आहेत अशा मुख्य भारतीय ग्रंथकारांची यादीः—

| ग्रंथकाराचें नांव. | भाषांतर झालेल्या ग्रंथांची संख्या. |
|---|---|
| १ मैत्रेय. | १० |
| २ अश्वघोष. | ७ |
| ३ नागार्जुन. | २४ |
| ४ देव. हा दक्षिण हिंदुस्थानचा रहिवासी, व नागार्जुनाचा शिष्य; याला नीलनेत्र असेंहि म्हणत; परंतु याचें मूळ नांव चंद्रकीर्ति असें होतें. | ९ |
| ५ वसुबंधु. | ३६ |
| ६ स्थिरमति. नालंद येथील एक विद्वान उपाध्याय. | ३ |
| ७ स्थितमति. जयसेनाचा (?) गुरु. | ३ |
| ८ देवशर्मा. बुद्ध निर्वाणपदाप्रत गेल्यानंतर १०० वर्षेपर्यंत हा जिवंत होता असें म्हणतात. | १ |
| ९ वसुमित्र. कनिष्कराजानें बोलाविलेल्या ५०० अर्हतांत हा प्रमुख होता. | ७ |
| १० समंतभद्र. हा योगाचार्य होता. (बोधिहृदय शीलादनकल्प ग्रंथाचा कर्ता.) | १ |
| ११ शिलादित्यराजा. | १ |
| १२ कपिल ऋषि. सांख्यवादाचा जनक. (सांख्यकारिकेचा कर्ता.) | १ |
| १३ ज्ञानचंद्र. वैशेषिक तत्त्वज्ञानाचा गुरु. | १ |

### चिनी भाषेंत बौद्ध तिपिटकाचें भाषांतर करणारे भारतीय भाषांतरकार.

१ काश्यप मातंग. मध्यहिंदुस्थानांतील ब्राह्मण श्रमण. चिनी वकील त्साई यिन (Tsai yin) (इ. स. ६५) याच्या निमंत्रणावरून हा इ. स. ६७ सालीं चीनमध्यें गेला. त्याच-वर्षी त्यानें लोयान (Lo-yan) येथील मठांत एका सूत्राचें भाषांतर केलें; व थोड्याच दिवसांनीं तेथें मरण पावला.

२ कूफालान. फालानचा अर्थ धर्मरक्ष असा असावा. परंतु कू-फा-लान ह्याला तिबेटी लोक गोवर्धन किंवा भारण असें म्हणत असावेत. हा काश्यपाच्या मागून गुप्तपणें चीनमध्यें गेला; व दोघांनीं मिळून ४२ परिच्छेदांच्या सूत्राचें भाषांतर केलें.

३ लोकरक्ष. श्रमण. हा इ. स. १४७ त चीनमध्यें गेला; व इ. स. १८६ पर्यंत लोयान येथें भाषांतर करण्यांत गुंतला होता.

४ शाक्य. श्रमण. इ. स. २०७.

५ धर्मकाल. श्रमण. इ. स. २२२. चीनमध्यें आल्यानंतर त्याला असें आढळून आलें कीं चिनी उपाध्यायांनां विनयाचे नियम अगदींच माहीत नाहींत. म्हणून त्यानें इ. स. २५० सालीं, महासंघिकांच्या प्रतिमोक्षाचें भाषांतर केलें. चिनी भाषेंत विनयपिटकाचें हेंच पहिलें पुस्तक होय.

६ खानसान-हुइ. कंबू येथील मुख्यप्रधानाचा सर्वांत वडील मुलगा. वू राज्याच्या राजधानीस तो इ. स. २४७ या वर्षी आला. त्यानें इ. स. २५१ ते इ. स. २८० पर्यंत भाषांतराचें काम केलें.

७ कालरुचि. श्रमण. इ. स. २८१. त्यानें एका सूत्राचें भाषांतर केलें.

८ श्रीमित्र. राज्यावरील वारसा सोडून देऊन हा श्रमण झाला होता. त्यानें इ. स. ३०७–३१२ या वर्षी नानकिंग येथें ३ ग्रंथांचीं भाषांतरें केलीं.

९ धर्मरक्ष. श्रमण. यानें इ. स. ३८१–३९५ या वर्षी कित्येक ग्रंथांचीं भाषांतरें केली.

१० गौतमसंघदेव. कुभा (अर्वाचीन काबूल) येथील एक श्रमण. यानें एकंदर ७ ग्रंथांचीं भाषांतरें केलीं.

११ बुद्धभद्र. हा अमृतोदनाच्या कुलांतील असून शाक्य मुनीचा चुलता होता. यानें एकंदर १३ किंवा १५ ग्रंथांचें भाषांतर केलें. चिनांत त्याला कुमारजीव हा भेटला. कुमारजीवाला न समजणारा भाग तो बुद्धभद्राला विचारीत असे. बुद्धभद्र इ. स. ४२९ त मरण पावला.

१२ धर्मप्रिय. श्रमण. हा विनयांत फार निपुण असून, त्यानें इ. स. ४०० मध्यें "विनयासंबंधीं मिश्र प्रश्न" या ग्रंथाचें भाषांतर केलें.

१३ विमलाक्ष. कुभा (काबूल) येथील श्रमण. हा विनय शास्त्राचा मोठा गुरु असून कर्मजीव हा त्याचा शिष्य होय. विमलाक्ष चिनांत असतां, कर्मजीव त्याला पुष्कळ मान देत असे. त्यानें दोन ग्रंथांचें भाषांतर केलें. (४०५–४१८).

१४ गीतमित्र. श्रमण.

१५ नंदी. पश्चिमभागांत हा एक गृहपति होता. ह्यानें ३ ग्रंथांचें भाषांतर केलें.

१६ धर्मबल. श्रमण. यानें "अमितायुरर्हत् सम्यक्संबुद्ध-सूत्रा"चें भाषांतर केलें. (इ. स. ४१९).

१७ कुमारबुद्धि. श्रमण. (इ. स. ३६९-३७१).

१८ धर्मप्रिय. श्रमण. यानें एका सूत्राचें भाषांतर केलें. (इ. स. ३८२).

१९ धर्मदिन. तुखारा येथील एक श्रमण. खानान येथें त्यानें पांच ग्रंथांचें भाषांतर केलें.

२० कुमारजीव. याचे वाडवडील आपल्या देशांत राज्यकर्ते होते. ह्याचा बाप कुमारायण आपलें राज्य सोडून खरचर येथें गेला. तेथें तेथील राजाची धाकटी बहीण जीवा हिजबरोबर त्याचा विवाह झाला. कुमारजीव हें नांव त्याच्या आईबापांच्या नांवावरून पडलें असें म्हणतात.

कुमारजीव हा सातव्या वर्षी भिक्षु होऊन, प्रसिद्ध धर्मोपदेशक बंधुदत्त (कुभा-काबूल-येथील राजाचा चुलत भाऊ) याचा शिष्य बनला. तो बारा वर्षांचा असतां त्याच्या आईला एक अर्हत् भेटला. कुमारजीवाला वाईट मार्गाकडे जाऊं न देण्याची चांगली खबरदारी घेण्यास त्यानें तिला सांगितलें; पापाचरण न करितां ३५ व्या वर्षापर्यंत तो राहिल्यास त्याच्या हातून बौद्धधर्माचा पुष्कळ प्रसार होऊन उपगुप्ताप्रमाणें तो असंख्य लोक तारील; परंतु त्याचें शील बिघडल्यास तो फक्त हुशार व चतुर उपाध्याय होईल असेंहि त्यानें बजाविलें. पुढें कुमारजीवानें विमलाक्षाजवळ सर्वास्तिवाद-विनयाचें अध्ययन केलें.

इ. स. ३८३ मध्यें, चीनच्या त्सिन घराण्यांतील राजानें पाठविलेल्या सेनापतीनें खरचरचा नाश करून त्या देशच्या राजाला ठार मारलें व कुमारजीवाला पकडून नेलें. वाटेंत, सेनापति लु क्वान यानें कुमारजीवाला (त्याच्या ३५ व्या वर्षापूर्वींच) राजाच्या एका मुलीशीं संभोग करावयास भाग पाडलें. इ. स. ४०१ पर्यंत, कुमारजीव लु क्वानबरोबर चीनमध्यें लियानक्यू येथें होता; व नंतर वर उल्लेखिलेल्या त्सिन घराण्यांतील दुसरा पुरुष याओहिन याजकडे खानान येथें गेला. तेथें त्याचें चांगलें स्वागत झालें. इ. स. ४०२ ते ४१२ पर्यंत त्यानें पुष्कळ ग्रंथांचें भाषांतर केलें, व चिनी भाषेंत कांहीं पुस्तकें व कविता लिहिल्या. हजारों चिनी धर्मोपदेशक त्याचे शिष्य बनले व त्या शिष्यांनींहि पुष्कळ पुस्तकें लिहिलीं. कुमारजीव इ. स. ३९९ ते ४१५ या हुंश (Hunsh) कालांत मरण पावला.

२१ पुण्यतर. कुभा (काबूल) येथील श्रमण. यानें कुमारजीवाबरोबर एका ग्रंथाचें भाषांतर केलें.

२२ धर्मयश. काबूल (कुभा)चा श्रमण. *भा. के. ग्रं. सं. १.

२३ धर्मरक्ष. मध्यहिंदुस्थानांतील श्रमण. हा चीनमध्यें इ. स. ४१४ त गेला. यानें कित्येक ग्रंथांचें भाषांतर केलें. उत्तर वेइ घराण्यांतील थाईवू-ति याच्या बोलावण्यावरून त्याजकडे जात असतां वाटेंत मारेकऱ्याकडून तो मारला गेला.

* भा. के. ग्रं. सं.=भाषांतर केलेल्या ग्रंथांची संख्या.

२४ बुद्धवर्मन. श्रमण. भा. के. ग्रं. सं. १.

*शिहकमन. चिनी श्रमण. यानें पाटलिपुत्रास येऊन निर्वाणसूत्र, महासंघिक विनय, व दुसरे कांहीं ग्रंथ चीनमध्यें नेले; व इ. स. ४३३-४३९ त निर्वाणसूत्राचें भाषांतर केलें.

२५ बुद्धजीव. काबूल (कुभा) येथील श्रमण. भा. के. ग्रं. सं. ३.

२६ कालयशः श्रमण. भा. के. ग्रं. सं. २.

२७ धर्ममित्र. श्रमण (काबूल.).

(चिनी श्रमण शिह कयेन-(Shih k'yen)-यानें काबूलहून संस्कृत ग्रंथ आणून १० किंवा १४ ग्रंथांचें भाषांतर केलें.)

२८ ईश्वर. श्रमण. यानें संयुक्त अभिधर्महृदयशास्त्र या ग्रंथाचें भाषांतर केलें. (इ. स. ४२६).

२९ गुणवर्मा. श्रमण(कुभा=काबूल). भा. के. ग्रं. सं. १०.

३० संघवर्मा. श्रमण. यानें क्येन ये (नानकिंग) (Kien-yeh) येथें इ. स. ४३३ त ५ ग्रंथांचें भाषांतर केलें.

३१ गुणभद्र. मध्यहिंदुस्थानांतील ब्राह्मण श्रमण. याला महायान असें टोपणनांव होतें. यानें चिनी भाषेमध्यें सुमारें ७८ ग्रंथांचें भाषांतर केलें.

(धर्म विक्रम (शूर) चिनी श्रमण.)

३२ संघवर्मा. सिलोन येथील श्रमण. यानें महीशासक विनयाच्या कांहीं भागाचें चिनींत भाषांतर केलें.

३३ धर्मजातयशः. भा. के. ग्रं. सं. १.

३४ महायान. पश्चिमभागांतील श्रमण. यानें ५०० जातकांचें सूत्र व स्थविरपंथाचा विनय या दोन ग्रंथांचें भाषांतर केलें.

| | | | |
|---|---|---|---|
| ३५ संघभद्र. | श्रमण- | | भा. के. ग्रं. सं. १. |
| ३६ धर्ममति. | | | ,, ,, |
| ३७ गुणवृद्धि. | | मध्यहिंदुस्थान. | ,, ,, |

(मंद्र. श्रमण. (सयाम?))

(संघपाल (वर्मा)-सयाम?)

३८ उपशून्य. मध्यहिंदुस्थानचा राजा उद्यान, याचा हा मुलगा. हा प्रथम पूर्व वेइ घराण्याच्या राजधानींत रहात असे. नंतर दक्षिणेकडे लिआन घराण्याच्या राजधानींत (नानकिंग) रहावयास गेला. यानें एकंदर ५ ग्रंथांचें भाषांतर केलें.

३९ परमार्थ. याला गुणरत असेंहि नांव होतें. तो उज्जयिनीचा राहणारा. ५४८ त तो नानकिंग येथें गेला. त्यानें सुमारें १० ग्रंथांचें भाषांतर केलें.

४० किंकर. श्रमण. भा. के. ग्रं. सं. ५.

४१ धर्मरुचि. श्रमण. भा. के. ग्रं. सं. ३.

४२ रत्नमति. मध्यहिंदुस्थानांतील श्रमण. भा. के. ग्रं. सं. ३.

४३ बोधिरुचि. उत्तरहिंदुस्थानांतील एक श्रमण. भा. के. ग्रं. सं. ३०. हा लोयान येथें इ. स. ५०८ त आला.

* भारतीयेतर ग्रंथकारांच्या नांवामागें क्रमांक घातला नाहीं.

४४ बुद्धशांत. श्रमण. भा. के. ग्रं. सं. १०.

४५ गौतमप्रज्ञारुचि. वाराणसीचा ब्राह्मण. भा. के. ग्रं. सं. १४ ते १८.

४६ विमोक्षप्रज्ञा अथवा विमोक्षसेन. हा कपिलवस्तूच्या शाक्य घराण्यांतील होता. श्रमण (इ. स. ५४१) भा. के. ग्रं. सं. ५.

४७ धर्मबोधि. भा. के. ग्रं. सं. १.

४८ नरेंद्रयशः. उद्यान (उत्तरहिंदुस्थान) येथील श्रमण. भा. के. ग्रं. सं. ७.

४९ ज्ञानभद्र. हा पद्मदेशचा (?) श्रमण. यानें पंचविद्येंतील एका सूत्राचें भाषांतर केलें.

५० ज्ञानयशः. मगधदेशचा श्रमण. हा व याचे दोन शिष्य यशोगुप्त व ज्ञानगुप्त, यांनीं ६ ग्रंथांचें भाषांतर केलें.

५१ गौतमधर्मज्ञान. वाराणसी येथील उपासक. हा प्रज्ञारुचीचा (वर ४५ पहा.) वडील मुलगा. उत्तर शि घराण्याचा मोड झाल्यानंतर (इ. स. ५७७.) उत्तर च्यू घराण्यानें त्याला यानसेन जिल्ह्याचा सुभेदार नेमिलें; परंतु त्या घराण्यामागून आलेल्या सुइ घराण्यांतील पहिला बादशहा वन-ति यानें त्याला राजधानीस बोलाविलें. तेथें त्यानें एका ग्रंथाचें भाषांतर केलें.

५२ विनीतरुचि. उद्यान (उत्तरहिंदुस्थान)चा श्रमण. भा. के. ग्रं. सं. २.

५३ नरेंद्रयश. भा. के. ग्रं. सं. ८.

५४ धर्मगुप्त. यानें इ. स. ५९० ते ६१६ पर्यंत कित्येक ग्रंथांचें भाषांतर केलें.

५५ प्रभाकर मित्र. क्षत्रिय श्रमण. (इ. स. ६२७) भा. के. ग्रं. सं. ३.

(ह्यून त्सान. लोयान येथील एक चिनी श्रमण. इ. स. ६२९ त हा हिंदुस्थानांत आला होता. चिनांत परत गेल्यावर यानें निरनिराळ्या ७५ ग्रंथांचें भाषांतर केलें.)

५६ भगवद्धर्म. श्रमण. (पश्चिमहिंदुस्थान). भा. के. ग्रं. सं. १.

५७ अतिगुप्त. श्रमण. (मध्यहिंदुस्थान). भा. के. ग्रं. सं. १.

५८ पुण्योपाय. मध्यहिंदुस्थानांतील एक श्रमण. हा इ. स. ६५५ त चीनमध्यें गेला. यानें आपल्या बरोबर महायान व हीनयान ह्या दोन्ही पंथांच्या तिपिटकाच्या निरनिराळ्या १५० प्रती नेल्या होत्या. इ. स. ६५६ त, चिनी बादशहानें त्याला प्यूलोकंडोर बेटांत चमत्कारिक नवीं औषधें आणण्याकरितां पाठविलें होतें. तेथून इ. स. ६६३ त परत आल्यानंतर त्यानें तीन ग्रंथांचें भाषांतर केलें.

५९ दिवाकर. भा. के. ग्रं. सं. १८.

६० बुद्धत्रात. काबूलचा श्रमण. भा. के. ग्रं. सं. १.

६१ बुद्धपाल. काबूलचा श्रमण इ. स. ६७६, भा. के. ग्रं. सं. १.

६२ देवप्रज्ञा. कुस्तान (खोतान) येथील श्रमण. भा. के. ग्रं. सं. ६.

६३ शिक्षानंद. कुस्तान येथील श्रमण. भा. के. ग्रं. सं. १९ (इ. स. ६९५ ते ७००)*

६४ रत्नचिंत. काश्मीरचा श्रमण. (इ. स. ६९३-७०६)* भा. के. ग्रं. सं. ७.

६५ बोधिरुचि. याचें मूळ नांव धर्मरुचि असें होतें. हा काश्यपगोत्री ब्राह्मण श्रमण. इ. स. ६९३ ते ७१३ पर्यंत यानें ५३ ग्रंथांचें भाषांतर केलें.

६६ प्रमिति. मध्यहिंदुस्थानांतला एक श्रमण. भा. के. ग्रं. सं. १

६७ शिह क्येन. (Shih k'yen) कुस्तानच्या राजाचा मुलगा. याला चिनांत ओलीस म्हणून पाठविलें होतें. भा. के. ग्रं. सं. ४.

६८ वज्रबोधि. दक्षिणहिंदुस्थानांतील मलयदेशचा श्रमण. हा चिनांत इ. स. ७१९ त गेला. भा. के. ग्रं. सं. ४.

६९ शुभकरसिंह. शाक्यमुनीचा चुलता अमृतोदन याच्या कुलांत त्याचा जन्म झाला असून नालंदच्या मठांत तो रहात असे. हा इ. स. ७१६ त चीनच्या राजधानीस गेला. तेथें त्यानें ४ ग्रंथांचें भाषांतर केलें.

७० अमोघवज्र. ब्राह्मण श्रमण. हा पहिल्यानें इ. स. ७१९ त आपला गुरु वज्रबोधि (नं. ६८) याजबरोबर चिनांत गेला. इ. स. ७६५ त, त्याला त्रिपिटक भदंत ही पदवी मिळाली. इ. स. ७७१ त, चीनच्या बादशहाच्या वाढदिवशीं त्यानें भाषांतर केलेले ग्रंथ बादशहास नजर केले; व त्याबरोबर एक विनंतीअर्जहि सादर केला. त्यांत त्यानें स्वतः-संबंधानें पुढीलप्रमाणें उल्लेख केला आहे. "लहानपणापासून (इ. स. ७१९ ते ७३२) मी आपल्या गुरूची (वज्रबोधि) सेवा करून त्याजपासून योगाचें ज्ञान संपादन केलें. पुढें हिंदुस्थानच्या पांच भागांत जाऊन, चीनमध्यें पूर्वीं न आलेल्या अशा सूत्रांच्या व शास्त्रांच्या निरनिराळ्या ५०० प्रती आणल्या. इ. स. ७४६ त, मी राजधानीस परत आलों; व त्या वर्षापासून आतांपर्यंत (इ. स. ७७१) ७७ ग्रंथांचें भाषांतर केलें." थानघराण्यांतील बादशहांच्या दरबारीं अमोघवज्राला फार मान असे. त्याच्या वजनामुळें चिनांत तंत्रमत प्रथम प्रचलित झालें. तो इ. स. ७७४ त मरण पावला.

७१ प्रज्ञा. काबूलचा श्रमण. भा. के. ग्रं. सं. ४.

७२ थिएन-सि-त्साई. जलंदरचा श्रमण. हा चिनांत इ. स. ९८० सालीं गेला; यानें १८ ग्रंथांचें भाषांतर केलें.

७३ (Sh-hu) दानपाल(?) उद्यानचा श्रमण. यानें १११ ग्रंथांचें भाषांतर केलें.

७४ धर्मरक्ष. मगधदेशचा श्रमण. (इ. स. १००४ ते १०५८) भा. के. ग्रं. सं. १२.

७५ Tshz'hhien. मैत्रेयभद्र(?) मगधदेशचा श्रमण. भा. के. ग्रं. सं. ५.

चीनमध्यें गेलेल्या आणि तेथें जाऊन ग्रंथकर्तृत्व अंगीकारलेल्या भिक्षूंची एक लांबलचक यादी देऊन वाचकांस त्रास

* भाषांतर केव्हां केलें ते सन.

देण्याचा आमचा हेतु नव्हता, तथापि स्वमतप्रसारार्थ किती ग्रंथलेखन करावें लागलें, काय खटाटोप करावे लागले याची सामान्य कल्पना येण्यासाठीं एक कंटाळवाणी यादी वाचकांच्या पुढें आपटण्याखेरीज इलाज नव्हता. संप्रदायाचा प्रसार झाला तो चिनी लोकांच्या भोळसरपणानें एखाद्या सांथीसारखा झाला नसून मोठ्या मेहनतीनें झाला आणि ती मेहनत घेणारे लोक आपल्याच राष्ट्रांतील होते ही गोष्ट मेहनतीस कंटाळणाऱ्या जनतेपुढें अत्यंत मोकळेपणानें मांडणें अवश्य आहे.

चिनी लोकांमध्यें हा संप्रदाय अनेक शतकें विचारक्षेत्रांत संग्राम केल्याशिवाय टिकला नाहीं. देशांत सर्व तऱ्हेनें वृद्धि व्हावी, लोकांनीं प्रजोत्पत्ति करावी, मेहनत करावी आणि साम्राज्याच्या संपत्तीची वृद्धि करावी अशीं तत्त्वें शिकविणारें कनफ्यूशिअसचें तत्त्वज्ञान लोकांत आणि विशेषेंकरून मांदारिनवर्गांत जिवंत होतें. त्याची यथार्थ कल्पना येण्यासाठीं डॉ० ग्रूटचे ग्रंथ वाचावेत.* या तत्त्वज्ञानाच्या अभिमान्यांनीं निवृत्तिमार्ग उपदेशिणाऱ्या बौद्ध भिक्षूंचे हाल थोडेथोडके केले नाहींत.

**तिबेट.**–तिबेटावर जो भारतीय संस्कृतीचा परिणाम झाला त्यांत आपणास खालील थर दिसून येतात. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे तिबेटमध्यें जी विचारपद्धति गेली ती महायान होती आणि त्यामुळें या मतावरोबरच अनेक शास्त्रेंहि गेलीं. महायानावरोबर प्रथमतः तंत्रशास्त्र मिसळून तिबेटांतील अनेक मतें निर्माण झालीं. हिंदुस्थानांतील जीं शास्त्रें तेथें गेलीं त्यांत मातृकाज्ञान, वैद्यक, न्यायशास्त्र, शिल्पशास्त्र, धर्मशास्त्र आणि परमार्थविषयक तत्त्वज्ञान यांचा प्रवेश महायानावरोवर म्हणजे पंडिती बौद्ध संप्रदायावरोवर झाला. आज या शास्त्रांचें ज्ञान मात्र येथें फारसें नाहीं असें कावागुची † म्हणतो.

तिबेटामध्यें समाजस्थिति हिंदुस्थानसारखीच दिसते. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या प्रकारचे तीन वर्ण तेथें आहेत. ब्राह्मणांचें स्थान तेथील वोनवो नांवाच्या वर्गानें घेतलें आहे. जेव्हां नवीन पारमार्थिक विचारसंप्रदाय आणि त्याचें भिक्षुमंडळ निर्माण होतें किंवा विशेषेंकरून परक्या ठिकाणाहून येतें तेव्हां परंपरागत आचार्य हे केवळ संस्कारकर्ते होतात ही गोष्ट जशी हिंदुस्थानांतील ब्राह्मणांच्या उदाहरणावरून जपानांतील 'शेन् ताओ' उर्फ 'शिन्तो'च्या आचार्यांच्या स्थितीवरून सिद्ध होते तशी वोनवो यांच्या तिबेटांतील स्थानावरूनहि सिद्ध होते.

तिबेटमध्यें लग्नें लावणें वगैरे संस्कार हे वोनवो करितात आणि पारमार्थिक उपदेश लामा करितात. तेथें विदुरांसारखा वर्ग आहे. तेथें विटाळाची कल्पना आहे. हे लोक अत्यंत घामट व घाणेरडे जरी आहेत तरी हलक्या जातीच्या मनुष्याच्या ओष्ठस्पर्शानें त्यांचा चहाचा चमस विटाळतो.

भरतखंडांत ज्याप्रमाणें ६० संवत्सरांचें वर्षचक्र आहे त्याप्रमाणें तिबेटांतील कालगणनेंतहि ६० वर्षांचें वर्षचक्र आहे. तिबेटमधील कालगणनापद्धति व भारतीय कालगणनापद्धति यांमध्यें विलक्षण साम्य आहे असें एम्. पी. पेलियट यानें आपल्या एका लेखांत दाखविलें आहे.*

तिबेट येथील शिक्षणपद्धति आणि हिंदुस्थानांतील न्यायमीमांसकांची जुनी शिक्षणपद्धति यांमध्यें बरेंच साम्य आहे. त्याचें कावागुचीनें येणेंप्रमाणें वर्णन केलें आहे.

दरसाल मोन्लोम उत्सवाच्या प्रसंगीं तीन्ही मठांतील विद्यार्थी मिळून फक्त १६ उमेदवारांस ल्हारंवा म्हणजे विशिष्ट पंडित अशी पदवी देतात. तिबेटांतील अत्यंत उच्च पदवी हीच. परीक्षा तोंडीं असते. परीक्षकमंडळ मोठ्या कसोशीनें परीक्षा घेतें. विद्यार्थ्यांचा २० वर्षांचा अभ्यासक्रम पुरा झालेला असतो. परीक्षेंत कोट्या आणि मोठे सूक्ष्म वादविवाद होतात. या वादविवादांच्या प्रसंगीं जी सूक्ष्मता कावागुचीनें पाहिली, तशी त्यानें इतरत्र कोठेंहि पाहिली नाहीं. वादविवादांत परीक्षक विद्यार्थ्यांस पकडूं पाहतात आणि परीक्षेस वसलेला उमेदवार त्यांच्या पकडींतून निसटून त्यांसच पकडूं पाहतो. ही परीक्षा नसून हें व्याघ्रसिंहाचें युद्धच आहे असें कावागुचीस वाटलें.

ल्हारंवाच्या खालोखाल पदवी म्हटली म्हणजे सोरंभा होय. या पदवीसाठीं १६ उमेदवार सर्व मठ मिळून पाठविले जातात आणि कोएन्जोच्या उत्सवप्रसंगीं ही परीक्षा घेतली जाते. याच्या खालोखालच्या पदव्या म्हटल्या म्हणजे डोरंवा आणी रिमशी अशा दोन आहेत. डोरंवा ही पदवी असलेले लोक सुद्धां जाडे विद्वान असतात; पण रिमशी ही पदवी अतिशय सामान्य शिक्षणाची निदर्शक होय. रिवोट किंवा गांडेल येथें ५।६ वर्षें घालविलीं, आणि कांहीं पैसे भरले म्हणजे ही पदवी वाटेल त्यास मिळते. तिबेटमध्यें बौद्धग्रंथ साकल्यानें जाणणारे पंडित जपानपेक्षां अधिक आहेत, असें कावागुची म्हणतो. तिबेटांतील वोनधर्म अत्यंत जुना म्हणून सांगितला तो नवीन होऊन त्यास बौद्धरूप आलें आहे. तिबेटांत मुसुलमानहि आहेत. त्यांची संख्या थोडी आहे. जे मुसुलमान आहेत ते काश्मिरी व चिनी मुसुलमानांचे वंशज आहेत. त्यांच्या जातिपरत्वें ल्हासा येथें दोन मशिदी आहेत. ते आपल्या मतांस मोठ्या भक्तीनें चिकटून राहतात. मात्र त्यांचा पुनर्जन्मावर विश्वास आहे. बौद्धांच्या व त्यांच्या समजुतींत फरक एवढाच कीं, बौद्धांच्या मतें मनुष्य पुन्हां खालच्या योनींत जन्मास येऊं शकतो पण

* Religious systems of China by Dr, J. J. M. de Groot 6 Vols. 1910. † Three years in Tibet. Madras 1909.

* Journal Asiatique, 1913.

मुसुलमानांच्या मतांप्रमाणें मनुष्य पुन्हा नीच योनींत जात नाहीं.* पुनर्जन्माचा सिद्धांत कुराणांत नाहीं असें जरी तेथील मुसुलमानांस सांगितलें तरी तो आहे असें ते म्हणतात.

तिबेटी बौद्धांमध्यें कर्मवाद आहे, आणि मोक्ष स्वकर्मानें मिळवितां येतो ही गोष्ट प्रत्येकाच्या मनावर ठसली आहे. बौद्धसंप्रदायाचा प्रभाव येथें इतक्या जोराचा आहे कीं दुसरा कोणताहि संप्रदाय येथें पसरणें शक्य नाहीं. कांहीं लोकांस आपण ख्रिस्ती केलें म्हणून ख्रिस्ती मिशनरी गर्व मानतात तथापि जे तिबेटी ख्रिस्ती झाले आहेत त्यांपैकीं बहुतेक सर्व लोक सिक्किमी असून आपणांस तिबेटी म्हणवून घेणारे आहेत. शिवाय ही मंडळी उघडपणें बायबल घेऊन चर्चमध्यें जातील पण घरीं चोरून बुद्धाच्या मूर्तीची पूजा करून धूप जाळतील अशांतली आहे.

येथपर्यंत वाचकांस तिबेटी लोकांबद्दल सामान्य माहिती दिली यापेक्षां थोडी विस्तृत माहिती द्यावयाची म्हणजे प्रथम तेथील भाषा व वाङ्मय यांशीं थोडासा परिचय करून देऊन नंतर तेथील समाजस्थिति, परमार्थसाधन इत्यादि माहिती देऊं.

**तिबेटी अथवा भोतिया.**—तिबेटी भाषा, † तिबेट व त्याच्या शेजारचे भारतांतील जिल्हे यांतून चालते. तिबेट या नांवाची उपपत्ति चांगलीशी लागली नाहीं. तिबेटी लोक आपल्या देशाला बोद-युल आणि आपल्या भाषेला बोद-स्कद असें संबोधितात. मध्य तिबेटांत या बोद-स्कदचा उच्चार भो-क असा करितात. तिबेटी मनुष्याला बोद-प असें नांव आहे व याचा भारतीयांनीं भौत्त, भोतिया असा अपभ्रंश केलेला आहे. भारतीय लोक भारत व तिबेट यांच्या सरहद्दींवर राहणाऱ्या तिबेटी लोकांनां 'भोतिया' असें नांव देतात व खुद्द तिबेटच्या रहिवाशांनां हूनिय व देशाला हूनदेस् असें संबोधितात. यांच्या भाषेला पुष्कळ नांवें सुचविलीं गेलीं आहेत. पण तिबेटी हेंच नांव त्या सर्वांत विशेष प्रसिद्ध आणि सर्वमान्य आहे.

बाल्तिस्तान आणि लडख यांसह सर्व तिबेटभर तिबेटीच्या निरनिराळ्या पोटभाषा चालतात. श्रीनगराहून द्रसकडे जाणाऱ्या हमरस्त्यावर असलेली झोजिलाची वाट आर्य आणि तिबेट वस्ती यांमधील नृवंशविभाजक स्थल आहे असें यथार्थ म्हणतां येईल. या स्थळापासून पूर्वेकडे लहौल, स्पिति, कुनावर, गढवाल, नेपाळ, सिक्किम आणि भूतान, या उत्तरेकडील प्रदेशांचा समावेश करून एक वांकडीतिकडी रेषा काढली असतां या विभाजक रेषेच्या तिबेटी बाजूचा भाग तो तिबेटी बोलणारा भाग होय. यावरून तिबेटी ही मुख्यतः हिंदुस्थानाला परकीय अशी भाषा आहे हें उघड होतें. ही हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील जिल्ह्यांतून वस्तीस राहिलेल्या विदेशीय लोकांत मात्र चालते. पूर्वेकडे हिचा प्रसार चीनमधल्या स्सेचुअन प्रांतापर्यंत झालेला आहे.

**पोटभाषा.**—तिबेटीभाषा ज्या प्रदेशांत बोलली जाते त्या सर्व प्रदेशभर ती एकसारखी नाहीं. तिबेटी वाङ्मयाची जुनी अभिजात भाषा, ज्या काळीं तिबेटी लेखनस्वरूपांत आणली गेली त्या काळीं ती कोणत्या अवस्थेंत होती हें दर्शविते. या जुन्या भाषेंत जोड व्यंजनें आरंभीं असणारे एकाक्षरी शब्द आहेत. मध्यतिबेटी भाषांत वर्णोच्चाराची एक विशिष्ट पद्धत आहे. मध्य-तिबेटी भाषांचा विस्तार पश्चिमेकडे स्पितिपासून पूर्वेकडे भूतान-पर्यंत आहे. या भाषावर्गांत अनेक पोटभाषा येतात व पश्चिमे-कडून निर्देश करीत आल्यास स्पिति, न्यम्कत, जड, गढवाल, कागते, शर्प, दन्जान्गक आणि ल्होके असा त्यांचा अनुक्रम येतो. सिक्किम आणि भूतान यांमधील चुम्बी खोऱ्यांतील तिबेटी भाषा त्या संस्थानांच्या भाषांशीं जुळते.

न्गारी म्हणून तिबेटचा जो पश्चिमभाग आहे त्याचे मंग्युल, खोरसुम आणि मन्युल असे तीन भाग पडतात. मंग्युलची भाषा, पूर्व नेपाळांत चालणाऱ्या शर्प व कागते या भाषांशीं जुळते; खोरसुमची भाषा स्पिति, न्यम्कत, जड या गढवालवगैरे प्रदेशां-तील तिबेटी भाषांशीं जुळते; व खोरसुमच्या उत्तरेकडे असलेल्या ऊडोकमधील भाषा लडखी आणि बाल्ती भाषांशीं एकजीव झालेली आहे.

पश्चिम तिबेटी म्हणून जो दुसरा एक भाषावर्ग आहे, त्यांतल्या ब्रिटिश हद्दींत चालणाऱ्या व परस्पर निगडित असणाऱ्या अशा तीन पोटभाषा आहेत, त्या बाल्तिस्तानमधील बाल्ती, जुन्या पुरिक प्रांतांतील पुरिक व लडखमधील लडखी-भाषा या होत. लहौलमध्यें जी तिबेटी भाषा चालते, तिला पश्चिम व मध्य तिबेटी यांनां जोडणारा दुवा असें म्हणतां येईल. पूर्वतिबेटांतील खम्सप्रांतांत जी भाषा चालते, तिला पूर्वतिबेटी असें म्हणतां येईल. उत्तरेकडे व पूर्वेकडे, सिफन आणि स्सेचु-अन प्रांतांत पूर्वतिबेटीशीं संबद्ध अशा भाषा वापरतात; त्या तिबेटी आणि आसाम व पूर्वतर उपभारताच्या तिबेट-ब्रह्मी भाषा यांनां जोडणारा दुवा होत.

**भाषा बोलणारांची संख्या.**—ब्रिटिशहिंदुस्थानच्या बाहेर निरनिराळ्या तिबेटी भाषा बोलणारे लोक किती आहेत याविषयीं विश्वसनीय माहिती मिळत नाहीं. १९०१ आणि १९११

---

* या मुसुलमानांपासूनच सध्यांच्या थिआसफिस्टांनीं नवीन बनविलेली पुनर्जन्माची विचारपद्धति घेतली नसेल ना? कां कीं यूरोपांत मनुष्येतर प्राण्यांस "सोल" नांवाचा जिन्नस नसतो आणि तो मनुष्यांतच असतो अशा समजुतीशीं मिळतें करून घेण्यासाठीं पुनर्जन्मविषयक हिंदुकल्पना जराशी बदलून यूरोपांत या मताचे प्रवर्तक मांडतात. त्यांनीं 'ट्रान्समायग्रेशन आफ् सोल' हे शब्द आतां टाकून 'री-इन्कार्नेशन' हा शब्द वापरण्यास सुरुवात केली आहे. नीचयोनीपासून जीवाचें "एव्होल्यूशन" होत होत त्यास नरदेह मिळाला म्हणजे त्याला "सोल" प्राप्त होतो. तो एकदां मिळाला म्हणजे पुन्हा नाहींसाच होत नाहीं. कां कीं जीवाचें एव्होल्यूशन सारखें चालू राहिलें पाहिजे असें त्यांचें म्हणणें आहे. ब्लाव्हाटस्कीचे महात्मे तिबेटांत होते असें ती सांगत होतीच. † Grierson–Linguistic Survey of India Vol, III Part I.

सालच्या खानेसुमारीच्या रिपोर्टमध्यें हिंदुस्थानांत तिबेटीभाषा बोलणारांची संख्या पोटभाषावार खालीलप्रमाणें दिली आहेः—

| भाषा | लोकसंख्या १९०१ | लोकसंख्या १९११ |
|---|---|---|
| तिबेटी | १४,८१२ | ६,०२० |
| बाल्ती | १,३०,६७८ | १,३२,१९९ |
| लडखी | ९० | ५४,७६१ |
| शर्प | ४,४०७ | ५,१८६ |
| दन्जान्गक | ८,८२५ | ११,५६२ |
| ल्होके | ४०,५९० | ८,६८० |
| इतर | ३५,८२२ | ११,४२९ |
| एकंदर | २,३५,२२४ | २,२९,८३७ |

**तिबेटीवाङ्मय.**—सातव्या शतकाच्या पूर्वभागांतच तिबेटी ही साहित्यभाषा होऊन बसली होती. रेव्ह. एच्. जस्खे आपल्या तिबेटी–इंग्रजी–कोशाच्या प्रस्तावनेत खालीलप्रमाणें तिबेटीवाङ्मयाच्या इतिहासाचा गोषवारा देतो:—

"तिबेटी वाङ्मयाची उत्पत्ति व वाढ आणि या भाषेच्या इतिहासांतील ठळक गोष्टी यांचा अभ्यास करणाराला वाङ्मय-निर्मितीचे दोन मुख्य काल लक्षांत घ्यावे लागतात. पहिला भाषांतरकाल, याला सर्वोत्कृष्ट काल असेंहि म्हणतां येईल. कारण पारमार्थिक संदेशाच्या पावित्र्यानें तो (संदेश) ज्या भाषा-स्वरूपांत सांठविला गेला त्या स्वरूपाला पवित्र व उत्कृष्ट अशा शाश्वत लौकिकाची जोड मिळाली. या कालाला सातव्या शतकाच्या पूर्वार्धात सुरवात होते; यावेळीं स्रांग्संगंपोचा प्रधान जो थॉन्मी संभोत त्याला संस्कृत शिकण्याकरितां हिंदुस्थानांत पाठविण्यांत आलें. या थॉन्मीनें तिबेटी वर्णमाला तयार केली. यामुळें तिबेटी वाङ्मयाला दोन अंगांनीं चेतना प्राप्त झाली; पुष्कळ शतकेंपर्यंत हिंदुस्थानचें पांडित्य व तिबेटची कल्पकबुद्धि यांनीं उत्साहानें व एकजुटीनें भाषांतराच्या कामीं पुष्कळ मेहनत घेतली. खऱ्या प्रतिभेला द्यावयाचा जो मान, तो तिबेटी व्याकरणाच्या या आद्यप्रवर्तकांनांच दिला पाहिजे. त्यांनां संस्कृत-भाषेच्या अलोट संपत्तीशीं व सौष्ठवाशीं झगडावयाचें होतें. त्यांनां आपल्या जन्मभाषेस शास्त्रीय नियमांनीं निश्चित स्वरूप द्यावयाचें होतें व असें करतांना, त्यांनां तिची स्वतंत्रता राखावयाची होती. अशा स्थितींत त्यांनीं मूळांतील अर्थ बरोबर व्यक्त करून मूळांतील शब्द न सोडणारीं अशीं भाषांतरें केलीं हें विशेष कौतुकास्पद आहे. या पहिल्या अध्यापकांनीं त्यांच्या मागाहून येणाऱ्या भाषांतरकार शिष्यांकरितां मार्ग फार सुलभ करून ठेविला होता, कारण तिबेटींत भाषांतर केलेल्या ग्रंथांतून व लेखांतून योजलेल्या लेखनपद्धतींत व प्रतिपादिलेल्या विषयांत पुष्कळ सुसंगतपणा दिसून येतो. अर्थात् नमुन्यादाखल कांहीं भाषांतरग्रंथ एकदां तयार झाल्यावर पुढें एखाद्या यंत्राप्रमाणें साहित्योत्पादन करणें शक्य झालें."

भाषांतरग्रंथ निर्माण होऊं लागल्यानंतर बऱ्याच काळानें तिबेटांतील रहिवाशी स्वतंत्र ग्रंथरचना करूं लागले. त्यांनीं अशी ग्रंथरचना करण्यास सुरुवात केली, तेव्हां प्रतिपाद्य विषय म्हणून ऐतिहासिक किंवा पौराणिक विषयच त्यांनीं घेतले होते. या दुसऱ्या कालांतली भाषा जवळ जवळ अर्वाचीन भाषेप्रमाणें असून, मध्यतिबेटाच्या सध्यांच्या बोलीशीं तिचें अतिनिकट साम्य आहे.

शरत् चंद्र दासाच्या मतें दुसऱ्या कालाला सुमारें इ. स. १०२५ त सुरवात होते. तो मिलरस्प आणि अतीश इत्यादि-कांचा काल होता. शरत् चंद्र इ. स. १०२५ पासून नवी अवस्था सुरू झाली असें धरितो,—

"मगधांतील उदन्तपुरि व विक्रमशील येथील मोठ मोठे बौद्ध मठ यांची लुटालूट व नाश पाहून आणि इ. स. १२०३ त बखत्यार खिलजीच्या सेनापतित्वाखालीं मुसुलमानांनीं केलेलें बंगाल व बिहार या प्रांतांचें आक्रमण अवलोकन करून, याच-सुमारास काश्मीरचा पंडित शाक्य श्री तिबेटला परत आला ··· ··· त्यावेळचे विख्यात लेखक म्हणजे शाक्य पंडित कुंत्राग्यल-शन, कुब्लइखान बादशहाचा आचार्य होगोन फग्-प, आणि दण्डीचा 'काव्यादर्श' व क्षेमेंद्राचें 'अवदानकल्पलता' यांचें छंदोबद्ध तिबेटींत भाषांतर करणारा शोंगटोन लोत्साव हे होत. १५ व्या शतकाच्या सुरवातीस बुतोन–रिन्चेन ड्बनें तिबेटी वाङ्मयाच्या एका नवीन कालास सुरुवात केली; आणि बुद्ध-धर्माला फग्मोदू राजांच्या कारकीर्दींत नवीन चोदना मिळाली. यावेळीं तिबेटी पंडीत चीनच्या मिंग बादशहांच्या आश्रयाखालीं चिनी वाङ्मयाचा जारीनें अभ्यास करीत होते. याच कालांत—याला दा-नाइंग (प्राचीन वर्णविचार)चा काल असें म्हणतात—तिबेटच्या महनीय देशी वाङ्मयाचा प्रादुर्भाव झाला. विद्वान् लोत्साव, सांग्सप, बुतोन, ग्यल्वा ङगपा, लामा तारानाथ, देस्री, संग्ये ग्यत्शोवसुंप खंपो यांसारखे पंडित उदयास आले. हा गेलु-गपाचा म्हणजे सांग्सपानें स्थापलेल्या बौद्धसंप्रदायांतील पीत शिरस्त्राणशाखेचा काल होता; गहदन हें या शाखेचें प्रमुख स्थान होय.

तिसऱ्या कालास १८ व्या शतकाच्या पहिल्या पादांत सुरवात होते. त्यावेळीं तिबेटवर चिनी सत्ता पूर्ण प्रस्थापित झाली होती व गुशीखानच्या घराण्यांतील शेवटला तार्तर राजा, झुनगर तार्तरांच्या सेनापतीकडून मारला गेला ही गोष्ट, आतांपर्यंत गेलुग-पा मठाचा एक क्षुल्लक धर्माधिकारी असलेल्या दलाइ लामाच्या हातीं तिबेटचें स्वामित्व स्वाधीन करण्याच्या कामीं कारणीभूत झाली. या तिसऱ्या कालांत पवित्र बोधिसत्वाच्या सुखप्रद सत्तेखालीं तिबेटनें अनुपम शांतता उपभोगिली आहे आणि त्याची भाषा उत्तर आशियाची सामान्यभाषा बनलेली आहे."

**प्राचीन उल्लेख.**—प्राचीन चिनी ग्रंथांतून कियांग या नांवाखालीं तिबेटी लोकांचा उल्लेख केलेला आहे. यूरोपांत तिबेट हें नांव मुसुलमानांच्या द्वारा गेलें. इ. स. ६ व्या शतकाच्या शेवटीं इस्तखीनें तिबेट या अर्थीं तोब्वत या रूपाचा उपयोग केलेला आहे. तिबेटवर, जोहन दि पामानो कार्पिनी (१२४७), विल्हेलमस दि रुब्रक (१२५३), मार्कोपोलो (१२९८) व दुसरे कांहीं विद्वान् यांनीं कांहीं लेख लिहून प्रसिद्ध केले. यांत तिबेट देशासंबंधीं फारशी माहिती मिळत नाहीं. १७ व्या व १८ व्या शतकांत कॅथॉलिक जेसुइट मिशनरी या प्रदेशांत आले व

होण्याशिओ दिला पेन्ना बेला हा इ. स. १७३२ पासून १७ वर्षें ल्हासा येथें राहून तेथील भाषा शिकला.

यूरोपांत गेलेले पहिले तिबेटी लेख दक्षिण सैबेरियांत सांपडलेले होते. इ. स. १७२१ त पीटर दि ग्रेट बादशहानें रोम व पॅरिस येथें पाठविलेला क्रोझ, थिओफिलस सीजफ्राइड बेयर, गरहार्ड फ्रेडरिक मुल्लर वगैरेनीं ते तिबेटी म्हणून ओळखले व प्राच्यभाषाकोविद पटिने व मिचेल या फ्रेंच गृहस्थांनीं त्यांचें भाषांतर करण्याचा प्रयत्न केला. लाक्रूझनें तिबेटी वर्णमालेवर एक ल्हानसा लेखहि प्रसिद्ध केला होता.

जेसुइट मिशनऱ्यांनीं स्वदेशांत पाठविलेल्या साधनांचा ऑगस्ट अँटोनियस जॉर्जी यानें इ. स. १७६२ त रोम येथें प्रसिद्ध झालेल्या आपल्या "तिबेटी वर्णमाला" या ग्रंथांत उपयोग केला. यापुढें जॉन बेल, लारेंझो हर्वस अडेलंग वगैरेनीं तिबेटी भाषेचा थोडथोडा परिचय आपआपल्या ग्रंथांच्या द्वारा लोकांनां करून दिला.

तिबेटी भाषेचा गहन अभ्यास करणारा पहिला यूरोपीय म्हणजे अलेक्झांडर क्सोमा दि कोरास नांवाचा हंगेरियन पंडित होय. हा कुमान येथील तिबेटी मठांत बरींच वर्षें राहिला. पहिलें तिबेटी व्याकरण व कोश तयार करण्याचें श्रेय याजला आहे.

**तिबेटी लोक.**—तिबेटी लोकांच्या तीन जाती आहेतः बोदपा, होरपा आणि डोकपा. बोदपा हे उत्तरेकडील चंग्पा लोक होत, होरपा तुर्कजातीचे आहेत; व डोकपा हे तंबूंतून राहणारे गोपाल आहेत, यांनां द्रुप असेंहि नांव आहे. हे नद्या व सरोवरें असणाऱ्या प्रदेशांतून वास करितात. डोकपाखेरीज या तिबेटी लोकांची एक दऱ्याखोऱ्यांतून राहणारी स्थायिक व बैठी जात आहे.

तिबेटी पुरुष साधारण उंचीचे (५ फु. ५–९ इं.) असून, वायका यापेक्षांहि ठेंगण्या असतात. यांचे केंस काळेभोर व कांहींसे कुरुळे असतात. गालांचीं हाडें मंगोल लोकांइतकीं उंच नसलीं तरी साधारण उंच असतात. जबडा रुंद असून ओंठ भरदार नसतात. खांदे मोठे व रुंद, दंड गोल, पण पाय मात्र बारीक असतात. बायका बहुधा पुरुषांपेक्षां सुदृढ असतात. त्यांचे केंस पुष्कळ असल्यामुळें डोकें पांटीएवढें दिसतें; गालांवर काळ्या रंगाचें रोगण चढविलेलें असतें त्यामुळें त्यांच्या चेहेऱ्यावरील कातडीचें हवेपासून रक्षण होतें व वरील रोगण धुवून टाकलें म्हणजे खालील तजेलेदार कातडी दिसूं लागते. तिबेटी लोक साधारण पिंगट वर्णाचे असतात. हे कपड्याशिवाय राहिले तरी त्यापासून त्यांनां कांहीं बाधा होत नाहीं. यांचीं वस्त्रें केंसाळ असतात. हे याक-तंबूंतून* किंवा विशेषतः दक्षिणेकडे धाब्याच्या घरांतून राहतात. यांचें खाणेंपिणें वेताबाताचेंच असतें. हे लोक फार मोकळ्या मनाचे असतात.

या लोकांत 'ग्युद' म्हणजे गोत्रें असतात. यांच्यांत सपिंडकुलपद्धत असून एकाकरितां सर्व कुलाला शिक्षा भोगावी लागते. यांच्यांत एकत्र कुटुंबपद्धति आहे. वडील मुलाकडे बापाची मालमत्ता जाते व इतर मुलांनां त्याच्या आज्ञेत राहून तो देईल तितकी पोटगी स्वीकारावी लागते. या लोकांच्या चालींपैकीं सर्वांत विलक्षण चाल म्हणजे अनेकभर्तृकता. सर्व भावांत मिळून एक बायको असते. ल्हान भावांनां लग्नें करतां येत नाहींत. वडील भावानेंच फक्त त्याला वाटेल तितक्या बायका कराव्या. तथापि धनगर जातींतून एकपत्नीकत्व आढळून येतें. यांच्यांत असगोत्र विवाहाची पद्धत आहे. घटस्फोटाची चाल नाहीं तरी बायको टाकतां येते. संतति नसलेल्या विधवेला दिराजवळ बायको या नात्यानें राहतां येतें किंवा नवऱ्याच्या मृत्यूपूर्वी तसें जाहीर केल्यास तिला स्वतंत्रताहि मिळूं शकते. नियोगपद्धति यांच्यांत आढळते. अविवाहित स्त्रिया दारूचीं किंवा इतर दुकानें घालतात, कांहीं भिक्षुणी होतात व कांहीं वेश्येचा धंदा करितात.

सुईघराण्याच्या बखरींतून पूर्व तिबेटामधल्या तुकुहन लोकांविषयीं खालील वर्णन आहे:—

यांच्या बायका केंसांची वेणी घालून त्यांवर शिंपा, मणी किंवा कवड्या बांधतात. बाप वारल्यानंतर मुलगा त्याच्या बायकोशीं—आपल्या आईशीं—लग्न लावतो; भाऊ आपल्या भावजईशीं लग्न करितो. उत्तरक्रिया होईपावेतों यांच्यांत सुतक धरितात. घोडे चोरण्याबद्दल देहांत शिक्षा असते. या लोकांच्या चालीरीती तुर्कांप्रमाणें आहेत.

यांपैकीं वानरांप्रमाणें इतस्ततः भटकणारी तंगसिआंग नांवाची एक जात आहे. ते केंसांच्या याक तंबूंत राहतात. हे लोक घोड्यावर बसून जातात व तरवारीचा उपयोग करितात. पण त्यांत पद्धतशीरपणा आढळत नाहीं. मुलानें मृत बापाच्या किंवा चुलत्याच्या बायकोशीं, धाकट्या भावानें वडील भावजयीशीं, लग्न लावलेलें चालतें; पण एकच आडनांव असलेल्या बाईशीं लग्न लावतां येत नाहीं.

तुकुओ हें स्त्रीराज्य असून तें सिंगलिंग पर्वतांच्या दक्षिणेस आहे. तेथें सु पी घराण्यांतील राणी राज्य करते. तिच्या पतीला चित्सु असें म्हणतात पण राज्यकारभाराशीं त्याचा संबंध येत नाहीं. लढाईला मात्र पुरुष जातात, बाकी त्यांनां कोठें मान नाहीं. या राज्यांत १०००० कुटुंबें आहेत. राणी नऊ मजल्याच्या वाड्यांत राहते; तिच्या तैनातीस हजारों स्त्रिया असतात. हिच्या खेरीज दुसरी एक छोटी राणीहि असते. दर पांचव्या दिवशीं मुख्य राजकार्यसभा भरते. या राज्यांत ठराविक कर नाहींत. जेव्हां राणी मृत्यु पावते तेव्हां तिच्याच कुळांतील दोन बायका, एक राणी व दुसरी छोटी राणी, अशा निवडतात.

श्रीमान् मनुष्य मृत्यु पावल्यास, त्याचें कातडें सोलून, आंतील भाग सोन्याबरोबर एका भांड्यांत भरतात व तें पुरतात. नंतर एक वर्षानें तें कातडेंहि पुरतात.

हे लोक देव व असुर यांची प्रार्थना करितात. पाडव्याच्या दिवशीं मनुष्य किंवा माकडें यांचा यज्ञ करितात. पक्षांवरून शुभाशुभ पाहतात. पूर्वेकडे, चिआंगच्या भागांत, सुफा ला ना चुचुलो म्हणून एक स्त्रीराज्य आहे. यांत ८० शहरें असून ४०,००० कुटुंबें व १०,००० सैन्य आहे. येथील राणी

* याक नांवाच्या रानटी तिबेटी बैलाच्या कातड्याचा तंबू करितात त्याला याक तंबू म्हणतात.

कंग्येन खोऱ्यांत रहाते. हिला पिन् चिन् व अधिकाऱ्यांनां कौपली अशीं नांवें आहेत. पुरुष स्त्रियांचे प्रतिनिधी या नात्यानें अधिकारावर असतात. राणीच्या तैनातीस बऱ्याच स्त्रिया असतात. दर पांचव्या दिवशीं राणीचा दरबार भरतो.

मुलगा आईच्या कुळाचें नांव धारण करितो. या प्रदेशांत सोनें सांपडतें. लग्नें खरेदीविक्रीच्या पद्धतीनें होत असतात. सुतक तीन दिवस धरतात.

**समाजव्यवस्था.**—तिबेटांतील सरदार घराणीं वंशपरंपरेनें चालत आलेलीं आहेत. परंतु भिक्षूंचा व पुरोहितांचा दर्जा सरदारांहून श्रेष्ठ आहे. सर्व धंदे वंशपरंपरेनें चालत आलेले आहेत व राज्यकारभारांतील अधिकारहि ठराविक घराण्यांतच परंपरेनें चालतात. कारागीर, हेलकरी, प्रेतवाहक, चर्मकार इत्यादि धंद्यांतील लोकांस अस्पृश्य समजतात. एखाद्याचा वांशिक धंदा अगर अधिकार हातचा गेल्यास तो हलका धंदा करण्यापेक्षां भिक्षावृत्ति पतकरितो. भिक्षु होणें अगर अन्य पारमार्थिक कामें करणें यांस अधिक महत्त्व देतात.

सरकारी अंमलदारांस वेतनाबद्दल जमीन तोडून दिलेली असते, या जमिनीवरील कुळांपासून त्यांस कर वसूल करण्याचा, त्यांचे न्याय निवडण्याचा, वेठबिगार वगैरे घेण्याचा इत्यादि हक्क असतात. या कुळांत शेती करणारे, मेंढ्या पाळणारे, सुतार वगैरे कारागीर, कारकून, किरकोळ कामें करणारीं गडी माणसें इत्यादि सर्व प्रकारचे लोक असतात. यांस 'मिसेर' अथवा 'योग' असें म्हणतात. या कुळांस त्यांच्या धंद्यापासून होणाऱ्या फायद्याचा अंश वेतन म्हणून देण्यांत येतो.

राजा हा एक मोठा सरदार समजला जातो व त्याला सर्व प्रदेशावर कांहीं विशिष्ट प्रकारचे हक्क आहेत.

जीं स्वतंत्र खातेदार कुळें आहेत त्यांस आपली जमीन विकण्याचा वगैरे हक्क आहेत. त्यांनां कांहीं कर भरावे लागतात, सैन्यांत नोकरी करावी लागते व विगार वगैरे कांहीं कामें करावीं लागतात.

लडख येथील राजा बौद्ध असून त्याचा बाल्तिस्तान येथील मुसुलमान राजघराण्याशीं शरीरसंबंध होतो पण सामान्य लोकांस मात्र अशा प्रकारचा संबंध करितां येत नाहीं.

नोमॅडो नांवाचे एक रानटी लोक आहेत त्यांच्यामध्यें राजा, त्यानंतर सरदार, त्यांचेमागून जातींचे मुख्य व शेवटीं टोळ्यांचे नायक अशी अधिकारपरंपरा आहे.

एकंदरींत तिबेटांत मुख्य दोन वर्ग आहेत त्यांपैकीं एकाची पदवी उच्च असून तो सामर्थ्यवान आहे आणि दुसरा निर्बल असून त्याची पदवी अगदीं कनिष्ठ आहे.

**आर्थिक स्थिति.**—कुटुंबांतील धाकटे भाऊ व इतर असंतुष्ट लोक हे सरदारांच्या आश्रयास जाऊन त्यांची नोकरी करितात अथवा भिक्षू होतात. सरदार लोक व मठवासी भिक्षू यांनां जमिनीवरील हक्क फार असल्यामुळें व ते अगोदरच श्रीमन्त असल्यामुळें अधिकाधिक संपत्ति जमवितात परंतु कुळांच्या वांट्यास उत्पन्नाचा फारच थोडा अंश येत असल्यामुळें तीं जमिनीच्या मशागतीकडे बिलकुल लक्ष देत नाहींत. बरीचशी जमीन लागवडीशिवाय पडलेली आहे व कांहीं केवळ खडकाळ व बर्फाच्छादित आहे.

**परमार्थसंप्रदाय.**—तिबेटांतील बौद्धसंप्रदाय भारतीय बौद्धसंप्रदायाच्या महायानशाखेप्रमाणेंच जवळ जवळ आहे. त्यांचा मुख्य देव संग्ये हा आहे. इतर पुष्कळ लहान लहान देव भारतीय पुराणांवरून घेतलेले आहेत. आध्यात्मिक विचारपरंपरेमध्यें त्यांनीं भारतीयांचें बरेंच अनुकरण केलेलें दिसतें. कांहीं किरकोळ बाबतींत काय तो फरक आढळतो बाकी कर्मवाद, पुनर्जन्म, भोग्यवस्तूंचा त्याग, अद्वैत इत्यादि बाबतींत त्यांचें भारतीयांशीं ऐकमत्य आहे.

देवांच्या मूर्ती, मंत्रतंत्र, अगडबंब विधि या लोकांतहि आहेत. कांहीं ख्रिस्ती पाद्र्यांस कांहीं विधी ख्रिस्ती भक्तिमार्गांतले असावेत व ते मध्ययुगांतील चीन व मंगोलियामध्यें राहणाऱ्या नेस्टोरियन ख्रिस्ती मिशनऱ्यांमार्फत आले असावेत असा तर्क करण्याची स्फूर्ति झाली होती पण ख्रिस्ती धर्मांतून घेतलेल्या म्हणून समजल्या जाणाऱ्या पुष्कळ गोष्टी, भरतखंडांतील पारमार्थिक संप्रदायांतून घेतल्या आहेत असें पुढें त्यांसच आढळून आलें.

तिबेटी लोक हजारों देवळें बांधतात, व मूर्ती स्थापन करितात. ते प्रार्थनामंत्र गातात, पुटपुटतात व पाण्याच्या शक्तीनें किंवा हातानें मंत्र लिहिलेलीं चक्रें फिरवितात. आपल्याकडे जशी जपमाळ असते तशीं त्यांच्याकडे चक्रें असतात. ते अक्षमाला जपतात, पवित्र संस्कार करितात, देवदैत्यांप्रीत्यर्थ जेवणें घालतात, गंडेनाडे बांधतात, ताईत बनवितात, शुभ चिन्हें काढलेल्या पताका उभारतात, दगडावर अक्षरें लिहून त्यांचे ढीग रचतात. पर्वत, सरोवरें, देवळें, दगडांचे ढीग वगैरे वस्तू ते पवित्र मानतात व असल्या वस्तूंनां ते प्रदक्षिणा घालतात; मिरवणुकी काढतात, यात्रेला जातात; लामांनीं पवित्र अवशेषांपासून तयार केलेल्या गोळ्या पापविनाशार्थ भक्षण करितात; माणसाचें मांस वगैरे दाहा अपवित्र गोष्टींपासून तयार केलेलें दुदचि नांवाचें दिव्य पाणी पितात; भूतापसारण, चेटूक, जादूटोणा या गोष्टी 'पारमार्थिक' कल्याणाकरितां आचरतात; गूढ संप्रदाय पाळतात व सैतानाला हांकून लावण्यासाठीं वेड लागल्याप्रमाणें नाचतात.

मृताच्या आत्म्याला त्याची परलोकीं जाण्याची वाट लामा दाखवितात. नोमाड लोक एखाद्यानें मरणापूर्वी त्याला विचारलेल्या प्रश्नास मरणोत्तर परत येण्याची आपली इच्छा आहे असें उत्तर दिल्यास त्याला श्वास कोंडून मारतात. मेल्यावर त्याच्या प्रीत्यर्थ एक जेवण घालतात, नंतर त्याची एक लांकडी प्रतिमा करून ४९ दिवस त्या प्रतिमेला जेऊं घालतात. (ही चाल ७ व्या शतकांतली आहे) पुढें ती प्रतिमा जाळून तिची राख मातींत मिसळून त्या मातीच्या शंकाकार आकृती तयार करितात व त्या देव्हाऱ्यांत ठेवतात. एक वर्षानंतर मृताच्या स्मरणार्थ उत्सव करितात; व पुढें दरवर्षी त्याच्या नांवानें तर्पण करितात. तिबेटी लोक पूर्वजांनां देवांच्या नांवांनीं संबोधितात.

स्पमो हीं प्राचीन राजपत्न्यांचीं भुतें होत. दद हीं फार भयंकर पिशाचें असून बौद्ध संप्रदायाला उपद्रव करणाऱ्या प्राचीन लोकांचीं तीं पिशाचें आहेत अशी त्यांची कल्पना आहे. पण

बौद्धसंप्रदायापूर्वींच्या संप्रदायांतील या देवता आहेत, कारण पशुयज्ञ निषिद्ध मानला आहे तरी यांनां डुकरांचे बळी देण्यांत येतात.

कुलदेवतांनां घरांतून प्रमुख स्थान देण्यांत येतें. रोज सकाळीं त्यांनां दूध, दारू व पाणी देतात. त्यांच्या पुढें दिवे लावतात. जुरू ( ज्युनिपर ) या पवित्र झाडाची फांदी ( समिध ) अग्नींत टाकून तो प्रदीप्त करितात. रात्रीं पुन्हां एकदां एक फांदी पेटवून, सबंध घरभर फिरवितात; उद्देश असा कीं, भुतेंखेतें वगैरे नाहींशीं व्हावीत.

पार्थिव देवता पृथ्वीमातेच्या खालील दर्जाच्या, व स्वर्गीय देवता नम्ल्हकपोंच्या खालच्या असें मानण्यांत येतें.

ज्यांचीं कुलदैवतें एकच आहेत अशीं माणसें एकमेकांकडे प्रेतसंस्कारास जातात. अशा संघास 'पासोन' म्हणतात. स्नेहाची शपथ परस्पर रक्तपान करून घेण्यांत येते. निसर्गाच्या प्रत्येक घटनेच्या मुळाशीं कोणीतरी देवता आहे असें मानतात. उदाहरणार्थ, नदीच्या मुळाशीं 'नरनाग' रक्षक म्हणून असतात असें मानतात. यांचें फलज्योतिष भारतीय अथवा चिनी ज्योतिषावरून घेतलें आहे.

इ. स. १८९३ च्या डिसेंबरांत रॉकहिल यास तिबेटमध्यें आपल्या इकडे ज्याप्रमाणें दिवाळींत दिवे लावून आरास करितात त्याप्रमाणें दिवे लावून एक सण साजरा केलेला आढळला.

वर्षाच्या शेवटच्या दिवशीं, लामा हाडांचा सांगाडा किंवा विद्रूप राक्षस यांसारखे पोषाख करून रक्तव्याघ्राचा नाच करितात. तेव्हां ते एका मनुष्याकृति पुतळ्यास धर्म व मानवजात यांचा शत्रू कल्पून मारून खाऊन टाकण्याचा औपचारिक विधि करितात.

सर्वच लामा पंचाक्षरी असतात; त्यांच्यांत मुख्य म्हणजे नचुंगचा प्रमुख पंचाक्षरी. आपले पूर्वज मंगोलियांतून आले असून, प्राचीन पॉन्बो धर्मांच्या श्रेष्ठ पुरोहितांचे ते वंशज आहेत असें यांचें म्हणणें आहे. ते भविष्यकथन, मंत्रतंत्र, जादूटोणे वगैरे करितात व रोग्यांनां औषधेंहि देतात. या कामीं ते चुचेल नांवाच्या गारगोटीसारख्या दगडाचा उपयोग करितात.

**पॉन्बो.**—पॉन्बो अथवा बोनबो हे सर्व तिबेटभर, विशेषतः पूर्व तिबेटांत राहतात. यांनां पाखण्डी बौद्ध मानण्यांत येतें. हे आपल्या धर्मसंस्थापकाला बुद्धावतार मानतात व दलाइ लामाला दांभिक समजतात. यांच्या लामांवर त्यानें ब्रह्मचारी रहावें अशी सक्ती नाहीं. ते लांब केंस वाढवितात; पण चटकन् ओळखूं येण्यासारख्या यांच्या कांहीं विशिष्ट चालीरीती नाहींत. हे आपआपल्या मठांत राहतात व तुर्की शामन आचार्यांप्रमाणें दिसतात. अभिचार करतांना, एक उंच टोंक असलेली, मोराचीं किंवा कोंबड्यांचीं पिसें लावलेली काळी टोपी घालतात व जवळ साहित्य म्हणून एक मृताची कवटी, एकावर एक तिरपी ठेवलेलीं दोन हाडें व दोन मानवी कवट्यांचा केलेला एक डमरू ठेवतात. हे प्राण्यांनां, विशेषतः कोंबड्यांनां, बळी देतात. एका लहान पुतळीला टांचणी टोंचून मंत्राचा प्रयोग करण्यांत येतो. कोणी आसन्नमरण स्थितींत असल्यास त्याची प्रतिमा करून, मृत्यूला फसविण्यासाठीं म्हणून ती दूर फेंकण्यांत येते. मृत्यु त्या प्रतिमेस घेऊन जातो व मनुष्य बरा होतो अशी त्यांची समजूत आहे.

यांच्यांतील प्रमुख देवता म्हणजे, स्वर्गांतील श्वेतदेव, भूलोकची कृष्णदेवी, रक्तव्याघ्र आणि सपक्ष नाग. यांचें पवित्र चिन्ह म्हणजे उलटें स्वस्तिक व त्याचप्रमाणें सूर्य व अरणि यांच्या आकृती. यांच्या सांप्रदायिक चालीरीती बौद्धलोकांपेक्षां निराळ्या नाहींत. हे शांतिपाठ म्हणतात, प्रार्थना-चक्रें फिरवितात, दगडांचे ढीग रचतात, पवित्र पताका टांगतात व देवळें, समाधि, दगडांचे ढीग, पर्वत, सरोवरें यांनां प्रदक्षिणा घालतात. तिबेटांतील बौद्धलोकांत अत्यंत सामर्थ्यवान् म्हणून समजला जाणारा मंत्र म्हणजे 'ॐ मणिपद्मे हुम्' व पॉन्बोंचा अशाच तऱ्हेचा मंत्र 'ॐ मते मुयसलेदो' हा होय. हे आपलीं धर्मचक्रें उलटीं म्हणजे उजवीकडून डावीकडे आंतून फिरविण्याच्या ऐवजीं डावीकडून उजवीकडे बाहेरून फिरवितात. या पॉन्बोंचें सारें बौद्धांच्या उलट असतें. हे प्रदक्षिणाहि उलटी घालतात.

**लामा.**—तिबेटांत धार्मिक बाबतींत एक श्रेष्ठ अधिकारी असतो. लोकांच्या जीवितावर सुद्धां त्याची सत्ता चालते. प्रत्येक जिल्ह्यावर एक अधिकारी असतो व प्रत्येक मठावर हा अधिकारी, वरील श्रेष्ठ अधिकाऱ्याच्या संमतीनें एक कँपो ( मठाधिपति ) नेमतो. पारलौकिक खात्याकडे कँपोच्या हाताखालीं लॉबपॉन ( शिक्षकविषयक अधिकारी ), वंड्झड ( धर्माध्यक्ष ) व चोत्रिम्पा ( व्यवस्थापक ) असे तीन नोकर असतात. या तिघांची निवडणूक देवाच्या मूर्तीपुढें तीन लामांकडून होते. मठाच्या मालमत्तेची व्यवस्था शॅडो ( खजिनदार ), त्याच्यानंतर वंड्झड व त्याच्या हाताखालीं नेर्पा ( दुय्यम खजिनदार ) व नंतर नर्चांग यांकडे असते. नर्चांगकडे बाहेरच्या गोष्टी सोंपविल्या असतात.

मठवाशांचे वर्ग खालील प्रमाणें असतातः (१) गेलांग, यांनीं सबंध आयुष्य येथें वाहिलेलें असतें; (२) गेत्सुल, यांनीं बारावर्षें निरनिराळ्या दर्जाचें काम केलेलें असतें, (३) दप हे नवशिके असतात, (४) उमेदवार. तिबेटांत ३००० मठ असून ते चांगले बळकट व समृद्ध स्थितींत आहेत. मठवासी चांगले गलेलठ्ठ असून हुषारहि असतात. मठांत चांगले चांगले लोक तेवढे घेतात. प्रसंग पडल्यास हे लढाईवर देखील जातात. मठांच्या भोंवतालची जमीन यांच्या मालकीची असून शेतकऱ्यांकडे ती मेहनतीबद्दल उत्पन्नाचा कांहीं हिस्सा कबूल करून लागवडीस देतात. या शेतांवरील लोक गवंडीकाम, सुतारकाम, लोहारकाम, वगैरे सर्व कारागिरीचीं कामें करितात. ल्हासा सरकारला कांहीं सारा द्यावा लागतो. मठांतून सोनें चांदी, मौल्यवान् जिनसा, नजराणे वगैरे संपत्ति सांठविली असते. शिवाय मरतांना लोक मठांना कांहीं देणग्या देतात त्या निराळ्याच. प्रत्येक लामा मठाला कांहींतरी देतोच. लामाचे उद्योग अनेक असतात. तो ग्रामपुरोहित, चित्रकार, ज्योतिषी, मांत्रिक, वैद्य, औषधविक्या, व्यापारी, शिल्पकार, मुद्रक, लेखक, वाचक वगैरे असतो.

मठवाशांनां लोकांकडून घरदार, धान्य, चहा, कपडालत्ता वगैरे मिळतो. वरिष्ठ लामांचा सर्व खर्च मठाकडून चालतो.

लामा ३० टक्के व्याजानें लोकांनां पैसे उसने देतात. कधीं-कधीं यापेक्षांहि जास्त व्याज लावतात. याप्रमाणें व्याज डाढून डाढून रकम फुगली म्हणजे त्यांच्या जमिनी विकतात. कोणी लामाची चोरी केल्यास त्यास एरवींच्या दसपट शिक्षा सांगितली आहे.

दलाइ लामा हा ऐहिक गोष्टींत वरिष्ठ असतो, धार्मिक बाबींत नसतो. १५ व्या शतकांत सांगकपानें दलाइ लामाची स्थापना केली. हा पहिला दलाइ लामा गेलुगपंथाचा असून कोकोनार जिल्ह्यांतील एक मठवासी होता. दलाइ लामाच्या हातीं सर्व राजकीय सत्ता असतें व त्याला ग्यालपो रिंपोशे (वैभवशाली राजा) अशी पदवी असते.

अतीश या हिंदु साधूनें १३०८ सालीं तिबेटांत कादम पंथ स्थापला, त्यांत सांगकपानें सुधारणा करून गेलुग (पीत शिरस्त्राण) पंथ स्थापला. या पंथांतील मठवासी जर दारू प्याला किंवा त्यानें कोणत्याहि स्त्रीशीं संबंध ठेवला तर त्याला हांकून देण्यांत येतें. तिबेटांतील बौद्धधर्मात सुधारणा करणारा मोठा पुरुष एकच व तो अतीश हा होय. त्याच्या नंतर सुधारणा करणारे त्याचे शिष्य होते व अतीशनें काढलेल्या पंथाच्या जोडीचे दुसरे जे प्राचीन सुधारलेले पंथ दिसतात ते त्याच्या शिष्यांचे होत. अशा पंथांपैकीं कर्ग्यु व सस्क्य हे पंथ प्रमुख आहेत.

गेलुग पंथाच्या खालोखाल महत्त्वाचा हा कर्ग्यु पंथ आहे. हा अकराव्या शतकाच्या उत्तरार्धांत स्थापन झाला. याचें विशिष्ट लक्षण म्हणजे यति-धर्म. हे यतिधर्म लोकांनां नावडते होऊन या पंथापासून अनेक पोटपंथ निघाले. यांपैकीं कर्मपा व डुग्पा हे होत. डुग्पापंथ भूतानमध्यें फार प्रचलित आहे.

तिसरा मोठा सुधारलेला पंथ सस्क्य किंवा सक्य हा होय. मंगोल बादशहा कुब्लइखान याच्या कारकीर्दीपासून या पंथाची सत्ता वाढली. सस्क्य मठाच्या पुरोहितानें या बादशहाला बौद्धधर्माची दीक्षा दिली होती म्हणून बादशहानें त्याला तिबेटांतील बौद्धधर्माचें आधिपत्य दिलें. सस्क्य पंथाचें वर्चस्व बरेच दिवस-अनेक पिढ्या-होतें. या काळांत यानें इतर पंथांवर बराच जुलूम केला. मिंग घराणें अस्तित्वांत आल्यापासून याला उतरती कळा लागली. या पंथांतील मठ-वाशांवर ब्रह्मचर्याची सक्ती नाहीं.

नाइंगमा हा जुना व मागसलेला पंथ होय. चांगले हुषार व श्रेष्ठ सदस्य दुसऱ्या पंथांत गेल्यावर राहिलेला दुर्बळ अवशेष तो हा पंथ होय. तिबेटांत बौद्धधर्म येण्यापूर्वी तेथें जो बॉन पंथ होता त्यांतील बरेचसे संस्कार व देवता या नाइंगमांत आहेत. या पंथांत ब्रह्मचर्य पाळीत नाहींत.

**राज्यव्यवस्था.**—१७५७ सालीं चीनच्या बादशहानें दलाइ लामाचा तिबेटवरील अधिकार मान्य केला. ग्यत्सब लामा हा दुय्यम अधिकारी असून इतर मंत्र्यांच्या मदतीनें राज्यकारभार पाहतो. या राज्यांत १६।१७ विद्यापीठें आहेत. याचे ८० जिल्हे-जांग-असून प्रत्येक जिल्ह्यावर दोन (जांग-पान) अधिकारी असतात. ल्हासा सरकारला याव-याचे कर पैशाच्या रूपांत फारसे नसून मेंढ्या, तट्टें, लोणी, लोंकर, कापड इ. जिनसांच्या रूपांत असतात. नोकरांनां पगार नसून त्यांनां जमिनी दिलेल्या असतात. येथें विगारीची पद्धति सर्वत्र प्रचलित आहे. सैन्यांतील घोडेस्वारांस पगार नसतो, तर त्यांनां कर माफ असतात. हा दर्जा मानाचा समजला जातो. या राज्यांत लहानसें सैन्य ठेवलें आहे. त्यांत ६ ड्यापॉन (वरिष्ठ अधिकारी) व १५६ सामान्य अधिकारी आहेत. राज्यांतील सर्व लोक शिबंदीचे घटक समजले जातात. लष्करी पोषाख घेण्यास समर्थ असून लष्करांत जाण्यास लायक असणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें लष्करी नोकरी केली पाहिजे व स्वतःचा खर्च स्वतःच चालविला पाहिजे असा नियम आहे.

राज्यकारभार धाकदपटशानें चालतो. राजकीय हक्क भिक्षुकांकडेच बहुतेक आहेत; व लोकांची या लामांवर फार भक्ति आहे. ल्हासा येथील राजप्रतिनिधि दिपंग, सेरा, किंवा गल्दन या मठांकडून निवडला जातो. १३ मठांस विशेष हक्क आहेत. ते आपला एक एक प्रतिनिधि सांग-दु किंवा राष्ट्रीय सभेकरितां निवडतात. चिनी बादशहाचा एक मुख्य रेसिडेंट असून त्याच्या शिवाय दुसरे पुष्कळ मोठमोठे चिनी अधिकारी राज्यांत देखरेखीला ठेविलेले असतात. चिनी अधिकाऱ्यांनां आपल्या बायका तिबेटमध्यें आणण्याचा अधिकार नाहीं. हळू हळू लामांची सत्ता कमीकमी होत जाऊन चिनी रेसिडेंटाची सत्ता वाढत चालली आहे.

**हिंदुस्थान व तिबेट.**—हिंदुस्थान व तिबेट यांजमध्यें व्यापारी दळणवळण विशेष आहे. तिबेटांत मोठ्या शहरांतून काश्मिरी व नेपाळी हिंदू लोक दिसतात. मुसुलमानांनीं तिबेटी लोकांनीं पवित्र मानलेल्या पर्वताच्या छायेंत मशीद बांधिली आहे. तिबेटांतील हिंदी रहिवाशांच्या द्वारा इंग्रज सरकार तेथील माहिती मिळवितें. पूरनगीर गोसावी हा गव्हर्नर जनरलचा ल्हासा येथील कायमचा प्रतिनिधि नेमला गेला होता. याची नेमणूक १७९० सालीं झाली होती. १८९३ सालीं तिबेट व हिंदुस्थानसरकार यांच्यामध्यें व्यापारी तह झाला पण त्याचा दळणवळण वाढविण्याच्या कामीं विशेषसा उपयोग झाला नाहीं. तिबेटचा कांहीं भाग नेपाळनें जिंकून घेतला असून तें तिबेटकडून कांहीं खंडणीहि दरसाल घेत असतें.*

---

## प्रकरण ८ वें.

### पश्चिमेकडे भ्रमण.

**जिप्सी.**-पश्चिमेकडे सोकोत्रापर्यंत झालेलें चाच्यांचें भ्रमण आणि कांहीं बौद्ध संप्रदायाचे पश्चिमेकडील अवशेष यांबद्दल मागें सांगितलेंच आहे. आतां प्रत्यक्ष यूरोपाकडे वळलें पाहिजे. भारतीयांचा परदेशांशीं संबंध पहातांना यूरोपांत जिप्सी नांवानें प्रसिद्ध असलेल्या भ्रमण करणाऱ्या जातींस विसरतां कामा नये. जेथें जेथें या जाती संघरूपानें दृष्टीस पडतात तेथें तेथें त्यांचे पोषाख वगैरे पाहून कोणाहि भारतपरिचितास

* The Land of the Lamas—W. W. Rockhill.

भारतीयांची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. जर्मनींत गेलेल्या एका महाराष्ट्रीय तरुणास हा कोणीतरी आपल्यांतला आहे असें समजून त्याच्याशीं जिप्सी भाषेंतच बोलण्याचा एका जिप्सीनें प्रयत्नहि केला होता. या जिप्सींविषयीं आपणांमध्यें फारशी माहिती नाहीं. या विषयावरील वाङ्मय इंग्रजींत फारसें नसून जर्मन भाषेंत आहे असें मित्र* यांच्या एका लेखावरून आणि नामदार रमणभाई नीलकंठ यांनीं पुण्यास भरलेल्या पहिल्या प्राच्य परिषदेंत वाचलेल्या मार्मिक निबंधावरुन व्यक्त होतें. असो.

जिप्सींची माहिती हिंदुलाच्या अवशेषांत न देतां हिंदूंच्या अपसृष्टीच्या इतिहासांत यावयाची. कां कीं, जिप्सी हे हिंदु रक्ताचे असून पुढें परकीय झाले. तथापि प्राचीन बहिर्देश-गमनाबरोबर यांचीहि माहिती दिल्यास ती अधिक मनोरंजक होईल. सुशिक्षित नेत्यांशिवाय जें बहिर्देशगमन होतें त्याचा परिणाम काय होतो हें जिप्सींच्या उदाहरणावरून स्पष्ट होणार आहे. परदेशीं गेलेल्या अर्वाचीन भारतीयांची स्थितीहि आज आहे त्यापेक्षां अधिक शोच्य झाली असती. परंतु पुष्कळशा पौरस्त्य लोकांपेक्षां ब्रिटिश राज्यकर्ते बाहेर गेलेल्या भारतीयांची बरीच काळजी घेतात यामुळें सदरील लोकांची स्थिति कांहींशी बरी आहे. याविषयीं सविस्तर माहिती पुढें येईलच.

जिप्सी हे लोक भारतीय खरे तथापि ते येथून केव्हां गेले, जे गेले ते कोणत्या प्रदेशांतील आणि कोणत्या जातीचे होते, इत्यादि प्रश्न अजून पूर्णपणें सुटावयाचेच आहेत असें आम्हीं समजतों.

हे लोक भारतीय असतां त्यांस जिप्सी हें नांव पडण्याचें कारण एवढेंच कीं, हे इजिप्तमधून आपल्या देशांत आले असावे असा इंग्रज लोकांचा प्रथम समज असे. त्यांच्या भाषा अभ्यासिल्या जाऊन जेव्हां त्यांचें सादृश्य भारतीय भाषांशीं दिसून आलें तेव्हां हे लोक हिंदुस्थानांतून गेले असावे असा समज झाला. आजकालच्या अनेक इंग्रजी कादंबऱ्यांतून अनेक निरनिराळे लोक जिप्सींच्या टोळ्यांत जाऊन सामील झाले, आणि जिप्सींनीं अमुक मुलास चोरून नेलें, त्याचें पुढें अमुक झालें, अशा गोष्टी येतात.

**लोकसंख्या.**—जिप्सी सर्व यूरोपखंडांत आणि पश्चिम आशिया, सैबेरिया, इजिप्त, उत्तर आफ्रिका, अमेरिका व आस्ट्रेलियांतहि आढळतात. यांची नक्की लोकसंख्या कळत नाहीं. यूरोपमधील यांची गणती केलेले आंकडेहि परस्परविरोधी व अविश्वसनीय असे आढळून येतात. यांची यूरोपमध्यें सर्वांत मोठी संख्या हंगेरीमध्यें ट्रान्सलेथोनिया या प्रांतांत आढळते. हा आंकडा जरी बराच जुन्या काळचा (१८९३) आहे तरी तो बहुतेक बरोबर असून विश्वसनीय असावा असें वाटतें. त्या वेळीं यांची संख्या २,७४,९४० असून त्यांपैकीं बहुतेक स्थाईक झाले होते व केवळ ९००० भटकत फिरणारे होते. यानंतर यांची मोठी संख्या रुमानियामध्यें दोनपासून अडीच लाखांपर्यंत आढळते. याखेरीज इतर प्रांतांत यांची संख्या अनुक्रमें, यूरोपांतील टर्की १,१७,००० (१९०३), पैकीं बल्गेरिया ५१,०००, व पूर्व रुमेलिया २२,०००; सर्व्हिया ४१,०००; बोस्निआ आणि हर्जेगोविना १८,०००; ग्रीस १०,०००; ऑस्ट्रिया १६,०००; जर्मनी २,०००; फ्रान्स २,०००; इटली ३२,०००; स्पेन ४०,०००; रशिया ५८,०००; पोलंड १५,०००; स्वीडन आणि नॉर्वे १५००; डेन्मार्क आणि हॉलंड ५०००; इराण १५,०००; ट्रान्सकॉकेशिया ३०००; आशियांतील टर्की अजमासें एक दीड लाख; ग्रेट ब्रिटन सुमारें १२०००; याप्रमाणें आहे. एकंदर जिप्सींची संख्या दहा लाखांच्या आंतच असावी.

**नांवें.**—यूरोपीय जिप्सी लोकांची हकीकत सामान्यतः पुढें दिल्याप्रमाणें आहे. यांनां निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या नांवांनीं ओळखतात, पण मुख्यतः या नांवांच्या दोन शाखा पडतात. पहिल्या शाखेंत बाल्कन द्वीपकल्पांतील बहुतेक लोक येतात व त्यांनां अत्झिंगन, अत्सिंगन, या सामान्य नांवानें ओळखतात. या नांवाचेच अपभ्रंश तुर्कस्थान आणि ग्रीसमध्यें त्शिगन, बल्गेरिया सर्व्हियामध्यें त्सिगन, जर्मनीमध्यें झिगनर, इटलींत झिंगरी असे होतात; व इंग्रजी टिंकर किंवा टिंक्लर हा शब्दहि या शब्दापासूनच निघाला असावा असा कित्येकांचा तर्क आहे. यांच्याच नांवांची दुसरी शाखा इजिप्त या शब्दापासून निघालेली आहे. परंतु जिप्सी लोक या संज्ञा कमीपणाच्या मानतात. इंग्लिश 'जिप्सी', जर्मनींतील १६ व्या शतकांतील कांहीं लेखांत 'इजिप्तेर', स्पॅनिश 'गितानो', अर्वाचीन ग्रीक 'गिफ्टॉस', या त्या संज्ञा होत. फ्रान्समध्यें यांनां बोहेमिअन म्हणतात व यांखेरीज वालाशि, सारासेनी, अगरेनी, न्युबियानी, इत्यादि अनेक नांवें त्यांनां मिळालीं आहेत.

जिप्सी लोक प्रथम यूरोपमध्यें केव्हां गेले याबद्दल अनेकांनीं अनेक मतें प्रतिपादन केलीं आहेत. बटैलार्ड (Bataillard) यानें यांचा संबंध हिरोडोटसनें उल्लेखिलेल्या सिगिन्नाइ (Sigynnoi) यांच्याशीं जोडून सहाव्या शतकापूर्वींच बायझन्टाइन लेखकांनीं उल्लेख केलेले कोमोद्रोमॉइ (Komodromoi) ते हेच असावेत असें म्हटलें आहे. रिएन्झी (Rienzi 1832) व ट्रम्प (Trumpp 1872) यांनीं हिंदुस्थानच्या ईशान्य भागांतील चंगर लोकांशीं यांचा संबंध जोडला आहे तर द गोएजे (de Goeje) यानें फारसी 'चंग' (एक वाद्य) किंवा 'झंग' (काळा) या शब्दांशीं यांचा संबंध जोडण्याचा प्रयत्न केला आहे. मिक्लॉसिक् (Miklosich) यानें यांचा संबंध पूर्वी आशियामायनरमध्यें फ्रिजियांत राहणाऱ्या अथिंगनॉइ (Athinganoi) नांवाच्या एका विशिष्ट पंथाच्या लोकांशीं

* Memoirs of London Anthropological Society Vol. III. (1870).

जोडला आहे. हे लोक फार शुद्ध आचरणाचे नियम पाळीत व इतरांचा स्पर्श होऊं देत नसत म्हणूनच त्यांस अथिंगनॉइ (मला शिवूं नको) हें नांव पडलें. या ग्रंथकारानें वायझंटाइन इतिहासांतून कांहीं उतारे काढून हे लोक जादूगार, सर्पमांत्रिक, भविष्यकथन करणारे असत असें दाखविलें आहे. पण तेवढ्यावरून ते जिप्सीच होते असें खात्रीनें म्हणतां येत नाहीं.

**जिप्सी भाषा.**—त्यांच्या भाषांचा अभ्यास जो आजपर्यंत झाला आहे त्यावरून हे हिंदुस्थानांतून तिकडे गेले हें निश्चित झालें आहे. त्यांच्या भाषांत जे इतर भाषांतले शब्द दृष्टीस पडतात त्यांवरून त्यांचा प्रयाण-मार्ग सहज दृष्टीस पडतो. फारसी, तुर्की, ग्रीक, स्लाव्ह इत्यादि सर्व भाषांतील शब्द त्यांच्यांत आहेत तथापि अरबी भाषांतील शब्द त्यांच्यांत नाहींत ही एक लक्षांत घेण्याजोगी गोष्ट आहे. बायझंटाइन व अर्वाचीन ग्रीक भाषेंतील शब्द जर्मनी व इटली या प्रदेशांत राहणाऱ्या जिप्सींच्या मध्यें देखील सांपडतात, आणि त्यांवरून त्या देशांतील जिप्सींचा पूर्वानुभव व्यक्त होतो.

जिप्सींच्या भाषांच्या अभ्यासास आणि त्यांचें हिंदुस्थानांतील भाषांशीं नातें शोधून हे हिंदुस्थानांतील नक्की कोणत्या प्रदेशांतून आले हें ठरविण्यास अडचणी उत्पन्न होतात त्या या कीं, जिप्सींच्या भाषांत भेसळ आणि विकृति ही एकसारख्या चाललेल्या स्थलांतरामुळें फार झाली आहे. दुसरी गोष्ट ही कीं हिंदुस्थानच्या भाषा बदलत आहेत. यामुळें अनेक कल्पनांस अवकाश झाला आहे. आर्मेनियन जिप्सींची भाषा आणि प्राकृत भाषा यांचा संबंध निकट आहे असें फिंक म्हणतो, तर ग्रियरसन पिशाच्च भाषांशीं तिचें नातें दाखवूं लागतो व रमणभाई हिचें गुजराथी व राजस्थानी या भाषांशीं नातें दाखवितात.

जिप्सींच्या भाषेचे कांहीं नमुने दिल्यास आपला आणि जिप्सींचा संबंध खरोखर होता याविषयीं खात्री पटेल.

| | |
|---|---|
| ए त्रिं मोरेश गिले पेंगे= | तीन माणसें गेलीं. |
| जीवमास्के=जीवन | छावे=मुलें, छावे, श्यावक |
| दिकेल=दिसणें | चिरिक्ले=पक्षी (चिडिया=चिमण्या) |
| पोरो=वृद्ध (पुरातन) | पोरोदारे=पुरातनतर |
| कोन=कोण | सी=असे |
| कोनसी=कोण आहे. | मनू=मज |
| मे=मी | तु=तूं |
| आमेन=आम्ही | तुमेन=तुम्ही |
| तुत्=तुज | ओइ=ती |
| ओव्=तो | ववेर=(सं) अवर, अपर |
| ओल्=ते (अनेकवचन) | सो=काय, शूं (गुजराथी) |
| साव=सर्व | तेरो=तुझी, तेरी (हिंदी) |

ओव, ओई आणि ओल हीं सर्वनामें येणेंप्रमाणें चालतात.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | ओव | ओइ | ओल् |
| द्वि. | लेस | ला | लेन |
| तृ. | लेस | लास | लेण्डज |
| च.(१) | लेस्ते | लाते | लेन्दे |
| (२) | लेस्के | लाके | लेंघे |
| पं. | लेस्तर | लातर | लेन्दर |
| ष. | लेस्केरो | लाकेरो | लेंगेरो |

सर्व देशांतील जिप्सींची भाषा एकच आहे तथापि तींत कांहीं पोटभाषा दिसून येतात. या सर्वांचा हिंदुस्थानी भाषांशीं संबंध आहे.

| संस्कृत | जिप्सी | | | | हिंदी | पाली |
|---|---|---|---|---|---|---|
| | इराण | इजिप्त | नार्वे | इंग्लंड | | |
| पानीय | पानी | पानी | पानी | पानी | पानी | |
| अग्नि | अइक | आग | जाग | योग | आग | |
| केश | वाल | वाल | वाल | वाल | वाल | |
| अक्षिन् | अकि | अंखि | जाक | योक | आंख | |
| हस्त | वस्त् | | | | | हत्थ |
| काष्ठ | कप्त् | | | | | कत्थ |
| ओष्ठ | वुप्त् | | | | | ओत्थ |
| त्रास | त्रष् | | | | | तस |
| त्रि, त्रीणि | त्रिन् | | | | | ति, तिनि |

वरील शब्द नेहमींच्या प्रचारांतीलच होत; तथापि संस्कृतमध्यें असून अर्वाचीन भाषेंत नसलेलेहि शब्द सध्यांच्या जिप्सींत नाहींत असें नाहीं. असले शब्द जिप्सींच्या गमनकालाचे सूचक आहेत. उदाहरणार्थ "कम्" हा शब्द घ्या. हा सध्यांच्या भाषांतून गेलेलाच आहे; तथापि 'कमेसहि'='तूं प्रेम करीत होतास', असें वाक्य या भाषेंत सांपडतें. 'जीव्' हा शब्द केवळ 'राहणें' या अर्थी संस्कृतमध्यें आहे. पण त्याचा तसा उपयोग अर्वाचीन प्राकृत भाषांत दिसत नाहीं. जिप्सींत तसा उपयोग आहे. 'जिवेनेस' याचा 'तूं जिवंत होतास' असा अर्थ असून 'तूं राहत होतास' असाहि अर्थ आहे.

जिप्सींच्या भाषेंत द्विवचन व नपुंसकलिंग हीं आढळत नाहींत. एकावयवी नामांखेरीज बहुतेक पुल्लिंगी नामें ओकारान्त असतात व स्त्रीलिंगी नामें इकारान्त असतात. उदाहरणार्थ-रक्लो (मुलगा); रक्लि (मुलगी). व्यंजनान्त पुल्लिंगी नामांचीं स्त्रीलिंगी रूपें 'नि' हा प्रत्यय लागून होतात. उदाहरणार्थ-रोम् (नवरा), रोम्नि (बायको). निर्जीव वस्तूंनांहि पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी समजण्याचा प्रघात आहे. उदाहरणार्थ-गाव (गांव), गाद (अंगरखा) हे पुल्लिंगी आणि नोक (नाक), बोक (भूक) हे शब्द स्त्रीलिंगी समजतात. रोम् व रक्लि हे शब्द पुढें दिल्याप्रमाणें चालवितातः—

| रोम्. पु. | | | रक्लि: स्त्री. | |
|---|---|---|---|---|
| | एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
| प्र. | रोम् | रोमा | रक्लि | रक्लिआ |
| द्वि. | रोमेस् | रोमेन् | रक्लिआ | रक्लिअन् |
| तृ. | रोमेसा | रोमेन्दजा | रक्लिआसा | रक्लिएन्दजा |
| च.(१) | रोमेस्ते | रोमेन्दे | रक्लिआते | रक्लिएन्दे |
| च.(२) | रोमेस्के | रोमेन्घे | रक्लिआके | रक्लिएन्घे |
| पं. | रोमेस्तर् | रोमेन्दर् | रक्लिआतर् | रक्लिएन्दर् |
| ष. | रोमेस्केरो | रोमेन्गेरो | रक्लिआकेरो | रक्लिएन्गेरो |
| सं. | रोमा | रोमाले | रक्लिए | रक्लाले |

षष्ठ्यन्त नामांचा उपयोग बहुतेक विशेषणांप्रमाणें होतो, म्हणजे त्यांचें पुढील नामाप्रमाणें लिंग वदलतें. उदाहरणार्थ, ए देर्विसेस्केरि रक्लि (एक दरवेशाची मुलगी). सोनेकइएस्केरो मोच्तो ( सोन्याचा पेटारा ) इ. द्वितीया विभक्तीच्या रूपास 'ते' किंवा 'के' (ला) हे प्रत्यय लाविले असतां चतुर्थीचीं, 'सर' ( नें, वरोवर, सह ) हा प्रत्यय लाविला असतां तृतीयेचीं व 'तर' प्रत्यय लाविला असतां पंचमीचीं रूपें वनतात. उ०, कातर=कोठून.

ओकारान्तनामांचें अनेकवचन एकारान्त होतें; जसें:— चावो–चावे ( मुलें ), चिरिक्लो–चिरिक्ले ( पक्षी ). इतर नामांचें 'आ' किंवा 'इआ' कारान्त होतें; जसें, तेम्–तेमा ( जमीन ), चइ–चइआ ( मुली ), पेन्–पेन्या (वहिणी). विशेषणें वहुतेक ओकारान्त असून अनेकवचन एकारान्त होतें व स्त्रीलिंग इकारान्त होतें.

**वर्तमान काळाचे प्रत्यय.**—हे प्रत्यय क्रियापद स्वरान्त असून ऐकावयवी असल्यास तसेच जोडावयाचे. तसें नसल्यास मध्यें एक स्वर घालून जोडावयाचे.

| एकवचन | अनेकवचन |
|---|---|
| व | स |
| स | न |
| ल | न |

उदाहरण, लाव=मी घेतों; केर्–आ–व=मी करतों

| टर्किश | वेल्श मराठी | मराठी | वेल्श | टर्किश |
|---|---|---|---|---|
| इसोम् | शोम्=मी आहें | आम्ही आहों= | शाम् | इसाम् |
| इसान् | शन्=तूं आहेस | तुम्ही आहां= | शेन् | इसान् |
| इसी | से=तो आहे; | ते आहेत.= | से | इसी |

शोमस्=मी होतों

शेनेस्=तूं होतास; तुम्ही होता

सेस्=तो होता; ते होते

आतां त्यांची शब्दमालिकाच घेऊं, ही जर्मन जिप्सींची आहे.

### नामें

| जिप्सी | हिंदी,* मराठी |
|---|---|
| त्सीरो | (वेळ) [उशीर] |
| वेर्श | वर्ष |
| मनेत, श्चांद | महिना, चांद |
| दिवेस | दिवस |
| रत्चि, रातगिन्, रात | रात्रि |
| फेइझरिले | फजर (सकाळ) |
| कुर्को | (आदितवार) |
| दोगा | (वस्तु) |
| ऐक, ओत्तेर | एक, तुकडा |
| देवे, देवेल, देवोल, देवला, देऊ | देव |
| श्वेतो | (आकाश) |
| शं, कं, ओकं | (सूर्य) |
| शान श्वेमुत, म्रश्च | (चंद्र) |
| प्रबल | (हवा) |
| याक्, याग, यागो | आग |
| पानी, पानियो | पानी, पाणी |
| पु, भू, पुबे, ए पे वु | भू, (जमीन) |
| ब्रिशिंत, ब्रेशिंदो | वृष्टि |
| वरो पानी | वडा पानी, मोठें पाणी (समुद्र) |
| सेरो | सरस्, सरोवर ( सं० सरस् ) |
| कुनारा | किनारी, किनारा |
| तल्लो | तलाव |
| यंगार, अंगार | अंगार |
| मोमली | मोमवत्ती, मेणवत्ती |
| बालू | बालू, वाळू |
| सोनाई, सोनेकी | सुन्ना, सोनें |
| रुप | रुपा, रुपें |
| रेझ | रेसिम, |
| पिपिनोरी | बानेर, ( वानर ) |
| ग्रा | घोरा, घोडा |
| बकेरा, बक्रा, बक्रो | बकरा, ( मेंढा ) |
| त्साप | साप, सरप |
| अउक,याओक,या का | अक्षिन्(आंख=डोळा) |

* हिंदी शब्द विशेष परिचित नाहीं तेथें मराठी अर्थ () या कंसांत घातला आहे. समानार्थ परंतु सदृश नव्हत असे शब्दहि () या कंसांत घातले आहेत; व जवळच्या अर्थाचे सदृश परंतु अगदीं समानार्थ नव्हत असे शब्द [ ] या कंसांत घातले आहेत.

| जिप्सी | हिंदी, मराठी |
|---|---|
| कान | कान |
| नाक | नाक |
| मुईं, मोईं. | मूं, मुख |
| दांत | दांत. |
| छिब | जिव, ( जीभ ) |
| पिरो | पद, पांव, पाय |
| छंगा | (गुडघा), [ जंघा, उत्संग ] |
| नइ | नख |
| सुनिओ | सुनना, श्रवण |
| सुंग | सूंघ ( हुंगणें ) |
| नाओ, लावे | नाम, नांव |
| बुकॉस | ( पुस्तक ) |
| केर | घर |
| दाई, दायो, दाया | [ दाई ], ( आई ) |
| गोनो | गोणी |
| गेरेता | गेरु |
| कोरो | कुरती, कुडतें |
| क्लिदिन् | कीली, किल्ली |
| ननी केक | नहीं कोइ |
| जमादार | जमादार |
| थू | धुआ, धूर |
| गाबेन् | खाना |
| पारो | भार |
| छछो | सच्ची, सत्य |
| छोर | चोर |
| राखली | [ रखेली ] (दासी) |
| दादे, दादि | दादा ( बाप ) |
| काको | काकाचा मुलगा |
| छावो, शावे | छावा, ( शिशु, पुत्र ) |
| छाइ, शाइ | ( शिशु, पुत्री ) |
| छावे, छावो | छावा, ( मुलगा ) |
| छोवो, छावो | छावा, ( लहान मूल ) |
| मामी | ( आजी ) |
| छतेर | ( तंबू ), [ छत्र, छत ] |
| छिन्नेवेत | जखम, [ छिन्न होणें ] |
| दुक | दुख, दुःख |
| तुझिलो | तृषितता, तृषा |
| बूको | भूक |
| मेर्ला | मरण |
| लिएल | [ लिहिलेलें पत्र ] |
| लव् | शब्द [ लप्-बोलणें-सं. ] |
| राकेरपेन | राखण्याचा पण |

| जिप्सी | हिंदी, मराठी |
|---|---|
| सिक | ( रुचि ), [ शीक, शिकवण ] |
| बूडा, पुराना | बुढा, पुराणा |
| बेहिर | भीड ( गर्दी, जमाव ) |
| वस्त | हस्त |
| पेर | पेट ( पोट ) |
| छेरो, शेरो, चेरु | शिर |
| स्वा | अंसू, अश्रू |
| खील | ( लोणी ) [ क्षीर, खीर ] |
| तुद् | दूध |
| रत् | रक्त |
| वाल }<br>पाल } | वाल ( कंस ) |
| काश्ट, कार्ष्ट | काष्ठ |
| वर्जुहिलो | [ वृष ], ( गोऱ्हा ) |
| गुरुनी | ( गाय, गो ) |
| गुरुव, गुरु }<br>गुर्नी } | ( वैल ) गोः |
| मछु, मछो | मत्स्य, मासा |
| जुआ ( युआ ) | यूका, ऊ |
| किर्मो | कृमि |
| हर्वुझो | खर्वुज |
| यीव् | [ यव ], गहूं |
| चार, छार | चारा ( घास, गवत ) |
| लोह्न्, लोन | लवण ( मीठ ) |
| शिक | ( घाण ) (शी, इश्श वायकांचें) |
| बिआर्, बलवल | वारा, वादळ |
| गिन् | गणती |
| राति | ( सायंकाळ ), [ रात्र ] |
| ब्रिशिंत, ब्रेशिंदो | वरसात |
| छुपनि | चावुक, [ चोप ] |
| डोरी | डोरी, दोरी |
| जारो, आरो | आटा ( मैदा ) |
| राजा | राजा |
| रानी | राणी |
| राझ | सरदारी ( राज्य ) |
| हर्मी | ( हतिआर, हत्यार ) |
| दंदूक | संदूक |
| गाल, झावे, जगाग | गाव, वस्ती |
| तंवुन | तंबुर ( पडघम ) |
| मनुष् | माणुस |
| कुनी | कुना, कोन |

### विशेषणें.

| जिप्सी | हिंदी, मराठी |
|---|---|
| नंगो | नंगा ( नागवा ) |
| दुवेर | दुवारा ( दोनदां ) |
| वरो | वडा ( मोठा ) |
| वोको | भूका ( भुकेला ) |
| वेंगो, वेंगा | बांका ( तेढा, वांकडा ) |
| तिक्नो, तिम्नो | ठेंगणा |
| नेवो | नया, नवा |
| काल्लो, काला | काला, काळा |
| गोर | गहेरा, [ गभीर, गंभीर ] |
| शोकेर | शोक ( इष्क ) |
| पुरो | पुराना, पुराण |
| अएक्टो | अकेला, एकटा |
| छोरेरो | चोर |
| सोरले | जोर, शूरत्व |
| इक्, एक् | एक |
| दुज्, दोज | दोन, द्वे |
| त्रिन्, त्रि | तीन, त्रि |
| श्वार, स्तार | चार |
| पांच | पांच |
| छौ, चौ, सोफ्, | सहा, छ |
| एफ्त | सप्त |
| आक्तो | आठ, अष्ट |
| एन्या, एहय | ( नऊ ) |
| देश, देस | दहा, दश |
| वेश, विश, विस | वीस, विंशति |
| त्रिअंदा, त्रंदा | तीस, त्रिंशति |
| स्तार वेल* देश, सारदा | चार वेळ दश, चार दहा ( चाळीस ) |
| पांच वेर * देश, पांदा, पांतसेन दिस | पांच वेळ दश, पांच दहा, ( पन्नास ) पांच अन् (×) दहा |
| छो वेर देश, छो अन दिस | सहा वेळ दश, सहा अन् (×) दहा |
| एस्त वेर दश | (सत्तर) सात वेळ दश |
| आक्तोवेर देश | (ऐशी) अष्ट वेळ दश |
| एइय वेर देश एनयन दिस | (नव्वद) नऊ वेळ दश, नऊ अन् (×) दहा |
| श्वेल, शेल, सेल | शंभर, शें |
| दुईशेल, देइशेल | दोनशें |

* "वेल" किंवा "वेर" याचा उपयोग पहा.

| जिप्सी | हिंदी, मराठी |
|---|---|
| देश-वेर-शेल एके झेरास | दश वेळ शें एक हजार |
| ए एकलो, ओ ग्लूनो | पहिला |
| ओ, (ए) दुईतो* | दुसरा |
| ओ त्रितो | तिसरा |
| ओ श्वारतो | चवथा |

### क्रियापदें.

| जिप्सी | हिंदी | मराठी |
|---|---|---|
| पेक्म् ( पक्म् ) | पकाना | पाक करणें |
| मंगवा | मंगना | मागणें |
| बंदोपेन | बंधना | बांधणें |
| जरावा | जिरना | जिरणें |
| छरावा | छाटना | कापणें |
| केरला | करना | करणें |
| सिवावा | सिवना | शिवणें |
| लावा | लेना, पकडना | पकडणें |
| नावे | नाम देना | नांव ठेवणें |
| वारिस्को | वारिश करना | (वृष्टि होणें) |
| डायेस त्रिशेंडो | ( वरसना ) | (पाऊस झाला) |
| सोंगवा | सूंघना | हुंगणें |
| झमांडर | जुदा करना | (वेगळे करणें) |
| छोर | चोरी करना | |
| लेजौला | लेजाना | घेऊन जाणें |
| पी, पिआवा | पीना | पिणें |
| पुरो | | पुराणें करणें |
| ने सुनेले | नहीं सुनता | नाहीं ऐकत |
| मे दिक्राहा | मैं देखा | मीं देखिलें |
| मे छाना | मैं जानता | मी जाणतों |
| कुरोबेन | [ कुर्बान् करना ] | ( मारणें ) |
| गिवावा | गाना | गाणें |
| छछोबेन् | [ सच्चा ] | न्याय देणें |
| ग्निनावा | गिनना | गणणें |
| शिवावा | ( जीना ) | जिवंत असणें |
| मुक् | | मुक्त करणें |
| घास् | खांसी करना | खोकणें |
| गेच्छाहा [ गच्छ ] | जाना | जाणें |
| मुतेरवावा | मुतना | मुतणें |
| गाना, खा, हाने | खाना | खाणें |
| छिल | चल, हिलना | हलणें |

* तो=रा, था, वा; हा "तो" चा उपयोग पहा.

## नामें चालविणें

### गड्झो (पुरुष)

| जिप्सी | हिंदी | मराठी |
|---|---|---|
| प्र० गड्झो | आदमी | पुरुष |
| द्वि० गड्झो | आदमीको | पुरुषास |
| च० गड्झस्को | आदमीको | पुरुषास |
| पं० गड्झेस्तार, गड्झेसे | आदमीसे | पुरुषाहून |
| ष० गड्झेस्केरो | आदमीका | पुरुषाचा |
| सं० ओ गड्झो | ओ आदमी | हे पुरुषा |

अनेकवचनीं

| | | |
|---|---|---|
| प्र० गड्झे | आदमियों | पुरुष |
| द्वि० गड्झे | आदमियोंको | पुरुषांस |
| च० गड्झेंगो | आदमियोंको | पुरुषांस |
| पं० गड्झेंदार-झेंसे | आदमियोंसे | पुरुषांहून |
| ष० गड्झेंगेरो | आदमियोंका | पुरुषांचा |
| सं० ओ गड्झे | ओ आदमियों | हे पुरुषांनों |

## सर्वनामें चालविणें

### मे (मी)

| | | |
|---|---|---|
| प्र० मे | मे | मी |
| च० मांगे, मा | मुझको | मला, मह्यम्(सं.) |
| पं० मांदर | मुझसे | मजपासून |
| ष० म्रोही (मोन्ही?) } माँ | मेरा | माझा. मे(सं.) |

### आमें, में (आम्ही)

| | | |
|---|---|---|
| प्र० आमें में | हम् | आम्ही |
| द्वि० अमें, में | हमको | आम्हाला |
| च० अमेंगे, में | हमको | आम्हाला |
| पं० अमेंदर, अमेंसे } मेंसे | हमसे | आमचेपासून |
| ष० अमेरोही | हमारा | आमचा |

### तू (तूं)

| | | |
|---|---|---|
| प्र० तू | तू | तूं |
| द्वि० तुते, तुत् | तुझको | तुल |
| च० तुके, तुते | तुझको, तुको | तुला |
| पं० तु, तन्ही, तुतरे | तुझसे | तुझेपासून |
| ष० त्रोही, तुते | तेरा | तुझा |
| सं० ओ तू | ओ तू | अरे तूं |

### तुम् (तुम्ही)

| जिप्सी | हिंदी | मराठी |
|---|---|---|
| प्र० तुमें, तुमे | तुम् | तुम्ही |
| द्वि० तुमें, तुमे | तुमको | तुम्हास |
| च० तुमें गोले, तुमें | तुमको | तुम्हाला |
| पं० तुमेंदर, तुमेंसे | तुमसे | तुमचेपासून |
| ष० तुमारोही, तुमेंदे | तुमारा | तुमचा |
| सं० ओ तुमे | ओ तुम् | अहो तुम्ही |

### मे, तू, आमें, तुम्.

| | | |
|---|---|---|
| मिरो, मिरी | मेरा, मेरी | माझा, माझी |
| मारो, मिरो | हमारा, हमारी | आमचा, आमची |
| तिरो, तिरी | तेरा, तेरी | तुझा, तुझी |
| तुमारो, तुमारी | तुमारा, तुमारी | तुमचा तुमची |

## क्रियापदें चालविणें

### होवावा (होणें, असणें)-वर्तमानकाळ

| | | |
|---|---|---|
| मे हूँ | मे हूँ | मी आहें |
| में हाँ | हम है | आम्ही आहों |
| तू हल | तू है | तूं आहेस |
| तुमे हाँ | तुम है | तुम्ही आहां |
| ओव ही | वो है | तो आहे |
| योले ही | उन्हे (वे) हैं | ते आहेत |

भूतकाळ

| | | |
|---|---|---|
| मे हमेस | मे हुआ, मे था | मी झालों, मी होतों |
| में हमेस | हम् हुए हम् थे | आम्ही झालों, आम्ही होतों |
| तू हलेस् | तू हुआ | तूं होतास |
| तुमें हमेस् | तुम् हुए | तुम्ही होता |
| योव् } हास् | वो हुआ | तो होता |
| योले } हास् | उन्हे (वे)हुए | ते होते |

भविष्यकाळ

| | | |
|---|---|---|
| मे ओवा | में होगा | मी होणार |
| में ओवाहा | हम् होंगे | आम्ही होणार |
| तू ओवेहा | तू होगा | तूं होणार |
| तुमे उना | तुम् होंगे | तुम्ही होणार |
| योव् उला | वो होगा | तो होणार |
| योले ओवेना | उन्हें (वे) होंगे | ते होणार |

### केरला (करणें)-वर्तमानकाळ

| | | |
|---|---|---|
| मे केरेल | में करता | मी करतों |
| शो केयेंम | हम् करते | आम्ही करतों |
| तू केरेश | तू करता | तूं करतोस |
| तुमें केयेंन् | तुम् करते | तुम्ही करतां |
| योव् केरेल | वो करता | तो करतो |
| ओ केद | उन्हें करते | ते करतात |

| जिप्सी | हिंदी | मराठी |
|---|---|---|
| | भूतकाळ | |
| मे केर्योम् | मे करता था | मी केलें |
| शो ,, | हम करते थे | आम्ही ,, |
| तू केर्येल | तू करता था | तूं केलेंस |
| तुमें केर्यन् | तुम करते थे | तुम्हीं केलें |
| ओं केर्ये | वो करता था | त्यानें ,, |
| ओं केर्दे | उन्हें करते थे | त्यांनीं ,, |

जिप्सींच्या भाषेची अधिक स्पष्ट कल्पना येण्यासाठीं त्यांच्या भाषेंतील एक उतारा घेऊं. हा उतारा वेल्स जिप्सी भाषेंतील गोष्टी वेल्स जिप्सी रावर्ट्स् यानें प्रसिद्ध केल्या आहेत त्यांतील आहे. आम्ही हा ब्रिटानिकेच्या नवव्या आवृत्तींतून घेतला आहे. शब्दांखालींच त्यांचे अर्थ जसे तेथें दिले आहेत तसे घेतले आहेत.

### एक जिप्सी गोष्ट

**येकेर् अ दोई सेस् बेअरेन्गॅरो ता ववेर् स्तोरे**
एकदां एक आणि दिनीं होते खलाशी तसेच अवर चार
**मोर्शे[९]. येकं[१०] सेस्[११] पेल्तनेन्गरो[१२] ता[१३] ओव्[१४] ववेर्[१५] सेस्[१६]**
माणूस. एक होता लोहार आणि (तो) दुसरा होता
**कोरमन्गरो[१७] ता[१८] सिवमन्गरो[१९] तो[२०] पह्लनो[२१] सेस्[२२]**
शिपाई आणि शिवणगार आणि पल्याडचा होता
**किर्चिमक्करो[२३]. ओव्[२४] बेअरेन्गरो[२५] पोत्चेदस्[२६] ए[२७]**
खाणावळवाला. तो खलाशी विचारतो त्या
**पेल्तनेन्गरो[२८] ते[२९] वेल्[३०] अप्रे[३१] ओव्[३२] दोरेअव्[३३]. ओव्[३४]**
लोहारास णें ये वर त्या दर्या. तो
**पेल्तनेन्गरो[३५] पेन्दस्[३६], नाउ[३७] शोम्[३८] ते[३९] जा[४०] ते[४१] केरों[४२]**
लोहार म्हणाला नाहीं आहे णें जा णें कर
**वृत्ती[४३]" "सो[४४] से[४५] तेरो[४६] वृत्ती[४७]"? "ते[४८] तसरों[४९] सस्तर्न[५०]"**
वृत्ती. काय असे तुझी वृत्ती? "णें तापव लोखंड
**चोत्‌ची[५१] ओव्[५२] पेल्तनेन्गरो[५३], ता[५४] ते[५५] केरॅव्[५६] लेस्[५७] उन्द्र**
उच्चारी तो लोहार आणि णें कर त्यांस आंत
**चिचाव्[५८] ग्रेन्ने[५९]" पोतच्दास्[६०] ओव्[६१] बेअरेन्गरो[६२] प[६३] ववेर्[६४]**
नाल घोड्या. पृच्छी तो खलाशी त्या अवरां
**त्रिनेन्गे[६५] ते[६६] वेन्[६७] अद्र[६८] ओव्[६९] वेअरो[७०] ओव्[७१] कोरमन्गरो[७२]**
तिघां णें ये आंत त्या तार्वा तो शिपाई
**पेन्दस्[७३] ता[७४] जल्ल[७५] ते[७६] केल[७७] मोयाबेन[७८] ता[७९] जववेन्[८०]**
म्हणाला कीं चाल्लो णें कर म्होर आणि जा;
**तो[८१] सिवमन्गरो[८२] पेन्दस्[८३], "शोम्[८४] ते[८५] जा[८६] ते[८७] केरों[८८] पसा[८९]**
आणि शिवणगार म्हणाला (मला) आहे णें जा णें कर वेष
**ते[९०] रिगेरेन्[९१] तोमेन[९२] तते[९३]" अ[९४] ओव्[९५] किर्चिमक्करो[९६] पेन्दस्[९७]**
णें रक्ष तुम्हां तप्त; आणि तो खाणावळकर म्हणाला,
**जव[९८] मा[९९] ते[१००] केरों[१०१] लोविना[१०२] ते[१०३] केल[१०४] तोमेन[१०५] मते[१०६]**
जा मी णे कर दारु णे कर तुम्हां मत्त.
**ते[१०७] जान्[१०८] साव्[१०९] तो[११०] मेन्दे[१११] कइ[११२] ओव्[११३] बेंग*[११४] ओके[११५] साव्[११६]**
णे जा सर्व आणि तुम्ही कडे त्या सैताना. येथें सर्व
**दोलेस्ते[११७].**
त्याला.

एकदां आणि दिनीं खलाशी तसेच अवर चार माणूस होते. एक लोहार होता आणि तो दुसरा शिपाई होता आणि शिवणगार आणि पल्याडचा खाणावळवाला होता. तो खलाशी त्या लोहारास त्या दर्यावर येणें विचारतो. तो लोहार म्हणाला, "नाहीं, (मला) वृत्ति करणें जाणें आहे." "तुझी वृत्ति काय असे"? तो लोहार उच्चारी "लोखंड तापविणें आणि त्यास रूप घोड्या (चे) नालांत करणें." तो खलाशी त्या अवरां तिघां त्या तार्वा आंत येणें पृच्छी. तो शिपाई म्हणाला कीं, "म्होर आणि जा करणें चाल्लों." आणि शिवणगार म्हणाला "तुम्हा तप्त रक्षिणें वेश करणें जाणें आहे." आणि तो खाणावळकर म्हणाला सर्व आणि तुम्हीं त्या सैतानाकडे जाणें. तुम्हा मत्त करणें दारु करणें मी जा. येथें सर्व त्याला.

या अवतरणांतील शब्दांचें आतां पृथक्करण करूं.

खालील शब्द संस्कृत शब्दांपासून व्युत्पादितां येतात. कंसांतील अंक शब्दांवर घातलेलेच आहेत.

येक=एक (१,१०); अ=च (२,९४); सेस=अस् धातूचें रूप (४,११,१६,२२); याचें आणखी एक रूप 'से' (४५); 'ता'=तथा, आणि या अर्थानेंहि याचा उपयोग आहे, (६,१३, १८,५४,७४,७९); ववेर=अवर (७,१५,६४), स्तोरे=चत्वारः (८); मोर्शे=मनुष्य (९); तो=ता (जिप्सी)=तथा (२०,८१, ११०); 'पोतचेदस' आणि 'पोतच्दास'=पृच्छति (२६,६०); ते=तुम् (२९,३९,४१,४८,५५,६६,७६,८५,८७,९०,१००, १०३, १०७); अप्र=उपरि (३१); पेन्दस्=वद् (३६,७३, ८३,९७); नाउ=नभवति (३७); शोम्=स्यामि (३८,८४); जा व जान्=या (४०,८६,१०८); केरों=कृ (४२,५६,८८, १०१); दुसरें रूप 'केल' (७७,१०४); तिसरें रूप 'केरॅव्'(५६); वृत्ती=वृत्ति (४३,४७); तेरो=तव (४६); तोमेन (९२,१०५);

* बेंग या शब्दाची व्युत्पत्ति मेक या शब्दापासून डॉ० मिक्लोसिच यानें साधिली आहे. तथापि 'गो टु डेव्हिल' याचें तत्स्वरूप वाक्य मराठी व इतर अर्वाचीन भाषा यांच्या ग्राम्य स्वरूपांत 'भोंकांत जा' किंवा 'भेंगेंत जा' असें आहे. आणि तें 'भगं यातु' अशा संस्कृत वाक्यावरून व्युत्पादितां येईल.

तसर्रो=त्रस् अथवा तप (४९); चोत्‌चि=उत्तर (५१); उन्द्र=अन्तर् (५७); दुसरें रूप 'अद्र' (६८); जल्ल=चल (७५); एस=वेश (८९); रिगेरेन्=रक्ष् (९१); तते=तप्त (९३); मा=अस्तत् (९९); मते=मत्त (१०६); साव्=सर्व (१०९, ११६; बेंग*=भग (११४); ओके=अत्र (११५).

अर्वाचीन देशी भाषांतील शब्द.

दोरेअव=दर्या (३२); सो=गुजराथी 'शूं' (४४); कइ=कडे (११२); सिवमन्गरो=शिवणगार (१९,८२); पल्लो=पल्याडचा (२१);

हिंदुस्थानांतून प्रयाण झाल्यानंतर आले असावे असा संशय ज्यांविषयीं आहे असे शब्द.

बेअरो, बेअरेन्गारो=तारूं आणि तारूंवाला (खलाशी), (५,२५,६२,७०); पेल्तनेन्गरो=लोहार (१२,२८,३५,५३); कोरमन्गारो=शिपाई (१७,७२); किर्चिमक्करो=खाणावळवाला (२३,९६); सस्तर्न=लोखंड (५०); चिचाव्=नाल (५८); ग्रेन्गो=घोडा (५९); वेन, वेल=येणें (६७,३०); मोयावेन=म्होर (७८); जवबेन=जा (८०,९८); मेन्दे=तुम्ही (१११).

भाषेच्या रचनेंत आपणांस काय भेद आढळून येतात हें पाहूं. प्रथमतः एक गोष्ट दिसून येत आहे कीं, शब्द आपलेच ठेवून वाक्यरचना मात्र इंग्रजी बनली आहे. या तऱ्हेचे विकार मराठीस थोड्या अंशीं तंजावर येथें आढळतात. वाक्यरचना करतांना जे प्रत्यय आपण नंतर लावतों आणि इंग्रज अगोदर लावतात ते जिप्सी इंग्रजांप्रमाणेंच अगोदर लावतात. उदाहरणार्थ,

ते वेल=णें ये=येणें (२९,३०)
ते जा=णें जा=जाणें (३९,४०)
ते कैर=णें कर=करणें (४१,४२)

याप्रमाणें 'ते' संस्कृत 'तुम्' या अर्थानें पुढें अनेक प्रसंगीं या उताऱ्यांतच आलें आहे. (४८,५५,६६,७६,८५,८७,९०, १००, १०३,१०७)

शब्दयोगी अव्यय नामानंतर मराठींत येतें; जिप्सी भाषेंत तें नंतर आलें नाहीं, एवढेंच नव्हे तर अगोदर शब्दयोगी मग उपपद आणि मग नाम असा अनुक्रम आला आहे.

अप्र ओव् दोरेअव्=वर त्या दर्या (३१,३२,३३)

कर्म क्रियापदानंतर घेण्याची पद्धत दिसते. तसेंच अस् धातूचा उपयोग करतांना विधेयाशेजारींच विधान न घेतां, क्रियापदानंतर घेण्याची पद्धत आहे. उदाहरणार्थ, एक सेस् पेल्तनेन्गरो=एक होता लोहार. क्रियापदाचें स्थान कर्त्याविषयीं सांगावयाच्या मजकुराच्या अगोदर घेण्याची पद्धत संस्कृत भाषेच्या स्वरूपास विरुद्ध नाहीं हें येथें सांगितलें पाहिजे.

जिप्सींच्या भाषेमधील ईश्वरविषयक शब्दावरून त्यांच्या हिंदुस्थानी आठवणी गेल्या नव्हत्या असें दिसतें. देवाला शब्द 'देवला' आणि क्रॉसला शब्द 'त्रुशूल' (त्रिशूल) हे त्या आठवणींच्या अस्तित्वाचे सूचक आहेत. त्रिशूळपरिचितांस क्रॉस दिसल्यावर आणि तो देखील पवित्र आहे ही भावना कळल्यावर त्यास ते शिवायुधाचें नांव कां देणार नाहींत? त्यांच्या रीतीभातींमध्यें एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्याजोगी आहे ती ही कीं, ते माणसें पुरतात पण त्यांचे कपडे जाळतात. हिंदुस्थानांतील अग्निमार्फत सर्व गोष्टी पाठविण्याची कल्पना आणि ईश्वराच्या हांकेबरोबर सशरीर पुनरुत्थानाची ख्रिस्ती कल्पना या दोहोंमधील हा मध्यम पंथ आहे. असो.

भारतीयांच्या भाषांच्या इतिहासांत जिप्सींच्या मूळ भाषेचें स्थान शोधण्यासाठीं त्यांचें वाङ्मय आणि भाषा हीं नागरी लिपींत छापिलीं जाऊन त्यांवर भारतीय पंडितांचा परिश्रम होणें अवश्य आहे. रमणभाईंच्या पूर्वी कोणीहि भारतीयानें या विषयाकडे विशेष लक्ष दिलेसें दिसत नाहीं.

या लोकांस 'रिलिजन्' नाहीं. हे मुसुलमान लोकांत मुसुलमान, ख्रिस्त्यांत ख्रिस्ती, अशी यांची स्थिति आहे आणि एका दृष्टीनें पाहतां यांस हिंदुत्वाचीच एक यूरोपांत चालण्यासारखी आवृत्ति असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**यूरोपभर संचार.**—सर्व यूरोपभर जिप्सींचें अस्तित्व इसवी सन पंधराशेंच्या सुमारास दिसून येतें आणि याच सुमारास ते इंग्लंडमध्यें पोंचले असावेत. चवदाशें चवदाच्या सुमाराला त्यांचें अस्तित्व हेसे या जर्मन संस्थानांत दिसून येतें. आलवर्ट क्रान्झ यानें साक्सोनिया नांवाचा एक ग्रंथ कोलोन येथें पंधराशें वीस सालीं प्रसिद्ध केला त्यांत त्यांची प्रथमतः सविस्तर माहिती सांपडते. आणि त्याचेंच वर्णन इतर ग्रंथकारांनीं पुनरुक्त केलें आहे. क्रान्झ वर्णन करितो कीं, त्यांच्यामध्यें एक राजा (काउन्ट) असे आणि कांहीं सरदार (नाइट्स) असत ते घोड्यांवरून जात. इतर पायांनीं चालत आणि वायका व मुलें दुचाकी गाड्यांतून जात. ते सिजिस्मंडचे आणि इतर राजांचे सुरक्षितपणें जाऊं देण्याविषयींचे परवाने दाखवीत. ते भटकण्याचें कारण असें सांगत कीं, त्यांस कांहीं पापक्षालनार्थ यात्रा करावयाची आहे. क्रान्झ पुढें वर्णितो कीं, या लोकांस स्वतःचा देश नाहीं, आणि ते इतस्ततः संचार करीत असतात. ते कुत्र्याप्रमाणें राहतात आणि त्यांचा विशिष्ट पारमार्थिक संप्रदाय असा कांहींच नाहीं. तथापि त्यांस जर कोणी बाप्तिस्मा दिला तर ते घेतात. ते उनाड पुरुष व वायका यांचाहि आपल्यांत समावेश करितात. त्यांच्या वायका भविष्य सांगतात आणि त्या भविष्य सांगतां सांगतांच खिसे कातरतात. या जुन्या लेखकांपैकीं कोणीहि त्यांचा भांडीं नीट करणारे किंवा गाणें वजावणें करणारे म्हणून उल्लेख

करीत नाहींत. सिजिस्मंडनें जें त्यांस पत्र दिलें आहे त्या पत्रांत त्यांच्या मुख्यास त्यांच्या आपसांतील भांडणांचा निकाल करण्याचा अधिकार दिला आहे.

चवदाव्या शतकाच्या सुरवातीपासून पंधराव्या शतकाच्या मध्यापर्यंत त्यांची प्रवासप्रवृत्ति पश्चिमेकडे कां झाली हें स्पष्ट झालें नाहीं. ते हंगेरींतून बाहेर पडल्यानंतर त्यांच्यापाशीं सिजिस्मंडचें पत्र होतें तरी देखील त्यांचा छळ होण्यास सुरवात झाली. ते चोऱ्या करीत, खिसे कातरीत. यामुळें लोकक्षोभ त्यांच्यावर पुष्कळ झाला. ते कोठें गेले म्हणजे तेथील शेतकरीवर्ग धावरून जात असे आणि या लोकांस करावें तरी काय म्हणून त्यांनीं कोठें तरी एका ठिकाणीं रहावें अशी इच्छा करणाऱ्या मुत्सद्यास मोठा प्रश्न उपस्थित होई.

**छळ.**—त्यांचें परकीय बाह्यस्वरूप, त्यांची लोकांस न समजणारी चोरांच्या गुप्त भाषेसारखी भाषा आणि त्यांची हातचलाखी, यांमुळें त्यांची गणना उनाड आणि रामोशी लोकांत करण्यांत आली;आणि त्यांस मोठ्या निष्ठुरतेनें वागविण्यांत आलें. पुष्कळ ठिकाणीं त्यांचे कायदेशीर खून करण्यांत आले. कधीं कधीं हे तुर्कांचे गुप्त हेर असावेत असें समजण्यांत येत असे. त्यांच्या कधीं कधीं कायदेशीर कत्तली होत. त्यांपैकीं एका कत्तलीचें वर्णन विझेनग्रुक नांवाचा ग्रंथकार करितो. तो म्हणतो, पांच माणसांनां चाकावर उताणें घालून छिन्नविच्छिन्न करण्यांत आलें. नऊ माणसांनां फांशीं दिलें आणि तीन पुरुष व आठ बायका यांचीं डोकीं उडविलीं. ही गोष्ट १४।१५ नोव्हेंबर १७२६ रोजीं घडली. ग्रेटब्रिटनमध्यें १५०५ सालीं स्कॉटलंडच्या चवथ्या जेम्सनें देशांतील सर्व इजिप्शिअन (जिप्सी) लोकांनां फांशी देण्यास किंवा शिक्षा करण्यास परवानगी दिली. १६३६ सालीं हॅडिंग्टन येथें इजिप्शिअन पुरुषांनां फांशीं द्यावें आणि बायकांनां बुडवून ठार मारावें असा हुकूम सोडण्यांत आला आणि गरोदर स्त्रियांस चाबकांनीं मारावें आणि त्यांचे गाल भाजावेत असें फरमाविण्यांत आलें. गाल व पाठ यांवर डाग देणें ही सामान्य शिक्षा असे. १६९२ सालीं हंगेरीमध्यें जिप्सींनां खूप बडवून आम्ही माणसें खातों असा अपराध त्यांच्याकडून कबूल करून घेतला आणि तसा तो अपराध कबूल करून घेतल्यानंतर त्यांस फांशीं देण्यांत आलें. पुढें चौकशीअंतीं समजलें कीं, जीं माणसें जिप्सींनीं खाल्लीं म्हणून जिप्सींनां फाशीं दिलें तीं माणसें जिवंतच होतीं.

यूरोपांतील कायद्यांमध्यें जिप्सींची स्थिति वारंवार बदलत आहे. जिप्सींच्याविरुद्ध कायदे आजहि बंद झाले नाहींत. १९०० सालीं देखील जर्मनीमधून जिप्सींची हकालपट्टी करण्याचा हुकूम सुटून त्यांस हद्दपार करण्यांत आलें. इंग्लंडांत अनेक जर्मन जिप्सी या हुकुमामुळें आले. १९०४ सालीं जिप्सींनां फेरीवाल्यांचे परवाने द्यावेत किंवा नाहींत याचा पुन्हां विचार करणें प्रशियाच्या प्रतिनिधिसभेस अवश्य वाटलें आणि १९०६ सालीं प्रशियाच्या प्रधानानें जिप्सींचा उपसर्ग बंद करण्यासाठीं विशेष नियम केले.

**गुलामगिरी व तींतून सुटका.**—यूरोपांतील रोमानिया, मोलदेविया आणि वालाचिया या भागांत जिप्सींची संख्या अधिक आणि त्यामुळें त्यांचा इतिहासहि तेथें अधिक विस्तृत आहे. रोमानियाचीं दप्तरें तपासून पाहिल्यास जिप्सींची माहिती पुढें मागें अधिक सांपडण्याचा संभव आहे. तेथें जिप्सींची समाजघटना येणेंप्रमाणें दिसते. प्रथम त्यांचे दोन वर्ग दिसून येतात. एका वर्गास रोबी अथवा भूमिबद्ध दासवर्ग म्हणतां येईल. दुसरा वर्ग म्हटला म्हणजे भटक्यांचा होय. शिवाय या लोकांचे धंद्यांच्या दृष्टीनें चार वर्ग पाडतां येतात. ते येणेंप्रमाणेः (१) लिंगुरारी म्हणजे सुतार किंवा खुर्च्या तयार करणारे, (२) काल्दरारी म्हणजे धातूचें काम करणारे लोहार, तांबट इत्यादि; (३) उरसारी म्हणजे अस्वल घेऊन फिरणारे आणि (४) औरारी म्हणजे सोन्याची माती धुणारे.

जिप्सींच्या समुच्चयास शत्र म्हणत. या शत्रावर एक अधिकारी असे त्यास रोमानियामध्यें 'जूड' आणि आस्त्रियामध्यें 'आगा' असें म्हणत असत. अनेक शत्रें आणि त्यांवरील जूड हे "बुलुबाशा" नांवाच्या अधिकाऱ्यांच्या हाताखालीं असत. पुष्कळदां हे बुलुबाशा बाहेरचे म्हणजे जिप्सी नसलेले लोक असत, त्यामुळें यांस फार त्रास होई.

रोबी म्हणून भूमिबद्ध दासांचा वर्ग असे. त्यांची गुलामांप्रमाणें विक्री होई.

१८५६ सालीं मोलदेविया संस्थानांत त्यांची दास्यापासून मुक्तता झाली. १७८१–२ सालांत हंगेरीमधील गुलामगिरी बंद झाली तेव्हां त्यांच्याबरोबर यांची गुलामगिरी बंद झाली. १८ व्या आणि १९ व्या शतकांत त्यांस शिक्षण देऊन एका ठिकाणीं वसाहत करून राहण्यासाठीं उत्तेजन देण्यांत आलें. पण त्या कार्यांत फारसें यश आलें नाहीं.

पोलंडमध्यें या प्रयत्नास थोडेंबहुत यश आलें. १८६६ सालापासून जिप्सी हे रोमानियाचे नागरिक बनले आणि आतां तेथील सरकारी आंकड्यांतून रोमानियन आणि जिप्सी असा भेद करीत नाहींत. ते आपली भाषा विसरत चालले आहेत आणि आतां स्थानिक जनतेंत त्यांचा परस्परविवाहानें समावेश होत आहे. बल्गारियामध्यें १८७८ सालच्या बर्लिन येथील तहान्वयें जिप्सी हे नागरिक बनून त्यांस समान हक्क मिळाले तथापि त्या तहाचा अर्थ निराळा करून त्यांचे ते हक्क ६ जानेवारी १९०६ रोजीं काढून घेण्यांत आले. पुढें जिप्सींनीं आपली कांग्रेस भरवून समान हक्क मागण्यास सुरवात केली आहे.

आतां जिप्सींचा कोणकोणत्या भारतीय जातींशीं संबंध जोडण्यासाठीं खटपट करण्यांत आली आहे याचा विचार करूं. हा विचार करितांना भाषादृष्टीनें झालेला विचार तात्पुरता वगळूं.

**मूलपीठिका.**—जिप्सींचे मूळपुरुष हिंदुस्थानच्या वायव्य दिशेकडील जाट लोक होत असा कॅप्टन रिचर्ड बर्टन यांचा तर्क आहे. जाट लोक व दुसरे कित्येक लोक दहाव्या शतकापासून हिंदुस्थानच्या बाहेर पश्चिमेकडे परदेशवासार्थ गेले व यांपैकीं जाट लोक हे यूरोपीय जिप्सींचे मूळपुरुष (हौस्तत्तम) झाले असें बर्टन साहेबांचें म्हणणें आहे. जेथें जातिनिर्बंध प्रस्थापित झाला आहे व जातींच्या बाहेर असणाऱ्या लोकांत देखील धंदे आनुवंशिक आहेत अशा हिंदुस्थान देशांतून जिप्सी लोकांचा उगम झाला असा तर्क जिप्सींच्या अनेक वर्षांच्या व्यवहारसातत्यावरून काढला आहे तो निर्दोष आहे असें नाहीं. परक्या देशांत गेलेल्या मनुष्याचा मूळचा धंदा कोणताहि असला तरी विशिष्ट धंदाच त्यास तेथें करतां येतो. अर्थात् जिप्सींची पाश्चात्त्य संशोधकांनीं गृहीत धरलेली विशिष्ट धंद्यांतील नैसर्गिक प्रवृत्ति कांहींएक सिद्ध करीत नाहीं. मात्र विशिष्ट धंद्यांची त्यांची आवड लक्षपूर्वक पाहिली तर ह्या बाबतींत त्यांच्याशीं संशोधकांनीं ठरविलेल्या त्यांच्या भारतीय पूर्वजांचें सादृश्य आहे एवढें मान्य करण्यास हरकत नाहीं. यूरोपांतील जिप्सींच्या पूर्वजांचे धंदे व संवयी खालीलप्रमाणें आहेत. ते जुनी भांडीं नीट करीत. ते लोहाराचें काम करीत. त्यांनां अश्ववैद्यक व घोड्याची नालबंदी करणें अवगत होतें. नाचणें, गाणें, वाद्यें वाजविणें, व दोरीवर नाचून कोल्हाट्या-सारखा खेळ करणें या कामांत ते फार कौशल्य दाखवीत. अशा खेळ करणारांच्या प्रवासी मंडळांत आणि यूरोप व अमेरिका येथील प्रत्येक नाटकगृहांत निदान एक तरी मनुष्य यूरोपीय जिप्सीवंशांतील (Romany) असतो असा नियम काढितां येतो. ते घोड्यांचा व्यापार करीत व घोड्यांची परीक्षा त्यांनां स्वभावतःच करतां येत असे. मनांत शंका न बाळगतां ते खुशाल उचलेपणा व खिसेकातरूपणा करीत आणि ज्या गुणाचा सामान्य यूरोपीय आणि अमेरिकन लोकांकडून भारतीयावर आरोप झाल्यानें, आजदेखील पाश्चात्त्य देशांत भटकणाऱ्या भारतीयास जो पोटाचें साधन झाला आहे तो अदृष्टज्ञानाचा गुण आपल्या अंगीं आहे असें दाखवून हस्तसामुद्रिकानें ते दैवीं काय लिहिलें आहे हें सांगत. बर्टन म्हणतो "स्वाभाविक मृत्यु पावलेलीं जनावरें ते शंका न बाळगतां खुशाल खात असत. डुकराची त्यांनां फार आवड होती व इंग्लंड-मधील श्रीमंत जिप्सी मेलेलें डुकर मिष्टान्न म्हणून खात असत. ते प्राण्यांची चामडीं सोलून काढीत, व प्रेतें वहात असत. अशा कंटाळवाण्या धंद्यांकडे यांची प्रवृत्ति फार होती, व कित्येक यूरोपीय राष्ट्रांत बराच काळपर्यंत फक्त हेच लोक हे धंदे करीत. चटया, टोपल्या व लांकडाचे लहान पदार्थ तयार करून हे लोक विकीत असत."

वृद्धापकालापर्यंत त्यांचे केंस काळे राहतात, आणि यूरोपीय लोक किंवा सामान्य पौर्वात्य लोक यांपेक्षां जिप्सी लोकांचे केंस जास्त टिकतात.

ते आर्यन् भाषा बोलतात. मुख्यत्वेंकरून ती जाट लोकांच्या भाषेसारखी असते, परंतु दुसऱ्या हिंदुस्थानच्या भाषांचें तींत मिश्रण झालेलें आहे.

**जाट व डोम.**—ह्या जातीचे विशिष्ट धर्म काय आहेत हें आपण पाहिलें. आतां, हिंदुस्थान व इराण या देशांत जिप्सी लोकांच्या मुख्य फिरत्या टोळ्या कोणत्या आहेत व त्यांचे धर्म यूरोपीय जिप्सी लोकांच्या धर्मांशीं कोठपर्यंत जुळतात ह्याचें आलोचन केलें पाहिजे. जिप्सी लोकांचे पूर्वज जाट आहेत हें गृहीत धरण्यास भाषाविषयक पूर्वगत संशोधन व जाट धाडसाचा इतिहास कारण झाला आहे. हिंदुस्थानच्या वायव्य दिशेकडे जाट लोकांची जात फार शूर म्हणून गणली जात असे. त्यांनीं खलीफांवर अनेक महत्त्वाचे जय मिळविले. अकराव्या शतकांत महंमदानें त्यांचा मोड केला व ते पश्चिमेकडे पळाले. ते अश्वविद्याविशारद होते व त्यांचा जीव कोणत्याहि विशिष्ट प्रकारच्या मतांत अगर उपास्यांत अडकला नव्हता. चौर्य-कर्माविषयीं त्यांची फार प्रसिद्धि होती. ह्या विशिष्ट लक्षणां-मध्यें त्यांचें व यूरोपीय जिप्सी लोकांचें साम्य आहे, परंतु मेलेल्या डुकरांचें मांस जाट खात नसत व ते कुत्र्यांप्रमाणें खादाड नव्हते. वर निर्दिष्ट केलेले सर्व धर्म जाट लोकांमध्यें होते असें आपणाला म्हणतां येत नाहीं आणि यामुळें रक्तमिश्रणाच्या संशयास अवकाश होतो. फिरत्या लोकांच्या अनेक ज्ञाती पाहिल्या तर त्यांमध्यें जाटांशीं विसदृश पण जिप्सींत असलेले सर्व धर्म दिसून येतात, ह्यावरून कांहींजणांनीं असें अनुमान काढलें आहे कीं, जाट लोकां-मध्यें इतर लोक मिसळले. मिसळणाऱ्या लोकांत प्रमुख डोम लोक असावेत अशी कल्पना मांडली गेली आहे. डोम हे मध्यहिंदुस्थान व उत्तरतम सरहद्द यांमध्यें आढळणारी भटक्या व गलिच्छ लोकांची एक जात आहे. हे काश्मिरां-तील गिलजित भागांतहि आढळतात आणि तेथें त्यांची पदवी फार कनिष्ठ आहे. हिचा उल्लेख आपल्या ग्रंथांतून अनेकदां आलाच आहे. डोम बिहार प्रांतांतील इतर लोकां-हून दिसण्यांत व आचारांत फार भिन्न आहेत.* त्यांचें तेथें अस्तित्व पुरातन कालापासून आहे. डोम आणि मनुस्मृतींत (१०,३४) उल्लेखिलेले 'श्वपाक' (कुत्रे खाणारे) हे एकच होत असा समज आहे. ते टोळ्याकरून फिरतात, टोपल्या व चटया वनवितात आणि दारूंत सर्व पैसे घालवितात. प्रेतें जाळणें व

---

* The People of India", edited by J. Forbes Watson & J. W. Kaye (India Museum, 1868)

सर्व शवांची तजवीज करणें या गोष्टींचा बहुतेक त्यांनीं मक्ताच घेतला आहे; आणि काशीक्षेत्रीं त्यावर एक कुल फार श्रीमान् झालें आहे. स्वाभाविक मृत्यूनें मेलेलीं सर्व जनावरें ते खातात व विशेषेंकरून मेलेल्या डुकराच्या मांसाची त्यांनां आवड आहे. अनियमितपणें वागून देखील त्यांच्यापैकीं पुष्कळ ८०-९० वर्षांपर्यंत जगतात व ६०-६५ वर्षांच्या पुढें त्यांचे केंस पांढरे होण्याला सुरवात होते अशी त्यांच्या संबंधाची माहिती पाश्चात्त्य लेखकांनीं गृहीत धरली आहे. तीपैकीं त्यांच्या दीर्घायुष्यासंबंधाची माहिती अजीवात चुकली आहे. ह्या डोम लोकांच्या पूर्वजांपैकीं कांहींजण उत्तरेकडील सरहद्दींत सांपडतात व तेथें ते 'डोमर' नांवानें प्रसिद्ध आहेत. हे "आर्यन्" लोकांनीं भरतखंडाच्या पूर्वभागांत वसती केली त्या काळाच्या अगोदरचे असावे असें समजतात. ते पर्वतांत राहतात, टोळ्या करून भटकतात, व मेंढपाळाचें काम करितात आणि लुटारूपणाचाहि धंदा करितात. यूरोपीय लोक त्यांनां जिप्सी असेंच म्हणतात. त्यांची भाषा यूरोपीय जिप्सींनां समजते असेंहि जरासें साहसाचें विधान करण्यांत आलें आहे.

यूरोपीय जिप्सींप्रमाणें डोम लोकांत कित्येक अवनति-दर्शक ठळक लक्षणें सांपडतात. तीं लक्षणें खलीफाला जिंकणाऱ्या शूर व लढवय्या लोकांच्या (जाटांच्या) संबयींशीं अगदीं न जुळणारीं आहेत. नैसर्गिक प्रवृत्तीनेंच जणोंकाय घाणींत कावाडकष्ट करणें, प्रेतांनां हात लावणें, टोपल्या करणें, मृतपशूंचें मांस खाणें, दारूबाजी हें आयुष्याचें मुख्य कर्तव्य मानणें, ह्या गोष्टी जाट लोकांची आपणाला जी माहिती आहे तिच्याशीं जुळत नाहींत. तथापि यूरोपीय जिप्सींमध्यें ह्या सर्व गोष्टी आढळून येतात व जाटांप्रमाणें अश्वविद्यानैपुण्य देखील दृष्टोत्पत्तीस येतें. यावरून जाटां-खेरीज इतर रक्त आणि तें देखील कनिष्ठजातीचें रक्त त्यांत मिसळलें असावें, असें अनुमान काढतां येतें. डोम हीच ती निराळ्या कनिष्ठ रक्ताची जात असावी आणि तिनेंच आपणांत जाटांचा समावेश करून एकत्र बनलेल्या वर्गाला डोम उर्फ रोम (डरयोरभेदात्) हें नांव दिलें असावें असा संशय व्यक्त झाला आहे, तो बरोबर असेल. तथापि उच्चजातीची कनिष्ठाचाराकडे प्रवृत्ति होणें देखील परदेशीं स्वाभाविक आहे. ती कशी होते याचें स्पष्टीकरण पुढें येईल.

**लुरी.**—स्लाव्ह व इतर अनेक यूरोपीय जिप्सींचें विशिष्ट लक्षण म्हणजे त्यांची उघड दिसून येणारी गायनकलेंतील कुशलता होय. ह्या लक्षणामुळें इराणच्या 'लुरी' लोकांशीं देखील त्यांचा निकटसंबंध असावा असें दिसून येतें. हे लुरीलोक स्पष्टपणें जिप्सी आहेत, कारण ते भटकत फिरतात, चोरी करितात, दैव सांगतात व भाटलोकांचा धंदा करितात; आणि मागें सांगि-तलेंच आहे कीं ते स्वतःस मुसुलमान म्हणवून पुनर्जन्मावर विश्वास ठेवतात. फर्दुसीच्या शहा—नामा या नांवाच्या ग्रंथांत असें आढळतें कीं, इ. स. ४२० च्या सुमारास हिंदुस्थानचा महाराजा शंकल यानें इराणांतील ससनीयन घराण्याचा राज्यकर्ता बहराम गौर याकडे पुरुष व स्त्रिया मिळून दहा हजार भाट पाठविले होते. भाट लोकांनां लुरी म्हणत होते. त्यांनां जमीन, धान्य व गुरें यांच्या देणग्या दिल्या होत्या. तथापि प्रथमपासूनच इकडे तिकडे भटकत फिरण्याची त्यांनां संवय होती. हल्लीं जिवंत असलेल्या त्यांच्या वंशजांच्या शासन-संस्थेविषयीं आणि आचारासंबंधीं खालील माहिती उपलब्ध आहे.*—

"यूरोपीय जिप्सी लोकांशीं यांचें फार स्पष्ट सादृश्य आहे. ते एक विशिष्ट भाषा बोलतात. प्रत्येक टोळीवर एक राजा असतो. पोरें चोरून नेणें व भामटेगिरी करणें ह्या कृत्यांकरितां त्यांची फार प्रसिद्धि आहे. त्यांचे मुख्य करमणुकीचे प्रकार म्हणजे दारू पिणें, नाचणें व गाणें हे आहेत. त्यांच्याबरोबर नेहमीं सहासात अस्वलें व माकडें असतात व त्यांनां ते सर्व-प्रकारचे विचित्र खेळ करावयास शिकवितात. प्रत्येक समूहांत दोनतीन मनुष्यें स्वतःस भविष्यवादी म्हणवितात व त्यामुळें प्रत्येक समाजांत त्यांचा तावडतोब शिरकाव होतो."

ह्या हकिकतीवरून व विशेषतः अस्वलें व माकडें यांचा उल्लेख केला आहे त्यावरून तुर्कस्थान व रुमानिया येथील नुरी नांवाचे लोक व सीरियामधील अस्वलें घेऊन फिरणारे रिसिनरी लोक या लुरींच्याच जमातीपैकीं असावेत असा सिद्धांत काढतां येतो. ह्यांची एक टोळी इंग्लंडमध्यें गेली आहे. इजिप्तमध्यें सीरियामधील रिसिनरी लोक आढळतात. त्यांच्यापैकीं बरेचजण स्वदेशाबाहेर गेलेल्या जाट व डोमलोकांनां जाऊन मिळाले असावेत असा संभव आहे. हे लोक इजिप्तमधूनच युरोपांत गेले त्यामुळें इजिप्तवरून त्यांस जिप्सी हें नांव पडलें.

नाट किंवा नटलोक हे हिंदुस्थानांतील भटकत फिरणारे लोक आहेत. त्यांचें यूरोपीय जिप्सींशीं सादृश्य आहे. इराणांतील लुरी लोकांची व त्यांची उत्पत्ति एक असावी असाहि तर्क प्रकट झाला आहे. जिप्सी लोकांचीं इतर लक्षणें त्यांच्यांत आहेत. लसुणाशिवाय प्रत्येक वस्तु ते खातात.

**वंजारी, झिंगारी.**—हिंदुस्थानांत वंजारी लोक आहेत. त्यांनां यूरोपीय प्रवासी जिप्सी म्हणतात. ते फिरते व्यापारी किंवा फेरीवाले असतात. त्यांच्यांत एक असंस्कृत भाषा प्रचलित आहे. ती इराणपर्यंत बोलतात व तिला सामान्य नांव 'रोम' असें आहे.†

---

* Sir Henry Potinger's "Travels in Beloochistan and Scinde" P. 153. † Dr. J. Forbes Watson's "The People of India".

या वंजारी* लोकांसच कित्येकांनीं जिप्सींचे पूर्वज वनवून ते चोर, दैववादी व भटकत फिरणारे आहेत असें त्यांचें वर्णन केलें आहे. जे स्वदेशत्याग करून पश्चिमेकडे गेले त्यांच्याशीं यांचा संबंध होता हें आपण प्रस्थापित करूं शकत नाहीं. यूरोपीय जिप्सी लोकांच्या शब्दांपैकीं बहुतेक शब्द हिंदी आहेत, व त्यांच्यांत थोडेंसें इराणी शब्दांचें मिश्रण झालेलें आहे. कोणत्याहि एकाच असंस्कृत भाषेंतील ते शब्द नाहींत. यूरोपीय जिप्सी लोकांप्रमाणेंच हिंदू लोकांत सांपडत नाहींत असे शब्द वंजारी उपयोगांत आणतात. यावरून युरोपांतील जिप्सींच्या एका घटकाचीच ही शाखा असावी असा संशय व्यक्त झाला आहे. 'वंजारी' याचा संबंध यूरोपीय लोक 'झिंगारी'शीं जोडतात आणि संस्कृत पंडित "वनचर" या शब्दाशीं जोडतात तथापि तेवढ्यावरून वंजारी हे जिप्सींचे पूर्वज सिद्ध होत नाहींत. रोमनी भाषेंत 'झिंगन' (Zingan) अथवा 'ट्चेंकन' (Tchenkan) असे शब्द आहेत, एवढें मात्र खरें. कातड्याचें काम करणारे व खोगीर करणारे जिप्सी लोक इराणांत आहेत व ते स्वतःला 'झिंगन' म्हणवितात. तेथें पंजाबांतील जाटवंशीय 'ट्चेंकन' नांवाचे जिप्सीहि आहेत. 'झिंगन' या शब्दाच्या व्युत्पत्ती-संबंधानें दोन तर्क प्रकट झाले आहेत. कोणी 'चेनूग्विन' या शब्दापासून तो निघाला असावा असें म्हणतात. चेनूग्विन हें तुर्कस्थानांतील जिप्सींचें आज प्रचारांत असलेलें नांव असून यूरोपीय जिप्सींच्या मूळ टोळीचें हेंच नांव होतें असें त्यांच्यांत प्रचलित असलेल्या एका दंतकथेवरून दिसतें. ही दंतकथा येणेंप्रमाणें:—

जिप्सीराष्ट्रांतील लोकांनां त्यांच्या देशांतून हांकून देण्यांत आल्यावर ते मेक्रन† येथें येऊन पोंचले, तेव्हां त्यांनीं एक आश्चर्यकारक यंत्र तयार केलें. त्या यंत्राला एक चक्र जोडिलें होतें. तें चक्र फिरूं लागेपर्यंत त्यांचा पुढचा प्रवास होऊं शकत नव्हता. कोणाहि मनुष्याच्यानें तें यंत्र फिरूं शकलें नाहीं. तेव्हां साधूचा वेष घेतलेल्या एका दुष्ट पिशाचाच्या सांगण्यावरून चक्र फिरण्यासाठीं त्या लोकांच्या 'चेन' नामक मुख्यानें आपल्या 'ग्विन' नामक बहिणीशीं लग्न केलें. या कारणासाठीं त्या टोळीला 'चेनूग्विन' असें जोड नांव पडलें. या अस्वाभाविक लग्नाकरितां एका महंमदीय साधूनें जिप्सी लोकांनां शाप दिला कीं ते चिरकालपर्यंत पृथ्वीच्या पाठीवर भटकत राहतील.‡

प्रस्तुत कथेचा ऐतिहासिक उपयोग कसा करावयाचा हें सांगतां येत नाहीं. कां कीं अत्यंत भिन्न अशा प्रदेशांत या प्रकारच्या कथा सांपडतात. अशीच एक दंतकथा ग्रीनलंड व वोर्निओ बेट या ठिकाणीं प्रसिद्ध आहे. जुन्या आयर्लंड-वासीयांनां देखील या प्रकारची एक कथा परिचित होती असें म्हणतात. व्युत्पत्तिशास्त्रांत बुड्या मारणाऱ्या लोकांकडून या गोष्टीचा आणि चंद्रसूर्यांच्या भ्रमणाचा संबंध जोडण्यांत आला आहे. अधिक चांगली माहिती उपलब्ध होईपर्यंत जिप्सींच्या मूळदेशासंबंधीं किंवा भ्रमणासंबंधीं कांहीं एक सिद्धांत बांधतां येत नाहीं. 'झिंगन' शब्दाचें मूळ चेनूग्विन असावें, या तऱ्हेचा एक ऐतिहासिक व्युत्पत्तिपक्ष आहे हें वर सांगितलेंच आहे. हा पक्ष उत्पन्न होण्यास सदरील दंतकथा कारण झाली आहे. झिंगन या शब्दाची व्युत्पत्ति कांहीं पंडित निराळ्या तऱ्हेनें देतात. डॉ. मिक्लोसिच यानें अझिंगन हा शब्द अथिंगनॉइ (Athinganoi) या शब्दा-पासून व्युत्पादिला आहे. अथिंगनॉइ या शब्दाचा अर्थ 'मला स्पर्श करूं नका' असा आहे (असें डॉक्टर मजकूर सांगतात). हा शब्द त्यांनां लावण्याचें कारण हेंच कीं ते लोक फार सोंवळ्या रीतीनें राहत असत व इतरांचा विटाळ मानीत असत. हे अर्थात् इतर लोकांपासून भिन्न राहणारे लोक विचारविषयक वावतींत इतर लोकांशीं तत्सम कोठून होणार? हे ख्रिस्ती जरी झाले तरी इतरांपेक्षांहि निराळेच रहाणार. मूलाचारभिन्नतेस ख्रिस्तीमताची जोड मिळाल्यानंतर या समूहास एका पाखंडी संप्रदायाचें स्वरूप मिळालें. फ्रिजिया, लिकॅओ-निया या एशियामायनरमधील भागांत ते राहत असत आणि भाट आणि मांत्रिक या पेशानें आपली उपजीविका करीत. अथिंगनॉइ यांचा आचारमूलक तुटकपणा हा यांचा हिंदूंशीं संबंध जोडितो आणि त्याच तुटकपणांत आणि उपा-सनाभिन्नतेंत जिप्सींचें आणि यांचें सादृश्य आहे.

जिप्सींनीं स्वतःविषयीं सांगितलेल्या उपर्युक्त कथेंत त्यांनीं आपलें मूलगृह मेक्रन हें दिलें आहे. मेक्रन हा प्रांत बलुचिस्तानांत आहे ही गोष्ट लक्षांत घेतां, आणि सामान्य जनतेहून भिन्नत्व दाखविण्यासाठीं एखादी गोष्ट निर्माण करण्याची पद्धत आणि त्यांतहि विशेषेंकरून भिन्नतेचें कारण कोणाचा तरी शाप होय असें सांगण्याचा प्रकार या गोष्टी भारतीय आहेत हेंहि लक्षांत आणतां जिप्सींच्या कांहीं कथा देखील हिंदुस्थानांत किंवा त्याच्या सरहद्दीवर किंवा हिंदुस्थानी विचारांच्या त्यांच्या मनावर पगडा असतांच तयार झाल्या असाव्यात असें वाटतें.

भाषासाम्य आणि जात्यवगम या वावतींतील फारच मोठी उडी म्हटली म्हणजे मध्यप्रांतांतील झिंजर जात आणि यूरोपांतील झिंगर भाषा यांचा जडविलेला संबंध होय. झिंगर भाषेचें ज्ञान असलें म्हणजे मध्यहिंदुस्थानांतील लोकांशीं बोलतां येतें असें हिंदुस्थानांत प्रवास केलेल्या एका रशियन राजपुत्राचें* म्हणणें आहे.

* Saturday Review Dec. 13. 1876. † मेक्रन नांवाचा एक प्रांत बलुचिस्तानांत आहे. ‡ "The People of Turkey" by a Consul's daughter & wife, edited by Mr Stanley Lane Poole.

* Indian Antiquary, Vol. X. pp. 50-53.

**जिप्सी व गुजराथी.**—वंजारी, डोम, जाट आणि हिंदुस्थानांतून इराणांत पाठविलेले भाट यांच्याशीं जो यूरोपीय संशोधकांनीं जिप्सींचा संबंध जोडला आहे त्या संबंधाच्या पुराव्यापेक्षां अधिक महत्त्वाचा पुरावा या विषयावर विचार करणाऱ्या रा. रमणभाई नांवाच्या एका नागर ब्राह्मण गृहस्थानें पुढें आणला आहे.

रमणभाई यांचा सिद्धांत असा आहे कीं, गुजराथी आणि राजस्थानी या दोन भाषांचें द्वैत स्थापन होण्यापूर्वी जी प्रकृतिरूप भाषा होती तीच जिप्सी यांची मूलभाषा होय. हें मत सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं जो पुरावा पुढें मांडला आहे तो अत्यंत महत्त्वाचा आहे. भारतीयांचा आणि जिप्सींचा संबंध दाखवून तद्विषयक इतकें सूक्ष्म विवेचन करणारा दुसरा निबंध आमच्या पाहण्यांत नाहीं. ग्रिअर्सनचें असें मत आहे कीं, जिप्सी हे पंजावांतील जाटांचे वंशज असावेत. रमणभाई यांनीं 'शूं' हा शब्द विरुद्ध प्रमाण म्हणून पुढें आणला आहे. 'काय' या अर्थी हिंदुस्थानी अगर मराठी शब्द 'क' या व्यंजनानेंच प्रारंभ होणारे आहेत. 'शूं' या शब्दाचें जिप्सी भाषेंतील अस्तित्व आपलें कल्पनाक्षेत्र वरेंच संकुचित करतें. नियमित कालांत, आणि नियमित वर्गापासून जिप्सींचा प्रादुर्भाव झाला असावा याचें तें सूचक आहे. रमणभाई आणि ग्रिअर्सन यांची एकवाक्यता होणें अशक्य आहे असें नाहीं. जिप्सींनीं आपल्या परिभ्रमणांत यूरोपांतील अनेक ठिकाणच्या लोकांचा आपल्यामध्यें समावेश केला आहे, ही गोष्ट यूरोपांत सुप्रसिद्ध आहे. जें यूरोपांत झालें तेंच कांहीं अंशीं हिंदुस्थानांतहि झालें आहे, अशी सध्यांच्या संशोधकांची समजूत आहेच. जाट आणि डोम या दोहोंचें मिश्रण जिप्सींत झालेलें दिसतें, आणि कदाचित नट, भाट, वंजारी इत्यादि जातींतील व्यक्तींचाहि त्यांत समावेश झाला असावा ही कल्पना संशोधकांनीं पूर्वीच व्यक्त केली आहे. पूर्वींच्या संशोधकांचा समज हाच कीं, जिप्सींचें वहिर्देशगमन दहाव्या शतकांत झालें असावें आणि रमणभाई यांनीं केलेल्या भाषाविषयक अभ्यासावरून त्याच कालाकडे वोट दाखवितां येईल. जिप्सींच्या परिभ्रमणाचा रस्ता वलुचिस्तानला नेणाऱ्या वोलनघाटांतून किंवा त्याहून उत्तरेस असलेल्या खैवरघाटांतून असला तरी ज्या प्रदेशांत गुजराथी आणि राजस्थानी यांची प्रकृतिरूप भाषा वोलली जात असे त्या स्थलाहून त्यांच्या परिभ्रमणाला सुरुवात होऊन पुढें मार्ग क्रमण करितांना जाटांचें मिश्रण त्यांच्यांत झालें नसेल कशावरून ? तसें झालें होतें असें धरलें तर रमणभाई आणि ग्रिअर्सन या दोघांची एकवाक्यता होते.

**कनिष्ठाचारप्रवृत्तीचें मूळ.**—आतां जिप्सींच्या परदेशगमनाविषयीं थोडासा विचार निराळ्या तऱ्हेनें करूं. भारतीय परदेशीं गेले असतां त्यांची सांपत्तिक स्थिति कशी काय होते हें पाहून एतद्विषयक कांहीं समाजशास्त्रीय तत्त्व सिद्ध होतें कीं काय हें पाहिलें पाहिजे.

जेव्हां एखादी जात जेथें अत्यंत भिन्न अशी समाजरचना आहे अशा परकीय देशांत जाते तेव्हां तिला तेथील निरनिराळ्या धंद्यांत पडण्यास अनेक अडचणी उत्पन्न होतात. नवीन ठिकाणची विद्या आणि भाषा यांचें ग्रहण झालें नाहीं तर ते परदेशीं गेलेले लोक अत्यंत निकृष्ट अशा स्थितींत जातात. जेव्हां संस्कृत विद्येचा आपल्याच देशांत ऱ्हास होऊं लागला तेव्हां अनेक वैदिक शास्त्री आणि श्रौती, भिक्षेकरी, स्वैंपाकी किंवा फराळाचे दुकानदार वनलेले आपण आपल्या डोळ्यांसमोरच पाहिले आहेत. लोकांनीं येथून इराणाकडे आणि एशियामायनरकडे गमन केलें तें सामुच्चयिक केलें त्यामुळें तेथील लोकांत मिसळून जाण्याची आवश्यकता किंवा संधि देखील त्यांनां कमी मिळाली असावी आणि त्यांचा सोंवळेपणा वराच कालपर्यंत टिकला असावा.

इतर जनतेमध्यें अनेक धंद्यांत पडण्यासाठीं अवश्य असणाऱ्या शिक्षणाचा अभाव, लोकांचें दैव सांगण्याचें काम करितांना होणाऱ्या प्राप्तीची सोय, सोंवळेपणाची भावना या सर्व कारणांनीं या भारतीयांच्या समाजाचें स्वरूप कांहीं निश्चित प्रकारचें वनलें असावें. आजचे धंदे पाहिले म्हणजे तेच धंदे त्यांचे पूर्वापार होते असें म्हणतां येत नाहीं. कां कीं, परकीय मनुष्यास पोट भरण्यास क्षेत्र कांहीं नियमित प्रकारचेंच असतें. आज जुन्या तऱ्हेचा सुशिक्षित मनुष्य जर परक्या देशांत गेला तर त्यास जीवनास उपयुक्त अशी कोणतीहि कला येत नसावयाची आणि त्यास मिळालेल्या वाङ्मयविषयक शिक्षणाचा उपयोग त्यास इतरत्र करितां येणार नाहीं. शिवाय सुशिक्षित मनुष्य अंगमेहनतीला देखील कमी तयार असणार. इत्यादि गोष्टींमुळेंच कांहीं थोड्यावहुत इंग्रजी शिक्षणानें सुशिक्षित झालेल्या यूरोपांत व अमेरिकेंत गेलेल्या हिंदूस हस्तसामुद्रिक किंवा फलज्योतिष इत्यादि विद्यांवर पोट भरावें लागतें ही गोष्ट वैयक्तिक परिभ्रमणांत जर आज दिसून येत आहे तर प्राचीन सामुच्चयिक परिभ्रमणांत कां दिसून येणार नाहीं ? अशा लोकांनां या धंद्यांपलीकडे जर कांहीं कामें करवयाचीं झालीं तर पशुपालनासारखीं, कीं त्यांत अत्यंत थोड्या कुशलतेची जरूर आहे अशींच कामें मिळणार. यांचें कलाकौशल्य जर लोकांच्या नेहमींच्या उपयोगाचें नसेल तर त्यास भटकत हिंडावें लागणार. जिप्सी चोहोंकडे भटकतात याचें कारण आर्थिक आहे. या जातींच्या अंगांत किंवा रक्तांत कांहीं निराळेपणा आहे हें नव्हे. जेथें नवीन धंदा शिकण्यास शाळा नसत. आणि कोणासहि धंदा शिकावयाचा झाल्यास यूरोपांतील श्रेणीं ( Guilds ) मुळें अनेक अडचणी उपस्थित होत असत, तेथें नवीन धंदे शिकणें देखील जड जात असे.

आज श्रेणी जरी मृत झाल्या आहेत तरी श्रेणींनीं उत्पन्न केलेली भावना मृत झाली नाहीं. अजून देखील यूरोपांत कलाकौशल्याचे धंदे शिकण्यास आपल्या विद्यार्थ्यांस काय अडचणी उत्पन्न होतात आणि पुष्कळ ठिकाणीं विद्यार्थ्यांस साहाय्य करण्यास सरकारी प्रयत्न देखील कसा फुकट जातो हें आपण पाहतोंच. इंग्लंडपेक्षां पूर्व यूरोपांत गिल्ड पद्धति फारच कडक असे. एका धंद्यांतील मनुष्याचा दुसऱ्या धंद्यांत प्रवेश होणें फ्रान्समधील राज्यक्रांतीच्या पूर्वी किती कठिण असे आणि एक धंद्याचा मनुष्य दुसऱ्या जरा खालच्या धंद्यांतील मनुष्याकडे आपण जणूं काय स्वर्गांत बसलों आहों आणि दुसरा नरकवासी आहे इतक्या तुच्छतेनें कसा पहात असे हेंहि आपणांस परिचित आहे. अशा सामाजिक पद्धतीच्या कालीं स्वसंरक्षणाची जबाबदारी असलेल्या या जिप्सींनां अनेक हलकीं कामें करावीं लागलीं, घाणेरड्या संवयी जडल्या आणि त्यांच्या सोंवळेपणाचें पर्यवसान मृतपशुमांसादनांत झालें यांत नवल तें कोणतें? या गोष्टी सांगण्याचा हेतु हा कीं, जर जाट लोकांसारखे शूर लोक घाणेरडीं कामें करतांना दृष्टीस पडले तर त्यावरून हिंदुस्थानांतील एखादी घाणेरडी जात त्यांत संमिश्र झाली असेल असें खात्रीपूर्वक म्हणतां येणार नाहीं हें लक्षांत यावें; आणि आपल्या विविध कालच्या आणि विविध प्रकारच्या परदेशगमनापासून काय काय परिणाम होत गेले याची यथार्थ कल्पना व्हावी. आज परदेशीं गेलेल्या लोकांची पुढेंमागें स्थिति जिप्सींच्या सारखीच होईल कीं काय असा विचार आपल्या मनांत उभा राहतो आणि यासाठीं अर्वाचीन परदेशगमनाचें सविस्तर ज्ञान आपण करून घेतलें पाहिजे. अर्वाचीन परदेशगमनाचा इतिहास जिप्सींच्या इतिहासाप्रमाणेंच अनेक दुःखदायक गोष्टींनीं भरला आहे.

---

## प्रकरण ९ वें.

### अर्वाचीन परदेशगमन-आफ्रिका आणि अमेरिका येथील वसाहती.

आफ्रिका व अमेरिका या खंडांत आपली वसाहत स्थापन करण्याच्या कार्यास १९ व्या शतकाच्या पूर्वार्धांत सुरुवात झाली. अमेरिकेंत आपला पूर्वी प्रवेश झाला होता असें पेरु येथील पांच राजपुत्रांच्या एका बायकोच्या गोष्टीवरून त्यांचा आणि पांडवांचा संबंध जोडून विधान करण्यांत येतें. शिवाय नॅडिलॅगच्या पुस्तकामध्यें त्यानें मेक्सिकोमध्यें आढळलेल्या गणपतीसारख्या कांहीं मूर्तींचीं चित्रें छापिलीं आहेत त्यामुळें सुपीक डोक्याच्या पाश्चात्त्य व हिंदू मंडळींनां त्यावरहि तर्कटें रचण्यास बरीच जागा झाली आहे. त्यांच्या संबंधानें आम्ही येथें विचार करीत नाहीं.* तेथें भारतीयत्वाचा आज मागमूसहि नाहीं आणि तेथें आपण गेलों असतां आपल्याच रक्ताचीं हीं माणसें म्हणून आपलें स्वागत करण्यास पूर्वकालीनांच्या अस्तित्वांत असलेल्या किंवा नसलेल्या वसाहतीचे वंशजहि कोणी नाहींत. म्हणून आपला त्या अमेरिकेंतील भागाशीं कांहींच संबंध १९ व्या शतकापूर्वी नव्हता असें आपण धरून चालूं. आफ्रिकेशीं मात्र कांहीं संबंध पूर्वीपासून दिसत आहे; आणि कांहीं अंशीं तो एकसारखा चालू आहे. तथापि एक गोष्ट नवीन आहे ती ही कीं, व्यापारासाठीं परदेशीं जाणारे लोक थोडे असतात. हे लोक म्हणजे वसाहत करणारे नव्हत. व्यापारासाठीं जाणारी वस्ती म्हणजे तात्पुरती होय. शेतकरी बनतात ते जमिनीस अधिक चिकटतात. यासाठीं व्यापारप्रधान परदेशगमनापेक्षां कृषिप्रधान परदेशगमन अधिक महत्त्वाचें व अधिक विचार करण्याजोगें होय.

---

* **हिंदू लोक व अमेरिका.**—हिंदू लोकांनीं अमेरिकेंत ख्रिस्तशकारंभापूर्वी तेराव्या शतकांत पाय ठेवला असावा, मिसिसिपीच्या खोऱ्यांत व आसपासच्या क्षेत्रांत या लोकांनीं वसाहत केली असावी व ही वसाहत पुष्कळ भरभराटीस आली असावी इत्यादि तर्क कांहीं पुराणवस्तुसंशोधकांनीं केले आहेत. अशा प्रकारचे तर्क करणाऱ्या पंडितांत अलेक्झांडर डेल मार, न्यूयॉर्कच्या लॅटिन अमेरिकन व्यापार-मंडळाचे एक जुने अध्यक्ष, हे प्रमुख आहेत. यांनीं या विषयासंबंधानें कांहीं वर्षांपूर्वी इंडियन रिव्ह्यु मासिकांत (सप्टेंबर १९१२) जो एक लेख लिहिला त्यांतील तर्कसाधनसामग्री व तर्क संक्षेपतः खालीं दिले आहेत.

**तर्कसाधनसमुदाय.**—(१) मिसिसिपीच्या व तिला मिळणाऱ्या नद्यांच्या खोऱ्यांत, सरोवरप्रदेशापासून तों मेक्सिकोच्या आखातापर्यंत असलेलीं मोठालीं मातीचीं कामें: (अ) लिटल मिआमी नदीपाशीं असलेली १० ते २५ फूट उंचीची व ४ मैल लांबीची अजस्र भिंत अथवा टेंकडी. (अशा प्रकारच्या लहानमोठ्या भिंती इतरत्रहि आहेत.) (आ) ओहिआमध्यें ब्रशक्रीकपाशीं असलेलें सर्पाकृति टेंकाड. याची लांबी १००० फुटांवर असून या सर्पाच्या तोंडांत असलेल्या अजस्र अंड्याचीं मापें १६०×८० फूट अशीं आहेत. (इ) पुष्कळ टेंकाडांत बुद्ध, कृष्ण यांसारख्या मूर्ती सांपडल्या आहेत. (ई) बिग टोको माउंड (टेनेसी) येथें १८८२ त सांपडलेली (शिरोविहीन) बुद्धसदृश मूर्ति ज्या कूर्मपृष्ठावर कोरलेली आहे त्याजवर एक स्वस्तिकाकृतीहि आहे. (उ) सोपो (न्यू ग्रॅनडा) येथील एका टेंकाडांत ४×२$\frac{1}{2}$ (इंच) लांबीरुंदीची व $\frac{1}{2}$ इंच जाड अशी एक काळ्या रंगाची कठिण वीट सांपडली आहे. या विटेवर दोन्ही बाजूंनां कोरींव आकृती आहेत. या आकृती म्हणजे, द्विमुखी पुरुष, वसकी टोपी घातलेला पुरुष, खालीं नजर केलेली स्त्री, साधु, वेडूक वगैरे आहेत. विटेच्या दोन्ही बाजूंवर एकेक पटाची आकृति आहे. या पटांत दोन मोठे सारखे खाने असून प्रत्येक खान्याचीं चार घरें केलीं आहेत व या प्रत्येक घराचे दोन सारखे भाग

आतां अर्वाचीन परदेशगमनाचा इतिहास पहावयाचा. अर्वाचीन परदेशगमनामध्यें ज्या देशाकडे आपल्या लोकांचे पाय अधिक फिरतात किंवा पूर्वी फिरले आहेत, ते देश म्हटले म्हणजे सिलोन, स्ट्रेट्स सेटलमेंट्स, फेडरेटेड

(मागील पानावरून पुढें चालू.)

केले आहेत. (ऊ) सिनसिनाटी (ओहिओ) येथें एका टेंकाडांत १८४१ सालीं करड्या रंगाचा ८ इंच लांब ३/४ इंच जाड असा स्लेटीचा तुकडा सांपडला. या स्लेटपाटीवर मध्यभागीं आठ आकृती कोरल्या असून त्यांपैकीं एक चतुष्टय दुसऱ्या चतुष्टया-सारखें जवळजवळ दिसतें; आणि ही प्रत्येक आकृति कसली तरी गांठ दिलेल्या दोरीचें चित्र म्हणून काढलेली दिसते. पाटीच्या रुंदीच्या दोन्ही बाजूंनां आठ आठ तिरप्या रेषा मधील आकृति-अष्टकाच्या मर्यादारेषेला लागून काढलेल्या आहेत, व या रेषांच्यापुढें अगदीं टोंकाला चोवीस बारीक रेषा सरळ काढ-लेल्या आहेत. (ऋ) ब्राह्मणधर्माचीं सुस्पष्ट चिन्हें मेक्सिको, मध्य-अमेरिका, व दक्षिण-अमेरिका या प्रदेशांत जागजागीं सांपडतात (?) (ॠ) कर्नल दु प्रे यांनीं केलेलें आर्कान्ससमधील एका मोठ्या कालव्याचें (१५० मैल लांब १०० फूट रुंद) वर्णन वाचण्यासारखें आहे. ज्या लोकांचीं हीं टेंकाडें आहेत त्यांनींच हा कालवा बांधला असावा.

(२) उत्तर आशियांत हिंदुस्थानांतील हिंदूंचे पूर्वज पूर्वकाळीं राहत होते. उत्तर आशियांत पंचांग-शिला सांपडतात व या शिलांचें वर्गीकरण पुराणवस्तुशास्त्रज्ञांनीं येणेंप्रमाणें केलें आहे:— (अ) अष्ट-मास वर्षाचें पंचांग शामन काळांतील, (आ) दश-मास पंचांग ब्राह्मण काळांतील, (इ) द्वादश-मास पंचांग कृष्ण किंवा बुद्ध यांच्या काळांतील. शामन काळानंतर ब्राह्मणकाळ, त्यानंतर बुद्ध (कृष्ण) काळ. शामन काळापूर्वी जुनें २४ पक्षांचें चांद्र वर्ष प्रचारांत असे. शामन धर्म म्हणजे सूर्यपूजेचा धर्म. मंगोलियांत (उत्तर आशिया) हा संप्रदाय प्रचलित होता. या धर्माचा ऱ्हास होऊन तेथें ब्राह्मणधर्माचा प्रसार (अथवा पुन:प्रसार म्हणतां येईल) झाला. महाभारतीय युद्धाचे काळांत उत्तर आशियांतील लोकसमाज त्या युद्धप्रसंगाच्या प्रत्यक्ष अप्रत्यक्ष परिणामानें इतस्तत: विखरले व दूर दूर देशांत गेले. महाभारत-युद्ध इ. स. पू. १३।१४ वे शतकांत झालें. या काळानंतर लवकरच अथवा या काळाच्या सुमारास लोखंडाचा शोध उत्तर आशियांत लागला.

अलेक्झांडर डेल मार यानें वर दिलेला (१) मधील दृश्य किंवा दृष्ट वस्तुसमूह व (२) मधील वस्तु–इतिहास व लोककथां-वर इतर पंडितांनीं बसविलेल्या कल्पना, या सामग्रीच्या व इतर कांहीं गोष्टींच्या आधारानें 'अमेरिकन माउंड बिल्डर' (अमेरिकेंतील जुनीं मातीचीं टेंकडें बांधणारे लोक) कोण असावे यासंबंधानें विचार केला व कांहीं तर्क प्रकट केले ते येणेंप्रमाणें:–(अ) मिसिसिपी खोऱ्यांतील टेंकाडांची सूक्ष्म तपासणी करितां हीं टेंकाडें बांधणारे लोक या प्रदेशांत एका काळीं जिकडे तिकडे पसरले असून त्यांची संख्या मोठी होती, त्यांचे सर्वांचे धर्म, राहणी, व राज्यरीति एकच होतीं, ते अर्ध-संस्कृत होते व त्यांच्यानंतर हा प्रदेश व्यापणाऱ्यांसारखे ते रानटी नव्हते, हें सिद्ध झालें आहे. (आ) या प्रदेशांतील नद्यांच्या जुन्या बांधीव तीरप्रदेशांची भूस्तरविषयक पाहणी करतां हें बांधकाम २।३ हजार वर्षांचें जुनें असावें असें ठरलें आहे. (इ) टेंकाडांतून हिंदू देवतांच्या मूर्तींसारख्या देवता-मूर्ती सांपडतात; सिनसिनाटीच्या पाटीवरील ज्या तिरप्या आठ आठ रेषा त्या अष्ट-मास-वाचक व ज्या चोवीस चोवीस लहान सरळ रेषा त्या २४ चांद्रपक्षांच्या वाचक व जीं मधील आठ ग्रन्थिचित्रें तीं मास-शब्दसूचक (मासदेवतासूचक) आहेत किंवा असावींत असें ठरलें आहे. [टेंकाडें बांधणाऱ्या नंतरचे जे पेरुविअन लोक, त्यांच्यांत सूत्र-ग्रन्थींनीं विचार-'लेखन' करीत असत, हिब्रु लोकांत पूजासमयीं ग्रन्थियुक्त शालींचा अशाच प्रकारें उपयोग होत असे. यावरून सिनसिनाटीच्या पाटीवरील ग्रन्थिचित्रें मास-शब्दसूचक असावींत असा तर्क आहे.] उत्तर आशियांत मंगोलियांत २४ चांद्रपक्षाच्या शामन-पूर्व पंचांगाचा व अष्ट-मास शामन पंचांगाचा अशा दोहोंचा प्रचार शामनधर्माच्या उत्तरकाळांत संभवतो. यावरून सूर्यपूजक शामन पंचांगकारानें सिनसिनाटीची पंचांगपाटी तयार केली असावी; मंगोलियांतून महाभारतयुद्धाचे सुमारास शामन हिंदू अमेरिकेंत मिसिसिपी प्रदेशांत गेले असावे; कारण या युद्धाचे सुमारास उत्तर आशियांतील लोकांची पांगापांग झाली हें अन्य पुराव्यावरून ठरलें आहे. महाभारत युद्ध इ. स. पू. सुमारें १३०० शे च्या सुमारास झालें असावें तेव्हां वरील (आ) सिद्धांत या (इ) मधील सिद्धांतास पुष्टिकारक आहे तसेंच (अ) सिद्धांतहि पुष्टिकारक आहे. वर (तर्क १ आ) मधील सर्प व अंडें सौरवर्षाचें प्रतीक दिसतें. तेव्हां तेंहि शामनांचें (सूर्य-पूजकांचें) मिसिसिपी खोऱ्यांतील वास्तव्यच सिद्ध करतें. (ई) महाभारताच्या फार पूर्वी अमेरिकेंत हिंदू लोक आले नसावे; कारण तसें असतें तर अमेरिकेंत फक्त शामन-पूर्वकालीन २४ चांद्र-पक्षांचें पंचांगच उपलब्ध झालें असतें; महाभारताच्या-नंतर फार दिवसांनींहि हिंदूंचें अमेरिकेंत प्रयाण झालें नाहीं; कारण असें असतें तर उत्तर आशियांत यावेळीं जो लोखंडाचा शोध लागला होता त्या शोधाचा उपयोग अमेरिकेंतील टेंकाडें बांधणाऱ्यांनीं केला असता. यांच्या टेंकाडांत लोखंडाचा त्यांनीं उपयोग केल्याचें मुळींच चिन्ह नाहीं. (उ) न्यू ग्रानाडा येथील वीट ही पंचांग-पाटीच असून अष्ट-मास वर्षाचीं चिन्हें तिजवर आहेत असें ठरलें आहे [पंचांग-पाटीवरील पटाचे दोन मोठे भाग ते वर्षार्धदर्शक असून प्रत्येक वर्षार्धात चार चार मास, प्रत्येक मासांत दोन पक्ष अशी पटांतील घरांची वाचणी आहे. ताओ धर्मीयांचीं पांच अष्ट-मास पंचांगें पारिसच्या म्युझे गिमे या पदार्थसंग्रहालयांत आहेत; बाबिलोनचें एक अष्ट-मास पंचांग ब्रिटिश म्युझियममध्यें आहे.] तेव्हां सिन-सिनाटीच्या पाटीवरून बसविलेल्या तर्काला ही पाटी पुष्टिकारक आहे. मात्र तिजवर ज्या प्राण्यांच्या आकृती आहेत त्यावरून ही पाटी सिनसिनाटी पाटीपेक्षां अलीकडील असावी असें म्हणावें लागतें. जुन्या शामनधर्मात, हिब्रू, महंमदी व वैदिक (?) धर्मात प्राण्यांच्या आकृति कोरणें निषिद्ध मानलें जात असे. तेव्हां

मलाया स्टेट्स, नाताळ, मॉरिशस, त्रिनिदाद, ब्रिटिश गियाना, फिजी, हे होत. यांपैकीं स्ट्रेट्स सेटलमेन्ट्स आणि फिजी खेरीज करून प्रत्येक देशांत भारतीयांची संख्या एक लाखाहून अधिक आहे. या ठिकाणीं इतकी वस्ती होण्याचें कारण करारानें बांधून भारतीयांस इतरत्र नेण्याची पद्धति होय. या भारतीय परदेशगमनाचा इतिहास उष्ण प्रदेशांत आपलें भांडवल गुंतवूं इच्छिणाऱ्या यूरोपांतील लोकांशीं निगडित

(मागील पानावरून पुढें चालू.)

सिनसिनाटी पाटी जुनी व ग्रानाडा पाटी अलीकडील असें यावरून होतें.

अलेक्झांडर डेल मार यानें उपलब्ध दृश्य व दृष्ट वस्तूंवरून व इतर पंडितांनीं बसविलेल्या तर्कावरून विचार करून शामन हिंदु मिसिसिपी प्रदेशांत मंगोलियांतून आले असावे असा तर्क केला. तेव्हां ते आले असावे कोणत्या मार्गानें यासंबंधानेंहि कांहीं कल्पना करणें डेल मार यास जरूरीचें भासलें. या मार्गासंबंधानें शोध करतां १७५० मध्यें लुइसिआनामधील फ्रेंच मिशनऱ्यांनीं काढलेल्या एका मार्गाच्या शोधाची हकीकत डेल मार यास उपयोगाची वाटली व या हकिकतीचा आधार घेऊन यानें अशी कल्पना बसविली आहे कीं, वरील शामन लोक हे पासिफिक मार्गानें कोलंबिया नदीच्या मुखापाशीं येऊन या मुखानें कोलंबिया नदीच्या वाटेनें ते मिसिसिपी खोऱ्यांत आले असावे. तसेंच कोलंबिया नदीच्या मुखाप्रमाणें ब्रिटिश कोलंबिया, ऑरेगन, कॅलिफोर्निया या संस्थानांतील पासिफिक किनाऱ्यावरील कित्येक जागांचाहि शामन लोकांनीं अमेरिकेंत प्रवेश करण्याच्या कामीं उपयोग केला असावा, अशीहि, डेल मार याची कल्पना दिसते.

वर सांगितलेल्या फ्रेंच मिशनऱ्यांच्या शोधाची हकीकत अशी: पासिफिक किनाऱ्यावरून तद्देशीय लोक लुइसिआनाकडे येतात तो मार्ग इतर मार्गाहून वेगळाच आहे असें या मिशनऱ्यांच्या कानीं आल्यावर यांनीं एक इंडिअन या मार्गाचा तपास लावण्याच्या कामीं योजिला. हा इंडियन नेटिवांच्या मार्गाचा माग काढीत मिसूरी व कोलंबिया या नद्यांच्या बाजूनें समुद्रापर्यंत जाऊन पोहोंचला. कोलंबियाच्या मुखापाशीं त्याला एक शिडाचें जहाज आढळलें. या जहाजावरील लोकांनां लांब शेंड्या असून हे लांब शेंडीवाले लोक कोलंबिया नदीची वाळू धुण्याचें व त्यांतील सोन्याचे कण बाजूला काढण्याचें काम करीत असलेले त्यास दिसले.

डेल मार याचा यावरील तर्क असा कीं, हे लांब शेंडीवाले लोक चिनी किंवा मांचूरी असावे.

ब्रिटिश कोलंबिया, ऑरेगॉन, कॅलिफोर्निया यांच्या किनाऱ्यावरहि जागजागीं वर सांगितलेल्या जहाजासारख्या जहाजांचे तुकडे सांपडतात.

हे तुकडे व वरील इंडिअनाची जहाजाची हकीकत यांजवर शामन लोकांच्या मोंगोलिया-मिसिसिपी प्रवासमार्गासंबंधीचा डेल मार याचा तर्क आधारलेला आहे, हें वर आलेंच आहे.

आहे. उष्ण प्रदेशांत व्यवहार करूं इच्छिणाऱ्या भांडवलवाल्यांचीं यूरोपांत अनेक वृत्तपत्रें आहेत. त्यांत 'वेस्ट इंडीज कमिटी सर्क्युलर' आणि 'ट्रापिकल लाइफ' यांचीं नांवें हिंदुस्थानांत अधिक परिचित आहेत. परदेशगमन करणाऱ्या लोकांवर लक्ष ठेवण्यासाठीं आणि त्यांची माहिति आपल्या देशांत पसरविण्यासाठीं ज्या चळवळी आपल्या देशांत उत्पन्न झाल्या त्यांचें निदर्शक मद्रासचें 'इंडियन एमिग्रंट' नांवाचें एक मासिक प्रसिद्ध होत आहे. परदेशस्थ लोकांची माहिती पुरविण्याचें काम 'मॉडर्न रिव्ह्यु' हें मासिकहि चांगल्या तऱ्हेनें करीत असतें. मद्रासच्या 'इंडियन रिव्ह्यू'चीहि कामगिरी विसरतां येण्याजोगी नाहीं. वर सांगितलेल्या ठिकाणांपैकीं बऱ्याच ठिकाणीं भारतीयांची वस्ती करारानें बांधून नेलेल्या मजुरांमुळें झाली आहे, तरी सर्वच ठिकाणची प्रथमची वसाहत केवळ मजुरांमुळें उत्पन्न झालेली नव्हे. डार्विननें आपल्या जगाच्या प्रवासांत १८३९ सालीं मॉरिशस येथें मुक्काम केला असतां तेथें त्याला सुमारें १२०० हिंदू लोक आढळले. ते तेथें कैदी म्हणून पाठविले होते. तथापि ते कोणी हलके कैदी नसून इंग्रजी हुकुमास आपल्या धार्मिक समजुतीमुळें न जुमानणारे लोक होते; आणि त्यांच्या डोळ्यांत विलक्षण तेज चमकत होतें. त्यांची तुलना गुन्हेगार इंग्रजांशीं करणें अयोग्य आहे असें डार्विन म्हणतो. जे लोक नोकरीकरितां म्हणून दूर गेले ते सर्वच पोटाच्या आशेकरितां गेले असें म्हणवत नाहीं. सुमारें ५० वर्षांपूर्वीं चार्लस किंग्सले यानें वेस्ट इंडीजमध्यें जो प्रवास केला त्याचें वर्णन देणारा त्याचा ग्रंथ 'वेस्टवर्ड हो' (Westward Ho) म्हणून आहे. त्या ग्रंथांत पन्नास वर्षांपूर्वींच्या त्रिनिदाद येथील हिंदूंचें मोठें हृदयंगम वर्णन आलें आहे. त्यांत तो म्हणतो कीं, सत्तावन सालच्या बंडांत इंग्रजांविरुद्ध शस्त्र उचललेले अनेक शिपाईबाण्याचे लोक आपलें अनिष्ट भवितव्य चुकविण्यासाठीं निसटून त्रिनिदाद येथें आले आहेत. ब्रिटिश गियाना येथील हिंदूंच्या वसाहतीसंबंधानें आणखी माहिती देणारीं पुस्तकें म्हटलीं म्हणजे रॉडवेक्कृत 'ब्रिटिश गियानाचा इतिहास', हेनरि कर्ककृत तेथील अनुभवांचें पुस्तक आणि त्यापेक्षांहि जास्त मनोरम आणि विस्तृत माहिती देणारें ब्रॉंकहर्स्टचें पुस्तक होय. ब्रॉंकहर्स्टनें तद्देशस्थ हिंदूंची जितकी विविध माहिती दिली आहे तितकी दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथकारानें दिली नाहीं. त्यांत त्यानें ज्या अनेक जातींचें वर्णन केलें आहे, त्यावरून असें दिसतें कीं तेथें ब्राह्मणहि पुष्कळ होते, तथापि त्या ब्राह्मण म्हणविणारांपैकीं अनेक ठिकाणचे लोक ब्राह्मण नसावेत अशी कल्पना करण्यास पुष्कळ जागा त्यानेंच उत्पन्न करून दिली आहे. ब्रॉंकहर्स्ट म्हणतो, सेंट लुसिया बेटांतील सर्वच हिंदूंनीं आपली जात ब्राह्मण म्हणून लिहून दिली आहे; आणि यावर तो असें उद्गारतो कीं सर्वच जर उपाध्ये तर सामान्य जन कोण?

तेथील ल्हान ल्हान दागिने करणाऱ्या सोनारांचीं, निग्रो आणि क्रिओल पोरांनां चटक लावणाऱ्या जिलब्या करणाऱ्या हलवायांचीं, आपली जातच वैद्य म्हणून सांगणाऱ्या लोकांचीं, लेखकाची नोकरी मिळविण्याची आकांक्षा करणाऱ्या तथापि इंग्रजीच्या अज्ञानामुळें ज्यांचा उपयोग होत नाहीं अशा कायस्थांचीं, तसेंच आपल्या घटपटादि खटपट करण्याच्या शिक्षणपद्धतीनें आणि वादविवादपद्धतीनें ब्रॉंकहर्स्टसारख्या भोळ्या मिशनऱ्यास वादविवाद करून पंचाइतींत पाडणाऱ्यांचीं वर्णनें ब्रॉंकहर्स्टच्या ग्रंथांत आलीं आहेत. नाताळ येथील आणि तसेंच मॉरिशस येथील हिंदुसमाजाचें वर्णन करणारे ग्रंथ दृष्टीस पडले नाहींत. तथापि सामान्य प्रवासवर्णनांत मधून मधून भारतीयांच्या स्थितीचीं सूचक वर्णनें किंवा उल्लेख येतात. असो.

वरील तुरळक उदाहरणें सोडून देतां हें निर्विवाद आहे कीं, या वसाहतींत हिंदुस्थानी लोकांचें संख्यावाहुल्य, एशियांतून "कूली" नेण्याच्या पद्धतीमुळें आहे; आणि भारतीयांची परदेशांतील दशा समजण्यास या कूलीपद्धतीचा थोडासा इतिहास समजून घेतला पाहिजे.

**कूली पद्धतीचा इतिहास.**—वेस्ट इंडीजमध्यें सर्वच हिंदुस्थानी लोकांस कूली हा शब्द लावण्यांत यतो. परंतु 'कूली' हा शब्द विशेषतः हिंदुस्थानांतील व चीन देशांतील जे लोक इतर देशांत मजुरी करण्यासाठीं जातात त्या लोकांनां लावतात. हा शब्द जरी हिंदुस्थानांतील 'कोळी' या जातिवाचक शब्दापासून बनला आहे तरी त्याचा अर्थ पुढें मजूर असा झाला. कां कीं मुंबईच्या इंग्रजांस पहिले मजूर कोळ्यांतले मिळाले*. चिनी पंडितांनीं या शब्दावर हा देश्य शब्द आहे असें समजून भाष्य केलें आहे तें असें: कु=श्रम, किंवा स्नायू; ली=भाड्यानें देणें.† हिंदुस्थान व चीन या देशांची लोकवस्ती फार असल्यामुळें येथीलच लोक दुसऱ्या देशांत जातात.

इ. स. १८४४ त गियाना येथील इंग्लिश वसाहतवाल्यांनीं चिनी मजुरांनां उघडपणें प्रोत्साहन दिलें; गुलामांचा व्यापार बंद झाल्यावर पेरु व क्युबा येथील लोकहि चिनी मजुरांनां आपल्या प्रांतांत नेण्याविषयीं प्रयत्न करूं लागले. सात किंवा आठ वर्षांच्या करारानें चिनी मजुरांनां नेण्यांत येत असे; प्रत्येक मजुराला प्रत्येक महिन्यास १७ शिलिंग व त्याशिवाय अन्नवस्त्र पुरविण्याचा ठराव असे; परंतु पेरु देशांत या मजुरांनां फार निष्ठुरतेनें वागविण्यांत येत असे. पेरु व क्युबा येथें या मजुरांचा गुलामांप्रमाणें लिलांव करण्यांत येई. विशेषतः चिंचा बेटांत ज्या मजुरांनां पाठविण्यांत येई त्यांचे फार हाल होत असत. कांहीं मजूर त्यांतून मुक्तता होण्यासाठीं आत्महत्या करीत. एकदां चीनमधून नेलेल्या ४००० मजुरांपैकीं पांच वर्षांनीं एक देखील जिवंत नव्हता. इ. स. १८५४ त हांगकांगच्या इंग्लिश गव्हर्नरानें चिंचाबेटांत मजूर पाठवूं नये असा ठराव केला. यामुळें या निर्दय पद्धतीच्या व्यवहारास बराच प्रतिबंध झाला.

नंतर चिनी मजुरांनां नेण्याचें काम मकाउ येथील पोर्तुगीज वसाहतवाले करूं लागले; व या ठिकाणाहून पेरु, क्युबा वगैरे देशांतील लोक या मजुरांनां नेऊं लागले. मजूर व त्यांनां विकत घेणारे लोक यांमधील ठराव मकाउच्या रजिस्ट्रार जनरलच्या समक्ष होत असत. मकाउ येथील कूलींच्या व्यापारांतील अमानुष कृत्यें कमी करण्याविषयीं पोर्तुगीज लोकांनीं नियम केले. फ्रान्स, इंग्लंड व चीन या देशांच्या प्रतिनिधींनीं पांच वर्षांनीं मजुरांनां परत पाठवावें असें ठरविलें; परंतु वेस्ट इंडीजच्या वसाहतवाल्यांनीं या गोष्टीस हरकत केली; त्यांनां कायमचे मजूर पाहिजे असल्यामुळें, वेस्ट इन्डीज व चीन यांमधील कायदेशीर मजुरांचा व्यापार बंद झाला. नंतर ब्रिटिश वसाहतींनां मजुरांचा पुरवठा फक्त हिंदुस्थानांतूनच होऊं लागला. तथापि मलाया स्टेट्स वगैरे पूर्व आशियांतील भागांत दरवर्षी हजारों चिनी मजूर अद्यापि जातात.

अठराव्या शतकापासून तामिळ मजूर स्ट्रेट्स सेटलमेंट्स व तेनासरीम वगैरे ठिकाणीं जात असत; परंतु इ. स. १८३६ त या व्यापाराविषयीं सरकारनें नियम केले. मजुरांनां नेण्या-बद्दल परवाना घेतला पाहिजे, पांच वर्षांपेक्षां अधिक काम त्यांच्यापासून घेऊं नये, प्रत्येक मजुराला सर्व अटी नीट समजावून सांगाव्या वगैरे गोष्टी ठरविण्यांत आल्या. हिंदुस्थानांतून २५ हजारांपेक्षां अधिक मजूर १८३८ पर्यंत मारिशसला गेले हें पाहून हिंदुस्थानसरकाराला काळजी वाटूं लागली. ब्राऊहॅम वगैरे लोकांनीं या व्यापाराचा निषेध केला; व बंगाल सरकारनें मजुरांचा व्यापार बंद ठेऊन तें त्याच्या दुष्परिणामांचा शोध करूं लागलें. इ. स. १८४४ त वेस्ट इंडीजमध्यें मजूर पाठविण्यास हिंदुस्थानसरकारनें आपली मंजुरी दिली. दुसऱ्या देशांतून गेलेल्या मजुरांचें योग्य संरक्षण करण्याबद्दल ज्या देशांनीं तजवीज केली असेल त्याच ठिकाणीं हिंदुस्थानांतील मजुरांनीं जावें असें इ. स. १८८३ त ठरविण्यांत आलें. मजुरांनां सर्व अटी नीट समजावून देण्यांत येतात, व त्यांची बरीच काळजी घेण्यांत येते. कलकत्ता, मद्रास, मुंबई व कराची या ठिकाणांहून मजुरांनां ब्रिटिश वसाहतींत पाठविण्यांत येतें. पाठविण्यापूर्वी ते शरीरानें सुदृढ आहेत किंवा नाहींत हें पाहण्यांत येतें. १८९१ पासून १९०१ पर्यंतच्या मुदतींत ब्रिटिश गियाना, त्रिनिदाद, जमेका, मॉरिशस, फिजी वगैरे ब्रिटिश वसाहतींत मजूर पाठविण्यांत आले. ते बहुधा दहा वर्षांच्या करारानें पाठवितात; व मुदत संपल्यावरोबर त्यांनां परत पाठविण्याची सोय करण्याचें ठरलेलें असतें.

इ. स. १९०० मध्यें एकंदर सर्व ब्रिटिश वसाहतींत ६,२५,०० हिंदी मजूर होते; यांपैकीं बहुतेक मजूर मॉरिशस व ब्रिटिश गियानामध्यें होते. एक मुख्य एजंट नेमलेला असून त्याच्या हाताखालीं मजुरांनां तपासणारे डॉक्टर व मजूर गोळा करणारे लोक असतात. कामाची वेळ, मुदत व मजुरी ठरविण्याचें काम याच लोकांकडे असतें.

* मरे याचा इंग्रजी ऐतिहासिक कोश पहा. † डॉ. मेरी रावर्टस्–कूलीज व चिनी लोकांच्या आगमनावरील ग्रंथ, न्यूयार्क १९१९ पहा.

युगांडा येथील रेल्वे तयार करतेवेळीं पंजाबमधून अनेक मजूर पाठविण्यांत आले. न्यासालँड येथें सरकारी कामें करण्याकरितांहि मजूर पाठविण्यांत येतात. इ. स. १९०४ मध्यें नाताळांत तेथील लोकांपेक्षां हिंदी लोकांची संख्या अधिक होती. बरेच हिंदी मजूर नाताळांत कायमचे रहिवाशी झाले आहेत.

हिंदुस्थानसरकार आपल्या मजुरांचें सुखस्वास्थ्य पहाण्यासाठीं एजंट पाठवितें. तद्देशीय अधिकाऱ्यांनीं त्यांनां दिलेली माहिती, आणि या एजंटानीं हिंदुस्थानांत आल्यानंतर प्रसिद्ध केलेले रिपोर्ट अनेक प्रश्नांकडे भारतीयांचें लक्ष वळवितील. आतां ही कुली पाठविण्याची पद्धति तात्पुरती तरी बंद झाली आहे आणि कांहीं निराळ्या पद्धतीनें परदेशगमनास उत्तेजन देण्याचा सरकारांत विचार चालू आहे. ब्रिटिश गियानाकडून एक कमिशन १९१९ च्या डिसेंबरमध्यें हिंदुस्थान सरकाराकडे आलें. त्या कमिशननें योजना मांडली ती कदाचित् स्वीकारली जाऊन त्याच स्वरूपाची योजना सर्व वसाहतींसंबंधानें लावली जाण्याचा संभव आहे. ती योजना म्हटली म्हणजे हिंदुस्थानांतील लोकांस वसाहतींनीं आपल्या खर्चानें तिकडे न्यावें. तेथें कोणाकडे कामावर रहावयाचें हें वसाहतीनें न ठरवितां ज्याचें त्यानें ठरवावें. कांहीं वर्षें तेथें काम केल्यास परत जाण्याचें भाडें देखील वसाहतींनीं द्यावें. ज्यांस स्वतःच्या हिंमतीवर काम करावयाचें असेल त्यांस कांहीं जमीन देण्याची सोय करावी. ब्रिटिश गियानाच्या प्रतिनिधींनीं असें बोलणें लावलें आहे कीं, हें आमंत्रण आम्हीं करीत आहों तें स्वस्त मजूर मिळवण्यासाठीं नाहीं, तर वसाहत मोठी व तींत लोकसंख्या कमी याच कारणासाठीं म्हणजे वस्ती वाढविण्यासाठीं ही मागणी आहे; शिवाय, या वसाहतींत शेंकडा ४५ लोक भारतीय असल्यामुळें आणखी आणावयाचे लोकहि भारतीयच असलेले चांगले असें आमच्या वसाहतींतील लोकांचें मत असल्यानें आम्ही हिंदी लोकांसच विशेष आग्रहानें बोलावीत आहों. याप्रमाणें गियानांतील प्रतिनिधींनीं हिंदी लोकांपुढें जी बाजू मांडली आहे तिच्यांत सत्याचा अंश किती आहे हें तपासाअंतीं उघडकीस येऊन त्यांच्या आमंत्रणाचा जो विचार व्हावयाचा तो होईल. या प्रश्नाचा विचार करण्याकरितां बसलेल्या कमिशननेंहि तेथील स्थिति प्रत्यक्ष पाहून येण्यासाठीं कोणी तरी योग्य इसम पाठवून त्याच्या शिफारसीवरून कायमचें उत्तर देण्याचें ठरविलें आहे.

आपण आतां करारबंद मजुरीची पद्धत कोणत्या स्वरूपाची होती तें समजून घेऊं.

**करारबंद मजूरपद्धति.**—ब्रिटिश वसाहतींत हिंदी लोकांनां वाईट रीतीनें वागविण्यांत येतें, याबद्दल बराच वादविवाद झालेला आहे. ज्या करारबंदीच्या मजूरपद्धतीमुळें हिंदी लोकांनां अशा प्रकारें वागविण्यांत येत असे त्या पद्धतीचें स्वरूप कोणत्या प्रकारचें आहे हें समजून घेणें इष्ट आहे. "करारबंद मजूर" पाठविण्याची पद्धति जरी बंद झाली तरी कोणत्या पद्धतीमुळें लाखों भारतीय परदेशीं गेले तिचें स्वरूप स्पष्टपणें लक्षांत असणें उपयुक्त आहे. हिंदुस्थानांतील व निरनिराळ्या वसाहतींतील केवळ कायद्याच्या आधारानें ही माहिती जुळविली आहे. कायद्यांची अंमलबजावणी कशी होते हा प्रश्न निराळा आहे.

ही पद्धति समजून घेण्यासाठीं हिंदुस्थानांतील व वसाहतींतील कायदे व चालीरीती यांचा विचार केला पाहिजे. त्रिनिदाद व ब्रिटिश गियाना येथील करारबंदी मजुरीच्या व्यवस्थेचें निरीक्षण केलें असतां, सर्व ब्रिटिश वसाहतींचें ठोकळ मानानें निरीक्षण केल्यासारखें होईल. क्षुल्लक गोष्टींत कांहीं फरक असला तरी एकंदर व्यवस्था एकसारखीच आहे.

सर्व ब्रिटिश वसाहती, फ्रेंच वसाहती व नेदरलंडच्या वसाहती, या ठिकाणची करारबंद मजूर-पद्धत कायदेशीर असून इतरत्र करारबंदीनें मजूर नेणें गैरकायदा आहे असें हिंदुस्थान सरकारनें ठरविलें आहे. उपरिनिर्दिष्ट वसाहतींपैकीं कोणत्याहि वसाहतीला हिंदी मजुरांची गरज लागल्यास, ती वसाहत हिंदुस्थानांत आपले गुमास्ते पाठविते. वसाहतींत जाण्याकरितां किती मजुरांचीं मनें या गुमास्त्यानें वळविलीं यावर याचा पगार अवलंबून न ठेवितां, वसाहतवाल्यांनीं आपल्या गुमास्त्यांनां ठरीव पगार द्यावा असा हिंदुस्थानांत कायदा आहे. हे गुमास्ते आपलें काम कांहीं लोकांच्या मध्यस्थीनें करितात; या मध्यस्थांस 'रिक्रूटर' असें म्हणतात.

करारबद्ध मजुरांनां फक्त मुंबई, मद्रास व कलकत्ता या बंदरांतूनच वसाहतींत कायदेशीरपणें नेतां येतें. या तीन बंदरांत या लोकांचें संरक्षण करण्यासाठीं, व यांची आरोग्यदृष्ट्या तपासणी करण्यासाठीं स्थानिक सरकार कांहीं लोक नेमितें, त्यांनां संरक्षक व तपासणी डॉक्टर असें म्हणतात. सर्व विदेशगामी लोकांचें संरक्षण करून त्यांनां माहिती पुरवणें व सल्ला देणें हें या संरक्षकांचें काम आहे. तसेंच परदेशगमनासंबंधाचा कायदा पाळला जात आहे किंवा नाहीं हें पहाणें व वसाहतींतून जे मजूर लोक परत येतात त्यांनां प्रवासांत व वसाहतींत कसें वागविण्यांत आलें याची चौकशी करून स्थानिक सरकाराला कळविणें हें त्यांचें काम आहे.

गुमास्त्याला मजूर मिळवून देण्यासाठीं जे लोक काम करितात त्यांनां वर सांगितलेल्या संरक्षकापासून परवाना मिळवावा लागतो. हा परवाना मिळाल्याशिवाय कोणालाहि मजुराशीं करार करण्याची मनाई आहे. रिक्रूटर लोकांचें वर्तन कसें आहे तें पाहून परवाना नाकारण्याचा व रद्द करण्याचा अधिकार या संरक्षकांनां असतो.

पोलीस कामगार किंवा मॅजिस्ट्रेट मागतील तेव्हां या रिक्रूटरनां आपला परवाना त्यांनां दाखवावा लागतो. करारनाम्याच्या अटींचा मसुदा त्या गुमास्त्यापासून रिक्रूटरला मिळतो. हा मसुदा इंग्लिशमध्यें व ज्या ठिकाणचे मजूर न्यावयाचे असतील त्या ठिकाणच्या देश्यभाषेंत असला पाहिजे, व पोलीस कामगार व न्यायखात्यांतील कामगार यांनां तो मसुदा दाखविला पाहिजे असा कायदा आहे. परदेशगमनाबद्दल ज्या

मनुष्याचें मन रिक्रूटर वळवीत असेल त्या मनुष्याला करारनाम्याची अस्सल प्रत त्यानें दिली पाहिजे. नोंद करितेवेळीं व बंदरांत गेल्यावर त्यानें त्या विदेशगामी लोकांची राहण्याची वगैरे नीट व्यवस्था केली पाहिजे. विदेशगामी लोकांचे डेपो सरकारी वैद्यांकडून तपासले जातात. या लोकांची नोंदणी झाल्यावर त्यांनां या डेपोंत नेतात; व ते तेथें आले म्हणजे डॉक्टर लोक त्यांची तपासणी करितात.

अगदीं ऐन वेळींहि परदेशांत जाण्याचें या लोकांनां नाकारितां येतें, त्यांच्यावर सक्ती करितां येत नाहीं. तथापि करारनामा झाल्यावर झालेल्या नुकसानीची भरपाई करून देण्याबद्दल त्यांच्यावर फिर्याद लावितां येते. या लोकांनां नेणाऱ्या जहाजालाहि एक विशिष्ट परवाना काढावा लागतो. प्रत्येक मनुष्याला निदान ७२ घन फूट जागा, इस्पितळासाठीं निराळी जागा व स्त्रियांसाठीं निराळी जागा याप्रमाणें व्यवस्था त्या जहाजावर केली पाहिजे असा कायदा आहे. हे सर्व नियम मान्य केल्याशिवाय परवाना मिळत नाहीं. सर्व प्रवाशांची अन्नसामग्रीची तजवीज जहाजावर केलेली पाहिजे व त्यांचेसाठीं एक कुशल शस्त्रवैद्यहि जहाजावर असला पाहिजे. विदेशगामी लोकांच्या संरक्षकाला त्याच्या कामांत गुमास्त्यानें सर्व प्रकारची मदत केली पाहिजे.

ज्या वसाहतींत हे मजूर जातात, त्या ठिकाणचे कायदे व पद्धति यांचा आतां विचार करूं. विदेशीय रहिवाश्यांच्या खात्यांतील मुख्य कामगारास ब्रिटिश गियानामध्यें 'इमिग्रेशन एजंट--जनरल' असें म्हणतात. त्रिनिदाद वगैरे वसाहतींमध्यें या कामगाराला 'विदेशीय रहिवाशांचा संरक्षक' असें नांव आहे. या कामगाराची नेमणूक राजाकडून होते; व कायद्याची नीट अंमलबजावणी करण्याबद्दल हा कामगार त्या वसाहतीच्या गव्हर्नराला जबाबदार असतो. परदेशगमनासंबंधाच्या बाबतींत हा गव्हर्नराचा सेक्रेटरीहि असतो. परदेशांतून आलेल्या लोकांची राहण्याची व औषधपाण्याची व्यवस्था कशी आहे हें पहाण्यासाठीं, वाटेल त्यावेळीं वाटेल त्या वसाहतींत जाण्याचा या कामगाराला अधिकार आहे. वसाहतींतील विदेशीय रहिवासी व वसाहतवाले यांची एकमेकांविरुद्ध कांहीं तक्रार असल्यास, तिची चौकशी करून याला ती न्यायाधीशापुढें मांडतां येते; व तेथें योग्य निकाल मिळाला नाहीं असें याला वाटल्यास परदेशवासीयांच्या वतीनें त्याला अपीलहि करितां येतें. गव्हर्नरानें नेमिलेले सीनियर व ज्यूनियर इमिग्रेशन एजंट हे त्याचे मदतनीस असतात. या खात्याचे निराळे डॉक्टर असून वाटेल त्या वसाहतींत जाण्याचा त्यांनां हक्क असतो.

वसाहतींत येण्याविषयीं लोकांचीं मनें वळविण्यासाठीं व त्यांचा जाण्यायेण्याचा खर्च देण्यासाठीं इमिग्रेशन फंड काढिलेला आहे. या फंडाची व्यवस्था रिसीव्हर-जनरलकडे असते. करारनाम्याची फी, एकरपट्टया, वगैरे कित्येक गोष्टींचा या फंडांत समावेश होतो. परदेशी मजूर ज्यांनां पाहिजे असतात असे लोक करारनाम्याची फी देतात. कोणत्या देशांतील किती मजूर पाहिजेत हें त्या धन्याला सांगावें लागतें. या मागण्या किती प्रमाणांत मान्य करितां येतील हें ठरविण्याचा अधिकार या विदेशीयसंरक्षक कामगाराला असतो. धन्याच्या स्वभावाबद्दल त्याला कांहीं संशय आल्यास, त्याची मागणी याला नाकारितांहि येते.

बंदरांत जहाज आलें म्हणजे मुख्य विदेशीय-संरक्षक कामगार व तपासणी डॉक्टर हे कायद्याप्रमाणें सर्व व्यवस्था आहे किंवा नाहीं हें पहातात. व आपला अभिप्राय गव्हर्नराला कळवितात. परदेशांतून आलेल्या मनुष्यांपैकीं कोणी आजारी असल्यास त्याला तावडतोब सार्वजनिक दवाखान्यांत पाठवितात. परदेशांतून वसाहतींत आलेल्या लोकांस धन्यांच्या स्वाधीन करावयाच्या वेळेपर्यंत सरकारच्या खर्चानें इमिग्रेशन डेपोमध्यें त्यांची अन्नपाण्याची व राहण्याची सोय करण्यांत येते.

या लोकांची वांटणी करितेवेळीं कित्येक लोकोपयोगी खात्यांच्या मुख्य कामगारांच्या मागणीचा प्रथम विचार करण्यांत येतो; नंतर मळेवाल्यांसारख्या खासगी लोकांच्या मागण्यांचा विचार होतो. या लोकांच्या गरजा भागल्यानंतर घरकामाकरितां ज्यांनां चाकर पाहिजे असतात अशा लोकांच्या अर्जांचा विचार करण्यांत येतो. परदेशी मजुरांनीं हरकत न केल्यास या क्रमानें त्यांची विभागणी केली जाते. ही विभागणी करितांना पुरुषांची त्यांच्या बायकांपासून व मुलांची त्यांच्या आईबापांपासून ताटातूट करीत नाहींत. मित्र, शेजारी किंवा एकाच गांवांतून येणाऱ्या लोकांची होतां होईल तों ताटातूट करीत नाहींत.

परदेशी लोकांच्या (मूळ) देशांत त्यांनां वसाहतींत नेतेवेळीं केलेले करार वसाहतींत गेल्यावर पाळण्यांत येतात; परंतु राजाची परवानगी घेतल्याशिवाय हिंदुस्थानांत केलेले करार कायदेशीर होत नाहींत असा नियम कांहीं वसाहतींमध्यें आहे. कराराची नेहमींची मुदत पांच वर्षांची असते. धन्यानें वाचन, लेखन व गणित शिकविण्याची व्यवस्था केल्याशिवाय अज्ञान मुलगा करारनाम्यानें धन्याशीं बांधला जात नाहीं.

परदेशांतून आलेल्या लोकांच्या राहण्याच्या जागेवर, अन्नपाण्यावर व दवाखान्यावर, सरकारच्या वैद्यक खात्याची देखरेख असते. जे धनी आपल्या करारबद्ध मजुरांनां दवाखान्यांत पाठविण्याची हेळसांड करितात त्यांनां दंड द्यावा लागतो. मजुरीसंबंधीं व कामाच्या विभागणीसंबंधीं इमिग्रेशन कायद्यांत नियम आहेत. आठवड्यांतून ४२ तासांपेक्षां अधिक काम परदेशांतून आलेल्या लोकांपासून घेऊं नये असा नियम आहे.

परदेशी लोक वसाहतींत आणणाऱ्या गुमास्त्याला या परदेशांतून आलेल्या लोकांच्या विवाहांची व घटस्फोटांची नोंद ठेवावी लागते; व यासाठीं कित्येक नियम केलेले आहेत.

या परदेशी नोकरांसाठीं हे जे कायदे केलेले आहेत, यांपेक्षां चांगले कायदे असणें क्वचितच संभवनीय आहे हें उघड आहे. हिंदी लोकांनां न्याय मिळून त्यांनां चांगल्या प्रकारें वागविण्यांत यावें यासाठीं वसाहतींनीं योग्य कायदे केलेले आहेत; तथापि हिंदी लोकांनां फार वाईट प्रकारें वागविण्यांत येतें ही गोष्ट कोणाहि प्रामाणिक मनुष्याला नाकबूल करितां येणार नाहीं. तर मग, हें काय गूढ आहे?

ही जी विसंगतता दिसते, तिचा उलगडा करण्यास फार खोल जाण्याची अवश्यकता नाहीं. कायदे उत्तम आहेत, परंतु त्यांची अंमलबजावणी नीट होत नाहीं अशी खरी स्थिति आहे. दिसण्यांत उत्तम असलेल्या कायद्यांची अयोग्यपणें बजावणी झाल्यास ते उघड उघड अन्यायी कायद्यांपेक्षां सहजच अधिक अपायकारक होतात. त्यांच्या योगानें सुधारणेचें काम अधिक अवघड होतें व तें लांबणीवर पडतें. इमिग्रेशन एजंट जनरल किंवा संरक्षक (प्रोटेक्टर ऑफ दि इमिग्रंट्स) हा खरोखर संरक्षक आहे किंवा नाहीं हें पाहिलें पाहिजे. या सर्व पद्धतीची उपयुक्तता व निर्दोषता सर्वस्वीं या कामगारावर अवलंबून आहे. तत्वतः हा कामगार हिंदी लोकांचा मित्र असला पाहिजे. तसा तो असल्यास त्याचे बरेच हाल कमी होतील यांत संशय नाहीं. ज्ञानानें व अनुभवानें या विषयासंबंधीं मत देण्याला जे योग्य आहेत त्यांनीं ही गोष्ट कबूल केलेली आहे. लंडनमधील 'ट्रॉपिकल् लाइफ्' नांवाच्या मासिक पुस्तकाचा संपादक, हॅरॉल्ड एच् स्मिथ, यानें आपल्या मासिकांत अनेकदां हा महत्त्वाचा मुद्दा आग्रहपूर्वक मांडला आहे. परदेशांतून आलेल्या लोकांच्या संरक्षकाला नेहमीं आपल्या स्वतःच्या महत्त्वाची फाजील कल्पना असते; व ज्यांच्याशीं त्याचा नेहमीं संबंध घडतो, त्या कनिष्ठ दर्जाच्या हिंदी मजुरांबद्दल त्याला क्वचितच आस्था वाटते. मजुरांच्या धन्यांबद्दल याला अधिक सहानुभूति वाटते, कारण ते बहुधा त्याचे मित्र असतात; मित्र नसले तरी सांपत्तिक दृष्ट्या, सामाजिक दृष्ट्या ते त्या कामगाराच्या बरोबरीचे असून त्यांची व याची जात व धर्म हींहि एकच असतात.

हिंदुस्थानसरकारला या गोष्टींत काय करितां येण्यासारखें आहे? इ. स. १८४०–४५ पासून हिंदुस्थानसरकार साम्राज्य-सरकारकडे पाठविण्यांत येणाऱ्या खलित्यांत वसाहतींतील हिंदी लोकांच्या वागवणुकीबद्दल टीका करीत आहे. परंतु या टीकेचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. साम्राज्य सरकारला पाठविण्यांत येणाऱ्या खलित्यांत एक सरकार दुसऱ्या सरकार-बद्दल वाईट भाषा वापरूं लागलें हाच काय तो त्या टीकेचा परिणाम झाला. हिंदी लोकांचे हाल कमी करून परदेशवास त्यांनां सुखावह व प्रिय व्हावा यासाठीं बऱ्याच गोष्टी करितां येतील. वसाहतींतील परदेशीयसंरक्षक व त्याचे मदतनीस हे नेहमीं इंग्लिश लोक असतात. वसाहतींतील इमिग्रेशन खात्याच्या मोठमोठ्या जागा योग्य हिंदी सद्गृहस्थांनां देण्या-संबंधीं हिंदुस्थानसरकार व वसाहतसरकार यांनीं एकविचारानें ठरवून, तसें करण्याबद्दल वसाहतवाल्यांचें मन त्यांनां वळवितां आल्यास चांगले परिणाम होतील असें वाटतें. कनिष्ठ दर्जाच्या हिंदी लोकांचा कैवार घेण्यासाठीं म्हणून, वसाहतींतील न्याया-धीशाच्या कांहीं जागा हिंदी लोकांनां देण्याचाहि प्रयत्न हिंदुस्थानसरकारनें करावा. हीं कामें करण्यालायक ईस्ट इंडियन लोक वसाहतींत सांपडणें शक्य दिसत नाहीं. परंतु अनुभविक व लायक लोक हिंदुस्थानांतून बोलावितां येतील. हिंदुस्थानसरकारनें या लोकांची शिफारस केल्यास निरनिराळ्या सरकारांचा एकमेकांविषयीं असलेला गैरसमज नाहींसा होऊन बऱ्याच अडचणी दूर होतील. हिंदी मजुरांच्या नीतिमत्तेसंबंधाचें वसाहतसरकाराचें धोरणहि गर्हणीय आहे.

आशियांतील करारबद्ध मजुरांमधील स्त्रीपुरुषांच्या निषिद्ध संबंधाबद्दल जे कायदे केलेले आहेत त्यांत सांपत्तिक फायद्या-पेक्षां स्त्रीधर्मास आणि गृहस्थधर्मास गौण मानिलेलें आहे. उदाहरणार्थ, ब्रिटिश गियानाची गोष्ट घ्या. इजा करण्याची किंवा खून करण्याची भीति दाखवून एखाद्या करारबद्ध हिंदी मजुरानें मजूर स्त्रीशीं संभोग केल्यास त्याला साधी किंवा सक्तमजुरीची शिक्षा एक महिन्यापेक्षां अधिक देऊं नये असा येथें कायदा आहे. व दुसऱ्याच्या बायकोला एखाद्यानें फसवून नेल्यास, त्याला चोविस डॉलरपेक्षां अधिक दंड होऊं नये असाहि कायदा आहे (१८९१ चा १८ वा कायदा, १५७–१६० पहा.). वसाहतींत मजुरानें जें काम करावयाचें ठरलेलें असतें त्यापेक्षां कमी काम एखाद्या मजुराला पडावें व तें तो वरील प्रकारचा गुन्हेगार म्हणून कमी पडावें ही गोष्ट वसाहत-सरकारला पसंत नाहीं!

ज्या अर्थी हे मजूर हिंदुस्थानांत परत येऊन हिंदी समाजाचे घटक बनतात, त्या अर्थी ढिल्या व घातुक कायद्याच्या योगानें करारबद्ध मजुराची नीतिमत्ता बिघडणार नाहीं अशी तजवीज करणें हें हिंदुस्थानसरकारचें कर्तव्य आहे; या गोष्टीचा हिंदुस्थान-सरकार विचार करील अशी फार आशा आहे.

कूली म्हणून ज्यांनीं करार करून आपणांस बांधून घेतलें त्यांचा छळ प्रत्येक देशांत झालाच आणि त्याचा विचार करण्याकरितां आज तीस वर्षे अनेक चवकशा होऊन त्यांचे रिपोर्टहि बाहेर आलेले आहेत. तसेंच या हिंदूंचा उपयोग माणसांची अवलाद सुधारण्याकरितां कसा काय करावा या संबंधानें तत्त्ववेत्ते आणि मुत्सद्दी दोघेहि विचार करितांनां दृष्टीस पडतात. डॉ० ए. एच्. कीन हा आपल्या 'एथ्नॉलॉजी' नामक ग्रंथांत म्हणतो कीं, निग्रो लोकांची सुधारणा गोऱ्या लोकांशीं संबंध जडवून होत नाहीं तर जेथें जेथें निग्रो म्हणून असतील तेथें हिंदू आणून सोडावेत म्हणजे त्यांची व निग्रोंची लग्नें होऊन जी जात उत्पन्न होईल तिच्यांत हिंदूंची परिश्रम करण्याची संवय येईल आणि निग्रोंचा कणखरपणाहि येईल. प्रस्तुत तत्त्ववेत्त्यानें विचार करितांनां शक्याशक्यतेचा विचार मुळींच केला नाहीं असें दिसतें. किंग्सले, ब्रॅंकहर्स्ट आणि हेनरी कर्क हे सर्व अशी साक्ष देतात कीं, हिंदूंचा लग्नव्यवहार निग्रोशीं मुळींच होत नाहीं. ब्रॅंकहर्स्ट म्हणतो कीं, हिंदूलोक निग्रोस इब्लिस म्हणजे सैतानाचीं पिल्लें समजतात आणि चिनी आणि हिंदू यांची तुलना करितांना हेनरी कर्क असें दाखवितो कीं, चिनी लोक निग्रो बायका खुशाल करितात आणि निग्रो बायका करितांनां निग्रोंतल्या सगळ्यांत देखण्या मुली तेच पटकावतात. हिंदू मात्र चार पांच जण मिळून एकाच स्त्रीबरोबर राहतात, पण निग्रोशीं संबंध करीत नाहींत. फार तर काय हिंदू यूरोपीयांशीं देखील संबंध करावयास अजून नाखूष आहेत. ब्रिटिश गियानामध्येंच पोर्तुगीज बायका निग्रोशीं देखील लग्न करितात आणि इंग्लंडमध्यें, फ्रान्समध्यें, निग्रोशीं लग्न करणाऱ्या

यूरोपीय वायका तर पुष्कळच दिसून येतात. यावरून इतर लोकांची अवलाद सुधारण्याकरितां यूरोपीय राजकारणी आणि व्यापारधोरणी मनुष्यांस हिंदूंचा कितपत उपयोग होईल हें सहज कळण्याजोगें आहे. फिजी बेटांतील लोक दिवसानुदिवस नष्ट होत चालले आहेत. त्यांची पुष्कळांस कींव येऊन त्यांनां सुधारण्याकरितां हिंदूंचीं व त्यांचीं लग्नें लावून द्यावीं अशा प्रकारचे विचार व्यक्त करणारे पुष्कळ लेखक व तत्त्ववेत्ते होऊन गेले; आणि या गोष्टीची इष्टानिष्टता पाहण्यासाठीं एक सरकारी कमिशनहि बसलें होतें. त्याचा एक लठ्ठ रिपोर्ट पाहण्यांत आला आहे. तथापि रक्तांचें मिश्रण करून हिंदूलोक फिजी येथील काळया लोकांत समाविष्ट करावेत या हेतूनें खटपट झाल्याचें आणि त्यांत सरकारचें अंग असल्याचें कोठें दिसत नाहीं. असो.

आतां अर्वाचीन परदेशगमन दाखविणारे आंकडे येथें देऊन त्यांवर कांहीं विचार प्रकट करूं.

ब्रिटिश राज्यांतील हिंदुस्थानी लोक. (खानेसुमारी १९११)

| स्थान | भारतीय वंशाचे | हिंदुस्थानांत जन्मलेले |
|---|---|---|
| इंग्लंड आणि वेल्स | ४००३ | ४००३ |
| स्कॉटलंड | १४८ | १४० |
| जिब्राल्टर | ५३ | ५३ |
| माल्टा | २३ | २३ |
| मालदिव | १६५ | १६५ |
| सिलोन | ५८००७६ | ४७३८३० |
| हाँगकाँग | ३०४९ | २३९७ |
| स्ट्रेट्स सेटलमेंट्स | ८२०५५ | ६५९५७ |
| फेडरेटेड मलायस्टेट्स | १६५९९८ | १५३७६४ |
| ब्रिटिश संरक्षित इतर मलाय संस्थानें | ११०७६ | ११०७६ |
| अँग्लो इजिप्शिअन सुदान | २३५ | २२१ |
| युगांडा | १६८७ | १६८७ |
| नायगेरिया | ६ | ६ |
| न्यासालँड | ४७४ | ४७४ |
| वेचुआनालँड | ४५ | ३६ |
| केप ऑफ गुड होप | ६६०६ | ४७८३ |
| नाताळ | १३३०३१ | ७३३२१ |
| ट्रान्सवाल | १००४८ | ६८५४ |
| ऑरेंज फ्रीस्टेट | १०६ | ४८ |
| बॅसुटोलँड | १३४ | १३४ |
| स्वाझीलँड | ७ | ६ |
| ऱ्होडेशिया | ७७१ | ६४७ |
| सायरालिओन | २६ | २१ |
| सेचिलिस | ४८९ | ३९३ |
| मॉरिशस | २५८२११ | ३५३४९ |
| झांझीबार | ८१२२ | ८१२२ |
| बाहामा | ४ | ४ |
| ग्रेनाडा | ४०६ | ४०६ |
| ब्रिटिश हांडुरास | ३५ (खा). | १०४ |
| त्रिनिदाद | १०७४३३ | ५०५८३ |
| फॉकलंड बेटें | ३ | ३ |
| जमेका | १७३८० | ७७८८ |
| सेंट व्हिन्सेन्ट | ३७६ | ११४ |
| ब्रिटिश गियाना | १२६५१७ | ८८२०१ |
| कानडा | २३४२ | २३४२ |
| डोमिनिका | ८ | ८ |
| वारवडॉस | ८ | ५ |
| सेंटलुसिआ | २०६४ | ६१२ |
| ब्रिटिश नॉर्थ बोर्निओ | ९०२ | ९०२ |
| * फिजी | ३९९७७ | २८९०८ |
| न्यूझीलंड | १५ | १५ |
| ब्रह्मदेश | ४,९३,६९९ | |
| बलुचिस्तान | ४१,२३२ | |
| अंदमान | १४,११४ | |
| | ५४९०४५ | ५४०४५ |
| एकूण | २११३४७४ | १५७२५५० |

निरनिराळ्या वसाहतींत गेलेल्या हिंदूंची माहिती मिळविण्यास आपणास साधनें पुष्कळ आहेत. तीं येणेंप्रमाणें:—(१) हिंदुस्थान सरकारनें निरीक्षणासाठीं आपले जे प्रतिनिधी पाठविलेले असतात त्या प्रतिनिधींचे रिपोर्ट आणि त्या प्रतिनिधींनां तद्देशीय सरकारांनीं केलेले रिपोर्ट. (२) परकीय वसाहतींच्या मजूर गोळा करण्याकरितां कलकत्त्यास असलेल्या त्यांच्या प्रतिनिधींनीं केलेले रिपोर्ट. (३) त्या त्या वसाहतींचे इतिहास. (४) प्रत्येक वसाहतींतील हिंदी लोकांसंबंधानें केलेले कायदे. (५) इतर लोकांचीं प्रवासवर्णनें. (६) त्या त्या वसाहतींतील वर्तमानपत्रें. (७) वसाहतींत भांडवल घालणाऱ्या लोकांनीं इंग्लंडमध्यें चालविलेलीं वर्तमानपत्रें. (८) हिंदुस्थानी लोकांस वाईट तऱ्हेनें वागविल्याबद्दलच्या कागाळ्या इंग्लंडपर्यंत पोंचल्यावर झालेल्या चौकशांचे व कमिशनांचे रिपोर्ट.

* फिजीमध्यें एकंदर हिंदी लोक ६११५३ आहेत. ही ३१ डिसेंबर १९१७ ची अंदाजी लोकसंख्या आहे. हिंदी लोक करारानें बांधले गेलेले फक्त ९०६२ होते त्यांत १७६७ मुलें करारबद्ध होतीं. १९१६ सालीं १७५६ हिंदी लोक फिजी बेटांत गेले आणि १९१७ मध्यें कोणीच गेले नाहींत, कारण कराराची पद्धति हिंदुस्थान सरकारनें बंद केली. फिजी बेटांतील लोकसंख्येमध्यें स्थानिक लोक ८७००० आहेत आणि भारतीयांचा नंबर दुसरा लागतो. यूरोपीयांची संख्या ३७०७ आहे.

(९) प्रत्येक वसाहतींतील प्रोटेक्टर ऑफ इमिग्रंट्स याचे रिपोर्ट. या विषयावर वाङ्मय अत्यंत विपुल आहे. त्या सर्वांचा निष्कर्ष देण्यास किंवहुना सर्व ग्रंथांची वर्षानुक्रमानें यादी देण्यासहि येथें अवकाश नाहीं. यासाठीं कांहीं प्रमुख ठिकाणीं असलेल्या भारतीय जनतेची माहिती व्हावी आणि त्यांच्यावर आलेल्या अडचणी समजाव्या म्हणून थोड्या टीपा मात्र येथें देतों. थोडक्यांत सांगावयाचें म्हटल्यास असें म्हणतां येईल कीं, मारिशस, दक्षिण आणि पूर्व आफ्रिका, फिजी, ब्रिटिश गिआना, त्रिनिदाद, जमेका, कानडा, युनायटेड स्टेट्स् या सर्व ठिकाणांहून दुःखाच्या आरोळ्या वारंवार ऐकूं आल्या. हिंदुस्थानास मांटेग्यूच्या खटपटीनें नवी सनद मिळाली तरी आफ्रिकेंतील आपल्या लोकांचा उपमर्द वंद झाला नाहीं. ब्रिटिश गियाना आणि फिजी येथून आमंत्रण येत आहे, तर कांहीं ठिकाणांहून दुःखाचीच माहिती मिळत आहे. प्रत्येक ठिकाणचे मजूर कोणत्या स्थितींत आहेत हें सांगण्यांत मतलव नाहीं. सिलोनमध्यें काय प्रकार सुरू आहे याची कल्पना मागें दिलीच आहे. इतर ठिकाणची स्थिति याहून फारशी निराळी नाहीं. आतां स्वतंत्र जनतेविषयीं विचार करूं.

**फिजी बेटांतील स्वतंत्र हिंदी लोक.**—हिंदी इसमाला फिजीबेटांत स्वतंत्र सोडला तर तो स्वतःची सोय चांगली लावूं शकतो. मुदतबंदीच्या नोकरीचीं पांच वर्षे संपल्यावर खुषीनें पुन्हां नोकरींत शिरणारे मजूर शेंकडा पांचापेक्षांहि कमी सांपडतात, ही लक्षांत घेण्यासारखी गोष्ट आहे. ते लोक थोडी-फार जमीन खंडानें स्वतंत्र लागवडीस घेतात आणि दुसरा हरएक धंदा करतात. आणि त्याचा परिणाम काय होतो ? मि० बर्टन यांनीं म्हटलें आहे कीं, "फिजीबेटांतील सुमारें २५००० स्वतंत्र हिंदी लोक हे तेथील लोकसमाजाचा एक महत्त्वाचा भाग होत. १९०७ मध्यें हिंदी लोकांनां पुढीलप्रमाणें धंदे करण्यास परवाने देण्यांत आले होतेः—किराण्याचीं दुकानें ९८१; फेरीवाले ५३२; रोटीवाले ६; किराणामालाच्या वखारी २३; होडीवाले ११२. सरकारी रिपोर्ट अगदीं अपुरे आहेत तरी त्यांत स्वतंत्र शेतकी करणाऱ्या हिंदी लोकांविषयीं पुढील आंकडे सांपडतात. ऊंस ५,५८० एकर; केळीं २,०००; मका १,१५८; वाटाणे; १०७; भात ९,३४७. एकंदर सर्व शेतीचे प्रकार हिशोबांत घेतल्यास सुमारें २०,००० एकर लागवड भरेल असें दिसतें. यापेक्षांहि जास्त जमीन गुरचराईकडे असून फिजीमधील बहुतेक गुरें हिंदी लोकांच्याच मालकीचीं आहेत. फिजींतील व्यांकांमध्यें ५०,००० पौंडांवर ठेव हिंदी लोकांची आहे, व ही रक्कम तेथील हिंदी समाजाच्या संपत्तीचा एक अंश मात्र आहे. ह्या स्वतंत्र हिंदी लोकांत मृत्यूचें प्रमाण अल्प असून जननाचें प्रमाण ( स्त्रियांची अल्पसंख्या लक्षांत घेतां ) वरेंच मोठें आहे.

हे हिंदीलोक प्रत्येक दिशेनें फिजी बेट व्यापीत चालले असून कित्येक जिल्ह्यांत त्यांची संख्या आजच फिजी लोकांपेक्षां अधिक झालेली आहे. हे हिंदी लोक मूळच्या फिजी लोकांपासून जमिनी विकत घेऊन किंवा खंडानें घेऊन त्यांनां हळूहळू मागें टाकीत चालले आहेत, आणि विशेषतः नदीकांठच्या व सडकेच्या कडेच्या बहुतेक जमिनी त्यांच्या हातांत गेल्या आहेत. फिजी बेटाचें एकंदर स्वरूपच ते वदलून टाकीत आहेत. तुम्हीं कोठेंहि जा, त्यांनीं कसलेली शेतजमीन आढळतेच. उदाहरणार्थ, सुवा-पासून नौसोरीपर्यंत कोणी प्रवास करील तर त्यास त्या वारा-मैलांत एकहि फिजी लोकांनीं भरलेलें खेडें आढळणार नाहीं. जिकडे तिकडे हिंदी लोकांचा भरणा दृष्टीस पडेल." बर्टन साहेबांच्या मतें फिजीबेट हें हिंदी लोकांचीच एक वसाहत होण्याच्या पंथास लागलेलें आहे. तें कसेंहि असलें तरी फिजीची सोय हिंदी लोकांनां कोणत्याहि दृष्टीनें 'स्वस्त' पडत नाहीं हें मात्र खरें.

फिजी येथील कौन्सिलमध्यें दोन प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क तेथील हिंदी लोकांस मिळाला आहे.

**कानडांतील वसाहत.**—कॅनडांतील हिंदी लोकांच्या वसाहतीला १९०५ पासून खरी सुरुवात झाली, आणि १९१३ सालीं तेथें ब्रिटिश सम्राटाचे हिंदी प्रजाजन ४५०० होते. यांपैकीं निम्म्याहून अधिक शेतकींत पडले आहेत, वरेच रेल्वेचे कामांत व कांहीं कारखान्यांत आणि लांकडांच्या गिरण्यांत आहेत.

वसाहतसरकारनें उपस्थित केलेल्या अनेक अडचणींतूनहि त्यांनीं आपल्या धैर्य, उद्योग व स्वाभाविक नियमितपणाची राहणी इत्यादि गुणांच्या बळावर सुधारलेलीं निर्वाहाचीं साधनें हस्तगत केलीं आहेत. जवळ जवळ ७,०००,००० डॉलर (२१,०००,००० रु.) इतकें भांडवल त्यांनीं ब्रिटिश कोलंबिया-मध्यें मालमत्ता उद्योगधंदे इ. यांत गुंतवून ते कॅनडांत कायमचे रहिवाशी झाले आहेत. त्यांनां मतदारीचा हक्क मात्र नाहीं !

या लोकांपैकीं शें. ९० शीख आहेत. त्यांपैकीं कांहींनीं पूर्वी हिंदी लष्करांत शौर्य गाजवून बिल्लेहि मिळविलेले आहेत. १९०७ सालापर्यंत वसाहतखात्याकडून या वसाहतींच्या बाबतींत कांहीं त्रास होत नव्हता; पण त्या सालापासून मात्र "आतां दरवाजा वंद" असे जे उद्गार जनरल स्वायने यांनीं काढले त्याप्रमाणें धोरण ठेविलें जात आहे. हे जनरल स्वायने एकेवेळीं हिंदी लष्करांतील अंमलदार होते व सध्या ब्रिटिश हांडुरस येथें गव्हर्नर—जनरल व कमांडर—इन—चीफ आहेत.

कॅनडांतून ह्या हिंदी वसाहतवाल्यांची ब्याद दूर करण्या-करतां त्या सर्वांनां हद्दपार करून ब्रिटिश हांडुरस येथें नेऊन टाकण्याची योजना तयार करण्यांत आली होती. पण तेथील वाईट हवा व स्थलान्तरासंबंधीं अपमानकारक अटी लक्षांत घेऊन व ह्या 'मोहक' सूचनेंतील धोरण जाणून तिला कॅनडां-तील हिंदीलोकांनीं एकमतानें विरोध केला. या योजनेच्या मुळाशीं असलेलीं कारणें स्वायने साहेबांनीं स्वमुखानें स्पष्ट सांगितलीं आहेत तीं अशीं: "गोरे लोकांच्या वसाहतीमध्यें येऊन हे पौरस्त्य हिंदी लोक आपल्या मूळ जाती वगैरे सर्व विसरून गोऱ्या लोकांशीं मोठी सलोखा वाढवितात ही गोष्ट मोठी बाधक आहे; आणि दुसरें असें कीं, हेच लोक परत हिंदुस्थानांत जाऊन तेथें समानहक्कसंपादनाचा उपदेश करूं लागतात; आणि या प्रकारें राज्यकारभार व शांतता यांच्या मार्गांत अडथळा आणतात."

असो. सदरील योजना मार्गे पडल्यावर "कॅनडी वसाहतीचे कायदे" करून हिंदी ब्रिटिश प्रजाजनांचा दर्जा इतर पौरस्त्य-जपानी, चिनी इत्यादि लोकांपेक्षां कमी ठरविण्यांत आला. कॅनडा-मधील हिंदी लोकांस ब्रिटिश प्रजाजन म्हणूनहि हक्क नाहींत व वसाहती (Immigrant) म्हणूनहि हक्क नाहींत. तेथील ब्रिटिश प्रजाजन याची व्याख्या अगदींच निराळी आहे. असले प्रकार खुद्द इग्लंडमध्येंहि नाहींत.

या जुलमी कायद्यांतील "अखंड प्रवासाचें कलम" सर्वांत जाचक आहे; तें असें:

"९ मे १९१० पासून पुढें कॅनडांत येणाऱ्या ज्या कोणी इसमानें स्वदेशांत किंवा कॅनडांत आगाऊ पैसे भरून एकदम थेट कॅनडापर्यंतचें तिकीट काढलें नसेल आणि स्वदेशापासून कॅनडापर्यंत अखंड प्रवास केला नसेल त्यास कॅनडाचे किनाऱ्या-वर उतरूं दिलें जाणार नाहीं."

हिंदुस्थान व कॅनडा यामध्यें थेट जाणाऱ्या बोटी नसल्यामुळें, व कोणतीहि आगबोट कंपनी अशी थेटचीं तिकिटें देत नसल्यामुळें कायद्याच्या या अटी पाळणें हिंदी लोकांस अर्थात् अशक्य आहे. या ठिकाणीं कंपन्यांनां थेटचीं तिकिटें देण्यास व थेटचा प्रवास करण्यास हिंदुस्थानसरकारनें भाग पाडणें एवढाच मार्ग दिसतो.

९ मे १९१० पासून अमलांत आलेला दुसरा जुलमी कायदा असा: "आशियामधील ज्या कोणा इसमाजवळ स्वतःचे २०० डॉलर नसतील त्या पुरुषास किंवा स्त्रीस कॅनडांत उतर-ण्यास मनाई आहे." कॅनडाशीं ज्या देशाचा या बाबतींत विशिष्ट तह झाला असेल किंवा ज्या देशाला या बाबतींत विशेष नियम लागू असतील अशा देशांतील इसमास हे कायदे लागू नाहींत.

जपान व चीन यांच्याबरोबर असे स्वतंत्र तह झाले असल्यामुळें जपानी व चिनी लोकांनां बायकांमुलांसह कॅनडांत येतां येतें. पण हिंदी लोकांनां वरील 'अखंड प्रवासाच्या' कलमाच्या अडचणी-मुळें असें करणें अशक्य होतें.

रा. नथुराम ह्या गृहस्थानें १९१० सालीं कलकत्ता ते व्हांकोव्हरचें तिसऱ्या वर्गाचें थेट तिकीट काढलें होतें. पण येतांना वाटेंत हांगकांगला त्यानें पहिलें तिकीट बदलून दुसऱ्या वर्गाचें घेतलें. तेव्हां थेट तिकीट नाहीं या सबबीवर त्याला व्हांकोव्हरहून त्याच बोटीनें परत जाणें भाग पडलें. रा. हिरासिंगला बायकामुलांबद्दल किनाऱ्यावर उतरल्याबरोबर एक हजार डॉलर जामीनगत भरूनहि तीन महिने कोर्टांत भांडावें लागलें. व इतकें भांडल्यावर देखील केवळ 'दया' (act of grace) म्हणून त्याच्या बायकोला व मुलांनां कॅनडांत उतरण्यास परवानगी मिळाली. रा. भागासिंग व बळवंतसिंग यांनांहि असेंच कोर्टांत भांडून तीनतीन महिन्यांनंतर बायका-मुलांनां आणण्याची परवानगी 'दया' म्हणून मिळाली. रा. हकीमसिंग यांचीं मुलेंमाणसें हांगकांग येथें थेटचें तिकीट मिळावें म्हणून दोन वर्षें तिष्ठत बसलीं होतीं. रा. विष्णु पिंगळे या विद्यार्थ्यास कॅनडांत उतरण्यास परवानगी मिळाली नाहीं पण युनैटेड स्टेट्सचे सरकारनें त्यास आपल्या हद्दींत उतरूं दिलें. हाच दुर्दैवी तरुण महाराष्ट्रीय इंग्रजी राज्य उलथून पाडण्यासाठीं पुढें गदर म्हणून चळवळ सुरू झाली तींत सामील झाला आणि पुढें सांपडून फांशी गेला.

असा हा बायकामुलांची ताटातूट करणारा कायदा असल्या-मुळें कॅनडांत वसाहत करण्याचा मार्ग हिंदीलोकांनां पूर्ण बंद झाला आहे.

ही निराशाजनक स्थिति दूर व्हावी म्हणून १५ डिसेंबर १९११ रोजीं ओटावा येथील अंतर्व्यवस्था-मंत्री ना. आर. रॉजर्स यांची आमच्या शिष्टमंडळानें गांठ घेतली. त्यांनीं कबूल केलें कीं "बायकामुलांनां आणण्याची परवानगी देण्याचा विचार तावडतोब करून बाकीच्या गोष्टींचाहि लवकरच योग्य निकाल करण्यांत येईल.

या आश्वासनाला पुरें सव्वा वर्ष होऊन गेलें तरीहि कायद्यांत कांहीं फरक न होतां त्याचा अम्मल पूर्ववत् चालू आहे, असें पाहून येथील हिंदी लोकांनीं आपली अडचण साम्राज्यसरकार व हिंदुस्थानसरकार यांजपुढें मांडण्याचें ठरविलें आणि २२ फेब्रुवारी १९१३ रोजीं वरील तीन इसमांचें शिष्टमंडळ नेमून पुढील ठराव केला:—

"हिंदू लोकांनां आपलीं बायकामुलें कॅनडांत आणण्यास परवानगी असावी या संबंधानें केलेल्या सर्व विनवण्यांकडे व शिष्टायांकडे कॅनडासरकारनें दुर्लक्ष केल्यामुळें वरील त्रिवर्गास लंडनमध्यें साम्राज्यसरकारपुढें हें गाऱ्हाणें मांडण्याकरतां पाठविण्यांत येत आहे. शिवाय हिंदुस्थानसरकारचें आणि हिंदी राष्ट्रीयसभा, मॉस्लेम लीग वगैरे संस्थांचें या कामीं साहाय्य मिळविण्याचें कामहि या त्रिवर्गावर सोंपविलें आहे."

या ठरावाअन्वयें या त्रिवर्गानें लंडनांत जाऊन मे १४ १९१३ रोजीं कॅक्स्टनहॉलमध्यें सर भावनगरी यांच्या अध्यक्षते-खालीं सभा भरविली. या सभेनें पुढील ठराव पास केला.

"कॅनडांतून आलेल्या शिष्टांचें 'अखंड प्रवासाचें कलमा'-बद्दलचें म्हणणें विचारांत घेतां असें स्पष्ट दिसतें कीं, या कलमाच्या योगानें हिंदुस्थानांतून थेटच्या बोटी येण्याची सोय नसल्यामुळें, हिंदू लोकांचा कॅनडामध्यें प्रवेश होणें पूर्णपणें बंद होणार आहे. इतकेंच नव्हे तर हल्लीं कॅनडांत असलेल्या हिंदी लोकांची व त्यांच्या बायकामुलांची ताटातूट होणार आहे. करितां हा कायदा रद्द व्हावा किंवा हिंदी लोकांनां तो लागू नसावा, अशी या सभेची साम्राज्य, कॅनडा व हिंदुस्थान या तिन्ही सरकारांजवळ आग्रहाची मागणी आहे."

१९१४ मध्यें सरदार गुरुदत्तसिंग यानें "कोमागाटा मारु" नांवाचें एक जहाज भाड्यानें घेऊन त्यांतून पंजाबी माणसें नेण्याचा प्रयत्न केला. त्यांतहि त्यास यश आलें नाहीं. हा प्रकार जर्मनीशीं युद्ध सुरु असतांच घडला. मज्जावामुळें चिडून गेलेले बोटीवरील लोक आणि तेथेंच "गदर" चळवळींत शिरलेले लोक या दोघांनीं हिंदुस्थानांत येऊन बंड करण्याचा निश्चय केला व हे लोक येथें आले. त्यांचें बंडाचे बेत अगोदरच उघडकीस येऊन पूर्णपणें कसे फसले याचा वृत्तांत सर्वांस विदित आहेच. या कटांत सांपडल्यामुळें पिंगळे आडनांवाच्या महाराष्ट्रीय ब्राह्मणांस प्राणास मुकावें लागलें.

**मारिशस.**—येथें १८३४ पासून हिंदी लोक कुली कामासाठीं नेले जाऊं लागले. निग्रो लोकांची गुलामगिरींतून मुक्तता झाली तो काल म्हणजे १८३४ ते १८३९ पर्यंतचा काल होय. ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, इकडे निग्रो लोक गुलामगिरींतून मुक्त होत होते तों इकडे त्यांचें काम करण्यासाठीं त्याचवेळीं हिंदी लोकांची योजना होत होती. गुलाम न म्हणतां गुलामगिरींत राबविण्याची अजब युक्ति निग्रो-गुलामीच्या अंत्येष्टीच्या वेळींच अर्थैकपरायण गौरकायांनां सुचली. गुलाम गेले त्यांच्या जागीं हिंदी कुली आले. मारिशसच्या साखरमळेवाल्यांनीं हिंदी कुलींनां नानाप्रकारें छळलें. पण थोडीशी समाधानाची गोष्ट आहे कीं, अलीकडे मारिशस येथें हिंदी जनतेचें प्राबल्य वाढत आहे आणि तेथील जमिनीवर हिंदी मंडळीची मालकीहि वाढत आहे. हिंदु किंवा मुसलमानी पद्धतीचीं लग्नें बहुतेक वसाहतींतून अद्यापि मान्य नाहींत. या जाचणुकींतून मारिशस येथील हिंदी लोकांची मात्र १९१२ सालीं मुक्तता झाली. तेथील वैवाहिक नियमांचें अलीकडलें स्वरूप येणेंप्रमाणें आहे.*

पूर्वी प्रसिद्ध केल्याशिवाय किंवा १८९० च्या २६ व्या कायद्यांत सांगितलेला कोणताहि शिष्टाचार केल्याशिवाय मुसुलमानांच्या किंवा हिंदू लोकांच्या उपाध्यायानें अनुक्रमें मुसुलमान किंवा एकाच जातीचे हिंदू यांचीं लग्नें लावणें हें कायदेशीर होईल. जेथें लग्न करण्यासाठीं लागणारी योग्यता व दुसऱ्या अटी या संबंधाच्या त्या कायद्यांतील ४६ ते ५० या कलमांमध्यें या कलमामुळें कोणत्याहि तऱ्हेनें फरक होणार नाहीं असें वाटेल तेथें, २६ व्या कायद्याला अनुसरून दिवाणी कामगारानें लाविलेलीं लग्नें जितकीं कायदेशीर ठरतात तितकींच हीं लग्नें या कायद्याच्या कलमांप्रमाणें कायदेशीर ठरतील.

(अ) दोन्ही पक्षांची मंडळी आपली संमति दर्शविण्यास समर्थ असल्याशिवाय, व सही किंवा निशाणी करणाऱ्या दोन साक्षीदारांसमक्ष, दोन्ही पक्ष विवाह-करारनाम्यावर आपली सही किंवा निशाणी लावण्यास कबूल असल्याशिवाय, अशाप्रकारचा लग्नसमारंभ करितां कामा नये.

(आ) नियोजित वर २१ वर्षांपेक्षां लहान व नियोजित वधू १८ वर्षांपेक्षां लहान असल्यास, १८९० च्या २६ व्या कायद्यान्वयें ज्यांची संमति अवश्य आहे, अशा आईनें किंवा बापानें लग्नासाठीं लेखी अधिकार न दिल्यास किंवा सही करून आपली अनुमति न दिल्यास अशा प्रकारचा विवाहसमारंभ करितां येणार नाहीं.

हिंदी उपाध्यायांनां मार्गदर्शक म्हणून मारिशस सरकारनें खालील सूचना केल्या आहेतः—

महत्त्वाच्या कारणांमुळें गव्हर्नरानें परवानगी दिल्याशिवाय १८ वर्षांखालील पुरुषास व १५ वर्षांखालील स्त्रीस लग्न ठरवितां येत नाहीं.

(अ) पहिल्या लग्नाचा घटस्फोट झाल्याशिवाय दुसरें लग्न करितां येत नाहीं.

(आ) घटस्फोट करण्यास कारणीभूत झालेल्या व्यभिचारी इसमाशीं, घटस्फोट करणाऱ्या व्यक्तीला लग्न लावितां येत नाहीं.

(इ) विधवा झालेल्या किंवा घटस्फोट झालेल्या स्त्रीला १० महिनेपर्यंत पुनर्विवाह करितां येत नाहीं.

पुतणीशीं, पुतण्याशीं व विधवा भावजईशीं लग्न करणें गैर कायदेशीर आहे. याप्रमाणें मारिशस येथील विवाहनियमांचें अलीकडील स्वरूप आहे.

[ज्या ठिकाणीं कुलींचीच केवळ वसाहत होती त्याच ठिकाणीं आपल्या लोकांचा छळ झाला इतरत्र झाला नाहीं असेंहि नाहीं. पुष्कळ ठिकाणीं जागेवर आपण अगोदर असतां आणि यूरोपीय मागाहून आले असतां आपणांस हांकलून देण्याचा प्रयत्न होतो आणि छळणुकीचे कायदेहि पास होतात. असल्या कायद्यांचा एक चांगला नमुना म्हणजे ब्रि० पू० आ० तील डोईपट्टीचा कायदा होय. या कायद्याची हकीकत खालीं दिली आहे.]

**ब्रिटिश पूर्वआफ्रिका.**—ब्रिटिश पूर्वआफ्रिकेंत १९१२ सालीं तेथील सरकारनें देश्येतर रहिवाशांवर वार्षिक रु. २५ ची डोईपट्टी बसविण्याचें बिल कायदेमंडळापुढें आणलें.*

या कायदेमंडळांत यूरोपीय रहिवाशांचे प्रतिनिधी नव्हते म्हणून प्रतिनिधि नाहीं तर करनिधि नाहीं अथवा कारभार नाहीं तर करभार नाहीं या तत्त्वानुसार यूरोपीयांनीं या बिलाला विरोध केला.

हिंदी लोकांनांहि या मंडळांत अर्थातच जागा नव्हती म्हणून हिंदी लोकांनींहि सदरील बिलाला विरोध केला. परंतु हिंदी लोकांच्या विरोधाचें दुसरें जबरदस्त कारण, जें यूरोपीयांना लागू नव्हतें तें दारिद्र्य हें होय. यूरोपीय धनाढ्य असून त्यांची शिरगणती अजमासें २०००, तर हिंदी धनहीन भुकेबंगाल असून त्यांची शिरगणती अजमासें २५०००, अशी स्थिति होती. हिंदी लोक फार तर रु. ४५ पावेतों दरमहा मिळवूं शकत. परंतु सामान्यतः बहुतेक लोकांची कमाई रु. २० ते रु. २५ इतकीच होती. या लोकांनां रु. १५ वार्षिक डोईपट्टी म्हणजे एक ओझेंच होतें हें कळणें अवघड नाहीं.

कायदेमंडळांत प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क नाहीं, व दारिद्र्य अतिशय, या दोन मुद्यांखेरीज तिसरा जो मुद्दा हिंदी लोकांनीं पुढें मांडला तो हा कीं, यूरोपीय लोकांनां ज्या नानाविध सवलती व हक्क पूर्व आफ्रिकेंत भोगावयास मिळत होते त्यांचा केवळ अगदीं लहानसा अंश हिंदी लोकांच्या वांट्यास आलेला होता. पैसे घेण्याच्या वेळीं यूरोपीय व हिंदी यांजकडे समदृष्टीनें पाहणें व हक्क-सवलती देण्याच्या वेळीं समदृष्टि विसरून जाणें हें सरकारचें धोरण गैरशिस्त आहे या गोष्टीची जाणीव हिंदी लोकांनीं आपल्या बिलविरोधक अर्जांत दाखविली होती. पूर्व आफ्रिकेंत काळा-गोरा या वर्ण-भेदाचें बंड फारच होतें व आहे, व या वर्णमूलक भेदामुळें आणि एकंदरीनें यूरोपीय व तदितर

* Indian marriages in Mauritius—I. R. August 1914.

*'Indians in East Africa' by the Hon. Mr. Jeevanjee-I. R. 1912.

यांनां आपले-परके या नात्यानें वागविण्याच्या धोरणामुळें हिंदी लोकांनां या भागांत फारच हाल काढावे लागत होते व आहेत.

[पूर्व आफ्रिकेचा नमुना आपण पाहिला. आतां दक्षिण आफ्रिकेकडे वळूं. जुलमाची स्थिति सर्वत्र जवळजवळ सारखीच आहे. हिंदी लोकांकडून कोठें कमी प्रतिकार होतो, कोठें अधिक होतो, एवढाच काय तो फरक. जेथें म्हणून स्वतंत्र वृत्तीच्या हिंदी जनतेचें अस्तित्व आहे तेथें पाश्चात्त्यांशीं स्पर्धा आहे. एका वर्गाच्या हातांत राजकीय अधिकाराची तरवार द्यावयाची आणि दुसऱ्यास निःशस्त्र ठेवावयाचें या प्रकारच्या स्पर्धामूलक व्यवस्थेमुळें दक्षिण आफ्रिकेंत जो लढा उत्पन्न झाला त्याचा इतिहास मननीय आहे तो थोडक्यांत येणेंप्रमाणें:—]

**दक्षिण आफ्रिका.**—१९१४ पूर्वी २० वर्षांपासून—अथवा त्याचेहि पूर्वीपासून म्हटलें तरी चालेल—दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोक आपल्या छळाची कहाणी अर्जांच्या द्वारा सांगत आले व छळाचें जोखड हलकें व्हावें अशी प्रार्थना करीत आले. परंतु या सर्व याचनांनां एकच उत्तर सरकारकडून मिळत गेलें व तें उत्तर म्हणजे अधिक छळ हें होय. "बहुतेक सर्वच ब्रिटिश वसाहतींतून ब्रिटिश प्रजाभूत हिंदी लोकांच्या विरुद्ध असे कायदे गेल्या थोड्या काळांत केले गेले आहेत कीं, त्यांच्या योगानें हिंदी लोकांची अब्रू व माणुसकी मातींत गेली आहे व ब्रिटिश प्रजाजन या नात्यानें जो त्यांचा दर्जा त्याला काळिमा आली आहे असें गाडफ्रे म्हणतो."*

हिंदी लोकांनां कःपदार्थ करणारे कायदे करण्याच्या कामांत सर्व वसाहतींत दक्षिण आफ्रिकेनें पहिला नंबर घेतलेला आहे आणि या मुळेंच या ठिकाणीं हिंदी लोकांनीं सत्याग्रहाच्या चळवळीचा स्वीकार केला. दक्षिण आफ्रिकावाल्यांचें धोरण त्यांच्या कायदे—कर्तबगारीवरून स्पष्ट दिसतें तें हें कीं, हिंदी लोकांविरुद्ध एकापेक्षां एक छळवादी कायदे करून त्यांनां सळो कीं पळो करून सोडावयाचें आणि नको ही आफ्रिका म्हणून पळून जावयास लावावयाचें व हें न साधेल तर कायदेशीर जबर-दस्तीनें घालवून द्यावयाचें. आफ्रिका देश हा हिंदी लोकांनीं आपल्या पराकाष्ठेच्या चिकाटीच्या मेहनतीनें यूरोपीयांनां वसति-योग्य करून दिला ही गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे व या आफ्रिकेला तेथें वसती करून राहिलेले हिंदी लोक आपला देश समजतात हेंहि विसरतां कामा नये. अशा स्थितींत त्यांच्या विरुद्ध छळवादी कायदे सारखे तयार होणें व या कायद्यांच्या विरुद्ध केलेल्या तक्रारींचा व प्रार्थनांचा परिणाम फक्त अधिक कठोर कायदे सरकारकडून निर्माण होण्यांत होणें हें गोरे लोक आपला स्वार्थसाधण्यासाठीं कोणत्या प्रकारें सरकारी सत्तेचा उपयोग करून घेतात त्याचें उत्तम द्योतक आहे. असो.

**गोखले-शिष्टाई.**—दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांची दुःस्थिति व सरकारची दुर्बुद्धि इतक्या थराला गेली कीं, नामदार गोखले हे दक्षिण आफ्रिकेंतील लढ्याचा सामोपचारानें शेवट लावण्याची शक्याशक्यता पहावयास गेले. नामदार गोखल्यानीं पाहिलें कीं यूरोपीय वसाहतवाले आपल्या जातीचें सु-संरक्षण होऊन नेहमीं तिला पोटभर चैन करावयास कशी सांपडेल या नैसर्गिक फिकिरींत होते. ही फिकिर अगदीं स्वाभाविक; अर्थात् नामदारांनीं या काळजीपुढें मान लवविण्याचेंच धोरण चांगलें असें सालसपणानें व पोक्तपणानें ठरविलें व एवढाच सविनय आग्रह धरला कीं, पुढें जे कांहीं कायदेकानू व्हावयाचे ते पूर्वीपेक्षां अधिक सरळ-पणाचे व न्यायाचे व्हावे आणि त्यांची अंमलबजावणी करतांनां माणुसकी व भूतदया यांनां फांटा न दिला जावा. या गोखल्यांच्या आग्रहाला होकारार्थी उत्तरहि सरकारी अधिकाऱ्यांकडून मिळालें.

पण पुढें काय? पुढें सोळा आणे फसवणूक, अथवा सतरा आणे म्हटलें तरी चालेल. युनियन सरकारनें आपलें इमिग्रेशन बिल (विदेशीय आगंतूसंबंधींचा कायदा) प्रसिद्ध केल्याबरोबर हिंदी लोकांपुढें त्यांची शोचनीय स्थिति स्पष्टपणें उभी राहिली. या बिलानें नानाप्रकारची नवीन अपात्रता हिंदी लोकांवर कायद्यानें लादली व जुने त्या काळपावेतों भोगलेले त्यांचे हक्क काढून घेतले. अर्थात् या बिलाविरुद्ध खडाजंगीची चळवळ उडाली व या चळवळीनें त्याचा कठोरपणा किंचितसा कमी झाला. तरी पण एवढ्यानें हिंदी लोकांचें समाधान होणें अशक्य होतें. कारण त्यांत तीन शल्यें तशींच कायम होतीं. १ कायद्यांत वर्णमूलक भेदाला स्थान दिलेलें होतें. २ त्या बिलाच्या वेळेपावेतों भोगलेले असे कांहीं हक्क काढून घेतलेले होते. ३ दक्षिण आफ्रिकेंत हिंदी लोकांचीं झालेलीं लग्नें बेकायदेशीर ठरविलीं होतीं. याखेरीज तीन पौंडांची पट्टीहि तशीच कायम ठेविली होती. नामदार गोखले यांजवळ युनिअन सरकारनें कबूल केलें होतें कीं ही पट्टी रद्द करण्यांत येईल! जबाबदार मंत्र्यांनीं सदरील पट्टीसंबंधानें स्पष्टपणें अशीं विधानें केलीं होतीं कीं ही पट्टी वसुलाच्या दृष्टीनें कुचकामाची असून ज्या कारणांसाठीं ती बसविण्यांत आली तीं कारणें नाहींशीं झालेलीं आहेत!

असो. हिंदी लोक युनिअन सरकारजवळ सदरील तक्रारीं-संबंधीं सारखी वाटाघाट करीत होते आणि नवीन कायदा न करितां, सरकारी इभ्रतीस बाधा न होतां किंवा नवीन हक्क-सवलती उत्पन्न न करतां सदरील तक्रारी कशा मिटवितां येतील यासंबंधीं उपायहि हिंदी लोकांनीं सरकारला सुचविले होते. तक्रारी मिटविण्याचा विचार सरकार बाजूला ठेवील तर सत्याग्रहाची कांस जनतेला धरावी लागेल अशी सूचनाहि लोकांनीं करून ठेवली होती. सरकारनें हिंदी जनतेच्या प्रार्थनां-कडे अजीबात दुर्लक्ष केलें व मौनाचा मार्ग स्वीकारला.

**सत्याग्रहास सुरुवात.**—शेवटीं १५ सप्टेंबर १९१३ रोजीं 'ब्रिटिश हिंदी समिती'चे अध्यक्ष कचालिया यांनीं युनिअन-सरकारला स्पष्टपणें कळविलें कीं, आतां हिंदी लोक सत्याग्रह सुरु करणार आहेत. मे १९१३ पासून सत्याग्रहाची तयारी चाललेली होतीच. तेव्हां वरील सूचनेप्रमाणें ताबडतोब १२ पुरुष व ४ स्त्रिया यांनीं सत्याग्रहाचा मार्ग स्वीकारला. या पहिल्या सत्याग्रही गटांत सर्व धर्मांचे व व्यापारी, कारकून, मोलकरी, सुखवस्तु वगैरे सर्व वर्गांचे लोक होते. या गटानें नेटल सोडून ट्रान्सवालाचा रस्ता धरला व वालक्रस्ट येथें सरहद्द ओलांडून ते आंत शिरले. या कृत्याबद्दल त्यांनां तीन महिने सक्तमजुरीची शिक्षा मिळाली. ही शिक्षा इकडे

* 'The struggle in South Africa' by Mr. J. W. Godfrey, Bar-at-law, Dundee, Natal.—I. R. Jan. 1914.

मिळतांच तिकडे ट्रान्सवालांतील बऱ्याचशा हिंदी स्त्रिया न्यूकॅसल व नेटल येथें येऊन विगरपरवाना व्यापार करूं लागल्या आणि सत्याग्रह करण्यासंबंधीं उपदेशहि त्यांनीं सुरू केला. या कामगिरीबद्दल या स्त्रियांनां तीन महिने सक्तमजुरी झाली. या स्त्रियांपैकीं कांहींचीं लहान अर्भकें त्यांच्या कडेवरच होतीं. या स्वार्थत्यागी महानुभाव स्त्रियांच्या उदाहरणाचा न्यूकॅसलमधील हिंदी जनतेवर सहजच विद्युद्गतीनें परिणाम झाला, आणि तेथील वाढप्यांचा धंदा करणाऱ्या हिंदी लोकांनीं त्याच दिवशीं एकदम संप करून सरकार तीन पौंड पट्टी काढून टाकीपावेतों आम्ही कामावर जाणार नाहीं असें जाहीर केलें. दुसरे दिवशीं म्हणजे २३ आक्टोबर १९१३ रोजीं न्यूकॅसल, फेअरली, वेलेन्गीक्, कॅम्ब्रिअन्, डर्वान नॅविगेशन्, ग्लेंको, नेटल नॅविगेशन, हॅटिंग स्प्रूट, सेंट जॉर्ज व राम्से या नऊ कोळशाच्या खाणींतील लोकांनीं न्यूकॅसलची वार्ता ऐकून स्वयंस्फूर्तीनें संप केला व हे बहुतेक लोक डंडी येथें आले. या ठिकाणीं एका चांभाराच्या अध्यक्षतेखालीं गांधींनीं या संपवाल्यांनां जाहीर उपदेश केला. या व्याख्यानांत गांधींनीं लोकांना आपलीं कामें सोडून देण्याचा उपदेश केल्याचा त्यांजवर पुढें आरोप ठेवला गेला व या कृत्याबद्दल त्यांस ९ महिने सक्तमजुरी मिळाली.

**३००० सत्याग्रही.**—न्यूकॅसल हें संपवाले एकत्र मिळण्याचें ठिकाण झालें. चोहोंकडील संपवाले स्त्रिया व पुरुष डंडीहून न्यूकॅसल-कडे चालले. पुष्कळांनीं आपलीं कोंबडीं, बकरीं व घरसामान येईल त्या किंमतीला फुंकून टाकून आपला बोजा आटोपशीर केला व हा बोजा घेऊन ते न्यूकॅसलकडे निघाले. पावसाळ्याचे दिवस. मुसळधार पावसांत बराच वेळ त्यांनां मार्गक्रमण करावें लागलें. गांधी या संपवाल्यांबरोबर होते. बायकामुलांनां आगगाड्यांनीं रवाना करण्याची शक्य तेवढी व्यवस्था करण्यांत येत होती परंतु पुष्कळ बायकांनीं या व्यवस्थेचा फायदा घेण्याचें नाकारलें व पुरुषांबरोबर सर्व आपत्ति त्यांनीं आनंदानें भोगल्या. न्यूकॅसल येथें संपवाल्यांनां सर्व प्रकारची मदत मिळाली. तेथील हिंदी लोकांनीं आपलीं दुकानें व मालसांठ्याच्या जागा मोकळ्या करून संपवाल्यांच्या राहण्याची सोय केली व त्यांच्या जेवण-खाणाची व्यवस्था करून त्यांची इतर सर्व प्रकारची चाकरी केली. पुष्कळ श्रीमंत तरुण याप्रकारें संपवाल्यांची सेवा करीत होते. या सत्कृत्याबद्दल न्यूकॅसलमधील पुष्कळशा हिंदी सज्जनां-वर पुढें करारबंदीच्या मजुरांनां गैरकायदा आश्रय दिल्याचा आरोप ठेवण्यांत आला. न्यूकॅसलहून संपवाले चार्लसटाऊन येथें गेले. या ठिकाणीं कालेनबॅक् (युरोपीय सत्याग्रही) व थुंबी नायडू यांनीं संपवाल्यांची व्यवस्था ठेवली. न्यूकॅसल व चार्लस-टाऊन या ठिकाणीं स्त्रिया व मुलें यांची व्यवस्था मिस् श्लेसीन या यूरोपीय स्त्रीनें आपल्या अंगावर घेतली होती. नोव्हेंबर ६ रोजीं गांधी ३००० हिंदी लोकांसह नेटलची सरहद्द ओलांडून ट्रान्सवालांत शिरले. ग्रेलिंगस्टाड येथें या सर्वजणांनां पकडलें. सत्याग्रही संपवाल्यांनां ज्यांच्या त्यांच्या खाणींवर पोंचविण्यांत आलें. (गांधी पोलक व कालेनबॅक यांनां संपवाल्यांचें अग्रेसरत्व पत्करल्याबद्दल पुढें तीन तीन महिने कैद मिळाली.) संपवाले खाणींवर पोंचते केले गेले परंतु तेथें त्यांनीं काम करण्याचें नाकारलें.

**न्यायकोर्टांचा फार्स.**—यानंतर न्यायकोर्टांचा न्यायनिवाडा सुरू झाला. डंडी येथील कोर्टासमोर सर्व संपवाल्यांना खेंचून आणलें आणि त्यांच्या तुकड्या करून एकेका तुकडीवर स्वतंत्रपणें आरोप ठेवण्यांत आले. एका तुकडीला रीतीप्रमाणें सात दिवस सक्तमजुरी मिळाली. त्यावेळीं हे शिक्षा झालेले सर्व लोक एक स्वरानें म्हणाले कीं, "तीन पौंड पट्टी बंद होईपावेतों आम्ही काम करणार नाहीं, आपण काय वाटेल तें करा. गेले तीन दिवस आम्ही अन्नावांचून आहों. मरूं एक दिवस. मरण एकदांच मरावें लागतें. सात दिवसांऐवजीं ५।६ महिन्यांची शिक्षा आपण द्याना."

**सत्याग्रही लोकांचा छळ.**—या निग्रही सत्याग्रही लोकांनां पोलीसच्या बंदोबस्तांत परत खाणींकडे पोंचविण्यांत आलें. परंतु पूर्वीप्रमाणेंच त्यांनीं नकार धरला. खाणीवरील व्यवस्थापकांनीं त्यांना अन्न देण्याचें नाकारलें. कारण काम करील त्याला अन्न असाच कायदा होता! 'नेटल हिंदी समिती'नें कांहीं सभासद या संपवाल्यांनां मदत देण्यासाठीं पाठविले, परंतु खाणींच्या जागा खासगी मालकीच्या, व या जागांच्या मालकांनीं खाणींच्या आवारांत शिरण्याची परवानगी सदरील सभासदांनां देण्याचें नाकारलें, तेव्हां अर्थातच संपवाल्यांनां मदत पोंचली नाहीं. खाणींचे व्यवस्थापक संपवाल्यांनां नरम करण्यासाठीं त्यांजवर मार देण्याचा प्रयोग करूं लागले. या प्रयोगासंबंधानें संपवाल्यांनीं तक्रारी केल्या, परंतु त्या व्यर्थ झाल्या. एकहि खटला कोर्टापुढें आला नाहीं, कारण साक्ष घेण्याची बंदी करण्यांत आली होती. नोव्हेंबर पहिली पावेतों याप्रमाणें चाललें होतें. या तारखेच्या सुमाराला न्यूकॅसल व डंडी येथील मॅजिस्ट्रेटांनीं सरकारी हुकमावरून संपवाल्यांच्या खाणींच्या जागा तात्पुरते तुरुंग ठरविले आहेत असें जाहीर केलें आणि संपवाल्यांनां सक्तमजुरी कैदेची कमी अधिक मुदतीची शिक्षा ठोठावून त्यांनीं आपापल्या खाणींतच ही शिक्षा भोगावी असें ठरविलें. हिंदी लोकांनीं सत्याग्रह केला व काम करण्याचें नाकारलें. अधिकारी, खाणीवाले मालक व त्यांचे मुनीम गरम झाले आणि संपवाल्यांनां ठोशांचा, चाबकाचा वगैरे प्रसाद भरपूर मिळूं लागला.

**सत्याग्रही लोकांवर गोळ्या.**—नोव्हेंबर १० रोजीं गांधींनांहि कैद झाली. गांधींचा निरोप संपवाल्यांनां गेला कीं, "तीन पौंड पट्टी रद्द होईपावेतों संप मोडणें नाहीं. सरकारानें मला कैद केलेंच आहे. आतां पट्टी रद्द करण्यासंबंधींचें आपलें म्हणणें सरकारला गौरवानें लोकांपुढें मांडतां येईल." हा निरोप गांधींच्या ठिकाणापासून २५० मैलांवर नेटलच्या समुद्र-किनाऱ्याच्या भागांतील हिंदी लोकांच्या कानावर जातांच त्या लोकांनीं तावडतोव (ता. ११ नोव्हेंबर) संप केला. हे हिंदी मजूर दंगाधोपा करतील या दहशतीनें पोलीस व लष्करी लोक सरकारनें बंदोबस्ताकरितां तयार केले. मारामारी, गोळ्या घालणें, वगैरे प्रकार झाले. प्राणहानि झाली.

**चौकशी–कमिशन.**—या प्रकरणासंबंधानें व वर खाणींतील मजुरांवर झालेल्या हाणामारीच्या व जुलुमजबरदस्तीच्या प्रकरणासंबंधानें चौकशी-कमिशन ता. २९ नोव्हेंबरला नेमलें गेलें. याचवेळीं दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी संपवाल्यांना उद्देशून नेटल

हिंदी समितीचे सभासद असलेल्या कित्येक स्त्रीपुरुषांचीं व्याख्यानें झालीं व त्यांत अधिकाऱ्यांशीं नम्रपणानें वागा आणि सत्याग्रहाचीं तत्त्वें धैर्यानें पाळा असा उपदेश केला गेला. तरीपण या सरळ व्याख्यानांचा विपर्यास केला गेला आणि १०।१५ व्याख्यात्यांवर लोकांनां मारामारीची चिथावणी केल्याचा आरोप ठेवून त्यांस कैद केलें.

संपवाल्या व इतर सत्याग्रही लोकांचा मेळा एका प्रसंगीं ३०००० पावेतों वाढला होता. यांची राहण्याची, खाण्यापिण्याची वगैरे सोय लावण्याचा रोजचा खर्च २५० पौंड येत असे. हिंदुस्थानांत नामदार गोखले यांनीं दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रही चळवळीसंबंधाची स्थिति समजावून देऊन या चळवळीच्या मदतीसाठीं मोठाल्या वर्गण्या जमविण्याचें काम केलें. ही वर्गणीची रक्कम चळवळीला चांगलें स्वरूप आणण्यास फार उपयोगी पडली. सत्याग्रही संपवाल्यांनां त्यांच्या त्यांच्या कारखान्यांत डाळतांदूळ पोंचविण्याचें काम कांहीं दिवस चालू होतें. पुढें अधिकाऱ्यांनीं या कामांत कांहीं काळाबेरा उद्देश आहे असा संशय काढला आणि ही मदत पोंचविणें बंद केलें. यानंतर रस्त्यावर अन्न ठेवून घावें व तें हिंदी संपवाल्यांनीं घेऊन जावें असा क्रम कांहीं दिवस चालला. पण हें कामहि अधिकाऱ्यांनीं बंद पाडलें. सत्याग्रही लोकांनां उपासमारीचे दिवस काढावयास लावावयाचे व या रीतीनें काम करावयास भाग पाडावयाचें, हा हेतु. परंतु सत्याग्रही लोकांनीं सत्याची कांस वळकट धरली व हा हेतु निष्फळ केला. यापुढें हाणामारीवर आलें व अशा रीतीनें कांहीं काळ लोटल्यावर चौकशीकमिशन ता. २९ नोव्हेंबरच्या सुमारास नेमलें गेलें. सर बेंजामिन रॉबर्टसन् हे हिंदी सरकाराच्या तर्फेनें सदरील कमिशनच्या प्रसंगीं चौकशीसाठीं पाठविले गेले. त्याच्या योगानें दक्षिण आफ्रिकेच्या सरकारापुढें हिंदी मंडळींची बाजू जितक्या चांगल्या तऱ्हेनें इंग्रजांस मांडतां येईल तितकी मांडली गेली, तथापि विशेष फलनिष्पत्ति झाली नाहीं.

[ब्रिटिश वसाहतींतील भारतीयांची स्थिति आपण येथवर नजरेखालीं घातली. आतां ब्रिटिशेतर वसाहतींचें थोडेंसें निरीक्षण करूं.]

**ब्रिटिशेतर वसाहतींतील भारतीय.***–परदेशवास केलेल्या भारतीयांचे दोन वर्ग पडतात. एक, स्वेच्छेनें परदेशांत जाऊन राहिलेल्या लोकांचा; व दुसरा, करारानें बांधलेल्या परदेशवासीयांचा. पूर्व आफ्रिकेचा समुद्रकिनाऱ्यालगतचा जो प्रदेश आहे त्या प्रदेशांत कित्येक शतकांपूर्वीपासून भारतीय लोक स्वेच्छेनें जाऊन राहत आहेत. आज ज्याला ईस्ट आफ्रिकन् प्रोटेक्टोरेट म्हणतात तो प्रदेश ब्रिटिश लोकांनीं आपल्या ताब्यांत घेण्यापूर्वीं कित्येक वर्षें अगोदर भारतीय लोक किनाऱ्यालगतचा प्रदेश व्यापून पुष्कळसे आंतहि वसती करून राहिले होते, ही गोष्ट. ए. एम्. जीवनजी यांनीं वारंवार पुढें आणिली आहे. मोम्बासाचे उत्तरेपासून तों डर्बानपर्यंत, आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावर जागोजाग भारतीयांच्या वसाहती आहेत. तसेंच नैरोबी, ब्लँटायर व इतर अंतःप्रदेशांतील ठिकाणींहि या वसाहती आहेत. या सर्व ठिकाणीं 'सुधारणेचा' प्रथम प्रवेश झाला तो भारतीयांच्या द्वाराच झाला. या ठिकाणीं आज ब्रिटिशांचें राज्य झालें आहे, तसें इतर ठिकाणें जीं या भारतीयांनीं रानटी स्थितींतून काढून सुधारलेल्या लोकांच्या वसतीला योग्य केलीं त्या ठिकाणीं जर्मन व पोर्तुगाल आणि दुसरे कित्येक परदेश यांचें राज्य आहे. हीं सर्व ठिकाणें उद्योगधंदे, व्यापार, शेतकी, या सर्व दृष्टींनीं भारतीयांनीं चांगलींच नांवारूपाला आणलीं व अशा चांगल्या स्थितींत तीं परकीयांनां आयतीं प्राप्त झालीं. ब्रिटिशेतर वसाहतींतील नमुनेदार ठिकाणांत लांगा, दार–एस्–सलाम्, बैरा, छिंदे, किलिमेन्, मोझांबिक, इन्हाम्बेन्, देलागोआ बे, हीं प्रमुख होत.

**ब्रिटिश गुरु.**—ब्रिटिश वसाहतींतून भारतीयांचा छळ करण्याचें प्रथम सुरू झालें व नंतर हें वेड पोर्तुगीज, जर्मन वगैरे वसाहतवाल्यांमध्येंहि दिसूं लागलें. ब्रिटिशांनीं अमुक प्रकारचा भारतीयहितविरोधी कायदा केलेला आहे असा आधार देण्याचीच वहिवाट पडली. उदाहरणार्थ, १८८४ सालीं प्रिटोरियाचे व्यापारीमंडळातर्फे साउथ आफ्रिकन रेपब्लिकच्या वास्सूक्राडकडे जो एक अर्ज पाठविला गेला त्यांत ब्रिटिशांच्या निरनिराळ्या वसाहतराज्यांत एशियावाल्यांच्या विरुद्ध पास केलेले कायदे नमुन्यादाखल अंतर्भूत केलेले होते आणि रेपब्लिकनें ब्रिटिशांचें सदरील एशियाटिक–विरोधी धोरण उचलणेंच हितकर आहे असें प्रतिपादन केलें होतें. १८८४ सालच्या लंडन कन्वेन्शननें दक्षिण आफ्रिकेंतील देश्येतर ब्रिटिश प्रजाजनांच्या हक्काचा कागद म्हणून जो तयार केला त्यांत गोरे लोक व त्यांचीं मुलेंबाळें–त्यांचे वंशज–यांच्याच हक्कांचें खरोखरी संरक्षण केलेलें होतें ही गोष्टहि वरील अर्जांत नमूद केली होती. या अर्जाचा विचार होऊन १८८५ चा ३ रा कायदा दक्षिण–आफ्रिका–लोकशाहीनें पास केला. पुढें ट्रान्सव्हालमध्यें जे भारतीयहितविरोधी कायदे पास केले गेले त्या सर्वांचें उगमस्थान हा १८८५ चा ३ रा कायदा होय.

ट्रान्सवाल हें बोअर युद्धानंतर ब्रिटिश वसाहत बनल्यावरहि त्या प्रदेशाचें भारतीय-विरोधी धोरण पूर्वीप्रमाणेंच राहिलेलें आहे. ट्रान्सवाल रेजिस्ट्रेशन आक्ट सेल्बोर्न-बोथा-स्मट्स गवर्मेंटनें पास करून घेतल्यानंतर नेटल व दक्षिण ऱ्होडेशिया या संस्थानांनीं तसलेच भारतीय हितविनाशक कायदे पास करून घेण्याची खटपट केली.* ब्रिटिश पूर्व आफ्रिका सरकारनेंहि भारतीयांनां दूर ठेवण्याचें धोरण स्वीकारलें.

या ब्रिटिश उदाहरणांचा फायदा घेऊन पोर्तुगीज व जर्मन वसाहतवाले भारतीयांचा छळ करण्याचेंच धोरण पत्करूं लागले.

**पोर्तुगीज शिष्य.**–१८९६ सालीं लोरेन्को मार्क्वेस या पोर्तुगीज परगण्यांत भारतीयांनां वागविण्याचें जें उदार धोरण अमलांत होतें तें पुढें लवकरच ब्रिटिश उदाहरणामुळें पार बदलून गेलें. नेटलमध्यें (नेटल ही ब्रिटिश वसाहत) एकदां गांधींनां आगगाडींतून खालीं ओढूनकाढून एका गोऱ्याला जागा करून दिली होती

* 'Indian Emigration to Non-British Colonies' by Mr. H. S. L. Polak, I. R. 1912.

* या खटपटींत यश आलें नाहीं कारण साम्राज्यसरकार विरुद्ध गेलें.

मग इतरेजनांची कथा काय ? ट्रान्सवालमध्यें गुरांच्या गाड्यांतच भारतीयांना कोंडण्याची वहिवाट आहे. उलटपक्षीं, लोरेन्को मार्क्वेस या पोर्तुगीज परगण्यांत गरीब भारतीयांनां दुसऱ्या क्लासांत वसवीत व आदरानें वागवीत. ही १८९६ मधली स्थिति ( हिचा उल्लेख गांधींनीं त्या वर्षी हिंदुस्थानांत जीं व्याख्यानें झालीं त्यांतून झाला होता ). परंतु पोर्तुगीज लोक लवकरच ब्रिटिश वळणावर गेले. नेटलमध्यें जसा भारतीयांचा राजकीय मताचा हक्क काढून घेतला गेला तसे पोर्तुगीज लोकहि हळू हळू भारतीयांच्या मानवी स्वतंत्रतेच्या हक्कावर घाला घालूं लागले. ट्रान्सवालचे लोक हे ब्रिटिश उदाहरणाचा फायदा घेऊन सर्वांत अग्रेसर असे भारतीय-द्वेष्टे बनलेले होते. पोर्तुगीज अंमलदार हे ट्रान्सवालच्या भारतीय-द्वेष्ट्या अंमलदारांचे दोस्त व साहाय्यक बनले आणि ट्रान्सवालनें जो रेजिस्ट्रेशन आक्ट व एमिग्रेशन आक्ट तयार केला होता त्याची अंमलबजावणी करण्याच्या कामांत किनाऱ्यावरील पोर्तुगीज अंमलदार न्यायाकडे न पाहतां ट्रान्सवाल सरकाराला मदत देऊं लागले. उदाहरणार्थ, ट्रान्सवालच्या कायद्याविरुद्ध सत्याग्रह करणाऱ्या अगदीं निरपराधी अशा शेंकडों लोकांनां ट्रान्सवाल सरकारनें चौकशी न करतां हद्दपारीची शिक्षा दिली व ही शिक्षा पोर्तुगीज मुलखांतून भारतीयांनां घेऊन जाऊन अंमलांत आणली गेली. याप्रमाणें हद्दपारीच्या अन्याय्य हुकमाच्या बजावणींतच पोर्तुगीज अंमलदार मदत देऊन राहिले नाहींत तर ट्रान्सवालमध्यें आपल्या आईबापांकडे कायदेशीर हक्कानें जावयास निघालेल्या लहान हिंदी मुलांनां अडविण्याचें कामहि त्यांनीं केलें. ही पोर्तुगीज लोकांची गोष्ट झाली.

**जर्मन शिष्य.**—जर्मन पूर्वआफ्रिकेंतहि ब्रिटिश उदाहरणाचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. बोअर युद्धानंतर ट्रान्सवालचे कांहीं बोअर लोक नैरोबी ( ब्रि० पू० आफ्रिका ) जिल्ह्यांत गेले व तेथें त्यांनीं आपलें वर्णद्वेषाचें खूळ तेथील गोऱ्या लोकांनां शिकविलें. नैरोबींत सारे २००० गोरे, हिंदी हजारों व नेटिव बेहिसाब. असें असून ब्रिटिश पूर्व आफ्रिका हा 'गोरा देश' राहिला पाहिजे असें धोरण नैरोबी जिल्ह्यांत तेथील गोऱ्यांनीं ठरवून टाकलें, व तदनुरूप गौरेतरांचा छळ सुरू केला. हें ब्रिटिश उदाहरण जर्मनांच्या पथ्यावर पडलें. ब्रिटिश पूर्व आफ्रिका व झांझिबार येथील हिंदी लोकांपेक्षां जर्मन आफ्रिकेंतील हिंदी लोकांची स्थिति थोड्या दिवसांपूर्वी नांव घेण्यासारखी चांगली होती. हेर डर्नबर्ग हा जर्मन वसाहतसेक्रेटरी असतांना जर्मन वसाहतींत हिंदी व्यापारी हे फार उपयोगी नागरिक आहेत आणि वसाहतीची आर्थिक उन्नति करावयाच्या कामीं या हिंदी नागरिकांच्या कडून फार महत्वाची मदत होईल असें या सेक्रेटरींनीं जाहीरपणें म्हटलें होतें व या मतानुसार हिंदी लोकांनां वागविण्याची पद्धतीहि जर्मन प्रदेशांत उदारपणाची होती. परंतु हा उदारपणा ब्रिटिश उदाहरणानें लयास गेला. ट्रान्सवालनें भारतीय-विरोधी रेजिस्ट्रेशन व इमिग्रेशन कायदे पास केल्यावर जर्मन पूर्व आफ्रिकेंत ट्रान्सवालच्या धर्तीवर कायदे पास करण्याची चळवळ झाली, परंतु त्यावेळीं वसाहतसेक्रेटरी व्यापारी दृष्टीचा पक्का असल्यामुळें सदरील चळवळीला यश आलें नाहीं. पुढें १९१२ सालीं ब्रिटिश उदाहरणें पुढें करून जनरल लायबर्ट यांनीं रायस्टॅगमध्यें हिंदी लोकांनां जर्मन पू० आफ्रिकेंत मज्जाव करणारी योजना पुढें आणली. या प्रसंगीं वसाहतीचे प्रधान डॉ. सोल्फ म्हणाले कीं, हिंदी लोक जर्मन आफ्रिकेंतून नाहींसे होतील तर चांगलें असें मत जर्मन आफ्रिकेंत आहे खरें, परंतु जर्मनांचा त्या प्रदेशावर कबजा होण्यापूर्वी कित्येक वर्षे हजारों हिंदी लोक तेथें वस्ती करून राहिले होते, यामुळें त्यांनां तेथून एकदम हांकलून लावणें अशक्य आहे. डॉ. सोल्फ यांच्या या उत्तरांत ब्रिटिश उदाहरण जर्मनांचा उदारपणा नाहींसा करण्याच्या कामीं कसें यशस्वी झालें हें स्पष्ट झालें आहे.

सामान्यतः स्वेच्छेनें विदेशवास करणारांची ही हकीकत झाली. आतां करारबंदीनें विदेशवास पत्करणारांची हकीकत पाहूं.

**फ्रेंच अत्याचार.**—ब्रिटिशेतर वसाहतींत करारबंदीनें हिंदी लोक जाऊं लागले त्याला आज जवळ जवळ ८० वर्षे झालीं आहेत. मॉरिशसवाल्यांना हिंदी मजूर मिळाल्यानंतर लवकरच रेयुनिअन् नांवाच्या मॉरिशसलगतच्या बेटांतील लोकांनीं करारबंदी हिंदी मजूर मिळण्याबद्दल अर्ज केला व या अर्जाप्रमाणें त्यांनां हिंदी मजुरांचा पुरवठा केला गेला. पुढें मजुरांनां वागविण्याच्या कामांत रेयुनिअनवाल्यांकडून अत्याचार घडल्यानें ग्रेटब्रिटन व फ्रान्स यांजमध्यें करारमदार होऊन फ्रेंच मुलखांत करारबंदीनें जाणाऱ्या हिंदी लोकांची व्यवस्था नीट व्हावी अशी तजवीज करण्यांत आली. पण हे करारमदार फुकट गेले व शेवटीं फ्रेंच मुलखांत करारबंदीनें मजुरांचा पुरवठा केला जाऊं नये असें ठरलें. डेन्मार्कनेंहि हिंदुस्थानांतून करारबंदीचे मजूर आपल्या वसाहतींत नेण्याचा उपक्रम केला होता परंतु अंतर्गत अडचणीमुळें डेन्मार्कवाल्यांनीं आपण होऊनच ही पद्धति बंद केली. ब्रिटिश गियाना जवळ सुरीनाम नांवाची डच वसाहत आहे तेथें १९१२ पावेतों करारबंदीचे मजूर जात होते.

१९१२ सालीं जर्मन नैऋत्य आफ्रिकेंत लुएडेरिझ बे येथील खाणीवाल्यांच्या मंडळाला मजुरांची तूट फार भासूं लागली. या ठिकाणीं हिऱ्याच्या खाणी आहेत. या खाणींसाठीं डामारालँडच्या सरकारच्या परवानगीनें एक हजार हिंदी मजूर करारबंदीनें आणावे अशी योजना सदरील खाणीवाल्यांनीं काढली.

**इंग्रजांची करार-कर्तबगारी.**—पैशाच्या पाठीमागें लागलेले इंग्रज लोक वसाहतीमध्यें हिंदी मजुरांचा किती प्रकारांनीं फाजील फायदा घेतात याचें एक उदाहरण म्हणून खालील हकीकत उपयोगी पडेल. १९०७ सालीं बेंग्वेलामध्यें लोबिटो बेपासून काटांगापर्यंत रेल्वे बांधण्याच्या कामासाठीं पुरेसे मजूर ठेकेदार इंग्रजी कंपनीला न मिळाल्यानें या कंपनीनें नेटलमधील करारमुक्त स्वतंत्र हिंदी मजुरांकडे नजर फेंकली. हे मजूर नांवाचे स्वतंत्र होते. नेटल सरकारनें जी वार्षिक तीन पौंडांची पट्टी ठेवली होती ती थकल्यानें आणि ही सरकारबाकी दिल्याखेरीज मजुराला कोणी काम देऊं नये असा कायदा असल्यानें मजूर लोक अडचणींत आलेले होते. तसेंच करारमुक्त झाल्यावरोबर हिंदुस्थानला जाणाराला जहाजाचें तिकिट जें फुकट मिळे तें पुष्कळ लोक वसाहतींतच करारमुक्ततेनंतर कालक्रमणा करून गमावून बसले होते. याप्रमाणें बेरोजगार मजुरांची नेटलमध्यें गर्दी झालेली होती. या मजुरांनां भरपूर पैशाची वगैरे लालुच

दाखवून, साम्राज्यसरकार व हिंदुस्थानसरकार यांच्या अनुमतीनें नेटल गवर्मेंटच्या नजरेखालीं ठेकेदार कंपनीनें त्यांजशीं करारमदार करून दोन वर्षांच्या ठरावानें (या दोन वर्षांच्या आंत मजुरांनां नेटलमध्यें आणून सोडावयाचें असा ठराव होता) दोन हजारांवर मजूर लोबिटोवेकडे रवाना केले. या मजुरांनां फार निर्दयपणें वागविण्यांत येऊं लागलें. हा जुलूम हळू हळू सर्वांच्या कानांवर गेला. शेंकडों मजूर मृत्युमुखीं पडल्याचें व शेंकडों परागंदा झाल्याचें वर्तमान सर्वश्रुत झालें. वर्षभर कसावसा हा रोजगार चालला व वर्षांच्या अंतीं ठेकेदार कंपनीनें करार धाब्यावर बसवून मजुरांनां कामावरून दूर केलें. कोणत्याहि सरकारानें या ठेकेदारांच्या अत्याचारांची चौकशी केली नाहीं. बेकार केलेले मजूर डर्बानपर्यंत आणले गेले. या वेळीं विदेशीयागमननिर्बंध खात्याच्या अधिकाऱ्याला मोठी युक्ति सुचली व ही युक्ति लढवून त्यानें नेटलमधून करारमुक्त हिंदी लोकांचा एक मोठा तांडाच्या तांडा घालवून लावला. सदरील युक्ति म्हणजे वरील ठेकेदार कंपनीशीं झालेल्या कराराचा गैरवाजवी अर्थ करून या अर्थाचा दुरुपयोग करणें ही होय. वसाहतींत करारमुक्तांची तीन वर्षें वसती झाल्यावर त्यांना नागरिकाचा वसतीचा हक्क मिळावयाचा व असा मनुष्य कोठें बाहेरदेशीं गेला तरी त्याला परत वसाहतींत येण्याचा हक्क आहे असा नेटलचा कायदा होता. लोबिटो बे येथें गेलेले मजूर तीन वर्षें त्यांची नेटलमध्यें वसति होण्यापूर्वीच त्या ठिकाणीं गेले असल्यानें नेटलमध्यें येण्याचा त्यांचा हक्क नाहीं असा सूक्ष्म डाव विदेशीयागमननिर्बंध खात्याच्या अधिकाऱ्यानें लढविला. नेटल सरकारनें या मजुरांचीं मनें वळवून लोबिटो बेकडे जाण्याचा करार त्यांजकडून करविला होता, हे मजूर आपलीं बायकापोरें नेटलमध्येंच ठेवून दोन वर्षांपूर्वी नेटलमध्यें कंपनीनें त्यांस घरीं आणून सोडावयाचें अशा स्पष्ट करारानें गेले होते, या सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष केलें गेलें. करारबंदीनें लोबिटो बेला गेलेल्यांपैकीं सर्वांनांच कांहीं निर्बंध खात्याच्या अधिकाऱ्याचा डाव लागू होत नव्हता. हिंदुस्थानला जाणाऱ्या बोटीवर जबरदस्तीनें चढविलेल्या मजुरांत पुष्कळ मजुरांनां नेटलांत शिरण्याचा कायदेशीर हक्क आलेला होता. पण इकडे पाहतो कोण! नेटल हिंदी कांग्रेसच्या अध्यक्षांनीं बोटींवरील लोकांची गांठ घेण्याची परवानगी मागितली. परंतु ही परवानगी देण्यांत आली नाहीं. कोणाचें कांहींहि न ऐकतां, न्यायकोर्टात चौकशीची सवड कोणालाही न देतां लोबिटोबेहून डर्बानला आणलेल्या मजुरांपैकीं बहुतेकजणांनां नेटलच्या विदेशीयागमननिर्बंधक अधिकाऱ्यानें जबरदस्तीनें हिंदुस्थानला पोंचविलें व आपलीं बायकापोरें अडचणींत व हलाखींत नेटलमध्येंच टाकून या सर्व हिंदी लोकांनां परत हिंदुस्थानला यावें लागलें. याप्रमाणें इंग्रज ठेकेदारांच्या अजब करार-कर्तबगारीची व इंग्रज वसाहतसरकारच्या हिंदी-प्रेमाची हकीकत आहे. ब्रिटिश सरकारनें अथवा हिंदी सरकारनेंहि या अतिनिर्घृण विश्वासघाताची चौकशी केली नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

अलीकडील परदेशगमनाचा वृत्तांत येथवर दिल्यानंतर आतां प्राचीन काळचें परदेशगमन, अलीकडच्या व तेव्हांच्या परदेशगमनांतील भेद वगैरे गोष्टींकडे वळूं.

**परदेशगमनाची अव्याहत परंपरा.**—प्राचीन काळच्या परदेशगमनापासून अलीकडचें परदेशगमन कालदृष्टीनें अगदीं पृथक् काढतां येणार नाहीं. आज व्यापारामध्यें गुजराथी लोकांस प्रामुख्य आहे आणि यूरोपांत गुजराथी जरी व्यापाराकरितां फारसे जात नाहींत तरी आफ्रिकेमध्यें आणि हिंदुस्थानच्या पूर्व भागांत पुष्कळ जातात. या गुजराथ्यांची व्यापारविषयक परंपरा फार जुनी आहे. व्यापाराबरोबर चांचेगिरीचा धंदा करण्याचें श्रेय देखील गुजराथ्यांसच आहे. भडोचचा व्यापारी शहर म्हणून उल्लेख जातक काळापासून आहे. आणि तेथून वसऱ्यापर्यंत व्यापार जातकांत दिसतो. मध्यंतरीं हिंदुस्थानच्या पश्चिमकिनाऱ्यावर चांचेगिरी चालत होती आणि त्यांत आंग्र्यांच्या नांवाचा जरी बोभाटा पुष्कळ झाला तरी खरे चांचे कच्छी होत. "चाचिया" या शब्दाची मराठी भाषेंत व्युत्पत्ति साधत नाहीं. गुजराथी लोक चांचिया याची व्युत्पत्ति अशी देतात कीं, चोंच असलेली पगडी वापरणारे लोक. कच्छी पालथ्या होडग्यासारखी एक पगडी वापरतात, तिला चाचिया म्हणतात. पालथी होडीची पगडी ही चांचेपणाची गुजराथेंत खूण होती. जे लोक व्यापारासाठीं साहस करणार, त्यांच्यांतून व्यापाऱ्यांचे लुटारू निघावयाचेच. सोकोत्रापर्यंत चांचेगिरी करणारे हेच लोक असावेत. वास्को डी गामा याला हिंदुस्थानची वाट दाखविणारा वाटाड्या गुजराथी होता. अलबुकर्क हा जेव्हां यवद्वीपास गेला तेव्हां त्यास तेथील अशी एक शासनपद्धति दिसून आली कीं, जे बाहेरचे व्यापारी येत त्यांच्यापैकींच कोणास तरी त्या लोकांवर अधिकार देण्यांत येई. चिनी लोकांचा कोणी तरी पुढारी राजा मान्य करी आणि त्याप्रमाणेंच गुजराथी लोकांचा कोणी तरी पुढारी ठरविला जात असे. त्या त्या पुढाऱ्यांस आपल्या सजातीयांवर अधिकार देऊन त्यास जबाबदार धरावयाचें फार प्राचीन पद्धत आहे. ही मनुस्मृतींतहि उपदेशिली आहे. बाहेर देशचे सीरियन ख्रिस्ती आणि कोचीनचे ज्यू ज्या वेळेस मलबार येथें आले आणि तेथें स्थित झाले, तेव्हां त्यांच्या पुढाऱ्यांसहि मलबारच्या हिंदू राजांनीं अशींच अधिकारपत्रें दिलीं होतीं. डच लोकांनीं देखील ही पद्धत यवद्वीपांत अंशेंकरून कायम ठेविली आहे. तेथें चिनी लोकांवर अधिकार चालविणारा एक 'क्यापटन चायनामन्' म्हणून असतो. चिनी लोकांस सुव्यवस्थित राखण्याची व प्रसंगीं शासन करण्याची जबाबदारी त्याच्यावर असते.

**जुन्या नव्या परदेशगमनांतील भेद.**—कालदृष्टीनें प्राचीन परदेशगमन आणि आजचें परदेशगमन हें पृथक् नाहीं तरी, प्राचीन परदेशगमन आणि अर्वाचीन परदेशगमन यांत कांहीं स्थूल भेद दृष्टीस पडतात. प्राचीन परदेशगमनामध्यें व्यापारासाठीं वैश्य हिंडत. कधीं कधीं एका ठिकाणाहून उच्चाटन झालेला क्षत्रियवर्ग दुसऱ्या ठिकाणीं जाऊन देश जिंकी व राज्य स्थापन करी, आणि संस्कृतिप्रसारासाठीं म्हणजे ब्रह्मकर्म

चालविण्यासाठीं, यज्ञयाग करण्यासाठीं आणि शिक्षक या नात्यानें ब्राह्मण जात. ब्राह्मणांचा देशोदेशीं होत असलेला वैयक्तिक संचार कथासरित्सागरांत वर्णन केला आहे. क्षत्रियांचीं स्थलांतरें आपणांस पुष्कळ दिसून येत आहेत. दक्षिणेंतील बरींच राजकुलें आणि मराठ्यांचीं कुलें उत्तरेकडून आलीं आहेत. ब्रह्मदेशचें राजकुल भारतीय आहे. सयामचें राजकुल देखील ज्या शाक्यवंशांत बुद्ध झाला त्याच वंशांतील आहे असा समज तेथील भिक्षूंनीं तेथील राजांचा करून दिला आहे. बौद्ध भिक्षूंचीं स्थलांतरें तर पुष्कळच होत आहेत. हा संप्रदाय स्थापन झाल्यानंतर भारतांतील कित्येक पंडित परदेशीं गेले. ग्रीसपासून जपानपर्यंत भारतीय पंडितांचा संचार तद्देशस्थ ग्रंथांतून दिसून येतो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्यादि वर्गांचीं स्थलांतरें आपल्या नजरेस येतात. त्यावेळेस आपलें जें स्थलांतर होई त्यानें भारतीय संस्कृतीची वृद्धीच होत होती असें दिसून येईल.

आजचें परदेशगमन निराळ्या प्रकारचें आहे. आज मजूर म्हणून आपले लोक इतरत्र जातात आणि तेथें परकीय संस्कृतीचे पूर्णपणें झाले नाहींत तरी कांहीं अंशानें अंशभाक् होतात. दक्षिण आफ्रिकेंत ज्यांच्या दोन पिढ्या उलटल्या आहेत अशा लोकांपैकीं कांहीं माणसें इंग्लंडमध्यें शिक्षणास आलेलीं दृष्टीस पडलीं. त्या सर्वांची स्थिति पाहिली तर त्यांस एकहि भारतीय भाषा येत नव्हती, आणि त्यांपैकीं कांहीं ख्रिस्ती होते आणि कांहीं नव्हते. आज गुजराथी आणि हिंदी भाषांतील लेख समाविष्ट करणारीं कांहीं पत्रें हिंदुस्थानीयांचें हितसंरक्षण करण्यासाठीं चालविलीं जात आहेत. त्यांसारख्या पत्रांच्या द्वारा हिंदुस्थानांतून तिकडे जाणाऱ्या वाङ्मयानें अशा लोकांचें भारतीयत्व थोडेंबहुत जिवंत राहील. येथून आफ्रिकेंत कांहीं भारतीय वाङ्मय जातें यांत शंका नाहीं. रामायणाच्या अनेक प्रती तेथें हिंदुस्थानांतून गेल्याची माहिती डॉ० कोमिन्स याला तद्देशस्थ अधिकाऱ्यांनीं आपल्या रिपोर्टांत दिली आहे. हिंदुस्थानांतील वेंकटेश्वर समाचार ( मुंबई ), भारतमित्र ( कलकत्ता ), इत्यादि पत्रांत वसाहतींत गेलेल्या लोकांचीं पत्रें वारंवार प्रसिद्ध होतात. ग्रंथ वाचून दाखवून पैसे मिळविणाऱ्या आणि त्यामुळें "आळसांत दिवस घालविणाऱ्या" ब्राह्मणांचें मत्सरयुक्त वर्णन ब्रॉकहर्स्टनें दिलें आहे. ब्राह्मणांविषयीं पूज्यबुद्धि नष्ट झाली नाहीं. ब्राह्मण गुन्हेगार पकडून सरकारच्या हवालीं करण्यास हिंदू पोलीस नाखूष असतात असा बोभाटा वसाहतीच्या अधिकाऱ्यांकडून मधून मधून ऐकूं येतो–(कोमिन्स यास केलेला रिपोर्ट). जागोजाग लहान लहान हिंदूंचीं देवळें व मुसुलमानांच्या मशीदी देखील वरील रिपोर्टांत वर्णिल्या आहेत. तेथें आढळणाऱ्या मातापालो नांवाच्या, वडाची आठवण देणाऱ्या, वृक्षाची पूजा गचाळ हिंदू करितात असें तेथील यूरोपीयन प्रवासी सांगतात. हें सर्व एखादी पिढी चालतें, पण दुसऱ्या पिढींत नैतिक दुर्गति येते आणि हिंदी आचाराची ओळख पूर्णपणें जातांना दिसते, असे ब्यारिस्टर मणिलाल यांनीं आपल्या माडर्न रिव्ह्यूमध्यें छापलेल्या ब्रिटिश गियानाच्या वर्णनांत म्हटलें आहे.

**आस्ट्रेलियाची वृत्ति.**—परदेशगतांच्या भारतीयत्वाच्या ओळखीचा जेथें संपूर्ण नाश होत आहे असें ठिकाण आस्ट्रेलिया होय. आस्ट्रेलियांत गेलेल्या भारतीयांविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. तेथें गेलेल्या लोकांची संख्या सात हजारांच्या आंत असावी. आस्ट्रेलियानें आतां एशियाटिक लोकांस जवळ जवळ मज्जाव केला आहे आणि हा देश गोऱ्यांचा म्हणून त्यांस राखावयाचा आहे. हा निश्चय भावी काळांत कितपत टिकेल याची वानवा आहे. तथापि, आज त्यांची वृत्ति निश्चित झाली आहे, हें मात्र खरें. हिंदुस्थानी लोकांच्या आगमनास अडचणी उत्पन्न करणाऱ्या अनेक अटी त्यांनीं घातल्या आहेत. येथें येणारे लोक पंजाबकडचे किंवा अफगाण असतात. उंट हांकणारे अफगाण पुष्कळ प्रसंगीं तद्देशीय गोऱ्यांच्या उपयोगी पडलेले आहेत. मणिलाल डॉक्टर यांच्या माडर्नरिव्ह्यूतील लेखावरून असें दिसून येतें कीं, भारतीयांस मज्जाव करण्याची जरी आस्ट्रेलियन लोकांची वृत्ति आहे, तरी जे आले त्यांस त्रास देण्याची त्यांची प्रवृत्ति नाहीं; आणि हा परिणाम होण्यास कांहीं अंशीं तेथें गेलेल्या अफगाणांचें पौरुष कारण होय. ते त्रास झाला तर स्वतःच प्रतिकार करतात आणि त्यामुळें गांधींच्या त्राग्याच्या अथवा "प्यासिव्ह रेझिस्टन्स"च्या मतास येथें फारसें क्षेत्र नाहीं. तेथें गेलेल्या लोकांपैकीं पुष्कळांचीं लग्नेंहि तेथेंच झालेलीं आहेत, आणि त्यांनीं तेथें लग्नें करणें या गोष्टीस आस्ट्रेलियन लोकांची वृत्ति प्रतिकूल असावयाच्या ऐवजीं अनुकूलच दिसते.

**परदेशगमनाचें भवितव्य.**—एवंच पश्चिमेकडे गेलेल्या जिप्सींचें खेरीज करून प्राचीनकालीं झालेलें परदेशगमन भारतीय संस्कृतीचें संवर्धक होतें. आजचें तसें नाहीं. तथापि आजचें परदेशगमन फलप्रद होत नाहीं असें नाहीं. जेथें आपल्या लोकांचा मोठा जमाव जातो तेथें आपली भाषा वगैरे राहण्यास तो कारण होतो आणि जे आज असंस्कृत आहेत ते उद्यां सुसंस्कृत पुढें बनवून मागें तेच संस्कृतीस जीव आणतात. कांहीं अंशीं आजची सामान्य जनता आजच्या सुशिक्षित वर्गापेक्षां स्वसंस्कृतिसंवर्धनास अधिक कारणीभूत होत आहे. हिंदुस्थानी भाषांचे कोर्टांत आणि इमिग्रेशन खात्यांत दुभाषे नेमणें, पोस्ट आफिसामध्यें भारतीय माणसें घेणें, हें अमेरिकेंत गेलेल्या अशिक्षितांशीं जरूर असलेल्या व्यवहारामुळें प्राप्त झालें. इंग्लंडास जाणारे हिंदु पुष्कळ आहेत पण ते मोठ्या पदवीचे आहेत. ते स्वतः इंग्रजी जाणतात आणि म्हणून ज्या प्रकारच्या भारतीयांची गरज अमेरिकेच्या पश्चिम भागांत सरकारास उत्पन्न झाली त्या तऱ्हेची गरज इंग्लंडांत उत्पन्न होत नाहीं. अशिक्षित वर्गास आज धर्मोपदेशक

मिळत नाहींत. ब्रिटिश गियाना आणि त्रिनिदाद येथें जागोजाग हिंदूंचीं देवळें आहेत, थोडाबहुत संस्कार किंवा धर्मोपदेश तेथें गेलेले ब्राह्मण करतात, त्या ब्राह्मणांस दक्षिणाहि वरी मिळते आणि ती तशी "विनाकारण" मिळते, हें पाहून ख्रिस्ती मिशनऱ्यांस मत्सर उत्पन्न होतो. तथापि हें स्वल्पस्थापन फारच क्षुल्लक आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हटल्यास आजचें दूरदेशगमन आपण विशेष काळजी न घेतल्यास आपल्या संस्कृतीचें पोषक होणार नाहीं. ज्याप्रमाणें जिप्सींची अवस्था झाली त्याचप्रमाणें आजच्या परदेशगन्तूची होऊन, 'परकीय देशांतील एक हीन जात' या प्रकारचेंहि हिंदूंचें भवितव्य पुढें होण्याचा संभव आहे. जें परदेशगमन जवळच्या आणि मूलतः बौद्ध अशा वसतीच्या देशांत होईल तें आर्य संस्कृतीस पोषक होईल, हें ब्रह्मदेशाविषयीं विवेचन करितांनां दाखविलेंच आहे.

**परदेशगतांसंबंधाचे प्रश्न.**—आज हिंदुस्थानांतील लोक बाहेर देशीं जातात त्यांच्यासंबंधानें खालील प्रश्न आपल्यापुढें उत्पन्न होतात.

(१) लोक कोणत्या पेशानें जातात ?

(२) ते परदेशीं गेले असतां त्यांस तेथील समाजांत स्थान कोणतें मिळतें ?

(३) आपल्या लोकांची तेथें संभावना तद्देशस्थांकडून कशी होते ?

(४) परदेशांत गेलेले हिंदू स्वदेशास पूर्णपणें पारखे होतील काय ?

वरील प्रश्न एकमेकांपासून अगदींच पृथक् नाहींत. तथापि आपण त्यांचें क्रमानें उत्तर द्यावयाचा प्रयत्न करूं.

**परदेशीं जाणाऱ्यांचें वर्गीकरण.**—परदेशीं आपले जे लोक जातात त्यांचें वर्गीकरण सामान्यतः येणेंप्रमाणें:—

(१) बरेचसे लोक लास्कर किंवा आगवाले म्हणून बोटींवर राहिलेले असतात. बोटी निरनिराळ्या देशांत जातात त्यांबरोबर जिकडे बोटी जातील तिकडे ते जातात. यांपैकीं बहुतेक लोक बोटीबरोबरच परत येतात. तथापि परदेशचे अधिक किफायतीचे मजुरीचे दर आणि विदेशांत गेल्यावर तेथील वस्तुस्थितीसंबंधानें जिज्ञासा या दोन कारणांमुळें काम सोडून लास्कर पुष्कळदां फरारी होतो. असे कांहीं लोक अमेरिकेंत किंवा इंग्लंडांत वारंवार भ्रमण करतांना दृष्टीस पडतात.

(२) एतद्देशीय कांहीं स्त्रिया आया किंवा दाया म्हणून इंग्लंडमध्यें गेलेल्या दृष्टीस पडतात. शिवाय आपले जुने नोकर कित्येकदां इंग्रज घेऊन जातात. यामुळें कधीं कधीं लंडनमध्यें असलीं माणसें दृष्टीस पडतात. बेकार आया आणि लास्कर यांच्या मदतीसाठीं एक गृह आंग्लो-इंडियन लोकांनीं लंडनच्या परिकरांत स्थापन केलें आहे.

(३) कांहीं हिंदुस्थानचे लोक जेथें कोणी पाहिले नसतील तेथें त्यांचें प्रदर्शन करण्यासाठीं प्रदर्शनें करणारे लोक घेऊन जातात.

(४) पारीसमध्यें कांहीं हिंदुस्थानच्या स्त्रिया वेश्यावृत्तीनें राहिल्या होत्या असें कळतें. त्या तेथें कशा गेल्या हें समजत नाहीं.

(५) या वरच्या प्रकारच्या माणसांपेक्षां भिन्न असा वर्ग म्हणजे विद्यार्थ्यांचा वर्ग होय. यांचा भरणा इंग्लंडमध्यें विशेष असतो. अमेरिका, फ्रान्स व जर्मनी इकडे त्यांचा मोर्चा कमी वळतो. इटाली आणि रशिया येथील विद्यापीठांत तयार होऊन आलेले लोक अवलोकनांत नाहींत. इंग्लंडमध्यें विद्यार्थ्यांची संख्या दोन हजारांच्या आंत बाहेर आहे. अमेरिकेंत ती अजमासें २०० पेक्षां कमी असावी. यूरोपांतील फ्रान्स आणि जर्मनी या देशांत कांहीं संख्या आहे. कांहीं विद्यार्थी जपानांतहि जातात. इटाली, रशिया, चीन येथील विद्यापीठांकडे आपल्या विद्यार्थ्यांचें लक्ष गेलें नाहीं.

(६) जेथें आपल्या लोकांची वस्ती पुष्कळ आहे अशा ठिकाणीं अनेक धंद्यांत लोक आढळतात. अशा प्रकारचीं ठिकाणें म्हटलीं म्हणजे ब्रह्मदेश, आफ्रिका, वेस्ट इंडिया, मादागास्कर वगैरे भाग होत.

(७) व्यापारी म्हणून बाहेर जाणारे आपले लोक आहेत, त्यांत सिंधी लोकांचा भरणा विशेष आहे. ब्रेझील, युनायटेड स्टेट्स्, इंग्लंड, फ्रान्स वगैरे देशांतील मुख्य शहरांत हेच आढळतात. तसेंच एडन, पोर्टसय्यद वगैरे बंदरांतहि दिसतात. तार्तरींत हे गेलेच आहेत. व्यापारी या दृष्टीनें यांचें महत्त्व मोठें आहे. या लोकांस मुंबईंस अज्ञानामुळें मुलतानी म्हणतात.

(९) गुजराथी लोकांपैकीं मोत्यांचा व्यापार करणारे लोक पारीसमध्यें आहेत त्यांत जैनांचा भरणा विशेष आहे. पुरुष, स्त्रिया व परिचारक मिळून यांची संख्या २५० वर असावी.

(१०) मतप्रसार करण्यासाठीं कित्येक संन्यासी किंवा इतर माणसें तुरळक अमेरिकेंत व यूरोपांत दिसतात. अमेरिकेंतील चढाओढीमध्यें ज्यांस यश येत नाहीं असे हिंदुस्थानांतील तिकडे गेलेले कांहीं लोक भविष्य किंवा ज्योतिष सांगणें यासारख्या संशयास्पद धंद्याकडे वहावतात. कित्येक सुशिक्षित व्याख्यानें देतात, लेख लिहितात आणि कसातरी गुजारा करतात.

(११) या सर्वांपेक्षां अधिक वर्ग मजुरांचाच होय.

परदेशगमनाचा प्रश्न आजच्या नव्या मनूंत अत्यंत महत्वाचा असल्यानें या प्रश्नासंबंधाची येथवर दिलेली फोड व माहिती अपुरी वाटते. आणि म्हणून तिच्यांत भर टाकण्यासाठीं

एका उपयुक्त सांवत्सरिक ग्रंथांतील* एतद्विषयक माहिती उद्धृत करून नंतर या प्रश्नासंबंधानें आणखी कांहीं पृथक्करणात्मक विचार ग्रथित करूं.

**परदेशगतांची संख्या.**—हिंदुस्थानचे लोक परदेशगमनाच्या, विशेषतः समुद्रोल्लंघनाच्या विरुद्ध आहेत. तथापि, मजुरी करण्याकरितां, दुकानें घालण्यासाठीं, अगर दुसऱ्या कांहींतरी धंद्यासाठीं म्हणून शेंकडों किंबहुना हजारों हिंदू लोक इतर देशांत जाऊन राहिलेले आहेत. हिंदी साम्राज्याच्या लोकसंख्येच्या मानानें पाहतां अशा लोकांची संख्या अगदींच अल्प म्हणजे सुमारें वीस लक्ष आहे. साम्राज्याच्या लोकसंख्येच्या मानानें ही संख्या जरी डोळ्यांत भरण्यासारखी नसली तरी अगदींच क्षुल्लक म्हणून दुर्लक्ष करण्याइतकी ती थोडीहि नाहीं. म्हणूनच, मुदतबंदीचे मजूर म्हणून ब्रिटिश साम्राज्याच्या वसाहतींत अगर सुखवस्तु गृहस्थ म्हणून कोठल्याहि स्वतंत्र देशांत राहणाऱ्या हिंदी लोकांच्या सामाजिक किंवा राजकीय प्रश्नांमुळें एक प्रकारचें महत्त्व या लोकसंख्येस आलेलें आहे.

**परदेशगमनाचा हक्क.**—साम्राज्याच्या दृष्टीनें पाहतां, हिंदी लोकांच्या परदेशगमनाचा प्रश्न, विशेषतः स्वराज्य उपभोगणाऱ्या वसाहतींत हिंदी लोकांनीं जाण्याचा प्रश्न, बराच महत्त्वाचा आहे; व कांहीं कालपर्यन्त या बाबतींत उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या प्रश्नांनां बरेंच गंभीर स्वरूप आलेलें होतें. ही स्थिति दक्षिण आफ्रिकेंत व ब्रिटिश कोलंबियांत विशेषच दृष्टोत्पत्तीस येत होती. परंतु, या गुंतागुंतीच्या बारीकसारीक प्रश्नांपेक्षां परदेशगमनाच्या हक्काचा सामान्य प्रश्न जास्त व्यापक स्वरूपाचा आहे, आणि म्हणून त्याचा विचार अगोदर करणें आवश्यक आहे. वर सांगितलेल्या दोन देशांत हिंदी लोकांचे होत असलेले हाल पाहून हिंदुस्थानांत जी खळबळ उडाली तिचें बीज मुख्यतः, ब्रिटिश नागरिकत्वाचे सामान्य हक्क या लोकांनां तेथें दिले जात नाहींत, या समजुतींत आहे. ब्रिटिश नागरिकत्वाचे सामान्य हक्क म्हणजे काय हें सांगणें दिसतें तितकें सोपें नाहीं. साम्राज्याच्या कोणत्याहि भागांत अनिर्बंध प्रवेश व वसति करतां येणें हा बादशाही प्रजेचा सर्वसामान्य हक्क नव्हे एवढेंच येथें नमूद करून स्वस्थ बसणें प्राप्त आहे. कानडा व आस्ट्रेलिया येथील वसाहतींच्या सरकारांनीं पुढें येणाऱ्या परदेशच्या लोकांनां प्रतिबंध करण्याचा हक्क कायद्यानें आपल्या स्वाधीन ठेवलेला आहे. निरनिराळ्या कारणांनीं हा कायदा 'इंग्रज' मनुष्याला सुद्धां लागू करण्यांत येतो. परदेशच्या लोकांनां आपल्या देशांत घेण्याबद्दलचे या लोकांचे जे प्रतिबंध आहेत ते मुख्यतः आर्थिक स्वरूपाचे आहेत, व याच तत्त्वांवर हिंदुस्थानच्या लोकांनां निष्प्रतिबंध रीतीनें आंत घेण्यास हे लोक हरकती घेतात. या प्रश्नाला वर्णविद्वेषाचें स्वरूप आलेलें आहे अशी सामान्यजनतेची समजूत होऊन बसणें अपरिहार्य झालेलें आहे, ही दुर्दैवाची गोष्ट होय. परंतु, स्वराज्य उपभोगणाऱ्या वसाहतींत हिंदी लोकांची वस्ती मोठ्या प्रमाणांत होऊं द्यावी कीं नाहीं याचा विचार करितांना अनेक राजकीय अडचणी व आर्थिक हितसंबंधांत येणारे विरोध यांचाच विचार ब्रिटिश मुत्सद्दी करतात असा सामान्य अनुभव आहे.

परदेशगमनाच्या हक्काचा विचार साम्राज्याच्या व्यापक दृष्टीनें करण्याचा प्रथम प्रयत्न लॉर्ड हार्डिंज यांनीं केला. परवान्याच्या पद्धतीचा अवलंब करून हिंदी लोकांच्या परदेशगमनावर हिंदुस्थान सरकारानें निर्बंध ठेवावा व उलट पक्षीं वसाहतींत येणाऱ्या हिंदी लोकांपैकीं थोड्या लोकांनां कांहीं विवक्षित अटींवर थोड्याशा सवलती वसाहतसरकारनें द्याव्या, असलें तडजोडीचें तत्त्व या प्रश्नाच्या बाबतींत समाविष्ट करण्याचा प्रयत्न करण्याची सूचना लार्ड हार्डिंज यांनीं ८ सपटंबर १९१४ रोजीं भरलेल्या वरिष्ठ कायदेकौंसिलाच्या बैठकींत केली. हिंदुस्थानांतल्या व हिंदुस्थानाबाहेरच्या लोकांनां ही कल्पना पसंत पडल्यानें १९१७ सालीं व १९१८ सालीं साम्राज्य परिषद् (Imperial Conference) व युद्ध-मंत्रिमंडळ (War Cabinet) यांजमध्यें झालेल्या वादविवादांत हिला बरेंचसें मूर्त स्वरूप प्राप्त झालें. १९१७ मध्यें इंडिया ऑफिसच्या वतीनें एक चोपडें प्रसिद्ध करण्यांत येऊन त्यांत हार्डिंजसाहेबांची ही तडजोडीची कल्पना विशेष विस्तृत स्वरूपांत प्रसिद्ध करण्यांत आली; व १९१८ सालीं वसाहती व हिंदुस्थान यांनीं एकमतानें खालील ठराव मंजूर केला.

(१) आपल्या देशांतील लोकसंख्येचे घटक कोणकोणते असावे या संबंधीं निश्चित मत सांगण्याचा, व त्याप्रमाणें परदेशांतून येणाऱ्या लोकांस प्रतिबंध ठेवण्याचा ब्रिटिश साम्राज्याच्या प्रत्येक घटकावयवास–हिंदुस्थान सुद्धां–जन्मसिद्ध हक्क आहे.

(२) हिंदुस्थानांतील व इतर कोणत्याहि ब्रिटिश साम्राज्याच्या भागांतील ब्रिटिश प्रजाजनांनां कोणत्याहि ब्रिटिश साम्राज्याच्या भागांत, देश पाहण्याकरितां म्हणून, व्यापारधंद्यासाठीं म्हणून, चैनीसाठीं म्हणून, किंवा शिक्षणाकरितां तात्पुरतें राहण्यासाठीं म्हणून जाऊं येऊं द्यावें; व अशा प्रकारच्या प्रवासाच्या अटी तडजोडीच्या तत्त्वावर खालीलप्रमाणें ठरविण्यांत याव्याः—(अ) हिंदुस्थानांतून बाहेर जाणाऱ्या लोकांवर जे निर्बंध दुसऱ्या ब्रिटिश साम्राज्याच्या भागांकडून घालण्यांत येतात, तसल्याच स्वरूपाचे निर्बंध दुसऱ्या भागांतून हिंदुस्थानांत येणाऱ्या लोकांवर घालण्याचा हिंदुस्थान सरकाराला हक्क आहे. (आ) असला भेटीचा किंवा तात्पुरती वस्ती करून राहण्याचा हक्क प्रत्येक व्यक्तिमात्रास त्याच्या सरकाराकडून देण्यांत येणाऱ्या परवानापत्रांत नमूद केला पाहिजे; व ज्या देशांत प्रवासास जावयाचें असेल तेथील सरकारची इच्छा

* Times of India Yearbook, 1920.

असल्यास त्या सरकारच्या वसाहतीच्या अधिकाऱ्याची त्यावर संमतिदर्शक सही असली पाहिजे. (इ) मजुरीकरितां जाणाऱ्या किंवा त्याकरितां तात्पुरती किंवा कायमची वस्ती करणाऱ्या लोकांस हा हक्क नाहीं.

(३) ब्रिटिश साम्राज्याच्या इतर भागांत यापूर्वींच कायम वस्ती करून राहिलेल्या हिंदी गृहस्थांस आपल्या बायका व अज्ञान मुलें खालील अटींवर आणण्याची मोकळीक असावीः— (अ) अशा प्रकारच्या प्रत्येक हिंदी गृहस्थानें एक बायको व तिची संतति यांखेरीज इतर परिवार बरोबर आणूं नये. (आ) अशा रीतीनें कोणत्याहि हिंदी गृहस्थाबरोबर येणारी स्त्री अगर मुलें ही त्याचीच धर्मपत्नी अगर कायदेशीर संतति असल्याबद्दलचा सरकारी दाखला त्याजजवळ असला पाहिजे.

वरच्या ठरावासंबंधानें स्वराज्य उपभोगणाऱ्या निरनिराळ्या ठळकठळक वसाहतींत खालील प्रकारची स्थिति आहेः—

दक्षिण आफ्रिका.—हा ठराव म्हणजे १९१३ सालचा इंडिअन इमिग्रंट ॲक्ट व १९१४ चा २२ नंबरचा इंडिअन रिलीफ ॲक्ट यांचीच पुनरुक्ति आहे, सबब याबद्दल निराळ्या कायद्याची जरूरी नाहीं.

न्यूझीलंड.—कायदा करण्याची जरूर नाहीं.

कानडा.—इमिग्रेशन ॲक्टाच्या प्रतिबंधदर्शक पोटकलमांचें स्वरूप कांहीं अंशीं सौम्य करण्यांत यावें, म्हणजे या कलमांखालीं येणाऱ्या हिंदी ब्रिटिश प्रजाजनांचा त्रास कमी होईल.

आस्ट्रेलिया.—येथील सरकारनें खालील ठराव केले आहेत. (अ) हिंदी व्यापारी, विद्यार्थी अगर चैनीखातर प्रवास करणारे लोक यांनां परवानापत्र असेल तर येऊं द्यावें. यांनीं आपल्या बायका बरोबर आणण्यास हरकत नाहीं. हिंदी माणसानें आपला दर्जा बदलला नसेल तर दरसाल अर्ज पाठवून परवाना नवा करून घेण्याचें कारण नाहीं. (आ) आस्ट्रेलिआंत राहिलेल्या माणसानें एक बायको व तिचीं मुलें आणण्यास हरकत नाहीं. (इ) हिंदुस्थानांत जाणाऱ्या आस्ट्रेलिअन लोकांनीं परवानापत्र घेतलें पाहिजे. (ई) हिंदुस्थानांतील लोकांनां इतर ब्रिटिश प्रजाजनांच्या बरोबरीनें वागविण्यांत यावें अशाबद्दलच्या कायदेकानूसंबंधाची सूचना पार्लमेंटपुढें मांडण्यांत येईल.

**दक्षिण आफ्रिका.**—येथें सर्व संकटें वसाहत करून राहिलेल्या मूळच्या हिंदी लोकांभोंवतींच गोळा झालीं होतीं. परदेशगमनासंबंधाच्या प्रतिबंधांचा प्रश्न जरी महत्त्वाचा असला, तरी चळवळ करणाऱ्या लोकांनीं हा प्रश्न बराच गौण मानलेला होता. नाताळमध्यें सालिना ३ पौंडांची जी डोईपट्टी बसविण्यांत आली त्याकडेच मुख्यतः लोकांचें लक्ष लागलें होतें. देशांतल्या देशांत एका संस्थानांतून दुसऱ्या संस्थानांत जाण्यास निर्बंध ठेवलेला होता, हें हिंदी लोकांच्या अंतःकरणांतलें दुसरें शल्य होय. व्यापारी लोकांनीं व्यापार करण्याबद्दलचीं परवानापत्रें घेतलीं पाहिजेत असा जो एक नियम होता तो तर हिंदी लोकांस अत्यंत अपमानास्पद वाटला. इंग्रज व्यापारी व हिंदी व्यापारी यांच्यांत केलेल्या अन्यायमूलक व नीचपणाच्या पंक्तिप्रपंचामुळें हिंदी लोकांनां अत्यंत चीड आली व ट्रान्सवालांतील चळवळीचा मुख्य भर याच प्रश्नावर होता. हा वाद ऐन भरांत आला असतां याच सुमारास संयुक्त पार्लमेंटनें एक कायदा पास केला व त्या कायद्यानें एकपत्नीव्रत पूज्य मानणाऱ्या धर्मांच्या संस्कारांप्रमाणें ज्याचा विवाहविधि झालेला असेल असल्या आफ्रिकेंतील कायदेशीर हिंदी रहिवाशाला आपली बायको व तिचीं मुलें यांनां आणण्याची बंदी केली. या संबंधीं एक खटला न्यायकोर्टापुढें आला असतां "एक बायको जिवंत असतां दुसरी करण्याची ज्या धर्मांत परवानगी आहे असल्या धर्मांच्या संस्कारांनां अनुसरून ज्याचा विवाहविधि झालेला असेल अशा माणसाला आपल्या बायकामुलांना आफ्रिकेंत आणण्याची मनाई आहे, इतरांनां नाहीं" असा न्यायकोर्टानें निवाडा दिला. यावर चळवळीच्या पुढाऱ्यांनीं निःशस्त्र प्रतिकाराचीं तत्त्वें उपयोगांत आणलीं. त्यामुळें नाताळांत हिंदी मजूर व पोलीस यांचे तंटे सुरू झाले. एकंदरींत तंटा बराच विकोपाला गेला, व हिंदुस्थानांत सरकारनें या प्रश्नावर एक कमिशन नेमावें अशी जोराची मागणी झाली. त्याप्रमाणें संयुक्त सरकारानें एक कमिशन नेमलें व हिंदुस्थान सरकारास एक प्रतिनिधि पाठविण्याविषयीं विनंति केली. त्याप्रमाणें हिंदुस्थान सरकारनें मध्यप्रांताचे चीफ् कमिशनर सर बेंजामिन रॉबर्टसन यांस आपले प्रतिनिधि निवडलें. कमिशननें हिंदुस्थानाला एकंदरींत अनुकूल असाच निकाल दिला.

**सन १९१४ चा इंडिअन रिलीफ ॲक्ट.**—या ॲक्टानें कमिशननें केलेल्या चौदा शिफारशींपैकीं पहिल्या पांचांस अवश्य तें कायदेशीर स्वरूप दिलें. सन १९१३ सालच्या कायद्याच्या कलमांतून कांहीं शब्द गाळून, पहिल्या कलमानें ज्या हिंदी गृहस्थाचें लग्न एकाच वेळीं अनेक बायका करण्यास परवानगी देणाऱ्या धर्माच्या विधींप्रमाणें झालेलें असेल त्यास त्याची बायको व तिचीं याच्यापासून झालेलीं अज्ञान मुलें आणण्याची परवानगी दिली. या कायद्यानें कमिशनची दुसरी एक शिफारस अमलांत आणली ती अशीः—एखाद्या हिंदी पुरुषानें व स्त्रीनें दोघांनीं मिळून एखाद्या मॅजिस्ट्रेटसमोर अगर लग्नें नोंदविणाऱ्या अधिकाऱ्यासमोर जर असा अर्ज केला कीं 'आम्हीं नवरा बायको आहोंत' व जर कांहीं विधि पाळून त्यांनीं आपलें लग्न एकपत्नीव्रताच्या अटीवर नोंदून घेतलें, तर हें लग्न आफ्रिकेमध्यें कायदेशीर मानलें जाईल, व या विवाहामुळें उत्पन्न होणारे निरनिराळे प्रश्न हा विवाह कायदेशीर समजूनच सोडविले जातील. अशा विवाहांत या पतिपत्नींच्या धर्मानें जरी एकाच वेळीं अनेक बायका करण्यास मोकळीक दिली

असली तरी तेवढ्यानें कांहीं बाध येत नाहीं. कमिशनच्या सूचनांपैकीं तिसरी सूचना जी अमलांत आणली गेली ती अशीः—संयुक्त आफ्रिकेच्या निरनिराळ्या संस्थानांमध्यें विवाहविधींवद्दल जे कायदे प्रचलित आहेत त्यांअन्वयें उपाध्याय म्हणून हिंदी भिक्षुकांची योजना करण्यास हरकत नसावी. केपकालनीपुरतीं १८६० सालच्या पहिल्या कायद्यानें ही गोष्ट मुसलमानी संप्रदायापुरती शक्य झाली होती. १८९१ सालच्या १९ व्या कायद्याप्रमाणें नाताळमध्येंहि अशाच प्रकारची व्यवस्था करण्यांत आली. नवीन कायद्यानें संयुक्त आफ्रिकेंतील लग्नविधींच्या कायद्याप्रमाणें कोणाहि हिंदी भिक्षुकास लग्नाचा उपाध्याय नेमण्याची मोकळीक मिळाली; व अशा उपाध्यायाच्या साक्षीनें लागलेलें लग्न हें कायदेशीर लग्न समजलें जावें अशी व्यवस्था करण्यांत आली. कमिशनच्या आणखी एका सूचनेप्रमाणें, नाताळांत मुदतबंदीच्या मजुरांनीं करार मोडल्यास त्यांजवर ३ पौंडांची वार्षिक डोईपट्टी जी वसविली जात होती ती उठविण्यांत आली.

**स्मट्स व गांधी यांचा करार.**—निःशस्त्र प्रतिकाराच्या चळवळीसंबंधानें रा. गांधी ज्यावेळीं दक्षिण आफ्रिकेंत गेले त्यावेळीं १९१४ सालच्या कायद्यांत एक थोडेंसें सोडवणुकीचें कलम घातलें होतें त्यावद्दल त्यांनीं समाधान व्यक्त केलें. त्यावेळेस अंतर्गत कारभाराचे प्रधान जनरल स्मट्स यांचा व रा. गांधींचा कांहीं पत्रव्यवहार झाला होता; त्यांत ट्रान्सवालमधील व्यापाऱ्यांसंबंधानें कांहीं करार झाला होता. या कराराचें स्वरूप खालील उताऱ्यांवरून समजण्यासारखें आहे. या वादाला १९१९ सालीं पुन्हां जेव्हां नवीन स्वरूप प्राप्त झालें त्यावेळीं या पत्रव्यवहाराचा उपयोग वराच झाला व याच्यामुळें झालेली कामगिरी लक्षांत घेतां हा पत्रव्यवहार महत्त्वाचाच समजला जाईल.

(अ) ता. ३० जून सन १९१४ च्या, प्रधानांच्या सेक्रेटरीकडून गांधींस आलेलें पत्रः—"प्रचलित कायद्यांच्या अंमलवजावणीसंबंधानें म्हणाल तर, मिनिस्टर साहेबांच्या हुकुमावरून मीं आपणांस असें कळवितों कीं, ही अमलवजावणी न्याय्य मार्गानें व प्राप्त हक्कांचा योग्य मान राखून केली जावी अशी सरकारची पूर्वीपासून इच्छा होती व आहे."

(आ) तेंच पत्रः—"शेवटीं जनरल स्मट्स यांनीं मला आपणास असें कळविण्यास सांगितलें आहे कीं, हें इंडिअन रिलीफ बिल स्टॅट्यूटबुकांत नमूद करून ठेवण्यानें हा वाद पूर्णपणें व कायमचा मिटेल. या गोष्टीवद्दल बिलकुल अंदेशा राहूं नये. या बिलावरोबरच नुकत्याच झालेल्या मुलाखतींत निघालेल्या व पत्रांत उद्धृत केलेल्या दुसऱ्या कित्येक बाबींसंबंधानें या पत्रांत दिलेलें वचनहि नमूद करून ठेवण्यांत येईल. व याप्रमाणें, दुर्दैवानें फार दिवस लांबलेला हा वाद एकदांचा कायमचा मिटेल असें हिंदू लोकांनीं विनधोक मानून चालावें."

(इ) ता. ७ जुलै १९१४ च्या आपल्या एका पत्रांत गांधी स्मट्सनां लिहितातः—"प्राप्त हक्क" या शब्दांचा हिंदी मनुष्याचा व त्याच्या वारसदारांचा तो रहात असलेल्या किंवा व्यापार करीत असलेल्या शहरांत राहण्याचा अगर व्यापार करण्याचा हक्क असा अर्थ मीं समजतों. मग त्यानें आपलें दुकान अगर घर शहरांतल्या शहरांत कितीहि ठिकाणीं हलविलें तरी हरकत नाहीं.

(ई) ३० जून १९१४ च्या एका पत्रांत गांधी स्मट्सनां लिहितातः—"या पत्रव्यवहारानें व इंडिअन रिलीफ बिल पास होण्यानें निःशस्त्रप्रतिकाराची चळवळ कायमची थांवली आहे......आपणांस माहीतच आहे कीं, माझ्या कांहीं देशबांधवांनीं या चळवळीची मजल याच्याहि पलीकडे नेण्याची मला सूचना केली होती. निरनिराळ्या प्रांतांतील व्यापारासंबंधाचे कायदे, ट्रान्सवालमधील सोन्यासंबंधाचा कायदा, ट्रान्सवाल टाऊनशिप्स ॲक्ट व १८८५ सालचा ट्रान्सवालचा ३ रा कायदा इत्यादि कायद्यांत व्यापार, जमिनीवरची मालकी, व वस्ती या संबंधीं पूर्ण हक्क मिळण्यासारखे फेरफार करण्यांत आले नाहींत म्हणून हे लोक नाराज आहेत. आफ्रिकेंतील निरनिराळ्या प्रांतांत निष्प्रतिबंध प्रवास करतां येत नाहीं, यावद्दल कित्येक लोक दिलगीर आहेत तर दुसऱ्या कित्येकांस विवाहाच्या प्रश्नासंबंधानें या रिफॉर्म बिलाची मजल फारशी पुढें गेलेली नाहीं यावद्दल वाईट वाटतें. या सर्वांचा अंतर्भाव निःशस्त्र प्रतिकाराच्या चळवळींत केला पाहिजे असें त्यांनीं मला सुचविलें आहे. परंतु यांच्या इच्छेप्रमाणें मला वागतां येत नाहीं. आतां या गोष्टीचा अंतर्भाव जरी निःशस्त्र प्रतिकाराच्या चळवळींत करतां आला नाहीं तरी या गोष्टीचा आज ना उद्यां सरकारला सहानुभूतिपूर्वक विचार करावा लागेल ही गोष्ट नाकवूल करतां येत नाहीं. आफ्रिकेंत जाऊन राहिलेल्या हिंदी रहिवाश्यांनां नागरिकत्वाचे पूर्ण हक्क दिल्याखेरीज सर्वत्र पूर्ण शांतता नांदूं लागेल अशी अपेक्षा करणें व्यर्थ आहे."

इ. स. १९१९ सालीं या वादानें पुन्हां उचल खाल्ली. यावेळीं तंटा फक्त ट्रान्सवालपुरता होता. या वादाचे महत्त्वाचे मुद्दे खालीं दिले आहेतः—

(१) रा. गांधींनीं "प्राप्त हक्क" (Vested Rights) याची जी व्याख्या दिली तिच्या अर्थावद्दल वाद उपस्थित झाला. एक पक्ष म्हणे कीं, "प्राप्त हक्क" म्हणजे करार झाला त्यावेळीं हिंदी लोक उपभोगीत असलेले हक्क. या दृष्टीनें पाहतां १९१४ सालीं ज्या ज्या शहरीं हिंदी लोकांनां व्यापार करण्याची परवानगी नव्हती त्या शहरीं व्यापार करणें, दुकानें उघडणें, वगैरे गोष्टी करणारांनीं स्मट्स व गांधी यांच्यांत झालेला करार मोडला असें या पक्षाचें म्हणणें आहे. तसेंच गांधींच्या व्याख्येंत वारसदार या शब्दानें "कायदेशीर वारस" असा अर्थ विवक्षित असल्यानें ज्या हिंदी लोकांनीं आपलीं दुकानें

वगैरे दुसऱ्यांनां विकून टाकलीं, त्यांनींहि तितक्यापुरता हा करार मोडला असें मानण्यास हरकत नाहीं असेंहि हा पक्ष म्हणतो. उलट, हिंदी लोकांच्या पक्षाचें म्हणणें असें कीं "प्राप्त हक्क" ( Vested Rights )या शब्दांनीं कोणत्याहि आशियांतील मनुष्याला असलेले जन्मसिद्ध हक्क असा अर्थ विवक्षित आहे. हे हक्क करार झाल्याच्यावेळीं सदरहू आशिआटिक मनुष्य उपभोगीत होता कीं नाहीं हा मुद्दा निरर्थक आहे. यांमध्यें पुढच्या पिढीच्या हक्कांचाहि समावेश होतो. तसेंच "वारसदार" या शब्दानें "मालक म्हणून मालमत्तेचा उपभोग घेणारा" असा अर्थ विवक्षित आहे, मग त्या मालकानें आपला वारसहक्क खरेदीनें मिळविलेला असो अगर दुसऱ्या मार्गानें त्याजकडे आलेला असो असें हिंदी पक्षाचें म्हणणें आहे.

(२) १९०८ सालचा ३५ वा ट्रान्सवालचा सोन्याचा कायदाः–क्रूगरस्डार्प म्युनिसिपालिटी वि. वेकेट या खटल्यांतील निवाडापत्रांत या कायद्याचा जो अर्थ केला आहे त्याप्रमाणें या कायद्याच्या १३० व्या कलमाअन्वयें कोणाहि (कृष्ण) वर्णांकित मनुष्याला ( Coloured Person ) या कायद्यांत सांगितलेले हक्क मिळवितां येत नाहींत. व अशा तऱ्हेचे हक्क ज्या मनुष्याला आहेत त्यानें आपला खास नोकर नसलेल्या कोणाहि वर्णांकित माणसास आपल्या जमिनींत राहण्याची अगर आपली जमीन वहिवाटण्याची परवानगी देऊं नये असें बंधन आहे. याच कायद्याच्या १३१ व्या कलमांत असें आहे कीं, जोहान्सबर्ग, बाक्सबर्ग व क्रूगरस्डार्प या ठिकाणच्या खाणीच्या प्रदेशांत अधिकाऱ्यांनीं नेमून दिलेल्या जागेव्यतिरिक्त इतर ठिकाणीं रहाण्याची वर्णांकित माणसांस ( Coloured Persons )परवानगी नाहीं. या कायद्याचा असा अर्थ केल्यानें याच्या कलमापासून होणारा त्रास कमी व्हावा एवढ्यासाठीं ट्रान्सवाल ब्रिटिश इंडिअन असोसिएशनें १९१९ फेब्रुआरीमध्यें पार्लमेंटकडे अर्ज केला होता. (३) मोतन विरुद्ध ट्रान्सवाल सरकार या खटल्यांत, अंतर्गत जमाबंदीच्या अधिकाऱ्याला, वर्णांकित माणसांनां सामान्य व्यापाराकरितां परवानापत्र देत नाहीं असें म्हणतां येत नाहीं, असा ठराव जरी झालेला असला तरी, वाण्याचीं दुकानें, फराळाचीं दुकानें वगैरे गोष्टी म्युनिसिपालिटीच्या ताब्यांतील असल्यानें अशीं दुकानें घालूं इच्छिणारीं माणसें जर हरकत घेण्यासारखीं असतील तर त्यांनां परवाना देणें न देणें हा म्युनिसिपालिटीचा अधिकार आहे. या अधिकाराच्या जोरावर ट्रान्सवालमधील म्युनिसिपालिट्या, विशेषतः क्रूगरस्डार्प येथील म्युनिसिपालिटी, अशीं परवानापत्रें हिंदी लोकांना–केवळ ते हिंदी आहेत–म्हणून देण्याचें नाकारिते. पुष्कळ वेळां क्रूगर्सस्डार्पच्या मॅजिस्ट्रेटनें कौन्सिलचे नियम धाब्यावर बसविले आहेत व म्युनिसिपालिट्यांनींहि हिंदी लोकांनां परवानापत्रें देण्याला हरकत घेतल्याचें कबूल केलें आहे. अशातऱ्हेचा हा म्युनिसिपालिट्यांनीं एकप्रकारें शिस्तवार चालविलेला पंक्तिप्रपंच बंद व्हावा म्हणून ब्रिटिश इंडिअन असोसिएशननें पार्लमेंटकडे अर्ज केला होता.

(४) १८८५ च्या ट्रान्सवालच्या तिसऱ्या कायद्याप्रमाणें हिंदी लोकांनां व सामान्यतः आशिआंतील लोकांनां 'रेपब्लिक' मध्यें स्थावर मिळकत करण्याची मनाई होती. हा कायदा अजूनहि अमलांत आहे. परंतु सन १९०९ सालच्या ३१ व्या कायद्यानें दोन अगर दोहोंहून अधिक माणसांनीं एखादी कंपनी काढिली तर त्या कंपनीला मात्र स्थावर इस्टेट करण्याची परवानगी आहे. ही पळवाट सांपडल्यामुळें १८८५ सालच्या कायद्यानें जमिनीची मालकी जी हिंदी लोकांनां मिळत नव्हती ती त्यांनां कंपन्या स्थापून मिळवितां येऊं लागली. स्मट्स व गांधी यांच्यांतील करारांचें एकंदर धोरण पाहतां अशा तऱ्हेच्या पळवाटेचा फायदा घेणें ही गोष्ट एकंदरींत त्या कराराच्या विरुद्ध आहे, अशी ओरड सुरू होऊन ट्रान्सवालमध्यें त्यावेळीं वरीच खळबळ उडून गेली.

वर सांगितलेल्या अर्जावरून व या एकंदर वादविवादांत जी कांहीं एक प्रकारची अशांतता उत्पन्न झाली तीमुळें सन १९१९ च्या मार्चमध्यें सरकारानें एक निवडक माणसांचें कमिशन नेमून अभिप्राय मागितले. ता. ३० एप्रिल रोजीं या कमिशननें आपला रिपोर्ट प्रसिद्ध केला. त्यांत खालील शिफारशी केलेल्या आहेतः–(अ) जून १९१४ मध्यें "खाणींचा प्रदेश" म्हणून राखून ठेविलेल्या जागेंत जे हिंदी लोक धंदा चालवीत असतील त्यांचे हक्क मान्य केले जावे. (आ) त्या तारखेपासून ज्यांनां व्यापार करण्याचे परवाने मिळालेले असतील व जे परवाने घेऊन व्यापार चालवीत असतील असल्या हिंदी लोकांच्या हक्कांचा योग्य मान ठेवावा. (इ) कायदेशीर रीतीनें ट्रान्सवालांत राहण्याचा ज्या हिंदी लोकांनां हक्क आहे अशा लोकांनां हिंदी व्यापाऱ्यांनीं आपलीं दुकानें विकलीं किंवा आपला व्यापार त्यांच्या हातीं दिला तरी हरकत नसावी. (ई) यापुढें नवीन धंदा करण्यासाठीं कोणत्याहि आशिआटिक मनुष्याला परवानापत्र मिळूं नये अशी तजवीज व्हावी. (उ) ज्या कंपन्यांचा मालकी हक्क आशिआटिकांकडे असेल त्या कंपन्यांनां जमीन खरीद घेण्याचा व स्थावर इस्टेट करण्याचा हक्क नसावा व या दृष्टीनें १८८५ सालच्या तिसऱ्या कायद्यांत सुधारणा करण्यांत यावी. म्हणजे "संप्राप्त हक्क" या शब्दांचा अर्थ कमिशननें "सध्यां असलेले हक्क, पुढें प्राप्त होणारे नव्हत" असा घेतला. तसेंच वारस म्हणजे वारसाहक्क आपोआप ज्यांच्याकडे जाऊं शकतो ते असा अर्थ घेतला गेला.

**१९१९ सालचा अमेंडमेंट ॲक्ट.**—या आक्टानें कमिशनच्या शिफारशी अमलांत आणल्या. पार्लमेंटमध्यें यामुळें एकंदरींत वरीच मोठी खळबळ उडाली. हिंदी लोक व हिंदी लोकांच्या विरुद्ध असणारे ॲंग्लोइंडियन्स यांपैकीं कोणाचेंहि या निकालानें पूर्ण समाधान झालें नाहीं. वर दिलेल्या (उ) व (ई) या कलमांनां हिंदी लोकांनीं हरकती घेतल्या व

अँग्लोइंडिअनांनीं (इ) या कलमाला हरकत घेतली. अँग्लोइंडिअनांची समजूत काढून बिल पार्लमेंटांत पास करून घेण्याच्या उद्देशानें सरकारानें या सर्व प्रश्नाचा फिरून विचार करण्यासाठीं एक पार्लमेंटरी कमिशन नेमण्याचें अभिवचन दिलें. या बिलानें हिंदुस्थानांतहि वरीच खळबळ उत्पन्न केली. हिंदुस्थानचे स्टेटसेक्रेटरी मि. मॉंटेग्यू यांनीं हिंदुस्थानचे २ प्रतिनिधि एक सरकारी व एक बिनसरकारी असे कमिशनर घ्यावे अशी संयुक्त आफ्रिकेच्या सरकारास सूचना केली. शेवटीं दोघांत तडजोड होऊन असें ठरलें कीं, कमिशनवर प्रतिनिधि घेण्याच्या ऐवजीं त्यांच्या कमिशनपुढें साक्षी घ्याव्या. त्याप्रमाणें सर रॉबर्टसन यांची हिंदुस्थानातर्फे साक्ष होण्याचें ठरलें, आणि शेवटीं चालू सालच्या (१९२०) फेब्रुआरी महिन्यांत कमिशननें आपला रिपोर्ट प्रसिद्ध केला. कमिशन वर (१) सर जोहान्स लँग (२) लेफ्टेनंट कर्नल स्कॉट वायली (३) विलिअम डंकन बॅक्स्टर (४) हेन्री जॉन हॉफवीमर हे चौघे सभासद होते. कमिशन ज्या गोष्टींचा विचार करील असें प्रसिद्ध करण्यांत आलें होतें त्या गोष्टी ह्याः–(अ) आशिआटिक लोकांनीं अगर त्यांच्या पोटीं जन्मास आलेल्यांनीं संयुक्त आफ्रिकेंत जमिनी घ्याव्या किंवा नाहीं, अगर त्यांनां जमिनीच्या बाबतींत व व्यापार वगैरे संबंधांत हक्क असावे कीं नाहीं (आ) अशा लोकांनीं व्यापार–धंदा वगैरे सामान्यतः सर्व आफ्रिकेंत चालवावा किंवा तोडून दिलेल्या कांहीं भागांतच चालवावा. (इ) कायद्यामध्यें फरक करणें हें सार्वजनिक हिताचें आहे कीं नाहीं (ई) [अ] व [आ] या कलमांसंबंधानें ज्या तक्रारी उत्पन्न होण्यासारख्या असतील अगर झाल्या असतील त्यासंबंधीं सूचना करणें.

दरम्यानच्या कालांत दोन्हीं पक्षांनीं कमिशनपुढें आपापलें म्हणणें मांडण्याची व्यवस्थित तयारी चालविली होती.

साऊथ आफ्रिकन लीग (हिलाच पूर्वी अँटिएशिआटिक लीग म्हणत असत.) या नांवाची एक संस्था ट्रान्सवालमध्यें तयार झाली. या संस्थेचे हेतु "आशिआटिक लोकांचें जें अरिष्ट (Asiatic Menace) आफ्रिकेवर येत होतें, त्याच्याशीं झगडावयाचें, आशिआटिकांच्या मार्गांत अडचणी उपस्थित करणाऱ्या कायद्यांची कडक अंमलबजावणी करवून घ्यावयाची, व कमिशनपुढें मांडण्यासाठीं साक्षीपुरावा गोळा करावयाचा असे होते. या संस्थेची प्राणप्रतिष्ठा करण्यासाठीं ता. ४ व ५ सपटेंबर रोजीं प्रिटोरिआ येथें एक मोठी व वजनदार लोकांची कांग्रेस भरली होती. या कॉंग्रेसमध्यें व्यापारी समित्या (चेंबर्स ऑफ् कॉमर्स) या संस्थांचे व इतर राजकीय, व्यापारविषयक व औद्योगिक चळवळींतले पुढारी लोक यांचे प्रतिनिधी होते. या सभेंत हिंदुस्थानच्या लोकांविरुद्ध मोठीं कडक भाषणें झालीं, अतिशय कडक अशा प्रकारचे ठराव पास झाले. या ठरावांत हिंदी लोकांनां नुकसानभरपाई देऊन ट्रान्सवालांतून हांकून द्यावें अशा अर्थाचाहि एक ठराव होता. उलटपक्षीं, जोहान्सवर्ग येथें आगस्ट महिन्यांत इंडिअन नॅशनल कॉंग्रेस या नांवाची एक परिषद भरली होती. या सभेस संयुक्त आफ्रिकेंतील सर्व ठिकाणचे हिंदी प्रतिनिधी आलेले होते. या बैठकींत एकंदर २३ ठराव पास झाले. आशिआटिकांच्या मार्गांतील अडचणी नाहींशा करण्यावद्दलचे, पूर्ण नागरिकत्वाचे हक्क मागण्यावद्दलचे, राजकीय हक्क असावे व प्रांताप्रांतांत वाटेल तिकडे जाण्याची मोकळीक असावी अशी मागणी करण्यावद्दलचे, व शिक्षणाची अधिक व्यापक सोय करण्यावद्दलचे ठराव पास झाले.

**ब्रिटिश कोलंबिआ.**—सन १९१४ सालच्या आरंभीं पूर्वेकडील भागांतून हिंदी लोकांचें एक जहाज व्हानकुवरकडे जाण्यासाठीं निघालें. परंतु, हें जहाज बंदरांतच अडकवून ठेवून त्यावरील उतारूंनां जमिनीवर उतरण्याची परवानगी न देतां अखेर तें जहाज हिंदुस्थानाकडे परत पाठविण्यांत आलें. हिंदी लोकांच्या प्रश्नाला ब्रिटिश कोलंबिआंत या प्रकारानें एक प्रकारचें उग्र स्वरूप प्राप्त झालें. ता. २६ सपटंबर १९१४ रोजीं कोमागातामारू जहाज कलकत्त्यास परत आलें. तो एक मोठा दुःखाचाच प्रसंग होता. हिंदी लोक कांहीं तरी चळवळ करतील अशा अपेक्षेनें या परत आलेल्या लोकांनां घरीं पोंचविण्यासाठीं रेल्वेच्या खास गाड्यांची सरकारानें सोय केली. १९१४ च्या पांचव्या ऑर्डिनन्सप्रमाणें अशी तजवीज करण्याचा अखत्यार सरकारानें आपल्या हातीं घेतला होता. त्याप्रमाणें परत आलेल्या लोकांपैकीं सुमारें ६० लोक आपापल्या घरीं गेले. परंतु वाकीच्या लोकांनीं गुरुदत्तसिंग नांवाच्या एका माणसाच्या नेतृत्वाखालीं कलकत्त्यास परत जाण्याचा प्रयत्न केला. लष्करी मदत घेऊन या लोकांनां मागें परतविण्यांत आलें. परंतु, यांच्यासाठीं दुसऱ्या स्पेशल गाडीची व्यवस्था होत असतां यांनीं पोलिस व इतर अधिकारी यांच्यावर गोळीबार सुरु केला. लष्करी लोकांनीं शेवटीं बंदुका झाडून गर्दी मोडली व त्यांपैकीं बहुतेकांस कैद केलें. कलकत्ता पोलिसपैकीं सार्जंट ईस्टवुड, व ई. बी. एस्. रेल्वेवरील मि. लोनाक्स हे मरण पावले. पंजाब पोलिसांपैकीं एकजण मेला व सहाजण जखमी झाले. दंगेखोरांपैकीं १६ व प्रेक्षकांपैकीं २ असे इसम गतप्राण झाले. या एकंदर प्रकरणाची चौकशी करण्याकरितां हिंदुस्थान सरकारानें सर विलिअम व्हिन्सेंट यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिशन नेमलें व या कमिशननें पंजाबांत व कलकत्त्यांत साक्षी घेतल्या.

ब्रिटिश कोलंबिआंत चार हजार हिंदी लोक वसाहत करून राहिलेले आहेत. यांपैकीं बहुतेक शीख लोक आहेत. हे लोक बहुधा शेतकी कामाकडे किंवा कारखान्यांतून अगर गुदामांतून मजुरी करीत असतात. त्यांनां आपलीं बायकामुलें हिंदुस्थानांतून आणण्याची इच्छा उत्पन्न झाली, यावरून त्यांनां कोलंबिआंतील परिस्थिति आवडते व तेथें त्यांची स्थिति एकंदरीनें ठीक आहे असें दिसतें. कोलंबिआंतील अधिकारी लोकांची

त्यांच्याशीं जी वर्तणूक आहे तिचें बीज एकंदरींत आशिआटिकांनां कोलंबिआंत घ्यावयाचें नाहीं या धोरणांत आहे. या अधिकाऱ्यांनां असें वाटतें कीं, आशिआटिक लोकांनां निष्प्रतिबंध रीतीनें कोलंबिआंत येऊं दिलें तर कोलंबिआ हा गोऱ्या लोकांकरितां आहे या तत्त्वाला हळू हळू बाध येऊं लागेल. जपान व चीन या देशांतील लोकांशीं निराळे तह करून जपानचे लोक दरसाल ठराविक प्रमाणांत व चीनचे लोक ५०० डॉलर्सची प्रवेश फी प्रत्येक माणसामागें घेऊन घेण्यांत येतात.

**एक काल्पनिक संकट.**—ब्रिटिश मुत्सद्यांच्या सर्व विचारार्ह गोष्टी जमेस धरल्या तरी सुद्धां ज्याला ज्याला म्हणून हिंदुस्थानच्या अंतर्गत कारभाराची स्थिति माहीत आहे त्याला त्याला "हिंदी लोक येऊन आपला प्रांत व्यापून टाकतील" ही स्वसत्ताक वसाहतींनां वाटणारी भीति वरीचशी काल्पनिक आहे असेंच वाटेल. हिंदुस्थानच्या बाहेर राहणाऱ्या हिंदी लोकांची संख्या वीस लक्षांहून थोडीशी कमीच आहे आणि यांतले बहुतेक लोक उष्ण प्रदेशांत आहेत. नुसत्या सिलोनमध्येंच ९ लाख लोक आहेत. मॉरिशसमध्यें २॥ लाख, ब्रिटिश गियानामध्यें सुमारें तितकेच, व २ लक्ष तीस हजार लोक स्ट्रेट्स सेटलमेंट्स व मलाया स्टेट्समध्यें आहेत. स्वसत्ताक वसाहतींपैकीं फक्त दक्षिण आफ्रिकेच्या वांट्याला बरेच हिंदी लोक आले आहेत. तेथील हिंदी लोकांची संख्या सुमारें १,६०,००० आहे; पैकीं नुसत्या नाताळ प्रांतांत १,३०,००० हिंदी लोक आहेत. परंतु ही लोकसंख्या आपखुषीनें नाताळांत जाऊन राहिलेल्या लोकांची नव्हे हें लक्षांत घेतलें पाहिजे. यांपैकीं बरेचसे लोक नाताळ प्रांतानें कृत्रिम रीतीनें आपल्या भोंवतीं जमविलेले आहेत. सन १९११ सालापासून मुदतबंदीच्या मजुरांचा कायदा हिंदुस्थान सरकारानें पास केला. तेथपर्यंत मुदतबंदीच्या मजुरांचा एकसारखा अव्याहत ओघ नाताळकडे चालला होता. व यांतील लोक साखरेचे कारखाने व इतर धंद्याचे कारखाने यांतून मजुरी करीत. बाहेरून येणाऱ्या लोकांमुळें होणाऱ्या वाढीपेक्षां हिंदी लोकसंख्येची तेथल्या तेथेंच वाढ जास्त झालेली आहे. आस्ट्रेलियाच्या सबंध वसाहतींत ७००० पेक्षां जास्त हिंदी लोक नाहींत. कानडा प्रांतांत १२०० हून अधिक लोक नाहींत. कारण, कानडांतले बरेच अमेरिकेस गेले व कांहीं हिंदुस्थानांत परत आले. या संख्या क्षुल्लक आहेत व त्यांचा विचार हिंदुस्थानच्या सध्यांच्या परिस्थितीकडे पाहून केला पाहिजे. हिंदुस्थानांतील ३० कोट लोकांची आर्थिक परिस्थिति यूरोपप्रमाणें असती, व यूरोपीय लोकांप्रमाणें यांची वृत्ति धाडसी व महत्त्वाकांक्षीपणाची असती तर वरील आफ्रिकेंतील लोकांनां हिंदी लोकांची वाटणारी भीति सकारण झाली असती. परंतु वस्तुस्थिति आज अशी आहे कीं, हिंदुस्थानांत या गोष्टी मुळींच सांपडत नाहींत. हिंदुस्थानांत मजुरी करणाऱ्या लोकांची जरूर अतिशय असून त्या मानानें मजुरांचा पुरवठा कमी आहे. आसामच्या चहाच्या मळेवाल्यांनां मजुरांची भरती करण्यासाठीं वसाहतींशीं विलक्षण चढाओढ करावी लागते. मजुरांचा दुष्काळ ही एक मुंबईच्या गिरण्यांची नेहमींची तक्रार आहे. जसजशी उद्योगधंद्यांची वाढ होत जाईल, शेतकीच्या पद्धतीमध्यें जसजशी सुधारणा होईल, जसजशी पडीत जमिनीची लागवड अधिकाधिक होईल, तसतसें हिंदुस्थानांतून मजूर कमी कमी बाहेर जाऊं लागण्याचा संभव फार आहे. त्यांतच, हिंदी लोकांनां घर सोडून फार दूर जायला नको असतें या गोष्टीची भर घातली म्हणजे "गोऱ्या लोकांकरितां राखून ठेवलेला देश" काळ्या लोकांनीं व्यापिला जाण्याची भीति अगदींच निरर्थक नसली तरी ही गोष्ट आजच दृष्टीच्या टप्प्यांत घेण्यासारखी नव्हे एवढें स्पष्ट होईल. इतक्या क्षुल्लक प्रमाणांतल्या हिंदी लोकसंख्येनें मुत्सद्यांचीं डोकीं बेताल व्हावीं हें आश्चर्य आहे.

ट्रान्सवालमध्यें जो वाद उपस्थित झाला त्याचें दुसरें कारण म्हणजे आर्थिक बाबतींत चढाओढ होईल ही भीति होय. ही भीति वरच्याप्रमाणेंच निराधार आहे. कारण ट्रान्सवालमधील हिंदी व्यापाऱ्यांचें गिऱ्हाईक नियमित आहे. मुख्यतः आफ्रिकेंतील देश्य लोक, वर्णांकित लोक, व आफ्रिकेमध्यें ज्यांनां "दरिद्री गोरे" अशी संज्ञा आहे ते उडाणटप्पू गोरे लोक, हें यांचें गिऱ्हाईक होय. आतां कधीं कधीं एखादा शिष्ट यूरोपिअन गृहस्थ चोरून मारून यांच्या दुकानांवर येतो, नाहीं असें नाहीं. परंतु असें होण्याचें कारण वरच्या प्रकारच्या लोकांमध्यें गिऱ्हाइकी मिळविण्याचा प्रयत्न करणाऱ्या यूरोपीय लोकांत हिंदी माणसाइतका मेहनतीपणा, काटकसर, प्रामाणिकपणा व कौशल्य आढळून येत नाहीं हें आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, हिंदी लोकांचा प्रश्न हा केवळ त्यांच्यापुरताच आहे अशी दक्षिण आफ्रिकेंत समजूत नाहीं. दक्षिण आफ्रिका हा गोऱ्या लोकांचा राखून ठेवलेला प्रान्त आहे या प्रश्नाचा निकाल लावतांना निरनिराळ्या वर्णांच्या व जातींच्या लोकांचा जो जास्त व्यापक प्रश्न त्याशीं याचा संबंध येतो ही गोष्ट गोऱ्या लोकांनां विसरतां येत नाहीं. हिंदू लोकांचा हिंदू म्हणून द्वेष करावयाचा असल्या मत्सरी बुद्धीनें दक्षिण आफ्रिकेंतील लोक प्रेरित झालेले नाहींत. हिंदी लोकांचा प्रश्न इतरांपेक्षां बऱ्याच प्रमुखत्वानें पुढें येत असल्याकारणानें हिंदी लोकांची त्यांना विशेष अडचण वाटते इतकेंच. उलट, हिंदी माणसाच्या बाजूनें विचार करतां, त्याला छळणाऱ्या अडचणी म्हणजे त्याच्या शीलावर मारलेले वैगुण्याचे, व्यंगाचे, नामुष्कीचे छापच होत असें त्याला वाटतें. असें असल्यानें हिंदी पक्षामध्यें मनोभावनांची उत्कटता विशेष आहे व त्यामुळें हा प्रश्न सोडविणें कठिण होऊन बसलेलें आहे. जनरल स्मट्स यांचें मत हिंदुस्थानाला

अनुकूल असल्याचें प्रसिद्ध आहे. व वसाहतींतला सर्वमान्य असा एकच मुत्सद्दी या नात्यानें वॉर कॅबिनेटमध्यें त्यांनी केलेली हिंदुस्थानची कामगिरी विविध आणि महत्त्वाची आहे. [यानंतर इअरबुककार प्रवचन करतात कीं,] जनरल स्मट्स हिंदी लोकांची स्थिति अतिशय सुधारतील अशी जी विरुद्ध पक्षाला भीति वाटते ती साधार आहे असें जनरल स्मट्स आपल्या कृतीनें दाखवितील यावर लोकांनीं विश्वास ठेवावा. ट्रान्सवालमधील हिंदी लोक व त्यांच्याशीं सहानुभूति बाळगणारे हिंदुस्थानांतील लोक या सर्वांनीं एवढें ध्यानांत ठेवावें कीं, अशा तऱ्हेची सहानुभूतीची भावना आफ्रिकेंत आहे. आणि म्हणूनच त्यांनीं आजच पूर्ण नागरिकत्वाचे हक्क मागण्याच्या भरीस पडून जनरल स्मट्स यांचा मार्ग निष्कारण अवघड करूं नये यांत त्यांचें हित आहे. अशा तऱ्हेच्या मागण्यांनीं हिंदी लोकांच्या विरुद्ध असणाऱ्या पक्षाला हिंदी लोकांनीं स्मट्स व गांधी यांचा १९१४ सालचा करार मोडला असें वाटतें. जनरल स्मट्स यांनीं ह्या करार सदरहू वाद कायमचा मिटविण्यासाठीं केलेला होता. आणि, "कधींनाकधीं तरी या गोष्टींचा सहानुभूतिपूर्वक विचार करणें सरकारास भाग पडेल" असें अर्थपूर्ण उत्तर गांधींनीं दिल्याचें जरी पत्रव्यवहारावरून दिसून आलें तरी आजच्या काळची विरुद्ध पक्षाची स्थिति लक्षांत घेतां, एकदम जहाल मागण्या मागून, त्यांचा सहानुभूतिपूर्वक तर राहोच, पण नुसत्या रूक्ष कांटेतोल न्यायदृष्टीनें तरी विचार होईल अशी अपेक्षा करणें अदूरदर्शीपणाचें होईल.

**मुदतबंदीनें मजूर बाहेर पाठविणें.**—ब्रिटिश साम्राज्यांतील उष्ण कटिबंधाच्या प्रदेशांत मुदतबंदीनें मजूर पाठविण्याची ही पद्धति फार जुनी आहे. सन १८६४ या सालापासून हिंदुस्थानांतून मुदतबंदीनें ब्रिटिश वेस्ट इंडीज्कडे मजूर पाठविले जात होते व ही गोष्ट सरकारच्या संमतीनें होत असे. या उष्ण कटिबंधांतील वसाहतींपैकीं कित्येक वसाहतींत तर हजारों मजूर दरवर्षी अव्याहत चालले आहेत. मॉरिशस्, स्ट्रेट्स सेटलमेंट्स, फेडरेटेड् मलाया स्टेट्स व नाताळ या वसाहतींत मुदतबंदीनें मजूर पाठविण्याची ही पद्धति अनेक कारणांनीं बंद झालेली आहे. परंतु या देशांत आतां कायमची किंवा तात्पुरती वस्ती करून राहणाऱ्या हिंदी लोकांची संख्या बरीच वाढलेली आहे. यांपैकीं कांहीं मजूर आहेत तर कांहीं स्वतंत्र लोक आहेत. मुदतबंदीनें मजूर पाठविण्याची पद्धत थोड्या काळापूर्वी जेथें जोरानें सुरू होती अशीं ठिकाणें ब्रिटिश गियाना, त्रिनिदाद व फिजी हीं होत. परंतु ही मुदतबंदीची पद्धति सरकारनें आतां बंद केली आहे. वरील ठिकाणीं सुद्धां गेल्या कांहीं वर्षांत या पद्धतीचा पाय बराच मागें ओढला गेला होता. याचें कारण, हिंदुस्थानांत मजूरभरती करण्यास पडणारी अडचण हें होय. हिंदुस्थानांतील उद्योगधंद्यांच्या वाढीमुळें हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांतच मजुरांची टंचाई भासूं लागली व यामुळें ही अडचण उपस्थित झाली.

मुदतबंदीनें मजूर पाठविणें हा एक बराच वादग्रस्त प्रश्न होऊन बसला आहे. हिंदुस्थानांतील लोकांनां व त्यांच्या बरोबरच इंग्लंडांतील कांहीं लोकांनां ही पद्धति आवडत नाहीं याचें कारण कित्येक बाबतींत ही पद्धति गुलामगिरीच्या पद्धतीसारखी आहे हें होय. त्या बाबी ह्याः—(१) मुदतबंदीचा काळ संपेपर्यन्त मजुराला स्वतंत्रपणें वागतां येत नाहीं. (२) मजूर ही मालकाची मालमत्ता समजली जाते व तो मालकाची नोकरी ठरलेल्या मुदतीपर्यन्त करण्यास बांधलेला आहे. नोकरीच्या अटीहि कायमच्याच ठरविलेल्या असतात. खुद्द वसाहतींत ही पद्धति अप्रिय असण्याचीं दोन कारणें आहेतः—(१) यामुळें रोजमुऱ्याची किंमत कमी होते (=बाहेरून ठराविक वेतनावर मजूर आणल्यानें घरच्या मजुरांच्या मजुरीचा दर मंदावतो). (२) मुदत संपल्यानंतर फारच थोडे मजूर कायमचे म्हणून तेथें राहतात. बरेचसे लोक आपला परत जाण्याचा प्रवासखर्च मागून घेतात व आपण जो कांहीं संचय करून ठेवला असेल तो पैसा वसाहतींतून परदेशीं नेतात. आतां स्वतः मजुराच्या दृष्टीनें पाहतां, मुदतबंदीचें व गुलामगिरीचें जें साहचर्य कित्येक बाबतींत मानलें जातें तें खरें असलें तरी ही गुलामगिरी सुसह्य आहे, असें या बाबतींतील कायदे पाहिले म्हणजे एखाद्यानें अनुमान करणें साहजिक दिसतें. उत्तम प्रकारच्या शुद्ध हवेंत या मजुराला रहायला जागा मिळते. बाजारांत मजुरीचे जे निरख आहेत ते पाहून मग यांच्या मजुरीचा दरदाम ठरविला जातो. भाड्यासाठीं म्हणून याच्या मजुरींतून कांहींहि कापून घेतलें जात नाहीं. औषधें व वैद्याची मदत त्याला द्यावयास त्याचे मालक बांधलेले आहेत. त्याच्या मुलांनां फुकट शिक्षण मिळतें. व मुदत संपल्यावर त्याची वसाहतींत राहण्याची इच्छा असेल तर त्याला रहावयास जागा व जमीन सरकारांतून फुकट मिळते. ब्रिटिश गियानामध्यें ही व्यवस्था आहे. इतर ठिकाणीं सरकारांतून फुकट जमीन मिळणें एवढी शेवची अट वगळली तर बाकीच्या बाबतींत व्यवस्था सारखीच आहे. ब्रिटिश गियानामध्यें कायम रहाणाऱ्या हिंदी लोकांची संख्या १२७,००० आहे, त्रिनिदादमध्यें ११३०००, फिजीबेटांत, ४०००० मॉरिशसमध्यें २५८०००, व नाताळमध्यें ११३००० आहे. जमेका, डच गियाना वगैरेसारख्या ठिकाणीं हिंदी लोक फारच थोडे आहेत व तेहि मुदत संपून गेलेल्या मजुरांपैकींच आहेत. सिलोन, स्ट्रेट्स सेटलमेंट्स व फेडरेटेड मलाया स्टेट्समध्यें हिंदी मजूर, विशेषतः दक्षिण हिंदुस्थानांतील मजूर, फार जातात. परंतु, तेथें मुदतबंदीची पद्धति मात्र अमलांत नाहीं. मुदतबंदीच्या मजुरांची भरती कशी करितात याचें वर्णन इतरत्र आम्ही दिलेंच आहे.

निरनिराळ्या वसाहतींतील हिंदी लोकसंख्या अजमासानें खालीलप्रमाणें कोष्टक खालीं दिलें आहे.

| वसाहत. | लोकसंख्या. |
|---|---|
| त्रिनिदाद. | ११७,१०० |
| ब्रिटिश ग्वायना. | १२९३८९ |
| जमेका. | २०,००० |
| फिजी. | ४४,२२० |
| सुरीनम. | २६,९१९. |
| रीयुनिअन | ३,०१२ |
| मॉरिशस. | २५७,६९७ |
| फेडरेटेड मलाय स्टेट्स. | २१०,००० |
| स्टेट्स सेटलमेंट्स. | आंकडा मिळत नाहीं. |
| केपकॉलनी. | ६.६०६ |
| नाताळ. | १३३,०३१ |
| ट्रान्सवाल. | १०,०४८ |
| ऑरेंजफ्रीस्टेट. | १०६ |
| सदर्नऱ्होडेशिआ. | आंकडा मिळत नाहीं. |
| आस्ट्रेलिया. | " |
| न्यूझीलंड. | " |

कानडा. सुमारें २००० पेक्षां कमी. निश्चित सांगतां येत नाहीं.

या कामीं चौकशी करण्यासाठीं नेमलेलें कमिशनः—सन १९१२ सालच्या अखेरीस हिंदुस्थानसरकारनें या बावतींत चौकशी करण्याकरितां मि. जे. मॅक्निल् व रा. चिमणलाल या दोघांचें एक कमिशन नेमलें. या कमिशननें वसाहतींतील हिंदी लोकांची एकंदर रहाणी पाहून त्या संबंधानें रिपोर्ट करावयाचा होता. हिंदी लोकांच्या कल्याणास संवर्धक अशा तऱ्हेच्या कांहीं उपयुक्त सूचनाहि कमिशननें कराव्या अशी सरकारची इच्छा होती. कमिशननें खालील मुख्य मुख्य गोष्टींकडे विशेष नजर पुरवावयाची होती. (१) मजुरांचीं घरें, व आरोग्यविषयक परिस्थिति. (२) औषधपाण्यासंबंधाची मदत पुरेशी आहे कीं नाहीं? (३) कामाचे तास योग्य आहेत कीं नाहीं, काम माफक व मजुरी योग्य आहे कीं नाहीं वगैरे गोष्टी. (४) न्यायखात्याच्या बावतींत योग्य न्याय मिळतो कीं नाहीं, वकील मिळण्याच्या बावतींत अगर स्वतःचा बचाव करण्याच्या बावतींत मजुरांना कांहीं अडचणी येतात काय? (५) मजुरांसंबंधींच्या कायद्यांत ज्या शिक्षा सांगितलेल्या आहेत त्या अयोग्य अगर जबर अशा आहेत कीं कसें? (६) कामाखेरीज इतर वेळांत मजुरांच्यावर कांहीं अयोग्य अटी लादलेल्या आहेत काय, व त्यांनां मॅजिस्ट्रेटकडे दाद मागण्याच्या कामीं कांहीं अडचणी आहेत काय? (७) मालक व मजूर यांचा सामान्यतः संबंध कोणत्या स्वरूपाचा असतो? (८) सामाजिक व धार्मिक बावतींत हिंदी मजुरांनां कांहीं सवलती दिल्या जातात कीं नाहीं? (९) परत स्वदेशीं पाठविण्याबावत कांहीं विलंब अगर हयगय होते काय? व मजुरांनां या बावतींत कांहीं अडचणी येतात किंवा कसें? या पद्धतीच्या आणखी कांहीं गुणदोषांसंबंधानेंहि कमिशनला रिपोर्ट करण्यास सांगितलें होतें. ह्या बाबी म्हणजे (१) मालक मजुरांच्यावर निष्कारण खटले करतात किंवा काय? (२) हिंदुस्थानांतून बाहेर जाणाऱ्या मजुरांचा नियंता म्हणून जो नेमिलेला असतो त्याची स्थिति कशी काय असते? (३) मजूर लोकांनीं ज्याच्यावर सह्या करावयाच्या त्या करारनाम्यांतील अटी कशा काय असतात? (४) स्वतंत्र हिंदी लोकांची स्थिति काय असते? (५) वायकांनां मुदतबंदीनें नेण्यांत येतें काय? (६) नीतिबाह्य वर्तन व आत्महत्या हे प्रकार मळ्यांतून कितीसे चालतात?

या पद्धतीचे गुणः—या कमिशनचें काम जवळजवळ ११ महिने चाललें होतें. कमिशनचे सभासद त्रिनिदाद, जमेका, ब्रिटिश गियाना व फिजी या ठिकाणीं गेले होते. सुरिनाम येथील डच कालनीमध्यें हिंदुस्थानांतील मजुरभरतीच्या नियमांप्रमाणें मजूर आणण्याची परवानगी आहे. सदर कालनीमध्येंहि हे कमिशनचे सभासद गेले होते. कमिशनचा रिपोर्ट दोन भागांत प्रसिद्ध झाला. ब्रिटिश गियाना व त्रिनिदाद यांच्याबद्दलच्या माहितीनें पहिला भाग व्यापिला असून दुसऱ्या भागांत बाकीच्या वसाहतींतील स्थितीसंबंधानें अभिप्राय देण्यांत आलेला आहे. वर निर्दिष्ट केलेल्या मुद्यांसंबंधानें कमिशनर्स ज्या ज्या भागांत गेले तेथल्या स्थितीबद्दल विस्तृत अभिप्राय देऊन कमिशनर्स म्हणतात. "आमच्या रिपोर्टांत या पद्धतीचे कांहीं दोष यावयाचे राहून गेले असतील; तरीपण ही गोष्ट जमेस धरून सुद्धां या पद्धतीपासून तोट्यांपेक्षां फायदेच अधिक आहेत असाच अभिप्राय आम्हांस जी माहिती शोधाअंतीं मिळाली तिजवरून द्यावा लागतो. बाहेरून येणाऱ्या मजूर लोकांनां येथें येण्यापूर्वी दारिद्र्याच्या चरकांतून पिळून निघावें लागत होतें व त्यांची स्थिति सुधारण्याचीहि आशा नव्हती. अशा परिस्थितींतून हे मजूर साधारण सुखासमाधानाच्या स्थितींत येऊन पडलेले आहेत व ही स्थिति आणखी सुधारण्याची आशा आहे. बाहेरून येथें आलेले मजूर हिंदुस्थानांतील आपल्या जातभाईंपेक्षां बऱ्याच सुखासमाधानानें राहतात, व ज्यांची यांनीं कधीं जन्मांतहि आशा केली नव्हती असले आपली उन्नति करून घेण्याचे प्रसंग यांनां येथें प्राप्त होतात. ते वसाहतींत नागरिक बनले आहेत व त्यांनां व त्यांच्या वंशजांनां समाजांत मान्यतेचा दर्जा मिळाला आहे." तेथील मजुरांच्या नैतिक वर्तनासंबंधानें कमिशनर्स पुढें म्हणतातः–"वसाहतींतील हिंदी लोकांची नीतिमत्ता ही हिंदी खेड्यापाड्यांतील लोकांच्या नीतिमत्तेपेक्षां फारच हलक्या दर्जाची असते व याचें कारण मुख्यतः हिंदुस्थानांतून ज्या मजूर स्त्रिया बाहेर जातात त्यांच्यापासून पोंचणारा उपसर्ग हें होय. आत्महत्या करणाऱ्या लोकांचें प्रमाण, स्वतंत्र लोक व मजूर यांमध्यें सारखेंच आढळतें, परंतु हें प्रमाण हिंदुस्थानांतील प्रांतांतल्यापेक्षां फारच मोठें आहे. एकंदर

हिंदी लोकसंख्येंत त्रिनिदादमध्यें आत्महत्येचें प्रमाण दर दहा लक्षास १३४ असें आहे व त्यांत मजुराचें प्रमाण दर दहा लक्षास ४०० आहे. हेंच प्रमाण इतर वसाहतींत खालीं दिल्याप्रमाणें आहेः—

| वसाहत. | मुदतबंदीचे मजूर. दर दहा लक्षास | बिन मुदतबंदीचे लोक. दर दहा लक्षास |
|---|---|---|
| ब्रिटिश गियाना | १०० | ५२ |
| जमेका | एकंदर प्रमाण ३९६ आहे. मुदतबंदी व बिन मुदतबंदी आंकडे वेगळे दिले नाहींत. | |
| डच गियाना | ९१ | ४९ |
| फिजी | ९२६ | १४ |

उद्योगधंदे व व्यापार यासंबंधाच्या हिंदुस्थान सरकारच्या खात्याच्या रिपोर्टांवरून आत्महत्येचें सामान्य प्रमाण निरनिराळ्या प्रांतांतून आढळून येतें तेंः—मुंबई इलाखा, दर दहा लक्षास २८·८; संयुक्त प्रांत, दर दहा लक्षास ६३, येथूनच बहुतेक मुदतबंदीचे मजूर भरण्यांत येतात; मद्रास, दर दहा लक्षास ४५, येथूनच फिजी बेटांतील बहुतेक मुदतबंदीचे मजूर भरतात.

या संबंधीं हिंदी लोकांच्या भावनाः—कांहीं वर्षांपासून, मुदतबंदीनें मजूर पाठविण्याची पद्धति एकंदरीनें राष्ट्राला मानहानिकारक आहे असें हिंदु पुढाऱ्यांचें मत बनत चाललें होतें. व म्हणूनच ही पद्धति थांबविली पाहिजे असें त्यांचें मत होतें. हिंदी मजूरवर्गावरून सामान्य हिंदी लोकांच्या बद्दल वसाहतींतील लोक आपलें निष्कारण वाईट मत करून घेतात व त्यामुळें एकंदर हिंदी लोकांनां वाईट तऱ्हेनें वागविण्यांत येतें अशी या पुढाऱ्यांची समजूत होती व त्यामुळेंच त्यांनीं वरील प्रकारचें मत करून घेतलें होतें. मुदतबंदीची पद्धति निदान नाताळपुरती तरी बंद करावी हा ना. गोखले यांचा ठराव सन १९१० सालीं हिंदुस्थान सरकारानें मान्य केला. परंतु, १९१२ मध्यें ही पद्धति अजीबाद बंद करण्याबद्दलच्या त्यांच्या ठरावास सरकारनें हरकत घेतली. हिंदुस्थानांतील लोकांचें मत या बाबतींत दिवसेंदिवस जास्तच विरुद्ध होत चाललें होतें. गेल्या वीस वर्षांत हिंदुस्थानांत प्लेगनें जो धुमाकूळ घातला त्यामुळें मजूर वर्गाची संख्या स्वभावतःच कमी होत गेली. खेरीज वाढत्या उद्योगधंद्यांमुळें मजुरांना मागणी अधिक झाली. त्यामुळें वरील मत दृढ होण्यास पुष्कळ मदत झाली. खेरीज या वसाहतींतून होणाऱ्या आत्महत्यांचें भयंकर प्रमाण, व तेथें होत असलेल्या अनाचारासंबंधाचे कबुलीजबाब या योगानें लोकमत प्रक्षुब्ध झालेलें होतें. त्यांत मजूरवर्गांतील अब्रूदार तरुण स्त्रियांनां मजूरभरती करणाऱ्या अड्ड्यांतील बेइमानी दलाल लोक फुसलावून नेतात अशाबद्दल विश्वसनीय गोष्टी ऐकावयास मिळाल्यानें, या लोकमताची प्रक्षुब्धता सहजच जास्त वाढली. रवींद्रनाथ टागोर यांनीं आपल्या स्वतःच्या कांहीं विशिष्ट कल्पनांबरहुकूम चालविलेल्या शाळेशीं संबंध असणारे मि. सी. एफ् अँड्र्यूज यांनां मुंबई येथील हिंदी नागरिक सभेनें वसाहतींत आत्महत्येचें प्रमाण किती आहे त्याची चौकशी करण्याकरितां फिजी येथें पाठविलें. या भयंकर परिस्थितीचीं कारणें शोधून काढणें हें कामहि त्यांजकडे होतें. यांच्याबरोबर मि. डब्ल्यू. पिअर्सन हे गृहस्थ होते. हे गृहस्थहि वर सांगितलेल्या टागोर यांच्या बोलपूर (बंगाल) येथील शाळेंतीलच होते. अँड्र्यूज व पिअर्सन हे दोघेहि ज्यावेळीं दक्षिण आफ्रिकेंत गेले त्यावेळीं गांधींची सत्याग्रहाची चळवळ अत्यंत जोरांत होती व त्यावेळीं झालेली तडजोड घडवून आणण्यांत यांनीं महत्त्वाची कामगिरी केलेली आहे.

**संरक्षित मुदतबंदीची पद्धति.**—ता. ५ सप्टेंबर १९१६ रोजीं नामदार व्हाइसराय साहेबांनीं परदेशीं मुदतबंदीनें मजूर पाठविणाऱ्या लोकांनां कसा आळा घालतां येईल याचा हिंदुस्थानसरकार विचार करीत आहे म्हणून सांगितलें. व्हाइसरायसाहेब म्हणाले "मजुरांनां त्यांची इच्छा असेल तर मजुरीसाठीं परदेशीं जाण्याचा हक्क आहे. तेव्हां आपण (सरकारानें) त्यांनां अडथळा करणें हें अदूरदर्शीपणाचें व अश्लाघ्य होय. तेव्हां आम्हीं (सरकार) निराळीच एक व्यवस्था अमलांत आणण्याचा प्रयत्न करीत आहों. या नवीन व्यवस्थेप्रमाणें या देशांत मजूरभरतीच्या अटी योग्य त्याच असतील अशी खबरदारी घेतली जाईल. या अटी म्हणजे (१) स्त्रिया व पुरुष यांचें योग्य प्रमाण व (२) मुक्कामाच्या ठिकाणीं उतरल्यावर मजुरांशीं योग्य तऱ्हेची वागणूक व सामान्यतः मलाया द्वीपकल्पांत अंमलांत असलेल्या अटींवर मजुराला वाटेल त्याची नोकरी करण्याची परवानगी या होत. मलाया द्वीपकल्पांत एक महिन्याची आगाऊ सूचना देऊन मजुरास मालकाची नोकरी सोडतां येते. ज्यांनीं ज्यांनीं या प्रश्नाचा अभ्यास केला असेल त्यांची आतां खात्री होऊन चुकली असेल कीं, परदेशीं जाणाऱ्या मजुरांच्या सुरक्षिततेसंबंधानें योग्य ती काळजी घेण्याच्या कामीं जर हिंदुस्थानसरकार हयगय करील तर तें कर्तव्यपराङ्मुख आहे असेंच म्हणावें लागेल. वसाहतींतील लोकांच्या कोणत्याहि दलालानें न बोलावितां, त्याचा पैसा न घेतां, केवळ आपखुषीनें, आपल्या देशांत पोट भरत नाहीं म्हणून परदेशीं जाणारे कांहीं मजूर आहेत हें मला माहीत आहे; परंतु अशांची संख्या फारच थोडी असावी. आतां, आज अस्तित्वांत असणारी मुदतबंदीची पद्धति नाहींशी करण्याकडेच जर आपण लक्ष दिलें तर मजूरभरती करणाऱ्या येथील दलालांनीं वाटेल त्या मार्गांनें—पैसे भरून सुद्धां—मजुरांचीं मनें वळवावीं व वाटेल त्या अटींवर, एक मुदतबंदीची अट खेरीज करून, त्यांस परदेशीं न्यावें अशी स्थिति येईल. अशा तऱ्हेच्या परिस्थितीचे

फारच वाईट परिणाम होतील. आसाम लेबर अँड एमिग्रेशन ॲक्ट पास होण्यापूर्वी तेथें या स्वतंत्र म्हणविणाऱ्या मजुरांची स्थिति काय होती याचा नुसता उल्लेख केला तरी पुरेसा होईल असें मला वाटतें. १९०१ सालीं कौन्सिलमध्यें सर चार्लस् रिवाझ यांनीं या आक्टाचा परिणाम काय झाला तो सांगितलाच आहे. वसाहतींनां मजूर पुरविणाऱ्या बेजबाबदार व अनियंत्रित दलालांचा एक वर्ग अस्तित्वांत आला व त्याची झपाट्यानें वाढ होऊं लागली. स्वतंत्र रीतीनें मजुरीसाठीं परदेशांत जाणाऱ्या लोकांनां मदत करण्याच्या नांवाखालीं, अज्ञान स्त्रीपुरुषांना फसवून, खोटीं आमिषें दाखवून यांनीं आसामांत जाण्यास उद्युक्त केलें. व त्यांवर अन्याय्य मार्गांनीं रगड नफा मिळविला. आतां, या मजुरांशीं वसाहतींत करारमदार वगैरे होत ही गोष्ट खरी; परंतु, तक्रार आहे ती मजूरभरतीच्या पद्धतीसंबंधाची आहे, करारासंबंधानें नव्हे, हें लक्षांत ठेवावयास पाहिजे. तसेंच, हिंदुस्थानांत मुदतबंदीनें मजूर पाठविण्याची पद्धति ज्यावेळीं प्रथम अंमलांत आली, त्यावेळेस प्रत्येक मजुरानें मॅजिस्ट्रेटसमोर मीं राजीखुषीनें जात आहें व नियम मला माहीत आहेत असें शपथेवर सांगितलें म्हणजे पुरत असे. सन १८४० सालीं सादर केलेल्या अहवालांत हिंदुस्थानांतील मजूरभरतींत त्यावेळींहि दोष होते असें दाखविलें आहे. हे दोष वेळोवेळीं कायदे पास करून व अधिकाधिक बंधनें घालून नाहींसे करावे लागले. तेव्हां, कसल्याहि परिस्थितींत अनियंत्रित मजूरभरती करण्याची परवानगी देणें शक्य नाहीं हें उघड आहे. लॉर्ड हार्डिंज यांनीं कांहीं मुद्यांचा विचार करण्याबद्दल अभिवचन दिलें होतें, व मींहि हें अभिवचन पाळणार आहें. हे मुद्दे म्हणजे (१) वसाहतींत मजूर पाठविण्याच्या बाबतींत जास्त सक्त देखरेख ठेवणें, (२) मुदतबंदीच्या मजुरांनीं सही करण्याच्या करारांत शिक्षेसंबंधाचीं कलमें नमूद करणें व (३) मजुरांना त्यांच्या धार्मिक किंवा जातिविषयक समजुतींनां विरुद्ध अशा तऱ्हेचीं कामें करावयास न लावणें, हे होत. यांपैकीं पहिल्या मुद्यासंबंधानें हिंदुस्थानसरकारानें प्रांतिकसरकारचा अभिप्राय सविस्तर विचारला होता. मुदतबंदीची पद्धति अजीबात बंद केल्यानंतर कोणकोणत्या बाबतींत सावधगिरी ठेवावी लागेल त्याच्या बद्दलचीं प्रांतिक सरकारांचीं मतें विचारिलीं तेव्हांच याबद्दलहि विचारिलें होतें. दुसऱ्या मुद्यासंबंधानें सांगावयाचें म्हणजे फिजी बेटांत सध्यां मजुरांनां त्यांच्या गुन्ह्यांबद्दल तुरुंगांत पाठवीत नाहींत हें आपणांस माहीतच आहे. इतर वसाहतीहि या बाबतींत सुधारणा करीत आहेत. परंतु, अशा दुसऱ्याहि कित्येक बाबी शिल्लक असतील कीं ज्यांच्याकडे मजुरांचें लक्ष वेधणें जरूर आहे. वर मीं उल्लेखिलेल्या सुधारणांसंबंधानें निरनिराळ्या वसाहती काय कायदे पास करितात तें पाहून नंतर हार्डिंज साहेबांनीं अभिवचन दिलेल्या गोष्टी करण्याचें आम्हीं योजिलें आहे."

**मुदतबंदीची पद्धति अजीबात बंद.**—सन १९१७ सालीं या परिस्थितींत एकदम विलक्षण बदल झाला. सरकारी रीतीनें कोणतेंच प्रसिद्धिपत्रक बाहेर पडलें नसतांना भारतमंत्र्यांनीं "मजूरभरतीची दुसरी नवी पद्धति अमलांत येईंपर्यन्त पांचवर्षें सध्यांची मुदतबंदीची पद्धतीच चालू ठेवावी" अशी सूचना केल्याबद्दल लोकांत दाट बातमी पसरली. या योगानें सर्व देशभर खळबळ उडून गेली व या सूचनेचा चोहोंकडे निषेध करण्यांत आला. युद्धाच्या काळांत सरकार व वसाहती यांच्या मार्गांत कांटे पसरण्याची कोणत्याहि प्रकारची प्रजेची इच्छा नव्हती, हें उघड उघड दिसत होतें. तरी पण, असली भयंकर आक्षेपार्ह पद्धति, ५ वर्षें नवीन मुदतबंदीच्या मजुरांची मुदत संपण्यासाठीं व ५ वर्षें नवीन पद्धति सुरू करण्यासाठीं अशीं १० वर्षें चालू राहणें म्हणजे फार झालें, असें प्रजेस वाटूं लागलें. अखेर युद्धासाठीं मजुरांचा तुटवडा येतो म्हणून मुदतबंदी मजुरीची पद्धति अजीबात बंद करून हिंदुस्थानसरकारानें हा प्रश्न सोडविला; व ही पद्धति पुन्हां कधींहि अमलांत येणार नाहीं असें वचन दिलें. याप्रमाणें नव्या मुदतबंदीचा प्रश्न कांहीं आगंतुक कारणांनीं मिटलासा वाटतो, परंतु तो कायमचा मिटला असें म्हणतां येणार नाहीं. सध्यां मुदतबंदीनें वसाहतींत असलेल्या मजुरांची काय वाट हा प्रश्न तर सर्वस्वींच शिल्लक राहिला आहे. सन १९१९ सालांत या पद्धतीप्रमाणें वसाहतींत कामें करणाऱ्या मजुरांची राहणी वगैरे सुधारण्याच्या कामीं बरेच प्रयत्न करण्यांत आले. ता. २४ नोवेंबर १९१९ रोजीं फिजी बेटांसंबंधानें व्हाइसरॉय साहेबांनीं खालील प्रसिद्धिपत्रक काढलें. "गेल्या कांहीं वर्षांपासून या बेटांतील मजुरांची स्थिति सुधारत चालली आहे, नाहीं असें नाहीं. परंतु, आम्हीं जितकी सुधारावयास पाहिजे म्हणतों तेवढी कांहीं ती सुधारलेली नाहीं. म्हणून सध्यां कामावर असलेल्या मुदतबंदी मजुरांची मुक्तता करावी असा मीं आग्रह धरिला. वसाहतींच्या प्रधानांनीं मि अँड्र्यूज यांच्या शिफारशीप्रमाणें १९२० च्या जानेवारीपर्यन्त ज्या वसाहतींत सुधारणा झालेल्या नाहींत तेथील मुदतबंदी पद्धत मोडून टाकण्याचें कबूल केलें. परंतु एवढ्यानें माझें समाधान झालें नाहीं. व म्हणून असलेले मुदतबंदीचे करार बदलून घेऊन फिजी बेटांतला प्रत्येक मजूर पुढच्या जानेवारीच्या आंत मुक्त करण्याच्या कामीं काय खर्च येईल असें मीं वसाहतींच्या प्रधानांनां विचारिलें आहे."

**सरकारमदतीची मजूरनिर्यातपद्धति.**—मुदतबंदीच्या पद्धतीऐवजीं कोणती पद्धति अमलांत आणावी याचा विचार करण्याकरितां लंडनमध्यें एक कमिटी बसली होती. १९१९ सालाचे चार सहा महिने लोटल्यावर या कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला. तिनें केलेल्या मुख्य मुख्य शिफारशींचा गोषवारा खालीं दिला आहे.

या पद्धतीप्रमाणें हिंदी मजूर वसाहतींत येईल त्यावेळेस त्याच्यावर कोणत्याहि प्रकारचें कर्ज लादलें जाणार नाहीं, व ओळखपाळख करून घेण्याच्या बाबतींत त्याला कसल्याहि प्रकारची खर्चाची तोशीस लागणार नाहीं. तो कोणत्याहि विशिष्ट मालकाचीच नोकरी करण्याला बांधलेला राहणार नाहीं. परंतु त्याला त्याच्या स्वतःच्या कल्याणासाठीं म्हणून एका निवडून दिलेल्या मालकाची नोकरी ६ महिने करावी लागेल. योग्य कारण दाखविल्यास, बाहेरून आलेल्या लोकांवर देखरेख ठेवणारा जो अधिकारी असतो त्याच्या परवानगीनें ह्याहि मालकाची नोकरी त्याला सोडून देतां येईल. वसाहतींत आल्या दिवसापासून मजुराला त्याच्या स्वतःकरितां म्हणून लागवडीस जमीन देण्यांत येईल. शेतकी कामाकडे कामावर असणाऱ्या प्रत्येक वयांत आलेल्या पुरुषाला $\frac{१}{१०}$ एकर बागाइत जमीन सहा महिन्यांच्या नोकरीनंतर स्वतःकरितां लागवडीसाठीं देण्यांत येईल. व सवड सांपडतांच $\frac{१}{३}$ एकर आणखी जमीन बक्षिसादाखल देण्यांत येईल. मजुरांच्या मालकांच्या यादीवर ज्याचें नांव नोंदलेलें असेल अशा मालकाची जर एखाद्या मजुरानें ३ वर्षें नोकरी केली तर त्याला वसाहतीसाठीं जागा मिळेल व ती शक्य तेवढ्या सोईनें व कमी किंमतींत देण्याबद्दल खटपट करण्यांत येईल. प्रत्येक वसाहतींत एक स्वतंत्र खातें निर्माण करण्यांत येऊन त्याजकडे प्रत्येक खऱ्या अर्जदाराला वरील व्यवस्थेप्रमाणें जमीन मिळेल इतकी जमीन तयार ठेवण्याची आणि तिला पाणी पुरवून तिच्यांतील तण वगैरे काढून व तिच्यांतील पाण्याचा निकाल करण्याची व्यवस्था लावून ती लागवडीयोग्य करण्याची जबाबदारी सोंपविली जाईल. अशी वसाहती जमीन जवळ जवळ पांच एकरपर्यंत असेल व ही मुदतबंदीच्या भाडेपट्ट्यानें घेतल्यास तिजवर योग्य तो वार्षिक खंड आकारला जाईल. या वसाहती जमिनीवरील हक्क ३० वर्षांपेक्षां अधिक काळपर्यंत टिकणार नाहींत. नवीन सुचविलेल्या योजनेप्रमाणें मजुरांवर फक्त दिवाणी फिर्यादी लावितां येतील. तो कोणत्याहि फौजदारी शिक्षेस पात्र असणार नाहीं. मजुरांचा कमींत कमी पगार किती असावा हें ठरवून दिलें जाईल व वेळोवेळीं त्यांत सुधारणा केली जाईल. पहिल्या वर्षीं ११ वर्षांखालील मुलांस शिधा फुकट पुरविला जाईल व पांच वर्षांखालील मुलांस दूधहि पुरविलें जाईल. ही व्यवस्था अर्थातच त्यांचे आईबाप मजुरीच्या कामावर असेपर्यंतचीच आहे. वयांत आलेले वीस किंवा विसांहून अधिक मजूर हाताखालीं असलेल्या नोंदलेल्या मालकांवर सड्या मजुरांचीं घरें व कुटुंबवत्सल मजुरांचीं घरें दूर दूर असण्याची व्यवस्था केली पाहिजे अशी सक्ती करण्यांत येईल, व इतरांनां ही गोष्ट शक्य तेवढी करण्यास भाग पाडण्यांत येईल. जबाबदार अधिकाऱ्यांकडे ज्या मालकांचे अर्ज आलेले असतील त्यांच्यापैकीं सरकाराची मदत घेणारे मजूर कामावर ठेवण्यास कबूल असलेल्या अधिकाऱ्यांचींच नावें सरकारांत नोंदलीं जातील व ही नोंद करण्यापूर्वीं हे मालक मजूर ठेवण्यास योग्य आहेत कीं नाहींत याची चौकशी होईल. मजुरांची परत स्वदेशीं जाण्याची इच्छा असेल त्यावेळीं त्यास परत जाण्यास मदत मिळेल. मजुरांनां त्यांच्या स्वतःकरितां म्हणून तीन वर्षांनंतर अर्धा व सात वर्षांच्या नोकरीनंतर जवळ जवळ सबंध प्रवासखर्च बहाल करण्यांत येईल.

मजूरभरती करण्याच्या बाबतींत येथल्या दलालांना परवाने देण्यांत येतील व त्यांचे पगारहि कायमचे ठरवून टाकण्यांत येतील. चांगलें काम केल्याबद्दल क्वचित्काळीं त्यांस पारितोषिकेंहि देण्यांत येतील.

या दलालांच्या कामावर 'इन्स्पेक्टर्स ऑफ एमिग्रेशन' नांवाच्या अधिकाऱ्यांची देखरेख राहील. व यांचे पगार चढत्या प्रमाणांत ठेवण्यांत येतील. या 'इन्स्पेक्टर्स'वर एक 'कमिशनर' व एक 'प्रोटेक्टर ऑफ इमिग्रंट्स्' असे अधिकारी प्रत्येक प्रांतिक सरकारांतून नेमण्यांत येतील व यांतला 'कमिशनर' हा वसाहतींच्या मुलकी खात्यांतील अधिकाऱ्यांपैकीं एक असेल. यांचें काम म्हणजे दूषित प्रांतांतून येणाऱ्या मजुरांवर देखरेख ठेवणें हें होय. प्रत्येक वसाहतींत बाहेरून येणाऱ्या मजुरांच्या हितसंबंधांस जपणारा असा एक अधिकारी असला पाहिजे. मजूर बाहेर पाठविण्याच्या अड्ड्यांनां भेट देण्याचा प्रांतांतील शिष्ट लोकांना अधिकार आहे. तसेंच मुख्य ठिकाणच्या अड्ड्यांत जाण्याचाहि या बिनसरकारी शिष्ट लोकांस अधिकार आहे. सबंधच्या सबंध कुटुंबें बाहेर जात असतील तर त्यांनां उत्तेजन देण्यांत येईल. परंतु, अठरा वर्षांच्या आंतील माणसांस आईबाप किंवा पालक बरोबर असल्याखेरीज जाऊं दिलें जाणार नाहीं. कुटुंबें बरोबर नसलेल्या एकट्या स्त्रियांनां सरकारी मदत मिळणार नाहीं. व मजुरांत स्त्रिया व पुरुष यांचें एक ठराविक प्रमाण असलेंच पाहिजे हा निर्बंध काढून टाकण्यांत येईल.

हा रिपोर्ट प्रसिद्ध करण्यांत आला त्यावेळीं हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची पुनर्घटना हा विषय राजकीय चळवळीचें केंद्र होऊन बसला होता. व या प्रश्नांचा येथें जागच्याजागींच निकाल करण्यासाठीं भारतमंत्री हिंदुस्थानांत यावयाचे होते तिकडेहि लोकांचे डोळे लागलेले होते. तेव्हां साहजिकपणेंच या रिपोर्टाकडे जावें तितकें लक्ष गेलें नाहीं. तथापि लोकमताचा एकंदर झोंक पाहतां, मुदतबंदीनें मजूर पाठविण्याच्या पद्धतीपेक्षां ही पद्धत जरी बरीचशी चांगली असली तरी परदेशीं मजूर पाठविण्याच्या कामीं सरकारानें इतक्या उत्सुकतेनें व सढळ हातानें मदत करावी हें लोकांनां एकंदरींत नापसंतच आहे.

**ब्रिटिश बेटांतील हिंदी लोक.**—हिंदुस्थानांतून इंग्लंडांत व्यापाराकरितां जाण्याचा प्रथम उपक्रम पारशी मंडळीनें

कामा आणि कंपनीमधील दादाभाई नौरोजी व इतर कित्येक मंडळी यांच्या द्वारा केला, त्या गोष्टीला आज ६० वर्षें होऊन गेलीं आहेत. वरेच हिंदू व मुसुलमान धंदेवाले लोक आज इंग्लंडांत कायमचे राहिलेले आहेत, तरी या बाबतींतलें आपलें पुढारीपण पारशी ज्ञातीनें अद्याप कायम ठेविलेलें आहे. दुसऱ्या धंद्यांतूनहि म्हणजे वैद्यक, बॅरिस्टर, सॉलिसिटर, वगैरे धंद्यांतहि हिंदुस्थानी लोक लंडन व इतर ठिकाणीं आहेत. भारतमंत्र्यांच्या कौन्सिलांत तीन हिंदी गृहस्थ आहेत. १९१९ या वर्षी तर लॉर्ड सिंह यांच्यामुळें हिंदी लोकांनां आजपर्यन्त कधीं न मिळालेला विलायत सरकाराच्या राज्यकारभारांत शिरण्याचा व उमरावपदाला चढण्याचा मान मिळाला. या शतकाच्या आरंभापासून इंग्लंडांत कायम वस्ती करून राहण्याकडे हिंदी लोकांचा कल होऊं लागला आहे. या वर्गांत विशेषतः पेनशनर्स (मुख्यत्वें वैद्यकीच्या खात्यांतील) व व्यापारी वर्गांतले लोक येतात. यांनां इंग्लंडांत रहाणें बरें वाटतें म्हणून म्हणा किंवा त्यांच्या मुलांनां इंग्लंडांत शिक्षण देण्याची त्यांची इच्छा असते म्हणून म्हणा, हिंदुस्थान सोडून हे लोक जे इंगलंडांत जातात ते बहुधा कायमचेच जातात. हिंदुस्थानांतून उन्हाळ्यांत जे लोक तिकडे जातात त्यांच्यांत बरेचसे श्रीमान् लोक असतात. महायुद्धाच्या पहिल्या-वर्षी फ्रान्समधील हिंदी सैन्य पूर्वेकडील प्रदेशांत नेण्यापूर्वी आमच्या हिंदी शूर शिपायांपैकीं हजारों जखमी लोक शुश्रूषेसाठीं उत्तम तऱ्हेची व्यवस्था व उत्तम सोयी असलेल्या हिंदी इस्पितळांत येत. हीं इस्पितळें कांहीं हॅम्पशायरमध्यें होतीं. पण बहुतेक ब्रायटनमध्यें होतीं. ब्रायटनमध्यें एक हिंदू लोकांचें स्मारक होत आहे. सन १९१९ सालच्या हिंदुस्थानच्या राज्यकारभारासंबंधाच्या बिलावर जाइंट कमिटीनें ज्या साक्षी घेतल्या त्यांच्या सम्बधानें हिंदुस्थानांतले बरेचसे मुख्य मुख्य राजकीय पुढारी कांहीं महिने इंग्लंडांत गेले होते.

**विद्यार्थिवर्ग.**—परंतु इंग्लंडांतील हिंदी लोकसंख्येचा या सर्वांपेक्षां महत्वाचा घटक म्हणजे हिंदी विद्यार्थिवर्ग, व तेथें हिंदी लोकांसंबंधानें जर कांहीं प्रश्न उपस्थित झालेले असतील तर ते मुख्यतः याच वर्गाबद्दल होत.

महायुद्धापूर्वीच्या पावशतकांत या विद्यार्थ्यांची संख्या पूर्वीच्या दसपट अगर बारापट वाढली. ही वाढ मुख्यतः १९०४ व १९०५ या सालांत विशेष जोरानें झाली. यानंतर सुमारें पांच एक वर्षांनीं बॅरिस्टरीकडे धांव घेणाऱ्या लोकांच्या झुंडीच्या झुंडी लंडनांत येऊं लागल्या. त्यामुळें कृत्रिम वाढ वरीच झाली. यामुळें, प्रवेशपरीक्षा जास्त अवघड ठेवाव्या लागल्या. या परीक्षांमुळें या वाढीला आळा बसला व औद्योगिक व एंजिनिअरिंग वर्गांतून विशेष भरती होऊं लागली. महायुद्धामुळें या भरतीला जोराचा धक्का बसला खरा, परंतु युद्धाची तात्पुरती लाट ओसरतांच परवाना व कॉलेजमध्यें जागा मिळणें या दोन्ही बाबतींतल्या अडचणींनां न जुमानतां १९१९ सालीं या संख्येंत वरीच वाढ झाली. युनिव्हर्सिटीच्या तरुण विद्यार्थ्यांखेरीज ईटन व हॅरो येथील शाळांत कांहीं हिंदी विद्यार्थी आहेत. हे चांगल्या हिंदू घराण्यांतले असून यांत कित्येक संस्थानांच्या राजघराण्यांतील मुलें आहेत. बॅरिस्टरीच्या धंद्याकडे २०० किंवा ३०० विद्यार्थी नेहमीं असतात. युद्धापासून कलाविषयक व औद्योगिक बाजूकडील विद्यार्थ्यांत बरीच वाढ झालेली आहे. वैद्यकीकडचे, कला-विषयाकडचे वगैरे सर्व विद्यार्थी धरून लंडनमध्यें सुमारें ५०० तरुण हिंदी लोक आहेत. एडिंबरो, केंब्रिज, ऑक्सफर्ड व मँचेस्टर येथील विद्यार्थ्यांची संख्या यांच्या खालोखाल आहे. खेरीज ग्लासगो, बर्मिंगहॅम, लीड्स्, शेफील्ड व लिव्हरपूल येथें कांहीं विद्यार्थी आहेत.

**सल्लागारकचेरी.**—कांहीं वर्षांपूर्वीपर्यंत हिंदी विद्यार्थ्यांनां, स्वतःच्या ओळखीच्या इंग्रज मित्रांच्या द्वारा येणारे व बिनसरकारी लोकांच्या अपुऱ्या साहाय्यानें इंग्लंडांत येणारे कांहीं अपवादभूत विद्यार्थी वगळले तर, बहुतेक स्वतःच्या प्रयत्नांवरच अवलंबून रहावें लागत असे. परंतु सन १९०९ च्या एप्रिल महिन्यांत लॉर्ड मोर्ले यांनीं इंडिया ऑफिसच्या एका कमिटीच्या शिफारशीवरून या लोकांच्या साहाय्यार्थ एक इन्फर्मेशन ब्यूरो (माहिती पुरविणारी कचेरी) नांवाची संस्था काढिली व डॉ. टी. डब्ल्यू. अर्नोल्ड या गृहस्थांनां एज्युकेशनल अॅडव्हायसर या नांवाखालीं तिचे अध्यक्ष नेमिलें. ही ब्यूरो लवकरच २१ क्रॉमवेलरोड या ठिकाणीं स्थापण्यांत आली. याच्यावरोबरच नॅशनल इंडिअन असोसिएशन व नॉर्थब्रुक सोसायटी या संस्था या जागेंत आल्या. जवर भाड्याचा प्रश्न अशा तऱ्हेनें आपोआप सुटून या संस्थांनां ऐसपैस जागा मिळाल्यामुळें तरुण हिंदी विद्यार्थ्यांच्या संबंधानें जें सामाजिक कार्य त्यांनीं अंगीकारलें होतें तें त्यांस सुकर झालें. ब्रह्मदेशांतील विद्यार्थ्यांकरितां आल्बिअन हाऊस नांवाच्या प्रशस्त जागेंत (सेंट पीटर्स स्क्वेअर, हॅमरस्मिथ, डब्ल्यू. सी.) पृथक् क्लबाची व्यवस्था करण्यांत आली आहे. लॉर्ड मोर्ले यांनीं सदरील कचेरीखेरीज एक सल्लागार मंडळहि नेमिलें होतें. या मंडळावर बहुतेक हिंदी रहिवाशीच सभासद असत. परंतु हें मंडळ आतां नामशेष झालें असून त्याच्याऐवजीं हिंदुस्थानांत परदेशीं जाणाऱ्या विद्यार्थ्यांनां सल्ला देण्यासाठीं म्हणून प्रांतिक कमिट्या नेमण्यांत आल्या आहेत. इन्फर्मेशन ब्यूरोचें काम झपाट्यानें वाढत चाललें. त्यामुळें सन १९१२ सालीं लॉर्ड क्यू यांनीं 'सेक्रेटरी फॉर इंडिअन स्टूडंट्स' या नांवाखालीं एक अधिकारी नेमून त्याच्या हातांत हें ऑफिस दिलें व त्याची पुनर्घटना केली. ह्या सेक्रेटरीच्या जागीं तेव्हांचे मि. आणि आतांचे सर सी. ई. मॅलेट यांची योजना करण्यांत आली. परंतु १९१६ सालच्या अखेरीस त्यांनीं राजीनामा दिला. यांच्या मागून 'हिंदी विद्यार्थ्यांचे एज्युकेशनल अडव्हायसर'

म्हणून डॉ. अर्नोल्ड हे तेथें आले. 'लंडनमधील स्थानिक सल्लागार' म्हणून मि. एन्. सी. सेन हे डॉ. अर्नोल्डच्या मागें तेथें गेले आहेत, व सध्यांच्या प्रांतिक युनिव्हर्सिट्यांतून असलेच अधिकारी नेमिलेले आहेत.

या बाबतींत दोन चुकीच्या समजुती झालेल्या आहेत; किंवा यांनां मुद्दाम पसरलेले गैरसमज म्हटलें असतांहि हरकत नाहीं. [इअरबुककरांचें हें म्हणणें वस्तुस्थितीस सोडून आहे]. एक समजूत अशी कीं, इंग्लंडांत जें एक प्रकारचें राजद्रोहाचें वारें पसरलें होतें व ज्याचें पर्यवसान सर कर्झन वायली यांच्या खुनांत झालें तें वारें नाहींसें करण्यासाठीं इंडिया ऑफिसनें हा ब्यूरो निर्माण केला. वास्तविक, हा खून होण्यापूर्वीच ३ महिने हा ब्यूरो अस्तित्वांत होता, व ह्याच्या स्थापनेबद्दलचा विचार एक वर्ष अगोदरपासून चाललेला होता. टाइम्सनें १९०८ च्या सपटेंबरांत म्हटल्याप्रमाणें "या ब्यूरोचा उद्देश हिंदी तरुण लोकांनां राजकीय चळवळीच्या आखाड्यांत नेऊन सोडण्याचा नव्हता; किंवा अधिकाराच्या जोरावर त्यांचें स्वातंत्र्य हरण करण्याचाहि नव्हता. त्यांचें सामान्यतः हित व्हावें व त्यांची शिक्षणविषयक प्रगति जास्त झपाट्यानें व्हावी, व त्यांच्यावर एकंदरींत हितकर असा दाब राहावा" एवढ्याच हेतूनें हा ब्यूरो अस्तित्वांत आला. यामध्यें हेराचें काम बिलकूल करावें लागणार नाहीं अशा समजुतीवरच डॉ. अर्नोल्ड यांनीं ही जागा पतकरिली होती

**विद्यार्थ्यांच्या अडचणी दूर करणें.**—दुसरा एक गैरसमज [?] म्हणजे, कॉलेजें किंवा दुसऱ्या संस्था यांनीं जे प्रतिबंधकारक नियम केलेले आहेत ते करण्यांत किंवा त्यांच्याविरुद्ध झालेल्या तक्रारींकडे दुर्लक्ष करण्यांत ब्यूरोचें अंग आहे असा विद्यार्थ्यांचा झालेला समज हा होय. अशी गैरसमजूत पुष्कळ अंशीं या विद्यार्थ्यांच्या देशांतीलच मोठ्या मोठ्या लोकांनीं पसरली आहे. विद्यार्थ्यांच्या मार्गांत अडचणी आणण्याचें तर राहोच, पण उलट त्यांनां ज्या ज्या ठिकाणीं मज्जाव आहे तेथें तेथें त्यांचा प्रवेश करून देण्याच्या कामीं व त्यांचीं खरीं खुरीं गाऱ्हाणीं दूर करण्याच्या कामीं ब्यूरोनें चांगलेंच यश मिळविलें आहे. या ब्यूरोचा सर्वांत मोठा विजय म्हणजे ऑक्सफोर्ड व केंब्रिज येथील युनिव्हर्सिट्यांतून हिंदी विद्यार्थ्यांनां प्रवेश मिळण्याची जी अडचण होती ती युनिव्हर्सिटीच्या बोर्डांत आपलीं माणसें वगैरे घुसवून त्यानें कमी केली हा होय. ऑक्सफोर्ड येथील 'ओरिएंटल डेलिगसी' व केंब्रिज येथील 'इंटर कॉलेजिएट इंडिअन स्टूडंट्स कमिटी' यांनीं स्थानिक सल्लागारांचें काम अंगावर घेतलें आहे; व याप्रमाणें हिंदी विद्यार्थ्यांचें बूड बरेचसें ठिकाणीं बसल्यासारखें झालें आहे. सरकारी नियंत्रणाच्या ज्या बाबी बऱ्याचशा विद्यार्थ्यांनां आवडत नव्हत्या, त्या ऑक्सफोर्ड व केंब्रिज या युनिव्हर्सिट्यांतून प्रवेश मिळाल्यानें बऱ्याच दूर झाल्या आहेत. या दोन पुरातन युनिव्हर्सिट्यांतून प्रवेश मिळाल्यानें तेथील संस्कृतीचे व परंपरेचे परिणाम अनायासेंच हिंदी विद्यार्थ्यांवर घडूं लागतील. स्थानिक सल्लागारांनां भारतमंत्र्यांकडून पूर्वी जेवढी ग्रँट मिळत असे तेवढीच जवळ जवळ ते या संस्थांनां देतात. या संस्थांचे व्यवस्थापक माजी स्थानिक सल्लागारांपैकींच असल्यानें त्यांनां परिस्थितीची पूर्ण माहिती असते हें सांगणें नकोच.

स्टेट टेक्निकल स्कॉलरशिप्सकरितां नेमिलेल्या सर टी. मॉरिसनच्या कमिटीच्या १९१३ च्या रिपोर्टांत म्हटलें आहे कीं, "हिंदू विद्यार्थ्यांनां आपल्या पुस्तकी ज्ञानाला अनुभविक ज्ञानाची जोड मिळवून देण्याच्या कामीं येणाऱ्या अडचणी सर्वसामान्य स्वरूपाच्या आहेत, म्हणजे हिंदी विद्यार्थ्यांनां कारखान्यांत वगैरे शिरकाव मिळण्यास ज्या अडचणी येतात त्याच बहुधा इंग्रज विद्यार्थ्यांनां येतात. सामान्यतः पाहतां वर्णविद्वेषाची कल्पना येथें नाहीं म्हटलें तरी चालेल." इंग्लंडांतील शिक्षणाच्या सोयींसंबंधानें व त्यांच्या एकंदर स्वरूपासंबंधानें कोणाहि विद्यार्थ्यानें निष्कारण गैरसमज करून घेऊं नये. 'हिंदी विद्यार्थ्यांसाठीं माहिती' म्हणून एक छोटेंसें पुस्तक 'नॅशनल इंडिअन असोसिएशन' व 'सल्लागार कचेरी' यांनीं प्रसिद्ध केलेलें आहे. त्यांतहि सर्व माहिती मिळेल. या पुस्तकाची १६ वी नवी आवृत्ति १९१९ मध्यें प्रसिद्ध झालेली आहे.

**मित्रत्वाची सल्ला, जुलूम नाहीं.**—कांहीं जुन्या पद्धतीचे अँग्लोइंडियन लोक समजतात त्याप्रमाणें या ब्यूरोला लंडनमध्यें किंवा इतरत्र विद्यार्थ्यांवर शिस्तीचें अनियंत्रित दडपण लादतां येत नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे कीं, सरकारची किंवा संस्थानची स्कॉलरशिप घेऊन आलेल्या विद्यार्थ्यांखेरीज इतरांवर आपले शिस्तीचे नियम जबरदस्तीनें लादण्याचा ब्यूरोला बिलकूल अधिकार नाहीं. आतां ज्या पालकांनीं किंवा आईबापांनीं आपलीं मुलें यांच्याच देखरेखीखालीं ठेविलेलीं असतील त्यांची गोष्ट वेगळी. तरी या विद्यार्थ्यांवर देखील त्यांनां खर्चाला जें मिळतें त्याच्या हिशेबापुरतीच देखरेख ठेवण्याचा ब्यूरोला अधिकार आहे. पुष्कळशा तरुण विद्यार्थ्यांनां कर्जबाजारीपणापासून वांचविण्याचें, उधळेपणापासून व व्यभिचार इत्यादि व्यसनांपासून अलिप्त ठेवण्याचें श्रेय ब्यूरोनें घेतलेलें आहे. हें श्रेय जें ब्यूरोनें मिळविलें तें जुलूम करून नव्हे, तर वेळोवेळीं मित्रत्वाची सल्ला देऊन, जें शिक्षण मिळविण्याकरितां विद्यार्थी इंग्लंडांत येतात त्या शिक्षणाच्या कार्याकडेच त्यांनीं लक्ष देण्याची किती आवश्यकता आहे हें वारंवार त्यांच्या नजरेस आणून, मिळविलेलें आहे.

विद्यार्थ्यांनां बिनअधिकारी मदतगार व मित्र पुष्कळ मिळतात. लॉर्ड हॉक् यांच्या अध्यक्षत्वाखालीं व लॉर्ड कारमायकेल यांच्या व्यवस्थापकत्वाखालीं अक्टन येथें इंडियन

जिमखाना क्लब नांवाची संस्था आहे. याच्याकरितां 'मिल हिल पार्क क्लब'ची जागा घेण्यांत आली आहे. या क्लबच्या क्रिकेटपटूंनीं लॉर्ड व ओव्हल आणि दुसरे वारीकसारीक क्लब यांच्याशीं सामने खेळून चांगलेंच नांव मिळविलें आहे.

विद्यार्थी आणि महायुद्ध.—हिंदुस्थानानें महायुद्धांत मदत देऊन जी मोठी कामगिरी बजावली त्या योगानें परिस्थिति बरीच समाधानकारक झाली असल्याकारणानें आतां गैर-समज बराच दूर होईल. 'इंडियन फील्ड ॲम्ब्यूलन्स' नांवाचें एक पथक तयार करून ( यांत सुमारें २७२ लोक होते ) व दुसऱ्या मार्गांनींहि इंग्लंडांतील हिंदी विद्यार्थ्यांनीं युद्धांत भाग घेतला आहे. महायुद्धांत ब्रिटिश विद्यार्थी लढाईच्या कामावर गेल्यामुळें युनिव्हर्सिट्यांतून ब्रिटिश विद्यार्थी कमी झाले, त्यावेळीं हिंदी विद्यार्थ्यांनीं बऱ्याच मोठ्या प्रमाणांत चांगलें यश मिळवून दाखविलें. त्यामुळें त्यांच्याबद्दल बरेंच चांगलें मत उत्पन्न झालें आहे. हिंदी विद्यार्थ्यांनीं युनिव्हर्सिट्यांतून मिळविलेला मान सन्मान हा हिंदुस्थानांतून पूर्वीपेक्षां बरे विद्यार्थी इंग्लंडांत जाऊं लागले आहेत याचें निदर्शक आहे. यांत युनिव्हर्सिट्या व कॉलेजें यांनीं दिलेल्या सवलतींचाहि भाग बराच आहे हें कबूल केलें पाहिजे. परंतु युद्धकाळीं ब्रिटिश विद्यार्थ्यांबरोबर चढाओढ करण्याचा फारसा प्रसंग नसल्यानें तेवढ्यापुरता जरी हिंदी विद्यार्थ्यांना फायदा मिळाला तरी हिंदी विद्यार्थ्यांसाठीं म्हणून पास होण्यास लागणाऱ्या गुणांचें प्रमाण कमी केलेलें नव्हतें ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. आतां सर्व स्थिरस्थावर झालें असल्या-कारणानें पुन्हां जास्त सर्धा सुरू झाली आहे व जुन्या युनिव्हर्सिट्यांतून जागा मिळणें अवघड झालें आहे. दुसऱ्या सर्व जबाबदाऱ्या लक्षांत घेऊन ब्रिटिश युनिव्हर्सिट्या अंगचोरपणा न करितां चांगल्या, बुद्धिमान् व मेहेनती विद्यार्थ्यांना जागा देण्यास तयार असतात. त्यांनां आळशी, अयोग्य व व्यवस्थित शिक्षण नसलेले असे विद्यार्थी नको असतात एवढेंच.

या संबंधाचा सर्व विचार सर चार्ल्स मॅलेट यांणीं १९०९ पासून १९१६ पर्यन्त 'इंडिअन स्टूडंट्स डिपार्टमेंट'च्या कामा-संबंधानें सालोसाल केलेल्या चार रिपोर्टांतून केलेला आहे.

[आपल्या येथून परदेशीं जाणाऱ्यांचें वर्गीकरण देऊन नंतर टाइम्स ऑफ इंडियाच्या नव्या सांवत्सरिक ग्रंथांतील परदेशगमनविषयक उपयुक्त माहिती आतांपर्यंत वर दिली आहे. यानंतर बाहेर जाणाऱ्या आपल्या लोकांची आर्थिक दृष्ट्या बाहेरचें जग काय किंमत करतें हें आपण पाहूं.]

**आमची बाहेरच्या जगांत किंमत.**—पारिस येथें असलेले शँपन्नास जवाहिरे आणि लंडन, लिव्हरपूल, जिनोवा इत्यादि ठिकाणीं असलेले तुरळक दुकानदार सोडून दिले आणि प्रोफेसर, ब्यारिस्टर या नात्यानें उपजीविका करणारा बोटावर मोजण्यासारखा वर्ग वगळला तर आपले जे लोक यूरोपीय संस्कृतीच्या देशांत जातात त्यांची किंमत मजूर होण्यापलीकडे लागत नाहीं हें सामान्यतः सांगितलें पाहिजे. जेथें हिंदुस्थानी वस्ती पुष्कळ आहे, तेथें कांहीं लोक हिंदूंच्याच गरजा भागविणारे खाणावळवाले आणि दुकानदार बनतात यांतहि नवल नाहीं. पूर्वेकडे जाणाऱ्या आणि आफ्रिकेंत गेलेल्या लोकांत व्यापारी वर्ग आहे तोहि मोठा महत्त्वाचा नाहीं. त्याची मजल लहानसान दुकानदारीपलीकडे जात नाहीं. अमेरिकेंत मजूर म्हणून देखील भारतीयांची किंमत मोठी नाहीं. वाशिंग्टन संस्थानांत १९०७ सालचे निरनिराळ्या लोकांस मिळणारे मजुरीचे दर पाहतां असें दिसलें कीं, अमेरिकनांस मजुरी अडीच डालर मिळत होती, तर जपान्यांस सवादोन डालर मिळत होती, चिनीस दोन डालर पंधरा सेंट म्हणजे दोन पूर्णांक पंधरा शतांश डालर मिळत होती आणि हिंदुस्थानी लोकांस पावणेदोन डालर मिळत होती. या निरनिराळ्या लोकांच्या कामाची किंमत त्यांस मिळणाऱ्या वेतनाच्या प्रमाणांतच होती असें इमिग्रेशनचे कमिशनर डॉ० जेंक्स यांस माहिती देणारांकडून कळलें. म्हणजे मजूर या नात्यानें हिंदुस्थानी लोकांची किंमत अमेरिकन लोकांच्या पाऊणपट आहे. येथें हेंहि सांगितलें पाहिजे कीं, अमेरिकेस जाणारा वर्ग बऱ्याच मेहनती अशा पंजाबी लोकांचा असतो.

कलाकौशल्यांत मागसपणा आणि विद्वान् वर्गाचा अभाव हीं ज्या हिंदू वसाहतींचीं लक्षणें आहेत, आणि भांडवलाचें एकीकरण होऊन जींत खजनांचा अभिमान वाळगणारे मोठाले संघ बनले नाहींत, अशा हिंदूंची जगांत आर्थिक दृष्ट्या आणि सांस्कृतिक दृष्ट्या कांहींएक किंमत नाहीं.

जगामध्यें आपली पदवी अंत्यजाची आहे हें वाक्य लाला हरदयाळ यानें उच्चारून बऱ्याच भारतीयांच्या मनास दुखविलें, तथापि त्यांत सत्यांश बराच आहे. कांहीं संस्कृतचे प्रोफेसर, आपल्या समाजाविषयीं ग्रंथ वाचून लिहिणारे कांहीं ग्रंथकार आणि प्राचीन संस्कृतीचे संशोधक यांनीं थोडीबहुत आपली स्तुति केली म्हणजे आपण हुरळून जातों आणि जगांत आपणांस मोठी मान्यता आहे असें समजतों. तथापि परदेशीं गमन करणारांस आपल्या राष्ट्राचा उपमर्द वारंवार ऐकूं येतो. रूझवेल्ट म्हणतो, ज्या देशानें व्हिक्टर ह्यू गो आणि डान्टे यांसारखे लोक निर्माण केले तो देश, ज्या देशांत तीस कोट लोक आहेत आणि जे उंदरांसारखे 'फळतात', अशा देशापेक्षां कितीतरी पटीनें श्रेष्ठ आहे. पुष्कळ परकीय ग्रंथकार लिहितातः "हिंदुस्थानी मनुष्यांस स्वतःच्या अस्तित्वा-बद्दल गर्व वाटण्यास कोणती गोष्ट आहे म्हणाल तर ती ही कीं, दोन तीन हजार वर्षांपूर्वींच्या त्यांच्या पूर्वजांनीं साबणाच्या बुडबुड्यांप्रमाणें सुंदर दिसणारे विचार व्यक्त केले." परकीय देशांत आपल्याकडील लोक गेले तर कांहीं माणसें

आपल्या बुद्धिवैभवानें किंवा कर्तृत्वानें इतरांवर छाप पाडतात. तथापि एकंदरींत आपली इभ्रत फारशी मोठी नाहीं. निग्रोपेक्षां आपली जात जराशी वरची लेखितात हें खरें आहे. तथापि त्याच्यापलीकडे आपणांस लोकांनीं आदरानें वागवावें असें आपलें वर्तन नाहीं. ज्या चिनी मनुष्याविषयीं अमेरिकन लोकांत द्वेषबुद्धि वाटते त्याच चिनी लोकांनीं प्रामाणिकपणामुळें अमेरिकन लोकांच्या मनांत आदर उत्पन्न करविला. आपल्याविषयीं तसें विधान आपणांस करतां येत नाहीं. हिंदुस्थानी मजूर कामचुकार, दारूबाज, कज्जेखोर, कोर्टांत वारंवार जाणारा अशी यांनीं आपली ख्याती करून घेतली आहे. हार्वर्डचे प्रोफेसर अर्चिबाल्ड कूलिज अमेरिकेच्या राजनीतिविषयक प्रश्नाविषयीं विचार करतांना 'America as a world power' या ग्रंथांत लिहितातः "हिंदुस्थानी मजुरास बंदी करणें कठिण नाहीं; कां कीं, ब्रिटिश सरकारच त्यांस आपल्या वसाहतींत संचरूं देत नाहीं. पण चिनी व जपानी लोकांची गोष्ट तशी नाहीं. त्यांच्या पाठीमागें स्वाभिमानी साम्राज्यें आहेत." आपल्या पारतंत्र्यामुळें आपली किंमत बाहेर देशीं वरीच कमी होते हें यावरून उघड आहे.

आफ्रिकेंत गेलेल्या भारतीयांची काय स्थिति आहे याची कल्पना सामान्य जनतेस आज पुष्कळ आहे. नाताळ, ट्रान्सव्हाल, इत्यादि प्रदेशांत जो आपला तिरस्कार आणि छळ झाला त्यांचा इतिहास महात्मा गांधी यांच्या चरित्रावरून सर्वविश्रुत झालाच आहे. कोठेंहि जा, आपलें वास्तव्य तद्देशीयांस प्रिय नाहीं हें खरें. प्रिय नसण्याचीं कारणें अनेक आहेत. त्यांत हिंदुस्थानचें पारतंत्र्य हें एकटेंच महत्त्वाचें कारण असेल असें वाटत नाहीं. सीरियन्, आर्मेनियन, इत्यादि राष्ट्रें देखील परकीय अंमलाखालींच आहेत. तथापि हिंदूंचा परदेशांत जसा तिरस्कार होतो तसा त्यांचा होत नाहीं. जेथें हिंदुस्थानी लोकांची तद्देशीय किंवा यूरोपांतून तेथें वसाहतीसाठीं गेलेल्या लोकांशीं सर्धा होते तेथें मत्सरभाव आणि द्वेषभाव हीं उत्पन्न व्हावयाचींच. ज्यांच्यांशीं सर्धा होते त्या लोकांशीं सर्धा करणारांचें जितकें सादृश्य जास्त असेल किंवा त्यांच्याशीं स्पर्धा करणारांची आत्मीयता होणें जितकें शक्य असेल तितकी त्या दोघांमध्यें द्वेषबुद्धि कमी उत्पन्न होते असा सामान्य नियम आहे. सर्धामूलक द्वेष एका देशांतील जातीजातींतहि असतो हें आपण पहातोंच. अमेरिकेसारख्या देशांतहि तो आहेच. या सर्धेमुळें अमेरिकन लोकांचे ज्यू, आयरिश, पोल, इटालियन इत्यादि अनेक लोकांशीं वारंवार खटके उडतात आणि कधीं कधीं त्यामुळें खुनांचे प्रसंगहि उत्पन्न होतात. आयरिश आणि इटालियन हे ख्रिस्ती खरे, पण क्याथोलिक आहेत. त्यांची इतरांशीं लग्न करण्याची प्रवृत्ति सहज होत नाहीं आणि त्यामुळें त्यांच्याविषयीं जरा निराळेपणा अमेरिकन लोकांस भासतो. डच, डेन, स्वीड आणि जर्मन हे प्राटेस्टंट असल्यामुळें अमेरिकनांत सहज मिसळून जातात. रशियांतून अमेरिकेंत जे लोक जातात त्यांची कथा ज्यू वगैरे लोकांप्रमाणेंच असते. जितका एखादा बाह्य वर्ग अगर जात पचनीं पाडण्यास म्हणजे आपल्या समाजांत समाविष्ट करून घेण्यास कठिण तितका तद्देशस्थांत त्यांच्याविषयीं द्वेष अधिक, अशी वस्तुस्थिति आहे.

चिनी व हिंदी लोकांचें जें बहिर्गमन होतें त्यामुळें कांहीं सामान्य आणि कांहीं भेददर्शक गोष्टी नजरेस येतात. एक तर, सोंवळेंओंवळें, खाद्यपेय आणि विवाह या बाबतींत चिनी मनुष्य कमी बद्ध असल्यामुळें आणि मारामारीला आणि क्रौर्यासहि तो अधिक उद्युक्त असल्यामुळें परदेशांत भारतीयांचे जसे हाल होतात तसे चिनी लोकांचे होत नाहींत. शिवाय, नवीन गोष्टी शिकण्यास आणि मेहनत चापून करण्यास चिनी जितके समर्थ दिसतात तितके भारतीय दिसत नाहींत हेंहि कबूल केलें पाहिजे. चिनी लोकांच्या पाठीमागें त्यांचें स्वजातीय सरकार आहे तसें भारतीयांच्या पाठीमागें नाहीं, यामुळें विशेष फरक झाला आहे असें दिसत नाहीं. आजपर्यंत त्यांचें सरकार दुबळेंच आहे आणि त्यामुळें हक्कांच्या संरक्षणासाठीं झालेल्या प्रयत्नांस चिनी लोकांस सरकारची फारशी मदत मिळाली नाहीं असेंच दिसतें. तथापि चिनी लोकांत संघशक्ति दांडगी असल्यामुळें आणि त्यांच्यांत सामान्यतः शिक्षण अधिक असल्यामुळें व त्यांचा व्यवहारांतील प्रामाणिकपणा लोकांच्या नजरेस आल्यामुळें चिनी लोक हळू हळू स्वतःच्या हिंमतीवर किफायतीचा धंदा करणारे व्यापारी बनले आहेत. हिंदूंची गोष्ट तशी नाहीं. शिक्षणाचा अभाव, भांडवलाच्या बाबतींतील परतंत्रता आणि संघशक्तीचा अपरिपक्व विकास या सर्व गोष्टी हिंदूंत दिसून येतात, आणि त्यामुळें हिंदू अधिक असहाय दिसतात. लोकांची इभ्रत वाढविण्यास पाठीमागें सरकारचा जोर असेल तर कांहीं थोडाबहुत फायदा होईल, नाहीं असें नाहीं. तथापि खरा फायदा जो होतो तो स्वतःच्या उन्नतीकरितां स्वतःच केलेल्या प्रयत्नांनीं होतो. पैशाचें एकीकरण आणि काम करणाऱ्या लोकांस पैशाचें साहाय्य या दोन गोष्टी झाल्या म्हणजे लोक व्यापारी बनतात; आणि त्यांचें मजूरवर्गांतून डोकें वर निघतें. असो.

चिनी व हिंदू यांची तुलना करून चिनी लोकांचें परदेशगमनविषयक संख्यामहत्त्व वारंवार सांगण्यांत येतें. पुष्कळ यूरोपीय ग्रंथकार या फरकाची कारणमीमांसा करूं पाहतात आणि असें दाखवितात कीं, चीनच्या आसपास पुष्कळ बेटें आहेत तशीं हिंदुस्थानच्या आसपास नाहींत म्हणून चिनी लोकांचा इतरत्र प्रसार झाला. चिनी लोक चोहोंकडे इतके कां पसरतात यावर जितका विचार झाला आहे तितका हिंदू कां पसरतात याच्यावर झालेला नाहीं. तथापि चिनी लोक खरोखर हिंदूंपेक्षां अधिक पसरले आहेत

काय याचा विचार झाल्याचें दिसत नाहीं. आम्हांस चिनी लोकांचें बहिर्देशगमन हिंदूंच्या बहिर्देशगमनापेक्षां कमीच असावें असा दृढ संशय येतो आणि त्याचें निराकरण विरुद्ध बाजूचा भक्कम पुरावा आल्याखेरीज व्हावयाचें नाहीं. आमच्या गणतीनें चीनचें साम्राज्य आणि हाँगकाँगसारखे प्रदेश वगळतां बाहेरदेशीं गेलेल्या चिनी लोकांची संख्या अठरा लक्षांपेक्षां कमी आहे, तर बाहेरदेशीं गेलेल्या हिंदुस्थानी लोकांची संख्या एकवीस लाखांवर आहे. हिंदूंची गणती करतांना आम्ही नेपाळ, भूतान आणि पोर्तुगीज हिंदुस्थान हीं वगळलीं आहेत. चीनच्या एकंदर लोकसंख्येसंबंधानें ती पन्नास कोटींवर असावी अशा तऱ्हेचीं विधानें आजपर्यंत पुष्कळ झालीं आहेत. तीं विधानें सोडून आतां बरींच नियमित विधानें होऊं लागलीं आहेत. पंचवीस वर्षांपूर्वी जी लोकसंख्या पन्नास कोटी म्हणून समजली जात होती ती दहा वर्षांपूर्वी चाळीस कोट समजली जाऊं लागली आणि आजची गणती बत्तीस कोटींपेक्षां अधिक म्हणजे हिंदुस्थानच्या साम्राज्याच्या एकंदर लोकसंख्येइतकीच जवळ जवळ दिसते. चीनच्या एकंदर लोकसंख्येसंबंधानें जे अतिशयोक्तीचे विचार व्यक्त झाले आहेत, त्यांमध्येंच चिनी लोकांच्या बहिर्देशगमनाच्या बाहुल्यासंबंधाचे विचार जमा धरावयास हरकत नाहीं. चिनी लोकांच्या एकंदर परदेशगमनाचे आंकडे येणेंप्रमाणें:—

### चिनी लोक बाहेर देशांतून किती आहेत.

| | | |
|---|---|---|
| न्यु साउथ वेल्स | | ७५०० |
| व्हिक्टोरिया | | ९३७७ |
| क्वीन्सलँड | | ६७१४ |
| साउथ ऑस्ट्रेलिया | | २५५ |
| उत्तर ऑस्ट्रेलिया | | १०३३ |
| बोर्निओ | | २६००२ |
| कॅनडा | | २७७७४ |
| कोचीन चीन | | ७६००० |
| फिजी | | ३०५ |
| बिस्मार्क आर्चिपेलेगो | | १२०० |
| सामोअन बेटें | | २००० |
| हवाइ | | २२२५० |
| जमेका | | २१११ |
| जपान | | ११८६९ |
| कोरिया | | १८९७२ |
| मादागास्कर | | १००७ |
| मलाया स्ट्रेट्स सेटलमेन्ट्स | | ४२५६७९ |
| फेडरेटेड मलाय स्टेट्स | | ४३३२४४ |
| नॉनफेडरेटेड मलाय स्टेट्स | जोहोर | ६३४०५ |
| ,, ,, | केदा | ३३७४६ |
| ,, ,, | केदान्तन | ९८४४ |

### चिनी लोक बाहेर देशांतून किती आहेत.

| | |
|---|---|
| मारिशस | ३६८६ |
| पनामा | ३५०१ |
| पेरु | ५०००० |
| फिलिपाइन | ३५००० |
| पोर्टोरिको | २१ |
| रीयुनिआँ | ८८४ |
| रशिया | ८०००० |
| सारावाक | २६००३ |
| सयाम | २००००० |
| युनायटेडस्टेट्स् | ७१००० |
| एकूण | १६५०३७९ |
| हिंदुस्थान | ८१५६८ |
| एकूण | १७३१९४७ |

जगामध्यें संस्कृतींत कनिष्ठ समजल्याजाणाऱ्या आणि परिश्रमाची संवय नसलेल्या जातींचा संहार होत आहे. हिंदी महासागर आणि पासिफिक बेटें यांतील मूळचे रहिवासी आर्थिक चढाओढींत होत असलेला पराभव, आणि सिफिलिससारख्या रोगांचा प्रसार यांनां आणि पुष्कळ ठिकाणीं निरनिराळ्या साथींनां भराभर बळी पडत असल्यानें जगांतील बराचसा भाग उघडा पडणार आहे. हा भाग एशियांतील अधिक प्रगत आणि श्रमसहिष्णु लोकांच्या वसतीनें पुढेंमागें व्यापिला जाणार हें उघड आहे. यासंबंधांत आपल्यापुढें प्रश्न उत्पन्न होतो तो हा कीं, पृथ्वीवरील बराचसा भाग चिनी, मलायी लोकांनीं व्याप्त व्हावा कीं हिंदूंनीं व्याप्त व्हावा. उष्ण प्रदेशांत कायमची वसाहत करण्यास गोरे लोक असमर्थ आहेत. आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यास राष्ट्रांचें स्मशानगृह म्हटलें आहे. कां कीं, येथें प्राचीन कालापासून अनेक यूरोपीय राष्ट्रांच्या आणि जातींच्या वसाहती झाल्या आणि त्या सर्व आज केवळ स्मृतिमात्र उरल्या आहेत. गोऱ्या लोकांनीं देश्यांबरोबर लग्नें केल्याशिवाय त्यांचें उष्ण कटिबंधांत चिरस्थायित्व नाहीं. तेव्हां हा प्रदेश पुढेंमागें एशियांतीलच जातींपैकीं ज्या अधिक साहस, अधिक श्रमसहिष्णुता दाखवितील त्यांचा आहे हें उघड आहे. वसाहती करण्यास आपला सुशिक्षितवर्ग मोठमोठे भांडवलवाले सावकार बरोबर घेऊन बाहेर पडलेला नाहीं, यामुळें जमिनीच्या आजच्या स्वस्तपणाचा किंवा मोफतपणाचा फायदा भारतीयांस चांगला मिळत नाहीं. ज्या देशांत नागरिकत्वाचे हक्क भारतीयांस सहज मिळतील आणि जेथें त्यांचें कालांतरानें महत्त्व वाढेल असा प्रदेश म्हणजे पोर्तुगीज व स्पानिश भाषांनीं व्याप्त असलेला दक्षिण अमेरिकेचा भाग होय. तिकडे भारतीयांचा मोर्चा मुळींच वळलेला नाहीं. उत्तर अमेरिकेंत शीखांचें गमन अप्रिय झालें आणि दक्षिण अमेरिकेंत त्यांनीं जाण्याचा प्रयत्न

केला त्यावेळेस कांहीं तरी सबब काढून शीख लोकांस मज्जाव केला असें समजतें. तेथील अधिकाऱ्यांस हिंदू तेथें गेले तर हरकत नव्हती. पण त्यांस टोपी घालणारे हिंदू हवे होते, लांबलचक केंस राखून फेंटा घालणारे नको होते. तुमचें पारमार्थिक मत किंवा उपासना कांहींहि असो, बाह्य स्वरूपांत तरी तुम्ही आमच्यासारखे दिसा, असा ब्रेझिल येथील लोकांचा आग्रह होता. तथापि संप्रदायचिन्हाच्या तीव्र प्रेमामुळें शीखांस आपला वेणीसंभार काढून टाकणें अयोग्य वाटलें. येथें हेंहि सांगितलें पाहिजे कीं, दुसऱ्या एका क्षुद्र कारणासाठीं कांहीं शीख वेणीसंभार काढावयास तयार होतात. वेणी ठेवल्यानें वेश्यागमनास पुष्कळ अडथळा होतो म्हणून ते पुष्कळदां ही वेणी काढून टाकतात!! असो.

जगांतील पुष्कळसा भाग अजून व्याप्त व्हावयाचा आहे. तथापि बराच कालपर्यंत आतां परदेशगमन कठिण होईल असें वाटतें. कां कीं, हिंदुस्थानांतच मजुरीचे दर वाढत आहेत आणि मजुरांचा तुटवडा येथील वाढल्या कार्यक्षेत्रामुळें आतांच जाणवूं लागला आहे. परदेशगमनाच्या प्रश्नाचा खल व्हाइसरायांच्या कौन्सिलांत होत असतां नागपूरचे सर गंगाधरराव चिटनवीस यांनीं मजूर बाहेर देशीं करारानें पाठविण्याची पद्धति बंद करावी असें सुचवितांना ह्याच मुद्दा पुढें आणिला होता.

जे लोक परदेशांत जातात ते अंशेंकरून देशास पारखेच होतात. तथापि जेथें ते जातील तेथें जर त्यांचा पगडा बसावयास लागेल तर ते स्वदेशास जरी पारखे झाले तरी स्वसंस्कृतीला पारखे होणार नाहींत. त्यांची वस्ती कायम व्हावी आणि त्यांनीं स्वसंस्कृतीला चिकटून रहावें म्हणून ज्या अनेक गोष्टी अवश्य आहेत त्या महत्त्वाच्या गोष्टींपैकीं एक म्हटली म्हणजे स्वसंस्कृतिरक्षणार्थ म्हणून मुद्दाम हिंदुस्थानांतून तिकडे लोक गेले पाहिजेत. या बाबतींत आर्यसमाजाची देखील हालचाल कोठें फारशी दिसत नाहीं. तसेंच आपल्या लोकांस आहे त्यापेक्षां अधिक प्रतिष्ठित पद प्राप्त होण्यासाठीं कांहीं भांडवलवाले देखील गेले पाहिजेत. येथें जमीन महाग आहे तथापि परदेशीं ती अजून बरीच स्वस्त आहे. ती जमीन आज जर कोणी घेऊन ठेवील तर कालांतरानें त्याचीं मुलेंबाळें धनाढ्य बनतील. शिवाय स्त्रियांचें गमनहि अवश्य आहे. परदेशीं जाऊन वसाहत करण्याच्या कामीं स्त्रियांनीं धैर्य दाखविलें पाहिजे. जेथें नवरा जाईल तेथें बायकोनेंहि जावें. यांत फारसा धोका नाहीं. हिंदुस्थानांत स्त्रियांची मान्यता आपण जितकी मानतों त्यापेक्षां पाश्चात्त्य संस्कृतीचे लोक अधिक मानतात, यामुळें स्त्रियांनां सच्छीलानें वागण्यास मोठीशी अडचण होईल असें नाहीं. स्त्रियांनीं एकटें जाणें कदाचित् आज सुरक्षित नसेल; तथापि नवऱ्यावरोबर किंवा भावाबरोबर जाण्यांत मुळींच भीति नाहीं. विद्यार्थी जातात ते सपत्नीक गेले तर खर्च विशेष वाढेल असेंहि नाहीं. तेवढ्याच खर्चांत बायको काटकसरी व दक्ष असल्यास दोघांचाहि गुजारा होऊं शकेल.

स्त्रीपुरुषांचा परस्परसंबंध हा विषय नेहमींच महत्त्वाचा आहे आणि आपल्या परदेशास गेलेल्या बांधवांच्या बाबतींत तो अधिकच महत्त्वाचा आहे. भारतीय स्त्रियांचा आजचा जीवितक्रम असा नाहीं कीं, त्या पुरुषांच्या अनेक खटाटोपांमध्यें धैर्यानें सहकारिता करूं शकतील. स्त्रिया मोकळेपणानें हिंडण्यास येथें बऱ्याच अडचणी आहेत आणि परदेशीं जाणाऱ्या स्त्रियांची संख्या फारच थोडी आहे. इंग्लंडांतील विद्यार्थ्यांमध्यें पुरुषांची संख्या जवळ जवळ दोन हजार आहे. पण विद्यार्थिनी दहा वीस तरी निघतील किंवा नाहीं याची शंका आहे. विद्यार्थी सिव्हिलसर्व्हिसची परीक्षा पास झाल्याबरोबर त्यावर पाश टाकण्याच्या आशेनें, उजवावयाच्या मुलींस घेऊन एखादददुसरी बंगाली स्त्री लंडनला आलेली दृष्टीस पडते. अमेरिकेंत कांहीं मिशनमार्फत आलेल्या ख्रिस्ती विद्यार्थिनी दिसतात. तथापि विद्यार्थिनींचें परदेशीं अस्तित्व अपवादादाखल आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. उच्च वर्गांतील स्त्रियांचें व तरुण मुलींचें गमन इंग्लंडसारख्या देशांत शिक्षण आणि लग्न या दोन्ही हेतूंनीं होतें. हे दोन्ही हेतू चांगले आहेत. आपणांस पाहिजे आहे तें एवढेंच कीं, स्त्रियांच्या परदेशगमनाचा वेग आणि प्रमाण आहे त्यापेक्षां अधिक व्हावें. चांगल्या वर्गांतील स्त्रिया जाण्याचें महत्त्व मोठें आहे. कनिष्ठ किंवा मजूर वर्गांतील स्त्रियांच्या परदेशगमनामुळें हिंदी स्त्रियांविषयीं परकीय लोकांचें मत आज चांगलें नाहीं. चांगल्या वर्गांतील स्त्रिया जर परदेशीं जाऊं लागल्या तर हिंदू स्त्रियांविषयीं आदर वाढेल आणि आपणांस आपले आर्थिक आणि सामाजिक प्रश्न सोडविण्यास आणि विशेषतः आपल्या लोकांचा आपलेपणा राखण्यास मदत होईल. आपल्या देशांतून स्त्रिया बाहेरदेशीं स्वतंत्रपणें जात नाहींत, एवढेंच नव्हे तर आपल्या पुरुषांचें बाहेरदेशीं जें प्रयाण होतें तेंहि सस्त्रीक होत नाहीं. पुष्कळ तरुण सिंधी व्यापारी यामुळें समाजांतील वृद्ध गृहस्थांवर चिडतात. कित्येकांनीं तर आम्हांस असें सांगितलें आहे कीं, सिंधी वृद्ध गृहस्थ आपल्या मुलांस 'तुमच्या बायका आम्हीं पाठविणार नाहीं, तुम्हीं पाहिजे तर तेथें कांहीं गुपचिप व्यवहार करा', असें सांगतात. स्त्रियांच्या बहिर्देशगमनाच्या अभावामुळें जे अनेक अनिष्ट परिणाम होत आहेत त्यांतील कांहींचा निर्देश येथें करणें अवश्य आहे. हे परिणाम बरेच व्यापक आहेत. त्यांतील मुख्य येणेंप्रमाणें:—

(१) अनेक तरुण वाईट मार्गाला लागतात. इंग्लंडसारख्या देशांत ब्रह्मचारी जाऊन त्यांपैकीं ब्रह्मचारीच परत येणारा वर्ग निम्म्यापेक्षां कमीच भरेल. जे लोक वाईट मार्गास लागतात त्यांपैकीं कांहीं जणांनां उपदंशप्रमेहादि रोग जडतात आणि

ते पुढें हे रोग आपल्या पत्नींस देतात आणि आपल्या मध्यम वर्गांतील अनेकांचीं अपत्यें भाजून निघालेल्यासारखीं निघतात.

(२) जे लोक धंदा वगैरे शिकण्यासाठीं जातात त्यांपैकीं जे चांगले असतात अशा अनेकांस परत येण्याची घाई सुटते. आपणांस विद्या जर खरी संपादन करावयाची असेल तर तो धंदा किंवा त्याचा अभ्यास पांचसात वर्षें केल्याशिवाय ती संपादितां येणार नाहीं, म्हणजे त्या विषयांत श्रेष्ठता येणार नाहीं. देशांतील धंदे उच्च स्थितींत आणण्यासाठीं किंवा वरीच पुढची विद्या संपादन करण्यासाठीं विशिष्ट शाखेंत सात आठ वर्षें अभ्यास किंवा परिश्रम अवश्य आहे. बाहेर देशीं गेलेला तरुण दोन चार वर्षांत कांहीं प्राथमिक ज्ञान मिळवितो, तों त्यास विवाहित असल्यास वायकोस भेटण्याची आणि अविवाहित असल्यास लग्न करण्याची घाई सुटते आणि परत यावें लागतें. आमचे तरुण लोक तेथें सपत्नीक गेले किंवा अविवाहितांस पत्नी निवडण्यासाठीं तेथेंच भारतीय तरुण मुली असल्या तर त्यांस परत येण्याची अशी घाई सुटणार नाहीं. तेव्हां शैक्षणिक दृष्टीनें स्त्रियांचें परदेशगमन अवश्य होय.

(३) सस्त्रीक व्यक्तीस सड्या व्यक्तीपेक्षां समाजांत मान्यता अधिक असते. लोकांनां आपल्या घरीं जेवावयास बोलावण्यानें स्नेहसंबंध अधिक जुळतो, व ही गोष्ट सस्त्रीक व्यक्तीलाच साधते. सस्त्रीक लोकांविषयीं सहानुभूति अधिक असते. बाजारांत त्याची पत असते. हा कोणी उपटसुंभ मनुष्य नव्हे अशी लोकांची कल्पना होण्यास प्रमाण मिळतें; आणि याचा परिणाम सर्व व्यवहारांवर होतो.

(४) व्यापारउद्योग करणारा आपल्या उद्योगाला अनेक वर्षें चिकटून राहिला तरच त्या उद्योगाची वृद्धि होते. शांतपणें बसून फार फाजील घाई न करतां संस्थांचें, मग त्या व्यापारी असोत किंवा धर्मादायाच्या असोत, संवर्धन केलें पाहिजे. सस्त्रीक राहिलेला मनुष्य पंधरावीस वर्षें शांतपणें राहून व्यापाराची वृद्धि करूं शकतो. जमीनजुमला खरेदी करूं शकतो. ही गोष्ट आपल्या बायकांस हिंदुस्थानांतच ठेवून परदेशीं राहणाऱ्या लोकांस शक्य नाहीं.

परदेशीं आणि विशेषेंकरून यूरोपांत पुरुषांबरोबर स्त्रिया जाणें हें आपल्या राहणीच्या सुधारणेच्या दृष्टीनेंहि अत्यंत महत्वाचें आहे. आपल्या राहणींत सुधारणा होण्यास स्त्रियांस अधिक चांगल्या प्रकारची राहणी दिसली पाहिजे. घरच्या राहणीवर पुष्कळ गोष्टी अवलंबून असतात. पाश्चात्त्य तऱ्हेची रहाणी दिवसानुदिवस आपल्या घरांत, निरुपायानें म्हणा किंवा उपयोगाची वाटते म्हणून म्हणा, शिरत आहे. आपलीं घरें आणि शहरें अत्यंत गलिच्छ आहेत. पुणें शहरांत स्वच्छ घर मिळण्यास किती अडचण पडते हें प्रत्येक भाड्यानें रहाणाऱ्या पुणेंकरास ठाऊक आहे. समाजाच्या अपेक्षा उच्च झाल्याशिवाय सुधारणा होणार नाहीं. गृह सुधारणें म्हणजे अनेक गोष्टींत सुधारणा करणें होय. पाश्चात्य गृहिणीस घरांतील भिंतीस कागद कसा लावावा, घरांतील प्रत्येक सामान चक्क कसें ठेवावें, तें अधिक दिवस कसें टिकवावें, रफू कसा करावा, स्वयंपाक लौकर कसा करावा, वगैरे गोष्टी ठाऊक असतात. खराब झालेल्या टेवलखुर्च्यांस वारणीस कसें लावावें, स्टोव्ह किंवा भांडीं चकचकीत ठेवण्यास कोणती रासायनिक द्रव्यें वापरावीं, हें समजतें. व्यवहारांतील अनेक धंदे गृहव्यवस्थेचींच अंगें आहेत. खाणावळी, चहाचीं दुकानें, कपडे धुणें कपडे नीट करणें, बरेंचसें शिवणकाम, लोणचींमुरंबे करणें, फळें राखून ठेवणें, वसतिगृहें चालविणें, लहान मुलांकरतां नर्सरी म्हणजे जोपासनागृहें चालविणें, बुटांनां पालिश करणें, भाकऱ्या म्हणजे पाव करून विकणें, केक्स तयार करणें, हे सर्व धंदे जरी निराळे आहेत, तरी त्यांचें ज्ञान प्रत्येक पाश्चात्त्य गृहिणीस असावें लागतें. परदेशी डॉक्टरीचा किंवा वकिलीचा धंदा शिकण्यासाठीं गेलेल्या तरुणांस या गोष्टींत मन घालणें मुळींच शक्य नाहीं. तथापि स्त्रिया तेथें गेल्यास अशा अनेक उपयुक्त कला हिंदुस्थानांत सहज आणतील.

ज्या प्रदेशांत भारतीयांची वस्ती वरीच मोठी आहे अशा अनेक वसाहतींत स्त्रियांचें संख्येनें अल्पत्व असल्यानें जे अनेक परिणाम दृष्टीस पडतात त्यांपैकीं कांहीं येणेंप्रमाणें:— पहिला परिणाम म्हटला म्हणजे तेथील समाजामध्यें चार पांच पुरुषांनीं एका स्त्रीबरोबर रहावें अशा प्रकारची चालच पडल्यासारखी झाली आहे. दुसरा परिणाम म्हटला म्हणजे आपल्यापैकींच एकाची लग्नाची बायको त्याजपासून फित-विण्याचा इतर हिंदुस्थानी लोकांकडून अधिक जारीनें प्रयत्न होतो. तिसरा स्वाभाविक परंतु निरनिराळे इतर परिणाम करणारा परिणाम म्हटला म्हणजे स्त्रियांची वाढलेली किंमत हा होय. याचे परिणाम असे होतात कीं सर्वांत जास्त पैसे देणाऱ्या मनुष्यास तरुण मुलीचा विक्रय होतो; आणि अधिक पैसे देण्यास समर्थ आणि अधिक गरजू मनुष्य बहुधा उतारवयाचा असतो, त्यामुळें पुष्कळ मुली म्हाताऱ्यांच्या हातीं लागतात. म्हाताऱ्या नवऱ्याची तरुण बायको फितवणें हें काम सोपें असल्यानें सहजच फार चालतें आणि त्यामुळें पुढें बायकांचे खून होतात. पुष्कळदां बायका नवऱ्यास टाकून जातात किंवा चोरून व्यभिचार करितात. हिंदु बायका निग्रोबरोबरहि पळून जाण्यास कचरत नाहींत असें दाखविण्याऱ्या गोष्टी ब्रॅंक-हर्स्टनें पुढें आणल्या आहेत आणि चोरून झालेला पत्रव्यवहारहि मासल्याकरितां छापला आहे. बायको पळून जाणें हें दोन गोष्टींमुळें नुकसानीस कारण होतें. एकतर बायको जाते आणि दुसरें, ती जातांना आपले दागिने घेऊन जाते. हिंदु आपल्या जवळ असेल नसेल तें सर्व बायकोच्या अंगाखांद्यांवर घालतो, यामुळें हें दुसरें नुकसानहि पुष्कळच होतें. यांत आणखी एक घोंटाळा उत्पन्न करणारी गोष्ट म्हटली म्हणजे हिंदुपद्धतीनें लावलेलें लग्न वसाहतींत कायदेशीर

ठरत नाहीं. बरेच लोक या कायद्याविषयीं अज्ञान असतात, त्यामुळें किंवा बेफिकिरपणामुळें ते लग्नें नोंदून घेत नाहींत. डॉ. कोमिन्स याला ब्रिटिश गियाना येथील अधिकाऱ्यांनीं जो रिपोर्ट केला त्या रिपोर्टांत प्रस्तुत कायद्याच्या परिणामांचा उल्लेख करून असें दाखविलें आहे कीं, पुष्कळ हिंदू जोडपीं आपलें लग्न आपण ख्रिस्ती नसतां ख्रिस्ती चर्चमधून लावतात. मॅजिस्ट्रेटसमोर स्वस्त लग्न लावून न घेतां ख्रिस्ती देवळांत जाऊन लग्न लावून घेण्याचें कारण एखाद्या समारंभांत आपण केंद्रवर्ती व्हावें अशी हिंदू स्त्रियांची इच्छा असते असें दिलेलें आहे.

स्त्रीपुरुषांचा संबंध असमाधानकारक करण्यामध्यें वसाहतींतील कायद्यांचा दोष केवळ हिंदुपद्धतीचें लग्न मान्य न करणें एवढाच नाहीं. कायद्यांतील दुसरा दोष कुली स्त्रियांवर कोणी कुलीनें बलात्कार केला तर त्यास शिक्षा फारच अल्प होते हा आहे. कायद्यानें फक्त महिन्या दोन महिन्यांची शिक्षा ठेवली आहे. याचें कारण एवढेंच दिसतें कीं, कुलीस आणलें तें त्याजकडून काम घेण्यासाठीं; त्यास तुरुंगांत घातलें तर काम कमती होईल; त्याचा पुरता फायदा वसाहतीस मिळणार नाहीं; या प्रकारची व्यापारी दृष्टि कायदे बनवितांना ठेवली गेली.

स्त्रीपुरुषांच्या संबंधाच्या पवित्रतेस विघातक अशा वर ज्या गोष्टी सांगितल्या त्यांखेरीज आणखी एक विघातक गोष्ट म्हटली म्हणजे आपल्या देशांतून तिकडे वारवधूच पुष्कळ नेल्या ही होय. शंभर पुरुषांमागें चाळीस तरी स्त्रिया नेल्याच पाहिजेत, हा हिंदुस्थान सरकारचा कायदा असे; आणि परदेशांत जावयास चांगल्या बायका तर तयार होत ना. लग्न झालेले पुरुष सपत्नीक गेले तर शेंकडा चाळिसाचें प्रमाण भरण्यास मदत होईल. पण कुटुंबवत्सल माणसें फारशीं साहसास प्रवृत्त होत नाहींत. बहुतेक जाणारे लोक सडेच असावयाचे. अशा प्रसंगीं कायद्याचें कलम पाळून कुली नेण्यासाठीं बाजारांतील स्त्रियांकडे धांव घ्यावी लागली. अशा प्रकारच्या अनेक स्त्रिया तिकडे गेल्या म्हणजे वसाहतींतील लोकांची हिंदू स्त्रियांच्या नीतीसंबंधानें कल्पना चांगली कशी होणार? हिंदू स्त्रियांवर बलात्कार यूरोपियन मळेवाले करतात ही गोष्ट आपण अनेक प्रवाशांच्या वर्णनांतून ऐकतों आणि देशापुढें ही गोष्ट अनेकदां मांडली जाते. याप्रकारें वर्णन करणारांत अनेक प्रामाणिक लोक आहेत तेव्हां तें खोटेंहि नाहीं. तथापि हिंदू स्त्रियांच्या अब्रूविषयीं आदर कमी उत्पन्न होण्यास दुसरीं कांहीं महत्त्वाचीं कारणें आहेत ही गोष्ट मात्र आपण विसरतां कामा नये.

परदेशीं गेलेल्या भारतीयांनीं तेथें जाऊन स्थाइक व्हावें अगर परत यावें हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. स्थाइक व्हावयाचें झाल्यास आपल्या स्त्रिया तेथें बऱ्याच गेल्याशिवाय चालणार नाहीं. ज्या जातीचे पुरुष त्या जातीच्या स्त्रिया असल्या तर लग्नव्यवहार अधिक सुलभ व सुखावह होतो. तसेंच जर बऱ्याचशा स्त्रिया तेथें गेल्या नाहींत तर गेलेल्या मंडळीचें भारतीयत्व एका पिढींतच नाहींसें होईल. बरींचशीं माणसें प्रजोत्पत्तीशिवायच मरून जातील आणि कांहीं तेथेंच लग्न करितील. जर त्यांनीं तद्देशस्थ स्त्रियांशीं लग्नें केलीं तर मुलांचा हिंदुस्थानकडे ओढा कांहींच उरणार नाहीं आणि जीं माणसें परदेशास गेलीं तीं आपण गमावलीं असेंच होईल. कानडा आणि अमेरिकेचा पश्चिम भाग येथें हिंदुस्थानी पुरुषांची वस्ती बरीच आहे आणि भारतीय स्त्रिया फारच कमी आहेत एवढेंच नव्हे तर यूरोपीय वंशाच्या स्त्रिया देखील तेथें फार थोड्या आहेत. कां कीं पैसा मिळविण्याकरितां पुरुष दूर ठिकाणीं जातात आणि स्त्रिया मागें राहतात हें स्त्रीपुरुषांच्या संख्याविषमत्वाचें कारण तेथेंहि परिणाम करीत आहेच. जेव्हां पुरुष मात्र अन्यदेशीं जातात आणि त्यांच्या जातीच्या स्त्रिया तेथें जात नाहींत तेव्हां अशा पुरुषांची स्थिति बरीचशी पराधीन होते. कारण, या पुरुषांनां तद्देशस्थ कुमारींची अपेक्षा असणार आणि यासाठीं त्या समाजांत आपला प्रवेश व्हावा अशी इच्छा असणार; व उलट तद्देशस्थांस भारतीयांच्या समाजांत मिसळण्याची किंवा आपल्या समाजामध्यें भारतीयांचें स्वागत करण्याची मुळींच इच्छा नसावयाची. आपल्या तत्रत्य समाजांत स्त्रिया असल्या म्हणजे अशी स्थिति न राहतां दोन्ही समाजांमध्यें दळणवळण अधिक वाढेल. आपले जेथें पुरुषच आहेत आणि ते त्या देशांत असणाऱ्या स्त्रियांच्या प्राप्त्यर्थ तेथील तरुणांशीं स्पर्धा करीत आहेत, तेथें अशा स्थितींत आपल्या लोकांचीं लग्नें झाल्यास तीं तात्पुरता अनिष्ट परिणामहि घडवून आणतील; कारण, हिंदू हे यूरोपीयांशीं विवाहयोग्य आहेत किंवा नाहींत हाच प्रश्न सध्याच्या स्थितींत तेथें उपस्थित होणार; यूरोपीय हे हिंदूंशीं विवाहयोग्य आहेत किंवा नाहींत हा प्रश्न तेथें उपस्थित होणार नाहीं; आणि उत्पन्न झालेला प्रश्न यूरोपीय पुरुष आपल्या स्वतःच्या मताप्रमाणेंच सोडविणार. समाजाचें मत हें पुरुषाधीन असतें. स्त्रियांच्या आधीन नसतें. उभयसमाजांत परस्परविवाह बरोबरीच्या नात्यानें व्हावा ही कल्पना तेथील पुरुषांच्या मनांत आपल्या स्त्रियांचें तेथें अस्तित्व असल्याशिवाय उत्पन्न होणार नाहीं. यासाठीं आपल्या स्त्रिया परदेशीं असणें अवश्य आहे. शिवाय आपल्या स्त्रिया तेथें असल्यास आपल्या पुरुषांचें स्त्रीप्राप्त्यर्थ परावलंबित्वहि कमी होईल. हिंदु मनुष्य परकीय लोकांशीं लग्न करण्यास नाखूष असतो हें खरें, तथापि आपल्या जातीबाहेर लग्न करण्याची त्याची नाखुषी निग्रो स्त्रियांच्या बाबतींत कितीहि स्पष्टपणें दिसून आली तरी ती यूरोपीय स्त्रियांच्या संबंधानें तितकी दिसत नाहीं. १९०८ सालीं शोध केला होता त्यावेळेस पंजाबी पुरुषांनीं कानडांतील इंग्रज मुलींशीं केलेलीं लग्नें दहाबारांवर होतीं. असो.

हिंदुस्थानी स्त्रीपुरुषांचें अनेक ठिकाणीं असलेलें संख्याप्रमाण पुढें दिलेल्या कोष्टकावरून लक्षांत येईल.

## भरतखंडाबाहेरील भारतीय लोक, त्यांपैकीं भरतखंडांत जन्मलेले लोक व त्यांतील स्त्रियांचें पुरुषांशीं प्रमाण.

| स्थान | एकंदर भारतीय लोकसंख्या | | स्त्रियांचें पुरुषांशीं शेंकडा प्रमाण | हिंदुस्थानांत जन्मलेले लोक | | स्त्रियांचें पुरुषांशीं शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|
| | पुरुष | स्त्रिया | | पुरुष | स्त्रिया | |
| इंग्लंड व वेल्स | ३८३५ | १६८ | ४ | ३८३५ | १६८ | ४ |
| स्कॉटलंड | १४४ | ४ | ३ | १३८ | २ | १ |
| जिब्राल्टर | ५३ | ० | ० | ५३ | ० | ० |
| माल्टा | २३ | ० | ० | २३ | ० | ० |
| मालदिव | १६५ | ० | ० | १६५ | ० | ० |
| सिलोन | ३४०९४२ | २३९१३४ | ७० | २८४२४८ | १८९५८२ | ६७ |
| हॉंगकॉंग | २५८१ | ४६८ | १८ | २२६७ | १३० | ६ |
| स्ट्रेट्ससेटल्मेन्ट्स | ६२३३० | १९७२५ | ३१ | ५३२१० | १२७४७ | २४ |
| फेडरेटेड मलायास्टेट्स् | १२६३८८ | ३९६१० | ३१ | १२०१०४ | ३२६६० | २८ |
| ब्रिटिश संरक्षित इतर मलाया संस्थानें | ९१३६ | १९४० | २१ | ९१३६ | १९४० | २१ |
| अँग्लोइजिप्शिअन सुदान | २०० | ३५ | १७ | १९२ | २९ | १५ |
| युगांडा | १४४४ | २४३ | १७ | १४४४ | २४३ | १७ |
| नायगेरिया | ६ | ० | ० | ६ | ० | ० |
| न्यासालँड | ४३८ | ३६ | ८ | ४३८ | ३६ | ८ |
| बेचुआना लँड | ४१ | ४ | १० | ३४ | २ | ६ |
| केप ऑफ गुडहोप | ५५९० | १०१६ | १८ | ४५९१ | १९२ | ४ |
| नाताळ | ८०१६० | ५२८७१ | ६६ | ४९५५१ | २३३७० | ४७ |
| ट्रान्सवाल | ८०५० | १९९८ | २४ | ६२४० | ६१४ | १० |
| ऑरेंज फ्री स्टेट | ८६ | २० | २३ | ४४ | ४ | १० |
| बॅसूटोलँड | १२९ | ५ | ४ | १२९ | ५ | ४ |
| स्वाझीलँड | ७ | ० | ० | ६ | ० | ० |
| र्‍होडेशिया | ६९२ | ७९ | ११ | ६०८ | ३९ | ६ |
| सायरालिओन | २३ | ३ | १३ | २१ | ० | ० |
| सेशिलिस | ४३८ | ५१ | १२ | ३६२ | ३१ | ८ |
| मॉरिशस | १३९३१९ | ११८८९२ | ८५ | २३७५७ | ११५९२ | ४८ |
| झांझीबार | ८१२२ | | | ८१२२ | | |
| बहामा | २ | २ | १०० | २ | २ | १०० |
| ग्रेनाडा | २४३ | १६३ | ६७ | २४३ | १६३ | ६७ |
| ब्रिटिश हांडुरास | ६४ | ४० | ६२ | ६४ | ४० | ६२ |
| ट्रिनिडाड | | | | ३२७७७ | १७८०६ | ५४ |
| फॉकलंड बेटें | २ | १ | ५० | २ | १ | ५० |
| जमेका | ९९२८ | ७४५२ | ७५ | ५०३८ | २७५० | ५४ |
| सेन्ट व्हिन्सेन्ट | २०१ | १७५ | ८७ | ७१ | ४३ | ६० |
| ब्रिटिश गियाना | ७३०२७ | ५३४९० | ७३ | ५४७७० | ३३४३१ | ६१ |
| कानडा | २३४२ | | | २३४२ | | |
| डोमिनिका | ८ | ० | ० | ८ | ० | ० |
| बारबडोस | ३ | ५ | १३३ | २ | ३ | १५० |
| सेन्ट लुसिया | ११५२ | ९१२ | ७९ | ३७७ | २३५ | ६२ |
| ब्रिटिश नॉर्थ बोर्निओ | ८०५ | ९७ | १२ | ८०५ | ९७ | १२ |
| फिजिबेटें | २५८५५ | १४१२२ | ५४ | २०१८७ | ८७२१ | ४३ |
| न्यूझीलंड | १५ | ० | ० | १५ | ० | ० |

भारतीय पुरुषांचें अस्तित्व असून स्त्रियांचें अस्तित्वच नाहीं अशीं पुष्कळ ठिकाणें या कोष्टकांत दृष्टीस पडतात. जेथें एकंदर वस्ती फारच अल्प म्हणजे दहाच्या आसपास आहे अशा ठिकाणचे आंकडे सोडून देतां आपणांस असें म्हणतां येईल कीं मारिशस, सिलोन, नाताळ, आणि जमेका हीं स्थानें वगळून इतरत्र स्त्रियांची कमतरता फार आहे. कानडामध्यें स्त्रियांच्या आगमनास विघातक अशी वृत्ति तेथील सरकारानें ठेविली होती. यांत हेतु हा होता कीं अशा पेंचांत हिंदी लोकांस पाडून त्यांनां स्वदेशीं जाणें भाग पाडावें. या परिस्थितीचा परिणाम काय झाला हें लाहोरच्या कटाच्या खटल्यावरून स्पष्ट होणार आहे. या परिस्थितीनें उघड झालेल्या ब्रिटिश सरकारच्या कानडांतील दौर्बल्यामुळें हिंदुस्थानांतील अत्यन्त राजनिष्ठ लोकांस अराजनिष्ठ बनविणें हें बंड करण्याच्या कटाच्या उत्पादकांस शक्य झालें. गदरची चाललेली चळवळ ही एकच चळवळ कानडांतील शीख लोकांमध्यें नव्हती. गुरुद्वाराच्या चळवळी, धार्मिक स्वरूपाच्या आणि मनुष्याचें दुःख कमी करावें या हेतूनें चाललेल्या चळवळी वगैरे तेथें अनेक होत्या. परंतु या सामाजिक चळवळी करणारांचें आणि तुमचीं दुःखें ब्रिटिश सरकारच्या कानावर घालतों म्हणून चळवळ करणारांचें तेज चिडलेल्या लोकांत अर्थातच कमी पडलें. कनेडियन लोकांस हिंदुस्थानांत बंड झालें तर त्याची पर्वाच नव्हती. ते म्हणत बंड झालें तर आम्ही लढावयास दारूगोळा व पैसा पाठवून देऊं. पण या काळ्या अदमींचें वास्तव्य आम्हांस नको. दक्षिण आफ्रिकेमधील लोकांनीं बऱ्याच प्रसंगीं असल्याच प्रकारची वृत्ति प्रदर्शित केली होती. असो.

निरनिराळ्या वसाहतींमध्यें जे हिंदू गेले त्यांची कथा मनोरम करण्यासाठीं त्यांच्या वैभवाच्या, सौख्याच्या, किंवा ज्यांबद्दल आपणास अभिमान वाटेल अशा युद्धांच्या कथा देतां येत नाहींत. त्यांचें अस्तित्व आपल्या लोकांस सांगावयाचें म्हणजे तेथील कागाळ्याच वर्णन करावयाच्या. आपल्या देशांतच धर्मप्रचारक संस्था कोठें आहेत तर आपण स्वत्वाचें रक्षण करणारे प्रचारक तेथें पाठवूं? आपल्या देशांतच भांडवलाचें एकीकरण कोठें झालें आहे? हें एकीकरण होऊन आमचें भांडवल कर्तृत्वक्षेत्रासाठीं जगाच्या पृष्ठभागावर चोहोंकडे पाहूं लागलें तरच त्याचा आणि निरनिराळ्या हिंदुस्थानी वसाहतींचा संबंध उत्पन्न होईल. जगाच्या अनेक घडामोडींचें आणि रोज बदलणाऱ्या परिस्थितीचें आपणच अवलोकन कोठें करितों तर विदेशीं गेलेल्या स्वजनांस आपण जीवनार्थ कलहामध्यें धडपड करण्यासाठीं जागृत करूं शकूं? आपली आपल्या देशांतच अधिक प्रगति झाल्याशिवाय इतरत्र गेलेल्या स्वजनांचें दुःखनिवारण आपणांस अशक्य आहे. जगांतील सामान्य मनुष्य या नात्यानें प्रत्येकास जे हक्क अवश्य आहेत तेच आपणांस अजून मिळवावयाचे आहेत, तेव्हां आपल्या संस्कृतिप्रसाराची गोष्ट सहजच दूर आहे. प्राचीन काळचा आपला प्रसार आणि आजचा प्रसार यांतील महदंतर आतांपर्यंत झालेल्या विवेचनावरून स्पष्ट लक्षांत येईल. किरणांची अपेक्षा तेजोमय गोलकाशिवाय अशक्य आहे. जोंपर्यंत स्वदेशांतच आपण मोठमोठ्या योजना केल्या नाहींत तोंपर्यंत इतरत्र गेलेल्या आपल्या लोकांस आपण टेंकू तरी कसा देणार?

---

# प्रकरण १० वें.

## हिंदुस्थानचे बाह्यांवर सांस्कृतिक परिणाम.

आपल्या राष्ट्रानें प्राचीनकाळीं इतर राष्ट्रांवर परिणाम घडविला, त्याचें थोडक्यांत स्वरूप सांगावयाचें म्हणजे असें म्हणतां येईल कीं, बौद्ध संप्रदाय चोहोंकडे पसरून त्यानें पाली भाषेचा आणि उपनिषदांतील तत्त्वज्ञानाच्या एका विकृतीचा प्रसार केला. संप्रदायप्रवर्तनार्थ येथून अनेक लोकांची भिक्षू म्हणून चीन देशांत व तिबेट, सिलोन वगैरे ठिकाणीं जाण्याकडे प्रवृत्ति करून दिली. चित्रकला आणि मूर्तिकर्म हीं पूज्य म्हणून समजल्या जाणाऱ्या पुरुषांच्या आश्रयानें विकास पावत असतात, या नियमानुसार प्रत्येक देशांत यांचा प्रसार व्हावयास बुद्धाचा गौरव कारण झाला. बुद्धाच्या जातकांतून ज्या अनेक कथा आहेत त्या चित्रविषय आणि मूर्तिविषय झाल्या. कांहीं ठिकाणीं आपल्या धर्मशास्त्रांचा आणि त्यांच्या आश्रयानें संस्कृत भाषेचाहि प्रसार झाला. आपलें वैद्यक सिलोन व इतर पुष्कळ ठिकाणीं गेलें. वाङ्मयाचे अनेक प्रकार आपल्या देशांत जन्मास आले, त्यांचाहि परिणाम अनेक ठिकाणीं झाला. आपल्या देशांतील संस्कृतीच्या ज्या भागांस सर्व जगाच्या इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्व आहे ते भाग प्रमुखत्वानें म्हटले म्हणजे आपलें शास्त्रीय वाङ्मय, आणि आपला पारमार्थिक व तात्त्विक विचार हे होत. काव्यें, नाटकें, अलंकारशास्त्र यांचा परिणाम कांहींसा झाला आहे; पण तो तात्त्विक विचाराच्या परिणामाच्या मानानें फार अल्प आहे. या सांगितलेल्या परिणामांच्या दृष्टीनें पाहतां आपल्या विचारास आणि त्याच्या इतिहासास सार्वलौकिक महत्त्व आलें आहे. यासाठीं आपल्या विचारौघाचा क्रम आपणास चांगला समजला पाहिजे आणि म्हणून तद्विषयक वाङ्मयाचा आमच्याकडून चांगला अभ्यास झाला पाहिजे.

बौद्ध वाङ्मयानें पूर्वेकडे श्रद्धापूर्ण सेवक व अभ्यासक मिळविले. त्याचे परिणाम पश्चिमेकडे पूर्वेइतके झाले नाहींत, तरी मुळींच झाले नाहींत असें नाहीं. पश्चिमेकडे पारमार्थिक उपदेशाच्या बाबतींत भारतीय विचाराशीं सर्धा

करणारे कांहीं संप्रदाय होतेच. गौतमाच्या जन्माचा परिणाम त्या संप्रदायांचें अस्तित्व असूनहि झाला. पारशांच्या पवित्र ग्रंथांत गौतमाचा उल्लेख आला आहे. झरथुष्ट्राचा संप्रदाय एका कालीं पश्चिम एशियांत बराच शक्तिमान होता असें दिसतें. ग्रीकांवर जशी भारतीयांच्या कलाकौशल्याची, शौर्याची, आणि त्याप्रमाणेंच आचारश्रेष्ठतेची छाप पडली तशी कांहीं अंशीं पर्शूंच्या उपासनापद्धतीची छाप पडली. झरथुष्ट्राच्या संप्रदायग्रंथांचा शोध प्रथम यूरोपीय लोक करूं लागले तो त्यांत कांहीं अपूर्व ज्ञान सांपडेल या भावनेनें करूं लागले. झरथुष्ट्राच्या ज्ञानीपणाबद्दल तारीफ यूरोपांत प्राचीन कालापासून फार पसरली होती. यामुळें जेव्हां त्याचे ग्रंथ प्रत्यक्ष लोकांच्या समोर येऊन त्यांतील सामान्यपणा आणि अर्वाचीनांस बाष्कळ वाटणाऱ्या गोष्टी त्यांस दिसल्या तेव्हां हे ग्रंथ झरथुष्ट्राचे नव्हतच असें ते म्हणूं लागले. हा झरथुष्ट्राचा संप्रदाय स्थापन होण्यांत भारतीय संस्कृतीचा संपर्क कोठवर कारण झाला हें अजून नक्की समजलें नाहीं.

ख्रिस्ती संप्रदायाची मात्र तशी गोष्ट नाहीं. ख्रिस्ताविषयीं उत्पन्न झालेल्या आणि शुभवर्तमानांतून व्यक्त झालेल्या कथांचें सादृश्य बौद्ध कथांशीं बरेंच दिसून आलें आहे. तथापि त्या सादृश्यावरून ऐतिहासिक निर्णय काढण्याच्या बाबतींत बराच मतभेद आहे. ख्रिस्तानें आपला उपदेश बौद्ध ग्रंथांतून घेतला आणि ख्रिस्ताची गोष्ट बौद्ध ग्रंथांवरून सजविली असें म्हणणाऱ्या वर्गापासून बौद्ध ग्रंथांतील गोष्टीच नंतरच्या आणि ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार होऊं लागला असतां बौद्धांनीं सजविलेल्या आहेत असें म्हणणाऱ्या पक्षापर्यंत भिन्न भिन्न मतें व्यक्त झालीं आहेत. त्यांचें साग्र विवेचन पुढें येईल.

ख्रिस्ती संप्रदाय बाजूला ठेवला तरी शामनिझम् म्हणून सैबेरियांतील वन्य लोकांत तसेंच तार्तरीच्या कांहीं भागांत जी परमार्थसाधनाची रूढ पद्धति आहे ती बौद्ध संप्रदायांतून निघाली असें म्हणतात. शामन् म्हणजे श्रमण. त्यांचा संप्रदाय तो शामनिझम्. आज मात्र या संप्रदायांत भुतेंखेतें आणि तिबेटी मतें व सैबेरियांतील छाछू करणाऱ्या मूळ लोकांचीं कर्मे यांचें मिश्रण होऊन त्याला अगदींच निराळें स्वरूप प्राप्त झालें आहे. तसेंच, मध्य एशियामध्यें जो मणिसंप्रदाय स्थापन झाला व जो यूरोपांतहि थोडाबहुत पसरला होता, त्यांतहि ख्रिस्ती व झरथुष्ट्री यांजबरोबर बौद्ध मतांचें एकीकरण झालेलें होतें.

एवढें मात्र सांगितलें पाहिजे कीं, बौद्धसंप्रदायाचा तुरळक प्रसार आणि त्याचा इतर संप्रदायांवर परिणाम या दृष्टीनें मात्र भारतीय संस्कृतीचा पश्चिमेकडे परिणाम झाला. पूर्वेकडे मोठमोठीं राष्ट्रें व हजारों मैल प्रदेश ज्याप्रमाणें या आमच्या बौद्ध संप्रदायानें व्यापिला त्याप्रमाणें पश्चिमेकडे त्यास यश आलें नाहीं.

आमच्या वाङ्मयाचा प्रारंभ वेदांपासून होतो. बौद्धसंप्रदाय हा वैदिक परंपरेचीच एक विकृति आहे, हें सांगितलेंच आहे. हा संप्रदाय पूर्वेकडे गेला तसे वेद तिकडे गेले नाहींत. वेदांकडे लक्ष पाश्चात्यांचें वेधलें आणि वेदांचा श्रद्धापूर्वक अभ्यास करणारे पाश्चात्यांत निघाले. आज हिंदुस्थानांत कांहीं लोकांनीं वेदाक्षरें घोकलीं आहेत; कांहीं लोकांनीं संहिताच्या संहिता पाठ केल्या आहेत; तथापि वेदांचा सूक्ष्म अभ्यास यूरोप व अमेरिका येथेंच होतो.

या दृष्टीनें यूरोपीय पंडितांचा परिश्रम आपणांस उपयुक्त आहे. त्यांच्या परिश्रमाचा इतिहास थोडाबहुत मनोरंजक आहे. त्यांस परिश्रम करण्यास जी स्फूर्ति अगर प्रवृत्ति झाली तिचीं कारणें तीन चार आहेत. ख्रिस्ती संप्रदायाचें संवर्धन करण्यासाठीं ज्या लोकांत संप्रदायाचा प्रसार करावयाचा त्यांच्या मनावरील पूर्वसंस्काराची ओळख करून घेणें संप्रदायाच्या प्रवर्तकांस अवश्य वाटलें. त्यामुळें कांहीं भारतीय पांडित्याचा उगम झालेला आहे. रॉजर ब्रांक्सलेडेन आणि पौलिनो यांचे परिश्रम या वरील हेतूनेंच झालेले दिसतात. संस्कृत अभ्यासाकडे प्रवृत्ति होण्याचें दुसरें कारण शासनविषयक होय. हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य सुरू झालें आणि हिंदूंच्या शासनासाठीं त्यांच्या कायद्याचें ज्ञान मिळविणें आवश्यक झालें. वॉरन हेस्टिंग्जच्या प्रोत्साहनानें हालहेडचे आणि तदनंतर जोन्स आणि कोलब्रूक यांचे परिश्रम या चोदनेनेंच झाले. हिंदुस्थानांतील अनेक इंग्रज पंडितांच्या परिश्रमाच्या बुडाशीं हाच हेतु होता.

फ्रान्स आणि जर्मनी येथें जे परिश्रम झाले त्यांच्या मुळाशीं भिक्षुकी किंवा राजकीय भावना प्रामुख्यानें दिसत नाहीं तथापि त्यांचा पूर्ण अभावहि आरोपितां येत नाहीं. जर्मनींतील पांडित्य फ्रेंच पांडित्याचें परिणत स्वरूप होय. उच्च प्रकारचें पांडित्य बर्नाफनें जसें प्रथम दाखविलें तसें कोणाहि इंग्रजानें दाखविलें नाहीं. आंकेति दु पेरॉं या फ्रेंच पंडितानें इराणी संस्कृतीच्या अभ्यासास सुरुवात केली आणि तेव्हांपासून इराणी संस्कृतीवर जे महत्वाचे ग्रंथ पाश्चात्यांकडून तयार झाले त्यांत इंग्लंडांतील विद्वानांच्या परिश्रमाचें फारसें महत्त्व नाहीं. जोरदारपणाचें, चिकाटीचें आणि चिकित्सक बुद्धीचें अस्तित्व फ्रेंच, डच, आणि जर्मन ग्रंथांवरून जसें दिसून येतें तसें इंग्रजी ग्रंथांवरून दिसून येत नाहीं.

बेनफे, बर्नाफ, लासेन, रोठ, बोथलिंक, वेबर, व्हिटने (अमेरिकन), यांच्या तोडीचें नांव इंग्लंडांत नाहीं. मॅक्स मूलर हाहि मूळचा जर्मन. अलीकडे बराच प्रसिद्धीस आलेला इंग्लंडांतील प्रोफेसर माकडनेल हाहि आपली परिश्रमाची पद्धति जर्मनींत शिकून पुढें आलेला आहे, आणि याचे बरेचसे ग्रंथ भाषांतरवजा आहेत. इंग्लंडांतील लोकांनीं हिंदुस्थानांत आल्यानंतर सरकारी लठ्ठ पगार खाऊन जर कांहीं चांगलें काम केलें असेल तर तें हें कीं, त्यांनीं आर्किआलजी, न्युमिसम्याटिक्स आणि एपिग्रफी या विषयांत परिश्रम केले, म्हणजे प्राचीन अवशेष, नाणीं आणि शिलालेख यांच्या साहाय्यानें पुराणवस्तूंचें आणि वस्तूंवरून स्पष्ट होणाऱ्या प्राचीन स्थितीचें संशोधन केलें. या कार्यांत प्रिन्सेप आणि कनिंगह्याम यांस प्रामुख्याचें स्थान

दिलें पाहिजे. मानववंशशास्त्रासाठीं एथ्नाग्रफीच्या खात्यामध्यें जें इंग्रजांनीं काम केलें त्यांत अथलस्टन बेन्स, रिस्ले, आणि गेट यांचीं नांवें देतां येतील. तथापि यांच्या खातेशाहीमार्फत झालेल्या कामापूर्वीचें जें संशोधन झालें त्यांत विलसन् आणि स्टील यांचीं नांवें प्रमुख होत. यांच्या परिश्रमाचा उपयोग जुन्याशीं नव्याचा धागा जोडण्याकडे होतो. या मानववंशशास्त्रामध्यें जे सरकारी नोकर पंडित म्हणून चमकले त्यांस शास्त्रज्ञ म्हणण्यापेक्षां शास्त्रसाहित्योत्पादक म्हटल्यास शोभेल. या जातिवर्णनात्मक लेख लिहिणारामध्यें वर दिलेल्या नांवांखेरीज दुसरींहि किलेक नांवें देतां येतील पण त्यांत चांगले थोडके आणि गचाळ पुष्कळ. थरस्टन् यानें मद्रासेकडील जातींसंबंधानें जे सात भाग प्रसिद्ध केले आहेत त्यापेक्षां अधिक गचाळ काम सुशिक्षितास करतां येईल किंवा नाहीं याची शंका आहे. सध्याच्या जाती आणि जुनी परिस्थिति यांचे धागे जोडण्याची खटपट करणारा पाश्चात्य म्हटला म्हणजे गस्टाव्ह ऑपर्ट होय. याचा 'भारताचे मूळ लोक' यावर लिहिलेला ग्रंथ स्वैरकल्पनांस माहितीचें आणि पांडित्याचें नियंत्रण नसतां मनुष्य किती वहकतो याचें उत्तम उदाहरण आहे.

भाषाशास्त्राकडे लक्ष देणारे विद्वान् जे निपजले त्यांत प्राकृतावर पिशेल (जर्मन) आणि एकंदर सर्वावलोकनावर ग्रिअरसन आणि तौलनिक व्याकरणावर बीम्स हीं तीन नांवें महत्त्वाचीं आहेत.

हीं स्थूल माहिती झाली. विशेष माहिती प्रत्येक विषयावर लिहितांना येईल. अलीकडच्या अभ्यासकांच्या परिश्रमाचें विवेचन व त्यावर मत पुढें मधूनमधून द्यावें लागणार आहे, आणि यासाठीं असे अलीकडचे पंडित लेखक गाळून पूर्वीच्या लोकांची माहिती येथें देतों.

**अॅब्राहम रॉजर.**—(१६५१) हा पालिकट्टा (मद्रास) येथें उच्च पाद्री होता; पुरातन ब्राह्मणी वाङ्मयावर ह्यानें एक ग्रंथ लिहिला व भर्तृहरीचे कांहीं श्लोक पोर्तुगीजमध्यें प्रसिद्ध केले.

**जोहान अर्न्स्ट हॅंक्सलेडन.**—ह्या मलबार किनाऱ्यावरील जेसुइट पाद्रीनें पहिलें संस्कृत व्याकरण लिहिलें (१६९९). हा ग्रंथ छापला नाहीं.

**फ्रा पौलिनो.**—हा आस्ट्रियन मिशनरी होता; ह्यानें दोन संस्कृत व्याकरणें व अनेक ग्रंथ व प्रबंध लिहिले आहेत. "Systema Brahmanicum" (Rome) "Reise nach Ostindien" (Berlin) हे ग्रंथ यानें लिहिले.

**वॉरन हेस्टिंग्ज.**—ह्यानें हिंदू वाङ्मयाच्या अध्ययनाला चांगलें प्रोत्साहन दिलें; त्यानें पंडितांकडून हिंदू कायदेपुस्तकांवरून "विवादार्णवसेतु" (१७७३) हा ग्रंथ तयार करून घेतला; ह्याचें इंग्रजींत "A Code of Gentoo Law" (१७७६) म्हणून हालहेडकडून भाषांतर करून घेतलें. ह्यांबर्ग येथें ह्याचें जर्मन भाषांतर झालें (१७७८).

**चार्लस विल्किन्स.**—ह्यानें प्रथम काशीस पंडितांजवळ संस्कृतभाषेचें अध्ययन केलें; व संस्कृत पुस्तकांवरून इंग्रजी ग्रंथ लिहिले. यानें भगवद्गीता, हितोपदेश व शाकुंतल यांचीं भाषांतरें अनुक्रमें १७८५, १७८७ व १७९६ या वर्षीं प्रसिद्ध केलीं. त्याचें संस्कृत व्याकरण, पहिल्याप्रथमच युरोपमध्यें, त्यानें तयार केलेल्या संस्कृत टाइपमध्यें प्रसिद्ध झालें (१८०८). अंकित लेख शोधून त्यांचें अध्ययन व इंग्रजीमध्यें भाषांतर करणारांपैकीं पहिला हाच होय.

**विल्यम् जोन्स.**—हा पौरस्त्य भाषा जाणणारा चीफ जस्टिस (हिंदुस्थानांत) होता; हा चांगला संस्कृतज्ञ होता. ह्यानें बंगाल्यांत एशिआटिक सोसायटी स्थापिली (१७८४); शाकुंतल नाटकाचें इंग्रजींत भाषांतर केलें (१७८९); ह्या भाषांतरावरून फॉर्स्टरनें जर्मन भाषांतर केलें (१७९१); तें हर्डर, गटे वगैरे जर्मन विद्वानांनां फार आवडून, शाकुंतलाविषयीं व संस्कृत ग्रंथांविषयीं त्यांचा उत्तम ग्रह झाला. जोन्सनें ऋतुसंहाराची संस्कृत प्रत काढली (१७९२); हेंच पहिलें संस्कृत छापील पुस्तक. त्यानें "Institutes of Hindu Law" (१७९४) म्हणून मनूवरून पुस्तक केलें. ह्या पुस्तकाचें वीमर येथें जर्मन भाषांतर प्रसिद्ध झालें (१७९७). ग्रीक, लॅटिन व संस्कृत या तीनहि भाषा मूळ एकाच भाषेपासून निघाल्या असें जोन्स यानें प्रथमच स्पष्टपणें दाखवून दिलें व जर्मन, केल्टिक आणि पर्शियन यांच्याशीं संस्कृतचा कांहीं तरी अज्ञाच प्रकारचा संबंध असावा असेंहि अनुमान यानेंच प्रथम बांधलें. तसेंच त्यानें प्राचीन भारतीय व ग्रीक–रोमन पुराणकथांमधील साम्यहि लोकांच्या नजरेस आणलें.

**हेन्री थॉमस कोलब्रूक.**—हिंदु पुराणवस्तुशास्त्र व भाषाविज्ञान ह्यांचा हा खरा उत्पादक; हा कलकत्त्यास नोकरीवर होता. यानें "A Digest of Hindu Law on Contract and Successions" (करार आणि वारसा यासंबंधीं संक्षिप्त हिंदु कायदा), हा चार भागांचा कायद्याचा ग्रंथ हिंदु धर्मशास्त्रावरून तयार केला (१७९७-१७९८); ह्याचा वेदावरील निबंध प्रसिद्ध आहे (१८०५); ह्यांशिवाय त्यानें अमरकोश, कित्येक दुसरे शब्दकोश, हितोपदेश, किरातार्जुनीय वगैरे ग्रंथ छापून काढले; वेदांत, धर्मशास्त्र, व्याकरण, ज्योतिष, गणित वगैरेवर त्यानें बरेच निबंध लिहिले आहेत.

**अलेक्झँडर हॅमिल्टन.**—हाहि संस्कृतज्ञ होता; हा पॅरिसमध्यें असतांना (१८०२ ते १८०४) जर्मन कवि फ्रेडरिक श्लेजेल हा ह्याच्याजवळ संस्कृत शिकला; जर्मन लोकांनां ह्या काळीं शाकुंतलावरून संस्कृत वाङ्मयाची फार चटक लागली होती.

**फ्रेडरिक श्लेजेल.**—जर्मनींतील पहिला संस्कृत भाषाभिज्ञ पंडित; ह्यानें पॅरिस येथें संस्कृतचा अभ्यास केला "Uber die Sprache nnd Weisheit des Indier Ein Beitrag zur Begrundung der Altertumskunde" हें पुस्तक प्रसिद्ध केलें; ह्यांत रामायण, महाभारत, मनु इत्यादि ग्रंथांतील बऱ्याच उताऱ्यांचें भाषांतर होतें. ह्यानें बरीच जागृति केली. मूळ संस्कृतावरून प्रथमच हीं जर्मन भाषेंत भाषांतरें केलेलीं होतीं.

**ऑगस्ट विल्यम व्हॉन श्लेजेल.**—हा फ्रेडरिक श्लेजेलचा भाऊ. ह्यानें पॅरिस येथें शेझी (Chezy) नांवाच्या फ्रेंच संस्कृत प्रोफेसराजवळ संस्कृताचा अभ्यास केला (१८१४). हा जर्मनीचा पहिला संस्कृत प्रोफेसर. बॉन युनिव्हर्सिटीचा हा संस्कृत प्रोफेसर झाला (१८१८). 'हिंदी वाङ्मय' हें नियतकालिक यानें सुरू केलें. याच्या पहिल्या ग्रंथांत भारतीय भाषाशास्त्रावर निबंध होते. यानें त्याच वर्षी लॅटिन भाषांतरासह भगवद्गीतेची प्रत काढली (१८२३). तसाच यानें रामायणाचा पहिलें कांड प्रसिद्ध केलें (१८२९).

**ए. एल. शेझी.**—हा फ्रान्समधील पहिला संस्कृत प्रोफेसर; हा बऱ्याच भारतीय ग्रंथांचा प्रकाशक व भाषांतरकार होता.

**फ्रँझ् बॉप्.**—(Franz Bopp) हा श्लेजेलबरोबरच शेझीजवळ पॅरिस येथें संस्कृत शिकला (१८१२). यानें तुलनात्मक भाषाशास्त्रावर पहिलाच उत्तम ग्रंथ लिहिला (१८१६); यानें संस्कृत वाङ्मयाचा शोधकबुद्धीनें अभ्यास केला; रामायण महाभारतांतील कांहीं कथांचें यानें छंदोबद्ध भाषांतर मूळ संस्कृतवरून केलें; व नलदमयंती आणि इतर सुंदर कथांचीं लॅटिन अर्थासह टीकात्मक पुस्तकें लिहिलीं. यानें कांहीं संस्कृत व्याकरणें लिहिलीं (१८२७,१८३१, १८३४). तसाच यानें संस्कृत कोश "Glossarium Sanscritum" तयार केला (१८३०).

**विल्यम् व्हॉन हंबोल्ट.**—प्रख्यात भाषाभिज्ञ व मुत्सद्दी. यानें संस्कृताचें महत्त्व जाणून त्याचा अभ्यास सुरू केला (१८२१); भगवद्गीतेला तो फार चाहत असे. त्यानें ह्या गीतेवर बरेच प्रबंध लिहिले आहेत.

**फ्रेडरिक रुकर्ट.**—जर्मन कवि व उत्तम भाषांतरकर्ता; ह्यानें हिंदू आर्षकाव्यें व रसात्मककाव्यें ह्यांतील कांहींचे अत्युत्तम मासले जर्मनमध्यें आणिले आहेत.

**आंकेतिल द्यु पेरॉं.**—(Anquetil du Perron) ह्या फ्रेंच विद्वानानें फारसीमधून लॅटिनमध्यें उपनिषदांचें भाषांतर १९ व्या शतकाच्या आरंभीं केलेलें आहे.

**फ्रेडरिक् रोझेन.**—यानें कलकत्त्यास ऋग्वेदाचें पहिलें अष्टक प्रसिद्ध केलें (१८३८). त्यापूर्वी राजा राममोहन राय यांनीं १८१६-१९ त इंग्रजीमध्यें उपनिषदांचें भाषांतर केलें होतें.

**यूजेन बर्नाफ्.**—फ्रेंच पौरस्त्यभाषाभिज्ञ, ह्यानें यूरोपमध्यें पहिल्यानेंच वेद शिकविण्यास आरंभ केला (१८४०). त्याचप्रमाणें ह्यानें पालीच्या अध्ययनाचा प्रथम पाया घातला व बुद्धवाङ्मयाच्या अभ्यासास सुरवात केली. यानें बरेच शिष्य तयार केले (१८२६).

**रुडोल्फ रोठ.**—बर्नाफ्चा शिष्य. ह्यानें जर्मनींत वेदाभ्यासाचा पाया घातला व वेदावर एक चांगला ग्रंथ लिहिला.

**मॅक्स मुल्लर.**—बर्नाफ्चा शिष्य व चांगला संस्कृतज्ञ. यानें सायनाचार्यांच्या भाष्यासह ऋग्वेदमंत्रांचा ग्रंथ प्रसिद्ध केला (१८४९–१८७५). ह्या ग्रंथाचा वाङ्मय-शोधनाच्या कामीं फार उपयोग झाला.

**थिओडोर ऑफ्रेच्.**—ह्यानें संपूर्ण ऋग्वेदमंत्रांचा एक आटपसर ग्रंथ काढला (१८६१–६३) व उपलब्ध असलेल्या संस्कृत ग्रंथांची व लेखकांची एक सूची तीन वेळां (१८९१, १८९६,१९०३) तयार केली.

**ख्रिश्चन् लासेन.**—विल्यम श्लेजेलचा शिष्य. ह्यानें त्याच्या वेळीं उपलब्ध असलेली हिंदुस्थानाबद्दलची संपूर्ण माहिती गोळा करून ती चार खंडांत प्रसिद्ध केली (१८४३–६२). "Sanskrit Worterbuch" हा संस्कृत कोश ओटो बोटलिंग (Otto Bohtlingk) व रुडोल्फ रोठ ह्यांनीं सात खंडांत प्रसिद्ध केला (१८५२–७५). ह्या अवाढव्य कामाला बरींच वर्षे लागलीं पण ह्यापासून फार फायदा झाला.

**आल्बर्ट वेबर.**—ह्यानें हिंदु वाङ्मयाचा संपूर्ण इतिहास लिहिला (१८५२). हिंदु वाङ्मयाच्या निरनिराळ्या भागांत येथपर्यंत केलेल्या संशोधनाचें एकीकरण "Outlines of Indo-Âryan Philology and Ârchaeology" ह्या जर्मन ग्रंथांत, बुल्हर व मागाहून किलहॉर्न ह्यांच्या नेतृत्वाखालीं केलें गेलें (१८९७). "पाली टेक्स्ट सोसायटी" ह्या नांवाची संस्था टी. डब्ल्यू. डेव्हिड्सनें स्थापिली (१८८२). ह्यानें बौद्ध-वाङ्मयाच्या संशोधनाच्या कामीं बरीच मदत झाली. अल्बर्ट वेबरनें जैन लोकांच्या पवित्र ग्रंथांवर एक मोठा प्रबंध लिहून वाङ्मयाची एक नवी दिशा दाखविली (१८८३–८५).

या कालानंतर भारतीय विद्येचे संशोधक पुष्कळ वाढले आणि भारतीय वाङ्मय पुष्कळ बाहेर पडूं लागलें. सर्व देशांत भारतीय विषयांचा संशोधक वर्ग वाढला. आज पंडितवर्गाच्या सुमारें ४० संस्था भारतीय विषयांचा अभ्यास करीत आहेत.

वेदांच्या आणि संस्कृत भाषेच्या अभ्यासानें यूरोपीयांचा त्यांच्या पूर्वजांशीं अधिक परिचय करून दिला असेल तथापि पाश्चात्यांच्या या अभ्यासानें आपलाहि कांहीं प्रत्यक्ष फायदा करून दिला आहे, आणि तो म्हटला म्हणजे आपल्या खालावलेल्या आजच्या स्थितींत आपणांस यूरोपीय आणि अमेरिकन लोकांनीं आपलें म्हणावें या गोष्टीला त्यानें साहाय्य केलें आहे. भारतीय आज वर्णानें काळा असला तरी अमेरिकेंत त्याची गणना कायद्यानें गोऱ्यांत होते आणि त्यास नागरिकत्वाचे हक्क प्राप्त होतात. हा परिणाम बऱ्याच अंशीं वेदांचा आणि वैदिक धर्माचाच होय. वेदमूलक धर्मानीं निरनिराळे भारतीय इतके जखडले गेले आहेत कीं, पूर्वींच्या आर्यन् लोकांचे वंशज कोणते आणि दस्यूंचे वंशज कोणते यांची निवड हिंदुस्थानांत जातिभेद राहूनहि करतां येईनाशी झाली आहे.

फक्त वेदांकडेच पाश्चात्यांची दृष्टि वळली असें नाहीं तर वेदांताकडे देखील वळली. आपल्या या बाबतींत झालेल्या

विचारांचा पाश्चात्यांवर परिणाम होत आहे. आजच्या आधिभौतिक शोधांच्या आड पाश्चात्यांच्या पारमार्थिक ग्रंथांचीं किती जरी वचनें आलीं आणि त्यांचीं पारमार्थिक मतें व त्यांच्या पारमार्थिक ग्रंथांनीं व्यक्त केलेला विचार यांचा आणि अर्वाचीन शास्त्रज्ञांच्या शोधांचा कितीहि विरोध आला, तरी त्यांचा वेदांताच्या तत्त्वांशीं फारसा विरोध येत नाहीं, आणि याप्रमाणें शास्त्रज्ञांस देखील मान्य असें तत्त्वज्ञान आपणांकडे आहे म्हणून आपल्याकडे अर्वाचीन तत्त्ववेत्त्यांचें थोडेंबहुत लक्ष आहे, व आपल्या वेदान्ती मतांच्या प्रवर्तक संस्था कांहीं प्रत्यक्ष आणि कांहीं प्रच्छन्न रूपानें पाश्चात्यांत आढळत आहेत. असो.

यूरोपांत बौद्ध ग्रंथांचा प्रसार केवळ पांडित्याचा एक भाग म्हणूनच होत नाहीं तर श्रद्धास्पद पारमार्थिक ग्रंथ म्हणूनहि होतो. आज यूरोपांत आणि अमेरिकेंत मिळून वीस हजारांवर लोक आपणांस बुद्धानुयायी म्हणवितात. लंडन येथें 'बुद्धिस्ट सोसायटी' बौद्ध संप्रदायाचा प्रसार करण्यासाठीं स्थापन झाली आहे. प्रो० ऱ्हीस डेव्हिड्स हे तिचे अध्वर्यू होते. बौद्ध संप्रदायाचा प्रसार यूरोपांत झाला तो जराशा विलक्षण परिस्थितींत झाला. ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं आपल्या संप्रदायाचा प्रसार बौद्ध देशांत करणें सुलभ व्हावें म्हणून बौद्ध ग्रंथांच्या अभ्यासास सुरुवात केली आणि याच हेतूनें त्यांनीं बौद्ध ग्रंथांचीं भाषांतरें यूरोपांतील भाषांत केलीं. पण त्या भाषांतरांचा परिणाम उलटा झाला. बौद्ध संप्रदायास पाश्चात्यांमध्यें अनुयायी मिळाले.

भारतीय संस्कृतीचा इतरत्र जो प्रसार झाला आणि येथील वाङ्मयाचा जो इतरत्र परिणाम झाला तो आपल्या लोकांचे थवेच्या थवे किंवा मोठ्या फौजा त्या त्या ठिकाणीं जाऊन झाला असें नाहीं, तर केवळ ग्रंथांमार्फत व प्रसंगीं कांहीं धर्मप्रचारक वगैरे जाऊन झाला असें दिसतें. कांबोजमध्यें जी मोठी लोकवस्ती हिंदु आहे ती व बलीबेटांतील लोकवस्ती ही देखील, आपल्याकडील लोकांच्या मोठ्या वसाहती तेथें होऊन उत्पन्न झाली, असें त्या तऱ्हेचा बळकट पुरावा आल्याखेरीज म्हणतां येणार नाहीं.

आपला परिणाम इतर लोकांवर होतो तो आपल्या लोकांशीं संपर्क अधिक झाल्यानें व्हावयाचा; तथापि जे अनेक लक्ष हिंदू विदेशीं गेले आहेत त्यांची बौद्धिक छाप तेथें पडली नाहीं. यास मुख्य कारण म्हटलें म्हणजे त्यांच्याबरोबर आपला सुशिक्षित वर्ग गेला नाहीं हें होय.

---

## प्रकरण ११ वें.

### बाह्यांचा हिंदुस्थानावर परिणाम.

आतांपर्यंत जें विवेचन झालें तें ज्या आपल्या संस्कृतीच्या प्रसारानें आपल्या समाजाची वृद्धि होईल किंवा इतर समाज आपणाशीं सदृश होण्यास मदत होईल त्या संस्कृतीचा प्रसार किती जनतेवर झाला हें शोधण्यासाठीं झालें. आतां इतर लोकांच्या संस्कृतीचा परिणाम आपणांवर काय झाला आणि होत आहे याच्याविषयीं माहिती दिली पाहिजे. इतर लोकांचे आपल्यावर जे परिणाम होतात त्यांत खालील गोष्टी ठळकपणें लक्षांत येतात.

(१) ज्या परकीय संप्रदायांच्या योगानें आपल्या समाजांतील व्यक्ती इतर समाजांत जाऊन मिळतात अशा संप्रदायांचा प्रसार म्हणजे आपल्या लोकांनीं ख्रिस्ती किंवा मुसुलमान होणें.

(२) इतर जातींच्या संनिकर्षामुळें आणि विचारप्रवर्तनामुळें आपल्या आचारांत तफावत पडणें.

(३) आर्थिक स्पर्धेचा आपल्या समाजावर परिणाम होणें.

परक्यांच्या आपणांवर होणाऱ्या पहिल्या प्रकारच्या परिणामाचा आजपर्यंतचा हिशोब आंकड्यांनीं व्यक्त केलाच आहे. जे मूळचे आपल्यांतील होते पण जे आज हिंदु समाजाच्या बाहेर आहेत अशा लोकांचें हिंदूंशीं प्रमाण शेंकडा तीस आहे. यावरून परकीयांच्या आपल्यावरील परिणामाचा हा प्रकार किती चिंताजनक स्वरूपाचा झाला आहे हें लक्षांत येईल. असो.

**परकीय उपयोगी वस्तूंचा हिंदुस्थानांत प्रवेश.**- परकीय राष्ट्रांचा हिंदुस्थानाशीं जो व्यापारी संबंध आहे त्याजकडे आतां वळूं. या संबंधाचे परिणामहि महत्त्वाचे झालेले आहेत. व्यापारी जिनसांपैकीं अनेक जिनसा परदेशाहून आपल्या देशांत सतत येत आहेत. ज्या केवळ वापरल्याच जात आहेत असें नाहीं तर ज्यांचें उत्पादनहि आपल्याकडे चालू झालें आहे अशा केवळ अमेरिकेहून पोर्तुगीज लोकांमार्फत आपल्याकडे कितीतरी गोष्टी आल्या. तंबाखू, बटाटे, मका, रताळीं, भुइमूग हे पदार्थ आपल्या देशांत इतके सजले आहेत कीं, ते परकी आहेत असें कोणासहि वाटत नाहीं. बाहेर देशांतून अनेक गोष्टी विक्रयासाठीं हिंदुस्थानांत येत असत या संबंधांत असा क्रम दिसून येईल कीं, नवीन गोष्टी प्रथम परदेशांतून येतात आणि नंतर त्यांचें उत्पादन येथें होऊं लागतें आणि याप्रमाणें येथील व्यवहार आणि प्रयत्न अधिक व्यापक करण्यास त्या कारणीभूत होतात.

**समाजांत परकीय रक्ताचा प्रवेश.**—आपल्या रक्ताच्या शुद्धतेविषयीं तीव्र अभिमान बाळगणाऱ्या हिंदूंनीं

हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, परक्या देशांतून सुरेख स्त्रिया खरेदी करून आणून आपल्याकडे दासी म्हणून ठेवण्याच्या परिपाठास भारतीयांनीं उत्तेजन दिलें.* ही गोष्ट बाहेरचा पुरावा भरभक्कम असल्यामुळें हिंदुस्थानांतील ग्रंथकारांनीं लक्षिली नसली तरी बाहेर पडणारच. आपल्या ग्रंथांत पूर्णपणें आपल्या ग्रंथकारांस ही गोष्ट लपवितां आली नाहीं हें संस्कृत नाटकांतील राजासन्निध असलेल्या यवनींवरून दिसून येतें. हिंदुस्थानांतील कच्चा माल तसाच कलाकौशल्याचा माल बाहेरदेशीं विक्रयास जाई, आणि हिंदुस्थानांत उलट विकावयास ज्या कित्येक गोष्टी येत असत त्यांत परदेशच्या स्त्रिया येथें आणून विकावयाचाहि परिपाठ असे. बाहेर देशांचा किंवा राष्ट्रांचा आपल्यावर जो परिणाम झाला तो केवळ सांस्कृतिक आणि राजकीय विकृतींसच कारण झाला नसून या परकीय स्त्रियांच्या द्वारा जातिविकृतीसहि कारण झाला हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

**परकीय लोकांची राजकीय सत्ता.**—हिंदुस्थानाचा जगाशीं व्यापारी संबंध आज दोन हजारांहून अधिक वर्षे आहे. राजकीय संबंध देखील असाच जुना असून अनेक प्रकारचा आहे. ब्रह्मदेशावर चीननें अनेक स्वाऱ्या केल्या आणि नेपाळ, भूतान आणि सिक्कीम या संस्थानांस देखील चीनचें मांडलिकपण स्वीकारावें लागलें होतें. जवळच्या पश्चिमेच्या राष्ट्रांपैकीं अनेक जातींनीं येथें राज्य केलें. इराणचा डरायस हिस्टास्पिस यानें हिंदुस्थानाचा बराच भाग काबीज केला होता. ग्रीक, शक, पल्हव आणि हूण या नजीकच्या लोकांनीं येथें स्वाऱ्या करून मुलुखहि पादाक्रांत केला होता. अरबांनीं आठव्या शतकांत कांहीं दिवस या देशांत राज्य केलें आणि मुसुलमानांच्या अनेक जाती, वंश आणि राष्ट्रें या देशांत जागजागीं राज्य करीत होतीं. आफ्रिकेंतील हबशी लोकांचें एक संस्थान जंजिऱ्यास आहे. याशिवाय अर्वाचीन यूरोपीय लोकांपैकीं डच, पोर्तुगीज आणि फ्रेंच या निरनिराळ्या राष्ट्रांनीं येथें कांहीं मुलुख काबीज केला आहे. इंग्रजांनीं तर जवळ जवळ सर्वच देश घेतला आहे. हा परकीय राष्ट्रांचा हिंदुस्थानाशीं घडलेल्या संबंधाचा राजकीय परिणाम होय.

सध्यां आपले राज्यकर्ते साता समुद्रांपलीकडचे आहेत. राजा सहजच देशांतील अनेक गोष्टींवर परिणाम घडवूं शकतो. आज आपल्यावर प्रत्येक बाबतींत पाश्चात्य परिणाम दिसत असल्यामुळें त्या परिणामांचा हिशोब देखील देतां येत नाहीं. शक, यवन, पल्हव, हूण इत्यादि अनेक परकी राष्ट्रांनीं या देशाचा कांहीं भाग काबीज केला होता, तथापि त्यांचा सांस्कृतिक परिणाम आपल्यावर काय झाला हें आज खात्रीनें सांगवत नाहीं. वास्तुसौंदर्यशास्त्रांत आपण अनेक गोष्टी परकीयांपासून घेतल्या असें विधान कांहीं संशोधक करितात. कांहीं तें नाकबूल करतात.

**परकीय शिल्पकलेचें अनुकरण.**—आपल्या देशांत मूर्ती अनेक प्रकारच्या. कारण देशच मूर्तिपूजक. तेव्हां देशांत मूर्तींची कला वाढली तर त्यांत नवल नाहीं. पण या बाबतींत देखील पाश्चात्य लेखक असें म्हणतात कीं आपण परकीय लोकांचें बरेचसें घेतलें. मूर्तिकर्म बौद्धांनीं देशांत सुरू केलें. तेव्हां बौद्धांच्या कलेचा एक अभ्यासक* आपल्या एतद्विषयक ग्रंथांत काय म्हणतो हें आपण पाहूं.

* Periplus of the Aerithrian Sea. Indian Antiquary Vol. VIII मधील लेखांत प्राचीन काळीं हिंदुस्थानांतून निर्गत होणाऱ्या व बाहेरून येथें येणाऱ्या मालाची यादी खालीलप्रमाणें दिली आहे:—

**निर्गत माल.**—(१) गुलाम बायका. (२) तूप. (३) चिनी कातडीं (केंस असलेलीं). (४) हस्तिदंत. (५) शिंगें. (६) लाख. (७) रेशमी दोरा. (८) गुग्गुळ. (९) तेंदू (एबोनी). (१०) तिळाचें तेल. (११) नीळ. (१२) डिकेमाली. (१३) कापूस. (१४) साखर. (१५) दालचिनी. (१६) जटामांसी अ० नलद. (१७) कुष्ठ अथवा पुष्करमूल. (१८) रुझट (Ruzot). (१९) कुटज अथवा करचाला. (२०) मलमल. (२१) तांदूळ. (२२) मिरीं. (२३) चंदन. (२४) लोखंड, पोलादी तरवारी. (२५) माणीक (Carbuncles). (२६) हिरे. (२७) गोमेद (Onyx). (२८) चिनी मातीसारख्या मातीचीं भांडीं. (२९) नीलमणि. (३०) हिआसिंथ (Hyacinth). (३१) खांद्यावरून घालण्याचे पट्टे व कमरपट्टे.

**आयात माल.**—(१) सुरेख मुली (बरगुझा म्हणजे भडोच येथें आणीत). (२) गुलाम (बरगुझा म्हणजे भडोच येथें आणीत). (३) चिनी कापूस. (४) प्रवाळ. (५) मोतीं. (६) शुक्ति (शिंपले). (७) कांसवाची पाठ. (८) श्रीवास. (९) विड्याचीं पानें. (१०) Melilot, Honey lotus. (११) बोळ. (१२) नारिकेळ (नारळ). (१३) मलमल. (१४) दारू. (१५) कचीं द्राक्षें. (१६) Sandarake (चंद्रस धूप). (१७) शिलारस. (१८) खारका. (१९) चांदीचीं भांडीं. (२०) सोमल. (२१) रोमन नाणें दिनारी किं. ८½ पेन्स (याची भडोच येथील नाण्यांशीं अदलाबदल होत असे.) (२२) कथील. (२३) शिसें. (२४) पितळ—याचा नाण्याकडेहि उपयोग होत असे. (२५) सुर्मा. (२६) तांबें व तांब्याचीं भांडीं. (२७) सोनें. (२८) कल्याण नांवाचा खडा. (२९) संगमरवरी दगड. (३०) चिनी मातीसारखी माती. (३१) कांच. (३२) पुष्पराग. (३३) निरनिराळ्या तऱ्हेचे पुरुषांचे व बायकांचे कपडे. (३४) फुलें काढलेले अगर कांठाचे कमरपट्टे. (३५) फुलें काढलेले कपडे. (३६) मूर्ति इत्यादि कारागिरीचे पदार्थ. (३७) वाद्यें.

* "Buddhist Art in India" by A. Grunwedel Translated by Gibson, revised by J. Burgess. 1901.

परकीय कलेचा भारतीय कलेमध्यें प्रवेश या विषयावर प्रकाश पाडण्यासाठीं हा ग्रंथकार लिहितोः—यूरोपांत भारतीय सुधारणेचा इतिहास चांगला ज्ञात झाल्यापासून, भारतीय कलेच्या प्राचीनत्वाविषयीं पाश्चात्य लोकांत असलेल्या पूर्वकल्पना अतिशयोक्तीच्या आहेत असें आढळून आलें. वास्तविक पाहतां, मूर्तिशिल्पविषयक सर्व प्राच्य कल्पनांत भारतीय कल्पना अतिशय अर्वाचीन आहे. कारण भारतांत कोणतेंहि महत्त्वाचें सारकचिन्ह इ. स. पूर्वी ३ ऱ्या शतकाच्या मागचें आढळत नाहीं. या कलेच्या वाढीला एक हजार वर्षें लागलीं; म्हणजे इ. स. पू. ३ रें शतक ते इ. स. ६ वें किंवा ७ वें शतक. या कालांत या प्राचीन भारतीय म्हणजे बौद्ध कलेचें प्रामुख्य असावें. हिंदुस्थानाबाहेरच्या आशिया खंडांतील ज्या देशांनीं पुढें बौद्धसंप्रदायाचा स्वीकार केला अशा देशांत, भारतीय पद्धतींवर पारमार्थिक विषय चित्रिणाऱ्या व गौरविणाऱ्या कलेची वाढ १३–१४ व्या शतकांपर्यंत चालू होती. त्यावेळेपर्यंत नकशीचीं कामें बहुतेक मोठ्या प्रमाणांत दगडांवर होत असत. पण पुढें हळू हळू बौद्धांचीं शिल्पकामें दगडाऐवजीं लांकूड आणि माती व त्यानंतर ओतींव धातू यांवर होऊं लागलीं.

भारतीय चित्रकलेनें दोन भिन्न भिन्न चित्रकलासंप्रदायांपासून कांहीं अंगें उसनीं घेऊन, त्यांचा आपल्या राष्ट्रीय चित्रप्रबंधांतून उपयोग केला आहे, असें ग्रुनवेडेल म्हणतो. हे दोन संप्रदाय म्हणजे एक प्राचीन एशियांतीलच संप्रदाय—याची सुरवात अकिमेनाइड्स (Achaemenides) कडून झाली—आणि दुसरा ग्रीको–रोमनसंप्रदाय. हिंदुस्थानांतील प्राचीन सारकांतून अकिमेनाइड्स यांच्या धाटणीचें बरेंच वर्चस्व आढळून येतें व हें वर्चस्व भारतीय चित्रकलापद्धतींत कांहीं ग्रीक अंगांचा समावेश करण्यास कारणीभूत झालें. तथापि भारतीय चित्रकलेच्या अंगीं निसर्गाच्या जिवंत व जोरदार कल्पनांचें वास्तव्य असल्यानें तिनें आपलें स्वातंत्र्य कायम ठेवून कांहीं विशिष्ट मर्यादेपर्यंत आपली वाढ करून घेतली.

याच्या उलट प्राचीन नमुने आदर्शभूत झाले आणि चित्ररचनेची (यूरोपांतील) जुनी तऱ्हा प्रसृत झाली, यामुळें कांहीं विशिष्ट रचनापद्धति सोंवळी बनून लोकांवर लादली गेली.

हिंदुस्थानाच्या चित्रकलेचा इतिहास लिहावयाचा म्हणजे ज्या बाहेरच्या प्रदेशांतून हिंदुस्थानांत कल्पना आल्या त्या प्रदेशांतील कल्पनांचा अभ्यास करावयास पाहिजे या तऱ्हेचे विचार सांगून बर्जेस पुढें म्हणतोः—

जेव्हां निरनिराळ्या प्रकारच्या बुद्धांच्या, बोधिसत्वांच्या, देवांच्या आणि दैत्यांच्या रूपांचा इतिहास उपलब्ध होईल, तेव्हांच पुष्कळशा इतिहासज्ञानांतील अडचणी दूर होतील. दुर्दैवानें, या कामाकरितां लागणाऱ्या कच्च्या साहित्यांपैकीं कांहींहि अजून प्राप्त करून घेतां आलेलें नाहीं. चित्रें आणि खोदकामें यांखेरीज तिसरें एक वाङ्मयरूपी साहित्य उपलब्ध आहे, तें विशेषेंकरून उत्तरेकडील चित्रकला–संप्रदायांचें असून त्याचें महत्त्व बौद्धांच्या पुरातन वस्तूंच्या वर्णनाच्या कामीं फार आहे. बुद्ध आणि बोधिसत्व यांच्या मूर्ती तयार करण्याविषयींचीं अर्वाचीन अनुशासनें व तसेंच 'कंजूर' आणि विशेषतः 'तंजूर' या तिबेटी ग्रंथांतून आढळणारीं लांबलचक देवांचीं वर्णनें, हे बौद्ध प्रतिमारचनेचे प्रमाणग्रंथ होत. वरील अनुशासनांत डोळे उघडणें, मूर्तीला सजीव करणें इत्यादि संस्कारविधींसह मूर्तींची रचना व परिमाणें दिलीं आहेत व देवांच्या वर्णनांत मूर्तींचीं परिमाणें, प्रभामंडलें, त्यांच्या सिद्धी इत्यादि विषय आहेत. या कारणांमुळें आपणांस भारतीय मूर्तिकलेची माहिती करून घेण्यासाठीं तिबेट किंवा जपान यांचीहि मूर्तिकला शोधावी लागते.

पल्लव राजांची कला रोमन कलेपासून अस्तित्वांत आली अशा प्रकारचें विधान एका फ्रेंच ग्रंथकारानें* केलें आहे. तो म्हणतोः—

पल्लवकलेचे जे अवशेष मद्रासमधील पदार्थसंग्रहालयांतून मांडले आहेत, त्यांवरून पाहतां, त्याकालच्या कलेचा विषय बौद्ध, पेहेराव बौद्ध, आणि दागिने हिंदूंचे, परंतु कारागिरी यूरोपीय दिसते.

यूरोपीय कलेचें वर्चस्व दर्शविणाऱ्या बौद्ध मूर्तींच्या मस्तकावर ग्रीक पद्धतीचे कुरळे केंस आहेत, यांचा चेहरा समभाग (Symmetrical) व अवयव शारीरशास्त्रांतील नियमानुरूप उठावदार कोरून त्यांमध्यें स्नायू दाखविले आहेत. कांहीं मूर्ती रोमन टोग्याची आठवण करील अशा वस्त्रानें आच्छादित आहेत.

हिंदु–यूरोपीय कलेचें मिश्रण फक्त कृष्णेच्या तीरावरच नजरेस पडतें असें नव्हे तर तें सार्वत्रिक दिसतें. गांधार देशांत तें विशिष्टत्वानें नजरेस पडतें.

हें यूरोपीय शिल्पकलेचें वर्चस्व दुसऱ्या व तिसऱ्या शतकांत हिंदुस्थानांत पराकाष्ठेला पोंचलें होतें, यावरून पल्लव कालांतील कलेवर रोमन कलेची छाप बसली होती हें सिद्ध होतें.

आंध्रवंशाच्या नाशाबरोबरच ग्रीक–बौद्ध कला नष्ट झाली नाहीं.

कृष्णातीरावरील तिसऱ्या शतकांतील शिल्पकला ही सर्वांशीं हिंदु–रोमन पद्धतीचीच आढळते. पांचव्या शतकांत हें रोमन वर्चस्व पार नाहींसें झालें.

इ. स. १९१७ सालीं बेझवाडा येथें लेखकास सांपडलेल्या बुद्धमूर्तींवर जर नामनिर्देश नसता तर ती मूर्ति एखाद्या प्राचीन रोमनची म्हणून समजली गेली असती. कारण त्या मूर्तींचे केंस कुरळे, डोळे बिनबाहुल्यांचे, व सामान्य स्वरूप रोमनप्रमाणें असून प्राचीन यूरोपीय पद्धतीप्रमाणें ती मूर्ति शुभ्र संगमरवरी पाषाणाची घडलेली आहे.

वरील मूर्ति पल्लव कालांतील असेलच असें म्हणण्याचा लेखकाचा आग्रह नाहीं. त्याचें इतकेंच म्हणणें कीं, यूरोपीय शिल्पकलेचें वर्चस्व हिंदी कलेवर होतें, व आंध्र व पल्लव यांच्या कालीं म्हणजे तिसऱ्या शतकांत हें वर्चस्व उच्चीला पोंचलेलें दृष्टोत्पत्तीस येतें.

* 'The Pallvas' by G. Jouveau Dubreuil. Translated by Dikshitar. Pondecherry 1917, Chap. I.

**उसनें ज्योतिर्ज्ञान.**-आपल्या ज्योतिःशास्त्रांतहि कांहीं भाग आपण यवनांपासून घेतला असावा असें सांगण्यांत येतें. उदाहरणार्थ, १२ राशींचें भारतीय ज्योतिषांत असलेलें अखिल ग्रीकांशीं झालेल्या परिचयाचें फल आहे असें म्हणतात. केंद्र हा शब्द ग्रीक कैंटर (Centre) शब्दापासून झाला [ त्याचा उच्चार इंग्रज सैंटर असा करतात ]; तसेंच आपल्या पंचांगांत येणारें "अवकहडा" चक्राचें नांव हें केवळ "ए बी सी डी" या अक्षरचतुष्टयाचेंच रूपांतर होय; इत्यादि पुरावे पुढें येतात.

भारतीयांनीं ज्योतिःशास्त्र, मुख्यत्वें त्याच्या गणित आणि जातक या शाखा, खाल्डी लोक, इजिप्तचे लोक अथवा अलेक्झांड्रियाचे ग्रीक यांजपासून घेतल्या असें बहुतेक यूरोपीय विद्वानांचें मत आहे. याबद्दल रा. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपल्या 'भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास' या ग्रंथांत प्रसंगोपात ठिकठिकाणीं व सविस्तर विचार केला आहे. त्याच्या आधारानेंच पुढील माहिती दिली आहे.

डॉ. थिबो यानें 'नक्षत्रपद्धति मूळची बाबिलोनियन (खाल्डी) लोकांची कीं काय?' याविषयीं एक महत्त्वाचा लेख बंगाल रॉयल एशियाटिक सोसायटीच्या नियतकालिकाच्या ६३ व्या ग्रंथांत इ. स. १८९४ मध्यें लिहिला आहे. त्यांत त्यानें (Astronomisches aus Babylon) 'बाबिलोनचें ज्योतिष' या पुस्तकाकडे वाचकांचें लक्ष वेधिलें आहे. बाबिलोनियामध्यें जे अनेक अंकित लेख खणून काढले गेले आहेत त्यांपैकीं कांहींचा अर्थ फादर स्ट्रासमेअरच्या साहाय्यानें फादर एपिंग यानें लावण्याचा प्रयत्न करून त्यांतील ज्योतिषसंबंधीं गोष्टी इ. स. १८८९ मध्यें या पुस्तकांत छापल्या आहेत. या कोरींव लेखांत ग्रहांच्या वेधाबद्दल उल्लेख आहेत. त्यांवरून बाबिलोनचे ज्योतिषी ग्रहस्थिति राशिविभागांत सांगत, नक्षत्रविभागांत सांगत नसत व त्यांच्यांत नक्षत्रविभाग मुळींच नव्हते असें दिसतें. यावरून बाबिलोनिअन लोकांपासून हिंदूंनीं नक्षत्रें घेतलीं या म्हणण्यास अवकाशच राहत नाहीं. अर्थात् तें मत त्याज्य ठरतें.

**यूरोपीय ग्रंथकारांचे अभिप्राय.**—आतां या बाबतींतील दुसऱ्या विद्वान यूरोपीय ग्रंथकारांचे अभिप्राय पाहूं. भारतीय ज्योतिःशास्त्रविषयक बाबतींत ज्यांना मत देण्याचा सामान्यतः अधिकार पोंचतो असे यूरोपीय पंडित म्हटले म्हणजे कोलब्रूक, इ. बर्जेस, व्हिटने आणि वर उल्लेखिलेला डॉ. थिबो हे होत. या पंडितांपैकीं कोलब्रूक यास भारतीय ज्योतिषाची माहिती बेताचीच होती. बर्जेस आणि व्हिटने यांचेंहि ज्ञान सामान्य प्रतीचेंच होतें. डॉ. थिबो यास मात्र साधारण माहिती होती, तरी जेवढी आपणांस दीक्षितांच्या ग्रंथांत सांपडते तेवढी नव्हती. बेंटली हा ज्योतिःशास्त्राच्या मूळाचा फारसा शोध करण्याच्या भानगडींत पडलाच नाहीं. डॉ. कर्न यानें बृहत्संहितेच्या उपोद्घातांत (इ. स. १८६५) आणि जेम्स बर्जेस यानें एका लेखांत (इ. स. १८९३) या विषयावर कांहीं उद्गार काढिले आहेत व गणित आणि जातक दोन्ही हिंदूंनीं ग्रीकांपासून घेतलीं असें या दोघांचेंहि मत आहे. परंतु यांचें विवेचन सविस्तर व सप्रमाण नसल्यामुळें विचारार्ह नाहीं.

**कोलब्रूक.**-कोलब्रूक यानें गणित व जातक या दोहोंविषयीं अभिप्राय देऊन अरबी ज्योतिषाविषयींहि अभिप्राय दिलेला आहे. अरबांपासून हिंदूंनीं ज्योतिष घेतलें असा एकदां कांहीं-जणांचा अभिप्राय होता परंतु हल्लीं यासंबंधीं अधिक माहिती उपलब्ध झालेली आहे व प्रथम अरबांनीं हिंदूंपासून ज्योतिष घेतलें याविषयीं आतां कांहीं संशय राहिला नाहीं. "ताजिक" मात्र मुसुलमानांकडून इकडे आलें. कोलब्रूक म्हणतो. "हिंदू लोकांनां परिचित असलेली क्रांतिवृत्ताच्या द्वादशधा विभागाची पद्धति किंचित् फेरफार करून अरबांनीं घेतली असें मला वाटतें. हिंदू लोकांनीं ही पद्धति ग्रीकांपासून घेणें अगदींच असंभवनीय नाहीं. मात्र ती त्यांनीं आपल्या प्राचीन २७ विभागांनां अनुरूप अशी केली. गोलयंत्राची कल्पना हिंदूंनीं ग्रीकांपासून घेतली किंवा त्यांस दिली. घेतली असली तरी त्यांनीं टालमीच्या गोलाची सर्वांशीं नक्कल केली नाहीं. दोहोंच्या रचनेंत बरेंच अंतर आहे. इजिप्तच्या आणि बाबिलोनच्या लोकांप्रमाणें हिंदू लोक राशीचे तीन भाग करितात. त्यांस द्रेष्काण म्हणतात. द्रेष्काणपद्धति खाल्डिअन, इजिप्शिअन आणि पर्शियन यांचीं एकसारखी आहे. हिंदूंची पद्धति केवळ तशीच नाहीं. कांहीं भिन्न आहे. हिंदूंनीं द्रेष्काणपद्धति परकीय राष्ट्रापासून घेतली हें निःसंशय आहे. (ही कल्पना मूळची इजिप्तचा राजा नेंकेपसो याची असें फरमिकुस म्हणतो). केंद्रच्युतवृत्तें, प्रतिवृत्तें, अधिवृत्तें इत्यादि पुष्कळ गोष्टींत हिंदू ज्योतिषांचें ग्रीक ज्योतिषांशीं साम्य आहे, आणि तें काकतालीय न्यायानें आहे असें म्हणणें कठिण आहे. ही गोष्ट आणि हिंदी ज्योतिषांत यवनाचार्य, रोमकसिद्धांत हीं नांवें आहेत ही गोष्ट, यांवरून हिंदूंस ज्योतिषज्ञान बाहेरून कोठून तरी प्राप्त होऊन त्याच्या योगानें आपलें मूळचें अपूर्ण ज्योतिष त्यांनां वाढवितां आलें आणि शुद्ध करितां आलें असें मानण्यास आधार होतो, असें कोणास वाटेल तर त्या मताविरुद्ध जाण्यास माझा कल होणार नाहीं. तसेंच हिंदूंचीं प्रतिवृत्तें आणि नीचोच्चवृत्तें या पद्धतीचें टालमीच्या अथवा हिपार्कसच्या पद्धतीशीं अगदीं ऐक्य नसलें तरी साम्य आहे, इत्यादि गोष्टींवरून ग्रीकांपासून हिंदूंस सूचना मिळाल्या याविषयीं संशय राहत नाहीं."

**व्हिटने.**-आतां व्हिटने याचें मत काय आहे तें पाहूं. त्यानें प्रथमतः ग्रीक व हिंदु ज्योतिषांतील ग्रहस्पष्टगतिस्थितिप्रमेयांची तुलना करून दोहोंत अनेक प्रकारें साम्य असल्याचें दाखविलें आहे. पुढें तो म्हणतो कीं, सूर्यसिद्धांतास बीजसंस्कार कल्पिला त्यांत मुसुलमानी ज्योतिषाचा कांहीं तरी संबंध

असावा. कारण असे फेरफार हिंदूंनीं स्वतंत्रपणें करण्याजोगे त्यांचे वेध किंवा त्यांजवरून निघणारीं अनुमानें होतीं हें अद्यापि सिद्ध होणें आहे. यानंतर हिंदु ज्योतिषाच्या मूळासंबंधानें तो लिहितो. "आमचें मत असें आहे कीं, ख्रिस्ती शकाच्या आरंभानंतर लवकरच हिंदु ज्योतिःशास्त्र हें ग्रीक ज्योतिःशास्त्रापासून उत्पन्न झालें आणि इसवी सनाच्या पांचव्या आणि सहाव्या शतकांमध्यें तें पूर्णतेस आलें. याला प्रमाण प्रतिवृत्तपद्धति दोहोंत सारखीच आहे. हीं प्रतिवृत्तें कांहींअंशीं नैसर्गिक आहेत हें खरें असलें तरी या पद्धतींत इतका पुष्कळ भाग कृत्रिम आणि मनःकल्पित आहे कीं, दोन्ही राष्ट्रांनीं स्वतंत्रपणें ही एकाच प्रकारची पद्धति शोधून काढली असावी हें असंभवनीय आहे. ग्रीकांनीं ती पद्धति मूळ काढिली, हळू हळू सुधारली आणि टालमीनें ती पूर्ण स्वरूपानें ग्रथित केली असें मानण्यास प्रमाणें आहेत. खाल्डियन, इजिप्शियन यांपासून काय घेतलें हें ते स्पष्ट सांगतात. प्रतिवृत्तकल्पनेचें मूळ, तिचे आधारभूत वेध आणि तिला सिद्धांतरूप देण्याची संयोगीकरणपृथक्करणपद्धति, हीं सर्व ग्रीक ग्रंथांत दिसून येतात. हिंदुपद्धति पहावी तों तिला वेध नको, कांहीं नको. ती एकदम साक्षात् ईश्वरापासून पूर्णत्वानें आली. गति इत्यादिकांच्या संख्या दोहोंच्या बऱ्याच मिळतात या गोष्टीस आम्ही महत्त्व देत नाहीं. कारण दोन राष्ट्रें सत्याच्या शोधास लागलीं तर त्यांचा निसर्गाशीं व परस्परांशीं बहुतांशीं मेळ पडेल हें संभवनीय आहे." याखेरीज मेषादि राशी केवळ आकाशाच्या क्षेत्रबोधक म्हणून घेणें व नांवांस कमी महत्त्व देणें, वारांचा उदय आणि कांहीं सिद्धांत रोमकनगर (रोम) येथें ईश्वरापासून मिळाले अशा दंतकथा, यवन, यवनाचार्य यांचा उल्लेख, केंद्र, लिप्ता इत्यादि शब्द, त्यानें आणखी प्रमाणांदाखल दिले आहेत. हें ज्योतिःशास्त्राचें ज्ञान रोमच्या व्यापाराचें बंदर जें अलेक्झांड्रिया तें व पश्चिम-हिंदुस्थान यांचा समुद्रमार्गें इसवी सनाच्या आरंभींच्या शतकांत व्यापार चालत असे त्याबरोबर टालमीच्या पूर्वींच ज्योतिष-पद्धतीच्या मूळरूपानें आलें व त्याला सांप्रतचें स्वरूप ख्रिस्ती शकाच्या पांचव्या आणि सहाव्या शतकांत आलें. असें व्हिटनेचें मत आहे. मध्यंतरीं जे फेरफार झाले त्यांत फार उपयोगी आणि महत्त्वाचा असा फेरफार म्हणजे ज्या यांच्या जागीं अर्धज्या यांचा उपयोग हा होय. तसेंच रेखागणितावद्दल अंकगणिताचा उपयोग होऊं लागला हेंहि ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

**ब र्जे स.**–आतां आपण बर्जेसच्या मताकडे वळूं. बर्जेस हा अनेक वर्षें हिंदुस्थानांत राहिलेला असून त्याला येथील आचार-विचारांची माहिती होती. व्हिटने अमेरिकेंत राहिलेला व त्याचें या बाबतींत पूर्ण अज्ञान. तेव्हां व्हिटनेपेक्षां बर्जेस हा या विषयावर मत देण्यास ज्यास्त अधिकारी हें उघड आहे. याचीं बहुतेक मतें व्हिटनेच्या विरुद्ध आहेत. तो म्हणतो, "हिंदूंनीं ज्योतिषगणित आणि जातक हें ग्रीकांपासून जसेंच्या तसें घेतलें आणि एतद्विषयक कांहीं गोष्टी अरबी, खाल्डियन, चिनी यां-पासून घेतल्या असें व्हिटनेचें मत दिसतें. मला वाटतें तो हिंदूंस न्याय्य मान देत नाहीं आणि ग्रीकांस वाजवीपेक्षां जास्त मान देतो. ग्रीकांनीं पुढें त्या शास्त्रांत जास्त सुधारणा केली हें खरें. तथापि मूलतत्त्वें आणि त्यांची बरेच अंशीं मरामत हीं हिंदूंचीं आहेत; आणि हिंदूंपासून तें शास्त्र ग्रीकांनीं घेतलें असें मला खात्रीनें वाटतें. याबद्दल निरनिराळे मुद्दे पाहूं. (१) क्रांतिवृत्ताचे २७ किंवा २८ विभाग ही पद्धति कमजास्त फरकानें हिंदु, अरब आणि चिनी यांची सारखीच आहे. (२) क्रांतिवृत्ताचे १२ विभाग व त्यांचीं नांवें याविषयीं पाहिलें तर नांवें हिंदु व ग्रीक या दोहों पद्धतींत सारख्याच अर्थाचीं आहेत. विभागकल्पना आणि नांवें यांचें मूळ एकच आहे, हें मत खरें आहे. (३) ग्रहाची गति आणि स्पष्टस्थिति हीं काढण्याची प्रतिवृत्तपद्धति दोहोंची सारखीच आहे; निदान त्यांचें इतकें साम्य आहे कीं, प्रत्येक राष्ट्रानें स्वतंत्रपणें ती शोधून काढणें संभवत नाहीं. (४) हिंदू, ग्रीक आणि अरब यांच्या जातक-पद्धतींत साम्य आहे. किंबहुना कांहीं भागांत एकसारखेपणा आहे. यावरून मूलतत्त्वांसंबंधें त्यांची उत्पत्ति एकच असली पाहिजे. (५) प्राचीन लोकांस माहीत असलेलीं पांच ग्रहांचीं नांवें व त्यांवरून स्थापिलेली वारपद्धति. या पांच गोष्टींबद्दल बर्जेस यानें आपला अभिप्राय पुढीलप्रमाणें दिला आहे.

"(१) क्रांतिवृत्ताच्या सत्तावीस किंवा अठ्ठावीस विभागाची पद्धति तिच्या विस्तृत रूपानेंहि हिंदु लोकांत फार प्राचीन आहे; आणि इतर राष्ट्रांच्या संबंधानें अशा प्रमाणांचा अभाव अथवा अत्यल्पता आहे. यावरून या पद्धतीची उत्पत्ति शुद्ध हिंदु आहे असें माझें निःसंशय मत आहे व बायो याच्या विरुद्ध अभिप्रायानेंहि तें पालटत नाहीं. (२) क्रांतिवृत्ताच्या बारा भागांचा उपयोग आणि त्यांचीं नांवें हीं कोणत्याहि देशांत जितक्या प्राचीन काळापासून आहेत तितक्या प्राचीन काळा-पासून हिंदुस्थानांत आहेत असें सिद्ध करितां येईल व इतरांस ठाऊक होण्याच्या पूर्वीं पुष्कळ शतकें ही विभागपद्धति हिंदूंस माहीत होती अशींहि प्रमाणें आहेत. मात्र तीं इतकीं स्पष्ट व खात्रीचीं नाहींत. याविषयीं आयडलर व लिप्सियन यांचेहि असेच अभिप्राय आहेत. (३) प्रतिवृत्ताचें प्रमेय ग्रीक व हिंदु या दोन राष्ट्रांत भिन्न रीतीनें सुधारत गेलें आहे. यावरून या राष्ट्रांस एकमेकांपासून फार तर सूचना मिळाल्या असतील, व त्या हिंदूंनां ग्रीकांपासून मिळण्यापेक्षां ग्रीकांसच हिंदूंपासून मिळाल्या असाव्या असें म्हणण्यास जास्त आधार आहे. (४) जात-काची कल्पना आणि सुधारणा यासंबंधीं हिंदु आणि खाल्डियन यांच्यामध्यें वाद आहे आणि त्यांत हिंदूंस अनुकूल अशींच प्रमाणें एकंदरींत पाहतां अधिक आढळून येतात. (५) हिरोडोटस म्हणतो, 'देवांचीं नांवें इजिप्त देशांतून ग्रीस देशांत गेलीं'. यांत देव शब्दानें ग्रह समजावयाचे आहेत. यावरून नांवाविषयींची

स्वतः ग्रीकांची समजूत दिसून येईल. ग्रहांचीं नांवें वारांस प्रथम कोणीं दिलीं हें निश्चयानें ठरविणें अशक्य आहे. याविषयीं प्रो. एच्. एच्. विल्सन म्हणतो, 'ही पद्धति ग्रीकांस माहीत नव्हती आणि रोमन लोकांनींहि बऱ्याच अर्वाचीन काळापर्यंत ती स्वीकारली नव्हती. ही इजिप्त आणि बाबिलोन येथील लोकांची असें सामान्यतः म्हणतात, परंतु यास पुरता आधार नसल्यानें ही मूळ कल्पिल्याचा मान इतर लोकांस जितका आहे तितकाच हिंदूंसहि आहे.'

"ज्योतिःशास्त्राचे मूळ कल्पक आपण असें अरब लोक म्हणत नाहींत. त्यांस ग्रीक ज्योतिषाचें ज्ञान होण्यापूर्वी ते हिंदु ज्योतिषांत अगदीं रंगून गेले होते. नंतर टालमीच्या सिंटाक्सिस पुस्तकाचें भाषांतर अरबांनीं केलें आणि अरबीच्या लॅटिन भाषांतरावरून तें यूरोपांत माहीत झालें. या लॅटिन भाषांतरांत राहूला 'नोडस कॅपिटिअस' (मस्तक–पात) आणि केतूला 'नोडस काडी' (पुच्छ–पात) म्हटलें आहे. यावरून व इतर प्रमाणांवरून हिंदू ज्योतिषाचें वर्चस्व अरब लोकांवर किती होतें हें दिसून येतें. यावरून क्रांतिवृत्ताच्या २७ भागांचे मूळ कल्पक अरब होते असें म्हणतां येत नाहीं. त्याप्रमाणेंच अयनचलनाचें वर्षमान, पृथ्वीच्या संबंधानें सूर्य आणि चंद्र यांचें आकारमान, सूर्याचें परमफल इत्यादि महत्त्वाच्या गोष्टींत ग्रीकांपेक्षां हिंदूंचीं मानें जास्त शुद्ध आहेत. आणि हिंदूंचे भगणकालहि फार शुद्ध आहेत. हिंदू आणि ग्रीक यांनीं एकमेकांपासून घेतलें असें फार थोडें आहे, हें अगदीं उघड आहे आणि एकापासून दुसऱ्यास मिळण्याचा ओघ कोलब्रूक मानतो त्याहून निराळा म्हणजे पश्चिमेकडून पूर्वेस असण्यापेक्षां पूर्वेकडून पश्चिमेकडे आहे असें मला वाटतें. ज्याप्रमाणें कोलब्रूक तत्त्वशास्त्रें व धर्म या बाबतींत हिंदू हे ग्रीकांचे शिष्य नव्हते तर शिक्षक होते असें म्हणतो त्याप्रमाणेंच ज्योतिषशास्त्राविषयीं मी म्हणतों."

थि बो.–पंचसिद्धांतिकेच्या उपोद्घातांत बऱ्याच ऊहापोहानंतर डॉ. थिबो लिहितो कीं, "सूर्यसिद्धांतासारखे ग्रंथ मुख्यतः ग्रीक ज्योतिषग्रंथांचे अनुयायी आहेत. तरी, पुष्कळ गोष्टींत त्यांत स्वतंत्र कल्पना आणि शोध आहेत आणि ते जरी पुष्कळ गोष्टींत मूळ ग्रीक ग्रंथांहून कमी योग्यतेचे आहेत तरी कोठें कोठें त्यांत नव्या रीती आणि युक्ती आहेत, त्यांत चातुर्य आणि कल्पना दिसून येते हें निर्विवाद आहे. उत्तम हिंदी ग्रंथांतील पद्धति केवळ ग्रीकांपासून घेतलेली जशीच्या तशी आहे अथवा तिला सर्वस्वी धरून आहे असें नाहीं तर तींत मिश्रण आहे आणि जास्त सुधारणा आहेत; आणि या दृष्टीनेंच पाहिलें तर कल्पकत्वाचा मान सूर्यसिद्धान्तकारास दिला पाहिजे."

**यूरोपीयांच्या अभिप्रायांचें परीक्षण.**—आतां या अभिप्रायांचें परीक्षण करितांना रा. शंकर बाळकृष्ण दीक्षित असें म्हणतात कीं, "गणितस्कंधाचा विचार पाहतां ग्रहांच्या मध्यम गतिस्थिति, स्पष्टगति व स्पष्टस्थिति काढण्याच्या मंद शीघ्र फलसंस्कारांचीं मानें, सारांश वेधानें निघणारीं सर्व मानें मूळ आमचीं आहेत. ग्रीक ज्योतिषाचा आमच्याशीं संबंध असेल तर तो एवढाच कीं, मंदशीघ्रोच्चांपासून ग्रहाचें जें अंतर म्हणजे केंद्र तदनुसार ग्रहस्थितींत फरक पडतो, हें तत्त्व परदेशांतून समजलें असावें असा संभव आहे. हें तत्त्व पाणिनीपूर्वीच आम्हांस कळून पुढें आमच्या ज्योतिषाचा विकास स्वतंत्रपणें झाला आहे. आणखी कांहीं किरकोळ गोष्टी कदाचित् परदेशांतून आल्या असतील. जातकाविषयीं पाहतां, जातकस्कंध आमच्या देशांत आहे त्याची उत्पत्ति मूळची आमच्या देशांतली आहे, असा माझा सिद्धांत आहे."

या गोष्टींबद्दल प्रमाण दाखवितांना पंचसिद्धांतिकेपैकीं पैतामहाबद्दल तर वादच नाहीं पण वासिष्ठ व पौलिश हे सिद्धांत देखील रोमकाहून प्राचीन होते असें रा. दीक्षित सिद्ध करून देतात; व हे सर्व पांच सिद्धांत टालमीहून प्राचीन आहेत असें दाखवितात.

रा शीं चीं नां वें.–मेषादि संज्ञा या आपल्या इकडे केवळ क्रांतिवृत्ताचा भाग दाखवितात व मेष वगैरेबद्दल यूरोपीयांप्रमाणें आमच्या पुराणांत कथा वगैरे नाहींत. पण नक्षत्रांच्या आकृतींवरून त्यांनां नांवें देण्याची पद्धति आमच्यांत होती हें हस्तादिनक्षत्रांवरून उघड होतें; व क्रिय, तावुरि हीं तिकडील नांवें कदाचित् इकडील मेषादि नांवाचीं भाषांतरें असूं शकतील, अगर त्याच्या उलटहि असूं शकेल. पण मेषादि संज्ञा व वारपद्धति यांत कांहीं महत्त्व नाहीं. ग्रहस्पष्टगतिस्थितींचें ज्ञान व त्याचें प्रमेय यांत काय तें ज्योतिःशास्त्राचें महत्त्व आहे. आम्ही प्रथम नुसते सावन दिवस पहिला दुसरा असे मोजीत होतों, त्याबद्दल वार घेतले किंवा क्रांतिवृत्ताच्या १२ विभागांस षडशीति इत्यादि आमच्या संज्ञा होत्या त्या टाकून मेषादि घेतल्या यांत कांहीं विशेष झालें असें नाहीं. क्रांतिवृत्ताचे १२ विभाग आमच्यांत मूळचे होते हें इतर ठिकाणीं दाखविलेलेंच आहे. ग्रहस्थिति राशिविभागावर सांगण्याची पद्धति मात्र मेषादि विभाग प्रचारांत आल्यावर सुरू झाली असें दिसतें.

ग्रहस्पष्टगतिप्रमेय आम्हीं ग्रीकांपासून घेतलें असलें तरी तें वासिष्ठसिद्धांतांत नाहीं. अर्थात् तें घेतलें असल्यास वासिष्ठसिद्धांत त्यापूर्वीचा आहे आणि त्यांत मेषादि विभाग आहेत. यावरून मेषादि विभाग खाल्डी लोक किंवा इजिप्तचे लोक यांपासून घेतले असल्यास त्यामुळें आम्हास कमीपणा आला असें मुळींच होत नाहीं. त्या संज्ञा इ. स. पूर्वी ५०० च्या सुमारास आल्या असाव्या.

वे ध.–त्याप्रमाणेंच आपल्या लोकांत वेधपरंपरा नाहीं, वेधकौशल्य नाहीं, अवलोकन नाहीं, हे आरोप मिथ्या होत हेंहि

रा. दीक्षितांनीं सप्रमाण दाखविलें आहे. प्राचीनतम उपलब्ध वेध म्हटले तर खाल्डी लोकांचा इ. स. पू. ७२० चें ग्रहण आणि ग्रीकांचा इ. स. पू. ४३० या वर्षी मेटननें केलेलें उद्गयनावलोकन हेच होत. आम्हीं तर उद्गयनावलोकन इ. स. पू. १४०० या कालीं केलें होतें.

ग णि त स्कं ध.–गणितस्कंधाविषयीं विचार करितांना, वर्षमान, ग्रहमध्यगति, मंदोच्चें आणि पात, मंदकर्ण, विक्षेपमानें, अयनचलन, रविचंद्र परममंदफलें व पंचग्रहांचीं परममंदशीघ्रफलें, क्रांतिवृत्ततिर्यक्त्व, सूर्यचंद्रलंबन, उदयास्तकालांश, यांतून कोणतीहि गोष्ट आम्ही टालमीपासून घेतली नाहीं हें रा० दीक्षित यांनीं सिद्ध करून दिलें आहे. हिपार्कस यास रविचंद्रस्पष्टीकरण मात्र माहीत होतें. ग्रहस्पष्टीकरण त्यास माहीत नव्हतें. तें टालमीच्या पूर्वींच्या कोणत्याच पाश्चात्य ग्रंथांत नाहीं असें पाश्चात्य ज्योतिषाच्या इतिहासांत ग्रँट म्हणतो.* हिंदु चांद्रमासाचें मान जितकें शुद्ध आहे तितकें ग्रीकांस कधींच साधलें नाहीं असें कोलब्रूक म्हणतो.† एकंदरींत हिपार्कस व टालमी या दोघांच्या ग्रंथांवरून आम्ही कांहीं घेतलें असल्यास प्रतिवृत्तपद्धतीखेरीज कांहीं घेतलें नाहीं असा सिद्धांत रा. दीक्षित काढतात.

टालमी आणि हिपार्कस यांच्या पूर्वी पाश्चात्यांजवळ ज्योतिषविषयक ज्ञान असल्यास फारच अल्प असलें पाहिजे, जवळ जवळ नव्हतेंच असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण रविचंद्रस्पष्टीकरण आणि पंचग्रहस्पष्टीकरण ही काय ती ज्योतिषांत महत्त्वाची गोष्ट, व तिचें ज्ञान हिपार्कसपूर्वी पाश्चात्यांस मुळींच नव्हतें असें सर्व यूरोपीय लेखक कबूल करितात.

म्लेच्छा हि यवनास्तेषु सम्यक् शास्त्रमिदं स्थितम्। या श्लोकावरून आम्हीं ज्योतिष यवनांपासून म्हणजे ग्रीकांपासून घेतलें अशी कल्पना कोणी करितात, परंतु या वचनाचा मुख्यतः जातकाशीं संबंध आहे. आमचें ज्योतिषशास्त्र मूलसूर्यसिद्धांतांत म्हणजे वराहापूर्वीच उत्तमावस्थेस आलें होतें असें आहे, तथापि पंचसिद्धांतिकेंत एका स्थळीं यवनपुरापासून (अलेक्झांड्रिया) उज्जनीचें देशांतर आलें आहे. रोमकनगरांत म्लेच्छावताररूपानें तुला ज्योतिषज्ञान देईन असें सूर्यानें मयास सांगितलें अशा अर्थाचा एक श्लोक सूर्यसिद्धान्तांत आढळतो. तसेंच

भूमिकक्षाद्वादशांशे लंकायाः प्राक्च शाल्मले।
मयाय प्रथमप्रश्ने सौरवाक्यमिदं भवेत्॥ शा० ब्र० सि० अ. १

असें वाक्य शाकल्य ब्रह्मसिद्धान्तांत आहे. यांत प्राक्च म्हणजे पूर्वेस लंकेपासून ३० अंशांवर मय आणि सूर्य यांचा संवाद झाला असें आहे. परंतु ज्योतिषाचें ज्ञान भारतीयांस मिळण्यासारखें स्थळ पूर्वेस लंकेपासून ३० अंशांवर मुळींच नाहीं तेव्हां हें वाक्य विश्वसनीय नाहीं. तरी पण सूर्यसिद्धान्तांतील कथेस यावरून जोर येतो. यावरून यवनांचा आमच्या ज्योतिषाशीं कांहीं तरी संबंध आहे असें मनांत येतें; आणि दोघांची प्रतिवृत्तादि पद्धति बरेच अंशीं सारखी आहे यावरून या अनुमानास बराच आधार मिळतो. तथापि कोणतेहि आंकडे आम्ही ग्रीकांपासून घेतले नाहींत हें वर दाखविलेंच आहे. तेव्हां विचार करून पाहतां बर्जेसच्या अनुमानाप्रमाणें असेंच अनुमान केलें पाहिजे कीं "दोन्ही राष्ट्रांस परस्परांपासून कांहीं दिग्दर्शन मात्र मिळालें आणि तेंहि फार प्राचीन कालीं (हिपार्कसच्या पूर्वी) मिळालें. कारण अर्वाचीन कालीं हिंदूंनीं ग्रीकांपासून कांहीं घेतलें असें म्हटलें, तर घेतलें काय हें सांगणें कठिण आहे, कारण दोघांच्या संख्या मुळींच मिळत नाहींत."

दि ग्द र्श न.–आतां हें दिग्दर्शन कोणापासून कोणास मिळालें हा विचार करितांना केंद्र हा आपणास महत्त्वाचा शब्द आढळतो. मंदशीघ्रोच्चांपासून ग्रहाचें जें अंतर तें केंद्र होय; आणि तदनुसार मंदशीघ्रफलें उत्पन्न होतात. केंद्र हा शब्द ग्रीक किंवा दुसऱ्या कोणत्या तरी भाषेंतला असावा. तो संस्कृत नाहीं असें दिसतें. यावरून "केंद्रानुसार ग्रहाच्या मध्यमस्थितींत अंतर पडतें" हें तत्त्व यवनांकडून आमच्याकडे आलें असावें असा निष्कर्ष रा. दीक्षित हे काढतात. हें तत्त्व पुलिशसिद्धान्तांत प्रथम आढळतें आणि हा सिद्धान्त हिपार्कसचा ग्रंथ इकडे येण्यापूर्वीचा असल्यामुळें हें तत्त्व हिपार्कसच्या पूर्वी इकडे आलें. हिपार्कसच्या पूर्वी प्रतिवृत्तपद्धतीचा आणि तिजवर अवलंबून असलेल्या वरील तत्त्वाचा ज्योतिषगणितांत उपयोग कोणी केला नव्हता हें कोलब्रूक इत्यादिकांच्या अभिप्रायांत स्पष्टच आहे. परंतु प्रतिवृत्तपद्धति हिपार्कसच्या पूर्वी अपालोनियस यानें मूळ कल्पिली असें कोलब्रूक म्हणतो. याप्रमाणें अपालोनियस किंवा दुसरा जो कोणी तिचा कल्पक असेल त्यापासून कोणत्या तरी मार्गानें ती इकडे आली. अर्थात् ती अपूर्ण होती आणि याच कारणामुळें आमच्या आणि ग्रीकांच्या प्रतिवृत्तादिपद्धतींत साम्य आहे तरी बरेंच वैषम्य आहे. पुलिशसिद्धान्ताचा वरील तात्पुरता यवनांशीं संबंध असेल. पुलिशांत भुजज्या आहेत त्या ग्रीकांपासून इकडे आल्या नाहींत, कारण टालमीच्या ग्रंथांतहि भुजज्या नाहींत. सारांश, परकीयांपासून आम्हांस कांहीं मिळालें असल्यास ग्रीकांपासून किंवा कदाचित् बाबिलोनच्या लोकांपासून केवळ वर लिहिलेल्या नियमांचें दिग्दर्शन मिळालें असेल, दुसरें कांहीं मिळालें नाहीं. वेधप्राप्त गोष्टी इत्यादि तपशीलवार माहिती मिळाली नाहीं. ही ज्योतिःशास्त्राची गोष्ट झाली.

* Grants History of Ph. Astronomy ch. XVII.
† Algebra, Introduction P. XXII.

**रामायण चोरलेलें.**—ज्या गोष्टींबद्दल आपण फार अभिमान बाळगतों त्यांपैकीं एक महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे आपलें वाङ्मय होय. रामायणासारख्या आर्षकाव्यांबद्दल अर्वाचीन हिंदूंच्या प्रमाणें चोहोंकडील प्राचीन ग्रंथकारांच्या मनांत नेहमीं आदर वसत असे. व्यास आणि वाल्मीकि यांच्या कृती म्हणजे आपणांस जवळ जवळ वेदांप्रमाणें पूज्य. सामान्यजनांमध्यें वेदांपेक्षां याच कृतींचा अधिक परिचय. कोणी या बाबतींत हें परक्याचें धन आहे ही कल्पना सांगितली तर ती आपल्या मनास विचित्र वाटते. तथापि या तऱ्हेची कल्पना व्यक्त झाली आहे. वेबरनें रामायण हा ग्रंथ होमरचें कथानक भारतांत आल्यामुळें झाला असें म्हटलें आहे. या त्याच्या म्हणण्याचें परीक्षण लासेन व तेलंग यांनीं केलें आहे. नाट्यकला आपण ग्रीकांपासून घेतली असें सांगणारे ग्रंथकारहि आहेत. तथापि अलीकडे वेदांचा अभ्यास वाढला असल्यामुळें वेदकालीं देखील नाट्यकला होती असें दिसून येऊं लागलें आहे. असो. आतां रामायणासंबंधाचें वेबरचें म्हणणें अगोदर सांगून नंतर लासेन आणि तेलंग यांचें म्हणणें वाचकांपुढें ठेवूं.

**वेबरचें रामायणाविषयीं मत.**—'द अलविस'* यानें परिश्रम करून रामायणाची मूळ कल्पना प्रथम बौद्ध ग्रंथ 'रामसागा' यामध्यें असून वाल्मीकिमहर्षींनीं तिच्यांत यज्ञदत्तवध या दंतकथेची भर घालून रामायण रचलें असें प्रतिपादन केल्यापासून रामायणरचनेच्या प्रश्नास अगदीं निराळेंच स्वरूप प्राप्त झालें आहे.† कारण बौद्ध कथेमध्यें व वाल्मीकींनीं दिलेल्या कथेमध्यें महत्त्वाचे फरक आढळतात. बौद्ध कथा ही जास्त प्राचीन दिसते यावरून ती प्रथम लिहिली गेली असावी असें वाटतें आणि हेंच अनुमान 'द-अलविस' यानें काढलें आहे.

**बौद्धकथा व रामायण यांची तुलना.**—किरकोळ गोष्टी सोडून दिल्या तर बौद्ध कथेमध्यें खालीं दिल्याप्रमाणें फरक आढळतातः—

(१) राम आणि त्याचा बन्धु लक्ष्मण यांस त्यांच्या बापानें आपल्या हयातींतच त्यांचें सापत्न मातेच्या कारस्थानापासून रक्षण करण्याच्या हेतूनेंच अरण्यांत पाठविलें.

(२) सीतादेवी‡ ही या दोन भावांची बहीण असून ती स्वेच्छेनेंच त्यांच्याबरोबर अरण्यांत गेली.

(३) १२ वर्षें अरण्यांत घालविल्यावर राम परत येऊन राज्यावर बसतो आणि नंतर आपल्या सीता बहिणीबरोबर विवाह करतो.

(४) यामध्यें रावणाकडून सीताहरण व लंकेवरची स्वारी या कथा मुळींच नाहींत.

रामवनवासाची सर्व कथा बौद्ध दंतकथांवरूनच घेतली असावी असें आपणांस सिद्ध करतां येईल.

बुद्धघोषानें 'धम्मपद' ग्रंथावरील टीकेंत वाराणसी येथील राजा ब्रह्मदत्त याची एक दंतकथा दिली आहे.* या दंतकथेंत असें आहे कीं, ब्रह्मदत्तानें आपल्या राणीस एक वर दिला होता व त्यापासून पुढेंमागें तिच्या पुत्रांस संकट येऊं नये म्हणून त्यानें महिंशासक आणि चन्द (चन्द्र) या राजपुत्रांस देशाबाहेर पाठविलें. त्या वेळीं ज्याच्याकरितां या राजपुत्रांस हा त्रास सोसावा लागला तो त्यांचा सावत्र भाऊ सूर्य हा त्यांच्याच बरोबर जातो. नंतर पित्याच्या मरणानंतर ते परत येऊन वडील भाऊ राज्यावर बसतो. चंद्र हा 'उपराज' होतो आणि सूर्य हा सेनापति होतो.

याप्रमाणेंच बुद्धघोषानें 'सुत्तनिपात' या ग्रंथावरील टीकेंत बुद्धाचे पूर्वज शाक्य आणि कोलिय वंश यांच्याबद्दल एक दंतकथा दिली आहे ती अशीः—अंबत्थराजन् यानें आपल्या तरुण राणीस खूप करण्याकरितां आपल्या ४ मुलांस व ५ मुलींस देशांतरास पाठविलें. अरण्यांत गेल्यावर त्यांपैकीं ४ भावांनीं ४ बहिणींबरोबर लग्नें केलीं व ते वडील वहिणीस आईप्रमाणें मानूं लागले. त्यांचा उद्देश असा होता कीं, आपल्या बहिणींस भलत्याच पुरुषाशीं लग्न करण्याचा प्रसंग येऊं नये. पुढें वडील बहीण पिया ईस कुष्ट झाल्यामुळें ते त्या जंगलाच्या दुसऱ्या भागांत गेले. त्या ठिकाणीं एक राम नांवाचा राजा कुष्ठी होऊन आला होता पण तो नुकताच बरा झाला होता. त्यानें तिला त्या रोगापासून मुक्त करून तिच्याबरोबर विवाह केला.†

या वरील तीन दंतकथांमध्यें कितीहि फरक असला तरी यांच्यांतील परस्परसंबन्ध तेव्हांच लक्ष्यांत येतो.

दशरथजातकामध्यें वनवासाचें व या बहिणभावांच्या लग्नाचें कारण दिलें असून शिवाय त्यामध्यें दशरथ, लक्ष्मण, भरत, सीता आणि राम हीं नांवें आढळतात. राम या राजाची या वनवासांतील मुलांशीं ओळख नव्हती असें न दाखवितां तो त्यांच्यापैकींच एक असून त्यांच्यांत मुख्य होता असें या जातकांत म्हटलें आहे.

नंतर रामायण रचीत असतांना कवीनें वरील गोष्टी घेऊन राम आणि सीता यांनां प्रणयी दंपत्य करून याखेरीज महत्त्वाची अशी सीतेच्या हरणाची व लंकेवरील स्वारीची गोष्ट त्यांत घातली आहे. त्याप्रमाणें वाराणसी हें स्थळ बदलून अयोध्या

---

* Attangaluvansa p. 166. Colombo 1866. दशरथ जातक, Jat. XI. (46). सामंजातक 7. Jat. XXI. (56) 3. † Vide Indische Striefen II. 383-384. ‡ देवी याचा अर्थ येथें राजकन्या असावा. Cf. माद्रिदेवी (Hardy, Manual of Buddhism 116); also Fausboll. p. 174

* Fausboll Ed. p. 303. † महावंसोमध्यें (पृ. १८४५) गंगातीरावर एक रामगाम नांवाच्या गांवाचा उल्लेख असून तेथें एक स्तूप असल्याचेंहि वर्णन आहे. हा गांव अशोकाच्या काळीं असून तो कोलिय घराण्याकडे होता असें म्हटलें आहे (Cf. also, Bigandet Life of Buddha p. 349). याच वेळीं फा हिआननें (Ch 22 end) व नंतर कांहीं वर्षांनीं हिओ-युएन-त्संग यानें कपिलवस्तूच्या हद्दीवर 'लान-मो' या नांवाच्या गांवाचा उल्लेख केला आहे. 'लान-मो' याचें मातृकान्तर स्टॅ. जूलिआं (II. 325) आणि 'बील' (Fa. Hian p. 89) यांनीं रामग्राम असें दिलें आहे.

नगरी ही पसंत केली आहे व वनवासाची जागा हिमालयाच्या ऐवजीं दण्डकारण्यांत कल्पिली आहे.

लंकेवरील स्वारी वर्णन करावयाची असल्यामुळें कवीनें वनवासाची जागा दक्षिणेंत पसंत करणें साहजिक आहे.

त्याप्रमाणेंच दशरथजातकामध्यें ब्रह्मदत्त व अंवत्थराजन् हे वाराणसी येथें राहत होते असें म्हटलें आहे; परंतु त्यांचीं वनवासास धाडलेलीं मुलें अथवा निदान त्यांचे वंशज शाक्य आणि कोलिय हे कपिलपुर (कपिलवस्तु) अथवा कोलियपुर येथें राहिले असावे. हीं नगरें रोहिणीनदीच्या* दोन्ही तीरांवर आहेत. याप्रमाणें त्यांचा संबंध अयोध्येकडे येतो आणि यावरून अयोध्या हें स्थळ कवीनें पसंत केलें असावें.

लंकेवरील स्वारीचें वर्णन करण्यांत कवीचा आर्यसंस्कृतीचा दक्षिणेंत कसा प्रसार झाला हें वर्णन करण्याचा विचार होता अशी आजपर्यंत समजूत होती.† परंतु मि. तलबॉइज व्हीलर‡ यानें असें मत प्रदर्शित केलें आहे कीं यांत फक्त ब्राह्मणांनीं लंकेंतील बौद्ध लोकांस राक्षस वगैरे वर्णन करून त्यांच्याबद्दल द्वेष दाखविला आहे. रावण आणि त्याचे भाऊ हे ब्राह्मण कुलांतच जन्मले असून त्यांनीं ब्रह्मा, अग्नि वगैरे देवतांस प्रसन्न करून घेतलें होतें असा उल्लेख असल्यामुळें वरील मतास पुष्टि येते.¶ तसेंच ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांतील ग्रंथकारानें आपल्या काव्यासाठीं त्यावेळीं चाललेल्या ब्राह्मण-बुद्ध वादविवादाचा विषय घेऊन बुद्धांच्या दक्षिणेंतील एका मोठ्या स्थानाच्या पराभवाचें वर्णन करणें साहजिक आहे. दक्षिणेंतील मूळचे लोक यांचें वानर म्हणून वर्णन केलें आहे आणि ते वालीशिवाय सर्व रामपक्षाचे असून त्यांनीं आर्यसंस्कृतीचा यापूर्वींच स्वीकार केला होता असें दिसतें. त्याप्रमाणेंच निषादांचा राजा गुह याची स्थिति होती. चित्रकूटपर्वतावरील आणि दंडकारण्यांतील ऋषींस पीडा करणारे राक्षस यांस बौद्ध लोक म्हणण्यांत जरी व्हीलर यानें या कल्पनेचा अतिरेक केला आहे तरी सीतेच्या अहिंसापर भाषणांत § तिनें राक्षसांविरुद्ध लढाई करण्यास उद्युक्त झालेल्या रामाचा निषेध केला त्यावरून असें दिसतें कीं, ही मूळ बौद्ध कल्पना आहे. तीमध्यें क्षत्रियानें प्रत्यक्ष स्वतःस इजा पोंचल्याशिवाय ब्राह्मण आणि बौद्ध यांच्या भांडणांत पडूं नये असें ध्वनित केलें आहे असें वाटतें. परंतु लंकेच्या अथवा तेथील रहिवाशांच्या वर्णनांत ज्याचा बौद्धांशीं कांहीं संबंध येईल असें कांहींच आढळत नाहीं. उलट होमरमधील ग्रीक आणि ट्रोजन लोकांप्रमाणें राम आणि रावण हे दोघेहि त्याच देवांची पूजा करीत होते असें दाखविलें आहे.* इंद्रजिताच्या ऐन्द्रजालिक हवनाच्या वेळीं उपाध्यायांनीं घातलेल्या तांबड्या पागोट्यांवरून व त्यांनीं नेसलेल्या तांबड्या वस्त्रांवरून आपणांस सामवेदांतील ऐन्द्रजालिक मंत्रांची आठवण होते.† या वस्त्रांचा बौद्ध केशरी वस्त्रांशीं (कषाय व रक्तपट) कांहीं संबंध नाहीं. ज्या एकाच ठिकाणीं बुद्धाचा उल्लेख आहे आणि जेथें त्यास चोर म्हटलें आहे तो श्लोक मागाहून प्रक्षिप्त केलेला असावा असें 'श्लेजेल' (Schlegel) याचें म्हणणें आहे.‡ वरील गोष्टी सोडून दिल्या तरी ज्याचें व्हीलर याच्या मताप्रमाणें मत असेल त्यास असें अनुमान काढावें लागेल कीं, ज्याअर्थी कवीनें बौद्ध व ब्राह्मण यांच्यामधील भांडणाचें वर्णन करण्याचा मूळ उद्देश इतक्या कुशलतेनें गुप्त ठेवला आहे, त्याअर्थी तो बौद्ध सत्तेखालीं असला पाहिजे आणि म्हणूनच त्याला आपला मूळ उद्देश गुप्त ठेवावा लागला आणि त्याला एक मूळ बौद्ध दंतकथा घेऊन तिचें आपल्या बेतास साजेल असें रूपांतर करावें लागलें.

या राजकीय आणि सांस्कृतिक हेतूंशिवाय तिसरा एक हेतु रामायणरचनेच्या मुळाशीं अगदीं बरवर पहाणाऱ्यासहि दिसून येतो. तो म्हटला म्हणजे राम हा विष्णूचा अवतार होता ही कल्पना दृढमूल करून रामाची योग्यता इतर देवतांपेक्षां वाढविणें हा होय. स्वतः वाल्मीकीच्या मनांत हा उद्देश कितपत होता तें सांगतां येत नाहीं. बहुतकरून हा उद्देश पुढें या काव्यांत भर टाकण्यास कारण झाला असेल; आणि या उद्देशानें घातलेल्या श्लोकांची इतर श्लोकांशीं जी ठिकठिकाणीं असंबद्धता दिसून येते तीवरून हें दुसरें अनुमानच बरोबर दिसतें.

तथापि रामायण हें बौद्धमताचा पाडाव करण्याच्या हेतूनेंच लिहिलें असें व्हीलर याचें मत जे लोक सर्वांशीं ग्रहण करण्यास तयार असतील त्यांच्या दृष्टीनें रामायणास दिलेलें हें वैष्णवी रूप खुद्द वाल्मीकीनें दिलें असावें हेंच मत पुष्कळ अंशांनीं ग्राह्य ठरेल. कारण हें मत बौद्धमतखंडनाच्या कल्पनेशीं तंतोतंत जुळतें. एवढें खरें कीं रामायणानें व त्याच्या या वैष्णवी रूपानें त्यांच्या देवतांना दिलेल्या निराळ्या वळणानें ब्राह्मणांनां बौद्ध लोकांनीं हिरावून नेलेली सत्ता परत मिळविण्याच्या प्रयत्नांत पुष्कळच मदत झाली. हा मोठा चमत्कारिक योग जमून आला कीं, बुद्धांच्या रामाच्या कथेला वाल्मीकीनें मोठ्या चातुर्यानें निराळ्याच वैष्णवी रूपांत नटविल्यानें ती कथा बौद्धांच्याच विरुद्ध उपयोगांत आणतां आली. या कथेमध्यें सामान्य जनतेस रुचणारीं मूळांतील तत्त्वें जशींच्या तशींच ठेऊन वर नुसता निराळा मुलामा मोठ्या कौशल्यानें करण्यांत आला.

**कृषिविषयक रूपक.**—वर दिलेल्या दंतकथांशिवाय वाल्मीकीनें दुसऱ्याहि पुष्कळ माहितीचा उपयोग आपल्या काव्यामध्यें केला असला पाहिजे व त्यामुळें तें काव्य जास्त लोकप्रिय झालें असलें पाहिजे. या काव्यांतील राम आणि ब्राह्मणांचा 'हलभृत् राम' यांचा संबंध स्पष्टच दिसतो. या रामकाव्याचीं रूपें जीं महाभारत वगैरे

* रोहिणी नदी—'क्रॅपरॉथ याच्या म्हणण्याप्रमाणें ही नदी नेपाळमधून येऊन महानन्देस मिळते व तेथून गोरखपूरनजीक रपति नदीपर्यंत पोंचते'—(Hardy) † Vide Lassen Ind. A. K. I. 535. & Webber Vorles. Uber Ind. L. G. p. 181. ‡ In. History of India (London 1869). ¶ There was also separation of Rakshasas into पौलस्त्य & शालकटंकट (VIII. 23-24) or सालंकटंकटा (VIII 20-23) i. e. Aryans & Aborigines. § III. 13. 2.

* VI. 19, 40, 52, 21. † Vide. Ind. Stud. I. 51, 52. ‡ II. 109. 33. ed. Sch.

ग्रंथांतून दिसतात त्यांमध्यें कांहीं अतिशय जुनीं असून त्यांत रामाचा काल 'सुवर्णयुग' असा वर्णन केलेला आढळतो आणि त्यावेळीं जमिनीपासून अतिशय उत्तम पीक निघत असे असें वर्णन केलेलें आढळतें. रामाचा वनवासकाल हा हिंवाळा असून यावेळीं निसर्ग विश्रांति घेत असतो व शेतकीचीं कामें बंद असतात. सीता हें नांव पौराणिक असून शिवाय. वेदामध्यें नांगराचें तास या देवतेबद्दल सीता हा शब्द वापरला आहे. या दोन शब्दांमधील संबंध लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. त्याप्रमाणेंच रामायणामध्यें शेत नांगरीत असतां सीतेची उत्पत्ति झाल्याचें वर्णन व शेवटीं भूमीच्या पोटांत तिचें झालेलें अंतर्धान या गोष्टी व तिच्या बहिणीचें नांव ऊर्मिला याचा अर्थ धान्याच्या शेतावरील लहरी असा करितां येतो, तसेंच तिचा बाप जनक याचें नांव सीरध्वज* (नांगर राजचिन्ह असलेला) असें होतें, या गोष्टीहि लक्ष्यांत घेण्यासारख्या आहेत. गृह्यसूत्रामध्यें इन्द्र अथवा पर्जन्य याच्या अर्धांगीचें जें वर्णन दिलें आहे† त्यांत थोड्याशा कविकल्पनांची भर घातली असतां आपणांस रामायणांतील सीतेचें वर्णन दिसेल. शिवाय महाभारत आणि शुक्लयजुर्वेदाचीं ब्राह्मणें यांतून उल्लेखिलेल्या विदेहदेशाच्या जनक राजाची सीता ही मुलगी कल्पिल्यामुळें तिला अधिक महत्त्व आलें; आणि यामुळें रामकथेस ब्राह्मणी स्वरूप देण्याच्या कामीं सीतेच्या गोष्टीची बरीच मदत झाली. या गोष्टीमुळें वेबरची जी पूर्वीची कल्पना होती कीं वाल्मीकि हा कोशल राज्याच्या प्रदेशांत जन्मला असावा ती दृढ होते. कोशलदेश हा विदेहदेशाला लागूनच असून ते दोन्ही देश एकमेकांशीं मित्रत्वाच्या नात्यानें असत. दशरथाचा शालक केकयदेशाचा राजा अश्वपति याचाहि उल्लेख शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मणांमध्यें जनकाचा समकालीन असा आला आहे. यजुर्वेदामध्यें सीता हें नांवहि आढळतें. परंतु त्या ठिकाणीं तें नांव सवितृ म्हणजे प्रजापति याच्या मुलीचें असून तिचें मन चंद्रावर गेलें होतें, परंतु चंद्र हा तिची बहीण श्रद्धा इच्यावर प्रेम करीत होता, पुढें तिच्या बापाच्या खटपटीनें सीता व चन्द्र यांचा विवाह झाला असें वर्णन आहे.‡ या गोष्टीचाहि वाल्मीकीनें आपल्या काव्यांत उपयोग केलेला दिसतो. सीतेच्या बापानें तिला एक हार घातला होता तो मंतरलेला असून त्यामुळेंच तिच्यावर चंद्राचें पुढें प्रेम बसलें, ही जी या दंतकथेंतील मुख्य गोष्ट तिच्यांतील कल्पनेवरूनच अत्रीची पत्नी अनुसूया इनें सीतेच्या अंगाला लावलेल्या अंगरागाची कल्पना वाल्मीकीस सुचली असावी.¶ तसेंच राम यास रामचन्द्र किंवा नुसतें चन्द्र‖ असें म्हटलेलें आढळतें. त्याप्रमाणेंच त्याचा स्वभावहि अतिशय शांत दाखविला आहे. त्यावरून रामाची कल्पना मूळ चन्द्र या देवतेवरून घेतली असून या काव्याचें मूळ तैत्तिरीय ब्राह्मणांतील कथानकामध्येंच असेल. रामायणांतील अंगराग आणि तैत्तिरीय ब्राह्मणांतील साकार अलंकार हें नांगरलेल्या जमिनीवर पडलेलें चांदण्यामध्यें चमकणारें दंव असावें. ही कल्पना खरोखरच काव्यमय दिसते व ती खरी असण्याचा संभवहि असता, परंतु राम यास रामचंद्र आणि चंद्र हीं नांवें इतकीं उशीरां दिलेलीं आढळतात कीं याच्या उलट अशीच कल्पना अधिक संभवते कीं रामाच्या शांत स्वभावामुळें पुढें त्यास एखाद्या कवीनें चन्द्राची उपमा दिली असावी. परंतु या कल्पनेवरून सुद्धां तैत्तिरीय ब्राह्मणावरून सीतेची कल्पना प्रथम सुचली असावी हें म्हणणें कायमच राहतें.

**होमरच्या काव्याची छाया.**—आतां सीतेच्या हरणाची मूळ कल्पना बौद्ध काव्यामध्यें नसल्यामुळें ही कल्पना वाल्मीकीनें प्रथम कोठून घेतली हें आपण पाहूं. व्हीलर याच्या मताप्रमाणें अनार्य अथवा बौद्ध लोकांवर झालेली खरोखरीच एखादी स्वारी वर्णन करावयाचें कवीच्या मनांत होतें काय? किंवा इतर गोष्टींप्रमाणें ही कल्पनाहि त्यानें दुसऱ्या कोठून उचलली असावी? वेबर याच्या मताप्रमाणें ही कल्पना वाल्मीकीनें हेलेनचें हरण व ट्रॉयशहराचा वेढा या गोष्टींवरून घेतली असावी. यावरून वाल्मीकीस होमरचीं काव्यें अवगत असावीं अथवा त्यांचें अस्तित्व त्यास ठाऊक असावें असें अनुमान निघत नाहीं. किंवा मोनिअर वुइल्यम्सप्रमाणें अगमेम्नॉन आणि सुग्रीव, पेट्रोक्लस आणि लक्ष्मण, नेस्टर आणि जांबवंत, ओडेशियस आणि हनुमन्त, हेक्टर आणि इंद्रजित यांच्या स्वभावसाम्यांसहि विशेष महत्त्व देतां येत नाहीं. (या स्वभावसाम्यांवरून रामायणाचा फ्रेंच भाषांतरकार हिप्पोलिते फोशे यानें वाल्मीकीपासून होमर यानें ही कल्पना उचलली असें अनुमान काढलें आहे.)

मोनिअर वुइल्यम्स यानें दाखविलेलीं कल्पनासादृश्याचीं स्थळें, उदाहरणार्थ, सीतेचें स्वप्नदर्शनानें शांतवन, लंकेच्या तटावरून रामसेनेचें निरीक्षण, सीतेचें सैन्यास दर्शन इ. जरी सोडून दिलीं आणि ग्रीक काव्याचा ठसा या आर्य काव्यावर कितपत उठला आहे हें पाहण्याचें जरी बाजूस ठेवलें तरी अलेक्झँडरच्या स्वारीमुळें हिंदुस्थान आणि ग्रीस या देशांतील लोकांचा जो संबंध जडला त्याचा विचार केला असतां असें दिसून येईल कीं, होमरच्या काव्यांतील गोष्टी भारतीय लोकांस थोड्याबहुत अवगत झाल्या होत्या. त्यांपैकीं कांहींचा उल्लेख 'मिलिंदपन्ह'* सारख्या बौद्धकाव्यांतून आढळून येतो. याखेरीज होमरच्या काव्यांतील दोन गोष्टी सिंहलद्वीपांतील कांहीं पाली ग्रंथांतून आढळून येतात. ओडेशियस याचेवरील किरके बेटांतील प्रसंगाचें वर्णन महावंसोमध्यें आढळतें.† त्याप्रमाणेंच ट्रॉयमधील घोड्याची गोष्ट घोड्याच्या ऐवजीं हत्ती करून दिलेली बुद्धघोषाच्या धम्मपद ग्रंथावरील टीकेंत आढळते.‡ त्याप्रमाणेंच या ग्रीक लोकांशीं आलेल्या संबंधामुळें इसापनीतींतील गोष्टींसारख्या इतर पुष्कळ गोष्टी आर्यावर्तांत आल्या. ऋग्वेदाच्या एका उपनिषदामध्यें गनीमीडच्या हरणाबद्दलच्या गोष्टीसारखी गोष्ट आढळून येते.¶ याप्रमाणेंच रामायणांतहि कांहीं गोष्टी आढळून येतील. उदाहरणार्थ, धनुर्भंगाची कथा वाचून ओडेशियसच्या

* उत्तररामचरित. † Cf. Webber's Abh. Uber Omina und Portenda pp. 370–373. ‡ Taitt. Bra. II. 3, 10, 1–3. ¶ Ramayana III 3. 18. § Bhavabhuti महावीरचरित. III. 18. ‖ Ramtap p. 333.

* Ind. Stud. III. 369. † महावंसो. Ch. VII. Turner. p. 48. ‡ Vide Fausboll. p. 158. Roger's Buddhaghosa's Parables p. 39. ¶ Ind. Stud. IX. 41.

धनुष्याची आठवण होते. जनकजातकामध्यें गलबत फुटल्यामुळें वहात असलेल्या मनुष्यास एका जलदेवतेनें वांचवून किनाऱ्यावर आणिलें, तेथें तो राजा झाला आणि एक धनुष्य वांकवून त्यानें आपलें सामर्थ्य दाखविल्यावर तेथील राणीशीं त्याचें लग्न झालें अशी गोष्ट आहे.* या गोष्टींत ओडेसियस यास ल्युकोथिया इनें वांचविल्याची व त्यानें धनुष्य वांकविल्याची गोष्ट एकत्र केली आहे. आतां या वरील गोष्टी जर होमरपासून घेतलेल्या असतील तर रामायणाचें मूळहि होमरमध्येंच सांपडेल. वरील जनकजातकामधील गोष्टी जरी ब्रह्मी भाषांतरावरून घेतल्या आहेत तरी त्यांच्या खरेपणाबद्दल संशय नसल्यामुळें त्यांचा या बाबतींत आधार घेण्यास हरकत नाहीं. याशिवाय रामायणामध्यें आढळून येतात अशा दोन पाश्चात्त्य कल्पनांपैकीं एक हनुमानानें सूर्यास न उगवण्याबद्दलची केलेली आज्ञा ही जोशुआप्रमाणें दिसते.†

दुसरी रामानें सीतेला वनांत सोडल्यानंतर अश्वमेधाच्या वेळीं सीतेची केलेली सोन्याची प्रतिमा ही होय.‡ ही गोष्ट विल्सन यानें युरिपीडिसच्या अलकेटिसमधील¶ गोष्टीसारखी दिसते असें दाखविलें आहे.§

तसेंच डॉ. लासेन याच्या म्हणण्याप्रमाणें अलेक्झँडरबरोबर मैत्री करणारा 'कीकेओइ' देशचा राजा सोपेइथिस हाच दशरथाचा शालक केकय देशाचा राजा अश्वपति असावा ही समजूत कांहीं अगदींच टाकाऊ दिसत नाहीं. तथापि असें असण्याचा जास्त संभव आहे कीं वाल्मीकीनें अश्वघोष या नांवाचा उपयोग केवळ तें नांव यजुर्वेदामध्यें आलेलें आहे म्हणून केला असावा.

यावरून आपणांस स्थूलमानानें रामायणरचनेचा काल काढतां येईल काय तें पाहूं.

**रामायणरचनेचा काल.**—आपणाला प्रथम ग्रीक ग्रंथकार ट्रजन याच्या कालीं होऊन गेलेला डायो क्रिसोस्टोम आणि नंतर एलियन यांच्या ग्रंथांत आर्यावर्तामध्यें होमरच्या काव्याचें भाषांतर असल्याबद्दलचा उल्लेख आढळून येतो. हें म्हणणें जरी शब्दशः खरें धरलें नाहीं तरी यावरून इतकें अनुमान निघतें कीं या कालाच्या सुमारास ग्रीस आणि आर्यावर्त या दोन देशांमध्यें होमरच्या काव्याप्रमाणें दोन महाकाव्यें प्रचलित होतीं. त्याप्रमाणेंच डायो क्रिसोस्टोम यानें म्हटलें आहे कीं आर्यावर्तांतील लोकांस प्रायमचा शोक, अँड्रोमॅकि आणि हेकबे यांचा विलाप, आणि ॲचिलिस व हेक्टर यांचें शौर्य यांची कल्पना होती. यावरून महाभारत व रामायण—विशेषतः महाभारत—या ग्रंथांवर ग्रीक काव्यांची छाप होती असें अनुमान निघतें. परंतु लंकेवरील स्वारी आणि त्या शहराचा वेढा यांचें ट्रॉयवरील स्वारी आणि त्याचा वेढा यांच्याशीं जितकें साम्य दिसतें तितकें साम्य कुरुक्षेत्राच्या मैदानावर झालेल्या भारती युद्धांत दिसून येत नाहीं. उलट डायो क्रिसोस्टोम हा रामायणांतील सीतेचें हरण हें जें मूळ युद्धाचें कारण व नंतर झालेली लंकेवरील स्वारी यांचा मुळींच उल्लेख करीत नाहीं. त्यावरून त्याच्या मनांत आर्यावर्तांतील आर्षकाव्य हें रामायण नसून महाभारत असावें असें दिसतें. परंतु याविरुद्ध असेंहि म्हणतां येईल कीं डायो क्रिसोस्टोम हा रामायण म्हणजे होमरचें भाषांतरच समजत असल्यामुळें त्याच्या प्रस्तुत कार्याकरितां त्याचा वेगळा उल्लेख करण्याची गरज त्यास वाटली नाहीं. यावरून त्यास रामायणाची माहिती असण्याचा संभव होता असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं. परंतु एवढ्यावरून आपल्याला या काव्याच्या कालनिर्णयाबद्दल विशेषसें खात्रीचें असें अनुमान काढतां येत नाहीं.

(डायो क्रिसोस्टोम याचा काल अद्याप नक्की झाला नाहीं. वेबर याच्या मतें तो प्लिनीनंतर झाला असावा. बेनफे याचेंहि तेंच मत आहे. लासेन याच्या मतें मेगास्थिनीस यानें प्रथम रामायणाबद्दल ग्रीस देशांत माहिती आणिली.)

आपण प्रथम या काव्यांतर्गत पुराव्याचा कालनिर्णयार्थ विचार करूं.

**काव्यांतर्गत पुरावा.**—१ हें काव्य मोठें असल्यामुळें एका कवीकडून तें लिहिलें जाणें शक्य नाहीं. हें समग्र लिहून होण्यास कित्येक शतकें लागलीं असतील व वरचेवर त्यामध्यें भर पडत गेली असेल. प्रत्येक हस्तलिखित प्रतींत निरनिराळा मजकूर आढळून येतो. या काव्याच्या निरनिराळ्या प्रतींत विरोध व कांहीं ठिकाणीं विसंगतपणा दिसून येतो, त्यावरून या काव्यामध्यें निरनिराळ्या लोकांनीं तपासून भर टाकली आहे हें स्पष्ट होतें.

आजपर्यंत ठाऊक असलेल्या प्रतींत व्हीलर यानें एका 'वायव्य प्रती'ची भर टाकली आहे. ही प्रत अगदींच अर्वाचीन दिसते आणि या प्रतींत पुष्कळसा मजकूर गाळलेला दिसतो.* निरनिराळ्या प्रतींमध्यें मूळ कोणतें व प्रक्षिप्त भाग कोणता हें कळणें फार कठिण आहे. बालकांडांतील विश्वामित्राच्या कथेमध्यें† क्षत्रियाचा ब्राह्मण केल्यामुळें ही कथा फार प्राचीन दिसते. त्याप्रमाणेंच रामानें परशुरामाच्या केलेल्या पराजयाची गोष्ट आहे.‡ या गोष्टी एकंदर ब्राह्मणांच्या मनांविरुद्ध असून सुद्धां कवीनें चातुर्यानें वर्णन करून त्यांची नावड घालविली आहे. या गोष्टी मुख्य कथानकाशीं जरी कदाचित विसंगत दिसल्या तरी सुद्धां त्या मागाहून घुसडून दिल्या असतील असें म्हणणें अशक्य आहे. या गोष्टी सर्व प्रतींत आढळून येतात. परंतु जनक राजाचा पुरोहित शतानन्द यानें सांगितलेली विश्वामित्राची धेनुहरणाची गोष्ट घ्या. या गोष्टींत पल्हव, शक, कांबोज येथील यवन वगैरे लोकांपैकीं—कांबोज, पल्हव, यवन, शक, बर्बर, म्लेच्छ, तुषार, हारीत, किरात यांची यादी दिली

* Life & Legend of Gaudama 1866 ed. p. 415.
† ही गोष्ट सर्व प्रतींत आढळून येत नाहीं. वरील विधान व्हीलर याच्या भाषांतरावरून केलेलें आहे आणि तें वायव्येकडील प्रतीवरून केलें असावें. मुंबई प्रतींत याबद्दल उल्लेख नाहीं.
‡ परंतु ही गोष्ट उत्तरकांडांत असून ती वास्तविक रामायणामध्यें मागाहून घातलेली आहे. ¶ V. 341-345. § Hindu Theatre, I. 337.

* Wheeler p. LXXXV 28, 65, 144, 203. † Chap. 51. 65. Schlegel. ‡ ibid Chap. 84-86.

आहे. हे सर्व लोक वसिष्ठ ऋषीच्या आज्ञेनें त्याच्या कामधेनूनें विश्वामित्राच्या सैन्याचा पराजय करण्याकरितां उत्पन्न केले होते. हीं नांवें रामायणामध्यें येणें पल्हव, शक, यवन वगैरे लोक येऊन त्यांनीं भारतीय क्षत्रियांचा ज्या वेळीं पराजय केला त्याच वेळीं शक्य आहे (कारण या गोष्टींत या लोकांनीं विश्वामित्राच्या सैन्याचा पराजय केला). हा काल म्हणजे ग्रीस व बॅक्ट्रियामधील लोक आणि भारतीय शक लोक यांनीं ज्या वेळीं वायव्य प्रांत काबीज केला तो होय.

या वरील गोष्टीस अनुसरूनच पुढें चतुर्थकाण्डांत कांहीं गोष्टी आढळून येतात. सुग्रीवानें सीताशुद्ध्यर्थ ज्या वेळीं चारी दिशांकडे वानर धाडले त्या वेळीं त्यांनीं पाहिलेल्या निरनिराळ्या देशांचीं व तेथील लोकांचीं वर्णनें दिलीं आहेत. उदाहरणार्थ, पश्चिमदिशेकडील वानरांनीं पुढील ठिकाणीं शोध केला. यवनांचीं नगरें, पल्हवांचीं घरें, आणि त्याच्या जवळच पंचनद (पंजाब), काश्मीर [पारद, (क)*], तक्षशिला, शाकल, पुष्कलावती, शाल्व, मणिमंत पर्वत [अरट्ट, कपिश, वाल्हिक (अ, क)], गान्धार देश इ. उत्तरेकडील देशांमध्यें, गान्धार, यवन, शक, ओड्र, पारद [चीन, पौंड्र, मालव, (अ, क,)], वाल्हीक, ऋषीक, पौरव, किंकर, (रामथ अ, क)), चीन, अपर–चीन, [अरम–चीन, (अ, क)] तुखार, वर्बर, कांबोज, [खस? (क)] दरद आणि हिमवन्त.† यांपैकीं मुख्य मुख्य नांवें सर्व प्रतींतून आढळतात. हीं नांवें ज्या वेळीं यवन (ग्रीक), पल्हव, पारद, शक वगैरे लोक वायव्य प्रांतांत येऊन राहिले होते व यामुळें कांबोज, वाल्हीक, दरद, गान्धार वगैरे लोकांचे शेजारी झाले होते त्याच वेळीं या ग्रंथांत येणें शक्य आहे. दुसऱ्या कांडामध्यें एका ठिकाणीं‡ यवनांचें राज्य शक लोकांच्या राज्याला लागून होतें असा उल्लेख आहे.

२ दुसरी विचार करण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे रामाची जन्मपत्रिका होय. विशेषतः त्या वेळीं राशींनां दिलेलीं कर्कट आणि मीन हीं नांवें लक्षांत घेण्यासारखीं आहेत. या नांवांवरून श्लेजेल यानें या ग्रंथाचें पुराणत्व प्रस्थापित केलें एवढेंच नव्हे तर त्यानें राशिचक्राचा शोध प्रथम भारतदेशांतच लागला असें ठरविलें.¶ परंतु होल्ट्झमन याच्या ग्रंथावरून (Uber den Griechischen Ursprung de Indischen Thierkreisco Karlshruhe 1841.) आतां खरी गोष्ट याच्या उलट असल्याबद्दल कोणासच संशय उरलेला नाहीं. हल्लीं प्रचारांत असलेलें राशिचक्र खिस्तपूर्व पहिल्या शतकांत हिंदुस्थानांत आलें असावें, त्याच्या पूर्वीहि नव्हे अथवा त्यानंतरहि नव्हे. आणि हें सर्वसाधारणपणें प्रचारांत येऊन सर्व लोकांस माहीत असल्याप्रमाणें या गोष्टीचा कवीनें उल्लेख करण्यास कांहीं तरी कालावधि लागलाच असला पाहिजे. यद्यपि ही जन्मपत्रिका बंगालमधील त्याप्रमाणेंच वरील अ, ब, क वगैरे प्रतींत आढळून येत नाहीं* तरी ती किंचितहि फरक न दिसतां श्रीरामपूर, श्लेजेल, आणि मुंबई वगैरे प्रतींत आढळून येते. याशिवाय ग्रंथाच्या इतर भागांत जरी ज्योतिषासंबंधीं उल्लेख आढळतो तरी राशिचक्राबद्दल कोठेंहि उल्लेख आढळत नाहीं. त्यावरून ज्या प्रतींमध्यें राशिचक्र आढळतें त्या प्रतींबद्दल तरी असें अनुमान निघतें कीं मागाहून कोणीतरी ज्योतिष्यानें एवढ्या महत्त्वाच्या गोष्टीबद्दल नक्की माहिती दिली पाहिजे असें समजून ही पत्रिका घुसडून दिली असली पाहिजे.†

आपण या पत्रिकेबद्दलची गोष्ट सोडून देऊन इतर जे ज्योतिषासंबंधीं उल्लेख आढळतात त्यांसंबंधानें विचार करूं. रामायणामध्यें नक्षत्रांचीं नांवें असून कांहीं ग्रहांचींहि नांवें आढळतात.‡ या ग्रहांबद्दलची माहिती भारतीय ज्योतिषांस रामायणरचनेचा हल्लीं जो काल धरतात त्याच्या पुष्कळ मागाहून लागलेली आहे. या ग्रहांचा उल्लेख प्रथमतः याज्ञवल्क्याच्या अथर्वपरिशिष्टामध्यें आढळतो. (I. 294 ff.)¶. तसेंच ज्या श्लोकांमध्यें या ग्रहांचा उल्लेख आढळतो त्या श्लोकांमध्यें मंगळ (Mars) याचा युद्धाशीं, बुध (Mercury) याचा व्यापाराशीं, गुरु (Jupiter) याचा यज्ञविधीशीं वगैरे जे संबंध दाखविले आहेत त्यांवरून भारतीय ज्योतिषांस या ग्रहांचें ज्ञान प्रथम ग्रीक लोकांपासून मिळालें असलें पाहिजे असें दिसतें.§ कारण मंगळ, बुध, गुरु यांचा संबंध भारतीय कल्पनेप्रमाणें वरील गोष्टींशीं जुळत नाहीं.

३ रामायणामध्यें सिलोन बेटास ग्रीक लोकांस ठाऊक असलेलीं जीं नांवें ताम्रपर्णी, सिंहल, पालिसीमन्त‖ यांपैकीं एकहि नांव न देतां सर्व ठिकाणीं लंका हें नांव दिलें आहे.

---

* कंसामध्यें (अ,ब क) अक्षरें दिलीं आहेत तीं निरनिराळ्या हस्तलिखित प्रतींचीं द्योतक आहेत. हीं बर्लिनमधील रॉयल लायब्ररीमध्यें तीन हस्तलिखित प्रती आहेत त्यांस वेबर यानें दिलेलीं नांवें आहेत. † IV. 44. 13 &c. Gorr. ‡ II. 2-10 Gorr. ¶ Z. fur die Kunde des Morgeul I. 354 ff. III. 369 ff.

* Vide Kern Vorrende zu Varahmihira's Brihatsamhita p. 40. † या ठिकाणीं आपणांस फक्त तर्कानें अनुमान काढावयाचें आहे. यावरून नक्की काळ ठरवितां येत नाहीं (See Weber Abh. uber die Naksh 1. 288) बेंटले यानें रामाच्या जन्मपत्रिकेवरून त्याचा जन्मकाल खि. पू. ९४० वर्षीं असावा आणि रामायणरचनेचा काल इ. स. २९५ असावा असें ठरविलें आहे. (Hindu Astronomy, London 1825, p. 14 ff.) गेऱ्यां (Guerin) यानें रामायणरचनेचा काल इ. स. १०५ हा ठरविला आहे. (Astronomie Indienne p. 238). ‡ I. 71, 24;72, 13. II. 4,20–21. Schlegel. V. 55,1,2,73,15;56 ff. Gorr. ¶ Cf. however मनु I. 24; VII. 121. See. Ind. Stud. II 240,242. § Vide Ind. Stud VIII. 413. X. 319.‖ यांपैकीं ताम्रोबेन हें फार प्राचीन काळीं, पालिसिमुन्दु हें पेरिप्लुसच्या काळीं, आणि सलिके अथवा सिएलेदिव हें नांव टॉलेमी व कॉसमास इंडिको प्लुयुस्टस यांच्या वेळीं होतें.

लंका हें नांव ग्रीक लोकांस माहीत नव्हतें. त्याचा प्रथम उल्लेख ( महावंसो सोडून दिल्यास पृ. ४७ ) अथर्व-परिशिष्ट ( कूर्मविभाग–सिंहललोकांची लंकापुरी ) यामध्यें आढळतो. नंतर आर्यभट्ट, वराहमिहिर यांच्या ग्रंथांत आढळतो. रामायणामधील भूगोलक्षेत्र महाभारतापेक्षां मोठें आहे. कारण महाभारतामध्यें फक्त कुरुक्षेत्रावरील लढाईचें वर्णन करावयाचें होतें पण रामायणामध्यें लंकेपर्यंतचा प्रदेश आक्रमावयाचा होता. तथापि पुष्कळांचें असें म्हणणें आहे कीं रामायणामध्यें दक्षिणेमधील भूगोलविषयक माहिती फारशी बिनचूक नाहीं; परंतु वायव्येकडील प्रांताबद्दलची माहिती मात्र कवीला बिनचूक होती असें दिसतें. ही गोष्ट वर दिलेल्या विश्वामित्राच्या कथेवरून व भरतास मामाकडून आणावयास धाडलेल्या दूतांचा व भरताचा प्रवास वर्णन केला आहे त्यावरून दिसते.* लंकेमधील रावणाच्या प्रासादामध्यें हनुमानास वायव्येकडील उमदे घोडे आढळल्याचें वर्णन आहे.† तसेंच भरतानें अश्वपतीपासून मिळालेले कुत्रे आणले. या कुत्र्यांचें वर्णन ग्रीक लोकांच्या 'कीकेओइ' देशाच्या वर्णनांत आढळतें.‡

४ रामायणामध्यें संस्कृत हा शब्द कोणत्याहि विशिष्ट अर्थी वापरलेला दिसत नाहीं.¶ परंतु या कालाच्या सुमारासच हा शब्द देशभाषेहून एका निराळ्या विशिष्ट भाषेचा द्योतक बनत चालला होता.$ त्याप्रमाणेंच यावेळीं साधारणतः प्रचारांत असलेल्या व बऱ्याच परिणत अवस्थेस पोंचलेल्या वाङ्मयाचा उल्लेख ठिकठिकाणीं आढळतो. यापैकीं कांहीं वाङ्मयास साधारणतः अर्वाचीन नांवें दिलेलीं आढळतात. उदाहरणार्थ, शास्त्र हा शब्द नुसताच एखाद्या ग्रंथाचें नांव असल्याप्रमाणें उल्लेख केलेला आढळतो व कांहीं ठिकाणीं हाच दुसऱ्या एखाद्या शब्दाच्या शेवटीं जोडलेला आढळतो. वेद, शिक्षादि सहा वेदांगें, सूत्र, भाष्य, कल्पसूत्र, यांशिवाय पुढील नांवें आढळतात; धनुर्वेद, त्याचीं अंगें, उपांगें, उपनिषद्, रहस्य, गंधर्वविद्या, ( ज्योतिर्गतिपु निष्णाताः ) ज्योतिष, लेख्य-संख्या, अर्थशास्त्र, त्याप्रमाणेंच शिल्पादि कला, नाटक, धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, न्यायशास्त्र, तसेंच कांहीं ठिकाणीं जडवादी व नास्तिक [ लोकायतिक,‖ आणि नास्तिक§ ] लोकांच्या मतांचा उल्लेख केलेला आढळतो. कांहीं ठिकाणीं अवतरणें घेतलेलीं दिसतातः—

हस्तिभिर्गीताः श्लोकाः ॥ (१) ( नातेवाइकांमधील वैराबद्दल ). कण्डुना गीताश्चिरोद्गाः ॥ (२) ( साहाय्य मागणाऱ्यां–बद्दल ). पौराणिगाथा, (३) इमं पुराणं धर्मसंहितम्…… ऋक्षेण गीतो यः श्लोकः ॥. (४)

* I. 55. 18 ff. II. 70,6,11-19,73. Gorr. Lassen. Ind. Alt. II. 553. † V. 12-36. ‡ Lassen Ind. Alt. II. 16. ¶ Vide Ind. Streifen II. 53. $ I. 51. 3. Gorr. ‖ II. 109.29. § I. 5.212. II. 109,64. 114,40 जावालि III. 69.5.

१ V. 88.6. २. VI. 91.7. ३. VI. 110.2. ४. VI. 98.32.

त्याप्रमाणेंच धन्वन्तरी याचा उल्लेख वैद्यांचा राजा (१) व सुषेण याचा पिता (२) असा केला आहे. तसेंच जैमिनी (३), कात्यायन (४), जावालि, मार्कंडेय यांचा अयोध्या येथील मन्त्री म्हणून उल्लेख केला आहे.

या वाङ्मयविषयक उताऱ्यांवरून ( हे गौड प्रतींमधून घेतलेले आहेत ) जरी रामायणाचा नक्की काल आपणांस ठरवितां येत नाहीं तरी रामायण हल्लीं समजलें जातें इतकें प्राचीन नाहीं हें ठरविण्यास यांवरून पुष्कळसा आधार मिळतो.

५ रामायणावरून जी परमार्थसाधनाबद्दल ऐतिहासिक माहिती मिळते तीवरून रामायण हें फार प्राचीन होतें असें म्हणण्यास फारसा निश्चित असा आधार मिळत नाहीं.

या ठिकाणीं ही गोष्ट लक्ष्यांत ठेवली पाहिजे कीं या काव्यांत कृष्णाचा अथवा कृष्णपूजेचा कोठेंहि उल्लेख आढळत नाहीं* यावरून वास्तविक रीतीनें हें काव्य आपणांस अतिशय प्राचीन आहे असें अनुमान काढतां येत नाहीं. तसेंच यामध्यें डाकिनी अथवा विद्याधर यांचा उल्लेख नाहीं त्यावरूनहि या ग्रंथाची फारशी प्राचीनता सिद्ध होत नाहीं.

इंद्र, अग्नि, वायु, रुद्र वगैरे वैदिक देवतांचा मात्र वरचेवर उल्लेख असून त्यांनीं कथानकामध्येंहि भाग घेतल्याचा उल्लेख आहे. परंतु त्यांच्या बरोबरीनेंच ब्रह्मा, विष्णु ( नारायण ), महेश यांचाहि उल्लेख असून कवीच्या मनाची प्रवृत्ति या सर्व देवतांमध्यें विष्णूचें श्रेष्ठत्व स्थापन करण्याकडे असलेली निदान या काव्याचें जें हल्लीं स्वरूप आहे त्यावरून स्पष्ट दिसून येते. या हेतूस पुष्टिकारक अशा शबरी, शरभंग, कबन्ध, विराध वगैरेंच्या दंतकथा आहेत त्या मोनिअर वुइल्यम्सच्या मताप्रमाणें ख्रिस्ती दंतकथांवरून† घेतलेल्या आहेत, किंवा वेबर याच्या मताप्रमाणें बौद्ध दंतकथांवरून घेतलेल्या‡ आहेत, हें सध्यां तरी अनिश्चितच आहे. परंतु या दंतकथा मूळांत नसून मागून घातलेल्या आहेत असें म्हणणें बरेंच कठिण आहे.

६ या ग्रंथाची भाषा महाभारतापेक्षां जास्त व्याकरणशुद्ध आहे. त्याप्रमाणेंच या दोन ग्रंथांच्या रचनेमध्येंहि फार फरक दिसून येतो. रामायणाच्या प्रत्येक सर्गाच्या शेवटील श्लोक ( सर्व प्रतींमध्यें ) काव्याच्या साध्या अनुष्टुप् वृत्तांत नसून

१. I. 46.30. २. I. 66.22. ३. II. 82.10. ४. I. 71.4. VI. 112.73.

* या ठिकाणीं ही गोष्ट लक्ष्यांत ठेवली पाहिजे कीं, राम व कृष्ण या दोन विष्णूच्या निरनिराळ्या अवतारांचे भक्त निरनिराळ्या संप्रदायांचे असल्यामुळें त्यांच्यामध्यें एकमेकांविषयीं मत्सर असणें संभवनीय असून त्यामुळें रामायणामध्यें कृष्णाचा उल्लेख नसणें संभवनीय आहे. वैष्णवी धर्मांतील रामपूजा ही जास्त प्राचीन होती हें खरें, तथापि हा एक निराळा पंथ होण्याचें कारण कदाचित् कृष्णपूजा पूर्वी प्रचलित होऊन जाणें हेंहि असूं शकेल. † S'abari indeed recalls the "woman of Samaria" ‡ Râm. Tap. Up. p. 276.

निरनिराळ्या वृत्तांमध्यें रचिलेले आढळतात. यावरून हें काव्य जास्त अलंकारिक व शुद्ध करण्याचा हेतु असावा असें उघड दिसतें; म्हणून रामायणास पुष्कळ ठिकाणीं महाकाव्य म्हटलें आहे. याच गोष्टीला सर्गांचीं नांवेंहि पण थोडासा आधार देतात.

येथपर्यंत दिलेल्या ग्रंथांतर्गत प्रमाणांवरून रामायण हें आर्यावर्तावर ग्रीक संस्कृतीची छाप बसल्यानंतर लिहिलें गेलें असावें अशी कल्पना करणें वावगें होणार नाहीं असें दिसतें. नाहींतर आपणांस या काव्यांतील कांहीं महत्त्वाचा भाग प्रक्षिप्त म्हणून गाळावा लागेल. (त्यांतील ग्रहांचा उल्लेख आलेला भाग गाळणें बरेंच कठिण जाईल). कारण या भागावरूनच ग्रीक लोकांचा संबंध आढळून येतो. इतर मराठी वाङ्मयामध्यें या काव्याचा जो जो उल्लेख येतो त्यावरून काढलेलीं प्रमाणेंहि वरील अनुमानासच बळकटी आणतात.

राजतरंगिणीमध्यें (१-११६) दामोदर राजास एक दिवसांत सर्व रामायण ऐकण्याचा योग येईपर्यंत सर्पयोनीमध्यें जन्म काढण्याचा शाप मिळाल्याबद्दल गोष्ट आहे. ही जर पुरेशी मानली* तर यावरून रामायण हें फार जुनें होतें असें सिद्ध होतें. कारण, दामोदर राजा हा खिस्तपूर्व चवदाव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेला. परंतु राजतरंगिणी हा ग्रंथ इसवी सनाच्या बाराव्या शतकांत (इ. स. ११२५ सु.)† लिहिला गेला हें प्रसिद्ध आहे. तेव्हां केवळ या ग्रंथाच्या रचनेपूर्वीं २४०० वर्षें होऊन गेलेल्या एका राजाच्या शापासंबंधानें या ग्रंथांत वर्णन असून त्यांत रामायणाचा संबंध येतो एवढ्यावरून रामायणाचें पुरातनत्व सिद्ध होतें असें म्हणणें जरा धाडसाचेंच होईल. शिवाय, राजतरंगिणीमधील दामोदर राजाचा खिस्तपूर्व चवदाव्या शतकाशीं कांहींएक संबंध नाहीं. कारण या काव्यांत त्याला अशोकाचा वंशज असें म्हटलें आहे (१-१५३). याच्यामागून गादीवर बसलेल्या राजांचीं नांवें भारतीय-शक (तुरुष्क) राजे हुष्क, जुष्क, कनिष्क अशींच दिलीं असल्यामुळें हा ग्रीक राज्य नाहींसें झाल्यानंतर खिस्तपूर्व प्रथम शतकांतच होऊन गेला असावा असें वाटतें. या बाबतीमध्यें राजतरंगिणी ग्रंथास जरी विशेष महत्त्व दिलें नाहीं तरी रामायणाचा सर्वांत प्राचीन काळ पाहूं गेलें असतां यवन व शक यांच्या राज्यांच्या दरम्यान येतो व या वेळीं तें पूर्ण झालें होतें असें दिसत नाहीं. यवन आणि शक या दोहोंचाहि उल्लेख रामायणांत आढळतो, हें वर सांगितलेंच आहे.

**रामायणाचा इतर ग्रंथांत उल्लेख.**—कालानुक्रमानें रामायणाबद्दलचे उल्लेख पाहूं गेलें असतां प्रथम उल्लेख जैनांच्या अनुयोगद्वारसूत्रांत आढळतो. या ठिकाणीं भारताप्रमाणें हें काव्यहि नास्तिक काव्यामध्यें सर्वांत वरच्या पायरीचें ठरविलें आहे. अनुयोगद्वारसूत्र हें भगवतीसूत्रानंतर पुष्कळ वर्षांनीं रचलेलें आहे आणि जरी हें जैन सूत्रांपैकीं बरेंच प्राचीन सूत्र आहे तथापि त्यास त्यांच्या मुख्य द्वादश अंगांमध्यें स्थान मिळालेलें नाहीं. याचें माहात्म्य सूर्यप्रज्ञप्तिसूत्राइतकेंच आहे. तथापि तें सतराव्या शतकामध्यें लिहिलेल्या कल्पसूत्रापेक्षां पुष्कळ जुनें आहे. या सूत्राचा नक्की काल मात्र आपणांस ठरवितां येत नाहीं. परंतु या सूत्रामध्यें उल्लेख केलेलें भारत हें प्रथम झालें असून रामायण हें त्यानंतर रचलें गेलें असावें असें म्हणणें कदाचित् ज्यास्त सयुक्तिक दिसेल. कारण महाभारतामध्यें रामायणाचा उल्लेख आलेला असून रामायणामधील रामाची सर्व कथा महाभारतामध्यें आढळते. परंतु ही गोष्ट नक्की ठरविण्याच्या कामीं मुख्य अडचण ही येते कीं अनुयोगद्वारसूत्राच्या कालीं जें भारत होतें त्यामध्यें ही रामाची कथा त्या वेळीं होती किंवा ती मागाहून प्रक्षिप्त केलेली आहे हें नक्की कळत नाहीं.

**महाभारतांतील रामोपाख्यान.**—महाभारतामध्यें रामायणाबद्दलचे उल्लेख पाहूं जातां प्रथम मुख्यतः तिसऱ्या पर्वाच्या शेवटीं रामोपाख्यानामध्यें रामायणांतील कथेप्रमाणेंच संक्षेपतः सर्व कथा दिलेली आढळते. परंतु या कथेमध्यें रामायणाचा अथवा वाल्मीकीचा उल्लेख मुळींच आढळत नाहीं. ही कथा जयद्रथानें हरण करून नेलेल्या द्रौपदीस परत आणल्यावर युधिष्ठिराचें शांतवन करण्याच्या हेतूनें पूर्वींहि याप्रमाणें गोष्टी घडून आल्या आहेत असें दाखविण्याकरितां मार्कंडेय ऋषीच्या मुखामध्यें घातली आहे. परंतु या दोन कथांमधील सादृश्य, व त्यांच्या लेखनामधील सादृश्य पाहून महाभारतांतील कथा ही वाल्मीकीच्या कथेचेंच सार असावें असें वाटतें. परंतु या दोन्ही कथांमध्यें कांहीं फरकहि आढळून येतात. उदाहरणार्थ, महाभारतांतील कथेंत रावण व त्याचे बन्धू यांचा पूर्ववृत्तान्त, दशरथानें केलेला यज्ञ, रामाचें शिक्षण व सीताप्राप्ति व बालकांडांतील बहुतेक भाग अजीबात गाळला आहे. या कथेस रामजन्मापासून आरंभ करून त्याच्या बालपणांतील कांहीं गोष्टी देऊन दशरथानें त्यास युवराज करण्याचा बेत केल्याचें सांगितलें आहे. नंतर अयोध्याकांड व अरण्यकांड यांतील भाग थोडक्याशा श्लोकांत सांगून टाकला आहे. मुख्य ज्या उद्देशानें ही गोष्ट सांगितली तो भाग आल्यापासून वर्णन जरा विस्तृत तऱ्हेनें दिलें आहे. शूर्पणखेचें काननाक कापल्यानंतर रावणाकडे झालेलें आगमन या गोष्टीपासून पुढील हकीकत सर्व रामायणाप्रमाणेंच क्रमाक्रमानें बारीकसारीक गोष्टींत कोठें क्षुल्लक फेरफार करून सांगितली आहे. कबन्धाची गोष्ट दिली आहे पण त्याच्या शापमोचनाचा उल्लेख केला नाहीं. शबरीची कथा सांगितलेली नाहीं. त्याप्रमाणेंच ब्रह्मदेवानें सीतेस पाडलेल्या स्वप्नाची हकीकत दिलेली नाहीं. त्रिजटेचें स्वप्न व रावणानें सीतेस दिलेली भेट या गोष्टी, सुग्रीवास राज्यदान व ४ महिन्यांनीं त्याला युद्धास मदत करण्यास केलेलें पाचारण या दोन गोष्टींच्या दरम्यान दिलेल्या आहेत. सीताशुद्धि ही हनुमानाच्या रामाजवळील लहानशा भाषणांत वर्णन केली आहे. या कथेंत रामायणाप्रमाणें समुद्राशीं युद्ध केल्याशिवायच त्यानें नलाच्या हातून सेतु बांधविण्यास संमति दिली. बिभीषणाचें आगमन सेतु पुरा होण्याच्या पूर्वीं न देतां मागाहून दिलें आहे. कुंभकर्णास रामाच्या ऐवजीं लक्ष्मणानें मारल्याचें वर्णन आहे. निकुंभिलेमध्यें इंद्रजितानें केलेल्या हवनाचें वर्णन दिलें नाहीं. इंद्रजितानें शरबंधानें रामलक्ष्मणास बांधल्याचें वर्णन दोनदां

* Gorresio. Intro-to Vol I p. xcvii—viii.
† Lassen Ind. Alt. I. 473. II. 18.

दिलें नसून एकदांच दिलें आहे. गंधमादन पर्वतावरून हनुमानानें वनस्पति (औषधि) आणल्याचें वर्णन एक वेळहि नाहीं. मुंबई प्रतीमध्यें हा पर्वत एकदांच आणल्याचें वर्णन आहे (VI. 74. 33 ff.) सीतेनें अग्निदिव्य केल्याचा मुळींच उल्लेख नसून तिनें पाचारण केलेल्या अग्नि, वायु, वरुण, ब्रह्मा इत्यादि देवता तिच्या पातिव्रत्याची साक्ष देतात असें वर्णन आहे.

यावरून, विशेषतः रामानें सीतेस अग्निदिव्य करावयास न लावितां तिच्या शपथेवर व देवतांच्या साक्षीवर भरंवसा ठेवून तिच्या पातिव्रत्याबद्दल खात्री करून घेतली या गोष्टीवरून, महाभारतांतील गोष्ट जास्त प्राचीन दिसते; व केव्हां केव्हां असा प्रश्न मनांत येतो कीं, महाभारतांतील रामोपाख्यान हें रामायणाचें सार नसून निदान तिसऱ्या सर्गापासून पुढील रामायणाचें संक्षिप्त संविधानकच तर नसेल? आणि याचाच तर वाल्मीकीनें विस्तार करून आपलें रामायण रचलें नसेल? अथवा हल्लींच्याच रामायणाच्या एखाद्या जुन्या अस्सल प्रतीवरून तर ही गोष्ट घेतली नसेल? परंतु हें गृहीत धरल्यास यावरून असें अनुमान निघेल कीं, या महाभारतांतील कथेंतच मध्यंतरीं एवढा फरक होऊन गेला होता कीं मूळ कोणचें व वाढविलेलें कोणचें याचा निर्णय करतां येणें अथवा हीं दोन्हीं एकच होतीं असें म्हणणें अशक्य झालें होतें; किंवा एकाच संविधानकावर हीं दोन निरनिराळीं काव्यें रचलेलीं असून जरी त्यांतील संविधानक एक होतें तरी अवांतर गोष्टींत पुष्कळ फरक होता; किंवा रामायणाचें सार काढणाऱ्यानें हे फरक आपल्या बुद्धीनें शोध म्हणून केले असतील, मात्र या शोधामुळें संविधानकास ज्यास्त साधें व प्राचीन स्वरूप आलें (पण ही कल्पना जरा वरील अनुमानाच्या विरुद्ध दिसते); किंवा रामोपाख्यान व रामायण हीं एकाच संविधानकावरून पण निरनिराळ्या हेतूनें निरनिराळ्या कवींनीं अगदीं निरनिराळीं काव्यें रचिलीं असावीं असेंहि अनुमान काढतां येतें.

यांपैकीं कोणतें अनुमान खरें असावें हें सध्यां नक्की सांगतां येत नाहीं. पण एवढी गोष्ट मात्र निश्चित दिसते कीं, महाभारतांतील रामोपाख्यानाच्या रामायणाशीं असलेल्या साम्यावरून त्या कालीं रामायण हा ग्रंथ कोणत्या तरी रूपामध्यें अस्तित्वांत होता एवढें सिद्ध होतें. या कथानकास भारतामध्यें स्थान केव्हां मिळालें ही गोष्ट आपणांस ठाऊक नसल्यामुळें या वरील गोष्टीचा आपल्याला रामायणरचनेच्या कालनिश्चयाच्या कामीं कांहीं उपयोग होत नाहीं हें खरें, तथापि या कथानकाचा भारतामध्यें प्रवेश ज्या कालीं रामायणाचा उपयोग वैष्णव लोक बौद्ध धर्माच्या विरुद्ध करूं लागले त्या कालीं झाला असावा असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

महाभारतामध्यें वरील आख्यानाखेरीज इतर ठिकाणींहि पुष्कळ वेळां रामायणांतील गोष्टींचा उल्लेख आलेला आहे. तिसऱ्या पर्वामध्येंच हनुमन्त व भीम यांच्या भेटीचें वर्णन दिलें आहे त्या ठिकाणीं हनुमन्तास "रामायणेऽतिविख्यातः" असें म्हटलें आहे (३-११९७७). या भेटींत मारुतीनें सीताहरणानंतरचा रामायणाचा भाग भीमास सांगितला आहे. या ठिकाणीं रामास विष्णूचा अवतार म्हटलें आहे.

विष्णुर्मानुषरूपेण चचार वसुधातलम् ॥

याप्रमाणेंच सातव्या पर्वामध्यें सीताहरण व रावणवध यांचें थोडक्यांत वर्णन करून रामाच्या कालीं लोक सुखी होते असें म्हटलें आहे व मोठ्या थोरपुरुषांनांहि इतर मनुष्यांप्रमाणें मरण येतें याबद्दल जीं सोळा उदाहरणें दिलीं आहेत त्यांत रामाचेंहि उदाहरण दिलें आहे.

बाराव्या पर्वामध्यें रामाच्या कारकीर्दीस सुवर्णयुग म्हटलें आहे.

तेव्हां दशरथजातकाबरोबर जुळणारें जें ब्राह्मणी रूप दिलेलें रामकाव्य तेंच हें होय. ज्या अर्थी दशरथजातकामध्यें रामवनवासाचा मुळींच उल्लेख नाहीं त्या अर्थी हें काव्य रचण्याच्या वेळीं वाल्मीकीचें काव्य मुळींच अस्तित्वांत नव्हतें असें मानणें चुकीचें होईल. कारण दशरथजातक हा ग्रंथ रामाबद्दलचा सर्व वृत्तांत देण्याकरितां लिहिलेला नसून त्याच्या एकंदर राज्याचें वैभव वर्णन करण्याकरितां लिहिलेला होता; व त्याप्रमाणें त्या ग्रंथांत वर्णन आहे आणि कित्येक ठिकाणीं तें शब्दशः रामायणांतील वर्णनाप्रमाणें आहे. या कथेच्या दोन्हीहि रूपांमध्यें राम हा विष्णूचा अवतार होता असें म्हटलेलें नाहीं. बाराव्या पर्वामध्यें राजाच्या अवश्यकतेबद्दल एक श्लोक आहे तेथें वाल्मीकीच्या काव्याचा स्पष्ट उल्लेख आहे-"पुरा गीतो भार्गवेण महात्मना । आख्याने रामचरिते···॥"–(उत्तरकांडामध्यें वाल्मीकीस भार्गव असें स्पष्ट म्हटलें आहे*) तो श्लोक पुढें दिल्याप्रमाणें आहे.

"राजानं प्रथमं विन्देत्ततो भार्यां ततो धनम् ।
राजन्यसति लोकस्य कुतो भार्या कुतो धनम् ॥

हाच श्लोक श्रीरामपूरप्रत व मुंबईप्रत यांमध्यें थोड्या शाब्दिक फरकानें आढळतो.

अराजके धनं नास्ति नास्ति भार्याप्यराजके ॥

हाच श्लोक हितोपदेशांत आढळतो.† परंतु श्लेजेल, व गोरेसिओ आणि "अ" या प्रतींत हा श्लोक किंवा याला सदृश असा दुसरा श्लोक सांपडत नाहीं.

सातव्या पर्वामध्यें सात्यकीच्या मुखामध्यें पुढील श्लोक वाल्मीकीचा म्हणून घातला आहे.

अपि चायं पुरा गीतः श्लोको वाल्मीकिना भुवि ॥ या पुढें पुढील श्लोकार्ध आहेत:—

न हन्तव्यः स्त्रिय इति यद्ब्रवीषि प्लवंगम ॥ १९ ॥
सर्वकालं मनुष्येण व्यवसायवता सदा ॥
पीडाकरममित्राणां यत्स्यात्कर्तव्यमेव तत् ॥ २० ॥

रामायणामध्यें हे श्लोक कोठेंहि आढळत नाहींत व असे शब्द वानरराजवळ उच्चारण्यासारखा प्रसंगहि दिसत नाहीं; कारण ताटकेचा वानरांशीं कांहीं संबंध नाहीं. परंतु या अवतरणावरून या कालीं अथवा तत्पूर्वी कांहीं काल वाल्मीकीचा

* Verz. der Berl. S. H. p. 121. † I. 194.

एक ग्रंथ अस्तित्वांत असून त्यामध्यें वानरांचा संबंध आला होता हें सिद्ध होतें. आणि हा ग्रंथ म्हणजे रामायणच असला पाहिजे. याशिवाय महाभारतामध्यें वाल्मीकीचा महर्षि म्हणून मोठ्या सन्माननीय तऱ्हेनें उल्लेख आलेला आहे, परंतु ग्रंथकार या नात्यानें मात्र त्याचा उल्लेख आढळत नाहीं. तेव्हां वाल्मीकि हें नांव रामायणाच्या कर्त्याबद्दल घातलेलें आहे किंवा तैत्तिरीय परिशिष्टांतील वैय्याकरणी याच्याबद्दल वापरलेलें आहे किंवा या नांवानें दुसऱ्याच एखाद्या महर्षीचा उल्लेख केला आहे तें नीटसें कळत नाहीं. जनमेजयाचें वर्णन "वाल्मीकिवत्ते निभृतं स्ववीर्यम्* ॥" याप्रमाणें केलें आहे. नारदानें युधिष्ठिराजवळ शक्रसभेचें वर्णन करतांना म्हटलें आहे, "वाल्मीकिश्च महातपाः ॥"† यावरून तो इन्द्राच्या सभेमध्यें सभासद होता असें दिसतें. त्याप्रमाणेंच तो कृष्णाचा उपासक होता असें म्हटलें आहे, "असितो देवलस्तात वाल्मीकिश्च महातपाः । मार्कंडेयश्च गोविन्दे कथयत्यद्भुतं महत् ॥."‡ याप्रमाणेंच ५ व्या पर्वांत म्हटलें आहे, "शुक्रनारदवाल्मीका मरुतः कुशिको भृगुः । देवब्रह्मर्षयश्चैव कृष्णं यदुसुखावहम् ॥ प्रदक्षिणमवर्तन्त सहिता वासवानुजम् ॥."¶

महाभारताची पुरवणी समजल्याजाणाऱ्या हरिवंशामध्यें रामायणासंबंधीं कांहीं उल्लेख आढळतात. या ग्रंथास हल्लीं जरा विशेष महत्त्व आलें आहे; कारण वासवदत्ता या ग्रंथाचा कर्ता सुवन्धु याजवळ (इ. स. च्या सातव्या शतकामध्यें) हरिवंशाची एक प्रत अथवा हल्लीं उपलब्ध असलेल्या हरिवंशाचा निदान कांहीं भाग असलेली प्रत असावी हें निश्चित झालें आहे.§ त्याप्रमाणेंच बाणानें कादम्बरीमध्यें या ग्रंथाचा उल्लेख केला असल्यामुळें त्याजवळहि एखादी प्रत असावी असें वाटतें.‖ बाण याचा काल सुवन्धूनंतरचा परंतु त्यानंतर लवकरच असावा असें धरितात.

हरिवंशामध्यें विष्णूच्या नऊ अवतारांबरोबर रामावताराचें वर्णन करीत असतां, रामाचें बालपण, त्याचा वनवास, त्याचें रावणाबरोबर युद्ध वगैरे सर्व रामायणाप्रमाणेंच वर्णन केलें असून राम लंकेहून परत आल्यावर त्याच्या राज्याचें वैभव महाभारतांतील ७ व्या आणि १२ व्या पर्वांप्रमाणेंच केलें असून तें रामायणांतील वर्णनाशीं जुळतें. ग्रंथकारानें ही माहिती गाथांवरून दिली आहे असें म्हटलें आहे. (गाथाश्चाप्यत्र गायन्ति ये पुराणविदो जनाः । रामे निबद्धाः २३५२ ॥) रामायणाबद्दल दुसरा स्पष्ट उल्लेख पाहूं गेलें असतां रामायण महाकाव्याचें नाटक केल्याबद्दलचा आढळतो. या ठिकाणीं वाल्मीकीचा जरी उल्लेख केलेला नाहीं, तरी एकंदर तेथील मजकुरावरून असें दिसतें कीं, त्या काळीं हल्लीं उपलब्ध असलेल्या वैष्णवी रूपामध्येंच रामायण अस्तित्वांत होतें. ज्या नटाच्या संबंधानें तो स्तुतिपर भाग रचलेला आहे त्या नटानें राक्षसांच्या राजास मारण्याकरितां विष्णूनें जो अवतार धारण केला होता त्या अवताराचें सोंग घेतल्याचें त्यांत वर्णन आहे. या नाटकामध्यें दशरथ आणि लोमपाद ऋषि यांनीं शांता व इतर नाटकशाळा यांकडून ऋष्यशृंगास आणविलें. राम, लक्ष्मण, शत्रुघ्न, भरत, ऋष्यशृंग व शांता यांचे पोषाख विशिष्ट तऱ्हेनें सजविलेले होते. पुढें शेवटीं महाभारताची स्तुति असलेल्या श्लोकामध्यें म्हटलें आहे, "वेद, रामायण, भारत या सर्वांमध्यें अथपासून इतिपर्यंत हरीची स्तुति भरली आहे." त्याप्रमाणेंच व्यासाबरोबर वाल्मीकीची केलेली स्तुति—कदाचित् रामायणकर्ता म्हणून—पुढें आढळून येते, 'तल्लभ्यते व्यासवचः प्रमाणं गीतं च वाल्मीकिमहर्षिणा च' (५–५). याप्रमाणेंच "हे आर्य आपण 'सरस्वती च वाल्मीकेः स्मृतिर्द्वैपायने तथा ।' असे आहां" (५–२२८५) असें वर्णन आहे.

महाभारतामधील वैष्णवी वर्णनें पाहून अशी खात्री होते कीं, यांच्या रचनेच्या कालीं बौद्ध धर्माविरुद्ध वैष्णवी धर्मामधील देवांचा झेंडा फडकूं लागला होता. परंतु हीं काव्यें या कालाच्या अगदीं आरंभीं झालीं होतीं किंवा काय याबद्दल थोडा संशय येतो. अथवा ज्या ठिकाणीं अवतारांचा क्रम ठरलेला आहे तेथें त्या क्रमास अनुसरून असलेल्या वर्णनाबद्दल संशय येण्याचें कारण नाहीं असेंहि वाटण्याचा संभव आहे. तसेंच हरिवंशाचें अस्तित्व जरी इ. स. च्या सहाव्या शतकांत होतें असें सिद्ध झालें तरी देखील हल्लीं असलेले १६३७४ श्लोक त्यावेळीं त्यामध्यें होते कीं नाहीं याबद्दल संशय वाटतो.

आतां आपण आर्षकाव्यांच्या पुण्यकारक वातावरणांतून थोडें खालीं उतरून जरा अर्वाचीन वाङ्मयाकडे वळूं. यापैकीं ज्यामध्यें रामायणाचा उल्लेख येऊन त्याच्या अस्तित्वाबद्दल बोध होतो असा सर्वांत जुना ग्रंथ म्हटला म्हणजे शूद्रक राजाच्या नांवानें प्रसिद्ध असलेली मृच्छकटिका ही नाटिका होय. परंतु या ग्रंथाचा काल अद्याप निश्चित झालेला नाहीं. कारण शूद्रक नांवाचे राजे पुष्कळ होऊन गेले आहेत. तथापि यावरून एवढें मात्र निश्चित होतें कीं, या वेळीं बौद्ध संप्रदाय पूर्ण भरभराटींत असून रामपूजा अथवा कृष्णपूजा अद्याप प्रचारांत आली नव्हती. कालिदासाच्या नाटकांमध्यें रामायणाबद्दल कोठेंच उल्लेख आढळत नाहीं. परंतु त्याच्या मेघदूत काव्यामध्यें (१–९९) आणि रघुवंशामध्यें 'प्राचेतसोपज्ञम् रामायणम्' याप्रमाणें रामायणाचा व वाल्मीकीचाहि (१५. ६३–६४) उल्लेख आढळतो. परंतु या ठिकाणींहि कालिदासाच्या कालाची अनिश्चितता (तिसरें किंवा सहावें शतक इसवी सन)* आणि मेघदूत व नाटकें लिहिणाऱ्या कवीनेंच रघुवंश लिहिला होता किंवा काय या गोष्टीबद्दल संशय हीं आपल्या मार्गांत येतात.† या ठिकाणीं कालिदासाच्याच नांवानें प्रसिद्ध असलेलें‡ व रामायणाचा आधार घेऊन रचलेलें सेतुबन्ध हें काव्यहि नमूद केलें पाहिजे. अलीकडील विद्वानांचें असें मत आहे कीं हें काव्य कालिदासानें विक्रमादित्याच्या आज्ञेनें प्रवरसेन राजाकरितां लिहिलें.

* I. 2110. † II. 297. ‡ XII. 7521. ¶ V. 2946. § Ind. Streifen I. 380. ‖ कादंबरी I. 45,80.

* Abh. uber Krishna's Geburtsfest of Webber. p. 319. Z. D. M. G. XXII. 726 ff. † cf. Z. D. M. G. XXII. 710.; Ind. Streifen I. 312. II. 373. ‡ See Hofer. Z. fur die W. der Spr. II. 500 ff. Verz. der. Berl. S. H. p. 156, 369.

प्रवरसेन यानें आरंभींचा कांहीं भाग लिहिला होता तो कालिदासानें पुरा केला. याच्या आरंभीं प्रस्तावनेमधील ९ व्या श्लोकांत हा ग्रंथ प्रवरसेन यानें आरंभिला होता असें म्हटलें आहे. यावरूनच बाण यानें (सुमारें सातवें शतक) हर्षचरिताच्या आरंभीं सेतुबंधकाव्य प्रवरसेन यानें रचिलें असें म्हटलें आहे.* राजतरंगिणीमधील (III, १०९, १२३, २९३) काश्मीरचा राजा प्रवरसेन (दुसरा) हाच वरील प्रवरसेन कवि असावा असें वाटतें. हा काश्मीरचा प्रवरसेन उज्जनीचा राजा हर्ष उर्फ विक्रमादित्य आणि प्रतापशील उर्फ शिलादित्य यांचा समकालीन होता. हा राजा हर्ष राजानें काश्मीरच्या गादीवर बसविलेल्या मातृगुप्त कवीच्या मागून गादीवर बसला. लासेनच्या म्हणण्याप्रमाणें† जर हा राजा खरोखरच इ. स. २४१ ते २६६ पर्यंत राज्य करीत असेल तर सेतुबन्ध काव्याचा काल तिसरें शतक ठरतो. परंतु डॉ. भाउ दाजी यांनीं प्रवरसेन व हिओयुएन-त्संग यांचा संबंध आला असल्याबद्दल उल्लेख केला आहे‡ व हर्षवर्धन, शिलादित्य आणि हिओयुएन-त्संग हे समकालीन होते असें म्हटलें आहे त्यावरून प्रवरसेन (दुसरा) हा हिओयुएन-त्संग याच्या वेळीं अथवा त्याच्या येण्याच्या पूर्वीं थोडे दिवस होऊन गेला असावा असें म्हणणें जास्त सयुक्तिक दिसेल. यावरून प्रवरसेन हा सातव्या शतकाच्या आरंभीं अगर सहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला असें निघतें.

सेतुबन्ध या काव्याचा काल याच्या पलीकडे जात नाहीं हें बाण यानें केलेल्या उल्लेखाशिवाय दण्डीनें आपल्या काव्यादर्शामध्यें केलेल्या उल्लेखावरून (१-३४) स्पष्ट होतें. कारण दण्डीच्या काव्यादर्शाचा काल सहावें शतक असा आतां निश्चित झाला आहे.¶

पुढेंपुढें आपणांस रामायणाचा उल्लेख पुष्कळच ग्रंथांतून आढळतो. वराहमिहिरानें राम याचा देव म्हणून उल्लेख केला आहे त्यावरून त्याच्या कालीं रामास पूज्य मानीत असत हें उघड होतें.$ त्याप्रमाणेंच पुढील काव्यांतून रामायणाबद्दल उल्लेख आहे. श्रीधरसेन राजाच्या आज्ञेवरून वल्लभी येथें लिहिलेलें भट्टीकाव्य|| (५३०-५४५), त्याच ठिकाणीं शिलादित्य राजाच्या आज्ञेवरून लिहिलेलें शत्रुंजयमाहात्म्य (५९८)§, सुबन्धु कवीचें वासवदत्ता (सुमारें सातव्या शतकाचा आरंभ), यांमध्यें सुंदरकांडाचा विशेषतः उल्लेख केलेला आहे. यानंतर लवकरच लिहिली गेलेली बाण कवीची कादंबरी, त्याप्रमाणेंच हल याचें सप्तशतक आणि सर्वांत शेवटीं भवभूतीचीं नाटकें. भवभूतीचा काल ललितादित्य याचा समकालीन राजतरंगिणीमधील यशोवर्मा राजा याची कारकीर्द (६९५-७३३) हा होय.* या कवीनें वाल्मीकीच्या रामायणावरून दोन नाटकें रचल्याचें प्रसिद्धच आहे. यांपैकीं उत्तररामचरितामध्यें रामायणामधून अवतरणें घेतलीं आहेत. प्रथमतः रामायणाबद्दल स्फूर्ति होण्यास कारणीभूत झालेला "मा निषाद......" हा श्लोक दुसऱ्या अंकांत जशाचा तसाच दिला आहे. त्याप्रमाणेंच सहाव्या अंकामध्यें बालकांडांतील शेवटचे श्लोक घेतले आहेत.

> प्रकृत्यैव प्रिया सीता रामस्यासीन्महात्मनः ।
> प्रियाभावः स तु तया स्वगुणैरेव वर्धितः ॥
> तथैव रामः सीतायाः प्राणेभ्योऽपि प्रियोऽभवत् ।
> हृदयं त्वेव जानाति प्रीतियोगं परस्परम् ॥

हेच श्लोक बालकांडामध्यें 'ब' 'क' या प्रतींत, श्लेजेलच्या प्रतींत व मुंबई प्रतींत शेवटच्या सर्गांत पुढीलप्रमाणें आढळतात.

> प्रिया तु सीता रामस्य दाराः पितृकृता इति ।
> गुणाद्रूपं गुणाच्चापि प्रीतिर्भूयोऽभ्यवर्धत ॥
> तस्याश्च भर्ता द्विगुणं हृदये परिवर्तते ।
> अन्तर्गतमपि व्यक्तमाख्याति हृदयं हृदा ॥

सर्व प्रतींत जरी हे श्लोक एकसारखे नाहींत तरी समानार्थी आहेत; आणि उत्तररामचरितांतील श्लोकांशींहि यांचें अर्थसाम्य आहे. गोरेसिओ याच्या प्रतींत यांसारखे श्लोक आढळत नाहींत. परंतु 'अ' प्रतीमध्यें जे श्लोक आहेत ते बहुतेक भवभूतीच्या श्लोकांशीं तंतोतंत जुळतात; व ते बालकांडाच्या शेवटींच आढळतात.

सहाव्या अंकामध्यें दुसरा एक श्लोक असा आहे:—

> त्वदर्थमिव विन्यस्तः शिलापादोयमग्रतः ।
> यस्याऽयमभितः पुष्पैः प्रविष्ट इव केसरः ॥

याला सदृश असा श्लेजेल, कॅरे, मार्शमन, व मुंबईप्रत यांमध्यें पुढील श्लोक आहे.

> त्वदर्थमिव विन्यस्ता त्वियं श्लक्ष्णसमा शिला ।
> यस्याः पार्श्वे तरुः पुष्पैः प्रहृष्ट इव केसरः ॥

गोरेसिओच्या प्रतींत पुढील श्लोक आहे.

> त्वदर्थमिह विन्यस्तः शिलापट्टोयमग्रतः ।
> अस्य पार्श्वे तरुः पुष्पैः प्रवृष्ट इव केसरः ॥

'अ' प्रतीमध्यें हा श्लोक असा आहे:—

> त्वदर्थमिह विन्यस्ता शिलेयं सुखसंस्तरा ।
> यस्याः पार्श्वे तरुः पुष्पैर्विभ्रष्ट इव केसरैः ॥

आतां या श्लोकांमध्यें दिसणाऱ्या फरकांवरून जर या अवतरणाच्या सत्यतेबद्दल आपण विचार करूं लागलों तर आपला उलटच समज होण्याचा संभव आहे. परंतु येथें आपणांस हें पाहिलें पाहिजे कीं, अवतरण घेतांना भवभूतीनें मूळामधून जसेंच्या तसेंच घेतलें होतें काय? आपणांला चुकीचीं अवतरणें पुष्कळ ग्रंथांतून आढळून येतात. परंतु या ठिकाणीं हें लक्षांत ठेवलें

* Hall. Vasavdatta. p. 13, 14, 54 & Ind Streifen I. 357. † Ind. Alt. II (402) 770, 910, ff. XXIV. ‡ Jour. Bombay Branch R. A. S. VII. 208 ff. (1861 Jan.) 223 ff. VIII. 248-51 (1864 Aug. published in 1868). ¶ Ind Streifen I. 312 ff. $ Abh. Uber die Râma Tâp. Up. p. 279. || According to Lassen. § Abh. uber die Râma Tâp Up. p. 8, 12, 29, 30.

* Lassen.

पाहिजे कीं, हीं अवतरणें एका जगद्विख्यात ग्रंथांतून घेतलेलीं होतीं आणि प्रेक्षक लोकांचें ज्ञान जरी इतकें बिनचूक आणि सूक्ष्म नसलें तरी मूळापासून विशेष फरक झाला असता तर त्याजकडे जनतेचें लक्ष गेल्याशिवाय राहतें ना. हा फरक विशेषसा लक्ष देण्यासारखा नसल्यामुळें, निरनिराळ्या प्रतींतून जे कित्येक वेळां परस्परविरोधी आणि विसंगत पाठ आढळून येतात त्या मानानें हा फरक कांहींच नसल्यामुळें, याकडे कोणी लक्ष न देणें साहजिक दिसतें; व भवभूतीच्या या अवतरणां-वरून रामायण हें त्या काळीं हल्लींच्या रूपांतच अस्तित्वांत होतें असें अनुमान निघतें. कारण कीं यावेळीं उत्तरकांडामध्यें वर्णन केलेल्या गोष्टी–सीतात्याग, वाल्मीकीच्या आश्रमांत कुश व लव यांचे जन्म, वाल्मीकीनें स्वतः रचलेल्या रामायणाचें त्यांच्या-कडून पठण, आणि रामसीतापुनर्मीलन इत्यादि सर्वतोमुखीं झाल्या होत्या.*

याप्रमाणेंच रघुवंशाचीहि गोष्ट आहे. परंतु उत्तरकांडामध्यें दिलेल्या हकिकतीमध्यें भवभूतीनें थोडासा फरक केला आहे. त्यानें रामसीतेचा वियोग एकदम न करितां त्यांनीं कांहीं दिवस एकत्र घालविले आणि सीतेला आपल्या पातिव्रत्याबद्दल आणखी एक दिव्य करावें लागलें असें दाखविलें आहे; हें दिव्य म्हणजे तिनें भूमीची प्रार्थना केल्यावर तिला भूमीनें आपल्या पोटांत जागा देऊन रसातलास नेलें हें होय. त्याप्रमाणेंच रामाची व कुश-लवांची भेट अध्यात्मरामायणामध्यें आणि रघुवंशामध्यें रामाच्या यज्ञामध्यें त्यांनीं वाल्मीकिप्रणीत रामायण म्हणून दाखविल्या-नंतर झाली असें वर्णन आहे. परंतु भवभूतीनें लवाकडून राम-सैन्याचा पराभव करवून नंतर करविलेली भेट अधिक काव्यमय आहे. या मुलाच्या पराक्रमावरून त्याच्या जन्माचें पावित्र्य व त्याच्या आईचें पातिव्रत्य हीं सिद्ध केलीं आहेत. परंतु भवभूतीनें हा फरक स्वतःच्या कल्पनेनें केला किंवा उत्तरकांडाची एखादी दुसरीच प्रत त्यास सांपडून तीवरून केला हा प्रश्न आहे. उत्तरकांडाच्या व्हीलर याच्या प्रतींत व जैमिनिभारता-मध्यें भवभूतीनें दिल्याप्रमाणेंच कांहीं हकीकत सांपडते यावरून ही सर्व भवभूतीचीच कल्पना असावी असें वाटत नाहीं. उलटपक्षीं या दोन्ही ग्रंथांतून दिसून येणाऱ्या अतिशयोक्तीवरून तरी हे दोन्हीहि ग्रंथ भवभूतीच्या नाटकानंतर रचले गेले असावे असें वाटतें.

वेबर याच्या मतें कुश आणि लव यांची सर्व गोष्ट कुशीलव म्हणजे भाट आणि गवई यांनीं कुशीलव या शब्दाचा दोष घालविण्यासाठीं रचिली असावी. या गोष्टीमुळें कुशीलवांचा दर्जा वाढेल असें त्यांस वाटलें असावें.† फ्रेडरिक याच्या म्हणण्याप्रमाणें उत्तरकांड हेंहि वाल्मीकीनेंच लिहिलें असून त्याचें कविभाषेमध्यें भाषांतर झालें आहे. कविभाषेमध्यें असलेलें अर्जुनविजय हें काव्य रामायणाच्याच (उत्तरकांडाच्या) आधारें रचिलें आहे.* परंतु हें काव्य जावामध्यें केव्हां गेलें हें जोंपर्यंत आपणांस ठाऊक झालें नाहीं तोंपर्यंत वरील गोष्टीचा आपल्याला कालनिर्णयाच्या कामीं कांहींच उपयोग नाहीं. कारण जावा बेटामध्यें वसाहत करणारे लोक एकाच वेळीं गेले नसून निर-निराळ्या वेळीं गेले व त्यांपैकीं कोणाच्या वेळीं रामायणाचा प्रवेश त्या बेटांत झाला तें कळत नाहीं. लासेन यानें हा काल इ. स. ५०० च्या पूर्वीचा नसावा असें म्हटलें आहे.† परंतु त्याच्या मतावर कितपत विश्वास ठेवावा तें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. रामायणाच्या कविभाषेंतील भाषांतरावरून रामायणाचें पुरातनत्व सिद्ध होत नसून उलट हें भाषांतर मूळ रामायणावरून केलेलें नसून उत्तरकांडामधील वगैरे. सर्व गोष्टी ज्यांत आहेत अशा एखाद्या बालरामायणावरून केलेलें असेल ही कल्पना खरी असण्याचा संभव आहे. कारण नुकत्याच बालरामायणाच्या धर्तीवर लिहिलेल्या रामायणांतील गोष्टी दक्षिण हिंदुस्थानांत सांपडल्या आहेत.‡ याशिवाय दोन संग्रहरामायणांचा उल्लेख आढळतो. पैकीं एक सात सर्गांचें आहे व दुसरें (याचा उत्तरार्ध फाटला आहे) सुमारें ५० सर्गांचें असावें.¶ त्याप्रमाणेंच २१ सर्गांचें एक प्रसन्नरामायण आहे$. यांशिवाय दक्षिणेमधील निरनिराळ्या भाषांतील भाषांतरांचा उल्लेख आढळतो त्यांत तामिल,‖ तेलगु,§ मल्याळम्,** उरिया,†† कानडी (गद्य व पद्य)‡‡ अशीं भाषांतरें आहेत. याशिवाय हल्लींच्या काळीं देखील कविरामायणासारखीं पुष्कळ रामायणें उपलब्ध आहेत. तेव्हां दुसऱ्या कोणत्या तरी तऱ्हेनें कविरामायणाचें प्राचीनत्व सिद्ध झाल्याशिवाय तें फार जुनें आहे असें आपणांस म्हणतां येत नाहीं.

भवभूतीनंतरच्या ग्रंथांमधून रामायणाचे उल्लेख पहात बसणें अनवश्यक आहे. परंतु वाङ्मयाच्या इतिहासाच्या दृष्टीनें हें काव्य फार महत्त्वाचें असल्यामुळें हे उल्लेख पाहण्यामध्येंहि थोडेंसें तथ्य आहे. तेव्हां साधारणतः वरवर आढळून येणाऱ्या काव्यांपैकीं कोणकोणत्या काव्यांमध्यें याचें अस्तित्व असल्याबद्दल उल्लेख आहे अथवा कोणतीं काव्यें याच्या आधाराच्या ग्रंथांत लिहिलीं आहेत तें आपण पाहूं. यांपैकीं प्रथमतः राजशेखरानें रामायण आणि वाल्मीकि यांची केलेली स्तुति आढळते. याचा काल दहाव्या शतकाच्या अखेरीचा असावा.¶¶ यानें ही स्तुति त्याच्या प्रचंडपांडव ग्रंथाच्या आरंभीं केली आहे. याच काळीं होऊन गेलेल्या धनंजय कवीनें आपल्या दशरूप ग्रंथामध्यें

---

* या गोष्टी रामायण, महाभारतांतील रामोपाख्यान आणि हरिवंश यांमध्यें मुळींच आढळत नाहींत. उलट या ग्रंथांत रामानें परत आल्यावर 'दशाश्वमेधानाजन्हे जारुथ्यान्स निर्गलान् ।' असें वर्णन आहे. † Webber. Acad. Vorles. uber Ind. Lit. G. & the St. Petersburg Lexicon, S. V.

* Uber die Sanskrit und Kavi Literatur auf-der Incel Bali cf. Ind. Stud. II. 133-6. अर्जुनविजय ibid p. 142. † Ind. Alt II. 1043 ff. ‡ Catalogue of Oriental MSS. of the College Fort St. George. Madras 1857. I, 295, 296, 299, 419, 450, 455. ¶ Ibid p. 456. $ Ibid p. 169. ‖ Ib. pp. 269, 520, 521. § Ib. p. 499. ** Ib. p. 670. †† Ib. p. 675. ‡‡ Ib. p. 595, 597, 604, 605, 665, 666, 602. ¶¶ Ind Streifen I. 313-4.

(१–६१) रामायणाचा उल्लेख केला आहे.* याप्रमाणेंच गोवर्धनानें सप्तशतीच्या आरंभीं उल्लेख केला आहे. गोवर्धनाचा काल दहावें अथवा बारावें शतक हा असावा.† त्रिविक्रम-भट्ट यानें दमयन्तीकथेच्या आरंभीं उल्लेख केला आहे.‡ त्याप्रमाणेंच राजतरंगिणीमध्यें उल्लेख आहे¶ व शार्ङ्गधर यानेंहि उल्लेख केला आहे.$ त्याप्रमाणेंच ब्रह्मवैवर्तपुराण,‖ विष्णुपुराण,§ यांमध्यें उल्लेख आहेत. विष्णुपुराणांत भृगूचा वंशज ऋक्ष याला वाल्मीकि म्हणत व तो चोविसाव्या द्वापरामधील व्यास होता, असें म्हटलें आहे.

आतां रामायणाच्या आधारानें रचलेले ग्रंथ पाहूं. यांत प्रथम पुराणांकडे पाहिलें असतां, अग्निपुराणाच्या पहिल्या सात सर्गांमध्यें रामायणाचीं सात कांडें सारांशरूपानें दिलीं आहेत.** पद्मपुराणामध्यें कांहीं सर्गांमध्यें रामायणाचा सारांश दिला आहे.†† स्कंदपुराणामध्यें रामनवमीव्रतासंबंधीं रामायणांतील कांहीं हकीकत दिली आहे. याप्रमाणेंच विष्णुपुराणामध्येंहि यांतील कांहीं भाग दिला आहे. ब्रह्मांडपुराणामध्यें रामायण-माहात्म्य दिलें आहे.‡‡ नंतर कवि राजाच्या राघवपांडवीय काव्यांत रामायण व महाभारत यांचें सार त्यांतीलच श्लोक घेऊन दिलेलें आहे. याचा काल अकरावें शतक असावा.¶¶ यानंतरचीं अर्वाचीन काव्यें म्हटलीं म्हणजे, अग्निवेश याचें रामचंद्रचरित्रसार,$$ साहित्यदर्पणाचा कर्ता विश्वनाथ याचें राघवविलास, रामचरण व हरिनाथ यांचीं रामविलास हीं एकाच नांवाचीं दोन काव्यें,‖‖ श्रीराम भद्राम्बा इचा रघुनाथाभ्युदय,§§ श्रीरत्नगानाथ याचें अभिरामनाम काव्य,*** गोविन्द कवीचें रामकुतूहल††† व सेतुबन्धाचें सुधारून केलेलें काव्य सेतुसरणि इत्यादि होत.

रामायणाच्या आधारें पुष्कळशीं नाटकेंहि रचिलीं गेलीं आहेत. यांत प्रथम महादेव याचा पुत्र जयदेव यानें लिहिलेलें प्रसन्नराघव हें येतें. यांतील एक श्लोक धनिकानें आपल्या काव्यांत घेतला आहे.‡‡‡ यावरून या नाटकाचा काल दहाव्या शतकाच्या मध्यभागीं येतो. हनुमन्त कवीचें म्हणून मानलेलें महानाटक हेंहि याच सुमारास झालें असावें. कारण यांतील अवतरण भोजदेवाच्या कंठाभरणामध्यें आढळतें; व त्याचा काल दहाव्या शतकाची अखेर हा ठरला आहे.¶¶¶ विदर्भराज याचें चंपूरामायण हें पंचांकी नाटकहि भोजाच्या कालींच रचलें गेलें असावें.$$$ राजशेखर याचें बालरामायण आणि धनिकानें उल्लेख केलेलीं उदात्तराघव आणि छलितराम‖‖‖ हीं नाटकेंहि याच कालीं लिहिलीं गेलीं असावीं. या तिन्ही नाटकांतून साहित्यदर्पणामध्यें अवतरणें घेतलीं आहेत. यांखेरीज पुढील नाटकेंहि रामायणाच्या आधारानें रचिलेलीं आहेत. मुरारि याचें अनर्घराघव (१३ वें अथवा १४ वें शतक),* कुलारावण, जानकीराघव, वालिवध, राघवाभ्युदय, रामचरित, रामाभिनन्द, रामाभ्युदय, हीं सर्व १३ व्यापासून १४ व्या शतकांतील होत. कविचन्द्र याचें रामचन्द्रचंपू हें साहित्यदर्पणानंतर रचलें गेलें असावें.† अभिराममणि नाटक याचा काल इ. स. १५९९ नंतरचा असावा.‡ श्रीसुभट कवीचें दूतांगद नाटक हें महाराजाधिराज श्री त्रिभुवनपालदेव याच्या आज्ञेवरून श्रीकुमारपालदेव याच्या यात्रेच्या प्रसंगीं लिहिलें असून तें बरेंच अर्वाचीन दिसतें¶ हॉल यानें अमोघराघव या नांवाचें नाटक व दुसरें एक चोक्कनाथाचें जानकीपरिणय नांवाचें नाटक पाहिल्याचा उल्लेख केला आहे.$ पुरुषोत्तम कवीचें रामचन्द्रोदय हेंहि यांपैकींच आहे.

शेवटीं वेबर म्हणतोः रामाच्या पूजेबद्दलच्या ग्रंथांचें वर्णन मी दुसऱ्या ठिकाणीं केलेंच आहे;‖ व रामानुज व रामानन्द यांच्या संप्रदायांचें वर्णन करणें अप्रस्तुत होईल; तेव्हां येथें रामपूजनाबद्दल ग्रंथांत रामायणाचा संबन्ध निकट§ आला आहे असा अद्भुतोत्तरकांड हा ग्रंथ आहे एवढेंच सांगतों.

वेबर यानें शोधून ठरविलेले मुद्दे:–

१ रामायणाच्या अस्तित्वाबद्दलचीं ग्रंथांतर्गत प्रमाणें हा ग्रंथ इ. स. च्या ३ ऱ्या किंवा ४ थ्या शतकांत लिहिला गेला असावा असें दाखवितात.

२ हल्लींच्या या ग्रंथाच्या विस्ताराकडे (२४००० श्लोक) आणि निरनिराळ्या प्रतींमधून दिसून येणाऱ्या फरकांकडे पाहिलें असतां या ग्रंथाच्या मूळच्या स्वरूपाबद्दल कांहींच निश्चय होत नाहीं. ग्रंथाच्या हल्लींच्या स्वरूपाकडे पाहतां त्या कालीं ग्रीक-संस्कृतीची छाप आर्यावर्तावर पूर्णपणें बसली होती असें स्पष्टपणें दिसून येतें.

३ रामायणाच्या संविधानकाचें मूळ जी बौद्ध दंतकथा तीमध्यें रावणानें केलेलें सीताहरण व लंकेवरील स्वारी या दोन गोष्टी मुळींच नसल्यामुळें वाल्मीकीनें या गोष्टी ज्याप्रमाणें होमरच्या काव्यांतील इतर कांहीं गोष्टी बौद्ध दंतकथांमध्यें घेतल्या आहेत त्याप्रमाणें होमरमधील गोष्टी ऐकून त्यांवरून रचल्या असाव्या.

४ रामायणाचें जें हल्लीं वैष्णवी रूप दिसतें आहे (व इतर वाङ्मयावरून हेंच रूप पुष्कळ प्राचीन कालापासून असावें असें वाटतें) तें मुळपासून तसेंच होतें कीं काय हें अनिश्चित आहे. परंतु एवढें मात्र स्पष्ट दिसतें कीं, हल्लींचें या काव्याचें हें वैष्णवी रूप कवीचा, बौद्ध दंतकथा घेऊन तिचा ब्राह्मणी देवतांशीं

* Hall. ed. (Cal. 1865) Intro. p. 2–3. † Abh. uber Hala's Saptasataka p.9–10. ‡ Verse 11. ¶ I. 166. $ Hall. Intro. to. वासवदत्ता p. 48. A. D. 1363. ‖ Burnouf Intro. to the Bhagwata Purana. I. 23. § III. 3. ** Aufrecht's Catalogue, p. 7a. †† Ibid p. 13–14. ‡‡ Ibid p. l. c. 30a. ¶¶ Ind. Streifen I. 352. 269- 271. $$ Auf-Catalo. p. 1216. ‖‖ Ibid p. 214 b; 132a. §§ Verz. der Berl. S, H. 154 *** Auf. Catalogue. p. 156. ††† Ibid 1986. ‡‡‡ Hall.. Preface to Dasarupa p.36. ¶¶¶ Auf-Cat. p.209a $$$ Taylor I. 174, 455. ‖‖‖ Hall p. 36.

* Wilson II. 383. † Auf. 2116. ‡ Wilson II 395. Auf. 1376. ¶ Wilson II. 390 Auf. 1396. $ Hall, Intro. to Dasarupa, p. 30. ‖ Abh. uber die Râma Tâpaniya Upnishad. Berlin1864. § See Verz der Berl. S. H. p. 123–127.

संबंध जोडून व त्यांचे पराक्रम वगैरे वर्णन करून बौद्धधर्मा-विरुद्ध उपयोग करण्याचा जो उद्देश, त्याला अनुसरून दिसतें.

५ व्हीलर याचें जें मत आहे कीं लंकेंतील राक्षस हें नांव तेथील बौद्धांस दिलें असावें तें खरें असण्याचा थोडासा संभव आहे.

६ दशरथजातकामधील राम व सीता यांच्या कथेमध्यें ऐतिहासिक सत्य किती आहे हें अनिश्चित आहे.

त्या कथेमध्यें कांहीं ऐतिहासिक भाग असेल तर वाल्मीकीनें त्या कथेंत भर घालून राम ही शेतकीचें पालन करणारी देवता समजून व त्याला कांहीं काळ त्याच्या कामांत वनवासा-मुळें अडथळा येतो (हा काळ बहुतकरून हिंवाळा असावा) अशी कल्पना करून आणि सीता हें दैवत नांगराच्या तासावरून कल्पून या देवतांची स्तुति आपल्या ग्रंथांत केली असावी.

७ वाल्मीकीनें दाखविलेली रामाच्या स्वभावांतील विलक्षण शांति ही बौद्ध दंतकथेवरूनच उचलली असावी. कांहीं कालानें कांहीं ख्रिस्ती दंतकथाहि यामध्यें प्रविष्ट केल्या गेल्या असण्याचा संभव आहे (उदाहरणार्थ शबरी, शंबुक.)

८ वाल्मीकीनें आपल्या काव्यांत यजुर्वेदांतील गोष्टी वर्णन केल्या आहेत (अंगराग, जनक, अश्वपति) यावरून तो यजुर्वेदी असावा; आणि त्याची जन्मभूमि अयोध्येच्या जवळपास असावी.

**लासेनची वेबरवर टीका.***—वेबर याच्या निबंधांतील महत्त्वाचे सिद्धांत लासेन येणेंप्रमाणें मांडतो: (१) रामायणाच्या कथानकाचें अतिप्राचीन स्वरूप दशरथजातक या बौद्ध ग्रंथांत पहावयास सांपडतें, (२) रामायणामध्यें आर्य हिंदी लोक व मूळचे रहिवाशी यांच्यांमधील झगड्याचें काव्यरूपांत वर्णन केलें नसून त्यांत ब्राह्मण व बौद्ध यांच्या आपसांतील वैमनस्याचें चित्र रेखाटलें आहे, (३) कृषिकर्माचा आद्यप्रवर्तक पौराणिक बलराम व रामायणाच्या कथानकांतील राम हे दोघेहि एकच आहेत व सीता ही नांगराच्या तासाची देवता आहे, (४) रावणाकडून सीतेचें हरण व द्वितीय रामानें ज्येष्ठरामाचा केलेला पराजय या कथाभागांवरून हिंदी लोकांचा होमरच्या काव्याशीं परिचय होता असें ध्वनित होतें, आणि (५) या काव्यास हल्लींचें स्वरूप ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकापूर्वी प्राप्त झालें नसावें. आणि यांवर तो म्हणतो: (१) वेबरच्या पहिल्या मुद्दयासंबंधानें एवढें कबूल केलें पाहिजे कीं, रामायणाचें कथानक आज ज्या निरनिराळ्या स्वरूपांत उपलब्ध आहे त्यांमध्यें, 'राम आपला बंधु व सीतानामक भगिनी यांच्या समवेत हिमवत् पर्वताकडे अरण्यवासास गेला' असें ज्या बौद्ध गोष्टींत वर्णिलें आहे तिला अतिप्राचीनत्व दिलें पाहिजे. परंतु या गोष्टीच्या मुळाशीं ब्राम्हणप्रणीत रामाच्या कथानकाविषयीं बौद्धांची गैरसमजूत असावी, किंवा त्यांनीं मुद्दाम मूळ गोष्टीस वेडेंविद्रें स्वरूप दिलें असलें पाहिजे; कारण सुखदुःखाचे वांटेकरी होणें व संकटसमयीं साथ देणें हें पत्नीचें कर्तव्यकर्म आहे असें इतरत्र मानलें गेलें आहे. जर पुढेंमागें या बौद्ध गोष्टींत रामायणांतील कवितांचा कांहीं मागमूस सांपडला तर या तर्कास निश्चयात्मक स्वरूप येईल. (२) दुसऱ्या मुद्दयासंबंधीं एवढी गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं, बौद्धांविषयीं सर्व रामायणांत फक्त एकाच ठिकाणीं उल्लेख आलेला आहे. तेथें एका नास्तिकास त्याच्या निंद्य आचारामुळें तुच्छतेनें वागविलें असें वर्णन आहे. पण या ठिकाणीं देखील हा नास्तिक म्हणजे बौद्धच असला पाहिजे असें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. कदाचित् तो शब्द तेथें एखाद्या चार्वाकाला उद्देशून वापरला असेल. शिवाय तो भाग प्रक्षिप्त असल्यामुळें त्याला फारसें महत्त्व देतां येत नाहीं. या प्रश्नाचा निर्णय करितांना दुसरीहि एक गोष्ट विचारांत घेतली पाहिजे ती ही कीं, दक्षिणेकडील मोठमोठ्या मुलखांवर त्या कालीं ब्राह्मणी आचारविचारांच्याच राजांची सत्ता असल्यामुळें, बौद्धांनीं ब्राम्हणांवर हल्ला केला असेल तर तो सिंहल-द्वीपाकडूनच झाला असला पाहिजे. परंतु दुसऱ्या अशोकाच्या वेळेपासून सिंहलद्वीपाचा जो विश्वसनीय इतिहास लिहून ठेवला गेला आहे त्यांत सिंहली राजे व हिंदुस्थानच्या दक्षिण किनाऱ्यावरील राजे यांच्यामधील लढायांचींच फक्त वर्णनें आहेत. असो. (३) ब्राम्हणांनीं दुसरा राम (दाशरथी) व तिसरा राम (बलराम) यांजमध्यें केव्हांच घोटाळा केला नसल्यामुळें, व दुसऱ्या रामास कृषिदेवता मानावयासहि कांहीं आधार नसल्याकारणानें वेबर याचा तिसरा सिद्धांतहि फोल ठरतो. मागाहून जरी पहिल्या (ज्येष्ठ) रामाची अवतारांत गणना होऊं लागली, तरी ज्या ऐतरेय ब्राह्मणांत त्याचा इतिहास दिला आहे त्यांत विष्णूच्या अवतारांचा कोणत्याहि प्रकारचा उल्लेख आलेला नाहीं, व म्हणून या रामाच्या ऐतिहासिक खरेपणाविषयीं शंका घेणें अशक्य आहे. याच कारणामुळें दाशरथी राम देखील ऐतिहासिक पुरुष होता असें प्रो. लासेन मानतो, व तो देवाच्या पदवीस जाऊन पोहोंचल्यावरच त्याचा सीतेशीं संबंध जोडण्यांत आला असें त्याचें म्हणणें आहे. सीतेच्या नांवावरूनच ती पुढें पृथ्वीची कन्या—नांगराच्या तासाची देवता—समजली जाऊं लागली. (४) सीता—हरणाची व लंकेंतील युद्धाची अशा दोन्हीहि रामायणांतील कल्पना, हेलेनचें पळून जाणें व ट्रोजनयुद्ध या कथाभागांपासून घेतल्या आहेत असें विधान करण्यांत वेबर यानें वस्तुस्थितीचा विपर्यास केला आहे. तो असें धरून चालतो कीं हिंदी लोकांचा होमरच्या काव्याशीं परिचय झालेला होता; परंतु तसें मानावयास त्याच्यापाशीं कांहींच आधार नाहीं. धनुष्य हें ज्यांचें एक मुख्य आयुध आहे अशा लोकांमध्यें धनुर्विद्येंतील आपल्या नैपुण्यामुळें प्रतिस्पर्ध्यांचा पराजय करणाऱ्या नायकाविषयीं गोष्टी रचल्या जाव्या हें अगदीं नैसर्गिक आहे. अशा प्रकारें जर आपण तुलना करूं लागलों तर, अर्जुनानें द्रौपदीच्या पाणिग्रहणप्रसंगीं धनुर्विद्येंतील आपल्या नैपुण्यामुळें प्रतिस्पर्धी राजांचा पराभव केला या कथाभागाच्या मुळाशीं देखील होमरचें काव्यच होतें असें म्हणावें लागेल. सीताहरण हा रामायणाच्या कथानकांतील महत्त्वाचा भाग आहे. उलटपक्षीं, होमरनें केवळ युद्धाचें कारण देण्याकरितां हेलेनच्या पातिव्रत्यभंगाचा उल्लेख केला आहे; तो त्याच्या कथानकांतील मुख्य विषय नाहीं.

* Prof. Lassen on Weber's dissertation on the Ramayan, Translated from Indische Alterthumskunde, Vol. II pp. 502 ff. by J. Muir. Indian Antiquary Vol. (1874) pp. 12-103.

म्हणून या दोन राष्ट्रांत प्रचलित असलेल्या गोष्टींची एकमेकींशीं तुलना करणें केव्हांहि बरोबर होणार नाहीं. (५) आतां शेवटच्या मुद्दयाविषयीं म्हणाल तर रामायणांतील ज्योतिषविषयक माहितीस पुरावा या दृष्टीनें कांहींच महत्त्व देतां येत नाहीं. प्रो. लासेनच्या मतें हिंदू लोकांनीं आपलें राशींसंबंधींचें ज्ञान ग्रीक लोकांपासून घेतलें नसून, तें त्यांनीं खाल्डियन लोकांपासून संपादन केलें होतें. उत्तरेकडील प्रदेशांत यवनांचीं व शकांचीं बलाढ्य राष्ट्रें होतीं याविषयीं जो रामायणांत उल्लेख आला आहे त्यापासून खरें म्हटलें असतां आपणांस इतकेंच अनुमान काढतां येईल कीं, हिंदू लोकांनां ग्रीक व शक लोकांची माहिती होती. त्यांनीं त्या भागांत आपली सत्ता प्रस्थापित केली होती असेंच कांहीं म्हणतां येणार नाहीं. काश्मीरच्या दामोदर राजानें रामायणाची कथा आपल्या समोर वाचवून घेतली असें जें राजतरंगिणींत (१. १९९) म्हटलें आहे ती गोष्ट प्रो. लासेन खरी मानतो. परंतु सध्यां उपलब्ध असलेलें रामायण-काव्य त्यापूर्वीं केव्हां रचलें गेलें होतें, हें ठरविणें बहुधा अशक्य कोटींतीलच गोष्ट आहे असें त्याचें मत आहे.

**तेलंग यांचा टीकात्मक लेख.**—वर दिलेल्या वेबरच्या लेखास न्यायमूर्ति काशीनाथ त्र्यंबक तेलंग यांनीं सविस्तर उत्तर दिलें आहे. त्याचा सारांश पुढें दिला आहे.

भारतीयांचें राष्ट्रीय आर्षमहाकाव्य जें रामायण त्याकडे आतांपर्यंत निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळ्या दृष्टींनीं पाहिलें आहे. कोणी त्यामध्यें आर्यसंस्कृतीचा दस्यूंवरील विजय चित्रित केला आहे असें म्हणतात, तर कोणी ब्राह्मण आणि बौद्ध यांच्या स्पर्धेचें चित्र त्यांत पाहतात, तर कोणाला तें एक कृषिकर्मावरील रूपक आहे असें भासतें. याप्रमाणें रामायणांतील कथेवर निरनिराळ्या काळीं निरनिराळे उद्देश आरोपित झाले आहेत. तरी त्यांतील मुख्य कथा मूळचीच आहे किंवा शुद्ध ब्राह्मणी आहे किंवा बौद्धांपासून घेतलेली आहे किंवा दुसऱ्या कोणापासून घेतली आहे हे प्रश्न व यांच्यासारखे इतर प्रश्न नुकतेच कोठें डोकावूं लागले आहेत. या गोष्टीकडे लक्ष वळविण्याचें श्रेय डॉ. वेबर यास आहे.

कोणत्याहि भारतीयास त्यानें आतांपर्यंत अत्यंत पूज्य मानिलेला राष्ट्रीय ग्रंथ, ज्या ग्रंथांतील नायकाकडे तो केवळ ईश्वरांशाप्रमाणें पाहतो तो ग्रंथ, त्यांतील मुख्य भाग एका बौद्ध जातकावरून घेऊन व त्यास एका पाश्चात्य कथेची पुस्ती जोडून तयार केला आहे असें सांगणें म्हणजे त्याच्या मनास बराच जोराचा धक्का देणें होय. परंतु जर शास्त्रीय पद्धतीनें तशी गोष्ट सिद्ध होत असेल तर ती मान्य करावयास आपल्या मनाची तयारी असली पाहिजे.

डॉ. वेबर यानें आपल्या एकंदर विवेचनावरून पुढील निष्कर्ष काढिले आहेत. (१) मुख्य वनवासाची कथा ही वरीलसारख्या बौद्ध दंतकथांच्या कथासूत्रांचा विस्तार करून बनविली आहे. (२) रामायणांतील कथानकाचें जें सध्यांचें स्वरूप आहे त्यावरून ग्रीक लोकांचा सांस्कृतिक परिणाम भरतखंडावर कायम झाला होता अशीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. (३) सीतेचें हरण आणि लंकेवरील स्वारी या दोन गोष्टी वरील बौद्धकथेस जोडल्या गेल्या, यावरून होमरच्या काव्यांशीं भारतीयांचा परिचय झाला होता हें स्पष्ट होतें. (४) वाल्मीकीच्या काव्याचा काल ख्रिस्ती शकाच्या आरंभापूर्वी फारसा जात नाहीं. एवढे वेबरचे मुख्य मुद्दे आहेत. बाकीचे गौण असल्यामुळें त्यांचा येथें विचार करण्याची आवश्यकता नाहीं.

यांपैकीं पहिला मुद्दा रामवनवासाची कथा दशरथजातक या बौद्ध जातककथेवरून घेतली हा होय. वेबरचा लेख जर नीटपणें पाहिला तर हा मुद्दा बरोबर सिद्ध झाला आहे असें म्हणतां येणार नाहीं. वेबरचें म्हणणें कीं बौद्धकथेमध्यें प्राचीनतेची इतकी स्पष्ट झांक मारते कीं ती कथा बरीच प्राचीन असावी यावद्दल संशय राहत नाहीं. परंतु ज्या गोष्टी वेबरला 'स्पष्ट' दिसतात त्या आमच्या मतें मुळींच स्पष्ट नाहींत. त्यानें या दोन कथांमधील फरक दाखविले आहेत त्यांत राम आणि त्याचा बंधु लक्ष्मण यांस त्यांच्या पित्यानें केवळ त्यांच्या सावत्र आईच्या कारस्थानापासून बचाव करण्याकरितां वनवासास पाठविलें असें आहे. आतां या गोष्टीवरून अधिक प्राचीनता कशी स्पष्ट होते हें मोठें कोडें आहे. दुसरा फरक म्हणजे बौद्ध कथेंतील सीता 'स्वखुषीनें' रामलक्ष्मण यांजबरोबर जाते. पण वाल्मीकीच्या कथेंतील सीताहि स्वखुषीनेंच रामाबरोबर जाते हें रामायणाच्या मुंबई व गोरेसियो प्रतींवरून आणि रघुवंशावरून स्पष्ट आहे. ( येथें वेबरच्या मनांतून फरक दाखवावयाचा तो सीता 'स्वखुषीनें' जाते यांत दाखवावयाचा नसून, ती बौद्ध-कथेंत रामाची बहिण म्हणून जाते व राम वनवासाहून परत आल्यावर त्याचें तिच्याशीं लग्न होतें आणि वाल्मीकीच्या कथेंत ती रामाची पत्नी असून वनवासापूर्वींच त्यांचें लग्न झालेलें होतें या गोष्टींत दाखवावयाचा असावा, वेबरचा हा मुद्दा नीटपणें मांडला गेला नाहीं ). या दोन्ही कथांतील वनवासाच्या कालांत फरक आहे. सीतेचें रामाशीं लग्न वनवासाहून परत आल्यावर होतें. सीता ही रामाची लग्नापूर्वी बहिण होती. या सर्वांत महत्त्वाचा फरक राम आणि सीता यांचें विवाहापूर्वी नातें बहिणभावांचें होतें या गोष्टींत आहे. तसाच बौद्ध कथेंत रावणानें सीतेचें हरण केलें इत्यादि पुढील कथाभाग नाहीं. आतां बहिणभावांच्या विवाहाची चाल ही जास्त प्राचीन असें जरी मानलें तरी तेवढ्यावरून त्या चालीचा उल्लेख असलेली कथा दुसऱ्या तऱ्हेची चाल दाखविण्याऱ्या कथेहून प्राचीन होती असें कसें म्हणतां येईल ? एवढ्याच मुद्दयावरून पौर्वापौर्य ठरविणें निदान इतक्या महत्त्वाच्या बाबतींत तरी बरेंच धाडसाचें होईल.*

आतां सीतेचें हरण व लंकेवरील स्वारी यांचा उल्लेख बौद्ध कथेंत नाहीं एवढ्यावरून ज्या कथेंत जास्त मजकूर आहे ती कथा

* तेलंगांच्या मुद्दयास आम्ही अशी पुस्ती जोडतों कीं ज्याअर्थी शकजातीय गौतमबुद्धाची उत्पत्ति बंधुभगिनीविवाहमूलक होती आणि ज्याअर्थी ही चाल ब्राह्मणानुयायी समाजांत कनिष्ठ समजली जात असली पाहिजे त्याअर्थी सर्वजनसंमत असें जें रामचरित्र त्यास आपण आपल्या चालीचें गालबोट लावावें अशी इच्छा गौतमास व त्याच्या अनुयायांस होणें शक्य आहे. —संपादक.

कमी मजकूर असलेल्या कथेपेक्षां अर्वाचीन असें म्हणतां येणार नाहीं. एखाद्या इंग्रजी वाङ्मयाच्या इतिहासाच्या अभ्यासकानें शेक्सपियरच्या नाटकांची हेमिंगे आणि कॉडेल यांची आवृत्ति बौडलरच्या कौटुंबिक आवृत्तीपेक्षां किंवा एखाद्या प्रयोगाच्या सोईकरितां छाटछूट करून फेरफार केलेल्या आवृत्ती-पेक्षां अर्वाचीन आहे असें म्हणणें जितकें सयुक्तिक होईल तितकेंच वरील विधान सयुक्तिक होईल.*

या दोन कथानकांतील स्थलांचा फरकहि लक्षांत घेण्या-सारखा आहे. वाल्मीकीनें अयोध्या नगर घेतलें आहे तर बौद्धांनीं बनारस शहर घेतलें आहे. या मुद्द्यावर वेबरचें जें म्हणणें आहे त्यांत विशेषसें तथ्य नाहीं एवढेंच येथें नमूद केलें म्हणजे पुरे. 'बौद्धांच्या अनेक जातककथांमध्यें बनारसचा उल्लेख येतो व बनारसचा राजा ब्रह्मदत्त हें जसें काहीं प्रत्येक जातकाचें पालुपद बनलें आहे' असें शेरिंग यानें आपल्या ग्रंथांत† म्हटलें आहे. यावरून बौद्ध जातकांतील सर्व कथांचें स्थल सामान्यतः बनारस हें दाखविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो व त्यामुळें दशरथाची कथा बनारसमध्यें घडली असें दाखविलें आहे. यासंबंधींच्या वेबरच्या मुद्द्यांत कांहींच अर्थ दिसत नाहीं.

आतां या वरील वादविवादासंबंधानें मुख्य प्रश्न हा उप-स्थित होतो कीं बौद्ध जातककथांचा काल कोणता? या प्रश्नाचा जरी वेबरनें विचार केलेला नाहीं तरी तो एक महत्त्वाचा प्रश्न आहे. बौद्ध कथेवरून रामायण रचलें जाण्याच्या ऐवजीं रामायणावरूनच बौद्ध कथेचा उगम होणें व रामायण हें बौद्धकथेची सुधारून वाढविलेली आवृत्ति असण्याच्या ऐवजीं बौद्ध कथा हीच रामायणाची संक्षिप्त आवृत्ति असणें ही गोष्ट वेबरनें जें वर विरुद्ध विधान केलें आहे त्याच्या इतकीच निदान संभवनीय आहे. दोन्ही गोष्टी सारख्याच संभवनीय आहेत असें म्हणण्याचें कारण एवढेंच कीं ब्राह्मणांनीं एखाद्या बौद्ध कथानकां-तील नायकास ब्राह्मणी स्वरूप देणें ही गोष्टच अतर्क्य दिसते. कारण त्यांनां जर बौद्ध संप्रदायाच्या विरुद्ध चळवळ करावयाची होती असें वेबर म्हणतो तर त्यांच्या कथानकांतील नायकाचें रूपांतर करणें ही गोष्ट अगदीं शेवटचा उपाय म्हणूनहि कोणी करणार नाहीं. उलटपक्षीं एखाद्या मुळापासून फुटून निघालेल्या पाखंडी संप्रदायानें पूर्वीच्या एकत्र असतांना चालत आलेल्या परंपरागत कथा वगैरे आपल्या बरोबर नेण्याचा जास्त संभव आहे आणि अशा दृष्टीनें बौद्ध कथा ही मूळ ब्राह्मणी परंपरेंतील कथा असून तिला बौद्धांनीं आपल्या मतानुरूप वळण दिलें असावें असें समजणें जास्त सयुक्तिक आहे.

आतां आपण वेबर यास ग्रीक संस्कृतीचा व विशेषतः होमरच्या काव्यांचा रामायणावर जो स्पष्ट परिणाम झालेला दिसतो त्याकडे वळूं. या बाबतींत वेबरनें पुढें आणलेले मुद्दे फारसे महत्त्वाचे नाहींत. वेबरनें रामायण व होमर या काव्यां-तील कांहीं पात्रांत जें 'साम्य' दाखविलें आहे तें बरोबर दिसत नाहीं. हेलेनला पळवून नेणारा स्त्रैण पारिस आणि जगज्जेता देवांसहि भयजनक असा सीतेचें हरण करणारा रावण यांच्या-मध्यें काय साम्य असूं शकणार? ग्रीक काव्यांतील नायिकेचा थिल्लरपणा आणि रामायणांतील जनककन्या सीता इची अलौलिक सात्त्विकता यांची तुलना कशी होणार? अॅगॅमेम्नान हा मेनिलॉसचा भाऊ होता, सुग्रीव हा रामाचा भाऊ नव्हता. लक्ष्मण हा रामाचा भाऊ होता व त्याचा वध झालेला दाखविलेला नाहीं. परंतु पेट्रॉक्लस हा अचिलिस याचा भाऊ नसून त्याचा वध झालेला दाखविला आहे. रामाची तुलना जर अचिलिसबरोबर केली तर मेनिलॉसचा जोडीदार कोण? आतां मेनिलॉस याची स्त्री पळवून नेलेली होती म्हणून त्याची जर रामाबरोबर तुलना केली तर ज्याच्या 'रागामुळें ग्रीसवर दुःखांचा प्रवाह लोटला' त्या अचिलिसशीं साम्य दाखवावयास कोण आणावयाचा? तेव्हां मुख्य पात्रें स्वभावतःच भिन्न आहेत असें मानलें पाहिजे. आपणांला शेक्सपिअरचें ऑथेल्लो आणि स्कॉटचें केनिलवर्थ यांत पुष्कळ साम्य आढळतें म्हणून स्कॉटनें आपला न्हानें यागोवरून घेतला व डेस्डिमोनेवरून अॅमि घेतली असें कोणी म्हणत नाहीं. परंतु वेबरचा या मुद्द्यावर कांहीं विशेषसा जोर नाहीं व तो अलेक्झांडरच्या स्वारीमुळें ग्रीक व भरतखंड यांचा जो संबंध आला होता त्यामुळें होमरच्या कथानकाच्या सारांशाशीं भारतीयांचा कांहीं तरी परिचय झाला असावा ही केवळ 'गृहीत गोष्ट' (assumption) म्हणून धरतो. यांतला 'गृहीत गोष्ट' हा शब्द महत्त्वाचा आहे व त्यापलीकडे त्या मुद्द्याची कांहीं किंमत नाहीं. आतां थोडें खोल जाऊन ही गृहीत गोष्ट कशावर आधारलेली आहे तें पाहूं.

आपणांला प्रथम डायो क्रिसोस्टोममध्यें आणि नंतर एलियन-मध्यें होमरच्या ग्रंथाचें एक भारतीय भाषांतर असावें असा उल्लेख आढळतो. परंतु असें भाषांतर आजपर्यंत कांहीं कोठें जगाच्या पुढें आलेलें नाहीं. यामुळें वेबरला केवळ 'ग्रीसप्रमाणें भरतखंडांतील लोकांसहि होमरच्या धर्तीवर असणाऱ्या एका महाकाव्याची माहिती होती' एवढें 'मत' प्रदर्शित करूनच थांबावें लागलें. नंतर वेबरनें महाभारतावर झालेला ग्रीक काव्याचा परिणाम याबद्दल ऊहापोह करून शेवटीं 'रामोपाख्यान हा भाग रामायणाचें ज्ञान असल्यामुळेंच भारतांत आला ही गोष्ट शक्य आहे; रामायण हा ग्रंथ त्या कालीं होताच असें सिद्ध करणारा हा कांहीं पुरावा नव्हे' असें म्हटलें आहे. यावर असें म्हणतां येईल कीं जर होमरचें भाषांतर भरत-खंडांत नव्हतें ही गोष्ट वेबरला कबूल आहे तर त्या काव्याची संक्षिप्त आवृत्ति तरी होती हें कशावरून? होमरचें भाषांतर किंवा संक्षिप्त आवृत्ति यांपैकीं कांहींहि येथें नसून केवळ या काव्यांचें ग्रीक काव्याशीं कांहीं वरवर साम्य आढळलें त्यावरून केवळ वर उल्लेखिलेल्या डायो क्रिसोस्टोम आणि

---

* तेलंगांचें हें विधान सयुक्तिक दिसत नाहीं. बौद्ध कथा एखाद्या रानवटानें दुसऱ्या रानवटाला सांगितल्यासारखी दिसते, व रामायणांतील कथा संविधानकाची ठाकठिकी पाहणाऱ्या कवीचा हात लागल्यावर होणारें स्वरूप पावलेली दिसते. तेलंगांच्या म्हणण्याप्रमाणें जातकांतील भिन्न नीरस मजकूर हा फेरफार आहे असें धरल्यास (उदाहरणार्थ, दशरथाचा ९ वर्षांनीं मृत्यु वगैरे प्रकारचा फेरफार) तो करण्यांत हेतु व्यक्त होत नाहीं.—संपादक

† Sherring's Benares, Chap. I.

एलियन या ग्रंथकारांचें भरतखंडांत होमरचें एखादें भाषांतर असावें असें मत झालें असावें. एकंदरींत या बाबतींत केवळ कल्पनांवर भिस्त ठेवलेली असून स्पष्ट मत कोणत्याच बाजूचें देतां येत नाहीं. वेबरच्या 'गृहीत गोष्टी'स आधार काय तो या दोन काव्यांतील कांहीं कांहीं प्रसंगांमध्यें अर्धवट साम्य दिसतें हाच राहतो. आतां वेबरनें दाखविलेल्या साम्यांपैकीं दोन गोष्टी तर महावंसो व बुद्धघोषाची धम्मपदावरील टीका यांसंबंधींच असल्यामुळें त्या सोडून दिल्या तर तिसरें साम्य केवळ 'कदाचित्' म्हणूनच दाखविलें आहे. हें साम्य रामायणामध्यें सीतेला रामानें धनुष्य वांकविण्याच्या पणांत जिंकलें यासारखीच गोष्ट जनकजातकांत व ओडेसीमध्यें आढळते हें होय. त्याप्रमाणेंच जनकजातकामध्यें दुसरी एक गोष्ट ओडेसीमधल्या एका गोष्टीसारखी असून ती या धनुष्याच्या गोष्टीला जोडून दिली आहे. यावरून वेबर असें म्हणतो कीं या गोष्टींचा संबंध जर होमरशीं जोडतां आला तर रामायणांतील हा प्रसंग होमरवरून घेतला असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु वरील साम्य एखाद्या विद्वानानें दोन ग्रंथांपैकीं एकावरून दुसरा रचला एवढें म्हणण्यास पुरेसें धरणें हें चिकित्सक बुद्धीला पटेसें नाहीं. डायो क्रिसोस्टोम याला जो होमरसारखा ग्रंथ वाटला तो कदाचित् प्रत्यक्ष रामायणच असून होमरच्यें कांहीं गोष्टींत त्याशीं साम्य त्यास दिसल्यावरून त्यानें तसें विधान केलें असावें. इतर जीं किरकोळ साम्यें, उदाहरणार्थ, हनुमानाची सूर्यास स्तब्ध राहण्याची आज्ञा, रामानें अश्वमेधाच्या वेळीं सीतेची सुवर्णप्रतिमा करून तिजबरोबर शयन करणें इत्यादि, तीं वेबरलाच कमी महत्त्वाचीं वाटून त्यानें त्यांवरून कांहींच अनुमानें काढलीं नाहींत. अश्वपति या नांवाबद्दल बोलावयाचें तर अश्वपति आणि केकय हीं दोन्हीं नांवें पाणिनीच्या सूत्रांत आढळतात;* व पाणिनी अलेक्झांडरच्या स्वारीपूर्वीं होऊन गेला याबद्दल कोणाचाच मतभेद नाहीं.

यावरून वेबरचें जें म्हणणें कीं रामायणाचें कथानक हें बौद्धकथेची नक्कल, तें कितपत सयुक्तिक आहे हें दिसून येईल. वेबरच्या कल्पनेच्या उलट बौद्धांनींच रामायणांतील कथा घेऊन तिचें रूपांतर केलें असण्याचा संभव आहे. रामायण व होमरचीं काव्यें यांतील जीं साम्यें वेबरनें पुढें आणलीं आहेत तीं केवळ आकस्मिक आहेत. ब्राह्मण व बौद्ध हे पूर्वींच्या एकाच परंपरेंतून निघालेले असल्यामुळें त्या दोघांतहि या कथेचें कथासूत्र परंपरेनें चालत आलें असावें व ब्राह्मणांमध्यें महाकवि वाल्मीकि उत्पन्न झाल्यामुळें त्यानें त्या सूत्रावरून रामायणासारखें काव्य निर्माण केलें तर बौद्धांनीं आपल्या समजुतींस अनुरूप अशी जातककथा तयार केली अशी खरी गोष्ट असावी. एकंदरींत वेबरचें म्हणणें फार तर 'असिद्ध' या सदराखालीं येईल, बर्नेलच्या म्हणण्याप्रमाणें 'जवळजवळ संशयाच्या पलीकडे सिद्ध' झालेलें धरतां येणार नाहीं.

आतां आपण वेबरनें ग्रंथांतर्गत पुरावा म्हणून जो पुढें मांडला आहे त्याकडे वळूं. प्रथमतः या ग्रंथाचें संस्कृत वाङ्मयामध्यें कालानुक्रमानें स्थान ठरवितांना वेबर हा ग्रंथ फार मोठा असल्यानें तो एकानेंच लिहिलेला असणें शक्य नसून त्याला सध्यांचें स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी अनेक शतकें त्यामध्यें भर पडत असली पाहिजे असें म्हणतो. आतां कांहीं विशिष्ट श्लोक किंवा लहान लहान उतारे अथवा कांहीं कथानकें मूळच्या वाल्मीकीच्या ग्रंथाला मागाहून जोडण्यांत आलीं असलीं तरी तेवढ्यावरूनच केवळ हा ग्रंथ अनेक ग्रंथकारांनीं रचलेला आहे असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. भवभूति आणि कालिदास यांसारखे ग्रंथकार जर उत्तरकांडांतील कथा रामायणांतील म्हणूनच धरून चालतात आणि उत्तरकांड तर वेबरच्या मतानेंहि मूळ रामायणाला मागाहून जोडलेलें आहे तर उत्तरकांड जोडलें जाण्याचा काल आणि भवभूति आणि कालिदास यांचा काल यांमध्यें किती अंतर असलें पाहिजे? आणि त्या मानानें मूळ रामायणांत आणि कालिदासभवभूति यांच्या कालांत किती अंतर धरलें पाहिजे? विश्वामित्र आणि परशुराम यांच्या कथानकांबद्दलहि हीच गोष्ट. दोहोंतहि क्षात्रवृत्तीचा ब्राह्मवृत्तीवर विजय दाखविलेला आहे. वसिष्ठ म्हणतो कीं माझें सामर्थ्य विश्वामित्राच्या सामर्थ्याबरोबर नाहीं. या ठिकाणीं रामायणांत विश्वामित्राची वरीच स्तुति केली आहे. आतां पतंजलीच्या महाभाष्यांत असें दाखविलें आहे कीं, विश्वामित्रानें पुन्हां पुन्हां तपश्चर्या करून स्वतःला, आपल्या पित्याला व आपल्या पितामहाला ऋषिपद प्राप्त करून घेतलें. अर्थात् जो स्वतःलाच केवळ नव्हे तर आपल्या पितरांसहि ऋषिपद प्राप्त करून देतो त्याचें सामर्थ्य बरेंच मोठें असलें पाहिजे व ही गोष्ट जर रामायणाच्या कालीं प्रसिद्ध असती तर ती वरील प्रसंगीं जेथें विश्वामित्राची एवढी स्तुति केली आहे त्या ठिकाणीं अवश्य नमूद केली गेली असती. ती तशी तेथें नमूद केलेली नाहीं यावरून ही गोष्ट रामायणकालीं माहीत नव्हती म्हणजे रामायण पतंजलीच्या पूर्वीं रचलें गेलें होतें. परशुरामासंबंधींहि तसेंच म्हणतां येईल. एकंदरींत या दोन्ही गोष्टी रामायणाच्या रचनाकालीं लोकांच्या समजुतींच्या विरुद्ध नव्हत्या असें दिसतें.

आतां कांबोज, पल्हव, यवन, शक, बर्बर, म्लेच्छ, तुषार, हारित, किरात इत्यादि ज्या लोकांचा उल्लेख आला आहे त्यांतील यवनांचा उल्लेख बॅक्ट्रियन, ग्रीक किंवा त्यांचे वंशज यांच्याबद्दल असावा असें वेबरचें म्हणणें. परंतु याविरुद्ध लासेन यानें असें म्हटलें आहे कीं यवन या शब्दानें ग्रीक किंवा आयोनियन ध्वनित होत नसून तो शब्द सेमिटिक लोकांसहि लावला जात असे. मॅक्स मुल्लरचेंहि मत असेंच आहे व यवन हा शब्द पाणिनींत* आलेला आहे. कंबोज हा शब्द देखील पाणिनींत आहे.† या निरनिराळ्या लोकांत काय फरक आहे हें भारतीयांस नक्की ठाऊक नसल्यामुळें हे शब्द अनिश्चितपणें लावले जात; व जेव्हां कवीच्या मनांत स्वकीय सैन्याचा पराजय करावयाचा होता तेव्हां त्यानें परकीयांची यादी घेतली ही गोष्ट वाल्मीकीसारख्या प्रतिभासंपन्न कवीमध्यें अगदीं स्वाभाविक आहे. अर्थात् ही यादी घेण्याची गोष्ट वाल्मीकीस बॅक्ट्रियन, ग्रीक अथवा शक लोकांच्या स्वारीवरून सुचली असें सिद्ध होत नाहीं.

* पाणिनी ४. १. ८४; ७. ३. २.

* पाणिनी सूत्र ४. १. ४९. † पाणिनी ४. १-१७५.

आतां सिंहलद्वीप हें ग्रीक लोकांस तपोवन, सिंहल अथवा पलिसिमुंदु एवढ्याच नांवांनीं ठाऊक होतें, परंतु रामायणांत त्याचा उल्लेख लंका म्हणून आलेला आहे. हें नांव आपणास प्रथम महावंसोमध्यें व अथर्ववेदाच्या परिशिष्टांत आढळतें व नंतर आर्यभट्ट आणि वराहमिहिर यांच्या ग्रंथांत आढळतें, तेव्हां लंका हें नांव सिंहलद्वीपास मागाहून मिळालेलें असावें, व तें नांव देणारा ग्रंथ ग्रीक लेखकांच्या नंतरचा असावा असें वेबर म्हणतो. पण लंका हें नांव सिंहल या नांवाच्या पूर्वी प्रचारांत असून मध्यंतरीं सिंहल नांव येऊन पुन्हां पुढें लंका हें नांव प्रचारांत आलें असण्याचा संभव आहे. कारण लंका हें नांव जर नंतरचें तर सध्यां आपण पूर्वीचें सिंहल पुन्हां कां वापरतों? जर सिंहल पुन्हां रूढ होऊं शकतें तर लंका हें पूर्वी रूढ असून पुन्हां रूढ झाल्याची गोष्टहि तितकीच संभवनीय आहे.*

आतां आपण वेबरच्या वाङ्मयविषयक आधारांकडे वळूं. हे सर्व आधार त्यास फक्त गौड प्रतींतच मिळाले. आतां असेंहि म्हणतां येईल कीं हे सर्व आधार फक्त गौड प्रतीलाच लागू आहेत; व ही गोष्ट वेबरलाहि मान्य आहे. वेबरचें म्हणणें कीं रामायणाच्या रचनेपूर्वी संस्कृत वाङ्मयाची वाढ वरीच झाली होती व त्यामुळें सापेक्षत्वानें (Comparatively) रामायण हें अर्वाचीन आहे. पण येथें सापेक्षत्वानें म्हणजे काय हें वेबरनें स्पष्ट केलें नाहीं व तुलनेकरितां कोणतें वाङ्मय घ्यावयाचें तें नीटसें दिलें नाहीं. त्याप्रमाणेंच संस्कृत वाङ्मयाची वाढ रामायणापूर्वी झाली होती ती खिस्ती शकाच्या पुष्कळच पूर्वी झाली असण्याचाहि संभव आहे व त्यामुळें नक्की कालनिर्णयास मदत होत नाहीं. आतां कोणत्या वाङ्मयाची वाढ झाली होती हें पहावयाचें म्हटल्यास वेदांबद्दल प्रश्नच नाहीं. वेदांगांचा उल्लेख पतंजलीनें उद्धृत केलेल्या एका वाक्यांत आहे.† वेदांगांपैकीं शिक्षा या ग्रंथावर वेबरचा वराच जोर दिसतो. या ग्रंथाचा कर्ता पाणिनि मानला जातो आणि सायणानें शिक्षेवरील कांहीं प्रकरणें ब्राह्मणांत होतीं असें म्हटलें आहे व मॅक्स मुल्लरला तें मान्य आहे. सूत्र आणि कल्प यांचा उल्लेख पाणिनींत आहे.‡ कल्पसूत्राचा पतञ्जलींत आहे. धनुर्वेद इत्यादिकांचा उल्लेख छांदोग्यांत आहे.¶ नाटक, धर्मशास्त्र यांचा उल्लेख पतञ्जलींत आहे.$ न्याय आणि नैय्यायिक यांचा पाणिनी (४. २. ६०) शीं संबंध आहे. 'न्याय' शब्द गणपाठांत आहे. नास्तिकांचा उल्लेख पाणिनींत|| आहे आणि लोकायतिकांचा पतञ्जलींत आहे.§

* लंका हा शब्द द्राविड भाषांत असून त्याचा अर्थ नुसता बेट असा आहे. विशिष्ट शब्दाला द्राविडांनीं केवळ बेट या अर्थी सामान्य नाम समजणें आणि त्याच शब्दाला उत्तरेकडील लोकांनीं विवक्षित बेटाचें नांव समजणें स्वाभाविक आहे-संपादक. † Introduction p. 4. (Benares Edition.) ‡ पाणिनि ४. २. ६५; ४. ३. १०५. ¶ Bib. Ind. Edi. p. 475, 478, 493. $ पाणिनि सूत्र ३. १. २६;१. २. ६९. || पाणिनि ४. ४. ६०. § पाणिनि ७.३. ४४. वरील भाष्यांत.

त्याप्रमाणेंच वेबरनें जीं अवतरणें घेतलीं आहेत तीं त्याच्या मतास पोषक नसून कांहीं तर त्याच्या विरुद्ध आहेत. तीं आतां अपरिचित असून त्यांच्या ग्रंथकारांचीं नांवेंहि नष्टस्मृति झालीं आहेत. त्याप्रमाणेंच त्यानें कात्यायन, जावालि, धन्वंतरि यांचा उल्लेख केला आहे त्यावरून काय अनुमान निघतें तेंहि नीट दिसत नाहीं. संस्कृत आणि शास्त्र या शब्दांबद्दलहि असेंच म्हणतां येईल. 'शास्त्र' शब्द पतंजलीनें एकटा व समासान्त असा दोन्ही तऱ्हेनें उपयोगिलेला आढळतो.*

कृष्ण व राम यांच्या उपासनांबद्दल असें म्हणतां येईल कीं, रामोपासना ही वैष्णवोपासनासोपानांतील कृष्णोपासनेपूर्वीची पायरी व कृष्णोपासना रामायणामध्यें आढळत नाहीं या दोन गोष्टी जर वेबरला कबूल आहेत तर रामायण हें कृष्णोपासनेपूर्वीचें ही गोष्ट सिद्ध होते. कृष्णोपासना ही पतंजलि व पाणिनि यांच्या कालीं होती हें पाणिनीवरील भाष्यावरून आपणांस समजतें.†

रामायण आणि महाभारतामध्यें जें व्याकरणनियमांपासून स्वातंत्र्य घेतलेलें आढळतें त्या संबंधानें या ग्रंथांची परस्पर तुलना केली तरी ती या दोन ग्रंथांचाच केवळ सापेक्ष काल ठरविण्याच्या कामीं उपयोगास येईल. तसेंच रामायणाच्या बऱ्याच सर्गांच्या अखेरीस जे भिन्न वृत्तांतील श्लोक आहेत त्यांवरून कथानकाला कांहींच मदत होत नाहीं व ते प्रक्षिप्त असले पाहिजेत.

आतां ज्योतिषविषयक गोष्टींचा रामायणांत उल्लेख येतो हा जो वेबरचा मुद्दा त्यापैकीं नक्षत्रज्ञान तर भारतीयांस वेदकालापासून होतेंच व राशींचा उल्लेख काय तो एकदांच आला आहे. आतां मंगळाचा युद्धाशीं, बुधाचा व्यापाराशीं व गुरूचा यज्ञविधीशीं जो संबंध जोडण्यांत आला आहे, त्यांत मंगळाचा रंग लाल असल्यामुळें रक्ताशीं सादृश्य कल्पून त्याचा युद्धाशीं संबंध जोडणें साहजिक आहे; व गुरु याचा अर्थ आचार्य असल्यामुळें त्याचा यज्ञविधीशीं संबंध जोडला जाणेंहि स्वाभाविकच आहे; तसेंच बुध हा बुद्धिवान् ग्रह असल्यामुळें त्याचा व्यापाराशीं संबंध जोडला गेला असेल.

यानंतर वेबर रामायण ग्रंथाचा उल्लेख कोणकोणत्या प्राचीन ग्रंथांत आढळतो तें पाहतांना म्हणतो कीं ज्याचें प्राचीनत्व निर्विवाद आहे अशा ग्रंथांत रामायणाचा उल्लेख आढळत नाहीं. परंतु यावरून तो बऱ्याच प्राचीन कालीं उपलब्ध नव्हता असेंहि सिद्ध होत नाहीं. आतां महाभारतामध्यें रामायणाच्या कथेचा उल्लेख आहे. हा महाभारताचा भाग किती जुना आहे हें पाहूं गेल्यास गोल्डस्टकर याच्या मताप्रमाणें महाभारतांतील सर्वांत अर्वाचीन म्हणजे बुद्धानंतरचा भाग सुद्धां खिस्ती शकाच्या उदयापूर्वीचा आहे व त्याच्या मताप्रमाणें कांहीं भाग खात्रीनें बुद्धनिर्वाणाच्या पूर्वीचा असावा असें म्हणतां येईल. तेव्हां वेबरनें रामायणाचा उल्लेख असलेला महाभारताचा भाग खिस्तपूर्वकालचा असणें शक्य नाहीं ही गोष्ट सिद्ध करावयास पाहिजे होती. शिवाय रामायणाचा उल्लेख महाभारतांत आढळतो

* पाणिनि १. १. ६ वरील भाष्य. † पाणिनि ४. ३. ९८ वरील भाष्य.

पण महाभारताचा उल्लेख मात्र रामायणांत कोठेंच आढळत नाहीं. त्याप्रमाणेंच कौरव, पांडव अथवा दुसरी एखादी महाभारतांतील व्यक्ति रामायणांत मुळींच आढळत नाहीं. वेबरनें रामकथेचा उल्लेख सामवेदाच्या कर्मप्रदीप नांवाच्या परिशिष्टांत आला आहे असें म्हटलेंच आहे. हा उल्लेखिलेला कथाभाग उत्तरकांडांतील असून उत्तरकांड हें तर रामायणांतील सर्वांत अखेरचा व अर्वाचीन भाग आहे. हें परिशिष्ट कांहीं रामकथेचा उल्लेख आहे म्हणूनच केवळ अर्वाचीन मानलें जाणार नाहीं. त्याचा काल इतर साधनांनीं निश्चित केला पाहिजे व तसा वेबरनें केला नाहीं. वेबरच्या मतें हें परिशिष्ट कात्यायनाच्या नांवावर मोडतें पण सर्वसामान्य समजूत तर अशी आहे कीं श्रुति सर्व अपौरुषेय आहेत. आतां हा कात्यायन जर पाणिनीच्या सूत्रांवरील वार्तिक रचणारा असेल तर रामायणाचा काल पुष्कळच मागें जातो. परंतु हें सामवेदपरिशिष्ट उपलब्ध नसल्यामुळें येथें त्याबद्दल फारसें विवेचन करतां येत नाहीं.

कालिदास हा रघुवंशामध्यें रामायणाचा आद्यकाव्य म्हणून व वाल्मीकीचा आद्यकवि म्हणून उल्लेख करितो. आतां कालिदासाच्या कुमारसंभवांतील एक श्लोक पंचतंत्रामध्यें दोन वेळां उद्धृत केलेला आढळतो.* नौशिर्वान या इराणच्या बादशहानें खि. श. ५३१–५७९ यांच्या दरम्यान पंचतंत्राचें मूळ संस्कृतवरून भाषांतर केलें. यावरून पंचतंत्र अगदीं अलीकडे म्हटलें तरी फार तर पांचव्या शतकाच्या अखेरीस रचलें गेलें असें म्हणतां येईल. यावरून कालिदास फार तर ४ थ्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला असें म्हणतां येईल. परंतु आपणांजवळ असलेल्या प्रतींच्या प्रामाण्याबद्दल संशय असल्यास त्याचें निराकरण भाषांतरावरून होतें. फारसी 'अनवारि सोहिली' या पंचतंत्राच्या दुसऱ्या एका या भाषांतरांत वरील श्लोकाच्या उत्तरार्धाशीं समानार्थक शब्द त्याच गोष्टींत आढळतात. आतां हें भाषांतर केवळ शब्दास शब्द असें नाहीं; कारण तें मूळ संस्कृतवरून केलेलें भाषांतर नाहीं. एकंदरींत कालिदासाचा वरील श्लोक अगदीं पंचतंत्राच्या पहिल्या भाषांतरांत असला पाहिजे आणि कालिदास जर ४ थ्या शतकामध्यें होऊन गेला असला तर वेबरच्या मताप्रमाणें २ ऱ्या शतकांत होऊन गेलेल्या वाल्मीकीला तो आद्यकवि व त्याच्या काव्यास आद्यकाव्य म्हणेल हें अशक्य आहे. वेबरनें आपल्या दुसऱ्या एका लेखाचा उल्लेख केला आहे त्यांत त्यानें कालिदास खिस्ती शकाच्या तिसऱ्या किंवा सहाव्या शतकांत होऊन गेला असावा असें धरलें आहे. आतां यांपैकीं जर पहिला काल घेतला तर रामायणाच्या कालाबद्दलचें वेबरचें सर्वच बोलणें फोल ठरतें.

आतां अयोध्याकांडामध्यें बुद्धाचा उल्लेख ज्या श्लोकांत आला आहे तो श्लोक श्लेजेलच्या मताप्रमाणें प्रक्षिप्त आहे पण वेबर म्हणतो कीं या गोष्टीचा पुन्हां विचार केला पाहिजे. परंतु हा श्लोक गोरेसिओ याच्या प्रतींत मुळींच आढळत नाहीं व बुद्धाचा पुढें कोठेंहि उल्लेख आढळत नाहीं. या ठिकाणींहि बुद्धाचा उल्लेख संदर्भास धरून नाहीं. या गोष्टी तो श्लोक प्रक्षिप्त आहे हेंच दाखवितात.

याप्रमाणें रा. तेलंग यांनीं वेबरच्या लेखाचा विचार करून नंतर आणखी कांहीं मुद्दे स्वतःचे मांडले आहेत ते पुढें देतों.

रामायणांतील व्यक्तींच्या नांवांबद्दल पाणिनींतील उल्लेख पाहतां ऐक्ष्वाक, कैकयी आणि कौसल्या इत्यादि शब्दांचीं रूपें नियमानुसार आहेत असें दाखविलें आहे. यावरून विशेष कांहीं बोध होत नाहीं पण एवढें खरें कीं, पाणिनींत जीं रूपें विशेष असतील तींच तेवढीं यावयाचीं. पतञ्जलीमध्यें पाणिनीच्या २. २. ३४ सूत्रावरील भाष्यांत 'प्रासादे धनपतिरामकेशवानाम्' असें वाक्य आढळतें. पण यांतील राम या शब्दानें निश्चयात्मक कोणती व्यक्ति दाखविली जाते हें सांगतां येत नाहीं. गणपाठाकडे वळलें असतां बाह्वादि गणांत (पाणिनि ४. १. ९६) सुमित्रा शब्द आढळतो. व त्यावरून सौमित्रि हा शब्द तयार होतो म्हणजे आपणास लक्ष्मण व त्याची आई यांचीं नांवें मिळतात.

आतां गणपाठ हा कालानुक्रम ठरविण्याकरितां केवळ आधार घेऊन चालणार नाहीं हें खरें, तथापि याच गणांत पुढें रामशब्द आलेला आहे व मध्यंतरीं पुष्करसद् हा शब्द आलेला आहे. यावरून पौष्करसद असें तद्धित रूप होतें व पौष्करसद हें कात्यायनानें उल्लेखिलेल्या एका व्याकरणकाराचें नांव होतें. तेव्हां सुमित्रा हा शब्द कात्यायनापूर्वीं या बाह्वादि गणांत होता असें म्हणावयास हरकत नाहीं. आतां या गणांत कांहीं शब्द नंतर घातले असतील व ते अनुक्रमानें शेवटीं न घालतां मध्येंहि घातले असतील अशी शंका कोणी घेईल; पण निदान मध्येंच घालण्याचा संभव नसण्यास तीन कारणें आहेत. एकतर या आकृतिगणांत मध्येंच शब्द घालण्याचें कांहीं विशेष प्रयोजन नाहीं. दुसरें, असा शब्द घालणाऱ्याच्या मनामध्यें कांहीं तरी अप्रामाणिक हेतु होता असें गृहीत धरावें लागतें; व तिसरें, याप्रमाणें आपण पुढील शब्द मागाहूनचे धरूं लागल्यास पहिल्या शब्दाशिवाय पुढच्या सर्वांचीच तीच अवस्था होईल. सुमित्रा शब्दाप्रमाणेंच रवण आणि ककुत्स्थ हे शब्द शिवादि गणांत (पाणिनि ४. १. ११२) आलेले आहेत; व त्यांवरून रावण आणि काकुत्स्थ हे शब्द तयार होतात. या गणांत ऋष्टिषेण शब्द वराच नंतर आला असून त्याचा उल्लेख महाभाष्यांत याच गणांत आहे म्हणून आला आहे. त्याप्रमाणेंच सौमित्रि हा शब्द गहादि गणांत आढळतो (पाणिनि ४. २. १३८) आणि रावणि, पौष्करसादि हे शब्द तौल्वल्यादि (पाणिनि २. ४. ६१) गणांत सांपडतात. तसाच केकय हा शब्द भर्गादि गणांत (४. १. १७८) तिसरा आहे व त्यापासून पुढें कैकयि शब्द होतो. याप्रमाणेंच राम, बिभीषण, पंपा, किष्किंधा, लंका इत्यादि शब्द गणपाठांत आढळतात.

रामायणामध्यें ब्रह्मा, विष्णु आणि शिव या तिहींचा उल्लेख असून तीं मुख्य दैवतें अशा समजुतीनें उल्लेखिलीं आहेत. पण शिव व विष्णु हीं परमेश्वराचीं रूपें असें त्यांचें रूप पतञ्जलींतहि आढळतें व ब्रह्मयाचाहि उल्लेख पतञ्जलींत आहे. रामायणांत त्यांचें त्रिमूर्तीमध्यें ऐक्य झाल्याचें दिसत नाहीं; परंतु कालिदासाच्या

* Kosegarton's Edi. p. 59 p. 102 मुंबई प्रतींत एकदांच आढळतो. पृ. ६३.

कुमारसंभव व रघुवंश यांमध्यें तसें दिसतें. रामायणांत इन्द्राचाहि सामर्थ्यवान् दैवत म्हणून उल्लेख आहे.* रामायणामध्यें रामाच्या विवाहाचें जें वर्णन आहे त्यावरून त्या वेळचा विधि बराच साध्या स्वरूपाचा दिसतो, पण कालिदासानें कुमारसंभवामध्यें शिवपार्वती यांच्या विवाहाचें वर्णन केलें आहे तें बरेंच थाटाचें आहे, या गोष्टींवरून रामायण आणि कालिदास यांच्या कालांत किती अंतर असलें पाहिजे याची कल्पना येईल.

वरील निबंध रा. तेलंग यांनीं मुंबईस 'स्टूडंट्स् लिटररी अँड सायन्टिफिक सोसायटी' पुढें २ सप्टेंबर १८७२ रोजीं वाचला. त्यानंतर प्रसिद्ध करतेवेळीं त्यास त्यांनीं कांहीं मजकूर टीपा व परिशिष्ट या रूपानें जोडला; तो पुढें दिला आहे.

दशरथजातकामध्यें शेवटीं बुद्ध स्वतः आपण राम होतों व त्याच्या सभोंवतींच्या निरनिराळ्या व्यक्ती वगैरे रामायणकालीं कोण होत्या हें सांगतो, यावरून बुद्ध हा एखाद्या जुन्या कथेचा आपल्या कार्याकरितां उपयोग करून घेत होता हें त्या ठिकाणीं स्पष्ट दिसतें. रामायणांतील कांहीं श्लोक दशरथजातकांतील कांहीं पाली श्लोकांशीं जुळतात यावरूनहि हीच गोष्ट सिद्ध होते. बौद्ध लोकांनीं रामायण ही मूळची आपली कथा असून नंतर ती ब्राह्मणांनीं घेऊन तींत फिरवाफिरव करून आपला मोठेपणा वाढविण्यास तिचा उपयोग केलेला पाहिला असता तर त्यांनीं तशी त्याविरुद्ध लागलीच ओरड केली असती. पण तसें कोठें दिसत नाहीं. आतां बौद्धांच्या कथेला एवढें महत्त्वच कधीं नसल्यामुळें ब्राह्मणांनीं त्या बाबतींत स्वस्थ बसणें सहजच संभवतें.†

महावंसोमध्यें एक लंकेवरील रावण राजाची कथा असून त्याच्या दुष्ट कृत्यांमुळें प्रलय झाल्याचें वर्णन आहे.‡

राजतरंगिणीमध्यें दामोदर राजाला शाप मिळाल्याची कथा आहे; व त्याला पुढील श्लोकांत उश्शाप मिळाला आहे.

> अशेषमेकेनैवाह्ना श्रुत्वा रामायणं तव ।
> शापस्य शान्तिर्भवितेत्यूचिरे ते प्रसादिताः ॥¶

दामोदर हा हुष्क, जुष्क व कनिष्क यांच्या पूर्वींचा लगतचा राजा होता. तो अशोकाचा वंशज होता. वेबरनें लासेनच्या मताप्रमाणें याचा काल ख्रिस्तपूर्व पहिलें शतक दिला आहे. यावरून रामायण या कालीं अपूर्ण असावें व तें यवन आणि शक यांच्या राज्यांच्या दरम्यानच्या काळांत लिहिलें गेलें असावें असें वेबर म्हणतो. परंतु या वरील श्लोकांत रामायणाच्या रचनाकालासंबंधानें कांहीं उल्लेख नाहीं व त्याच्या अपूर्णतेबद्दलहि उल्लेख नाहीं. उलट या श्लोकावरून असें दिसतें कीं, रामायण या वेळीं पूर्ण असून तें इतकें पवित्र मानलें जात असावें कीं त्याच्या श्रवणापासून पातकाचें क्षालन होतें अशी समजूत असावी.

आतां दामोदर राजाचा काल कोणता येतो तें पाहूं. प्रिन्सेप कनिष्काचा काल ख्रि. पू. ११८ देतो व त्यावरून दामोदराचा काल सुमारें ख्रि. पू. १७५ येतो.* प्रो. विल्सनच्या मतें कनिष्काचा काल ख्रि. पू. ३८८ हा असावा.† यावरून दामोदराचा काल त्याच्याहि पूर्वीं जातो. रा. राजेन्द्रलाल मित्र आपल्या ललितविस्तराच्या भाषांतरांत कनिष्काचा काल ख्रि. पू. १४३ देतात. जी. टर्नर हाच काल ख्रि. पू. १०३ असावा असें म्हणतो.‡ मॅक्स मुल्लर हा लासेनच्या मताप्रमाणें ख्रिस्तशकाच्या आरंभाच्या पूर्वीं कांहीं वर्षें अगर नंतर कांहीं वर्षें असा कनिष्काचा काल धरितो. परंतु त्याच्या कारकीर्दीचा आरंभ नक्की ठरविणें कठिण आहे असें म्हणतो. गोल्डस्टकर हा कनिष्काचा समकालीन नागार्जुन याचा काल ख्रि. पू. १४३ ठरवितो.¶ आतां यावरून आपणास कनिष्काचा काल सुमारें ख्रि. पू. १४३ व दामोदराचा काल ख्रि. पू. १७५ धरावयास हरकत नाहीं. त्यावेळीं रामायणाचें वरील श्लोकांत दर्शविलें आहे इतकें पावित्र्य मान्य झालें होतें, तेव्हां त्या मानानें त्याचा रचनाकाल बराच पूर्वींचा असला पाहिजे असें म्हणावें लागतें.

वेबरनें या राजतरंगिणींतील श्लोकाबद्दल अविश्वास दाखविला आहे, पण तो श्लोक तेथें घालण्यांत कर्त्याचा कांहीं विशिष्ट हेतु असावा असें दिसत नाहीं; तो तेथें स्वाभाविकच दिसतो. प्रिन्सेपच्या निबंधांत§ एका शिलालेखाचें भाषांतर दिलें आहे. तो लेख ख्रिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकांतील असून प्रो. विल्सनच्या मतें त्यांत रामाच्या सेतूचा उल्लेख आहे. पण तो लेख नीट लागलेला नसल्यामुळें त्याबद्दल विशेष लिहितां येत नाहीं.

भर्तृहरीच्या नीतिशतकामध्यें दशावतारांचा उल्लेख आहे.‖ यावरून त्यास रामायणाची सर्व कथा ठाऊक असावी. तसाच परशुरामाचा अवतारांमध्यें समावेश केला आहे. पण कालिदासाच्या रघुवंशामध्यें§ अथवा वाल्मीकिरामायणामध्यें परशुरामाचा अवतारांमध्यें समावेश केलेला आढळत नाहीं. मेघदूतामध्यें परशुरामाचा फक्त भृगुपति असा उल्लेख केलेला आहे, पण वामनाचा विष्णु म्हणून उल्लेख केला आहे, यावरून कालिदास आणि भर्तृहरि यांच्यामध्यें बराच काल लोटला असावा असें दिसतें. परंतु शाकुंतलांतील** एक श्लोक जशाचा तसाच नीतिशतकामध्यें†† आढळतो. आतां कालिदासानें हा श्लोक भर्तृहरीमधून घेऊन आपल्या पात्राच्या तोंडीं घातला असावा असें म्हटलें तर वरील गोष्टीस बाध येतो.

हा श्लोक सामान्य विद्वद्वर्गामध्यें प्रचलित असें जें परंपरागत सुभाषितवाङ्मय असतें त्यामधून दोघांनींहि घेतला असण्याचा

---

* Gorresio Balkanda XIV. 5. † या बाबतींत शेरिंग याचा बनारस (पृ. ७), राजेन्द्रलाल मित्र याचा ललितविस्तर (पृ. ११,१७), बर्नाफनें तथागत या शब्दाचें केलेलें विवेचन, आणि टर्नरनें पाली बौद्ध ऐतिहासिक ग्रंथांचें केलेलें परीक्षण (नं. ३. पृ. १) हीं पाहण्यासारखीं आहेत. ‡ Hardy's Legends of Buddhism p. 8. ¶ राजतरंगिणी—कलकत्ता प्रत पृ. ६. १८३५

* Princep's Essays by Thomas, Vol. I. pp. 39,40, 101. † Cited by Princep p. 40 above. ‡ Examination of Pali Buddhistic Annals. ¶ पाणिनि. पृ. ३०. § Princep's Essays Vol. II. p. 68. ‖ नीतिशतक ९३. § सर्ग ११. ** William's Sakuntala pp. 194-5. †† Bohlen's Bhartrihari p. 46-7 हा श्लोक भर्तृहरीच्या निरनिराळ्या १२ प्रतींत आढळतो.

संभव आहे. पण असें असणें कांहीं अंशींच संभवनीय म्हणतां येईल. निश्चितपणें असें विधान करतां येणार नाहीं. कारण नाटकामध्यें व संभाषणामध्यें असलीं प्रचलित सुभाषितें कर्त्यांनें घेऊन पात्रांच्या तोंडीं घालणें स्वाभाविक आहे पण नीतिशतकासारख्या ग्रंथांत आपण हें सुभाषित परक्याचें ठरविलें तर कदाचित् सर्व श्लोकांबद्दलहि तेंच म्हणतां येईल व भर्तृहरीला कांहींच शिल्लक राहणार नाहीं.

डॉ. भाऊ दाजी यांनीं भर्तृहरि हा राजतरंगिणींत उल्लेखिलेला भर्तृमेन्थ असावा व तो कालिदासाचा समकालीन असावा असें धरिलें आहे. पण ही केवळ गृहीत गोष्ट आहे.* उलटपक्षीं सरस्वतीकण्ठाभरणांत भर्तृहरि व भर्तृमेन्थ या दोहोंचाहि उल्लेख आहे.† पैकीं दुसऱ्याचें नांव प्रख्यात नाहीं पण भर्तृहरीचें प्रसिद्ध आहे. वरतीं आपण कालिदास आणि पंचतंत्राचें अनवारी सोहिली या नांवाचें भाषांतर यांजबद्दल जो ऊहापोह केला तोच भर्तृहरीबद्दलहि करितां येतो. मात्र येथें पंचतंत्राचें तें भाषांतर न घेतां 'कलिल उ दिम्न:' याचें इंग्रजी भाषांतर घ्यावें लागतें. यांत नीतिशतकामध्यें‡ असलेला एक श्लोक पंचतंत्रामध्यें (मुंबई प्रत)¶ ज्या गोष्टींत आढळतो त्याच गोष्टींत त्याच संदर्भानें 'कलिल उ दिम्न:' याच्या भाषांतरांत आढळतो. आतां यांत थोडा शाब्दिक फरक आहे त्याचा उलगडा 'कलिल उ दिम्न:' हें पहलवी भाषांतरावरून नंतर तयार केलेलें आहे या गोष्टीवरून होतो. यामुळें पंचतंत्राचें जेव्हां नौशिर्वानकरितां भाषांतर झालें तेव्हां पंचतंत्रांत हा नीतिशतकांत आढळणारा श्लोक होता असें निघतें, व मागें दाखविल्याप्रमाणें अनवारी सोहिलीच्या गोष्टीचा जसा कालिदासाचा काल ठरविण्याकडे उपयोग होतो तसा या कलिल उ दिम्न:च्या गोष्टीचा भर्तृहरीचा काल निश्चित करण्याकडे होतो. भर्तृहरीनें रामाचा अवतारांमध्यें उल्लेख केला आहे व कोणीहि दोन शतकांपूर्वी होऊन गेलेल्या व्यक्तींनां अवतारांमध्यें घालणार नाहीं. कालिदास हा भर्तृहरीपूर्वी फार तर कांहीं दशकें होऊन गेला असेल.

रामचरित्राशीं संबंध आलेल्या ग्रंथांमध्यें वेबरनें मृच्छकटिकाचा उल्लेख केला आहे पण त्यापासून त्यानें फारशीं अनुमानें काढलीं नाहींत; कारण मृच्छकटिकाचा काल निश्चित नाहीं. दण्डीच्या काव्यादर्शामध्यें मृच्छकटिकांतील उतारा आला आहे व दण्डीचा काल खिस्तीशकाचें सहावें शतक हा निश्चित झाला आहे. हा उतारा 'लिंपतीव तमोंगानि वर्षतीवांजनं नभ:' हा आहे. यावर दण्डीनें बराच वादविवाद केला आहे व हा श्लोक विशेष प्रसिद्ध असल्याशिवाय त्यावर एवढा वादविवाद करणें संभवत नाहीं. तेव्हां मृच्छकटिक आणि दण्डी यांमध्यें बराच काल लोटला असण्याचा संभव आहे. मृच्छकटिक या नाटकाचा कर्ता शूद्रक प्रसिद्ध आहे. या नांवाच्या राजाचा उल्लेख प्रिन्सेपनें आपल्या कोष्टकांत खि. पू. २१ यावर्षी होऊन गेला असा केला आहे. रामायणाच्या कथेचा शकाराच्या तोंडीं मृच्छकटिकामध्यें रावण व कुंती, हनुमान आणि सुभद्रा, इत्यादि मूर्खपणाच्या जोड्या घालण्यांत केला आहे. आतां या जोड्यांतील मूर्खपणा लोकांस त्या वेळीं स्पष्ट दिसत असला पाहिजे. म्हणजे त्या वेळीं रामायण व महाभारत यांतील कथा सर्व लोकांच्या तोंडीं असल्या पाहिजेत. यावरून रामायणाचा काल खि. पू. २१ या वर्षाच्या पुष्कळच मागें नेला पाहिजे.

रामकथेचा संबंध असलेला दुसरा ग्रंथ कर्मप्रदीप याचा वेबरनें टीपेंत उल्लेख केला आहे. मॅक्स मुल्लरनें या कर्मप्रदीपाचा कर्ता कात्यायन हा पाणिनीवर वार्तिकें लिहिणारा कात्यायनच होय असें म्हटलें आहे.* गोल्डस्टकर म्हणतो कीं मॅक्समुल्लरनें या दोन्ही ग्रंथांचा कर्ता कात्यायन एकच हें षड्गुरुभाष्याच्या आधारें म्हटलें आहे.† परंतु मूळ षड्गुरुभाष्याचा जो उतारा प्रो. मुल्लरनें घेतला आहे त्यांत कर्मप्रदीपाचा उल्लेख नाहीं. तेव्हां कर्मप्रदीप म्हणजे कात्यायनाचा स्मृतिग्रंथ घ्यावयाचा किंवा 'भ्राज' श्लोक घ्यावयाचे हा प्रश्न आहे. या कर्मप्रदीपाचा नीटसा उलगडा होत नाहीं.

वेबरनें इतर ग्रंथकारांच्या सारखेंच असें दाखविलें आहे कीं, वाल्मीकीला दक्षिणेकडील प्रदेशांचें भौगोलिक ज्ञान फारसें नव्हतें. भांडारकरांच्या मतें त्यानें तिकडील लोकांस वानर वगैरे म्हणणें हें त्याच्या त्यांच्याविषयींच्या अज्ञानाचें द्योतक आहे. उलटपक्षीं आपणांस पतञ्जलीच्या महाभाष्यावरून व अशोकाच्या शिलालेखांवरून तत्कालीन लोकांस दक्षिणेविषयींचें ज्ञान असावें असें दिसतें.

पतञ्जलीनें चोल‡ आणि केरल‡ यांचा उल्लेख केला आहे. चोल हा शब्द वार्तिकांतहि आढळतो. पतञ्जलीला सुह्म¶ (सयाम) व कांचीपुर§ माहीत असल्याचें दिसतें. आतां हीं नांवें उत्तरेकडील देशांचीं अगर गांवांचीं असूं शकतील असें म्हणणाराहि एक पक्ष आहे; पण रघुवंशांत आपणांस चवथ्या सर्गामध्यें कांबोज, यवन, मुरल, केरल, ताम्रपर्णी इत्यादि नांवें आढळतात व त्यांतील पहिलीं दोन उत्तरेकडील व पुढील दक्षिणेकडील असा तेथें स्पष्ट उल्लेख आहे यावरून वरील संशय राहत नाहीं.

बाबु राजेन्द्रलाल मित्र यांनीं आपल्या 'सांची येथील दस्यु' या लेखांत 'जनकजातक' नांवाची बौद्ध जातककथा दिली आहे तिचें रामायणांतील श्रावणाख्यानाशीं साम्य आहे. कांहीं किरकोळ फरक आहेत ते वजा करून जें दशरथजातकाबद्दल म्हणतां येईल तेंच या जातकाबद्दलहि म्हणतां येण्यासारखें आहे. तर वेबर असें म्हणण्यास तयार आहे काय हा मोठा प्रश्न आहे. उलटपक्षीं जर जनकजातक हें श्रावणाख्यानावरून तयार केलें आहे असें म्हटलें तर अशी स्थिति येते कीं, दशरथजातक व होमर यांवरून रामायण घेतलें व रामायणावरून बौद्धांनीं पुन्हां जनकजातक तयार केलें. ही गोष्ट बौद्धकथांच्या कालानुक्रमाशीं कितपत जुळेल हा प्रश्न आहे.

* JBB RAS. 1862. (Vol. VI. No. XXI) p. 218 † Aufrecht's Catalogue 2090. ‡ श्लोक. ९१. ¶ तंत्र दुसरें पृ. ५.

* History of Ancient Sanskrit Literature pp. 54, 235. † Panini p. 80. ‡ पाणिनि ४. १. १७५ वरील भाष्य. ¶ पाणिनि ४. २. ५२ वरील भाष्य व रघुवंश ४. ३५. पहा. § पाणिनि ४. १.११२ वरील भाष्य.

आतां होमरची 'इंग्रजी वाचकांकरितां प्राचीन अभिजात काव्यें'* या नांवाच्या मालेंत जी दोन ग्रंथांत इलियडची आवृत्ति निघाली आहे तींत संपादक प्रथम असें म्हणतो कीं, होमरच्या मूळ ग्रंथांत मागाहून वरचेवर भर पडली आहे ही गोष्ट मान्य आहे. ग्रीक वंशाची उत्पत्ति प्राच्य आहे असा बळकट संशय आहे. होमरच्या कथानकाचा उगम पौरस्त्य देशांत झाला ही गोष्ट दाखविणाऱ्या अनेक गोष्टी त्या काव्यांत आहेत.† होमरनें एखाद्या पूर्वेकडील शहरास भेट दिलेली असावी ही गोष्टहि सुचविली गेली आहे. या सर्व गोष्टींवरून होमरचा ग्रंथ केवळ ग्रीक असून बाकीचे त्याच्यासारखे ग्रंथ सर्व त्याच्या नकला आहेत असें म्हणण्याचें कोणास कारण नाहीं हें उघड आहे. विशेषतः वाल्मीकीच्या विरुद्ध असें विधान करतां येणार नाहीं.

रा. ब. चिं. वि. वैद्य यांचें रामायणाबद्दल म्हणणें असें आहे कीं यथाहि चोरः स तथाहि बुद्धः। हा श्लोक आला आहे त्यावरून रामायण हें पूर्वीचें सर्व लोकांचें सामान्य व सर्वमान्य असें काव्य होतें पण त्यास विशिष्ट पारमार्थिक स्वरूप मागाहून देण्यांत आलें असावें.

आर्थर लिलि नांवाच्या एका इंग्रज गृहस्थानें 'राम आणि होमर' नांवाच्या ग्रंथांत रामायणाबद्दल विवेचन केलें आहे पण तो ग्रंथ जरा अधिक महत्त्वाचा असता तर त्याबद्दल येथें ऊहापोह केला असता.

**ग्रीक नाट्यकलेचा भारतनाट्यकलेवरील परिणाम.**— या विषयावर इ. विंडिश यानें प्राच्य संशोधकांच्या सार्वराष्ट्रीय पांचव्या परिषदेंत निबंध वाचला त्याचा सारांश येणेंप्रमाणें:—

बॅक्ट्रिया, पंजाब व गुजराथ येथील ग्रीक राजांच्या दरबारांत ग्रीक नाटकांचे प्रयोग करण्यांत येत. हे प्रयोग पाहून भारतीयांनां त्यांचें अनुकरण करावेंसें वाटलें, व अशा तऱ्हेनें भारतीय नाट्यकलेचा उगम झाला; नृत्य, गायन व संगीत या कला मात्र त्यापूर्वींच हिंदुस्थानांत अस्तित्वांत होत्या; असें वेबरचें म्हणणें आहे. उलट प्रो. ब्रॉकहॉस म्हणतो कीं, अभिमानी ब्राह्मण जातीच्या लोकांनीं म्लेच्छ लोकांपासून कधींच कोणतीहि गोष्ट उचललेली नाहीं; आणि भारतीय नाट्यकलेचें ग्रीक नाट्यकलेशीं बिलकुल एका बाबतींत सुद्धां साम्य नाहीं.

शेवटीं लासेननें सिद्ध केलेली जी परंपरा तिलाच (पतञ्जलीचें महाभाष्य पहा) दुजोरा देऊन वेबरनें असें म्हटलें आहे कीं, हिंदुस्थानांत नाटकें रचण्याकरतां अत्यंत जुन्या गोष्टी ज्या घेतल्या आहेत त्या म्हणजे देवांच्या व विशेषतः श्रीविष्णूच्या कथा होत. हें जरी खरें असलें तरी भारतीय नाट्यरचनेच्या बाबतींत तिच्यावर ग्रीक नाटकांचा परिणाम झाला होता, असें त्याचें मत आहेच.

अलेक्झांडर दि ग्रेट यानें निरनिराळ्या देशांवर ज्या ज्या वेळीं स्वाऱ्या केल्या त्या त्या वेळीं त्यानें आपल्या बरोबर अनेक कलाकुशल लोकहि घेतले होते; आणि जेथें जेथें त्याचे मुक्काम होत तेथें तेथें तो नाटकांचे प्रयोगहि करवीत असे. याप्रमाणें त्या काळीं ज्ञात असलेल्या सर्व पृथ्वीवरील देशांत ग्रीक नटांनीं ग्रीक नाट्यकलेचा फैलाव केला. हे नाट्यप्रयोग विशेषेंकरून राजांच्या दरबारीं होत असत. हिंदुस्थानासंबंधानेंहि असाच प्रकार झाला असावा. आणि त्यामुळें त्यांच्या कलेचा भारतीय कलेवर परिणाम झाला असावा. हा परिणाम झाला तो भारतीय आनंदपर्यवसायी नाटकांवर झालेला आहे, दुःखपर्यवसायी नाटकांवर नाहीं. तसेंच हा परिणाम निरनिराळ्या देशांतून प्रवास करणाऱ्या नाट्यकवींच्या योगानेंहि झालेला आहे. ग्रीक लोकांच्या सत्तेखालीं अलेक्झांड्रिया असतांना त्या शहराचा व्यापारी संबंध हिंदुस्थानच्या पश्चिमकिनाऱ्यावरील शहराशीं होता इतकेंच नव्हे, तर हिंदुस्थानच्या अंतर्भागांतील एका व्यापारी दळणवळणाच्या मार्गानें तो संबंध जुनें राजधानीचें शहर जें उज्जयिनी तेथपर्यंत पोहोंचला होता. मृच्छकटिक नाटकांतील संविधानकाचें स्थळ हेंच उज्जयिनी शहर होय. ग्रीक नाट्यकलेचे परिणाम म्हणून जीं भारतीय नाटकें निर्माण झालीं त्यांचें प्रमुख व प्रथम स्थळ हें उज्जयिनी नगरच होय. याप्रमाणें भारतीयांचा ग्रीक कामेडीशीं (आनंदपर्यवसायी नाटकांशीं) परिचय झाला तो अलेक्झांड्रियाहून बर्यगाझाला (भडोचला) व्यापार करिण्याकरतां जे डायोनिशियन कलाकुशल लोक आले त्यांच्या मार्फत झाला असावा. भारतीय नाट्यकवींवर जो परिणाम झाला तो केवळ ऐकींव गोष्टींनीं झालेला नव्हता तर प्रत्यक्ष ग्रीक नाट्यप्रयोगांच्या प्रेक्षणानें झाला होता.

नवीं ग्रीक आनंदपर्यवसायी नाटकें रोममध्यें लोकांनां ठाऊक झालीं त्याच काळाच्या सुमारास तीं हिंदुस्थानांतहि ठाऊक झालीं असलीं पाहिजेत. तथापि त्यांचा भारतीय नाट्यकलेवर परिणाम प्रत्यक्ष केव्हां झाला तो काळ नक्की सांगतां येत नाहीं. ग्रीक नाट्यकलेचा पश्चिम हिंदुस्थानांत अत्यंत परिणाम झालेला दृष्टीस पडतो तो मिनांडर राजाच्या कारकीर्दीमध्यें होय. लासेनच्या मतें झाला आरंभ झाला तो इ. पू. १४४ च्या सुमारास झाला असावा. तें कांहीं असलें तरी हिंदुस्थानाशीं ग्रीक व्यापार पुढें कित्येक शतकें चालू होता, एवढें खरें.

येणेंप्रमाणें भारतीयांनां ग्रीकांचे नाट्यप्रयोग व विशेषतः त्यांचीं आनंदपर्यवसायी नाटकें पहावयास मिळालीं होतीं असें म्हणण्यास केवळ शक्यतेच्यापेक्षां पुष्कळच अधिक पुरावा आहे.

भारतीय नाटकांचें ग्रीको-रोमन आनंदपर्यवसायी नाटकांशीं कांहीं कांहीं बाबतींत जें साम्य आहे तें एकंदरींत इतकें पुष्कळ आहे कीं, एक तर हें साम्य हा केवळ आश्चर्यकारक योगायोग होय असें म्हटलें पाहिजे, किंवा भारतीय नाट्यकलेवर ग्रीक नाट्यकलेचा चांगलाच परिणाम झाला ही गोष्ट मान्य केली पाहिजे.

भारतीय व ग्रीको-रोमन आनंदपर्यवसायी नाटकांत कोणतेंहि नवें पात्र रंगभूमीवर आणण्यापूर्वीं प्रेक्षकांची मनोभूमि त्याच्याबद्दल अगोदरच तयार करून ठेवावयाची, असा साधारण नियम ठरून गेलेला दिसतो.

* Ancient Classics for English readers Vol. I. II. Iliad pp, 4, 5, 37, 116. † Cf. Odyssey p. 33.

अपटी ( अल्पः पटः ) म्हणजे रोमन ( Unbaeum )ही नव्हे व हल्लींचा पडदाहि नव्हे. हल्लींच्यासारखे पडदे पूर्वी हिंदू लोकांत नव्हते व ग्रीक लोकांतहि नव्हते. तेव्हां अपटी म्हणजे रंगभूमीची ( बॅकग्राऊंड ) पृष्ठभूमि होय; व ती रंगभूमि ( Stage ) आणि नेपथ्य ( पात्रें सजण्याची खोली Actors' room ) यांच्या मध्यें येते. नेपथ्य म्हणजेच ग्रीको-रोमन लोकांतील पोस्ट-सीनीम (Post-Scenium) होय, आणि अपटी म्हणजे ग्रीकलोकांची दारें असलेली चित्रित पृष्ठभूमि ( सीन वॉल ) होय. त्याच्यापुढें स्टेज म्हणजे रंगभूमि असते. याप्रमाणें सामान्यतः भारतीय नाट्यगृहाची रचना ग्रीको-रोमन पद्धतीशीं जुळती आहे.

ग्रीक 'स्कीनी' याला सदृश भारतीयांत यवनिका म्हणून आहे. पट, अपटी हे तत्समानार्थांच शब्द आहेत. शिवाय दशरूप १,५५ यांत अन्तर्यवनिकासंस्थैश्चूलिकार्थस्य सूचना इत्यादि उल्लेख आहे. आरंभींचा मजकूर ( मंगलाचरण ) 'नेपथ्यपात्रेण' म्हणजे नेपथ्यामधील माणसानें म्हणावयाचा, असें टीकाकारानें स्पष्ट करून सांगितलें आहे. 'यवनिका' याबद्दल जवनिका असें जरी आढळतें, तरी हा केवळ प्राकृतभाषाविशिष्ट प्रकार आहे; कारण जवनपासून जवनिका असा शब्द झाला, असें म्हणणें मुळींच सयुक्तिक दिसत नाहीं. हा शब्द ( ग्रीक ) यवन शब्दापासून झालेला आहे असें वेबरनें पूर्वीच सिद्ध केलें आहे, आणि विंडिशनेंहि तें ग्राह्य मानलें आहे. ग्रीक लोकांतील ( सीनवॉल ) चित्रित पृष्ठभूमीसारखी रचना करतांना तिला भारतीयांनीं ( ग्रीकवॉल ) यवन-भित्ति अथवा यवनिका हा शब्द योजला असावा, ही कल्पना सहज करतां येण्यासारखी आहे.

एका ग्रीक नाटकामध्यें मेडिया ही आपल्या स्वतःच्या घरावर ड्रेगनच्या ( असुराच्या ) रथामध्यें बसलेली अशी दाखविलेली आहे. भारतीय प्रयोगशालेला अशा प्रकारचा देखावा दाखविण्यास सोयीची अशी खोलीच नसे; किंवा एकापेक्षां अधिक मजले नसत. शाकुंतल नाटकाच्या ७ व्या अंकांत दुष्यंतराजा आकाशरथांत (आकाशयान) बसलेला असा आकाशांतून खालीं भूमीवर उतरतो, असा देखावा आहे; पण असा देखावा प्रत्यक्ष रंगभूमीवर दाखवीत नसावेत असें वाटतें. पण तशी प्रेक्षकांची समजूत होण्याकरितां दुष्यंतराजा रंगभूमीवर इंद्राच्या रथासह येतो असें दाखवितात.

**नाटकांतील कथानक.**—हिंदुस्थानांतील जुन्या जुन्या नाटकांवर ग्रीक नाटकांचा परिणाम झालेला अधिक असणार; करितां अशा नाटकांचेंच आपण परीक्षण करूं.

मृच्छकटिक नाटकाच्या धर्तीवर नाटकें लिहिण्याचा प्रयत्न त्याच्यानंतरच्या नाटकांत कोणीं केलेला दिसत नाहीं. त्या नाटकांतल्या कथानकाचें इतर नाटकांमधील कथानकांशीं क्वचितच साम्य आहे. उलटपक्षीं मृच्छकटिकांतील कथानक अगदीं तंतोतंत ग्रीकोरोमन आनंदपर्यवसायी नाटकांतल्या सारखें आहे; म्हणजे नायक हा एक श्रेष्ठी आहे व नायिका ही एक वेश्या आहे. अथेन्स शहर त्या वेळीं राजकीय व सामाजिक अवनतावस्थेंत असल्यामुळें वर वर्णिलेली परिस्थिति चांगली लक्षांत येण्यासारखी असून तिची कारणमीमांसाहि बरोबर सांगतां येते; ग्रीकांच्या आनंदपर्यवसायी नाट्यकलेच्या दृष्टीनें ही शेवटची पायरी आहे. भारतेतिहासांत अशा तऱ्हेनें परंपरेची सांखळी जुळवून दाखविण्याचा प्रयत्न करणें विफल होईल. सामान्य प्रकारच्या आयुष्यक्रमांतील पात्रें व प्रसंग रंगभूमीवर नाट्यप्रयोगाच्या रूपानें दाखविण्याची कल्पनाच मूळ ग्रीकलोकांपासून घेतलेली आहे. एखाद्या वेश्येला थोड्याफार गंभीर स्वरूपाच्या नाटकांतील नायिका करणें, ही गोष्ट भारतीय समाजस्थितीच्या आधारावर रचलेली असणें शक्य दिसत नाहीं. हें मृच्छकटिक नाटक ग्रीक नाटकांच्या अनुकरणानें केलेलें आहे असें मानलें म्हणजे वरील प्रकारच्या कथानकाबद्दल तितकें आश्चर्य वाटत नाहीं; आणि मग मृच्छकटिकाचा कर्ता शूद्रक राजा होता याबद्दलहि आश्चर्य करण्याचें कारण पडत नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं, एका उदार वणिजाच्या प्रेमाला पात्र झाल्यानेंच केवळ उघडउघड वेश्या असलेल्या स्त्रीचा समाजांत दर्जा वाढूं शकतो, ही कल्पनाहि सर्वस्वी ग्रीक लोकांतील आहे. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, भारतीय वाङ्मयामध्यें कथासरित्सागराच्या १२ व्या तरंगांत कांहीं अंशीं अशा प्रकारची रूपिणिकेची गोष्ट आली आहे. वास्तविक ह्या गोष्टींतील पहिल्या भागाचें मृच्छकटिकाच्या कथानकापेक्षां ग्रीको-रोमन नाटकाशींच अधिक साम्य आहे. म्हणूनच ही गोष्ट, प्रत्यक्षपणें म्हणा अप्रत्यक्षपणें म्हणा, ग्रीकग्रंथावरून रचलेली असावी, असें नक्की दिसतें. त्या गोष्टीचें सिस्टेलॅरिया (Cistellaria) च्या पहिल्या अंकाशीं असलेलें सादृश्य नुसतें आश्चर्योत्पादकच नव्हे, तर संशोधकांनां तें अनेक दृष्टींनीं फार महत्त्वाचें आहे.

कालिदास, श्रीहर्ष, भवभूति यांच्या ग्रंथांत जागोजाग ग्रीक नमुन्यांवर रचना केलेली आढळते. मालविकाग्निमित्र, रत्नावली व नंतरचें विद्धशालभञ्जिका यांतील कथानकांची तुलना करून पहा, म्हणजे अशी खात्री होईल कीं, यांत जें सादृश्य दिसतें तें क्वचित् ठिकाणीं व सहजगत्या आलेलें नसून अशा तऱ्हेचा प्रकार अनेक नाट्यग्रंथांतून सारखा आढळून येतो.

ग्रीको-रोमन व भारतीय दोन्ही नाट्यग्रंथांतून आढळून येणारी आणखी एक समान गोष्ट म्हटली म्हणजे, लहान डबी, किंवा एखादी अंगठी, अशा प्रकारच्या कांहीं खुणेच्या वस्तूच्या साहाय्यानें शेवटीं ओळख पटणें, ही होय; उदाहरणार्थ, रत्नावली, मालविकाग्निमित्र, शाकुंतल, विक्रमोर्वशी, नागानंद.

विदूषक, विट, दासी ह्या प्रकारचीं पात्रें घालण्याची पद्धतहि ग्रीक नाटकांवरून पडली.

बऱ्या वाईट कोणत्याहि मार्गानें द्रव्य मिळवून एखाद्या दासीला दास्यांतून सोडवून न्यावयाची, ही गोष्ट भारतीय व ग्रीको-रोमन नाट्यग्रंथांतून सारखीच आढळते; तसेंच वेश्येच्या अलंकारांच्या डब्याची गोष्ट, मालतीमाधवांतील माळेची गोष्ट, पुनर्मीलन घडवून आणणारें कारण, या अनेक बाबतींतहि दोहोंमध्यें फार साम्य दिसून येतें.

मृच्छकटिक नाटकांत प्रत्यक्ष रंगभूमीवर खुनाचा प्रयत्न केल्याचा देखावा आहे. वास्तविक ह्या ठिकाणीं भारतनाट्यशास्त्रांतील नियम मोडलेला आहे. ग्रीक ग्रंथांचें अनुकरण केल्याचें या देखाव्यावरून स्पष्ट दिसतें.

नाटकाच्या कथानकांतील कालासंबंधानेंहि कांहीं साम्य दोहोंत आढळतें; तथापि भारतीय नाटकांत बऱ्याच अधिक मोठ्या काळांतील गोष्टी दाखविण्यांत येत असतात.

**पात्रें.**—सामान्यतः ग्रीको-रोमन नाटकांतून जितकीं पात्रें असतात तितकींच भारतीय नाटकांतून आढळतात. याला अपवाद मृच्छकटिक नाटक. यांत २९ पात्रें आहेत. तसेंच प्रत्येक नाटकांत एक नायक, एक नायिका असावयाची आणि ही नायिका नायकाची धर्मपत्नी असावयाची; नायकाचा जो प्रतिस्पर्धी तो त्या प्रणयी युगुलाच्या संमीलनाला अडथळा आणणारा असावयाचा या गोष्टी व नायिकेच्या सख्या, दासी, वेश्येची आई मध्यस्थी करणारी वगैरे वगैरे गोष्टी दोहोंकडे सारख्याच दिसतात.

मृच्छकटिकांतील विट, शकार आणि विदूषक हीं तिन्ही पात्रें ग्रीकांच्या पात्रांवरून घेतलेलीं आहेत.

विदूषक हा ब्राह्मण आहे; ग्रीक नाटकांत तो गुलाम असतो. त्या वेळच्या भारतीय सामाजिक स्थितीशीं ग्रीक स्थितीची तुलना करून पाहतां हें सयुक्तिकच दिसतें. हा विदूषक आपल्या मालकाच्या प्रणय-प्रकरणांतच फक्त विश्वासांत घेतलेला असतो.

भारतीय नाटकांतील मुख्य विनोदी पात्र म्हणजे हा विदूषक होय; हा विदूषक म्हणजे ग्रीको-रोमन नाटकांतील वफूनसारखा सर्वस्वीं जरी नसतो तरी बहुतेक तसाच असतो; तो बराच ग्रीकलोकांतील गुलामासारखा असतो. शिवाय शकार व विट यांच्या बाबतींतहि दोहोंमध्यें साम्य आहे.

भवभूतीच्या नाटकांत या तीन पात्रांपैकीं कोणीच आढळत नाहीं. यावरून ग्रीक नाट्यकलेचें महत्त्व हळूहळू नष्ट होत गेलें असें दिसतें. भवभूतीच्या ग्रंथांतूनहि त्यानें ग्रीक नमुन्यावर रचना केली आहे असें स्पष्ट दिसतें. मात्र भवभूतीनें वरील तिन्ही पात्रें गाळलीं आहेत. याचें कारण उघडच आहे तें हें कीं, भारतीय समाजांत असलेल्या व्यक्तींनां मृच्छकटिकांत दिलें आहे इतकें महत्त्व मुळींच नाहीं.

एकंदरींत भारतीय नाटकांतील बराचसा पात्रवर्ग ग्रीक नमुन्यावरच तयार केलेला असे असें अनुमान काढण्यास बरीच जागा आहे.

**प्रस्तावना.**—हिची पद्धत भारतीय व ग्रीको-रोमन नाटकांत सारखीच आहे; भारतीय व रोमन दोहोंतील प्रस्तावना मूळ ग्रीक नमुन्यावरून घेतलेली आहे. (Captatio Benevolentiae) सभापूजा व प्ररोचना हीं दोहोंतहि सारखीं आहेत. भारतीय व ग्रीक दोन्ही प्रस्तावनांच्या शेवटीं पुढें पहिल्या अंकांत जीं पात्रें असतील त्यांनां उद्देशून मजकूर असावयाचा असा परिपाठ दिसतो.

**सूत्रधार.**—सूत्रधार उर्फ स्टेजमॅनेजर हा बहुधा स्वतःहि एक पात्रच असावा. तो नाटकांत येणारें पहिलें पात्र असतो इतकेंच नव्हे, तर सर्व नाटकांत त्याच्याकडे मुख्य काम असतें असें दिसतें; व याप्रमाणें तो ग्रीकांतील 'प्रोटॅगोनिस्टिस' प्रमाणें किंवा रोमनलोकांतील 'डुक्स ग्रेगिस' सारखा दिसतो. तेव्हां हें साम्यहि केवळ यदृच्छया आलेलें नसून त्यावेळीं ग्रीक नाटकमंडळ्या देशोदेशीं फिरत असत असा जो वर उल्लेख केला आहे त्या गोष्टीचाच हा परिणाम असला पाहिजे.

रंगदेवता, स्थळ, काळ, प्रसंग या बाबतींतहि भारतीय नाट्यप्रयोगांचें ग्रीक नाट्यप्रयोगांशीं कांहींसें साम्य आढळतें. Dionysis Coir म्हणजेच भारतीय शिव होय. ग्रीक 'एलॅफीबोलिओन्' म्हणजे चैत्र हाच नाट्यप्रयोग करून दाखविण्यास अत्यंत योग्य काळ होय.

या दोन्हीं देशांत कोणताहि नवा प्रयोग प्रथम असल्या समारंभप्रसंगीं करीत असत.

ग्रीकनाट्यग्रंथांतील संभाषणें नेहमीं कवितावद्ध असत; भारतीय नाटकांत तीं बहुतेक गद्यांत असतात; व कांहीं पद्यांतहि असतात.

गद्य भाग प्रामुख्यानें असून त्यांत मधूनमधून पद्यें घालावयाचीं ही तऱ्हा सर्वस्वीं भारतीय नाट्यकारांचीच कल्पना होय; परंतु तीहि कदाचित् जेव्हां ग्रीकांचे पद्यमय नाट्यप्रयोग त्यांनीं प्रत्यक्ष अवलोकन केले तेव्हां त्यांवरून त्यांनां सुचलेली असावी. त्यांनां जेव्हां सर्व चा सर्व भाग पद्यांत घालणें अशक्य झालें, तेव्हां भाषणांचे सामान्य व उच्च असे दोन प्रकार करून फक्त उच्च दर्जाचें भाषण पद्यांत घालण्याची पद्धत त्यांनीं पाडली असावी.

तसेंच नाटक हें शक्य तितकें वस्तुस्थितीचें निदर्शक करण्याचा प्रयत्न असल्यामुळेंच सामान्य पात्रांच्या तोंडीं प्राकृत भाषा घालण्याचा नियम पडला. आणि ज्याअर्थी रोजच्या व्यवहारांतील गोष्टी रंगभूमीवर आणण्याची पद्धत भारतीयांनां ग्रीकलोकांनीं लावून दिली हें खरें आहे, त्याअर्थी सदरील प्राकृताची योजनाहि ग्रीक कलेचाच परिणाम होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. एवढें मात्र खरें कीं, आतां ग्रीक ग्रंथांत भारतीयांइतकी मजल या वस्तुस्थितिनिदर्शनाचे बाबतींत मारलेली दिसत नाहीं.

**वेदकालीन व मूलगृहकालीन नाट्यकला.**—लिओपोल्ट फॉन श्रोडर यानें Mesterium und mimus im Rigveda (Leipzic 1908) या ग्रंथांत वेदकालीन नाट्यकलेवर विवेचन करून मूलगृहकालीं नाट्यादि मनोरंजन साधनें काय होतीं याविषयीं तौलनिक पद्धति वापरून आपले विचार प्रदर्शित केले आहे. मूलगृहकालीन नाट्यपद्धति शोधण्यासाठीं त्यानें ऋग्वेदांत दिसून येणारे नाट्यविषयक उल्लेख गोळा केले आहेत.

ऋग्वेदांत संभाषणात्मक सूक्तें अनेक आहेत. त्यांपैकीं बऱ्याच सूक्तांचा संपूर्ण अर्थ समजत नाहीं. या प्रकारच्या सूक्तांबद्दल बऱ्याच कल्पना प्रगट झाल्या आहेत. ओल्डेनबर्ग म्हणतो कीं, हीं सूक्तें म्हणजे मूळ गद्यपद्यात्मक आख्यानें असावींत आणि त्या आख्यानांतून गद्य नष्ट झालें असावें. आज या संभाषणात्मक

गाण्यांवर ब्राह्मण ग्रंथांवरून प्रकाश पडतो. हीं गाणीं एड्डु* (Edda) नामक नॉर्स गाण्यासारखीं आहेत. यांस ओल्डेनबर्ग आख्यानें समजतो. त्याप्रमाणेंच कार्ल गेल्डनर आणि रिचर्ड पिशल हेहि समजतात. फरक एवढाच कीं, गेल्डनर इतिहास हें नांव आख्यान यायेवजीं पसंत करतो. श्रोडर संवादात्मक गाणीं हीं आख्यानावशेष न समजतां नाटकावशेष समजतो. सिल्व्हँ लेवी हा भारतीय नाट्याचा आरंभ हींच संवादात्मक गाणीं होत असें म्हणतो. वेदकालीं नाट्यकलाच लोकपरिचित होती असें श्रोडर समजतो. ओल्डेनबर्गाचें स्पष्टीकरण चुकीचें आहे असें योहन्नेस हेर्टल (Johnnes Hertel) यानें आपल्या 'भारतीय नाट्यकलेचा इतिहास'† या महत्त्वाच्या निबंधांत दाखविलें आहे. ब्यूलर असें म्हणतो कीं, हे संवाद अनेक लोक मिळून गात असत.

**नृत्य आणि नाट्य.**—नाट्यशास्त्रांत नृत्य आणि नाट्य असे नृत्यविभाग धरले आहेत. नाट्य म्हणजे हावभावांनीं युक्त आणि कथासूचक असें नाचणें. नाट्य हा नृत्यवाचक शब्द असून तो नाटकांकडे उपयोजिला गेला त्या अर्थी नाटकांचें मूळ नृत्यांत शोधिलें पाहिजे ही कल्पना सहज वसते. हिचा अनुवाद श्रोडरनें केला आहे आणि स्वमतपुष्ट्यर्थ त्यानें आप्तवाक्येंहि दिलीं आहेत. नाट्यनामक नृत्यांत वाक्यें म्हणणेंहि येतें असें श्रोडर समजतो. "नृत्य" आणि "नाट्य" यांचा उपयोग देवतांसाठीं देवतांपुढें झाला एवढेंच नाहीं तर या कलेचा उपयोग देवतांनीं केला हें आपल्याकडील अनेक ग्रंथकाराचें म्हणणें अनुवादित करून ऋग्वेदकालीन नाट्य शोधण्यास श्रोडर प्रवृत्त होतो.

* 'एड्डु' ह्या संज्ञेबद्दल भाषाशास्त्रज्ञांचा बराच मतभेद आहे. प्राचीन परंपरेप्रमाणें सदरहु नांव, स्कँडिनेव्हिया देशांतील अतिप्राचीन अशा देवादिकांच्या काव्यमय कथांनां दिलें जातें. मुख्यतः 'एड्डु' या संज्ञेनें दर्शविले जाणारे असे सध्यां दोन ग्रंथ आढळतात. यांपैकीं 'प्राचीन कथासंग्रह' (Elder Edda) ह्यांतील बऱ्याच कथा, नॉर्वे व स्कँडिनेव्हिया देशांतील अतिप्राचीन परिस्थिति दाखवितात. खरें पाहतां 'एड्डु' हें नांव पूर्वीपासून 'गद्य कथासंग्रह' (Prose Edda) या कथासंग्रहास दिलेलें आढळतें.

"प्राचीन काव्यकथासंग्रह" (Elder Edda) हा इ. स. १६४३ पर्यंत उपलब्धच नव्हता. ब्रिंजोल्फ् स्विन्सन् (Brynjulf Sweinsson) यास प्रथम हा संग्रह हस्तगत झाला. नॉर्वे देशाच्या राजघराण्यांतील सेमंड् सिग्फ्यूसन् (Saemund Sigfusson) नामक गृहस्थानें सदरहु कथा संकलित केल्या असल्याबद्दल दंतकथा आहे. ह्या संग्रहांतील कित्येक काव्यें फारच प्राचीन असून एकंदर काव्यांची रचना १० व्या व ११ व्या शतकाच्या सुमारास झाली असल्याचा फार संभव दिसतो.

वरील काव्यसंग्रहांतील विषयांचें वर्गीकरण दोन प्रकारें करतां येईल: (१) पौराणिक दंतकथा व (२) शूर पुरुषांच्या आख्यायिका. (Heroic Poems). पैकीं पौराणिक दंतकथांमध्यें मुख्यत्वेंकरून ओडिन् (Odin) व थॉर (Thor) या दोन देवतांचीं अचाट कृत्यें वर्णन केलीं आहेत—ऋग्वेदांतील 'बृहस्पति' अथवा "ब्रह्मणस्पति" या देवतेशीं 'ओडिन्' या देवतेचें निकट साम्य आहे. त्याचप्रमाणें थॉर व त्याचा अजस्र दैवी हातोडा (Hammer) ऋग्वेदांतील इंद्र व त्याचें वज्र याच्याशीं सदृश दिसतो. याखेरीज वरील देवतेचे कित्येक शत्रु असल्याचें वर्णन आहे त्यांत 'वाल्डर्' (Balder) हा सर्व देवांशीं वारंवार युद्ध करणारा व सरतेशेवटीं पराभव पावलेला असा बलाढ्य दैत्य असून त्याचें ऋग्वेदांतील वृत्रासुराशीं बरेंच साधर्म्य आढळतें. एकंदर सर्व काव्यें अनेक उपदेशपर कथांनीं युक्त आहेत. त्या सर्वांचें तात्पर्य पाहिलें तर वाईट कृत्यें कधींहि परिणामीं सुखदायक न होतां अतिशय [illegible] होतात हेंच आहे. पौराणिक दंतकथां (Mythical poems) मध्यें पहिली कविता 'व्होलुप्सा' (Volupsa) नांवाची असून तिच्यांत एकंदर जगाच्या आरंभापासून देव, दैत्य मानव इत्यादिकांचें चटकदार वर्णन आहे. दुसरी कविता 'हॅवमेल्' नामक असून तींत एकंदर मानवी प्राण्यांनीं या जगांत कशा रीतीनें वागावें, कीर्ति कशी मिळवावी, तरुणांनीं कसें वागावें, इत्यादि विविध विषयांवर काव्यमय चुटके आहेत. तिसऱ्या कवितेंत 'ओडिन्' देवाचें एका दैत्यावरोबर मानसिक शक्तीबद्दल युद्ध होऊन दैत्याचा पराभव झाल्याबद्दलचें वर्णन आहे. नंतरच्या काव्यांत 'ओडिन्' व थॉर् यांचें ज्ञान व अचाट शक्ति यांजसाठीं युद्ध झाल्याचें वर्णन आहे. एकंदर कवितांचा शेवट वाल्डर् (Balder) याच्या स्वप्नमय जीविताच्या वर्णनानें झाला आहे. (२) 'शूरांच्या कथा' (Heroic Poems) यांमध्यें इतिहास व त्या वेळची परिस्थिति यांबद्दल बरेच उल्लेख आढळतात.

"गद्यकथासंग्रह" (Younger or Prose Edda) हाच एक ग्रंथ लोकांस कांहीं दिवस 'एड्डु' या नांवानें माहीत होता. कारण 'काव्यकथासंग्रह' (Elder Edda) हा बरेच दिवस म्हणजे सुमारें १७ व्या शतकापर्यंत उपलब्धच नव्हता. गद्यकथासंग्रह हा ग्रंथ आयस्लंड (Iceland) मधील 'स्नोरी स्टर्लुसन्' या प्रसिद्ध पुरुषानें लिहिला. सदरहू गाथांची काव्यमय भाषा जरी जुनी असली तरी तीमध्यें एक प्रकारचें गांभीर्य व प्रसाद हे गुण असून वाचकाच्या मनावर तेव्हांच परिणाम करितात. या संग्रहांतील एकंदर विषयांचे तीन भाग पाडले तर पहिला व दुसरा भाग हे पुढील भागाची प्रस्तावनाच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. सदरहू ग्रंथांत प्रथम जगाची उत्पत्ति, नंतर देवांचें सुवर्णयुग, व नंतर 'प्रपंचवृक्ष' (Yggdrasil) ह्या सर्वांचें उत्तम वर्णन आहे. यानंतर नरकाचें व दैत्यांचें वर्णन असून पुढें वाल्डरचा (Balder) मृत्यु, 'लॉकी' (Loki) देवतेचें कारागृहांत पतन व सरतेशेवटीं देवांचें युद्ध व विश्वाची पुनश्च उभारणी असें वर्णन आहे. हें सर्व वर्णन संवादरूपानें केलेलें आहे. सदरहु ग्रंथ कर्त्यानें इ. स. १२२० चे सुमारास लिहिला असल्याचें निश्चित आहे.

† Der Ursprung des Indischen Dramas und Epos. Wiener Zeitschrift für die Kunde des Morgenlandes, Vol. XVIII (1904) Heft 1–2, p. 59–83, 137–168.





पुरूरव्यानें उर्वशीस सोडविलें





पुरूरवा–पश्चादेत्य शनैः करांबुजवृते कुर्वीत वा लोचने

Lakshmi Art, Bombay, No. 8

ऋग्वेदांतील संवाद हे नाट्यावशेष आहेत असें म्हणणारा श्रोडर ते संवाद भारतीय नाट्यकलेचा प्रारंभ होय असें म्हणणाऱ्या लोकांशीं देखील आपला मतभेद व्यक्त करतो. तो म्हणतो कीं, ऋग्वेदांत जी नाट्यकला दृष्टीस पडते ती भारतीय नाट्यकलेचा प्रारंभ नसून वेदपूर्वकालीन नाट्यकलेचें अंतिम स्वरूप होय. अर्वाचीन भारतीय नाट्यकला सामान्य जनांत तंत्रशास्त्रीयांच्या खेळांत आणि वीजशक्तिदैवतप्रधान मंडळींच्या खटाटोपांत निर्माण झाली. ऋग्वेदोक्त नाट्यकला असंगत झाली. तिचे वंशज हिंदुस्थानांत सांपडणार नाहींत. तिचे भाऊबंद व संबंधी पाश्चात्त्य राष्ट्रांत सांपडतील. ऋग्वेदांतील हजारांवर सूक्तांमध्यें संवादरूपी सूक्तें फार थोडीं आहेत. यजुर्वेदांत तर अशीं सूक्तें मुळींच नाहींत आणि त्यापुढें तर ती कला मृतकल्प झालेली दिसते. उत्तरकालीन वेदग्रंथ तयार होण्यापूर्वींच ऋग्वेदांतील नाट्यकला मृत झाली. तथापि प्राकृत जनांच्या खेळांची परंपरा फार जुन्या काळापासून, कदाचित् वेदकालापासून, पुढें चालू राहिली आहे.

श्रोडरनें ऋग्वेदांत जीं संवादसूक्तें नाटकें म्हणून हुडकून काढलीं आहेत आणि ज्यांच्या स्पष्टीकरणासाठीं त्यानें विशेष पानें खर्चिलीं आहेत त्या सूक्तांचे विषय येणेंप्रमाणें:—

इन्द्र, मरुत् आणि अगस्त्य ( ऋ. मं. १. सू. १७०, १७१, १६५. ).

लोपामुद्रा आणि अगस्त्य ( ऋ. मं. १. सू. १७९. ).
सरमा आणि पणी ( ऋ. मं. १०. सू. १०८. ).
अग्नि परत मिळविणें ( ऋ. मं १०. सू. ५१–५३; १२४ ).
वरुण आणि इंद्र ( ऋ. मं. ४. सू. ४२. ).
विश्वामित्र आणि नद्या ( ऋ. मं ३. सू. ३३. ).
पुरूरवा आणि उर्वशी ( ऋ. मं. १०. सू. ९५. ).
यम आणि यमी ( ऋ. मं. १०. सू. १०. ).
ऋष्यशृंग आणि शांता.
वृषाकपि आणि इंद्राणी ( ऋ. मं. १०. सू. ८६. ).
इंद्राचा अमानुष जन्म ( ऋ. मं. ४. सू. १८. ).
इंद्र वायु (?) आणि कवि ( ऋ. मं. ८. सू. ८९. ).
मुद्गलाची शर्यत ( ऋ. मं. १०. सू. १०२. ).
सोम प्यालेला इंद्र ( ऋ. मं. १०. सू. ११९. ).
वैद्याचें प्रहसन ( ऋ. मं. १०. सू. ९७. ).
पश्चात्ताप पावलेला जुगारी ( ऋ. मं. १०. सू. ३४. ).
बेडूक ( ऋ. मं. ७. सू. १०३. ).
सोमप्राशनाचें लळीत ( ऋ. मं. ९. सू. ११२. ).

यांपैकीं कांहीं खेळांचें स्वरूप वर्णन करतांना पाश्चात्त्य तुल्य गोष्टींची श्रोडर वारंवार आठवण देतो; आणि या नाटकांपैकीं बऱ्याच नाटकांचा प्रारंभ मूलगृहकालीं झाला आणि शेवट ऋग्वेदकालांत झाला असें दाखविण्याचा तो प्रयत्न करितो.

कांहीं असो. एक गोष्ट सर्वमान्य होईल ती ही कीं, नाटकें भारतीय संस्कृतींतच जन्मास आलीं. नाट्यकला यवनांपासून हिंदीयांनीं घेतलें असें तर आज कोणीच मान्य करणार नाहीं. विंडिशनें ज्या पात्रांची यवनकल्पनेपासून उत्पत्ति दिली आहे ती देखील सहज मान्य होणार नाहीं. उदाहरणार्थ, विदूषकाचा उगम व हर्षदेवाच्या नाटकांत ह्या पात्राचा उपयोग या विषयावर मांटगोमेरी श्लूर यांनीं निराळें भाष्य केलें आहे.*

**विदूषकाचा उगम.**—फार प्राचीन संस्कृत नाटकें हल्लीं उपलब्ध नसल्यामुळें विदूषकाचा उगम शोधून काढण्याच्या कामांत बराच अडथळा येतो. वर्तमान नाटकांत शूद्रकाचें मृच्छकटिक नाटक अत्यंत जुनें आहे; अगदीं प्रथम नाटकें कशीं लिहीत त्याचा हा एक नमुना आहे. त्यांतील कल्पना व त्याची एकंदर रचनाहि प्रगल्भ स्वरूपाची असल्यामुळें त्या नाटकाच्या पूर्वीं संस्कृत नाटकाच्या इतिहासांत ओबडधोबड नाटकें लिहिण्याचा काल होऊन गेला असावा असें म्हणणें आपणांस भाग पडतें. आज जीं नाटकें उपलब्ध आहेत त्यांतील विदूषकाची कामगिरी लक्षांत घेऊन नंतर आपण भरताचें नाट्यशास्त्र, साहित्यदर्पण वगैरे ग्रंथांत विदूषक वनविण्याविषयीं जे नियम दिले आहेत तिकडे नजर दिल्यास आपणांस ह्या एकाच पात्रासंबंधींच्या कल्पनांमध्यें कसा विरोध व फरक आहे तो समजतो. ह्या विरोधाचा उलगडा होण्यास आपणांस असें अनुमान करावें लागतें कीं, विदूषकाचा उगम राजदरबारांतल्या नाटकांत झालेला नसून हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जातींतील किंवा वर्णांतील प्राचीन खेळांत झालेला आहे. हे खेळ प्रहसनें असत व त्या कालीं जी लोकांची राहणी असे तिचें प्रतिबिंब प्रहसनांतील पात्रांत दृष्टीस पडे. अधिकारी धर्मोपदेशक ब्राह्मणांबद्दल लोकांनां जो तिरस्कार वाटत असे तो ते प्रहसनरूपानें उघड करून दाखवीत. लोक विदूषकाला ब्राह्मण करीत पण तो फार हलक्या दर्जाचा व तिरस्करणीय क्षुद्र मनुष्य असे. अशा रीतीनें ते आपल्या ओबडधोबड व आकाररहित खेळांनां प्रहसनाचें स्वरूप देऊन उच्च वर्गाचा सूड घेत.

कांहीं कालानंतर ब्राह्मणांनीं जेव्हां नाटकाचें काम आपल्या हातांत घेऊन दरबारांत त्याला काव्याचें रूप दिलें व नाटकाची रचना करण्याकरितां जेव्हां नियम तयार करण्यांत आले त्या वेळेस खेड्यापाड्यांतील नाटकांत लोकांमध्यें रूढ झालेलीं जीं पात्रें आढळत त्या सर्वांचा ह्या नाटकांत समावेश करण्यांत येऊं लागला. लोकांच्या मनामध्यें पूर्णपणें ठसलेल्या विदूषकासारख्या पात्राला आपल्या नाटकांत ब्राह्मणांनां काट देतां येईना; पण त्याच वेळीं आपल्या वर्गाची तिरस्कारपूर्ण अशी लोकांनीं केलेली निंदा त्यांनां पहावेना. त्यामुळें ब्राह्मणांनीं विदूषकाच्या पात्रांत जो ओंगळ भाग होता त्यांत फरक करून त्या पात्राच्या आंगीं असणाऱ्या विनोदाला प्राधान्य दिलें. वर्तमान नाटकांतला विदूषक खुषमस्कऱ्या व गम्मत करणारा असतो ह्याचें कारण हेंच होय. पाणिनीय संस्कृतांत लिहिलेल्या नाटकांतील प्राकृतांत जी मोठी भिन्नता दृष्टोत्पत्तीस येते त्याचेंहि कारण हेंच आहे. नाटकाचे मूळ उत्पादक जर ब्राह्मण असते तर त्यांनीं विदूषक हा निःसंशय ब्राह्मण म्हणून त्याचे मुखांत संस्कृत भाषा घातली

* अमेरिकन ओरीएन्टल सोसायटीचें जरनल व्हॉल्यूम २०,

असती व दरबारांतल्या श्रोत्यांनां सहज समजणारी अशी अर्थयुक्त व जोरदार भाषा विदूषकानें वापरली असती. परंतु ब्राह्मणांनीं नाटकाचें काम हातीं घेण्यापूर्वीं प्राकृत भाषेंतील नाटकें प्रिय झालेलीं होतीं; त्यामुळें तीं घेऊनच त्यांत स्वतःच्या उपयोगासाठीं जरूर तेवढी सुधारणा ब्राह्मणांनीं केली. आपणांला जेवढीं म्हणून नाटकें माहीत आहेत त्या सर्वांत विदूषक प्राकृतांत बोलतांना आढळतो ह्याचें हेंच कारण. दुसऱ्या कोठेंहि ब्राह्मण प्राकृतांत बोलता तर ती गोष्ट योग्य मार्गाविरुद्ध झाली असती.

येणेंप्रमाणें पाणिनीच्या कालच्या संस्कृत नाटकांपूर्वीं प्राकृतांत खेड्यापाड्यांत जीं नाटकें होत त्यांत विदूषकाचा उगम आपणास आढळण्यासारखा आहे. हें पात्र ब्राह्मण कवींनीं शोधून काढलेलें नाहीं.

विदूषकाचीं उत्तम उदाहरणें हर्षदेवाच्या तीन नाटकांत, विशेषतः त्याच्या नागानन्द नाटकांत आढळतात. हर्षाचा विशेष कल बौद्धधर्माकडे होता; पण इतर धर्मांचा तो द्वेष करीत नसे. प्रियदर्शिका व रत्नावली हीं आपलीं दोन नाटकें त्यानें शिवाला अर्पण केलीं आहेत, व म्हणून अर्थातच त्यांनां ब्राह्मण-सारस्वताचा संस्कार लागलेला आहे. ह्या दोन नाटकांतील विदूषक गमत्या आहे. नागानन्दांतला विदूषक मात्र भिन्न-प्रकारचा आहे. नागानन्दांतील नांदी बुद्धाला उद्देशून लिहिलेली आहे. नागानन्दाच्या तिसऱ्या अंकांत हर्षानें पूर्वींच्या लोकप्रिय नाटकांप्रमाणें ब्राह्मणांची भरपूर निंदा केली आहे. ही निंदा अत्रेय नांवाच्या मूढमति व हीन दर्जाच्या विदूषका-करवीं करण्यांत आली आहे. इतर प्राचीन नाटककार ब्राह्मण असल्यामुळें त्यांनां ब्राह्मणांची फजिती करितां आली नाहीं; पण या अत्रेय पात्रानें मात्र ब्राह्मणांची खूप निंदा केली आहे.

ही विदूषक या पात्रासंबंधाची गोष्ट झाली. विंडिशनें ज्या अनेक पात्रांच्या ठायीं केवळ सादृश्यावरून यवनमूलकत्व आरोपिलें आहे तींहि निरनिराळ्या संस्कृतींत विदूषकाप्रमाणेंच स्वयंस्फूर्तीनें उत्पन्न होण्यासारखीं आहेत. असो.

विंडिशचीं कांहीं मतें आपण खोडून काढलीं तरी ग्रीक रंगभूमीचा भारतीय रंगभूमीवर परिणाम बराच झाला असेल ही गोष्ट आपणांस नाकारतां यावयाची नाहीं.

वरील परिणामांपेक्षां अधिक महत्त्वाचा परिणाम म्हटला म्हणजे विशिष्ट उपासना आणि विचारसंप्रदाय यांचा अभिमान धरणारे जे परदेशांत संघ उत्पन्न झाले त्यांचा होय. हिंदुस्थानच्या एकराष्ट्रीयत्वास विघातक आणि देश्य संस्कृतीच्या उन्मूलनास बद्धपरिकर असेच हे संघ अथवा संप्रदाय होते; आणि या संप्रदायांच्या प्रसारानें हिंदुस्थानांतील राजकीय आणि सामाजिक प्रश्न जितके विकट केले तितके दुसऱ्या कशानेंहि केले नाहींत. बराच काळ जाईपर्यंत हे परिणाम आपणांस जाचक होतील. आज दोन माणसें एकमेकां-पासून दूर असण्याचें कारण एकास उपदेश करणारा या देशांत जन्मला तर दुसऱ्यास उपदेश करणारा त्या देशांत जन्मला हें होय. वरील कारण किंवा देवाविषयीं याची कल्पना अमुक होती आणि दुसऱ्याची तमुक होती हें कारण हीं दोन्हीं आजच्या जनतेस एकमेकांपासून दूर ठेवण्यास मात्र उपयोगी पडतात. ख्रिस्तीसंप्रदायाचा प्रसार हिंदुस्थानांत फार पूर्वींपासून झाला; आणि आजचे वरेचसे ख्रिस्ती हे परदेशीय आहेत किंवा स्वदेशीय आहेत हें सांगतां येत नाहीं. अशा लोकांचा एक वर्ग म्हटला म्हणजे सीरिअन ख्रिस्त्यांचा होय. मलबारमध्यें या लोकांच्या पुढाऱ्यांस स्वजनांवर अधिकार चालवण्यास मलयाधिपतींनीं ताम्रपट दिलेला आहे. आणि छत्री, मोर्चेल व चवरी यांचाहि मान त्यांस मिळाला आहे असें सीरिअन सांगतात. सीरिअन यांनांच नेस्टोरिअन असेंहि म्हणण्याचा प्रचार आहे. तथापि आज त्रावणकोरमध्यें त्यांच्यांत अनेक पक्ष होऊन सीरिअन लोकांचे तीन चार तट पडले आहेत. ते रोमोसीरिअन, जॅकोबाइट सीरिअन, लंडन मिशनरी सोसायटी सीरिअन, खाल्डिअन सीरिअन हे होत. यांच्या-मध्येंच अलीकडे 'यूयोमयं' नांवाचा एक संप्रदाय स्थापन झाला आहे.

ॲलेक्झांड्रियाचे पँटीन्युज् (Pantaenus) (इ. स. १८०) मिशनरी वगळल्यास, हिंदुस्थानांत येणारे ख्रिस्ती संप्रदायाचे अगदीं प्रथमचे प्रचारक म्हटले म्हणजे इराणांतून आलेले हे नेस्टोरियनच होत. जेसुइट जरी सोळाव्या शतकांत आले असले तरी केवळ संख्येकडे दृष्टि फेंकल्यास तेच जास्त यशस्वी होत असें वाटल्यावांचून राहत नाहीं. यांनीं देशीभाषांतून विपुल वाङ्मय तयार केलें. त्यापैकीं बरेंचसें वाङ्मय कोणास समजणार नाहीं असें आहे, तथापि कांहीं महत्त्वाचें आहे. फादर स्टीफन्सचा ग्रंथ चांगल्या मराठी पुस्तकांत मोडेल. "एसुर्वेद" करणारा आणि आपणास रोमचा ब्राह्मण म्हणवून व संन्याशाचा पोषाख करून दुधावर राहून दर्शनास आलेल्या राजेलोकांनां बेपर्वाई दाखवून ज्यानें आपली छाप पाडली आणि हजारों द्राविड ब्राह्मण आपल्याकडे ओढले तो डि नोबिली यांच्याच पैकीं होता.

जेसुइटांच्या प्रामुख्याखालीं क्याथोलिक संप्रदायाचा प्रसार जारीनें सुरू होता तेव्हां इन्क्विझिशन नामक छळ करून मतप्रसार करणारी संस्था मोठी कार्यकर्ती बनली होती. तिनें अनेक अमानुष कृत्यें करून लोकांस वाटविलें. त्यांवर सारवा-सारव करण्याचा प्रयत्न क्याथोलिक एनसायक्लोपिडिआनें केला आहे. संप्रदायाच्या प्रसाराला राजसत्तेची जोड मिळाली तेव्हां संप्रदायाचें संवर्धन सहज झालें यांत आश्चर्य नाहीं.

संप्रदायप्रचाराचा उपयोग राजकीय दृष्ट्या होईल अशी समजूत असल्यामुळें कोणत्या तरी प्रकारानें पण संप्रदाय वाढविण्यास पोर्तुगीज सरकारची संमति असे. तथापि याला उलट परिणाम झाला. इंग्रज मात्र त्यापासून धडा

शिकले आणि त्यांनीं आपलें बस्तान नीट बसेपर्यंत मिशनांस थोडाबहुत विरोधच केला.

अठराव्या शतकांत प्रॉटेस्टंट पंथाचे ड्यानिश लोक त्रांकेबारच्या किनाऱ्यावर संप्रदायप्रचारार्थ प्रथम आले. हा वेळपावेतों संप्रदायसंवर्धनाच्या दृष्टीनें ज्या महत्त्वाच्या गोष्टी घडल्या त्या म्हणजे (१) या देशांत ख्रिस्तीसंप्रदायाला शिरकाव मिळाला व (२) हिंदु विचाराला महंमदी संप्रदायानें जें एकेश्वरीपंथाचें वळण लावण्यास सुरुवात केली होती तीच पद्धत मिशनऱ्यांनीं चालू ठेवली, या होत. तुरळकपणें व अंधश्रद्धेनें संप्रदायप्रसार करावयाची चाल अगदीं निरुपयोगी आहे, तिच्या योगानें उच्च वर्गांत संप्रदायाचा अगर तत्त्वांचा प्रसार होत नाहीं, अशी पुष्कळांची खात्री झाली. आतां येथें शिक्षणविषयक प्रयत्नांस अधिक महत्त्व मिळत आहे. अमेरिकन लोकांनीं संप्रदायवर्धनाचा प्रयत्न १८१० पासून चालविला आहे. इंग्रज मिशनऱ्यांत कॅरेचें नांव विशेष प्रामुख्यानें घेतलें पाहिजे. विल्यम कॅरेनें इकडे येऊन कलकत्त्याच्या उत्तरेस १५ मैलांवर श्रीरामपुर येथें एक मिशन स्थापलें त्या वेळेपासून संप्रदायवर्धनापेक्षां पाश्चात्त्यसंस्कृतिप्रसाराकडेच विशेष लक्ष दिलें जात आहे. इ. स. १८३४ पर्यंत कॅरेनें व त्याच्या दोन मित्रांनीं बायबलचें सात भाषांत व नव्या कराराचें ३० भाषांत भाषांतर केलें. ह्याशिवाय त्यांनीं वाङ्मय, शास्त्र वगैरेविषयीं फार परिश्रम केले आहेत. त्यांनीं कांहीं शेतकीविषयक संस्था, सेव्हिंग ब्यांकाहि स्थापन केल्या आणि सती, बालहत्या वगैरे दुष्ट चाली बंद करण्याकरितां फार परिश्रम घेतले. अर्थात् संप्रदायवर्धन हें ध्येय मिशनऱ्यांनीं टाकून दिलें नाहीं. मात्र संप्रदायवर्धनासाठीं उच्चवर्गांकडे न जातां अशिक्षित वर्गांकडे गेल्यानें अधिक फायदा होईल या भावनेनें तिकडे त्यांनीं मोर्चा वळविला. दक्षिणेंत त्रावणकोर येथें रिंगेलटाबे (Ringeltaube) नांवाच्या लंडन मिशनरी सोसायटीच्या एजंटनें विशेषतः ताडी काढणाऱ्या लोकांत आपली चळवळ सुरू करून, इ. स. १८४० पर्यंत १५००० लोक ख्रिस्ती बनविले. तिनवेल्ली येथें ऱ्हेनियस (Rhenius) नें चालविलेल्या चर्च मिशनरी सोसायटीस असेंच यश लाभलें. पूर्वकिनाऱ्यावरील जगन्नाथपुरी या क्षेत्राची महती ऐकून, बॅप्टिस्ट लोकांनीं इ. स. १८२१ त ओरिसामध्यें एक मिशन स्थापलें. सिलोन, म्हैसुर व कावेरीखोरें या ठिकाणीं वेस्लियन मिशनरी होतेच; लंडन मिशनरी सोसायटीच्या शाखा, मद्रास, बेंगलोर व बेल्लारी या प्रमुख लष्करी ठाण्यांच्या ठिकाणीं होत्या; व अमेरिकन बोर्डाचे एजंट अहमदनगर व इतर महाराष्ट्रांतील भागांत होते. हिंदूंच्या आचारविचारांचें माहेरघर म्हणून नांवाजलेल्या गंगायमुनांच्या प्रदेशांत बॅप्टिस्ट मिशनरीशिवाय चर्च मिशनरी सोसायटी, व लंडन मिशनरी सोसायटी या वावरत होत्या. ह्यांचा शिरकाव खुद्द काशींत झाला तो अनुक्रमें १८१६,१८१८ व १८२० या सालीं होय. स्कॉटिश प्रेसबिटेरियन पंथाचा मिशनरी अलेक्झँडर डफ यानें कलकत्त्यास मोठ्या प्रमाणावर शिक्षणाचें काम सुरू केलें; व बहुधा सर्व ठिकाणीं बायबलवरचे लहान ग्रंथ प्रसिद्ध करून त्यांचा प्रसार करणाऱ्या संस्था उत्पन्न केल्या. ख्रिस्ती पीठांचे लहान मोठे धर्माध्यक्ष, उपाध्याय वगैरे अधिकारी संप्रदायप्रसारार्थ आलेली संधि केव्हांहि फुकट दवडीत नसत. इ. स. १८३० मध्यें १० संस्थांचे १४७ एजंट १०६ ठिकाणीं ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रसाराच्या कामावर होते. १८३४ सालीं पश्चिम किनाऱ्यावर बॅसेल मिशन, मदुरेस अमेरिकन मिशन व लुधियाना येथें अमेरिकन प्रेसबिटेरियन मिशन, अशा संस्था स्थापन झाल्या. या निरनिराळ्या संस्थांनां जीं कामें करावीं लागतात म्हणून त्या संस्था बोभाटा करितात तीं कामें येणें प्रमाणें: (१) "लोकांनां उपासनाविषयक व सामाजिक स्वातंत्र्य" देऊन व "विश्वबंधुत्वाची कल्पना" लोकांच्या मनावर बिंबवून जातिभेद व "ब्राह्मणांचा जुलुमी वरचढपणा" नाहींसा करणें;- (२) लोकांची वर्तणूक सुधारून, त्यांचा दर्जा वाढविणें; (३) अनेकेश्वरी मूर्तिपूजा व तदानुषंगिक 'अनीतीचे' प्रकार यांचें खंडन करणें; (४) विश्वाच्या ईश्वरमयत्वाची (Pantheistic) भावना नाहींशी करून तिच्या जागीं विश्वाचा कर्ता, आपण उत्पन्न केलेल्या जीवांची व्यक्तिशः काळजी करणारा आणि विशेष प्रकारच्या अलौकिक मार्गानें मनुष्याला साक्षात्कार देणारा अशा प्रकारच्या ईश्वराविषयीं आस्तिक्याची भावना उत्पन्न करणें; (५) स्त्रियांची व परायांसारख्या अस्पृश्य जातींच्या लोकांची उन्नति करणें. वरील गोष्टी हिंदूंच्या बाबतींत कराव्या लागतात व त्याशिवाय सहा कोटी महंमदीयांनां वळविण्यासाठीं योजावे लागणारे उपाय निराळेच. अशा बाबतींत कार्य करण्याच्या प्रमुख दिशा खालीलप्रमाणें होत; व त्या दिशांनीं आजपर्यंत हें कार्य होत आलेलें आहे. मोठाल्या शहरांतून देशीभाषेंतून उपदेश करणें व खेडेगांवांतून फिरते उपदेशक ह्या कामीं नेमणें हा त्यांचा स्वाभाविक कार्यक्रम आहे. यूरोपियन व अमेरिकन प्रचारकांच्या देखरेखीखालीं देशी ख्रिस्ती उपदेशकांनीं या कामीं चांगलें यश संपादलें आहे असें म्हणतात. उपदेशाशिवाय औषधोपचाराच्या कामाकरितां देखील मिशनऱ्यांनीं संस्था काढल्या आहेत. अशा संस्थांनीं, मिशनरी लोकांविषयीं सर्वसाधारण अनुकूल ग्रह उत्पन्न होण्याला बरीच मदत झाली आहे. अनाथगृहें काढणें या बाबतींत रोमन कॅथोलिक पंथाच्या मिशनऱ्यांनीं पुढाकार घेतला आहे; कां कीं रोमन कॅथोलिक यांची सामाजिक भावना तीव्र असल्यामुळें नवीन इसम सामाजिक दृष्टीनें रोमन कॅथोलिक बनण्यापूर्वी त्याचा यूरोपीय आचारांत पुष्कळच दूरवर प्रवेश व्हावा लागतो आणि यासाठीं नवीनास बरींच

आचारपुटें द्यावीं लागतात; व अशीं पुटें देण्यास जरूर ती सवड मिळावी म्हणून 'गृहा'सारख्या संस्थेची अवश्यकता असते. मिशनांच्या नेतृत्वाखालीं देशी भाषांच्या शाळा देखील निघाल्या आहेत. या बाबतींत अमेरिकन बोर्डाचें मदुरा येथलें मिशन नमुनेदार आहे. इंग्रजी शिक्षण देण्याची व्यवस्था करणें या बाबतींत मिशनरी संस्थांनीं सरकारच्या प्रयत्नाला बरीच जोड दिलेली आहे; याचीं ढळढळीत उदाहरणें म्हणजे मद्रासचें ख्रिश्चन कॉलेज, कलकत्त्याचें जनरल असेंब्ली ऑफ स्कॉटलंडस् इन्स्टिट्यूशन, मुंबईचें विल्सन कॉलेज, त्रिचनापल्लीचें सेंट जोसेफस् कॉलेज आणि नागपूरचें हिस्लाप कॉलेज हीं होत. कांहीं कांहीं ठिकाणीं याच्याहि पुढचें काम म्हणजे सुशिक्षित हिंदूंनां व्याख्यानें व संभाषणें यांच्या द्वारें आपल्या संप्रदायाकडे वळविणें, या कार्यार्थ प्रयत्न होतोच. तथापि त्यांत यश किती येतें हा प्रश्न आहे. स्त्रीशिक्षण व जनान्यांतील थोर स्त्रियांनां सुसंस्कृत करण्याचें कार्य, हें आपल्याकडे घेऊन ख्रिस्ती मिशनरी स्त्रियांचे हितकर्ते म्हणून मिरवूं पहातात. त्याप्रमाणेंच, प्रचारासाठीं ज्याअर्थी त्यांनीं सुशिक्षित समाजाकडे दुर्लक्ष करून अज्ञानी मंडळीस पकडण्याचा प्रयत्न चालविला आहे त्याअर्थी त्यांस मागसलेल्यांचें, अस्पृश्यांचें आणि वन्यांचें पुढारीपण करण्याची जरूरी भासते हें उघड आहे. ब्राह्मण-ब्राह्मणेतरांत कलह लावण्यांत यांची खालच्या वर्गाविषयींची कळकळ बरीच कामास येते. या बाबतींत तेलुगु भाषा बोलणाऱ्या प्रदेशांतल्या अमेरिकन बॅप्टिस्टांनां मलजातीस ख्रिस्ती करण्यांत व लंडन मिशनरी सोसायटीच्या प्रचारकांस मादिगांनां आपल्या संप्रदायांत ओढण्यांत चांगलेंच यश आलें आहे. कारण पुष्कळ तेलुगु लोक ख्रिस्ती झालेले दृष्टीस पडतात. वर सांगितलेल्या खटपटींखेरीज, छोटानागपुरचे कोल, संताल व बंगालच्या पूर्वेकडील खासिया पर्वतांतील वन्य लोक अशा जातींतून प्रचारकसंस्था स्थापणें, ख्रिस्ती वाङ्मय प्रसिद्ध करणें, खेड्यापाड्यांतून हिंडणें व ख्रिस्ती देवालयांची काळजी घेणें, हीं कामें मिशनरी करीत असतात.

ख्रिस्ती मिशनरी स्वजनांत पैसे मिळविण्यासाठीं आपण लोकोद्धाराचीं काय कामें करतों याचें रसभरित वर्णन करितात, तेव्हां हिंदूंच्या बायकांची कींव व खालच्या वर्गाची कळकळ दाखवून ब्राह्मणांच्या जुलमांचा काल्पनिक हिशोब सांगतात, व आपण या बाबतींत कसा काय प्रयत्न करीत आहों याचा हिशोब देतात आणि धार्मिक, बौद्धिक, औद्योगिक व राजकीय बाबतींत मोठमोठे फरक ब्रिटिश सरकार व ख्रिस्ती मिशनरी यांच्या संयुक्त प्रयत्नानेंच झालेले आहेत असें भासवितात. ब्रह्मसमाज व आर्यसमाज यांच्या वाढीचें श्रेय ते स्वतःसच घेतात. पुराणमतवादी हिंदू लोक हिंदू कथापुराणांचीं बाडें संशोधक दृष्टीनें चाळून त्यांतील अद्भुत कथांतील रूपकात्मक अर्थ शोधतात आणि धर्मजागृति करण्याचा जो थोडाफार प्रयत्न करितात त्याचेंहि श्रेय मिशनरीच घेतात. फारच थोडे मुसुलमान ख्रिस्ती झालेले आहेत व जे झाले आहेत ते तरी सुशिक्षितां-पैकींच. तथापि त्या समाजांतील तरुण सुशिक्षित लोकांची प्रवृत्ति स्वतंत्र विचाराकडे जास्त दिसून येते हा देखील आमच्याच प्रयत्नांचा परिणाम आहे असें ते सांगतात.

हिंदुस्थानांतील मिशनरी लोकांच्या मतें त्यांच्या कामांत येणारे विशिष्ट अडथळे म्हणजे खालील होतः (१) परकीयांच्या सर्व गोष्टींविषयीं लोकांत असलेला द्वेष. (२) हिंदू लोकांची बुद्धि प्रयोग व अनुभव यांकडे विशेष पाहणारी नसून तिला कल्पनेचेंच विशेष वेड आहे. या बुद्धीला ऐतिहासिक पुराव्याचें महत्त्व वाटत नाहीं. (३) "प्रथम खड्डयांत पडण्याच्या तयारीचा अभाव;" ज्या हिंदुस्थानासारख्या देशांत अविभक्त कुटुंबाची पद्धत सार्वत्रिक व प्रबळ असते त्या ठिकाणीं व्यक्तिस्वातंत्र्य व इच्छास्वातंत्र्य यांविषयींची आस्था देखील बेताचीच असते. (४) स्त्रियांचें अज्ञान व रूढिप्रियता. (५) पापाबद्दलची "अपूर्ण" कल्पना. (६) ख्रिस्ती उपदेशाला न जुळणारें असें तत्त्वज्ञान व पाश्चात्त्य भौतिकवाद यांचा हिंदुस्थानांत प्रवेश. या वर दिलेल्या* कारणांचा अर्थ देखील लावण्याची जबाबदारी आम्ही घेत नाहीं. मिशनरी लोकांच्या कार्याच्या दिशा नेहमींच शहाणपणानें ठरविल्या जात नाहींत; उलट कांहीं वेळां त्यांच्या 'प्रभूनें' "मी नाशाकरितां आलों नसून पूर्णता करण्यासाठीं आलों" या आंखून दिलेल्या मार्गानें ते गेलेले नाहींत असें स्पष्ट दिसतें. तथापि वरील अडथळे आले असतां देखील ह्या प्रचारक मंडळींनीं चिरस्थायी व वाढतें यश मिळवून ठेवलें आहे.

**ख्रिस्ती लोकांची वाढ.**—ही फारच मोठी दिसते. इ. स. १९०१ च्या सेन्सस रिपोर्टावरून हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांच्या २९,४३,६१,०५६ लोकसंख्येपैकीं २९,२३,२४१ लोक ख्रिश्चन (नेटिव ख्रिश्चन २६,६४,३१३) होते. १९११ सालीं ख्रिस्त्यांची वाढ सुमारें दहा लक्षांनीं झाली म्हणजे सुमारें एकुणचाळीस लाख ख्रिस्ती होते. हिंदुस्थानांतील १०० ख्रिस्त्यांपैकीं ९२ ख्रिस्ती भारतीयच होत. आणि १९११ सालीं दर दहाहजार लोकसंख्येंत १२४ ख्रिस्ती होते. पोर्तुगीज व फ्रेंच हद्दींतील ख्रिस्ती लोक धरल्यास आणखी ३,५०,००० त्यांत मिळवावे लागतील. लोकसंख्येच्या मानानें ही संख्या फार नसली तरी मागील सेन्ससच्या रिपोर्टांतील ख्रिस्ती संख्यांशीं तुलना करतां ही प्रगति विशेषच आहे असें म्हणावें लागतें. इ. स. १८७२ त, १५,१७,९९७; १८८१ त, १८,६२,५२५ (२२·७% वाढ); १८९१ त, २२,८४,३८० (२२·६% वाढ); १९०१ त, २९,२३,२४१

* En. Bri., Article on 'Missions.'

(२८% वाढ). इ. स. १८९१ ते १९०१ या दहा वर्षांत हिंदुस्थानांतील एकंदर लोकसंख्या २½% नीं वाढली तर ख्रिस्ती लोकसंख्या २८% नीं वाढली हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. ही वाढ हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांतांत व संस्थानांत झालेली आहे. १९१० सालीं हिंदुस्थानांत एकंदर १२२ प्रचारक मंडळ्यांतून ४६१४ मिशनरी (स्त्रिया धरून), १२७२ हिंदू (ख्रिस्ती) धर्मोपदेशक, व शिक्षक व बायबलप्रचारक स्त्रिया धरून ३४,०९५ इतर देशी कामगार होते. मिशनरी लोकांनां हिंदुस्थान सरकारच्या वरिष्ठ अधिकाऱ्याचें व्यक्तिशः व एकंदरीनें चांगलें पाठबळ असतें, ही गोष्ट सांगणें अवश्य आहे.

**ख्रिस्ती संप्रदाय व सरकार.**—ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार करणें हा सरकारचा हेतु आहे असें दिसत नाहीं. तथापि अधिकाऱ्यांकडून पुष्कळ मदत या संप्रदायाच्या अभिवृद्धीस होते यांत संशय नाहीं. आमच्या चौकशी-वरून असें दिसतें कीं, दुष्काळांमध्यें जीं अनाथ अर्भकें सांपडतात त्यांनां दुष्काळी कामें आटपल्यानंतर त्यांच्या आईबापांची चौकशी करून परत पाठविणें हें स्थानिक अधि-काऱ्यांचें कर्तव्य असतें. तथापि अशा प्रसंगीं कांहीं यूरोपियन अधिकारी ही चौकशी करण्याची तसदी न घेतां मुलें मिशनऱ्यांच्या ताब्यांत देतात. कधीं कधीं मामलेदारास तसें करण्यासाठीं खासगी पत्रेंहि लिहितात. शिवाय मिशनरी संस्थांनां पैशाची किंवा जमिनीची मदत करण्याच्या कामीं बराच सढळ हात दाखविला जातो. ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार ब्रिटिश राज्य चिरकाल करण्यास उपयोगी पडेल ही भावना देखील सरकारी ग्रंथांतून दृष्टीस पडते. (चार्लस ग्रांटचें मध्यप्रांताचें ग्याझेटिअर पहा).

हिंदुस्थान सरकारनें ख्रिस्ती संप्रदायांपैकीं एका विशिष्ट संप्रदायाचें मत असलेल्या लोकांच्या फायद्याकरितां जें एक मोठ्या खर्चाचें खातें ठेविलें आहे त्याविरुद्ध ख्रिस्ती मंडळींत वागत असलेला असंतोष मधून मधून दृग्गोचर होतो; आणि या असंतोष व्यक्त करणाऱ्यांमध्यें देशी ख्रिस्ती उपाध्यायांचा भरणा विशेष आहे. त्यांचें असें मत आहे कीं, राज्य आणि उपासनासंप्रदाय या गोष्टी भिन्न असल्यामुळें एकाच संप्रदाया-साठीं इतका खर्च करण्याचें कारण नाहीं. ते असें म्हणतात कीं, हीं जर वियुक्त झालीं तर द्रव्यदृष्टि इंग्रज हें चर्च आपल्या खर्चानें ठेवण्यासाठीं मोठमोठ्या पगाराचे यूरोपियन आणण्यास मदत करणार नाहीं. त्याला आपल्या पोरांचा बाप्तिस्मा वगैरे करून घेण्याकरितां तात्पुरते तरी काळे पाद्री आणावे लागतील व त्यांनां काळ्या पाद्र्याचा मान ठेवावा लागेल.

**पारशी, यहुदी व चिनी यांचा हिंदुसमाजावर परिणाम.**—आज या देशांत ख्रिस्ती व मुसुलमान यांनीं एतद्देशीय लोकांस आपल्यांतलें केलें, एवढेंच नव्हे तर पारशांनीं देखील हिंदूंतील माणसें घेऊन समाजवर्धन केलें. आजच्या पारशी लोकांतील अनेक लोकहि मूळचे इकडचेच आहेत. डावर हें आडनांव ठाण्याच्या आसपासच्या वारली जातींत व पारशांतहि आढळतें. देशांतील शिष्टवर्ग त्यांच्या संप्रदायांत मिळेना व केवळ खालच्या जातीचेच लोक त्यांच्या जातींत समाविष्ट होत म्हणून ही पार्शीकरणाची चाल त्यांनीं अलीकडे बंद केली आहे असें डॉ. ढाला म्हणतात. अलीकडे पारशांत परकीय लोकांस स्वसमाजांतर्गत करावें म्हणून म्हणणारा एक पक्ष आहे.तथापि त्या पक्षाचा हेतु यूरोपीय लोकांचा आणि विशेषेंकरून स्त्रियांचा समावेश स्वजातींत व्हावा असा आहे. त्या पक्षास विरुद्ध पक्षाचे लोक 'चिरूटिया' किंवा 'मडमिया' (म्हणजे चिरूट ओढणें किंवा मडम बायको करणें या बाबतींत स्वातंत्र्य अपेक्षिणारा वर्ग) म्हणतात. परजातीयांस स्वजातींत घ्यावें किंवा नाहीं याबद्दल पारशांनीं इराणांतील धर्मशास्त्रज्ञांकडून रेवायत नांवानें ओळखिले जाणारे जे शास्त्राधार आणले त्यांत परप्रवेशानुकूल अभिप्राय व्यक्त करून घेतला आहे. आजचे पारशी स्वजातिसंवर्धनाकडे फारसें लक्ष घालीत नाहींत याचें एक कारण जातीच्या पंचायतीचा जो निधि आहे त्या निधीचा फायदा घेणाऱ्यांची संख्या वाढूं नये असें सांगण्यांत येतें. तथापि हें कारण सर्वांशीं खरें नाहीं. स्वकीय विद्या व समाजसभासदत्व हें धन समजून त्याचा उपभोग इतरांस घेतां येऊं नये ही भावना हिंदूंप्रमाणें त्यांतहि आहेच. पारशी मद्रसांमध्यें अवेस्ता शिकविण्यासाठीं परकीयांस अजून घेत नाहींत या गोष्टीवरून पारशांनीं वेद-रक्षणाच्या सांप्रदायिक बाबतींत हिंदूंचें किती अनुकरण केलें आहे हें दिसतें. पार्शी लोकांचें हिंदूंशीं साम्य दाखविणारी दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं, गाथा, वेंदिदाद या ग्रंथांत जे विचार उपदेशिले आहेत ते पारशांच्या विचारांचें नियमन करीत नाहींत, केवळ उपासना आणि विधी या गोष्टींपुरताच पारशी दस्तुरांचा आज उपयोग आहे. दस्तुर जे अवेस्ताचे पाठ म्हणतात ते शुद्ध नाहींत तर ते मूळ गाथांचे खरे उच्चार सोडून भ्रष्ट उच्चार करितात अशी पारशी सुशिक्षितांची समजूत आहे.* जे विचार लोकांत सांगावेत आणि ज्या मतांची स्थापना चोहोंकडे करावी असे विचार आणि अशीं उत्साहजनक मतें पार्शी ग्रंथांत नाहींत असें नाहीं. पण ते विचार अजून कर्तव्यास स्फूर्ति देतील इतक्या स्पष्ट तऱ्हेनें दस्तुरांच्याच मनांवर बिंबले नाहींत. अवेस्ताचा अर्थ न समजतां संध्येसारखा पाठ म्हणावा यापलीकडे त्यांचें ग्रंथज्ञान

* ही समजूत दृढ होण्यास ग्रंथांच्या पूर्वींच्या यूरोपीयांनीं (उ० वेस्टरगार्ड, १८५४) संशोधिलेल्या प्रती होत. आतां गेल्डनरची आवृत्ति प्रसिद्ध झाली आहे. तींतील उच्चार भिक्षुकी उच्चारांच्या अधिक जवळचे आहेत.

फारसें गेलें नाहीं. पार्शांच्या अस्तित्वामुळें हिंदूंवर काय सामाजिक परिणाम झाले हें सांगतां येत नाहीं. थोडेसे हिंदू केव्हांतरी पारशी झाले हा एक परिणाम दिसतो. आपल्यांतील सोंवळयाच्या कल्पना कमी होण्यास इराण्यांचीं हाटेलें कारण झालीं हा एक दुसरा परिणाम दिसतो. गुजराथी भाषेवर पारशी भाषेचा कांहीं परिणाम झाला आहे. पारशी गुजराथी म्हणून एक बोली तयार झाली आहे. तरी पण पारशांचा आपल्यावर फारसा परिणाम होण्याऐवजीं आपलाच पारशांवर अधिक झाला असें म्हणतां येईल.

पारशांशिवाय दुसरा परकीय संस्कृतीनें वेष्टिलेला अल्प समुदाय म्हणजे यहुद्यांचा होय. यहुद्यांपैकीं कांहीं गेल्या शतकांतील आहेत आणि कांहीं फार जुने आहेत. हे देखील आज आपला संप्रदाय वाढवीत नाहींत. तथापि कांहीं वर्षांपूर्वीं ते संप्रदाय वाढवीत असावेत असें वाटतें. कोचीन येथें गोरे व काळे असे यहुद्यांमध्यें भेद आहेत. तेथील गोरे यहुदी देखील अनेक शतकें येथें आहेत त्या गोऱ्यांचें म्हणणें असें आहे कीं, ते स्वतः शुद्ध रक्ताचे आहेत आणि काळे यहुदी मिश्र किंवा मूळचे हिंदू आहेत. काळे यहुदी असें म्हणतात कीं, आम्ही जुने आहोंत. गोरा आणि काळा हा जसा यूरोपीयांनीं हिंदुस्थान जिंकल्यामुळें तीव्र भेद उत्पन्न झाला आहे त्याप्रमाणेंच येथील यहुद्यांमध्यें भेद वाढत आहे. बेने इस्रायलांस इतर यहुदी कमी समजतात. बेने इस्रायल पूर्वीं नवीन आलेल्यांस हलके समजत असत.

डेव्हिड सासून यानें यहुदी लोकांसाठीं ज्या मोठमोठ्या देणग्या दिल्या त्यांचा उपयोग बेने इस्रायलांस होत नाहीं. बेने इस्रायलांमध्यें मराठी भाषा लपविण्याची प्रवृत्ति होण्यास यहुदी समाजांतील काळागोरा भेद बराच कारण होतो हें स्पष्टपणें निर्देशिलें पाहिजेच. कोंकणी यहुदी म्हणजे बेने इस्रायल यांचीं व इतर यहुदी लोकांचीं लग्नें होत नाहींत. जेव्हां होतात तेव्हां त्या संबंध करणाऱ्या गोऱ्या यहुद्यास इतर यहुदी वाळींत टाकतात, अशीं कांहीं उदाहरणें कलकत्त्यास दृष्टीस पडतात. गोऱ्या यहुद्यांपैकीं सर्वच लोक बेने इस्रायलांचें जातीनें यहुदीपण अमान्य करीत नाहींत. उलटपक्षीं बेने इस्रायलहि असें सांगूं लागले आहेत कीं, आम्हां बेने इस्रायलांतच काळा आणि गोरा असे भेद पूर्वीपासून आहेत. असें सांगणारे बेने इस्रायल स्वतःस गोऱ्यांत जमा करतात हें सांगावयास नकोच. बेने इस्रायलांच्या रक्ताविषयीं शंका न घेतां त्यांच्या आचाराच्या शुद्धतेविषयीं दोष काढण्याचें सुरू झालें आहे. उदाहरणार्थ बेने इस्रायलांच्या बायका तेविल्ला घेत नाहींत म्हणजे विटाळशांनीं देवळांतील हौदांत स्नान करून शुद्ध व्हावयाचें तें त्या करीत नाहींत वगैरे अपवाद आतां बाहेर पडूं लागले आहेत. यहुदी लोकांच्या धर्माविषयींचा आणि इतिहासाविषयींचा विचार पुढें येईल.

आतां आपल्या देशांतील चिनी लोकांकडे वळूं. आज त्यांची संख्या जरी अल्प आहे तरी ती पुढेंमागें मोठी होईल असा बराच संभव आहे. शिवाय हे लोक आले म्हणजे आपल्या देशांतील वैसदृश्य अधिक वाढलें असें होईल. या बाबतींत सरकारी शासनाचा उपयोग करून घेण्यासाठीं लोकांनीं जागरूक राहिलें पाहिजे. चिनी लोक या देशांत आले तर त्याची फिकीर येथील सरकारास खास वाटत नाहीं. पूर्वीं एकदां साष्टी बेटांत चिनी लोकांची वसाहत करवावी म्हणजे मुंबईच्या इंग्रज व्यापाऱ्यांस लागणारे मजूर भरपूर मिळतील अशा तऱ्हेची योजना ईस्ट इंडिया कंपनीच्या हातीं राज्य कारभार असतां झाली होती. तथापि ती पुढें सोडून देण्यांत आली. कांहीं चिनी कैदी हिंदुस्थानांत ठेविले होते आणि त्यांस येथील हलक्या जातींच्या स्त्रियांपासून संततीहि झाली आहे. या संततीस आज नांव काय आहे तें कळलें नाहीं. थरस्टन* यांस "चायनीज तामिल क्रास" म्हणजे चिनी तामिळ मिश्रण असें म्हणतो. या वर्गाचें पुढें भवितव्य काय याजकडेहि आपणांस दृष्टि ठेवली पाहिजे. कलकत्त्यास अनेक चिनी येऊन जोड्यांचा व्यापार करणें, बूट तयार करणें, सुतारकाम करणें, या धंद्यांत पडलेले आढळतात. आजचे कलकत्त्यांतील सगळयांत चांगले सुतार हे चिनी होत असा समज कलकत्त्यास आहे. हे लोक जर देशांतच राहिले तर देश्य संस्कृति दुर्बल करण्यास जीं कारणें आहेत त्यांत आणखी एकाची भर पडेल. जेथें जातिभेद तीव्र आहे तेथें परकीय लोक आपल्या समाजांत समाविष्ट व्हावे ही इच्छा ठेवणें म्हणजे फार दूरच्या गोष्टीसंबंधानें ओरड करणें होय. या लोकांवर आपली छाप आपल्यांतीलच एखाद्या संप्रदायाकडून पडते असें दिसत नाहीं. कलकत्त्यास देखील कांहीं बौद्ध आहेत पण त्यांचा आणि चिनी लोकांचा संबंध मुळींच दिसत नाहीं. हे सध्यां अगदीं तुटक असल्यासारखे आहेत. नाहीं म्हणावयास एकदां असें प्रसिद्ध झालें होतें कीं हे चिनी लोक नेटिव ख्रिस्ती स्त्रियांशीं लग्नें करतात. हें जर खरें असेल तर कदाचित बंगालीपणा चिनी लोकांच्या भावी प्रजेंत शिरेल. कलकत्त्यांतील बंगाली लोकांस या संबंधानें स्पष्ट माहिती नाहीं, किंवा यासंबंधाचा विचारहि ते करूं लागले नाहींत.

एतद्देशीय ख्रिस्ती स्त्रिया आणि चिनी पुरुष यांच्या योगानें जी संतति तयार होते ती दुसऱ्या परक्या समाजांत समाविष्ट होत असावी अशी कल्पना देणारा पुरावा थोडाबहुत पुढें आलेला आहे. मद्रास येथें १९१५ च्या जानेवारींतील इंडियन सायन्स कॉंग्रेसमध्यें डॉ. आननडेल यानें यूरेशियन समाजाच्या घटनेसंबंधीं एक व्याख्यान दिलें त्यांत असें दाखविलें कीं, यूरेशियन म्हणजे यूरोपीय पुरुष आणि एशियांतील स्त्रिया यांपासून होणारी संतति असा जो

* Castes & Tribes in Southern India, Madras 1909.

समज आहे तो बराचसा खरा नाहीं. यूरेशियनांत अनेक जातींचें मिश्रण सांपडतें, म्हणजे कांहीं 'दिव्यजनसंभव' प्रजा यूरेशियन लोकांत शिरली असावी असें त्यानें चिनी, मलायी वगैरे स्वरूपाच्या जमा केलेल्या यूरेशियनांच्या चित्रांवरून दिसतें.

वाह्य लोकांपैकीं जे लोक आपल्याच देशांत येऊन राहिले त्यांच्या चळवळींकडे आणि त्यांच्या संख्येच्या वृद्धीकडे आणि अपकर्षाकडे आपलें सतत लक्ष राहिलें पाहिजे. इतर देशांशीं स्पर्धा करण्याच्या कल्पनेपूर्वीं देशांतल्या देशांतच आपण कोणीतरी आहोंत ही वृत्ति नसेल तेथें उत्पन्न झाली पाहिजे व असेल तेथें टिकविली पाहिजे. परदेशी लोकांचें जर देशांतच महत्त्व वाढलें तर तें फार घातुक आहे. स्पर्धा करणाऱ्या समुच्चयांपैकीं एकाची वृद्धि आणि प्रगति दुसऱ्याच्या प्रगतीस अनेक प्रसंगीं अडचण उत्पन्न करते. यूरोपीयांचे येथें जे व्यापारी संघ असतील किंवा गिरण्या असतील त्यांच्यापुढें आपला टिकाव लागला नाहीं आणि आपल्या व्यापारी संस्था मृत होऊं लागल्या तर मुळावरच घाला आल्यासारखें होईल. असें होण्यापेक्षां येथें आलेल्या यूरोपीयांचें आणि आपलें व्यवहारविषयक एकीकरण होणें हें अधिक चांगलें. असें एकीकरण होण्याचा रंग दिसूं लागला आहे. पुष्कळ कंपन्या अशा निघतात कीं, कांहीं भांडवल एतद्देशीयांचें तर कांहीं यूरोपीयांचें; कंपनींतील कांहीं नोकर हिंदी तर कांहीं यूरोपीय. आपल्यामध्यें जोंपर्यंत कलाकौशल्य आणि व्यवस्थेची उत्तम शिस्त हीं वृद्धिंगत झालीं नाहींत तोंपर्यंत आपणांस यूरोपीय मंडळीच्या साहाय्या-शिवाय गत्यंतर नाहीं. असो.

आतां यूरोपीय मंडळीची या देशांतील लोकसंख्या किती आहे हें आपण पाहूं.

हिंदुस्थानांत १९११ सालीं परक्या देशांत जन्म झालेल्या लोकांची एकंदर संख्या साडेसहा लाखांवर होती. या साडे-सहा लाखांपैकीं यूरोपांत जन्म झालेले एक लक्ष बत्तीस हजार होते. आफ्रिकेंत जन्म झालेले दहा हजार, अमेरिकेंत जन्म झालेले २७६० आणि आस्ट्रेलेशियामध्यें जन्मलेले १२६७ होते. १९०१ सालीं या परक्या देशांतून आलेले लोक बरेचसे कमी होते. यूरोपांतून फक्त एक लक्ष चार हजार लोक आले. ग्रेट ब्रिटन आणि आयर्लंड या भागां-तून हजारों लोक केवळ शिपाईपेशासाठीं येतात. त्यामुळें यूरोपीयांची संख्या फुगली आहे. हे लोक जर वगळले तर येथें येणारे यूरोपीय किती थोडे आहेत याची कल्पना येईल. युनायटेड किंगडम म्हणजे इंग्लड, स्काटलंड, आयर्लंड आणि वेल्स या भागांत जन्मलेले लोक जर वगळले तर या देशांतील यूरोपीय स्त्रीपुरुषांची संख्या १९०१ सालीं आठ हजार होती ती १९११ सालीं ९ हजार झाली. यावरून किती थोडक्या लोकांनीं आपला परदेशी व्यापार आणि देशाच्या सर्व किल्ल्या ताब्यांत ठेवल्या आहेत हें कळून येईल. बाहेरून आपल्या देशांत येणारा वर्ग अधिक सुशिक्षित व व्यवहारज्ञ आणि आपलें काम कसें करावें हें जाणणारा असतो. संख्येच्या दृष्टीनें अल्पल्प असून इतर दृष्टींनीं मोठें महत्त्व असलेला असा हा वर्ग आहे.

यूरोपांतील लोकांचें या देशांत महत्त्व केवळ त्यांच्या हातीं राज्यकारभार आहे याच दृष्टीनें आहे असें नाहीं. त्यांच्या हातीं किती उद्योगधंदे आहेत इकडे लक्ष दिलें पाहिजे. रेल्वे जेथें सरकारी नाहींत तेथें यूरोपियन भांडवलवाल्यांच्याच मालकीची असते. देशांत ज्या अनेक ब्यांका आहेत त्यांपैकीं बहुतेक ब्यांकांचे म्यानेजर व मुख्य अधिकारी यूरोपियनच आहेत. आपल्या लोकांनीं कांहीं उद्योग काढले आणि मोठें भांडवल त्यांत गुंतविलें म्हणजे त्यांस यूरोपियन अधिकारी नेमल्याखेरीज गत्यंतरच नसतें. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या असतां यूरोपीय लोकांचें देशांत सध्यां असलेलें वर्चस्व केवळ सरकारी मर्जीमुळें यूरोपीय उच्चस्थानावर वसतो एवढ्यावरच आधारलेलें नसून त्यांच्या अधिक इभ्रतीवर, अधिक विद्येवर आणि अधिक मेहनतीवर त्यांनां देशांत श्रेष्ठ स्थान मिळत आहे हें उघड होतें. ही गोष्ट आपल्या जितकी लवकर लक्षांत येईल तितकें चांगलें. वस्तूंची पैदास करण्यांत आणि कच्चा माल घेऊन त्याचा पक्का माल बनविण्याच्या कृतींत असलेलें यूरोपीयांचें प्रावीण्य त्यांस महत्त्वाच्या स्थानावर अधिष्ठित करीत आहे. विद्या आली म्हणजे अधिकारहि हातीं येतो. यास चहाच्या मळ्यांचेंच उदाहरण घेऊं. १९११ सालच्या आंकड्यांप्रमाणें आसामांतील ६०९ चहाच्या मोठ्या मळ्यांपैकीं ५३६ मळे इंग्रज किंवा यूरेशियन लोकांनीं चालविले आहेत; आणि त्यांच्या मालकीचे मळे घेतले तर ते या ६०९ पैकीं ५४९ भरतील, म्हणजे कांहीं मळे यूरोपियन लोकांच्या मालकीचे असून त्यावर व्यवस्था हिंदी लोकांची आहे. हिंदी लोकांच्या मालकीचे चहाचे मळे आसामांत फक्त साठ आहेत, पण हिंदुस्थानी म्यानेजरांच्या देखरेखीखालीं असलेले ७३ आहेत.

आपले शास्ते या दृष्टीनें त्यांचें महत्त्व आपल्यावर किती आहे हें सांगावयास नकोच. स्वराज्य मिळालें तरी बऱ्याच काळपर्यंत हें महत्त्व कमी होणार नाहीं. कदाचित् उलट वाढत जाण्याचाहि संभव आहे. यूरोपीयांचें देशांत जें महत्त्व आहे तें अधिकारामुळें आहे; तथापि बराचसा अधिकार गुणमूलक आहे. पुढें एवढें मात्र होईल कीं, नालायक यूरोपियन लोकांस केवळ यूरोपियन म्हणून मोठेपणा मिळावयाचा कमी होईल. हिंदुस्थानांतील लोकांस जर राज्यकारभारांत आणि जगांत महत्त्व आलें तर त्यांचें कार्यक्षेत्र विस्तृत होईल आणि तें तसें होऊं लागलें म्हणजे त्यांस कार्यकर्ती माणसें प्रथम यूरोपां-तूनच आणावीं लागतील. आपल्या कारखान्यांवर आणि

पेढ्यांवर आपण इंग्रज कां नेमतों ? उत्तर एवढेंच कीं, त्यांची आवश्यकता आज आहेच. आपला सुशिक्षित समाज फारच अल्प आहे आणि आहे तो जगांतील सर्वेशीं फारसा परिचित नाहीं. आपल्यामध्यें सर्व प्रकारच्या कार्यांस उपयोगीं पडणारीं माणसें अजून उत्पन्न व्हावयाचीं आहेत.

यूरोपीयांचे जे आपणांवर परिणाम होतात त्यांत सांस्कृतिक परिणाम फारच मोठे आहेत. अनेक नवीन शास्त्रें यूरोपांत आणि अमेरिकेंत उदयास आलीं. शास्त्रांचा हेतु जर सत्य-शोधन आहे आणि सत्यामध्यें जर द्वैत नाहीं तर या सर्व शास्त्रांचा परिणाम आपल्या विचारपद्धतीवर होणारच. आज शास्त्रविकासाचा आपणांवर परिणाम एवढाच होत आहे कीं, शास्त्रज्ञानामुळें यूरोपीय लोकांस आलेलें बल आपणांस भोंवतें आणि त्यांनीं उत्पन्न केलेले पदार्थ आपणांस वापरावयास मिळतात. त्यांचीं शास्त्रें जाणून घेऊन आपणांमध्यें आपण कर्तृत्व उत्पन्न करून घ्यावयाची क्रिया फारशी सुरू झाली नाहीं आणि त्यांचें शास्त्रज्ञान आणि आपलें जुनें ज्ञान यांचें एकीकरणहि झालें नाहीं. हें एकीकरण कसें होईल हा एक मोठा स्वतंत्र विषय आहे आणि त्याचें विवेचनहि स्वतंत्र-पणें करण्याचें योजिलें आहे.

हिंदु समाजावर परिणाम घडविण्यासाठीं ज्या ख्रिस्त्यांच्या मिशनरी संस्था आहेत त्यांचें स्थूलस्वरूपवर्णन दिलेंच आहे. हिंदु समाजाच्या आणि त्यांच्या प्रयत्नांच्या झटापटीमुळें समाजाचें भवितव्य कसें होणार आहे याचें विवेचन पुढें येईल.

आतां मुसुलमानांकडे वळूं. ख्रिस्ती संप्रदायापेक्षांहि ज्या परकीय संप्रदायाचें कार्य मोठें होऊन ज्यानें साडेसहा कोटीं-वर लोक आपल्याकडे ओढले असा संप्रदाय महंमदाचा होय. मुसुलमानांचा सर्व इतिहास हा या संप्रदायाचाच इतिहास आहे. कां कीं, संप्रदायासाठीं राज्य आणि राज्यासाठीं संप्रदाय इतका निकट संबंध मुसुलमानी संप्रदायाचा आणि राज्याचा आहे.

मुसुलमानांची वाढती संख्या आपणांस परिचित आहे. मुसुलमानांच्या हिंदुस्थानांत वाढत असलेल्या या संख्या-बलाबद्दल मुसुलमानांविषयीं मत्सरबुद्धि जागृत होत आहे. तथापि यासंबंधांत ज्या एका मुख्य गोष्टीचा विचार करावयास पाहिजे ती ही कीं संख्याबल हें त्यांच्या समाजास व्हावें तसें हितावह होत आहे कीं कसें ? मुसुलमानांचें संख्याबल त्यांस हितावह होत नाहीं कारण, मुसलमानांमध्यें काम करण्यास लायख अशा स्त्रीपुरुषांचें प्रमाण कमी आहे. १९११ सालीं दहा हजार हिंदु पुरुषांत वीसपासून चाळीस वर्षांचे ३२१६ पुरुष होते. मुसुलमानांत फक्त ३०४७ होते. चाळीसपासून साठ वर्षांपर्यंतचे पुरुष हिंदूंत १६७३ होते तर मुसुल-मानांत १४९३ होते. १९०१,१८९१,१८८१ सालीं देखील अशीच स्थिति दिसते.

हिंदुमुसुलमानांच्या तुलनेसंबंधाच्या दोघांच्या वाढीवर परिणाम करणाऱ्या आणि दोन्ही समुदायांच्या सौख्यविषयक प्रश्नांवर प्रकाश पाडणाऱ्या महत्त्वाच्या गोष्टी येणेंप्रमाणें:—

१५–२० या वयाचे पुरुष मुसुलमानांत १८९१ सालची गणना वगळतां हिंदूंपेक्षां कमीच दिसतात.

१५–२० वयाच्या स्त्रिया मुसुलमानांमध्यें हिंदूंपेक्षां नेहमीं जास्त असतात.

२०–४० वर्षांच्या स्त्रिया हिंदूंमध्यें मुसुलमानांपेक्षां अधिक आहेत.

१५–४० वर्षांच्या स्त्रिया घेतल्या तर त्या हिंदूंमध्येंच अधिक दिसतील.

तथापि स्त्रियांच्या प्रसवशक्तीच्या जोमाचीं हिंदुस्थानां-तील मुख्य वर्षें १५–२० हींच आहेत. कां कीं, येथें लग्नें लवकर होतात आणि १५ पासून ४५ वर्षांपर्यंत स्त्रियांची प्रसवशक्ति एकसारखी वयपरत्वें कमी कमी होत जाते.

मुसुलमानांमध्यें व हिंदूंमध्यें पंधरापासून वीस वर्षांच्या मुलींपैकीं शेंकडा ८५ मुली विवाहित असतात.

१० वर्षांपर्यंतच्या पुरुषांची संख्या दहा हजार हिंदूंत १९११ सालीं २६२९ होती तर मुसुलमानांमध्यें ती २९२३ होती. स्त्रियांमध्येंहि अल्पवयी स्त्रियांचें प्रमाण फार मोठें आहे. यावरून असें दिसून येतें कीं मुसुलमान समाजामध्यें मुलें फार आहेत. आयुर्मर्यादा हिंदूंपेक्षां कमी. स्त्रियांमध्यें २०–४० वर्षांच्या स्त्रिया कमी. १५–२० वर्षांच्या पुष्कळ. विवाहकाल हिंदूंमध्यें व मुसुलमानांमध्यें सारखाच, आणि त्यामुळें हिंदूंपेक्षां मुसुलमानांत प्रजोत्पत्ति अधिक पण अल्पवयी मृत्यु त्यापेक्षांहि अधिक आहेत.

याचा अर्थ हा कीं, मुसुलमान समाजावर अपत्यसंगोपनाचा बोजा हिंदूंपेक्षां अधिक आहे आणि द्रव्योत्पादनक्षम वयाचीं माणसें मुसुलमानांत कमी आहेत. एकंदरींत मुसुलमानांचें संख्याधिक्य थोडेंसें भ्रामक आहे. त्यांची एकंदर लोकसंख्या अधिक भरते पण ती कामास येत नाहीं; तिचा बराच भाग केवळ कार्यक्षम लोकांवर अधिक बोजा टाकण्यास कारण होतो.

या तऱ्हेचें विवेचन करणें म्हणजे अर्थशास्त्रांत शिरणें होय. तिकडे शिरलें म्हणजे पुष्कळच लिहिलें पाहिजे. सध्यां समाजाचा तात्त्विक विचार करीत करीत हिंदु, मुसुलमान आणि ख्रिस्ती यांच्या प्रश्नांकडे त्यांचें भवितव्य जाणण्यासाठीं वळूं. भवितव्य काढावयाचें तें सर्वांचेंच एकदम काढावें लागतें, आणि यासाठीं समाजाचे विशेष व्यापक नियम लक्षांत घ्यावे लागतात.

## प्रकरण १२ वें.

## समाजरूपांतराचे नियम आणि हिंदुसमाजाचें भवितव्य.

**हिंदुत्ववृद्धि म्हणजे काय.**—हिंदुसमाजाचा एकंदर विस्तार आणि त्यावरोवर उपस्थित होणारे प्रश्न यांची माहिती दिल्यानंतर या समाजाचें भवितव्य काय हा प्रश्न उत्पन्न होतो. समाजाचा भवितव्यविषयक विचार करण्यासाठीं ज्या कारणांनीं समाजांत फेरवदल उत्पन्न होतात तीं कारणें आणि त्या कारणांनीं होणाऱ्या फेरवदलांचें स्वरूप यांचें शास्त्र थोडेंसें अवगत करून घेतलें पाहिजे. समुच्चयांची घटना, विकास, अन्यसमाजसंयोग, स्वरूपांतर, विघटना म्हणजे समुच्चयांतर्गत व्यक्तींचा अन्यसमाजांनीं केलेला स्वीकार आणि तन्मूलक समाजनाश या सर्व समुच्चयविकाराच्या पायऱ्या लक्षांत घेतल्या पाहिजेत. हिंदुसमाजाचें भवितव्य मनुष्येतिहासांत सुरू झालेल्या अनेक प्रकारच्या गतींनीं निर्णीत व्हावयाचें आहे. केंद्रविहीन हिंदुसमाजास केंद्र उत्पन्न होऊन त्याचे हातपाय पसरतील किंवा हा समाज दुसऱ्या कोणत्या तरी समाजांत विलीन होऊन जाईल, हा प्रश्न आहे. जें काय भवितव्य असेल तें गूढच राहणार, तथापि त्याचीं शक्य स्वरूपें काय हें लक्षांत घेतलें पाहिजे. हीं शक्य स्वरूपें येणेंप्रमाणें दिसतात.

(१) ख्रिस्ती व मुसुलमान हे संप्रदाय वाढून हिंदु संस्कृतीचा अजीवात लोप होणें, आणि हिंदु समाजाचाहि नाश होणें.

(२) हिंदु समाज वृद्धिंगत होणें.

आपणांस एक प्रश्न वारंवार विचारला जातो तो हा कीं "हिंदु धर्माचा" म्हणजे हिंदुत्वाचा विस्तार इतःपर होईल काय?

या प्रश्नास उत्तर द्यावयाच्या अगोदर आपण कांहीं कल्पनांची फोड करून घेतली पाहिजे. या प्रश्नाचे दोन अर्थ होऊं शकतील. एक हिंदु समाज वाढत जाईल काय? आणि दुसरा हिंदु विचार आणि कल्पना या पसरत जातील काय? हिंदुत्व पसरणें आणि खैस्त्य पसरणें या गोष्टींचें स्वरूप भिन्न आहे. संप्रदायाचा प्रसार म्हणजे विशिष्ट मतांचा प्रसार, आणि त्याच्या अनुषंगानें समाजाचा विस्तार. या दोन भिन्न गोष्टी एकत्वानें ख्रिस्ती इत्यादि सर्व संप्रदायांस लागू पडतील. हिंदुत्वाचा प्रसार म्हणजे अशी गोष्ट नाहीं. हिंदुत्व म्हणजे कांहीं मतें नव्हत. हिंदुत्व स्थापन होणें म्हणजे परक्यांचा हिंदुसमाजामध्यें अंतर्भाव होणें होय. अंतर्भाव म्हणजे बाहेरील माणसें समाजांतील विशिष्ट जातींत प्रविष्ट होतील, किंवा त्यांची घटना जशी ची तशीच राहून त्यांचा समाज हिंदु समजला जाईल. हिंदु समाजाची एकंदर घटना लक्षांत घेतली म्हणजे त्या घटनेचा विस्तार कसा काय होणें शक्य आहे हें समजेल. हिंदुसमाजाची तुलना आपण तात्पुरती अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांशीं करूं. संयुक्त संस्थानें म्हणजे मूलतः एक राष्ट्र नव्हे; तर राष्ट्रांचा संघ आहे. अमेरिका म्हणजे संयुक्त संस्थानें हें राष्ट्र (राष्ट्रसंघ) दोन तऱ्हांनीं वाढत आहे. एक, या राष्ट्रसंघामध्यें इतर राष्ट्रांचा समावेश होत आहे आणि दुसरें, नाना ठिकाणचीं माणसें त्या प्रदेशांत येत आहेत. दुसऱ्या तऱ्हेनें जेव्हां वाढ होते तेव्हां असें होतें कीं, नवीन येणारा मनुष्य एका विशिष्ट संस्थानामध्यें नागरिक होतो व अशा रीतीनें त्या संस्थानामार्फत अमेरिकन राष्ट्राचा नागरिक होतो. जो समुच्चयांचा संघ आहे त्यांत व्यक्तींचा स्वतंत्रपणें अंतर्भाव होत नाहीं. राष्ट्रवर्धन व्हावयाचें तें एकतर नवीन संघ येऊन राष्ट्रसंघास मिळाल्यानें होईल किंवा व्यक्ति येऊन संघांतर्गत समूहास मिळाल्यानें होईल. या दोन्ही तऱ्हांनीं हिंदुत्वाची वाढ होणें शक्य आहे. कारण, हिंदुसमाज हा व्यक्तींचा संघ नसून संघांचा संघ आहे. एवढेंच कीं, त्या संघामध्यें किंवा संघांतर्गत बऱ्याचशा समूहांमध्यें शासनसंस्था नाहींत; त्यामुळें अस्तित्वांत असलेल्या बऱ्याच संघांची आंतील सभासद वाढून वाढ होणें फारसें शक्य नाहीं. जे समाज जयिष्णु असतील, ज्यांत गडवड करून संघवल वाढविणारीं माणसें निघतील, तेच समाज अशा रीतीनें वाढतील, इतर वाढावयाचे नाहींत. शिवाय आपल्या संघसमुच्चयास केंद्रवर्ती संस्था नसल्यामुळें जे समाज आपल्याशीं अधिकाधिक सदृश होतील ते आपल्यांतीलच आहेत असें समाजातर्फे मानण्यास आपल्यांत अधिकारी तरी कोण आहे? असो.

**भिन्नसमाजसंनिकर्ष.**—एक समुच्चय एखाद्या समुच्चयसंघांत प्रवेश करितो असें जाणून बुजून क्वचितच होतें. समुच्चयसंघांशीं सादृश्यवृद्धि झाली म्हणजे बाह्यसमुच्चयस्वीकार सुलभ होतो. एकनामधारण ही क्रिया केव्हांतरी क्रमाक्रमानें होते. दोन समाजांचा संनिकर्ष झाला असतां दोहोंमध्येंहि रूपांतर होतें तथापि अशा प्रसंगीं कांहीं बाबतींत सारखेपणा वाढलेला असतांहि जर त्याजबरोबर इतर बाबतींत फरक वाढला असेल तर कोणताहि एक समाज वृद्धिंगत झाला असें म्हणतां येत नाहीं. असा एक नियम आहे कीं, दोन शेजारी समाजांमध्यें सादृश्य वाढून लग्नव्यवहार सुरू झाला म्हणजे सामान्यतः मोठा समाज लहान समाजावर आपली छाप टाकतो आणि त्याला आपल्यांत समाविष्ट करून घेतो. परंतु हाहि नियम सार्वत्रिक नाहीं. मोठा समाज आंत अतिशय तुकडे असल्यामुळें अन्यस्वीकारास असमर्थ असेल आणि लहान समाज आपलें सर्व संयुक्त बल एकत्र वापरण्यास समर्थ असेल व या रीतीनें तो एका मोठ्या समाजाच्या सन्निध राहूनहि आपलें मूलस्वरूप कायमच ठेवूं शकेल. असो. आतां कांहीं समाजस्वरूपांतरविषयक विचारांत आपण प्रवेश करूं.

**संस्कृतिवैशिष्ट्यरक्षण.**—जातिरूपी दुर्बल समाज—जगांत ज्या अनेक जाती आहेत त्यांपैकीं सर्वच आपली विशिष्ट संस्कृति रक्षिण्यास समर्थ नाहींत. उदाहरणार्थ, महाराष्ट्रांत आज अर्धनग्न दिसणाऱ्या कातकरी व ठाकूर या जाती घेऊं. यांस जर पुढें शिक्षण मिळून भोंवतालच्या समाजामध्यें त्या मिसळून गेल्या तर त्यांचें विशिष्टत्व फार तर कांहीं गाण्यांच्या रूपानें शिल्लक राहील. त्यांचे बहुतेक रिवाज जंगली असल्यामुळें नाहींसेच होतील. गुंजामय भूषणें, कवड्यांचे किंवा पोतीचे भरगच्च दागिने हे टिकावयाचे नाहींत. त्यांच्या गरजा व सर्व समाजाच्या गरजा जवळ जवळ सारख्याच होतील. संस्कृतीचा प्रसार होऊन जेव्हां जगांतील भिन्न भिन्न समाजांचा एकमेकांवर परिणाम होत असतो तेव्हां गळतें काय आणि टिकतें काय हें थोडेंसें पाहिलें पाहिजे. ज्या समाजांस स्वातंत्र्य आहे म्हणजे जे राज्यकर्ते आहेत, त्यांचा विशिष्टपणा अधिक टिकतो आणि त्यांच्याच रिवाजास सार्वत्रिकत्व येतें; आणि जे समाज स्वायत्त नाहींत म्हणजे राज्यकर्ते नाहींत, त्या समाजांच्या अनेक गोष्टी दिवसानुदिवस नाहींशा होत जातात आणि जर त्यांचें वैवाहिक पृथक्त्व टिकलें नाहीं तर दुसऱ्या मोठ्या समाजांमध्यें त्यांचा अंतर्भाव होतो. याप्रमाणें भिन्न समाजांचा एकरूप समाज बनविणारें एक प्रसिद्ध ठिकाण म्हणजे न्यूयॉर्क शहर होय. या शहरास परमेश्वराची मोठी मूस म्हटलें आहे. येथें निरनिराळ्या राष्ट्रांतून अनेक लोक येतात आणि त्यांनां अमेरिकन शिक्षण मिळून त्यांच्या पुढील पिढीचे आचार एकसारखे होऊन समाजांत एकरूपता येते. तेथें अनेक जाती एकमेकांमध्यें लग्नें करितात आणि त्यामुळें त्यांचें जातिवैशिष्ट्य वितळून जाऊन त्यांवर एकराष्ट्रीयत्व झळकूं लागतें. आतां आपण कोणतीं राष्ट्रें आपलें विशिष्टत्व रक्षिण्यास समर्थ होतात हें पाहूं. यूरोपामध्यें लोकांस एकराष्ट्रीय करण्यासाठीं जे शिक्षणविषयक प्रयत्न झाले त्यांत असें दिसून येईल कीं, एका राष्ट्राच्या प्रदेशावर दुसऱ्याचें राज्य स्थापन झालें असतांहि त्याजवर परसंस्कृतीचा लेप फारसा बसला नाहीं. मूळचा एकरूप समाज परकीय भाषेच्या दडपणाखालीं ठेविल्यास त्याची प्रगति कांहीं दिवस बंद होईल एवढेंच. तथापि कोणत्याहि ठिकाणीं सार्वत्रिक असलेली भाषा नष्ट करणें सुलभ नाहीं. पोलंडची भाषा दाबून टाकण्याचा प्रयत्न रशिया, ऑस्ट्रिया आणि जर्मनी यांनीं केला, तरीहि ती नष्ट झाली नाहीं. फिनलंडची तीच कथा आहे. युक्रेन भागांतील युक्रेन भाषा ही रशियन भाषेचीच पोटभाषा आहे असें सांगून ती दडपून टाकण्याचा प्रयत्न रशियानें केला तथापि त्या प्रयत्नांस कितपत यश आलें, हें रशियाच्या वाईट दिवसांत युक्रेनमधील लोकांनीं आपलें स्वतंत्र राष्ट्र स्थापिलें यावरून लक्षांत येईल. वेल्श भाषेचा देखील नायनाट करण्याच्या प्रयत्नास फारसें यश आलेलें नाहीं. जेव्हां स्वतंत्र भाषा असणाऱ्यांना स्वतंत्र प्रांत असतो तेव्हां परसत्तेखालीं जाऊन देखील त्यांचें समाजविशिष्टत्व कायम राहतें आणि त्यांचा समावेश करून घेऊन त्यांस पचनीं पाडण्यास इतर लोकांस जड जातें. त्या माणसांचा जेव्हां इतस्ततः संचार होत असेल तेव्हां मात्र तीं माणसें दुसऱ्या संस्कृतींस पचनीं पाडतां येतात. तथापि यासहि कांहीं थोडाबहुत अपवाद आहेच. यहुदी लोक आतां सर्वत्र पसरले आहेत. ज्या देशांत ते जातील तें राष्ट्र त्यांचें व तो समाज त्यांचा. तथापि इतकें असूनहि त्यांचें विशिष्टत्व अंशेंकरून कायमच राहिलें आहे; आणि याचें कारण यहुदी लोकांचें प्राचीन वाङ्मय होय. जेव्हां राष्ट्रस्वरूपी जाति आणि संप्रदाय यांचा संबंध येतो आणि जेव्हां भोंवतालचे संप्रदाय आपल्या समाजाची संख्या वाढविण्यासाठीं परसमाजांतून मनुष्यचौर्य करूं लागतात, तेव्हां स्वसमाजरक्षणार्थ पूर्वीच्या राष्ट्रस्वरूपी जातीसहि आपल्या समाजामध्यें इतरांचा अंतर्भाव करून घेणें प्राप्त होतें; आणि ते आपल्या जातीच्या संस्कृतीस आणि जातीस संप्रदायाचें स्वरूप देतात. यहुदी लोक आतां गोऱ्या लोकांनां आपल्या समाजांत घेऊं लागले आहेत याचें कारण हेंच आहे. हिंदुसमाजासारखें जें मोठें धूड आहे तें एकीकृत होऊन कांहीं संस्कृतिरक्षणाचें कार्य करूं लागेल असा संभव नाहीं. तथापि जें सर्व समाजास शक्य नाहीं तें समाजांतर्गत संप्रदायांनीं करण्यास प्रारंभ केला आहे. आर्यसमाज व ब्रह्मसमाज हे दोन्ही समाज परजनग्राहक आहेत. हिंदु मिशनरी सोसायटीचा प्रयत्नहि या प्रकारचाच आहे. जे समाज स्वतः राष्ट्रस्वरूपी असून ज्यांच्यांतील संस्कृतीमध्यें परमार्थसाधनेंहि अनेक आहेत आणि ज्यांचें स्वातंत्र्य गेलेलें नाहीं अशा समाजांमध्यें जर परकीय संप्रदाय येऊन मिशनरीपणा करूं लागले तर ते समाज आपली पैतृक संस्कृति कायम राखूं शकतात. अशा प्रसंगीं हे समाज आपल्यांतील उपासनांपेक्षां संस्कारविधि आणि कायदा यांसारख्या लौकिक गोष्टींसच प्रामुख्य देतात व यामुळें नवीन संप्रदाय आणि परंपरागत संस्कृति यांची तडजोड होते. या प्रकारचा उपक्रम जपाननें केला आहे. 'शेन ताउ' उर्फ 'शिंतो' यास आतां परमार्थसाधनपर आचारसमूह म्हणून धरीत नसून केवळ लौकिक व्यवहारासाठीं उत्पन्न झालेला नियमसंग्रह असें मानतात; आणि राज्याचे सर्व विधी शिंतोप्रमाणें चालवितात.

आज हिंदुसमाजामध्यें दोन तऱ्हेच्या निरनिराळ्या संघांचा समावेश होतो. ते दोन संघ म्हटले म्हणजे जाती आणि संप्रदाय हे होत. विशिष्ट नियमांनीं, विशिष्ट आचारांनीं व विशिष्ट उपास्यांनीं वेष्टिलेले असे हे दोन्ही संघ आज दृष्टीस पडतात. या दोहोंमध्यें भेद हा आहे कीं एकांत नियम आचार आणि उपास्यें हीं अप्रधान असून दुसऱ्यांत तीं प्रधान आहेत आणि त्यामुळें एकांत इतरांचा प्रवेश नाहीं आणि एकांत इतरांचा प्रवेश आहे. जातींपैकीं अनेक

जातींमध्यें शासनसंस्था नसल्यामुळें त्या प्रसारास अक्षम आणि असहाय झाल्या आहेत तथापि जर जातींमध्यें कांहीं फेरफार झाले तर जाती समाजास हानिकारक न होतां पोषकच बनतील आणि ते फेरफार म्हटले म्हणजे प्रत्येक जातींतच लग्न लावलें पाहिजे, या जातीच्या नियमासंबंधाचे होत. जातीबाहेर लग्न लावण्याचा प्रचात जरी पडला तरी जातीचें समुच्चयत्व नाहीसें होईल असें नाहीं. संघांची उपयुक्तता केव्हांहि भासणारच. जेव्हां मोठ्या कार्याकरितां अनेकांचें एकीकरण करावें लागतें तेव्हां तें समाजांत असलेल्या लहान लहान संघांमुळें सुलभ होतें. सर्व लोकांस वळविण्यापेक्षां प्रत्येक वर्गांतील निश्चित पुढारी वळविणें हें अधिक सोपें जातें. अमेरिकेमध्यें आपणास फ्रॅटर्निटीज उर्फ बंधुमंडळें दृष्टीस पडतात. या बंधुमंडळांस त्यांच्या विरुद्ध असलेले लोक हिंदुजातींचें सवंग अनुकरण म्हणून त्यांचा उपहासहि करितात. प्रत्येक बंधुमंडळामध्यें कांहीं माणसें असतात. जेव्हां बंधुमंडळांतर्गत संघीभूत लोकांस आपलें वर्चस्व इतरांवर स्थापावयाचें असतें तेव्हां हीं बंधुमंडळें सहज एकत्र होऊं शकतात. उदाहरणार्थ, अमेरिकेंतील कॉलेजामध्यें असलेल्या कोणत्याहि संस्थेमध्यें अधिकारी निवडावयाचे झाले म्हणजे निरनिराळीं बंधुमंडळें एकत्र होऊन प्रत्येकानें आपआपलीं कोणतीं माणसें पुढें आणावीं हें ठरविण्यांत येतें. अमक्या संघांतील मनुष्यास अध्यक्ष नेमावें, अमक्या अमक्यांतील अमुक अमुक माणसास उपाध्यक्ष नेमावें, अमक्या अमक्यांतील लोकांस चिटणीस निवडावें, अमक्या संघांतील अमुक मनुष्य खजिनदार करावा, असें त्यांचें आपआपसांतच ठरतें; आणि तें ठरलें म्हणजे निरनिराळ्या बंधुमंडळांतील सर्वच माणसांचीं मतें त्या योजनेस पडतात. असें झालें म्हणजे एखाद्या समूहांत पांचशें माणसें असलीं आणि त्यांतील दोनशें माणसें कोणत्या तरी बंधुमंडळांत असलीं म्हणजे बंधुमंडळांनीं आपआपसांत ठरविलेल्या अधिकाऱ्यास दोनशें मतें पडतील. आणि उरलेल्या तीनशेंचें एकीकरण तर तत्काल होणें शक्यच नाहीं. यामुळें बंधुमंडळांतील माणसें निरनिराळ्या संस्थांवर सत्ता चालवूं शकतात. एवंच निरनिराळ्या ज्ञातींचें पृथक् संघ असणें ही गोष्ट समाजास हितावह नाहीं असें नाहीं. अमेरिकन फ्रॅटर्निटिज आणि हिंदुस्थानांतील जाती यांमध्यें कांहीं भेद आहेत. तेथील बंधुमंडळांनां आपल्या समुदायांत हुशार माणसें घ्यावींत आणि संघसाहाय्यानें आपलें महत्त्व वाढवावें ही इच्छा असते. हिंदुस्थानातील जाती तसें करीत नाहींत. कां कीं जातींत समावेश करावयाचा आणि बंधुमंडळांत समावेश करावयाचा यांत आज पुष्कळच फरक आहे. दोहोंमध्यें सदृश अशी गोष्ट ही कीं, दोन्ही समाज कांहीं विशिष्ट पारमार्थिक मतें पसरविण्याचें अंगिकारीत नाहींत. तसेंच जातीमध्यें ज्याप्रमाणें जातीची देवता असते त्याप्रमाणें या बंधुमंडळामध्यें मौजेकरितां म्हणून तरी निदान कांहीं गुप्त विधी आणि संस्कार हे असतातच.

**संप्रदाय.**—जातींशिवाय जे समुच्चय हिंदुसमाजांत आहेत ते समुच्चय म्हटले म्हणजे संप्रदाय हे होत. संप्रदाय वर्धिष्णु असतात आणि हिंदुसमाजामध्यें ज्या कोणास आज प्रविष्ट व्हावयाचें असेल त्यास जातीचें सदस्यत्व मिळालें नाहीं तरी संप्रदायाचें सदस्यत्व मिळण्यास अडचण पडत नाहीं. आर्यसमाजी मंडळीनें हिंदूंखेरीज इतर लोकांस आपणांमध्यें बरेंच आणलें आहे असें दिसतें. १९०७ पासून १९१० पर्यंत आर्यसमाजांतर्गत रजपूतशुद्धिसभेनें १०५२ मुसुलमान रजपूत समाजप्रविष्ट करून घेतलें; आणि एका दिवसांत ३७० रजपूत मुसुलमान आत्मीकृत केले. कांहीं यूरोपीयांसहि आर्यसमाजानें आपल्या संप्रदायांत ओढिलें असें पंजाबच्या खानेसुमारीचा अधिकारी ब्लंट म्हणतो. ज्या प्रचारांनीं समाजसंवर्धन होत नाहीं, असे कांहीं हिंदूंच्या मताचे प्रचार होत आहेत त्यांतीलच विवेकानंदाची वेदान्त सोसायटी ही होय.

हिंदुसमाजाचा विस्तार मतांच्या आश्रयानें करावयाचा झाल्यास ब्रह्मसमाज, आर्यसमाज यांसारखे संप्रदाय उत्पन्न केल्याशिवाय आज गत्यंतर नाहीं. तथापि समाजांतील जो मुख्य प्रश्न कीं, बाह्यमनुष्यग्राहकता समाजामध्यें यावी, तो पूर्णपणें सुटणें आज शक्य नाहीं. शिवाय आज असा प्रश्न उपस्थित होतो कीं, जें आपणांस जगास द्यावयाचें आहे असें आपणांपाशींच काय आहे? जो मनुष्य आपल्यामध्यें प्रविष्ट होईल त्यास त्यापासून काय फायदा आहे? हिंदुत्व हा जर पारमार्थिक संप्रदाय नाहीं केवळ सामाजिक संप्रदाय आहे. तर सध्यांच्या आपल्या दुर्बल समाजांत येऊन कोणाचा काय फायदा? शिवाय जर सध्यां आपण आपल्या समाजांतर्गत असलेल्या वऱ्याचशा जातींस शूद्र म्हणून लेखितों, तर आपण बाहेरून आलेल्या मनुष्यास शूद्रापेक्षां उच्चस्थान कसें देणार व बाहेरच्या मनुष्यास जर शूद्राचें स्थान द्यावयाचें असेल तर बाहेरून येणारा मनुष्य तें पत्करील तरी कसें?

राष्ट्रस्वरूपी समाज आणि संप्रदाय या दोहोंची तुलना झाली. आतां या संप्रदायांचा राजकीय दृष्टीनें विचार केला पाहिजे.

राष्ट्रस्वरूपी जाती आणि संप्रदाय यांमध्यें संप्रदाय हे उत्तरकालीन होत. जेव्हां समाजाचें अस्तित्व अगोदरच हयात असलेल्या राष्ट्रानें रक्षिलें असेल तेव्हांच संप्रदाय आंत उत्पन्न होणार.

संप्रदाय हे नवीन देव निर्माण करून किंवा स्थापित करून उपासनेच्या नवीन पद्धति आणून, नवे विधी, नवे संस्कार, नव्या चालीरीती, नवीन भोजनप्रसंग आणि नवीन अनध्याय-

दिवस निर्माण करून, माणसांमाणसांमध्यें निराळेपणा उत्पन्न करून राष्ट्रांतर्गत जनतेचे तुकडे पाडितात. हें संप्रदायांचें खरूप अर्थात् समाजाच्या स्वास्थ्यास बरेंच घातुक होतें. एखाद्या राष्ट्रांतील सर्व लोक एकाच संप्रदायाचे सदस्य नसल्यास हे संप्रदाय त्या राष्ट्रांत विनाकारण भांडणें व मारामाऱ्या निर्माण करितात. एखाद्या राष्ट्रांतील सर्व माणसें एका संप्रदायाचीं सदस्य असलीं आणि तो संप्रदाय इतर शेजारच्या राष्ट्रांत जर आपल्या उपास्याचा किंवा मताचा प्रसार करूं लागला तर तो त्यांस घातुक होतो. कारण शेजारच्या राष्ट्रांतील वराचसा वर्ग संप्रदायांतर्गत राष्ट्राशीं सदृश होतो आणि इतर जनतेहून भिन्न होतो म्हणजे या शेजारच्या राष्ट्रांतील संप्रदायांतर्गत वर्गाची सहानुभूति परक्याकडे वळते आणि स्वजनांपासून विभक्त होते. मनुष्यमात्राच्या हिताच्या दृष्टीनें असें झालें पाहिजे कीं, संप्रदायांचा पगडा लोकांवर कमी व्हावा आणि हें संप्रदायविशिष्ट बंधुत्व अस्तित्वांतून जावें. समाजघटना जी करावयाची ती राजकीय किंवा स्थानविषयक तत्त्वांवर न घडवितां ईश्वराचें कोण कसें पूजन करितो यावर बनवावयाची ही पद्धति वेडगळ आहे आणि यासाठीं या संप्रदायाला समाजघटनेशीं फारसा खेळखंडोबा करण्यास अवधि नसावा. लोकांनीं संप्रदाय वाटल्यास उत्पन्न करावे किंवा वाटेल तितके दिवस चालवावे तथापि त्यांचें कार्यक्षेत्र उपासनेपुरतेंच असावें आणि त्यांस आपलें क्षेत्र सोडून बाहेर इतर गोष्टी करण्याची संधि मिळूं नये.

हिंदुस्थान हें निरनिराळ्या बाह्य संप्रदायांनीं अनुयायी मिळविण्यासाठीं उडी घेतलेलें रणक्षेत्र आहे. प्रत्येक संप्रदाय जितके अधिक अनुयायी मिळतील तितके पहात आहे, तथापि कोणत्याहि संप्रदायास आपला प्रसार फारसा करण्यास अवकाश नाहीं. निदान राष्ट्राचें एकत्व संप्रदायामार्फत स्थापणें शक्य नाहीं. त्या तऱ्हेचे जो कोणी प्रयत्न करील तो देशामध्यें अधिकाधिक द्वेषबुद्धि माजविण्यास मात्र कारण होईल.

संप्रदायविशिष्ट बंधुत्व उत्तेजित करणें हें केवळ हिंदुस्थानासच नुकसानीचें नाहीं तर तें सर्व जगासच नुकसानकारक आहे. सर्व जगाची अशी प्रवृत्ति दिसते कीं, ईश्वरविषयक मतांवरून समाजघटना बनवावी हें इष्ट नाहीं. आपली बंधुभावना विशिष्ट उपास्यानुसारी लोकांपुरतीच नसावी तर तिचें क्षेत्र अधिक विस्तृत असावें. या प्रवृत्तीमुळें संप्रदायांचा पराभव शेवटीं ठरलेलाच आहे. संप्रदायविशिष्ट भावना उत्पन्न करण्याकरितां ख्रिस्ती लोकांमध्यें जी शासनसंस्था उर्फ 'चर्च' आहे त्या शासनसंस्थेच्या उद्देशांत सुधारणा झाली पाहिजे, नाहीं तर या संप्रदायशासनसंस्थेचा जनतेकडून त्याग होईल. ज्या कर्मांचें व आचारांचें नियमन चर्चकडून होतें त्यांपैकीं बऱ्याच कमी गोष्टींचें नियमन पुढें चर्चकडून होईल. मनुष्याच्या अनेक व्यावहारिक गोष्टींवर जर उपासनांचे आचार्य तावा चालविण्याचा प्रयत्न करूं लागले तर त्यांचें कोणी ऐकणार नाहीं. कालांतरानें असें होईल कीं, संप्रदायाशिवाय इतर साधनांनीं जगामध्यें जी बौद्धिक आणि नैतिक परंपरा उत्पन्न होते ती वाढत जाऊन केवळ उपासनासंप्रदायामुळें जी परंपरा उत्पन्न झाली तिचें महत्त्व जगांत कमी होत जाईल. जर सुशिक्षित हिंदूंचें जगभर प्रयाण होईल तर संप्रदायसंस्थेचें महत्त्व अधिकाधिक कमी होईल. कां कीं, उपासनाविचार आणि जातिसमुच्चय यांचा अर्थाअर्थी संबंध नाहीं ही गोष्ट लोकांस अधिक पटेल, आणि उपासनामूलक शासनसंस्थांशिवाय नैतिक कल्पनांनीं मनुष्य वागूं शकतो हें त्यांस कळून येईल.

**उपासनासंप्रदाय आणि शासनसंस्था.**—या दोहोंचा निकट संबंध पश्चिम एशिया व यूरोप यांत आला, आणि त्यामुळें शासनसंस्था उर्फ राष्ट्रें शृंखलाबद्ध झालीं होतीं. हिंदु वाङ्मयाशीं जगाचा अधिक परिचय होईल तर जगास असें दिसून येईल कीं, जगामध्यें उत्तम नैतिक स्थिति रक्षिण्यास उपासनासंप्रदायांची विशेष अवश्यकता नाहीं. उपासनासंप्रदायांचें प्राचीन कालीं यूरोपमध्यें जें महत्त्व होतें त्याचें एक कारण असें आहे कीं शासनसंस्थांमार्फत आचारनियम निर्माण करून नीतितत्त्वांचा कायद्यांच्यामार्फत प्रसार करणें हें पूर्वकालीं फारसें नव्हतें आणि त्यामुळें समाजनियमनास उपासनासंघांतर्गत नियमांची आवश्यकता होती. तशी आवश्यकता आज नाहीं. आज कायद्यांच्या रूपानें व्यवहारतत्त्वें इतकीं वाढलीं आहेत कीं, आज कोणीहि आपल्या आचारनियमनासाठीं विशिष्ट उपासना शिकविणाऱ्या गुरूकडे धांव घेणार नाहीं. यूरोपांत दिवसानुदिवस उपासनासंघविषयक भावना कमी होत जाऊन राष्ट्रीयसंघविषयक भावना वृद्धिंगत होत जात आहेत आणि केवळ सामाजिक नीतितत्त्वांचा प्रचार अधिकाधिक होत जाऊन उपासनासंप्रदायाचें महत्त्व कमी कमी होत जात आहे. शासनसंस्थांवर त्यांचा जोर नाहींसाच झाला आहे. हा जोर नाहींसा होण्यास यूरोपांतील शासनसंस्थांच्या अभिमान्यांस सुमारें सात आठशें वर्षें खटपट करावी लागली.

त्या धडपडीचा सामान्य इतिहास येणेंप्रमाणें. सुमारें ख्रिस्ती शकाच्या अकराव्या शतकाच्या प्रारंभीं बहुतेक सर्व यूरोप ख्रिस्ती संप्रदायाचें सदस्य झाल्याचें दिसतें आणि यामुळें या संप्रदायाचे जे नियम होते ते सर्व यूरोपास सारखेच बंध होते. राजानें इतर सर्व मनुष्यांप्रमाणें संप्रदायनियमांचें उल्लंघन करतां कामा नये; आणि जर तो संप्रदायनियमांचें उल्लंघन करणार नाहीं तर सर्व प्रजेनें राजाचें आज्ञाधारण केलें पाहिजे असें होतें. यूरोपांतील प्रत्येक राजा किंवा संस्थानिक हा आपणास ख्रिस्ती म्हणवी आणि तो

आपल्या सर्व राजव्यवहारांत संप्रदायधर्म आणि संप्रदायशासनें अनुल्लंघनीय समजे. राजासहि म्हणजे संस्थानासहि जो शासन-समुच्चय अनुल्लंघनीय तो सर्व लोकांचा प्रथमधर्म होय. या प्रथम-धर्माचें स्पष्टीकरण चर्चकडून होई आणि राजासहि संप्रदाय-शासन ज्याप्रमाणें चर्च सांगेल त्याप्रमाणेंच मानावें लागे. परिणाम असा झाला कीं राजशासन हें संप्रदायाच्या शासनसंस्थेचें दुय्यम किंवा अनुवर्ति बनलें. या सर्व रचनेचा स्वाभाविक परिणाम असा झाला कीं सर्व पश्चिम यूरोप हें रोम येथील पीठाचें अंकित झालें. ही परिस्थिति जरी तत्कालीन कल्पनांचा स्वाभाविक परिणाम होती तरी सर्व लोकांस रुचण्यासारखी नव्हती आणि तिला फांदाडे फोडण्याची इच्छा ज्यांस हें अंकितत्व बोंचे त्यांस स्वाभाविक-पणें होत असे. राजांस स्वातंत्र्य हवें होतें आणि कांहीं अंशीं तें लोकांसहि हवें होतें. राजे आणि लोक यांनीं हें इष्ट स्वातंत्र्य ज्या पायऱ्यांनीं स्थापिलें त्या पायऱ्या येणें प्रमाणें. संप्रदायतत्त्वांचें महत्त्व मान्य करावयाचें आणि संप्रदायतत्त्वें आपल्या आयुष्यनियमनास उपयोगी पडण्यासाठीं अधिकारी संस्थेनें म्हणजे चर्चनेंच त्या संप्रदायतत्त्वांचा अर्थ लावला पाहिजे हेंहि तत्त्व मान्य करावयाचें; पण संप्रदायाचा मुख्य जो पोप त्याचा अधिकार मात्र मान्य करावयाचा नाहीं, ही पहिली पायरी. याच्या पुढील पायरी अशी कीं संप्रदायतत्त्वांचें महत्त्व मान्य करावयाचें, तथापि हीं संप्रदाय-तत्त्वें काय आहेत याविषयीं निर्णय करण्याचा अधिकार संघास नसून तो व्यक्तीस आहे असें प्रतिपादन करावयाचें. याच्याहि पुढची पायरी म्हटली म्हणजे राष्ट्रशासनामध्यें संप्रदायानुयायित्व मुळींच कबूल करावयाचें नाहीं; अर्थात् उपासना कोणी कोणती करावी आणि कोणते ग्रंथ कोणी कसे मानावे इत्यादि प्रश्न सोडविणें हें वाटेल त्या व्यक्तीनें वाटेल तसें करावें, याचा आणि राष्ट्रघटनेचा किंवा राष्ट्रशासनाचा कांहींएक संबंध नाहीं, हें तत्त्व स्थापावयाचें.

पाश्चात्त्य जगामध्यें शासनसंस्थांचें जें उपासनासंप्रदायां-पासून स्वातंत्र्य स्थापन झालें त्याचा इतिहास या वरील तीन पायऱ्यांमध्यें अंतर्भूत होतो. रोमविरुद्ध बंड करून ज्या वेळेस राष्ट्रें स्वतंत्र होऊं पहात होतीं त्या वेळेस अशी परिस्थिति होती कीं, संप्रदायांशिवाय नीतितत्त्वांचें पृथक्पणें अस्तित्वच नव्हतें. धर्मयुक्त आचरण जें करा-वयाचें तें केवळ धर्म म्हणून करावयाचें ही प्रवृत्ति त्यावेळेस यूरोपांत जागृत झाली नव्हती. धर्मतत्त्वांचें आचरण जें करावयाचें तें केवळ स्वर्गाकरितां अशी भावना होती. लोकांस स्वर्ग केवळ श्रेष्ठ नीतितत्त्वांच्या आचरणानें शक्य नसून ख्रिस्तानुयायी आचरणानेंच शक्य होता. अशा प्रसंगीं ख्रिस्ताचीं तत्त्वें काय आहेत हें सांगण्याचें काम कोणी तरी केलेंच पाहिजे, अर्थात् तें काम स्वाभाविकपणें ख्रिस्ती उपासनासंप्रदायाची शासनसंस्था जें चर्च त्या चर्चवर पडलें. ख्रिस्ती ग्रंथांचें स्वरूपच असें आहे कीं, त्यांत नीतितत्त्वें सरळपणें लिहिलीं नाहींत. त्या ग्रंथांमध्यें पौराणिक स्वरूपाचा इतिहास, म्हणी, दंतकथा, शुभवर्तमानें इत्यादि अनेक ग्रंथ आहेत. हे सर्व ग्रंथ परस्परांशीं सुसंगत असतील हें थोडेंच शक्य आहे. नुसतीं शुभवर्तमानें घेतलीं तरी त्यांत परस्परविरुद्ध गोष्टी पुष्कळच आहेत. ख्रिस्तासारख्या उपदेशकांच्या संबंधानें एक अशी गोष्ट दिसून येते कीं, ते कांहीं एका विशिष्ट सुसंगत विचारपद्धतीचे उत्पादक नव्हते तर कांहीं चांगल्या परंतु संकीर्ण अशा कल्पना त्यांनीं लोकांस उपदेशिल्या. या तऱ्हेचें अनेकस्वरूपी वाङ्मय लोकांच्या हातीं पडलें तर व्यवहारापयोगी नीतितत्त्वें प्रत्येक मनुष्य त्यांतून कसा काढील? अर्थात् तें काम संप्रदायावर पडलें आणि त्या बरोबर संप्रदायावर अशीहि एक जबाबदारी पडली कीं, ग्रंथांचें अशा तऱ्हेनें विवेचन केलें पाहिजे कीं, लोकांचा ग्रंथांवरील विश्वास ढळणार नाहीं. याप्रमाणें अनेक शतकें त्यावर विचार व विवेचन होऊन नीतिनियम निघाले आणि एक कॅथोलिक म्हणजे सार्वलौकिक विचारपरंपरा निर्माण झाली. या विचारपरंपरेचा बराचसा भाग उपयुक्त आहे. उदाहरणार्थ, एकपत्नीव्रत घ्या, हें ख्रिस्तानें उपदेशिलेलें नाहीं किंवा ख्रिस्तपूर्व परंपरेमध्यें निषेधिलें गेलें नाहीं. तथापि रोमन संप्रदायाच्या शास्त्रकांनीं हें तत्त्व स्थापित केलें आणि त्याच्या योगानें ख्रिस्ती आचरणास आणि आयुष्यास एक उच्च प्रकारचें ध्येय दिलें. पुढें जेव्हां ल्यूथर भटजींनां रोमन संप्रदायापासून लोकांस स्वतंत्र करावयाचें होतें तेव्हां एका संस्थानिकास खूष करण्यासाठीं एकाच काळीं दोन बायका करण्यास कांहीं धार्मिक अडचण नाहीं असा व्यवहारचतुर शास्त्रार्थ त्यांनीं सांगितला. त्याच ल्यूथरला आपल्याकडील प्रार्थनासमाजवाले वगैरे लोक मोठ्या नीति-तत्त्वाच्या रक्षणार्थ लढणारा समजतात हें पाहून कोणासहि मौज वाटेल.

आचारनियमनासाठीं तत्त्वें पहाण्याकरितां चर्चचें सांप्र-दायिक स्पष्टीकरण घेणें हें लोकांस अवश्य होतें आणि त्यामुळें त्याचें वर्चस्व बऱ्याच काळपर्यंत राहिलें. रोमन चर्चपासून फुटून निघालेले लोक व्यक्तिस्वातंत्र्याचे चाहते किंवा विचारस्वातंत्र्याचे संरक्षक होते अशांतला भाग नाहीं; ते स्वतःच्या मताचेच प्रवर्तक होते. नवीन पाखंड मतें उपस्थित करणारे लोक तर परंपरेस मानणाऱ्या लोकांपेक्षांहि अधिक असहिष्णु होते. त्यांस, म्हणजे चळवळ करणाऱ्या पुढाऱ्यांस, स्वतःस जरी वाटेल तें स्वातंत्र्य पाहिजे होतें तरी तें त्यांच्या मनांतून इतर लोकांस द्यावयाचें नव्हतें. म्हणून त्यांनीं फक्त संप्रदायाच्या अधिकारपीठावरच हल्ला केला. संप्रदायाचीं तत्त्वें झुगारून दिलीं नाहींत किंवा वैयक्तिक स्वातंत्र्यहि मान्य केलें नाहीं.

एकदां कालगतीनें पवित्र झालेली परंपरा सुटली म्हणजे जे नवीन संस्थापक उत्पन्न होतात त्यांच्या हातीं तरीं लोकविचारनियमनाचा अधिकार कितपत राहणार? थोडक्याच दिवसांत ग्रंथांचा अर्थ लावण्याचा अधिकार वैयक्तिक आहे हें तत्त्व पुढें आलेंच; तथापि संप्रदायग्रंथांचें महत्त्व मात्र अमान्य झालें नाहीं.

**हिंदुस्थानांतील संप्रदायदौर्बल्य.**–संप्रदायांचें महत्त्व यूरोपला जर इतकें जाणवलें आणि त्यानें राष्ट्रें चीं राष्ट्रें शृंखलाबद्ध झालीं तर त्या संस्थेचा परिणाम हिंदुस्थानांत फारसा कां झाला नाहीं हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. हिंदुस्थानांत दिसून येणारें संप्रदायसंस्थेचें अपयश पाहून त्याचें कारण काय असावें असा विचार करतां खालील गोष्टी दिसतात. लोकांमध्यें सादृश्य पुष्कळ उत्पन्न झाल्याशिवाय आणि प्रयोजन पडल्याशिवाय भिन्नजातिविवाह शक्य होत नाहीं. शिवाय प्रत्येक संप्रदायाची स्थिरता आणि शक्ति हीं फार नियमित असल्यामुळें एखाद्या गुरूच्या नादीं लागून आपल्या जातींत असलेलें स्थान तरी कोण गमावतो. आज जातिभेद मोडावा म्हणून उपदेश करणारे प्रार्थनासमाजांतील प्रमुख सारस्वत ब्राह्मण विवाह करतेवेळेस आपल्या जातींतीलच लहानशा मेदापलीकडे न जाण्याची धूर्तता दाखवितात. यावरून संप्रदायांचा चिरस्थायीपणा नसल्यामुळें कोणीहि धूर्त पुरुष ज्या गोष्टी व्यक्तीस तात्कालिक हानिकारक आहेत त्या संप्रदायाच्या तत्त्वासाठीं करण्याच्या भानगडींत पडत नाहींत; मात्र कांहीं बावळट किंवा दुर्बल माणसें पकडून त्यांस अशा हानिकारक गोष्टी उदाहरणार्थ अन्यजातिविवाह करण्यास प्रेरित करितात. जोंपर्यंत देशामध्यें निरक्षरता दाट आहे आणि उपदेश करणाऱ्यांचें महत्त्वहि संशयास्पद आहे, आणि जोंपर्यंत संप्रदायांतच दुर्बलपणा आहे तोंपर्यंत संप्रदायांच्या मार्फत जातिभेद मोडणें शक्य नाहीं. जातिभेद जो टिकला तो तत्त्वांनीं किंवा उपदेशांनीं टिकला नाहीं; तर आचारविषयक आणि शैक्षणिक विषमतेमुळें टिकला आहे. हिंदुस्थानांतील कोट्यवधि लोकांस सुसंस्कृत करणें राहोच त्यांस नुसतें लिहावयास वाचावयास आणि थोडा बहुत विचार करावयास आणि आपला फायदा समजून घ्यावयास शिकविणें हें कार्य देखील अत्यन्त कठिण आहे आणि तें झाल्याशिवाय जातिभेद नाहींसा व्हावयाचा नाहीं. फायदा दिसला म्हणजे लोक अनेक बंधनें तोडून बाहेर पडतात. विवाहविषयक अडचणी दिसूं लागल्या म्हणजे लोक भिन्नजातिविवाहासहि प्रवृत्त होतात. हें सिद्ध करण्यास भरपूर पुरावा आहे. कोणा व्यक्तीस अन्य जातींतील व्यक्तीशीं विवाह करण्याची उत्कट इच्छा असून नियम आडवे आले म्हणून सुधारक ओरडत होते असें मुळींच नव्हतें. ज्याप्रमाणें द्वैताद्वैतावर रणें माजवावयांची त्याचप्रमाणें जातिभेद असावा किंवा नसावा असा तात्त्विक वाद मात्र उत्पन्न झाला होता. परदेशगमनाबद्दल देखील असाच तात्त्विक वाद चालू असे. ज्या वेळेस दहा लाखांपेक्षां अधिक हिंदू लोक परदेशीं गेले होते त्या वेळेस देखील सामाजिक परिषदांमधून परदेशगमनास हरकत नसावी या तऱ्हेचे ठराव पास होतच होते! जाणारा वर्ग यांच्या ठरावाची फिकीर करीत नव्हता आणि ठराव करणारा वर्ग बाहेर देशीं जाण्याच्या कधीं पंचाइतींत पडत नव्हता. अवश्यकता जसजशी प्राप्त होत गेली तसतसे अन्य जातींत लग्न करणें बरेंच चालू झालें. हे सामाजिक सुधारणेचे तत्त्ववेत्ते चमकूं लागण्यापूर्वीं भिन्न जातींत प्रसंगोपात्त परस्परविवाह किती रूढ झाला होता याचा थोडासा अजमास येण्यासाठीं कांहीं उदाहरणें येथें देतों. (१) तंजावरकडे गेलेल्या देशस्थांत त्यांच्याबरोबर गेलेले कोंकणस्थहि मिसळून गेले आहेत हें सिद्ध करण्यास साधनें अनेक आहेत. त्यांच्यांत कोकणस्थांचीं आडनांवें अनेक सांपडतात. गोडबोले, राजवाडे, पाटणकर, सोहोनी, चितळे वगैरे आडनांवें तेथील देशस्थ म्हणविणारांत आहेत. (२) मध्यप्रांतांत दूर गेलेल्या कोकणस्थांनीं आपला देशस्थांतच समावेश करून घेतला आहे. उदाहरणार्थ, रायपूरचे बर्वे वकील घ्या. हे आपणांस देशस्थ म्हणवितात आणि त्यांचे लग्नव्यवहार कोकणस्थांशीं नसून देशस्थांशीं आहेत. (३) अनेक द्राविड ब्राह्मण, विशेषेंकरून स्मार्त ब्राह्मण हे महाराष्ट्रांत आल्यानंतर देशस्थांत मिसळून जातात. द्रविड आडनांव लावणारे अनेक ब्राह्मण आज पक्के महाराष्ट्रीय झाले आहेत ते आणि नागपूरचें कौशिककर घराणें हीं या विधानास उदाहरणें आहेत. (४) अनेक तैलंग ब्राह्मण आज पक्के महाराष्ट्रीय बनले आहेत, याचीं उदाहरणें वऱ्हाडनागपुरांत अनेक आहेत. वऱ्हाडचे विद्वान पुढारी माधवराव अणे हे मूळचे तैलंग होत. (५) कन्नड ब्राह्मण आणि देशस्थ ब्राह्मण यांचीं इतकीं लग्नें झालीं आहेत कीं त्यांचा हिशोबच करितां येत नाहीं. (६) नेपाळकडे गेलेले महाराष्ट्रीय ब्राह्मण पहाडिया जातीच्या ब्राह्मणांशीं लग्नें करून पहाडिया बनले आहेत. पण त्यांत महाराष्ट्रीय आडनांवें मात्र शिल्लक आहेत; आणि तीं त्यांचें महाराष्ट्रीयत्व लपूं देत नाहींत. (७) अनेक महाराष्ट्रीय घराणीं तैलंगणांत जाऊन तैलंग बनलीं असावींत असें दिसतें. त्याशिवाय पिंगळे, केतकर हीं आडनांवें त्यांच्यांत दिसलीं नसतीं. केतकर या नांवाचा स्वरूपभेद मात्र तेथें झालेला आहे तो केतवार असा आहे; आणि केतवार हें आडनांव ज्यापासून उत्पन्न होईल असें स्थान तैलंगणांत नाहीं. केतवारांचें गोत्र केतकरांप्रमाणेंच गार्ग्य आहे. तैलंग पिंगळे शिवाजीचे मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे हे आमच्याच घराण्यांतील होते असें म्हणतात. (८) अनंत हे मूळचे क्रमपाठ म्हणणारे ब्राह्मण देशावरून

कोंकणांत आले. ते कालांतरानें कोंकणस्थांत मिसळून जाऊन त्यांची जात आतां जवळ जवळ नाहींशीच झाली आहे. (९) द्राविड किंवा तैलंग ब्राह्मण कोंकणस्थांत समाविष्ट झाल्याचीं उदाहरणें फारशीं नाहींत; कां कीं, कोंकण फार दूर पडलें आणि कोंकणांतील आर्थिक परिस्थिति अशी नाहीं कीं जी इतर लोकांस तिकडे ओढील. तथापि कांहींतरी लोक येऊन समाविष्ट झाल्याचा संशय आहे. गुहागरचे खरे हे मूळचे द्राविड होते असा थोडाबहुत एका वर्गाच्या दृष्टीनें लोकापवाद त्यांच्याविषयीं आहे. तथापि सामान्य दृष्टीनें त्यांचें घराणें आज तर अस्सल कोंकणस्थांत मोडतें. (१०) पळशे हे पाठारे प्रभूंचे उपाध्याय असून हे आज देशावरील शुक्लयजुर्वेदी ब्राह्मणांशीं विवाहसंबंध करतांना आढळतात. तथापि हे महाराष्ट्रीय नसून गुजराथेकडून आले असावे हें सिद्ध करणारा पुरावा आहे. आज पळशे आणि पाठारे प्रभु यांमध्यें थोडासा मतभेद आहे. पाठारे प्रभूंची जात गुजराथेकडून आली असें कबूल करण्यास पाठारे प्रभूंस बिलकुल दिक्कत वाटत नाहीं. तथापि त्यांच्या उपाध्यायांची पाठारे प्रभू व पळशे हे गुजराथेकडून आले हें कबूल करण्यास थोडीबहुत नाखुषी दिसते. महाराष्ट्रीय ब्राह्मण इतरांत कसे समाविष्ट होतात आणि इतर ब्राह्मण महाराष्ट्रीयांत कसे समाविष्ट होतात हें दाखविण्यास वर दाखविलेलीं उदाहरणें पुरीं आहेत. देशस्थ व कऱ्हाडे, कोंकणस्थ व देशस्थ आणि कोंकणस्थ व कऱ्हाडे यांचे परस्परविवाह तर हिशोबांतच घेतां येत नाहींत. रामेश्वर येथें तर कोंकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे, द्राविड, तैलंग यांचीं मिश्रणें अनेक कुळांत आहेत आणि बाप ज्या जातीचा असेल ती जात आपली असें मुलगा समजतो. कोंकणस्थांनीं देशस्थ ऋग्वेदी किंवा देशस्थ आपस्तंबाशिवाय चरक शाखेशीं लग्न केल्याचेंहि नागपुरास उदाहरण आहे; आणि मैत्रायणीय शाखा आणि कऱ्हाडे यांच्यामध्यें झालेलीं दोन लग्नें आढळतात. मिश्र विवाहाकडे कऱ्हाडे ब्राह्मणांची प्रवृत्ति फार पूर्वीपासून दिसते आणि महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्याच इतर जातींत लग्न करण्यांत आपण कांहीं सुधारकपणा करीत आहों असें त्यांस वाटतहि नाहीं. तैलंग ब्राह्मण कऱ्हाड्याकडे जेवीत नाहींत याचें कारण जो बाळाजी बाजीरावांच्या कारकीर्दीमध्यें आपल्या तैलंग जांवयास त्यांनीं विषप्रयोग केला असा त्यांच्यावर आरोप आहे तो खरा असो अगर नसो तथापि कऱ्हाडे आणि तैलंग यांमध्यें लग्न करण्यास हरकत नाहीं असें जुन्या काळींहि वाटत होतें हें खास.

ब्राह्मणेतरांत देखील मिश्र जातिविवाहाचीं पूर्वापार उदाहरणें अनेक आहेत. राजे लोक दुसऱ्या राजाची जात कोणती हा प्रश्न पुढें आणीत नसून वर्ण कोणता हाच प्रश्न पुढें आणीत आणि गोंड आणि रजपूत यांचीं देखील लग्नें झाल्याचीं उदाहरणें थोडींथोडकीं नाहींत. पूर्वबंगालमध्यें कायस्थ आणि वैद्य या दोन जातींचीं एकमेकांशीं लग्नें आज शंभर वर्षें होत आहेत पण पश्चिमबंगालांत तो परिपाठ नाहीं. बंगाल्यांतील ब्राह्मणांचीं आणि कायस्थांचीं कुळें सुधारण्याकरितां प्रत्येक जातीचीं पांच पांच घराणीं बाहेरूनच आणलीं होतीं; आणि त्यांचा परिणाम कायस्थांवर असा झाला कीं, पश्चिमेकडील कायस्थ आपली उच्चता वाढविण्यासाठीं वैद्यांशीं संबंध जुळवून आणण्याची अपेक्षा न करितां कायस्थ पंचककुलाशीं लग्नव्यवहार करूं लागले आणि त्यामुळें पूर्वबंगालमध्यें झालेली सुरवात पश्चिमबंगालमध्यें पसरली नाहीं असें कित्येक म्हणतात. आपल्याकडील मराठे म्हणविणारी जात कशी बनली ही गोष्ट देखील विचार करण्यासारखी आहे. हा विचार केला असतां जातिभेद मोडण्यास कोणकोणत्या गोष्टी कारण होतात तें दृष्टीस पडतें. कुणबी व मराठे या आज दोन जाती नसून दोन निराळे वर्ग आहेत आणि मराठा हा वर्ग उत्तरेकडून आलेलीं रजपूत कुळें, देशांतीलच यदुकुळें आणि नागकुळें मिळून झाला असावा असें दिसतें. दोन कुणबी जाती उदाहरणार्थ तिळोरे किंवा तिळोरी कुणबी, आणि बावणे कुणबी हे त्याच नांवांनीं एकमेकांशीं लग्नें लावीत नाहींत पण मराठा हें नांव धारण करून दोघेहि एकमेकांशीं लग्न लावितात. अभिमानार्ह जें नांव असेल त्या नांवांतच आपला समावेश करून घेण्याची इच्छा स्वाभाविक असते आणि त्यामुळें आपलें जुनें नांव टाकून देऊन जें नांव सर्वसामान्य असेल तें नांव धारण करण्याची प्रवृत्ति दिसते. खानेसुमारीचे आंकडे पाहिले असतां आपणांस असें दिसून येईल कीं, मराठे या नांवाची लोकप्रियता कुणब्यांमध्यें अधिकाधिक वाढत आहे. मुंबई इलाख्यांत १८९१ आणि १९११ याच्या दरम्यान कुणब्यांची संख्या शेंकडा ४१ नीं कमी झाली आणि मराठ्यांची संख्या शेंकडा ५४ नीं वाढली. मध्यप्रांताकडे पाहिलें असतां त्याच वीस वर्षांत कुणब्यांची संख्या शेंकडा ३ नीं कमी झाली आणि मराठ्यांची संख्या शेंकडा ८१ नीं वाढली. यावरून असें दिसतें कीं, वऱ्हाडांत आणि मध्यप्रांतांत मराठे या नांवापेक्षां कुणबी या नांवाचाच प्रचार जास्त आहे, तथापि कुणबी हें नांव सोडून मराठे हें उपपद धारण करणारे लोक मुंबई इलाख्यापेक्षां वऱ्हाड मध्यप्रांतांत जास्त झपाट्यानें वाढत आहेत. कुणबी व मराठे यांचे आंकडे एकत्र केले तर त्या वीस वर्षांत मुंबई इलाख्यांत या जातीची वृद्धि शेंकडा एक या प्रमाणानें झाली आणि वऱ्हाड मध्यप्रांतांत मुळींच झाली नाहीं. असो. महत्त्वाची गोष्ट ही आहे कीं, समाजापुढें विशिष्ट कार्य असलें आणि तें पार पाडण्याच्या बुद्धीनें समाज प्रेरित झाला व त्या समाजामध्यें अनेक लोकांस एकत्र ओढणारें स्थान उत्पन्न झालें म्हणजे त्या समाजास आपलें कार्य पुढें हांकण्यास अनेक अंतर्गत फेरफार करावे लागतात. लोकांस एके ठिकाणीं ओढील आणि कार्यप्रवृत्त करील असें तत्त्व पुढें आलें म्हणजे लोक एकत्र होतात आणि प्रसंगीं नवीन समाजहि उत्पन्न होतात. यूरोपला उपासनासंप्रदायानें सर्व

कांहीं दिलें असें म्हणतां येईल. हिंदुस्थानांत संप्रदायांच्या बाहेरच ज्ञान व विचार इतकीं वाढलीं कीं, संप्रदाय म्हणजे अल्पज्ञ शूद्रांच्या टोळ्या असें पंडितवर्गास वाटे; आणि त्यामुळें त्यांचें वजन समाजावर कधींच पडलें नाहीं.

**जातींचा व्यक्तींवर ताबा.**—संप्रदायसंस्थेमार्फत जातिभेद मोडणें म्हणजे काय, तर मनुष्याला आपल्या जातिसमुच्चयांतून ओढून संप्रदायरूपी जातीस जोडावयाचें. नुसती जातिभेद नसावा म्हणून होणारी ओरड निष्फळ होते. हिंदुस्थानाचें समाजस्वरूप समुच्चयसंहतीचें आहे. व्यक्तिसंहतीचें नव्हे हें मागें सांगितलेंच आहे. समुच्चयसंहतीची व्यक्तिसंहति बनवावयाची म्हणजे त्याबरोबर कोणकोणत्या क्रिया होणार हें पाहूं. प्रत्येक व्यक्ति आपल्या समुच्चयाच्या तावडींतून सोडवावयाची आणि सर्व समाजाला एक केंद्र उत्पन्न करून त्यास त्या व्यक्ती जोडावयाच्या हा जो एवढा खटाटोप व्हावयाचा हा केवळ समाजाचें मत जातिभेद नसावा असें झाल्यानें होत नाहीं. प्रत्येक व्यक्तीस आकर्षण करणारा असा बलवान केंद्र उत्पन्न झाला पाहिजे तर त्या केंद्राकर्षणामुळें व्यक्तींचें आणि पूर्वगत समुच्चयांचें आकर्षण दृढ होत जाईल. वीस कोटी प्रजेस आपल्याकडे ओढून तें बंधन बलवान करणारा आणि पुढें त्या बंधनाविषयींच्या भक्तीमुळें जुन्या बंधनास दुर्बल करणारा असा केन्द्र उत्पन्न होणें फारच कठिण आहे. असा केंद्र आपल्या समाजांत अजून उत्पन्न झालेला नाहीं. ख्रिस्ती व मुसुलमान लोकांनीं मात्र निरनिराळ्या जातींतील माणसें आपणांकडे ओढलीं आहेत.

ख्रिस्ती व मुसुलमान जगांत जातिभेद नाहीं असें आपण समजतों पण ती गोष्ट सर्वांशीं खरी नाहीं. बहुतेक मनुष्यांचीं लग्नें स्थानिकच होतात आणि फारच थोड्यांचीं आपल्या समुच्चयाच्या बाहेर होतात. उच्चनीचतेचा प्रश्न समाजांतील तत्त्ववेत्त्याच्या मनांत नसला तरी आपल्या समूहाच्या बाहेर लग्न करणें हें फारच थोड्या प्रमाणांत शक्य असतें. बेदुइन बायका पैशाकरितां दुसऱ्या जातीच्या मनुष्यावरोबर तात्पुरता व्यभिचार करतील तथापि दुसऱ्या जातीच्या मनुष्यावरोबर त्या लग्न करणार नाहींत. याप्रकारचीं अनेक उदाहरणें वेस्टरमार्क यानें विवाहसंस्थेच्या इतिहासांत (History of Human Marriage) दिलीं आहेत. हार्वर्डचा प्रो. रिप्ले यानें 'यूरोपांतील जाती' या ग्रंथांत असें दाखविलें आहे कीं मोठमोठ्या राज्यक्रान्त्या होवोत, मोठमोठे सामाजिक फेरफार होवोत, पण यूरोपांतील बहुतेक लोक आपआपल्या जागेला चिकटून राहिले आहेत. त्यांचीं लग्नेंहि स्थानिक होतात आणि भूभागावर जातींची प्रादेशिक व्याप्ति जशी अनेक शतकांपूर्वीं होती तशीच जवळ जवळ आजहि टिकली आहे. हिंदुस्थानामध्यें सध्यांच्या चार पांच हजार जातींपैकीं बऱ्याचशा जाती राष्ट्रस्वरूपाच्या आहेत आणि कांहीं जीवनव्यवसायाच्या वैशिष्ट्यामुळें उत्पन्न झाल्या आहेत. जीवनव्यवसाच्या वैशिष्ट्यामुळें जे संघ अगर श्रेणी उत्पन्न झाल्या त्यांचा ताबा सभासदावर दिवसानुदिवस अधिक वाढत गेला आणि त्यांस जातीचें स्वरूप प्राप्त झालें असें दिसतें. जेव्हां रोमन साम्राज्य दुर्बल होत गेलें तेव्हां त्याबरोबर अर्थिक अडचणीहि नवीन नवीन उत्पन्न होत गेल्या आणि त्यावेळेस व्यवसायविशिष्ट ज्या श्रेणी होत्या त्या श्रेणींनीं आपल्याच हातीं धंदा राखण्यासाठीं श्रेणीमध्यें इतरांचा प्रवेश होऊं देण्यास अडचणी फार ठेवल्या होत्या आणि प्रत्येकानें लग्नहि आपल्या श्रेणीच्या मनुष्याशींच केलें पाहिजे असा नियम केला होता. त्यामुळें इटलीमध्यें व्यवसायविशिष्ट जाती हिंदुसमाजासारख्याच पडत होत्या. याचें वर्णन प्रो. डिल यानें आपल्या ग्रंथांत केलें आहे.

**जातिभेदनाशार्थ झालेल्या प्रयत्नाची अव्यापकता.**—जातिभेदाच्या बलाचें पृथक्करण झालें पाहिजे. तें केल्यानें आपण प्रयत्न काय केला पाहिजे याचीहि कल्पना येईल. जातींचें बल समुच्चयावर अनेक प्रकारें अवलंबून असतें. एक तर प्रत्येक मनुष्यास लग्न करण्याची अवश्यकता असल्यामुळें आणि जातीच्या बाहेर फारच थोड्या व्यक्ती असल्यामुळें जातींचें व्यक्तींवर वर्चस्व मूळचेंच फार आहे. याशिवाय व्यक्तींची काळजी घ्यावयाची हें कर्तव्य राष्ट्रानें म्हणजे सरकारनें फारच नियमितपणानें अंगिकारलें आहे. समाजांतील व्यंगें किंवा दुःखें यांचें निवारण करण्यासाठीं सरकारी दानसंस्था नाहींत, एवढेंच नव्हे तर देश्य दानसंस्थांची काळजी देखील सरकार नीट घेत नाहीं. समाजांतील पुढारी म्हणविणारा वर्ग फारच थोडा आहे. हिंदुसमाजांतील दानसंस्थांचा हिशोबहि घेतला गेला नाहीं. त्यामुळें त्या बऱ्याचशा बेजबाबदार आणि गैरशिस्त आणि निष्काळजीपणानें काम करणाऱ्या झाल्या आहेत. सुशिक्षित वर्ग देवळांपासून आणि त्यामुळें दानसंस्थांपासून अलिप्तच आहे. अडचणीच्या प्रसंगीं प्रत्येकास आपल्या जातीकडेच जावें लागतें आणि अडचणी दूर करण्याचें काम दुसऱ्या कोणींच हातीं घेतलेलें नाहीं. कांहीं विमाकंपन्या आपल्या देशांत आहेत आणि बऱ्याचशा परकीय कंपन्या येथें येऊन धंदा करीत आहेत त्यांच्यामुळें विधवांचें किंवा निराश्रित अर्भकांचें हित पहाण्याचें काम जातींच्या पुढाऱ्यांकडून जर बजावलें गेलें नाहीं तर अनन्यगतिक लोकांस थोडीबहुत सोय आहे; परंतु ज्या गोष्टी जात करूं शकेल पण विमाकंपन्या करूं शकणार नाहींत, अशा गोष्टी बऱ्याच आहेत. अंत्यसंस्कार वगैरे बाबतींत जर जातीची मदत झाली नाहीं तर दुसऱ्या कोणत्याच सार्वजनिक संस्थेवर आज तें काम विश्वासतां येत नाहीं. सामाजिक सुधारणेचा प्रसार करण्याचें काम जे लोक अंगावर घेतात त्यांमध्यें सर्व हिंदुस्थानाचा हिशोब

घेतांहि निश्चयाचीं व करारी माणसें आज मुळींच नाहींत. ज्यास आपला म्हणविला त्यास शेवटपर्यंत नेट धरून मदत करावयाची हा करारीपणा कोणामध्यें आहे? सुधारणेचीं तत्त्वें आपण बोलावयाचीं, तीं तत्त्वें दुसऱ्या कोणावर तरी लादून त्याला फशीं पाडावयाचें, आणि आपण मोकळेंच रहावयाचें अशा प्रकारच्या मंडळींनींच जातिभेदाविरुद्ध ओरड करणारा वर्ग भरलेला आहे. या परिस्थितीमध्यें जातीचा आश्रय सोडून व्याख्यान देणाऱ्या सुधारकाचे अनुवर्ती होतील असे लोक फारच थोडे सांपडणार.

व्यक्तींनीं आपल्या जातीचीं बंधनें टाकून दुसऱ्या कोणत्या तरी संस्थेशीं किंवा संस्थांतर्गत आचार्य बनूं पाहणाऱ्या व्यक्तीशीं संबंध स्थापित करणें अशक्य होण्यास जीं अनेक व्यावहारिक कारणें आहेत त्यांपैकीं कांहींची कल्पना वरील विवेचनावरून येईल. शिवाय लोकांच्या मनांतील किंतु नाहींसा करण्यासाठीं आणि सर्वजनसमाजावर परिणाम करण्यासाठीं आपल्या सामाजिक संस्थांचा जो सत्यनिर्णायक आणि ऐतिहासिक अभ्यास व्हावा लागतो तोहि झालेला नाहीं. नवीन सुधारणा प्रवृत्त करूं पाहणाऱ्यांमध्यें संस्कृत पांडित्य आणि ऐतिहासिक पद्धति आणि त्यांबरोबर अवश्य होणारें देशी भाषेंत ग्रंथलेखन यांचा तर पूर्ण अभावच दिसून येतो.

शिक्षणसंस्थांकडे पाहिलें तर आज फारच थोड्या वर्गाचें शिक्षण सरकारच्या हातीं आहे. बहुतेक सर्व धंद्यांचें शिक्षण, व्यवहारोपयोगी शेतकीचें शिक्षण, हें सर्व जुन्या परंपरेच्याच हातीं आहे. त्यामुळें जातींचा व्यक्तींवर पगडा सहजच विशेष राहणार आहे. फक्त कारकुनी करणें आणि वरिष्ठ धंदे करणें हें मात्र सरकारच्या अथवा अर्वाचीन सुशिक्षितांनीं चालविलेल्या संस्थांच्या हातीं आहे.

अमेरिकेसारखा समाज आणि हिंदुस्थानासारखा समाज यांची तुलना केली असतां अनेक भेदसूचक गोष्टी नजरेस येतात. जगांतील स्पर्धेंत परकीयांस साहाय्यक आणि हिंदूंस असाहाय्यक अशा ज्या गोष्टी आहेत त्यांतील प्रमुख व सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे शिक्षणमूलक फरक ही होय. हिंदुस्थानांतील शेंकडा पंचाण्णव व्यक्ती लिहिण्यावाचण्यास असमर्थ असल्यामुळें समाजांतील सुशिक्षित व विचार करणाऱ्या उच्च जनतेचा आणि इतर जनतेचा संबंध हिंदुस्थानांत फारच थोडा आहे. याशिवाय दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे ज्याप्रमाणें प्राचीन कालीं शास्त्रीपंडितांचा वर्ग व्यवहाराशीं अनभिज्ञ असे, त्याप्रमाणें आजचाहि सुशिक्षितांचा वर्ग आहे. उलटपक्षीं अमेरिकेंत सर्व व्यवहारांत सुशिक्षित वर्ग आहे आणि तेथील एकंदर सुशिक्षित वर्ग त्यामुळें व्यवहारज्ञ आहे.

या दोन भेदांशिवाय आपणांस अहितकारक असे भेद इतके आहेत कीं, त्यांचें वर्णन करावयाचें म्हणजे एक मोठा ग्रंथच होईल. तथापि या दोहोंचें निदर्शन करण्याचें कारण एवढेंच कीं, यांचे परिणाम फार दूरवर पोंचतात; आणि त्यामुळें जगांतील स्पर्धेंत आपला समाज फारच दुर्बल ठरतो. बहुतेक जनसमाजाला जगांतील स्पर्धेची कल्पनाच नाहीं आणि व्यवहारानभिज्ञ सुशिक्षित वर्गाला देखील ती फारच थोडी आहे.

या तऱ्हेनें सुशिक्षित वर्गाची चळवळ बांधली गेली असल्यामुळें त्यास सर्व लोकांमध्यें एक कल्पना प्रसृत करण्यास आणि लोकांच्यामध्यें स्वसमाजसंवर्धनाविषयीं भक्ति उत्पन्न करण्यास सामर्थ्य नाहीं, व त्यामुळें संप्रदायसंस्था आपले विचार बऱ्याच लोकांत प्रसृत करण्यास देखील बरीचशी असमर्थ ठरते. असो. आतां समाजवृद्धिसंकोचविषयक आणखी कांहीं नियम सांपडतात कीं काय तें पाहूं.

**जातींची घटना आणि विघटना.**—नवीन जातींच्या घटनेसंबंधानें आणि जुन्या जातींच्या विघटनेसंबंधानें सर्वसामान्य तत्त्वें येणेंप्रमाणें सांगतां येतील.

(१) जेव्हां वर्ग, जाती, आणि राष्ट्रें आपली प्रसरणशक्ति घालवितात तेव्हां त्या संकुचित होऊन त्यांच्या निराळ्या जाती बनतात.

(२) आपली जात किंवा वर्ग वाढवावा या तऱ्हेची भावना जातीमध्यें किंवा राष्ट्रामध्यें किंवा वर्गामध्यें कधीं कमी कधीं जास्त अशी असते आणि तद्विषयक त्यांची वृत्ति वारंवार बदलते; आणि परक्यांचा समावेश आपल्या जातींत करावा किंवा करूं नये हें त्या जातीच्या तात्कालिक वृद्धिपर किंवा संकोचपर भावनांवर अवलंबून असतें.

(३) ज्या अर्थी अनेक जातींचें अगोदरचें स्वरूप वर्ग किंवा राष्ट्र यांच्या स्वरूपाचें म्हणजे पुष्कळसें बंधनरहित असतें त्या अर्थी जाती कशा बनतात हें स्पष्ट करण्यासाठीं वर्ग कसे बनतात किंवा राष्ट्रें कशीं बनतात हें स्पष्ट केलें पाहिजे.

(४) जाती आणि इतर राष्ट्रवर्गादि भिन्न समूह यांच्यामधील भेद हा जितका तीव्र आहे असें समजलें जातें तितका नाहीं. समूहाचें संवर्धन किंवा संकोच हा समूहांतील वारंवार बदलणाऱ्या लोकवृत्तीवर अवलंबून असतो आणि यासाठीं विशिष्ट समूह जात आहे किंवा वर्ग आहे याविषयींचें विधान विशेष काळजीपूर्वक केलें पाहिजे आणि जें विधान आज बरोबर असेल तें शंभर वर्षांपूर्वी बरोबर असेलच असें नाहीं, हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे.

(५) समूहाची वृद्धि जी होते ती सामुच्चयिक प्रयत्नानें झाल्याचें दिसत नाहीं. ज्या जातींत पंचायत किंवा कोणतीच शासनसंस्था नाहीं त्या जातींत सामुच्चयिक प्रयत्नाचा संभव नाहीं. तथापि ज्या जातीमध्यें पंचायती वगैरे आहेत त्या जातींत देखील वृद्धि होते ती सामुच्चयिक प्रयत्नानें झाल्याचें

दिसत नाहीं. नेहमीं असें दिसतें कीं एखाद्या समाजांत कांहीं बलवान व्यक्ती उत्पन्न होऊन त्या आपलें कार्यकर्तृत्व दाखवितात आणि आपल्या चळवळीनें समाजाची वृद्धि करितात आणि या त्यांच्या प्रयत्नानें जातीच्या स्वरूपांत फेरफार होतो.

(६) बहुतकरून असा नियम समजावा कीं जे बलवान संघ आहेत त्यांची प्रवृत्ति प्रसारशील असते आणि जे दुर्बल समूह आहेत ते संकोचनप्रवृत्तीचे असतात.

(७) बऱ्याचशा जातींचा इतिहास लक्षांत आणतां आपणांस असें दिसून येईल कीं, आपल्या जातीमध्यें जातींतच उत्पन्न झालेल्याखेरीज इतर कोणाचा प्रवेश होऊं द्यावयाचा नाहीं किंवा मिश्रविवाहापासून उत्पन्न झालेल्या संततीचा स्वीकार करावयाचा नाहीं हें तत्त्व ज्या जातींचा इतिहास आपणांस ठाऊक आहे त्यांपैकीं कोणीहि पूर्णपणें पाळिलें नाहीं. कोणत्या जातींतील माणसांचा प्रवेश आपल्या जातींत होऊं द्यावयाचा या संबंधाची निवड करून परकीय रक्त बहुतेक सर्व जातींत कमी अधिक प्रमाणानें घेतलें गेलें आहे. हें विधान महाराष्ट्रांतील कोंकणस्थ, देशस्थ व कऱ्हाडे ब्राह्मण, मराठे, माळी, सोनार, महार आणि महाराष्ट्रांतील गौड ब्राह्मण या सर्वांसंबंधानें करितां येईल. मराठे आणि धनगर यांनीं तर मुसुलमान दासीपासून झालेली प्रजा देखील आपणांत समाविष्ट करून घेतली आहे.

(८) जेव्हां एखादी नवीन जात वर्ग या रूपानें किंवा राष्ट्र या रूपानें तयार होऊं लागते त्या वेळेस असें होऊं लागतें कीं, ती जात निरनिराळ्या जातींचीं कुलें, वर्ग किंवा पोटजाती आपणांत समाविष्ट करून घेते. अशा वेळेस सामाजिक घटनेचें एखादें निराळें तत्त्वहि उदयास येतें. ही गोष्ट मराठ्यांसारख्या जातीवरून सिद्ध होईल.

(९) जेव्हां सामाजिक घटनेचीं नवीन तत्त्वें उद्भूत होतात तेव्हां जुनीं तत्त्वें कमी महत्त्वाचीं होतात आणि जुन्या जाती नाहींशा होऊन नव्या जाती निर्माण होतात. ब्राह्मण जातींचें पृथक्त्व महाराष्ट्रांत वेदशाखामूलक आहे, परंतु तैलंग, द्राविड इत्यादि देशांत तें मतमूलक आहे.

(१०) जेव्हां जुने समुच्चय जाऊन नवीन समुच्चय बनतात त्या वेळेस त्या नवीन होणाऱ्या समुच्चयांत निरनिराळ्या जातींचे लोक आले असतां ते त्या नवीन समुच्चयाच्या पोटजाती बनतात. त्या जातींमध्यें किंवा समुच्चयांमध्यें जेव्हां एकीकरणाचा प्रयत्न होतो तेव्हां आपसांतील पोटभेद काढून टाकण्याकडे प्रवृत्ति होऊन त्या जातींस अधिकाधिक एकरूपता येते. महाराष्ट्रांतील निरनिराळ्या जातींमध्यें ज्या पोटजाती आहेत त्यांपैकीं पुष्कळांचीं नांवें एकच आहेत, उदाहरणार्थ सोनारांत किंवा माळ्यांमध्यें ज्या पोटजातींचीं नांवें म्हणून सांपडतील तींच नांवें दुसऱ्या कांहीं जातींत सांपडतील. या तऱ्हेच्या गोष्टी उपर्युक्त तत्त्वाची सिद्धता करितात.

वरील विवेचनावरून असें दिसेल कीं, जातिभेद नष्ट न होण्यास कारणें लौकिक आहेत, आणि तो मोडण्यास जे प्रयत्न झाले पाहिजेत त्यांचा शतांशहि समाजाकडून झाला नाहीं. समाजाचें एकीकरण करण्यास ज्या गोष्टी उत्पन्न झाल्या पाहिजेत, त्यांपैकीं समाजास हेतु उत्पन्न झाला पाहिजे व समाजास केंद्र उत्पन्न झाला पाहिजे या मुख्य होत. आजपर्यंत सर्व समाजास एकत्र बांधूं इच्छिणाऱ्या चळवळी पारमार्थिक स्वरूपाच्या असल्यामुळें त्यांचा केवळ एक विशिष्ट संप्रदायाच्या स्थापनेपुरता परिणाम झाला.

सर्व लोकांत सामान्य तऱ्हेनें उच्च प्रकारची वृत्ति व आचार उत्पन्न करण्यास विशेष व्यक्तींचा पारमार्थिक उपदेश हें यंत्र अपुरें आहे, सर्व लोकांस साधें शिक्षण देण्याची खटपट ज्या वेळीं होऊन तींत यश येईल तेव्हां जनतेच्या अज्ञानापासून सुशिक्षित वर्गालाहि तापदायक होणारीं बंधनें कमी होऊं लागतील. सर्वसामान्य समाज गतानुगतिक असतां सुशिक्षितांस वेगळें राहून चालत नाहीं. शिक्षण सार्वत्रिक जोंपर्यंत नाहीं तोंपर्यंत तीव्र आचारभेद राहील. एक दोन मराठे ब्राह्मणासारखे वागतील पण सर्व मराठे निराळेच वागतील आणि दिसतील. निरनिराळ्या जातींमध्यें वरवर दिसणारेंहि सादृश्य जोंपर्यंत वाढलें नाहीं तोंपर्यंत जातिभेदाविरुद्ध ओरड फोल होते. समाजांत सादृश्य वाढविण्यासाठीं मोठ्या प्रमाणावर शिक्षणाची खटपट पाहिजे आणि तें स्त्रियांतहि पाहिजे. शिक्षणानें उत्पन्न होणारें सादृश्य वाढलें आणि सर्व समाजास एकत्र ओढणाऱ्या व्यक्ती अगर संस्था निर्माण झाल्या म्हणजे जातिभेदाचें स्वरूप कमी तीव्र होईल. हें सादृश्य उत्पन्न व्हावयाचें तें भारतीय विद्येमार्फत होईल, अगर इंग्रजी विद्येमार्फत होईल, याचा विचार पुढें करूं. तसेंच सर्व समाजामध्यें वजनदार असा एखादा शिष्टवर्ग उत्पन्न झाल्यास तो केंद्र होऊन त्याच्यामार्फत जातिभेद मोडण्यास मदत होते. तो शिष्टवर्ग कसा उत्पन्न होईल त्याचें स्वरूप कसें काय असलें पाहिजे हाहि विचार त्याबरोबरच करूं.

मुसुलमानांचें भवितव्य आणि हिंदूंचें भवितव्य या दोहोंचाहि विचार साकल्यानें केला पाहिजे. या दोघांचें एकत्व होईल किंवा दोन्ही समाज निरनिराळे रहातील यांपैकीं कांहीं तरी एक होणार हें उघड आहे. हे दोन पृथक् राहतील असें भविष्य करणें म्हणजे मनुष्योपायाची व्यर्थता व्यक्त करणें होय; आणि सर्व समाजशास्त्रीय विद्येचा राजनीतीचा आणि या सर्वांहून मोठें जें ज्ञान त्या ज्ञानाचा उपमर्द करणें होय. समाजभिन्नता जर विचारमूलक आहे तर विचाराच्या ओघाबरोबर समाजाचें स्वरूप बदललें पाहिजे. संप्रदाय जर

विचारमूलक आणि आचारमूलक आहेत, आणि विचार शेवटीं सत्याच्या अनुषंगानेंच प्रवृत्त होणार हें सर्व विचारांचेंच ध्येय आहे; आणि सत्य जर शास्त्रांचा विषय आहे तर शास्त्रांची प्रगति झाल्यानंतर विचारभिन्नता राहील कशी व आचारभिन्नता राहील कशी ?

समाजाचें पृथक्त्व आचारमूलकच असेल आणि आचार जर विचारमूलक असतील आणि विचार जर सत्यमूलक असतील तर सत्याच्या अनुषंगानें सर्व लोकांत विचार व आचार यांचें ऐक्य अगर सादृश्य हीं उत्पन्न होणारच. मग जर लोकभेद राहिला तर त्याचें कारण निराळें असलें पाहिजे. सध्यांच्या वृत्तींत फरक होणार नाहीं व दोन्ही समाजांचें पृथक्त्व कायमचें राहणार, हा सिद्धांत केवळ विचार न करणाऱ्या आणि भेदाचा डोंगर पाहून घाबरून गेलेल्या मनुष्याचा होईल. प्रज्ञाचा होणार नाहीं.

लोकांत जे भेद राहतात ते भेद रक्षण करण्यासाठीं कांहीं तरी संस्था किंवा त्या संस्थेच्या अस्तित्वानें हित पावणारा मनुष्यवर्ग लागतो. ती संस्था अगर तो मनुष्यवर्ग आपल्या वर्गाच्या हितासाठीं माणसामाणसांत भेद राखतो. लदाखमध्यें बौद्ध आणि मुसुलमान निराळे कां तर एकाच्या हजार वर्षांपूर्वीच्या वापदाद्यांस महंमदाचा उपदेश ग्राह्य वाटला आणि दुसऱ्यास पंचवीसशें वर्षांपूर्वींच्या बुद्धाचा उपदेश ग्राह्य वाटला. म्हणून दोघांनीं एकमेकांशीं भांडावयाचें, अशी स्थिति दिसते. संप्रदायसंस्थापकाचा उपदेश काय होता याची माहिती कोणासच नाहीं. एक आपणास मुसुलमान म्हणवितो व दुसरा बौद्ध म्हणवितो एवढें मात्र खरें. त्यांचें भिन्नत्व आज राहतें तें भिन्न उपदेशांमुळें खास नव्हे तर मनुष्यांमनुष्यांमध्यें द्वैत उत्पन्न करून ज्या मध्यस्थांचा फायदा होत असतो त्यांच्यामुळेंच हें संप्रदायभिन्नत्व टिकतें. या वेळेस ज्ञान व विचार या दोहोंकडेहि दुर्लक्ष होतें आणि बाह्य आचार थोडाबहुत टिकतो. मुसुलमानाचें पृथक्त्व निराळें ठेवण्यास ब्राह्मणासारखी कायमची जात नाहीं किंवा रोमन कॅथोलिक संप्रदायाच्या सोपानपरंपरायुक्त गुरुमंडलासारखें गुरुमंडल नाहीं. महंमदी संप्रदायाचीं मुख्य अंगें म्हणजे, एक ग्रंथ, त्यानें सांगितलेल्या प्रार्थना व रिवाज, आणि चार कायदेपंडितांच्या परंपरा, वरीचशी सामुच्चयिक संपत्ति आणि खलिफ हीं होत. कायदेपंडितांच्या परंपरेचें महत्त्व कमी होण्यास अवश्यक गोष्ट ही कीं, कुराणाचा अर्थ लावण्यांत व्यक्तींनीं आपलें स्वातंत्र्य स्थापणें. या तऱ्हेचें स्वातंत्र्य जेव्हां स्थापिलें जाईल तेव्हां कुराणाचा मूळ अर्थ लक्षांत येऊन त्यापासून भिन्न असे जे आचारविचार आणि कायदा वगैरे गोष्टी समाजावर लादल्या गेल्या असतील, त्यांपासून आपलें स्वातंत्र्य स्थापण्याची मुसुलमानांस बुद्धि होईल. या तऱ्हेनें एका गोष्टीची वाट लागेल. खलीफाची वाट अंशेंकरून लागलीच आहे. मुसुलमानांचें पृथक्त्व आणि ऐक्य कायम राहण्यास कारण झालेली जगज्जयिष्णु आकांक्षा गेल्या तुर्कांबरोबर झालेल्या मित्रसंघाच्या तहांत धुळीस मिळाली. ती आकांक्षा नष्ट होण्याबरोबर मुसुलमानांच्या पृथक्त्वाचें राजकीय प्रयोजनच गेलें. सामुच्चयिक संपत्तीनें तयार झालेलें ऐक्य व पृथक्त्व हीं कांहीं दिवस कायम राहतील, आणि त्यांमुळें व राजकीय सनदी हक्कामुळें हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत मुसुलमानांचा वरचष्मा असावा ही भावना कायम राहील आणि त्यामुळें संघबलानें प्रयत्नहि होतील. तथापि त्याचा परिणाम फारसा अनिष्ट होणार नाहीं.

देशाचे विभाग जर भाषेच्या तत्त्वानुसार पडतील आणि देशभाषेंत जर राज्य चालवावें ही परिस्थिति उत्पन्न होईल तर मुसुलमानांस हिंदूंशीं सदृशच व्हावें लागेल आणि आज ज्याप्रमाणें जैनांचें पृथक्त्व थोडेंसें निराळें आहे तथापि सर्वसामान्य समाजांतीलच तो वर्ग आहे त्याप्रमाणेंच मुसुलमानांची स्थिति होईल. देशामध्यें आर्थिक आणि राजकीय प्रश्नास जितकें अधिक महत्त्व येत जाईल तितकें पारमार्थिक प्रश्नांचें महत्त्व कमी होईल. हिंदु समाज हा पारमार्थिक परंपरेनें बद्ध नाहीं आणि पारमार्थिक परंपरेचा जातिभेदाशीं संबंध नाहीं. यामुळें हिंदुस्थानांतील मुसुलमानांस मुसुलमानी संप्रदायाचे हिंदू म्हणवून घ्यावयास कोणतीच हरकत नाहीं. तथापि परंपरेनें दृढ झालेल्या हिंदु शब्दाच्या अर्थासंबंधीं कल्पना एकाएकीं नष्ट होणार नाहींत आणि त्यामुळें मी मुसुलमान असून हिंदु आहें असें मुसुलमानानें आणि मी ख्रिस्ती असून हिंदु आहें असें ख्रिस्त्यानें म्हटल्यास आज ख्रिस्त्यांस, मुसुलमानांस व हिंदूंस सर्वांसच तें विलक्षण वाटेल. तथापि समाजाचें स्वरूप जितकें अधिकाधिक स्पष्ट होत जाईल तितकी मुसुलमानांस व ख्रिस्त्यांस आपल्या सांप्रदायिक उपासना सोडावयास न लावतां हिंदुसमाज वाढविण्याची कल्पना अधिक पटेशी होईल. सर सय्यद अहमद यांनीं मुसुलमानी संप्रदायाचे हिंदू असें हिंदुस्थानांतील मुसुलमानांनीं कां म्हणवून घेऊं नये असा प्रश्न उपस्थित केला होता पण या गोष्टीस बरींच वर्षें लोटलीं.

आपल्या देशामध्यें जो कायदा आहे तो कधींकाळीं कोणत्यातरी पुस्तकांत लिहिलेल्या नियमावरून इंग्रजांनीं घेतला असून तो लोकांच्या बोकांडी बसविला गेला आहे. शब्दांच्या अर्थांची धुडगूस करून कायदा बदलविण्याचे दिवस नाहींसे होऊन लोकेच्छा आणि लोकप्रवृत्ति यांच्या पायावर भावी हिंदुस्थानांतील कायदा उभारला जाईल. सरकाराला हिंदु कायद्यांत हात घालूं द्यावयाचा नाहीं, या तऱ्हेची बुद्धि जी समाजांत वागत होती व आहे ती लोकसत्ता वाढूं लागेल तेव्हां कमी कमी होत जाईल. देशविभाग भाषेच्या तत्त्वानुसार पाडले गेले तर सामाजिक कायदे करण्याची प्रवृत्ति अधिकाधिक वाढेल. ही प्रवृत्ति वाढूं लागली म्हणजे आजच्या परिस्थितीस अनुकूल काय आहे याविषयीं विचार उत्पन्न

होऊन लोक कायदे करूं लागतील. हीच प्रवृत्ति मुसुलमानांतहि उत्पन्न होईल, आणि त्यामुळें आजच्या मुसुलमानांनीं आपल्या विचारानें मुसुलमानांकरितांच जरी कायदे निर्माण केले तरी ते हिंदूंच्या कायद्यांजवळजवळच येतील, आणि चार कायदे-पंडितांच्या परंपरेचें दास्य सुटेल. कालांतरानें इस्टेटीच्या वांटणीचे कायदे देखील देशांत सारखेच असावे असें लोकांस वाटूं लागेल, आणि या रीतीनें कायद्याच्या बाबतींत एकरूपता झाली म्हणजे उपासनेस कोठें जमावयाचें एवढ्याच भेदानें लोकांमध्यें भेद राहील. मुसुलमानांचें व हिंदूंचें आचारविचार-साम्य दोन तऱ्हांनीं होईल. एकतर मुसुलमान लोकांच्या विचारांतच विकास होऊन त्यांची वृत्ति इतर जगाशीं सख्यक्षम होण्याच्या पद्धतीनें होईल अथवा मुसुलमान होतांनाच जुन्या हिंदू चालीरीति पुसट्न जाण्याची क्रिया अपूर्ण राहिल्यानें होईल. सध्यां आपणांस दोन्ही प्रकारचें कार्य दिसत आहे. कुराणाविषयीं वृत्ति कशी काय रहावी याविषयीं मुसुलमानांत विचारांचे फांटे फुटले नाहींत असें नाहीं. ते फांटे विचाराचा अनेक बाजूंनीं विकास दाखवितात. ग्रंथवचन युक्तीनें सिद्ध करण्याची वेळ आली म्हणजे ग्रंथवचनापेक्षां युक्तीचें प्राधान्य सहजच आलें. मुसुलमानी विचारास जे फांटे फुटले आहेत ते नवीन विचारास वाव देण्यासाठीं आहेत. नवीन विचारांस वाव दोन तीन तऱ्हांनीं मिळावयाची. कुराणाशिवाय इतर सांप्रदायिक वाङ्मयाचें महत्त्व वाढवावयाचें, किंवा आप्तवाक्याचा अर्थ लावण्यांत कल्पकता दाखवावयाची किंवा परमेश्वराचे वक्ते महंमदाशिवाय इतर मान्य करावयाचे. या सर्व तऱ्हेनें मुसुलमानी विचाराची प्रगति होत आहे. मुसुलमानांच्या चळवळींचें क्षेत्र पाहण्यासाठीं आपणांस पंजाब व बंगाल इकडे नजर फेंकली पाहिजे.

बंगालमध्यें पूर्वी वाहाबी नांवाचा एक पंथ मुसुलमानांमध्यें निघाला होता. त्यांची चळवळ बंद करण्याचे प्रयत्न झाल्यानंतर त्यांपैकीं जे शिल्लक राहिले त्यांतील कांहीं आपणांस 'अहल इ हादी' असें म्हणवूं लागले. 'अहल इ हादी' या शब्दाचा अर्थ परंपरेंतील लोक असा आहे. त्यांनां हें नांव मिळण्याचें कारण, त्यांचें म्हणणें असें होतें कीं, "हावी म्हणजे कुराणांत न सांपडणारीं परंतु परंपरेनें चालत आलेलीं जीं महंमदाचीं वचनें आहेत त्यांचा अर्थ लावण्याचा आपणांस हक्क आहे." वाहाबीपैकीं कांहीं लोक आपणांस 'घैर मुकल्लिद' म्हणजे परंपरेपासून फुटून निघालेले असें म्हणत व ते सुनी पंथाच्या चार इमामांचीं तत्त्वें मान्य करीत नसत. यांनांच रफियदैन असेंहि एक नांव असे.

बहार आणि ओरिसामध्यें अहमदी यांचा एक नवीनच पंथ आहे. यांचें मत असें आहे कीं, मेसाया, माहदि, कृष्ण हीं सर्व निरनिराळीं नांवें अथवा उपपदें आहेत व हीं सर्व नांवें या पंथाचा संस्थापक जो मिर्झा गुलाम अहमद तो आपणां स्वतःस लावीत असे. तो आपणास मुसुलमानांची सुधारणा करणारा म्हणून 'माहदि' म्हणवीत असे. ख्रिस्ती लोकांस पुन्हां ख्रिस्ताचीं तत्त्वें पाळावयास लावणारा म्हणून 'मेसाया' म्हणवीत असे व हिंदूंनां ऋषिप्रणीत धर्माची पुन्हां ओळख करून देणारा म्हणून कृष्ण म्हणवीत असे. सर्व धर्मांचें मूळ सत्यांत आहे आणि महंमदानें सर्व धर्मांतील सत्य घेऊन तें कुराणांत गोंविलें असें त्याचें तत्त्व असे. सर्व धर्मांच्या मूळाशींहि तेंच सत्य असून वेदांमध्यें, बायबलमध्यें, गीतेमध्यें व बुद्धाच्या वचनांतहि तेंच आहे.

आतां पूर्वसंस्कारांचे अवशेष बाटलेल्या मुसुलमानांत कसे राहतात हें पाहूं. कांहीं कांहीं ठिकाणीं जे वन्य लोक बाटवून मुसुलमान केले गेले ते अद्यापिहि आपलेच जुने आचार व शेजारपाजारच्या हिंदूंचे आचार पाळतात. पूर्निया जिल्ह्यांतील एका मुसुलमानी पंथांत कांहीं लोक हिंदूंप्रमाणेंच पितरांची पूजा करितात. त्यावेळीं ते दोन बांबू जमीनींत पुरून त्यांची पूजा करितात. ते झाडांची पूजा करून त्यांच्यापुढें भाकरी, साखर वगैरे नैवेद्य दाखवितात. कनिष्ठ जातीच्या मुसुलमान व हिंदूंचें दुसरें एक सामान्य दैवत म्हणजे देवता महाराज हें होय. याच्या द्वारपालास हादि म्हणतात. हें दैवत म्हणजे एक बांबू जमीनींत पुरलेला असतो व त्याला एक टोपली, एक तिरकमटा, एक मासे धरण्याचें जाळें व गळ अशीं बांधलेलीं असतात. या पूर्निया जिल्ह्यांतील मुसुलमान म्हणविणारे लोक हिंदूंच्या देवतांची, ग्रामदेवतांची वगैरे पूजा हिंदू पुजाऱ्यांच्या हातून करतात. ते आपल्या शेजारपाजारच्या हिंदूंबरोबर हिंदू सण पाळतात व कालीच्या देवळास जातात. बहुधा प्रत्येक घरांत 'खुदाइ घर' म्हणून एक भाग असून त्यांत अल्ला व काली यांची प्रार्थना करितात.*

कांहीं उच्च जातीच्या बाटलेल्या मुसुलमानांतहि अद्यापि हिंदू चालीरीती पाळतात. शाहाबाद जिल्ह्यामध्यें एक मूळचें रजपूत घराणें बाटून ख्रिस्ती झालेलें आहे. ते स्वतःला अद्याप रजपूत म्हणवितात. ते लग्नाला ब्राह्मणाकडून मुहूर्त काढून घेतात व लग्नविधिहि हिंदू पद्धतीचा करितात.

हिंदुस्थानच्या पुष्कळ भागांतून मुसुलमान लोक हिंदू चालीरीती पाळतात. सर्पदंश झाला असतां ते हिंदू मांत्रिकांनां बोलावितात व ते मांत्रिक आपल्या देवतांस उद्देशून मंत्र म्हणतात. बंगालमध्यें मुसुलमान लोक हिंदू पुजाऱ्याच्या-मार्फत सर्पांची देवता मानसा हिची पूजा करितात. ओलाबिबि आणि सीतलादेवी यांची रोगनिवारणार्थ पूजा करणारे मुसुलमान बहार आणि बंगालमध्यें आढळून येतात. बहार-मध्यें मुसुलमान बायका 'छटपूजा' नांवाच्या सूर्याच्या वार्षिक

* Purnea Settlement Report.

उत्सवांत भाग घेतात. ही पूजा केली नाहीं तर त्यांचेवर छटीमाता ( सठी ) कोप करील अशी त्यांची समजूत आहे.

मुसुलमानांमध्यें हिंदूंच्या जाती शिल्लक आहेत. अशा जाती प्रांतोप्रांतीं आहेत त्यांपैकीं काश्मीर प्रांतांतील अशा प्रकारच्या जातींची यादी येणेंप्रमाणें:—

### अनेक मतानुयायी जाती.

| जातीचें नांव. | लोकसंख्या. | समुच्चय. |
|---|---|---|
| अरोरा | ३,५२७ | हिं. शी. आ. मु.* |
| बरवाला | ११,३५५ | हिं. मु. |
| बसिथ | ७,६४७ | हिं. मु. शी. |
| बवरिया | ३४ | मु. हिं. |
| बझिगार | १,२७६ | हिं. मु. |
| बेदा | २२४ | मु. बौ. |
| बेलदार | २,४१८ | हिं. मु. |
| चुरा | ८,६९९ | हिं. आ. मु. शी. |
| दर्जी | ३,९५८ | हिं. मु. |
| दम | ५२,०९९ | हिं. आ. मु. शी. |
| गद्दी | १०,५६३ | हिं. मु. |
| गोरख | १,३३० | हिं. मु. बौ. |
| हजाम | ३४,४५६ | हिं. मु. शी. |
| जाट | १४१,४३९ | हिं. आ. मु. शी. |
| झीवार | १३,५०० | हिं. मु. शी. |
| जोगी | ५,५५३ | हिं. मु. |
| कुंहिआर | १८,९५८ | हिं. मु. शी. |
| लभाना | ५,३२१ | हिं. मु. शी. |
| लोहार | २८,८८४ | हिं. मु. शी. |
| मंग्रीक | ९८,५०८ | मु. बौ. |
| मेघ | ७५,४०९ | हिं. आ. मु. शी. |
| रजपूत | २०४,७४२ | हिं. आ. मु. शी. |
| रिगझंग | ४,८८८ | मु. बौ. |
| तर्खान | २७,८७१ | हिं. मु. शी. |
| तेली | १९,३०९ | हिं. मु. |
| ठक्कर | १०४,६१३ | हिं. आ. मु. |
| थथिआर | ६३ | हिं.मु. |
| झरगर | ६,३७९ | हिं. मु. शी. |

वरील कोष्टकावरून दिसून येईल कीं रजपूत, अरोरा यासारख्या केवळ मोठमोठ्या जाती मुसुलमानांत शिल्लक उरल्या नसून पोटजातीहि शिल्लक उरल्या आहेत. सिलोनमध्यें ज्याप्रमाणें ख्रैस्त्य हें जातिकारक राहिलें नसून केवळ मत आहे त्याप्रमाणें "मौसलमान्य" अथवा 'महंमदीयत्व' जातिकारक न होतां केवळ मत होईल अशी अपेक्षा करण्यास हिंदू व मुसुलमान यांमध्यें दिसून येणाऱ्या सारख्याच जाती कारण होतात. कांहीं काळापूर्वी जारीनें आणि आज थोडथोडा अजून असा प्रकार दिसतो कीं, मुसुलमान आपल्या जातीचीच हिंदूंमधील मुलगी करतात व हिंदू त्यांस मुली देतात. ही चाल बंद पाडण्यास स्वामी दयानंदानीं बराच प्रयत्न केला. मुसुलमानांमध्यें जाती राहिल्यानें पुढेंमागें हिंदू व मुसुलमान यांच्यामध्यें अधिक मोकळेपणानें व्यवहार होईल असें वाटतें.

समाजाचें भवितव्य प्रच्छन्न आहे. बऱ्याच गोष्टी आपल्या प्रयत्नावरच अवलंबून राहणार, आणि यासाठीं आपणांस प्रयत्नांची दिशा समजली पाहिजे. ती समजण्यासाठीं स्पर्धाक्षेत्राचें सिंहावलोकन करून नंतर भवितव्याच्या प्रश्नांचा खोल विचार केला पाहिजे.

* हिं.=हिंदु; शी.=शीख; आ.=आर्य; मु.=मुसुलमान; बौ.=बौद्ध.—खानेसुमारी १९११.

---

## प्रकरण १३ वें.

### स्पर्धाक्षेत्राकडे पुन्हां एकदां.

पूर्वगत माहितीचें विहंगवृत्तीनें अवलोकन करून ज्या गोष्टी आपण प्रदेशानुरूप मांडल्या त्या आतां विषयानुरूप मांडल्या पाहिजेत. विषयास प्रारंभ जगाच्या स्पर्धेच्या अवगमनानें झाला, आणि ज्या स्पर्धा करणाऱ्या संस्था जगांत आहेत त्या सर्वांत संस्कृतिसंस्था ही अत्यंत महत्त्वाची आणि आपल्या इतिहासांत अनेक राष्ट्रांचा इतिहास समाविष्ट करणारी असल्यामुळें संस्कृतिस्पर्धेचा विषय अगोदर हातीं घेऊन आपला ज्या संस्कृतीशीं अवयवावयवी संबंध आहे त्या हिंदु संस्कृतीचें आणि तिच्या प्रसाराचें व्यापक ज्ञान व्हावें म्हणून हिंदूंच्या जगभर झालेल्या खटपटी व चळवळी यांची जागेचा मर्यादितपणा लक्षांत घेऊन जितकी विस्तृत माहिती देतां आली तितकी दिली आहे. तिचें अवलोकन केलें असतां ब्राह्मणांच्या, बौद्धांच्या आणि संस्कृत वाङ्मयाच्या प्रवर्तकांच्या चळवळीचें खोल जरी नाहीं तरी व्यापक ज्ञान होईल. आतां हिंदु संस्कृतीच्या नांवें खालील खात्यांवर काय पडलें आहे याचा हिशोब देतों.

( १ ) हिंदु संस्कृतीनें म्हणजे संस्कृत ग्रंथांनीं व भाषेनें संस्कार केलेल्या भाषा.

( २ ) तिनें संस्कारिलेल्या जाती.

( ३ ) हिंदूंच्याच वंशजांकडून व्याप्त झालेले किंवा त्यांचा जेथें बराचसा जमाव आहे असे प्रदेश.

( ४ ) हिंदु संस्कृतीचें कालदेशदृष्ट्या महत्त्वमापन.

( १ ) भारतीय संस्कृतीचा संस्कृतभाषा व संस्कृतवाङ्मय यांच्याद्वारा इतर देशांवर झालेला परिणाम येणेंप्रमाणें:—

संस्कृत भाषेशीं निकट नात्याच्या भाषा भरतखंडाबाहेर ज्या देशांत आढळतात असे देश सिंहलद्वीप आणि मालदीव

बेटें हे होत. या भाषाप्रचारावरून भारतीय जनतेचें मोठ्या प्रमाणावर प्रयाण सिद्ध होतें. ज्या आर्य भाषाकुलाबाहेरील भाषांवर संस्कृत भाषेंतील शब्दांचें त्यांत मिश्रण होऊन परिणाम झालेला आहे अशा भाषा अनेक असून त्या अनेक भाषाकुलांतील आहेत. ब्रह्मदेशांत चालणाऱ्या ब्रह्मी, कुकिचिन, लोलो, सिनिटिक (करेण), थइ इत्यादि संघांतील सुमारें ७३ पोटभाषा या मूळ तिबेटो-चिनीकुलांतील असून त्यांत अनेक संस्कृत शब्द शिरले आहेत. मलायो-पॉलिनेशियन कुलांतील मलयु भाषा, ऑस्ट्रो-एशियाटिक कुलांतील मोन-ख्मेर व पलौंगवा संघांतील सुमारें १० भाषा व इंडो-चिनी संघांतील बिम, बत्ता, तागाल, लाव इत्यादि भाषा व द्राविड कुलांतील तुळुव, कोदगु, गोंडी व कोरकु या भाषा, जावाबेटांतील कविभाषा आणि फिलिपाइन व सुमात्राबेटांतील भाषा या सर्व भाषांमध्यें संस्कृत शब्दांचें मिश्रण झालें आहे. म्हणजे संस्कृतभाषेचा पगडा तिबेटो-चिनी, ऑस्ट्रो-एशियाटिक, द्राविड, इंडो-चिनी इत्यादि कुलांतील जवळ जवळ १०० परकीय भाषांवर बसला आहे.

संस्कृत भाषेचा यापेक्षां महत्त्वाचा परिणाम म्हणजे संस्कृत ग्रंथांचा प्रवेश ज्या भाषांत झाला आहे अशा भाषा मलयु आणि जावा या होत.

ज्या भाषांवर संस्कृत भाषेचा परिणाम झाल्याचें स्पष्ट दिसत नाहीं पण तसा संशय घेण्यास सबळ कारणें आहेत अशा भाषांमध्यें सेलिबिसमधील बूगी भाषा मोडते.

चिनी भाषेंत संस्कृत वाङ्मयाचा प्रवेश झाला पण त्या भाषेवरील परिणाम अद्यापि मोजला गेला नाहीं. तिबेटी व जपानी भाषांवर परिणाम झाल्याचीं चिन्हें दिसत आहेत.

ज्या भाषा मूळ आर्यकुलांतील असून ज्यांचें स्वरूप इतर भाषांचा त्यांवर परिणाम झाल्यानें पालटलें आहे अशा भाषा म्हणजे मालदिवी व काफरिस्तानांतील पैशाची या होत. हा भारतीय विजयाचा भाग नसून अपसृष्टीचा भाग होय. लखदिवी भाषा द्राविड कुलांतील असून अपसृष्ट झाली आहे.

(२) आतां भारतीय संस्कृतीनें संस्कारलेल्या जातींचा हिशोब घ्यावयाचा. येथें आपणांस प्रथम ब्राह्मणांचें अगर तत्सम जातींचें हिंदुस्थानाबाहेर अस्तित्व किती ठिकाणीं आढळतें हें पाहिलें पाहिजे. हें अस्तित्व अनेक ठिकाणीं आहे. ब्रह्मदेशांत पावन, सयामांत ब्राह्मण, कांबोजांत बकु अथवा ग्राम ब्राह्मण व आचार जात, मलायांत इदान जात, बलि व जावामध्यें पादण्ड, इत्यादि लौकिक नांवांनीं ओळखल्या जाणाऱ्या जाती ब्राह्मणच आहेत. जेथें ब्राह्मणगौरव आहे तेथें हिंदुत्व पक्कें आहे असें समजावें. ज्या बाह्य देशांतील जातींवर भारतीय संस्कृतीचा परिणाम झाल्याचें अवशेषरूपानें दिसत आहे अशा जाती शोधूं लागल्यास पेगूंतील तलैंग लोक, काचिन लोक, आराकानांतील माघ, ब्रह्मी, काफरिस्तानांतील लोक, बलुचिस्तानांतील गिचकी जात, इराणांतील छुरी व गुदाद, आफ्रिकेंतील जुवालँडमधील कांहीं जाती, सेलिबिसमधील बूगी, बोर्निओमधील लोक, सुमात्रांतील अनेक जाती, कांबोजमधील चाम, इत्यादि आढळतात. बौद्धांचा तर सिंहली, ब्रह्मी, चिनी, जपानी, या लोकांवर व पूर्वेकडील द्वीपकल्पांतील व बेटांतील, लोकांवर अनेक बाबतींत महत्त्वाचा परिणाम झालेला आहे.

(३) भारतीयांच्या वंशजांकडून व्याप्त झालेले किंवा त्यांचा जेथें बराचसा जमाव आहे असे प्रदेश म्हटले म्हणजे, सिंहलद्वीप, लखदीव, मालदीव, अंदमाननिकोबार, ब्रह्मदेश, मलाया, सयाम, कांबोज, कोचिनचीन, टाँकिन, जावा, बलि, सुमात्रा, लाँबाक, सेलिबिस, फिजीबेटें, मादागास्कर, पूर्व आफ्रिका, दक्षिण आफ्रिका, ब्रिटिश गियाना, त्रिनिदाद, व डच गियाना हे होत.

(४) भारतीय संस्कृतीचें कालदेशदृष्ट्या महत्त्वमापन करावयाचें तर सिलोनचा अगोदर उल्लेख केला पाहिजे. सिलोन देशांत भारतीय संस्कृतीचा प्रसार अत्यन्त प्राचीन कालीं झाला व सिलोन हें हळूहळू भरतखंडाचा एक भाग बनलें. त्यानंतर ब्रह्मदेश, मलाया, सयाम, कांबोज इत्यादि पूर्वेकडील देशांत भारतीय संस्कृतीचा प्रसार झाला व तेथें सिलोनइतका नसला तरी बराच महत्त्वाचा परिणाम झाला. पश्चिमेकडे फार प्राचीन कालापासून भारतीयांच्या वसाहती व राज्यें हीं अफगाणिस्तान, इराणचा कांहीं भाग, बलुचिस्तान इत्यादि प्रदेशांत होतीं; पण मुसुलमानी संस्कृतीनें तीं नष्ट झालीं व आतां फक्त कांहीं गोष्टी अवशेषरूपानें राहिल्या आहेत. मुसुलमानी आवेगापुढें भारतीय संस्कृतीच्या पराभवाचा काळ म्हटला म्हणजे ख्रिस्तोत्तर १००० पासून १५०० पर्यंतचा होय. त्यानंतर यूरोपीय सत्तेचा काल होय. ज्या लोकांनां मुसुलमानांबरोबर फारसें झुंजावें लागलें नाहीं अगर निदान त्यापुढें नमावें लागलें नाहीं असा प्रदेश म्हटला म्हणजे सिंहलद्वीप व इंडोचायनांतील कांहीं भाग होय. हिंदूंची उचल मुसुलमानांच्या सत्तेच्या प्रकर्षानंतर झाली असे प्रदेश म्हटले म्हणजे हिंदुस्थानांत विजयानगर, महाराष्ट्र व पंजाब हे होत व बाहेर बलिद्वीप हें होय. आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावर भारतीयांच्या वसाहती बरेच दिवसांपासून आहेत; व तो प्रदेश वसतियोग्य करण्यास त्याच कारण झाल्या आहेत. आतां मात्र तेथें यूरोपीयांचा प्रवेश होऊन ते सर्वसत्ताधीश बनले आहेत. यानंतर अलीकडे जे भारतीय कूली म्हणून बाहेर गेले ते फिजीबेटें, ब्रिटिश गियाना, डच गियाना, त्रिनिदाद, दक्षिण आफ्रिका इत्यादि प्रदेशांत आढळतात. त्यांचें जरी तेथें संख्येनें महत्त्व असलें तरी त्यांची स्थिति अत्यंत निकृष्ट आहे.

आतां आपण विविध संस्कृतींचे स्पर्धासंबंध लक्षांत घेऊं.

भारतीय संस्कृतीला मुसुलमानी, चिनी व यूरोपीय या तीनहि संस्कृतींशीं झगडावें लागलें. चिनी संस्कृतीचा व आपला संबंध कसा काय आला या विषयीं साकल्यानें कल्पना आपणांकडे नाहीं म्हणून त्या स्पर्धेचें स्वरूप दाखविणारे उल्लेख एकत्र केले पाहिजेत. सिंहलद्वीपाकडे पाहिलें तर त्याजवर चिनी स्वारी १४०८ सालीं होऊन तेथील राजा चौथा पराक्रमबाहु यास चिनी फौजेनें कैद करून नेलें आणि पुढें ३० वर्षेपर्यंत सिंहलद्वीप चीनचें मांडलिक होतें. खुद्द हिंदुस्थानांत पाहिलें तर असें दिसतें कीं, १८९० सालापर्यंत सिक्कीम संस्थान चीनचें मांडलिक होतें आणि त्या सालीं चीननें त्यावरील आपलें अधिराजत्व सोडून इंग्रजसरकारास दिलें. इसवी सनाच्या ७ व्या व ८ व्या शतकांत काश्मीरचें राज्य देखील चीनला खंडणी देत होतें आणि नेपाळ दरबार जरी आज चीनची सत्ता कबूल करीत नाहीं, तरी मधून मधून आपला अहेर चीनच्या दरबारला पाठवितो. ब्रह्मदेश व चीन यांच्यामध्यें अनेक युद्धें अनेक प्रसंगीं झालीं आणि त्यांत कांहीं कालपर्यंत चीनचें अधिराजत्व ब्रह्मदेशास कबूल करावें लागलें. इंडोचायना म्हणजे पूर्वेकडील द्वीपकल्प यामध्यें हिंदुस्थानची राजकीय शक्ति नव्हतीच पण सांस्कृतिक शक्ति देखील बरीच वितळलेली दृष्टीस पडते आणि चीनची वाढलेली दृष्टीस पडते. राजकीय गोष्टीच घेतां हें सांगितलें पाहिजे कीं कांबोजच्या राजानें चीनशीं मित्रत्वाचें नातें जोडण्याचा प्रयत्न इ. स. ६१६ पासून केला होता आणि पुढें आपण सुभेदाराची पदवी चीनकडून घेतली. टॉंकिन संस्थान तर चिनी सत्तेखालीं जाऊन तेथें चिनी राज्यपद्धति चालू झाली. यवद्वीपांत देखील चिनीलोकांची स्वारी झाली होती आणि मयपहित येथील दोन सुंदर राजकन्या चीनच्या बादशहास नजर करण्यासाठीं तार्तार फौज घेऊन गेली. येणेंप्रमाणें चीनचें वर्चस्व हिंदुस्थानच्या उत्तरेस, दक्षिणेस आणि पूर्वेस भासत होतें आणि हिंदुस्थानी कल्पनांचा जरी या प्रदेशांत प्रसार झाला तरी चीनची विद्या आणि बल यांचा परिणाम या देशांवर हिंदुस्थानाच्या संस्कृतीचीं जाड पुटें बसण्यास प्रतिकूल झाला.

चिनी व भारतीय संस्कृतींच्या स्पर्धाक्षेत्रांत चीन, जपान, तिबेट, कांबोज व सयाम ह्या देशांचाच मुख्यत्वेंकरून समावेश होत असून ही स्पर्धा जवळ जवळ ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून सोळाव्या शतकापर्यंत चालू होती.

भारतीय संस्कृतीचा चिनी संस्कृतीवरील सर्वांत मोठा विजय म्हटला म्हणजे भरतखंडांत निघालेल्या एका म्हणजे बौद्ध संप्रदायानें त्या संस्कृतीच्या घरांत शिरून तेथें आपलें कायमचें ठाणें बसविलें हा होय. सांप्रदायिक ग्रंथांच्या अनुषंगानें हिंदु कायदा, वर्षांचे विभाग पाडण्याची हिंदु रीति इत्यादि दुसऱ्याहि कित्येक गोष्टींचा चीन देशांत प्रवेश झाला असावा. चिनी राष्ट्रांत बौद्ध संप्रदायास शालिवाहन शकाच्या प्रारंभास बादशहाच्या बुद्धसंघप्रवेशामुळें प्रामुख्य आलें. त्या सुमारास १३ भारतीय ग्रंथकारांच्या १०४ ग्रंथांचीं चिनी भाषेंत भाषांतरें झालीं होतीं, व इ. स. ६७ पासून १०५८ पर्यंत ७५ प्रमुख भारतीय ग्रंथकारांनीं चिनी भाषेंत ६७५ हून अधिक ग्रंथरचना करून बौद्धसंप्रदायमूलक वाङ्मयाचा त्या देशांत पाया घालून दिला.

जपानांत भारतीय संस्कृति चिनी संस्कृतीच्या प्रवाहाबरोबरच शिरली. ह्या दोन्हीहि संस्कृतींचा प्रसार त्या देशांत कोरियामार्फत झाला. चिनी संस्कृतीचा परिणाम जपानच्या वाङ्मयावर झाला तोच त्याचें आपणांशीं सादृश्य जुळविण्यास कारण झाला. जपानांतील कांहीं मूर्तींचे भारतीय स्वरूपाचे तोंडवळे, आ, ई, ऊ, ए व ओ ह्या स्वरांचा चिन्हांच्या साहाय्यानें व्यंजनांशीं संयोग करण्याची रीत, कांहीं संस्कृत ग्रंथ, मोठमोठीं देवालयें, नगारे व घंटा यांचें अस्तित्व, अर्वाचीन काळाचा परिणाम होण्यापूर्वी बऱ्याच प्रमाणांत तेथें प्रचारांत असलेली मांसनिवृत्ति, पारमार्थिक संप्रदाय व राष्ट्रीय संस्कार यांचें भिन्नत्व व हिंदुस्थानांतील ब्राह्मणांसारखे तेथील शिंतो नांवाचे राष्ट्रीय संस्कारकर्ते, हीं सर्व चिनी संस्कृतीपेक्षां भारतीय संस्कृतीची तेथें अधिक छाप पडल्याचीं उदाहरणें आहेत.

भारतीय संस्कृतिजन्य बौद्ध संप्रदायाचा तिबेटवर इतका पगडा बसला आहे कीं, तेथें आतां अन्य संप्रदायाचा प्रसार होणें अशक्य झालें आहे. सातव्या शतकांत तिबेटी लोकांनीं संस्कृत वाङ्मयाच्या अभ्यासास सुरुवात करून आपली वर्णमाला तयार केली. त्यानंतर संस्कृत ग्रंथांचीं तिबेटी भाषेंत जीं उत्कृष्ट भाषांतरें झालीं त्यांमुळें तिबेटी भाषेस बरेंच सौष्ठव प्राप्त झालें. १५ व्या शतकाच्या प्रारंभास तिबेटी लोकांनीं चिनी वाङ्मयाचा जारीनें अभ्यास सुरू केला. अठराव्या शतकाच्या प्रथम पादांत तिबेटवर चिनी सत्ता पूर्णपणें प्रस्थापित झाली. तथापि ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तीन वर्ण, ब्राह्मणांप्रमाणें बोनबो नांवाच्या राष्ट्रीय संस्कारकर्त्यांचा वर्ग, विदुरासारखा वर्ग, विटाळाची कल्पना, साठ संवत्सरांचें चक्र, हिंदु व तिबेटी कालगणनापद्धतींतील साम्य, तिबेटांतील शिक्षणपद्धति व न्यायमीमांसकांची जुनी शिक्षणपद्धति यांतील सादृश्य, गोत्रांचें अस्तित्व, वांशिक धंदे, अस्पृश्यत्व, पूर्व तिबेटांतल्या तुकुहन लोकांतील सुतकाची चाल, बौद्धांतील कर्मवाद, पुनर्जन्मवाद, अद्वैतवाद, भोग्य वस्तूंचा त्याग इत्यादि कित्येक गोष्टींत ह्या लोकांच्या संस्कृतीचा भारतीय संस्कृतीशीं संबंध अद्याप दृष्टीस पडतो.

पूर्वेकडील देशांपैकीं कोचिनचीन व टॉंकिन या देशांत चिनी संस्कृतीनें आपला पगडा बराचसा बसविलेला आहे. येथील अधिकाऱ्यांचे दरबारी पोषाख, त्यांच्यामधील दहा

दर्जे, त्यांच्याकडून होत असलेला कान्फ्यूशसच्या तत्त्वांचा पुरस्कार, त्यांच्या शासनपद्धतींतील कांहीं अंगें, चिनी लिपी व वाङ्मय यांचा त्या देशांत झालेला प्रसार, पितृपूजा, उपाध्याय वगैरे बाबतींत त्यांच्या धर्माचें चिनी धर्माशीं सादृश्य, या सर्व गोष्टी तेथील लोकांवर चिनी संस्कृतीचा किती परिणाम झाला आहे हें दाखवितात. या दोन्हीहि देशांनीं चीनच्या सत्तेखालीं वरींच वर्षें काढलीं आहेत. मध्यंतरीं इ. स. १३७१ मध्यें भारतीय संस्कृतीचा संस्कार झालेल्या कांबोज राष्ट्रानें कोचिनचीनास आपल्या अंमलाखालीं आणलें होतें. परंतु कोचिनचीन व टाँकिन या दोहोंतून एकाहि देशावर भारतीय संस्कृतीचा म्हणण्यासारखा परिणाम झालेला दिसून येत नाहीं. या राष्ट्रांचीं सांप्रदायिक तत्त्वें चिनी बौद्धांच्या तत्त्वांसारखीं आहेत. तेथें बौद्ध संप्रदायाचा प्रवेश अगदीं अलीकडे म्हणजे इ. स. १५४० त झाला असून त्याच्या अनुषंगानें जी कांहीं भारतीय संस्कृति तेथें शिरली असेल तेवढीच.

कांबोज देशाचा हिंदुस्थानांतील लोकांपेक्षां चिनी राष्ट्राशींच अधिक संबंध आला होता. तेथें हिंदू लोकांची ख्रिस्ती शकाच्या आठव्या शतकापासून चौदाव्या शतकापर्यंत एक वसाहत होती. पण त्याच्याहि पूर्वीं म्हणजे इ० स० ६१६ त कांबोजच्या राजानें चिनी दरबारांत आपला पहिला वकील पाठविला होता. इ० स० ११२८ त चीननें कांबोज येथें आपला सुभेदार नेमला; १३७१ सालीं कांबोजच्या राजानें चिनी साम्राज्यांतर्गत कोचिनचीनचें राज्य आपल्या हाताखालीं घातलें; व इ०स०१४५२ मध्यें चीननें कांबोजकडे आपला वकील पाठविला. या सर्व गोष्टींवरून इ. स. ६१६ पासून १५३८ त सयामनें कांबोजचें राज्य जिंकीपर्यंत चीन व कांबोज या देशांचा कोणत्या ना कोणत्या रीतीनें परस्परांशीं संबंध येत होता हें उघड होतें. तेराव्या शतकांत तर चिनी रहिवाशी कांबोजांत राहत असून ते व्यापारांत अग्रेसर होते. चिनी लोकांच्या संपर्कामुळें गृहोपयोगी लांकडी सामानसुमान व भांडीं यांची कांबोजमधील लोकांस माहिती झाली. तेराव्या शतकाच्या अखेरीस कांबोजांत चिनी अंत्येष्टिविधीप्रमाणें विधि प्रचलित होता. रस्त्यावर चीनप्रमाणेंच डांकघरांची पद्धतहि तेथें त्या वेळीं अस्तित्वांत होती; व राज्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांतून वरिष्ठ शासनयंत्रांत सहा मंत्री घेण्याची पद्धतीहि चीनच्या संसर्गानेंच कांबोजमध्यें अस्तित्वांत आली. तथापि भारतीय संस्कृतीचा कांबोजवर बराच परिणाम झालेला आहे. तेथील बकु अथवा ब्राम जातीचे लोक ब्राह्मणांचे वंशज आहेत. हे राजपुरोहित असून त्यांनां बेरोहेत असें म्हणतात. ते लांब शेंडी ठेवितात व त्यांचा आचार सोंवळेपणाचा असतो. वर्षाचे भाग पाडण्याची रीत व द्वादशवर्षांचें चक्र या गोष्टीहि भारतीय संस्कृतीच्याच निदर्शक आहेत. त्यांच्या वर्षाचा आरंभ चीनप्रमाणें कुंभराशीच्या अर्ध्यावर होत नसून भारतीयांप्रमाणें मार्चच्या मध्याच्या सुमारास होतो. दहाव्या शतकाच्या सुमारास कांबोजांतील ब्राह्मणी संस्कृतीच्या ऱ्हासास सुरुवात होऊन तेथें बौद्ध संप्रदायाचा प्रवेश झाला; तथापि अद्यापहि त्या देशांत शैवसंप्रदायी लोक पुष्कळ आहेत. तेथील अंकोरवात वगैरे मोठमोठीं देवालयें, मूर्ती, लिंगें हे सर्व प्राचीन ब्राह्मणी संस्कृतीचेच अवशेष आहेत.

सयामांतील लोकांत आढळून येणारा चिनी संस्कृतीचा मागमूस पहावयाचा म्हटला म्हणजे पहिली गोष्ट त्यांच्या थइ भाषेंत बहुतेक एकाक्षरी शब्दांचा भरणा असून तिचें चिनीशीं साम्य आहे ही होय. त्या भाषेंतील अंक चिनीसारखेच आहेत. त्यांची काव्यें पठण करण्याची रीत कांहीं जण सामवेदपठणासारखी आहे असें म्हणतात तर कांहींच्या मतें ती चिनी पद्धतीप्रमाणें आहे. कांबोजप्रमाणें सयामच्या शासनपद्धतीवरहि चिनी संस्कृतीचा परिणाम झालेला दिसतो. तथापि प्राचीन काळीं ब्राह्मणांनीं सयामच्या राजकीय व सामाजिक घडामोडींत बरेच फेरफार घडवून आणले. हिंदुस्थानाशीं व्यापारी दळणवळण सुरू होऊन हिंदुस्थानांतील माणसें तिकडे गेलीं व तेथें हरिहरांचीं देवालयें वाढलीं. सयामांत अद्याप ब्राह्मणवर्ग जातिरूपानें आहे. घराची वास्तुशांति, राज्याभिषेक करणें व पत्रिका जुळविणें हीं तेथील ब्राह्मणांचीं कामें आहेत. थइ भाषेंत राम व रामायणांतील इतर व्यक्ती यांच्या विषयींचे ग्रंथ असून रामायणांतील प्रसंगावर नाटकेंहि होतात. सयामांतील आधारभूत जुन्या कायदेग्रंथाचा हिंदु कायद्याशीं निकट संबंध आहे. या आधारभूत कायदेग्रंथांत पुष्कळ फरक करण्यांत आला आहे, तरी लाओम येथें अमलांत असलेला कायदेग्रंथ मूळ मानवधर्मशास्त्राच्या पाली भाषांतरावरूनच तयार झालेला आहे. तेथील न्यायांत हिंदूप्रमाणें दिव्याची पद्धतहि दिसून येते.

भारतीय व महंमदी संस्कृतींच्या स्पर्धेचा विचार करूं लागलें असतां ज्या कांहीं गोष्टी आपल्या दृष्टीस पडतात त्या येणेंप्रमाणें:—अफगाणिस्तान, बलुचिस्तान, इराण, मलाया द्वीपकल्प, जावा इत्यादि देशांत महंमदी संस्कृतीनें मजबूत व कायमचें ठाणें वसविलेलें दिसून येतें व त्यांचा जुन्या भारतीय संस्कृतीशीं संबंध केवळ त्या संस्कृतीच्या स्थानिक अवशेषांवरूनच ओळखतां येण्याजोगा राहिला आहे. प्रत्यक्ष हिंदुस्थानांत जवळ जवळ एक पंचमांश प्रजा मुसुलमान झाली आहे. या स्पर्धेचें क्षेत्र (१) अफगाणिस्तान (२) बलुचिस्तान, (३) इराण, (४) बोर्निओ, (५) सोकोत्रा, (६) आफ्रिका, (७) तार्तरी, (८) ट्रान्सकाकेशिया, (९) लखदीव, (१०) सुमात्रा, (११) सेलिबिस, (१२) मालदीव, (१३) फिलिपाइन्स, (१४) मलायाद्वीपकल्प, (१५) जावा, (१६) बलि व (१७) लँबाक इतक्या देशांत असून स्पर्धेचा मुख्य काळ १० व्यापासून १५ व्या शतकापर्यंत होता. अफगाणिस्तानांत आज महंमदी संस्कृतीनें आपलें अप्रतिहत

साम्राज्य स्थापन केलें आहे तरी, अद्यापहि तेथें भारतीय संस्कृतीचे प्राचीन अवशेष मधून मधून आढळून येतात. अफगाणिस्तान व बलुचिस्तान या दोन्हीहि देशांतील शेवटचें हिंदु राज्य अकराव्या शतकाच्या सुमारासच लयास गेलें. बौद्ध संप्रदायाच्या भरभराटीच्या काळीं अफगाणिस्तानांत अनेक बौद्ध मठ, स्तूप व नवविहार होते हें त्यांचे जे आज अवशेष सांपडतात त्यांवरून सिद्ध झालें असून, बामियन नांवाच्या गांवीं तर अद्यापहि बौद्धमूर्ती दृष्टीस पडतात. अठराव्या शतकाच्या अखेरीस गझनीचा व्यापार सर्वस्वीं हिंदूंच्या हातीं होता व अद्यापहि अफगाणी तुर्कस्तानांतील हैबक गांवाच्या व्यापारपेठांत हिंदूंचीं पुष्कळ दुकानें आहेत. काफिरिस्तानांतील लोक तर १८९४ पावेतों मुसुलमान झाले नव्हते. तथापि आज अफगाणिस्तानच्या महंमदी संस्कृतींत हिंदु संस्कृतीचा जर कांहीं महत्त्वाचा अवशेष शिल्लक दिसत असेल तर तो खुद्द अफगाण लोकांस लागू पडणाऱ्या त्यांच्या पुख्तनवाली धर्मशास्त्रांतच होय. ह्या कायदेपुस्तकांत कित्येक रजपूत चालीरीतींचें व कल्पनांचें प्रतिबिंब पहावयास मिळतें. अफगाणिस्तानापेक्षां बलुचिस्तानांत भारतीय संस्कृति अधिक टिकाव धरून राहिली असें म्हटलें पाहिजे. कारण सातव्या शतकांत एक बौद्ध भिक्षु लासबेला येथें राज्य करीत असून, त्या वेळीं सर्व गंडावा प्रांत बुद्धानुयायी होता. अकराव्या शतकांत लासबेला येथें ज्या मुसुलमानांनीं आपलें राज्य स्थापिलें ते मूळचे रजपूत घराण्यांतीलच होते. मकरान नांवाचा बलुचिस्तानांत जो एक प्रांत आहे तेथील गिचकी नांवाची मुख्य जात आपणांस रजपूत वंशाची म्हणवीत असून आम्ही सतराव्या शतकांत राजपुतान्यांतून येथें आलों असें ते सांगतात. या प्रांतावर बलुचिस्तानाचा अंमल केवळ नामधारीच आहे. इराणमध्यें भारतीयांचा अंमल केव्हांहि नव्हता. तथापि तेथेंहि लुरिस्तानांत आज पुनर्जन्मावर विश्वास ठेवणारे मुसुलमान आढळून येतातच. याशिवाय आश्रेफ नांवाच्या शहरांत हिंदुस्थानांतून आली असें समजण्यांत येणारी गुदाद नांवाची एक जात आहेच. पुनर्जन्मावरील विश्वास तिबेटांतील मुसुलमानांत देखील आढळून येतो. तिबेट हें भारतीय व महंमदी संस्कृतींचें स्पर्धाक्षेत्र होतें असें म्हणतां येत नाहीं. कारण तेथें मुसुलमानांची संख्या थोडीच असून, आहेत तेहि काश्मिरी व चिनी मुसुलमानांचे वंशज आहेत. या देशांत बौद्ध संप्रदायाचा इतका पगडा बसला आहे कीं, तेथें इतर कोणत्याहि धर्माचा शिरकाव होणें शक्यच नाहीं. ट्रान्सकाकेशिया व तार्तरी हे देश आज सर्वस्वीं महंमदी संस्कृतीनेंच व्यापलेले आहेत. तथापि दोन्हीहि देशांत आज भारतीय संस्कृतीचे प्राचीन निर्जीव अवशेष मात्र मुबलक पहावयास सांपडतात. तार्तरी देशांत काश्गर प्रांतीं ख्रिस्ती शकाच्या पहिल्या आठ शतकांत बौद्ध संप्रदाय प्रचलित होता. त्या प्रांतांत व खोतान प्रांतांत कित्येक बौद्ध मूर्ती, नाणीं व संस्कृत हस्तलिखितें सांपडलीं आहेत. आवाकान्स्क शहरींहि हिंदुत्वाचे व बौद्ध संप्रदायाचे अवशेष मूर्तिरूपानें आढळून येतात. हिसार प्रांतीं तर व्यापारी वर्गांत हिंदूंचें अस्तित्व दिसून येत असून बुखारा संस्थानांतील बराचसा व्यापार हिंदूंच्याच हातीं आहे. ह्या संस्थानांतील हिंदू व्यापाऱ्यांची संख्या सुमारें ३०० असावी. सोकोत्रा येथील व्यापार आरंभीं हिंदुस्थानच्या लोकांच्याच हातीं होता; पण पुढें तो अरबांनीं घेतला. मादागास्कर बेटांत बऱ्याच शतकांपासून, व पोर्तुगीजांच्या आफ्रिकेंत दीडशें एक वर्षांपासून हिंदु व्यापारी आहेत. अबिसीनियाशीं तर हिंदु लोकांचा व्यापार पूर्वापारपासून आहे. बोर्निओ हें पूर्वीं यवद्वीपाच्या हिंदु साम्राज्याखालीं होतें. त्या बेटांतील ब्रुनीई संस्थान १५ व्या शतकापर्यंत हिंदु सत्तेखालीं होतें. त्यानंतर पुढें तेथें मुसुलमानी राज्य झालें. या देशांत हिंदुत्वाची छाप पडते न पडते तोंच तेथें महंमदी संस्कृतीचा फैलाव झाला. लखदीवचे सुलतान इंग्रजी अंमलाखालीं येण्यापूर्वीं मलबारांतील कॅनॅनूरच्या राजाचे मांडलिक होते. त्या बेटांतील भाषा मल्याळीच आहे, पण तींत अरबी शब्दांचें मिश्रण असून ती अरबी लिपींतच लिहितात. सुमात्रा बेटांतील मूळ संस्कृति हिंदूच होती व तें पूर्वीं जावानीज साम्राज्याखालीं होतें. इ. स. १२६५ त सुमात्रा येथें आदित्यवर्मा नांवाचा बौद्ध राजा होता. पण पुढें मुसुलमानांच्या स्वाऱ्या होऊन आतां तेथें मुसुलमानी संप्रदाय सर्वमान्य झाला आहे. सेलिबिस बेटांत हिंदु व महंमदी संस्कृतीच्या स्पर्धाकाळास सतराव्या शतकाच्या आरंभाच्या सुमारास सुरवात झाली. या बेटांतील बूगी भाषा संस्कृतजन्य असून तिच्यामधील ऐतिहासिक काव्यांतील वृत्तें संस्कृतसारखींच असतात. आज ह्या बेटांत किनाऱ्यावर मुसुलमानी संप्रदायाचा अंमल आहे; तथापि अंतःस्थ भागांत जुन्या चालीरीतीच दृष्टीस पडतात. मालदीव बेटांतील भाषा सिंहली म्हणजे संस्कृतजन्य असून लोक अरब व हिंदू यांच्या मिश्रणानें बनलेले आहेत. फिलिपाइन्स बेटांत मुसुलमान प्रजा थोडी आहे. तेथील जुन्या परंपरागत भाषांत संस्कृतजन्य शब्द आढळून येतात. मलाया द्वीपकल्पांत बऱ्याच प्राचीन काळीं बौद्ध संप्रदाय प्रचलित होता. इ. स. १८०५ च्या सुमारास ह्या द्वीपकल्पाचा किनाऱ्यावरील प्रदेश महंमदीयांनीं व्यापला. मलयु भाषा अरबी लिपींत लिहितात; पण तिच्यामध्यें संस्कृत व तत्साधित शब्दांचा भरणा अरबी अंशाहून अधिक असून अरबी शब्द अद्यापि त्या भाषेंत संस्कृत शब्दांप्रमाणें पूर्णपणें मिसळलेले नाहींत. मलयु वाङ्मयांत कांहीं कथा संस्कृतवरून व कांहीं अरबी भाषेंतून रूपांतर करून घेतलेल्या आहेत. जावानीज राष्ट्र इ. स. १४०० पावेतों पूर्णपणें हिंदूच होतें. आज ह्या बेटांतील लोक मुसुलमान आहेत; तथापि त्यांच्या चालीरीती मुसुलमानांहून

भिन्न आहेत. ते लोक हिंदु कायदाच वापरीत असून त्यांच्या क्रिया तर अजूनहि हिंदुधर्मच पाळतात. ह्या बेटांत अद्याप हिंदु संस्कृतीचे पुष्कळ अवशेष शिल्लक आहेत. तेथें शालिवाहन शक चालतो. जावा भाषेंतील वाङ्मय संस्कृतापासून झालें असून त्यांत भारतीय छंद आहेत. तेथील गांवांचीं व संस्थानांचीं नांवें हिंदु संस्कृतीचे अवशेष आहेत. तेथें अमात्य आणि मंत्रिमंडळ यांनीं युक्त अशी राज्यव्यवस्था आहे. अमात्य, मंत्री, पुरोहित, धर्माध्यक्ष वगैरे अधिकाऱ्यांचीं नांवें भारतीयच आहेत. लौकिक भाषेंत आणि पारमार्थिक व शास्त्रीय विषयांमध्यें भारतीय शब्दांचा भरणा आहे. बलिबेट तर अद्यापि सर्वस्वीं हिंदु आहे. तेथल्या समाजांतील चातुर्वर्ण्यव्यवस्था, ब्राह्मणांचा धोतर, उपरणें व तांबडी टोपी यांनीं युक्त पोषाख, त्यांच्या अंगावरील जानवें व रुद्राक्षमाला हीं चिन्हें, तेथें प्रचलित असलेला शालिवाहन शक व हिंदु कालगणना, महिन्यांतील ज्येष्ठ व आषाढ हीं हिंदु नांवें, सूर्यग्रहणीं सूर्य राहूकडून ग्रस्त होतो ही कल्पना, त्या देशांतील संस्कृत व संस्कृतापासूनच तयार झालेलें कविवाङ्मय, इत्यादि सर्व गोष्टी त्या बेटाच्या हिंदुत्वाची साक्ष पटवितात. हल्लीं तेथें ज्या खालच्या जातींचा ब्राह्मणांकडून तिरस्कार केला जातो त्यांत मात्र मुसुलमानी धर्म वाढत आहे. ह्या बेटाजवळच असलेलें लॉंबाक बेट इ. स. १८३९ पासून १८९४ पावेतों बलिद्वीपस्थ हिंदूंचें मांडलिक होतें. आज ह्या बेटांत महंमदी संप्रदायानें आपलें ठाणें वसविलें आहे. तथापि तेथील लोकसंख्येमध्यें जवळ जवळ एक षष्ठांश लोक बलिद्वीपस्थ हिंदू असतील.

भारतीय व यूरोपीय संस्कृतीच्या स्पर्धेस सोळाव्या शतकापासून सुरवात झाली. भारतीय संस्कृतीशीं यूरोपीय संस्कृतीच्या स्पर्धेचा विचार करावयाचा तो तिच्या पारमार्थिक व आधिभौतिक अंगांचा भेद लक्षांत ठेवून केला असतां अधिक बोधप्रद होईल. यूरोपीय संस्कृतीच्या पारमार्थिक अंगाच्या प्रसाराचा इतिहास म्हणजे ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रसाराचा इतिहास होय. खास हिंदुस्थानामध्यें इ. स. १९११ सालीं ख्रिस्ती झालेल्या लोकांचें हिंदु संस्कृतीच्या लोकांशीं प्रमाण शेंकडा दीड एवढेंच कायतें होतें. जपान, चीन, तिबेट, सिंहलद्वीप, जावा इत्यादि ज्या ज्या देशावर भारतीय संस्कृतीचा परिणाम झालेला आहे, त्या सर्व देशांत ख्रिस्ती मिशनऱ्यांचा प्रवेश झाला असून तेथें त्यांनां संप्रदायप्रसाराच्या कामांत थोडेंबहुत यश मिळालेंहि आहे. परंतु मिशनरी लोकांनां त्यांचीं सावजें अडाणी लोकांतच विशेषतः आढळून आलीं आहेत, व अशा बाटवून ख्रिस्ती केलेल्या लोकांचें प्रमाण फारच थोडें असून अशा प्रकारच्या संप्रदायप्रसाराचा सामान्य जनतेवर फारच थोडा परिणाम झाला आहे. तिबेटी लोकांसारख्या बौद्ध संप्रदायाच्या कट्टया अनुयायी लोकांत तर संप्रदायप्रसाराच्या कामांत मिशनरी लोकांस मुळींच यश मिळालें नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. यूरोपीय संस्कृतीच्या आधिभौतिक अंगाचा परिणाम मात्र ज्या ज्या देशांत ह्या लोकांचा तेथील जनतेशीं निकट संबंध आला त्या त्या देशांतील सर्वच जनतेवर कमी अधिक प्रमाणांत एकसारखा होत आहे. जपान, चीन व तिबेट हे तीन देश खेरीज करून बाकीचे भारतीय संस्कृतीनें संस्कारलेले सर्वच देश कोणत्या ना कोणत्या रीतीनें यूरोपीय राष्ट्रांच्या वर्चस्वाखालीं आले आहेत; व तेथें पाश्चात्त्य शिक्षणाच्या प्रसाराबरोबर यूरोपीय संस्कृतीचाहि तद्देशीय लोकांचे पोषाख, आचार व विचार यांवर परिणाम होत आहे. हिंदुस्थानाबाहेरील भारतीय संस्कृतीनें संस्कारलेल्या लोकांचे पोषाख व आचारविचार यांवर यूरोपीय संस्कृतीचे जे ठळक ठळक परिणाम झाले आहेत त्यांचा हिशोब पुढें दिल्याप्रमाणें आहे. सिंहली लोकांमध्यें पातराटांवर यूरोपीय संस्कृतीचा परिणाम विशेष झाला आहे. त्यांचा पोषाख व आचार यूरोपियन लोकांसारखे असून त्यांनां रोमन–डच कायदा लागतो. फिलिपाइन्समध्यें पूर्वीं हिंदु संस्कृति असतां आतां तेथील बहुतेक प्रजा ख्रिस्ती झालेली आहे. मलयु भाषेकरितां मोलक्कामध्यें लॅटिन लिपी वापरण्याचा प्रघात आहे. एका मलयु ग्रंथांत शंभु, ब्रह्मा, महादेव, विष्णु व देवी सारी यांची उत्पत्ति गुरु नामक एका अडामच्या वंशजापासून वर्णिली आहे. असलाच प्रकार महाचिनोक नांवाच्या थई म्हणजे सयामी ग्रंथांतहि आढळून येतो. त्या ग्रंथांत जनक राजाची कथा असून तींत फ्रेंच व फ्रँक्स यांचा उल्लेख आढळतो. सयामसारख्या स्वतंत्र संस्थानांतहि यूरोपीय आधिभौतिक संस्कृतीचा प्रवेश झाल्यावांचून राहिला नाहीं. तेथील राजानें शंभर वर्षांपूर्वींच इंग्रज अधिकाऱ्यांकडून आपल्या सैन्यास लष्करी शिक्षण देववून घेतलें असून त्याच्या आरमारांतहि यूरोपियन तऱ्हेच्या बोटी आहेत. हल्लीं देशांत आगगाडी झाली असून यूरोपियन सल्लागारांच्या मदतीनें तेथील राजानें आपल्या राज्यकारभारांत बऱ्याच पाश्चात्त्य सुधारणा घडवून आणल्या आहेत. ही जर मागसलेल्या पण स्वतंत्र म्हणविणाऱ्या संस्थानची स्थिति, तर जपानसारख्या पुढारलेल्या राष्ट्रानें पाश्चात्त्यांची सर्वच्या सर्वच आधिभौतिक संस्कृति उचलली असली, किंवा सिंहलद्वीपासारख्या तीन चार शतकांपासून यूरोपीयांच्या सत्तेखालीं खिचपत पडलेल्या राष्ट्रास व्यवहारांतहि रोमन डच कायदा लावण्याची पाळी आली असली तर त्यांत नवल नाहीं. तिबेटसारख्या कांहीं देशांत पाश्चात्त्यांची आधिभौतिक संस्कृति शिरकाव करूं शकली नाहीं, ती पुष्कळ अंशीं त्या देशांच्या भौगोलिक परिस्थितीमुळेंच होय.

**भारतीयसंस्कृतिशकलांचें ऐक्य.**—आपण येथें असा एक प्रश्न उपस्थित करूं कीं, जागोजागचे शिलालेख, ग्रन्थें, रीतिभाती आणि भाषांचीं स्वरूपें तपासून

दृष्टीस पडणाऱ्या हिंदु संस्कृतीच्या इतस्ततः पसरलेल्या फांद्यांचें किंवा गळून पडलेल्या पानांचें सध्यांच्या स्पर्धामय जगांत भवितव्य काय ? त्या सर्वांस सामुच्चयिक आयुष्यक्रम कांहीं आहे काय ?

या प्रश्नास स्पष्ट उत्तर द्यावयाचें तर असला आयुष्यक्रम त्यांस असल्यास फारच थोडका आहे, हें कबूल करणें भाग आहे. सर्व हिंदूंनीं एकत्र होऊन जगावर राज्य करण्याची इच्छा आज 'पॅन इस्लामिझमच्या' उत्कट भावनांपेक्षां देखील अतिशय मूर्खपणाची होईल. जगांतील अत्यंत वलवान राष्ट्रांस देखील ही आशा नाहीं, तर मनुष्यांच्या जगांतील अत्यंत दुर्वल पुंजक्यांस ही आकांक्षा धरणें वेडेपणाचें होईल. ज्या भागांत हिंदू आहेत ते भाग इंग्रजांनीं घेतल्यास या पुंजक्यांच्या शासनविषयक ऐक्याची निदान कल्पना होते. परंतु ती देखील शक्य कोटींतील आहे असें आज म्हणवत नाहीं. इतस्ततः पसरलेल्या हिंदूंची शासनविषयक एकता कल्पावयास आणखी एक उंच भरारी मारली तर ती शक्यतेच्या कोटींतील आहे असें कित्येकांस वाटेल. वोलशेव्हिझमचें उर्फ लेनिनभक्तकृत नीतिशास्त्राचें असेंच ध्येय आहे कीं मनुष्यसंघांनीं आपआपल्या इच्छेप्रमाणें संघ निर्मावे आणि त्या संघांचें एकीकरण संघांनीं आपआपल्या इच्छेप्रमाणेंच करावें म्हणजे कोणत्याहि संघानें वाटेल त्या संघाशीं संयुक्त व्हावें किंवा वाटेल त्या संघापासून वियुक्त व्हावें, (पृष्ठ ७० नियम ११ पहा). हें ध्येय जगाच्या राष्ट्रसंघांत सर्वमान्य होऊन त्या राष्ट्रसंघाच्या नियंत्रणाखालीं सर्व मनुष्यांस स्वेच्छेनें संघ निर्माण करण्याची आणि संघविषयक संयोगवियोगाची मोकळिक मिळाली तर हिंदुत्वाचीं पूर्णपणें फुटून निघालेलीं शकलें संयुज्यमान होण्याची कल्पना करावी. वर सांगितलेल्या कल्पनांशिवाय हिंदुत्वाच्या तुकड्यांच्या राजकीय एकतेची कल्पना होत नाहीं. या कल्पनेच्या शक्यतेस ज्या अटी म्हणून सांगितल्या आहेत त्या जगाच्या एकंदर प्रवृत्तींच्या स्वाभाविक परिणामाच्या अंशभूत आहेत हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे.

**बौद्धिक ऐक्य.**—राजकीय एकता सोडून दिली तरी बौद्धिक एकता किंवा दळणवळण तरी निदान ठेवणें शक्य आहे काय ? हें प्रथमतः शक्य कोटींतील दिसतें. जगांतील कोणत्याहि मनुष्यसमूहानें कोणत्याहि मनुष्यसमूहाशीं दळणवळण ठेवणें हें अशक्य नाहीं. प्रश्न येतो तो परिमाणविषयक विचार करतांना येतो. दळणवळण कितपत ठेवतां येईल ? राजकीय दळणवळण शतक दीडशतक तरी शक्य नाहीं हें मागील विचारांवरून व्यक्त होईल; आणि व्यापारविषयक दळणवळण देखील फारच नियमितपणाचें होईल हें सकारण पुढें सांगण्यांत येईल. या दोन दळणवळणांच्या अभावीं सुशिक्षितांचा दूर देशीं प्रवास आणि निवास हीं कठिणच आणि त्यामुळें बौद्धिक दळणवळण कमीच राहणार. बौद्धिक दळणवळण सुरूच झाल्यास त्यास साहाय्यक अशा अनेक गोष्टी आहेत. आमच्या अनेक पौराणिक कथांचा आमच्या दूरगत बांधवांस अगोदरच परिचय असल्यामुळें अशा कथांशीं आणि त्यांजवर रचलेल्या नाटक प्रहसनादिकांशीं तो अधिक सुलभतेनें होईल. भाषा गीर्वाण शब्दांनीं संस्कार पावल्या असल्यामुळें आणि भारतीय उपासनाविषयक शब्द आणि कल्पना त्यांच्या भाषांत व आयुष्यक्रमांत शिरल्या असल्यामुळें भारतीयांस आपल्या कल्पना त्यांच्या वाङ्मयांत घुसविण्यास कठिण पडणार नाहीं. याशिवाय जसजसा हिंदूंच्या एकंदर विस्ताराचा इतिहास तयार होत जाईल आणि तो सर्व देशांत पसरविला जाईल तसतशी सर्वांच्या एकत्वाची कल्पना अधिक दृढमूल होत जाईल यांत शंका नाहीं. जें संस्कृत भाषेच्या प्रभावामुळें सादृश्य उत्पन्न झालें आहे तें वृद्धिंगत करण्याकरितां परिश्रम झाल्यास संवर्धनक्षम आहे हें मात्र सांगतां येईल; आणि या सादृश्याशिवाय व इतिहासमूलक ऐक्याच्या कल्पनेशिवाय सर्व लोकांस एकत्र जोडण्याचें साधन आज आपल्यापाशीं नाहीं.

**व्यापारविषयक संबंध.**—आतां आपणांस आपल्या बांधवांनीं व्यापलेल्या प्रदेशांशीं व्यापारविषयक दळणवळण कितपत स्थापन करतां येईल याचा विचार करूं. भरतखंडामध्यें सामान्यतः ज्या वस्तू तयार करण्यांत येतात त्या स्थानिक गरजा भागविण्याकरितांच व त्या गरजांपुरेशाच तयार होतात. याप्रमाणेंच बहुतेक सर्व प्रदेशांत स्थानिक गरजांपुरेसा माल स्थानिक कारखान्यांतूनच तयार होतो. उदाहरणार्थ, खेड्यापाड्यांतून रोजच्या उपयोगाकरितां लागणारीं मडकीं व किरकोळ भांडीं वगैरे व रोजचे वापरावयाचे साधे कपडे व कापड इत्यादि जिन्नस बहुतेक खेडोखेडीं तयार होतात व त्यांचा खपहि आजूबाजूच्या खेड्यांतून होतो व मालहि तेवढ्यापुरेसाच असतो. कांहीं चैनीच्या वस्तू आपले राजेरजवाडे असतां एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जात. उदाहरणार्थ, गजनवीचें कापड इ०. तथापि त्या वस्तू आज प्रचारांतून गेल्या आहेत. हिंदी गांवढळ संस्कृति आणि यूरोपीय नागरिक संस्कृति यांचें मिश्रण म्हणजे सध्यांची भारतीय संस्कृति होय. पक्का माल एकतर आसपासच्या गांवांतला, नाहींतर विलायतचा अशी आज स्थिति आहे. याला अपवाद हाच कीं स्त्रियांच्या पोषाखापैकीं कांहीं जिन्नस मात्र प्रांतोप्रांतीं खपतात; व हीच गोष्ट पगडीसारख्या कांहीं पुरुषांच्या पोषाखांतील वस्तूंसहि लागू आहे. अशा तऱ्हेच्या वस्तूंचा बाहेरील प्रदेशांतहि प्रवेश होणें सोपें आहे. विशेषतः ज्या प्रदेशांत आपलें बहिर्गमन नुकतेंच झालें आहे अशा प्रदेशांत तर या वस्तूंचा प्रवेश होणें अधिक शक्य व सुलभ आहे.

आपण वापरतों त्यांपैकीं बरेंचसें कापड परदेशांतून येतें. अशा तऱ्हेचें कापड आपल्या बहिर्गत बंधूंसाठींहि परदेशांतूनच

जाईल. त्याप्रमाणेंच कांचेच्या वस्तु, औषधें, यंत्रें वगैरे ज्या जिन्नसा आपल्यालाच परदेशांतून आणाव्या लागतात त्या आपल्या बहिर्गत भारतीय बंधूंसहि परदेशांतूनच आणाव्या लागतील. मसाल्याचे जिन्नस वगैरे पूर्वींप्रमाणेंच आतांहि इकडूनच पुरविण्यांत येतील. साखर पुरविण्याचें काम जावा बेटाकडे तसेंच राहील तथापि जावा बेटाची आपणांस आतां हिंदू प्रदेशांत गणना करतां येत नाहीं.

अर्वाचीन जागतिक व्यापारामध्यें एक विशेष गोष्ट अशी आहे कीं, व्यापार चालू राहतो तो नेहमीं कच्चा माल उत्पन्न करणारे आणि कच्च्याचा पक्का माल करणारे या प्रकारच्या देशांमध्यें किंवा पक्का माल तयार करणाऱ्या दोन देशांमध्यें आपआपसांत होतो. दोन कच्चा माल पुरविणारे देश एकमेकांपासून बरेचसे वियुक्त असतात. हा सर्वसाधारण नियम उष्णकटिबंधांतील प्रदेशांस एकमेकांपासून वियुक्त ठेवण्यास कारण झाला आहे. हा स्थूल नियम झाला, पण यास कित्येक महत्त्वाचे अपवाद आहेत. दोन निराळ्या कच्चा माल उत्पन्न करणाऱ्या देशांतहि अदलाबदल करण्यास कांहींतरी सांपडतेंच. शिवाय कच्चा माल उत्पन्न करणारा देश आणि पक्का माल उत्पन्न करणारा देश अशी सफाईदार विभागणी कोठेंच झालेली नाहीं. आपला जावाशीं आणि चीन देशाशीं जो व्यापार चालतो तो बराच मोठा आहे, आणि चीन, जावा व हिंदुस्थान हे सर्व देश कच्चा माल उत्पन्न करणारे आहेत. कांहीं वर्षांपूर्वी कनिष्ठ प्रकारच्या कापडाच्या हजारों गांठी आणि अफूच्या हजारों पेट्या हिंदुस्थानांतून चीन देशास जात असत; आणि चीनमधून अनेक प्रकारचा माल येथें येत असे. अलीकडे बसऱ्यास आपला व्यापार जोरानें सुरू झाला आहे. पण बसऱ्यास कोणी पक्का माल करणाऱ्या देशाचें द्वार म्हणणार नाहीं. हातमागाचें कापड जगाच्या बाजारांतून म्हणजे लोकांच्या मागणीच्या दृष्टीनें नष्ट झालें नाहीं आणि अनेक देशांत कांहीं विशिष्ट प्रकारचें कापड होत असल्यामुळें आणि अन्य प्रदेशांत देखील त्याची अभिरुचि उत्पन्न होणें शक्य असल्यामुळें पक्का माल करण्यांत मागसलेले म्हणून जे देश समजले जातात त्या देशांचाहि एकमेकांत व्यापार चालणें शक्य आहे. याशिवाय स्थलांतरक्षम जीं खाद्यें व भोज्यें आहेत आणि जीं करण्यास मोठमोठाले कारखाने लागत नाहींत त्यांचाहि व्यापार पुष्कळ होणें शक्य आहे, व होत आहे. शेतकरी देशांतहि बाहेरचा कच्चा माल पुष्कळ खपतो. खजूर, भुईमूग, बटाटे, वगैरे साधे जिन्नस देखील शेतकरी हिंदुस्थानांत बाहेरून येतात. पक्का माल उत्पन्न करण्याच्या बाबतींत मागसलेल्या दोन देशांमध्यें व्यापारविषयक दळणवळण सुलभ करणारें दुसरें एक कारण म्हटलें म्हणजे उतारपेठेच्या स्वरूपाचीं बंदरें होत. उतारपेठेच्या बंदरांत एका देशांतून माल येतो आणि दुसऱ्या देशांत जातो. कधींकधीं तो उतारपेठेच्या देशांत कांहीं संस्कार पावल्यानंतर दुसऱ्या देशांत जातो. या पद्धतीनें वस्तूत्पादनामध्यें मागसलेल्या दोन देशांतहि व्यापारी दळणवळण चालू रहातें. मुंबई व सिंगापूर हीं बंदरें अशींच उतारपेठेचीं आहेत. आफ्रिकेंत खपणारा विलायती माल पुष्कळसा मुंबई बंदरांतून जातो.

दोन देशांमधील व्यापार कसा काय चालेल याविषयीं विचार करितांना दोन कच्चा माल उत्पन्न करणाऱ्या देशांमध्यें वियुक्तता राहणार या स्थूल व ओबडधोबड नियमावर परिणाम करणारा दुसरा नियम नजरेस येतो तो म्हटला म्हणजे ज्या देशांतील व्यापारी वर्ग अधिक साहसी असेल आणि व्यापारास उत्तेजन देणाऱ्या पेढ्या, नेआणीच्या सोई वगैरे ज्या देशांत अधिक असतील त्या देशाचा इतर देशाशीं संबंध अधिक होतो. दोन देशांमध्यें व्यापारविषयक संबंध घडण्याचीं व वाढण्याचीं अवश्य अंगें दोन आहेत. एक परसरापेक्षित माल आणि दुसरें त्या दोन देशांतील व्यापारसाधनें. या नियमाकडे लक्ष दिलें तर हिंदूंनीं वसाहत केलेले देश कच्चा माल उत्पन्न करणारेच आहेत म्हणून निराश व्हावयास नको. या प्रकारच्या निरनिराळ्या देशांमध्येंहि व्यापार वाढणें अशक्य नाहीं.

**भारतीयसंस्कृतिप्रसाराचें महत्त्व.**—क्यांबोडिआ (कांबोज) आणि बलिद्वीप येथील लोक हिंदु आहेत, आणि पूर्वेकडील क्याचशा भूभागावर भारतीय संस्कृतीचा एका काळीं परिणाम झाला होता या गोष्टीचें भावी इतिहासांत महत्त्व काय? आमच्या व्याख्यात्यांनां अभिमानपूर्ण आणि आवेशयुक्त वाक्यांनीं आपल्या पूर्वजांची ख्याती गावयास हा पुरावा उपयोगी पडेल, यापलीकडे या स्थितीचें महत्त्व कांहींच नाहीं काय? या प्रश्नास जवळ जवळ कांहींच नाहीं असें उत्तर द्यावयास हरकत नाहीं. तथापि या अनुपयुक्ततेच्या विधानास अपवादादाखल ज्या गोष्टी पुढें मांडतां येतील त्या मांडल्याच पाहिजेत. संस्कृतीचा परिणाम भाषेवर व लोकांच्या मनोरंजनाच्या साधनांवर टिकतो. एकाच संस्कृतीचा दोन राष्ट्रांवर परिणाम झाला असल्यास त्या दोन्ही राष्ट्रांतील निरनिराळ्या भाषांपैकीं दोहोंमध्यें जर कठिण अर्थ व्यक्त करणारे शब्द एकाच संस्कृत भाषेपासून आले असतील तर त्या दोघी एकमेकींवर परिणाम घडवितील. एका राष्ट्राच्या भाषेला अधिकाधिक प्रौढ स्वरूप येऊं लागलें म्हणजे तें दुसऱ्याच्या भाषेलाहि येईल. मराठींत आपण प्रौढ विचार व्यक्त करण्याकरितां संस्कृतभाषामूलक जे शब्द वापरूं तेच सर्व देशभाषांचा एकमेकांवर परिणाम होण्याचे दिवस आले म्हणजे ब्रह्मीभाषेंत देखील येणें अशक्य नाहीं, आणि ब्रह्मी आणि सयामी वाङ्मयांचा एकमेकांवर परिणाम होणेंहि अशक्य नाहीं. उन्नतिमार्गावर जाण्यास सर्व लोकांस स्वभाषेची कांस धरूनच गेलें पाहिजे. भाषेंत जर ग्रंथ किंवा शब्द यांची अल्पता असेल तर ती दूर करावी लागते, आणि भाषेच्या एकंदर नादकलापाशीं आणि श्रवण

## जावांतील वाद्यें


































## यवद्वीपांतील शेतकीचीं-आउतें

















परिचयाशीं जुळतील असलेच शब्द परभाषेंतून घेतां येतात. यामुळें ज्या ज्या भाषांवर संस्कृत भाषेनें संस्कार केलेला आहे त्या त्या भाषांस अधिकाधिक शब्द पुरविण्याचा पूर्ण मक्ता जरी संस्कृत भाषेस मिळाला नाहीं तरी त्या व्यापारांतील एक मोठा हिस्सा संस्कृत भाषेस मिळेल यांत शंका नाहीं, आणि सर्वांत शब्द जर एकाच भाषेपासून घ्यावयाचे आहेत तर घेतलेल्या शब्दांमध्यें किंवा नवीन पाडलेल्या संज्ञांमध्यें एकरूपता रहावी ही भावना नंतर यावयाचीच. पूर्वेकडील राष्ट्रांस पाश्चात्त्य भाषांचा आत्यंतिक संस्कार होण्यापूर्वी जर उन्नतीची इच्छा व तिजबरोबरच वाङ्मयोद्धारेच्छा उत्पन्न झाली तर भारतसादृश्य जिवंत राहण्यास व वृद्धिमान होण्यास अवकाश आहे. तथापि जर उन्नतीच्या भावना लौकर उत्पन्न झाल्या नाहींत आणि पाश्चात्त्य भाषांस आपलें कार्य करण्यास अवसर सांपडला तर कोंकणी भाषेस गोवानिजांच्या मुलुखांत किंवा जातींत जें स्वरूप मिळालें आहे तें स्वरूप संस्कृत भाषेचा परिणाम झालेल्या तेथील भाषांस मिळेल. देश्यभाषेस अभियुक्त शब्दांचा पुरवठा करण्याच्या बाबतींत संस्कृत भाषेशीं स्पर्धा करणाऱ्या भाषा म्हटल्या म्हणजे अरबी, चिनी व ज्या पाश्चात्त्य भाषेशीं अधिक संबंध येईल ती पाश्चात्त्य भाषा ह्या होत. एका भाषेवरच अभियुक्त शब्द देणाऱ्या दोन भाषांचे संस्कार घडले म्हणजे दोन भाषाप्रकार निर्माण होतात त्यांचीं उदाहरणें येणेंप्रमाणें:— (१) हिंदी व उर्दू (२) मल्याळी व लखदिवी (३) सिंहली व मालदिवी (४) मलयु, प्राचीन व अर्वाचीन (५) हिंदु कोंकणी व ख्रिस्ती कोंकणी (६) जुनी जावानीज व नवी जावानीज इत्यादि.

एकाच भाषेंतील शब्द जर दुसऱ्या निराळ्या परंतु मूलतः भिन्न भाषेनें घेतले तर त्याचा एक परिणाम असा होऊं लागतो कीं, त्या दोघांचेंहि संगीत एकच होऊं लागतें. उदाहरणार्थ, आंध्र व द्राविड या भाषा संस्कृत भाषेशीं मूलतः असंबद्ध अशा अगदीं निराळ्या भाषा होत. तथापि या दोहोंवरहि संस्कृत भाषेचा संस्कार झाला आहे आणि त्यामुळें दाक्षिणात्यांचें संगीत जरी उत्तरेकडील संगीताहून थोडेंसें भिन्न राहिलें आहे, तरी दोन्हीं संगीतें दोन्हीं प्रदेशांतील लोकांचें मनोरंजन करूं शकतात. भारतीय संगीत या दृष्टीनें कोठवर पसरत जातें आणि जाणें शक्य आहे याचा विचार झाला पाहिजे. हा विषय येथील संगीतशास्त्राच्या परिषदांकडून जितक्या लौकर विचारांत घेतला जाईल तितकें चांगलें. आम्ही पूर्वेकडील देशांतील वाद्यांचीं चित्रें दिलीं आहेत त्यावरून संगीतशास्त्रांत देखील कांहीं नातीं निघतील अशी कोणासहि कल्पना येईल. मागें दिलेल्या मलयु व यावद्वीप भाषांतील ग्रंथांच्या यादीवरून आपणांस असें दिसून येईल कीं, त्या देशांतील बरेचसे कथाग्रंथ भारतीय कथाग्रंथांशीं संबद्ध आहेत. त्यामुळें सिनेमासारख्या मनोरंजनाच्या साधनांचा सार्वत्रिक प्रसार झाल्यानंतर भारतीय कथांचे चित्रपट भारतीय कारखानदारांनां तिकडे खपवितां येणें शक्य होईल.

याशिवाय हीहि गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, पूर्वेकडील बऱ्याचशा देशांत व दक्षिणेंत सिंहलद्वीपांत शालिवाहन शक चालतो, आणि आपले वैद्यक ग्रंथहि या देशांत परिचित आहेत. तेव्हां ज्योतिष्यांच्या व वैद्यांच्या संमेलनांमध्यें तिकडील लोक बोलवून त्यांच्याशीं संबंध जोडणें हें एक काम अजून आपल्याला करावयाचें आहे.

ब्रिटिश गियाना, त्रिनिदाद, जमेका, फिजी, नाताळ वगैरेसारख्या प्रदेशांशीं म्हणजे जेथें भारतीयांचा नुकताच प्रवेश झाला आहे अशा प्रदेशांशीं आपला संबंध अधिक निकट राहील. या प्रदेशांतील लोक ब्रिटिश साम्राज्याच्या एकाच छत्राखालीं असल्यामुळें भारतांतील लोकांचा व तेथें गेलेल्या भारतीयांचा संबंध राहणें सुलभ झालें आहे, व तेथील लोकांनीं राजकीय चळवळींत भारतीयांकडून अपेक्षिलेलें साहाय्य भारतीयांकडून सहज पुरविण्यांत येत आहे. भरतखंडांतील छापलेल्या ग्रंथांचाहि या प्रदेशांत प्रसार होतो. ब्रिटिश गियानामधील अधिकाऱ्यांनीं डॉ. कोमिन्स यांजकडे पाठविलेल्या रिपोर्टांत असें नमूद केलेलें आढळतें कीं गियानामध्यें रामायणाच्या प्रतींचा खप होतो व तेथें कांहीं भारतीय भाषांमध्यें वर्तमानपत्रें निघतात. वसाहतींमध्यें अलीकडेच गेलेल्या भारतीयांशीं संबंध कायम ठेवण्याच्या कामीं आपल्या भाषांचा कितपत उपयोग होईल हें आजच निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. भारतीय राजकीय विचार म्हणजे दुःखाबद्दल ओरडणें हा होय. त्या विचाराचा अंशरूप भाग म्हटला म्हणजे परद्वीपस्थ भारतीयांचीं दुःखें होत. कांग्रेसशीं संबंध ठेवण्यासाठीं तेथेंहि संस्था तयार होत आहेत, आणि येणेंप्रमाणें शासनविषयक विचारांसंबंधानें स्वदेशस्थ भारतीयांची आणि परदेशस्थ भारतीयांची दृष्टि एक होऊं लागली आहे.

या वरील माहितीवरून सामान्य सिद्धांत एवढाच काढावयाचा कीं नवीन वसाहतींमधील भारतीयांचा हिंदुस्थानाशीं संबंध राहत जाईल. कारण कीं, त्या प्रकारची आवश्यकता जीवनकलहामुळें उत्पन्न झाली आहे. तथापि हिंदूंचें विशिष्टत्व राहून त्या समुच्चयाचा विकास होणें शक्य आहे कीं नाहीं या संबंधानें निश्चयपूर्वक विधान करतां येत नाहीं.

**हिंदु संस्कृतीचें भवितव्य.**—हिंदूंच्या भवितव्याविषयीं विचार करतांना आणि हिंदु संस्कृतीचा किंवा हिंदूंच्या आधुनिक वैयक्तिक किंवा सांघिक जीवितक्रमाचा अंश असलेल्या कांहीं गोष्टींचा जो लोप होत आहे त्याविषयीं आनंद किंवा दुःख मानावयाचें हें ठरवितांना जगाच्या क्रमासंबंधीं आणि आपल्या हिताहितासंबंधीं आपल्या कल्पना व्यवस्थित असल्या पाहिजेत. देशाच्या व

धर्मांच्या म्हणजे आचारांच्या एकत्वामुळें ज्या समुच्चयाविषयीं एकत्वाची भावना व्यक्त होते त्या समुच्चयाचें हित व्हावें या प्रकारच्या भावना मनुष्यास क्षुधातृषेसारख्या नैसर्गिक नाहींत. त्या सर्व शिक्षणमूलक आणि विचारमूलक आहेत. व्यक्तींचें हित साधण्यासाठीं समुच्चयाची आवश्यकता असते आणि त्या समुच्चयाचें संरक्षण व्हावें म्हणून त्या समुच्चयाच्या ठायीं भक्ति उत्पन्न करण्यांत येते. समुच्चयभक्ति ही संयुक्तस्वार्थज्ञानमूलक असते. समुच्चयभावना जागृत रहाण्यासाठीं जे अनेक उपाय योजिले जातात त्यांत विसदृश समाजाविषयीं मत्सर व तिरस्कारबुद्धि स्वसमुच्चयांतर्गत व्यक्तींत उत्पन्न करणें, वैसादृश्याचा तिरस्कार किंवा विटाळ मानणें, आपल्या परंपरेंत किंवा तत्कालीन समाजांत उत्पन्न झालेल्या नियमांनीं व्यक्तींस जखडणें यांचा समावेश होतो. या प्रसंगीं काळजी वाळगावयाची ती एवढीच कीं, ज्या समाजवैशिष्ट्याविषयीं भावना हृदयांत उत्पन्न होते तें वैशिष्ट्य कोणतें हित साधण्यासाठीं उपायरूप आहे याची चिकित्सा व्हावी. म्हणजे या उपायांनीं जें साध्य इष्ट आहे तें प्राप्त होतें काय, इष्ट साध्य साधण्यासाठीं साधन म्हणून जे उपाय प्रचलित होत असतात ते साध्यरूपी होऊन त्याची साधना होण्यासाठीं म्हणून समाजवैशिष्ट्याचीं अंगें संरक्षिलीं जात आहेत काय, या प्रश्नांची छाननी व्हावी.

हिंदुत्व जर केवळ उपासनामूलक नाहीं, आणि विशिष्ट मतांचा संप्रदाय होऊन उत्पन्न झालेलें नाहीं, तर त्याची पुढें काय गति होईल याचा विचार करणें अप्रासंगिक होणार नाहीं. पुढें दाखविण्यांतच येईल कीं, श्रौतधर्म म्हणजे त्रेताग्नीवर होणारीं कर्में हीं प्राचीन कालांतच घरोघर नव्हतीं, आणि अग्निहोत्र प्रत्येकानें घेण्याचा परिपाठ वेदकालींच संपुष्टांत येत चालला होता, आणि ज्या कारणामुळें हा अजीबात बंद पडत चालला तींच मनुष्यस्वभावमूलक कारणें त्या श्रौतधर्माचा पुनरुद्धार शक्य होण्यास विघातक होतील. सध्यां श्रौतकर्मांचें ज्ञान असलेले पुरुष महाराष्ट्रांत १५।२० असतील किंवा नाहीं याची शंका आहे. शिवाय अग्नींत कांहीं टाकलें तर अग्नि तें देवांपर्यंत नेऊन पोंचवितो ही भावना, आणि आठ वसू, बारा आदित्य इत्यादि दैवतें यांवर विश्वास हीं पुन्हां प्रस्थापित करतां येतील, असें वाटत नाहीं. पुराणांमध्यें ज्या दैवतांचें महत्त्व वर्णिलेलें आहे तीं दैवतें देखील देशांतील विद्वान् लोकांस आकर्षीत नाहींत. देवळांमध्यें शिष्ट लोक क्वचितच जातात आणि घरोघरची देवपूजा संपुष्टांत येत चालली आहे. स्मार्तधर्महि श्रौतधर्माप्रमाणें नाहींसाच झाला आहे. पाकयज्ञ तरी आज कोण करतो? संध्या देखील घरोघर आतां बंद पडत चालली आहे. संस्कारांचें महत्त्व पहावें तर तेंहि आज राहिलेलें दिसत नाहीं. लग्न करणें मनुष्यास अवश्य आहे, तें कोणत्या तरी संस्कारानें झालेंच पाहिजे; तथापि तें करतांना जे मंत्र म्हणावयाचे ते वेदमूलक आहेत कीं नाहींत याची चौकशी तरी कोण करतो आहे. लग्न कोणत्या तरी संस्कारानें कसें तरी लागलें म्हणजे झालें इतकीच लोकांची वृत्ति आहे.

**जातिभेद आणि चातुर्वर्ण्य.**—हिंदुसमाजांतील जातिभेद आहे हा कोणाहि विचारवान किंवा धर्मशास्त्र उत्पन्न करणाऱ्या ऋषींच्या योजनेनें उत्पन्न झाला नसून तो केवळ समाजामध्यें असलेला नियंत्रणाभाव आणि ऋषींनीं सुरू केलेलें कार्य अपूर्ण राहिलें त्यामुळें उत्पन्न झाला आहे. आजच्या चार हजार विविध जाती एका पूर्णाचे तुकडे तुकडे पडून निघाल्या नाहींत. अनेक राष्ट्रें, निरनिराळ्या ठिकाणाहून आलेले लोक आणि संस्कृतीच्या अनेक पायऱ्या दर्शविणारे मनुष्यसमूह यांचें एकीकरण करण्यासाठीं प्राचीन ब्राह्मणांनीं जो प्रयत्न सुरू केला त्यास मुसुलमान व यूरोपीय यांच्या स्वाऱ्यांमुळें अडथळा उत्पन्न झाल्यामुळें तें कार्य अर्धेंच पडलें आहे. ऋषींचें, ब्राह्मणांचें आणि धर्मशास्त्रवेत्त्यांचें जें सामाजिक ध्येय होतें तें ध्येय चातुर्वर्ण्य होय. चातुर्वर्ण्यसंस्थापना म्हणजे जातिभेदाचा नाश होय. चातुर्वर्ण्याची कल्पना, जर आजच्या चातुर्वर्ण्य किंवा जातिभेद या दोहोंपैकीं कांहीं एक न समजतां खंडन मंडन करूं पाहणाऱ्या लोकांची बाजूस ठेवून, वेदांची किंवा स्मृतींची घेतली तर चातुर्वर्ण्य हें तत्त्व समाजांत टिकण्याजोगें आहे, आणि हें तत्त्व विश्वव्यापी होऊन सर्व जगाच्या संस्कृतीचा महत्त्वाचा अंश होऊं शकेल. तथापि येत्या शंभर वर्षांपुरताच विचार केला तर जातिभेदनाशक म्हणजे चातुर्वर्ण्यसंस्थापक कार्य फारसें व्हावयाचें नाहीं. अज्ञ व निरक्षर समाज आणि जगाशीं अपरिचय असलेला आणि शिस्तवार विचार न करणारा मध्यमवर्ग यांनीं युक्त असा जो आजचा हिंदुसमाज त्या हिंदुसमाजांत अत्यन्त सामान्य सुधारणा करण्यास देखील फारच अडचणी आहेत. तर सर्व जगांत अत्यन्त कठिण असें कार्य जें चातुर्वर्ण्यसंस्थापन तें पार पडण्याची नव्हे तर पार पाडण्याच्या रस्त्यास लागण्याची तयारी होण्यास येतीं शंभर वर्षें पुरतील किंवा नाहीं हा मोठाच प्रश्न आहे.

समाजांत चारच वर्ण आहेत ही कल्पना टिकेल असें खात्रीनें म्हणतां येत नाहीं. तरी ज्या आर्थिक आणि सामाजिक परिस्थितींत ही कल्पना जोपासली गेली ती आज नाहीं असें म्हणतां येईल. समाजाचें वर्गीकरण करितांना पूर्वीं आपण फारच लहान समुच्चय लक्षांत घेत होतों, आणि उत्पादन व व्यापार यांच्याहि कल्पना अत्यंत प्राथमिक स्वरूपाच्या होत्या. आज पाश्चात्त्य देशांत आणि विशेषेंकरून अमेरिकेंत जी समाजघटना दिसत आहे ती समाजघटना पुढें मागें सर्व जगभर पसरण्याचा संभव आहे. कां कीं, बाजारांत आलेल्या वस्तू विकण्यामध्यें जी स्पर्धा उत्पन्न होते त्या स्पर्धेमुळें वस्तूंच्या उत्पादनाची घटना बदलावी लागते. लहान प्रमाणावर कारखाने असावे, किंवा उत्पादन कारखान्यांत न होतां

उपदेशकानें आपल्या मनांत उभारलेल्या गोजिरवाण्या झोंपड्यांतून व्हावें, असलीं तत्त्वें देशाभिमान ओतप्रोत भरलेल्या किंवा आचरणानें अत्यंत पवित्र अशा पुढाऱ्यांनीं कितीहि अट्टाहासानें जरी सांगितलीं तरी त्यांचें अवलंबन सर्वथैव अशक्य आहे. एका देशांत जर भांडवलाचें एकीकरण झालें, मजुरांचीं सैन्यें कामास लावलीं गेलीं आणि एकाच संस्थेकडून लाखों किंवा कोट्यवधि रुपयांचा माल विकला जाईल अशा विक्रीच्या संस्था उभारल्या गेल्या आणि अनेक क्रियापरंपरा होत असतां प्रत्येक क्रियेनंतर होणारी नासधूस पोटधंद्यांचें उत्पादन करून टाळली, शिस्तवार आणि पुष्कळ काम करून घेण्यासाठीं मजुरांस तालीम दिली तर जी मोठी काटकसर उत्पन्न होते ती उत्पादित वस्तु फार थोडक्या किंमतीस विकतां येणें शक्य करील. एका देशांत हा प्रकार झाला तर दुसऱ्या देशास तेंच करणें आणि जिवंत राहणें किंवा उत्पादनपद्धति प्राथमिक ठेवून मनोहर वाक्यें उच्चारणाऱ्या पुढाऱ्यांचे गुण गात मरून जाणें याखेरीज तिसरा उपाय नाहीं. परदेशांत जी स्थिति आली तीच हिंदुस्थानांत पुढें येणार आणि ती आपली सर्व समाजघटना फिरविणार हें भवितव्य टाळणें शक्यच नाहीं.

**धर्मशास्त्राचें भवितव्य.**—धर्मशास्त्र म्हणून जो नियमसमुच्चय आहे त्याचें भवितव्य देखील थोडेंबहुत ठरलेलेंच आहे. प्राचीन काळापासून ब्रिटिश काळापर्यंत येत जावें तों तों नियमांचें लिगाड अधिकाधिक वाढत आहे, आणि स्वातंत्र्य नाशाच्या कालीं त्याचा अतिरेक होत होता. सोंवळें ओवळें पराशरामध्यें पुष्कळ वाढविलें. या सोंवळ्याच्या कल्पनांनीं हिंदुसमाजास त्याच्या वाईट दिवसांत अलिप्त राखून हिंदू म्हणून त्याचें स्वतंत्र अस्तित्व रक्षण केलें त्या देखील पुढें नष्टप्रायच होणार. एक तर त्यांतील अनेक नियम फार संकुचित बुद्धीनें तयार झालेले आणि परस्परविरोधी आहेत, शिवाय जगांतील अनेक राष्ट्रांचा व लोकांचा एकमेकांशीं जो संबंध वाढत आहे त्याच्या योगानें ते नियम रहाणेंच शक्य नाहीं. पाखंडी आणि प्राटेस्टंट लोकांशीं कसें वागावें म्हणून पोपनें जे नियम कॅथोलिकांस घालून दिले त्यांत त्यांशीं संभाषण करूं नये, पत्रें पाठवूं नयेत इत्यादि विधानें आहेत, तथापि आज तसें वागणें कोणा भाविक कॅथोलिकास शक्य आहे ? आज सोंवळें ओवळें साफ बुडालें आहे. पुण्यांत अनेक चहाच्या दुकानांत चहाचे कप आणून देण्यास कुणबीच आहेत. सोडावाटर कोणी तयार केलें याची चौकशी न करतां सर्वच घेतात आणि बिस्कुटांची गणना "निर्लेप" पदार्थांत झाली आहे. सोंवळ्याच्या कल्पनांवर आज ब्राह्मणस्त्रियांचा देखील विश्वास बेताचाच आहे ही गोष्ट वारंवार प्रत्ययास येते. पूर्वीं मोठा विटाळ म्हणजे विटाळशीचा असे, तो देखील आतां कमी झाला आहे. विवाहित स्त्रिया विटाळशी म्हणून बाजूला अजून बसतात पण पुष्कळ ठिकाणीं कुमारिकांस बाजूस बसविण्याची चालच नाहीं. रजोदर्शनापूर्वीच मुलीचें लग्न केलें पाहिजे असें समजणाऱ्या हिंदूंमध्यें व विशेषेंकरून ब्राह्मणांमध्यें आपली कुमारिका मुलगी बाहेरची झाली हें सांगण्यास किंवा दिसूं देण्यास संकोच वाटे आणि त्यामुळें रजस्वला कुमारी स्वतंत्र वसूं देत नसत; त्याच्यामुळें आतां विटाळशीचा विटाळच नाहींसा होत चालला. मुलींच्या शाळांतून तो आतां लक्षांतच घेत नाहींत. शिवाय आज पुष्कळ कुमारिकांस बाजूस बसण्याचा राग येतो. त्यांनां असें वाटतें कीं आपल्या शरीराची स्थिति आज कशी आहे याची जाहिरात देण्यास ही चाल भाग पाडते. शिवाय विटाळशी हा शब्द गृह्य पण सभ्य मराठी भाषेंत रूढ नाहीं. हा शब्दच वायकांसमोर उच्चारण्याची जर पुरुषांस मनाई आणि स्त्रियांस लाज तर त्या स्थितीची जाहिरात देणें अधिक लाजिरवाणें नाहीं काय असें त्यांस वाटतें. विवाहित स्त्रियांच्या मासिक अशौचाचा कडकपणा देखील नियमित झाला आहे.

स्पर्शामुळें जो विटाळ होतो तो संक्षेपांत आला आहे एवढेंच नव्हे तर सुतकहि लोक कमी पाळूं लागले आहेत. घराबाहेर म्हणजे कचेरींत, कारखान्यांत, शाळेंत आतां सुतक कोणी पाळीत नाहीं. ग्रहणप्रसंगीं सुतक समजून तें पाळण्याचा प्रघात शहरांतून तरी अनेक वर्षांपूर्वीचा आचार म्हणून कांहीं लोकांस ठाऊक असतो एवढेंच.

याशिवाय ऐतिहासिक पद्धतीचा आणि तन्मूलक विचारांचा पगडा दिवसानुदिवस वाढत जाणार. विष्णु हें सूर्याचेंच रूपकात्मक नांव आहे हें सर्व लोकांस समजलें म्हणजे विष्णूवर तरी भक्ति कशी रहाणार? कारण आज सूर्य, चंद्र यांची उपासना कोणी करीत नाहीं. पूर्वीं समाजांतील एका शास्त्रज्ञवर्गांत असलेलें ज्ञान सार्वत्रिक झालें म्हणजे पूर्वीं तें एका अत्यंत लहान वर्गांत असल्यामुळें इतर वर्गांतील लोकांच्या अज्ञानांवर कांहीं लोकांस आपला जीवनक्रम कंठण्यास मदत होत होती ती देखील बंदच पडत चालली आहे.

कोणत्या गोष्टी जातील हें सांगितलें, तसें टिकेल काय याचा विचार केला पाहिजे. हिंदुसमाजांत परस्परांस बांधणाऱ्या अशा गोष्टी कांहींच टिकल्या नाहींत तर ती गोष्ट मोठी नुकसानीची होईल. ख्रिस्ती व मुसुलमान हे मात्र पृथक्पणें स्वतंत्र राहतील. त्यांस एकत्र बांधणाऱ्या ख्रिस्त आणि महंमद या दोन्ही व्यक्ति ऐतिहासिक आहेत, आणि त्या व्यक्तींविषयीं असणारा आदर त्यांस एकत्र ठेवील. हिंदूंचा त्यांच्याविषयीं वाटणारा विटाळ मात्र जाईल. हिंदूंस एकत्र बांधण्याऱ्या दोऱ्या ढिल्या व्हावयाच्या आणि मुसलमानांचा विटाळ नाहीं ही कल्पना दृढ होत जावयाची या हिंदूंच्या विचारविकासाचा परिणाम मुसुलमान व ख्रिस्ती यांची संख्या वाढविण्यासाठींच होईल काय?

ही शक्यता आहे पण संभाव्यता नाहीं. ही गोष्ट खरोखरीच घडून येण्यास अडचणी पुष्कळ आहेत. एक तर विटाळाची कल्पना नाहींशी होण्यास व ऐतिहासिक पुरुषापासून किंवा सृष्टिचमत्कारापासून उत्पन्न झालेल्या आणि पौराणिक कथांनीं गाइलेल्या दैवतांवरचा विश्वास उडण्यास बरीच विचारजागृति अवश्य होते. ही विचारजागृति एकाएकीं होत नाहीं. ज्या समाजामध्यें निरक्षरताच पुष्कळ आहे आणि ज्यांत शंभरपर्यंत आंकडेहि मोजतां येत नाहींत असा वर्ग पुष्कळ आहे, तो समाज परंपरेपासून एकदम तुटेल कसा? शिवाय ईश्वरविषयक स्वतंत्र कल्पना उत्पन्न करील आणि ऐतिहासिक स्वरूपाशीं परिचय करील इतकी विचारजागृति उत्पन्न होण्यापूर्वींच, इतिहासाच्याच ज्ञानामुळें देशांत आत्मीय भावनाहि तीव्रतेनें तीच ऐतिहासिक विचारशक्ति जागृत करील. आत्मीय भावनेनें जेव्हां पुढील पिढी आपल्या ग्रंथांविषयीं अभिमान धरील, तेव्हां सर्व जुन्या ग्रंथांमध्यें अभिमान धरण्याजोगा भागहि पुष्कळच आहे, हें त्यांच्या मनावर ठसेल.

पुढील पिढीस ज्याबद्दल अभिमान बाळगतां येईल अशा गोष्टी आपल्या वाङ्मयांत थोड्या थोडक्या नाहींत. वेदांचें अतिप्राचीनत्व, उपनिषदांतील गंभीर विचार, जैमिनीची शब्दप्रामाण्यावरून अनुमानपरंपरा काढण्याची विचारपद्धति, पुराणांत गाइलेल्या पुरुषांचीं मनोहर चरित्रें, लोकांपुढें ध्येयरूप होतील अशा थोर स्त्रीपुरुषांचीं चरित्रें, तीं समजावून देण्यासाठीं उत्पन्न झालेलें महाभारतांतील नीतिशास्त्र, वाल्मीकीचा काव्यावेश, या सर्व गोष्टी अभिमानास कारण होऊन लोकांची पूज्यताबुद्धि जरी नाहीं तरी प्रेम हें खास रक्षितीलच. आज आपणांस एखादा मनुष्य मुसुलमान झाला तर दुःख होतें, याचें कारण तो अनेक दैवतें सोडून एकाच निराकार देवाची उपासना करितो हें नव्हे; किंवा कुलस्वामिनीस, पितरांस, सर्पांस किंवा कावळ्यांस बळी देत नाहीं, श्रावणी करीत नाहीं किंवा श्राद्ध करीत नाहीं हेंहि नव्हे. आपणांस दुःख जें होतें तें तीन कारणांमुळें होतें. एकतर तो स्वजातीस मुकतो, एवढेंच नव्हे तर तो स्वजातिनाशक संघास मिळतो आणि आपण ज्यास भ्रष्ट आचार समजतों त्यांचा तो अवलंब करितो आणि कालांतरानें त्याचे वंशज वेद, इतिहास, पुराणें यांपासून दूर जाणार म्हणून होय. असें शक्य आहे कीं, ज्यास आजचे लोक भ्रष्ट आचार समजतात आणि ज्यास परकीय लोक भ्रष्ट आचार समजत नाहींत असे आचार आपल्या समाजांत वृद्धिंगत होतील. गोमांसाहार वेदविहित व सूत्रविहित आहे ही गोष्ट लोक वेदग्रंथ व सूत्रग्रंथ स्वतःच वाचूं लागले म्हणजे कशी लपून राहील? ही शक्यता मनांत ठेवली तर वाह्यांचा तिरस्कार करविणाऱ्या गोष्टींपैकीं एक गोष्ट गळेल आणि हिंदूचा मुसुलमान झाला तर ज्या गोष्टीमुळें दुःख होईल अशा दोनच गोष्टी उरणार. त्यांतील पहिली गोष्ट म्हणजे तो विरुद्ध समाजांत जाणार. ही आपणास दुःखकारक वाटण्यास दोनच कारणें दिसतात. एक मुसुलमानांशीं हिंदूंचें असादृश्य आणि दुसरें स्वसंघांत पुनरागमनाची अशक्यता. ही अशक्यता पूर्ण असल्यामुळें एखादा मनुष्य गळाला तर त्याचें दुःख अधिक होतें. तसेंच तो परकीय संस्कृतीच्या पटलाखालीं असलेला बनेल आणि आपल्या ग्रंथांचें पुढें मागें महत्त्व नाहींसें करून टाकण्यास जो संघ बद्धपरिकर आहे त्या संघामध्यें अंतर्भूत होईल एवढें एक भय उरतें.

उपास्यांच्या भिन्नतेविषयीं उदासीन आणि बाह्यांसारखेच किंवा बाह्यसमाजापासून अतिशय भिन्न नाहीं असे आचारविचार असलेल्या समाजाला आपलें विशिष्टत्व ज्यामुळें भासेल आणि ज्या विशिष्टत्वास सोडून कोणी परकीय समाजास मिळाला तर दुःख होईल अशी गोष्ट शेवटीं निघते ती पूर्वजांविषयीं, संस्कृत भाषेविषयीं आणि संस्कृत ग्रंथांविषयीं अभिमान ही होय. जें आपणांस रक्षणीय आहे आणि जें रक्षण करितां येईल अशी गोष्ट एवढीच आहे. संस्कृतींतील बाकीच्या सर्व गोष्टी म्हणजे आचारविचार आणि दैवतें नष्ट झालीं किंवा टिकलीं तरी त्यापासून हरकत होणार नाहीं. एवढें टिकलें आणि बाकी सर्व गोष्टी हिंदुसमाज अनवश्यक किंवा कमी महत्त्वाच्या मानूं लागला तर समाजास बळकटी येईल कीं दौर्बल्य येईल याचा विचार वाचकांनीं करावा.

एवंच विचारविकासाचा परिणाम परसमाजपोषक व्हावयाचा नाहीं तर मनुष्य अधिक निर्भयतेनें वागूं लागेल. एवढें मात्र खरें कीं जुन्याचा अभिमानी वर्ग नष्ट होत जाईल. आज जुन्याचा अभिमानी म्हणून म्हणविणाऱ्या वर्गाला विशेषेंकरून भिक्षुक वर्गाला ग्रंथांची फारशी ओळख नसते. याचा परिणाम एवढाच दिसतो कीं त्याचा अभिमानी म्हणून जो वर्ग पुढें यावयाचा तो फार दुर्बल होत आहे.

समाजांतील सुशिक्षितवर्गांत खुळ्या समजुती राहणार नाहींत असें नाहीं. आपणांस यूरोपांत आणि अमेरिकेंत कालेजांतील शिक्षण ज्यांनीं मिळविलें आहे अशा कांहीं लोकांचा देखील फलज्योतिषावर आणि पत्ते पाहून भविष्य-सांगण्याच्या शक्तीवर विश्वास असतो असें दिसतें. जगांत असे अनेक विषय आहेत कीं ज्यांची कार्यकारणमालिका आपणांपैकीं अत्यंत विद्वान अशा शास्त्रज्ञास माहीत नाहीं. सामान्य मनुष्याची अशी समजूत असते कीं ज्या गोष्टी आपल्या स्थूल दृष्टीस परस्परांशीं असंबद्ध अशा वाटतात त्या खरोखर संबद्ध असतात. मात्र त्या दोहोंचा संबंध जोडणारे सृष्टिनियम आपणांस माहित नाहींत एवढेंच. येशू ख्रिस्त हा त्याच्या आईच्या कौमार्याचा भंग होण्यापूर्वींच गर्भीं राहिला या कल्पनेवर पुष्कळ प्राणिशास्त्रवेत्त्यांचा देखील विश्वास आहे. ते म्हणतात कीं ज्या नियमांनीं ही गोष्ट घडून

आली ते नियम आपणांस ठाऊक नाहींत असें म्हणा. या तऱ्हेची वृत्ति आली म्हणजे शकुनांवर आणि फलज्योतिषावर भरंवसा उत्पन्न होतो. ज्ञानाची पूर्णता कधींच होणें शक्य नाहीं. जगांत कांहीं गोष्टी तरी अज्ञात राहणारच आणि जेव्हां वस्तुविषयक अज्ञान असतें तेव्हां स्वैर कल्पनेस क्षेत्र मिळतें. ज्ञानाचा संचय जितका वाढत जाईल तितकें तें सामान्य जनापासून अधिक दूर होत जाईल आणि अंधविश्वासास क्षेत्र राहील.

शास्त्रज्ञानाच्या विकासामुळें श्रद्धा जर कमी होत जाईल तर हिंदूंचें विशिष्टत्व नाहींसें होऊन देशाचें सामान्यपणें नुकसानच होईल असें मानणारेहि कांहीं श्रद्धाभक्त आहेत! असो.

हिंदुसमाजांत अनेक महत्त्वाचे फेरफार होऊन समाजाला हळू हळू निराळें स्वरूप येणार ही गोष्ट गेल्या १०० वर्षांत स्पष्ट झाली आहे. परंपरागत आचार नष्ट होण्याच्या पंथास लागून गेले तरी हिंदूंचा अभिमान गेला नाहीं आणि तो जावयाचाहि नाहीं. आपणांपुढें प्रश्न येतो तो हाच कीं, आपल्या व मुसुलमान आणि ख्रिस्ती समाजांचे संबंध इतःपर कसे होतील. इतर राष्ट्रांशीं सहकारिता करण्यास अडचण करणारी विटाळाची भावना गेली म्हणजे सहकारिता अधिक होईल हें खरें, पण त्यामुळें सर्व समाज एकत्र होतात असें नाहीं. सर्व समाजांस एकत्र होण्यास कांहीं तरी सामान्य परंपरा लागते आणि कांहीं तरी हिताहिताचें ऐक्य लागतें. सामान्य परंपरा अशी आज थोडीच आहे. इतिहास म्हणजे पूर्वींच्याच भांडणांचा हिशोब होय. तसेंच सहकार्य असें आपलें आज फारच थोडें झालें आहे. आज जरी झालें नाहीं, तरी पुढें होईल अशी आशा करण्यास जागा आहे. कां कीं, सर्व लोकांत एकत्र होऊन काम करण्याची संधि उर्फ स्वराज्याचे हक्क सोळा आणे नाहीं तरी आणा दोन आणे मिळाले आहेत. लोकांस राष्ट्रसंवर्धनाची सामान्य नीति उत्पन्न करण्यास हे हक्क प्रेरक होतील असें वाटतें. याशिवाय सार्वजनिक शिक्षणाची प्रगति होत जाणार हें आजच्या लोकांच्या शिक्षणार्थ होणाऱ्या धडपडीवरून निदान आक्रोशावरून स्पष्ट होत आहे. जे समाज अल्पसंख्याक असतात त्यांनां सर्व जनतेहून आपण भिन्न आहोंत ही भावना उत्पन्न करणारा आणि सर्व जनतेशीं फटकून वागण्यास शिकविणारा चोरटा व बेजबावदार राजा किंवा सत्ताधारी समूह लागत असतो. हा समूह आपलें विशिष्ट व्यक्तिहित किंवा अल्पसामुच्चयिक हित सर्व जनतेच्या हितास दुर्लक्षून साध्य करून घेण्यासाठीं धडपडत असतो. आणि आपल्या स्थानापासून उत्पन्न होणाऱ्या बेसुमार फायद्याचा वांटेकरी अल्पसंख्याकांस करितो. त्याच्या शिकवणीमुळें अल्पसंख्याक किंवा देशावर राज्य करण्यासाठीं भाडोत्री आणलेले परके लोक आपलें हित सर्व जनतेच्या विरुद्ध आहे असें ओळखतात. परंतु लोकसत्तेची जसजशी वाढ होत जाते तसतशी अल्पसंख्याकांस आपलें जनताविरोधी भिन्नत्व काढून टाकण्याची इच्छा होते. इंग्लंडवर जर तुर्कांचें राज्य असतें तर तेथील यहुदी लोकांस ख्रिस्ती लोकांपासून आपण किती भिन्न आहोंत हें वारंवार सांगण्याची स्फूर्ति झाली असती आणि मुसुलमानी आणि यहुदी धर्मांत, म्हणजे आचारांत व कल्पनांत निकट साम्यतेचा त्यांनां पत्ता लागला असता आणि ख्रिस्ती सुपरस्टिशनचें (खुळ्या समजुतींचें) वारंवार आश्चर्य वाटलें असतें. लोकसत्तेची वाढ परकीय लोकांस देश्य समाजामध्यें विलीन होण्यास मोठी द्रावक आहे. अशी आशा आहे कीं, हिंदुस्थानामध्यें लोकसत्तेची जसजशी वाढ होत जाईल तसतशी परकीयांचें परकीयत्व घालविण्यास साहाय्यक अशी वृत्ति परकीयांतच जन्मास येईल. असो. या प्रसंगीं आपली बाह्यांसंबंधानें वृत्ति कशी काय पाहिजे व होईल हें स्पष्ट केलें पाहिजे.

**आमचें बाह्यांसंबंधानें कर्तव्यकर्म.**—चातुर्वर्ण्याच्या बाहेरील जे लोक ते बाह्य लोक. हिंदुस्थानांत जे बाह्य लोक आहेत, त्यांपैकीं मुसुलमान, ख्रिस्ती, पारशी, यहुदी, बेनेइस्रायल इत्यादि प्रमुख आहेत. ख्रिस्त्यांमध्यें संस्कृतिभेदानें जे वर्ग पाडतां येतील ते येणेंप्रमाणें: (१) मलबारकडील सीरियन ख्रिस्ती, (२) अलीकडे म्हणजे गेल्या शतकांत ख्रिस्ती संप्रदायांत शिरलेले लोक व (३) पोर्तुगीज लोकांनीं बाटविलेले म्हणजे आमच्यांतून ओढून घेऊन स्वतःच्या संप्रदायांत नेलेले लोक. अलीकडे ख्रिस्ती झालेले आणि पोर्तुगीज लोकांच्या अंमलाखालीं ख्रिस्ती झालेले यांच्यामध्यें एक संस्कृतिभेद आहे तो हा कीं, पोर्तुगीज ख्रिस्ती लोक हिंदु संस्कृतीपासून जितके च्युत झाले आहेत तितके अलीकडे ख्रिस्ती झालेले जे प्रॉटेस्टंट ख्रिस्ती ते च्युत झाले नाहींत. या भेदास महत्त्वाचीं कारणें आहेत. एक मुख्य कारण म्हटलें म्हणजे संप्रदायविशिष्ट समुच्चयभाव कॅथोलिक लोकांत जितका जागृत आहे तितका प्रॉटेस्टंटांत नाहीं. कॅथोलिक संप्रदायांतील लोकांत प्रॉटेस्टंटांपेक्षां बंधुत्व अधिक तीव्रत्वानें जागृत असतें. इंग्रज कॅथोलिकानें जावानीज कॅथोलिक बाईबरोबर लग्न करण्यास हरकत नाहीं. पण इंग्रज प्रॉटेस्टंटाबरोबर होतां होई तों लग्न करूं नये व करावयाचें असल्यास कॅथोलिक संप्रदायाचे संस्कार व शिक्षण देऊं अशी कबुलायत करून घेऊन मग लग्न करावें असा कॅथोलिक मठाचा आग्रह आहे.

दुसरें कारण म्हटलें म्हणजे कॅथोलिक संप्रदायामध्यें संस्कार, विधी, यांचें पुष्कळ प्राबल्य असतें व यामुळें पृथ्वीवरील निरनिराळ्या भागांतील कॅथोलिक लोकांत एकस्वरूपता अधिक झाली आहे. कॅथोलिक मठाचा नेहमीं असा उद्देश होता कीं, जाति, राष्ट्र इत्यादिक गोष्टींमुळें मनुष्यामनुष्यांत जो निराळेपणा आलेला असतो तो नाहींसा करावा; आपल्या विधिसंस्कारांचा प्रचार करून लोकांत सारखेपणा

आणावा; जीं नैतिक बंधनें मठास मान्य असतील तींच चोहोंकडे पसरवावीं; ख्रिस्ती लोकांच्या पवित्र ग्रंथांतील वाक्यांचा कॅथोलिक संप्रदायाचे अधिकारी जो अर्थ लावतील तोच इतरांनीं मान्य करावा व बायबलचा अर्थ लावण्यांत स्वतःची अक्कल चालवूं नये. एवंच सामान्य विधी, रीतिरिवाज, संस्कार व नीतिशास्त्र यांनीं कॅथोलिक संप्रदायांत एकस्वरूपता पुष्कळ आणिली व निरनिराळ्या राष्ट्रांतील परंपरागत चालीरीतींवर व भिन्नत्वावर वरवंटा फिरविला. जगांतील सर्व भाषांस प्राकृतासमान लेखून कॅथोलिक संप्रदायांतर्गत सर्व लोकांचें नागरवाङ्मय लॅटिनमध्यें ठेवावें व अनागरवाङ्मय म्हणजे शूद्रांकरितां निर्माण केलेले ग्रंथ, इंग्रजी, फ्रेंच, मराठी, कोंकणी इत्यादि प्राकृतांत करावे असा कॅथोलिक मठाचा आग्रह आहे.

जगांतील सध्यांच्या सर्व प्रचलित भाषांस कॅथोलिक संप्रदाय अजून तुच्छतेनें वागवितो व त्यांच्या संप्रदायांतील मंत्र, उपासनावाक्यें, हीं सर्व लॅटिनमध्यें असतात. म्हणजे सध्यांच्या प्राकृत भाषांपैकीं एका भाषेचा वरचष्मा दुसऱ्या भाषेवर ठेवावा या तत्त्वास कॅथोलिक संप्रदायानें फारशी अगर कोठेंच सहानुभूति दाखविली नाहीं.

राष्ट्रीय विभक्तपणास हा कॅथोलिक संप्रदाय फार विरोध करितो. इटालियन लोकांच्या राष्ट्रीय आकांक्षांस या संप्रदायाच्या अधिकाऱ्यांनीं फारच विरोध दाखविला व हिंदुस्थानांतील कॅथोलिक लोकांस खरे हिंदी बनविण्याचा आपण प्रयत्न करीत असतां हा संप्रदाय बराच आडवा येईल असा संभव दिसतो. जर आपण येथील गोवानीज व इतर कॅथोलिक लोकांस लॅटिनऐवजीं संस्कृत शिकण्याचा उपदेश केला तर कॅथोलिक "चर्च" उर्फ मठ फारच विरोध करील. कॅथोलिक मठ संस्कृत शिकूं नका असें म्हणणार नाहीं, पण लॅटिन शिकण्याचा आग्रह धरील व तेणेंकरून हिंदी राष्ट्रीयत्वाला अडथळा करील.

कॅथोलिक "चर्च"चें सामाजिक धोरण वर स्पष्ट केलें आहे. त्याचें मनन केलें असतां एतद्देशीय कॅथोलिक ख्रिस्ती व पोर्तुगीज लोक यांच्यामध्यें सारखेपणा कां वाढावा आणि हिंदूंच्या संस्कृतीपासून प्रॉटेस्टंट ख्रिस्त्यांपेक्षां हे गोवानीज ख्रिस्ती अधिक भिन्न कां व्हावे याचें कारण लक्षांत येईल.

गोवानीज लोकांचें समाजस्वरूप येथील एतद्देशीय संस्कृतीपासून अधिक च्युत कां व्हावें यास आणखी एक कारण आहे. काळागोरा हा भेद इंग्रजांस जितका भासतो तितका पोर्तुगीजांस भासत नव्हता व पोर्तुगीज लोक एतद्देशीय ख्रिस्ती लोकांशीं लग्नव्यवहार करीत. गोऱ्या लोकांनीं काळ्या लोकांशीं लग्न लावूं नये यासंबंधानें इंग्रजांचा कटाक्ष किती आहे हें आपणांस फारसें स्पष्ट करावयास नको. पोर्तुगीज सरकारची यासंबंधानें वृत्ति अगदीं निराळी होती. खुद्द पोर्तुगीज सरकार पोर्तुगीज वसाहतींतील मेस्तिझांनां पोर्तुगीज मुलींबरोबर लग्नें लावावीं म्हणून खटपट करीत असे. एकदां तर पोर्तुगाल देशाच्या सरकारनें आपल्या आफ्रिकन वसाहतींतील निग्रोंबरोबर लग्न लावण्यास ज्या मुली तयार होतील त्यांस आम्ही इतकी इतकी जमीन देऊं अशी लालूच दाखवून हजारों पोर्तुगीज मुली पूर्व आफ्रिकेंत पाठवून दिल्या व त्यांचीं निग्रोबरोबर लग्नें लावून दिलीं. (Keane's Africa, London, 1895-'Stanford's Compendium of Geography) हिंदुस्थानांत देखील गोवानीज लोकांस पूर्ण पोर्तुगीज बनविण्यास गोवें सरकारनें अनेक आमिषें दाखविलीं होतीं. पुष्कळ हिंदूंनां मोठमोठे पोर्तुगीज सरदार दत्तक घेत. "आलमिडा," "आलबुकर्क" या नांवांचा येथील गोवानिजांमध्यें जो बराचसा सुकाळ झाला आहे त्याचें कारण हेंच आहे.

येथील एतद्देशीय ख्रिस्त्यांचा परक्या देशांतील लोकांशीं जितका जितका निकट संबंध येतो, तितका तितका एतद्देशीयांशीं त्यांचा संबंध कमी कमी होऊं लागतो. हिंदुस्थानांतील इंग्रज लोक येथील प्रॉस्टेटंट ख्रिस्ती लोकांस "काला अदमी" प्रमाणेंच वागवितात व यामुळें या ख्रिस्ती लोकांस हिंदूंशीं अधिक संबंध ठेवणें भाग पडतें. प्रॉटेस्टंट मिशनऱ्यांनीं ख्रिस्ती लोकांस इंग्रजांचें अनुकरण करण्यास फारसें उत्तेजन दिलें नाहीं. कारण अनुकरणेच्छा उत्पन्न झाली म्हणजे तिच्याहूनहि जी अधिक भयंकर (अर्थात् त्यांच्या दृष्टीनें) "समतेची इच्छा" ती उत्पन्न होईल, व समतेची इच्छा "नेटिव" ख्रिस्ती लोकांत उत्पन्न होऊं लागावी हें त्यांनां अधिक भयप्रद वाटतें. हिंदू लोकांची जातिविषयक "सुपरस्टिशन" त्यांस ख्रिस्ती करून टाकून घालवून देण्याचा मिशनरी लोकांचा उद्देश आहे हें खरें; पण ख्रिस्ती झाल्यानें परिणाम असा होत आहे कीं, जे लोक हिंदू असतां इंग्रजांचा विटाळ मानीत व सोंवळ्याओंवळ्याच्या बाबतींत तरी त्यांनां महारांसमान लेखीत त्या लोकांस इंग्रज हे कोणी उच्च, थोर ब्राह्मणापलीकडचे ब्राह्मण आहेत असें भासूं लागतें, व यामुळें साहेबांचे "बटलर" होण्यास तयार असा वर्ग वाढतो.

हिंदुस्थानांतील ख्रिस्त्यांस पारमार्थिक विचारांत यूरोपीय लोकांवर अवलंबून राहणें रुचत नाहीं. ख्रिस्ती संप्रदायामध्यें उत्पन्न झालेला देशाभिमान ज्या कांहीं गोष्टींत व्यक्त होत आहे त्या येणेंप्रमाणें: ब्रह्मदेशांतील करेण स्वतःचा उपासनासंघ म्हणजे चर्च स्थापन करीत आहेत. त्रावणकोरमध्यें यूयोमयं नांवाचा जो संप्रदाय स्थापन झाला आहे तो बायबलविषयीं प्रामाण्यबुद्धि ठेवितो, तथापि संप्रदाय संस्थापकाच्या घराण्याशिवाय परमार्थाच्या बाबतींत दुसऱ्या कोणाचाहि अधिकार मान्य करीत नाहीं, आणि त्यांच्या क्रिया व कर्में हीं ब्राह्मणपद्धतीवर आहेत. महाराष्ट्रामध्यें संकीर्तनें आणि भजन यांस प्रामुख्य देण्याकडे ख्रिस्ती मंडळींनीं प्रवृत्ति दाखविली आहे. त्याप्रमाणेंच भारतीय पोषाख करण्याचा व

आपल्या मुलांनां यूरोपीय नांवें ठेवण्यापेक्षां भारतीय नांवेंच ठेवावीं अशा प्रकारचा उपदेशहि इकडील विद्वान ख्रिस्ती देश्य ख्रिस्त्यांस व्याख्यानद्वारा करतांना आढळतात.

ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रसाराविषयीं आपणांपैकीं पुष्कळांस जें वैषम्य वाटतें त्याचें कारण पारमार्थिक नसून सामाजिक आहे. ख्रिस्तानें केलेला उपदेश अनीतीचा प्रवर्तक आहे असें आपलें मत नाहीं व त्याचें अवलंबन केल्यानें मनुष्य खास दुर्गतीस जाईल असें आपणांस वाटतें असेंहि नाहीं. ख्रिस्ती संप्रदायाचा द्वेष व त्या संप्रदायाच्या 'प्रसाराचा' द्वेष या दोन गोष्टी भिन्न आहेत. आमचें भांडण संप्रदायाशीं नाहीं. त्याच्या प्रसाराशीं आहे; व त्याचें मुख्य कारण हें आहे कीं, या संप्रदायाच्या प्रसाराबरोबर एक सामाजिक अनिष्ट परिणाम घडून येतो. तो हा कीं, आमचें बौद्धिक स्वावलंबन नाहींसें होऊन परावलंबन उत्पन्न होतें व परके लोक सामाजिक-दृष्ट्या उच्च वर्गांत मोडतात. आमच्यांतील नास्तिक व हिंदूंच्या परंपरागत दैवतांवर विश्वास न ठेवणाऱ्या लोकांस देखील ख्रिस्ती संप्रदायाचा हिंदुस्थानांत प्रसार झालेला आवडणार नाहीं.

गोवानीज ख्रिस्ती आणि प्रॉटेस्टंट ख्रिस्ती यांची तुलना केली असतां आपणांस आढळून येईल कीं, देशी भाषेशीं प्रॉटेस्टंटांचा अधिक परिचय असतो. रेव्हरंड टिळकांसारखा चांगल्या योग्यतेचा कवि प्रॉटेस्टंटांत झाला आहे. प्रॉटेस्टंट ख्रिस्ती स्त्रियांनीं देशी पोषाख सोडला नाहीं व पुष्कळ पुरुषहि उच्च हिंदूंप्रमाणें पोषाख व आचार ठेवण्याचा प्रयत्न करितात. मराठ्यांच्या इतिहासाबद्दल अभिमान बाळगणारे अनेक लोक ख्रिस्ती महाराष्ट्रीयांत सांपडतात. मराठी भाषा बरोबर येत नाहीं म्हणून ज्या महाराष्ट्रीय ख्रिस्त्यांस पूर्वीं गर्व वाटत असे त्यांचा गर्व कमी कमी होऊं लागला आहे. मराठी नाटकें, मराठी कादंबऱ्या, मराठी वर्तमानपत्रें, इत्यादिकांचें वाचन जसें हिंदूंत होतें तसें ख्रिस्त्यांतहि होतें. राजकीय चळवळी-संबंधानें महाराष्ट्रीय हिंदू आणि ख्रिस्ती या दोहोंमध्यें एक-प्रकारची समानवृत्ति देखील दृग्गोचर होते.

आजचें जें मराठी वाङ्मय आहे त्याचा अभ्यासक वर्ग मात्र ख्रिस्ती मंडळांत फारसा आढळत नाहीं. उदाहरणार्थ, कै. विष्णुशास्त्री चिपळुणकर यांच्या निबंधमालेचें वाचन करणारा, तुकारामाच्या अभंगांस आनंदानें गाणारा, इतिहास-संशोधक रा. राजवाडे यांच्या ऐतिहासिक लेखांकडे दृष्टि फिरविणारा, मराठी वाङ्मयाचें तात्त्विकदृष्ट्या विवेचन करणारा, व महाराष्ट्रीय संस्कृतीचा अभिमान धरून महा-राष्ट्रीय संस्कृतीचें वर्चस्व पुन्हां संस्थापित करावें म्हणून आवेशानें खटपट करणारा अगर निदान बोलणारा मनुष्य ख्रिस्ती समाजांत क्वचितच आढळेल व महाराष्ट्रीय ब्राह्मण ख्रिस्त्यांमध्यें स्वाभिमानाची ज्योत जरी कधीं कधीं दृष्टीस पडते तरी ती जितकी तेजोमय दिसावी तितकी दिसत नाहीं. या स्थितीचें कारण केवळ ख्रिस्ती मंडळीचा हेकेखोरपणा व देशाभिमानशून्यता नव्हे; तर ख्रिस्ती मंडळींपैकीं बराचसा वर्ग असा आहे कीं, त्यांस अगर त्यांच्या वाडवडिलांस ख्रिस्ती होण्यापूर्वीं उच्च प्रकारचा महाराष्ट्रीय संस्कारच प्राप्त झाला नव्हता. शिवाय अर्वाचीन ग्रंथकारांपैकीं व त्यांमध्यें विशेषें-करून देशाभिमानी म्हणून पुढें आलेल्या ग्रंथकारांपैकीं पुष्कळ लोकांच्या लेखांत ख्रिस्ती मंडळींसंबंधानें द्वेषबुद्धि व मत्सर-भाव आहे, असा ख्रिस्ती मंडळींचा समज झाल्याकारणानें त्यांनीं हिंदूंनीं लिहिलेले ग्रंथ वाचले नाहींत. यामुळें महाराष्ट्रीय ब्राह्मणांत व इतर उच्चजातीय हिंदूंत अर्वाचीन मराठी वाङ्मयानें ज्या प्रकारच्या कल्पना पसरल्या त्या कल्पना ख्रिस्त्यांमध्यें पसरल्या नाहींत. शिवाय १८१८ सालापूर्वींचें जें मराठी वाङ्मय झालें त्यांत पारमार्थिक अंश प्रामुख्यानें असल्यामुळें व "हिंदूंचें पारमार्थिक वाङ्मय वाचणें हें ख्रिस्ती संप्रदायाच्या विरुद्ध आहे, कारण त्याच्या योगानें खुळी मूर्तिपूजा, खोटीं दैवतें, यांजकडे मनाचा ओढा होईल." अशी ख्रिस्ती लोकांस भीति वाटत असल्यामुळें त्यांच्याकडून त्याहि मराठी वाङ्मयाची उपेक्षा झाली. येथें एवढेंच सांगितलें पाहिजे कीं, ख्रिस्तीसंप्रदायानें अगर तदंतर्गत मठांनीं हिंदु वाङ्मयाचा विटाळ ख्रिस्ती लोकांस बिलकुल होऊं द्यावयाचा नाहीं असा पक्का आग्रह धरिला नाहीं. यास प्रत्यक्ष प्रमाण पाहिजे असेल तर, तुकारामादि हिंदू कवींच्या कृतींतील निवडक पद्यें ख्रिस्ती लोकांच्या उपासनाप्रसंगीं म्हणावयाच्या गीतांमध्यें आढळून येतात हें आहे.

महाराष्ट्रीय 'प्रॉटेस्टंट' ख्रिस्ती लोकांस ( जे लोक आपणांस मराठी ख्रिस्ती म्हणवितात त्यांस ) उत्तम प्रकारचे महाराष्ट्रीय वनविण्यास आपणांस अतिशय आयास पडतील असें नाहीं. जें वाङ्मय पारमार्थिक नाहीं म्हणजे ललित, राजकीय अगर सामाजिक आहे त्या वाङ्मयाचा प्रसार ख्रिस्ती मंडळींमध्यें करावयाचा म्हटला व जीं राजकीय व सामाजिक ध्येयें आपणांपुढें असतील तीं मराठी ख्रिस्त्यांपुढें ठेवण्याचा प्रयत्न केला, तर त्यांत यश येईल असें वाटतें. यासंबंधानें आपणांस जें मिशनरी कार्य करावें लागणार तें फारसें कठिण नाहीं. मराठी वाङ्मयांतील जातिद्वेष कमी केला, ख्रिस्तीसंप्रदाया-बद्दल चीड आणणारी भाषा आमच्या लेखांतून वगळली व ख्रिस्ती मंडळींपैकीं जे सुशिक्षित आहेत त्यांच्याशीं सामाजिक दळणवळण अधिक वाढविलें, तर ख्रिस्ती लोकांची सामाजिक व राजकीय वृत्ति 'आपुणासारखी तत्काळ करण्यास काळवेळ आपुणांलागीं' लागणार नाहीं.

येथें आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे. ती ही कीं, महाराष्ट्रीय ख्रिस्त्यांमध्यें देखील महाराष्ट्रभाव वाढत आहे, ही गोष्ट दाखविण्यासाठीं एक दोन उदाहरणें देतों.

मराठी भाषेंत "बायबल"चें भाषांतर जें झालें तें भ्रष्ट मराठींत झालें. त्याच्या वाचनानें नीट अर्थबोध होत नाहीं व

भाषेच्या दृष्टीनें तें कमी योग्यतेचें आहे ही गोष्ट अलीकडे महाराष्ट्रीय ख्रिस्ती लोकांस जाणवूं लागली आहे. चांगल्या मराठी भाषेंत 'बायबल' उतरावें यासाठीं त्यांची खटपट सुरू आहे.

दुसरी एक गोष्ट म्हटली म्हणजे, ख्रिस्ती प्रार्थनामंदिरांचें व तदंतर्गत प्रार्थनांचें स्वरूप महाराष्ट्रीय नाहीं इकडे त्यांचें लक्ष गेलें आहे; व ख्रिस्ती प्रार्थना आपल्या भजनाच्या पद्धतीवर आणण्यासाठीं त्यांची खटपट सुरू आहे. मधूनमधून मराठी चालीचीं भजनें व कीर्तनें करण्याचा ख्रिस्ती मंडळी प्रयत्न करितात; शिवाय सध्यां ख्रिस्ती "चर्च" मधून जीं मराठी गीतें गाइलीं जातात तीं देखील इंग्रजी चालींवर तयार केलेलीं असतात; त्यांच्या ऐवजीं मराठी चालींवर गीतें तयार करून तीं भजनाच्या वेळीं म्हणण्याची ख्रिस्ती मंडळींत खटपट सुरू आहे. मराठी ख्रिस्ती वाङ्मयांतून चर्च शब्द काढून दुसरा कोणता तरी शब्द वापरावा यासंबंधींची चळवळ ज्ञानोदयाचे अंक चाळले असतां दिसेल.

गोवानीज ख्रिस्ती लोकांचें महाराष्ट्रीयत्व बहुतेक नष्ट झाल्यासारखें आहे. त्यांस मराठी वाङ्मयाचा व भाषेचा बिलकुल गंध नाहीं, व अगदीं सोपेंसें मराठी पुस्तक जर त्यांच्या हातीं टाकलें तर ज्यांस तें समजेल असा वर्ग त्यांच्यामध्यें फारच थोडा आहे. माझा कमींत कमी दोन अडीचशेंवर गोवानिजांशीं प्रत्यक्ष संबंध आला, तथापि या इतक्या समूहांत ज्यांनां साधारणपणें शुद्ध मराठी बोलतां येतें, व ज्यांनीं एखादें तरी मराठी पुस्तक वाचलें असेल असे गोवानीज दोनतीन आढळले असें डॉ. केतकर म्हणतात. मराठी पुस्तकेंच जर हे लोक वाचीत नाहींत व होईल तितकें करून प्रारंभापासूनच इंग्रजी शिकण्याचा व नंतर लॅटिन शिकण्याचा प्रचार जर त्यांच्यामध्यें आहे, तर त्यांच्यामध्यें महाराष्ट्रीय कल्पना कितपत उतरणार !

पोषाखाच्या बाबतींत गोवानीज लोक बरेचसे पाश्चात्त्य झाले आहेत. कांहीं गोवानीज स्त्रिया साड्या वापरतात; परंतु बऱ्याचशा इंग्रजी पद्धतीचा पोषाख करितात. मुसुलमानी संप्रदायांत प्रवेश झाल्यानंतर मूळचे हिंदू लोक जसे अगदीं पालटून गेले व संस्कृतीनें व अंतःकरणानें हिंदूंपासून अगदीं भिन्न झाले त्याचप्रमाणें गोवानीज लोकांचीहि गोष्ट होय. महाराष्ट्रीय प्रॉटेस्टंट ख्रिस्ती लोक आमच्यामध्यें पुढेंमागें सहज मिसळून जाण्यासारखे आहेत; परंतु गोवानीज लोकांस महाराष्ट्रीय बनवणें हें काम अधिक कठिण आहे व यासाठीं आपणास विशेष खटपट करावी लागेल. या खटपटीमधील मुख्य अंगें येणेंप्रमाणें:—

एक तर खुद्द गोव्यास व जेथें जेथें कोंकणी भाषा आहे अशा ठिकाणीं शुद्ध मराठीच्या शाळा उघडावयाच्या. दुसरें काम म्हटलें म्हणजे महाराष्ट्रीय प्रॉटेस्टंट ख्रिस्ती लोकांत "गोवानीज ख्रिस्त्यांनां महाराष्ट्रीय करणें" हें आपलें कर्तव्यकर्म आहे ही भावना उत्पन्न करून घ्यावयाची.

पुढें आपल्या इतिहासाचें व राष्ट्रीय कल्पनांचें वाङ्मय गोवानीज ख्रिस्ती लोकांस समजावें म्हणून कोंकणी भाषेंत तयार करावयाचें व शक्य असल्यास कोंकणी भाषा रोमन लिपींत न लिहितां नागरी म्हणजे मराठी लिपींत लिहावी या बाबतींत गोवानिजांचें मन वळवावयाचें व युनिव्हर्सिट्यांतून यासंबंधानें गडबड करावयाची. गोवानीज स्त्रीपुरुषांस मराठी भाषेच्या प्रावीण्याबद्दल स्कॉलर्शिपा देऊं करावयाच्या. ख्रिस्ती संप्रदायाचीं पुस्तकें चांगल्या मराठी भाषेंत जर निर्माण झालीं तर ख्रिस्ती लोकांमध्यें मराठी भाषेवरील आसक्ति वाढेल. हिंदु समाज व गोवानीज समाज हे पूर्वी एक असतां ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रसारामुळें त्यांच्यांत जें एक मोठें खिंडार पडलें आहे तें खिंडार भरून काढण्यासाठीं ज्यांचा मराठेपणा पूर्णपणें गेला नाहीं असा अर्वाचीन महाराष्ट्रीय म्हणजे प्रॉटेस्टंट ख्रिस्ती समूहच उपयोगास लाविला पाहिजे.

ख्रिस्ती लोकांस महाराष्ट्रीय करण्यासाठीं जे उपाय योजावयाचे तेच बेने-इस्रायल लोकांस महाराष्ट्रीय करण्यास योजितां येतील. जर कोणी एखाद्या महाराष्ट्रीय विद्वानानें हिब्रू भाषेचा अभ्यास करून व यहुदी लोकांच्या इतिहासाचें अवलोकन करून, निदानपक्षीं यहुदी लोकांसंबंधानें इंग्रजींत जें वाङ्मय झालें आहे त्याचा अभ्यास करून, किंवा हेंहि झालें नाहीं तर 'दि ज्यूइश एन्सायक्लोपिडिआ' सारख्या ग्रंथांचा आधार घेऊन यहुदी लोकांच्या संस्कृतीवर जर मराठींत ग्रंथ लिहिले तर इस्रायल लोकांची मराठी भाषेवर आसक्ति वाढविण्यास त्यांचा उपयोग होईल. ख्रिस्ती, यहुदी, मुसुलमान, पारशी इत्यादि लोकांबरोबर लग्नसंबंध करण्यास आपला महाराष्ट्रीय समाज तयार होईल आणि या लोकांबरोबर एखाद्या हिंदूनें लग्नव्यवहार केला असतां त्यास हिंदुसमाजास मुकावें लागणार नाहीं, असा काळ केव्हां येईल तो येवो; सध्यां ती गोष्ट शक्य नाहीं व वरील बाह्य समाज देखील आपल्याशीं लग्न लावावयास तयार होईल असें वाटत नाहीं. याबरोबर हेंहि एक तत्त्व लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, जेव्हां या लोकांशीं शरीरसंबंध केल्यानें हिंदूंच्या समाजाचें बल कमी न होतां वृद्धिंगत होईल तेव्हांच असले संबंध केले पाहिजेत; नाहीं तर आपलीं माणसें गमावून त्या माणसांचा समावेश परक्या समाजांत करवून आपल्या समाजास दुर्बलत्व आणणें हें आपल्याच नाशास कारणीभूत होईल. आपणांपैकीं जे लोक बाह्यांशीं लग्नव्यवहार करितील त्यांनीं आपल्या लोकांच्या मताची पर्वा करावयाची नाहीं असें करूं नये. उलट स्वजनांशीं अधिक निकट संबंध ठेवण्याचा प्रयत्न करावा. हिंदूंच्या लोकमताला तुच्छ लेखावयाचें व त्यापासून अलग रहावयाचें व आम्ही लोकमताची पर्वा न करणारे सुधारक आहों असा टेंभा मिरवावयाचा, असल्या गोष्टी खऱ्या सुधारकास न शोभतां

केवळ खोट्या सुधारकांसच शोभतील. अमुक आचरण जनतेच्या विरुद्ध असलें तरी चांगलें आहे म्हणून ज्या लोकांस तें करावयाचें आहे व ज्या लोकांस लोकमताची पर्वा न करितां पुढें जावयाचें आहे त्यांनीं लोकांस न भितां लोकांच्या मताविरुद्ध जें आचरण त्यांनां करावयाचें असेल तें बेधडक करावें; पण त्यांनीं लोकांपासून अलिप्त न राहतां लोकांतच मिसळण्याचा व लोकांमधील आपलें स्थान कायम राखण्याचा प्रयत्न केला पाहिजे. या प्रयत्नांत स्वजनांनीं कितीहि मानखंडना केली तरी ती सोसून समाजांतच राहण्याची व समाजांत मिसळण्याची खटपट खऱ्या समाजभक्तानें केली पाहिजे.

सुधारकांची यासंबंधानें कर्तव्यबुद्धि अधिक जागृत व्हावयास पाहिजे. गेल्या पिढींतील कांहीं सुधारकांनीं उपदेशानें व आचरणानें स्वसमाजापासून अलिप्त राहण्याची व केवळ ख्रिस्तीपारशांत मिसळण्याची व पुन्हां आम्ही समाजापासून अलिप्त राहण्याचा 'स्वार्थत्याग' करतों म्हणून ऐट मारण्याची शक्कल काढली होती. त्यांच्या त्या प्रवृत्तीचा स्पष्ट व कठोर अशा शब्दांनीं निषेध केला पाहिजे. गेल्या पिढींतील सुधारक लोक असें म्हणत असतील कीं, समाजापासून अलिप्त राहणें हा स्वार्थत्याग होय; तर आम्ही उलट असें म्हणतों कीं, समाजापासून अलिप्त राहणें व या रीतीनें अपमानाचे प्रसंग चुकविणें हा भयंकर समाजद्रोह होय. खऱ्या सुधारकांनीं एकीकडे बाह्यांबरोबर आपला संबंध वाढवावा व दुसरीकडे जुन्या लोकांबरोबरचा संबंध होईल तितकें करून पूर्ववत् कायम ठेवावा.

पारशी लोकांची देशी भाषेवर आसक्ति वाढविली पाहिजे. पारशी लोक संस्कृतीनें इंग्रज बनण्याची खटपट करीत आहेत व हिंदूंच्या संस्कृतीचा त्यांस गंधहि नाहीं. जे पारशी अवेस्ता भाषा शिकत नाहींत, ते फारशी अगर फ्रेंच शिकण्याचा प्रयत्न करितात; त्यांनां स्वभाषा देखील बरोबर येत नाहीं. गुजराथी भाषा शुद्ध तऱ्हेनें लिहितां येण्यास निदान आज तरी संस्कृत भाषेच्या ज्ञानाची आवश्यकता आहे. आज पारशांस संस्कृत येत नाहीं व संस्कृत शब्दांचा उपयोग त्यांस गुजराथी लिहिण्यांत करितां येत नाहीं. जो पारशी संस्कृत शिकतो त्याचा हिंदूंसंबंधानें आदरभाव व प्रेमभाव वाढतो असा अनुभव आहे; यासाठीं पारशी लोकांत संस्कृत भाषेचा अधिक प्रसार करण्यासाठीं खटपट केली पाहिजे.

दुसऱ्यांमध्यें आपल्या संस्कृतीचा प्रसार करावयाचा हें जर आपल्या मनांत असेल, तर आपण एक गोष्ट केली पाहिजे ती ही कीं, ज्या लोकांत आपण आपलीं मतें अगर संस्था पसरविणार त्या लोकांच्या संस्कृतीची व मनोरचनेची आपणांस उत्तम प्रकारें ओळख पाहिजे व त्यांच्या संस्कृतीचा आपण इतका अभ्यास केला पाहिजे कीं, त्यांच्या संस्कृतीसंबंधानें आपणच मोठे पंडित होऊन बसूं.

इंग्रजांनीं व इतर यूरोपियनांनीं संस्कृत विद्येची इतकी ओळख करून घेतली आहे व संस्कृत वाङ्मयासंबंधानें इतके ग्रंथ लिहिले आहेत कीं, आज जर एखाद्यास संस्कृताचा उत्तम पंडित बनावयाचें असेल, तर त्यास पाश्चात्त्य लोकांच्या ग्रंथांची ओळख करून घेणें भाग आहे. जो वर्ग एखाद्या विषयासंबंधानें परिश्रम करीत आहे किंवा ग्रंथ लिहीत आहे त्या वर्गांत आपली मान्यता व्हावी असें नवीन प्रयत्न करणारास वाटतें. संस्कृतादि पौरस्त्य वाङ्मयाचा अभ्यास करतांना आपल्या ग्रंथांची पूर्वींच्या शास्त्रीपंडितांमध्यें मान्यता होऊन त्यांच्याकडून आपणांस शाबासकी मिळावी असें पाश्चात्त्य पंडितांस वाटत असे; व शास्त्री लोकांस ज्यामुळें राग येईल अशीं कृत्यें अगर सुधारणा आपण करूं नयेत असेंहि त्यांस वाटत असे. मोनियर बुइल्यम्स्‌नें आपला संस्कृत कोश जेव्हां प्रसिद्ध केला व त्यांत संस्कृत शब्द लिहिण्यास पवित्र नागरी लिपी सोडून "म्लेच्छ" रोमन लिपीचा उपयोग केला तेव्हां शास्त्री लोकांच्या समजुतीखातर कांहीं वाक्यें लिहिलीं व या प्रयत्नाबद्दल शास्त्री लोकांनीं राग मानूं नये म्हणून विनंतिरूपानें आपल्या कृतीचें समर्थन केलें.

हार्वर्ड युनिव्हर्सिटीचे प्रो. लानमन यांनीं कांहीं संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध केले व त्यांत लांबलचक संधियुक्त अक्षरसमूह न ठेवतां निरनिराळे शब्द तोडून लिहिले; या त्यांच्या सुधारणेवर टीका बरीच झाली. इतर पाश्चात्त्य संस्कृतज्ञ असें म्हणाले कीं, हीं पुस्तकें जर शास्त्रीमंडळीच्या दृष्टीस पडतील तर ते काय म्हणतील ! आज हा मनु पालटला आहे. एतद्देशीय विद्वानांस असें वाटतें कीं, आपल्या प्राचीन भारतविषयक ग्रंथांची मान्यता पाश्चात्त्य विद्वानांकडून व्हावी. कै० लो० टिळकांसारख्या स्वाभिमानी लेखकासहि वेदांसंबंधीं ग्रंथ लिहितांना तो परभाषेंत लिहावा लागला. यावरून विवक्षित प्रकारें जम बसलेल्या व अगोदरच मान्यता पावलेल्या लेखकांचें महत्त्व लक्षांत येईल.

पारशी लोकांच्या पुरातन संस्कृतीसंबंधानें जर बरेंचसें विद्वत्त्वपूर्ण लिखाण मराठींत झालें तर पारशी लोकांसहि मराठी ग्रंथ आपल्या धर्मासंबंधानें व परमार्थासंबंधानें ज्ञान मिळविण्याकरितां वाचावे लागतील. हिंदू लोकांकडून पारशी लोकांच्या पवित्र ग्रंथांसंबंधानें उत्तम प्रकारचें वाङ्मय निर्माण होण्यास एक अवश्य गोष्ट म्हटली म्हणजे नागरी लिपींत झंदावेस्ताची आवृत्ति तयार करणें ही होय. नागरी लिपींत 'झंदावेस्ता' तयार झाला म्हणजे त्याच्या अभ्यासाकडे आपल्या संस्कृतज्ञ सुशिक्षितांचें लक्ष वेधेल व ते त्याचा 'तौलनिक' पद्धतीनें अभ्यास करून जे ग्रंथ निर्माण करतील ते ग्रंथ पारशी लोकांस वाचावे लागतील. त्यांस स्वतःच्या

पवित्र ग्रंथांचें ज्ञान व्हावें यासाठीं हिंदू सुशिक्षितांनीं लिहिलेल्या ग्रंथांचें अवलोकन करावें लागेल व संस्कृत ग्रंथांचें ज्ञानहि वाढवावें लागेल. असें झालें म्हणजे हिंदूंतील बुद्धिमान् लोकांचा व संस्कृत ग्रंथांचा पगडा पारशी लोकांवर वाढावयास लागून पारशांस हिंदूंतील विद्वान् वर्गाविषयीं शिष्यभाव उत्पन्न होईल.

आपल्या समाजास पचनीं पाडण्यास अत्यंत कठिण वर्ग म्हटला म्हणजे मुसुलमानांचा होय. मुसुलमान लोक अजूनदेखील अरबी भाषेंतूनच प्रार्थना करितात. विशेष सुशिक्षित व ज्यांस आपल्या सांप्रदायिक ग्रंथांची चाड आहे असे मुसुलमान अरबी भाषेंतूनच कुराण वाचतात, मग त्यांस त्या भाषेचें जरी ज्ञान नसलें व आपण काय वाचलें यांतलें त्यांस एकहि अक्षर समजलें नाहीं तरी देखील चालतें. ज्याप्रमाणें आपल्यांतील कांहीं लोक संस्कृतचें एक अवाक्षरहि येत नसलें तरी गीता वाचण्यांत पुण्य मानतात, त्याप्रमाणें बऱ्याच मुसुलमानांची वृत्ति झालेली असते. मुसुलमान लोकांच्या पारमार्थिक ग्रंथांवर व कायद्यावर अधिकारयुक्त वाणीनें आपण परके असल्यामुळें जरी आपणांस बोलतां येणें शक्य नाहीं तरी तुम्ही आपलें धर्मशास्त्र नीट समजून घ्या व जें काय करावयाचें तें अडाण्यासारखें न करितां सुशिक्षिताप्रमाणें करा, हें मुसुलमानांस सांगण्याचा आपला अधिकार आहे. जर आपणांतील कांहीं लोक कुराण व इस्लामी कायदा व अरबी वाङ्मय व इस्लामीयांचें तत्त्वज्ञान उत्तम प्रकारें पढले व मुसुलमानी संप्रदायावर सहानुभूतिपूर्वक ग्रंथ लिहूं लागले तर आपल्यांतील विद्वानांसहि थोडाबहुत अधिकार येईल. मुसुलमान लोकांस 'तुम्ही आपला धर्म समजून घ्या, व अमुकच आपला धर्म, आणि अमुकच आपलें कर्तव्य, अशा कल्पना डोळे मिटून ग्रंथावलोकन न करितां करून घेऊं नका,' हें सांगणें आपलें कर्तव्यकर्म आहे. कारण, मुसुलमानांसहि आपणांस चांगले नागरिक बनवावयाचे आहेत. कुराणाचें जर आपण अवलोकन केलें तर आपणांस असें दिसून येईल कीं, उत्तम नागरिक होण्यास जो उपदेश मनुष्यास केला पाहिजे त्या प्रकारचा उपदेश मुसुलमान ज्यास पैगंबर (शास्त्रदृष्ट्या) मानितात त्या महंमदानेंहि आपल्या ग्रंथांत केला आहे. जर आपणांस कित्येक ठिकाणीं दिसून येणारा उपदेश अयोग्य वाटला तर आपण त्याचा निषेधहि करावा; पण आपले जे समान नागरिक मुसुलमान त्यांच्या मनोवृत्तीचें व ती मनोवृत्ति घडवून आणणाऱ्या विचारपरंपरेचें, आणि त्या परंपरेचा मूलभूत ग्रंथ जो कुराण त्याचें आपणांमध्यें जें पूर्ण अज्ञान आहे, तें आपणांस लांछनास्पद आहे. मुसुलमान व ख्रिस्ती यांच्या ग्रंथांचें आपल्यांतील सुशिक्षित म्हणविणारांतहि किती अज्ञान आहे याची कल्पना या दोन संप्रदायांसंबंधानें रा. अत्युत्तम कोल्हटकर यांनीं जे लेख लिहिले व त्यानंतर 'केसरी'त जो वादविवाद उपस्थित झाला त्यावरून दिसून येईल.

मुसुलमान लोकांस धर्मग्रंथांचें अक्षरज्ञान आहे त्याच्या ऐवजीं धर्मज्ञान म्हणजे धर्मग्रंथांतर्गत विचारांचें ज्ञान व्हावें, यासाठीं त्यांस देशी भाषेंतून प्रार्थना करण्यास व देशी भाषांतील ग्रंथांतून धर्मज्ञान मिळविण्यास उत्तेजन दिलें पाहिजे. औरंगजेबानें पूर्वीं या प्रश्नाकडे लक्ष दिलें होतें. "धर्मग्रंथज्ञान जन्मभाषेंतून न मिळवितां व प्रार्थना देशी भाषेंतून न करितां परभाषेंतून करावी लागते हें अवश्य आहे काय?" असा आक्षेपरूपी प्रश्न त्यानें आपल्या शिक्षकास एका पत्रांत केला होता. त्याचे उद्गार आज बर्नियरच्या प्रवासवृत्तांत उपलब्ध आहेत. आपणास आजच्या मुसुलमानांपुढें तोच प्रश्न ठेवावयाचा आहे.

आज मुसुलमानांची आसक्ति अर्थावर नसून अक्षरावर आहे. याचे दुष्परिणाम अनेक आहेत. एकतर मुसुलमानांमध्यें समजूतदारपणाऐवजीं धर्मवेडेपणा असतो. दुसरा दुष्परिणाम म्हटला म्हणजे इस्लामी उपदेशाचे ते शिष्य न बनतां विदेशी संस्कृतीचे ते आग्रही बनतात; त्यांचें स्वरूप विदेशी बनतें; व एतद्देशीय भाषांचे व लिपींचे ते द्वेष्टे बनतात. नागरी लिपीचा प्रसार त्यांच्यामध्यें कमी आहे व फारसी आणि अरबी शब्द हिंदुस्थानी भाषेंत मिसळून ती अधिक कठिण बनविण्यास ते कारण झाले आहेत. मुसुलमानांस जर देशी भाषांतून कुराणाचें भाषांतर करण्यास व त्याचाच पाठ परमार्थसाधनासाठीं करण्यास आपण प्रवृत्त केलें तर भाषाविषयक रणें कमी माजतील व मुसुलमानांची देशी भाषेवर आसक्ति वाढेल. या हेतूच्या सिद्धीसाठीं आपलें कर्तव्य म्हटलें म्हणजे मुसुलमानांस पूज्य असलेल्या कुराणादि ग्रंथांचीं भाषांतरें देशी भाषांतून करवावीं, व संस्कृत भाषेमध्यें प्रावीण्य मिळवीण्यासाठीं मुसुलमानांकरितां कांहीं स्कॉलर्शिपा राखून ठेवाव्या; हिंदूंनीं देखील मुसुलमानी धर्माचा व अरबी वगैरे भाषांचा व्यासंग करावा.

हीं बाह्यांसंबंधाचीं जीं कर्तव्यें वर दिलीं आहेत तीं कांहीं अंशीं बाह्यांच्याच उन्नतीसाठीं आहेत, कांहीं अंशीं हिंदूंच्या उन्नतीसाठीं आहेत व कांहीं अंशीं बाह्य आणि हिंदू हे दोन्ही मिळून जें हिंदी राष्ट्र बनतें त्या हिंदी राष्ट्राच्या उन्नतीसाठीं आहेत. बाह्यांचें आपणांशीं जितकें सादृश्य वाढेल तितका आपलाच फायदा होणार आहे. एक तर महाराष्ट्रीयांपैकीं सध्यां जो लेखकवर्ग आहे तो वर्ग बाह्यांचा शिक्षक व पुढारी होईल. या लेखकवर्गास स्वतःचीं अंतःकरणें जातिद्वेष टाकून अधिक शुद्ध करून घ्यावीं लागतील. आमच्यांतील सुशिक्षित व लेखक मंडळीस केवळ हिंदूंचें म्हणजे महाराष्ट्रीय ब्राह्मणांचेंच पुढारीपण करावयाचें

नाहीं तर सर्व राष्ट्राचे पुढारी व्हावयाचें आहे. या आपल्या आकांक्षांनुसार आपणांस वर्तन ठेविलें पाहिजे. "केसरी" पत्राचा खप कितीहि असो, लो. टिळक हे कितीहि विद्वान् गृहस्थ असोत, त्यांचें आचरण कितीहि चांगलें असो, आज त्यांनीं आपल्या लेखांतून ज्या कल्पना पसरविल्या असतील त्या कल्पनांचा प्रसार यहुदी, ख्रिस्ती, गोवानीज, पारशी, मुसुलमान यांच्यामध्यें कितपतसा झाला आहे? फार कशाला? मुंबईचे शेणवी, पाठारे प्रभु, चौकळशी, पांचकळशी, दैवज्ञ ब्राह्मण, या जातींपैकीं कितीसे लोक केसरीच्या लेखांस स्वतःच्या मतांचे आदर्श समजतात व केसरी पत्रास स्वतःचा प्रतिनिधि समजतात? कायस्थ प्रभूंमध्यें केसरी-संबंधानें कितपतसें प्रेम आहे? जो समाज कोंकणस्थ ब्राह्मणां-पासून अधिक दूर तितकी त्याची केसरीसंबंधानें कमी भक्ति, असा एक ठोकळ नियम घालण्यास हरकत नाहीं. एवंच, महाराष्ट्रांतील प्रमुख पत्राचा परिणाम ज्या क्षेत्रांत होतो तें क्षेत्र किती नियमित आहे हें कळून येईल.

समाजांतील सर्व लोक एकाच विचारी लोकसमूहाकडे शिष्यदृष्टीनें पाहूं लागले म्हणजे समाजाचें विचारैक्य होतें, व कवी, नाटककार, निबंधकार व इतर प्रकारचे लेखक जें लोकमत उत्पन्न करितील तें खरेंखुरें सार्वजनिक मत होतें. सर्व जनतेला मान्य असें लोकमत बनविणारांचा वर्ग अजून उत्पन्न व्हावयाचा आहे. मुसुलमान व हिंदू लोक पुष्कळ गोष्टींमध्यें समोरासमोर उभे राहून वादविवाद करूं लागले, म्हणजे सर्व जनांवर परिणाम घडवून आणणाऱ्या कविजनसमूहाची संस्थापना होईल. परंतु जोंपर्यंत दोन्ही लोक आपापल्या पथकापुरती खळवळ करीत आहेत, व एका पथकांत काय चालतें याची शुद्धि दुसऱ्या पथकास नाहीं असें जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत समाजाची एकरूपत्वाकडे प्रगति होणें अशक्य आहे.

वर्तमानपत्रांचें क्षेत्र केवळ एका पथकापुरतें नसून कांहीं अंशीं सर्व राष्ट्रापुरतें असतें. लेखक जें लिहील तें एका लहानशा जातींतील माणसंच न वाचतां सर्व जातींच्या लोकांच्या नजरेसमोर येईल अशी लेखकास भीति पडते व त्यामुळें त्याच्या लेखणीवर दाब पडतो. यामुळें साधारण जनतेचीं मतें व अंतःकरणें बदलण्यास थोडीबहुत मदत होते. निरनिराळ्या जातीचे लोक समोरासमोर उभे राहून शांतपणानें वादविवाद करूं लागले म्हणजे सर्व लोकांस मान्य होतील अशा तऱ्हेच्या नीतितत्त्वांचा उद्भव होतो व कालां-तरानें या सर्व लोकांच्या वादविवादामुळें उत्पन्न झालेल्या नीतितत्त्वांचा परिणाम राष्ट्रावर होऊन राष्ट्रास एकस्वरूप येण्यास मदत होते.

या सर्वसामान्य नीति उत्पन्न करण्याच्या ध्येयाच्या पूर्ती-साठीं एक अवश्य गोष्ट म्हटली म्हणजे लोकांनीं आपले विचार स्पष्टपणें मांडण्यास शिकलें पाहिजे. आपलीं जीं खरीं मतें व भावना असतील त्यांचें सकारण समर्थन करतां येतें कीं नाहीं हें पाहण्याचाहि लोकांनीं प्रयत्न केला पाहिजे व आपल्या मतांचें आणि भावनांचें लोकांकडून परीक्षण होऊं दिलें पाहिजे. केवळ शिष्ट लोकांच्या भीतीनें खरे विचार लपवूं नयेत. आपल्या ज्या भावना असतील त्यांची लपवा-लपव करण्यांत अर्थ नाहीं. कारण, नीतिशास्त्राच्या मुळाशीं मनुष्यस्वभावाचें ज्ञान असलेंच पाहिजे, व मनुष्यस्वभावाचें आविष्करण आपण जर निःशंकपणानें केलें नाहीं तर आपलें नीतिशास्त्र मनुष्यस्वभावाच्या अल्प ज्ञानावर उभारलें जाईल, व तेणेंकरून सदोष असे नीतिनियम उत्पन्न होतील.

हिंदू व बाह्य हे दोन्ही लोक मिळून जो समाज उत्पन्न होतो त्या सर्व समाजास सामान्य अशीं नीतितत्त्वें उत्पन्न होतील अशी व्यवस्था झाल्यास दोन्ही समाजांस परस्परांशीं व्यवहारसंबंध ठेवण्यास सोयीचें होईल. इंग्रजी कायदा म्हणजे हिंदुस्थानांतील शासनसंस्थांनीं उत्पन्न केलेला कायदा परस्परांतील देवघेवीचा व्यवहार नियमित करितो. तथापि हिंदूंस व बाह्यांस सारखेंच बंधनरूप होईल असें लोकमत आपल्या येथें निर्माण झालेलें नाहीं व तें निर्माण करणारा वर्गहि झालेला नाहीं. जो तत्त्ववेत्ता सर्व लोकांस मान्य होतील अशीं नीतितत्त्वें उत्पन्न करील, व सर्व जनांत त्याचा प्रसार करण्यासाठीं खटपट करून सर्व जातींतील व संप्रदायांतील लोकांमध्यें आपल्या तत्त्वांस मान्यता मिळविण्याचा प्रयत्न करील तोच तत्त्ववेत्ता राष्ट्रामध्यें सामान्य नीति उत्पन्न करूं शकेल. सामान्य लोकमत उत्पन्न झाल्याशिवाय सामाजिक दळणवळण व व्यवहार शक्य नाहीं.

आतांपर्यंत बाह्यांसंबंधानें आपलें कर्तव्यकर्म सांगितलें व त्यांस आपल्यासारखें करण्यासाठीं आपण कोणत्या गोष्टी त्यांच्याकरितां केल्या पाहिजेत त्यांची यादी दिली; तथापि बाह्यांनीं आपणांसारखें वर्तन ठेवण्यास आपण काय केलें पाहिजे यासंबंधाचें अत्यंत महत्त्वाचें कार्य म्हटलें म्हणजे स्वतःचें शक्तिवर्धन हें होय. आम्हीं इतरांस आमची भाषा शिका म्हणून सांगितलें तरी त्यांनीं ती कां शिकावी? आम्हीं इतरांस आमच्यासारखें होण्यास सवलती दिल्या तरी त्यांचा फायदा इतरांनीं कां घ्यावा? जर आपण बलवान् झालों तरच आपण दिलेल्या सवलतीचा फायदा इतर लोक घेतील. नाहीं तर कोणीहि त्यांचा फायदा घेणार नाहीं. ख्रिस्ती लोक आपणांस त्यांच्यासारखें बनविण्यासाठीं जे ग्रंथ लिहितात ते आपण कितपत वाचतों? जर आपणांस कांहीं तादृश फायदा दिसेल तरच आपण ते वाचूं; एरवीं वाचणार नाहीं. इतर लोकांनीं आपणांशीं मिसळावें म्हणून जरी आपण सवलती दिल्या तरी जोंपर्यंत आपण बलवान् झालों

नाहीं तोंपर्यंत आपणांशीं स्नेहसंवर्धन करण्यास कोण प्रवृत्त होईल बरें ?

सुदैवानें, हिंदुस्थानास आज अंशानें स्वराज्याचा लाभ झाला आहे, आणि त्यामुळें सर्वजनतेच्या भाषेस व तीवरोवर त्या भाषेच्या सुशिक्षित वर्गास अधिक महत्त्व येऊन बाह्यांसंबंधानें खटपट करण्याची आवश्यकता पूर्वीपेक्षां अधिक झाली आहे. आपली व्यापारांत प्रगति झाली व आपला वर्ग श्रीमंत झाला म्हणजे आपण इतरांस दूर सारलें तरी देखील ते लोक आपल्याकडे येण्याची खटपट करतील. आपण आपल्या समाजाची सुव्यवस्थित घटना केली व आपली समाजशक्ति व सत्ता वाढविली तर इतर लोकांस आपल्यासारखें व्हावेंच लागेल.

आपण आपल्या भाषांचें स्वामित्व युनिव्हर्सिट्यांतून व प्रांतिक सरकाराच्या कामांत गाजविलें तर इतरांस आपल्यासारखें खास व्हावें लागणार. आपलें व्यवहारध्येय व राजकीय तत्त्व हें असलें पाहिजे कीं, आपण एकीकडे बलवान् होण्याचा प्रयत्न करावयाचा व इतर आपल्यासारखे होण्याचा प्रयत्न करूं लागले तर दुसऱ्याप्रमाणें त्यांस दूर न लोटतां उत्तेजन द्यावयाचें. पेशवाईंत ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांच्यामध्यें आचारभेदाची भिंत बांधण्याचा प्रयत्न चालत होता. आज आपणांस त्यांच्या अगदीं उलट प्रयत्न केला पाहिजे. आज महाराष्ट्रीय संस्कृतीच्या सरहद्दीवर ज्या ज्ञाती आहेत त्यांस आपल्यांत ओढून आणण्याचा, आल्यानंतर त्यांस पक्के महाराष्ट्रीय बनविण्याचा, आणि त्यांस आपणांत येण्यामध्यें कोणताहि कमीपणा वाटूं नये म्हणून आपणांत आल्यावर सहानुभूतीनें वागविण्याचा व त्याच्यावरोवरच स्वतःस अधिकाधिक बलवान् करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. राष्ट्राचें एकीकरण जें होतें तें, म्हणजे निरनिराळीं राष्ट्रकें एकत्र आणण्याचें काम, सर्वांत जो वर्ग संख्येनें व राजकीय महत्त्वानें बलाढ्य असेल त्यानें इतरांस एकत्र आणल्यानेंच होतें. बलाढ्य वर्ग हा समाजकेंद्र होय, व बलाढ्य वर्गानें इतर वर्गांस व समाजांस आपणांशीं चिकटवून घेतल्यानेंच राष्ट्रीकरण होईल.

राष्ट्रीयत्वभावना ख्रिस्ती जगांत उत्पन्न होऊन परमार्थविषयक विचारांनीं उत्पन्न केलेली आणि भिक्षुकांच्या प्रयत्नानें राखलेली माणसामाणसांतील ताटातूट ख्रिस्ती जगांत कमी कमी होत आहे आणि लोकमतमूलक शासनाचा आणि तत्त्ववेत्त्यांनीं निर्माण केलेल्या विचारांचा पगडा जनतेवर बसून आज यूरोपांतील व अमेरिकेंतील राष्ट्रें शासित होऊं लागलीं आहेत. ख्रिस्ती जगांत पारमार्थिक सत्तेविरुद्ध राजकीय सत्ता असा प्रकार झाल्यामुळें पारमार्थिककल्पनामूलक सत्तेनें माजविलेला घोंटाळा लवकरच लयास जाण्याच्या पंथास लागला. मुसुलमानांची गोष्ट मात्र तशी नाहीं. येथें शासनसंस्था आणि पारमार्थिक सत्ता यांचें ऐक्य असल्यामुळें आणि खलीफ हाच चक्रवर्ती राजा आणि मुसुलमानी जगाचा नेता सांप्रदायिक कल्पनांनीं असल्यामुळें परमार्थमूलक संप्रदायामुळें होणारा घोंटाळा राजसत्ताच ढांसळल्याशिवाय नष्ट होणें अशक्य होतें. सर्व मुसुलमान हे एक आहेत आणि इतर जगावर राज्य करण्यासाठीं किंवा त्याची संपत्ति लुटण्यासाठीं त्यांनीं बद्धपरिकर असावें अशा तऱ्हेची परमार्थप्रचारार्थ उत्पन्न झालेल्या शासनतत्त्वांची मांडणी झालेली आहे. त्यामुळें केंद्र जें खिलाफत त्याचे पूर्ण तुकडे झाल्याशिवाय मुसुलमानांचें लक्ष खैबर घाटापलीकडे न जातां देशांतच स्थिर होणें शक्य नव्हतें. एका विशिष्ट कार्यार्थ उत्पन्न झालेली गति मुळाशीं असलेला जोर अजीवात तुटेपर्यंत चालूच होती आणि ती आपल्या स्वतःच्या कार्यासाठींच स्थानिक सत्तेचा उपयोग करून घेई असें मुसुलमानांच्या समाजाविषयीं म्हणतां येईल. खिलाफतीचे आतां जवळ जवळ पूर्णपणें तुकडे झालेले आहेत, आणि त्यामुळें संप्रदायाभिमानाऐवजीं स्वदेशाभिमान मुसुलमानांत अधिक जागृत होईल अशी अपेक्षा आहे. जर्मनांच्या साहाय्यानें तुर्कांनीं नुक्तें आटपलेलें युद्ध म्हणजे मुसुलमानांच्या जगज्जयिष्णु कल्पनेचा शेवटचा उमाळा होय.

मुसुलमानी संप्रदायामध्यें संप्रदायभावना जागृत रहावी आणि त्यांचें प्रेम शेजारच्या हिंदूंवर असण्याऐवजीं डोंगरांपलीकडच्या राष्ट्रांशीं बद्ध व्हावें ही गोष्ट देशास हितावह नाहीं. खिलाफत ठार मेल्यानें राष्ट्रीय भावनेस जर जोर मिळणार आहे तर खिलाफत प्रश्न हातीं घेऊन सध्यां कांहीं पुढारी म्हणविणारे हिंदू देखील चळवळ करितात याचें बीज काय ? हें करण्यामध्यें महात्मा गांधींचा कोणता हेतु आहे ? ही चळवळ करणारे हिंदू लुच्चे आहेत कीं मूर्ख आहेत असा प्रश्न वारंवार उपस्थित होतो. व्यक्तींच्या मनांत कोणास शिरतां येत नाहीं, तथापि कृत्यांवरून आणि परिस्थितीच्या शक्य परिणामांच्या पृथक्करणानें कार्यकर्त्यांच्या मनांतील हेतू काढावयाचे ठरविल्यास असें म्हणतां येईल कीं, पॅन-इस्लामिझम नांवानें ठाऊक असलेली राजकीय चळवळ इतकी आशेपलीकडे गेली आहे कीं, तिला आतां हिंदूंनें देखील मदत करण्यास हरकत नाहीं, असें या चळवळींत पडणाऱ्या हिंदूंस वाटत असावें आणि कितीहि आक्रोश केला तरी खिलाफत जर जिवंत होणार नाहीं तर मग फुकटचा शाब्दिक आशिर्वाद देण्यास माघार कां घ्या अशी त्यांची विचारसरणी असावी. केलेल्या आक्रोशामुळें इस्तंबूल सरकारचा जरी कांहीं फायदा झाला तरी तो इतका होणार नाहीं कीं, त्यानें मुसुलमानांची राजकीय सत्ता बळावून ते पुन्हां जगज्जयिष्णु बनूं पहातील. या चळवळीनें मुसुलमानी संप्रदाय राजकीय दृष्टीनें बळकट होण्याचा संभव नसतां यूरोपीय राष्ट्रांच्या अधाशी धडपडींत तुर्कांचें राज्य जितकें अधिक टिकेल तितकें टिकवावें, हलवायाच्या दुकानावर संतर्पण

करावयाचें आहे तर ख्रिस्ती राष्ट्रें विरुद्ध मुसुलमान या लढ्यांत आपण मुसुलमानास शाब्दिक मदत करण्यास कोणती हरकत आहे? शिवाय केवळ मुसुलमानी हिताच्या बाबतींत हिंदूंनीं साहाय्य केलें, आणि एवढेंच केवळ नव्हे तर या चळवळींत हिंदूंनीं पुढारीपण घेतलें तर दुसऱ्या अनेक चळवळींत मुसुलमानांचें साहाय्य मागण्याचा हक्क हिंदू पुढाऱ्यांस सहज उत्पन्न होणार. या दृष्टीनें विचार केला तर महात्मा गांधींची कृति अगदींच वेडी व गैरधोरणी दिसणार नाहीं.

स्पर्धाक्षेत्राचें अवलोकन करून भारताबाहेर हिंदुत्वाचे अवशेष शोधून आपली कर्तव्यमीमांसा करतांना भारतीयांच्या भारतबाह्य लोकांशीं असणाऱ्या संबंधांचें ज्या बाबतींत रक्षण करणें शक्य आहे त्या गोष्टी मागें वर्णिल्या आहेत. भारतीय साहित्याचा भारतबाह्य भाषांवर व संगीतावर परिणाम घडविणें, ज्योतिःशास्त्र आणि आयुर्वेद यांविषयींच्या आपल्या चळवळींत भारतबाह्य भारतीयांस सामील करून घेणें एवढेच संबंध ठेवण्याचा आपणांस प्रयत्न करतां येईल. व्यापारानें संबंध ठेवण्याच्या कल्पनेचा आणि राजकीय ऐक्याच्या कल्पनेचा थोडासा विचार मागें केलाच आहे. जो विचार त्यावेळीं वगळला तो सामाजिक होय. हा सामाजिक विचार हातीं घेण्यापूर्वी भारतीयांच्या एकराष्ट्रीयत्वाचें विवेचन अवश्य असल्यानें त्याच्यासाठीं, जेणेंकरून देशांतील अपसृष्टांस जवळ ओढून आत्मवत् करतां येईल असे कोणते फरक हिंदुसमाजामध्यें होणें शक्य आहे याचा विचार करावा लागला. आतां याच विचाराच्या पूर्तीसाठीं समुच्चयरक्षणाच्या नीतिशास्त्राचे नियम तपासावयाचे आहेत. विशिष्टसमुच्चयरक्षणाला समाजशास्त्रीय तत्त्वज्ञानाचा कांहीं पाठिंबा मिळतो काय याचा विचार होणें अवश्य आहे. भारतीय समाजव्यवस्था आणि भारतबाह्य भारतीयांची समाजव्यवस्था यांचा संबंध एकसंस्कृतितत्त्वावर जोडतां येईल किंवा नाहीं हा विचार करण्यासाठीं भारतीय समाजव्यवस्था कितपत टिकेल, ती टिकवण्याचा प्रयत्न कां करावा, भारतीय समाज व इतर समाज जोडण्याइतकी भारतीय समाजाच्या आधुनिक स्वरूपाची स्थिरता आहे काय, आणि अशी स्थिरता नसल्यास निदान असें शक्य आहे काय कीं पुढें शेंपन्नास वर्षांपर्यंत दोन्ही समाजांची विशिष्ट तऱ्हेनें प्रगति होत होत ते समाज एकस्वरूपी होऊं शकतील, हा विचार अवश्य होतो. जे थोडेसे जवळ आहेत त्यांस पक्कें जवळ करण्याचा प्रयत्न करणें किंवा भारतीय समाजास विश्वबंधुत्वावर एकदम उडी मारावयास उत्तेजन देणें यांपैकीं करावें तरी काय याविषयींचे कार्यसिद्धांत बांधण्यासाठीं आपल्या संस्कृतीचा नाश अथवा रक्षण करण्यासंबंधींचे नीतिनियम तपासले पाहिजेत. आपणांस असा विचार केला पाहिजे कीं आपणच मोडक्या समाजाचे छिन्नभिन्न झालेले अवयव, आपला समाजच आपणांस संभाळतां येत नाहीं तर क्यांबोडियाच्या चामलोकांविषयीं आपण फिकीर बाळगीत बसावें कां? याशिवाय दुसरेहि विचार प्राप्त होतात ते असे. आपल्या समाजाचें स्वरूप जर पुष्कळसें पालटत आहे तर तें वाटेल तसें पालटूं कां देऊं नये? विशिष्ट लोकसमूहांस कोणत्या तरी प्रकारच्या हिंदुत्वाखालीं एकत्र करून आपलें मध्यवर्तित्व ठेवण्यांत इतर लोकांचा फायदा आहे काय? या अट्टहासानें आपला स्वतःचा तरी कितपत फायदा आहे? आपली समाजव्यवस्था मोडून आपणच दुसऱ्या संघांत कां मिळूं नये?

**समाजांतील असंतुष्ट वर्गानें स्वसमाजत्याग करावा काय?**—जगांतील सर्धेविषयीं विचार करतांना समुच्चयांमधील स्पर्धा जेव्हां आपण विचारांत घेतों त्यावेळेस विशिष्ट समुच्चय जगावा आणि त्या समुच्चयाशीं स्पर्धा करणाऱ्या इतर समुच्चयांविरुद्ध त्यास जय यावा या तऱ्हेची आपली वृत्ति नेहमींच असते. समुच्चय जर व्यक्तिहितासाठीं आहेत तर आपलें हित साधावयास अधिक सवड देणाऱ्या समुच्चयास मिळण्यासाठीं व्यक्तींनीं आपल्या समुच्चयास सोडून कां जाऊं नये याचा विचार केला पाहिजे, आणि त्या विचाराच्या अनुषंगानें व्यक्तीस समुच्चयाचा अभिमान धरावयास लावण्यासाठीं समुच्चयाचे हितचिंतक, अभिमानी किंवा कार्यकर्ते यांच्या समुच्चयांतर्गत व्यक्तीसंबंधानें ज्या अपेक्षा असतील त्या अपेक्षांचें नियमन केलें पाहिजे. हिंदूंनीं ख्रिस्ती अगर मुसुलमान कां होऊं नये? त्यांत नुकसान कोणाचें होणार? देशाच्या राज्यव्यवस्थेसाठीं कर दोघांसहि द्यावा लागतो; आणि देशांतील आर्थिक व आरोग्यविषयक सुधारणा मुसुलमानांच्या हातीं राज्यकारभार आला किंवा हिंदूंच्या हातीं राज्यकारभार आला तरी कारभारी बुद्धिमान असल्यास सारख्याच होतील अशी स्थिति असतां एखादा मनुष्य जर मुसुलमान झाला तर त्यांत त्याचा दोष काय? मुसुलमान होण्यांत त्याचा फायदा होत असेल तर त्यानें मुसुलमान तरी कां होऊं नये? ज्या हिंदूंच्या कायद्यांचें लिगाड फार त्रासदायक आहे, आणि ज्या हिंदूंना एकमेकांचें हित साधण्यासाठीं संघीभूत होतां येत नाहीं, आणि ज्या समाजास चिकटून राहण्यानें जगांतील अनेक रुचिकर मांसें खाण्यास प्रतिबंध होतो किंवा ज्या समाजांत राहिल्यानें वाटेल त्या जातीशीं अगर वर्गाशीं लग्न लावावयास प्रतिबंध होतो, जेथें उच्च कुलांतील विधवांस इच्छेप्रमाणें पुनर्विवाह करावयास त्रास पडतो आणि एकंदर मोकळेपणानें व्यवहार करावयास अडचणी येतात, त्या गचाळ हिंदुसमाजांत राहण्यांत आणि स्वतःचें नुकसान करून घेण्यांत व्यक्ति कोणाचें हित साधणार आहे? आणि ख्रिस्ती अगर मुसुलमान झाल्यानें तरी काय नुकसान होणार आहे? महारांनीं ख्रिस्ती अगर मुसुलमान न होतां हिंदूच राहण्याचा मूर्ख हट्ट कां करावा? ब्राह्मणांतील देखण्या विधवांनीं त्यांना अरसिक हिंदू पतकरीत नसतील तर ख्रिस्ती

अगर मुसुलमान नवरे कां करूं नयेत? याचा खुल्या दिलानें विचार झाला पाहिजे. शंकराची पूजा केल्यानें मनुष्य स्वर्गास जात नाहीं किंवा बिसमिल्ला म्हटल्यानें नरकास जात नाहीं. तर विशिष्ट उपासनेचा किंवा आचाराचा अभिमान तरी कां धरा? आम्ही जे ग्रंथ कोणीहि वाचीत नाहींत त्या वेदांचें, पुराणांचें वगैरे उगाच शाब्दिक म्हणजे खोटें अनुयायित्व कां पतकरावें? त्यांची उपासना करणें हा आमच्या बापदाद्यांचा धर्म असेल पण तसें असलें म्हणून काय झालें? आम्ही मुसुलमान होऊन बापदाद्यांचें श्राद्ध करावयाचें चुकविलें तर आमचे पितर नरकांत पडणार अशी आपली खात्रीच असती तर मेलेल्यांचें हित पहावयाचें कीं जिवंतांचें हित पहावयाचें याचा विचार पडला असता. पण ती खात्री तरी आज आहे काय? पितृगणांच्या अदृश्यसृष्टिविषयींच्या कल्पनांवर तरी आज कितपत विश्वास आहे? पितृतर्पणाच्या उपयोगासंबंधानें खात्री नाहीं, तर मग आचार्यतर्पण कशास पाहिजे आणि अग्नीच्या धुरानें डोळे दुखविणारी श्रावणी तरी कशाला करा? चार बायका करण्यास अनुकूल असा मुसुलमानी संप्रदाय ख्रिस्त्यांनीं कां घेऊं नये? किंवा दारू प्यावयास अनुकूल असा ख्रिस्ती संप्रदाय हिंदुमुसुलमानांनीं कां स्वीकारूं नये? ज्याला जो समाज अनुकूल वाटेल त्या समाजांत शिरावयाच्या इच्छेस गैर काय म्हणून म्हणतां? ज्या कुलांत अगर प्रदेशांत आपला जन्म झाला त्या कुलाशीं संबद्ध असलेल्या समाजाचें किंवा देशाचें नागरिक आपण राहिलेंच पाहिजे असा तुमचा हट्ट आहे काय? आपण कोणत्या समाजाचें नागरिक व्हावें हें आपल्या इच्छेनें आपण कां ठरवूं नये? जन्मसिद्ध स्थिति चांगली समजणें हें कर्तव्य आहे काय? आणि त्या जन्मसिद्ध स्थितीशीं श्रद्धामय अन्तःकरणानें तादात्म्य ठेवणें हें जर मनुष्याचें कर्तव्य असेल तर गरीबानें श्रीमंत व्हावयाची तरी इच्छा कां करावी? आणि अशिक्षितांनीं सुशिक्षित व्हावयाची इच्छा कां करावी? धर्माभिमान, देशाभिमान हे शब्द लुच्चांचे अगर मूढांचे नव्हेत काय? ज्याप्रमाणें शिक्षकवर्गास अर्धपोटीं काम करावयास लावण्यास त्यांच्या स्वार्थत्यागाची तारीफ करण्याची आपण धूर्तता दाखवितों, त्याप्रमाणें धर्माभिमान इत्यादि शब्द कमी किंमतीचा माल अधिक किंमतीस विकण्यासाठीं योजिलेले नव्हेत काय? ख्रिस्ती संप्रदायाचा अवलंब केल्यानें हिंदुसमाजघटनेच्या सिद्धांताप्रमाणें जरी समाजांतील कनिष्ठता मनुष्यास प्राप्त होते तरी व्यावहारिक दृश्य प्रमाण पाहिलें असतां कनिष्ठताच प्राप्त होते असें म्हणवत नाहीं. आज आपण ख्रिस्ती झालेल्या एतद्देशीयांची स्थिति लक्षांत घेतली तर त्यांची स्थिति ज्या वर्गांतून ते ख्रिस्ती झाले त्या हिंदूंच्या वर्गापेक्षां वाईट आहे असें आपणांस म्हणतां येईल काय? आपल्या कुणब्यांपेक्षां किंवा शिंप्यांपेक्षां गोवानीज शिंप्यांची आणि खैंपाक्यांची रहाणी वाईट आहे असें म्हणतां येणार नाहीं. पुष्कळ हिंदू असें कबूल करतात कीं गोव्यांतील खालच्या वर्गाच्या हिंदू स्त्रियांपेक्षां ख्रिस्ती स्त्रियांत पातिव्रत्य अधिक चांगलें आहे. नायर स्त्रियांपेक्षां मलबारांतील सीरियन ख्रिस्ती स्त्रियांमध्यें अधिक पवित्राचरण आहे. सांपत्तिक दृष्ट्या पाहिलें तर गोवानीज खैंपाकी आपल्या खैंपाक्यापेक्षां अधिक पैसे मिळवितो आणि अधिक चांगल्या स्थितींत असतो असें म्हणतां येईल. आपल्या शिंप्यांपेक्षां गोवानीज शिंपी जास्त पैसे मिळवितात हें आपणांस दिसून येतें. याशिवाय व्यापारांत कोंकणांतील हिंदूंपेक्षां गोवानीज अधिक पुढें गेलेले आहेत असें दिसून येतें. महाराचे प्रॉटेस्टंट ख्रिस्ती झालेले लोक पाहिले आणि त्यांची आपल्या महारांशीं तुलना केली तर आपणांस हें खास कबूल केलें पाहिजे कीं सांपत्तिक दृष्टीनें, रहाणीच्या दृष्टीनें आणि कर्तृत्वाच्या व शिक्षणाच्या दृष्टीनें हे ख्रिस्ती आपल्या तत्सम वर्गापेक्षां अधिक चांगल्या स्थितींत आहेत. असें जर आहे तर मग ते ख्रिस्ती झाले याबद्दल आपणांस दुःख तरी कां वाटावें, आणि त्यांस तुम्ही ख्रिस्ती होऊं नका म्हणून सांगण्यांत आपला शहाणपणा कोणता? जें हित त्यांस आपण देऊं शकत नाहीं तें त्यांनीं जर दुसरीकडून मिळविलें तर आपण त्याबद्दल खेद कां मानावा? आणि बाह्यांसंबंधानें कर्तव्यकर्म म्हणून सांगण्यांत जीं पानें खर्च केलीं त्यांत शहाणपणा कोणता? स्वहिताकरतां स्वसमाजाचा त्याग करणें व परसमाजांत प्रवेश करणें या गोष्टीचा तात्त्विक विचार झाला पाहिजे. असा तात्त्विक विचार करणें म्हणजे स्वसमाजत्यागाची तयारी करणें असें मात्र खास नव्हे. हा विचार व्यक्तींच्या अपेक्षा आणि समाजाच्या अपेक्षा यांचें परस्परांकडून नियमन होण्यास उपयोगी पडेल.

**स्वसमाजत्यागास अडचणी.**—योग्यायोग्यतेच्या कल्पना शक्याशक्यतेच्या नियमांनीं बद्ध होत असतात. मनुष्यास परकीय समाजाचें सदस्यत्व पत्करणें अशक्य किंवा कठिण करणाऱ्या तरी कांहीं गोष्टी आहेत काय? तसेंच आपल्या हिंदुत्ववर्धनाच्या इच्छेनें आपण जाळें पसरूं लागलों तर त्या जाळ्यांत किती लोक सांपडतील या गोष्टींचा विचार आपली समाजशास्त्रीय नीति ठरवितांना केला पाहिजे. प्रथम मनुष्यास स्वसमाजास चिकटवून ठेवणाऱ्या गोष्टी कोणत्या या प्रश्नाचा विचार करूं.

व्यक्तीची प्रवृत्ति स्वसमुच्चयांतच रहाण्याकडे व्हावयाची यास जी स्वाभाविक कारणें आहेत तीं येणेंप्रमाणें:—

मनुष्य हा निसर्गतः सहवासप्रिय प्राणी आहे व तो ज्या समुच्चयांत जन्मास येतो त्यामध्यें राहून त्यास आपली व आपल्या बांधवांची सुखप्राप्ति जी सहज करून घेतां येते ती परकीय समुच्चयांत जाऊन करून घेण्यास त्यास अत्यंत त्रास पडतो असा अनुभव आहे.

मनुष्य जर आपल्या वृत्तींत कांहीं स्थैर्य न ठेवतां काल्पनिक सुखाच्या पाठीमागें लागून समुच्चयांची वारंवार धरसोड करूं लागेल, तर कोणत्याहि समुच्चयांत मिसळणें त्यास अशक्य होईल.

ज्या समुच्चयांत मनुष्य जन्मास आलेला आहे त्यांत अनुकूल परिस्थिति असून जर त्यास सुखप्राप्ति करून घेतां येत नसेल तर परकीय समुच्चयाच्या परिस्थितींत पडून सुख मिळविणें त्याला त्याहूनहि कमी शक्य आहे.

परकीय समाजाचें सदस्यत्व पत्करतांना मनुष्य तरतमभाव पाहतो. समुच्चय सोडून केवळ स्वतःच्या जबाबदारीनें सुख मिळविणें प्रत्येकास शक्य नाहीं. आणि म्हणून दुसरा समुच्चयच स्वीकारावयाचा तर अगदीं परकीय प्रकृतीचा समुच्चय स्वीकारण्यापेक्षां सदृशप्रकृतीचा स्वीकारणें जास्त इष्ट आहे.

समाजाच्या व्यक्तिविषयक अपेक्षांचें ज्ञान आणि त्यांच्या पूर्तीसंबंधानें करावयाच्या कर्तव्याची जाणीव ज्या मानानें मनुष्यास असेल त्या मानानें समाजत्यागास त्याचें मन माघार घेईल.

मनुष्याला नागरिकत्वाच्या निवडीचें ज्ञान प्राप्त होण्यापूर्वी त्यावर जे कांहीं पूर्वसंस्कार झालेले असतात त्यांचा त्याग त्याच्यानें एकदम होत नाहीं.

मातृभूमीचें किंवा समाजाचें ऋण मनुष्याला प्रत्यक्ष दिसत नसलें तरी त्याच्या ठिकाणीं त्यासंबंधाची भावना जागृत असते.

वाटलेल्या महारास ख्रिस्ती अगर मुसुलमान समाजांतहि त्याच्या शैक्षणिक स्थितीमुळें कनिष्ठ स्थानच मिळणार. ख्रिस्त्यांतील जातिभेद हा या ठिकाणीं लक्षांत घेण्यासारखा आहे.

स्वतःपेक्षां संस्कृतीनें, ज्ञानानें, बुद्धिमत्तेनें, द्रव्यानें वगैरे कोणत्याहि एका प्रकारानें श्रेष्ठ अशा समाजांत शिरणाऱ्या नवख्या गृहस्थास उच्चपद मिळणें अशक्य असतें.

श्रेष्ठ पदवीचा मनुष्य कनिष्ठ समाजांत गेल्यास श्रेष्ठ पदावर गेला तरच जातो.

धंद्यांची आनुवंशिक होण्याची सामान्य प्रवृत्ति हेंहि एक महत्त्वाचें कारण आहे. दुकानदाराचा मुलगा दुकानदार न झाल्यास दुकानाची गिऱ्हाइकी, इभ्रत, पत वगैरे फुकट जातात, व सहज शिक्षणाचा फायदा फुकट जाऊन नवीन शिक्षण घेण्यास जास्त श्रम, वेळ व द्रव्य हीं लागतात.

एका समाजांत अनेक दिवस राहिल्याचा एक प्रकारचा फायदा ओळखी, नातेवाइक वगैरे असतो तो नवीन समाजांत मिळत नाहीं आणि त्या मानानें सात्मीकरण होण्यास काळ लागतो. नवखा हा कोठेंहि थोड्याफार प्रमाणानें एकाकी असतो.

स्वसमाजत्याग करण्यास मनुष्य नाखूष कां होईल त्याचीं कारणें दिलीं. आतां त्यागाकडे प्रवृत्ति कोणत्या कारणांनीं होईल याचा विचार करूं.

**स्वसमाजत्यागास प्रवृत्तिकारक कारणें.**—कोणत्याहि दुःखाच्या अगर अपमानाच्या प्रसंगीं व्यक्तीची प्रवृत्ति दुःखाचे प्रसंग स्वतःपुरते चुकविण्याकडे असते. सार्वजनिक प्रश्न हातीं घेऊन त्यांजशीं लढण्याकडे नसते. राजकारण हा ज्यांचा धंदा आहे त्यांस तत्त्वासाठीं भांडण्यास अवकाश सांपडेल पण इतरांची तशी गोष्ट नाहीं. ज्या वर्गाचा अपमान होत असेल त्या वर्गाचें सदस्यत्व चुकवावयाचें हा सामान्य प्रकार. हा प्रकार पुष्कळ स्वरूपांत दृष्टीस पडतो. कै० उमेशचंद्र बानर्जी यांनीं कांग्रेसच्या चळवळीपूर्वीं एक पंथ काढला होता तो असा कीं, बायको गरोदर झाल्यानंतर तिला प्रसूतीसाठीं इंग्लंडला पाठवून द्यावयाचें. याचा हेतु असा होता कीं, मुलगा इंग्लंडमध्यें जन्मला म्हणजे त्यास इंग्रजाचे हक्क मिळतील. हिंदुस्थानांतील पारशांपैकीं कांहीं वर्ग आपण नेटिव नाहीं असें प्रतिपादीत असे. यांत त्यांचा हेतु असा होता कीं, नेटिवास जे अपमानाचे प्रसंग येतात त्यांपासून आपली जात सुटावी. त्यांनीं आपण यूरोपीयांचे वंशज आहोंत असें सिद्ध करण्यासाठीं, हजारों ग्रीक इराणांत राहिले होते त्या वेळीं त्यांचें म्हणजे यूरोपीय रक्त पारशी जनतेंत मिसळलें असावें असे विचार व्यक्त करण्यास सुरुवात केली. या अर्थाचा एक लेख 'ईस्ट ॲण्ड वेस्ट' या मुंबईस प्रसिद्ध होणाऱ्या नियतकालिकांत प्रसिद्ध झाला होता. हिंदुस्थानांत नेटिवांचा अपमान होतो तर हिंदुस्थानांत रहा तरी कशाला, परदेशींच कायमची वसाहत करून कां राहूं नये, या प्रकारचा मोह परदेशीं गेलेल्या भारतीयांस पडतो, हें त्यांशीं संबंध येणाऱ्या लोकांस ठाऊक आहेच. समाज पुढें सुधारेल या भावनेनें आपला स्वार्थ सोडणें हें प्रत्येकास करतां येणार नाहीं. आपण मेलों आणि पुढें समाजाला चांगली स्थिति आली तर तिचा आपणांस उपयोग काय हा विचार सामान्य लोकांच्या पुढें येतो.

**स्वसमाजनिष्ठा.**—आतां नुकसान सोसूनहि समाजास अभिमानानें चिकटून रहाणें या गोष्टीचें समर्थन कसें करतां येईल याचा विचार करूं. धर्माभिमान, देशाभिमान इत्यादि उच्च भावनांचें समाजांत कार्य कोणतें आहे? देशाभिमानी मनुष्य इतर राष्ट्राचें नागरिकत्व अधिक फायदेशीर असतांहि आपल्या राष्ट्रास चिकटून राहील. राजा पराभूत झाला असतांहि राजनिष्ठ मनुष्य त्याला सोडणार नाहीं. राष्ट्रत्यागापेक्षांहि संस्कृतित्याग अथवा धर्मत्याग हा लोकांस अप्रिय आहे. राजनिष्ठा, देशनिष्ठा, धर्मनिष्ठा या सर्वांची तारीफ चोहोंकडे होते. जेव्हां राजा दुर्बल असेल, जेव्हां देश सुखकर नसेल, जेव्हां धर्म अनिश्चित आणि असुखकारक असतील, तेव्हां त्यांस चिकटून राहिल्यानें कांहीं फायदा नसतो; परंतु जेव्हां चिकटून राहिल्यानें फायदा नाहीं तेव्हांच निष्ठेची खरी परीक्षा होते. कठिण प्रसंगांतून तरून जावयास निष्ठा पाहिजे.

स्पर्धामय जगांत समुच्चयांनीं जिवंत रहावयाचें तर व्यक्तींची समुच्चयांच्या ठायीं निष्ठा असणें हें अत्यंत आवश्यक आहे.

स्वजनांस सोडून परकीय जनतेचे आपण अंश व्हावें अशा वृत्तीची निंदा जे करितात त्यांच्या निंदेंत काय अर्थ आहे हें पाहूं. राजनिष्ठा, धर्मनिष्ठा, आणि कर्तव्य म्हणून एखादी गोष्ट आपण केली पाहिजे, त्यांत नुकसान आलें तरी पत्करलें, ही बुद्धि आणि यासारख्या केवळ रुपये, आणे, पैकडे लक्ष न ठेवण्याच्या उदार भावना समाजास अवश्य आहेत किंवा नाहींत? आसक्ति केवळ व्यक्तीच्या फायद्या-तोव्यावर ठेवली तर अनवस्था उत्पन्न होते. गरीब नवऱ्यास सोडून स्त्रीनें दुसऱ्या एखाद्या श्रीमंताकडे जाऊन कां राहूं नये? आपल्या राजाचा पराभव झाला तर परकीय राजास आपल्या राजाविरुद्ध लढण्यासाठीं सावकारांनीं अधिक व्याजासाठीं द्रव्य कां देऊं नये? राजभक्तीचें प्रयोजन तरी काय?

या प्रश्नांनां असें उत्तर आहे कीं, समुच्चयाच्या द्वारा व्यक्तीचें हित साधावयाचें आहे आणि तें साध्य होत रहावें म्हणून समुच्चयाला तदंतर्गत व्यक्तींच्या भक्तीची आवश्यकता आहे. समुच्चयास वाईट दिवस आले तरी त्यांतून समुच्चय-संस्था पार पाडावी आणि व्यक्तींनीं समुच्चयाचा त्याग करूं नये. कां कीं सामुच्चयिक स्थिति एकदां नष्ट झाली म्हणजे पुन्हां ती जुळविण्यास त्रास पडतो, आणि व्यक्तींनां आपलें सामुच्चयिक हित साधणें कठिण होतें. राज्य गेलें म्हणजे तें पुन्हां मिळविणें कठिण होतें. जेव्हां समुच्चय कार्य करण्यास असमर्थ होतील तेव्हां ते जिवंत ठेवावे आणि त्यांजकडून काम करवून घ्यावें किंवा ते मरूं द्यावे आणि व्यक्तिहित साधण्यासाठीं निराळी संस्था निर्माण करावी हा एक विचार करण्यासारख्या प्रश्न आहे.

आपला समाज दुर्बल आहे तर त्याचा त्याग न करितां त्या समाजामध्येंच राहून आपल्या ज्ञातिबांधवांस अधिक महत्त्वाचें स्थान प्राप्त करून देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हा उच्च प्रकारचा देशाभिमान आहे. येथें कोणी असें म्हणतील कीं विशिष्ट समाजास चिकटून राहून तो वाढ-विण्याची इच्छा तरी कशाला हवी? जो समाज जगावयास योग्य आहे तो जगेल, त्याला इतर लोक मिळतील. या पद्धतीनें श्रेष्ठ समाज तेवढे टिकतील आणि हेंच झालेलें चांगलें. आपण विश्वबंधुत्व ठेवावें आणि अधिक फायदेशीर समाजास मिळावें. याला उत्तर असें आहे कीं विश्वबंधुत्वाच्या दृष्टीनें देखील नियमित समाजावर जडलेली आसक्ति अश्रेयस्कर ठरणार नाहीं. कां कीं, विश्वबंधुत्वाचें बीज रुजावयास निरनिराळे समाज बऱ्याच अंशीं सारख्याच स्थितींत असावे लागतात. बलवान् आणि दुर्बल यांचें सख्य होत नाहीं. अल्पसमुच्चयाच्या सदस्यत्वाविषयीं उदासीन रहाण्याचा बाणा बाळगणाऱ्या व विश्वबंधुत्वाचा बहाणा करणाऱ्या वक्त्यांसहि आपल्या दुर्बल जातीविषयीं उदासीनता दाखविणें शोभणार नाहीं.

आपला समाज सुधारला पाहिजे किंवा सोडला पाहिजे हा विचार मात्र समाजांत जागृत पाहिजे. कां कीं, त्याशिवाय समाजसुधारणा होणार नाहीं.

जर एखादा विशिष्ट समुच्चय इतर समुच्चयांपेक्षां आपल्या सभासदांची काळजी विशेष घेत असेल, तर त्या समुच्चयां-तील लोकांस त्या समुच्चयाच्या सदस्यत्वाबद्दल अभिमान राहील. तसेंच तो समुच्चय जर विशेष संपन्न स्थितींत असला व त्या समुच्चयांतील लोक कर्तृत्ववान झाले तर त्यामुळें सर्व समुच्चयास मोठेपणा येतो. जो समुच्चय आपल्यासाठीं घटना उत्पन्न करीत नाहीं आणि व्यक्तींची काळजी घेत नाहीं, तो समुच्चय जिवंत राहण्यास नालायक होय. समुच्चयानें आपण कांहीं एक न करतां सदस्यांच्या निष्ठेची अपेक्षा बाळगणें हें अत्यंत बेजबाबदारपणाचें द्योतक आहे. असो.

समाजनिष्ठेचा प्रश्न एवढ्या विवेचनानें सुटत नाहीं. असाहि एक वाद उपस्थित होतो कीं, देशाभिमान हा व्यक्तींस पूर्वापार आलेल्या लहान समुच्चयाचे अभिमानी बनवून मोठा समुच्चय करण्याची क्रिया दूर ढकलील. अमेरिकेंत यादवी चालू असतां दक्षिणेंतील संस्थानें आपल्या संस्थानांचा अभिमान धरून मोठें समुच्चय घडवून आणण्याचें कार्य दूर टाकीत नव्हतीं काय? देशा-भिमान धरून जगद्विकासकार्य दूर ढकलणें योग्य आहे काय? कार्याचें महत्त्वमापन करतांना जर आपण जगाचा अंतिम किंवा आज तागाईत झालेला विकास गृहीत धरून त्यास साधक किंवा नाशक अशा कोणत्या गोष्टी झाल्या यावरून क्रियांची युक्तायुक्तता ठरवितों आणि त्या जगद्विका-सास जितपत साधक झाल्या असतील त्या प्रमाणानें त्यांचें महत्त्व ठरवितों तर देशाभिमानास महत्त्व कां द्यावें? या तऱ्हेच्या वादास उत्तर देण्याच्या पूर्वी जगद्विकासाचे नियम काय आणि त्याचें अंतिम स्वरूप काय हें तपासलें पाहिजे आणि देशाभिमानादि तत्त्वांची पुन्हां उजळणी केली पाहिजे.

---

## प्रकरण १४ वें.

## सामाजिक दृढीकरण व समाजविस्तार या क्रियांचें जगद्विकासांत स्थान.

विवक्षित समाजाच्या अस्तित्वाचें समर्थन करतां येईल किंवा नाहीं या प्रश्नाचा विचार करतांना कित्येक गोष्टींचा विचार करणें प्राप्त होतें. जगद्विकासाची एकंदर क्रिया कशा स्वरूपाची आहे? तिचा आज दृश्य होतो असा अंतिम

हेतु कोणता? समाजाच्या विस्ताराचा हेतु काय? समाजदृढीकरणाची क्रिया म्हणजे काय? या प्रकारचे प्रश्न हिंदुसमाजाच्या भवितव्याच्या नियमनाच्या दृष्टीनें हातीं घेण्यापूर्वी वरेंचसें तात्त्विक विवेचन करणें जरूर आहे. विवेचनसौकर्यासाठीं समाजदृढीकरणाची क्रिया प्रथम स्पष्ट करूं.

**समाजदृढीकरण.**—समाजाचा विस्तार झाला म्हणजे त्याचें दृढीकरण करण्याची आवश्यकता उत्पन्न होते, आणि समाजाचें दृढीकरण झालें म्हणजे समाज आणखी विस्तारक्षम होतो असा विस्तार व दृढीकरण या दोन कार्यांचा संबंध आहे. समाजदृढीकरण आणि समाजविस्तार यांचीं तत्त्वें समजलीं म्हणजे पुष्कळ प्रकारच्या कार्यांची युक्तायुक्तता तपासण्यास आपण समर्थ होऊं.

समाजाच्या निरनिराळ्या स्थितींत समाजदृढीकरणाचें कार्य अव्याहत चालू असतें. प्राणिशास्त्र, वनसतिशास्त्र यांचा विषय जे जीव त्यांच्या सादृश्याच्या दृष्टीनें आणि सदृशांत महत्त्व आणि सावयवत्व यांच्या दृष्टीनें वनविलेल्या परंपरा तपासल्या असतां आणि सामाजिक घटना अवलोकिल्या असतां ही दृढीकरणाची क्रिया त्या ठिकाणीं चालू दिसते. सामाजिक घटनेबद्दल कित्येक विशेष गोष्टी हर्बर्ट स्पेन्सर यानें लोकांच्या नजरेस आणल्या आहेत. तो म्हणतो, वैयक्तिक घटना आणि सामाजिक घटना यांमध्यें सामान्य असे चार धर्म आहेत.

१. घटनेचा आरंभ भ्रूणत्वापासून किंवा अतिशय लहान पुंजक्यांपासून होऊन त्यांची वाढ नकळत होत जाते. कांहींचा आकार वाढून मूळच्या आकाराच्या दहा हजारपट होतो.

२. या पुंजक्यांची रचना आरंभीं इतकी साधी असते कीं, त्यांनां कांहीं अवयवयुक्तता असेल असें वाटत नाहीं. परंतु ते जसजसे वाढत जातात तसतशी त्यांची रचना जास्त गुंतागुंतीची होत जाते.

३. आरंभीं जेव्हां त्यांची वाढ अर्धवट झालेली असते, तेव्हां त्यांच्या घटकांमध्यें परस्परावलंबित्व फारच थोडें असतें. तें हळूहळू वाढत जाऊन पुढें इतकें पूर्णतेस येतें कीं, प्रत्येक घटकाचें जीवित अथवा चलनवलन हें सर्वस्वीं दुसऱ्या घटकाच्या जीवितावर व चलनवलनावर अवलंबून राहतें.

४. समाजाचें आयुष्य हें त्यांतील घटकांच्या आयुष्यावर अवलंबून नसून बरेंच दीर्घ कालीन असतें. प्रत्येक घटक हा स्वतंत्रपणें जन्मतो, वाढतो, कार्य करतो, उत्पादन करतो आणि मरून जातो. परंतु या घटकांचा झालेला समूह पिढ्यान्‌पिढ्या जगतो. त्याची आकारामध्यें, रचनेच्या पूर्णतेमध्यें आणि क्रिया करणाच्या शक्तीमध्यें सारखी वाढ होत असते.

वर दिलेल्या चार गोष्टींपैकीं तिसऱ्या गोष्टीकडे आपणांस विशेष लक्ष दिलें पाहिजे. समाजदृढीकरणाचें मर्म याच गोष्टींत असल्यामुळें तिचें विस्तृत विवेचन करणें अवश्य आहे.

जेव्हां अनेक लहानलहान सामाजिक घटक एक मोठा एकरूपी समाज बनविण्याकरतां एकत्र येतात, तेव्हां या निरनिराळ्या घटकांमध्यें एक नवीन रचना करण्याच्या हेतूनें जी अंतःक्रिया होते तिला दृढीकरण असें म्हणतात. जे निरनिराळे समाज अशा दृष्टीनें एक होतात त्यांनां नेहमींच दृढीकरणाच्या बाबतींत यश येतें असें नाहीं. व्यक्तीवरील जातीचें बंधन तोडून टाकून तिला राष्ट्राच्या समूहामध्यें प्रत्यक्ष सामील करण्याकरितां बरेच श्रम करावे लागतात. अनेक जाती एका ठिकाणीं मिळून त्यांची एक मोठी एकस्वरूपी जात किंवा एक राष्ट्र होण्यापूर्वी त्या जातींनां अनेक स्थितींतून जावें लागतें. या स्थित्यंतरांतील पायऱ्या जगांतील अनेक निरनिराळ्या लोकांचें निरीक्षण केलें असतां सहज नजरेस येतील. या पायऱ्यांचीं, जातिभेद, साम्राज्यें आणि वंशपरंपरागत वर्गभेद हीं उदाहरणें होत. आधुनिक जगांत या पायऱ्यांचें अस्तित्व समाजाच्या दृढीकरणाची क्रिया अपूर्ण राहिली आहे अशी साक्ष देतें.

जो समाज विविध राष्ट्रें एक प्रदेशांत आल्यामुळें बनला असेल त्याच्या घटकांत एक प्रकारचा उच्चनीच भाव उत्पन्न होतो, आणि या निरनिराळ्या घटकांत राष्ट्रमर्यादेचें वैवाहिक बाबतींत अतिक्रमण झालें नाहीं म्हणजे जातिभेद उत्पन्न होतो.

जेव्हां अनेक जाती अगर राष्ट्रें एका राजकीय सत्तेखालीं येतात आणि ती राजसत्ता या निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्या व निरनिराळे संप्रदाय मानणाऱ्या जातींनां एकाच सामाजिक संघांत आणण्यास अपुरी पडते तेव्हां त्या सामाजिक रचनेस साम्राज्य असें म्हणतां येईल.

केव्हां केव्हां साम्राज्यांतील सत्ताधारी जात स्वसमाजामध्यें परजनप्रवेशास विरोध करीत नाहीं. अशा प्रसंगीं या जातीचा आनुवंशिक वर्ग बनतो.

जेव्हां अशा निरनिराळ्या जातींनां सांस्कृतिक आणि सामाजिक दृष्टीनें एकाच दर्ज्यावर आणलें जातें, तेव्हां त्यांची एकच जात बनणें शक्य होऊं लागतें. अशा वेळीं त्यांचें दृढीकरण होण्यास सुरुवात झाली असें म्हणतां येईल.

जीविशास्त्रामध्यें ज्या क्रियेमुळें गुंतागुंतीचा रचना असणारा अवयवी साध्या रचनेचा परंतु चिरकालीन असा होतो त्या क्रियेस दृढीकरण असें म्हणतात. समाजशास्त्रामध्यें हा शब्द याच अर्थानें वापरतां येईल. हा शब्द वास्तविक कोणत्याहि एका विशिष्ट शास्त्रांतला नसून उत्क्रांतिविषयक सामान्य तत्त्वज्ञानांतील आहे. सामाजिक उत्क्रांतीमध्यें

दृढीकरणाची क्रिया म्हणजे निरनिराळ्या जातींच्या समुच्चयापासून एकरूपी जात उत्पन्न होणें ही होय, निरनिराळ्या जातींच्या भाषा, संस्कृती, पोषाख, आचार, हे निरनिराळे असतां त्यांचें एकीकरण करणें म्हणजेच दृढीकरण होय. या दृढीकरणास अनेक गोष्टी उपकारक होतात.

राजकीय सत्तेची स्थापना, अनेक राष्ट्रांचे संघ बनणें, संप्रदायाचा प्रसार, एक मोठा समाज बनवावा ही इच्छा व दळणवळण वाढल्यामुळें संस्कृतींत उत्पन्न झालेला सारखेपणा, निरनिराळ्या जातींमध्यें अथवा वर्गांमध्यें मिश्र विवाहाची वाढ, एक भाषा होणें, जाती, वंश, अथवा राष्ट्रें यांच्या जीवनाची सांपत्तिक पुनर्घटना, या सर्वांमुळें सामाजिक दृढीकरणास मदत होते. सामाजिक दृढीकरणास साह्यभूत होणाऱ्या सर्व क्रियांची यादी देतां येणार नाहीं. त्याप्रमाणेंच वर दिलेल्या सर्व गोष्टींचीं सर्व कार्यें विस्तृतपणें देणें हेंहि शक्य नाहीं. तथापि एक दोन गोष्टींचा येथें विचार करूं.

सामाजिक दृढीकरणाचीं अंगें पुढें दिल्याप्रमाणें आहेत. प्रथमतः ज्यांचें दृढीकरण करून नवीन समाज बनवावयाचा आहे असे निरनिराळे मनुष्यसमूह पाहिजेत. दुसरें, त्यांचें दृढीकरण होण्यास पोषक अशा गोष्टी व कारणें पाहिजेत. दोन अथवा अधिक मूलतः भिन्न अशा समूहांनीं आपलें पृथक्त्व सोडून एक समाजांत येण्यास कांहीं तरी निश्चित असें कारण पाहिजे. सामान्यतः दोन अथवा अधिक समाज एकत्र येऊन त्यांचें एका समाजांत दृढीकरण होणें हें सावकाश व बहुतेक नाखुषीनेंच होतें. बहुतकरून एखाद्या संघाच्या राजकीय सत्तेची वृद्धि अथवा एखाद्या सामान्य शत्रूविरुद्ध राजकीय सत्तांचें संघीकरण या गोष्टी एक मोठा समाज बनण्याच्या क्रियेचा पाया घालतात. प्रसरणशील संप्रदाय आणि संस्कृती याहि कांहीं प्रसंगीं हें कार्य करतात. अशा तऱ्हेनें दृढीकरणास प्रारंभ झाल्यानंतर त्या कार्यास मदत करणाऱ्या गोष्टी पुष्कळच असतात.

जुने समुच्चय नष्ट करून नव्या एकच आणि एकरूप अशा समुच्चयाची घटना करणें फार कठिण काम आहे. अशा कार्यांत कमीअधिक यश येणें हें कार्याच्या विस्तारावर अवलंबून असतें. जर एकत्र आणावयाचे दोन समुच्चय एकच भाषा बोलणारे, एकाच पारमार्थिक परंपरेंतील अथवा एकाच वंशांतील असले तर हें काम बरेंच सोपें जातें; परंतु ते जर या सर्व बाबतींत भिन्न असतील तर हें कार्य बरेंच कठिण होतें.

जगांतील निरनिराळ्या लोकांचें दूरीकरण होणें व त्यांच्यांतील फरक वाढत जाणें या क्रिया आतां बहुतेक बंद झाल्या आहेत. जगामध्यें एकत्व उत्पन्न होण्याची क्रिया आतां सुरू झाली आहे. अमेरिकेचा यूरोपीयांस लागलेला शोध व यूरोपमधून हिंदुस्थानास जाण्याकरितां लागणाऱ्या समुद्रमार्गाचें त्यांस झालेलें ज्ञान या एकत्वोत्पादन क्रियेंतील दोन महत्त्वाच्या पायऱ्या होत. सध्यांच्या युगांत देशादेशामध्यें दळणवळण वाढणें, सांस्कृतिक गोष्टींची अदलाबदल होणें, आणि मिश्रविवाह होणें या गोष्टी सामान्य होत चालल्या आहेत. सर्व जगाची प्रवृत्ति सारख्याच विचारांकडे, आचारांकडे व चालीरीतींकडे, अर्थात् थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे एकाच संस्कृतीकडे होऊं लागली आहे.

या एकीकरणाच्या क्रियेमध्यें प्रमुखत्व कोणत्या गोष्टीकडे यावयाचें हें काल व स्थल यांवर अवलंबून असतें. कांहीं देशांमध्यें संप्रदायप्रसारानें बरेंच कार्य केलें, तर कांहीं देशामध्यें परराष्ट्रीय सत्तेनें हें कार्य बजावलें. राजकीय सत्तेचा विजय आणि सांप्रदायिक सत्तेचा विजय हीं दोन महत्त्वाचीं कारणें आहेत. पण यांखेरीज आणखींहि कारणें आहेत. राजकीय सत्तेच्या विजयामुळें निरनिराळ्या राजकीय सत्तांखालीं असलेले समूह एका सत्तेखालीं येतात, पण त्यामुळें नेहमींच समाजदृढीकरण होतें असें नाहीं. कित्येक वेळां एकाच सत्तेखालीं आणलेल्या निरनिराळ्या समूहांचें राष्ट्रीकरण करण्याच्या कामांत त्या सत्तेस यश येत नाहीं. तरी पण राजकीय वर्चस्वाची या क्रियेस मदत होते एवढें खरें. या गोष्टी कशा होतात तें आपण पाहूं.

**जित आणि जेते यांचा संबंध.**—प्रथमतः परकीय सत्ता जुन्या संस्कृतीचा पूर्ण नाश करून टाकण्याचा प्रयत्न करते. कित्येकदां ती जित राष्ट्रावर आपला संप्रदाय लादण्याचा प्रयत्न करते. ही संप्रदायप्रस्थापनेची कल्पना पूर्वयुगांत फार बळावलेली होती. परंतु आतां ती स्थिति राहिलेली नाहीं. परकीय राजकीय सत्ता बहुतकरून जित लोकांच्या भाषेचा नाश करून तेथें आपली म्हणजे जेत्यांची भाषा प्रस्थापित करते. जित राष्ट्रांतील लोकांचा देशाभिमान कांहींसा या गोष्टीस विरोध करतो. परंतु त्याला आपला पराभव कबूल करून स्वस्थ बसावें लागतें. जित राष्ट्राच्या भाषेचें उन्मूलन व जेत्या राष्ट्राच्या भाषेचें प्रस्थापन याचा परिणाम जित व जेते यांच्या विचारांत व कल्पनांत साम्य आणण्याच्या कामीं होतो. उच्च शिक्षण बहुतकरून जित राष्ट्राच्या भाषेंत न देतां जेत्या राष्ट्राच्या भाषेंत दिलें जातें, आणि याला कारण असें सांगितलें जातें कीं, जित लोकांच्या भाषेंत उच्च विचार आणि त्याचप्रमाणें प्रगति पावलेलें शास्त्र व श्रेष्ठ संस्कृति यांतील कल्पना प्रदर्शित करण्याचें सामर्थ्य नाहीं. राज्यकारभारहि जेत्यांच्या भाषेंत चालतो.

जित राष्ट्रें जेत्या राष्ट्राचें अनुकरण करूं लागतात. बहुतकरून जेत्यांच्या जातीला जित व जेते मिळून होणाऱ्या एकंदर समाजांतील उच्च पदवी प्राप्त होते. आणि ज्याप्रमाणें समाजांतील कनिष्ठ वर्ग उच्च वर्गांचें अनुकरण करतो

त्याप्रमाणें या जेत्या जातीचें अनुकरण जित लोक करूं लागतात. ज्या देशांत समाजांतील लोकांच्या कल्पनांप्रमाणें जेत्यांची जात समाजबाह्य समजली जात असेल त्या देशांतहि त्यांचें अनुकरण करणारे बरेचसे लोक आढळतात. ज्या अर्थी अनुकरण करणें ही एक प्रकारची खुषामत आहे, त्या अर्थी सत्ताधारी लोकांचें अनुकरण करणाऱ्या लोकांवर सत्ताधाऱ्यांचा अनुग्रह होतो. जे लोक स्वाभिमानाच्या कल्पना बाजूस सारून जेत्यांचें अनुकरण करतात त्यांनां जेत्यांकडून 'प्रागतिक' असें विशेषण मिळतें. एखाद्या गोषाची चाल पाळणाऱ्या राष्ट्रानें जर दुसरें राष्ट्र जिंकलें तर ते जित लोकहि आपल्या बायकांनां गोषांत घालतील. जर जेत्या राष्ट्राच्या स्त्रिया स्वतंत्र व धीट असतील तर जित राष्ट्रांतील लोकहि आपल्या समाजांतील स्त्रीपुरुषव्यवहारासंबंधींच्या नियमांत सुधारणा करूं लागतील.

वरील गोष्टींखेरीज आणखीहि कांहीं गोष्टी जित लोक करूं लागतात. बाह्य स्वरूपामध्यें जेत्या राष्ट्राशीं साम्य असल्यास जित राष्ट्रांतील व्यक्तीस अपमान व मानखंडना सोसण्याचे बरेचसे प्रसंग टाळतां येतात. जित राष्ट्रांतील व्यक्तीस जेत्यांचें अनुकरण करून आपण जेत्या राष्ट्रांतील आहों असें पुष्कळ वेळां भासवितां येतें.

या अनुकरणप्रवृत्तीचा उगम नेहमीं खुषामतींतच होतो असें नाहीं. कित्येक वेळां जित राष्ट्रांतील मनुष्यास जेत्या राष्ट्रांतील संस्थांच्या गुणाधिक्याची जाणीव झाल्यामुळें तो त्या संस्थांचा स्वीकार करतो. राजकीय वर्चस्वस्थापनेचा मनावर परिणाम इतका मोठा होतो कीं, जेत्या राष्ट्रांतील खुळेपणाहि जित राष्ट्रांतील लोकांस सद्गुणासारखा वाटूं लागून त्याचा ते अंगीकार करूं लागतात.

जेत्या राष्ट्रास जित राष्ट्रापेक्षां आपला परमार्थसंप्रदाय व दैवतें हीं श्रेष्ठ आहेत असें भासविण्यास फारसे श्रम पडत नाहींत. जित लोक जेत्या लोकांच्या देवांनां वस्तुतः पिशाच्च म्हणत असले तरी ते देव आपल्या देवांपेक्षां बलवान आहेत अशी त्यांची थोडीफार समजूत होऊं लागते. जर जेत्या राष्ट्रांतील लोक एका विशिष्ट दैवतसंप्रदायाचे अनुयायी असतील तर त्या संप्रदायाचा अनुयायी होणाऱ्या जित राष्ट्रांतील मनुष्यास थोडाफार फायदा होतो. जर त्या दैवतसंप्रदायांतील लोकांत संप्रदायबंधुत्वाची कल्पना विशेष दृढ असेल तर त्या संप्रदायांत शिरणारे जित राष्ट्रांतील लोक जेत्या राष्ट्रांत मिळून जाण्याचा पुष्कळ संभव असतो. जर ही संप्रदायबंधुत्वाची कल्पना विशेष बलवत्तर नसेल तर त्या जेत्यांच्या संप्रदायांत शिरणाऱ्या जित लोकांचा तिरस्कारच होतो, तथापि संप्रदायाबाहेर असणाऱ्या लोकांपेक्षां यांनां थोड्या जास्त सहृदयतेनें वागविलें जातें.

**संप्रदायप्रसार.**—आतां आपण संस्कृतीवर परिणाम करणाऱ्या आणि जगाच्या एका भागामध्यें सारखेपणा उत्पन्न करणाऱ्या दुसऱ्या एका कारणाचें महत्त्वमापन करण्याचा प्रयत्न करूं. हें कारण म्हटलें म्हणजे संप्रदायप्रसार हें होय. येथें संप्रदाय याचा अर्थ विशिष्ट तत्त्वज्ञानपद्धति अथवा विशिष्ट परमार्थसाधनपद्धति असा नव्हे तर ख्रिस्तीधर्म अथवा ख्रिश्चानिटी म्हणून जो एक रिलिजन अथवा कांहीं समजुती व आचार यांचें कोडबोळें आहे तसल्या प्रकारच्या कोडबोळ्यास येथें संप्रदाय हा शब्द लावला आहे. कोणत्याहि संप्रदायानें आयुष्याच्या श्रेष्ठ प्रकारच्या अंतिम ध्येयाचाच केवळ प्रसार करण्याच्या इच्छेनें प्रेरित होऊन आजपर्यंत चळवळ केली नाहीं, व प्रचारहि केला नाहीं. ख्रिस्ती संप्रदायांतील नैतिक कल्पनांवर आणि आयुष्याच्या श्रेष्ठ प्रतीच्या ध्येयावर विशेष लक्ष देण्याचें काम त्या संप्रदायांतहि केवळ अलीकडेच सुरु झालें आहे. अद्यापहि नैतिक कल्पनांची निवड करून केवळ त्यांचाच प्रचारकांमार्फत प्रसार करण्याची कल्पना त्या संप्रदायांत निघालेली नाहीं. ख्रिस्ती संप्रदायांतील जुन्या कल्पना धरून बसलेले लोक अद्यापहि रानटीपणा म्हणजे अधार्मिकपणा अथवा ख्रिस्ती कळपापासून दूर राहणें असें समजतात. त्यांचा आशय असा कीं, ख्रिस्ती संप्रदायाच्या बाहेर राहणें अथवा परमार्थकल्पनांमध्यें मतभेद असणें किंवा भिन्न संप्रदायाचा अनुयायी असणें ही गोष्ट केवळ दुर्लक्षिण्यासारखी नव्हे, कारण लोक निराळ्या संप्रदायाचे अनुयायी झाल्यामुळें कित्येक ठिकाणीं त्यांच्या संस्कृतीमध्येंहि बदल झालेला आहे. आतां आपण ख्रिस्ती संप्रदायाच्या प्रसाराचें उदाहरण घेऊन ह्या गोष्टी कशा होतात तें पाहूं.

परंतु या मुद्द्याचा विचार करण्यापूर्वी आपण या संप्रदायाच्या निरनिराळ्या अंगांचा विचार करून त्याचें स्वरूप स्पष्ट करूं आणि मग या परकीय संप्रदायाचा स्वीकार म्हणजे काय व त्याचा व्यक्तीवर काय परिणाम होतो तें पाहूं.

एखाद्या संस्थेच्या प्रसाराचे परिणाम मोजण्याकरितां प्रथम त्या संस्थेच्या निरनिराळ्या घटकांचे परिणाम मोजण्यापासून आरंभ करणें चांगलें. कोणत्याहि संप्रदायाचा प्रसार करणारे लोक पुष्कळदां हें विसरतात कीं, एखाद्या विशिष्ट संप्रदायाचा प्रसार करणें योग्य आहे कीं नाहीं हें पहावयाचें म्हणजे त्या संप्रदायांतील सर्व कल्पना दुसऱ्या एका समाजावर लादल्या असतां त्यांचा एकंदर परिणाम काय होईल हें पहावयाचें असतें.

**ख्रिस्ती संप्रदाय.**-ख्रिस्ती संप्रदाय हा कोणकोणत्या गोष्टी मिळून बनला आहे हें आपण पाहूं. प्रथमतः ख्रैस्त्य म्हणजे ख्रिस्ताचें शिष्यत्व किंवा ख्रिस्ताला देव अथवा देवाचा पुत्र मानणें हें मत होय. हें शिष्यत्व पत्करण्यामध्यें बाप्तिस्मा घेण्यासारखे

अनेक विधी येतात. नाताळ व ईस्टरचे सण पाळणें या गोष्टीहि त्यांतच येतात. ईश्वर, पिशाच, 'सोल', स्वर्ग, आणि नरक यांच्याबद्दलच्या कल्पनांवरील विश्वास हींहि त्यांतच अंतर्भूत होतात. पुन्हां ख्रैस्त्य यामध्यें केवळ ख्रिस्ताचें शिष्यत्व येत नाहीं तर परंपरागत यहुदी कथा व बायबलमधील कथा यांचाहि त्यांत अंतर्भाव होतो. अलीकडे पुष्कळ 'चर्च' मधून असें जाहीर करण्यांत येऊं लागलें आहे कीं, ख्रैस्त्य यामध्यें यहुदी इतिहासकथांचा अंतर्भाव होऊं शकत नाहीं, तर फक्त ख्रिस्ताच्या बारा प्रथमशिष्यांच्या (ॲपॉसल्सच्या) तत्त्वांचा अंतर्भाव होतो. परंतु जर कोणीं सध्यांच्या ख्रिस्ती चर्चमधील स्थिति व प्रचारकसंस्थांची प्रवृत्ति-मग त्या प्रॉटेस्टंट असोत किंवा कॅथोलिक असोत-पाहिली तर जाहीर केलेल्या तत्त्वांपेक्षां आचारांत असलेलीं तत्त्वें निराळीं आहेत असें दिसून येईल. जुन्या कराराचा अंतर्भाव बायबलमध्यें केला आहे ही एकच गोष्ट या प्रचारकांच्या बोलण्याचें असत्यत्व सिद्ध करील. असो.

आतां ख्रैस्त्याचा स्वीकार म्हणजे बायबलमध्यें उल्लेखिलेल्या, त्यानें संमति दिलेल्या व पसंत केलेल्या कल्पना, तत्त्वें व संस्था यांच्याशीं विरोधी असणाऱ्या सर्व कल्पना वगैरेंचा त्याग करणें होय. श्रद्धावान ख्रिस्त्यानें ख्रिस्ती धर्मशास्त्राविरुद्ध असणाऱ्या आपल्या जातीच्या, राष्ट्राच्या व वंशाच्या सर्व जुन्या संस्थांचा त्याग केला पाहिजे. यावरून ख्रिस्ती संप्रदायाच्या स्वीकाराचा सामान्य परिणाम निश्चित करणें कठिण नाहीं. ख्रैस्त्य स्वीकार करणाऱ्या व्यक्तीच्या आपल्या मूळ राष्ट्रासंबंधीं असलेल्या सर्व परंपरागत भावनांचा नाश होऊन त्या ठिकाणीं यहुदी व बायबली कल्पना स्थापित होतात. हा ख्रिस्ती संप्रदायाच्या स्वीकाराचा सामान्य परिणाम होय. परंतु हा परिणाम केव्हांहि प्रचारकांच्या आकांक्षेप्रमाणें घडून येत नाहीं. ख्रैस्त्येतर संप्रदायांतील अनेक संस्था थोडेंसें ख्रैस्त्याचें आवरण घेतल्यावर ख्रिस्ती संप्रदायाच्या अंगभूत होतात. अन्यसंप्रदायी देवता ख्रिस्त्यांचे महंत (सेंट) बनतात, आणि अन्य संप्रदायांतील कांहीं चाली ख्रिस्ती संप्रदायांत मिळून जातात. तथापि या सर्व गोष्टी होऊनहि नव्या जुन्या ख्रिस्त्यांमध्यें बाह्य स्वरूपांत कांहीं सारखेपणा उत्पन्न होतो. पुन्हां, जेव्हां एखादें राष्ट्र ख्रिस्ती संप्रदायाचा स्वीकार करतें तेव्हां तें विकृत स्वरूपांत त्याचा प्रसार करतें. अशा वेळीं तें राष्ट्र खरोखर मूळ संप्रदायाचा प्रसार न करतां ख्रैस्त्याचें पांघरुण घातलेल्या आपल्याच राष्ट्राच्या कल्पनांचा व संस्थांचा प्रसार करतें. यूरोपांतील ख्रिस्ती संप्रदायांतील बराचसा भाग ग्रीस आणि रोम येथील संप्रदायांतून आलेला आहे; आणि त्या संप्रदायाबरोबर ग्रीक आणि रोमन संस्थांचा प्रसार झालेला आहे. जरी कांहीं पंडितांच्या मताप्रमाणें येशू स्वतः अरेमाइक भाषा बोलत असे आणि बहुतकरून मूळचें ख्रिस्ती धर्मशास्त्र हिब्रू भाषेमध्यें लिहिलें गेलें होतें तरी ग्रीक आणि रोमन या भाषांस बरेंच पावित्र्य प्राप्त झालें आहे. यूरोपियन राष्ट्रांनीं आतां ख्रिस्ती संप्रदायाचा स्वीकार केला आहे, आणि जेव्हां तीं राष्ट्रें या संप्रदायाचा प्रसार करतात तेव्हां तीं ख्रिस्ताच्या कल्पनांचा प्रसार करण्याच्या ऐवजीं ख्रैस्त्यप्रसाराच्या नांवाखालीं स्वतःच्याच देशांतील कल्पनांचा व संस्थांचा प्रसार करण्याचा प्रयत्न करतात. या गोष्टीचें स्पष्ट उदाहरण हिंदुस्थानांत आढळतें. दक्षिण हिंदुस्थानांत नवरीच्या गळ्यामध्यें एक मंगळसूत्र बांधण्याची चाल आहे. ख्रिस्ती मिशनऱ्यांस ही ताली म्हणजे मंगळसूत्र आवडत नसल्यामुळें ते तिच्याऐवजीं एक आंगठी घालण्याचा उपदेश करतात. परंतु ही आंगठी घालण्याची चालहि यूरोपांतील एका ख्रिस्तपूर्व खुळ्या समजुतीचा अथवा चालीचा अवशेष आहे. हिंदूंची मद्य व मांस याबद्दल तिरस्कारबुद्धि ही देखील एक अन्यसांप्रदायिक खुळी समजूत म्हणून समजली जात असे. परंतु सुदैवानें उच्च नैतिक कल्पनांच्या वाढीमुळें आतां ख्रिस्ती मिशनरी हिंदूंस आपल्या कळपांत घेतांना त्यांची ही 'खुळी समजूत' काढून टाकण्याचा प्रयत्न अलीकडे करीत नाहींत.

ख्रिस्ती संप्रदायानें आपल्या संप्रदायांत येणाऱ्या लोकांच्या मनावरील पूर्व संस्कार काढून टाकून सारखेपणा आणण्याचा प्रयत्न केला एवढेंच नव्हे तर संप्रदायांतील लोकांत बंधुत्वाच्या कल्पनेचाहि प्रसार केला. चर्चचा असा आग्रह असतो कीं, ख्रिस्ती संप्रदायांत येणाऱ्या सर्व लोकांनीं एकमेकांस बंधुत्वाच्या नात्यानें वागवावें. त्याचप्रमाणें सर्व ख्रिस्ती लोक चर्चमध्यें एकत्र जमतात व त्यामुळें त्यांच्यांतील परस्पर दळणवळण वाढतें. ख्रिस्ती जनतेमध्यें बऱ्याच गोष्टी सामान्य असतात. त्यांची पूर्वपरंपरा एकच असते व त्यांचे सण, चालीरीती, दैवतें व कांहीं कल्पना एकच असतात. एकाच चर्चचे अनुयायी असणाऱ्या लोकांमध्यें जर वंशविषयक फारसा भेद नसेल तर त्यांत असणाऱ्या निरनिराळ्या जाती एक होऊं शकतात.

दैवतसंप्रदाय एकरूपता आणण्याचें काम करतात असें वर म्हटलें आहे; आणि हे दैवतसंप्रदाय स्वभावतःच समाजविघातक आहेत असेंहि प्रतिपादन केलें आहे. परंतु या दोन विधानांत विसंगतपणा आहे असें समजूं नये. दैवतसंप्रदायापेक्षां संघट्टनपद्धतींत जास्त सोयी आहेत. केवळ संघट्टनपद्धतीनें समाजांत एकरूपता आणणें या क्रियेचा समाज विशिष्टप्रदेशमर्यादित असावें या कल्पनेस बाध येत नाहीं. परंतु दैवतसंप्रदायाच्या प्रसाराची क्रिया मात्र प्रादेशिक समाजाच्या कल्पनेला विरोधी होते. दैवतसंप्रदायाचा प्रसार हा लोक कोणत्या प्रदेशांत राहतात याचा विचार न करतां कांहीं विशिष्ट गोष्टींवरील

श्रद्धा आणि विशिष्ट उपासनापद्धति यांच्या साहाय्यानें एक समाज बनवावयास पाहतो. यामुळें दैवतसंप्रदाय हा खरोखर एखाद्या विशिष्ट प्रदेशांतील समाजाचें संघटन करण्यापेक्षां विघटनच करीत असतो. ज्यांनां एखाद्या प्रदेशांतील समाजाचें राष्ट्रीय अथवा साम्राज्याच्या दृष्टीनें दृढीकरण करावयाचें असेल त्यांनीं या दैवतसंप्रदायांपासून सावध राहावें. कारण आजपर्यंतच्या इतिहासांत हे संप्रदाय मनुष्यजातीस शापरूपच होऊन राहिले आहेत.

**पूर्ण दृढीकरणाचा समाज.**—ज्याचें पूर्णत्वानें दृढीकरण झालें आहे असा समाज आढळणें अशक्य आहे. बहुतेक प्रचलित समाजांमध्यें कोणतीना कोणती उणीव आढळून येते. लहान लहान समुच्चय एकत्र होऊन त्यांचा मोठा समुच्चय होण्याची क्रिया सतत चालू असल्यामुळें कोणत्याहि एका समाजाचें पूर्ण दृढीकरण होण्यास अवकाशच मिळत नाहीं. ज्या समाजामध्यें निरनिराळ्या व परस्परविरुद्ध अशा दृढीकरणाच्या क्रिया त्या समाजांतील व्यक्तींच्या दुर्भाग्यामुळें चालू असतील त्यांच्या दृढीकरणामध्यें अधिकच अडचणी उत्पन्न होतात. असो. आजची दृढीकरणाची स्थिति पाहिली तर असें दिसतें कीं, एका वंशांतील लोकांनीं आपली राजकीय सत्ता दुसऱ्या एका अगदींच भिन्न भाषा बोलणाऱ्या, भिन्न चालीरीतींच्या व भिन्न संस्कृतीच्या लोकांवर प्रस्थापित केली आहे आणि एकच भाषा बोलणारे व सारख्याच चालीरीती असणारे लोक निरनिराळ्या सत्तांखालीं गेले आहेत. तसेंच वंश, चालीरीती व आचार हे ज्यांचे एकमेकांपासून अगदीं विसदृश आहेत असे लोक एकाच संप्रदायाचे अनुयायी झाले आहेत आणि अनेक बाबतींत सदृश असणारे लोक भिन्न संप्रदायांत गेले आहेत, किंवा एकाच राज्यामध्यें अनेक संप्रदाय प्रचलित आहेत.

जरी पूर्णत्वानें दृढीकरण झालेला समाज सांपडणें अशक्य आहे तरी अशा समाजाचीं कांहीं लक्षणें आपणांस सांगतां येतील.

ज्या समाजामध्यें दृढीकरणाची क्रिया पूर्ण झाली आहे त्या समाजाचे घटक असणारे निरनिराळ्या वंशांतील लोक रक्तानें, चालीरीतींनीं व संस्कृतीनें एकमेकांशीं पूर्णपणें मिसळून गेले पाहिजेत. अशा समाजांत पूर्वीची वंशविषयक कल्पना पूर्णपणें मावळून तिच्या जागीं या संयुक्त समाजाची कल्पना स्थापित झाली पाहिजे. सदरील वंशविषयक कल्पनेची जाणीव पूर्णपणें बुजून गेली असली पाहिजे, नाहीं तर ती प्रेम अथवा द्वेष उत्पन्न करण्यास कारणीभूत होईल.

जेव्हां निरनिराळ्या संस्कृतींचें ऐक्य होईल तेव्हां पूर्वीची श्रमविभागणी नाहींशी होऊन तिच्या जागीं नवीन श्रमविभागाचीं तत्त्वें येतील. ऐक्यापूर्वींचा जातींचा आयुष्यक्रम, चालीरीती व वागणूक भिन्न असल्यामुळें त्यांच्या गरजाहि भिन्न असतील. त्या गरजा पुरविणारे लोकहि भिन्न असतील. उदाहरणार्थ, दोन परस्परांपासून भिन्न असणाऱ्या जातींचा शिंप्यांचा वर्गहि निरनिराळा असतो. कधीं कधीं एका जातींत खप होणाऱ्या वस्तूंचा दुसऱ्या जातींत खप होत नाहीं. अशा स्थितींत त्या वस्तू तयार करणाऱ्या लोकांचा संबंध एका जातीशीं येईल, दुसऱ्या जातीशीं येणार नाहीं. परंतु संस्कृतींचें ऐक्य झालें म्हणजे या जातींच्या वंशजांचा आयुष्यक्रम सारखाच होईल आणि त्यामुळें श्रमविभागणीची पुर्नघटना करावी लागेल.

संस्कृतींच्या ऐक्याचा दुसरा एक परिणाम म्हटला म्हणजे समाजांतील उच्च वर्ग एकच असणें हा होय. जेव्हां समाजांतील एक विभाग एका विशिष्ट वर्गाला श्रेष्ठपणा देतो व दुसरा विभाग तो मान्य करीत नाहीं किंवा उलट एका घटकाच्या सत्ताधाऱ्यास अथवा समाजधुरीणास दुसरा एखादा घटक विधर्मी किंवा समाजबाह्य समजतो तेव्हां अशा समाजामध्यें एकाच वर्गाकडे सामाजिक श्रेष्ठत्व येणार नाहीं. राजकीय सत्ताधारी वर्गच समाजधुरीण असला पाहिजे असें नाहीं. एखाद्या पूर्ण दृढीकरण झालेल्या समाजामध्यें सत्ताधारी वर्गापासून समाजधुरीण वर्ग भिन्न असूं शकेल. त्याच्या धुरीणत्वाच्या अधिकारास व पदवीस त्या सत्तेखालीं असलेल्या सर्व लोकांकडून अनुमति असली म्हणजे झालें.

**दृढीकरणास प्रत्यवाय.**—याप्रमाणें समाजाचें पूर्णपणें दृढीकरण होण्यास जनतेमध्यें निरनिराळे भेद असणें हानिकारक आहे. अशा तऱ्हेचे मुख्य भेद पुढें दिले आहेत.

१. लोकांच्या उपासनापद्धती, दैवतें व परंपरागत चालत आलेले विचार यांमध्यें पूर्वींच्या विशिष्ट जातींच्या संस्कृतींचे अवशेष म्हणून राहिलेले फरक.

२. लोकांच्या भाषांत असणारे फरकहि त्यांनां एकमेकांपासून दूर ठेवण्यास व समाजविघटन करण्यास कारणीभूत होतात.

३. चालीरीती, पोषाख, उपभोग्य वस्तू आणि मनावर झालेले संस्कार–जे पूर्वींच्या जातिविशिष्ट संस्कृतींतून आले असल्यामुळें आनुवंशिक झाले असतील ते–समाजास विघातक होतात.

**जातिभेद हें अपूर्ण दृढीकरण आहे.**—कांहीं लोकांची अशी कल्पना असते कीं, सध्यांचा अतिशय वाढलेला व गुंतागुंतीचा जातिभेद हा पूर्वींच्या चांगल्या आणि साध्या स्थितीचें अवनत स्वरूप होय. ही

कल्पना विद्वान व अज्ञान या दोहोंमध्येंहि सारखीच आढळून येते. यूरोपीय व भारतीय ग्रंथकारांच्या ग्रंथामध्येंहि ही कल्पना आढळून येते. ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं या कल्पनेचा फायदा घेऊन लोकांच्या मनांत असें भरविलें आहे कीं, हा परिणाम ब्राह्मणी वर्चस्वामुळें उत्पन्न झाला आहे. तसेंच ही चुकीची कल्पना आपल्या संप्रदायप्रसारास एक कारण म्हणून ते पुढें आणतात. ज्याला वस्तुस्थितीचें वास्तविक ज्ञान आहे आणि ज्याला निरनिराळ्या गोष्टींचा संबंध पाहून त्यांची संगति लावण्याचें व त्यापासून नियम काढण्याचें ज्ञान आहे त्याला जुन्या इतिहासावरून निराळ्याच गोष्टींचा बोध होतो. त्याला असें स्पष्ट दिसेल कीं, सध्यांची स्थिति हें पूर्वींच्या चांगल्या स्थितीचें अवनत स्वरूप नसून केवळ दृढीकरणाची क्रिया अपुरी राहिल्यानें अथवा एकत्र आलेल्या समुच्चयांची एकरूपता नीट न झाल्यामुळें घडलेला परिणाम आहे. सध्यांचा हिंदुसमाज, म्हणजे परकीय संप्रदायांत प्रवेश करून परकीय समाजांत गेलेले लोक सोडून बाकीचे भरतखंडांतील सर्व लोक, अनेक जातींमध्यें विभागले गेल्यामुळें पृथक् भासत असले तरी ते आतांच्या इतके पूर्वी केव्हांहि संघटित झाले नव्हते. अनेक विभाग अलीकडेच पडले आहेत, व अद्यापहि कांहीं नवीन विभाग पडत असतील. परंतु हे सर्व विभाग समता आणि ऐक्य उत्पन्न करण्याच्या प्रयत्नामध्यें स्वाभाविकतःच उत्पन्न होणारे-व कांहीं तर उत्पन्न होणें अवश्य असलेले असेच-विभाग आहेत असें दाखवितां येईल. भरतखंडांतील जातिभेदाचा इतिहास म्हणजे अधिकाधिक वाढत जाणाऱ्या विभागांचा व असमतेचा इतिहास नव्हे, तर हळूहळू होणाऱ्या आणि अपूर्ण राहिलेल्या वाढीचा, संघटनेचा आणि दृढीकरणाचा इतिहास होय.

जातिभेदाचा इतिहास हें नांव देखील हिंदुसमाजाच्या इतिहासास अप्रयोजक दिसतें. याला योग्य नांव म्हटलें म्हणजे हिंदुसमाजाच्या परिणतीचा इतिहास हें होय. जातिभेदाचा इतिहास स्वतंत्रपणें लिहिणें अप्रयोजक होतें. समाजामधील वर्ग आणि जाती यांचे परस्परसंबंध राजकीय उलाढाली, निरनिराळे संप्रदाय, राज्यक्रांत्या, सांपत्तिक स्थितींतील फरक आणि समाजविषयक तत्त्वज्ञान यांमध्यें होणाऱ्या फरकांवरून निश्चित होतात. त्यांच्यावर परकीय लोकांच्या आगमनाचाहि बराच परिणाम होतो. अशा स्थितीमध्यें जातिभेद अथवा त्यासारखाच दुसरा एखादा सामाजिक प्रश्न एकटाच घेऊन त्याचा विचार करणें अशक्य होतें. कोणत्याहि एका विशिष्ट कालांतील एका विशिष्ट सामाजिक प्रश्नाचा कांहीं अंशीं पृथक्पणें विचार करणें शक्य असतें. परंतु जेव्हां एखाद्या लेखकाला तीन चार सहस्रकांपर्यंत पसरलेल्या कालाचा विचार करावयाचा असतो तेव्हां निरनिराळ्या प्रश्नांची इतकी गुंतागुंत झालेली असते कीं, त्यांचें पृथक्करण करणें जवळजवळ अशक्य होतें. राष्ट्रीकरणाकरितां अथवा समाजदृढीकरणाकरितां योजावयाच्या उपायांचें अज्ञान व या उपाययोजनेचा हिंदुस्थानांत दिसून येणारा अभाव या दोन गोष्टींवरून आपणांस पूर्वींचे जातिभेद मोडण्याचे वास्तविक अथवा काल्पनिक, प्रामाणिक अथवा अप्रामाणिक प्रयत्न कां व्यर्थ झाले हें दिसून येतें. ते व्यर्थ होण्याचें कारण हें एकच कीं, आतांपर्यंत योग्य वेळ आली नव्हती. जातिभेदाचा नाश करण्याच्या प्रयत्नास जोंपर्यंत सर्व हिंदुस्थानभर एकाच कालीं प्रयत्न होणार नाहीं तोंपर्यंत केव्हांहि यश यावयाचें नाहीं. अशा तऱ्हेचा सर्व हिंदुस्थानभर एकाच वेळीं प्रयत्न होणें जेव्हां सर्व हिंदुस्थान एका सत्तेखालीं असेल आणि हिंदुस्थानांतील सर्व लोकांत एकत्वाची भावना उत्पन्न झालेली असेल आणि एकाच तऱ्हेची उपाययोजना करण्याच्या कामीं परस्परांस साहाय्य करण्यास मिळण्याची संधि प्राप्त होईल तेव्हांच शक्य आहे. याखेरीज अशा तऱ्हेच्या कार्यास ज्यांचें सर्व देशावर वजन पडेल व ज्यांना मोठमोठीं साम्राज्यें चालविण्याची योग्यता असेल व जे समाजसुधारणेच्या प्रामाणिक इच्छेनें प्रवृत्त झाले असतील अशा कार्यकर्त्या पुरुषांची जरूरी आहे.

**पूर्वींचे समाजसुधारक.**—पूर्वींचे समाजसुधारणेचे प्रयत्न व्यर्थ झाले यांचें कारण तसा काल आला नव्हता असें वर म्हटलें आहे, यावरून पूर्वींचे सर्व प्रयत्न सद्धेतुपूर्वक व सुयोजित होते असें म्हणतां येणार नाहीं. त्यांपैकीं बरेच असे नव्हते. धर्मसुधारक म्हणून म्हणविणाऱ्यांपैकीं बहुतेक लोक सामाजिक सुधारणेच्या हेतूनें मुळींच प्रेरित झालेले नव्हते. त्यांपैकीं कांहींचा ज्यांनां 'ब्राह्मणांचें मौर्ख्य' उघड करून दाखविण्याकरितां टपून बसलेल्या यूरोपीय पंडितांनीं धर्मसुधारक असें म्हटलें आहे त्यांचा, या चळवळींत केवळ स्वतःपुढें धूप जाळून घेण्याच्या पलीकडे कोणताहि हेतु नव्हता. त्यांपैकीं कांहीं असत्यवादी व धूर्त होते आणि कांहीं परमार्थाच्या मार्गानें महत्त्व मिळविणाच्या व्यापारांत दांडगाई करूं पहाणारे गुंड होते. एखाद्या संप्रदायाच्या स्थापनेमध्यें यश येण्यास नेहमींच मोठीशी विद्वत्ता अथवा मनुष्यजातीचें भवितव्य सुधारण्याची उत्कट इच्छा किंवा उच्च सद्गुण लागतात असें नाहीं. बहुतेक प्रसंगीं अशा कामांत ज्या लोकांनां यश येतें त्यांच्या अंगीं बरेंचसें धार्ष्ट्य, अविनय, सन्मानाची हांव आणि लोकांस फसविण्याची म्हणजे चमत्कार करून दाखविण्याची शक्ति असते. कांहीं धार्मिक लोक व कांहीं 'धर्मसुधारक' आपल्या अनुयायांचीं मनें जगांतील नश्वर वस्तूंवरून काढून टाकण्याचा प्रयत्न करीत. त्यांनां या पृथ्वीचें रूपांतर जर नरकांत झालें असतें तर आनंद झाला असता असें दिसतें. कारण, या स्थित्यंतरामुळें लोकांचीं मनें ऐहिक वस्तूंपासून आणि जगांतील सुखांपासून दूर होऊन त्यांच्या मतानें जें

कांहीं उच्च व शाश्वत असें होतें तिकडे वळलीं असतीं. अशा तऱ्हेची विचारपद्धति असणाऱ्या लोकांपासून सामाजिक हिताची अपेक्षा करणें जवळजवळ मूर्खपणाचें आहे.

ज्यांनां समाजघटनेंत खरोखरच कांहीं फेरफार करावयाचे होते असेहि कांहीं धार्मिक सुधारक वरील वर्गांखेरीज होते, परंतु त्यांनीं समाजांतील व्यंगें काढून टाकण्याच्या बाबतींत उत्तम वैद्य अथवा शस्त्रक्रिया करणाऱ्या डॉक्टराच्या ऐवजीं वैदू किंवा न्हावी यांचें काम केलें.

आपल्या रुचीला न आवडणारी अथवा आपल्या स्वाभिमानाला कमीपणा आणणारी अशी एक गोष्ट आपणांला कबूल केली पाहिजे ती ही कीं, आपल्या समाजाचें दृढीकरण करण्याच्या बाबतींत फार महत्त्वाचें असें काम एका परकीय सत्तेनें केलें आहे. या परकीयांनीं सर्व हिंदुस्थानाला एका बलिष्ठ सत्तेखालीं एकत्रित करून देशांतील निरनिराळ्या वंशांनां व राष्ट्रकांनां पारतंत्र्याच्या सामान्य जाणीवेनें आपआपसांतील वैर बाजूस ठेवण्यास शिकविलें आहे. त्यांनीं राजकीय सत्तेंत बहुतेक एकरूपता आणून आपणांस साहाय्य केलें एवढेंच नव्हे, तर त्यांनीं पाश्चात्त्य सुधारणेचीं फळें आमच्या दारांत आणून ठेवलीं. त्यांनीं हिंदुस्थानांतील सर्व लोकांस एकत्र जमण्यास व परस्परांची ओळख करून घेण्यास शिकविलें. या परकीयांच्या प्रतिनिधींनीं केलेल्या गैरमुत्सद्दीपणाच्या कृत्याबद्दल सर्व लोकांस वाटणारा त्वेष आपणांस एकत्र आणतो. याखेरीज यूरोपियन राष्ट्रांचीं स्पष्ट उदाहरणें डोळ्यापुढें ठेऊन आपणांस जातिभेद मोडणें म्हणजे काय याची यथार्थ कल्पना येऊं लागली आहे. हें यूरोपियन राष्ट्रांचें निरीक्षण आपणांस या परकीयांमुळेंच सुकर झालें आहे. आपण जर पूर्वींच्या काळाकडे थोडी नजर दिली तर आपणांस असें दिसून येईल कीं, जातिभेद मोडावा म्हणून ओरड करणाऱ्या लोकांनां जातिभेद मोडणें म्हणजे काय याची यथार्थ कल्पनाच नव्हती. पुष्कळ लोकांनां जातिभेद मोडणें याचा अर्थ ब्राह्मणांचें वर्चस्व नाहींसें करणें असाच वाटे, आणि ब्राह्मणांचें वर्चस्व ही तर जातिभेदांतील सर्वांत निरुपद्रवी गोष्ट आहे.

या वरील एकंदर विवेचनावरून आपणांस काय दिसून येतें? प्रथम हें विवेचन आपणांस आशावादी बनण्यास बरेंचसें सबळ कारण देतें. जातिभेद मोडणें हें कांहीं एकंदरींत मनुष्याच्या शक्तीच्या पलीकडील काम नाहीं असें आपणांस वाटूं लागतें. पूर्वींच्या सुधारकांस यश आलें नाहीं याचें कारण त्यांची पद्धति चुकीची होती आणि त्या वेळीं योग्य समय प्राप्त झाला नव्हता हें होय. या गोष्टींचें ज्ञान होण्यानेंच आपणांला अशी आशा करण्यास आधार मिळतो कीं, आपल्या प्रयत्नास यश येण्याचा पुष्कळच संभव आहे; मात्र आपण पूर्वींच्या गौतमापासून राममोहनरायापर्यंत होऊन गेलेल्या लोकांनीं केलेल्या घोडचुका करतां कामा नये. अर्थात् या कामाला उच्च दर्जाचा स्वार्थत्याग, बंधुत्वाची व्यापक कल्पना यांची आणि यापुढें उत्पन्न होणाऱ्या सामाजिक शास्त्रांच्या धोरणानें अनेक तऱ्हेचे प्रयत्न बऱ्याच मोठ्या प्रमाणावर करण्याची आवश्यकता आहे.

जातिभेद मोडणें म्हणजे हिंदुत्वाचा उच्छेद करणें नाहीं. जातिभेद मोडण्याचा अथवा समाजदृढीकरणाचा प्रश्न म्हणजे समाज अनेक क्रिया करण्यास समर्थ करण्याचा प्रश्न होय. हें सामर्थ्य हिंदुस्थानच्या समाजांत हिंदुत्वाच्या उच्छेदानें नव्हे तर त्याच्या प्रसारानेंच येणारें असल्यानें आतां हिंदुत्वाच्या भवितव्याकडे वळणें इष्ट आहे.

**हिंदुत्वाचें भवितव्य.**—हिंदुत्वाचा प्रसार होईल किंवा नाहीं? या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वीं त्याला कांहीं तरी निश्चित अर्थ देणें जरूर आहे. वरील प्रश्नाचे अनेक अर्थ होऊं शकतात. एक अर्थ हिंदू कल्पनांचा प्रसार होईल काय, असा होऊं शकतो. दुसरा, हिंदुसमाजाबाहेरील लोक भविष्य काळीं या समाजांत येतील काय असा होऊं शकतो. वरील प्रश्न दोनहि अर्थीं घेऊन त्याला होकारार्थीं उत्तर देतां येईल. मात्र या उत्तरांतील कल्पना नीट लक्षांत याव्यात म्हणून या विधानाबरोबर समाजघटनाविषयक दोन शब्द सांगितले पाहिजेत. 'ख्रिस्त्याचा प्रसार' या शब्दसमुच्चयाचा जो अर्थ आपण घेतों, तसा अर्थ हिंदुत्वाचा प्रसार या शब्दांचा घ्यावयाचा नाहीं. ख्रिस्त्याचा प्रसार म्हणजे इतर जातींतून कांहीं लोक ख्रिस्ती संप्रदायांत घेऊन त्या संप्रदायाचा अनुयायी वर्ग वाढविणें होय. उलटपक्षीं, हिंदुत्वाचा प्रसार होणें याचा अर्थ असा आहे कीं, जे लोक हिंदुसंस्कृतीचें अंग बनले नाहींत अशा लोकांत हिंदुसंस्कृतीचा प्रसार करणें म्हणजे हिंदू व इतर यांमध्यें असें सादृश्य उत्पन्न करणें कीं, ज्या सादृश्यानें हिंदूंनां हे दुसरे लोक आपल्या जवळचे वाटावेत व त्याचप्रमाणें हिंदूंच्या सन्निध आलेल्या या लोकांनां हिंदू हे इतरांपेक्षां आपल्या जवळचे आहेत अशी जाणीव व्हावी. प्रत्यक्ष कार्य करावयाचें तें सादृश्य उत्पन्न करावयाचें कार्य होय. शास्त्रार्थाच्या दृष्टीनें जें कार्य करावयाचें तें निराळें आहे. तें कार्य म्हणजे धर्मशास्त्राचीं समाजनियामक तत्त्वें तपासून, परक्यांचा समावेश स्वजनांत कोणत्या नियमांच्या अनुषंगानें होईल तें ठरविण्याचें आहे.

हिंदुसमाजाच्या स्वरूपाचें जें वर्णन वर आलेलें आहे त्यावरून आणि समाजस्थितिमूलक कल्पनांचें निरीक्षण केलें असतां त्यावरून हिंदूंची सामान्य सामाजिक कल्पना जी दिसते ती ही कीं, जगांतील सर्व जाती व कुळें मिळून एकच समाज असून त्या समाजाचे ब्राह्मण व दुसरे आर्य (म्हणजे थोर व चांगले लोक अर्थात् हिंदू) आणि म्लेच्छयवनादि बाह्य लोक हे घटक आहेत. बाह्य शब्दांत हिंदुस्थानांतील जंगली

जाती व हिंदुस्थानाबाहेरील परकीय लोक यांचा अंतर्भाव होतो. या समाजवैविध्याच्या वर्णनांत जें तल लावलें आहे तें वस्तुस्थितीचें नसून चातुर्वर्ण्याचें आहे. यासाठीं वस्तुस्थितीची आणि तत्त्वाची जुळणी करून घेतली पाहिजे. समाजाची वस्तुस्थिति आणि त्याचें चातुर्वर्ण्यानें नियमन या दोन गोष्टींची संगति इतपत झाली आहे कीं, ब्राह्मण हा वर्ग निश्चित आहे व बाह्य हाहि वर्ग निश्चित आहे. मधला वर्ग पुष्कळ अंशीं अनिश्चितपद आहे. तथापि या वर्गातील व्यक्तींची आपलें चातुर्वर्ण्यांत कांहीं तरी स्थान आहे अशी समजूत आहे आणि ब्राह्मणांस देखील ही गोष्ट देखील मान्य आहे. समाजाची ही घटना अथवा घटनाविषयक कल्पना लक्षांत घेतली असतां हें प्रथमच स्पष्ट होईल कीं, अहिंदूंनां हिंदू करणें याचा अर्थ परकीय कुलांनां चातुर्वर्ण्यांत स्थान देणें अथवा विशेषेंकरून त्यांनां आर्यत्वाची पदवी प्राप्त करून देणें इतकाच काय तो आहे. इच्छिलेल्या फेरफारांची चातुर्वर्ण्यतत्त्वांशीं जुळणी कशी करावयाची हा कायद्याचा अथवा धर्मशास्त्रीय विचार एका बाजूस ठेवून प्रथम वस्तुस्थितीच्या दृष्टीनें इष्टस्थळीं कसें पोंचतां येईल तें पाहूं.

**सान्निध्यानें हिंदुत्वप्रसार.**—हिंदुत्वसाधक सादृश्य उत्पन्न करण्याचें कार्य कसें करावयाचें? याला उत्तर 'केवळ सान्निध्यानें' हें आहे. कांहीं हिंदू लोक एकत्र होऊन ते प्रगल्भसंस्कृतिविहीन लोकांत मिसळून त्यांजमध्यें महत्त्वाचें स्थान व्यापून बसले म्हणजे कालांतरानें ते असंस्कृत लोक हिंदू चालीरीती स्वीकारतील. असें झाल्यानें ज्या असंस्कृत लोकांत हिंदू महत्त्वाची जागा व्यापितील त्या लोकांनां हिंदु जनतेचें स्वरूप येऊन "कनिष्ठ हिंदू जाती" हें नांव जगाकडून त्यांस मिळण्यास ते लायक होतील. पुष्कळ प्रसंगीं हिंदु या नांवाची अधिक जाहिरात करण्याचेंच काम उरलेलें असतें. पुष्कळ लोकांनां आपली जात कोणत्या मोठ्या समुच्चयांत मोडते त्याची माहिती नसते. सिलोनमधील पुष्कळ शैवधर्मी तामिल लोकांस आपण हिंदू हें ठाऊक नाहीं. क्यांबोडियांतील शैवधर्मी ब्राह्मणांस देखील हिंदु या नांवाचा परिचय कोठें आहे? आपल्याकडे अडाणी किंवा वन्य जातींपैकीं बऱ्याचशा लोकांस आपण 'हिंदू' आहोंत हें ठाऊक नसतें. या लोकांत हिंदु या शब्दाचा प्रचार झाला म्हणजे ते हिंदू झाले असें होईल. सादृश्यावरच केवळ समाजसदस्यत्व अवलंबून नाहीं. कां कीं, गोंडांसारख्या जातींपैकीं जे लोक आपणांस हिंदू म्हणवितात आणि जे आपणांस तसें म्हणवीत नाहींत त्यांच्यामध्यें मोठें वैसदृश्य उत्पन्न झालेलें नाहीं, किंवा गोंड हिंदूंत आणि इतर हिंदूंत सादृश्य फार आहे असेंहि नाहीं. एका वर्गाला हिंदु हें नांव परिचित झालें आहे आणि आवडलें आहे आणि दुसऱ्या वर्गास तें परिचित झालेलें नाहीं एवढेंच. कधीं कधीं मनाचे समजूत करून घेतांनां "नांवांत काय आहे" असा प्रश्न लोक विचारतात आणि "कांहीं नाहीं" असें उत्तर देतात. पण या ठिकाणीं उत्तर दिलें पाहिजे तें हें कीं, जें कांहीं आहे तें नांवांतच आहे.

हिंदूंची संख्या वाढविण्याची सान्निध्यात्मक शक्ति असंस्कृत जातींच्या बाबतींत यशस्वी झाली, परंतु कमीअधिक प्रगल्भ संस्कृतीनें युक्त अशा परकीय लोकांच्या बाबतींत तिला यश आलें नाहीं याचें कारण काय? हिंदुस्थानांतील मुसुलमान लोक व ख्रिस्ती लोक यांच्या चालीरीती व कल्पना हिंदू लोकांशीं सदृश झालेल्या नाहींत असें नाहीं. परंतु याबरोबर हेंहि खरें आहे कीं, भारतीय मुसलमान किंवा ख्रिस्ती स्वतःस हिंदू म्हणवीत नाहींत. हिंदु शब्द नाकारण्याचें त्यांचें एक कारण हें दिसतें कीं, हिंदूंची समाजपद्धति आपली म्हणून जर त्यांनीं स्वीकारली तर त्यायोगें ते लोक हिंदू समाजाच्या कनिष्ठ जातींत मोडले जातील. जीं कुलें असंस्कृत आहेत तीं अनन्यगतिक असतात, आणि यामुळें हिंदूंच्या सान्निध्यानें तीं हिंदु समाजांत अंतर्भूत होतात; परंतु मुसुलमान व ख्रिस्ती यांची अर्थातच अशी स्थिति नाहीं. हिंदु समाजाहून आपण वेगळें आहोंत ही वृत्ति राखण्याची या लोकांत इच्छा आहे. शिवाय हिंदु म्हणून एक मूर्तिपूजक पारमार्थिक संप्रदाय आहे अशी त्यांची कल्पना झाली ही गोष्ट देखील त्यांनीं हिंदु या नांवाचा त्याग करण्यास कारण आहे.

**हिंदुसमाजाची संग्राहकता.**—बाह्यांनां आपल्या समाजाचे अंश करावयाचे झाल्यास त्यांस तुम्ही अत्यंत कनिष्ठ पद स्वीकारा असें म्हणून चालणार नाहीं. यूरोपीय, चिनी व जपानी यांसारखीं सुधारलेलीं राष्ट्रें व मिल्ल, तोडा, गारो यांसारख्या हिंदुस्थानांतील रानवट जाती यांमध्यें संस्कारावरून वर्ण ठरविणारा हिंदु समाज भेद करीत नाहीं. हिंदूंस हे सर्वच म्लेच्छ अथवा बर्बर आहेत. हिंदूंच्या दृष्टीनें जगांत एकच संस्कृति आहे; आणि ती हिंदु किंवा ब्राह्मण संस्कृति होय. या संस्कृतीबाहेर ज्या समाजव्यवस्था आहेत त्या हिंदूंच्या दृष्टीनें रानवट पंथ, भ्रष्ट आचरण अथवा पतितांचे मार्ग होत. पूर्वीच्या काळीं परकीय लोक आपल्या समाजांत येऊन केवळ शूद्रस्थान किंवा अंत्यजस्थान पावले असें मात्र नाहीं. कित्येकांनीं क्षत्रियस्थान मिळविलें आहे; आणि शातवाहनासारख्या कुलानें त्यांच्यांशीं लग्नसंबंध केले आहेत.* समाजाची संग्राहकता अलीकडे कमी झाली आहे. याचा अर्थ बाहेरून येणाऱ्या लोकांनां समाजांत मानाचें स्थान देण्याची समाजाची शक्ति गेली असा आहे. ही शक्ति एकटीच गेली नाहीं तर समाजांतील व्यक्तींचा कर्माप्रमाणें वर्णनिर्णय करण्याच्या शक्तीबरोबर ही गेली. समाज स्वतःच्या स्थितीमध्यें कोणतेहि फेरफार करण्यास आज असमर्थ आहे. समाजाची

* हें विधान खोडून न काढतां जातिभेद व चातुर्वर्ण्य हीं एकच समजणाऱ्या रा. विश्वनाथपंत राजवाड्यांनीं "बाटेगिरीचे सिद्धांत काढण्यांत भूषण मानणारे" असें डॉ० भांडारकरांस दूषण दिलें आहे (ज्ञानेश्वरीची प्रस्तावना पहा).

अशी असहाय स्थिति झाल्यानें एखाद्या परकीय समाजांतील चांगल्या माणसांनां हिंदु समाजांत येण्याला एकच मार्ग आहे तो हा कीं, आर्यसमाज, ब्रह्मसमाज, व यांसारखे वाह्यांनां आपले दरवाजे खुले ठेवणारे जे दुसरे संप्रदाय आहेत त्या संप्रदायांपैकीं एखाद्यांत त्यांनीं शिरावें. केवळ अर्वाचीन संप्रदायच मोकळ्या तोंडाचे असतात असें नाहीं. एका मुसुलमानाला महानुभावांनीं आपल्यांत घेतल्याचें व एका पारशाला जैनांनीं आपल्यांत ओढल्याचें उदाहरण मधून मधून ऐकूं येतें. असो. याप्रमाणें संप्रदायांच्या दारांतून आंत येणें हा एकच मार्ग सुधारलेल्या कुलाला हिंदुत्व स्वीकारण्यास म्हणजे हिंदु समाजाचे घटक होण्यास आज मोकळा आहे. पुनरुद्धृत झालेल्या व्रात्यस्तोमानें आणखी एक मार्ग खुला करून दिला, त्याप्रमाणें भविष्यत् काळीं परकीयांस अन्य मार्गहि खुले होतील असें वाटतें. परंतु ते होण्यास हिंदुत्वाची सुधारणा घडून येणें जरूर आहे. या ठिकाणीं एवढें सांगणें उचित होईल कीं, आर्यसमाज, ब्रह्मसमाज यांनां व इतर संप्रदायांनां ब्राह्मण कितीहि नांवें ठेवोत, पण आज हे समाज उपरिनिर्दिष्ट जी सेवा करीत आहेत तिजबद्दल त्यांचे ब्राह्मणांनीं उपकार मानणेंच युक्त आहे.

**हिंदुसमाजव्यवस्थेंतील दोष.**—आपल्या स्वतःचें भवितव्यनियमन करणें ज्या समाजाच्या हातीं असेल तो समाज दुसऱ्यांपेक्षां अधिक सुधारलेला समजावा. हिंदुस्थानाच्या समाजाला स्वेच्छेनें भवितव्यनियमन करण्याची शक्ति आज दिसत नाहीं. समाज जागृत होऊन स्वेच्छेनें समाजस्वरूपनियमनाची चळवळ करण्यासाठीं कंबर बांधू लागला तर त्यास गुणदोषविषयक विचार आणि त्यांतल्या त्यांत दोषशोध अगोदर केला पाहिजे.

दोष शोधून काढण्याचें काम कांहीं सोपें नाहीं, तरी पण कांहीं ढोबळ दोषांचा आपण परामर्श घेऊं.

हिंदुसमाजव्यवस्थेंतील सर्वांत मोठा दोष म्हटला म्हणजे दृढीकरणाची अल्पता हा होय. हिंदुसमाजांत परस्परांपासून विभक्त अशा तीन हजारांहून अधिक जाती व त्याहीपेक्षां अधिक पोटजाती आहेत. हा प्रकार म्हणजे अलीकडे उत्पन्न झालेलें अत्यंत भयंकर द्वैत असें जगाला दिसतें. पण जें हें द्वैत दिसतें त्याचा अर्थ एक समाजाचे अनेक तुकडे पडले असा नाहीं, तर दृढीकरणाचें कार्य अपूर्ण राहिलें असा आहे. हें दृढीकरणाचें कार्य व्हावयापूर्वीचें कार्य म्हणजे अनेक जनसमाज एका सामान्य संस्कृतीखालीं आणावयाचें. तें कार्य झालें. हें उत्पन्न केलेलें सादृश्य दृढ करावयाचें कार्य उरलें. तें कार्य करण्याचा प्रयत्न अनेक संस्थांनीं केला परंतु तें करण्यांत या संस्था दुर्बल ठरल्या.

निरनिराळ्या जाती व मनुष्यवर्ग यांचें ऐक्य घडवून आणणारी जी संप्रदाय नांवाची एकीकरणपद्धति आहे, तिच्या योगानें मुसुलमानी व ख्रिस्ती देशांत लोकांची एकी घडून आलेली आहे. या एकीला मुसुलमानी संप्रदाय व ख्रिस्ती संप्रदाय हे दोन बलिष्ठ संप्रदाय कारण झालेले आहेत. हिंदुस्थानांतहि संप्रदायसंस्था उद्भूत झाली. परंतु या संप्रदायांनां हिंदुस्थानांत एकी घडवून आणतां आली नाहीं. हिंदुस्थानांतील संप्रदायाचे संस्थापक ख्रिस्त अथवा महंमद यांच्या दर्जाचे नव्हते म्हणून त्यांनां ऐक्याच्या कार्यांत अपयश आलें असेंच केवळ म्हणतां येणार नाहीं. त्यांच्या अपयशाचें कारण या देशांत पूर्वापार चालत आलेली बौद्धिक संपत्तीची परंपरा होय. ही परंपरा इतकी सार्वत्रिक असून श्रेष्ठ दर्जाची होती कीं, येथें जे संप्रदाय उत्पन्न झाले ते या परंपरागत बौद्धिक संपत्तीशीं तुलना करितां फार आकुंचित असेच वाटले. पाश्चात्त्य जगताला रिलिजन्सनीं ज्या गोष्टी दिल्या त्या हिंदु जगताला संप्रदायांकडून प्राप्त होणें अशक्य होतें.

यूरोपांतील लोकांनां न्यायशास्त्र आणि ईश्वरविषयक व इतर व्यापक विचार संप्रदायसंस्थेकडून प्राप्त झाले. उलटपक्षीं, भारतीयांनां या गोष्टी संप्रदायांबाहेरील सामान्य संस्कृतीमधूनच प्राप्त झाल्या होत्या. भारतीय तात्त्विक विचार व कल्पना, ख्रिस्ती संप्रदाय व महंमदी संप्रदाय या दोघांच्या हल्ल्यांतून आजला टिकून राहिल्या आहेत त्याचें कारण कोणताहि संप्रदाय त्यांच्या मुळाशीं नव्हता हें आहे. ख्रिस्ताच्या व महंमदाच्या संप्रदायांनीं हिंदुस्थानांतील अडाणी समाजांतून माणसें उचललीं हें खरें आहे. परंतु अडाणी लोकांखेरीज इतरांनां म्हणजे बुद्धिमान वर्गाला या संप्रदायांच्या तत्त्वांची फारशी किंमत वाटली नाहीं हें तितकेंच खरें आहे. ख्रैस्त्य व इस्लाम हे संप्रदाय म्हणजे केवळ अर्धसंस्कृत टोळ्यांचे पंथ असून त्यांत परस्परविसंगत अशाच गोष्टी पुष्कळ आहेत, त्यांत मौल्यवान् असें नवें तत्त्व कांहीं नाहीं, अशी हिंदुस्थानांतील बुद्धिमान वर्गाची सदरील संप्रदायांसंबंधानें ठाम कल्पना आहे; व म्हणून त्याजवर त्या संप्रदायांच्या उपदेशकांचा कांहींच परिणाम होत नाहीं. याशिवाय हिंदूंची वृत्ति अशी आहे कीं, जर एखादें मत चांगलें असेल तर तें घ्यावें, ज्ञान कोठूनहि घ्यावें, त्याकरितां जात बदलावयास लावणाऱ्या संप्रदायास मिळावयाचें कारण नाहीं. असो. या आणि दुसऱ्या अनेक कारणांनीं संप्रदायसंस्थेस हिंदुस्थानांत एकी करण्याच्या कामीं यश आलें नाहीं. तेव्हां याखेरीज कांहीं दुसरी संघटित योजना एकीकरणाच्या कार्यासाठीं आपण केली पाहिजे.

येथील ऐक्याच्या अभावाचीं मूळकारणें तरी काय याचा विचार करितां असें दिसतें कीं, देशांतील निरनिराळ्या

टोळ्या व राष्ट्रकें यांनां आत्मसात् करून आपलें व त्यांचें मिळून एक मोठें बलिष्ठ राष्ट्र निर्माण करण्याचा उपदेश करणारे व्यापक विचार आणि भावना हिंदुस्थानांत उदय न पावल्यानें येथें पाहिजे तें ऐक्य घडून आलें नाहीं. कोणत्याहि प्रकारची राष्ट्रीय भावना म्हणून हिंदुत्वांत उत्पन्न झाली नाहीं. जातीची कल्पना व त्यानंतर एकदम मानव्याची कल्पना अशा दोनच ऐक्याच्या कल्पना प्राचीन हिंदू लोकांस अवगत होत्या. पृथ्वीवरील सर्व मनुष्यांचा एकच समाज असावा, या समाजांत श्रेष्ठकनिष्ठ असे चार वर्ण असावेत, व या वर्णांत ब्राह्मण सर्वांच्या वर असावेत, ही हिंदूंची समाजघटनेची कल्पना होती. हें त्यांचें सामाजिक ध्येय होतें. परंतु, हें ध्येय व्यवहारांत आणतांना जो मार्ग त्यांनीं पत्करला त्यायोगें हिंदुस्थानांत व शेजारच्या देशांत म्हणजे हिंदी महासागरांतील द्वीपें व पूर्वेकडील उपभारत वगैरे प्रदेशांत पुष्कळशा जातींची सोपानपरंपरा निर्माण होऊन त्यांत ब्राह्मण जात सर्वश्रेष्ठ व बाकीच्या उच्चनीचतेच्या कल्पनेनें एकाखालीं एक अशा पायरीनें लाविलेल्या ही स्थिति कायमची रूढ होण्यापलीकडे कांहीं झालें नाहीं. ब्राह्मणांचें ध्येय जाती कायम टिकाव्या हें नव्हतेंच. त्यांचें ध्येय मनुष्यसमाजांत चार वर्ण किंवहुना शक्य तर ब्राह्मण व शूद्र हे दोनच वर्ण रहावे असें होतें. वर्णभावना जागृत करून जातिभावना कमी करावी आणि चातुर्वर्ण्यसंस्थापना करावी म्हणजे जातिभेद नष्ट करावा हें ब्राह्मणांचें प्राचीन ध्येय जसें विफळ झालें तसेंच ब्राह्मणेतर निरनिराळ्या जाती आपलें जातिवैशिष्ट्य गौण मानून ज्या एका नांवाखालीं एकत्र होतील अशी पदवी 'शूद्र' ही खास नसल्यानें ब्राह्मणांचें दोन वर्णांचें ध्येयहि फळास आलें नाहीं.

महंमदी संप्रदायाचा उदय होऊन मुसुलमान लोकांच्या टोळ्या जेते या नात्यानें हिंदुस्थानांत घुसून येथें वस्ती करीपावेतों भारतीय म्हणून आपण अभारतीयांहून वेगळे आहोंत ही जाणीव भारतीयांनां नव्हती, व त्यांनां तसें वैशिष्ट्यदर्शक नांवहि नव्हतें. मुसुलमान आल्यावरहि आपली ब्राह्मणप्रमुख उच्चनीच जातिपरंपरेची कल्पना हिंदूंनीं टाकली नाहीं. देशांत घुसलेल्या मुसुलमानांनां त्यांनीं म्लेच्छ अथवा अनार्य जात असें नांव देऊन आपल्या समाजाच्या अगदीं तळाच्या खालीं एक नीच जात म्हणून तिला आपल्या सामाजिक विचारांत स्थान देऊन टाकलें. आतां ख्रिस्ती संप्रदायाचे लोक राज्य करीत आहेत तरी भारतीयांनीं आपली जुनी समाजकल्पना टाकलेली नाहीं. खालच्या नीच जाती म्हणून इंग्रज व दुसरे ख्रिस्ती लोक यांची आजहि ते एकत्र गणना करितात.

याप्रमाणें हिंदूंनीं जरी आपल्यापुरतें सर्वव्यापी असें समाजव्यवस्थाशास्त्र निर्माण केलें तरी सर्व जग आपलें म्हणून स्वीकारील असें या व्यवस्थेचें स्वरूप नव्हतें व नाहीं. हिंदू लोकांमध्यें आपली समाजव्यवस्था जगावर जबरदस्तीनें लादण्याइतकें सामर्थ्यहि नव्हतें. हिंदुस्थानांतील राजेरजवाडे ब्राह्मणांच्या ज्ञानाची मदत घेऊन जग जिंकूं शकले असते तर, किंवा ब्राह्मण सर्व जगावर जाऊन ते भारतीयांचे पुरोहित झाले तसे जगांतील इतर सर्व लोकांचे पुरोहित झाले असते तर, त्यांच्या सामाजिक विचारांनां सर्व जगभर मान्यता मिळाली असती. परंतु हिंदूंच्या इतिहासांत त्यांच्या सामर्थ्याभावामुळें असाहि योग घडून आला नाहीं.

हिंदुस्थानांत बाह्य संप्रदाय शिरून त्यांच्या सान्निध्यानें व हल्ल्यानें हिंदु संस्कृतीचा समूळ नाश होतो कीं काय अशी भीति उत्पन्न होईपावेतों हिंदूंमध्यें सर्वांचें ऐक्य करून स्वसमाजवर्धन या एका ध्येयाची साधना करण्याची विचारपद्धति व वृत्ति उत्पन्न झाली नाहीं. ख्रिस्त आणि महंमद यांच्या संप्रदायांत ज्या जाती ओढल्या गेल्या त्यांच्या ठिकाणीं स्वसमाजवर्धनाची प्रेरणा करणारी भावना जागृत होती आणि यामुळें पुष्कळ लोकांचें ऐक्य या जाती करूं शकल्या.

**आपलें साध्य.**—भारतीय लोकांचें ऐक्य व्हावें यासाठीं कांहीं सुधारणा करावयाचा आपण विचार करितों, तेव्हां आपल्याला साधावयाचें काय त्याची नीट कल्पना करून देणारी समाजविषयक विचारपद्धति आपल्या समोर असली पाहिजे. आपल्याला साधावयाचें काय त्याची स्पष्ट कल्पना आपल्या समोर असल्याशिवाय तें साध्य करून घेण्यासाठीं सुविवेकसंमत आणि सुव्यवस्थित अशी उपाययोजना आपणांस करितां येणार नाहीं. हिंदु समाजाच्या स्वरूपांत फेरफार करणें जरूर आहे, एवढी गोष्ट कोणीहि सहज मान्य करील. परंतु यानंतर आपणांपुढें प्रश्न उभा राहतो तो हा कीं, जुन्या व्यवस्थेंतील कोणता भाग ठेवावयाचा व कोणता काढून टाकावयाचा आणि या व्यवस्थेंत कोणत्या नव्या गोष्टींची भर टाकावयाची. या प्रकारची निवड करण्यासाठीं आपणांस प्रथम जगाच्या संस्कृतीचें भवितव्य काय होणार यासंबंधानें कांहीं अंदाज बांधून ठेवला पाहिजे. हा अंदाज बरोबर यावा म्हणून आजच्या संस्कृतींतील अनेक अंगांची कोणत्या प्रकारची भवितव्यता आहे तें तपासलें पाहिजे व त्याचप्रमाणें जागतिक संस्कृतीला विवक्षित इष्ट वळण मिळावें यासाठीं तिच्यांत कोणते फेरबदल करणें शक्य आहे तेंहि आपणांस ठरविलें पाहिजे.

जगांतील सर्व मनुष्यांचा एक समाज बनवावयाचा हें ध्येय आपणांसमोर ठेविल्यास त्याला कोणी विरोध करील असें वाटत नाहीं. अगदीं प्राचीन काळापासूनच्या मनुष्याच्या राजकीय इतिहासाकडे पहा, त्याच्या सांपत्तिक इतिहासाकडे पहा, सामाजिक व्यवहारशास्त्रें व कला यांच्या इतिहासाकडे पहा. या सर्व ठिकाणीं या गोष्टीचा भरपूर पुरावा आढळून येईल कीं, मनुष्याची प्रवृत्ति त्यांतील मनुष्यांचा एक मोठा

समाज होण्याकडे आहे. लहान राजकीय समूहांचे मोठाले राजकीय समूह होणें, जीवनकलहांत दुर्बलांचा विनाश होणें, संप्रदाय अथवा रिलिजन ह्यांच्या पायावर मोठाले समाज बनणें, वरिष्ठ संस्कृतींचा सर्वत्र प्रसार होणें, या सर्व क्रियांचा रोंख जगाचा एक समाज घडवून आणण्याकडे आहे.

या दृष्टीनें हिंदुत्वाच्या सुधारणेचा विचार करावयाचा तर या ठिकाणीं आपलें मुख्य कार्य, ज्या समुच्चयाचें घटनातत्त्व जागतिक समाजघटनेच्या तत्त्वाशीं अगर पद्धतीशीं विरोधी होणार नाहीं व जो अंतर्गत व्यवस्थेच्या दृष्टीनें एक, पूर्ण व दृढ असेल असा समुच्चय निर्माण करण्याचें आहे.

येथें हें सांगणें अवश्य आहे कीं, भूतकालीन गोष्टींचें अंतरंग बघतांना किंवा भविष्यकालची कोणतीहि योजना करतांना मानवी स्वभावांतील एका विशेषाकडे आपणांस दुर्लक्ष करतां कामा नये. आपणांस कित्येक वेळां आढळून आलें आहे कीं, फार मोठें ध्येय पुढें ठेवणारांपेक्षां बेताचें ध्येय ठेवणारांच्या हातून जास्त कार्य घडलेलें आहे. महंमदी संप्रदाय आणि ख्रिस्ती संप्रदाय यांनीं आपल्या संप्रदायांतील लोक एकमेकांचे बंधू असून त्यांनां समान हक्क आहेत ही भावना आपआपल्या सांप्रदायिकांत जागृत करण्याचें ध्येय ठेवून तदनुरूप प्रयत्न केले व या संप्रदायांचे हे प्रयत्न पुष्कळ अंशानें यशस्वी झाले आहेत. उलट पक्षीं, हिंदूंनीं जें तत्त्वज्ञान निर्माण केलें व लोकांनां शिकविलें तें वस्तुतः वरील संप्रदायांपेक्षां कितीतरी अधिक थोर असतां त्यांच्या हातून ऐक्याचें कार्य झालें नाहीं. हिंदूंचा वेदांत सर्व हिंदू एकमेकांचे बंधू आहेत एवढेंच सांगून रहात नाहीं, तर सर्व मनुष्यें एकमेकांचे बंधू आहेत–इतकेंच नव्हे तर तुम्ही आणि मी एकच आहोंत–असें सांगतो; बंधुता आणि समानता या भावनांच्या ऐवजीं आमूलाग्र एकतेची भावना वेदांत आमच्या ठिकाणीं उत्पन्न करूं पाहतो; तथापि हिंदूंचें अशा प्रकारचें थोर तत्त्वज्ञान असतांहि हिंदुस्थानांत एकी उत्पन्न झाली नाहीं. याचें कारण काय? कारण असें आहे कीं, जगांतील सर्व माणसें भाऊभाऊ आहेत किंवा एखाद्या लहान समुदायांतील घटक बंधुभावानें बांधलेले आहेत असलें तत्त्वज्ञान कोणा तत्त्ववेत्त्यानें कितीहि कुशलतेनें विवेचन करून सांगितलें तरी सामान्य जनसमूहावर व त्याच्या कृतीवर त्याचा परिणाम होण्यापूर्वी त्या जनसमूहाला हें तत्त्वज्ञान आपल्या कृतींत उतरविण्याची अत्यंत आवश्यकता भासावी लागते. वरील प्रकारचें तत्त्वज्ञान व्यवहारांत आणण्याची आवश्यकता लूट मिळविण्याच्या हव्यासानें भासूं लागेल, किंवा स्वसंरक्षणाची इच्छा अथवा एखाद्या देवतेचा किंवा उपासनामताचा प्रचार करण्याची इच्छा सदरील आवश्यकतेची जाणीव उत्पन्न करील. ठग लोक आणि निरनिराळ्या संप्रदायांतील मिशनरी लोक यांच्यामध्यें परस्परांसंबंधानें सामान्यतः तीव्र अशी बंधुभावना असते, कारण एक वर्गाला खेतरांच्या खिशांतून पैसे चोरावयाचे असतात व दुसऱ्या वर्गाला इतर वर्गांतून माणसें चोरावयाचीं असतात.

केवळ विश्वबंधुत्वाच्या कल्पनेनें सर्व हिंदूंचा एकोपा होणें शक्य नाहीं. केवळ ह्या कल्पनेच्या आधारानें निरनिराळ्या हिंदू जाती व वर्ग हे एकांत एक मिसळून जाऊन त्यांचा खरोखरीचा एक समाज होणें अशक्य आहे. असा समाज होणें हें आपलें ध्येय असेल तर तें साध्य होण्यासाठीं कांहीं काळपावेतों तरी विश्वबंधुत्वापेक्षां कमी कक्षेची अशी समाजभावना आपणांत जागृत झाली पाहिजे. या संकुचित क्षेत्राच्या समाजतत्त्वज्ञानाची उभारणी पारमार्थिक अथवा जातिविषयक भावना यांजवर केलेली नसावी. आपल्याला जी भावना पाहिजे आहे ती भूमिविषयक भावना होय. संप्रदाय अथवा जात, कुल, वंश यांसंबंधाचा सर्व विचार बाजूला ठेऊन अगदीं शुद्ध अशी देशभावना आपणांस हवी आहे. हिंदुस्थान हें माझें राष्ट्र, हिंदुस्थान हा माझा मायदेश, असें मनापासून वदविणारी राष्ट्रभक्ति अथवा देशभक्ति भारतीयांत उत्पन्न झाली पाहिजे. अशी राष्ट्रभावना उत्पन्न करणें हें भारतीय कवींचें, लेखकांचें व मुत्सद्द्यांचें कर्तव्य आहे. अशा प्रकारची बलवत्तर राष्ट्रभावना उत्पन्न होऊन भारतीयांनां आपण सगळे एका समाजाचे अवयव आहोंत, रक्ताच्या, ऐतिहासिक परंपरेच्या आणि हिताहिताच्या बंधनांनीं आम्ही सर्व एकत्र बांधलेले आहोंत, असें जेव्हां वाटूं लागेल तेव्हां मग पुढें विश्वबंधुत्वाची कल्पना येथील जनसमूहांत पेरून तिचा विस्तार करणें हिताचें होईल.

**भारतीय ऐक्यास उपाय.**—वरील विवेचनावरून भारतीयांत ऐक्य घडून येण्याचे मुख्य उपाय उघड होतात ते येणेंप्रमाणें:—पारमार्थिक बाबतींत उदारपणाच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार आम्हीं करीत रहावें. हिंदुस्थानांत या तत्त्वज्ञानाचा प्रसार करीत असतां आमच्याकडून सर्व जगताची महत्त्वाची सेवा घडेल. राजकीय आणि सामाजिक बाबतींत माझा संप्रदाय अमुक, माझी उपासना अमुक, इत्यादि प्रकारचे विचार पुढें आणणें हळूहळू बंद होत जाईल अशी व्यवस्था झाली पाहिजे. मुसुलमान व ख्रिस्ती हे म्लेच्छ आहेत हें आपलें मत हिंदु समाजानें टाकून दिलें पाहिजे. समाजाच्या दृष्टीनें सर्व जाती व वर्ग सारखेच आहेत ही कल्पना आमच्यामध्यें निर्माण झाली पाहिजे. जातींचा हा तात्त्विक सारखेपणा व्यवहारांत यावा म्हणून आमच्या सोंवळ्याच्या व विटाळाच्या ज्या अश्रौत आणि अनार्य कल्पना आहेत त्यांचा आम्हीं त्याग केला पाहिजे. आमच्यांतील भिन्न जातींचें पूर्ण ऐक्य व्हावें

व उच्चनीचतेच्या कल्पना आमच्यामध्यें राहूं नयेत यासाठीं लग्नासंबंधाचे निर्बंधहि आम्हीं काढून टाकले पाहिजेत.

हिंदुत्वांत हे सर्व फेरबदल करतांना मुख्य गोष्ट आपण केली पाहिजे ती ही कीं, हे सर्व फेरफार जुन्या पुराणसंरक्षणप्रिय लोकांच्या पद्धतीनें आपण घडवून आणले पाहिजेत, म्हणजे एखाद्या जातीचें रूप घेणारा कोणताहि नवा संप्रदाय उत्पन्न न करितां किंवा कोणत्याहि चालू संप्रदायाला उत्तेजन न देतां वर निर्दिष्ट केलेले फेरबदल झाले पाहिजेत.

याप्रमाणें हिंदुत्वाची पुनर्घटना करणें याचा अर्थ हिंदु या भावनेच्या ऐवजीं लोकांच्या ठिकाणीं भारतीय ही बुद्धि उत्पन्न करणें किंवा हिंदु संस्कृतीचें रूपांतर भारतीय राष्ट्रधर्मांत घडवून आणणें हा होय. हें काम सोपें नाहीं. वर्तमानपत्री चळवळ करून प्रत्येक हिंदी माणसाच्या कानावर भारतीयत्व अथवा भारतीय राष्ट्रधर्म हे शब्द पुनःपुनः आदळणें, प्रत्येकाला मराठा, बंगाली, हिंदु, मुसुलमान, पारशी ही संकुचित समूहनामें टाकावयास सांगून मी हिंदी अथवा भारतीय आहे ही वृत्ति धरावयास शिकविणें एवढ्यानें कांहीं इष्ट फेरफार घडून येणार नाहींत. कारण प्रश्न नांवांचा नाहीं, तर निरनिराळ्या समूहांनां विभागणाऱ्या सामाजिक बंधनांचा आहे. वस्तुस्थितीकडे पाहतां असें दिसून येईल कीं, फ्रेंच लोक आणि रशियन लोक यांजमध्यें त्यांनां एकमेकांपासून दूर ठेवणारे जितके सामाजिक निर्बंध आहेत, त्यांहून मराठे व बंगाली त्यांच्यामध्यें दूरीभाव उत्पन्न करणारे निर्बंध अधिक आहेत. मराठे लोक व बंगाली लोक स्वतःला भारतीय म्हणविण्यास उत्सुक आहेत एवढेंच नव्हे, तर त्यांनां त्या नांवाचा अभिमान वाटतो असें असून आणि राजकीय व आर्थिक हितसंबंधांच्या सूत्रांनीं ते एकत्र बांधलेले असतांहि समाजबंधनांची स्थिति वरील प्रकारची आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. हिंदुस्थानच्या लोकांत जर राष्ट्रीयत्व उत्पन्न व्हावयाचें असेल तर त्यांनां यूरोपियन लोक ज्या ज्या स्थितींतून गेले त्या त्या स्थितींतून क्रमाक्रमानें परंतु यूरोपियनांपेक्षां अधिक त्वरेनें पार झालें पाहिजे.

**समाजाचे दोन प्रकार.**—यूरोपियन राष्ट्रें सध्यांच्या राष्ट्रपदाला जीं पोहोंचलीं तीं कोणकोणत्या पायऱ्या चढून पोहोंचलीं हें आपण नीट समजून घेतलें पाहिजे. यूरोपियन लोकांचीं राष्ट्रें बनावयास जी गोष्ट सर्वांत अधिक कारणीभूत झाली ती ही कीं, त्यांनीं आपले समाज जात्यवलंबी होते ते क्षेत्रावलंबी केले. समाजाची जातिबद्धता काढून त्याला क्षेत्रबद्धतेचें स्वरूप देणें या गोष्टीचें किती महत्त्व आहे याची बरोबर कल्पना रॉचेस्टर येथील डॉक्टर मॉर्गन यांच्याखेरीज इतर कोणाहि समाजशास्त्रज्ञास झालेली दिसत नाहीं. समाजाच्या व्यवस्थेंत यूरोपमध्यें हा जो फरक झाला, त्याच्या योगानेंच त्या ठिकाणीं हिंदूंसारखी जातिव्यवस्था वाढ पावूं शकली नाहीं. जातिमूलक समाज आणि प्रादेशिक समाज हे भिन्न प्रकारचे समाज आहेत. जातिभावना आणि प्रादेशिक भावना यांचें कार्य ज्या समुच्चयांत होतें ते समुच्चय राजकीय असूं शकतात त्याप्रमाणें केवळ सामाजिकहि असूं शकतात.

एखाद्या प्रदेशांत तेथील विशिष्ट जातींवरच केवळ नव्हे तर सर्वांवर सारखीच जर राजकीय सत्ता चालत असेल तर त्या प्रदेशांतील समाजाला राजकीय स्वरूपाचा प्रादेशिक समाज म्हणावें. निरनिराळ्या प्रदेशांत राहणाऱ्या निरनिराळ्या लोकसमूहांवर कोणातरी एकाच प्रमुखाची अनेक सामाजिक बाबतींत जर सत्ता चालत असेल आणि या लोकांच्या सामाजिक रूढींत त्या त्या ठिकाणची राजसत्ता जर कोणत्याहि प्रकारें हात घालीत नसेल तर असल्या संस्थेला जातिस्वरूपी सामाजिक समुच्चय म्हणतां येईल. रोमन कॅथोलिक चर्च हें असल्या समुच्चयाचें चांगलें उदाहरण आहे. चीन आणि इराण यांसारख्या पौरस्त्य देशांत व हिंदुस्थानांतील देशी संस्थानांत असलेल्या ब्रिटिश प्रजाजनांवर ब्रिटिशांचा अधिकार चालतो हें राजकीय स्वरूपाच्या जातिघटित समाजाचें उदाहरण आहे. एखाद्या देशांत एखाद्या लोकसमूहाला फक्त जातीचे कायदे व वहिवाटी याच जर बंधनकारक असतील आणि तेथें असलेली राजसत्ता जर त्या जातीच्या रूढींचा अंमल करण्याच्या कामीं लक्ष देत नसेल तर तेथें जातिघटित शासनसंस्था आहे असें म्हणतां येईल. ज्या लोकांनां हक्काची समानता हें ध्येय आवडतें त्यांनीं अशी जातिस्वरूपी शासनसंस्था नाहींशी करण्याचा प्रयत्न करणें व तिच्या जागीं प्रादेशिक शासनसंस्था निर्माण करण्यास झटणें हें त्यांचें कर्तव्य आहे.

मानवी विकासामध्यें प्रादेशिक समाज ही कांहीं शेवटची पायरी नव्हे. शिवाय ही प्रादेशिक भावना नेहमींच कायम राहते असेंहि नाहीं. कोणताहि प्रादेशिक समाज संकुचित वृत्तीचा होऊन जातीच्या स्वरूपाचा होण्याचें भय नेहमींच असतें. जातीला जसा जातीचा अभिमान असतो व आपल्यापेक्षां कमी दर्जाच्या जातींत मिसळण्याची जशी तिची तयारी नसते तशीच प्रदेशमूलक समाजांची गोष्ट आहे. त्या समाजांनां एकदां राष्ट्रस्वरूप प्राप्त झालें म्हणजे त्यांच्यामध्यें राष्ट्राभिमान वाढतो, व त्यायोगें ते अहंमन्य आणि एकलकोंडे बनतात. कोणत्याहि देशांत जर निरनिराळे समाज एकत्र झाले व हे समाज परस्परांत मिसळून जाण्यासारखे नसले तर त्या देशांत प्रदेशमूलक समाज व प्रादेशिक भावना टिकून राहण्याची गोष्ट फार अवघड होते. देशांत येणारे बाहेरचे लोक पोषाख, चालीरीती, उपासनासंप्रदाय व संस्कृतीच्या इतर गोष्टी या बाबतींत आणि रंगारूपाच्या बाबतींत देशांतील लोकांहून निराळे असले तर तेथील प्रादेशिक समाजाला या बाहेरच्या लोकांनां आपल्याशीं

एकरूप करून घेण्याच्या कामांत फारच अडचण पडते. हिंदुस्थानांत निरनिराळ्या विभागांत प्रादेशिक समाज पूर्वी झाले असतील यांत कांहीं अशक्य दिसत नाहीं. परंतु हे समाज पुढें पुन्हां जातिस्वरूप झाले असें दिसतें. उदाहरणार्थ कलिंगादि राष्ट्रें आज जातिस्वरूपी बनलेलीं आहेत.

जगांतील सर्व समाजांचा जर आपण हिशोब घेतला तर एक समाज पूर्णपणें जातिस्वरूपाचा व दुसरा पूर्णपणें प्रादेशिक असें आढळत नाहीं. जातकुळीवार बनलेले समाज व प्रदेशवार बनलेले समाज यांची मेसळ जगांत सांपडते. अमुक देशांत केवळ क्षेत्रवार बनलेले समाज आहेत व अमुक देशांत केवळ जातीवार समाज आहेत या प्रकारें जगाचे दोन विभाग करतां येतील अशी स्थिति नाहीं. इंग्लंड, फ्रान्स व पूर्वेकडील जपानी साम्राज्य हीं क्षेत्रनिश्चित समाजाचीं उदाहरणें म्हणतां येतील. यूरोपियन राष्ट्रांतील लोक ज्या देशांतून व वसाहतींतून राहत आहेत तेथें त्यांनीं आपल्या बरोबर क्षेत्रनिश्चित समाजाची कल्पना नेलेली आहे, परंतु या प्रदेशांत ज्या निरनिराळ्या भिन्न वंशांतील जातींबरोबर राहण्याचा प्रसंग येतो, त्यांची चालरीत अगदीं वेगळी असल्यानें आपलें क्षेत्रनिश्चित अथवा प्रादेशिक समाजाचें ध्येय अंमलांत आणतांना त्यांची फार त्रेधा उडते. संयुक्त संस्थानांतील लोक आपल्या समाजाचें प्रादेशिक स्वरूप कायम राखण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहेत व त्यांच्या मार्गांतील अडचणींतून ते केव्हां तरी यशस्वितेनें पार निघून जातील असा पुष्कळ संभव दिसतो. उलट पक्षीं, हिंदुस्थानचा समाज हा जातिविशिष्ट समाजाच्या असर्याद वाढीचें एक थोरलें उदाहरण म्हणून देतां येईल.

**प्रादेशिक समाज कसा बनतो?**—जातिस्वरूपी समाजाला प्रादेशिक समाजाचें स्वरूप कसें येतें हें समजण्यासाठीं आपण एक भटकणारी जात घेऊं. या भटक्या लोकांचा एक नायक आहे, त्यांत उच्च समजला जाणारा एक वर्ग आहे आणि त्यांनां बंधनकारक असे जे कायदे आहेत ते त्यांच्या जुन्या रूढीच आहेत असें आपण समजूं. यानंतर ही भटकी जात एका प्रदेशांत बरेच दिवस टिकून राहिली व तेथें थोडाफार स्थिर असा जीवनक्रम पतकरून शेतकी व दुसरे कांहीं उद्योगधंदे यांत मन घालून तिनें त्यांची थोडीफार वाढ केली असें आपण समजूं. सदरील जातीच्या राहणींत अशा तऱ्हेचा फरक झाल्यानें त्या जातीच्या इतर व्यवस्थेंत काय फरक होतील ते पहा. एक फरक असा होण्याचा संभव आहे कीं, परकी जातींतला मनुष्य आपल्या जातींत घेण्याचें काम तिला सोपें होईल. जात भटक्या स्वरूपाची असतांना परकी लोक तिच्यांत येण्याचें अगदींच असंभवनीय नसलें तरी फार थोड्या प्रमाणांत तें संभवनीय असतें. असें कित्येकदां होतें कीं, भटक्या जातींत तिच्याशीं विरोध असलेल्या जातींतून कांहीं लोक पळून येऊन मिसळतात; तसेंच इतर जातींतील मुलें पळवून आणून किंवा मोठीं माणसें गुलाम करून आणून तीं आपल्या जातींत कायम करून टाकण्याचें कामहि भटक्या जाती करितात. या रीतीनें त्यांच्यांत परकीयांचा समावेश होतो.* परंतु आपलें भटकणें सोडून या जाती एखाद्या प्रदेशांत लहानमोठ्या गांवांतून स्थिरपणें राहूं लागल्या म्हणजे त्यांच्या ज्या जातीच्या वहिवाटी व कायदे असतात त्यांनां हळूहळू प्रादेशिक कायद्यांचें व वहिवाटींचें स्वरूप येतें. त्या जातीचा जो नायक असेल तो त्या प्रदेशाचा राजा होतो. तो परकीयांकडून कर घेतो आणि त्यांचें संरक्षण करितो. हीं परकी माणसें त्या देशांतील लोकांत लग्नें करितात व त्यांच्या देशी कायद्याप्रमाणें वागून तेथील देश्य समाजाशीं एकरूप होऊन जातात.

या परकीय लोकांनां पुष्कळ वेळां अनेक तऱ्हेच्या अपात्रतेचा डाग मारला जातो. कांहीं नागरिकी हक्क त्यांनां देण्याचें नाकारिलें जातें. त्यांचें सामाजिक जीवन दुर्लक्षिलें जातें. आपल्या सामाजिक गोष्टी परकीय लोकांनीं आपल्या मर्जीप्रमाणें चालवाव्या, विवाह, वारसा, मृत्युपत्र, इत्यादि बाबतींत त्यांच्या रूढी असतील त्यांप्रमाणें त्यांनीं वागावें अशा तऱ्हेची जेथें व्यवस्था असेल परंतु समाजामध्यें बरेवाइट नियम करण्यास कोणीच अधिकारी नाहीं असें असेल तर त्या समाजाचें जातिस्वरूप पुष्कळच संरक्षिलें जातें. विजातीय म्हणून त्यांकरितां सरकारनें कायदा करावयाचा नाहीं, आणि त्यांच्यामध्यें कायदे करण्यास अधिकारीच नाहीं ही स्थिति समाजास जुन्या नियमांनीं गच्च बांधणारी आणि समाजाची प्रगति बंद करणारी आहे. उलट पक्षीं रोमन लोकांमध्यें जातींचा (Jus Gentium) म्हणून जो कायदा निर्माण झाला त्या कायद्याच्या निर्माणपद्धतीप्रमाणें जेथें परकी जातींच्या कांहीं रूढी निवडून घेऊन त्या निवडक रूढींचाच अंमल प्रथमतः त्या परकी लोकांत करावयाचा, अशा रीतीनें ज्या देशांतील परकी लोकांसाठीं नवे कायदे निर्माण होतात त्या देशांतील तत्रत्य समाजाशीं देशांत आलेले परकीय लोक थोडेबहुत दृढतेनें बद्ध होतात. या परकीय लोकांकरितां तयार केलेले नवे कायदे बंधनकारक म्हणून देश्यांनींहि मान्य केल्यास परकी व देशी लोकांतील अंतर आणखी कमी होतें. पुढें परकीयांची सामाजिक अपात्रता सर्वस्वी दूर केली गेली म्हणजे त्यांनां पूर्वी खालची जात म्हणून जें लेखिलें जात असतें तें तसें लेखणें नाहींसें होतें.

**जातिविशिष्ट समाज.**—उलट पक्षीं परकीय लोकांनां त्यांच्या चाली व कायदे असतील त्याप्रमाणें चालूं दिलें तर समाजाचें जातिबद्ध स्वरूप कायम राहतें आणि जातिभेदाची व्यवस्था समाजांत निर्माण होण्यास मदत होते. परकी लोकांच्या चालीरीतींकडे अतिशय विरोधबुद्धीनें पहावयाचें हाच

* कैकाडी नांवाच्या जातींत पूर्वी कऱ्हाडा ब्राह्मण असलेला महाजनी आडनांवाचा एक मुलगा शिरून तो पूर्ण कैकाडी व त्यांचा पुढारी बनला असें एक पोलिसचे अधिकारी कळवितात.

लोकसत्ताक समाजांचा सामान्यतः स्वभाव दिसतो. आपल्या व परकी लोकांच्या चालीरीतींत फरक जितका जास्त तितकें त्यांनां आपल्यांत मिळवून घेणें अधिक कठिण असा अनुभव आल्यानें लोकसत्ताक समाजांची ही अशी बाह्यताविद्वेषी तीव्र वृत्ति दिसून येते.

आपलेपणा वंशानुरूप धरावयाचा या सामाजिक वृत्तीचा अंतिम परिणाम उघड आहे. या वृत्तीमुळें विशिष्ट प्रदेशांत असलेल्या जाती कमी अधिक कायम राहून जातिभेद ज्या समाजांत असतो त्या समाजाची सर्व पद्धति तेथें उत्पन्न होईल.

इंग्रज, अमेरिकन व यांसारखे दुसरे जे क्षेत्रनिश्चित समाज आहेत ते जर सावधानतेनें वागले नाहींत तर तेहि जातिबद्ध समाज होऊन त्या समाजांप्रमाणें भविष्यत् कालीं त्यांच्यांत जातिभेद रूढ होईल. माणसें जोंपर्यंत एका देशांतून दुसऱ्या देशांत जातात तोंपर्यंत विवक्षित समाज आज देशकृत आहे कीं जातिकृत आहे यावर त्याची पुढची भवितव्यता अवलंबून राहत नाहीं. तो समाज आपल्यापुढें ध्येय कोणतें ठेवितो, प्रादेशिक समाजाचें किंवा जातिस्वरूपी समाजाचें, यावर त्याची भवितव्यता अवलंबून असते. इंग्रज आणि गोरे अमेरिकन स्वतःला अँग्लोसाक्सन जातीचे म्हणवितात. त्यांजमध्यें नवीनच प्रकारचा रक्ताचा गर्व वाढत आहे; आणि त्यांचें प्रादेशिकसमाजाचें स्वरूप जाऊन त्यांनां जातिसमाजाचें स्वरूप प्राप्त होण्याचीं लक्षणें दिसत आहेत. जातां जातां हें सांगणें उचित होईल कीं, अमेरिकन नीग्रो लोकांनां स्वतःला अँग्लोसाक्सन म्हणवून घेण्याचा जितका हक्क पोहोंचतो, त्यापेक्षां जास्त गोऱ्या अमेरिकन लोकांनां तसें म्हणविण्याचा हक्क बिलकुल पोहोंचत नाहीं.

प्रदेशविशिष्ट सत्तेस मुख्य अडथळा एकमेकांत न मिसळणाऱ्या निरनिराळ्या वंशांतील व जातींतील लोकांचा एखाद्या प्रदेशांत अंतर्भाव होणें हा होय. लोकांचें एकमेकांत मिसळून जाणें त्यांच्यांत असणाऱ्या साम्यावर अवलंबून असतें. तेव्हां ज्या गोष्टींमुळें लोकांत विषमता उत्पन्न होऊन त्यांनां एकमेकांपासून दूर राहण्याची प्रवृत्ति होते त्या गोष्टी प्रदेशनिश्चित समाजास विघातक होत हें उघड आहे.

**समाजांतील भेद.**—सर्व मनुष्यजातीची उत्पत्ति एकाच मूळापासून झालेली आहे असें प्रतिपादन करणाऱ्या तत्त्ववेत्त्यांस हे एकाच ठिकाणाहून उत्पन्न झालेले निरनिराळे लोक आतां एकमेकांत मिसळून जाण्यास नाखुष असतात या गोष्टीचें आश्चर्य वाटतें. परंतु वास्तविक यांत आश्चर्य करण्यासारखें कांहींच नाहीं. कोणतेहि लोक घेतले तरी ते आपल्या शेजारच्या लोकांहून फारसे भिन्न नसतात. आपण जर ऑस्ट्रेलियापासून आरंभ करून उत्तरेच्या बाजूनें हिंदी महासागरांतील निरनिराळ्या बेटांतील लोकांचें निरीक्षण करीत करीत सयाम, चीन, जपान, कामश्चाटका इत्यादि ठिकाणीं गेलों व तेथून अमेरिकेकडे वळलों, किंवा सिलोनपासून आरंभ करून उत्तरेकडे काश्मीरपर्यंत जाऊन नंतर यूरोपकडे गेलों तर आपणांस असें आढळून येईल कीं, कोणत्या विशिष्ट रेषेपासून एका जातीचे लोक संपून दुसऱ्या जातीचे लागले हें सांगणें फार कठिण आहे. आपणांला लोकांच्या पोषाखांत, चालीरीतींत व वागणुकींत अंतराप्रमाणें हळूहळू फरक होत गेलेला सर्वत्र दिसेल. कोणत्याहि एका ठिकाणचे लोक त्यांच्या अलीकडच्या लोकांसारखेच जवळजवळ दिसतील व त्यांच्या पलीकडील लोक जवळजवळ त्यांच्या सारखे दिसतील. मात्र आपण दोन टोंकांकडील लोकांची तुलना केली तर आपणांस पुष्कळ फरक आढळून येईल. समतेचें तत्त्व बोलत असणाऱ्या अमेरिकन लोकांमध्येंहि उच्चनीचभावनात्मक जातिसमुच्चयांमध्यें सोपानपरंपरा तयार झाली आहे. मात्र ही परंपरा लावण्यामध्यें व निरनिराळ्या जातींचा समाजांतील दर्जा ठरविण्याच्या कामीं त्या जातीच्या मूलस्थानाचें अतलांतिक महासागरापासूनचें अंतर लक्षांत घेतलें जातें. जातिपरंपरा उत्पन्न होण्याचें कारण शोधण्यास आपणांस फार दूर जावयास नको. प्रगतीच्या प्रथमावस्थेंत मनुष्यांचें स्थलांतर फार सावकाश होत असे व त्यामुळें त्यांच्यामध्यें फरकहि फार थोडा पडत असे, परंतु हा फरक जरी जवळजवळच्या लोकांत फारसा नसला तरी बऱ्याच अंतरावर राहणाऱ्या लोकांत फार वाढला आहे. जर मनुष्यें एकत्र होण्याचा क्रम सारखा चालला असता व एका जातीचे लोक शेजारच्या व फारसा फरक नसलेल्या लोकांशीं संघट्टनानें मिसळून जाऊन त्यांच्यामध्यें एक प्रकारचें शारीरिक व सांस्कृतिक ऐक्य उत्पन्न झालें असतें तर सध्यां दिसतात इतके जातिभेद व वंशभेद राहिले नसते. याप्रमाणें अमेरिकेंत जो जातिभेद दिसतो त्याचें कारण एकमेकांपासून फार भिन्न अशा निरनिराळ्या प्रदेशांतील जाती तेथें एकत्र झाल्या आहेत हें होय. या जातींचें एकत्र येणें हें आकस्मिक कारणांनीं झालेलें आहे. त्याची पूर्वतयारी मुळींच झालेली नव्हती.

जगाचा बराचसा भाग कांहीं थोड्या यूरोपांतील राष्ट्रांनीं व्यापिला आहे. त्यामुळें कांहीं उच्च संस्कृतींतील लोकांचा कांहीं कनिष्ठ दर्जाच्या संस्कृतींतील लोकांशीं व कांहीं सर्वतः भिन्न संस्कृतींतील लोकांशीं संबंध आला आहे. ज्या वेळीं चिनी व जपानी लोकांनीं परदेशगमनास सुरुवात केली त्या वेळीं त्यांचा त्यांच्यापासून अनेक रीतींनीं भिन्न अशा गोऱ्या लोकांशीं संबंध आला. याप्रमाणें या एकत्र येणाऱ्या लोकांमध्यें इतके भेद आहेत कीं त्यांचें सर्वथा एकीकरण होणें अशक्य आहे.

अनेक जातींच्या लोकांच्या संघट्टनाची क्रिया चालू असतांना या लोकांच्या कल्पनांत, योग्यायोग्यतेंत व त्यांच्या सामाजिक संस्थांत बदल होत असतो.

मनुष्य दिवसेंदिवस अधिकाधिक स्वतंत्र विचाराचा होऊं लागला आहे. सर्व लोकांच्या आचारांत आणि विचारांत साम्य असावें अशी आतां फारसे लोक अपेक्षा करीत नाहींत. रानटी लोक व हिंदू (या दोहोंमध्यें सध्यां फारसा फरक नाहीं !) अतिशय क्षुल्लक भेद असलेल्या लोकांशींहि लग्नव्यवहार करण्याचें नाकारतात. सध्यांचे यूरोपीय लग्नव्यवहाराच्या बाबतींत परकीयांत व त्यांच्यांत शारीरिक व सांस्कृतिक फरक पुष्कळच असेल तरच मिश्रविवाहास प्रतिकूल असतात.

कालमानानें व संस्कृतीच्या प्रगतीबरोबर मनुष्याची एकमेकांत मिसळून जाण्याची शक्तीहि वाढत चालली आहे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील लोकांइतकी परस्पर-संमिश्रणाची शक्ति दुसऱ्या कोणत्याहि लोकांनीं दाखविलेली नाहीं. अमेरिकेंतील लोकांनीं परकीय लोकांस अमेरिकन बनविण्याच्या बाबतींत इतकें यश संपादन केलें आहे कीं, यासंबंधींच्या वर्णनावर प्रत्यक्ष तेथें जाऊन पाहून आलेल्या मनुष्याशिवाय इतराचा विश्वास बसणें शक्य नाहीं. अमेरिकन लोकांचा परकीयांस आपल्यासारखें बनविण्याच्या स्वतःच्या शक्तीवर इतका विश्वास आहे कीं, ते अमेरिकेंत पांच किंवा अधिक वर्षे राहिलेल्या परकीयांस आपल्या राज्याच्या कारभारामध्यें आणि संस्थांच्या कारभारामध्यें भाग घेऊं देतात. ही त्यांची मुक्तद्वारपद्धति त्यांच्या सात्मीकरणाच्या शक्तींत भर टाकते.

**सात्मीकरण.**—सात्मीकरण म्हणजे परकीय लोकांस आपणांसारखे करणें आणि स्वकीयांचीं मनें परकीय लोकांचा स्वसमाजांत स्वीकार करण्यास तयार करणें. या गोष्टीला दोन्हीहि बाजूंकडून तयारी करावी लागते. या गोष्टीचें स्वकीय व परकीय या दोघांसहि शिक्षण द्यावें लागतें. जर परकीय लोक देश्य लोकांसारखे सहज बनण्यासारखे असतील तर देश्य लोकांत त्यांच्या संबंधानें परकीयभाव बराचसा कमी राहील. उलट पक्षीं, सत्ताधारी देश्य समाज आपलें सभासदत्व व तत्संबंधीं सामाजिक आणि राजकीय हक्क परकीयांस देण्यास तयार असेल तर परकीय मनुष्यांस देश्य लोकांची राहणी व त्यांचे आचारविचार यांचा स्वीकार करण्याची जास्त प्रवृत्ति होते. सात्मीकरणाची शक्ति जितकी वाढत जाते तितका देश्य व परकीय यांजमधील विरोध कमी होत जातो.

परदेशगमन जर विशेष सुलभ होत जाईल तर या प्रदेश-विशिष्ट समाजपद्धतीचा शेवटीं एक परिणाम हा होईल कीं, मनुष्याची प्रवृत्ति अधिकाधिक व्यक्तिहितवादी होत जाईल; तो कोणत्याहि देशांत जन्मला असला तरी जन्मभूमिविषयक विचार बाजूस ठेवून आपण कोणत्या समाजाचें घटक व्हावें हें ठरविणें त्याला शक्य होईल; तो ज्या प्रदेशांत राहत असेल त्या प्रदेशांतील समाजाशीं त्याला एकरूप होतां येईल. त्याचप्रमाणें सर्व जगांतील मनुष्यांमध्यें एक प्रकारचें साम्य उत्पन्न होईल आणि त्यामुळें एका समाजांत जन्मलेल्या मनुष्यास जगांतील दुसऱ्या कोणत्याहि समाजांतील संस्कृतीचा स्वीकार करणें सुलभ होईल. लोकांतील शारीरिक फरकहि कमी होत जातील अगर त्यांचें महत्त्व तरी कमी होत जाईल. तसेंच निर-निराळ्या राष्ट्रांतील, संप्रदायांतील अथवा वंशांतील लोकांमध्यें परस्परविवाह होऊं लागतील आणि त्यामुळें जगांतील निरनिराळ्या लोकांचे सामाजिक संबंध बरेचसे कमी गुंतागुंतीचे होतील.

**हिंदुसमाजाचें रूपांतर.**—हिंदुस्थानांतील जातिविशिष्ट समुच्चयांनां प्रदेशविशिष्ट समुच्चयांचें रूप कसें देतां येईल या गोष्टीचा विचार करतांना असें दिसतें कीं, या बाबतींत ब्रिटिश सरकारनें बरेंचसें कार्य आधींच करून ठेविलें आहे. हिंदुस्थानांतील हायकोर्टांची सत्ता कांहीं विशिष्ट प्रदेशांवर चालते. त्या प्रदेशांतील लोकांवर हीं हायकोर्टें हिंदुधर्मशास्त्रांतील कांहीं नियमांचा जातगोत वगैरे न पाहतां सारखाच अंमल करतात. परंतु तीं विशिष्ट जातींतील कांहीं सामाजिक चालींस मान देऊन त्यांचाहि अंमल करतात. याप्रमाणें ब्रिटिश कोर्टांनीं कांहीं कार्य केलें आहे. तरी पण बरेंचसें अद्यापि व्हावयाचें आहे. असें असण्याचें कारण प्रादेशिक समाजाची ग्राह्यता पूर्णपणें मान्य झालेली नाहीं हें होय.

हिंदुस्थानांतील जातिविशिष्ट समाजांचें प्रदेशविशिष्ट समाजांत रूपांतर करावयाचें तर हिंदुस्थानाचे राजकीय विभाग प्रत्येक विभागांत वस्तीचा मोठा अंश सामान्यतः एकाच जातीच्या लोकांचा येईल या धोरणानें पाडले पाहिजेत. सध्यांचे हिंदुस्थानाचे विभाग केवळ ऐतिहासिक यदृच्छात्मक गोष्टींस अनुसरून पाडल्यामुळें वेडगळ झालेले आहेत. भाषेनुसार हिंदुस्थानचे विभाग पडावे ही कल्पना इष्ट रूपांतराच्या दृष्टीनें सर्वांत उपयुक्त आहे. आतां अशा विभागणीमध्यें कांहीं थोड्या जाती निरनिराळ्या प्रांतांत समाविष्ट होतील हें खरें आहे, तथापि या गोष्टीस इलाज नाहीं. अशा तऱ्हेचे हिंदुस्थानचे विभाग पडले आणि हिंदुस्थानास पूर्ण स्वराज्य मिळालें म्हणजे हिंदू लोक सामाजिक बाबतींतहि बरेचसे कायदे तयार करतील. सध्यां अशा कायद्यांचा अगदींच अभाव आहे. हिंदु समाजाची व हिंदु कायद्याची वाढ सध्यां मनुष्यांच्या गरजांप्रमाणें नवीन कायदे होत नसल्यानें खुंटली आहे. भाषावार प्रांत झाल्यावर कायदे करण्याच्या बाबतींत हल्लींपेक्षां लोकांच्या म्हणण्याकडे जास्त लक्ष दिलें जाईल. तेव्हां नवीन तयार होणारे सामाजिक कायदे प्रांतांतील सर्व लोकांस सारखेच लागू होतील आणि यामुळें लोकांमध्यें अधिक साम्य उत्पन्न होईल. सध्यां निरनिराळे समाज आपल्या जातिविशिष्ट कायद्यांप्रमाणें चालतात. परंतु पुढें त्यांनां प्रदेशविशिष्ट कायदे अनुसरावे लागतील.

ब्रिटिश सरकार स्वतःच भाषेनुसार राजकीय विभाग पाडण्याचें काम हातीं घेईल असें दिसत नाहीं, परंतु योग्य चळवळ करून त्यांस हें काम हातीं घेण्यास भाग पाडलें पाहिजे. या नवीन व्यवस्थेमुळें प्रत्येक प्रांतांत संख्येनें अधिक असलेली जात आपल्या कल्पना चालीरीती व संस्था तेथील दुसऱ्या अल्पसंख्याक व परकीय जातींवर लादण्याचा प्रयत्न करील यांत शंका नाहीं. परंतु असें होईल म्हणून भाषावार देशाचे विभाग पाडणें गैर आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण असे प्रकार सर्वच देशांत चालू असतात. राष्ट्रीकरणामधील ही एक आवश्यक क्रियाच आहे. सत्ताधारी समूहानें समाजांत ऐक्य उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. यूरोपमधील देशांत जे राष्ट्रीकरणाचे प्रयत्न झाले त्यांच्या पाठीमागें अन्यसांप्रदायिक लोकांचा छल, परकीय पोषाखावर निर्बंध, परकीय भाषा व चालीरीती यांच्या विरुद्ध कायद्यांचें नियमन इत्यादि गोष्टी होत्या हें आपणांस विसरतां कामा नये. यासंबंधीं आणखी विचार पुढें यावयाचा आहे.

देशामध्यें निरनिराळ्या प्रांतांत कांहीं स्थानिक वैशिष्ट्य उत्पन्न होण्याचा संभव आहे, परंतु हें वैशिष्ट्य निरनिराळ्या जातींतील वैशिष्ट्यापेक्षां पुष्कळ बरें. कारण जातींतील वैशिष्ट्यामुळें निरनिराळ्या लोकांत कायमचे भेद उत्पन्न होतात. हिंदी राष्ट्र तयार करण्याच्या कल्पनेमुळेंहि हिंदुस्थानांतील लोकांत एकरूपता होण्याचा बराच संभव आहे. एकीकरणामध्यें साहाय्यभूत होणारी आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे सर्व प्रदेशांत मान्य होईल असा एक उच्च वर्ग तयार करणें ही होय. अशा तऱ्हेचा समाजांतील उच्च वर्ग समाजामध्यें कितीहि भिन्न प्रकारचे वर्ग असले तरी राष्ट्रीकरणाच्या कामांत बरेंच साहाय्य करतो आणि त्याच्या अस्तित्वामुळें जातिभेद कमी होण्याची शक्यता असते.

हा उच्च वर्ग उत्पन्न होण्याची क्रिया कशी होईल यासंबंधानें आज भविष्य करणें फार धोक्याचें आहे, तथापि क्रियांचें स्वरूप समजण्यासाठीं सोदाहरण विवेचन म्हणून भविष्यकालांत प्रवेश करण्यास हरकत नाहीं; आणि त्याप्रमाणें आपण पुढें प्रवेश करूं.

पारमार्थिक संप्रदायसंस्था हिंदुस्थानाचें एकराष्ट्रीयत्व स्थापित करण्यास असमर्थ ठरली तथापि लहान समुदायांचे मोठे समुदाय करणें आणि अत्यंत अप्रगत अशा लोकांस सर्व समाजांत ओढण्यास थोडीशी मदत करणें यासारखें उपयुक्त कार्य संप्रदायसंस्थेनें केलेलेंच आहे. तथापि हें विसरतां कामा नये कीं संप्रदाय व राष्ट्र या दोन संस्थांचा हेतु भिन्न आहे व त्यामुळें या दोन संस्था एकमेकींस थोड्या फार विरोधीच आहेत.

**संप्रदायांची आवश्यकता.**—यापुढें राष्ट्रीकरणाचा विकास होऊन संप्रदाय नष्ट होणार. प्रस्तुत भविष्यात्मक विधान जेव्हां आम्ही करतों तेव्हां समाजाला संप्रदायांची आवश्यकता आहे काय असा एक प्रश्न विचारण्यांत येतो; या प्रश्नाला स्पष्टपणें उत्तर द्यावयाचें म्हणजे नकारार्थी देतां येईल. परंतु या उत्तरामुळें गैरसमज होऊं नये म्हणून कांहीं स्पष्टीकरण दिलें पाहिजे.

संप्रदायांनीं आजपर्यंत जीं नैतिक तत्त्वें उपदेशिलीं त्यांनीं आपलें काम केलेलें आहे. त्यांनीं जगांतील नैतिक विचाराचा पाया घातला आहे. या बाबतींत त्यांनीं केलेलें कार्य कायम राहील आणि त्याचा समाजाला मार्ग दाखविण्याच्या कामीं उपयोग होत राहील. स्वर्ग, नरक, निर्वाण, यांसारख्या कल्पनाहि कायम राहतील आणि त्यांचा सामान्य लोकांस थोडासा उपयोगहि होईल. सर्व लोकांमध्यें सामान्य असणाऱ्या कांहीं अद्भुत कल्पनाहि कायम राहतील व त्यांचाहि उपयोग आहे. समाजाला अनवश्यक असा जो भाग आहे तो एखाद्या विशिष्ट ग्रंथांतील कल्पनांवर श्रद्धा ठेवून आपलें पृथक् सामाजिक अस्तित्व ठेवणें हा होय. हा भाग म्हणजेच संप्रदायघटना व म्हणूनच संप्रदायाच्या म्हणजे घटनेच्या नाशानें समाजाचें यापुढें नुकसान होणार नाहीं असें आम्ही म्हणतों.

हिंदुसमाज हा अनेक जाती एकत्र मिळून झालेला व परंपरागत विचारांनीं चालत आलेला समाज होय. यामध्यें आणि ख्रिस्ती व महंमदी यांसारख्या शास्त्रग्रंथप्रधान समाजांमध्यें बराच फरक आहे. ब्रिटिश राज्यघटना म्हणून जिला म्हणतात त्या परंपरागत राज्यपद्धतीमध्यें आणि संयुक्त संस्थानांच्या पूर्वलिखितानें चालणाऱ्या घटनेमध्यें जितकें अंतर आहे तितकेंच वरील दोन प्रकारच्या समाजांमध्यें आहे. परंपरागत कल्पनांप्रमाणें चालणाऱ्या समाजामध्यें एक पिढी पूर्वीपासून चालत आलेल्या चालीरीतींचा व कल्पनांचा स्वीकार करून त्यांमध्यें आपल्या सोयीनें कांहीं फेरफार करिते व या बदललेल्या स्वरूपांत ती त्या कल्पना व चालीरीती पुढच्या पिढीस देते. निरनिराळ्या जाती एकत्र येऊन एका ठिकाणीं मिसळतात, आपल्या परंपरागत समजुतींची देवघेव करितात आणि याप्रमाणें एक सामान्य अशी परंपरा उत्पन्न करितात.

एखाद्या संप्रदायामध्यें, उपासकसंघामध्यें, गुप्तमंडळामध्यें, किंवा पवित्र द्विजवर्गामध्यें समावेश होण्याकरितां कांहीं संस्कार करावे लागत असतील, परंतु कोणत्याहि व्यक्तीला अगर संघाला परंपरेमध्यें समावेश करून घेण्यास कोणताहि संस्कार करावा लागत नाहीं. परकीय परंपरेचा स्वीकार करण्याची क्रिया फार सावकाश किंवा नकळत चालू असते. कनिष्ठ संस्कृतीच्या जातींनीं हिंदु संस्कृतीचा स्वीकार अशाच तऱ्हेनें केला आहे. जेव्हां ब्राह्मण आणि ब्राह्मणानुयायी हिंदू आपल्या परंपरेचा प्रसार करीत होते तेव्हां ते आपल्या-

पेक्षां संस्कृतीनें कनिष्ठ असलेल्या जातींच्या कल्पनांचा आणि संस्कृतींचा स्वीकारहि करीत होते.

**हिंदुधर्मांचें कार्य.**—हिंदुधर्मांच्या बाबतींत यापुढें करावयाचें कार्य म्हणजे सर्व जगास सामान्य अशी एक परंपरा अगर मानवधर्म निर्माण करावयाचा, हें होय. हें कार्य आपण यापूर्वी एकदां हातीं घेतलें होतें पण तें अपूर्ण राहिलें. पश्चिम एशिया आणि यूरोप या देशांमध्यें जी संस्कृतीची वाढ झाली तींत आणि हिंदुस्थान व पूर्वेकडील देश यांमध्यें जी वाढ झाली तींत बराच फरक आहे. एका काळीं हिंदु संस्कृति सर्व जगावर पसरण्याच्या बेतांत होती, आणि ती सर्व जगामध्यें सांस्कृतिक ऐक्य उत्पन्न करणार होती. परंतु या कार्यांत तिला मानवांमध्यें भेद वाढविणाऱ्या महंमदी व ख्रिस्ती या संप्रदायांच्या उत्पत्तीमुळें अडथळा आला. ख्रिस्ती व मुसुलमान या दोन सेमिटिक संप्रदायांनीं आपआपसांत तीव्र भेद उत्पन्न केला आणि सर्व जगापासून आपणां दोघांस निराळे समजून मनुष्यांची एकदिल होण्याची क्रिया अधिक कष्टसाध्य करून ठेविली. जेव्हां यूरोपीय लोकांनीं हिंदुस्थानामध्यें देश्य संस्कृतीच्या विकासाचें कार्य पाहिलें तेव्हां त्याला त्यांनीं 'हिंदुइझम' असें नांव दिलें; व तो एक पारमार्थिक संप्रदायच आहे अशी आपली चुकीची समजूत करून घेतली.

सर्व हिंदुस्थानास आणि पाश्चात्त्य जगास एकच सामान्य परंपरा निर्माण होण्याच्या कार्यास सुरवात झाली आहे. या कार्याचे परिणाम हिंदुस्थानच्या बाबतींत पुढें दिल्याप्रमाणें सांगतां येतील. १. दिवसेंदिवस सोंवळयाओंवळ्याच्या कल्पना कमी होत चालल्याच आहेत. २. पूर्वीच्या समजुती व कल्पना यांच्या सत्यावद्दल संशय येऊं लागला आहे, आणि आधुनिक शास्त्रांच्या साहाय्यानें त्या कल्पनांतील सत्य हुडकून काढण्याचा प्रयत्न चालला आहे. ३. नवीन नवीन कल्पनांमुळें आणि सांपत्तिक परिस्थितीमुळें हिंदु लोकांच्या कुटुंबव्यवस्थेमध्यें फरक होत आहेत. बहुभार्यत्वाची चाल नाहींशी होत आहे. ४. पोषाख, राहणी आणि खाणेंपिणें या बाबतींत हिंदूंमध्यें बराच फरक होत चालला आहे. ५. नास्तिकवाद, निरीश्वरवाद आणि भौतिकवाद यांचा प्रसार होत आहे. ६. ज्याच्या योगानें हिंदू लोक जगांतील दुसऱ्या सर्व लोकांस रानटी आणि अपवित्र समजत असत तो जात्यभिमान बराचसा कमी झाला आहे. निदान त्याला बराचसा धक्का बसला आहे. बरेचसे लोक यूरोपीयांचें भय बाळगून त्यांचा द्वेषहि करूं लागले आहेत. यूरोपीयांच्या शास्त्रीय ज्ञानावद्दल आदर वाढत आहे. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या चळवळीमुळें ख्रिस्ती संप्रदायावद्दल द्वेषहि वाढत आहे. ७. इतिहासपुराणांतील बऱ्याच कथा केवळ कल्पना म्हणून वाटूं लागल्या आहेत. प्राचीन हिंदू शास्त्रांचा आणि तत्त्वज्ञानाचा आतां निराळ्या तऱ्हेनें अभ्यास सुरू झाला आहे. जगांत एकच सत्य असतें म्हणजे दोन परस्परविरुद्ध गोष्टी सत्य असूं शकत नाहींत या तत्त्वास अनुसरून शास्त्रांच्या दोन विरुद्ध दिशांनीं झालेल्या प्रगतीची संगति लावण्याचा प्रयत्न चालू आहे. ज्ञानकोश हें त्यांतीलच एक कार्य होय.

याप्रमाणें जगाला सामान्य अशी परंपरा उत्पन्न करण्याचें काम हल्लीं हिंदू लोकांच्या विचारांमध्यें जो अलीकडे फरक झाला आहे त्यामुळें आणि हिंदुस्थानानेंच दोन हजार अथवा त्याहूनहि अधिक वर्षांपूर्वी जी दिशा घालून दिली त्या दिशेनें जी हल्लीं यूरोपीय विचाराची वाढ होत आहे तीमुळें बरेंच सोपें झालें आहे.

यूरोपीयांच्या दैवतकल्पना आणि तत्त्वज्ञान याकडे काळजीपूर्वक रीतीनें पाहणाऱ्या हिंदूस असें वाटतें कीं, हे पाश्चात्त्य लोक दैवतविषयक कल्पनांच्या मुग्धभावांतून नुकतेच कोठें बाहेर येऊं लागले आहेत. हिंदूंनीं फार प्राचीनकालापासून प्रदर्शित केलेले दैवतविषयक उच्च विचार पाश्चात्त्य अभ्यासकांस आतां फार आवडूं लागले आहेत; परंतु सामान्यतः यूरोपीयांमध्यें स्वतःच्या परमार्थपर कल्पनांवद्दल असलेला फाजील आदर आणि उच्च तत्त्वज्ञान समजून घेण्यास आवश्यक अशा बौद्धिक पूर्व तयारीचा असलेला अभाव यांमुळें इकडील विचारांतील मर्म त्यांस कळणें शक्य नाहीं. आजकालहि ज्या यूरोपीय तत्त्ववेत्त्यांचे विचार त्यांच्या बौद्धिक प्रगतीमुळें हिंदू विचारांच्याच वळणावर येऊं लागले आहेत त्यांचा श्रद्धाळू यूरोपीयांकडून गौरव होत नाहीं. यूरोपीय तत्त्ववेत्त्यांस आतां असें कळूं लागलें आहे कीं, हिंदूंमधील ज्या गोष्टींची ते मूर्तिपूजकांचा खुळेपणा म्हणून चेष्टा करीत असत तसलेच प्रकार ख्रिस्ती संप्रदायांतहि आहेत. त्यांनां आतां हेंहि वाटूं लागलें आहे कीं, ईश्वरानें बाकीच्या सर्व जाती वगळून एखाद्या विशिष्ट जातीलाच आपला साक्षात्कार दाखविला असें म्हणणें म्हणजे हट्ट होईल.

बायबलमधील देवविषयक कल्पना विशेषतः सैतानवाद मागें पडत चालला आहे. ईश्वरावद्दलच्या कल्पना जास्त विस्तृत होत चालल्या आहेत. ईश्वरासंबंधीं व्यक्तिविषयक कल्पना आतां नष्ट होत चालल्या आहेत. 'सोल' अथवा आत्मा म्हणून एक चीज इतर प्राण्यांत नसून मनुष्यप्राण्यांतच आहे ही कल्पनाहि आतां जुन्या काळची समजली जाते.

हिंदु तत्त्वज्ञानांतील कांहीं कल्पना पश्चिमेकडे प्रसृत झाल्या आहेत. बौद्ध संप्रदाय व बौद्ध तत्त्वज्ञानाचा प्रसार यूरोप व अमेरिकेमध्यें होत आहे. वेदांत तत्त्वज्ञानाचे अनुयायीहि पाश्चात्त्य देशांत आढळतात. हिंदूंचे पवित्र ग्रंथ आणि त्यांचे धर्मोपदेशक यांनां पाश्चात्त्य देशांत बराच मान मिळत आहे.

संस्कृत भाषेच्या ज्ञानानें आणि मनोरचना व भाषा यांमध्यें असलेल्या नात्यावरून पाश्चात्त्य लोकांस त्यांच्याप्रमाणेंच हिंदू हे कॉकेशियन वंशांतील आहेत ही गोष्ट समजूं लागली आहे व हिंदुस्थानासंबंधीं त्यांच्या कर्तव्याची त्यांनां जाणीव होऊं लागली आहे.

हिंदु संस्कृतीचा परिणाम पाश्चात्त्य संस्कृतीवर झाला आहे त्यापेक्षां पाश्चात्त्य संस्कृतीचा परिणाम हिंदुसंस्कृतीवर अधिक झाला आहे. याचें कारण शोधावयास फार दूर जावयास नको. प्रथमतः, यूरोपीयांनीं आपलें राजकीय वर्चस्व सर्व जगावर प्रस्थापित केलें आहे. सत्ताधिष्ठित जातीच्या कल्पना खऱ्याखोट्या कशाहि असल्या आणि त्यांच्या चालीरीती हितकर अथवा अहितकर असल्या तरी दुसऱ्या जातीवर त्या परिणाम करितात. दुसरें, हिंदुस्थान देश परतंत्र असल्यामुळें त्याला स्वतंत्र असें राजकीय अस्तित्वच नाहीं. त्यामुळें सार्वराष्ट्रीय धर्मशास्त्र व राजकीय नीति ठरविण्याच्या कामांत त्याला बोलतांच येत नाहीं. याशिवाय, भौतिक शास्त्रांमध्यें यूरोपीयांनीं फारच आघाडी मारली आहे. तेव्हां यूरोपियन संस्कृतीनें घेण्यासारख्या गोष्टींपेक्षां तिच्याकडून हिंदुसंस्कृतीस मिळावयाच्याच गोष्टी अधिक आहेत. हिंदुस्थानानें भौतिक शास्त्रांत स्वतंत्रपणें भर घालण्याचे दिवस अद्यापि यावयाचे आहेत. या गोष्टीस आतां आरंभ झाला आहे, हें मात्र नाकबूल करतां यावयाचें नाहीं.

**संस्कृतींचें ऐक्य.**—जेव्हां आम्ही सर्व जगांतील संस्कृतीच्या ऐक्याची कल्पना करतों तेव्हां सर्व जग अगदीं एकसारखेंच होईल असें आमचें म्हणणें नसतें. कारण तसें होणें अगदींच अशक्य आहे. कारण निरनिराळ्या देशांतील नैसर्गिक परिस्थितीच पुष्कळ भिन्न असते. तथापि निरनिराळ्या संस्कृतींच्या सन्निकर्षामुळें एक तऱ्हेची सामान्य संस्कृति उत्पन्न होणें शक्य आहे. निरनिराळ्या ठिकाणच्या व राष्ट्रांच्या संस्कृतींची वाढ होत असतांना जी एका संस्कृतींत उणीव असेल ती दुसऱ्या संस्कृतींतून भरून निघण्याचा संभव आहे. पूर्ण कार्यक्षम पद्धति आणि कला यांच्या पुढें अर्धवट कार्यक्षम पद्धतींचा आणि कलांचा टिकाव लागणार नाहीं.

संस्कृतीचें एक अंग असें आहे कीं, त्यामध्यें इतरांपेक्षां लवकर ऐक्य होण्याचा संभव आहे आणि त्याचा परिणामहि इतर अंगांवर होण्यासारखा आहे. हें अंग म्हटलें म्हणजे जगांतील ज्ञान आणि विचार हें होय. या बाबतींतील मुख्य तत्त्व म्हणजे सत्यें परस्परविरुद्ध असूं शकत नाहींत हें होय. या एकीकरणाच्या बाबतींत बरीचशी प्रगति आजच झाली आहे. पाश्चात्त्य देशांत वाढलेलीं बरींचशीं शास्त्रें पौरस्त्य देशांनीं उचललेलीं आहेत. यूरोपियन रसायनशास्त्रापेक्षां निराळें असें पूर्वेकडील रसायनशास्त्र असूं शकणार नाहीं, दोन परस्परविरुद्ध गोष्टी प्रतिपादन करणारीं निरनिराळीं पदार्थविज्ञानशास्त्रें असूं शकणार नाहींत, हें आतां सर्वांस पटलें आहे.

तथापि आजहि निरनिराळ्या लोकांच्या कल्पनांमध्यें आणि समजुतींमध्यें बराच विरोध असतो. हा विरोध बहुधा ज्या गोष्टींत सत्य अज्ञात असतें अशा बाबतींत असतो. या विरोधाचें स्वरूप विशेषतः परमार्थविषयक कल्पनांमध्यें दिसून येतें. सुशिक्षित हिंदूंच्या या बाबतींतील विचाराचा प्रसार केल्यास हा विरोध आणि त्यापासून उत्पन्न होणारा द्वेष बराचसा कमी होईल.

मतें आणि उपास्यें याबद्दल सुशिक्षित हिंदू लोकांच्या कल्पना येणेंप्रमाणें आहेत. ईश्वर ही अनंतत्वाची कल्पना असल्यामुळें त्याचें वास्तविक ज्ञान होणें शक्य नाहीं. एखाद्या आकस्मिक व चमत्कृतिजनक आविष्करणानें या अनंतत्वाचें सामर्थ्य, अद्भुतता वगैरे एखाद्या अंगाच्या रूपानें कांहींसें ज्ञान होतें. एखाद्या मनुष्यानें या शक्तीच्या एकाच दृश्य स्वरूपाचा अभिमान बाळगून बाकीच्या स्वरूपांकडे दुर्लक्ष करणें अयोग्य आहे. तेव्हां उपासनेच्या सर्व प्रकारांनां मुभा असावी. उपासकाची ईश्वराबद्दलची कल्पना जर विस्तृत झालेली असेल तर त्यानें कोणत्याहि देवतेची उपासना केली तरी हरकत नाहीं. एक देवता काढून टाकून तिच्या ठिकाणीं दुसरी देवता स्थापन करण्याचें कारण नाहीं. कारण, ईश्वराबद्दलची अनंतत्वाची आणि केवलत्वाची कल्पना शिव, विष्णु, दुर्गा अथवा बुद्ध यांपैकीं कोणत्याहि नांवांनीं ओळखली गेली तरी हरकत नाहीं. मनुष्य सूर्याची, बृहस्पतीची, शनीची अथवा एखाद्या ऐतिहासिक व्यक्तीची उपासना करतो किंवा एखादा साधु अथवा गंगेसारखी नदी किंवा ज्या एखाद्या वस्तूबद्दल त्याला भीति किंवा आदर वाटेल अशी एखादी वस्तु यांपैकीं कोणाची उपासना करतो या गोष्टीस कांहीं महत्त्व नाहीं. हीं सर्व दैवतें अथवा ईश्वराचीं बाह्य स्वरूपें या फक्त उपासनेमधील आरंभींच्या पायऱ्या आहेत. मनुष्याच्या मनाची जोंपर्यंत उच्च कल्पनांचा स्वीकार करण्याइतकी तयारी झाली नाहीं तोंपर्यंत त्याचा सगुण दैवतावरील विश्वास उडविणें मूर्खपणाचें होईल. ईश्वर सर्वत्र असून एकच आहे हीच कल्पना ईश्वराच्या बाबतींत नेहमीं टिकाव धरून राहूं शकेल. परंतु ही कल्पना मनांत ठसणें फार कठिण आहे. कारण ही कल्पना समजून घ्यावयाची म्हणजे मनुष्याला फार कठिण आणि गूढ असे नियम, अत्यंत दुर्बोध तत्त्वें आणि अतिशय अमूर्त कल्पना व त्यांचें एकीकरण यांचें ज्ञान व्हावें लागतें. या तऱ्हेच्या अद्वैताची कल्पना पूर्ण बाणली म्हणजे मनुष्याचा पापपुण्याबद्दलच्या कल्पनांवरील विश्वास नाहींसा होईल आणि अशा वेळीं जर त्याच्या मनाची चांगली तयारी झाली नसेल तर त्या मनुष्याचें व त्याच्या समाजाचें अहित होईल.

दिवसेंदिवस जगाची प्रवृत्ति अशी दिसते कीं, समाजघटनेच्या बाबतींत मत अथवा उपास्य याला कमी महत्त्व द्यावयाचें. पुढें मागें सर्व जगाचा एक समाज होईल. मनुष्यांच्या नैतिक कल्पना एकसारख्या होत जातील. बऱ्याचशा चालीरीती सारख्याच होतील. जगांतील बुद्धिमान् लोकांकडून हिंदुस्थान, अरबस्थान व जूडिया या देशांत होऊन गेलेल्या महात्म्यांस कमी अधिक प्रमाणानें सर्वत्र मान मिळत जाईल. परलोक आणि अगम्य वस्तूंबद्दलच्या कल्पना हीं केवळ मतें म्हणून समजलीं जातील. त्यांनां तत्त्वें म्हणून सर्वांनीं मान्य केलींच पाहिजेत असें कोणी प्रतिपादणार नाहीं. या मतांच्या बाबतींत हिंदुस्थानांत जें

स्वातंत्र्य आजपर्यंत चालत आलें आहे तें पुढें सर्वांनांच राहील. निरनिराळ्या देशांतील धार्मिक चालीरीती तशाच चालू राहतील, पण त्या केवळ पूर्वीपासून चालत आलेल्या आणि परंपरागत म्हणून मौजेकरितां राहतील. अशा रीतीनें ज्याकरितां हिंदुसमाजाची स्थापना झाली ती क्रिया हळूहळू पूर्ण होईल.

पूर्वोक्त विवेचन सूत्ररूपानें थोडक्यांत मांडून इतिकर्तव्यतेचा प्रथम शब्द बोलला पाहिजे. या दोन्ही क्रिया खालील सूत्रांत केल्या आहेत.

(१) हिंदुसमाजाला राष्ट्ररूपास जाण्याइतकें आत्मविकासाचें सामर्थ्य आहे.

(२) पाश्चात्त्य संस्कृति व हिंदु संस्कृति यांचें स्वरूपैक्य होत आहे. जागतिक संस्कृति स्थापन होऊन हिंदुस्थान हा तिचा एक भाग होईल.

(३) हिंदु समाजाला हें जें जागतिक समाजामध्यें स्थान मिळणार आहे तें त्यास अगोदर आपलें राष्ट्रीकरण करूनच मिळवावें लागेल.

(४) अशा तऱ्हेचें राष्ट्रीकरण करावयाचें म्हणजे हिंदुत्वाचें रूपांतर राष्ट्रीयत्वामध्यें करण्याचा प्रयत्न करणें होय.

(५) हें राष्ट्रीकरण हिंदुसमाजाचें व हिंदुसंस्कृतीचें सामर्थ्य वाढविलें असतां घडवून आणणें जास्त सोपें जाईल.

(६) एखाद्या भारतीयानें आपण हिंदु समाजाचें नागरिक असावें अगर नसावें हें ठरवितांना सर्व जगाचें सांस्कृतिक ऐक्य हिंदुसमाजाचें सामर्थ्य वाढविलें असतांनाच घडवून आणणें शक्य आहे ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे.

---

## प्रकरण १९ वें.

## इतिकर्तव्यता.

### उपप्रकरण १ लें.

### राष्ट्रधर्मसंस्थापना.

जगद्विकासाची दिशा समजून घेतल्यानंतर भारतीय समाजासंबंधानें आपणांस व्यवहारनीति ठरवावी लागते. पुढें मागें सर्व जग मिळून एक समाज होणार, त्याची ज्ञानपरंपरा एकच होणार म्हणजे जगांतील सर्व समाजांना जवळजवळ एकतऱ्हेचें स्वरूप येणार हें आपण ठरविलें. आपणांस आतां हें पाहिलें पाहिजे कीं, आपण जगाच्या बरोबर सहकार्य करण्यास कसे समर्थ होऊं? आपले व सर्व जगाचे व्यवहार यांची जुळणी कशी करून घ्यावयाची? हे प्रश्न सोडविण्यासाठीं आपणांस अनेक बाबतींत कार्य करावयाचें आहे.

आपल्यापुढें सर्वांत महत्त्वाचा प्रश्न म्हटला म्हणजे सामाजिक होय. आपणांस जगाच्या इतर लोकांशीं जगाचा एक अवयव या नात्यानें सहकार्य करावयाचें म्हणजे वाटेल तो मनुष्य वाटेल त्या देशांत गेला तरी त्या देशाचें आणि त्या देशाच्या जनतेचें नागरिकत्व मिळण्याची संधि त्यास मिळाली पाहिजे अशी स्थिति उत्पन्न करावयाची. आपले लोक इतर देशांत गेले तर त्या लोकांस जगानें समतेनें वागवावें यासाठीं आपण धडपडतों, चळवळी करतों, तर परकीय लोकांस आपल्या समाजाचें सदस्यत्व देण्यास आपण काय खटपट केली आहे याचा विचार आपणांस पाहिजे. आपणांस आपल्या संस्कृतीस जितकी अधिकाधिक एकरूपता आणतां येईल म्हणजे आपणांस जितके राष्ट्रीय आचार उत्पन्न करतां येतील तितकें परकीयांस भारतीयत्व ग्रहण करणें सोपें जाईल.

भारतीयांस जगांतील इतर राष्ट्रांप्रमाणें एकराष्ट्र ही पदवी उत्पन्न करून घेण्यास जें काय केलें पाहिजे तें येणेंप्रमाणें.

( १ ) देशांतील समाजास एकरूपता यावी म्हणून राष्ट्रधर्म संवृद्ध केला पाहिजे.

( २ ) देशांतील लोकांचें राजकीय बल वाढविलें पाहिजे.

( ३ ) देशांतील निरनिराळ्या संस्कृतींस एकरूपता यावी म्हणून त्या संस्कृतींत राहणाऱ्या जातींस आणि राष्ट्रांस राष्ट्रधर्माचें शिक्षण दिलें पाहिजे.

( ४ ) देशांतील सर्व लोक ज्या सामाजिक योजनेनें एकत्र होऊं शकतील अशी सामाजिक योजना अथवा धर्मशास्त्रीय सिद्धांत प्रसृत झाला पाहिजे.

समाजास एकरूपता येण्यासाठीं अवश्य असणारी दृढीकरणाची क्रिया मागें सामान्यतः वर्णिलीच आहे. येथें त्या क्रियेच्या आर्थिक स्वरूपाकडे विशेष लक्ष देण्याचें योजिलें आहे.

**आर्थिक स्थितीचें पर्यालोचन.**—आज जी समाजास विचित्र स्वरूप देणारी, आणि उत्पादनविनिमयास अवरोध करणारी आर्थिक स्थिति समोर दिसत आहे तिचें पूर्वरूप नीट लक्षांत येण्यासाठीं, ज्यांचा परिणाम फार दूरवर झालेला आहे अशा गोष्टींच्या ऐतिहासिक स्वरूपाचें ज्ञान होणें अवश्य आहे. त्याप्रमाणेंच भारतांत जे समाजविकासनियम कार्य करीत आहेत त्यांचेंहि ज्ञान असणें जरूर आहे. आजच्या आर्थिक स्थितीचा प्रारंभ शोधावयाचा व त्याजबरोबर या स्थितीशीं कार्य अथवा कारणभावानें संबद्ध अशा समाजस्थितीचेंहि मूळ शोधावयाचें असें जर आपण मनांत आणलें तर कल्पनातीत अशा प्राचीन काळाचें आपणांस ज्ञान करून घेतलें पाहिजे. सध्यांचा जातिभेद कोणत्या राजकीय व आर्थिक स्थितीशीं कार्यकारणरूपानें संबद्ध आहे याची आपणांस फारच अल्प व असष्ट माहिती आहे. जातिभेदाशीं बऱ्याच अंशीं झगडत असलेल्या व समाजास विचाराच्या द्वारा विशिष्ट स्वरूप देणाऱ्या वर्णव्यवस्थेचीं कांहीं अंगें आपणांस ऋग्वेदमंत्रांच्या रचनेच्या काळांत उपलब्ध होतात एवढेंच नव्हे तर तीं त्यापूर्वींच्या इंडोयुरोपीय काळांतहि सांपडतात. पुरातन काळच्या

पुष्कळशा संस्थांचे अवशेष आज राहिलेले आहेत व अनेक वेळां आजच्या आर्थिक जीवनाचें स्वरूप ठरविण्याच्या कार्यांत या केवळ अवशेषभूत गोष्टींकडेच निर्णायक सामर्थ्य असल्याचें अनुभवास येतें.

लहान समाज मोठ्याच्या पोटांत सात्मीकृत होऊन किंवा दुसऱ्या लहानांशीं संलग्न होऊन महान् समाज उत्पन्न व्हावे अशा प्रकारचें जगाच्या विकासाचें धोरण दिसत आहे. अनेक भिन्नस्वरूपी समाज एक भाषा किंवा एक पंडितवर्ग अथवा एक पुरोहितवर्ग अथवा एक राजकीय छत्र अशा प्रकारच्या कोणत्या तरी अधिक व्यापक शक्तीच्या तावडींत आले म्हणजे त्या भिन्नगुणसमाजांत एकरूपता उत्पन्न होण्याची क्रिया सुरू होते. ही एकरूपता वाढत जाते तशी आर्थिक संबंधांची पुनर्घटना तिच्या मागोमाग येते. सामाजिक एकरूपतेची वाढ म्हणजेच आर्थिक पुनर्घटना होय. ज्या गोष्टी ही एकरूपवृद्धि खुंटविण्यास कारणीभूत होतात त्या आर्थिक जीवनाच्या पुनर्घटनेच्या बाबतींतहि अपायकारक होतात. यासाठीं आर्थिक इतिहासाच्या अभ्यासकाला ज्या घडामोडींचा अभ्यास विशेष महत्त्वाचा आहे त्या घडामोडी म्हटल्या म्हणजे देशांत जीवनाची अथवा राहणीची समानता किंवा भिन्नता उत्पन्न करणाऱ्या गोष्टी होत. राहणीमध्यें सारखेपणाची वाढ झाल्यानें म्हणजे सर्वसामान्य गरजांची वाढ झाल्यानें समाजाच्या आर्थिक जीवनावर कसा परिणाम होतो, त्यायोगें उत्पादन मोठ्या प्रमाणावर करण्याची क्रिया कशी जोरानें चालू होते यासंबंधाचें वर्णन मागें आलेलेंच आहे. तेव्हां, आपण अत्यंत बारकाईनें जो सामाजिक, राजकीय व आर्थिक इतिहासाचा भाग कोणत्याहि देशांत लक्षांत घेतला पाहिजे तो भाग म्हणजे या देशांत भिन्न घटकांतून सर्वसामान्य अशी संस्कृति कशी उदयास आली त्यासंबंधाचा भाग होय. अशा प्रकारची सामान्य प्रादेशिक संस्कृति जेथें उदयास आलेली नसेल, तेथें ती उदयास न येण्याचीं कारणें कोणतीं आहेत तीं शोधून काढण्याकडे आम्हीं लक्ष पुरविलें पाहिजे. देशांत सर्वसामान्य संस्कृति उदयास कशी येते याचे जे नियम आहेत त्यांचें ज्ञान तात्त्विक दृष्टीनें महत्त्वाचें आहे एवढेंच नव्हे तर या नियमांचें ज्ञान व्यवहारदृष्ट्याहि बहुमोल आहे. कारण, या ज्ञानाच्या आधारावर आपणांस देशांत जे संस्कृतीचे थर असतात व या थरांचे प्रतिनिधि जे लोकसमाज असतात त्या समाजांनां व त्या थरांनां अमुक धोरणानें वागविणें श्रेयस्कर होईल हें ठरवितां येतें. संस्कृतीच्या प्रत्येक थराला तत्संबद्ध अशी एक आर्थिक जीवनपद्धति असते. एखाद्या प्रदेशांत अनेक सांस्कृतिक थर असतील तर त्यांचा एकमेकांवर परिणाम होत असतो. मात्र, असेंहि पुष्कळ वेळां घडतें कीं, ही परस्परांवर परिणाम करण्याची क्रिया कांहीं कारणपरंपरा उद्भवून स्तंभित होते.

**भारतीय समाजांतील घटक.**—समाजाच्या आर्थिक जीवनाच्या या अंगाचा अभ्यास करावयाचा तर देशांतील लोकसमुदायांत निरनिराळे घटक कोणते आहेत त्यांचें ज्ञान आपणांस करून घेतलें पाहिजे व देशांतील सर्वसामान्य संस्कृतीच्या वाढीस या प्रत्येक घटकाकडून कोणत्या प्रकारची मदत किंवा अडचण होण्याचीं लक्षणें दिसत आहेत त्यांचेंहि ज्ञान आम्हांला पाहिजे. अशा अभ्यासासाठीं जीवनभेदाच्या तत्त्वावर हिंदुस्थानांतील लोकांचे वर्ग खालीलप्रमाणें पाडतां येतील.

(१) इंग्रज लोक. हिंदुस्थानांत इंग्रज वर्ग हा राज्यकर्ता वर्ग असून हिंदुस्थानच्या संस्कृतीला ब्रिटिश वळण लावण्याचा याचा प्रयत्न आहे.

(२) हिंदू लोक. देशांत सर्वांत मोठी संख्या यांची असून आज आपली संस्कृति अभंग राखण्यासाठीं यांनां झगडावें लागत आहे.

(३) मुसुलमान लोक. संख्येच्या दृष्टीनें यांचा नंबर हिंदूंच्या खालीं लागतो. यांची संस्कृति हिंदूंच्या संस्कृतीपासून अगदीं भिन्न असून हे लोक ही आपली भिन्न संस्कृति संरक्षिण्याच्या प्रयत्नांत आहेत.

(४) पार्शी, यहुदी व इतर अप्रधान समाज. देशांत यांची कोणाचीहि स्वतंत्र व संरक्षणार्ह अशी संस्कृति नाहीं.

या भिन्न समाजांचे व संस्कृतींचे एकमेकांवर व हिंदुस्थानच्या सर्वसामान्य संस्कृतीवर काय परिणाम होतात तें पाहूं. हिंदु संस्कृति जी उदयास आली ती अनेक घटकांच्या आचारविचारांच्या दीर्घकालपर्यंत चाललेल्या तडजोडींतून उदयास आली. 'हिंदु' या नांवाच्या समूहांत जे लोक अंतर्भूत होतात ते लोक निरनिराळ्या वंशांतील आहेत आणि त्यांच्या संस्कृतीहि स्वभावतःच निरनिराळ्या आहेत. यासाठीं आपण लोकसमाजांचीं भ्रमणें आणि या भ्रमणांचा संस्कृतीवर होणारा परिणाम विचारांत घेऊं. आपल्या विवेचनाला पूर्णता येण्यासाठीं अगदीं प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत जे निरनिराळे लोकसमूह आले त्यांचें ज्ञान आपण करून घेऊं. ऋग्वेदावरून आपल्याला हिंदुस्थानांत कोणीतरी मोठा समूह आल्याचें दिसून येतें. आर्यन् म्हणून ज्यांनां आपण म्हणतों ते या देशांत आपल्याला बरोबर माहीत नाहीं अशा अतिप्राचीन कोणत्या तरी काळांत आलेले आहेत. ह्या आर्यनांच्या आगमनापूर्वी एक, दोन अथवा तीन बाह्य समाजांचीं आगमनें झालीं. हे समाज म्हणजे निग्रिटो, कोलेरियन् आणि द्राविड समाज होत. या लोकांसंबंधाचें वर्णन तिसऱ्या प्रकरणांत येऊन गेलेंच आहे. या लोकांनंतर जे आर्यन् लोक येथें आले ते वायव्येकडून येऊन त्यांनीं हिंदुस्थानाला एक नवीन संस्कृति दिली. त्यांनीं आपणांपूर्वी असलेल्या संस्कृति अगदींच लयाला नेल्या नाहींत. त्यांनीं जें कार्य

केलें तें या सर्व संस्कृतींनां आपल्या संस्कृतीचें पुट चढवून एकरूपता आणण्याचें होय. पूर्वी ज्या निरनिराळ्या स्थानिक आणि लहान लहान टोळ्यांपुरत्या संस्कृती होत्या त्यांनां एकत्र करून नव्याजुन्यांची मिळून एक नवीन व सर्वांगपूर्ण अशी संस्कृति त्यांनीं बनविली. या आर्यन् लोकांनंतर मंगोलियन लोकांचें आगमन या देशांत झालें. हे जे मंगोलियन लोक आले ते त्यांच्या वंशांतील सुधारलेले लोक नसून कमीअधिक रानटी लोकच असावेत असें दिसतें. अर्थात् यांनीं येथें आपली स्वतंत्र संस्कृति न स्थापितां येथील 'आर्यन्' संस्कृतीचाच प्रामुख्यानें स्वीकार केला. आजची जी हिंदु संस्कृति झालेली आहे ती उदयास येण्यास यांचा हातभार लागलेला आहे. दक्षिणेंत आर्यन् आणि द्राविड आचारविचारपरंपरा जशा मिश्रित झाल्या तशाच पूर्वभारतांत आर्यन् आणि मंगोलियन परंपरा एकमेकांत मिसळून गेल्या आहेत.

वर सांगितलेले पांच अथवा तीन वंश या सर्वांनीं मिळून आज हिंदु नांवानें संबोधिली जाणारी संस्कृति निर्माण केलेली आहे आणि या कार्यांत प्रमुखत्वाचा भाग आर्यन् संस्कृतीनें घेतला आहे. हिंदुस्थानांत निरनिराळ्या संस्कृती एकत्र होऊन त्यांची परस्पर देवघेव व तडजोड ज्या दीर्घ काळाच्या मुदतींत सारखी चाललेली होती त्या मुदतीचा आरंभ आर्यन् आगमनाच्या पूर्वी अतिप्राचीन अज्ञात काळांत होत असून तिचा शेवट ख्रिस्ती शकाच्या पहिल्या सहस्रकाच्या अखेर झाला. या देवघेवींतून व तडजोडींतून आजची हिंदु संस्कृति निर्माण झाली.

प्रत्येक वंशाच्या हातून कोणतातरी एक प्रकारचा संस्कृतीचा नमुना तयार होत असतो. हा नमुना जर बराच सुव्यवस्थित असेल तर दुसरे जे वंश या नमुन्याच्या कक्षेंत येतात ते या नमुन्याप्रमाणें आपली राहणी करण्याचा प्रयत्न करतात. मात्र येणारे लोक जर जेते म्हणून आले असतील तर समोरील जित लोकांची संस्कृति विध्वंसून टाकणें हें आपलें कर्तव्य असें ते सामान्यतः समजतात व अर्थातच ह्या जित संस्कृतीप्रमाणें आपली राहणी बदलण्याच्या भानगडींत ते पडत नाहींत. सामान्य नियम असा आहे कीं, दोन भिन्न संस्कृती एकत्र आल्या असतां त्या एकमेकींची उचलबांगडी करूं पाहतात. जुन्या संस्कृतीचे प्रतिनिधी जर राजकीय सत्तेनें संपन्न असतील तर नवे येणारे लोक या जुन्या राष्ट्राची संस्कृति पत्करतात. ही जुनी संस्कृति पत्करतांना आपल्या पूर्वीच्या चालीरीती या नवीनांनां सामान्यतः टाकून द्याव्या लागतात. मात्र कांहीं बळकट अशी वाङ्मयपरंपरा जर नवीनां-जवळ असली तर त्यांच्यापुढें स्वीकारार्थ आलेल्या संस्कृतीचा ते पूर्णपणें अंगीकार करीत नाहींत. एखाद्या लोकांनीं एखादा देश ताब्यांत घेतला व तो कांहीं दिवस आपल्या ताब्यांत ठेवून आणि त्यांतील लोकांवर आपली संस्कृति लादून जर हे लोक सत्ताच्युत झाले, तर अशा देशांत दोन संस्कृती परस्परांशीं झगडत असतात. या संस्कृती आरंभीं जरी एकमेकाला विरोधी असल्या तरी सान्निध्यानें शेवटीं या दोन संस्कृतींतून नवीच एक संस्कृति निर्माण होते. ही नवी संस्कृति जुन्या दोहोंच्या मिश्रणानें झालेली असते व या मिश्रणांत संख्येनें अगर बळानें अधिक समर्थ अशी जी संस्कृति असेल तिचा भाग अधिक असतो. शक व श्वेत हूण लोक यांच्या ज्या टोळ्या देशांत आल्या व अलीकडे यहुदी, पार्शी, आर्मीनियन व चिनीलोक जे येथें आले ते अल्पसंख्याक असल्यानें त्यांसंबंधानें दोन शब्द सांगितले म्हणजे पुरे आहे.

वरील लोकांसंबंधानें सामान्यतः असें म्हणतां येईल कीं त्यांनीं देशी लोकांची संस्कृति कमी अधिक प्रमाणानें पत्करिली. येथें हें एक सर्वसाधारण विधान करण्यास हरकत नाहीं कीं, जेव्हां एखाद्या देशांत बाह्य लोकांची टोळी येते तेव्हां जर देश्य लोक राजकीय दृष्टीनें प्रमुखपदाधिष्ठित असतील तर हे बाह्य लोक त्यांच्यासारखी राहणी करण्याचा प्रयत्न करितात.

**देश्य आणि परकीय संस्कृतींचें द्वंद्व.**—जर एखाद्या देशांत परकीयांचा अंमल सुरू झाला तर मात्र देश्यांच्या संस्कृतीनें जो समाज निर्माण झालेला असेल त्या समाजाचे अंशभूत हे परकी जेते लोक होऊन राहणें फारसें संभवनीय नसतें. देश्यांच्या चालीरीती ह्या परक्यांकडून उचलल्या जाण्याचा संभव फार कमी असतो. देश्य संस्कृति बलिष्ठ नाहीं अशा स्थितींत त्या संस्कृतीचें सामर्थ्य कमी कमी करण्याचा प्रयत्न करणें आणि आपल्या संस्कृतीचें सामर्थ्य वाढविण्याचा प्रयत्न करणें हेंच त्या देशांत शिरलेल्या परकीयांचें धोरण होतें. जर देश्य संस्कृतीमध्यें फार प्रकार असतील किंवा जर देशांत भिन्न भिन्न संस्कृती वास करीत असतील तर अशा देश्य संस्कृतीचें बळ परकीयांच्या सान्निध्यानें पुष्कळच कमी होतें. परकीय संस्कृतीचे लोक वरील प्रकारच्या भेदपूर्ण देशांत थोडे जरी असले तरी त्यांचा देशांत वरचष्मा होतो. या परकीयांनीं देश्य संस्कृति स्वीकारण्याच्या आड जी एक गोष्ट येते ती म्हणजे त्या संस्कृतींतील नाना प्रकार व भेद यांचें अस्तित्व होय.

हे परके लोक त्यांनीं आणलेल्या बाह्य संस्कृतीचे जर जोरदार पुरस्कर्ते नसतील तर जेते असूनहि ते देश्यांची संस्कृति कदाचित् पत्करतील. बाहेरून आलेल्या जेते लोकांनीं देश्यांची संस्कृति स्वीकारल्याचीं उदाहरणें आपल्या इतिहा-सांत सांपडतात तीं शक आणि हूण लोकांचीं होत. हे लोक हिंदु समाजांत अगदीं मिसळून गेले आहेत.

बाह्यांचे जे अल्पसंख्याक समूह येथें आले त्यांचा आपल्या देशावर काय काय परिणाम झाला त्याचीं उदाहरणें

पुढें देणार आहों. येथें आतां मुसुलमानी संस्कृतीचा इतिहास विचारांत घेऊं.

आठव्या शतकांत अरब मुसुलमानांची जी स्वारी हिंदुस्थानावर झाली तिचा हिंदु संस्कृतीवर फारसा परिणाम न झाल्यानें ती फारशी विचारार्ह नाहीं. मुसुलमानी संस्कृति जी हिंदुस्थानांत आली ती अकराव्या शतकांत आली. या काळापासून १७ व्या शतकाच्या अखेरीपावेतों मुसुलमान संस्कृतीचा जोर वाढत होता. हिंदुस्थानांतील जुन्या संस्कृतीचा नाश करण्याचेंच काम मुसुलमानी संस्कृतीनें केलें. अठराव्या शतकांत मुसुलमानी सत्ता लयास गेली. मुसुलमानी सत्तेच्या नाशाला जे लोक कारणीभूत झाले त्यांत मराठे, शीख आणि इंग्रज हे प्रमुख होत. इंग्लंडांतील लोकांनीं शेवटीं हिंदुस्थान जिंकला आणि येथें देश्य भाषांनां बाजूस सारून त्यांच्या जागीं इंग्रजी भाषेचा अभ्यास लोकांकडून करवून इंग्रजांनीं या देशांत ब्रिटिश संस्कृति लादण्याचा प्रयत्न चालविला आहे. हिंदुस्थानाला ब्रिटिश लोक आंग्लरूप करून टाकतील हें संभवनीय नाहीं; तथापि त्यांनीं आपल्या बाह्य संस्कृतीचा रोपा येथें लावण्याचा जो प्रयत्न चालविला आहे त्या त्यांच्या प्रयत्नाचे जे महत्त्वाचे परिणाम आहेत त्यांकडे लक्ष दिलें पाहिजे. त्याचप्रमाणें आपल्या देशांत ज्या अल्पसंख्याक परकीय जाती राहिलेल्या आहेत व रहात आहेत त्यांचे हिंदी संस्कृतीवर काय परिणाम झाले आहेत व होत आहेत हेंहि आपण लक्षांत घेतलें पाहिजे.

ब्रिटिश संस्कृतीचें हिंदुस्थानांतील वर्चस्व आणि या वर्चस्वाचा व ब्रिटिश राजसत्तेचा संबंध यांचा साकल्यानें विचार पुढें करूं. हिंदुस्थानांत इतर ज्या लहान लहान टोळ्या येऊन राहिल्या त्यांच्या सान्निध्याचा येथील संस्कृतीवर काय परिणाम झाला त्याकडे सध्यां लक्ष देऊं. देशांत येऊन वस्ती करणारांसंबंधानें आम्ही फारच थोडा विचार करतों. देशांतून बाहेर जाणारे जे आमचे नातेवाईक आहेत त्यांचा–विशेषतः त्यांनां परदेशांत ज्या रीतीनें लोक वागवितात त्या रीतीचा–विचार आमच्याकडून जितका होतो तितका आमच्या येथें येऊन राहणाऱ्यांसंबंधींचा होत नाहीं.

**अल्पसंख्याक बाह्य समाज.**—देशांत येऊन वस्ती करणाऱ्या बाह्यांसंबंधानें कांहीं विचारणीय प्रश्नच नाहींत अशी गोष्ट नाहीं. असे प्रश्न पुष्कळ आहेत. परंतु आमची समाजस्थिति कांहीं एका विशेष प्रकारची असल्यानें या प्रश्नांचें अस्तित्व जोरानें आम्हांस भासत नाहीं. हिंदुस्थानांत चिनी लोक आले तरी येथें ज्या अनेक जाती आहेत त्यांत आणखी एका जातीची भर पडते एवढेंच. अमेरिकेसारख्या देशांत चिनी लोक गेले तर भिन्न प्रकार होतो.

अमेरिकन लोक या लोकांनां आपल्या समाजांत स्वीकारूं शकत नाहींत व म्हणून यांच्यावर प्रादेशिक बहिष्कार घालण्याकडे त्यांची जोराची भावना असते. आजच्या अमेरिकन समाजांत चिनीअमेरिकन विवाह मोकळेपणानें होत नाहींत. अमेरिकेंत पश्चिम संस्थानांत चिनी व जपानी लोकांशीं गोऱ्यांचीं लग्नें होऊं नयेत असे स्पष्ट कायदे आहेत. पूर्वेकडील संस्थानांत असे गौरेतर जातींशीं गौरांच्या विवाहास प्रतिबंध करणारे कायदे नसले तरी सामाजिक मतें व भावना असल्या विवाहाच्या बाबतींत इतकीं विरुद्ध आहेत कीं असले विवाह तेथेंहि होत नाहींत. केव्हां केव्हां असे प्रश्न केले जातात कीं, विवाहास अमेरिकन लोक नाखुष आहेत कीं चिनी लोक नाखुष आहेत? अमेरिकेंतील पूर्व संस्थानांत खालच्या जातीच्या गोऱ्या बायकांशीं लग्न करण्याची संधि चिनी लोक प्रायः घेतात यावरून नाखुषी अधिकांशानें अमेरिकन लोकांचीच आहे यांत संशय राहत नाहीं. जातां जातां हेंहि सांगितलें पाहिजे कीं, चिनी पुरुष आणि नीग्रो बायको असे विवाह कांहीं थोडे होत नाहींत. ब्रिटिश गियानामध्यें हिंदु कूली नीग्रो बाईशीं व्यभिचार करण्याचें देखील टाळतो, परंतु चिनी मनुष्य नीग्रो बाईशीं विवाह करण्यालाहि मागें पुढें पहात नाहीं, त्यांतल्या त्यांत चांगलीशी नीग्रो बाई पाहून तिच्याशीं चिनी मनुष्य विवाह करतो, अशी साक्ष हेनरी कर्क देतो. तेव्हां चिनी व गोरे यांच्यामध्यें विवाह होत नसेल तर त्याचा दोष चिनी लोकांकडे नाहीं. आधींच अनेक रक्तांचें मिश्रण असलेल्या अमेरिकन समाजांत आपण सर्वेखीं मिळून जावें या ध्येयाला चिनी लोक कांहीं प्रतिकूल नाहींत. चिनी लोकांशीं मिळून जाणें हें अमेरिकन लोकांच्या मनाला अतिशय जड वाटतें म्हणूनच या चिनी लोकांनां आपल्या समाजापासून दूर ठेवण्याचें धोरण राष्ट्रानें पत्करावें असें अमेरिकन लोकांनां वाटतें. स्वसमाजाशीं मिसळून टाकण्याला अपात्र असे हे लोक जर देशांत येऊं दिले तर देशांत जातिभेद उत्पन्न होईल व त्या योगानें अमेरिकन लोकराज्यामध्यें जें ऐक्य व जी समता आज आहे तिला बाधा येईल अशी अमेरिकन लोकांनां भीति वाटत असल्यानें चिनी लोकांस बहिष्कार घालावयाचें धोरण त्यांनां पसंत वाटतें. हिंदुस्थानांत बाह्यांच्या सात्मीकरणाचा प्रश्न फार दूरचा आहे. हिंदुस्थानांतील सर्व लोकांची तर गोष्टच नको, येथील केवळ हिंदूच घेतले तरी त्यांच्यांत एक रक्ताच्या म्हणजे परस्परविवाहाच्या बंधनानें निर्माण होणारें एकराष्ट्रीयत्व अस्तित्वांत नाहीं, व त्यांचे जे कायमचे मुसुलमान शेजारी आहेत त्यांच्याशीं त्यांचें फारच थोड्या बाबतींत ऐक्य आहे. बाजारांत एकत्र येणारे लोक एक भाषा बोलतात त्याप्रमाणें हे हिंदुमुसुलमान एक भाषा बोलत असतील पण यापलीकडे दोघांनां सामान्य असें वाङ्मय देखील नाहीं. देश्य लिपींचा पुरस्कार हिंदू लोक करितात तर मुसुलमान एका बाह्य लिपीचा पुरस्कार करितात. सामाजिक कायदे हेहि हिंदूंचे आणि मुसुलमानांचे भिन्न भिन्न आहेत. परंपरागत आचार, चालीरीती, खायेंपेयें, हींहि

दोघांचीं तत्त्वतः भिन्नभिन्न आहेत. एकंदरीनें आपण हिंदी-लोक फारच थोड्या अंशानें एकरूप आहोंत. तेव्हां आपल्या येथें येणाऱ्या बाह्यांनां आपल्या समाजांत आत्मसात् करून घेण्याची कल्पना हें आज केवळ मनोराज्य आहे. भारतीय म्हणून आपली कांहीं सर्वांनां सामान्य अशी विचारपरंपरा नाहीं, भारतीय अशा सर्वसामान्य चाली किंवा पोषाख नाहींत. अशी जोंपर्यंत आमची स्थिति आहे तोंपर्यंत बाह्यांनां आमची विचारपरंपरा देणें व आमचा पोषाख देणें, आणि आमच्या चालीरीती देणें या गोष्टींच्या कल्पना करण्यांत काय अर्थ आहे?

**भारतीय संस्कृतीवर बाह्यांचा परिणाम.**—या ठिकाणीं असा प्रश्न कोणी करील कीं, जर हिंदुस्थानची स्थिति वर वर्णिल्याप्रमाणें आहे तर हिंदुस्थानांत येऊन राहणाऱ्या लोकांसंबंधाचा प्रश्न इतक्या विस्तारानें विचारांत घेण्यापासून फायदा काय होणार? या प्रश्नाच्या उत्तरार्थ येवढें सांगून ठेवणें पुरे आहे कीं देशांत येणारांच्या संबंधानें लोकांनीं विचार करण्यास लागावें असें म्हणण्यांत आमचा हेतु असा आहे कीं हिंदुस्थानची भवितव्यता अमुकच प्रकारची होईल अशी कल्पना करतांना आपण फार सावध राहिलें पाहिजे. हिंदुस्थानच्या राष्ट्रीकरणाकडे आपण लक्ष्य देऊं तेव्हां देशांत असलेल्या साधक बाधक गोष्टींकडे आपण फार सावधानतेनें पाहिलें पाहिजे. पहिल्यापासूनच आपण अशी काळजी घेतली पाहिजे कीं, राष्ट्रीकरणाच्या मार्गावर पाऊल टाकून आपण पुढें चालूं लागलों असतां आपल्या मनांतील उद्दिष्ट साध्य होण्याच्या आड कांहीं विशेष विघ्नें येऊन आपलें राष्ट्रीकरणाचें कार्य अवघड होऊं नये. आमचें म्हणणें असें कीं, हिंदुस्थानांत आपल्या प्रयत्नानें एक सर्वसामान्य संस्कृति आपण करूं शकलों (अर्थात् ही संस्कृति शुद्ध महंमदी, शुद्ध हिंदु किंवा शुद्ध पाश्चात्त्य असणार नाहीं तर ही या सर्वांची मिळवणी असणार) तर अशी सर्वसामान्य संस्कृति निर्माण झाल्यावर आपल्या देशांत असा कोणताहि लोकसमूह असूं नये कीं ज्याला या आपल्या उद्दिष्ट संस्कृतीच्या गोटांत आणतां येणार नाहीं. राष्ट्रीकरणाचे प्रश्न सोडवितांना मुख्य जी गोष्ट करावयाची असते ती ही कीं, देशांत जे निरनिराळे समाज असतात त्या सर्वांनां सामान्य असें काय आहे, किंवा सर्वांतच नाहीं असें काय आहे, तें शोधून काढून त्याचा सामान्य संस्कृति निर्माण करण्याच्या कामीं उपयोग करावयाचा असतो. अर्थात् हें काम चांगलें व्हावें यासाठीं आणि सामान्य संस्कृति तयार करण्याचें काम विशेष अवघड होऊं नये एतदर्थ देशांत एकमेकांपासून अगदीं भिन्न असे समाज जितके कमी असतील तितकें सोईचें होतें. उद्यां धाडसी चिनी लोकांचे थवेच्या थवे येथें येऊन राहूं लागले, तर त्यायोगें भारतीय राष्ट्र बनविण्याचें आमचें काम अवघड होईल, कारण चिनी समाज आमच्यापासून महत्त्वाच्या बाबतींत अगदीं भिन्न आहे. ब्रिटिश लोक या अशा भिन्न चिनी लोकांचें आगमन स्वतःच्या देशांत होण्याच्या जरी विरुद्ध आहेत तरी हिंदुस्थानांत त्यांची वस्ती होण्यास उत्तेजन देऊन येथील लोकांत आधींच जी भिन्नता वावरत आहे तिच्यांत भर टाकण्याला ते निश्चितपणें मदत करतील. अठराव्या शतकाच्या शेवटीं शेवटीं आणि एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं मराठ्यांशीं केलेल्या पहिल्या युद्धानंतर प्राप्त झालेल्या साष्टी बेटांत चिनी लोकांची वसाहत करविण्याचा ईस्ट इंडिया कंपनीचा विचार होता ही गोष्ट इतिहासांत नमूद आहे. कंपनीचा हा बेत साधला नाहीं ही गोष्ट वेगळी. मद्रासेकडे तर गुन्हेगार चिनी लोकांची वसाहत स्थापितहि झाली होती, आणि चिनी-तामिल या नांवाची नवी संकरजाति आज तेथें दिसत आहे ती या वसाहतीमुळेंच उत्पन्न झालेली आहे. कलकत्त्यांत पुष्कळ चिनी लोक आज चांभाराचा धंदा करीत आहेत. हे कलकत्त्यांत येणारे चिनी लोक बहुधा एकटे येतात आणि येथें हिंदी-ख्रिस्ती बायकांशीं लग्नें करतात असा मजकूर कांहीं वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाला होता तो खरा असेल तर ही एक गोष्ट राष्ट्रीकरणदृष्ट्या आम्हांला सोईची आहे व या गोष्टीमुळें चिनी लोकांची आमच्या देशांतील वस्ती आमच्या ध्येयाला विशेष अपायकारक होणार नाहीं असें म्हटलें पाहिजे.

परंतु चिनी लोक आणि दुसरे अल्पसंख्याक समाज जे आमच्या देशांत येऊन राहतात त्यांच्या संबंधानें एक अडचणीची गोष्ट उपस्थित होते कीं, आजच्या परिस्थितींत हे सर्व बाह्य लोक आमची देशी संस्कृति आणि विचारपरंपरा दुर्बल करण्याचा प्रयत्न करतात. आज जर हिंदुस्थानांत देशी राजाचें राज्य असतें तर येथें वस्तीस आलेल्या बाह्य लोकांकडून आमच्या संस्कृतीला बाधा पोंचली नसती. कित्येक शतकांपूर्वी सीरियन् ख्रिस्ती लोक येथें आले ते येथें स्वराज्य असल्यामुळें पोषाख, राहणी, भाषा या सर्व बाबतींत हिंदीच बनून गेले आहेत. कोचीन आणि त्रावणकोर येथें सामान्य हिंदु आणि सीरियन ख्रिश्चन माणसें, विशेषेंकरून बायका, हीं इतकीं सदृश दिसतात कीं अमकी बाई ख्रिस्ती आहे अगर हिंदु आहे हें एकाएकीं ओळखतां येत नाहीं. कित्येक शतकांपूर्वी यहुदी लोक दक्षिणेंत आले ते आज मराठीच बोलतात, मराठीच लिहितात, त्यांची धार्मिक गीतेंहि मराठींतच आहेत. एवढेंच नव्हे तर महाराष्ट्रीय वाङ्मयसूचीवरून हें स्पष्ट होईल कीं या लोकांनीं कित्येक काव्यें व नाटकें लिहून मराठी वाङ्मयांत भर टाकलेली आहे. भाषेप्रमाणें ह्यांच्या स्त्रिया पोषाखाच्या बाबतींतहि हिंदू झाल्या आहेत. बेने इस्रायल (यहुदी) स्त्री व हिंदु स्त्री यांत फरक एवढाच दिसतो कीं हिंदु स्त्रीच्या कपाळावर कुंकू असतें व यहुदी स्त्रीच्या नसतें. पार्श्यांचीहि गोष्ट थोडीफार यहुदी लोकांसारखीच आहे. गुजराथी ही त्यांनीं आपली भाषा म्हणून स्वीकारली आहे,

हिंदु देवतांनां ते नवस करतात, लग्न वगैरे संस्कारांच्या बाबतींत ब्राह्मणाजवळून मुहूर्त वगैरे काढतात. गायकवाडींतील कांहीं पारशी मराठेशाही पागोटें घालतांना आढळतात. त्यांच्या स्त्रिया शुभ प्रसंगीं कुंकू लावतात व त्यांच्या लग्नांत जरी ब्राह्मण पुरोहित लागत नसले तरी त्यांचे विवाहमंत्र पुष्कळसे संस्कृत असतात. गोमांसहि त्यांनीं टाकलें आहे व गोरक्षणाचा पुरस्कार करणाऱ्या मंडळींत शेट जसावाला यांसारखे कांहीं पारशीहि आहेत. ही खराऱ्याच्या दिवसांत येथें येऊन राहिलेल्या बाह्य लोकांची गोष्ट झाली.

**सध्यांचे पारशी.**—अठराशें अठरा सालीं महाराष्ट्र देश जिंकला जाऊन तेथें व हिंदुस्थानांत इतर सर्वत्र ठिकाणीं ब्रिटिश सत्ता जशी हळू हळू पसरली तशी या बाह्य जातींच्या मनांत देश्य संस्कृति व चालीरीती यासंबंधानें पूर्वींची जी भावना होती ती बदलली. आज पुष्कळ पार्शी लोकांनां इंग्रजी भाषा गुजराथीपेक्षां जास्त संवईची झाली आहे. ते घरीं इंग्रजी बोलत नाहींत, गुजराथीच बोलतात, परंतु त्यांची बोलण्याची व लिहिण्याची गुजराथी आतां पूर्वींसारखी शुद्ध राहिली नसून ती तशी व्हावी अशी त्यांनां इच्छाहि दिसत नाहीं. त्यांची लिहिण्याची गुजराथी ही एक अपभ्रष्ट भाषा असून तिला पारशी गुजराथी असें नांव ते देतात. 'संसारिका' नांवाचें एक गुजराथी काव्य लिहिणारे शेट मलबारी यांसारखे लोक शुद्ध गुजराथी लिहितां येतें याचा अभिमान मानीत. परंतु ते दिवस गेले. मलबारी यांची पिढी आज नाहींशी झालेली आहे. मलबारी यांनीं वरील कविता प्रसिद्ध केली त्या वेळीं देशी भाषेंत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांचे व ग्रंथांचे रिपोर्टर यांनीं असा एक शेरा मारला होता कीं, "कवितेची भाषा अगदीं शुद्ध गुजराथी आहे, अर्थात् मलबारी हे पारशी असल्यानें त्यांच्या हातून ही कविता लिहिली गेली नसावी". या रिपोर्टरानें असेंहि आणखी म्हटलें होतें कीं, "कवितेंतील भाषासरणी व भावनांचा ओघ पाहतां कोणातरी पेट्रियटनें म्हणजे देशभक्तानें ही कविता लिहिली असली पाहिजे". अर्थात् या रिपोर्टरानें पारशी देशभक्त असणार नाहीं अशी आपली समजूत प्रदर्शित केली आहे! असो. पारशी लोक हरएक बाबतींत बहुतेक पाश्चात्त्यांसारखे झाले आहेत ही गोष्ट सामान्य दृष्टीलाहि स्पष्ट दिसते. हिंदुस्थानांत सामाजिक आणि राजकीय विषयांत लक्ष घालणाऱ्या समाजांत इंग्रजी भाषेचा जोरानें पुरस्कार करणारे असे हे पारशी लोकच होत.

**आर्मीनियन.**—पार्शी लोकांनंतर आर्मीनियन लोकांची स्थिति पाहतां हे लोक ब्रिटिश सत्तेच्या स्थापनेपूर्वी कित्येक वर्षे येथें वस्तीला असूनहि आज ते सर्वस्वीं इंग्रजरूप होण्याच्या प्रयत्नांत आहेत. पुष्कळ आर्मीनियन लोक घरीं इंग्रजी बोलतात व इंग्रज गृहस्थांची जेवण्याराहण्याची सोय आपल्या घरीं करतात. कलकत्त्यांत एक मोठें व अत्यंत प्रसिद्ध हॉटेल एका आर्मीनियन गृहस्थाचें आहे. बऱ्याच आर्मीनियन लोकांनीं इंग्रजांशीं लग्नें केलेलीं आहेत. ही लग्नांची संख्या फार मोठी नाहीं तरी हिंदू लोक आणि आर्मीनियन लोक यांच्या मध्यें जितका सामाजिक व्यवहार आहे त्यापेक्षां इंग्रजांचा व आर्मीनियनांचा सामाजिक व्यवहार मोठ्या प्रमाणावर चालतो ही गोष्ट स्पष्ट करण्यास ही लग्नसंख्या पुरेशी आहे. इंग्रजांनां लागू असणारा कायदा आर्मीनियन लोकांनीं आपला म्हणून मान्य केलेला आहे. असो.

**यहुदी.**—आतां यहुदी लोकांकडे वळूं. हिंदुस्थानांत आलेले यहुदी लोक दोन वर्गांत पडतात. पूर्वी येऊन राहिलेले ते बेने इस्रायल लोक होत. हे लोक बहुतेक बाबतींत मराठेच झालेले आहेत. ब्रिटिश सत्ता स्थापित झाल्यानंतर जे यहुदी लोक येथें आले ते नेटिवांच्या चालीरीती घेत नाहींत, तर राज्यकर्त्यांची राहणी स्वीकारतात. त्यांनीं अरबी भाषेलाहि सोडचिठ्ठी देण्याचा प्रयत्न चालविला आहे व तिच्या जागीं ते कोणतीहि देशभाषा न स्वीकारतां इंग्रजीचा स्वीकार करतात. यांपैकीं कांहीं लोक यूरोपियन यहुदी आणि ख्रिस्ती लोकांशीं लग्न करतात परंतु आपले जातभाई बेने इस्रायल यांजशींदेखील लग्नव्यवहार करीत नाहींत. बेने इस्रायलांत घटस्फोट मंजूर नाहीं आणि यहुदी धर्माचें घटस्फोट हें आदितत्त्व आहे असेंहि तत्त्व एक सासून घराण्यांतील तरुण ज्ञानकोशकारांपुढें मांडूं लागला. बेने इस्रायल काळे म्हणून जर या नव्या यहुदींस नकोत तर मग हिंदुस्थानांतील एकाद्या जातींत लग्न करण्याची गोष्ट दूरच आहे. कलकत्त्यांतील एका बेने इस्रायल खाणावळवाल्याचे दोन मुलगे कलकत्त्यांत वाढल्यानें त्यांनां त्यांची मराठी भाषा येत नव्हती. मराठी येत नाहीं म्हणून त्या मुलांनीं कोंकणांतील मुली न करतां कलकत्त्यांतीलच कराव्यात असें मनांत आणलें, परंतु कलकत्त्यांत मागाहून आलेल्या म्हणजे गोऱ्या यहुदी लोकांच्या मुलींतून बायका मिळविणें त्यांनां अत्यंत दुर्घट झालें. मोठ्या कष्टानें एका कुटुंबांतल्या दोन मुली बहिणीबहिणी या दोन भावांनीं आपल्या बायका करून घेतल्या. पुढें या विवाहाचा परिणाम असा झाला कीं ह्या दोन मुलींनां त्यांच्या गोऱ्या यहुदी जातीनें वाळींत टाकलें.

सासून नांवाच्या गृहस्थांनीं आपल्या जातीच्या मदतीसाठीं ज्या मोठमोठ्या देणग्या देऊन ठेवल्या आहेत व जे धर्मादाय काढले आहेत त्यांचा फायदा बेने इस्रायल लोकांनां फारच थोडा दिला जातो. कारण काय तर बेने इस्रायल हे मागून आलेल्या यहुदी लोकांपेक्षां काळसर वर्णाचे आहेत. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे बेने इस्रायल लोक आणि बगदादहून आलेले नंतरचे यहुदी लोक यांचे संबंध

इंग्रज आणि नेटिव्ह ख्रिस्ती यांच्या संबंधाप्रमाणें जवळ जवळ आहेत. कोचीन येथें ज्यू लोकांतच काळी आणि गोरी अशा दोन जाती आहेत. गोरी जात काळ्या जातीला तुच्छतेनें वागवितें.

**चिनी.**—आतां चिनी लोकांची गोष्ट घेऊं. हे चिनी लोक हिंदी लोकांप्रमाणें वागण्याचा कितपत प्रयत्न करतात? मुळींच करीत नाहींत म्हटलें तरी चालेल. सत्ताधारी लोकांचा पोषाख आणि चालीरीती यांनांच ते जवळ करतात असें दिसतें. क्षुल्लक फायद्यासाठीं ख्रिस्ती पंथ किंवा दुसरा कोणताहि पंथ पत्करावयास ते मागेंपुढें पहात नाहींत. हिंदी लोकांचें अनुकरण करणें हें चिनी लोकांनां आज फायद्याचें नाहीं म्हणून ते त्या भानगडींत पडत नाहींत. वेस्ट इंडीज बेटांत किंग्स्ले नांवाचे एक गृहस्थ राहिले होते. त्यांनीं आपला असा अनुभव लिहून ठेवला आहे कीं, चिनी पुरुष आपली बायको चर्चमध्यें पाठवितो ती केवळ नवी ट्रम (फॅशन) म्हणून पाठवितो. आज चिनी पुरुष इंग्रजी हॅट घालतात व पुष्कळ चिनी बायका यूरोपियन तऱ्हेचा पोषाखहि करतात. ही आजची गोष्ट झाली. कांहीं दिवसांनीं आपल्या नव्या लोकराज्याविषयीं चिनी लोकांनां अभिमान वाटेल. हें त्यांचें लोकराज्य दिवसानुदिवस बलिष्ठ होत जाऊन अभिमान वाटण्याजोगें होईल आणि मग हे चिनी लोक आज आम्हांला कित्येक यूरोपियन राष्ट्रांचे लोक वागवितात त्याप्रमाणें तिरस्कारानें वागवितील. ते हिंदुस्थानांत राहतील पण मनानें हिंदुस्थानचे नागरिक असें स्वतःला समजणार नाहींत, तर आपल्या लोकराज्याचेच नागरिक राहून हिंदुस्थानांत नेहमीं परक्यांप्रमाणें वागतील. आतांपर्यंत या ज्या गोष्टी सांगितल्या या उद्यां होणाऱ्या गोष्टी आहेत व म्हणून आजच्या राजकारणांत त्यांचा विचार करण्याचें विशेष कारण नाहीं. तरी पण उद्यांच्या होण्यासारख्या गोष्टी म्हणून त्या आम्हीं ध्यानांत ठेवणें बरें. चिनी लोकांची काम करण्याची ताकद अमेरिकन लोकापेक्षांहि अधिक आहे. चीन देशांत मजूरवर्गाची लोकसंख्या फार मोठी आहे. हिंदुस्थानांत कुशल कारागिरांचा तुटवडा आहे. आमचे कारागीर लोक स्वभावतः आळशी असतात. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या आणि हिंदुस्थान व चीन देश हे एकमेकाला लागून आहेत ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे हिंदुस्थानांत वस्तीला येणाऱ्या चिनी लोकांची संख्या यापुढें वाढत जाणार हें आपल्यास कळून येईल. असेंहि संभवनीय दिसतें कीं, चिनी लोक हे आमच्या देशांत कायमचीच वस्ती करून राहणारे होतील. असें झाल्यास आमच्या राजकारणांत अनेक अल्पसंख्याक समाज ज्या धोरणानें वागतात त्या धोरणानें तेहि वागण्याचा संभव आहे. एकमुखी अनियंत्रित सत्ताधारी सरकार असलेल्या देशांत अल्पसंख्याक समाज नेहमीं सत्ताधारी लोकांशीं संगनमत करतात आणि आपल्या समाजासाठीं विशेष हक्क मिळावे म्हणून देशांतील बहुसंख्याक जनतेपासून अलग राहण्याचा प्रयत्न करतात. हें अल्पसंख्याकांचें सामान्य धोरण चिनी लोकहि पतकरतील यांत नवल नाहीं.

**ख्रैस्त्यप्रसार.**—आतांपर्यंत चिनी, यहुदी, पार्शी आणि आर्मीनियन यांच्या वृत्तीसंबंधानें जें वर्णन केलें आहे त्यावरून हें लक्षांत येईल कीं, या समाजांचें धोरण इंग्रजी संस्कृति स्वीकारावी किंवा आपली स्वतःची संस्कृति धरून ठेवावी अशा प्रकारचेंच असणार. यांपैकीं कोणतीहि गोष्ट त्यांनीं केली तरी देश्य संस्कृतीला त्यापासून फायदा नसून या संस्कृतीचें बळ कमी होणें हा एक त्यांच्या राहणीचा परिणाम होणार आहे. ब्रिटिश लोक या देशांत आपल्या ब्रिटिश संस्कृतीचा पुरस्कार करीत आहेत; व अल्पसंख्याक बाह्यजातीयांचें वर्तन या पुरस्काराला साहाय्यक होत आहे; या दोन गोष्टी तर हिंदी संस्कृतीला अपायकारक आहेतच पण याखेरीज आणखी एक जबरदस्त अपायकारी शक्ति आपल्या संस्कृतीविरुद्ध कार्य करीत आहे. ही शक्ति म्हणजे ख्रैस्त्याचा हिंदुस्थानांत केला जाणारा प्रचार होय. प्रत्येकाला वाटेल त्या गोष्टीवर विश्वास ठेवण्या न ठेवण्याचें स्वातंत्र्य आहे व वाटेल त्या मताचा प्रचार करण्याचें स्वातंत्र्य आहे. हीं तत्त्वें कबूल करूनहि आम्हांला आमच्या देशांत होणाऱ्या ख्रैस्त्यप्रचाराविरुद्ध बोलतां येईल. या ख्रिस्तपंथप्रचारानें आमचे देशबंधू देशभावनेला पारखे होतात, आमच्या ज्या जुन्या शिष्टमान्य आचारपरंपरा आहेत त्यांकडे तिरस्कारबुद्धीनें पाहण्याची संवय ख्रिस्तपंथ आमच्या देशबांधवांनां लावतो, या प्रकारच्या हरकती या पंथाच्या प्रचाराविरुद्ध आम्हांला आतांच घेतां येतात. पुष्कळसे ख्रिस्ती झालेले लोक साहेब बनावयास पाहतात. आपला पोषाख टाकून ते परकी पोषाख घेतात. पुष्कळ ख्रिस्ती कुटुंबांत देशी भाषा बाजूस सारून इंग्रजी भाषेचा घरच्या व्यवहारांत उपयोग करण्याचा प्रचार सुरू झालेला आहे. संताळ वगैरे सारख्या जातींत ख्रिस्ती मिशनरी लोक आपल्या मिशनरी कामासाठीं जातात तेव्हां त्यांच्यामध्यें रोमनलिपीचा प्रचार करण्याचा यत्न करितात. हेतु हा कीं, ख्रिस्ती वाङ्मय त्यांच्या भाषेंतून त्यांनां शिकवितां यावें. मिशनऱ्यांच्या या चळवळीचा परिणाम असा होईल कीं, आमच्यांतील कांहीं लोक रोमन लिपी लिहावयास शिकतील व या लिपीचीच त्यांनां संवय लागून आमच्या देश्य लिपीचें संख्याबल कमी होईल. गोव्यामधील ख्रिस्ती लोकांनीं आपल्या कोंकणी मराठी भाषेंत पोर्तुगीज आणि लॅटिन् शब्द मिसळून व ही भाषा लिहिण्याला रोमन लिपीचा उपयोग करून आपल्यापुरती एक नवीनच उपभाषा निर्माण केली हें प्रसिद्ध आहे. असो.

आपल्याला हिंदुस्थानांत जी सामाजिक व आर्थिक उन्नति घडवून आणावयाची आहे त्या उन्नतीच्या कार्यासाठीं जें

मुख्य काम आपणाला करावें लागणार आहे तें हिंदुस्थानांत असलेल्या निरनिराळ्या संस्कृतींचें एकीकरण होय. या एकीकरणानें जी नवीन संस्कृति उत्पन्न करावयाची तिचें स्वरूप ठरवितांना हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, हिंदी लोकांनां सर्वतोपरी पाश्चात्त्य रूप देणें हें केवळ अवघडच नव्हे तर अशक्य कोटींतलें आहे. अर्थात् येथील देश्य भाषा रक्षण केल्या पाहिजेत. त्या नाहींशा करून टाकतां उपयोगी नाहीं व असें करणेंहि शक्य नाहीं. या देशांत येथील भाषाच प्रमुखतेनें प्रचारांत असल्या पाहिजेत. अर्थात् ख्रिस्ती मिशनरी लोक वर सांगितल्याप्रमाणें भाषांच्या कामांत जी अनवस्था उत्पन्न करूं पाहत आहेत तिला कायद्यानें किंवा जोरदार लोकमत उत्पन्न करून प्रतिबंध केला पाहिजे.

येथें जे बाह्य लोकांचे अल्पसंख्याक समाज आहेत व जे परकीय उपासनासंप्रदाय आहेत त्यांचे आपल्या देश्य समाजावर होणारे परिणाम कोणत्या उपायानें टाळतां येतील, आमच्या राष्ट्रीयवृत्तींत हे पंथ व समाज जे दोष उत्पन्न करूं पाहत आहेत ते उत्पन्न होण्याचें टाळण्यास काय उपाय योजणें जरूर आहे, या प्रश्नांचा विचार करतां आम्हांला जो उत्तम उपाय सुचतो तो हा कीं प्रांतोप्रांतीं आमच्या ज्या देश्य भाषा आहेत त्यांचें सामर्थ्य आम्हीं वाढवावें आणि हें सामर्थ्य वाढण्यासाठीं जरूर ते सामाजिक आणि राजकीय फरक आम्ही घडवून आणावे.

**भाषावार देशविभाग.**—आमच्या मतें हिंदुस्थानच्या कारभारांत जो फरक आज अगदीं जरूर झालाच पाहिजे तो या देशाची भाषावार विभागणी हा होय. आज देशाचे जे राजकीय विभाग आहेत ते निरनिराळ्या परिस्थितीप्रमाणें सहज घडून आलेले आहेत. ईस्ट इंडिया कंपनी जसा देश काबीज करीत गेली तसा कबजांत असलेल्या मुलखांत नवा मिळालेला मुलूख त्याचाच एक भाग म्हणून अंतर्भूत केला गेला. मुंबई इलाख्याकडेच पाहतां या इलाख्यांत मराठी, गुजराथी, सिंधी व कानडी या चार अगदीं भिन्न भाषा बोलणारे भिन्न भाग सामिल केले गेले आहेत. कानडी भाषा बोलणारे लोक कांहीं मद्रास इलाख्यांत तर कांहीं मुंबई इलाख्यांत वांटले गेले आहेत. मराठी बोलणारा मोठा समाज मुंबई इलाखा, वऱ्हाड, मध्यप्रांत व निजामचें राज्य या चार ठिकाणीं विभागला गेला आहे.

परवां परवांपर्यंत बंगाली लोक पूर्वबंगाल आणि पश्चिमबंगाल अशा दोन ठिकाणीं विभागले गेले होते व या प्रांतांतून बिहारी व आसामी यांसारख्या भिन्न भाषा बोलणाऱ्या लोकांशीं सरकारानें त्यांची जोड केलेली होती. अशा प्रकारची भाषांनां न मानणारी देशविभागणी सामाजिक हिताच्या दृष्टीनें उपकारक होऊं शकत नाहीं. उलट ही विभागणी पुष्कळशी सहजगत्या घडून आलेल्या कारणामुळे जरी प्रथम ठरली गेली असली तरी ती तशीच कायम ठेवल्यापासून लोकांत असा सकारण समज उत्पन्न होतो कीं, ब्रिटिश सरकारनें ही जी विभागणी केली आहे ती बुद्धिपुरःसर केली असून तिचा हेतु लोकांत भेदबुद्धि माजावी असा आहे.

हिंदुस्थानांत काय किंवा यूरोपीय देशांत काय निरनिराळ्या लोकांमध्यें सामाजिक दळणवळण कमीअधिक होणें हें त्यांच्या भाषेवर अवलंबून असतें. ज्यांची भाषा एक, त्यांच्या भावना व कल्पना पुष्कळशा सारख्या सारख्या असतात. मग ते निरनिराळ्या प्रांतांत रहात असले तरी हरकत नाहीं. मुंबई इलाख्यांत मराठी बोलणारे जे लोक आहेत त्यांची गुजराथ्यांशीं जितकी सहानुभूति असते त्यापेक्षां वऱ्हाडांतील आणि नागपूर प्रांतांतील मराठी बोलणारांशीं अधिक सहानुभूति असते. हिंदुस्थानांतील जातींची वांटणी पहावी तर तीहि भाषावारीनेंच झालेली दिसते. मराठा जात मराठी बोलणाऱ्या देशांतच सांपडते. मराठी बोलणाऱ्या देशाबाहेर ही जात फक्त बडोदा आणि इंदूर या संस्थानांत सांपडते. पण हीं संस्थानें मराठ्यांचींच आहेत. लोकांच्या राजकीय वृत्ती आणि भावना तपासल्या तर त्याहि भाषेप्रमाणें भिन्न भिन्न आढळून येतात. सामाजिक चालीरीती भाषावारच वांटलेल्या दिसतात, म्हणजे ज्यांची भाषा एक त्यांच्या चालीरीती व राजकीय कल्पना वगैरे सारख्याच असतात. लोकांमध्यें कोणत्याहि तऱ्हेचा सारखेपणा असणें ह्याला सामाजिकदृष्ट्या पुष्कळ किंमत आहे. या सारखेपणापासून समाजाचें पुष्कळ प्रकारचें हित होतें म्हणून भलत्याच रीतीनें राजकीय विभागणी करून देशांतील विवक्षित लोकांमध्यें असलेलें साम्य नाहींसें करण्याचा प्रयत्न करणें बरें नव्हे व असें करण्याची खरोखरी जरूरहि नसते.

आज जी देशाची वांटणी झालेली आहे ती बदलून त्याची भाषावार पुनर्विभागणी करणें हें लोकांनां व सरकारलाहि पुष्कळ फायदेशीर होईल. प्रथम आपण सरकारला अशा विभागणीपासून कोणते फायदे होतील हें पाहूं.

**सरकारचें हित.**—सरकारला पहिला फायदा हा कीं सिव्हिल सर्विसमधल्या लोकांनां एकच भाषा शिकावी लागेल व त्यामुळें ती त्यांनां चांगली शिकतां येईल. सध्यां असें होतें कीं, अंमलदार एखाद्या जागेवर नेमला गेला म्हणजे तेथील स्थानिक भाषा मोठ्या मेहनतीनें शिकूं लागतो. एक दोन वर्षांत त्याची तेथून दुसरीकडे अगदीं वेगळी भाषा असणाऱ्या ठिकाणीं बदली होते. असें झाल्यानें सिव्हिलियन अंमलदारांनां कोणतीच देशी भाषा मन लावून शिकावीसें वाटत नाहीं. ह्याच अंमलदार जर एक भाषा बोलणाऱ्या प्रांतांत नेमला जाईल तर तो तेथील भाषा नीट शिकून घेईल व त्या

भाषेच्या वाङ्मयाचाहि चांगला अभ्यास करील. हिंदी वाङ्मय, हिंदी नाटकें वगैरे यांजकडे तो अधिक लक्ष देऊं लागेल व त्यायोगें त्याला लोकप्रियता प्राप्त होऊन त्याचा परकीपणा लोकांनां फारसा भासणार नाहीं. सरकारचे अंमलदार लोकप्रिय झाले म्हणजे त्यायोगें सरकारसत्ताहि लोकप्रिय होण्यास वरीच मदत होते. भाषा अंमलदारांनां नीट आल्या-कारणानें त्यांचें मनोगत हिंदुस्थानच्या लोकांनां नीट उमजेल आणि त्यांनांहि येथील लोकांचें म्हणणें नीट समजून घेतां येईल.

दुसरा फायदा असा होईल कीं, सरकारला विद्याखात्यांत पुष्कळ सुधारणा करतां येईल. आजच्या परिस्थितींत विद्या-खात्याचें क्षेत्र फार नियमित झालें आहे. एकदां भाषावार प्रांतरचना झाली म्हणजे या प्रान्तिक भाषेच्या द्वारा लोकांनां अधिक शिक्षण देतां येईल. आज विद्याखात्याला फारसें काम करितां येत नाहीं व त्यामुळें लोकांचा समज असा झाला आहे कीं, देशांतल्या भाषा नाहींशा करण्याचा ब्रिटिश सरकारचा प्रयत्न आहे. कांहीं ब्रिटिश अंमलदारांनीं येथील भाषासंबंधानें आपलें विरोधी मत पूर्वी व्यक्त केलेलें आहे यामुळें आणि ब्रिटिश सरकारच्या अडचणी लोकांनां न कळल्यामुळें त्यांचा वरीलप्रमाणें समज होतो. अर्थात् देशी भाषांत चालणारीं पुष्कळशीं वर्तमानपत्रें सरकारशीं फार विरोध करतात.

आयर्लंड व स्काटलंड येथील भाषांनां इंग्लंडनें नामशेष करून टाकलें आहे ही गोष्ट लक्षांत घेऊन हिंदुस्थानांतील भाषांची तीच वाट लावून हिंदुस्थानांतील लोकांनां राष्ट्रभावनाशून्य करण्याचा इंग्रजांचा बेत आहे असें ते अनुमान काढतात.

वर सरकारला भाषावार प्रांतरचना केल्यापासून जे फायदे दाखविले आहेत त्यांत आणखी एका गोष्टीची भर घातली पाहिजे ती ही कीं, सरकारला आपले सरकारी कागदपत्र देशी भाषेंतून प्रसिद्ध करून आपली बाजू लोकां-पुढें मांडण्याचें काम अधिक जोरानें करतां येईल. प्रांतांत चार पांच भाषा असल्या म्हणजे प्रत्येक भाषेंत सरकारचें म्हणणें प्रसिद्ध करणें अवघड होतें. त्याच प्रांतांत एकच भाषा असल्यास प्रांतिक सरकारास हें काम सोपें होऊन मोठ्या प्रमाणावर करतां येईल.

**लोकहित.**—आतां लोकांनां जे फायदे होतील ते पाहूं. एकतर एका प्रांतांतील लोकांमध्यें परस्परांचें म्हणणें सर्वांनां नीट समजून सलोखा अधिक उत्पन्न होईल व त्यायोगें सर्वांचें पुष्कळ हित होईल. दुसरें, हिंदुस्थानच्या भाषांची अधिक काळजी घेतली जाईल व त्यायोगें त्यांची वाढ नीट होईल. तिसरें देशी भाषांच्या द्वारा शिक्षण देण्याची व्यवस्था अधिकाधिक झाल्यानें उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थांचा फायदा घेणारे लोक अधिकाधिक निघतील व त्यायोगें लोकसमाजाचें पाउल जोरानें पुढें पडत जाईल.

देशाचे राजकीय विभाग चांगल्या तत्त्वावर केले जातील व देशीभाषांनां योग्य तें स्थान दिलें जाईल तेव्हांच सर्व देशाला सामान्य अशा राष्ट्रीय संस्कृतीची इमारत बांधावयाला आरंभ झाला असें होईल. पाश्च्यात्त्यांपासून ज्या शास्त्रीय शोधांचा फायदा आपण घेणार ते शोध आपल्या लोकांनां परिचित करावयाचे तर त्यांच्या मातृभाषांच्या द्वाराच हें काम झालें पाहिजे. देशभाषांचा दर्जा जसा आपण वाढवूं तसे देशांतील बहुसंख्याक लोक महत्त्वाला चढतील. राजकीय दृष्टीनें आणि सामाजिक दृष्टीनें देशांतील बहुजनसमाज आपलें खल प्रस्थापित करूं लागला म्हणजे देशांत राहणीचा सारखेपणा वेगानें वाढत जाईल आणि जी एक सामान्य राहाणी म्हणून ठरेल ती देशांतील अल्पसंख्याक लोकहि बहुतांशानें स्वीकारतील. असें झालें म्हणजे देशांतील आर्थिक संबंध बदलतील व त्यांची पुनर्घटना करावी लागेल अथवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे आज जें अर्थशास्त्र जातवारीनें बांधलें आहे त्याच्या जागीं भारतीय अर्थशास्त्राची उभारणी होऊन नव्या आर्थिक युगाला आरंभ होईल.

वर वर्णन केलेल्या विकासास अधिक त्वरित गति देण्या-साठीं राष्ट्रीकरणाचें व्यावहारिक स्वरूप समजलें पाहिजे. दोन विविध संस्कृती नष्ट होऊन तिसरी संस्कृति उत्पन्न होईल किंवा एक संस्कृति दुसऱ्या संस्कृतीस आत्मसात् करून सर्वांस सामान्य अशी एक संस्कृति देशांत उत्पन्न होईल हा प्रश्न भवितव्याच्या काळोखांत लपला गेला आहे. राष्ट्रीकरण किंवा एकसंस्कृतिकरण साममूलक नसून दंडमूलक आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं जें काय एकीकरण होणार तें रक्तपातामुळेंच उत्पन्न होईल, तर दोन बाजूच्या लोकांनीं तडजोडीनें तुमचें काय ठेवावयाचें व आमचें काय ठेवावयाचें या विषयींचा तहनामा करून सामान्याचार उत्पन्न करावयाचे ही कल्पना यश पावणें अशक्य आहे. जें काय शक्य दिसतें तें हें कीं दोन समुच्चयांपैकीं प्रत्येक समुच्चयाच्या संस्कृतीच्या ज्या अंगास अधिक बल असेल तें त्या समुच्चयाच्या संस्कृतीचें अंग टिकेल आणि विरुद्ध संस्कृतीचें तत्सदृश अंग विलयास जाईल. तसेंच जो समाज अधिक बलवान् त्याचीं अधिक अंगें टिकतील. म्हणजे नवसंस्कृतींत जीं पूर्वसंस्कृतीचीं अंगें शिल्लक राहतील तीं संग्रामांतर्गत बलामुळें टिकून राहतील.

तडजोडीचा संप्रदाय उत्पन्न होऊन तो कधीं कधीं मूलभिन्न समुच्चयांच्या संस्कृतींचें एकीकरण करूं पहातो पण त्यास देखील प्रत्येक संस्कृतीवर छाप टाकण्यासाठीं झगडावेंच लागतें.

**उदारमतवाद.**—संस्कृतीच्या एकीकरणाचीं वरील तत्त्वें लक्षांत घेऊन आपलें कर्तव्य काय ठरतें तें पाहूं. दोन समुच्चयांच्या ठिकाणीं राष्ट्ररूपी एक समुच्चय उत्पन्न करावा या इच्छेनें जो उपदेश हिंदुस्थानांत न्यायमूर्ति रानड्यासारख्या विद्वान् गृहस्थांनीं प्रसृत केला तो ज्या एका वाक्यांत सांठविला आहे असें "मी हिंदु नाहीं, मी मुसुलमान नाहीं, मी हिंदी आहे" हें उदारमताचें वाक्य होय.

राष्ट्रीकरणाचा यापेक्षां निराळा मार्ग रामदासांनीं उपदेशिला. "मराठा तेवढा मेळवावा आणि महाराष्ट्रधर्म वाढवावा" हें रामदासांचें वाक्य वारंवार उच्चारिलें जातें. त्या उपदेशाचा थोडक्यांत अर्थ म्हटला म्हणजे सदृश समाज एकत्र करावा आणि त्या सदृश समाजाचें साहृश्य इतरांवर लादावें. राष्ट्रीकरणासाठीं एका समुच्चयास संग्राहक बनलें पाहिजे आणि दुसऱ्या समुच्चयास संग्राह्य म्हणजे संग्रहणाचा विषय झालें पाहिजे. एका पक्षास आपला समाज वाढविण्याची इच्छा पाहिजे आणि दुसऱ्या समाजास त्या समाजाच्या समुच्चयांत शिरण्याची महत्त्वाकांक्षा पाहिजे. समाजवर्धिष्णु इच्छेशिवाय जो उदारमतवाद पसरतो तो स्वसमाजनाशक आहे. स्वसमाजवर्धनाची चळवळ जोराची नसतां जेव्हां उदारमतवाद सुरू होतो तेव्हां तो कोणा परक्या जयिष्णु समाजाच्या शिकवणीमुळें सुरु झाला आहे कीं काय इकडे लक्ष दिलें पाहिजे.

उदारमतवाद आपल्या देशांत "सुधारक" नांवाच्या संप्रदायाशीं बराच संलग्न आहे. पूर्वींच्या अनेक रूढींशीं झगडण्यामध्यें या संप्रदायानें आपलें बरेंच बल खर्च केलें आहे, तथापि या संप्रदायाच्या मतांचें ऐतिहासिक स्थान लक्षांत घेऊन विवेचन केलें पाहिजे आणि उदारमतवादानें ज्या मोकळिकी उत्पन्न करण्याची खटपट केली आहे त्यांची राष्ट्रीकरणाच्या तत्त्वाशीं कितपत संगति किंवा असंगति आहे याचा विचार केला पाहिजे.

एखाद्या विचारपद्धतीच्या ग्राह्याग्राह्यतेचें परीक्षण करतांना स्वतःची सामाजिक परिस्थिति अवलोकन करून त्या विचाराच्या अवलंबनानें त्या सामाजिक परिस्थितीवर म्हणजे व्यक्तिविषयक आणि समूहविषयक आयुष्यावर काय परिणाम होईल हें निरीक्षिलें पाहिजे. तसेंच आपला विचार अधिक सूक्ष्मपणें करण्यासाठीं ज्या कालीं, आणि ज्या स्थलीं उर्फ समाजांत विशिष्ट विचारपद्धति उत्पन्न झाली असेल त्या कालीं त्या समाजांत त्या विचारपद्धतीच्या अवलंबनानें कसा काय फायदा झाला अगर होण्याचा संभव आहे हें तपासून नंतर मग ती परिस्थिति आपल्या समाजांत आहे कीं काय हें पहावें, आणि मग त्या बाह्य विचारांची ग्राह्याग्राह्यता ठरवावी. स्वतःच्या समाजाची, आणि बाह्य समाजाची तुलना करीत असतां दोन्ही ठिकाणीं एकसारखींच व्यंगें आहेत आणि तीं व्यंगें दूर करण्यासाठीं कोणते सामाजिक उपाय योजिले जातात एवढेंच पाहून चालावयाचें नाहीं तर समाजनियंत्रणाचीं आणि समाजप्रगतीचीं करणयंत्रें आणि त्यांची शक्ति यांजविषयीं विचार केला पाहिजे. जेथें समाजप्रगतीचीं करणें जय्यत आहेत तेथें खटाटोप थोडा लागतो, आणि जेथें तीं करणें अस्तित्वांत नाहींत अगर नष्ट झालीं आहेत तेथें अनेक खटपटी फुकट जातात. एवढेंच केवळ नाहीं तर कार्याच्या शक्याशक्यतेवरूनच विचारांची ग्राह्याग्राह्यता म्हणजे वृद्धिकारकता अगर नाशकारकता ठरते. जेथें लोकांच्या हातीं सत्ता असते तेथें कांहीं बाबतींत औदार्य दाखविलें तर तें उपयोगी पडतें, जेव्हां लोकांच्या हातीं सत्ता नसते तेव्हां औदार्य अनेक प्रसंगीं नाशकारक होतें. सामान्य सिद्धांत प्रथम सांगून कालव्यय न करितां इंग्रजी "उदारमतवादाचा" स्वीकार आपण कितपत करावा हें हिंदुस्थानीय परिस्थितींत त्या औदार्यानें अकल्याण होईल कीं फायदा होईल हें पाहून ठरवूं आणि या बाबतींत समाजशास्त्रविषयक काय सिद्धांत बांधणें शक्य आहे हें मागाहून पाहूं.

इंग्लंडमध्यें प्रागतिक लोकांमध्यें उदारमतवाद पसरत आहे आणि या मतवादामुळें इंग्लंडचें आणि साम्राज्याचें पुष्कळ कल्याण झालें आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. उदाहरणार्थ, हिंदुस्थानामध्यें मतस्वातंत्र्यास मिळालेली वाव, ख्रिस्ती संप्रदायाचें शिक्षण इंग्लंडनें आम्हांवर लादलें नाहीं ही गोष्ट, तसेंच कॅथोलिक, ज्यू, इत्यादि संप्रदायांस इंग्लंडांत मिळालेलें उपासनास्वातंत्र्य आणि संस्कारस्वातंत्र्य इत्यादि गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे इंग्लंडमधील अन्याय नष्ट करण्यास आणि साम्राज्यांत सुखवृद्धि होऊन साम्राज्य बळकट करण्यास उदारमतवाद कारण झाला आहे हें उघड होतें. तथापि तेवढ्यावरून आपल्या देशांत सामाजिक आणि राजकीय सुधारणांचें प्रवर्तन करण्यास ही "उदारमतवाद" नांवाची विचारपद्धति उपयोगी पडेल असें मात्र नाहीं. उलट पक्षीं हिच्यावर जर अंधश्रद्धा बसली तर त्याच्या योगानें देशाचें आणि त्यांतल्या त्यांत हिंदुसमाजाचें मोठें नुकसान होणार आहे. तें नुकसान कसें होणार याचें स्पष्टीकरण पुढें येईलच.

उदारमतवादाचे आपण सामान्यतः दोन भाग पाडूं. पहिला भाग म्हटला म्हणजे शासनतंत्रानें काय करावें या विषयींचे अधिक मोकळीक देणारे विचार होत. या भागास आपण शासनविषयक उर्फ राजकीय औदार्य असें म्हणूं. दुसरा भाग म्हटला म्हणजे लोकांनीं मनांत आणि हृदयांत कोणते विचार आणि भाव बाळगावेत म्हणजे सरकारकडून अनियंत्रित असल्यामुळें लोकांस आपल्या मनाप्रमाणें वर्तन ठेवण्यास किंवा लोकमताच्या जोरावर नियमन करण्यास जें आचारक्षेत्र मोकळें असतें त्या क्षेत्रांत व्यक्तीस अधिक स्वातंत्र्य देणारे विचार होत. या

आचारविषयक विचारांस आपण सामाजिक औदार्य म्हणूं. या दोन विचारसमूहांत तीक्ष्ण भेद नाहीं. जे लोक स्वयंशासित आहेत त्यांच्यामध्यें खासगी आचारविचारांचें नियमन आणि सरकारी धोरण यांत पुष्कळशी सरूपता असते, आणि यासाठीं इंग्लंडमधील खासगी बावतींतील "उदारपणा" राजनीतीचा अंश समजून त्या दोहोंची युक्तायुक्तता एकत्र ठरविली पाहिजे. उलट हिंदुस्थानांतील उदारपणाचें परीक्षण जित आणि दुर्बल लोकांच्या राजनीतितत्त्वानुसार केलें पाहिजे.

"उदार" विचारपद्धतीचे वर सांगितलेले दोन भाग करण्याचें मुख्य कारण एवढेंच कीं, "उदार" अगर "अनुदार" विचारांनीं शासनतंत्रावर परिणाम करण्यास हिंदू लोकांस फारशी संधिच नाहीं. उदाहरणार्थ, मुसुलमान आणि ख्रिस्ती लोकांस ते पाखंडी आहेत असें म्हणून त्यांस आपण जाळून टाकावें, अगर त्यांस दुसऱ्या कोणत्या तरी रीतीनें होईल तितकें छळावें असे वेडे विचार जरी आपल्या मनानें घेतले तरी त्यांप्रमाणें कृति आपणांस शक्य नाहीं, कारण आपण पूर्णसत्ताधारी राजे कोठें आहोंत? शासनपद्धतीवर आपल्या विचारांचा परिणाम झाला तरी तो अत्यल्प होत आहे. पुढच्या दहा वर्षांत आपणांमध्यें उदारमतवाद जो पसरवावयाचा त्याचें कारण आम्हीं लोकांवर जुल्म करूं नये यासाठीं पसरवावयाचा असें मुळींच नाहीं. आम्हांस खेळखंडोबा करण्यास जर कांहीं अवकाश असेल तर तो आम्हीं जेवावें कोणावरोवर, कपडे कसे घालावेत, हजामत कशी करावी, जेवण्यांत कोणते पदार्थ खावेत, लग्नें कोणांवरोवर करावींत आणि तीं कशीं करावींत, लग्न लावण्यास भिक्षुक घरीं वोलवावा कीं नवरा-नवरीनें म्याजिस्ट्रेटाकडे जावें, इत्यादि गोष्टींसंबंधानें चळवळ किंवा पाहिजे तसें आचरण करण्यास परवानगी देण्यापुरता आहे. उपर्युक्त गोष्टींचा राजकारणाशीं संबंध नाहीं असें नाहीं पण तो फार दूरचा आहे. आपल्या देशांत राजकारणा-संबंधानें सुव्यवस्थित विचार झालाच नाहीं, आणि राजकारणाशीं वरील गोष्टींचा संबंध कसा पोंचतो हें आपलें आपणांस स्पष्ट झालेलें नाहीं. "उदारमतवादी" लोकांनीं वरील गोष्टींचा राजकारणाशीं संबंध येतो ही गोष्ट ओळखली आहे, आणि पुष्कळ देशाभिमानी लोक उदारमतवादानें प्रेरित होतात याचें कारण त्यांनीं तो संबंध ओळखला आहे हें होय. मात्र त्यांच्याकडून उदारमतवादास संमति मिळाली आणि त्याच्या प्रवर्तनासाठीं खटपट सुरू झाली ती त्यांजकडून सर्व गोष्टींचा सूक्ष्मपणें विचार न झाल्यामुळें आणि इंग्लंडमध्यें उदारमतवादामुळें इंग्लंडचें कल्याण होत आहे ही गोष्ट त्यांस ढळढळीत दिसत असल्यामुळें झाली हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

एवंच उदारमतवादाचें परीक्षण जें करावयाचें तें राजकीय उर्फ शासनविषयक ध्येयानुसार करावयाचें आहे, आणि येथें जे प्रश्न विचारासाठीं घ्यावयाचे ते सामाजिक होत. कारण राजकीय बावतींत उदारमतवाद अगर अनुदारमतवाद यांच्या अनुसार कार्य करण्यास आपणांस फारशी सवडच नाहीं. "उदारमतवाद" म्हणजे कांहीं नवा नाहीं. प्रत्येक देशांत निरनिराळ्या काळीं पूर्वस्थितींत उत्पन्न झालेल्या विचारांपासून अगर विचारजन्य मनोभावांपासून लोकांस सोडविण्यासाठीं आणि लोकांमध्यें सुखवृद्धि करण्यासाठीं कांहीं विशिष्ट तऱ्हेचे उदारमतवाद उत्पन्न होतात. स्टोइक्, एपिक्यूरियन् वगैरे विचारपद्धती ग्रीस देशांत पैदा होऊन त्यांचा रोमन साम्राज्यांत प्रसार झाला आणि रोमन साम्राज्यांत त्यांनीं एकलभाव, विश्वबंधुत्व आणि समानता हीं उत्पन्न केलीं. हीं उदारमतवादासारखींच मतें होतीं, आणि इंग्लंडमधील उदारमतवादाचे कित्येक पुरस्कर्ते आपली गुरुपरंपरा उर्फ विचारपरंपरा अगदीं तेथपर्यंत नेऊन भिडवितात. विशिष्ट तऱ्हेचें साम्राज्यकार्य व्हावयाचें होतें म्हणून त्या तऱ्हेच्या कल्पनांचा प्रसार रोमन साम्राज्यांत झाला. हिंदुस्थानांतील हिंदुमुसुलमानांतील दुही कमी होऊन हिंदुमुसुलमान बादशहाशीं राजनिष्ठ रहावेत यासाठीं मुसुलमानी उदारमतवाद अकवराच्या कारकीर्दींत कसा उदयास आला ही गोष्ट इतिहास-विश्रुत आहे. हिंदू लोकांची संस्कृति अधिकाधिक वृद्धिंगत व्हावी एतदर्थ हिंदुस्थानाच्या बौद्धिक इतिहासांत उदारमत-वादाचें प्राबल्य वारंवार झालेलें दिसून येतें. उदाहरणार्थ, आर्य हा शब्द प्राग्‌ऐतिहासिक काळीं जातिवाचक न रहातां गुणवाचक आणि पदवीवाचक बनला आणि "आर्य" या शब्दास उत्तमाचारयुक्त मनुष्य असा अर्थ उत्पन्न झाला हा त्या काळीं प्रसृत झालेल्या एक प्रकारच्या उदारमतवादाचाच परिणाम असावा. निरनिराळीं दैवतें आणि परमार्थसाधनें मान्य करून त्यांची वैदिक देवतांशीं सरूपता स्थापन केली. याच्या योगानें निरनिराळ्या अनार्य जातींचें श्रौतस्मार्तधर्मयुक्त समाजाशीं एकीकरण झालें हा देखील औदार्याचाच परिणाम होय. तसेंच निरनिराळ्या जातींचे आचारविचार पाहून त्यांचा समावेश धर्मशास्त्राच्या ग्रंथांत केला. उदाहरणार्थ राक्षस, गांधर्व आणि पैशाच हे विवाह धर्मग्रंथांत उल्लेखित केले, आणि धर्मग्रंथांत निरनिराळ्या जातींचे "धर्म" (कायदा) चौकसून राजानें ते अंमलांत आणावेत असा धर्मशास्त्रानें उपदेश केला. हें धर्मशास्त्रविषयक औदार्य समाजास एकसूत्री करण्यास कारण झालें. याच्या योगानें हलक्या जातींत देखील ब्राह्मण-निर्मित धर्मशास्त्राविषयीं आपलेपणा उत्पन्न झाला.

उदारमतवाद हा संघसाधक आहे. ज्या संघाची वृद्धि व्हावी असें आपलें मत असेल त्या संघाची वृद्धि होण्यासाठीं इतर संघांशीं एकल साधणाऱ्या योजक अगर भेदक वृत्ती घालवून द्याव्यात असें त्या संघाची वृद्धि करूं पहाणाऱ्या लोकांचें म्हणणें असतें. उदाहरणार्थ, माध्वांचे गुरु अलीकडे

महाराष्ट्रीय माध्वांस असें सांगतात कीं, तुम्हीं माध्व ब्राह्मणांबरोबरच लग्नें करा, मग तो तेलगु आहे अगर कानडी आहे इकडे पाहूं नका. रोमन कॅथोलिक संप्रदायाचे उपदेशक आणि गुरु असें सांगत असतात कीं, जात अगर राष्ट्र यांचा लग्नव्यवहारांत विचार करूं नका पण तुम्हीं प्राटेस्टंटांबरोबर लग्नें लावूं नका. पौरस्त्य कॅथोलिक स्त्रीपुरुषांबरोबर पाश्चात्त्य कॅथोलिक अनेक प्रसंगीं लग्नें करितात हें हिंदुस्थान, जावा, फिलिपाइन्स इत्यादि ठिकाणांकडे अवलोकन केलें असतां दिसतें. कॅथोलिकांस कॅथोलिक खिस्ती संप्रदाय वाढवावयाचा आहे आणि कॅथोलिक लोकांत राष्ट्रविषयक मनोभाव कमी होऊन संप्रदायविषयक मनोभाव वाढवावयाचा आहे यासाठीं त्यांचा कॅथोलिकांमध्यें राष्ट्रविषयक आणि जातिविषयक औदार्य वाढविण्याचा प्रयत्न आहे. कॅथोलिक संघ हा राष्ट्रघटनेस विरुद्ध होता, आणि इटालियन लोकांचें राष्ट्ररूपानें एकीकरण व्हावयास या संप्रदायानें बराच विरोध केला. जुन्या एखाद्या संघाचा नाश करून नवीन संघाची वृद्धि करणें हें सर्व उदारमतवादांचें धोरण असतें. एखाद्या काळीं चालू असलेल्या उदारमतवादाचें परीक्षण करूं लागतांना आपण असा प्रश्न विचारावा कीं, कोणत्या संघाच्या नाशार्थ आणि कोणत्याच्या अभिवृद्ध्यर्थ हा उदारमतवाद आहे.

अमेरिकेंत एक दुर्बल उदारमतवाद आहे. तो म्हणतो कीं, गोरा, नीग्रो, चिनी इत्यादि भेद, तसेच खिस्ती व ज्यू हे गोऱ्यांतील भेद, राज्यव्यवहारांत तसेंच सामाजिक व्यवहारांत आणूं नयेत. हा उदारमतवाद दुर्बल आहे असें म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, गोऱ्यांनीं काळ्या लोकांबरोबर लग्नें करावींत असें प्रसिद्धपणें म्हणण्याचें धैर्य तसल्या लग्नांची युक्तता पटलेल्या समाजशास्त्र्यांस देखील होत नाहीं. तथापि काळ्यांबरोबर लग्नें करण्यास हरकत नाहीं असें म्हणण्यास तयार असलेला वर्ग अत्यंत अल्प आहे, आणि जो आहे तो तीं तत्त्वें अमलांत मुळींच आणीत नाहीं. गोऱ्या बाईनें नीग्रोबरोबर लग्न लावलें म्हणजे ती बाई गोऱ्यांच्या जातींतून निघून काळ्यांच्या जातींत जाते. तथापि या अमेरिकन उदारमतवादाचें ध्येय राष्ट्राचें दृढीकरण करणें हेंच आहे.

ज्या समाजांत कांहीं बाबतींत उदारपणा दिसतो त्याच समाजांत दुसऱ्या कांहीं गोष्टींविषयीं अत्यंत अनुदारपणा असतो. राष्ट्रीकरणध्येयाच्या पूर्तीसाठीं त्यांस पुष्कळ उदार मतें देखील गुंडाळून ठेवावीं लागतात. उदाहरणार्थ, अमेरिकन लोकांचें असें मत आहे कीं मनुष्यास वाटेल तिकडे जाण्यास आणि वाटेल तो व्यवहार करण्यास स्वातंत्र्य असावें. त्यांची राष्ट्रस्थापनेची विचारपरंपरा व्यक्तिस्वातंत्र्य रक्षण करण्याची आहे. असें असतां, चिनी अथवा जपानी लोकांस अमेरिकेंत येण्यास त्यांनीं मज्जाव केला आहे आणि आतां हिंदूंस मज्जाव करण्याचा प्रयत्न त्यांनीं चालविला आहे. त्याचें असें मत आहे कीं, ज्या लोकांचा अंतर्भाव आपल्या राष्ट्रांत लग्नव्यवहारानें रक्त मिसळून होणार नाहीं त्या जातींस देशांत येऊं देणें बरोबर नाहीं, कारण त्यानें राष्ट्रीयत्व भंग पावेल. लोकसत्तात्मक राज्य आणि राष्ट्रसाधन हीं स्वतंत्रतेचीं मोठीं चहातीं आहेत असें मुळींच नाहीं. ज्यू अगर खिस्ती हा विचार मनांत न आणतां लग्नें करा असें जे लोक म्हणतात तेच लोक बाहेर देशांतून आलेल्या मनुष्यानें बाह्य पोषाख ठेवूं नये अमेरिकन पोषाखच घ्यावा म्हणून आग्रह करितात. जेथें हजारों इटालियन अगर जर्मन कुटुंबें आहेत तेथें देखील बाह्य शिक्षणसंस्था चालूं देत नाहींत. शिक्षण सर्व देशभाषेंतूनच झालें पाहिजे, नवागतानें भाषेनें इंग्रज आणि राष्ट्रानें म्हणजे जातीनें अमेरिकन झालें पाहिजे हीच त्यांची शासननीति आहे. अमेरिकन कायद्यानेंच सर्व व्यवहार झाला पाहिजे, बाहेर देशचा कायदा अमेरिकेंत बिलकुल ठेवावयाचा नाहीं, मनुष्य मूळ जातीनें इटालियन असो अगर जर्मन असो त्याचें अमेरिकेंत लग्न व्हावयाचें तें अमेरिकेंतल्या कायद्याप्रमाणेंच झालें पाहिजे, त्याच्या देशाच्या चालीप्रमाणें झालें तर तें लग्नच नव्हे, वगैरे कायद्याच्या बाबतींत सर्व लोकांचें एकीकरण करून कायद्यानें लोकांवर अमेरिकन एकाचारता लादली आहे. उदारमतवाद हा राष्ट्राच्या एकरूपतेस पाश्चात्त्य लोक आडवा येऊं देत नाहींत, तर राष्ट्राची एकरूपता साध्य होण्यासाठीं आणि राष्ट्राच्या एकरूपतेस अडचण करणाऱ्या भावनांस, संस्थांस, आणि आचारांस दुर्बल करण्यासाठीं उदारमतवादाचा आश्रय पाश्चात्त्यांकडून केला जातो. पारमार्थिक संप्रदायांच्या मार्फत लग्नें न होतां राष्ट्रनियुक्त अधिकाऱ्यांमार्फत लग्नें व्हावींत अशी जी त्यांची खटपट आहे ती केवळ उदारमतवादाचा प्रसार करण्यासाठीं नसून संप्रदायांचा लोकांवरील अधिकार कमी करून सर्वलोकयुक्त असें जें राष्ट्र त्याचा अधिकार वाढविण्याची ही मसलत आहे.

इंग्लंडमध्यें व कांहीं अंशीं पश्चिम यूरोपामध्यें जो उदारमतवाद झाला त्याचीं मुख्य अंगें येणेंप्रमाणें होत.

(१) शासनतंत्राचें परमार्थविषयक संघांपासून स्वातंत्र्य स्थापन करणें, आणि व्यक्तीवर परमार्थविषयक संघांचा ताबा कमी करणें.

(२) परमार्थविषयक संघांच्या शिकवणीमुळें आणि नियंत्रणामुळें माणसामाणसांत भेद पडून स्नेहविषयक, विचारव्यंजनाविषयक, आणि विवाहविषयक बाबतींत अडचणी उत्पन्न होतात त्या अडचणी नष्ट करणें.

(३) परमार्थविषयक मतांवर नागरिकत्वाचे हक्क अवलंबून राहूं नयेत अशी व्यवस्था करणें.

(४) लग्नव्यवहाराचा परमार्थाशीं संबंध न ठेवतां तें केवळ सामाजिक संस्कार आहेत अशी भावना उत्पन्न करणें.

(५) नागरिकत्वाच्या हक्कांचा उपभोग घेणारा वर्ग जितका अधिक होईल तितका करणें.

(६) स्त्रिया वगैरे वर्गांची परतंत्रता काढून टाकून होईल तितकी स्वतंत्रता त्यांस उपलब्ध करून देणें.

(७) "नैसर्गिक नियम" म्हणून जे कांहीं आहेत त्यांच्या कार्यास ज्या राजकीय कारणांनीं व्यत्यय येईल तीं कारणें नाहींशीं करणें.

याशिवाय दुसरीं कांहीं तत्त्वें या उदारमतवादी लोकांस मान्य होतीं. उदारमतवाद्यांनीं योजिलेले हे सर्व फेरफार राष्ट्राच्या वलास हितावह परंतु ख्रिस्ती संप्रदायाच्या वलास अहितावह होते. वर सांगितलेल्या तत्त्वांपैकीं कांहीं तत्त्वें आणि त्यांचें सामाजिक प्रयोजन हीं स्पष्ट केलीं पाहिजेत.

परमार्थविषयक संघ उर्फ "चर्च" याचें पाश्चात्त्य राजकारणांत काय स्थान होतें हें मागें १४ व्या प्रकरणांत स्पष्ट केलें आहे.

समाजाला वळकटी येण्यासाठीं एक गोष्ट अवश्य आहे ती ही कीं, समाजांतील उच्च वर्गांत मोडण्याची संधि वाटेल त्यास असावी आणि गुणानें व संपत्तीनें मनुष्य मोठ्या पदवीला चढला म्हणजे त्यास समाजांतील श्रेष्ठ स्थान उपलब्ध व्हावें. समाजांतील उच्च स्थानीं वसलेल्या वर्गास खालच्या वर्गाची घाण येऊं लागते, आणि त्यास खालच्यांस खालींच ठेवावेंसें वाटतें. या तऱ्हेची स्थिति आली म्हणजे समाजांत एक मोठा असंतुष्ट वर्ग वाढेल. तो वर्ग वाढूं नये म्हणून उदारमतवाद उत्पन्न व्हावा लागतो. इंग्लंडमध्यें शासनपद्धतीचें स्वरूप असें आहे कीं प्रत्यक्ष सत्ता ज्या वर्गाच्या हातांत त्या वर्गाला सामाजिक मोठेपणा नाहीं. त्यामुळें सामाजिक मोठेपणा ज्या सरदारवर्गांत आहे त्या सरदारवर्गांत सामान्य स्थितींत जन्मून महत्पदास पोंचलेल्या मनुष्याचा प्रवेश करून द्यावयाची आवश्यकता तेथें उत्पन्न झाली.

इंग्लंडमध्यें शासनपद्धतीची पूर्णता करण्यासाठीं उदारमतवादाचा उदय झाला. राजा, सरदार आणि जनता या त्रयीच्या सहकारित्वानें तथापि मुख्यत्वेंकरून जनतेच्या इच्छेनेंच शासन चालावें हें लोकांस युक्त वाटत होतें, आणि तें शासन दिवसानुदिवस निर्दोष करण्याचा प्रयत्न होत होता, व तें निर्दोष होण्यासाठीं लब्धाधिकार जनतेसच शिष्टल यावें हें अवश्य होतें आणि ही गोष्ट जनता आणि सरदार यांतील सामाजिक आणि सांस्कृतिक अंतर कमी झाल्यानेंच घडून येणें शक्य होतें. सरदारांनीं सामान्यांबरोबर लग्नव्यवहार करूं नये ही वृत्ति इंग्रज लोकांत आज देखील आहेच, तथापि पूर्वीं सरदारांमध्यें अशी वृत्ति होती कीं, ज्यांची सरदारी अधिक जुनी त्यांनीं नवीन बनलेल्या सरदारांबरोबर लग्नें करूं नयेत. हीच वृत्ति मोडण्यास कांहीं पिढ्या लागल्या. सरदारी उर्फ क्षत्रियत्व लोकांस राजमान्यतेनें मिळे त्या वेळेस कांहीं लोक व्यापारांत पैसा मिळवून त्यांतील अंश राजद्वारीं ओतून सरदार बनले. ते मूळचे जमीनदार देखील नव्हते. अशा काळीं नव्या सरदारांच्या अस्तित्वाचें समर्थन करणारे लोक असें दाखवूं लागले कीं, पहिल्या हेनरीच्या कारकीर्दीपासून जमीनदारीविरहित सरदार होते, त्यांनीं पुढें थोड्याबहुत जमिनी घेतल्या आणि त्यांस पुढें त्या गांवांच्या नांवानें लोक ओळखूं लागले. त्या काळीं नवीन सरदार आणि जुने सरदार यांच्यामध्यें भेद राहूं नये म्हणून खटपट होती. जो जुन्या घराण्यांतील सरदार नवीन झालेल्या सरदार घराण्यास तुच्छ लेखणार नाहीं तो उदारमताचा समजला जाई. अर्थात् हें उदारमत म्हणजे, अमुक वर्गानें अमुक वर्गाशीं कसें वागावें, राग कोणाचा करावा लोभ कोणाचा करावा इत्यादि जे सामाजिक भाव लोकांत वागत असतात त्या भावांची आणि शासननीतीची एकाग्रता करणारें यंत्र होतें. समाजशासन ज्या पद्धतीनें चालत आहे त्या पद्धतीनेंच चालत रहावें आणि ती पद्धति ज्या प्रसंगांनीं विघडेल ते प्रसंग टाळावेत अगर त्यांजवर उपाय योजावा ही वृत्ति समाजशासनाविषयीं विचार करणाऱ्या लोकांमध्यें असते. समाजाचें शासन बहुतांशीं सरदारांकडून होत असतां सरदारांमध्यें गृह्य आणि नैतिक तसेंच सांपत्तिक उच्चत्व रहाणें ही गोष्ट अवश्य आहे. पुष्कळ सरदार केवळ जमिनीचेच मालक असत आणि जमीनदारीचा मान देशामध्यें मोठा असे. तथापि कालांतरानें व्यापाराची आणि कारखान्यांची वृद्धि होऊन संपन्नतेस पोंचण्यास नवीन करणें उत्पन्न झालीं. जमिनीची मालकी एवढेंच संपत्तिसाधन राहिलें नाहीं. तथापि बड्या घराण्यांतल्या म्हणजे क्षत्रिय वर्गांतील लोकांनीं वैश्यवृत्ति करूं नये हा परंपरागत भाव लोकांत वागत होता, व पुष्कळदां असेंहि होई कीं, व्यापारी आणि कारखानदार पैसे मिळवून थाटामाटानें रहात, आणि त्यांच्या थाटमाटापुढें सरदारांचा थाटमाट फिक्का पडे. कधीं कधीं तर पुष्कळ सरदार मोडकळीस आले असल्यामुळें त्यांची स्थिति सामान्य लोकांच्या स्थितीपेक्षां देखील वाईट होई. अशा प्रसंगीं पैसे मिळविण्यासाठीं इतर धंदे करण्यास हरकत नाहीं अशी उदारमताची मीमांसा झाली. कारण सरदारास आपल्या मोठेपणाचें संरक्षण करण्यासाठीं पैशाची देखील जरूर असते. तसेंच सामान्य लोकांची शासनतंत्रांत सत्ता वाढली आणि सरदारांची कमी झाली. हळू हळू सामान्यांतून उच्च पदवीस चढणारांचा आणि सरदारांचा वस्तुतः एकच वर्ग झाला आणि अधिकाधिक होऊं पहात आहे. अशा वेळीं सामान्यजन व सरदारवर्ग यांचा विभक्तपणा राखणें योग्य नाहीं असें उदारमत झालें कारण शासननीति आणि सामाजिक भावना यांची एकमार्गता या औदार्यानें साध्य होते. तसेंच शासनविषयक फरकामुळें सामान्यवर्गाशीं सरदारांनीं मिसळावें,

लग्नव्यवहार करावा हें देखील योग्यच झालें. जो सरदार सामान्यांशीं मिसळतो तो लोकप्रिय होतो आणि या दोन्ही वर्गांच्या एकत्र मिसळण्यानें समाजास बल उत्पन्न होतें. लोकसत्तापक्ष बळावला म्हणजे राष्ट्रामध्यें एकस्वरूपता आणि एकलभाव वाढतो, तथापि समाजांतील सत्ता संस्कृतीनें आणि शिष्टाचारानें युक्त अशा वर्गांतच रहाते. शिष्टाचाराचा प्रसार सामान्यांच्या शिष्ट पुढाऱ्यांत होतो तो उच्चवर्गांच्या अनुकरणानेंच होतो आणि सामान्यवर्ग ह्याच संपत्तीमुळें, अधिकारामुळें आणि शिष्टाचारग्रहणामुळें शिष्टवर्ग बनतो. उदारमत हें जुना शिष्टवर्ग आणि नवा शिष्टवर्ग या दोहोंच्या एकीकरणास आणि समाजाचें आचारविषयक शासन एकाच वर्गाकडून व्हावें या ध्येयाच्या साधनास उपयोगी पडतें.

हिंदुस्थानामध्यें चातुर्वर्ण्यविषयक पुनर्घटना झाली पाहिजे असें जे म्हणतात त्यांच्या मनांतील हेतु परंपरागत शिष्टवर्ग आणि प्रत्यक्ष शिष्टवर्ग यांतील अंतर काढून टाकलें जावें ह्याच आहे.

**उदारमतवाद आणि स्त्रीस्वातंत्र्य.**—उदारमतवादाचा उपयोग स्त्रियांची स्थिति सुधारण्याकडे आणि त्यांस नागरिकत्वाचे हक्क अधिकाधिक देण्याकडे झाला. तथापि या उदारमतवादास समाजाची थोडीशी मान्यता जी मिळाली ती केवळ त्या मताच्या गोजिरवाण्या स्वरूपामुळें मिळाली नाहीं. पुष्कळ लोकांस असें वाटत असे कीं, व्यक्तींस कार्य करण्यास अधिक अवकाश मिळाला म्हणजे त्यांची उन्नति होते, आणि ती उन्नति राष्ट्रास हितावह आहे. पुरुषांच्या अस्तित्वभावनेंत आपलें अस्तित्व विसरून जाण्यापेक्षां आपल्या अस्तित्वाची स्त्रियांस अधिक जाणीव झाली म्हणजे स्त्रियांच्या अंगीं पुरुषांप्रमाणेंच आपण नागरिक आहों, केवळ पुरुषांची घटकाभर करमणूक करण्यासाठीं चित्रविचित्र रंगाचे कपडे धारण करणाऱ्या पाकोळ्या आपण नाहीं, अशी भावना उत्पन्न होईल व त्यांच्या अंगीं देशाभिमान अधिक वाढेल. स्त्रीशिक्षण इंग्लंडमध्यें जरी फारसें नाहीं तरी अमेरिकेंत पुष्कळच आहे. स्त्रियांच्या शिक्षणांत हा जो फरक झाला आहे तो केवळ शिक्षण हें स्त्रियांची उन्नति करणारें आहे म्हणून झालेला नाहीं. स्त्रियांस मास्तरणीची जागा हें एक पोटाचें साधन झालें असल्याकारणानें आणि प्रत्येक स्त्रीस मी लग्न होण्याच्या बाबतींत वगळली जाईन कीं काय अशी भीति वाटत असल्यामुळें स्त्रीशिक्षण थोडेंसें अधिक सरसावलें. संपन्न घराण्यांतील स्त्रिया शिक्षणाच्या भानगडींत पडत नाहींत. एवढें मात्र खरें कीं आजच्या संपन्न घराण्यांतल्या बायका पूर्वींच्या बायकांपेक्षां अधिक सुशिक्षित आहेत.

स्त्रियांचा आयुष्यक्रम सुखावह करणाऱ्या सर्व चळवळी स्त्रियांस अधिक व्यापक कार्यक्षेत्र असावें या बुद्धीनें झाल्या नाहींत. स्त्रियांच्या आयुर्नियमनांत फरक पडत आहे तथापि स्त्रीस्वातंत्र्याची आवड लोकांत वाढली आहे असें मात्र नाहीं; आणि जोंपर्यंत कांहीं नैसर्गिक नियम स्त्रीस्वातंत्र्याच्या आड येत आहेत तोंपर्यंत स्त्रीस्वातंत्र्य अशक्य आहे. पाश्चात्त्य देशांतील लोकांस स्त्रीस्वातंत्र्याची आवड अधिक आहे असें दिसत नाहीं. हिंदुस्थानांतील पुरुषांमध्यें जे मनोधर्म आहेत तेच त्यांच्यांतहि आहेत. तथापि आपणांस बायका कशा पाहिजेत याविषयींच्या अभिरुचींत फरक आहे. स्त्रिया ह्या पुरुषांच्या दृष्टीनें अत्यंत उच्च प्रकारचीं पाळींव जनावरें होत, असें विधान बहुतेक सर्व प्रकारचीं राष्ट्रें पाहून करण्यास हरकत नाहीं असें वाटतें. कित्येक लोकांस फार ओझें नेण्यास समर्थ असा बैल आवडतो, आणि कित्येकांस जो सजवून झूल घालून आणला असतां सुंदर दिसेल असा बैल आवडतो, कित्येकांस जो तोफा ओढून नेईल असा घोडा पाहिजे, आणि कित्येकांस सर्कशींत रंगणें घालणारा पाहिजे. ज्या तऱ्हेच्या जनावरांची मागणी लोकांत अधिक त्या तऱ्हेचीं जनावरें पैदा होतात. आजच्या स्त्रीशिक्षणाची गोष्ट तीच आहे. पूर्वीं लोकांस चार पायली दळण दळील अशी बायको आवडे, आज हारमोनियम वाजवून जी गाणें गाऊन दाखवील अशी आवडते. समाजांत स्त्रीशिक्षण आणि स्त्रीसंगोपन उत्पन्न व्हावयाचें तें नेहमीं पुरुषांच्या अपेक्षेप्रमाणें उत्पन्न व्हावयाचें. पुरुषांचें शिक्षण कसें असावें याचें नियमन आर्थिक, शासनविषयक, आणि परस्पर राष्ट्रव्यवहारविषयक परिस्थितीप्रमाणें होतें, आणि बायकांचें शिक्षण बहुतेक देशांत पुष्कळ अंशीं आर्थिक परिस्थितीप्रमाणें असतेंच, उदाहरणार्थ कांहीं बायकांस मोलमजूरीचें, कांहीं बायकांस जातीप्रमाणें कपडे शिवण्याचें, धोबीकामाचें अगर चांभारकामाचें शिक्षण लहानपणापासून मिळतें. ज्या बायकांस पोटाकरितां काम करावें लागत नाहीं असा वर्ग पांढरपेशा बायकांचा होय. त्या वर्गांतल्या बायकांचें शिक्षण आणि संगोपन जें व्हावयाचें तें त्यांस एक तर सभ्य रीतीनें पोट भरतां यावें या हेतूच्या सिद्धीसाठीं, अगर पुरुषांस रुचेल असा घांस स्त्रियांस कसें बनवावें या हेतूनें व्हावयाचें असतें. पुरुषांच्या अभिरुचीप्रमाणें स्त्रियांचें आचारस्वरूप बदलतें असें म्हटलें यावरून पुरुषांस अधिक उपयोगी आणि सुखावह असे गुण स्त्रियांमध्यें येऊं पहातात असें मात्र नाहीं. ज्या गोष्टी सहज दिसून येतात त्याच गोष्टी स्त्रियांमध्यें लौकर शिरतात. ग्रांथिक शिक्षण स्त्रियांस जें देण्यांत येतें तें देखील उपयोगाच्या दृष्टीनें दिलें न जातां पुरुषांच्या डोळ्यांत चटकन भरेल अशा स्वरूपाचें दिलें जातें. बाजारांत माल विकला जातो त्यांत टिकाऊ मालापेक्षां दिखाऊ मालच चटकन खपतो, त्याप्रमाणेंच स्त्रीशिक्षणाची गोष्ट आहे. हिंदुस्थानांत स्त्रियांच्या अंतःकरणाची ओळख करून घेण्याची संधि नसल्यामुळें, येथें बाहेरून दिसणाऱ्या गुणांच्या योगानें वधूपरीक्षण करण्याची प्रवृत्ति इंग्लंडपेक्षां

अधिकच असावयाची. अमेरिका, इंग्लंड वगैरे पाश्चात्त्य देशांत वैवाहिक प्रश्नासंबंधानें विचार करणाऱ्या तरुणांच्या मनांत ही मुलगी किती परीक्षा पास झाली आहे हा विचारच येत नाहीं. हिंदुस्थानांत कित्येक पुरुष, मॅट्रिकच्या सर्टिफिकिटावरच खूष होतात आणि एखादी मुलगी मॅट्रिकची परीक्षा पास झाली असली म्हणजे तिचें लग्न होणें सोपें होतें.

मॅट्रिकची परीक्षा पास झालेल्या मुलीपेक्षां जिला खरोखर उपयुक्त असें शिक्षण मिळालें असेल अशी कमी शिक्षणाची पण जी शिकली आहे असें लोकांस दाखवितां येईल अशी मुलगी मिळविण्याकडे कांहीं लोकांची प्रवृत्ति असावयाचीच आणि त्या वृत्तीचा परिणाम मुलींच्या शिक्षणावर व्हावयाचाच. स्त्रियांचें भवितव्य फायदेशीर लग्नावर अवलंबून असल्याकारणानें स्त्रियांचें शिक्षण अगदीं स्वतंत्रपणें होणें शक्य नाहीं. येथें स्त्रीशिक्षणावर व्याख्यान करण्याचा इरादा नाहीं तथापि एवढें मात्र सांगितलें पाहिजे कीं, स्त्रियांच्या आयुर्नियमनांत जी सुधारणा होते ती इतर गोष्टींपेक्षा पुरुषांची अभिरुचि सुधारल्यानेंच अधिक होते.

पाश्चात्त्य देशांत स्त्रियांचें आचरणस्वरूप गेल्या साठ वर्षांत पुष्कळ बदललें आहे, तथापि तें बदलण्याचें मोठें कारण म्हणजे स्त्रियांची उन्नति करावी हें ध्येय नसून बदललेली आर्थिक परिस्थिति आणि पुरुषांची बदललेली अभिरुचि हीं मुख्य कारणें आहेत. तसेंच स्त्रियांचें आयुष्य पाश्चात्त्य देशांत जें अधिक सुखावह आहे त्याचें कारण बऱ्याच अंशीं पाश्चात्त्यांचें दाक्षिण्य होय. हें दाक्षिण्य दुर्बलांविषयीं अनुकंपेच्या भावनेनें झालें असो, अगर स्त्रीसौंदर्य व तारुण्य यांच्या उपासनेमुळें असो, स्त्रियांचें आयुष्य त्यामुळें समाजांत अधिक सुखावह होतें खास.

**उदारमतवाद व राष्ट्रीकरण.**—इंग्लंडमध्यें उदारमतवाद झाला तो कांहीं विशिष्ट ऐतिहासिक परंपरेचें पर्यवसान होता. समाजांत समाजविषयक जीं मतें उत्पन्न होतात त्यांचा ऐतिहासिक परिस्थितीशीं निकट संबंध असतो. समाजशासन कोणच्या तत्त्वानुसार व्हावें याविषयीं भोंवतालची स्थिति अवलोकून सामाजिक तत्त्ववेत्ते मुत्सद्दी भावी कार्यनियमनासाठीं विचारमालिका उत्पन्न करितात. नवीन विचार, बहुधा समकालीन परिस्थितीच्या अवलोकनानें जी विचारपरंपरा देशांत एकसारखी उत्पन्न होत असते त्या परंपरेंत अंतर्गत असलेल्या विचारांचें परिणत स्वरूप असतात आणि समाजांतील लोकांचें आचरण पूर्वागत विचार आणि नवे विचार या दोहोंमध्यें कोठें तरी असतें. परंपरागत विचारांचे परिणतस्वरूपी जे विचार असतात त्या विचारांचा परिणाम समाजास पुष्कळ उपयुक्त असतो; उलट परक्या ठिकाणाहून आणलेले विचार रुक्ष भूमींत रुजत नाहींत. इंग्लंडमधील राजकीय आणि सामाजिक विचारांचें अवलोकन केलें म्हणजे आपणांस असें दिसून येईल कीं पूर्वीच्या विचारांत क्रमाक्रमानें थोडथोडा फरक होऊन तेथील विचार बदलत गेले आणि सामाजिक परिस्थितीशीं अत्यंत भिन्न अशा विचारांनीं समाजांत वेडगळपणा आला नाहीं. हिंदुस्थानांतील परमार्थसाधनपर विचाराचा इतिहास पाहिला म्हणजे अशीच उत्क्रांति आढळून येते. ही उत्क्रांति आणि तज्जन्य परमार्थविषयक सामाजिक ध्येय हें माधवाचार्यांनीं आपल्या शांकरदिग्विजय या ग्रंथांत व्यक्त केलें आहे आणि मराठींत कै. रा. रा. रघुनाथशास्त्री गोडबोले यांनीं आपल्या अर्वाचीन कोशाच्या प्रस्तावनेंत अवतरिलें आहे.

उदारमतवाद आणि राष्ट्रधर्म या दोहोंमध्यें एक सादृश्य आहे तें हें कीं, आजच्यापेक्षां निराळी स्थिति दोहोंसहि पाहिजे आहे. राष्ट्र बलवान् करावयाचें या ध्येयानें समाजांत जे फेरफार करावे लागतील आणि जी निराळी आचारपरंपरा उत्पन्न करावी लागेल तीच आचारपरंपरा कांहीं अंशीं उदारमतवादानें देखील उत्पन्न होईल आणि प्रत्यक्ष उपदेशहि जो करावा लागेल तो बराच उदारमताच्या प्रसाराचाच करावा लागेल. तथापि कांहीं बाबतींत राष्ट्रधर्म ज्या सीमा घालून ठेवील त्या सीमा आजच्या उदारमतवादानें घातलेल्या नाहींत. आपली संस्कृति व परंपरागत आचार आणि आपलेच कायदे गृहीत धरून त्यांत फेरफार करीत जाणें आणि हिंदुत्वाचें क्षेत्र अधिकाधिक विस्तृत करीत जाणें व त्यावरोबर स्वत्वाबद्दलचा अभिमान पण दृढ ठेवणें हा राष्ट्रधर्म होय. हिंदु या नांवाची व्याप्ति अधिक वाढवून त्यांत अधिकाधिक लोक घेणें हा राष्ट्रधर्म होय. केवळ ख्रिस्ती व मुसुलमान यांशीं अधिक चांगले संबंध उत्पन्न करणें हा उदारमतवाद होय. केवळ उदारमतवाद हिंदु या शब्दाची व्यापकता वाढवीत नाहीं आणि त्यामुळें बाह्य लोकांस घेऊन समाजांत पूर्णपणें प्रविष्ट करून देणें त्यास शक्य नाहीं.

अर्थात् आपणांस करावयाचें कार्य येणेंप्रमाणें होईल.

(१) सर्व जगाशीं व्यवहारास जुळतील असे हिंदूंचे आचार बनविणें.

(२) हिंदु संस्कृति म्हणजे आपल्या भाषा व आपलें पैतृक वाङ्मय यांविषयीं अभिमान उत्पन्न करणें.

(३) हिंदुसमाजाचें सदस्यत्व इतरांस उपलब्ध करून देणें एवढेंच नव्हे तर त्यांस तें सदस्यत्व हितावह होईल असा प्रयत्न करणें.

(४) हिंदुसमाजांतील लोकांस एकरूपता आणण्याचा प्रयत्न करणें आणि त्यासाठीं उच्चनीचपणाच्या सामाजिक कल्पनांस आळा घालणें.

(५) समाजांत कार्यकर्त्या संस्था निर्माण करून समाजाची कार्यशक्ति वाढविणें.

## उपप्रकरण २ रें.

## राष्ट्रधर्म व राजकीय बल.

**राजकीय बलाची वृद्धि.**—देशांतील लोकांचें राजकीय बल वाढवावयाचें ही आपली एक मोठी इतिकर्तव्यता होय. देशांतील सत्ता झुगारून देऊन स्वतंत्र राज्यस्थापना करावी अशा भावनेचा जो पक्ष देशांत आहे त्या पक्षाच्या अलीकडील प्रयत्नांचा इतिहास रौलट कमेटीच्या रिपोर्टांत दृष्टीस पडेल. त्यांतील सार कमेटीच्या शब्दांतच थोडक्यांत पुढें दिलें आहे.

**क्रान्तिकारक चळवळ.**—"हिंदुस्थानांतील क्रांतिपक्षीय चळवळीशीं संबंध असलेल्या सर्व गुप्त कटांची चौकशी आम्हीं केलेली आहे. या चौकशीवरून आमच्या निदर्शनास असें आलें आहे कीं, मुंबई इलाख्यांत जे कट झाले ते निखालस ब्राह्मणांचे व त्यांतहि बहुतेक चित्पावनांचे कट होते. बंगालमधील कटवाले सुशिक्षित मध्यम वर्गांतील तरुण लोक होते. या बंगाली कटवाल्यांनीं जी चळवळ केली ती फार व्यापक व चिकाटीची आणि कुशलतेनें चालविलेली अशी होती. त्या चळवळीच्या योगानें त्यांच्या स्वतःच्या प्रांतांत खून व दरोडे यांची एक लांबलचक मालिका उत्पन्न झाली. बहार, ओरिसा, संयुक्तप्रांत, मध्यप्रांत व मद्रास या प्रांतांत बंगाली चळवळीचीं मुळें रुजलीं नाहींत. या ठिकाणीं मधून मधून एखादा गुन्हा झाला, किंवा दंगाधोपा झाला एवढेंच कायतें. पंजाबमध्यें अमेरिकेंत राहिलेले जे पंजाबी लोक परत आले ते रक्तपात करावयाचा व क्रांति करावयाची अशा निश्चयानेंच आले होते, त्यामुळें तेथें अनेक खून व दरोडे झाले आणि १९१५ ची 'गदर' कटाची चळवळ निर्माण झाली. ब्रह्मदेशांतहि 'गदर' चळवळ चाललेली होती. परंतु तिला सरकारकडून लवकरच प्रतिरोध झाला व ती बंद पडली. एक मुसुलमानांचा कटहि झालेला होता. या कटांत थोडेसेच माथेफिरू होते परंतु त्यांचा उद्देश बाह्यांची मदत घेऊन ब्रिटिश सत्ता उलथून पाडण्याचा होता. वर सांगितलेल्या सर्व कटांचा उद्देश ब्रिटिशांची हिंदुस्थानांतून जबरदस्तीनें उचलबांगडी करणें हा एकच असल्याचें आमच्या नजरेस आलें आहे. हे कट केव्हां केव्हां स्वतंत्रतेनें व आपआपल्या जागीं काम करीत होते तर केव्हां केव्हां त्यांचा परस्परसंबंध होता. केव्हां केव्हां त्यांनां जर्मनीकडून पैशाचा पुरवठा होऊन उत्तेजन मिळालेलें आहे. हिंदी लोकांच्या राजनिष्ठेच्या मदतीनें या सर्व कटांचा उद्देश हाणून पाडला गेला आहे. परंतु या कार्यांत सरकारला आपल्या असाधारण कायदे करण्याच्या शक्तीचा उपयोग करावा लागला आहे. सदरील कट फार चतुरतेनें रचलेले होते व सामान्य कायद्यांनां ते दाद देत नव्हते ही गोष्ट लक्षांत ठेवली म्हणजे कटांसाठीं असाधारण कायद्यांचा प्रयोग सरकारला करावा लागला या गोष्टीचें आश्चर्य वाटणार नाहीं."

लोकांचें बल वाढतें तें केवळ एक तऱ्हेच्या प्रयत्नानें वाढत नाहीं. सर्व प्रकारच्या विद्यांस उत्तेजन दिल्यानें, प्रत्येक मनुष्याची कर्तृत्वशक्ति अधिकाधिक वाढल्यानें आणि देशांत मोठमोठे कारखाने, मोठमोठ्या पेढ्या निघाल्यानें शक्तीची जी वाढ होते ती मोठी होते. परंतु लोकसामर्थ्य वाढविण्याचे हे प्रयत्न आणि राजकीय प्रयत्न यांत भेद आहे. राजकीय अधिकार लोकांनां अधिकाधिक मिळावेत यासाठीं जो प्रयत्न होतो तो राजकीय प्रयत्न होय. या प्रयत्नाची दिशा कशी काय असावी हें सांगण्याचें येथें प्रयोजन नाहीं, तथापि आजपावेतों असे प्रयत्न कोणकोणते झाले त्यांची हकीकत दिली पाहिजे.

लोकमत एकत्र करून त्याचा सरकारवर परिणाम घडवावयाचा आणि शासनपद्धति बदलावयास लावावयाची या हेतूनें पुष्कळ संस्था निघाल्या आहेत. विशिष्ट हितसंबंधांच्या सदरील हेतूच्या अनेक संस्था देशांत असून या सर्वांस व्यापून टाकणारी मध्यवर्ती संस्था म्हणजे राष्ट्रीय सभा उर्फ कांग्रेस होय.

**राष्ट्रीय सभा.**—राष्ट्रीय सभेची संस्थापना इ. स. १८८५ ह्या वर्षीं झाली असून तिला अस्तित्वांत आणण्याचें बहुतेक सर्व श्रेय कैलासवासी ॲलन् ऑक्टेव्हिअन ह्यूम यांजकडेच आहे. ह्यूम साहेबांचे वडील जोसेफ ह्यूम हे ब्रिटिश पार्लमेंटचे एक सभासद असून ते आपल्या रॅडिकल उर्फ आमूलसुधारणावादी (जहाल उदारमतवादी) तत्त्वांकरितां फार प्रसिद्ध होते. ॲलन ऑक्टेव्हिअन ह्यूम हे इंडिअन सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरून हिंदुस्थानांत आले. येथें त्यांनीं आपलें काम चोख रीतीनें बजावल्यामुळें लवकरच पुढें ते प्रसिद्धीस आले. १८५७ सालीं हिंदुस्थानांत बंड झालें तेव्हां ते या देशांत नुकतेच आले असून इटावा येथें कलेक्टर व मॅजिस्ट्रेट होते. तेथें त्यांनीं बंड उग्र स्वरूपांत येण्यापूर्वींच त्याचा बंदोबस्त करून सरकारची एक मोठीच कामगिरी बजाविली. तिजमुळें त्यांनां सरकारकडून 'सिव्हिल कंपॅनिअन ऑफ दि बाथ' ही त्या वेळीं फारच बहुमानाची अशी समजली जाणारी पदवी अर्पण करण्यांत आली. अशा रीतीनें मोठमोठ्या हुद्द्यांचीं कामें उत्तम प्रकारें पार पाडून शेवटीं ते हिंदुस्थान सरकारच्या होम सेक्रेटरीच्या जागेपावेतों चढले व याच कामावर असतांना त्यांची नोकरी पुरी होऊन त्यांनीं वृद्धवेतन घेतलें. त्या वेळीं हिंदुस्थानांत लॉर्ड लिटन (१८७६–८०) यांच्या कारकीर्दींतील धोरणामुळें असंतोष उत्पन्न झाला होता. 'कृष्ण कायदा' या नांवानें प्रसिद्धीस आलेला व्हर्नाक्युलर प्रेस ॲक्ट व अफगाणिस्थानचा अमीर शेरअल्ली याशीं निष्कारण वैर केल्यामुळें उपस्थित झालेलें दुसरें अफगाण युद्ध या दोन गोष्टींवर तत्कालीन नेमस्त म्हणून गणल्या जाणाऱ्या मुत्सद्द्यांकडूनहि देशांतील सर्व भागांतून टीकेचा भडिमार होत होता. अशा स्थितींत हिंदी जनतेच्या तक्रारी सरकारपुढें मांडण्याकरितां परिषदेसारख्या एखाद्या संघटनेची

आवश्यकता भासूं लागली व या परिषदेची निर्दोष पायावर उभारणी करून तिला कायम स्वरूप कसें देतां येईल यासंबंधीं निरनिराळ्या प्रांतांतील विचारी पुढाऱ्यांत पत्रव्यवहार सुरू झाला. लिटन साहेबानंतर व्हाइसराय होऊन आलेले लॉर्ड रिपन यांच्या कारकीर्दीत ह्या कल्पनेस चेतना व उत्तेजन मिळालें. इ. स. १८८३ मध्यें ह्यूम साहेब सरकारी नोकरींतून बाहेर पडले तेव्हां ही कल्पना इतकी परिपक्व दशेस आली होती कीं, त्याच वर्षी जॉन ब्राइट व स्टॅगप्रभृति पार्लमेंटांतील हिंदुस्थानची कळकळ बाळगणाऱ्या मित्रांकडून तिला पाठिंबा मिळतांच ह्यूम साहेबांच्या सहानुभूतियुक्त मदतीनें एक संघ निर्माण झाला. ह्यूम साहेब हे हिंदुस्थानांत घडत असलेल्या सर्व गोष्टींचें शांतपणें पण दक्षतापूर्वक निरीक्षण करीत आले होते. हिंदुस्थानची आर्थिक, सामाजिक व राजकीय स्थितींत सुधारणा घडवून आणण्यास त्यांच्या मनाची पूर्ण तयारी झाली असल्यामुळें राष्ट्रीय सभेच्या चळवळीस आपण कांहीं तरी प्रत्यक्ष मदत केली पाहिजे असें त्यांनां वाटूं लागलें. निरनिराळ्या प्रांतांतील पुढाऱ्यांशीं त्यांचा यासंबंधांत पत्रव्यवहारहि चालू होता. येथें एक गोष्ट नमूद केली पाहिजे कीं, राष्ट्रीय सभेची कल्पना गर्भावस्थेंत होती तेव्हां ह्यूम साहेब हे सिमल्यास गेले असतांना त्यांनां लॉर्ड डफरिन यांचा या संबंधांत सल्ला घेण्याची संधि मिळाली होती. त्या वेळीं ह्यूम साहेबांचीं मतें डफरिन साहेबांस पूर्णपणें पसंत पडलीं होतीं व ह्यूम साहेबांस डफरिन साहेबांकडून बरेंच उत्तेजनहि मिळालें होतें ही गोष्ट खरी आहे.* पुढें १८८८ नंतर काय कारण झालें असेल तें असो. डफरीन साहेब राष्ट्रीय सभेवर उलटले. परंतु १८८८ सालीं दिसेंबर महिन्यांत जॉर्ज यूल ह्यांनीं अलाहाबाद येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेंत जें भाषण केलें त्यानें डफरीन साहेबांच्या वर्तनास चांगलेंच उत्तर मिळालें.

**कांग्रेसचा आरंभ.**—सर वुइल्यम वेडर्बर्न यांनीं मि. ॲलन ऑक्टेव्हियन ह्यूम यांचें जें चरित्र लिहिलें आहे त्यांत कांग्रेसला आरंभ कसा झाला त्यासंबंधानें कांहीं महत्त्वाचा मजकूर आहे तो खालीं दिला आहे.

सर ऑक्लंड कॅल्व्हिन हे संयुक्त प्रांताचे लें० गव्हर्नर असतांना त्यांनीं ह्यूम साहेबांस एक पत्र लिहून कांग्रेससभा काढणारांनीं फार घाई केली, कांग्रेससारख्या सभेची प्रतिष्ठापना होण्याचा काळ तेव्हांचा नसून ही सभा स्थापण्यापूर्वी हिंदुस्थानांत आणखी पुष्कळ सामाजिक वगैरे प्रगति व्हावयास पाहिजे होती, कांग्रेसची चळवळ ही देशाला अपायकारक आहे वगैरे विधानें त्यांत केलीं होतीं. या विधानांनां ह्यूम साहेबांनीं उत्तर देतांना कांग्रेससभा घाईनें व अवेळीं स्थापली गेली नसून सरकारच्या राज्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें असल्या सभेची स्थापना अत्यंत अवश्यक झाल्यामुळेंच आपण तिच्या स्थापनेचा प्रसंग घडवून आणला असें म्हटलें आहे. हा पत्रव्यवहार १८८८ च्या आक्टोबरमधील आहे. कांग्रेसस्थापनाविषयक असे ह्यूम साहेबांच्या पत्रांतील कांहीं उतारे येणेंप्रमाणें:—"माझ्या मनाप्रमाणेंच मला करतां आलें असतें तर आणखी कांहीं वर्षेंपर्यंत ही कांग्रेसची स्थापना मी पुढें ढकलली असती, पण मला व माझ्या ज्या सहकारी लोकांनीं कांग्रेस काढली त्यांनां आपल्या इच्छेप्रमाणें वागण्यास सवडच नव्हती. पाश्चात्त्य कल्पना, पाश्चात्त्य शिक्षण, शोध व साधनें हिंदुस्थानांत येऊन कांहीं दिवस झालेले आहेत व या मुदतींत त्यांनीं एक नवीन खळवळ उत्पन्न केलेली आहे. ही खळवळ जोरानें प्रसार पावून कांग्रेस स्थापनेच्या काळीं ती जमिनींत घुसून गुप्त कटांचें स्वरूप घेऊं लागली होती. अर्थात् जमिनीखालचा हा प्रसार थांबावा म्हणून लोकांच्या चित्तक्षोभाला उजेडांतली सनदशीर वाट काढून देणें अपरिहार्य झालें. ब्रिटिशांचें हिंदुस्थानांतील साम्राज्य राखावयाचें या अत्यंत जिव्हाळ्याच्या दृष्टीनें कांग्रेससंस्थापकांनां प्रश्न असा पडला होता कीं, ही कांग्रेस काढण्याची वेळ निघून तर नाहींना गेली ? देशांत इतका असंतोष माजला होता कीं, कांग्रेस काढलेली फुकट जाईल, लोक या कांग्रेसकडे न वघतां कटांचाच मार्ग पुढें चालवितील अशी धास्ती आम्हांला वाटत होती. देशांत इंग्रजांच्या कारवाईनें ज्या चळवळीच्या शक्ती उत्पन्न होऊन दिवसानुदिवस सारख्या वाढत चालल्या होत्या त्यांनां बॉयलर (वाफेच्या यंत्रा)मधील वाफेला बाहेर जावयास 'सेफ्टी व्हाल्व्ह' (संरक्षक द्वार) असतें त्याप्रमाणें एका तोंडाची अत्यंत आवश्यकता होती व आमच्या कांग्रेसनें हें आवश्यक तोंड निर्माण करून दिलें. आमची अशी खात्री आहे कीं, लोकांतील क्षोभाची वाफ सुरक्षितपणें बाहेर पडावयास हें कांग्रेसचें तोंड जितकें कार्यक्षम झालें तितकें दुसरें कांहींहि झालें नसतें. त्या वेळीं (म्हणजे मला वाटतें लॉर्ड लिटन जाण्यापूर्वी सुमारें सव्वा वर्ष) ज्या गोष्टीनें माझी अशी खात्री केली कीं, एक भयंकर स्फोट होऊन आपणांवर लवकरच मोठें संकट कोसळणार आहे ती गोष्ट अशीः ब्रह्मदेश, आसाम व इतर कांहीं लहान प्रांत वगळून बाकीच्या प्रदेशाचे कांहीं एका पद्धतीनें भाग पाडण्यासंबंधींचे सात मोठे ग्रंथ मला पाहण्यास मिळाले; त्यांत बऱ्याचशा कागदपत्रांची नोंद होती; हरएक प्रकारच्या देशी भाषेंतील रिपोर्टांचीं आणि बातम्यांचीं इंग्रजी भाषांतरें आणि कांहीं सारांश, जिल्हे (आपण पाडलेल्या जिल्ह्यांशीं असदृश), पोट-जिल्हे, तालुके, लहानमोठीं शहरें आणि गांवें अशा वर्गीकरणानें या ग्रंथांत घातले होते; या नोंदलेल्या गोष्टींची संख्या फारच मोठी होती; निरनिराळ्या तीस हजारांपेक्षांहि जास्त बातमीदारांकडून आलेल्या त्या बातम्या आहेत असा कांहीं जणांचा समज होता. अगणित वाटल्यामुळें मी त्या मोजल्या नाहींत; पण माझ्या फारच परिचयाच्या व निःसंशय

* Indian year Book 1914. Times of India.

तापदायक अशा वायव्य प्रांतांतील एका जिल्ह्यांतील शहरें व गांवें यांसबंधींच्या अजमासें तीनशें नोंदण्या त्यांत होत्या; त्यांतील पुष्कळशा लोकांचीं नांवें वगैरे बाबतींत त्या मला अर्धवट ताडून पाहतां येण्यासारख्या होत्या.

"बऱ्याचशा नोंदण्यांतून खालच्या दर्जाच्या लोकांचीं संभाषणें उद्धृत केलीं होतीं; त्यांचा सारांश इतकाच कीं हे गरीब लोक चालू कारभारासंबंधीं निराशेनें व्याप्त झालेले होते. त्यांची अशी वृत्ति होऊन चुकली होती कीं, आपण भुकेनें तडफडत मरून जाऊं, तेव्हां आपण 'कांहींतरी' केलें पाहिजे.........आपली जूट करून हे लोक 'कांहींतरी' करणार होते; आणि हें कांहींतरी म्हणजे अत्याचार, साहस इ. होतें, कारण अनेक नोंदण्यांतून जुन्या तरवारी, भाले आणि तोडीच्या बंदुका लपवून ठेवल्याचा उल्लेख होता; या जिनसा जरूरीच्या वेळेकरितां तयार ठेवल्या होत्या. प्रथमावस्थेंत याचा परिणाम सरकाराविरुद्ध वास्तविक एखादें बंड करण्यांत होईल असें कोणी मानीत नव्हतें तर, वैयक्तिक गुन्हे, तिरस्कृत लोकांचे खून, व्यांकवाल्यांच्या चोऱ्या, बाजारांची लुटालूट यांचा या परिस्थितीनें एकदम जोराचा स्फोट होईल असें मात्र निश्चित वाटत होतें. अर्धपोटीं राहणाऱ्या अगदीं खालच्या दर्जाच्या लोकांच्या स्थितीवरून असें वाटूं लागलें होतें कीं, प्रथमचे थोडे गुन्हे त्यांजसारख्या दुसऱ्या शेंकडों गुन्ह्यांनां आणि अराजकतेच्या सार्वत्रिक वाढीला कारण होऊन अधिकारी आणि प्रतिष्ठित वर्ग यांची पांचावर धारण बसवितील. शिवाय अशीहि खात्री वाटत होती कीं, जिकडे तिकडे पानावरील पाण्याच्या थेंबांप्रमाणें लहान लहान संघ मोठ्यांत मिळून जाऊं लागतील, देशांतील सर्व स्फोटक द्रव्यें एकत्र होतील आणि लवकरच हे संघ फारच मोठ्या प्रमाणाचे होऊन सरकारशीं सलोखा न ठेवणारे असे सुशिक्षित वर्गांपैकीं कांहीं थोडे लोक तरी या चळवळींत जिवावर उदार होऊन सामील होतील, कांहीं ठिकाणीं ते पुढाकार घेतील, आणि या स्फोटाला एकीकरणाचें स्वरूप देऊन राष्ट्रीय बंडाचें त्याला वळण देतील."

या उताऱ्यांवरून कांग्रेससभा निर्माण करण्याच्या मुळाशीं काय हेतु होता हें स्पष्ट कळून येईल. असो.

त्या वेळीं पुणें हें राजकीय चळवळीचें आगर असल्यामुळें राष्ट्रीय सभेच्या पहिल्या अधिवेशनाकरितां तीच जागा अगोदर पसंत करण्यांत आली होती. हें अधिवेशन १८८५ सालच्या नाताळांत व्हावयाचें ठरलें असून त्याकरितां पुण्यांत जोराची तयारीहि चालली होती. परंतु इतक्यांत तेथें पटकीचा उपद्रव सुरू झाल्यामुळें प्रतिनिधींनां अशा ठिकाणीं जमा करणें इष्ट न वाटून राष्ट्रीय सभा पुण्यास भरविण्याचा बेत तहकूब केला; व ती मुंबई येथें बांबे प्रेसिडेन्सी असोशिएशनच्या विद्यमानें भरविण्यांत आली. फिरोजशहा मेथा, काशिनाथ त्र्यंबक तेलंग व दिनशा एदलजी वाच्छा हे उद्योगी गृहस्थ त्या वेळीं ह्या असोशिएशनचे सन्माननीय चिटणीस होते. हिंदी जनतेचें मत कांहीं एक विपर्यास न करितां व्यक्त करणें हा या सभेचा मुख्य उद्देश असल्यामुळें तिला हिंदी राष्ट्रीय सभा हें नांव देण्याचें याच वेळीं ठरविण्यांत आलें.

राष्ट्रीय सभेच्या पहिल्या कांहीं वर्षांत तिचे उद्देश व ध्येय यांसंबंधीं इतकीं दिशाभूल करणारीं विधानें करण्यांत आलीं आहेत कीं, १८८८ सालीं अलाहाबाद येथें झालेल्या चौथ्या अधिवेशनांत स्वतः ह्यूम साहेबांनींच आपल्या भाषणांत राष्ट्रीय सभेचे जे उद्देश सांगितले ते येथें नमूद करणें अवश्य आहे. उद्देश कथन करण्यापूर्वी तें आपल्या प्रास्ताविक भाषणांत असें म्हणाले कीं, 'अर्वाचीन इतिहासांतील दुसऱ्या कोणत्याहि चळवळीनें हिंदुस्थानांतील लोकांच्या मनावर इतक्या थोड्या अवधींत इतका स्पष्ट पगडा अद्यापपर्यंत कधींहि बसविलेला नाहीं किंवा इतके हितकारक व दूरगामी परिणाम दुसऱ्या कोणत्याहि चळवळीपासून होतील असें वाटत नाहीं. हिंदुस्थानच्या कल्याणाकरितां कांहींएक गाजावाजा न करतां झटण्यासाठीं, बहुतेक सर्व या देशांतच जन्मास आलेले जे सुशिक्षित लोक कांहीं वर्षांपूर्वी एकत्रित झाले, त्यांच्या परिश्रमांचें राष्ट्रीय सभेची चळवळ हें-आज तेंच सर्वांत ठळठळीत व सुव्यक्त दिसत असलें तरी-केवळ एक दृश्य फळ आहे.' राष्ट्रीय सभेचीं मूलभूत तत्त्वें ह्यूम साहेबांनीं स्पष्ट केलीं तीं येणेंप्रमाणेंः (१) हिंदुस्थानच्या जनतेंतील परस्परभिन्न लोकांमध्यें राष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न करून त्यांचें एकीकरण करणें, (२) अशा रीतीनें निर्माण झालेल्या राष्ट्राची बौद्धिक, नैतिक, सामाजिक व राजकीय अशा सर्व बाजूंनीं आस्ते आस्ते सुधारणा घडवून आणणें, आणि (३) हिंदुस्थानास अन्याय्य व अपायकारक असलेल्या गोष्टींत फेरफार घडवून आणून तो देश व इंग्लंड यांच्या ऐक्याचें दृढीकरण करणें हीं आहेत.

**काँग्रेसमधील दुफळी व समेट.**—वर सांगितलेल्या मूलभूत तत्त्वांस धरून राष्ट्रीय सभेनें लोकांकडून निंदाप्रचुर टीका व तक्रारी यांचा भडिमार होत असतांहि इ. स. १९०७ पावेतों आपलें उद्दिष्ट कार्य अव्याहत चालू ठेविलें होतें. परंतु १९०७ सालीं राष्ट्रीय सभा सुरत येथें भरली असतां तेथें जमलेल्या प्रतिनिधींमध्यें पक्षभेदाचें वारें शिरून दोन तट उत्पन्न झाले; व त्यांच्या मधील भांडणें इतकीं विकोपास गेलीं कीं, शेवटीं राष्ट्रीयसभेचें तें अधिवेशन बंद ठेवणें प्राप्त झालें. या वेळेपावेतों काँग्रेसमध्यें नेमस्त पक्षाच्या लोकांचें प्राबल्य असून सुरतच्या काँग्रेसमध्यें ज्याला पुढें जहाल हें नांव प्राप्त झालें त्या पक्षाचे लोक प्रामुख्यानें पुढें आले. सुरतेस काँग्रेसमध्यें बखेडा होऊन ती बंद ठेवावी लागली. जहाल उर्फ राष्ट्रीय आणि मवाळ उर्फ नेमस्त पक्ष या दोन्ही पक्षांच्या परिषदा सुरत येथें

भरल्या. मवाळ पक्षाचे मुख्य मुख्य पुढारी लोक पुन्हां त्याच जागीं एकत्र झाले व पुढच्या राष्ट्रीयसभांचीं कामें निर्विघ्नपणें पार पाडतां येण्याकरितां कोणत्या उपायांचा व मार्गांचा अवलंब केला पाहिजे याचा विचार करून त्यांनीं राष्ट्रीयसभेकरितां एक लेखनिबद्ध घटना तयार केली. या घटनेच्या नियमांतील सर्वांत महत्त्वाचा भाग म्हणजे काँग्रेसचें धोरण हा होय. हें धोरण पूर्वीपासूनच ठरलेलें होतें. फरक एवढाच कीं राष्ट्रीयसभेचे उद्देश जे पूर्वी लेखनिविष्ट केलेले नव्हते ते आतां लेखामध्यें नमूद करण्यांत आले. हें धोरण पुढें दिल्याप्रमाणें आहे.

ब्रिटिश साम्राज्यांतर्गत स्वयंसत्ताक भागांमध्यें ज्या प्रकारची शासनपद्धति आहे त्याच प्रकारची शासनपद्धति हिंदुस्थानच्या लोकांकरितांहि प्राप्त करून घेणें व साम्राज्यांतील हक्क व जबाबदारी या दोहोंतहि इतर भागांबरोबर जोडीनें भागीदार होणें हे राष्ट्रीय सभेचे उद्दिष्ट हेतु आहेत; व ते प्रचलित शासनपद्धतीमध्यें सनदशीर मार्गानें आस्ते आस्ते सुधारणा घडवून आणून, राष्ट्रीय ऐक्य अधिकाधिक वृद्धिंगत करून, लोकांमध्यें सार्वजनिक कामाची आवड उत्पन्न करून व बौद्धिक, नैतिक, आर्थिक व औद्योगिक अशा सर्व बाजूंनीं व्यवस्थित रीतीनें देशाची उन्नति करून साध्य करून घ्यावयाचे आहेत.

हें जें येथें राष्ट्रीय सभेचें ध्येय म्हणून सांगितलें आहे तें आपणांस मान्य असल्याबद्दल व आपण तिच्या घटनेमध्यें जे नियम आहेत ते पाळण्यास तयार असल्याबद्दल प्रत्येक प्रांतांतील काँग्रेस कमिटी आपल्या भागांतून जाणाऱ्या प्रतिनिधींकडून त्यांनां पाठविण्याच्या अगोदर लेखी कबूली घेते.

ही घटना तयार करून पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें सर्वांस येण्यास मोकळीक असलेली सभा ( म्हणजे "क्रीड"वाल्या आणि बिनक्रीडवाल्या लोकांची सभा ) भरून तिजकडून पास झाली नाहीं आणि त्यामुळें ही क्रीडवाली काँग्रेस पूर्वीच्या काँग्रेसची धर्मयुक्त वारस नाहीं. हेंच विधान वारंवार जहाल पक्षाकडून पुढें मांडलें गेलें. तथापि जहालांस स्वतंत्र काँग्रेस भरवून हा दोष काढून टाकतां आला नाहीं. "मवाळ" नांवानें ओळखल्या जाणाऱ्या विशिष्ट पक्षानें आपली स्वतःची घटना बनविली, ती मान्य करणारांनांच फक्त परिषदेंत शिरकाव द्यावयाचा हें ठरविलें, आणि राष्ट्रीय सभा हें नांव मात्र घेतलें. जहालांस स्वतःची परिषद भरवितां न आल्यामुळें पुढें हीच विशिष्ट पक्षाची परिषद त्यांनां मान्य करावी लागली आणि तींतच आपला शिरकाव करून घ्यावा लागला.

**राष्ट्रीय सभेची घटना.**—राष्ट्रीय सभेच्या घटनेंतील नियम १९०८ पासून पूर्णपणें अमलांत येऊं लागले आहेत. राष्ट्रीय सभेंत जमलेल्या प्रतिनिधींनीं बहुमतानें एखादा फेरफार मंजूर केल्याशिवाय या नियमांत बदल होऊं शकत नाहीं. या नियमानुसार प्रत्येक प्रांतानें निवडून दिलेल्या देशांतील उत्तम उत्तम पुढाऱ्यांची एक कमिटी नेमण्यांत येते. हिच्यामधील सभासदांचीं नांवें राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष दरवर्षी आपल्या उन्नत स्थानावरून जाहीर करितात. राष्ट्रीय सभेचे माजी अध्यक्ष, चिटणीस व इतर अधिकारिवर्ग हे सर्व त्या कमिटींत खास ( एक्स ऑफिशिओ ) सभासद नेमण्यांत येतात व तिला 'ऑल इंडिया कांग्रेसकमिटी' असें म्हणतात. हिंदुस्थान सरकारचे जे प्रांतिक विभाग आहेत तेच राष्ट्रीय सभेच्या कामाकरितांहि प्रांतिक विभाग समजण्यांत येतात. प्रत्येक प्रांतांतील कमिटीस प्रॉव्हिन्शिअल कांग्रेस-कमिटी असें नांव असून राष्ट्रीय सभेस पाठवावयाचे प्रतिनिधी निवडण्याकरितां सभा भरविणें, राष्ट्रीय सभेमध्यें चर्चा करण्याकरितां विषय सुचविणें हीं व तदनुषंगिक दुसरीं कामें तिजवर सोंपविलीं आहेत. दरवर्षी राष्ट्रीय सभा बरखास्त करण्यापूर्वी पुढच्या वर्षीची राष्ट्रीय सभा कोणत्या ठिकाणीं भरावयाची हें जाहीर करण्यांत येत असतें. नाताळच्या सुट्टीची वेळ सर्व प्रकारच्या प्रतिनिधींस फार सोईची पडत असल्यामुळें आजपर्यंत राष्ट्रीयसभा नाताळच्या सुट्टीचा पहिला दिवस सोडून दुसऱ्या दिवसापासून भरविण्यांत आली आहे. ज्या शहरीं राष्ट्रीय सभा भरावयाची असते तेथील लोक या दिवसाच्या सहा महिने अगोदरपासून तिची तयारी करूं लागतात. ते एक स्वागतमंडळ बनवून त्याच्या अध्यक्षाच्या जागीं एखाद्या प्रसिद्ध पुढाऱ्याची योजना करितात. पैसे जमवून त्यांचा हिशोब ठेवणें, पत्रव्यवहार करणें, प्रतिनिधींनां उतरण्याकरितां जागेची सोय लावणें, त्यांच्या जेवण्याखाण्यासंबंधीं व्यवस्था करणें इत्यादि कामांकरितां ह्या स्वागतमंडळाच्या सभासदांतून निरनिराळ्या पोटकमिट्या नेमण्यांत येतात. ह्या पोटकमिट्यांतील मेहनतीचीं कामें करण्याकरितां तरुण उत्साही स्वयंसेवकांचीं पथकें बनविण्यांत येतात. पूर्वी बहुधा विद्यार्थिवर्गांतूनच हे स्वयंसेवक निवडून घेतले जात. परंतु विद्यार्थ्यांनीं कोणत्याहि राजकीय चळवळींत भाग घेऊं नये असा सरकारच्या विद्याखात्यानें हुकूम सोडल्यापासून ह्या स्वयंसेवकांची भरती धंदेवाईक लोकांमधून करण्यांत येऊं लागली आहे. ह्या स्वयंसेवकांस उत्तम प्रकारें शिस्तीनें वागण्याचें शिक्षण देण्यांत येऊन आपल्या मुख्याच्या हुकुमाप्रमाणें वागण्यास त्यांनां शिकविण्यांत येतें. राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनप्रसंगीं यांच्यावर फार जबर कामाचा बोजा पडतो. निरनिराळ्या भागांतून आलेल्या प्रतिनिधींचें स्टेशनवर स्वागत करणें, त्यांनां गांवामध्यें त्यांच्या उतरण्याकरितां नेमून दिलेल्या ठिकाणीं घेऊन जाणें, आलेल्या प्रतिनिधींचे निरोप व चिठ्याचपाट्या इकडून तिकडे नेणें व ते सांगतील तीं दुसरीं कामें करणें, अशीं—एकना दोन—अनेक कामें त्यांनां करावीं लागतात. अशा रीतीनें ते कांहीं एक

मोबदला न घेतां मोठ्या उत्साहानें व दक्षतेनें एक फार महत्त्वाची कामगिरी बजावितात व त्यामुळें त्यांनां एक प्रकारें शिस्तीचें शिक्षण मिळून सार्वजनिक हिताची वृत्तीहि त्यांच्या अंगीं थोडीफार बाणते. राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष शेवटीं समारोप करितांना ह्या स्वयंसेवकांच्या कामगिरीचा बहुमानपूर्वक उल्लेख करण्यास कधींहि विसरत नाहींत. पोटकमिट्यांकडे सोंपविण्यांत येणाऱ्या कामांमध्यें सर्वांत कठिण असें जर एखादें काम असेल तर तें काँग्रेसचा मंडप उभारणाऱ्या पोटकमिटीचें असतें. राष्ट्रीय सभेमध्यें प्रतिनिधींची संख्या किमान पक्षीं पांचशें व ज्यास्तींत ज्यास्त हजार किंवा त्याहूनहि अधिक असून त्याशिवाय वरेचसे लोक प्रेक्षक म्हणून येत असतात. त्यामुळें कमींत कमी ५००० माणसें बसूं शकतील एवढा मोठा मंडप तयार करावा लागतो. कांहीं कांहीं राष्ट्रीय सभांमध्यें प्रतिनिधी व प्रेक्षक यांची संख्या दहा हजारांपर्यंतहि जाऊन पोंचते. १८८९ सालीं सर विल्यम वेडरबर्न यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या राष्ट्रीय सभेमध्यें एवढी संख्या झाली होती. या सभेस ज्यांनीं पुढें १८९० सालीं पार्लमेंटमध्यें वाढविलेल्या कायदेकौन्सिलांचें पहिलें सुधारणाबिल आणलें ते चार्लस ब्रॅडला लंडनहून वेडरबर्न साहेबांबरोबर येऊन हजर राहिले होते. १९१२ पावेतों राष्ट्रीयसभेस येणाऱ्या प्रतिनिधीस वीस रुपये फी द्यावी लागत असे; परंतु आतां ती पंधरा रुपये करण्यांत आली असून त्यांच्या जेवण्याराहण्यावद्दलहि फारच माफक फी घेण्यांत येत असते. सुखवस्तू प्रतिनिधी स्वतःच्या खर्चानें स्वतंत्र बंगले भाड्यानें घेतात, परंतु परप्रांतांतून येणाऱ्या प्रतिनिधींपैकीं अधिकांश लोक बहुधा राष्ट्रीय सभेनें पुरविलेल्या जागेंतच येऊन राहतात. लहान शहरामध्यें इतक्या माणसांस उतरण्याकरितां लागणाऱ्या जागेची सोय करण्यास फारच प्रयास पडतात. याशिवाय खुर्च्या वगैरे दुसरें सामान पुरविण्याचें कामहि कमी जड नसतें, पण तें एक कर्तव्यच समजून लोक तें मोठ्या खुषीनें आपल्या अंगावर घेतात.

**राष्ट्रीय सभेची बैठक.**—मुंबई, कलकत्ता किंवा मद्रास यांसारख्या प्रमुख शहरीं मोठी सभा भरली असतां तिचा तो भव्य देखावा मनास फारच आल्हादकारक असतो. एवढ्या मोठ्या सभेंतहि श्रोतृसमाजाचें वर्तन नेहमीं सभ्यपणाचें असतें. दररोज पांच तासप्रमाणें तीन दिवसपर्यंत या सभेचें काम चालत असतें. मंडप तयार करतांना वक्त्याचा आवाज प्रत्येक कोनाकोपऱ्यांत देखील ऐकूं जावा अशी बहुधा काळजी घेण्यांत येते. मंडपांत जाण्यायेण्याकरितां शक्य तितके अधिक मार्ग ठेवण्याची व्यवस्था केलेली असते. अलीकडे गोषांतील स्त्रियाहि राष्ट्रीय सभेंतील चर्चेमध्यें विशेष लक्ष्य घालूं लागल्या असल्यामुळें त्यांच्याकरितां एक ग्यालरी मुद्दाम वेगळी राखून ठेवण्यांत येते. राष्ट्रीय सभेच्या कामाकरितां दरसाल कमींत कमी पंचवीसपासून तीस हजार रुपयांपावेतों खर्च लागतो. ह्या खर्च भागविण्याचीं साधनें म्हटलीं म्हणजे (१) ज्या प्रांतांत राष्ट्रीय सभेची बैठक व्हावयाची असते तेथील ह्या संस्थेवद्दल सहानुभूति बाळगणाऱ्या धनिक लोकांकडून मिळालेल्या देणग्या, (२) प्रतिनिधींपासून गोळा झालेल्या फीच्या पैशांतून लंडनमधील ब्रिटिश काँग्रेसकमिटीस अर्धी रकम देऊन राहिलेला भाग व (३) प्रेक्षकांचीं तिकिटें काढून गोळा झालेली रकम हीं आहेत. उपर्युक्त मार्गांनीं जमा केलेल्या निधींतून राष्ट्रीय सभेचा सर्व खर्च भागून शिल्लक राहण्याचा प्रसंग क्वचितच येतो. कांहीं कांहीं वेळां तर जमा झालेल्या रकमेपेक्षां खर्चच अधिक होऊन तूट मात्र आलेली आहे. काँग्रेस झाल्यानंतर स्वागतमंडळ आपल्या सवडीनुसार लवकरच तिच्या तीन दिवसांच्या कामाचा अहवाल प्रसिद्ध करतें. कांहीं वर्षेंपर्यंत काँग्रेसला लागूनच एक औद्योगिक प्रदर्शनहि भरविण्यांत येत होतें. याच प्रदर्शनापासून पुढें औद्योगिक परिषदेची उत्पत्ति झाली. ह्या सर्व प्रदर्शनांमध्यें १९०४ च्या राष्ट्रीय सभेबरोबर भरलेलें प्रदर्शन फारच यशस्वी झालें होतें.

स्वागतमंडळाकडील अतिशय महत्त्वाचें काम म्हणजे राष्ट्रीयसभेच्या अध्यक्षाच्या निवडणुकीसंबंधांत निरनिराळ्या प्रांतांतील कांग्रेसकमिट्यांचीं मतें मागविणें हें आहे. राष्ट्रीय सभेचा जो अध्यक्ष निवडावयाचा त्यासंबंधानें सामान्य नियम असा आहे कीं, तो केवळ राष्ट्रीय सभेमध्यें भाषणें करूनच नव्हे तर आपल्या प्रांतामध्यें त्या सभेचें कार्य व उद्देश यासंबंधीं लोकांमध्यें व्याख्यानें देऊन व शिक्षणप्रसार करून पूर्वी कित्येक वर्षांपासून तिच्या कामांत उत्साहपूर्वक भाग घेत आला असावा. तथापि हा नियम नेहमींच पाळण्यांत येतो असें नाहीं. १९१६ सालच्या कांग्रेसमध्यें अध्यक्षस्थान सर सत्यप्रसन्न (आतां लॉर्ड) सिंह यांस दिलें होतें. तथापि सिंह यांनीं पूर्वी कांग्रेसमध्यें क्वचितच भाग घेतला होता. जेथें कांग्रेस भरावयाची असते तेथील स्वागतमंडळाकडें प्रत्येक प्रांतिक कांग्रेसकमिटीनें तिला ज्या माणसांतून अध्यक्ष निवडून यावा अशी इच्छा असेल त्यांचीं नांवें सप्टेंबर अखेरपावेतों किंवा दुसऱ्या एखाद्या ठरलेल्या मुदतीपावेतों पाठवावीं अशी सर्व प्रांतांच्या कमिट्यांनां सूचना देण्यांत येते. या सर्व कमिट्यांनीं सुचविलेलीं नांवें स्वागतमंडळाकडे आल्यावर त्यांतून ज्याला अधिकांश मतें मिळालीं असतील तो अध्यक्ष निवडून आला असें समजण्यांत येऊन त्याचें नांव जाहीर करण्यांत येतें. निवडून आलेल्या अध्यक्षास त्याची निवडणूक झाल्याचें स्वागतमंडळाकडून रीतसरपणें कळविण्यांत आलें म्हणजे तो आपलें भाषण तयार करण्याचें काम हातीं घेतो. ह्या भाषणांत त्या वर्षांत घडलेल्या राजकारणांतील मुख्य मुख्य गोष्टींचें समालोचन करून कांग्रेसनें आपल्या बैठकींत कोणकोणत्या महत्त्वाच्या विषयांवर ठराव पसार करावे याचें दिग्दर्शन करण्यांत येतें. कांग्रेसचा अध्यक्ष हा स्वागतमंडळाचा

सन्मान्य पाहुणा असतो. उत्तमशा जागेंत त्याच्या राहण्याची व्यवस्था करण्यांत येते व त्याला सर्व प्रकारच्या सुखसोयी मिळवून देण्याकरितां प्रयत्न केले जातात. दोनचार स्वयंसेवक सदोदित त्याच्या तैनातींत राहत असतात. अध्यक्षाच्या तैनातींत रहावयास मिळणें हा एक ते मोठा मान समजतात. अध्यक्षाची स्वारी दाखल होतांच त्याचा बहुधा जयघोषपूर्वक सत्कार करण्यांत येतो व त्याची मिरवणूक काढून लोक आपला आनंद व्यक्त करितात. ज्यांनां शहरांतील आबालवृद्ध नरनारींच्या जयजयकारांत अशा रीतीनें रस्त्यांतून मिरवीत घेऊन जाण्याचा मान मिळाला असे कित्येक अध्यक्ष होऊन गेले आहेत.

राष्ट्रीय सभा उघडण्याच्या दिवशीं तिचे अध्यक्ष, जनरल सेक्रेटरी, सेक्रेटरी, स्वागतमंडळाचे अध्यक्ष व त्या प्रसंगास हजर असलेले राष्ट्रीय सभेचे माजी अध्यक्ष या सर्वांस घेऊन आपल्या उच्चासनावर येऊन बसतात. ही मंडळी स्थानापन्न होतांच कॉंग्रेसच्या बैठकीस सुरुवात झाली असें जाहीर करण्याकरितां एक घंटा होते. बैठकीच्या सुरुवातीस स्वागतमंडळाच्या अध्यक्षाचें भाषण होतें. ह्या भाषणांत ते प्रथम तेथें जमलेल्या प्रतिनिधींचें स्वागत करितात व आपल्या शहरामध्यें विशेष ध्यानांत ठेवण्यासारख्या अशा कोणत्या गोष्टी आहेत हें सर्वांच्या निदर्शनास आणून लोकांपुढें असलेल्या प्रांतिक व दुसऱ्या कांहीं प्रश्नांचा उल्लेख करितात. हें काम झाल्यानंतर लागलीच अध्यक्षांच्या निवडणुकीची औपचारिक सूचना पुढें आणून त्यांनां यथाशास्त्र त्यांच्या जागेवर अधिष्ठित करण्यांत येतें. सूचना पुढें मांडणारे गृहस्थ आपल्या भाषणांत अध्यक्ष कोण आहेत व त्यांनीं आपल्या देशाची कोणती सेवा केली आहे याची बहुधा श्रोतृवृंदास ओळख करून देतात. हें झाल्यावर अध्यक्ष टाळ्यांच्या गजरांत भाषण करावयास उभे राहतात. सामान्यतः अध्यक्षांचें भाषण अगोदर लिहून काढून छापलेलें असतें व तें सभेंत फक्त वाचून दाखविण्यांत येतें. तें वाचावयास बहुधा दीड तास लागतो. तथापि कित्येक अध्यक्ष श्रोत्यांचें जणूं काय सत्त्वच पहातात. बांकीपूरच्या कांग्रेसच्या वेळेस अध्यक्षाचें ( रा. ब. मुधोळकरांचें ) भाषण चारपांच तास झालें असावें. अध्यक्ष आपल्या भाषणांत राजकारणांतील तत्कालीन परिस्थितीचें पर्यालोचन करितात, राज्यकारभारासंबंधीं प्रश्नांवर त्या वर्षी निरनिराळ्या संस्थांतून जें मत व्यक्त झालें असेल त्याचा प्रतिध्वनि करितात व पुढें कोणत्या सुधारणा करावयास पाहिजेत यासंबंधांत कांहीं शिफारशी व सूचना करून ते आपलें भाषण संपवितात.

अध्यक्षांचें भाषण संपल्यावर जमलेल्या प्रतिनिधींतून विषयनियामक कमिटीची निवडणूक करण्यांत येऊन तिच्यांतील सभासदांचीं नांवें अध्यक्षांकडून जाहीर केलीं जातात. अर्ध्या तासांत किंवा फार झालें तर एक तासांत मंडपांतील एखाद्या विविक्त भागांत विषयनियामक कमिटीची सभा भरते. विषयनियामक कमिटीवर नसलेल्या प्रतिनिधींस व दुसऱ्या सर्व बाहेरच्या लोकांस तेथून निघून जाण्याविषयीं विनंति करण्यांत येते. राष्ट्रीयसभेचे अध्यक्ष आपल्या अधिकाराच्या नात्यानें या कमिटीचे अध्यक्ष होतात व नंतर जे प्रश्न दुसऱ्या दिवशीं कॉंग्रेसमध्यें ठराव आणून पास करून घेण्याइतके महत्त्वाचे असतात त्यांवर चर्चेला सुरुवात होते. या ठिकाणीं कॉंग्रेसचे प्रतिनिधी अगदीं एकाग्र मनानें आपलें काम करीत असल्याचा देखावा दृष्टीस पडतो. ही एक प्रकारची हाउस ऑफ कॉमन्सची 'सिलेक्ट कमिटीच' असते. येथें वादविवादांत निष्णात असलेले उत्तम उत्तम वक्तेच बहुधा पुढें येऊन छोटीं छोटीं भाषणें करितात. ठरावांच्या मसुद्यांत काटछाट व फेरफार करून त्याला अखेरचें कायम स्वरूप देण्यांत येतें. कित्येकदां ठरावांच्या मुद्द्याकडे दुर्लक्ष करून किंवा एकंदर ठरावांच्या यादीकडे दुर्लक्ष करून ठराव सुबक इंग्रजींत कसे लिहावे याविषयींच पुष्कळसें वाष्कळ पांडित्य चालतें. सभासदांचीं मतें घेण्याकरितां त्यांनां हात वर करावयास सांगण्यांत येतें व अध्यक्ष स्वतः मतें मोजून एखादी सूचना मंजूर झाली कीं नामंजूर झाली तें जाहीर करितात. अशा रीतीनें दररोज बहुधा पांच सहा ठराव निकालांत काढण्यांत येतात. हे सर्व ठराव दुसऱ्या दिवशीं दुपारीं कॉंग्रेसच्या बैठकीपावेतों छापून तपासून तयार ठेवणें हें चिटणिसांचें काम असतें. कॉंग्रेसच्या बैठकींतील दोन दिवसपर्यंत विषयनियामक कमिटीचें काम सामान्यतः दररोज तीन तासप्रमाणें चालत असतें; परंतु फारच वादग्रस्त प्रश्न पुढें आल्यास यापेक्षांहि अधिक वेळ लागतो. यावरून एक गोष्ट स्पष्ट होईल कीं, राष्ट्रीयसभेच्या अधिवेशनांतील खरें महत्त्वाचें काम जमलेल्या प्रतिनिधींतील उत्तम उत्तम माणसें घेऊन बनविलेल्या विषयनियामक कमिटीच्या बैठकींतच होत असतें. विषयनियामक कमिटीच्या स्वरूपांत १९२० सालीं सप्टेंबर महिन्यांत कलकत्त्यास जी जादा कॉंग्रेस भरली होती तींत बदल करण्यांत आला. या कमिटीचें काम गुप्त म्हणून समजण्यांत येत असे तें तसें राहूं न देतां तें खुलें समजण्यांत आलें आणि तिचा वृत्तांतहि प्रसिद्ध करण्यांत आला.

राष्ट्रीय सभेच्या जाहीर बैठकींतील कामकाज सुव्यवस्थितपणें व्हावें म्हणून तें कसें चालवावयाचें यासंबंधीं नियम आहेत व त्या नियमानुसार नेहमीं कामकाज चालतें. जाहीर सभेंत कोणत्याहि प्रतिनिधीस ठरावास उपसूचना आणण्याचा हक्क आहे, परंतु त्यानें सभेपुढें ठराव मांडला जात असतांना अध्यक्षास अगोदर तशी सूचना केली पाहिजे. उपसूचनेस अनुकूल व प्रतिकूल असणाऱ्या प्रतिनिधींचीं मतें हात वर करावयास सांगून घेण्यांत येतात. विशेष प्रसंगीं मतें घेण्याकरितां नियम केलेले आहेत, पण त्यांचा उपयोग करण्याचा

प्रसंग क्वचितच येतो. १९२० च्या जादा कांग्रेसमध्यें *असहकारितेच्या ठरावावर त्याचें महत्त्व जाणून व त्या विरुद्धहि वरींच भाषणें झाल्यामुळें प्रांतवार मतें घेण्यांत आलीं. वस्तुस्थिति सामान्यतः अशी असते कीं, विषयनियामक कमिटींत प्रत्येक

* असहकारितेचा ठराव.—(१)ज्या पक्षीं खिलाफत प्रकरणांत हिंदुस्थान सरकार व ब्रिटिश सरकार हे दोघेहि हिंदी–मुसुलमानांसंबंधाच्या आपल्या कर्तव्यापासून सर्वस्वीं च्युत झाले व मुख्य प्रधानानें तर आपलें वचन जाणूनबुजून मोडलें; आणि अशा रीतीनें हिंदी–मुसुलमानांवर जी आपत्ति कोसळली तिच्यांतून पार पडण्याकरितां मुसुलमानांकडून जो प्रयत्न करण्यांत येईल त्यास सर्व प्रकारें कायदेशीर रीतीनें मदत करणें हें हिंदी–मुसुलमानेतरांचेंहि कर्तव्य आहे;

(२) आणि ज्या पक्षीं पंजावांत १९१९ च्या एप्रिलमध्यें उद्भवलेल्या धालमेलींत पंजावांतील निरपराधी प्रजेचें संरक्षण करण्यांत आणि निरपराधी प्रजाजनांशीं रानटीपणानें व क्षात्रवृत्तीला लांछन लागेल अशा रीतीनें वर्तन करणाऱ्या अधिकाऱ्यांस शिक्षा करण्यांत सदर सरकाराकडून भयंकर हयगय झाली किंवा त्यांस आपलें कर्तव्य बजावतां आलें नाहीं; शिवाय रहिवाशांच्या छळणुकीकडे ज्यानें पाषाणहृदयीपणानें दुर्लक्ष केलें व अधिकाऱ्यांच्या हातून घडलेल्या बहुतेक सर्व अपराधांची जबाबदारी ज्याच्या माथ्यावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें असते त्या सर मायकेल ओडवायरला सदर सरकारांनीं दोषमुक्त केलें;

(३) आणि ज्या पक्षीं पार्लमेंटांतील व विशेषतः लॉर्डांच्या सभेंतील वादविवादावरून हिंदी लोकांविषयीं सहानुभूतीचा शोचनीय अभाव दिसून आला, आणि पंजावांतल्या अधिकाऱ्यांनीं जी सोटेशाही व रावणशाही राजरोस चालविली तिला या वादविवादानें जणु काय दुजोराच दिला;

(४) आणि ज्या पक्षीं व्हाइसरॉयांच्या नुकत्याच झालेल्या भाषणांत खिलाफत व पंजाव या दोनहि प्रकरणांतील उभय सरकारांच्या वर्तनाविषयीं पश्चात्तापाचा लवलेशहि दिसून आला नाहीं;

त्या पक्षीं, या राष्ट्रीय सभेचें असें मत आहे कीं, वरील दोन प्रकारांतील अन्यायाची दुरुस्ती झाल्याविना हिंदुस्थानांत समाधान नांदणार नाहीं; आणि यासंबंधांत आपल्या राष्ट्राची इज्जत राखण्याला व असल्या राक्षसी वर्तनाची पुनरावृत्ति न होईल अशी खबरदारी घेण्याला स्वराज्याच्या स्थापनेखेरीज दुसरा रामबाण उपाय नाहीं.

आणि या राष्ट्रीय सभेचें आणखी असें मत आहे कीं, वरील दोनहि अन्याय दूर होईपर्यंत व स्वराज्याची स्थापना होईपर्यंत क्रमशः वर्धिष्णु व अत्याचारवर्ज असहकारिता करण्याचें तत्त्व मान्य करणें व तें आचरणांत आणणें याखेरीज हिंदी लोकांना गत्यंतर नाहीं;

आणि ज्या अर्थीं ज्या वर्गानें आजपर्यंत जनतेचें प्रतिनिधित्व स्वीकारून लोकमताला वळण लावलें त्याच वर्गानें या असहकारितेला सुरुवात केली पाहिजे, आणि ज्या अर्थीं सरकार आपल्या हुकमतीखालच्या शाळा, कोर्टें, कौन्सिलें आणि बहुमान व पदवीदानसमारंभ यांच्या योगानें आपली सत्ता दृढ करितें, आणि ज्या अर्थीं या चळवळीच्या सध्यांच्या कालावस्थेत आपलें ध्येय साध्य करण्याला विसंगत न होईल इतका पण कमींत कमी धोका व कमींत कमी नुकसान होईल असें करणें प्राप्त आहे;

त्या अर्थीं ही राष्ट्रीय सभा सर्वांस कळकळीनें असा सल्ला देते कीं,

(१) सरकारनें दिलेल्या पदव्या, विनपगारी अधिकारांच्या जागा आणि स्थानिक संस्थांतील सरकारनियुक्त सभासदत्व सोडून द्यावें.

(२) गव्हर्नरची लेव्ही, सरकारी अधिकाऱ्यांनीं भरविलेले दरबार, किंवा त्यांच्या मानाकरितां होणारे समारंभ यांच्यांत भाग घेऊं नये.

(३) पूर्ण सरकारी, निम सरकारी अगर सरकारच्या मदतीनें चालणाऱ्या शाळांतून व कॉलेजांतून पालकांनीं आपलीं मुलें आस्तेआस्ते काढून घ्यावीं आणि अशा शाळा व कॉलेजें यांच्या-ऐवजीं प्रांताप्रांतांतून राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळा व कॉलेजें स्थापन करावीं.

(४) वकील व पक्षकार यांनीं खासगी भांडणतंटे तोडण्या-करितां सरकारी कोर्टाकडे धांव घेण्याचें क्रमाक्रमानें सोडून देऊन त्या कोर्टांच्या जागीं स्वतःचीं लवाद कोर्टें स्थापन करावीं.

(५) लष्करी, कारकुनी व मजुरदार पेशाच्या लोकांनीं मेसोपोटेमियांत नोकरी करण्याकरितां रिक्रूट किंवा उमेदवार होऊं नये.

(६) सुधारलेल्या कौन्सिलच्या निवडणुकीकरितां उभे राहिलेल्यांनीं आपलीं नांवें उमेदवारींतून परत घ्यावीं आणि राष्ट्रीय सभेचा हा ठराव न जुमानतां जे उमेदवार उभे राहतील त्यांनां मतदारांनीं मतें देण्याचें नाकारावें.

(७) परदेशाहून येणाऱ्या मालावर बहिष्कार घालावा.

आणि ज्या अर्थीं ज्या गुणांखेरीज राष्ट्र उदयाला येऊं शकत नाहीं अशा गुणांचें, म्हणजे शिस्तीचें व स्वार्थत्यागाचें वळण जनतेला लावण्याचा मार्ग म्हणून ही असहकारितेची चळवळ अंगिकारण्यांत आली आहे आणि ज्या अर्थीं या चळवळीच्या पूर्व रंगांत देखील प्रत्येक पुरुषाला, स्त्रीला व मुलालाहि कांहीं तरी शिस्तीचा व स्वार्थत्यागाचा धडा घेण्याला संधि मिळणें जरूर आहे, त्या अर्थीं ही राष्ट्रीय सभा सर्वांनां स्वदेशी मालाचा, मुख्यतः स्वदेशी कापडाचा, उपयोग करण्याविषयीं सल्ला देत आहे. आणि ज्या अर्थीं हिंदी भांडवलाच्या व हिंदी लोकांच्या देखरेखीखालीं चालणाऱ्या गिरण्यांतून देशांतील सर्व लोकांनां पुरवठा होईल इतकें सूत व कापड सध्यां हिंदुस्थानांत तयार होत नाहीं व पुढेंहि बराच काळपर्यंत तयार होईल असें वाटत नाहीं, त्या अर्थीं प्रत्येक कुटुंबांत हातरहाटावर सूत काढण्याच्या कामाला उत्तेजन देण्यांत यावें, आणि ज्या लक्षावधि कोष्टयांनीं आपल्याला प्रोत्साहन मिळत नाहीं म्हणून आपला सन्मान्य धंदा सोडून दिला आहे त्यांनीं हातमागावर कापड विणण्यास सुरुवात करावी असेंहि या राष्ट्रीय सभेचें सांगणें आहे.

ठरावावर भरपूर चर्चा होऊन तो सर्वमान्य स्वरूपांतच बाहेर पडत असल्यामुळें प्रतिनिधींमध्यें दुमत सहसा होत नाहीं. ठरावांवर भाषणें कोणीं करावयाचीं व त्यांनां दुजोरा कोणीं द्यावयाचा हें सर्व विषयनियामक कमिटीनेंच अगोदर ठरविलेलें असतें. तथापि अध्यक्षांनां वाटल्यास ते यादींत नसलेल्या माणसासहि परवानगी देऊं शकतात. सभेंत होणारीं भाषणें हीं सामान्यत्वेंकरून मध्यम प्रतीचींच असतात. कांहीं थोडे अपवाद खेरीज करून भाषणामध्यें अलंकाराचा उपयोग सहसा केलेला आढळून येत नाहीं. भाषणामध्यें वक्तृत्वाची रेलचेल असते व वरीचशीं भाषणें पूर्वतयारी न करतांच केलेलीं असतात. अर्थात् आपणांस काय सांगावयाचें आहे याचा विचार वक्ते अगोदर करून ठेवीत नसतील असा याचा अर्थ नाहीं; परंतु मुद्दे टिपून आणून त्यांच्या मदतीनें क्वचितच भाषण करण्यांत येतें. तिसऱ्या दिवशीं संध्याकाळीं राष्ट्रीय सभेचें काम संपल्यावर अध्यक्षांचे आभार मानण्यांत येतात व त्याला अध्यक्षांकडूनहि लहानसें उत्तर मिळतें. एवढें झालें कीं, पुढच्या वर्षी कॉंग्रेस कोठें भरावयाची हें जाहीर करण्यांत येऊन ती वरखास्त होते.

अमृतसरमध्यें जानेवारी १९२० मध्यें भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या वैठकींत कॉंग्रेसच्या घटनेंत फेरफार सुचविण्याकरितां एक पोट कमिटी नेमली होती. या कमिटीकडून नवीन घटनेची योजना पुढें आली आहे.*

**परिणाम.**—१९०७ सालची कॉंग्रेस धरून १९१९ सालापावेतों कॉंग्रेसच्या एकंदर छत्तीस वैठकी झाल्या. कॉंग्रेसच्या आद्य प्रवर्तकांपैकीं आज सुरेंद्रनाथ बॅनर्जी, मदन मोहन मालवीय, दिनशा एदलजी वाच्छा, रंगनाथ

---

* **राष्ट्रीय सभेच्या घटनेच्या नव्या मसुद्यांतील कांहीं महत्त्वाचीं कलमें.**—(१) हिंदी राष्ट्रीय सभेचा उद्देश कोणत्याहि सनदशीर व शांततेच्या मार्गांनीं हिंदुस्थानास स्वराज्य प्राप्त करून देणें हा आहे.

(२) राष्ट्रीय सभेस प्रतिनिधि म्हणून निवडून आलेल्या प्रत्येक पुरुषास व स्त्रीस पहिल्या कलमांत नमूद केलेला राष्ट्रीय सभेचा उद्देश व तो साध्य करून घेण्याचे तिचे मार्ग मान्य आहेत असें गृहीत धरण्यांत येईल व त्याला किंवा तिला पुढें राष्ट्रीयसभेच्या घटनेनुरूप व नियमांनुरूप वागणें प्राप्त होईल.

(३) (अ) राष्ट्रीय सभेची वैठक साधारणतः वर्षांतून एकदां नाताळच्या सुट्टींत आदल्या वैठकींत ज्या ठिकाणीं ती भरविण्याचें ठरलें असेल त्या ठिकाणीं अगर यापुढें उल्लेखिली जाणारी अखिलभारतीय कॉंग्रेसकमिटी ठरवील त्या ठिकाणीं भरेल. (आ) राष्ट्रीय सभेची जादा वैठक अखिलभारतीय कॉंग्रेसकमिटीनें आपण होऊन अगर प्रांतिक कॉंग्रेसकमिट्यांनीं वहुमतानें मागणी केल्यास ती जेथें भरविणें इष्ट वाटेल तेथें भरवावी. अशा वैठकीला घटनेचे सर्व नियम अखिलभारतीय कॉंग्रेसकमिटीला वाटतील ते फेरवदल करून लागू होतील.

**(४) राष्ट्रीय सभेचे पोटभाग.**—हिंदी राष्ट्रीय सभा ही खालील घटकांची वनलेली असेल–(अ) हिंदी राष्ट्रीय सभा. (आ) प्रांतिक कॉंग्रेसकमिट्या. (इ) जिल्हा कॉंग्रेसकमिट्या (ई) तालुका कॉंग्रेसकमिट्या. (उ) अखिल भारतीय कॉंग्रेसकमिटी. (ऊ) ब्रिटिश कॉंग्रेसकमिटी आणि हिंदुस्थानच्या वाहेर राष्ट्रीय सभेच्या मार्फत वेळोवेळीं वनतील त्या कमिट्या. (ए) प्रांतिक अगर जिल्हा कॉंग्रेसकमिट्यांनीं वेळोवेळीं भरविलेल्या सभा व स्थापिलेल्या कमिट्या, उदाहरणार्थ राष्ट्रीयसभेची स्वागतकमिटी आणि तालुका, जिल्हा व प्रांतिक परिषदा.

(५) वर नमूद केलेल्या कोणत्याहि सभेचा अगर कमिटीचा सभासद होऊं इच्छिणारा मनुष्य निदान २१ वर्षांचा असला पाहिजे व या घटनेच्या कलमांत नमूद केलेले राष्ट्रीय सभेचे उद्देश, मार्ग, व नियम या सर्वांनां त्यानें लेखी मान्यता दिली असली पाहिजे.

**प्रांतिक कॉंग्रेसकमिट्या.**

(६) प्रांतिक कॉंग्रेसकमिट्या वनविण्यासाठीं हिंदुस्थानचे (संस्थानें धरून) खालीं दिल्याप्रमाणें भाषावार विभाग केले आहेत.

१ मद्रास (तामिळ), मुख्य ठिकाण मद्रास.
२ आंध्र (तेलगू), ,, ,, ,,
३ कर्नाटक (कानडी), ,, ,, बेळगांव अगर धारवाड.
४ महाराष्ट्र (मराठी), मुख्य ठिकाण मुंबई अगर पुणें.
५ गुजराथ (गुजराथी), ,, ,, मुंबई. अगर अहमदाबाद.
६ सिंध (सिंधी), मुख्य ठिकाण हैद्रावाद.
७ पंजाब व वायव्य सरहद्दीवरील प्रांत (पंजाबी), मुख्य ठिकाण लाहोर.
८ दिल्ली, अजमीर मेवाड व ब्रिटिश. राजपुताना (हिंदुस्थानी), मुख्य ठिकाण दिल्ली.
९ संयुक्त प्रांत (हिंदुस्थानी), मुख्य ठिकाण अलाहावाद.
१० मध्यप्रांत (हिंदुस्थानी), मुख्य ठिकाण नागपूर अगर जवलपूर.
११ वऱ्हाड व मध्यप्रांत (मराठी), मुख्य ठिकाण उमरावती अगर नागपूर.
१२ वहार (हिंदुस्थानी), मुख्य ठिकाण पाटणा.
१३ ओरिसा (ओरिया) बंगाल, आंध्र, आणि मध्यप्रांत या भागांतील ओरिया भाषा बोलणारे लोक धरून. मुख्य ठिकाण कटक.
१४ बंगाल व आसाम (बंगाली), मुख्य ठिकाण कलकत्ता.
१५ ब्रह्मदेश (ब्रह्मी), मुख्य ठिकाण रंगून.

राष्ट्रीय सभेस प्रसंगानुरूप कोणतेंहि हिंदी संस्थान उपरिनिर्दिष्ट प्रांतांपैकीं कोणत्याहि एका प्रांतांत समाविष्ट करण्याचा अधिकार

नरसिंह मुधोळकर वगैरे थोडीशीच मंडळी हयात आहेत. थोड्या थोड्या वर्षांनीं काँग्रेसच्या रचनेंत नेहमीं फेरफार घडून येत असतात. गेल्या पंचवीस तीस वर्षांचें सिंहावलोकन केलें तर असें आढळून येईल कीं, एकंदरींत राष्ट्रीय सभेनें लोकांची उन्नति घडवून आणण्याचें बरेंच भरींव काम केलेलें आहे. लॉर्ड लॅन्सडौन हे हिंदुस्थानचे व्हाइसराय असतांना त्यांनीं असे उद्गार काढले होते कीं, राष्ट्रीय सभा ही एक पुढारलेल्या उदारमतवादी लोकांची संस्था

---

( मागील पानावरून पुढें चालू. )

असून प्रांतिक काँग्रेसकमिटीस राष्ट्रीय सभेनें तिच्याकडे सोंपविलेलें संस्थान तिच्या हाताखालच्या जिल्ह्यांपैकीं वाटेल त्या जिल्ह्यांत घालतां येतें.

(७) मागील कलमांत सांगितलेल्या प्रत्येक प्रांतास एक एक प्रांतिक काँग्रेसकमिटी राहील व या कमिट्यांनां आपआपल्या प्रांतांमध्यें निरनिराळ्या जिल्हा व तालुका कमिट्या बनविण्याचा व त्याचप्रमाणें आपआपल्या प्रांतांतर्फे काँग्रेससंबंधीं काम करण्याचा हक्क राहील.

प्रांतिक काँग्रेसकमिटीच्या प्रत्येक सभासदास वर पांचव्या कलमांत सांगितलेल्या सर्व अटी लागू असून त्याला ती कमिटी ठरवील तितकी वार्षिक वर्गणी आगाऊ दिली पाहिजे.

प्रांतिक काँग्रेसकमिटीचे अंमलदार मामूली वहिवाटीप्रमाणें तिच्या सभासदांकडून निवडण्यांत येतील.

(८) जिल्हा व तालुका कमिट्या ह्या त्या त्या प्रांतांतील काँग्रेस-कमिट्यांनीं घालून दिलेल्या नियमांनुरूप बनविण्यांत येतील.

### मतदारसंघ व प्रतिनिधी.

(१०) (अ) प्रत्येक जिल्हा काँग्रेसकमिटीनें आपल्या व आपल्या हाताखालच्या सर्व तालुकाकमिट्यांच्या सभासदांतून आपल्या जिल्ह्याच्या लोकसंख्येंतील दर लाख माणसांस एक या प्रमाणांत राष्ट्रीय सभेकरितां प्रतिनिधी निवडून द्यावे. अर्धा लाख किंवा लाखाचा याहून मोठा अंश हा एक लाखाबरोबर धरण्यांत येईल.

ज्यांचा कोणत्याहि जिल्ह्यामध्यें अंतर्भाव होत नाहीं अशीं सर्व शहरें या कलमांतील बाबींकरितां वेगळे जिल्हे म्हणून समजण्यांत येतील व यांपैकीं प्रत्येक शहराचा एक एकच जिल्हा समजावा किंवा त्याहून अधिक जिल्हे समजावे या गोष्टीचा निकाल करण्याचा अखत्यार अखिलभारतीय काँग्रेसकमिटीस आहे.

(आ) २१ व्या कलमाप्रमाणें प्रत्येक प्रांतिक काँग्रेस-कमिटीच्या वांट्यास अखिलभारतीय काँग्रेसकमिटीचे जितके सभासद आले असतील तेवढेच सभासद त्या प्रांतिक काँग्रेस कमिटीनें आपल्यातर्फे राष्ट्रीय सभेकरितां निवडून द्यावे.

(इ) ब्रिटिश काँग्रेसकमिटीनें व चवथ्या कलमाच्या 'ऊ' या भागांत उल्लेखिलेल्या हिंदुस्थानाबाहेरील प्रत्येक कमिटीनें आपल्या तर्फे पांच सभासद निवडून राष्ट्रीय सभेस पाठवावे.

### अखिलभारतीय काँग्रेसकमिटी.

(२१) अखिलभारतीय काँग्रेसकमिटीमध्यें तिचे खास ( एक्स ऑफिशिओ ) सभासद खेरीज करून आणखी १०० सभासद राहतील. या खास सभासदांमध्यें हिंदुस्थानांत राहत असलेल्या किंवा हजर असलेल्या राष्ट्रीय सभेच्या माजी सर्व अध्यक्षांचा व पुढें २५ व्या कलमांत उल्लेखिलेल्या राष्ट्रीय सभेच्या जनरल सेक्रेटरींचा समावेश होतो. जे राष्ट्रीय सभेचे जनरल सेक्रेटरी असतील तेच अखिलभारतीय काँग्रेसकमिटीचे जनरल सेक्रेटरी होतील.

प्रत्येक प्रांतानें आपआपल्या प्रांताच्या प्रांतिक काँग्रेस-कमिटीनें या बाबतींत जे नियम केले असतील त्यांनां धरून दर-वर्षीं डिसेंबरच्या १५ तारखेपूर्वीं त्या सालीं आपल्या प्रांतांतून काँग्रेसमध्यें निवडून पाठविलेल्या प्रतिनिधींमधूनच अखिल-भारतीय काँग्रेसकमिटीकरितां आपल्या तर्फे प्रतिनिधी निवडून द्यावे. अखिलभारतीय काँग्रेसकमिटींत निरनिराळ्या प्रांतांतर्फे शक्य तोंपावेतों पुढें दिल्याप्रमाणें प्रतिनिधींची संख्या राहील:–

(१) हिंदुस्थानी–संयुक्त प्रांत १५; (२) बंगाली–बंगाल १४; (३) पंजाबी–पंजाब १०; (४) तामिल–मद्रास ९; (५) हिंदुस्थानी, बिहार ८; (६) तेलगू–आंध्र ७; (७) मराठी–महाराष्ट्र ६; (८) गुजराथी–गुजराथ ६; (९) कानडी–कर्नाटक ५; (१०) सिंधी–सिंध ४; (११) हिंदुस्थानी–दिल्ली ३; (१२) मराठी-वऱ्हाड व मध्यप्रांत ४; (१३) ओरिया–ओरिसा ३; (१४) ब्रह्मी–ब्रह्मदेश ३; (१५) हिंदुस्थानी-मध्यप्रांत ३. एकंदर १००.

(२५)–(अ) राष्ट्रीयसभेला तीन जनरल सेक्रेटरी नेमले जातील. यांची निवडणूक दर वर्षीं राष्ट्रीय सभेच्या बैठकींत होईल. राष्ट्रीय सभेची वार्षिक बैठक जेथें व ज्या वेळीं व्हावयाची ठरली असेल त्या ठिकाणीं त्या वेळच्या कांहीं काळ अगोदर अखिलभारतीय काँग्रेसकमिटी आपली बैठक भरवील व या बैठकीपुढें या कमिटीनें वर्षभर केलेल्या कामाचा अहवाल, हातीं आलेल्या फंडांच्या हिशोबासह जनरल सेक्रेटरी सादर करतील. नंतर या हिशोबाच्या व कामाच्या अहवालाच्या प्रती राष्ट्रीय-सभेपुढें सादर करण्यांत येतील व सर्व काँग्रेसकमिट्यांकडे पाठ-विण्यांत येतील.

### कार्यकारी कमिटी.

(२६) अखिलभारतीय काँग्रेसकमिटीनें आपल्या पहिल्याच बैठकींत अध्यक्ष, जनरल सेक्रेटरीज व आणखी सात सभासद इतक्या जणांची एक कार्यकारी कमिटी नेमावी. या कार्यकारी कमिटीस अखिलभारतीय काँग्रेसकमिटी तिच्याकडे वेळोवेळीं जीं निर-निराळीं कामें सोंपवील तीं सर्व करावीं लागतील.

(२७) अखिलभारतीय काँग्रेसकमिटी ही आपल्या शिरावरील जबाबदारी पार पाडण्याकरितां तिला जितक्या सभा भरविणें जरूर असेल तितक्या सभा भरवील. अशी सभा भरविण्यासाठीं प्रत्येक वेळीं या कमिटीच्या किमानपक्ष पंधरा सभासदांची ते कोणत्या उद्देशानें सभा भरवूं इच्छितात हें जींत स्पष्ट नमूद केलें आहे अशी (केली) विनंति असली पाहिजे.

आहे व वास्तविक पाहिलें असतां तिच्या कार्यक्रमांत नेहमीं प्रागतिक सुधारणांचाच अंतर्भाव केलेला आहे. इ. स. १८८५ व १९०९ यांच्या दरम्यान कायदे कौन्सिलच्या घटनेसंबंधांत ज्या दोन वेळां सुधारणा झाल्या त्या काँग्रेसच्या जोरदार व सतत चालू ठेविलेल्या चळवळीमुळेंच प्राप्त झाल्या असें म्हटलें असतां त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. पहिलें सुधारणा बिल १८९२ सालीं पास झालें. परंतु थोडक्याच वर्षांत असें आढळून आलें कीं, कौन्सिलांतील लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींची संख्या अपुरी पडते, 'द्यावा निधि तर घ्या प्रतिनिधि' ह्या तत्त्वानुसार अंदाजपत्रकावर मोकळेपणानें वादविवाद व्हावयास पाहिजे तसा होत नाहीं आणि १८९२ मध्यें प्रश्न विचारण्याचा जो हक्क देण्यांत आला त्यांत कांहींतरी सुधारणा व वाढ होणें जरूर आहे. याप्रमाणें कौन्सिलांची पुन्हा सुधारणा होणें जरूर भासलें तेव्हां काँग्रेसनें या सुधारणेसाठीं चळवळ सुरू केली. काँग्रेसनें ही चळवळ सारखी चालू ठेविल्यामुळें पुढें मोर्लेमिंटो सुधारणा मिळाल्या. मिठावरील कर अडीच रुपये मण होता तो एक रुपया मण करण्यांत आला याचें श्रेय ह्या संस्थेसच दिलें पाहिजे. कमाल पक्षीं किती उत्पन्नापावेतों प्राप्तीवरील कर माफ असावा याची काँग्रेसनेंच शिफारस केली होती. आगगाड्यांपेक्षां पाटबंधाऱ्याचीं कामें हातीं घेणें अधिक महत्त्वाचें आहे या तत्त्वाचा तिनें सदोदित पुरस्कार केला आहे. दुष्काळनिवारणाच्या कामांतील सरकारी अव्यवस्थेवर ती जी टीका करीत आली तीच मुख्यत्वेंकरून दुष्काळनिवारणासंबंधींची व्यवस्था जवळजवळ पूर्णतेला नेऊन पोंचविण्यास कारणीभूत झाली आहे. सर्व प्रकारच्या शिक्षणांत, व त्यांतल्या त्यांत प्राथमिक व व्यवहारोपयोगी शिक्षणांत, जी कांहीं आज प्रगति झालेली दृष्टीस पडते ती बहुतेक सर्व काँग्रेसच्या चळवळीमुळेंच झाली आहे. आरोग्यखात्यांतील सुधारणांस काँग्रेस अंशतः तरी कारणीभूत झालेली आहे असेंहि तिचे अभिमानी म्हणतात. जंगल खात्यांतील व देशी मालावरील करासंबंधीं कडक नियमांमुळें होणारा त्रास काँग्रेसच्या विनवण्यांमुळें कांहींसा कमी झाला आहे. शेतसाऱ्याच्या विषयाकडे काँग्रेसनें लक्ष पुरविलें असून शक्य तोंपर्यंत कायमधाऱ्याची पद्धतीच अमलांत यावी असें तिचें थोडेंबहुत धोरण आहे. 'सिव्हिल सर्व्हिस एक्झॅमिनेशन' इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्हीहि ठिकाणीं घेण्यांत यावी व न्यायखातें अंमलबजावणी खात्यापासून वेगळें करावें यासंबंधांत तिनें आजपर्यंत केलेली सर्व ओरड अरण्यरुदनवत् झाली आहे, तथापि तिनें दाखविलेली चिकाटी स्पृहणीय आहे. दक्षिण आफ्रिकेंत व इतर ठिकाणीं असलेल्या हिंदू लोकांच्या वतीनें केलेल्या तिच्या सर्व विनवण्या कळकळीच्या पण नेमस्तपणाच्या आहेत. चलनी नाण्याच्या प्रश्नावरील सरकारचीं मतें तिला पसंत नाहींत. सरकारी नोकरींतील वरिष्ठ जागांवर हिंदी लोकांच्या बऱ्याच मोठ्या प्रमाणांत नेमणुका होऊं लागतील असें करणें हा तिचा पूर्वीपासून उद्देश असून त्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां सरकारनें पब्लिक सर्व्हिस कमिशनची नेमणूक केलीहि होती. थोडक्यांत सांगा-

---

( मागील पानावरून पुढें चालू. )

**विषयनियामक कमिटी.**

(२९) राष्ट्रीय सभेच्या चालू बैठकीसाठीं प्रत्येक प्रांतातर्फे अखिलभारतीय काँग्रेसकमिटींत जे सभासद निवडून दिलेले असतील तेच सभासद त्या बैठकीच्या विषयनियामक कमिटींतहि राहतील.

(३०) काँग्रेसचें जाहीर अधिवेशन होण्यापूर्वीं कमींतकमी दोन दिवस तरी अगोदर विषयनियामक कमिटीची सभा भरली पाहिजे. विषयनियामक कमिटीच्या बैठकीचें अध्यक्षस्थान नवीन निवडून आलेल्या अध्यक्षांस देण्यांत येईल. अगोदरच्या वर्षींचे सेक्रेटरी यांनीं पुढील बैठकीच्या कार्यक्रमाचा मसुदा व निरनिराळ्या प्रांतिक काँग्रेसकमिट्यांनीं राष्ट्रीय सभेच्या बैठकींत पुढें मांडण्याकरितां म्हणून सुचविलेले ठराव या विषयनियामक कमिटीच्या बैठकींत सादर करावे.

(३१) यानंतर विषयनियामक कमिटी या तिजपुढें आलेल्या कार्यक्रमावर चर्चा करील व राष्ट्रीयसभेच्या जाहीर अधिवेशनांत जे ठराव पुढें मांडावयाचे त्यांचा मसुदा तयार करील.

(३२) राष्ट्रीय सभेचें अधिवेशन चालू असतांना देखील जरूर पडल्यास विषयनियामक कमिटीच्या आणखी बैठकी करण्यांत येतील.

(३३) राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या सुरवातीस जमलेल्या मंडळीच्या स्वागतार्थ स्वागतकमिटीचे अध्यक्ष पंधरा मिनिटांत आटपेल असें एक लहानसें भाषण करतील. या भाषणाची एक छापील प्रत दाराशींच प्रत्येक प्रतिनिधीस व प्रेक्षकास कांहींहि मोबदला न घेतां देण्यांत आली पाहिजे. स्वागतकमिटीच्या अध्यक्षांचें भाषण संपल्याबरोबर त्यांनीं राष्ट्रीय सभेच्या नवीन अध्यक्षांस अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयीं विनंति करावी. यानंतर राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षांनीं आपलें स्वतःचें भाषण करावें. हें त्यांचें भाषण ४५ मिनिटांच्या आंत आटपेल असें असलें पाहिजे व त्याच्याहि छापील प्रती पूर्वींच दाराशीं प्रतिनिधींस व प्रेक्षकांस फुकट वांटण्यांत आल्या असल्या पाहिजेत.

(३४) राष्ट्रीय व स्वागत सभांच्या अध्यक्षांचीं भाषणें इंग्रजी भाषेंत, नागरी व उर्दू या दोन्हीहि लिपींमध्यें हिंदुस्थानी भाषेंत व ज्या प्रांतांत राष्ट्रीय सभा भरली असेल त्या प्रांताच्या भाषेंत छापलीं जातील.

(३५) राष्ट्रीय सभेचें सर्व काम शक्य तोंपावेतों हिंदुस्थानी भाषेंतच चालविण्यांत येईल. तथापि अध्यक्षांच्या इच्छेनुरूप ज्या ठिकाणीं राष्ट्रीय सभा भरली असेल त्या ठिकाणच्या देश्य भाषेंत किंवा इंग्रजी भाषेंत काम चालविण्याचीहि सवड ठेवण्यांत येत आहे.

वयाचें म्हणजे कॉंग्रेसनें आजपर्यंत लोकांच्या पुष्कळ तक्रारी सरकारपुढें मांडल्या व त्यांतील कांहीं सरकारकडून दूर झाल्या आहेत. वरिष्ठ जागांवर हिंदी लोकांच्या अधिक प्रमाणांत नेमणुका करवून घेणें, लष्करी खात्यांतील खर्च कमी करणें, जकाती बसविण्याचा अधिकार, विशेषतः जुन्या पद्धतीनें तयार होणाऱ्या कापडावर जकात बसविण्याचा अधिकार प्राप्त करून घेणें, गुन्हेगार लोकांच्या इन्साफाच्या पद्धतींत सुधारणा घडवून आणणें ( यांतच अंमलबजावणी खातें न्यायखात्यापासून विभक्त करण्याच्या सुधारणेचा अंतर्भाव होतो ), व ब्रिटिश साम्राज्याचे नागरिक या नात्यानें बादशहांच्या ताब्यांत असलेल्या सर्व मुलुखांत इतरांच्या बरोबरीचे हक्क मिळविणें हे राष्ट्रीयसभेचे कांहीं ठळक ठळक उद्देश आहेत.

**ब्रिटिश कमिटी.**—राष्ट्रीयसभेची 'ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी' म्हणून लंडनमध्यें एक शाखा आहे. हिंदुस्थानांतील राष्ट्रीयसभेकडून या कमिटीस पैसा पुरविण्यांत येतो. या कमिटीस तिची स्वतःची कचेरी असून तिला जोडूनच मतप्रसार करण्याकरितां 'इंडिआ' नांवाचें एक स्वतंत्र वर्तमानपत्र आहे. ह्या वर्तमानपत्राच्या खर्चाची रकम वेगळी तोडून दिलेली आहे. त्यामध्यें हिंदुस्थानांत घडत असलेल्या प्रत्येक आठवड्यांतील ठळक ठळक गोष्टी प्रसिद्ध होत असल्यामुळें तें थोडेंबहुत उपयुक्त आहे. त्याला हिंदुस्थानांतून सर्व प्रकारची बातमी पुरविण्यांत येते व हिंदुस्थानच्या आकांक्षाविषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या व त्याच्या कल्याणाकडे व प्रगतीकडे लक्ष पुरविणाऱ्या पार्लमेंटांतील सर्व सभासदांत त्याचा फुकट प्रसार करण्यांत येतो. या कमिटींत हिंदुस्थानांत नोकरी करून परत गेलेले अँग्लोइंडिअन लोक सभासद असतात. तिच्या अध्यक्षस्थानीं पुष्कळ दिवसपर्यंत हिंदुस्थानचे सुप्रसिद्ध हितचिंतक व त्याच्या कल्याणाकरितां अगदीं निःस्वार्थ बुद्धीनें झटणारे सर विल्यम वेडरबर्न हे होते. हिंदुस्थानानें त्यांनां दोन वेळ राष्ट्रीयसभेच्या अध्यक्षत्वाचा मान देऊन त्यांच्याबद्दल वाटत असलेली आपली कृतज्ञताबुद्धि व्यक्त केली आहे. एखाद्या गोष्टीचा खल करावयाचा असला म्हणजे ही कमिटी हिंदुस्थानांतले जे कोणी सुप्रसिद्ध किंवा पुढारी लोक लंडनमध्यें असतील त्या सर्वांनां निमंत्रण देते. हाउस ऑफ् कॉमन्समध्यें हिंदुस्थानसंबंधांत जे जे कांहीं वादविवाद होतात त्यांची ही कमिटी नेहमीं माहिती ठेवीत असते व गरज पडेल तेव्हां तेथील सभासदांस हिंदुस्थानविषयक प्रश्न विचारण्यास इकडील माहितीहि पुरविते. पूर्वी ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी ही हाउस ऑफ कॉमन्समधील सभासदांची एक स्टॅंडिंग कमिटीच होती. मध्यंतरीं तिचें तें स्वरूप नाहींसें झालें होतें. इ. स. १९१३ च्या सुमारास तिला तिचें पूर्वरूप प्राप्त करून देण्याचे पुन्हां प्रयत्न करण्यांत आले. ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी ही इंडिआ ऑफिसशीं आपला पत्रव्यवहार ठेविते व पुष्कळ वेळां ती सेक्रेटरी ऑफ् स्टेटला हिंदी लोकमत समजावून देण्याचें काम करितें. याप्रमाणें ही ब्रिटिश कांग्रेस कमिटी इंग्लंडमध्यें हिंदुस्थानची एक बरीच उपयुक्त कामगिरी बजावीत आहे. येथें हें सांगितलें पाहिजे कीं, कॉंग्रेसमध्यें राष्ट्रीय पक्षाचा जोर झाल्यानंतर कांहीं कालपर्यंत ब्रिटिश कॉंग्रेसकमिटीचें आणि इंडिया पत्राचें धोरण कॉंग्रेसच्या विरुद्ध होऊं लागलें होतें तें धोरण पुन्हां कॉंग्रेसला अनुसरून करण्याचा बराचसा यशस्वी प्रयत्न कै० लोकमान्य टिळक यांनीं इंग्लंडांत असतांना केला.

**कॉंग्रेसमधील पक्ष.**—इ. स. १९०७ च्या सुरतच्या बखेड्यापूर्वीच कॉंग्रेसमध्यें पक्षभेद दिसून येत होता. बंगालची फाळणी झाल्यानंतर बहिष्काराची चळवळ सुरू झाली. त्या चळवळीचा हेतु असा कीं जर सरकार लोकपक्षाचें म्हणणें ऐकत नसेल तर लोकांनीं प्रतिकार करावा व तो करण्यासाठीं बहिष्कार हें शस्त्र उपयोगास आणावें. बहिष्काराची चळवळ जी बंगाल्यांत सुरु झाली तिचें १९०६ सालच्या कॉंग्रेसनें समर्थन केलें. या सुमारासच देशांत चोहोंकडे सरकारविषयीं विरुद्ध मत जोरानें फैलावूं लागलें. सरकारच्या अनेक कृत्यांविषयीं संशय प्रदर्शित होऊं लागला. या कालांत तत्त्वभेदापेक्षां प्रकृतिभेदामुळें समाजांत मवाळ आणि जहाल असे दोन पक्ष तयार झाले आणि या दोन पक्षांत १९०७ सालीं सुरतेस खटका उडाला, आणि कॉंग्रेसमधून जहालपक्ष बाहेर पडला. जहाल उर्फ राष्ट्रीय पक्षास आपली स्वतंत्र कॉंग्रेस बनवितां आली नाहीं. पण हा पक्ष बाहेर पडल्यानें कॉंग्रेसला अत्यंत दौर्बल्य प्राप्त झालें व तिजविषयीं चोहोंकडे उदासीनता पसरली. ती इतकी कीं, १९१२ सालच्या बांकीपूरच्या कॉंग्रेसला जमलेले प्रतिनिधी २०० देखील नव्हते. त्यानंतर मवाळ व जहाल यांच्या समेटाचा प्रयत्न करण्यांत येऊं लागला आणि त्यामुळें १९१४ सालच्या मद्रासच्या कॉंग्रेसला आणि १९१५ सालच्या मुंबईच्या कॉंग्रेसला बराच जोर मिळाला. मुंबईच्या कॉंग्रेसमध्यें राष्ट्रीय पक्षाच्या भावनेला मान देणारा एक ठराव पास झाल्यामुळें पुढें राष्ट्रीय पक्षानें कॉंग्रेसमध्यें जाण्याचें ठरविलें. लखनौ, अमृतसर इत्यादि ठिकाणीं राष्ट्रीय पक्षाचा जोर फार झाला व पुढें मवाळ उर्फ प्रागतिक उर्फ नेमस्तपक्ष हा कॉंग्रेसमध्यें अधिकाधिक दुर्बल झाला, आणि सध्यां तो बाजूस राहिल्यासारखा झाला आहे.

नेमस्त पक्षांतील पुढारी नामदार गोखले हे १९१५ च्या फेब्रुवारी महिन्यांत मृत्यू पावले आणि सर फेरोजशहा मेहेता हेहि नंतर थोडक्या काळांतच वारले. या गोष्टी नेमस्तपक्ष बराच कमजोर करण्यास कारण झाल्या. १९२० सालीं आगस्टच्या पहिल्या तारखेस लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचें देहावसान झालें. या कारणानें १९२० च्या सप्टेंबर महिन्यांत भरलेल्या जादा कॉंग्रेसमध्यें पुष्कळ लोकांस आपल्या मताप्रमाणें चालवूं शकणारा पुढारी महात्मा गांधी यांशिवाय दुसरा कोणी उरला नाहीं. महात्मा गांधी यांचा असहकारितेचा

ठराव लोकमान्य असते तर वराच निराळ्या स्वरूपांत पास झाला असता असें कांहीं लोकांचें मत आहे. देशास नवीन मिळालेल्या राज्यपद्धतीमुळें निरनिराळे पक्ष आपआपली मतमालिका प्रसिद्ध करूं लागले होते. इतर पक्षांवरोबर काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षानेंहि आपला कार्यक्रम प्रसिद्ध केला होता. पण असहकारितेच्या तत्त्वामुळें काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचा कार्यक्रम अगदींच बाजूस पडल्यासारखा झाला आहे. असो.

आयर्लंडांत स्वतंत्र लोकसत्तात्मक राज्य स्थापन करण्यासाठीं चालू असलेली चळवळ आणि इजिप्तला असहकारितेमुळें आलेलें यश यांच्यामुळें, स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाच्या पुकारामुळें आणि राष्ट्रसंघाच्या घटनेमुळें म्हणजे साम्राज्यांत शांतता राखण्यासाठीं साम्राज्य कोणास तरी जबाबदार असल्यामुळें लोकांच्या स्वराज्यविषयक महत्त्वाकांक्षा अधिकाधिक वाढत आहेत. या महत्त्वाकांक्षांस मूर्तस्वरूप येण्यासाठीं एकसारखी चळवळ पाहिजे आहे असें काँग्रेसमधील पुढाऱ्यांचें धोरण दिसतें. हिंदुस्थानास स्वराज्यास अधिकाधिक लायक करून अधिकाधिक हक्क द्यावेत या ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या धोरणाची पूर्णता होणें काँग्रेसमधील पुढाऱ्यांच्या प्रस्तुतच्या धोरणामुळें शक्य होईल.

एक गोष्ट खरी कीं, लोकांची सत्ता आज पूर्वीच्या मानानें बरीच वाढली आहे आणि ती दिवसानुदिवस अधिकाधिक होत जाईल.

---

## उपप्रकरण ३ रें.

## लोकसत्ता व लोकमत यांजकडून अपेक्षा.

सध्यां आपणांपुढें जे प्रश्न नवीन उपस्थित झाले आहेत त्यांत एक प्रश्न हा उपस्थित झाला आहे कीं, आतां नवीन येणाऱ्या परिस्थितीमुळें प्रगतीस व्यत्यय येईल काय? लोकसत्ता आणि प्रगति यांचा कितपत संबंध आहे? अमेरिकेसारखें राष्ट्र इतकें प्रगमनशील झालें याचें कारण लोकसत्ता आहे काय? आणि समाजाची स्थिति सुधारत जाण्यास लोकसत्तेच्या वाढीची आवश्यकता आहे काय?

लोकसत्तेचा प्रसार अलीकडे अधिकाधिक होत आहे, तथापि हिंदुस्थानांत लोकसत्तेचें तत्त्व अपरिचित नाहीं. प्राचीन हिंदुस्थानांत उत्तरकुरु आणि उत्तरमद्र हीं वैराज्यें होतीं. लिच्छिवि हेंहि वैराज्य होतें. देश राजशासित असणें ह्यासारखी दुसरी राज्यव्यवस्था चांगली नाहीं अशी कल्पना लबाड ब्राह्मणांनीं करून देऊन जेथें जेथें लोकसत्ता दिसून येईल तेथें ती लपविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे असा प्रसिद्ध इंग्रज बौद्ध कै० प्रो० ऱ्हिस डेविड्स यांनीं ब्राह्मणांवर आरोप केला आहे. प्रोफेसरमजकुरांची ब्राह्मणांच्या हेतूंसंबंधाची अप्रस्तुत प्रशंसा जरी सोडून दिली तरी त्यांनीं लोकसत्तात्मक राष्ट्रें देशांत होतीं यावद्दल जो पुरावा आणला आहे* तो महत्त्वाचा आहे.

प्राचीन वैराज्यांमध्यें शासनपद्धति कशी काय होती, त्यांमध्यें लोकसत्ता एकवटण्यास आणि कार्यक्षम करण्यास काय उपाय योजीत होते याची आपणांस स्पष्ट माहिती नाहीं.

राजशासित राष्ट्रांमध्यें देखील कार्यांचा बराचसा भार लोकांनींच उचललेला होता.

यूरोपांतील वैराज्यांकडे आपण लक्ष दिलें असतां असें दिसतें कीं तीं लोकसत्तात्मक राज्यें नसून कांहीं विशिष्ट लोकांचीं आणि जातींचीं इतर लोकांवर राज्यें होतीं. ग्रीस किंवा रोम येथील सर्व जनतेमध्यें शासकवर्ग निराळाच होता. हा शासकवर्ग इतर लोकांवर राज्य करी व आपल्यापैकींच कोणाला अधिकार द्यावयाचा हें ठरवी.

लोकमतानें राज्य करणें याचें आत्यंतिक स्वरूप स्वित्झर्लंडांत दिसून येतें. तेथें कांहीं कँटॉन्समध्यें लोकमतानेंच कायदे होतात, केवळ लोकप्रतिनिधिमतानें होत नाहींत. कांहीं गांवांमध्यें सर्व लोक एकत्र जमून स्थानिक राज्यकारभार व त्याविषयीं कराव्या लागणाऱ्या गोष्टी यांची चर्चा करतात. सर्व स्वित्झर्लंडला लागू होणारे कायदे देखील प्रतिनिधिमताऐवजीं लोकमतानेंच होतात. स्वित्झर्लंड येथील पार्लमेंटला जे कायदे सर्व लोकांनीं मिळून करावेसे वाटतील ते कायदे करण्याचें काम तें पार्लमेंट लोकमतावर टाकतें. असें करण्याचें मुख्य कारण हें कीं, जेव्हां अमुक एक कायदा पार्लमेंटमध्यें पास करून घेतला तर सत्ताधारी पक्ष लोकप्रिय राहील किंवा लोकांस अप्रिय होईल याविषयीं कारभाऱ्यांचें मन साशंक असतें तेव्हां आपल्या कपाळचें अपयश चुकविण्यासाठीं तो कायदा लोकांपुढें टाकावयाचा आणि आपण नामानिराळे रहावयाचें ही कारभाऱ्यांची प्रवृत्ति असते. इंग्लंडमध्यें देखील जेव्हां स्त्रियांनीं मतासाठीं बराच गिल्ला केला होता व प्रधानमंडळी त्याच्या उपयुक्ततेविषयीं साशंक होती तेव्हां बायकांना मत असावें किंवा नसावें हा प्रश्न सर्व लोकांपुढें मांडण्यांत येणार होता. त्या वेळेस इंग्रज कारभाऱ्यांचा मुख्य हेतु स्त्रियांनां मतें मिळूं देण्याचें चुकवावें हा होता. परंतु स्त्रियांनां नाखूष करण्याचें अपेश आपल्यावर न घेतां लोकांस द्यावें ही दृष्टि त्याजबरोबर होती. लोकांपुढें असा प्रश्न टाकण्याच्या पद्धतीला 'रेफरंडम' (लोकनिर्णययाचना) म्हणतात आणि लोकांनीं स्वतः एखादा कायदा करून घेण्यास उचल केली आणि बऱ्याचशा सह्या गोळा करून सरकारास त्याविषयीं लोकमत घेण्यास भाग पाडलें तर त्या प्रकारास लौकिक प्रारंभ (Initiative) म्हणतात. या लोकायत्त उपक्रमामुळें संस्थानाच्या पार्लमेंटचें किंवा कायदे करणाऱ्या संस्थेचें महत्त्व अर्थात् कमी होतें.

---

* Buddhist India.

प्रतिनिधींमार्फत लोकमत न घेतां प्रत्यक्ष लोकमतानें कायदा करणें हें कितपत उपयुक्त अगर हानिकारक आहे याविषयीं हारवर्ड युनिव्हर्सिटीचे प्रेसिडेंट मि. लोवेल यांनीं आपल्या Political Parties in Continental Europe या ग्रंथांत सविस्तर विवेचन केलें आहे. त्यावरून लोकांच्या खालील प्रवृत्ती दिसून येतात.

(१) जो ठराव किंवा कायदा पास करावयाचा त्याची भाषा अत्यंत सुलभ नसली तर तो बेधडक नापास करावा.

(२) लोकांस कधीं कधीं कायदे भराभर पास करण्याचें किंवा नापास करण्याचें वारें येतें आणि अशा वेळीं कायदे एकामागून एक पास किंवा नापास होतात. वारें येतें असें न म्हटल्यास कायदे पास करण्याचें अगर नापास करण्याचें सयुक्तिक कारण दाखवितां येत नाहीं.

(३) कधीं कधीं अल्पसंख्याक लोकांवर जुलूम करण्याची प्रवृत्ति होते. ज्यू लोकांची जी गुरें मारण्याची पद्धत आहे आणि जी धार्मिक समजुतींच्या दृष्टीनें योग्य म्हणून ठरली आहे ती पद्धति जनावरांवर क्रौर्य करूं नये या तत्त्वाखालीं लोकांनीं बंद पाडली. असो.

जेथें लोकमत प्रबल आहे आणि शासनविषयक अनेक गोष्टींचा निवाडा लोक स्वतः करतात तेथें समाजांत जुन्या लोकांचें किंवा मोठमोठ्या घराण्यांचें महत्त्व नसेल अशी आपली जर समजूत होईल तर स्वित्झर्लंडचा अनुभव याच्या विरुद्ध आहे. एखाद्या शहराचा मेयर असुकच घराण्यांतून निवडावयाचा असा प्रकार तेथें चालू आहे व कांहीं घराण्यांत तीन पिढ्यांपर्यंत मेयरचें पद अचल होतें असें समजतें. यावरून असें दिसतें कीं वंशपरंपरेनें अधिकार चालणें हें लोकसत्ताक राज्यांत अशक्य नसतें. स्वित्झर्लंड-मधील लोकांची समजूत अशी दिसते कीं असुक घराण्यांत बापानें मेयरचें काम केलें आहे तर मुलगा अर्थात् इतर लोकांपेक्षां मेयरचें काम जास्त चांगलें करील. तसेंच मुख्य अधिकारी कोण निवडावे यासंबंधानें देखील स्वित्झर्लंडांत तीव्र भाव नाहीं. अमेरिकेंत अमेरिकन कान्स्टिट्यूशनप्रमाणें अध्यक्ष निवडण्याचा अधिकार लोकांस प्रत्यक्ष दिलेला नाहीं. लोकांनीं मतदार Electors निवडावे व मतदारांनीं अध्यक्ष निवडावा अशी पद्धति घातली आहे. परंतु व्यवहारांत त्या पद्धतीची अगदीं उलटापालट झाली आहे. निरनिराळे राजकीय पक्ष अध्यक्षपदाकरितां आप-आपला उमेदवार नेमतात, त्या उमेदवाराची जाहिरातींनीं प्रसिद्धि करतात आणि आपल्या पक्षास आपल्याच उमेद-वारास मत द्या म्हणून सांगतात. अध्यक्षाला निवड-ण्याचें शोभेचें काम करणारे मतदार आपल्या कार्डावर इलेक्शनच्या दिवशीं नांव मात्र छापतात. मत देणारा मनुष्य उमेदवारांच्या यादीकडे ढुंकून देखील पहात नाहीं; आपली पार्टी कोणती आहे ती पाहतो आणि त्या पक्षाच्या उमेदवाराला आपलें मत देतो. असो.

लोकमतानें राज्य करणें हें नेहमींच श्रेयस्कर होत नाहीं. जेव्हां एखादी गोष्ट न्यायाची असते तेव्हां एकट्या न्याया-धीशावर जर न्यायाची जबाबदारी असेल तर निकाल बराचसा न्यायाचा होईल. परंतु जेव्हां निकाल देण्याची जरूरी ज्यूरीवर पडते तेव्हां ज्यूरीवर जबाबदारी टाकून जज्ज नामानिराळा होतो आणि ज्यूरीचें मत अनेक कारणांमुळें पुष्कळ प्रसंगीं सदोष असतें. अमेरिकेंत गोऱ्या ज्यूरीकडून गोरा विरुद्ध काळा असा खटला असला म्हणजे काळ्यास न्याय मिळणें अतिशय कठिण जातें. हिंदुस्थानांत यूरोपि-अन गुन्हेगारास दोषी ठरविण्यास यूरोपिअन ज्यूरीचें मत कसें कचरतें ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे.

लोकमताची आणखी एक प्रवृत्ति म्हटली म्हणजे सर्व स्थितीची गोळाबेरीज करून निकाल द्यावयाचा आणि कायद्याच्या बारीक खांचाखोंचींकडे दुर्लक्ष करावयाचें ही होय. लोकमतानें न्याय देण्यांत एक गोष्ट अशी होते कीं तत्कालीन न्यायविषयक ज्या कल्पना असतील त्या कल्पना कायद्यांत उतरतात आणि कायदा लोकमतानुवर्ती होतो. लोकमत व कायद्याची सरळ दृष्टि यांतील भेद लक्षांत येण्याकरतां येथें एकच उदाहरण देतों. समजा, एका ब्राह्मण स्त्रीवर ब्राह्मणानेंच बलात्कार केला तर त्यापासून ब्राह्मणज्ञातीस जें दुःख होईल त्यापेक्षां ख्रिस्ती अगर मुसुल-मानानें केला असतां अधिक होईल. उदाहरणार्थ, मुसुलमानानें ब्राह्मण स्त्रीवर बलात्कार केल्याबद्दल मृत्यूची शिक्षा रत्ना-गिरीच्या सुभेदारानें एकदां ठोठावली होती. सध्यांच्या इंग्रजी कायद्याच्या दृष्टींत हा भेद येत नाहीं. अमेरिकेंत या प्रकारचा भेद वारंवार होतो. एवढेंच नव्हे तर, एका चिनी गृहस्थानें एका गोऱ्या बाईस पाऊस पडत असतां छत्री देऊं केली याबद्दल चिनी मनुष्यास ५० डालर दंड झालेला आहे. असें कां तर, गोरी बाई अडचणींत असली व तिला मदत करण्यास चिनी पुढें सरसावला तर चिनी मनुष्यास गोऱ्या बाईशीं अधिक संघट्टन ठेवण्याची संधि मिळेल व तशी संधि नसावी असें तर लोकमत आहे.

लोकमत स्वयंस्फूर्तीनें कार्य करण्यास पंगू आहे. तें नेहमीं आपल्या प्रतिनिधींच्या मागें धांवत असतें किंवा जो स्वतःस लोकांचा प्रतिनिधि म्हणवून घेतो त्याला चिकटतें. लोकमताचें राज्यकर्त्यांवर दडपण कधीं कधीं पडलेंसें दिसतें. पण तें खरेखुरें लोकमताचें दडपण नसून कारभाऱ्यांचे जे अंतेवासी असतील त्यांचें मत होय. सर्व जनतेची एकी होणें कोणत्याहि राष्ट्रांत शक्य नाहीं. सर्व लोकांची एकी म्हणजेच सरकार. जेथें लोकांची बराच वेळ टिकणारी अशी लोकमतप्रदर्शक संस्था आहे तेथें तिच्या ठायीं राजत्वाचे

हक्क नकळतपणें जातात. एकजुटीनें वागणाऱ्या मजूर-वर्गाच्या पुढाऱ्याचें कारखानदारास ऐकावेंच लागतें. त्याचप्रमाणें लोकांच्या मतांचें ज्या संस्थांत एकीकरण होतें त्या संस्थांच्या हातीं कार्यनियमन वरेंचसें येतें. लोकसत्तात्मक राज्यांत पंगू लोकमत सजीव व जोरदार करणाऱ्या ज्या संस्था दिसतात त्यांचें अतिशय उत्कट स्वरूप अमेरिकेंत दृष्टीस पडतें. आणि या संस्थांचें कार्य लक्षांत घेतलें म्हणजे खासगी रीतीनें तयार झालेल्या संस्था कायद्यानें तयार झालेल्या संस्थांस कशा पिटाळून लावतात हें लक्षांत येईल.

अमेरिकेमध्यें सामान्य नागरिकास दोन तीन वर्षांत एखाद्या वर्षीं शेंसवाशें लोक निवडावे लागतात. ग्रामाचे अधिकारी, काउंटीचे अधिकारी, संस्थानाचे अधिकारी आणि राष्ट्राचे अधिकारी अशा सर्व प्रकारचे लोक निवडावे लागतात. इतक्या सर्व प्रकारच्या जागांस जे उमेदवार म्हणून उभे राहतात त्या सर्वांची माहिती नागरिकास कोठून होणार? जेथें उमेदवार मनुष्यांविषयीं माहिती फारशी नाहीं तेथें हा आपल्या जातीचा किंवा पक्षाचा आहे काय इत्यादि विचार मनुष्याच्या मनांत येणें स्वाभाविक आहे. आपल्याकडे ज्याप्रमाणें अधिकार हातांत असलेले लोक आफिसामधील नवीन कारकून आणायचा असेल तर आपल्याच जातीचा आणण्याची खटपट करितात त्याप्रमाणें पुष्कळदां लोकांकडून होणारी निवड जातीच्या तत्वावरच होते. अमेरिकेंतील शासनसंस्थेंत मनुष्याच्या पारमार्थिक मताचा विचार वगळावा असें कायद्याचें तत्त्व आहे खरें, परंतु रोमन कॅथोलिकास किंवा ज्यूस अध्यक्षपद कधींहि मिळालें नाहीं व बराच कालपर्यंत तें मिळण्याचा संभवहि नाहीं. जनतेंतील मोठा भाग प्रॉटेस्टंट आहे म्हणून बहुतेक प्रॉटेस्टंटच देशाचा मुख्य अधिकारी होतो. लहान-सहान हुद्दे इतरांस मिळतात, पण त्याचें कारण देखील पुष्कळ अंशीं जातिमूलकच असतें. उदाहरणार्थ, न्यूयॉर्कच्या मेयरची जागा पुष्कळदां कॅथोलिकास मिळाली आहे आणि याचें कारण न्यूयॉर्क शहरांत आयरिश लोकांचा भरणा मोठा आहे हें होय. जातिमूलक बुद्धीनें लोकांनीं मत देणें हें जसें चालतें तसेंच पक्षमूलक भावनांनीं मत देणें हें देखील चालू असतें. जो मनुष्य उमेदवार म्हणून उभा राहील त्याची माहिती होणें हें फारजणांस शक्य नसतें म्हणून पक्षमूलक कल्पनांचा पगडा बसणें स्वाभाविक आहे. आपल्या पक्षाच्या मुत्सद्द्यांनीं अमुक उमेदवाराची निवड केली त्या अर्थीं तो मनुष्य योग्यच असला पाहिजे ही कल्पना लोकांत असते आणि यामुळें निरनिराळ्या पक्षांच्या केंद्रस्थानीं असणाऱ्या मुत्सद्द्यांस आणि घटनांस शक्ति उत्पन्न होते. राजकीय पक्षांच्या मध्यवर्ती संस्था व त्यांचे सर्व देशभर पसरलेले हात यांचा एकंदर वृत्तांत आणि त्याचप्रमाणें त्यांच्या कार्य करण्याच्या पद्धती या सर्वांची हकीकत मनोरंजक आहे. या संस्थांमध्यें व्यवहार इतका दृष्टीस पडतो कीं ज्याप्रमाणें वर्तमानपत्रांत खाण्याच्या जिनसांच्या मोठमोठ्या जाहिराती येतात त्याप्रमाणें अमक्याला मत द्या म्हणून देखील जाहिराती येतात. त्या जाहिराती मासिककार फुकट छापीत नाहींत. रीतीप्रमाणें पैसे घेऊनच छापतात. पक्षांचे वक्ते पगारी असतात. चोहोंकडे व्याख्यानें पगारी वक्त्यांकडून होतात. अर्थात्, प्रत्येक पक्षाच्या मोठमोठ्या लोकांकडून व्याख्यानें होतात तीं निराळीं. जो मनुष्य उमेदवार म्हणून उभा असतो त्याजवर सर्व मोहिमीचा खर्च पडत नाहीं. तो आपल्या शक्तीप्रमाणें आपल्या पक्षाच्या संस्थेस वर्गणी देतो व आपण उमेदवार म्हणून थोडे जास्त पैसे देतो एवढेंच. कोणीं कोठें व्याख्यान द्यावें, उमेदवारांनीं कोणकोणत्या ठिकाणीं जावें हें सर्व त्या पक्षाचे व्यवस्थापक ठरवितात आणि आपण ठरविलेल्या कार्यक्रमाप्रमाणें उमेदवारास हिंडवितात. निरनिराळ्या पक्षांचीं क्रमिक पाठांचीं पुस्तकें असतात. व्याख्यानाचे सांचे मुख्य ऑफिसांतील हुषार लेखक तयार करतात. आणि भाडोत्री व्याख्याते तीं वाक्यें चोहोंकडे उद्गारतात. याशिवाय पक्षाचा जो मुख्य वक्ता असेल त्याचा आणि सर्व जनतेचा प्रत्यक्ष संबंध यावा यासाठीं अशा वक्त्याचीं व्याख्यानें फोनोग्राफमध्यें घेऊन त्या फोनोग्राफच्या मार्फत त्यांचें श्रवण चोहोंकडे करवितात. वर सांगितलेल्या मतप्रसारार्थ व लोकपरिचयार्थ होणाऱ्या केवळ सर्वसामान्य चळवळी होत. पक्षाच्या खटपटींचें क्षेत्र याहूनहि अधिक आहे. त्या खटपटी म्हटल्या म्हणजे सर्व मनुष्यांनां नाना उपायांनीं आपल्या पक्षांत कायमचे अडकवून ठेवण्यासाठीं उपाय योजणें. अशा उपायांपैकीं एक मुख्य उपाय म्हटला म्हणजे मनुष्य जेव्हां कायद्याचे अडचणींत सांपडला असेल तेव्हां त्यास मोकळें करणें. कोणास अधिक जोरानें मोटार हांकल्याबद्दल पोलीसनें पकडलें असलें म्हणजे त्यानें आपल्या पक्षाच्या सूत्रचालकास म्हणजे 'बॉस'ला कळवावें. सूत्रचालक पोलीसची समजूत करून खटला काढून टाकील. कोणी रविवारीं दारू चोरून विकण्याबद्दल सांपडत असेल तर त्यालाहि पक्षाचा नेता सोडवून आणील. तसेंच आपल्या पक्षाच्या कोणा मनुष्याची नोकरी सुटली असेल तर त्याला ती कोठें तरी लावून देण्याची खटपट त्या पक्षाचा मुख्य करील. हा पक्षाचें महत्त्व कायम राखण्याकरितां उपकारांचा उपाय झाला. दुसऱ्या निरनिराळ्या पक्षांचें महत्त्व कमी करण्याकरितां जे उपाय प्रचारांत आणतात त्यांच्यामध्यें खोटें किती बोलावें याला सुमारच नसतो. पक्षांच्या लोकांस हें ठाऊक झालें आहे कीं अशा गडबडीच्या वेळेस कोणी मोठा मनुष्य कोर्टांत खटला नेत नाहीं. आणि एखाद्यानें नेला तर ठीकच झालें, त्याचा वेळ आयताच अडकला गेला आणि त्याची चळवळ त्या मानानें बंद पडली. शिवाय जें खोटें बोलायचें

तें देखील फार काळजीपूर्वक बोलण्यांत येतें. खोटीं विधानें प्रत्यक्ष करूं नयेत· ज्यांच्यापासून लोकांची गैरसमजूत होईल अशीं विधानें बेलाशक करावीं. पैसेखावूपणाचा आरोप करूं नये पण तो ध्वनित करावा. उदाहरणार्थ, अमुक मनुष्य अमुक हुद्दयावर असतांना त्याचा पगार अमुक होता, त्याचा घरचा त्यावेळचा खर्च अमुक असला पाहिजे, असें गणित वर्तमानपत्रांत मांडावें आणि त्या दिवसांमध्यें झालेल्या मिळकतींत त्यानें अमुक किंमतीचें घर बांधलें असें म्हणून त्याच्या घराचा फोटो द्यावा. तसेंच मनुष्याच्या कित्येक घरच्या खासगी उखाळ्यापाखाळ्या काढून त्याहि चवाट्यावर आणण्याचा परिपाठ आहे. निरनिराळ्या पक्षांचे हे जे सूत्रचालक असतात त्यांनां मतावद्दल मोठीशी फिकीर असते अशांतला भाग नाहीं. राजकीय पक्ष अथवा त्याची कार्यकारी संस्था म्हणजे कांहींतरी तत्त्वाखालीं एकत्र जुळलेल्या लोकांची आपलें खासगी हित साधणारी संस्था असते. पुष्कळदां हें खासगी हित साधण्यासाठीं किंवा पक्षाचें हित साधण्यासाठीं नगराचें, संस्थानाचें किंवा राष्ट्राचें हित बाजूस करण्यास पक्षांचे सूत्रचालक मागेंपुढें पहात नाहींत· पक्षांचे सूत्रचालक एकमेकांच्या फार विरुद्ध असतात असेंहि नाहीं· त्यांचा एकमेकांविषयीं स्नेहभाव असतो, एकमेकांत दळणवळण असतें. या पक्षांच्या सूत्रचालकांच्या तडाख्यांतून एखादें संस्थान किंवा शहर सोडवावयाचें किंवा कोणतीहि सुधारणा घडवून आणावयाची असें जेव्हां लोकांनीं योजिलें असेल तेव्हां परस्परविरुद्ध पक्षांचे सूत्रचालक रुमालाखालीं हस्तांदोलन करतात· व्यवहार न समजणारा अथवा प्रामाणिक म्हणजे सार्वजनिक पैशाची अफरातफर होते त्याविरुद्ध ओरड करणारा अथवा त्याविरुद्ध आपलें वर्तन ठेवणारा वर्ग समाजांत निर्माण झाला म्हणजे दोन्ही पक्षाचे सूत्रचालक आपसांत असें ठरवितात कीं, तुम्ही बदमाष मनुष्यास पुढें करा आम्ही बदमाष मनुष्यास पुढें करतों. तुम्हीं जिंकलें तर तुम्ही खा, आम्हीं जिंकलें तर आम्ही खाऊं, पण हे व्यवहार न समजणारे सुधारक नकोत.

इंग्लंडांत लोकसत्तेची जी गेल्या १५० वर्षांत वाढ झाली ती, मुख्य कारकुनी उर्फ मुख्यप्रधानाची जागा आपल्या हातीं पडावी, व ती पाडून घेण्याकरितां मधून मधून लोकजागृति करावी आणि लोकांचीं मतें ती जागा मिळण्याकरितां आपल्या तर्फेनें वळवून घ्यावीं, प्रसंगीं या प्रकारच्या खटपटी करण्याकरितां मतांचा तुटवटा पडला तर आपल्या पक्षास बळकटी आणण्याकरितां मतें देण्याचा हक्क अधिकाधिक वांटून द्यावा, या प्रकारच्या मुत्सद्दयांच्या खटपटीनें झाली. उदाहरणार्थ, एखाद्या मालगुजाराला आपला वसूल जुन्या दिवाणजीमार्फत होत नाहीं असें वाटलें म्हणजे ज्या मनुष्यामार्फत वसूल होईल असा दिवाणजी तो नेमील आणि या परिस्थितीमुळें एखादा खटपटी मनुष्य काम करीत असलेल्या दिवाणजीस नालायक ठरविण्यास कुळांस असा उपदेश करील कीं 'तुमच्याकडून पैसा फार कठोरपणानें वसूल केला जातो आणि तुमच्या हिताकरितां दिवाणजी कांहीं करीत नाहीं, तुमच्याकडून वसूल करावयाचा तो तुमच्या सोईनें घेतला पाहिजे आणि तुमचें अमुक अमुक हित पाहिलें पाहिजे'. असें सांगून तो कुळांस चेतवील आणि मालगुजारास असें भासवील कीं, लोकांच्याकडून वसूल व्हावयास या लोकप्रिय मनुष्यास नेमल्यास सुलभ जाईल. असें वारंवार होऊं लागलें म्हणजे मालगुजाराचा कारकून कुळांनीं नेमावा असा प्रघात पडूं लागेल.

इंग्लडच्या लोकसत्तेच्या इतिहासांतील खरे धागे हे आहेत आणि बाकीचें सर्व काव्य आहे.

इंग्लंडमध्यें लोकांस अधिकाराचा अंश राजाकडून दिला गेला आहे; पार्लमेन्टचें खरें कर्तव्य लोकांच्या गरजा राजास कळविणें हें आहे व तें कर्तव्य दाखविणारे विधी व मंत्र अजून शिल्लक आहेत; तथापि व्यवहारांत सत्ता हाऊस आफ कामन्स मधील बलवान् पक्षाच्याच हातीं आहे.

अमेरिकेमध्यें सर्व जनता हीच शासनविषयक धर्मशास्त्राच्या दृष्टीनें सर्वसत्ताधारी आहे.

सर्व लोकांस एकत्र जमवून कार्य करणें अशक्य असतें; यासाठीं सर्व लोकांस आपलें मत व्यक्त करतां यावें आणि कार्य करतां यावें म्हणून प्रतिनिधिसत्ता अस्तित्वांत येते. प्रतिनिधी निवडावयाचे त्यांत देखील जेथें सर्व जनता संख्येनें अवाढव्य आणि आपल्या कर्तव्यासंबंधानें दुर्लक्ष करणारी अशी स्वाभाविकपणेंच असेल तेथें ज्यांनां मत असेल अशा लोकांस पढवून आपल्या तन्त्रांतले लोक पुढें आणून त्यांस मतें मिळवून द्यावयाचीं हा कित्येकांचा धंदा झालेला असतो. या मतदारांच्या ड्रिलमास्तरांचें उपजीवन होण्यास जें द्रव्य लागतें तें दोन तऱ्हांनीं उत्पन्न करण्यांत येतें. एकतर, आपल्या तर्फेचे लोक अधिकारावर आणून सरकारी पैशाची कन्त्राटें घेण्याच्या मिषानें चोरी करणें. दुसरें, कायदे करणाऱ्या लोकांच्या हातीं ज्या संपत्तिमान् लोकांचें अगर कंपन्यांचें वरेंवाईट करण्याचा अधिकार आहे त्या लोकांकडून किंवा संस्थांकडून "वर्गणी" घेणें. या प्रकारचा पॉलिटिक्सचा धंदा करणाऱ्यांनां पालिटिशियन म्हणतात व जे लोक मतदारांस ड्रिल देऊन सत्ता आपल्या हातीं आणतात त्यांस बॉस (Boss) म्हणतात. मतदारांस जी ड्रिल द्यावयाची तिच्या पद्धती अनेक आहेत. भोळसर लोकांनां किंवा सामान्य जनतेस तत्त्वें सांगून वळवावयाचें आणि विशेष खटपटी व चळवळ्या लोकांस अधिकार हातीं आल्यानंतर नोकऱ्या द्यावयाच्या.

जेथें प्रतिनिधिसंघ मोठा असतो आणि तो बराचसा आपल्या मानाकरितां अगर किफायतीकरितां लोकप्रतिनिधींच्या

खुर्च्यांवर येऊन बसतो तेथें त्यांचें एकमत करण्यास मत-विषयक उपदेश हा तर होतोच, तथापि त्यापेक्षांहि जास्त परिणामकारी उपाय म्हणजे त्यांची किफायत होईल असे व्यवहार त्यांच्या हातीं ठेवणें, लांच देणें, वेश्या पुरविणें इत्यादि प्रकारहि होतात.

१९१० सालच्या फेब्रुवारी महिन्यांत न्यू जर्सी संस्थानाच्या प्रतिनिधींच्या सभागृहामध्यें प्रतिनिधींच्या उपयोगाकरितां वेश्या आणल्या व त्यावद्दल गव्हर्नरनें आक्षेप घेतल्यानंतर न्यू जर्सीच्या बॉसनें गव्हर्नरास गप्प बसण्यास सांगितलें व गव्हर्नर मित्रेपणानें गप्प बसून बाहेर गेला. यावद्दल जनतेस फार लाज वाटून व वर्तमानपत्रांत फार बोभाटा होऊन न्यू जर्सीच्या बॉसनां पुढें चांगला मनुष्य गव्हर्नरच्या जागीं आणणें भाग पडलें व यामुळें डॉ. विल्सन यांस न्यू जर्सीचा गव्हर्नर होण्याची संधि मिळाली.

कधीं कधीं रेल्वे कंपन्यांनां वगैरे आपल्या मालकीच्या जमिनी नामधारी किंमतीस प्रतिनिधींनां रेल्वेचें एकादें बिल पास व्हावयाचें असल्यास विकाव्या लागतात.

पुष्कळदां असें विधान करण्यांत येतें कीं अमेरिकेंतील अध्यक्षपदावर श्रेष्ठ गुणांचा मनुष्य येणार नाहीं. बहुतेक प्रेसिडेंट हे सामान्य प्रकारचे मनुष्य असतात हें विधान गेल्या वीस वर्षांचा इतिहास पाहिला तर कोणी बरोबर म्हणणार नाहीं. कां कीं, मॅकिन्ले, रूझवेल्ट, टाफ्ट, विल्सन, हे सर्व चांगल्या योग्यतेचे लोक होते यांत शंका नाहीं. तथापि सामान्य मनुष्य अध्यक्षपदावर आल्याचा अनुभव अमेरिकन राष्ट्रास पुष्कळदां आला आहे आणि याला कारणेंहि अनेक देण्यांत येतात.

एक कारण असें देण्यांत येतें कीं, ज्या मनुष्याला कांहीं अंशीं अधिकार वापरावा लागतो त्या मनुष्याला पुष्कळांनां नाखूष करावें लागतें आणि त्यास शत्रू अधिक उत्पन्न होतात. अधिकारपदावर आल्यानंतर न्यायासाठीं पक्षाच्या अनेक लोकांस नाखूष करावें लागलें म्हणजे नाखूष झालेला वर्ग त्या अधिकाऱ्यावर उलटतो आणि त्याला पुढें संधि देत नाहीं. यामुळें नेहमीं पुजाऱ्याच्या तंत्रानें चालणारे देव पुढें येतात.

याशिवाय दुसरी ही एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, "लोकसंग्रह" हेंच ज्याचें ध्येय होतें त्याला कोणच्याहि विषयाचें ज्ञान मिळविण्यास अवकाश कमी मिळतो. राज्य चालविण्यास जे विविध गुण लागतात ते संपादन करण्यापेक्षां निरनिराळ्या लोकांस खूष कसे करावे, त्यांच्या भिन्न अपेक्षांतून कार्यक्रम कसा आंखावा, या तऱ्हेचें ज्ञान त्याला फारतर मिळवितां येईल आणि सामान्य तऱ्हेच्या कार्यक्षमतेस इतपत ज्ञान पुरेसें होतें. जर समाजाचा प्रत्येक अवयव स्वहिताविषयीं जागरूक असेल तर निरनिराळ्या मागण्या करणारे निरनिराळे पक्ष पाहून त्यांतून मार्ग काढण्याइतकें कार्यज्ञान पुरेसें होईल. तथापि समाजाची प्रगति विशेष जोरानें करावयास यापेक्षां निराळ्या प्रकारच्या मनुष्याची आवश्यकता असते.

पक्षांची घटना व कार्य समजण्यासाठीं हें पक्षांचें यंत्र पैसा उत्पन्न कसा करतें हेंहि समजलें पाहिजे. पैसे उत्पन्न करण्याचा एक सर्वमान्य प्रकार म्हणजे लोकांकडून 'वर्गण्या' वसूल करणें. हें वर्गणी वसूल करणें एखाद्या धर्मादाय संस्थेच्या वर्गणी वसूल करण्याच्या पद्धतीपेक्षां निराळ्या प्रकारचें असतें. कांहीं लोक तात्त्विक बुद्धीनें वर्गणी देतात. कांहीं लोक एखादा भावी कायद्याचें संकट येणार आहे तें टाळावें व त्याकरितां आपल्या पक्षास जोरानें मदत द्यावी अशा दृष्टीनें वर्गणी देतात. कांहीं लोक ज्या दृष्टीनें पोलीसला वर्गणी देतात त्या दृष्टीनेंच पक्षाला वर्गणी देतात. कांहीं गोष्टी पुस्तकी कायद्याप्रमाणें गुन्हा समजल्या जातात. उदाहरणार्थ, रविवारीं दारू विकणें, लायसेन्सशिवाय कोकेन विकणें, वेश्यागृह चालविणें, या सर्व गोष्टी कायद्यानें मना आहेत. या गोष्टी राजरोस-पणानें चालविण्यासाठीं जशी पोलीसला 'वर्गणी' द्यावयाची तशीच या पक्षांनांहि वर्गणी द्यावयाची म्हणजे त्या मनुष्याकडे कानाडोळा करण्यास पक्षाधिकारी पोलीसास सांगतील. कांहीं वर्गणी धाकदपटशानें मिळविण्यांत येते. शासनाचे अधिकार एका पक्षाकडून दुसऱ्या पक्षाकडे गेले म्हणजे अनेक अधिकारी स्थानभ्रष्ट होतात आणि यामुळें जे अधिकारी कामावर असतात त्यांनां दोन्ही पक्षांस खूष ठेवणें भाग पडतें म्हणजे ते दोन्ही पक्षांनां वर्गण्या देतात. वर्गणीनें पैसा वसूल करणें हा एक मार्ग झाला. परंतु त्याहूनहि अधिक महत्त्वाचा मार्ग म्हटला म्हणजे सरकारी अगर म्युनिसिपालिटीचीं कंत्राटें होत. हिंदुस्थानांत पब्लिक वर्क्स डिपार्टमेंटमध्यें कंत्राटें मिळविण्या-साठीं जसे अधिकाऱ्याचे हात ओले करावे लागतात त्याप्रमाणें अमेरिकेंत जो पक्ष प्रबळ असेल त्या पक्षास वर्गणी द्यावी लागते. कधीं कधीं शंभर रुपयांचें काम करण्याचें कंत्राट ५०० किंवा १००० रुपयांस देण्यांत येतें. आणि अशा प्रसंगीं जी योग्य फायद्यापेक्षां अधिक रक्कम कंट्राक्टरला जाते ती रक्कम कंत्राटदाराकडून सूत्रचालकाच्या हातीं जाते.

सर्व लोकांस एका पक्षाखालीं अडकवून ठेवण्यासाठीं पक्षाच्या सूत्रचालकास काय काय पसारा मांडावा लागतो याची कल्पना सहजच येईल. बऱ्याचशा लोकांस पक्षाभिमानानें भारून टाकण्याकरितां वाङ्मय तयार करणें, वक्ते तयार करणें, हें काम असतेंच. आणि यासाठीं आपलें तुणतुणें कायमचें चालू ठेवण्यासाठीं अनेक दैनिक व साप्ताहिक पत्रें हाताशीं धरावीं लागतात. पुष्कळदां हीं दैनिक पत्रें केवळ आपल्या पक्षाच्या गिऱ्हाइकीवरच चालूं शकतात, व पुष्कळदां त्यांनां पक्षाकडून Subsidy उर्फ वर्गणीची मदत मिळते. लोकांचें मन

वळविण्यासाठीं त्यांनां मत देण्याच्या दिवशीं गाड्या तयार ठेवणें किंवा ज्याला मत देण्याकरितां परगांवीं जावें लागत असेल त्यास भाड्याचे पैसे देणें हे प्रकार नेहमींच चालू असतात. शिवाय मत देण्यासाठीं प्रसंगीं नागरिकांस लांचहि द्यावा लागतो. असो.

जें संस्थान लोकशासित आहे आणि सुलतानी पद्धतीनें ज्या संस्थानचें राज्य चाललें आहे त्या दोहोंमधील प्रजेंत महत्त्वाचे फरक दिसून येतात. लोकशासित राज्य चालविणें कठिण आहे. त्यामुळें असल्या राष्ट्रांत प्रत्येक नागरिकास चांगलें शिक्षण मिळणें अवश्य होतें. कारण संस्थारक्षक शिक्षण सर्व जातींस दिल्याशिवाय प्रजासत्ताक संस्थान चालणेंच शक्य नाहीं. संस्थारक्षक शिक्षणाचा भाग जेव्हां प्रजेंत दृष्टीस पडतो तेव्हां संस्थानाचें स्वरूप पालटल्याशिवाय रहात नाहीं. एकतर, परचक्र येऊन त्याचा विध्वंस होईल किंवा देशांतल्या देशांतच त्याचें शासनस्वरूप पालटेल. प्रजासत्ताक राज्यांतील जनतेचें दुसरें एक लक्षण असें आहे कीं, तेथें लोकांमध्यें शिक्षणानें किंवा अन्य उपायांनीं सादृश्य बरेंच उत्पन्न करावें लागतें. आणि यासाठीं परक्या देशांतून आलेल्या लोकांस 'अमेरिकनाइझ' करण्याकरितां अमेरिकेंत फार जोराचे प्रयत्न चालू असतात. वैसदृश्याविषयीं प्रजासत्ताक राज्यांत फार असहिष्णुता असते. प्रजासत्ताक राज्यामधील लोकांत परस्परांचें दळणवळण पुष्कळ पाहिजे. लोकांस पुढें येण्यासाठीं मतें मिळवावीं लागतात आणि तीं मतें मिळविण्यासाठीं पुढारी होऊं इच्छिणाऱ्यास सर्वांशीं स्नेहभाव ठेवावा लागतो. प्रत्येकानें गांवांतल्या अनेक मंडळींची ओळख करण्याकरितां प्रयत्न करावयाचा व त्या ओळखी कायम राखावयाच्या याचा परिणाम लोकांच्या रोजच्या व्यवहारावरहि पुष्कळ होतो. प्रजासत्ताक राज्यांत मोठेपणा मिळविणें व कायम राखणें या गोष्टी इतर नागरिकांवरोवर सौजन्यानें वागल्यानेंच सिद्ध होतात आणि त्यामुळें तेथील अधिकारी सौजन्ययुक्त असतात. पण जेथें मनुष्याचें महत्त्व आपल्या गांवांतील मंडळीच्या मार्फत आलेलें नसतें म्हणजे वरून आलेलें असतें तेथील राष्ट्रसेवकांमध्यें म्हणजे सरकारी नोकरांमध्यें उद्दामपणा दिसून येतो. मोठ्या पदावर जी मंडळी असतात त्यांचें अनुकरण सामान्य करतात म्हणून प्रजासत्ताक राज्यांत सर्व जनतेला एकमेकांशीं सौजन्यानें वागण्याचें वळण लागतें. उलट राजशासित देशांत मोठ्या अधिकाऱ्यांच्या अंगीं जे गुण दृष्टीस पडतात किंवा त्यांची जी वागणूक दृष्टीस पडते तिची नक्कल मोठेपणाचा आव घालणाऱ्यांमध्यें दृष्टीस पडते व समाजामध्यें एकमेकांविषयीं बेपर्वाई वाढते. प्रजासत्ताक राज्यांत आणि राजशासित राज्यांत आणखी एक भेद म्हटला म्हणजे नीतिमत्तेचा होय. दरबार आणि दरबारच्या भोंवतीं असलेला मुखावलेला परंतु काम करूं न चाहणारा वर्ग असतो त्याला राजास खुष करण्याकरितां नाना बरेवाईट उपाय योजावे लागतात व त्यायोगानें त्याची पुष्कळ नैतिक दुर्गति झालेली असते.

आतांपर्यंत केलेलें विवेचन एवढें दाखवील कीं लोकसत्ता वाढली म्हणजे समाजाची आर्थिक वृद्धि होईल असें नाहीं.

इतकें म्हणतां येईल कीं एखादा पक्ष अधिकारारूढ असला व त्या पक्षानें अधिकाधिक सुधारणा केल्या नाहींत म्हणजे त्यास बदनाम करण्याकरतां दुसरा पक्ष खटपट करूं लागतो आणि तो निरनिराळ्या सुधारणा केल्या नाहींत म्हणून देखील दोष देऊं लागतो; अर्थात् हें भवितव्य टाळण्याकरितां अधिकारारूढ वर्ग आणि अधिकार हिसकावूं पहाणारा वर्ग या दोहोंसहि जागरूक असावें लागतें, व अशा स्थितींत प्रजेच्या सुखाविषयीं व मागणीविषयीं अनास्था फार दिवस रहाणें शक्य नसतें. शिवाय अधिकारी लोकांतूनच निवडावयाचा प्रसंग उत्पन्न झाल्यानें पुष्कळ लोक सार्वजनिक प्रश्नांचा विचार करूं लागतात व या तऱ्हेच्या परिस्थितींत अधिक प्रगति होते.

तथापि हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, आर्थिक उन्नतीसाठीं प्रयत्न अनेकविध करावा लागतो, आणि त्या प्रयत्नाचा लोकसत्तेशीं प्रत्यक्ष संबंध थोडा आहे.

---

## उपप्रकरण ४ थें.

## हिंदुसमाजबलवर्धन.

देशांतील राजकीय बल वाढलें पाहिजे हा आपल्या इतिकर्तव्यतेचा एक मोठा भाग होय हें वर सांगितलेंच आहे. देशांतील राजकीय बल जसें वाढवावयाचें तसें हिंदुसमाजाचेंहि बल वाढलें पाहिजे. तें वाढेल तरच हिंदूंत आपण मिळून जावें ही इच्छा इतरांत संभवेल व राष्ट्र तयार करण्याची इच्छा तृप्त करणें शक्य होईल. आतां हें बल वाढवावयाचें कसें या प्रश्नाकडे वळूं.

हिंदुसमाजांतील एक मोठा दोष म्हटला म्हणजे सर्व समाजाला एकत्र जोडणाऱ्या शासनसंस्थेचा अभाव हा होय. आपल्या देशांत ज्या राजकीय चळवळी होत आहेत त्यांनीं हें कार्य पूर्णपणें साध्य होण्यासारखें नाहीं. सर्व हिंदी जनतेची पदवी वाढावी हा काँग्रेससारख्या संस्थांचा हेतु आहे. काँग्रेससारखी संस्था बलवान् होऊन हिंदी या तत्त्वावर निराळें आचारशास्त्र उत्पन्न करील तर हिंदु हा समाज नाहींसा होऊन हिंदी हा समाज वाढेल.

तसेंच, हिंदुसमाज एकसूत्रबद्ध होऊन कार्यकर्ता झाला तर तो अधिक व्यापक होईल व त्याच्या संस्कृतीचें हिंदु स्वरूप कायम राहून तो राष्ट्रस्वरूपी संघाचा साधक होईल.

या दोन क्रियांमध्यें कोणती क्रिया अधिक त्वरेनें कार्य करूं शकेल किंवा अधिक खोल कार्य करूं शकेल हें कार्यकर्त्यांच्या कर्तृत्वावर अवलंबून राहणार आहे.

हिंदुसमाजाचें संवर्धन करून त्यांतून राष्ट्रधर्म तयार करावयाचा या दृष्टीनें जर कार्य करावयाचें असेल तर जी कार्यपद्धति आचरावी लागेल ती येणेंप्रमाणें—

हिंदुसमाजास बलवान् करावयाचें म्हणजे दोन गोष्टी करावयाच्या. एक, समाजांतील व्यक्ती जास्त सुसंपन्न होतील अशी खटपट करावयाची आणि दुसरी गोष्ट करावयाची ती ही कीं, निरनिराळ्या व्यक्तींचा संबंध ज्या योजनेनें एकंदर हिंदुसमाजास फायदेशीर होईल अशी योजना करावयाची. व्यक्तीचें महत्त्व वाढविण्यासाठीं शिक्षणादिक उपाय जे समाजास केले पाहिजेत ते सर्व या खटपटीमध्यें मोडतात. सामाजिक अंतर्घटना काय करावी यासंबंधानें आज कोणताहि प्रयत्न जरी सुरु केला तरी तो व्यर्थ जाईल अशी खास शंका वाटते. कां कीं कोणताहि विचार अंमलांत आणण्यास जें शिक्षण लोकांस दिलें पाहिजे तें द्यावयास फुरसत कोणास आहे? कोणत्याहि विचाराचा प्रसार निरक्षर जनतेंत करावयास किती अडचणी उत्पन्न होतात आणि यासंबंधानें प्रयत्न केल्यास उद्दिष्टाशीं विसदृश फल कसें प्राप्त होतें हें दिसतच आहे. जेव्हां सामान्य लोकांस लिहिलेलें वाचून सरळ वाक्यांचा अर्थ समजण्याइतकी व थोडासा विचार करण्याइतकी शक्ति आली असेल तेव्हांच कोणत्याहि सामाजिक प्रयत्नांत यश येणार. समाजांत सुधारणा करण्यापूर्वी समाजाला उद्दिष्ट लागतें. समाजांतील अंतर्गत स्थिति अगर घटना समाजध्येयाचें करण होय. साध्य स्पष्ट असेल तर यंत्र कसें बनवावें हें स्पष्ट होईल. असें दिसून येतें कीं केवळ अंतर्घटनेंत फेरफार करण्याकरितां जे प्रयत्न झाले ते सर्व अप्रिय आणि अयशस्वी ठरले. उलट जेव्हां समाजास कांहीं विशिष्ट कार्य करावें असें वाटलें तेव्हां तो कृतीमध्यें उपदेशकांच्या पुढें गेला. अर्थात् अंतर्घटनेची सुधारणा करण्यापेक्षां समाजाची महत्त्वाकांक्षा अधिकाधिक व्यापक करण्याचा प्रयत्न अधिक उपयुक्त होईल आणि ही महत्त्वाकांक्षा पार पाडण्यासाठीं जर खटपट होऊं लागेल, तर समाजांत फरक कोणते करावे हें सांगणें अनवश्यक आहे. जातींतील पंचांस अधिकार कमी असावे अगर जास्त असावे, शंकराचार्यांसारख्या अधिकाऱ्यांस मान्यता द्यावी अगर देऊं नये या दोन ऐच्छिक कार्यक्रमांपैकीं कोणत्या कार्यक्रमानें समाजाचें बल वाढेल इत्यादि विचार सर्व समाज जोंपर्यंत निरक्षर आहे तोंपर्यंत फोल आहे. जोंपर्यंत सर्वसामान्य जनसमूह अज्ञान आहे तोंपर्यंत शंकराचार्यांसारख्या संस्था जिवंत राहिल्या काय किंवा मेल्या काय सारख्याच. सामान्य जनांवर त्यांचें वजन कांहींच नाहीं, सुशिक्षित वर्ग शोभेकरितां त्यांना मान देतो, जो वर्ग त्यांच्या तंत्रानें वागण्याचा प्रयत्न करितो त्या वर्गास या प्रकारच्या संस्था पीडादायक होतात. ओरिसामध्यें मोठमोठ्या जमिनींचे मालक जे महंत आहेत ते आपल्या ताब्यांत असलेल्या लाखों रुपयांची आणि कित्येक सहस्र रुपये वार्षिक उत्पन्नाची काय वरें विल्हेवाट लावितात? तिरुपतीच्या महंतासारख्यांचे खेळ कोर्टांत, वर्तमानपत्रांत, गांवांतील वारयोषितांच्या वस्तींतील रस्त्यांत वर्णिले गेल्यामुळें सर्वविश्रुत झाले आहेत. जनता जर अज्ञानी आहे तर तिच्यावर ज्या वर्गास अधिकार गाजविण्याची संधि आहे अशा वर्गानें आपला तळीराम गार करण्याची संधि कां घालवावी? सामान्यतः थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे हिंदूंनां प्रथमतः आपल्या सामुच्चयिक उत्कर्षाची इच्छा पाहिजे आणि ती इच्छा कृतींत आणण्याकरितां संस्था व योजना तयार करण्याचें प्रत्येक प्रांतांत व जिल्ह्यांत त्यांनीं अंगावर घेतलें पाहिजे. हिंदुसमाजबलवर्धनाच्या दृष्टीनें करावयाचीं कार्यें कशीं करतां येतील आणि तत्संबद्ध साध्य जें एकराष्ट्रीयत्व तें कसें सिद्ध होईल याविषयींची विचारमालिका खालीं देत आहों.

१. हिंदुस्थान हें राष्ट्र होणें इष्ट आहे एवढेंच केवळ नाहीं, तर तें अपरिहार्य आहे. लोकांचा निश्चय असला आणि ज्या तत्त्वांवर आणि ज्या पद्धतीनें कार्य करावयाचें तीं तत्त्वें आणि ती पद्धति हीं निर्दोष असलीं तर हिंदुस्थानचें राष्ट्रीभवन शीघ्र होईल. परंतु कार्यतत्त्वें आणि कार्यपद्धति हीं जर सदोष असतील तर किंवा लोक निरिच्छ राहतील तर राष्ट्रीभवनाच्या कार्याला तात्पुरता विलंब होईल.

२. सादृश्य आणि सहानुभूति यांचा अन्योन्याश्रय आहे. ज्या मानानें लोकांमध्यें सादृश्य अधिक त्या मानानें त्यांजमध्यें सहानुभूति (ऐक्यभाव) अधिक. लोकांमध्यें ऐक्यभाव वृद्धिंगत करण्यासाठीं त्यांच्यामध्यें सादृश्यवर्धन करणें अवश्य आहे.

३. सादृश्य हें सहवासजन्य आहे. निरनिराळ्या लोकांचा एकमेकांशीं निकट संबंध झाला असतां जे लोक अधिक बलवान् असतील त्यांचें कमी बलवानांकडून अनुकरण झाल्यानें सादृश्य उत्पन्न होतें.

४. सादृश्य हें केवळ तडजोडीनें उत्पन्न होत नाहीं. तें दंडमूल आहे. देवघेवीच्या तत्त्वानेंच केवळ सादृश्य उत्पन्न होत नाहीं. देवघेवीच्या तत्त्वावर एखादी नवीन आचारपद्धति उत्पन्न होईल; तथापि त्या पद्धतीचा प्रसार आणि त्या प्रसारामुळें उत्पन्न होणारें समाजसादृश्य देखील ती पद्धति अंगिकारणाऱ्या लोकांच्या शक्तीवर अवलंबून आहे. बलवानांची आचारपद्धति दुर्बलांच्या आचारपद्धतीवर परिणाम घडविते आणि तेणेंकरून समाजांत सादृश्य उत्पन्न होतें असा इतिहासाचा अनुभव आहे.

५. राष्ट्रीकरण म्हणजे हिंदुस्थानांत सध्यां ज्या तीन हजार जाती आहेत त्या मोडून टाकून त्यांची एक जात होणें होय. निरनिराळ्या जातींत आणि लोकांत भेदभाव अनेक प्रकारचा आहे. भेद ज्या प्रमाणानें नष्ट होतील त्या प्रमाणानें एकजातित्व वृद्धिंगत होईल. सर्वच भेद पूर्णांशानें नष्ट होणें शक्य नाहीं. तथापि राष्ट्रीभवन साध्य होण्यास सर्व लोकांचें ऐक्य साधण्यापुरतें सादृश्य उत्पन्न झालें पाहिजे.

६. समाजाचे अनेक घटकावयव एकमेकांशीं संलग्न होऊन लोकांचें एकीकरण होणें शक्य नसेल तर ते सर्व एखाद्या समाजकेंद्राशीं संलग्न होतील अशी तजवीज करून समाजाचें एकीकरण करावें लागतें. ऐक्य समाजकेंद्रामुळें उत्पन्न होतें. समाजशासनविषयक उच्च हेतु अगर ध्येय प्राप्त करून घेण्यासाठीं समाजाचे अनेक घटक अशा तऱ्हेनें रचले पाहिजेत आणि सुसंघटित केले पाहिजेत कीं आपल्या राष्ट्रास आपलें भवितव्य हातीं राखतां येईल.

७. आमची सामाजिक आणि राजकीय घटना अत्यंत दुर्बल आहे. कोणत्याहि समाजास जगांत यशःप्राप्ति होण्यासाठीं सरकार आणि लोक यांचें ऐक्य नसलें तरी निदान त्यांची सामाजिक, विचारविषयक आणि बुद्धिविषयक एकरूपता झाली असली पाहिजे. ही एकरूपता येथें उत्पन्न व्हावी यासाठीं शासनतंत्राच्या ठायीं भारतीयपणा आणला पाहिजे.

८. एकरूपता प्रस्थापित करण्यासाठीं खालील सुधारणात्रयी अनुक्रमानें घडवून आणली पाहिजे.

(अ) हिंदुस्थानचे राजकीय विभाग भाषेच्या तत्त्वानुसार घडवून आणले पाहिजेत.

(आ) या निरनिराळ्या विभागांची राज्यव्यवस्था त्या त्या प्रांतांतील देशी भाषांच्या द्वारें चालविली पाहिजे.

(इ) भाषानुसार पाडलेल्या या नवीन प्रांतांस प्रत्येकीं निदान एकतरी विद्यापीठ असलें पाहिजे आणि त्यांतून सर्व शिक्षण त्या त्या प्रांतांतील देशी भाषेच्या द्वारेंच दिलें पाहिजे.

९. या सुधारणा झाल्या असतां प्रत्येक प्रांतांत समाजशासक शिष्टवर्ग अस्तित्वांत येईल आणि तो बलवान् होऊन ऐक्य घडवून आणील.

१०. समाजांत ऐक्य आणण्यासाठीं उच्च संस्कृतीचा लोकमान्य शिष्टवर्ग असणें अवश्य असतें. मग प्रश्न एवढाच उरतो कीं, हा उच्चवर्ग स्वदेशीय असावा कीं परका असावा.

११. समाजांतील उच्च शिष्टवर्ग असा असला पाहिजे कीं, तो आपल्या बौद्धिक सामर्थ्यानें समाजांत सुधारणा घडवून आणील. यासाठीं हा उच्चवर्ग रक्तानें स्वदेशीय असून स्वदेशीय संस्कृतीचा प्रतिनिधि असला पाहिजे. असाच वर्ग समाजांत चिरकाल जनमान्य होऊं शकतो. दंडधारित्वामुळें उर्फ दंडेशाहीमुळें परक्या जातीस अगर संस्कृतीस जनमान्यता आलीच तर ती तात्पुरती येईल.

१२. समाजाचें अगर राष्ट्राचें भवितव्य ठरविण्याचें काम अशा वर्गाकडे अगर जातीकडे सोंपविलें पाहिजे कीं, तो वर्ग अगर ती जात स्वतः बलवान् असून आपलें वजन, निदानपक्षीं अस्तित्व, कोणत्याहि परिस्थितींत कायम राखूं शकेल आणि समाजसंस्काराचें काम अप्रतिहतपणें चालवूं शकेल.

१३. समाजांत फेरफार घडवून आणण्यासाठीं कार्यकर्त्या लोकयंत्राची आवश्यकता आहे. ब्राह्मण जर इतर जातींप्रमाणें स्वयंशासित जात बनतील तर त्यांस स्वाचारनिर्णय करतां येईल एवढेंच नाहीं, तर इतर जातींचा आचारनिर्णय देखील त्यांच्याकडून होईल. कां कीं, अनुकरणाची इच्छा (ईर्ष्या) समाजांत सदैव जागृत राहील.

१४. ज्या अर्थी ईर्ष्या आणि श्रेष्ठांचें अनुकरण हे भाव प्रत्येक निरोगी समाजांत जागृत असतात त्या अर्थी समाजांतील उच्च वर्णानें आपलें आचरण असें ठेविलें पाहिजे कीं, तेणेंकरून समाज अनिष्ट मार्गानें जाणार नाहीं.

१५. हिंदु समाजाचे कार्यकर्ते लोक ब्राह्मणच आहेत. आंग्लबुद्धी बनलेल्यांचा उर्फ "सुशिक्षित" हिंदी लोकांचा वर्ग समाजांत फेरफार घडवून आणण्यास सर्वस्वीं असमर्थ आहे. विशिष्ट वर्ग समाजांत फेरफार करण्यास समर्थ व्हावयास त्या वर्गाच्या हातीं कांहीं तरी स्वयंसिद्ध सत्ता असली पाहिजे; आणि त्या वर्गाच्या ठायीं एकत्वभावना, एकजातित्व, स्वयंशासनाची व आत्मीयकरणाच्या नियमनाची शक्ति हीं पाहिजेत. "सुशिक्षित हिंदी" लोकांमध्यें यापैकीं कांहींहि नाहीं.

१६. आंग्लबुद्धी बनलेल्यांचा वर्ग, एतद्देशीय ख्रिस्ती लोक, आणि ब्रह्मसमाजासारखे संप्रदाय हे सर्व लोकसमूह पाखंडी आहेत. या पाखंडांचीहि थोडीफार उपयुक्तता आहे. परंपरागत संस्कृतीशीं या पाखंडांचें सारूप्य ज्या प्रमाणानें असेल अगर बाह्यांमध्यें किंवा चिनी लोकांसारख्या बाहेर देशच्या लोकांमध्यें हिंदीपणा उत्पन्न करण्यांत त्यांस ज्या प्रमाणानें यश आलें असेल त्या प्रमाणानें त्या पाखंडांची उपयुक्तता कमी अधिक आहे.

१७. सध्यां देशांत विविध संस्कृती परस्परांशीं झुंजत आहेत. या युद्धांत आर्यसंस्कृतीचा विजय जाहला पाहिजे. तो विजय संपादन करण्यास आपली चातुर्वर्ण्यविषयक समाजनीति पूर्ववत् व्यापक रीतीनें प्रस्थापित केली पाहिजे, व समाजघटना पहिल्यापेक्षांहि बलवत्तर केली पाहिजे.

१८. राष्ट्रीकरणासाठीं जो कार्यक्रम ठरवावयाचा तो ठरवितांना हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, देशांत कांहीं परिस्थितींत

अस्वस्थता व अराजक उत्पन्न होण्याचा संभव असतो. ही गोष्ट लक्षांत घेऊन शिवाय देशांतील विशिष्ट संस्कृतींचें अगर त्यांच्या विशिष्ट अंगांचें बळाबळ आणि क्षराक्षरत्व ओळखिलें पाहिजे; आणि मग कार्यक्रम ठरविला पाहिजे.

१९. हिंदु समाजाचे अत्यंत श्रेष्ठ संस्कर्ते उर्फ सुधारक म्हटले म्हणजे प्राचीनकालीन ब्राह्मण होत. आर्यन्, द्रविडियन् आणि मंगोलियन् इत्यादि निरनिराळ्या जातींमध्यें एकरूपता, सामान्य संस्कृति आणि श्रौतस्मार्तपरंपरा उत्पन्न करून त्यांच्या ठायीं ऐक्यभावना उत्पन्न करण्याचें काम प्राचीन ब्राह्मणांनींच केलें आहे. त्या कामाची पूर्तता करणें हें आजच्या ब्राह्मणांचें काम आहे.

२०. हें काम ब्राह्मणांसच अधिक सोपें आहे. ब्राह्मणांस आपल्या पूर्वजांची कार्यपरंपरा चालविली पाहिजे.

२१. ब्राह्मण हे समाजाचे केंद्र आहेत हें प्राचीन तत्त्व आहे. ही ब्राह्मणकेंद्रत्वाची कल्पना प्राचीन ब्राह्मणांस सर्व वर्णांच्या स्त्रिया विवाह्य आहेत, क्षत्रियांस तीन वर्णांच्या विवाह्य आहेत इत्यादि नियम सांगून प्राचीन ऋषींनीं व्यक्त केली.

२२. समाजांत कोणता तरी वर्ग उच्च व शिष्ट असावा आणि तो केंद्ररूप असावा असें प्राचीनांनां वाटलें याचें कारण हें कीं, निरनिराळ्या जाती आणि वर्ग एकमेकांशीं लग्न करण्याची आकांक्षा करीत नाहींत, तर उच्च वर्णांशीं विवाह-संबंध जोडण्याची त्यांची इच्छा असते ही गोष्ट प्राचीनांनीं ओळखली होती.

२३. या देशांत समाजाचा केंद्र होणें हें जर ब्राह्मणा-खेरीज दुसऱ्या कोणत्या जातीस शक्य असेल तर ती जात इंग्रजांची होय. त्यांखेरीज दुसऱ्या कोणासहि समाजकेंद्रत्व शक्य नाहीं.

२४. सिव्हिल् म्यारेजसारख्या साधनांनीं इंग्रज हे धर्म-संस्कारांचे कर्ते बनूं पाहत आहेत, ते ब्राह्मणांचें चातुर्वर्ण्या-मधील स्थान लग्नव्यवहारांच्या बाबतींत पटकावूं पाहत आहेत. निरनिराळ्या जाती एकमेकांबरोबर लग्नें करीत नाहींत, तथापि इंग्रज व यूरेशियन यांच्याबरोबर सर्व जाती लग्नें करितात अशी आज ज्याप्रमाणें सिंहल देशांत स्थिति आहे, तशी स्थिति जर उद्यां हिंदुस्थानांतहि आली तर इंग्रज हा उच्च वर्ण या नात्यानें हिंदुस्थानाचा ब्राह्मण होईल.

२५. हिंदूंच्या धर्मशास्त्राप्रमाणें राष्ट्राचें सर्व प्रकारें शासन होणें जरी आज शक्य नसलें तरी गृह्यन्यायशासन तरी धर्म-शास्त्रानुसार झालें पाहिजे. तें देखील आज योग्य रीतीनें होत नाहीं. लोकांच्या प्रगतीला अत्यंत आवश्यक गोष्ट म्हटली म्हणजे जनतेंतील उच्च विचार आणि आचारनियम यांचा परस्परांवर एकसारखा परिणाम होत राहिला पाहिजे. आज ही गोष्ट शक्य नसल्यामुळें धर्मशास्त्राची यथाकाल वाढ व्हावयाची ती बंद जाहली.

२६. तथापि यांहूनहि महत्त्वाची एक गोष्ट म्हटली म्हणजे धर्म आणि तदनुरूप शासन हीं आंग्लबुद्धि बनलेल्या हिंदू कायदेपंडितांनीं बिघडविलीं आहेत. धर्मशासन बिघडण्याचीं मुख्य कारणें येणेंप्रमाणें:—

(अ) समाजघटनेच्या तत्त्वांवर म्हणजे कायद्यावर दत्त-विधान, विवाह यांसारख्या इतर बाबतींतील धर्मशासन अवलंबून असतें. तथापि इंग्रज हे हिंदूंचे आजचे धर्म-नियामक बनले आहेत व त्यांस धर्मशास्त्रांतर्गत हिंदुसमाज-घटनेचीं तत्त्वें (उर्फ कायदा) काय आहेत याची कल्पना देखील नाहीं.

(आ) समाजाच्या आचारव्यवहारादींचें नियमन करणारी जी विचारपद्धति असते त्या विचारपद्धतीशीं संलग्न असा अधिकारी वर्ग आणि धर्मनियमन यांची असंगति उत्पन्न होतां कामा नये. हिंदूंच्या आचारव्यवहारादींचें नियमन करणारी विचारपद्धति म्हणजे त्यांचें धर्मशास्त्र होय. धर्मविधि उर्फ विचारपद्धति घालून देणाऱ्या अधिकारी मंडळांशिवाय इतरां-कडून आचारव्यवहारांचें शासन धर्मयुक्त होत नाहीं. जोंपर्यंत शासनतंत्रानें धर्मविशिष्ट अधिकारी मंडळांचा अधिकार मान्य केला नाहीं, तोंपर्यंत शासननियम दुर्बल राहतील. कारण जनतेवर त्या शासननियमांचा नैतिक परिणाम होणार नाहीं.

(इ) प्रत्येक विचारपद्धतीचें स्पष्टीकरण करतांना तें स्पष्टीकरण या विचारपद्धतीस विशिष्ट अशा तर्कशास्त्राच्या साहाय्यानें आणि ती विचारपद्धति ज्या लोकांत उत्पन्न झाली त्या लोकांच्या समजुतींप्रमाणेंच झालें पाहिजे. आज शासन-प्रयोगार्थ धर्मनियमांचा अर्थ लावण्याचें काम हिंदूंच्या तर्क-शास्त्राच्या आणि समजुतींच्या अनुसार होत नसून इंग्रज समजुतीनें भरलेल्या तर्कशास्त्राच्या (British Common Sense) अनुसार होत आहे.

(ई) धर्मशास्त्र आणि त्यास अनुसरणारे शासननियम हे कल्पवेदांगाच्या इतर अनेक भागांशीं संबद्ध आहेत. त्या कल्पशास्त्राचा अर्थ आयुष्याच्या एकंदर स्वरूपाचा अभ्यास न करतां लावण्याची जी पद्धत समाजांत बोकळली आहे तिजमुळें शासननियमांची जनमान्यता कमी कमी होत चालली आहे.

(उ) विदेशी माणसें अगर विदेशी सत्तेचे प्रतिनिधी हिंदू अगर प्रत्यक्ष ब्राह्मण जरी असले तरी त्यांस धर्म-नियमांचा अर्थ लावतांना धर्मग्रंथांतील शब्दांचें अगर जुन्या टीकाकारांचें दास्य करावें लागेल. उलट जे धर्मदृष्टीनें

अधिकारी पुरुष आहेत त्यांस धर्मनियम सांगतांना बरेंच स्वातंत्र्य असतें. यामुळें आणि दुसऱ्या अनेक कारणांमुळें समाजोपयोगी शासननियम उत्पन्न करण्यासाठीं धर्मनियमांचा अर्थ लावणें हें काम जे लोक जातीनें आणि बुद्धीनें विदेशी आहेत त्यांच्याकडून योग्य रीतीनें होणार नाहीं.

(ऊ) जोंपर्यंत न्यायखातें जनतेच्या भावेंतून न्यायाचें काम करीत नाहीं तोंपर्यंत शासननियमपद्धति दिवसानुदिवस दूषितच होत जाणार. या कारणासाठीं हिंदूंचें धर्मानुसार शासन व्हावयाचें तर स्वतंत्र न्यायासनें निर्माण केलीं पाहिजेत.

२७. ब्राह्मणांच्या जातीची प्रगति व्हावी, आणि त्यांचें धर्मशास्त्रानुसार शासन व्हावें आणि तेंहि स्वायत्त असावें यासाठीं जातिपंचायती निर्माण झाल्या पाहिजेत. प्रत्येक जात हा आपआपल्या सामाजिक बाबींपुरता स्वयंशासक वर्ग आहे हें तत्त्व इंग्रजी शासनपद्धतीनें देखील मान्य केलें आहे.

२८. समाजाचें भवितव्य होईल तितकें करून समाजायत्त करण्यासाठीं लोकयंत्र बनविणें हें कार्य इतर सर्व कार्यापेक्षां अधिक महत्त्वाचें आहे.

२९. ज्या ज्या जातींस पंचायती नसतील त्या त्या जातींच्या पंचायती निर्माण करण्याच्या कामीं आणि समाजशासन करण्याच्या कामीं ब्राह्मणांस साह्य करण्याविषयीं त्या त्या जातींनां उत्तेजन दिलें पाहिजे.

३०. गुणकर्मांच्या अगर परंपरेच्या तत्त्वानें क्षत्रिय वर्णाचा निश्चितपणें निर्णय करून क्षत्रियांचा सुसंघटित संघ बनविल्यास तें कार्य राष्ट्रीकरणास मदत करील. तथापि राजेरजवाडे आणि क्षत्रियत्वावर हक्क सांगणारे इतर लोक यांच्या हक्काची तपासणी करून त्यांस क्षत्रियत्व अधिकारानें देण्यासाठीं ब्राह्मणांची किंवा सर्व समाजाची धर्मपरिषद् अस्तित्वांत आली पाहिजे.

३१. राष्ट्रीकरण होत असतां एक महत्त्वाचें कार्य होत असतें तें हें कीं, एका समाजांत दुसऱ्या समाजाचा अंतर्भाव होत जातो.

३२. आपल्या देशांत साधारणतः श्रुतिस्मृतिपुराणोक्त आचारव्यवहारानें युक्त अशा हिंदूंपासून दूर राहिलेले समाज म्हटले म्हणजे मुसुलमान आणि ख्रिस्ती हे होत. खरोखर पाहिलें असतां यांस हिंदू न समजण्यास कोणतेंहि कारण नाहीं. कां कीं, ख्रिस्ती व मुसुलमान हे माध्व, रामानुज इत्यादिकांप्रमाणें परमार्थसाधक संप्रदाय आहेत; व माध्व, रामानुज इत्यादिकांनां पोटांत ठेवणारा हिंदुसमाज विशिष्टपरमार्थसाधनाच्या अवलंबामुळें उत्पन्न जाहलेला संप्रदाय नाहीं.

३३. मुसुलमान आणि ख्रिस्ती हे जातिरूप संप्रदाय बनल्याकारणानें आम्हांपासून विभक्त आहेत. त्यांचीं मतें आणि परमार्थसाधनें यांच्यामुळें हिंदुसमाजानें जुमानत होत नाहीं. कां कीं, हिंदुसमाज म्हणजे विशिष्ट मतें अगर परमार्थसाधनें यांच्या पायावर निर्माण केलेला समाज नाहीं, तर सर्व प्रकारच्या मतांची आणि दैवतांची ग्राहकता हिंदूंमध्यें आहे. ही गोष्ट हिंदुसमाजास अनुकूल आहे.

३४. मुसुलमान आणि ख्रिस्ती लोकांनीं आपली जात वाढविण्याचा प्रयत्न न करितां आपला ईश्वरसाधनाचा मार्ग वाढविण्याचा प्रयत्न करणें हें त्यांचें कर्तव्य आहे ही गोष्ट त्यांस भासविली पाहिजे. हिंदुस्थानीय लोकांपैकीं प्रत्येकाची जात हिंदूच आहे, मग त्याचें ईश्वरविषयक मत कोणतेंहि कां असेना.

३५. हिंदुस्थान ही भावनात्मक (तात्त्विक) कल्पना आहे ती मूर्त केली पाहिजे. देशांत हिंदु संस्कृति आहे, पण तिला हिंदीपणा आलेला नाहीं.

३६. देशाभिमान प्रज्वलित केल्याशिवाय आणि राष्ट्रीय महत्त्वाकांक्षा जागृत केल्याशिवाय कर्में करण्यास भाग पाडणारी प्रवृत्ति आणि तीं पार पाडण्याची शक्ति उत्पन्न होणार नाहीं.

३७. इतिहासाकडे पाहतां आम्हां भारतीयांची जी सामाजिक महत्त्वाकांक्षा दिसते ती येणेंप्रमाणें:—आर्य (संस्कृतभाषाजन्य) संस्कृतीचें पुनरुज्जीवन करून तिचा प्रसार चहूंकडे करणें, ईश्वरविषयक संप्रदायांच्या तडाक्यांतून राष्ट्रास सोडवून त्यास केवळ राष्ट्रधर्मानेंच शासित करणें, जगाच्या भवितव्याचें नियमन उच्च धर्मनियमांनीं करणें आणि राष्ट्रशासनास आणि परसर राष्ट्रव्यवहारास साह्य करण्यासाठीं उच्च प्रतीचा राजधर्म निर्माण करणें.

३८. आपणांस देशांत जोराचा ऐक्यभाव निर्माण करावयाचा आहे. आपल्या राष्ट्राच्या भवितव्यावर आणि संस्कृतिस्वरूपावर आपला अधिकार पूर्णपणें स्थापित करणें हें आपलें राजकीय ध्येय आहे.

३९. आमचें साम्राज्यशासनाचें तत्त्व येणेंप्रमाणें आहे:—बादशहा हा केवळ इंग्रज नाहीं, कनेडियन नाहीं, अगर हिंदी नाहीं; तसेंच तो केवळ आर्यन नाहीं, अगर मंगोलियन नाहीं, अगर द्रविडी नाहीं; तो ख्रिस्ती नाहीं, अगर मुसुलमान नाहीं, अगर शैव नाहीं; तर तो सर्वात्मक आहे.

४०. कोणतें सामाजिक अगर शासनविषयक ध्येय आपल्या राष्ट्रास आणि त्याच्या स्वाभिमानास रुचेल तें शोधून काढण्यासाठीं निर्भयपणें, अप्रतिबंध रीतीनें विचार करणें आणि सरकारास तें ध्येय स्वीकारण्यास मदत करणें हें काम अत्यंत राजनिष्ठ आहे. तसेंच तें देशाभिमानाचें देखील आहे. जगद्विवर्तांत जें आपलें राष्ट्रकार्य असेल तें आपण आपल्या शासनतंत्राच्या साहाय्यानें करून दाखविणें हें हिंदुस्थान, इंग्लंड आणि जग या सर्वांस श्रेयस्कर आहे.

**नव ब्राह्मण्याच्या विकासाचें धोरण.**—हिंदुसमाजवर्धनामध्यें जी गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, हिंदू हे शास्त्र आहेत असें समजून म्हणजे ते एक समाज आहेत असें समजून त्यांचा विस्तार करावयाचा. तो विस्तार करतांना पारमार्थिक प्रश्नाकडे मुळींच लक्ष द्यावयाचें नाहीं. ज्याप्रमाणें हिंदु हा पारमार्थिक संप्रदाय नाहीं त्याप्रमाणें ब्राह्मण हे पारमार्थिक गुरू नाहींत ही कल्पना जितकी अधिकाधिक स्पष्ट समजेल तितकी राष्ट्रीकरणाची क्रिया खुली होत जाईल. मुसुलमान व ख्रिस्ती पंथ हे पारमार्थिक मार्ग आहेत. ते शास्त्रें नव्हत. या पारमार्थिक मार्गांस व्यत्यय न येईल अशा तऱ्हेनें या पंथांनां आपण वागविल्यास आणि यांनां पारमार्थिक मार्गाव्यतिरिक्त इतर गोष्टींत आपलें पृथक्त्व राखण्याची इच्छा कमी झाल्यास हे दोन्ही संप्रदाय हिंदु जनतेंत विलीन व्हावयास हरकत नाहीं. या दोन संप्रदायांनां हिंदुसमाजांत विलीन होण्यास साधक गोष्टी कोणत्या होतील त्यांची चर्चा अंशेंकरून मागें केलीच आहे आणि कांहीं अंशीं पुढेंहि करावी लागेल. येथें भावी हिंदुसमाजांत ब्राह्मणांचें स्थान काय असावें या नाजूक प्रश्नाकडे वळूं.

ब्राह्मणांचें पारमार्थिक स्वरूप हें अत्यंत गौण आहे ही गोष्ट लक्षांत घेऊन समाजांतील नेतृवर्ग या दृष्टीनेंच नव ब्राह्मण्याचा विकास झाला पाहिजे. म्हणजे ब्राह्मणवर्गानें आपली पारमार्थिक श्रेष्ठत्वाची भावना सोडून देऊन लौकिकस्थितिमूलक श्रेष्ठत्व संपादण्याच्या उद्योगास लागलें पाहिजे. या विषयाची मीमांसा थोड्याशा विस्तारानें करूं.

**समाजांत उच्च वर्गाचें कार्य.**—समाजांत लौकिक श्रेष्ठत्व संपादन केलेला एखादा उच्च वर्ग असला म्हणजे त्या वर्गाशीं संबंध ठेवण्याची इच्छा प्रत्येक जातींत उत्पन्न होते. प्रत्येक जातींतील लोकांस असें वाटतें कीं या उच्च वर्गाशीं लग्नसंबंध करण्याची संधि मिळणें ही एक मानाची गोष्ट आहे. अशा तऱ्हेचा उच्च वर्ग समाजांत नसेल तर निरनिराळ्या जातींनां आपल्या जातीबाहेर लग्न करण्याची इच्छा उत्पन्न होण्यास कांहींच कारण राहणार नाहीं. प्रत्येक जात सामान्यतः दुसऱ्या जातीचा द्वेष करीत असते आणि स्वतःच्याच जातीपुरता विचार करीत असल्यानें ती दुसऱ्या जातींतील लोकांशीं विवाह करण्याच्या भानगडींत पडत नाहीं.

**हिंदुस्थानांत सर्वमान्य उच्च वर्गाचा अभाव.**—हिंदुस्थानामध्यें जातिव्यवस्थेचें इतकें प्रस्थ माजूनहि अशा तऱ्हेचा सर्वमान्य उच्च वर्ग केव्हांच निर्माण झाला नाहीं. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या राज्यांतील राजे हे निरनिराळ्या दर्जाच्या जातींचे लोक होते. क्षत्रिय ही जात अशी केव्हांच झाली नाहीं. या निरनिराळ्या राज्यकर्त्या जातींमध्यें रजपूत ही जात सर्वांत उच्च समजली जाते. मराठ्यांच्या जातीलाहि बरेंच महत्त्व आहे. कांहीं राजे आपणांस रजपूत म्हणवितात, परंतु त्यांची जात रजपूत आहे ही गोष्ट सर्वमान्य झालेली नाहीं. कांहीं लोकांनां केवळ जंगली राजे समजण्यांत येतें. कांहीं लहान लहान संस्थानांवर अगदीं हलक्या जातींतील लोकांचें राज्य आहे.

हिंदुस्थानामध्यें कित्येक वर्गांस थोडेंबहुत उच्चत्व प्राप्त झालें होतें व आजहि कित्येक वर्गांस उच्चत्व आहे. परंतु हीं त्यांची उच्चता केवळ स्थानिक अगर जातिविशिष्ट असे व आहे. उदाहरणार्थ, मराठा ही जात घेऊं. या जातींत मराठे आणि कुणबी असे दोन वर्ग आहेत. या दोन वर्गांनां निराळ्या जाती समजण्याइतका त्यांजमध्यें भेद नाहीं. या दोन वर्गांचा रोटीव्यवहार सरसहा होतो व केव्हां केव्हां बेटीव्यवहारहि होतो. एखादा कुणबी सुशिक्षित झाला आणि चांगला पोषाख करूं लागला म्हणजे तो आपणास मराठा म्हणवूं लागतो; आणि या त्याच्या म्हणण्यास त्याच्यामध्यें कांहीं विशेष दोष असल्याशिवाय, उदाहरणार्थ त्याच्या घराण्याची उत्पत्ति व्यभिचारापासून वगैरे झाली नसल्यास, कोणीहि हरकत घेत नाहीं. बंगाली ब्राह्मणांमध्यें आणि कायस्थांमध्यें कांहीं घराण्यांनां कुलीन असें म्हणतात. उत्तर हिंदुस्थानांत खत्री आणि रजपूत यांसारख्या कांहीं जाती आहेत त्या आपणांस क्षत्रिय असें म्हणवितात. परंतु हिंदुस्थानांतील क्षत्रियवर्गामध्यें ज्याला आपल्या जातीबाहेर अथवा प्रदेशाबाहेर सर्व हिंदुस्थानांत महत्त्व मिळालें आहे असा एकहि वर्ग अथवा जात उत्पन्न झाली नाहीं. वास्तविक क्षत्रियत्व हें जात अथवा वर्ग या रूपानें केव्हांच अस्तित्वांत नव्हतें. क्षत्रियत्व ही केवळ एक कल्पना होती. अशा तऱ्हेचा एक वर्ण आहे ही एक ब्राह्मणी कल्पना होती. सर्व समाजाची रचना चातुर्वर्ण्यपद्धतीस अनुसरून असली पाहिजे ही ब्राह्मणांची कल्पना, परंतु हिंदुस्थानांतील लढाऊ जातींमध्यें ऐक्य उत्पन्न झालें नाहीं आणि त्यामुळें सर्वमान्य असा वर्ण अथवा जात त्यांच्याकडून तयार झाली नाहीं. अशा तऱ्हेचा सर्वमान्य वर्ण अथवा जात उत्पन्न होण्यास फक्त दोनच मार्ग आहेत आणि ते राजकीय सत्ता आणि सामाजिक संस्कार हे होत. हिंदुस्थानामध्यें राजकीय सत्तेनें या बाबतींत हात टेंकले आहेत. हिंदू राजांच्या सत्तेचा मुसुलमानांकडून नाश झाल्यानंतर हिंदू राजांची व सरदारांची इभ्रत बरीच कमी झाली. परंतु हिंदुसमाजाचें धुरीणत्व या नवीन राजकीय सत्ताधारी लोकांकडे—मुसुलमानांकडे—न जातां, तें पूर्णपणें ब्राह्मणांच्या हातीं गेलें. हिंदूंनीं मुसुलमानांनां केव्हांहि समाजांतील श्रेष्ठ वर्ग म्हणून मान्य केलें नाहीं. ते मुसुलमानांनां समाजबाह्य समजत असत व त्यांनीं केवळ जुलमानें राजकीय सत्ता हस्तगत केली अशी त्यांची कल्पना असे. हिंदूंनां मुसुलमान राजांशीं लग्नव्यवहार करण्यांत मोठेपणा वाटत नसून या आचारभ्रष्ट जातीशीं जुलमानें लग्न करण्याचा

प्रसंग आल्यास त्यांत आपण पतित व भ्रष्ट झालों असेंच त्यांस वाटे. इंग्रजांबद्दलहि असेंच म्हणतां येईल. जोंपर्यंत इंग्रज लोकांस हिंदू लोक भ्रष्ट मानतात व मुसुलमान लोक नास्तिक मानतात तोंपर्यंत त्यांच्याकडे सामाजिक श्रेष्ठत्व केव्हांच येणार नाहीं.

**संस्थानिकांतून असा उच्च वर्ग निघेल काय?—** हिंदुस्थानांतील राजेरजवाडे आणि संस्थानिक यांच्या मधून असा वर्ग आपणांस निर्माण करतां येईल काय? आमच्या मतें असा वर्ग उत्पन्न होणें शक्य आहे आणि त्या वर्गाचा हिंदुस्थानामध्यें ऐक्य उत्पन्न करण्याच्या कामीं उपयोगहि होईल. ब्राह्मणांपेक्षां राजेरजवाड्यांकडे सामाजिक श्रेष्ठत्व देणें हें अनेक कारणांमुळें सोइस्कर होईल. परंतु असें होण्यापूर्वी राजेरजवाड्यांमध्यें शिक्षण, कर्तव्याची जाणीव आणि कार्यतत्परता या गोष्टींची वरीच वाढ झाली पाहिजे. या गोष्टी तर हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांमध्यें ठळकपणें केव्हांच दिसून आलेल्या नाहींत. त्यांच्यामध्यें स्वतःच्या घराण्याबद्दल फाजील अभिमान दिसून येतो, त्यांस उच्च सामाजिक ध्येय नाहीं, यामुळें त्यांच्याकडून सहकारितेनें प्रयत्न होणें शक्य दिसत नाहीं.

जर हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांनीं आपले जात व वंश या बाबतींतील भेद बाजूस ठेविले आणि एकमेकांत सररहा बेटीव्यवहार चालू केला आणि ब्राह्मणांवर आपलें वर्चस्व स्थापन करण्याचा प्रयत्न केला तर त्यांस तसें करणें शक्य आहे. अशा तऱ्हेनें हिंदी राजेरजवाडे एक होऊन जर ते ब्राह्मणांचें वर्चस्व नाहींसें करण्याचा प्रयत्न करतील तर फार चांगली गोष्ट होईल. राजेलोकांनां त्यांच्या संपत्तीचें आणि सत्तेचें साहाय्य आहे. उलट, ब्राह्मणांनां फक्त बुद्धि, शिक्षण व पूर्वांपार चालत आलेलें महत्त्व यांचेंच केवळ साहाय्य आहे. परंतु राजेलोकांनीं आपणांत ऐक्य उत्पन्न करण्याची बुद्धि अद्यापि दाखविलेली नाहीं. एका मोठ्या हिंदी संस्थानिकाच्या मुलीला योग्य वर दुसऱ्या जातीशिवाय मिळण्यासारखा नव्हता यामुळें तिला आपल्याच जातींतील एका राजाची दुसरी बायको व्हावें लागणार होतें ही गोष्ट प्रसिद्ध आहे. जर हिंदी राजेरजवाड्यांत ऐक्य होईल तर ते असा एक वर्ग उत्पन्न करूं शकतील कीं, त्या वर्गाशीं लग्न करण्याची इच्छा सर्व जातींच्या व वर्गांच्या मनांत येईल. ब्राह्मणांनां आपल्या जातीचा कितीहि अभिमान असला तरी ते राजेलोकांशीं लग्नव्यवहार करणें सर्वस्वीं नाकारतील असें दिसत नाहीं. राजघराण्याशीं लग्न करण्यांत ज्यांनां भूषण वाटत असे अशा ब्राह्मणांचीं पूर्वकालांतील उदाहरणें देतां येतील. अशा तऱ्हेच्या गोष्टी अद्यापहि होतात. पूर्व हिंदुस्थानांतील एका राजाला बाकीचे राजे केवळ एका जंगली जातींतील समजत असत; परंतु त्याला त्याच्यापेक्षां उच्च समजल्या जाणाऱ्या जातीच्या मुलीशीं लग्न लावतां आलें व पुढें त्याला आपल्या मुलीचें लग्न तिच्याबरोबर एक लक्ष रुपये वरदक्षिणा देऊन एका ब्राह्मणाशीं लावतां आलें.

आपणांस कांहीं ब्राह्मणांचीं अशीं देखील उदाहरणें सांपडतात कीं, त्यांच्या मतें ज्या जातींनां वैदिक संस्कारांचा अधिकार नाहीं त्या जातींचे संस्कार वैदिक पद्धतीनें करण्याचें त्यांनीं नाकारलें व यामुळें त्यांच्यावर वंशपरंपरागत जहागिरी सोडण्याचा प्रसंग आला तरी त्यांनीं मागें पुढें पाहिलें नाहीं. परंतु सुदैवानें अथवा दुर्दैवानें केवळ तत्त्वाकरितां ऐहिक वैभवाचा त्याग करणारे लोक नेहमींच फार थोडे आढळतात. वरेचसे ब्राह्मण केवळ ऐहिक गोष्टींचाच विचार करणारे असून त्यांच्यावर द्रव्याचा व सत्तेचा परिणाम झाल्यावांचून राहत नाहीं.

ब्राह्मणांची सत्ता नाहींशी करण्याच्या कामीं पुढाकार घेण्याच्या योग्यतेचा व कांहीं विधायक काम करून हिंदुस्थानामध्यें ऐक्य उत्पन्न करूं शकेल असा संस्थानिक दुर्दैवेंकरून अद्यापि उत्पन्न झाला नाहीं. वरेचसे हिंदू संस्थानिक ब्राह्मणांनां शिव्या देण्यापलीकडे कांहीं करीत नाहींत. गौतमबुद्धाच्या कालापासून किंबहुना त्याच्याहि पूर्वींपासून ज्या राजेलोकांस ब्राह्मणांच्या सत्तेविरुद्ध चळवळ करावयाची होती त्यांनीं देखील याच रीतीचा अवलंब केला आहे. हिंदुस्थानांतील राजेरजवाडे आणि दुसऱ्या ब्राह्मणेतर जाती यांनीं हिंदु समाजाचें ऐक्य करणारी जी एकटीच ब्राह्मण जात तिच्या विरुद्ध हा खस्ताईचा आणि बेजबाबदार द्रोह करण्यापलीकडे कांहीं केलेलें नाहीं. राजेरजवाड्यांनां कार्य केल्याशिवाय व जबाबदारी पत्करल्याशिवाय मोठेपणा मिळावा अशी इच्छा आहे. आणि जोंपर्यंत त्यांची अशी इच्छा आहे तोंपर्यंत त्यांच्या मार्फत हिंदुस्थानामध्यें ऐक्य उत्पन्न होण्याची आशा करावयास नको.

**ब्राह्मणांनीं लौकिक समाजधुरीणत्व पत्करलें पाहिजे.—**जर राजेरजवाड्यांस समाजधुरीण होणें अशक्य असेल तर तें काम ब्राह्मणांनीं केलें पाहिजे. या बाबतींत त्यांनां कांहीं विशेष गोष्टींची मदत आहे. हिंदुस्थानामध्यें नेहमीं सर्वांत श्रेष्ठ मानली जाणारी अशी ही एवढीच जात आहे. अनेक राजघराणीं उत्पन्न झालीं व नष्ट झालीं. परंतु ब्राह्मणांचें स्थान कायम आहे. तथापि आहे या स्थितींत ब्राह्मण विशेषसें कार्य करूं शकणार नाहींत. त्यांनीं आपली संघटना केली पाहिजे. प्रत्येक ब्राह्मणजातीची संघटना होऊन त्या सर्व जातींचें एकीकरण झालें पाहिजे. ब्राह्मण संघटित झाले म्हणजे त्यांनां आपल्या समाजाचे घटक कोणास बनवावें हें ठरवितां येईल; सध्यां त्यांच्या समाजांत असलेल्या कांहीं लोकांस त्यांनां बाहेर काढून टाकतां येईल व योग्य वाटतील त्या बाहेरच्या जातींतील लोकांस त्यांनां आपल्या पवित्र समाजाचे घटक बनवितां येईल. ब्राह्मणत्वामध्येंहि कांहीं दोष आहेत. त्यांतील मोठा दोष म्हणजे जातिवैशिष्ट्य हा होय. ब्राह्मणांच्या निरनिराळ्या आठशें जाती असून त्यांचा परस्परांत लग्नव्यवहार होत नाहीं. यांतील कांहीं जाती प्रथम केवळ प्रदेशावरून पडल्या असून आतां त्या पृथक् जाती बनल्या आहेत. एखादा कान्यकुब्ज ब्राह्मण दक्षिणेंत आला तर त्याला कोणीहि

दाक्षिणात्य ब्राह्मण समजणार नाहीं. या कान्यकुब्ज ब्राह्मणाला लग्न करावयाचें झाल्यास कनोजला गेलें पाहिजे व त्याच्या मुलांसहि वायका मिळविण्याकरितां तिकडेच जावें लागेल. पंचगौड ब्राह्मण आणि पंचद्राविड ब्राह्मण हे जे पूर्वी केवळ प्रदेशविशिष्ट भेद होते त्यांच्या आतां जाती बनल्या आहेत.

ब्राह्मणांमध्यें हे निरनिराळे भेद कसे उत्पन्न झाले हें शोधीत वसण्याचें हें स्थल नव्हे. परंतु प्रादेशिक भेदांचें रूपांतर जातिभेदामध्यें जें होतें त्याचीं कांहीं कारणें येथें विचारांत घेऊं. पहिलें आणि मुख्य कारण म्हटलें म्हणजे परस्परावद्दल संशय हें होय. जेव्हां एखादा उत्तर हिंदुस्थानांतील मनुष्य दक्षिण हिंदुस्थानांत येतो आणि आपणास ब्राह्मण म्हणवितो, तेव्हां दक्षिणेंतील पुष्कळ ब्राह्मणांनां त्याच्या ब्राह्मणत्वाचा संशय येऊन ते त्याच्याशीं संबंध ठेवीत नाहींत. अशा संशयाला कारणेंहि असतात. कारण अशा तऱ्हेनें फसविल्याचीं पुष्कळ उदाहरणें ऐकींव गोष्टींतून आढळतात. दुसरें, उत्तरेकडील ब्राह्मणांच्या आणि दक्षिणेकडील ब्राह्मणांच्या आचारांत फरक असतो; आणि हा फरक विशेषतः सोंवळ्याओंवळ्याच्या वावतींत जास्त आढळतो. उदाहरणार्थ, एखादा गुजराथी ब्राह्मण दक्षिणेंत आला आणि त्याच्या समजुतीप्रमाणें शूद्राच्या हातचें पाणी पिण्यास हरकत नसल्यामुळें शूद्राच्या हातचें पाणी प्याला तर एखादा महाराष्ट्रीय ब्राह्मण म्हणेल, "काय हो ! हा कोणत्या जातीचा ब्राह्मण आहे ? हा शूद्राच्या हातचें पाणी पितो." याप्रमाणें तो त्या गुजराथी ब्राह्मणास आपणापेक्षां हलका समजूं लागेल. अशा स्थितींत त्यांच्यामध्यें लग्नव्यवहार होणें अशक्य आहे.

जातिभेदाची तीव्रता कमी करण्यास योजावयाच्या उपायांची विस्तृत चर्चा येथें करण्याचें प्रयोजन नाहीं. राष्ट्रीकरणाच्या वावतींत महत्त्वाचे अडथळे कोणते आणि जातिभेद कायम टिकविणारीं कारणें कोणतीं यांचेंच दिग्दर्शन येथवर केलें आहे. त्यावरून आजच्या हिंदुसमाजाकडे एका निराळ्याच दृष्टीनें आपणांस पाहतां येईल. संप्रदायसंस्था या राष्ट्रीकरणाच्या मार्गांत आज विघ्नरूप आहेत. हे संप्रदाय भविष्यत् काळीं नष्ट होण्याचा पुष्कळ संभव आहे. तें कसेंहि असो. संप्रदायांच्या नाशानें एकीकरणाच्या कार्याला मदत होईल यांत संशय नाहीं.

समाजाचें पारमार्थिक धुरीणत्व विशिष्ट जातीच्या हातीं राहील हें आतां शक्य नाहीं. पारमार्थिक धुरीणत्व म्हणजे देव कसा आहे, आत्मा कसा आहे, मोक्ष म्हणजे काय आणि मनुष्य मेल्यावर त्याचें काय होतें हें सांगण्याचा धंदा. या धंद्यामध्यें जो जास्त लवाड त्यास प्रामुख्य मिळणार. जो अधिक विद्वत्तेनें लोकांस भुरळ घालूं पाहील तो जाडा आध्यात्मिक पुढारी बनणार. असल्या धंद्यांत ब्राह्मणाच्या सबंध जातीनें वर्णकार्य म्हणून पडावें हें अयोग्य होईल. ब्राह्मणांचें महत्त्व होतें तें देवाचा पत्ता लावून देण्याच्या कौशल्यामुळें नसून विद्वत्तेमुळें होतें हें कोणीहि इतिहासज्ञ कबूल करील. आज महाराष्ट्रांत पारमार्थिक उद्यमांत जितके ब्राह्मण आहेत त्यांहून अधिक ब्राह्मणेतर आहेत, आणि या प्रकारच्या उद्यमांत स्पर्धा करण्यास एखादी इंग्रज वाई देखील येऊन बरेंचसें यश संपादूं शकते हें आपणांस दिसतच आहे. तर आपण येथें असा प्रश्न उपस्थित करावा कीं, पारमार्थिक उद्यम सोडून दिला तर ब्राह्मणाचें महत्त्व कसें राहील आणि ब्राह्मणाच्या महत्त्वाची आवश्यकता तरी काय ?

एखाद्या जातीचें महत्त्व कायम ठेवणें हा समाजाचा अंतिम हेतु नाहीं. आणि यासाठीं अज्ञानावर जें महत्त्व स्थापन झालें असेल तें जिवंत ठेवण्याची जबाबदारी कोणींच घेऊं नये. ब्राह्मणाच्या महत्त्वाची अंतिमविकासकालीं आवश्यकता नाहीं. तथापि महत्त्व आहे तें सोडून देण्याचा प्रयत्न यशस्वी होणार नाहीं. ब्राह्मणांचें अनुकरण करण्याची इच्छा सर्व जातींत आहे आणि ब्राह्मणांशीं विवाह व्हावेत असें अनेक जातींतील सुशिक्षितांस वाटतें. या इच्छा जोंपर्यंत आहेत तोंपर्यंत ब्राह्मणप्रामुख्य सहजच राहणार आहे. या दोन्ही इच्छा स्तुत्य व राष्ट्रसाधक आहेत. समाजास एकरूपता कोणत्यातरी श्रेष्ठवर्गाच्या अनुकरणानें येते आणि समाजाची आकांक्षा एका विशिष्ट वर्गाशीं लग्न करण्याची असली म्हणजे ती आकांक्षा जातिभेद नष्ट करण्यास उपयोगी पडते. जातिभेद नष्ट करण्याला समाजांत एक शिष्टवर्ग असल्यानें फार मदत होते. दोन सदृश जाती एकमेकांशीं लग्नव्यवहार करणार नाहींत पण उच्च म्हणून समजल्या जाणाऱ्या वर्गाशीं करतील. सर्व हिंदुस्थानाचें ऐक्य व्हावयाचें तर तें अशा एका जातीमार्फत किंवा वर्गामार्फत होईल कीं, जो वर्ग सर्वदेशव्यापी आहे. आणि ज्याचें महत्त्व सर्व लोकांच्या मनावर ठसलेलें आहे. असा वर्ग हिंदुसमाजांत ब्राह्मणाशिवाय दुसरा नाहीं. या प्रकारचे विचार मागें व्यक्त केलेच आहेत. आतां आपणांस हें पहावयाचें कीं, समाजाचा केंद्रभूत जो वर्ग व्हावयाचा तो केवळ 'वातांवुपर्णाशनाः' या वृत्तीचा असावा कीं सर्व प्रकारच्या ऐहिक श्रेष्ठतेचें तो माहेरघर असावा ? वातांवुपर्णाशनाः या वृत्तीनें सर्व हिंदूंचें वैवाहिक नीतींतील केंद्र होण्याचें कार्य ब्राह्मणांकडून होणार नाहीं. लोकांची प्रवृत्ति भिक्षुकाच्या किंवा संन्याश्याच्या पायां पडण्याकडे असेल पण दरिद्र्यास मुलगी देण्याकडे खास नाहीं. आज भिक्षुकाच्या लग्नापेक्षां ब्राह्मण शिंप्याच्या लग्नास कमी अडचण पडते. भिक्षुक देखील आपली मुलगी भिक्षुकास देऊं चाहत नाहीं. या परिस्थितीशीं झगडत असतां भिक्षुकसमाज जिवंत राखण्याकरितां तैलंगी ब्राह्मणांत वैदिकी व नियोगी असे भेद उत्पन्न होऊन दोन निराळ्या जाती पडल्या. समाजाचे धुरीण आणि समाजांतील श्रेष्ठवर्ग या नात्यानें ब्राह्मणावर जी जबाबदारी पडते ती

ही कीं, आपल्या जातीस विद्याधनसंपन्नता आणली पाहिजे आणि सर्व निरनिराळ्या जातींतील निवडक मंडळींशीं लग्नव्यवहार करून सर्व राष्ट्रास एकरूपता आणली पाहिजे. अर्थात् आज आपणांस जातिभेद मोडावयाचा असेल तर तो मोडण्यास आज उपलब्ध असलेल्या ब्राह्मणगौरवाशिवाय दुसरें साधन आपल्या हातीं नाहीं. येथें ब्राह्मणद्वेषाचीहि थोडीशी मीमांसा करणें इष्ट आहे.

**ब्राह्मणद्वेषाची मीमांसा.**—ब्राह्मणद्वेषाविषयीं विचार केला असतां आपणांस असें दिसून येईल कीं, आज जो ब्राह्मणद्वेष दिसत आहे त्याला बऱ्याच अंशीं ब्राह्मणांची ऐहिक सुस्थितीच कारण आहे. जेथें ब्राह्मण निरक्षर तेथें ब्राह्मणद्वेष नाहीं. जेथें तो पूजानिमग्न तेथें तो पूज्य आणि जेथें तो ऐहिक चढाओढीमध्यें यशस्वी तेथें तो द्वेषपात्र अशी स्थिति आहे. मद्रास इलाख्यांत ब्राह्मण सुशिक्षित, तेथें ब्राह्मणद्वेष ब्राह्मणेतरांत फार. आणि उत्तरसिलोनमध्यें ब्राह्मण पूजानिमग्न व अडाणी, तेथें ब्राह्मणद्वेषच नाहीं. उत्तरहिंदुस्थानांतील ब्राह्मण कमी सुशिक्षित, तर तेथें ब्राह्मणांविषयीं आदर. या परिस्थितीवरून असें दिसून येईल कीं, जर सर्धामय जगांत ब्राह्मणांस शिरावयाचें असेल तर त्यांस इतरांचा द्वेषहि पतकरलाच पाहिजे. ब्राह्मणांचें कर्तव्य ऐहिक श्रेष्ठपणा मिळविण्याचें होय हें सांगणें म्हणजे अधिक द्वेषाचें स्थान ब्राह्मणांनीं व्हावें अशाच तऱ्हेचा उपदेश करणें नव्हे काय? आणि हा विचार जातिद्वेष वाढविण्याचा नव्हे काय? आणि अशी जर परिस्थिति आहे तर आपण एकलाची अपेक्षा कशी करावी? असे प्रश्न येथें उपस्थित होतात.

या प्रश्नांचा विचार करतांनां प्रथम द्वेषाची मीमांसा करूं आणि पुढें एखाद्या समूहाविषयीं द्वेष कां जागृत होतो हें पाहून नंतर ब्राह्मण जातीविषयीं विचार करूं. द्वेष म्हणजे विरुद्धभाव होय. हा उत्कटतेला गेला म्हणजे याला आपण द्वेष म्हणतों. विरुद्धता व आकर्षण हे दोन भाव कोणत्याहि समाजांत आहेतच. जगांत अजातशत्रु कोणीच नाहीं. अठरा अक्षौहिणी सैन्याचा नाश करणाऱ्या धर्मराजास "अजातशत्रु" म्हणणें म्हणजे या शब्दांचा उपहास होय. समाजामध्यें जी विरुद्धता दिसते ती सर्व आत्महितविषयक आहे. "न कश्चित् कस्यचिन्मित्रं न कश्चित् कस्यचिद्रिपुः। कारणेन हि जानीयाद् मित्राणि च रिपूंस्तथा॥" कोणा मनुष्याचा दुसऱ्या मनुष्याशीं संबंध जडला म्हणजे त्या संबंधांत आपलें हित साधावयाचा त्यांपैकीं प्रत्येकजण प्रयत्न करितो. प्रसंगीं त्यांचीं भांडणें होतात, प्रसंगीं त्यांस पुन्हां एक व्हावें लागतें. कोणाशीं स्नेह केला म्हणजे तो स्नेह देखील अनेक अपेक्षा उत्पन्न करितो आणि त्या अपेक्षा पूर्ण झाल्या नाहींत म्हणजे स्नेहांत व्यत्यय येतो. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे विरुद्धता ही सार्वत्रिक आहे, तिचें हिंदुसमाजांतच अस्तित्व आहे असें नाहीं; द्वेषाच्या मुळाशीं स्वहितविषयक जागरूकता असते आणि ती सर्व समाजांस अवश्य आहे. प्रत्येक जातीनें आत्महिताविषयीं जागरूक असावें कीं नसावें हा प्रश्न प्रथम उपस्थित होतो. आणि या बाबतींत जागरूक नसावें असें जर कोणी म्हणणार नाहीं तर आपल्या जातीच्या हितासाठीं इतरांशीं विरोध करूं नये असें तरी कोण म्हणूं शकेल?

आत्महितविषयक जागरूकता समाजांत कोणतीं कोणतीं स्वरूपें धारण करिते व कोणतीं कोणतीं कार्यें करिते हें आतां आपण पाहूं.

आत्महिताची कल्पना जितकी व्यापक असेल तितकी जागरूकता अधिक राहील. ती जितकी अल्पक्षेत्री असेल तितकें व्यक्तीचें आचरण अनुदारपणाचें आहे असें लोकांस भासेल.

हिंदुसमाजांतून विरोधबुद्धीच काढून टाकावी असें कोणी म्हणेल तर त्यास उत्तर हें कीं, तो प्रकार अत्यंत घातुक होईल.

समाजशास्त्रीय मुत्सद्दीगिरीचें एक कर्तव्य हें आहे कीं, व्यक्तींची अगर समूहांची स्वार्थविषयक जागरूकता नष्ट होऊं न देतां तिचें उलटें संवर्धन करावयाचें व व्यक्तींची अगर समूहांची आत्महितभावना ज्या समाजाची मुत्सद्दीगिरी आपण करीत असूं त्या समाजाच्या हितसंवर्धनाशीं बद्ध करावयाची. जर ब्राह्मणद्वेष समाजांत नको असेल तर या प्रकारचा द्वेष नको एवढें म्हणून चालावयाचें नाहीं. कारण, द्वेष म्हणजे उत्कट स्पर्धा व विरोध, आणि राष्ट्राचें नुकसान होत नसेल व जें कांहीं राष्ट्रांत असेल तें घेण्यासाठींच सर्धा असेल तर एखाद्या समूहानें आपल्या हितासाठीं ब्राह्मणांशीं सर्धा केली आणि त्यांशीं विरोध केला तर त्यांत विरोध करणाराचा दोष नाहीं. तेव्हां समाजशास्त्रीय मुत्सद्द्यानें ब्राह्मणद्वेषाच्या मुळाशीं जी इतर समूहांची आत्महितभावना आहे ती लक्षांत ठेवून या द्वेषाच्या आत्यंतिक नाशाच्या भानगडींत न पडतां त्याला फक्त नीट वळण देण्याचा यत्न करावा.

आत्महितविषयींच्या जागरूकतेमुळें आणि स्वाभाविक मत्सरामुळें जो द्वेष उत्पन्न होतो तो परस्परविवाहास घातुक होत नाहीं हें थोड्याच विचाराअंतीं कळून येईल. पैसेवाल्यांचा गरीब लोक द्वेष व मत्सर करितात हा अनुभव सर्वत्र आहे. तथापि तेच गरीब लोक पैसेवाल्यांच्या समाजांत मिसळं पाहण्याची आकांक्षा करितात आणि त्यांच्याशीं विवाह जुळवून आणण्यास धडपडतात. लोकांच्या पोकळ आदराचें किंवा दयेचें स्थान न होतां जे स्पृहा व असूया यांचें स्थान होतात तेच समाजाच्या अग्रेसरत्वास पात्र झालेले असतात.

**ब्राह्मणकर्तव्य.**—समाजाची वैवाहिक नीति मनुष्याच्या वैवाहिक प्रवृत्तीच्या पुढें कांहीं अंशानें फिक्की पडेल असें दिसतें. समाजांत प्रौढविवाह रूढ झाले म्हणजे प्रीतिविवाह समाजांत शिरण्यासाठीं धडपडणार आणि आईबापांचे विचार बाजूस राहून तरुणतरुणींचे विचार व भावना विवाहनीतीच्या निर्णायक होणार अशा प्रसंगीं भिक्षापात्र धरणारा ब्राह्मण तरुणीचें चित्त आकर्षूं शकणार नाहीं, तर सुखवस्तु तरुणच आकर्षूं शकेल. तेव्हां सर्व वर्णांच्या स्त्रियांनीं ब्राह्मणांशीं विवाह करावा ही आकांक्षा वाळगावी असें जर राष्ट्रीकरणाच्या प्रवर्तकांस वाटत असेल तर ब्राह्मण तरुणांनीं सुदृढ शरीर, देखणेपणा व उत्कृष्ट नीतिमत्ता यांच्या जोडीला संपत्तीहि साध्य करून घेतली पाहिजे.

आतां समाजांतील श्रेष्ठवर्ग अनुकरणाचें स्थान बनतो ही गोष्ट लक्षांत घेऊन ब्राह्मणकर्तव्याकडे पाहूं. मद्रासकडील ब्राह्मणेतर ब्राह्मणांचा द्वेष करितो पण त्यांचें अनुकरणहि करितो. तिनवेल्लीचे शैव वेल्लाल यांनीं मांसाहाराचा त्याग केला आहे आणि मद्रासेंतील पुष्कळ वेल्लाल ब्राह्मणाच्या सोंवळ्यांची देखील नक्कल करितात. दरिद्री ब्राह्मण पुष्कळ प्रसंगीं आपलें दारिद्र्य लपविण्याकरितां "पिण्डेष्वनास्था खलु-भौतिकेषु" म्हणत सुटतो आणि हें पाहून ब्राह्मणेतर देखील निरिच्छतेचा आणि त्यागाचा गुण आपल्या अंगीं आणण्याचा प्रयत्न करितो. सिंहलद्वीपांत वेल्लाल आणि सिंध देशांत आमिल या दोन ब्राह्मणेतर जातींस सामाजिक प्रामुख्य असल्यानें ते लौकिकाचारांत ब्राह्मणांचें अनुकरण करण्याच्या भानगडींत मुळींच पडत नाहींत; ते अनुकरण करावयाचेंच झालें तर पाश्चात्त्यांचें अनुकरण करितात. ब्राह्मणांस समाजांतील शिष्टवर्ग रहावयाचें असल्यास त्यांनीं लौकिकाचाराच्या बाबतींत देखील त्यांचेंच प्राधान्य राहील असें वागलें पाहिजे. पोषाखाच्या नवीन सुंदर ट्रमा आपल्यापासून प्रसृत व्हाव्यात म्हणून आपले पोषाख अधिक सुंदर आणि अधिक अभिरुचियुक्त करण्याची त्यांनीं खटपट केली पाहिजे. तसेंच समाजांतील माणसांनीं आपआपसांत पाळावयाचे शिष्टसंप्रदाय उर्फ 'एटिकेट' आपल्यापासूनच प्रसृत होतील अशी त्यांनीं काळजी घेतली पाहिजे. वरील कारणासाठीं पोषाख व शिष्टसंप्रदाय इकडे ब्राह्मणांनीं वारंवार लक्ष दिलें पाहिजे. त्यांनीं जर आधिभौतिक मोठेपणा सोडून देऊन आध्यात्मिक मोठेपणा मिळवावा अगर राखावा एवढेंच आपलें ध्येय आहे असा बाणा बाळगण्यास सुरवात केली तर सर्व लोकांस आर्थिक दुर्गतीस नेण्याचा दोष त्यांच्याकडे येईल. दौर्बल्य आणि दारिद्र्य या गोष्टी सर्व प्रकारच्या दुर्गतीच्या जनक होतात ही गोष्ट त्यांनीं लक्षांत ठेवली पाहिजे.

**ब्राह्मणमहत्त्वाचें ऐतिहासिक पर्यालोचन.**—कोणतेंहि कार्य करण्याची जबाबदारी समाजाचा जो उच्चवर्ग असतो त्यावर पडते. ही गोष्ट इतर लोकांची वृत्ति पाहिली असतां सहज दिसून येईल. जो जातिभेदावर किंवा हिंदुसमाजावर कोरडे ओढतो तो मुख्यतः ब्राह्मणावरच कोरडे ओढतो. जे ब्राह्मणेतर ब्राह्मणांस शिव्या देतात त्यांची अनुक्त भावना अशी दिसते कीं, कार्य करण्याची जबाबदारी ब्राह्मणांवर टाकावी, आपण असंतोष व्यक्त करावा आणि समाजास वळण कोणतें द्यावयाचें हें ब्राह्मणांवर सोंपवावें. या प्रकारची पद्धति फार पूर्वीपासून चालत आहे. आणि त्यामुळें सामाजिक व धर्मशास्त्रविषयक विचार करण्याची जबाबदारी ब्राह्मणांवरच पडल्यामुळें समाजनीति ब्राह्मणांनांच ठरवावी लागली.

समाज कोणत्या स्थितींत असावा यासंबंधानें तात्त्विक विचार सध्यां जसे चालतात तसे पूर्वकालींहि चालत होते. चातुर्वर्ण्य असावें कीं नसावें, विवाहसंबंधीं कोणते नियम अवलंबावे, याप्रकारचे प्रश्न अनेक प्रसंगीं वादविवादास कारण होत असत. महाभारत, पुराणें, धर्मशास्त्रें यांचें अवलोकन केलें असतां अनेक वादविवाद दृष्टीस पडतात. संस्थांच्या उत्पत्तिलयासंबंधानें देखील अनेक कल्पना पुढें येत असत.

ज्याप्रमाणें तात्त्विक तऱ्हेचे वादविवाद होत असत, त्याप्रमाणें "पॉलिसी" उर्फ व्यवहार्य नीतितत्त्वेंहि लोक विचारास घेत असत. राजेलोकांस ज्याप्रमाणें राज्य चालविण्यासाठीं नीति लागे, त्याप्रमाणें ब्राह्मणांस आपलें कर्तव्यकर्म बजावण्यासाठीं विशिष्ट प्रकारची नीति अवलंबावी लागे. ती नीति काय होती हें समजलें नाहीं तोंपर्यंत लोकांस प्राचीन इतिहासांतील पुष्कळ गोष्टी समजणार नाहींत, ब्राह्मणांच्या विशिष्ट कृत्यांचा अर्थ त्यांस समजणार नाहीं, व यायोगानें ब्राह्मणांविषयीं त्यांचा वाईट समज होण्याचा संभव आहे. तसेंच, समाजसुधारणा जर शिस्तवार करावयाची असेल तर ब्राह्मणांची परंपरागत समाजनीति समजून घेतली पाहिजे.

ब्राह्मणांच्या आवडीनिवडी, इच्छा, आकांक्षा, अंतःकरणें यांची ओळख त्यांची समाजनीति समजावून घेतली असतां होणार आहे. ज्या गोष्टी ब्राह्मणांच्या हातीं होत्या त्यांवरून त्यांची पूर्वीची समाजनीति समजते. आज आपणांस पुष्कळ अंशीं पूर्वी घालून दिलेल्या समाजनीतीचाच अवलंब करावयाचा आहे हें पुढें दाखवून देऊं. ब्राह्मणांच्या नीतीचीं मुख्य अंगें कोणतीं अमुख्य अंगें कोणतीं यांची निवडानिवड करून मुख्यांगांचें प्रवर्तन करावयाचें आहे. आजच्या अत्यंत उच्च अशा राष्ट्रीय आकांक्षा पाहिल्या, आणि प्राचीन ब्राह्मणांची नीति व सामाजिक ध्येयें यांचें अवलोकन केलें, तर आपणांस दिसून येईल कीं हीं दोन्हीं एकच आहेत. प्राचीनांच्या कृत्यांचें सहृदयतेनें अवलोकन मात्र केलें पाहिजे.

पूर्वकालीन ब्राह्मणांच्या समाजनीतीचीं अंगें अनेक आहेत. ब्राह्मणांकडून जीं कार्यें घडून आलीं व त्यांचा जो अधिकार होता तो त्यांनीं ज्या रीतीनें वापरला त्यांत त्यांची समाजनीति नजरेस येते.

प्राचीन ब्राह्मणांच्या या समाजनीतीचीं मुख्य अंगें सिद्ध-सिद्धांतरूपानें अगोदर देऊन नंतर त्यांच्या विवेचनास लागूं.

(१) ब्राह्मणांचें पहिलें तत्त्व हें होतें कीं चातुर्वर्ण्याच्या कल्पनेचा प्रसार सर्वत्र करणें, व चोहोंकडे ब्राह्मणांचें महत्त्व प्रस्थापित करणें.

(२) ब्राह्मणांचें महत्त्व कमी करण्यासाठीं कोणी प्रयत्न केला तर त्याच्या विरुद्ध खटपट करणें.

(३) वेद हा धर्मशास्त्राचा आणि समाजशासनपद्धतीचा मूळपाया करणें, आणि वेदांत व स्मृतिपुराणादि ग्रंथांत व्यक्त झालेल्या कल्पना व लोकप्रचार यांचें एकीकरण करून स्वतंत्र संस्कृति तयार करणें. ज्या जातींचे वेद हे परंपरागत ग्रंथ नसतील त्या जातींत देखील वेद हे शासनाचे व धर्मशास्त्राचे प्रमाणग्रंथ बनविणें.

(४) देशांमध्यें वेदांचें व ब्राह्मणांचें महत्त्व कमी करणारे जे संप्रदाय उत्पन्न होतील त्या संप्रदायांचें महत्त्व कमी करणें. हें कार्य करण्यासाठीं त्या संप्रदायांस एकतर आपलीं तत्त्वें कबूल करण्यास भाग पाडणें अगर त्या संप्रदायांचें वजन सामान्य जनांवर न पडूं देणें.

(५) देशांमध्यें बाह्य लोकांच्या येण्यामुळें, अगर परदेशीं ब्राह्मणांच्या गमनामुळें चातुर्वर्ण्ययुक्त आर्य व आर्यसंस्कृति-हीन बाह्य यांचा संबंध आला असतां बाह्यांचा चातुर्वर्ण्ययुक्त समाजांत अंतर्भाव करणें व आर्यसंस्कृतीचा पगडा बाह्यांवर बसविणें.

(६) वरील ध्येयांस अनुसरून भाषाविषयक व संस्कार-विषयक नीति उत्पन्न करणें.

ब्राह्मणांनीं मोठमोठीं सामाजिक कार्यें कशीं घडवून आणलीं यांचा सविस्तर वृत्तांत येथें देणें शक्य नाहीं. त्यांचा सविस्तर इतिहास द्यावयास निदान पांचशें पांचशें पृष्ठांचे सात आठ ग्रंथ लिहावे लागतील. त्यांनीं काय केलें याची कल्पना येण्यास त्यांच्या कार्यांतील मुख्य विशेष गोष्टी येथें देतों.

ब्राह्मणांचें एक मुख्य कार्य म्हटलें म्हणजे त्यांनीं समाजाचें नियमन करणारें धर्मशास्त्र वेदांसारख्या महत्त्वाच्या पैतृक वाङ्मयाच्या साहाय्यानें निर्माण केलें.

त्यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं जाऊन त्या देशांतील आचारांची आणि वेदविहित धर्मशास्त्राची सांगड घातली.

आर्य, द्रविड, मंगोलियन आणि मलायी इत्यादि अत्यंत भिन्न अशा मोठ्या मोठ्या मानववंशांतील लोकांत त्यांनीं एकत्वाची भावना उत्पन्न केली आणि ती देखील इतक्या तीव्रतेनें उत्पन्न केली कीं वेदांसारखे ग्रंथ सर्वांसच पैतृक वाटूं लागले.

निरनिराळ्या ठिकाणचीं निरनिराळीं दैवतें होतीं, त्या सर्व दैवतांचें त्यांनीं एकीकरण केलें.

संस्कृत विद्या आणि शास्त्रें यांचा प्रसार चोहोंकडे केला आणि ब्राह्मणांच्या दृष्टीनें जें आचरण योग्य त्या आचरणाचा प्रसार केला.

निरनिराळे देश जे पूर्वीं लोकांस जाण्यास अयोग्य वाटत ते ब्राह्मणांनीं जाऊन रहाण्यास योग्य असे केले. उदाहरणार्थ, मनुस्मृतीच्या कालीं म्हणजे इसवी शकानंतर तीनशें वर्षेंपर्यंत जो दक्षिण देश शूद्रांसच वसतीस योग्य होता, तेथें कित्येक क्षेत्रें उत्पन्न करून दक्षिणेंत प्रवास करणें हें ब्राह्मणांनीं सर्वांचें कर्तव्य करून ठेविलें.

कित्येक ठिकाणीं त्यांनीं उच्च तऱ्हेचा कायदा लोकांस दिला, आणि राजनीतीचा बोध केला.

ज्या ज्या नवीन कल्पना निघतील त्यांची ग्राह्याग्राह्यता युक्तीच्या दृष्टीनें आणि परंपरागत शास्त्रांच्या दृष्टीनें तपासून परंपरागत ज्ञानसंचयांत एकसारखी सुधारणा केली.

आर्य संस्कृतीचा परिणाम शक, यवन, पल्हव इत्यादि बाह्यांवर करून त्यांस हिंदू बनविलें.

याप्रमाणें समाजाचा विस्तार करणाऱ्या, इतरांस आपल्या समाजांत ओढणाऱ्या, समाजास एकस्वरूपता आणणाऱ्या, स्वसंस्कृतीचा विस्तार परदेशांत करणाऱ्या आणि इष्ट आचार-विचारांचें (मद्यमांसनिषेधादि) अवलंबन जनतेकडून करविणाऱ्या व विटाळ असलेल्या देशांचा विटाळ घालवून तेथें प्रवास करणें हें कर्तव्यकर्म करणाऱ्या सामाजिक सुधारणा आपल्या पूर्वजांनीं केल्या. त्यांच्या कार्याचा अभ्यास आणि मनन करणें हें अर्वाचीन सुधारकांचें कर्तव्यकर्म होय.

**शासनसत्ताधिष्ठित ब्राह्मणांची समाजनीति**— ब्राह्मणांस शासनाधिकार असतां त्यांची सामाजिक नीति कशी काय होती हें आतां पाहूं.

पेशवाई बुडाल्याला आज जवळजवळ एक शतक उलटून गेलें आहे. पेशवाई कायम असतां आम्हां महाराष्ट्रीयांपैकीं कांहींजणांच्या डोक्यांत एक तऱ्हेची शासननीति होती. देशा-संबंधीं काय करावें या संबंधानें कांहीं तरी विचार लोकांच्या डोक्यांत घोळत होते; कारण जे विचार डोक्यांत घोळतील,

त्या विचारांस कर्तृत्वाचें स्वरूप द्यावयास तेव्हां अवकाश होता. देशाचें राज्य कसें चालवावें यासंबंधानें कल्पना चालत होत्या, व देशांतील निरनिराळ्या वर्णांस कसें काय वागवावें, देशांतील एका वर्गाचा दुसऱ्या वर्गाशीं संबंध कोणत्या तऱ्हेचा असावा यासंबंधीं विचार व्यक्त होत असत, व या कल्पनांनां आणि विचारांनां कार्यरूपहि येत असे. उदाहरणार्थ, नारायणराव पेशव्याच्या कारकीर्दींत प्रभूंसंबंधानें दाखविलेली सामाजिक नीति लक्षांत घ्यावी व त्याच्या पलीकडे जावयाचें तर मुंबईंतील सोनारांनीं एकमेकांत नमस्कार करूं नयेत तर रामराम करावा असा निर्बंध घालण्यास बाळाजी बाजीरावानें इंग्रजांस भाग पाडलें ही गोष्ट लक्षांत घ्यावी. ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांच्यामध्यें तीक्ष्ण रेषा ओढण्याच्या समाजनीतीबद्दल आपलें आजचें कांहींहि मत असो, पण पेशव्यांस एक विशिष्ट प्रकारची सामाजिक नीति होती, हें खास. पेशवाईंतील सामाजिक नीतीचीं मुख्य मुख्य तत्त्वें म्हटलीं म्हणजे येणेंप्रमाणें:— दाक्षिणात्य म्हणजे निवृत्तमांस ब्राह्मणांमध्यें एकीकरण उत्पन्न करून चोंहोकडे त्यांचें प्राबल्य वाढवावयाचें व ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर हे दोनच वर्ग देशांत ठेवावयाचे. ब्राह्मणांमध्यें परस्पर लग्नव्यवहार वाढवावयाचा, व ब्राह्मणांच्या साह्यानें देशावर राज्य करावयाचें. बुद्धिमान् लोकांचा वर्ग व राज्य करणारांचा वर्ग हा एकच करावयाचा.

बाळाजी बाजीरावानें स्वतः एका देशस्थ मुलीबरोबर लग्न केलें होतें, आणि तेलंग, कर्नाटक व द्रविड या देशांतील विद्वान् ब्राह्मण पुण्यास आणून व त्यांस देशस्थांबरोबर लग्न करण्यास उत्तेजन देऊन महाराष्ट्रीय बनविलें होतें. आज जीं ब्राह्मण घराणीं महाराष्ट्रीय म्हणवितात, त्यांत तेलगु, द्रविड आणि कानडी लोक पुष्कळ आहेत. बरेचसे कानडी ब्राह्मण आपणांस देशस्थ म्हणवितात, व त्यांचीं महाराष्ट्रीय देशस्थांबरोबर लग्नें तर दर घटकेस होतात. तेलगु ब्राह्मणांत वैदिक आणि नियोगी या दोन मुख्य मोठ्या जाती आहेत व या दोन जातींच्या पोटजाती पुष्कळच आहेत. त्यांच्यामध्यें आपापसांत लग्नें होत नाहींत, परंतु या सर्वांचीं महाराष्ट्रीय ब्राह्मणांबरोबर लग्नें होतात. नागपूरची घरतपासणी केली, तर आज महाराष्ट्रीय म्हणून मान्य झालेले पुष्कळ ब्राह्मण मूळचे तेलगु आहेत असें नजरेस येईल हें पूर्वीं सांगितलेंच आहे.

हिंदुस्थानांत सामाजिक सुधारणा घडवून आणण्याकरितां ज्या अनेक खटपटी सध्यां चालू आहेत त्यांसंबंधाचें, महाराष्ट्रीय ब्राह्मणांस पंचद्रविड ब्राह्मण विवाह्य करण्याचें म्हणजे इतर द्रविड ब्राह्मणांच्या जाती महाराष्ट्रीय ब्राह्मण समाजास चिकटविण्याचें भलेंथोरलें काम पेशव्यांनीं व तत्कालीन महाराष्ट्रीय ब्राह्मणांनीं करून ठेविलें आहे. आजकालच्या सुधारकांस जर कांहीं करावयाचें असेल, तर पेशव्यांनीं घालून दिलेल्या समाजनीतीचा अधिक विस्तार करावयाचा आहे एवढेंच. समाजनीतीचीं मुख्य तत्त्वें पूर्वींच घालून दिलीं गेलीं आहेत, परंतु तीं तत्त्वें प्रचारांत आणणारें कार्यकारी मंडळ (म्हणजे पेशवे व त्यांच्या भोंवतालची मंडळी) हें मात्र नष्ट झालें आहे.

पेशव्यांच्या समाजनीतीवर ज्याच्या योगानें प्रकाश पडणार आहे अशी आणखी एक गोष्ट म्हटली म्हणजे समशेर बहाद्दरची "मुंज" करण्याचा बाजीराव साहेबांनीं केलेला विचार होय. ही जी सुधारणा त्यांनीं मनांत योजिली होती ती तत्कालीन लोकमत त्यावेळेस तयार नसल्यामुळें पार पडली नाहीं. तथापि त्यांत अंतर्भूत झालेलें तत्त्व आदरणीय होतें, यांत शंका नाहीं. एका पुरुषानें दोन बायका कराव्या अगर करूं नयेत या प्रश्नास व त्याचप्रमाणें एखादी रखेली ठेवावी अगर ठेवूं नये या प्रश्नास येथें महत्त्व देण्याचें कारण नाहीं. कां कीं बहुतेक सर्वच राजे रखेल्या ठेवितात, व सध्यां इंग्रज रखेल्या ठेवणारे देखील संस्थानिक लागतील तितके आहेत. येथें लक्षांत घ्यावयाचें तें हें कीं, स्वतांच्या औरस संततीस—मग ती मुसुलमानणीपासून झालेली असो किंवा रखेलीपासून झालेली असो—मान्यता द्यावयाची व हिंदु समाजांत त्या संततीला स्थान द्यावयाचें हा जो विचार बाजीरावाच्या मनांत आला, तो कांहीं एक विशिष्ट समाजनीति त्याच्या मनांत वागत असल्यामुळेंच आला हें उघड दिसतें, आणि ती समाजनीति म्हटली म्हणजे ब्राह्मण व ब्राह्मणेतर हिंदू आणि अहिंदू यांचा संबंध उत्पन्न झाला असतां त्यापासून उत्पन्न होणारें अपत्य हिंदु समाजामध्येंच अंतर्भूत व्हावें ही होय.

बाजीरावानें हिंदु समाजास जो घास गिळावयास दिला, तो फारच मोठा असल्याकारणानें तत्कालीन ब्राह्मणांस तो गिळवला नाहीं; व त्यामुळें त्याच्या मनांतील समाजनीति प्रस्थापित झाली नाहीं. त्यानें मनांत योजलेल्या सुधारणेस योग्य असा काळ तेव्हां उत्पन्न झालेला नव्हता. पेशव्यांच्या सामाजिक धोरणांचा साकल्यानें विचार केला असतां तदंतर्गत खालील तत्त्वें नजरेस येतात.

पहिलें तत्त्व म्हटलें म्हणजे ब्राह्मणांचें एकीकरण करणें म्हणजे सर्व दाक्षिणात्य ब्राह्मणांची एक जात बनविणें.

दुसरें तत्त्व–ब्राह्मण ज्या वेळेस ब्राह्मणेतर स्त्रीशीं–मग ती हिंदु स्त्री असो अगर यवन स्त्री असो–समागम करील व प्रजोत्पत्ति करील, तेव्हां त्या प्रजेचा अंतर्भाव केवळ हिंदु समाजांतच नव्हे तर द्विजवर्गांत व्हावा, यासाठीं खटपट करणें.

तिसरें तत्त्व–सर्व ब्राह्मणेतरांस एका वर्गांत लोटणें.

चौथें तत्त्व–ब्राह्मण व ब्राह्मणेतरांत तीक्ष्ण भेद उत्पन्न करून ब्राह्मणांची थोर पदवी इतर जातींच्या मनावर ठसविणें.

आणि पांचवें तत्त्व–ब्राह्मण या पदवीस जितक्या जातींचा हक्क पोहोंचत असेल, तितक्या जातींची चौकशी करून तो हक्क मान्य करणें, आणि त्या जातींनीं ब्राह्मणांशीं मिळून जाण्यास पूर्णपणें संधि देणें.

खरोखर पाहतां ही सामाजिक सुधारणेचीं तत्त्वें जातिमेद मोडावा, जातिमेद मोडावा, अशी जी अलीकडील सुधारकांची अनिश्चित ओरड आहे त्या ओरडीप्रमाणें मुळींच अनिश्चित नाहींत. जातिमेदासंबंधानें एक तऱ्हेची नीति निश्चित झाली होती असेंच या तत्त्वांवरून दिसून येतें.

एकोणिसाव्या शतकांतील सुधारकांची जातिमेदासंबंधाची ओरड ही या तत्त्वांच्या पुढें मागासलेली दिसते. जातिमेद मोडण्यासंबंधानें आपला काय कार्यक्रम असावा यासंबंधानें फारसा विचार या सुधारकांनीं केलेला नाहीं, असेंच त्यांची ओरड दाखविते.

पेशव्यांची समाजनीति ही कमींतकमी शंभर वर्षांनीं अर्वाचीन सुधारकांच्या पुढें होती असें म्हणतां येईल. कारण पेशव्यांनीं जातिमेदासंबंधानें जी समाजनीति अठराव्या शतकाच्या मध्यभागीं दाखविली, तितकी प्रगमनशील समाजनीति तितक्या स्पष्टपणानें अर्वाचीन सुधारकांच्या मनांत अद्यापि सुद्धां जागृत झालेली नाहीं. समाजांतील उच्च वर्गाचें एकीकरण करावयाचें, समाजांतील खालच्या वर्गांच्या मनांत उच्च वर्गाविषयीं उच्चपणा ठसवावयाचा, व खालच्या वरच्या वर्गांच्या मिश्रणानें जी संतति होईल तिला उच्च वर्गांत समाविष्ट करावयाचें व हिंदू आणि बाह्य यांचा शरीरसंबंध झाला असतां संततीस हिंदूंमध्यें स्थान द्यावयाचें ही त्यांची–थोडक्या शब्दांत–जातिमेदमय देशाचें एकराष्ट्र बनविण्याची पद्धति होती. पेशव्यांच्या लेखांमधून अगर तत्कालीन लेखांमधून जातिमेद मोडावा असे शब्द नाहींत. परंतु येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, जातिमेद हा शब्दच पेशवाईनंतरचा आहे. पेशव्यांचें धोरण पूर्णपणें मुत्सद्द्यांसारखें होतें, तत्त्ववेत्त्यांसारखें नव्हतें. मुत्सद्दी त्याला प्रस्तुत असणाऱ्या प्रसंगीं काय करावें एवढेंच ठरवितो. तत्त्ववेत्ता अंतिम ध्येय काय असावें हें सांगतो. पेशवे हे सामाजिक मुत्सद्दी होते, व हा मुत्सद्दीपणा अनिश्चितपणें वाक्यें वदणाऱ्या सुधारकांपेक्षां कितीतरी उच्च प्रतीचा होता.

पेशवाई गेल्यामुळें जें एक मोठें नुकसान झालें तें हें कीं, सामाजिक सुधारणा करणारें कार्यकारी मंडळ नष्ट झालें, व सामाजिक सुधारणा करण्यास जें राजकीय प्रयोजन लागतें तें राजकीय प्रयोजन उरलें नाहीं. सध्यां आपणांस हिंदुस्थानचें राज्य चालवावयाचें नाहीं, किंवा नवीन देश काबीज करावयाचे नाहींत. इंग्रजांचें राज्य आल्यामुळें देशाच्या सुखदुःखासाठीं ज्या कांहीं गोष्टी करावयाच्या, त्यांचा मक्ता इंग्रजांकडे गेला, आणि त्यांचा हुकूम पाळणें एवढेंच काय तें आपलें कर्तव्य राहिलें. इंग्रजी राज्यांत कालांतरानें इंग्रजी शिक्षण मिळाल्यामुळें इंग्रजानें शासनव्यवस्थेंत आपणांस भागीदार करावें अशी इच्छा लोकांत उत्पन्न झाली व राजकीय चळवळी सुरू झाल्या. त्या राजकीय चळवळींस थोडेंसें यश देखील आलें. तें यश म्हटलें म्हणजे मांटेग्यू-चेल्मसफर्ड सुधारणा होत. तथापि सामाजिक सुधारणा करण्यास इंग्रज सरकार पूर्वीपासूनच असमर्थ होतें. याचें कारण इंग्रज सरकार हें आमच्या समाजाचें केंद्र नाहीं. इंग्रज सरकार फार तर शहराचें आरोग्य वाढविणें, शेतकऱ्यांची स्थिति सुधारणें, गिरण्यांतील कामकरी वर्गाची स्थिति सुधारणें, देशांत इस्पितळें वगैरे काढणें, आंधळे वगैरे लोकांसाठीं शाळा वगैरे काढणें, गुन्हेगार लोकांस सुधारण्याचा प्रयत्न करणें, यांसारख्या सुधारणा करूं शकेल. या सुधारणा देखील उत्तम तऱ्हेनें त्यांस पार पाडतां येणें शक्य नाहीं. उदाहरणार्थ, कामकरी वर्गाची राहणी सुधारण्याचा प्रयत्न करण्याची गोष्ट घ्या. समाजांतील संस्कृतिदृष्ट्या अत्यंत कनिष्ठ अशा वर्गाची राहणी जी सुधारावयाची ती राहवें कसें यासंबंधाच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार करण्यापेक्षां चांगल्या तऱ्हेनें राहणाऱ्या लोकांच्या वर्गाशीं त्या वर्गाचा संबंध आल्यानेंच सुधारेल. या कामांत समाजांतील उच्च जाती कनिष्ठ जातींवर जो परिणाम घडवूं शकतील तो परिणाम टोपीवाला घडवूं शकणार नाहीं, हें उघड आहे. तसेंच सुधारणा बहुधा अनुकरणानेंच होते, आणि अनुकरण करण्यास लायक अशा वर्गास जर राजकीय प्रमुखत्व नसेल तर त्याचें अनुकरण करण्यास कनिष्ठ वर्ग फारसा उत्सुक होत नाहीं हेंहि स्पष्ट आहे. अर्थात् ब्राह्मणांचें अनुकरण करण्याची इच्छा ब्राह्मणांच्या हातची सत्ता आज गेल्यामुळें इतरांमध्यें फारच कमी झाली असल्यानें आणि टोपीवाल्याचें अनुकरण करणें हें हिंदु मजूर वर्गास शक्यच नसल्यानें या वर्गाची राहणी सुधारणें अत्यंत अवघड होऊन बसलें आहे.

इंग्रज हा हिंदु समाजाचा केंद्र नसल्यामुळें त्याच्या हातून वर सांगितलेल्या सुधारणांपैकीं सामाजिक सुधारणा देखील फारच अल्प होईल.

सामाजिक सुधारणेचे आपण विवेचनाच्या सोईसाठीं दोन ओबडधोबड भाग करूं; एक भाग म्हटला म्हणजे समाजाची घटनात्मक सुधारणा आणि दुसरा भाग म्हटला म्हणजे बाह्यस्वरूपी सुधारणा.

वर सरकार ज्या सुधारणा करण्यास योग्य आहे असें सांगितलें त्या सुधारणांस आपण बाह्यस्वरूपी म्हणूं व समाजाच्या घटनेंतच फेरफार जेणें करून होईल त्यांस घटनात्मक सुधारणा म्हणूं. समाजाच्या घटनेमध्यें सुधारणा जेणें करून होईल, अशा सुधारणा दोन तीन प्रकारच्या आहेत. (१) विवाहविषयक सुधारणा म्हणजे लोकांनीं आपल्या जातीबाहेर लग्नें करावींत अगर करूं नयेत या प्रश्नासंबंधाची सुधारणा. (२) हिंदुसमाजानें बाहेरील लोकांस आपल्या समाजांत घ्यावें या दृष्टीनें केलेली सुधारणा. (३) एका जातीनें दुसऱ्या जातींतील मनुष्यास आपल्या जातींत घ्यावें व एका जातींतील कुलानें अन्यजातीय व्यक्तीस दत्तक घ्यावें या दिशेची सुधारणा.

या तीन प्रकारच्या सुधारणा समाजाच्या घटनेंत महत्त्वाचे हितकर फेरफार करूं शकतील. पण या प्रकारच्या कोणत्याहि घटनात्मक सुधारणा करण्यास इंग्रज सरकार पूर्णपणें असमर्थ आहे एवढेंच नव्हे तर सरकारपाशीं वजन एवढेंच ज्यांचें भांडवल आहे असे लोकहि असमर्थ आहेत. हिंदुसमाजाचें बलवर्धन हें ज्यांचें ध्येय आहे त्यांनीं या गोष्टी नीट लक्षांत वागवून आपला कार्यक्रम आंखला पाहिजे एवढी सूचना देऊन आतां समाजघटनाविषयक विचारांचा थोडा विस्तृत परामर्श घेऊं.

---

## उपप्रकरण ५ वें.

## चातुर्वर्ण्यसंस्थापन.

सामाजिक विचारांत घटनाविषयक विचार अत्यंत प्रमुख होत. हिंदूंच्या घटनाविषयक विचारांचे प्रकार येणेंप्रमाणें:—(१) समाजामध्यें जे अनेक अवयव आहेत त्यांचा संबंध अधिक निकट करणें (२) समाजामध्यें केंद्रवर्ती सत्ता उत्पन्न करणें (३) समाजास विशिष्ट मार्गानें जावयास आणि आपलें संवर्धन करावयास दिशा उत्पन्न करणें (४) समाजाच्या प्रयत्नांचा कांहीं संस्कार इतर समाजांवर झाला असल्यास तो संस्कार दृढ करणें (५) समाजाचा अन्य समाजांशीं संबंध निश्चित करणें इत्यादि. जातिभेद मोडा म्हणून जरी ओरड चालली आहे तरी समाजाचे अवयव जोडून त्यांत केंद्र उत्पन्न करण्याचा प्रयत्न झालेला नाहीं. जुना केंद्र जो ब्राह्मणवर्ग त्याच्या महत्त्वनाशासाठीं मात्र प्रयत्न सुरू आहे. समाजास दिशा दाखविण्याचे प्रयत्न जे झाले त्यांत आर्थिक सुधारणा करा, औद्योगिक सुधारणा करा, जातिभेद मोडा, या प्रकारच्या ठरींव वाक्यांपलीपडे मजल क्वचितच गेली. समाजघटनाविषयक जुन्या नियमावलीचा अभ्यास करणें व त्या नियमावलीच्या अनुरोधानें कार्याचें भावी स्वरूप ठरविणें यासंबंधीं विचार फारसा झालेला नाहीं. चवथ्या आणि पांचव्या प्रकारचे विचार तर फारच थोडे व्यक्त झाले आहेत. सध्यांच्या सामाजिक चळवळींतील प्रमुख प्रश्न खालीलप्रमाणें आहेत.

(१) परदेशांतील हिंदुत्व किंवा हिंदुत्वांश व त्यासंबंधानें आपल्या समाजाची वृत्ति.

(२) बाह्यांसंबंधानें समाजाची वृत्ति.

(३) ब्राह्मणांचें समाजांतील स्थान व कार्य आणि ब्राह्मणांविरुद्ध चळवळ.

(४) चातुर्वर्ण्य उर्फ समाजघटनेचें जुनें धर्मशास्त्र आणि त्याची आजची स्थिति व भवितव्य.

या प्रश्नांपैकीं पहिल्या तीन प्रश्नांसंबंधानें बरेंच विवेचन वरती आलेलें आहे. येथें आपणांस चौथ्या प्रश्नाचाच किंचित् विस्तारानें विचार करावयाचा आहे.

समाजनियमनासंबंधानें जीं तत्त्वें लोकांमध्यें वागत असतात त्या तत्त्वांसंबंधानें समाजामध्यें निरनिराळ्या प्रकारें विचार झाला पाहिजे. ते प्रकार असे.

(१) त्या तत्त्वांनुरूप समाजाचें नियमन होत आहे काय ?

(२) त्या तत्त्वांनुरूप समाजनियमन होत नसेल तर तें व्हावें म्हणून काय प्रयत्न केला पाहिजे ?

(३) तीं तत्त्वें हितावह आहेत काय ?

(४) तीं तत्त्वें हितावह नसल्यास त्यांचा नाश कसा करावा आणि त्यांच्या ऐवजीं कोणतीं तत्त्वें अमलांत आणावीं ?

चातुर्वर्ण्यसंरक्षण हें तत्त्व आज हजारों वर्षें समाजनियमन करीत आहे, निदान या तत्त्वानुरूप समाजनियमनाचा प्रयत्न होत आहे. सध्यां चातुर्वर्ण्याचें तत्त्व समाजांत कितपत पाळलें जात आहे आणि तें अमलांत आणतांना काय अडचणी उत्पन्न होतात, आणि तें अमलांत आणण्यासाठीं काय खटपटी कराव्या लागतील याचा विचार होणें अत्यंत अवश्य आहे. आपण जो विचार केला पाहिजे तो हा कीं, आपण एक तर चातुर्वर्ण्याचें तत्त्व पूर्णपणें अमलांत आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे किंवा तें अमलांत आणण्याचा प्रयत्न आज जो हजारों वर्षें झाला त्याचे आचारावर कायद्यावर आणि समाजस्थितीवर झालेले परिणाम काढून टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

आपल्या सामाजिक प्रयत्नांची दिशा आणि समाजनियमनाची विचारपद्धति यांचें ऐक्य असलें पाहिजे. विचार एका दिशेनें आणि प्रयत्नांची गति दुसऱ्या दिशेनें असें नसावें. जर चातुर्वर्ण्यसंरक्षणासंबंधाची खटपट अनवश्यक व अहितकारक असेल तर ती तशी आहे हें

दाखविलें पाहिजे. चातुर्वर्ण्याच्या तत्त्वांचें समाजनियमनाच्या दृष्टीनें महत्त्व काय आहे हें आपण पाहूं.

**चातुर्वर्ण्यसंरक्षण हा आपला प्रथमधर्म होय.**—सामाजिक प्रश्नांवर जो विचार देशांत उत्पन्न होतो त्यांत सर्व समाजाच्या घटनेसंबंधाचा म्हणजे सध्यांची घटना कायम राखावी अगर बदलावी यासंबंधाचा विचार सर्वांत महत्त्वाचा होय. जातिभेद मोडावा किंवा राखावा म्हणून सुधारकउद्धारकांकडून होणारा विचार याच स्वरूपाचा आहे. वर्णाश्रमधर्मासंबंधानें होणारा विचार हा देखील घटनाविषयकच आहे.

कायद्यासंबंधाच्या शास्त्रांत सामान्यतः अलीकडचे पाश्चात्त्य शास्त्रज्ञ शासननियमांचे दोन वर्ग करतात. पहिल्या वर्गास सोईकरितां आपण "प्रथमधर्म" असें म्हणूं. या प्रथमधर्मांत सर्व समाजास लागू असणारा व जो बदलण्याचा समाजाच्या शास्त्यांस अधिकार नाहीं किंवा जो बदलणें समाजास फारसें शक्य नाहीं, अशा प्रकारच्या कायद्याचा अंतर्भाव होतो. दुसऱ्या प्रकारचा कायद्यासंबंधानें असें बंधन असतें कीं, प्रथमधर्मानें ज्या मर्यादा घालून दिल्या असतात त्या मर्यादेंत याचे नियम असले पाहिजेत. या भेदाच्या स्पष्टीकरणार्थ आपण आधुनिक व्यवहारांतील एक उदाहरण घेऊं. म्युनिसिपालिट्यांचे अधिकार सरकारनें म्युनिसिपालिट्यांसंबंधानें जो कायदा केला आहे त्यानें नियमित होतात. म्युनिसिपालिट्यांनीं नगरशासनासंबंधानें जे नियम करावयाचे ते सरकारी कायद्यानें घालून दिलेल्या मर्यादेंत केले पाहिजेत. त्यांचा अतिक्रम नगरच्या अधिकारी वर्गानें करतां कामा नये. असें असल्यानें सरकारनें म्युनिसिपाल्यांच्या अधिकारासंबंधानें केलेला कायदा हा म्युनिसिपालिटींत काम करणारांचा प्रथमधर्म झाला.

हा प्रथमधर्म नेहमीं शब्दांनीं व्यक्त केलेला असतो असें नाहीं; तर लोकांनां स्वाभाविकपणें त्या प्रथमधर्माचीं तत्त्वें मान्य असतात, आणि त्यांचा अतिक्रम करणें बरें वाटत नाहीं. जेथें लोकसत्ता नाहीं व राजा जेथें पूर्णपणें स्वतंत्र आहे अशा ठिकाणचा राजा देखील कांहीं नियमांचें मला उल्लंघन करतां येणार नाहीं असाच बाणा बाळगील. ब्रिटिश साम्राज्यांत "राजा व पार्लमेंट" ही जोडी सर्वाधिकारी सत्ता आहे. तथापि पार्लमेंट करील तो कायदा असें इंग्रजांचें कायद्यासंबंधानें तत्त्व असतांहि इंग्रजी पार्लमेंटला असें वाटतें कीं, ख्रिस्ती संप्रदायाचीं आदितत्त्वें आपल्या इच्छेपेक्षां अधिक आदरणीय आहेत व त्यांचा आपल्याकडून अतिक्रम होऊं नये. मागें एकदां मृत पत्नीच्या बहिणीबरोबर लग्न करण्यास लोकांस परवानगी द्यावी असें इंग्रज राष्ट्राचें मत झालें; त्या वेळेस अशीं लग्नें करूं देणें हें ख्रिस्ती धर्मशास्त्राप्रमाणें म्हणजे ख्रिस्तीसंप्रदायान्तर्गत लोकशासनाचीं तत्त्वें जीं आहेत त्यांस अनुसरून कायदेशीर आहे कीं नाहीं याविषयीं वादविवाद सुरू झाला, आणि त्यासंबंधानें तज्ज्ञांचीं मतें गोळा करणें इंग्रज राष्ट्रास अवश्य झालें. अर्थात् ख्रिस्ती संप्रदायाचीं आदितत्त्वें हीं इंग्रज राष्ट्राचा "प्रथमधर्म" होत असें यावरून दिसतें.

हिंदुधर्मशास्त्रांत देखील "प्रथमधर्म" आहेच. एका गृहस्थास मुलगा नसतां त्याची इस्टेट मुलीनें घ्यावी अगर पुतण्यानें घ्यावी यासंबंधाचे नियम धर्मविषयक भिन्न ग्रंथांत भिन्न असणें शक्य आहे व ते तसे आहेतहि; राजा आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथकार यासंबंधानें लोकप्रवृत्ति पाहून किंवा स्वेच्छेनें भिन्न पद्धती अमलांत आणण्याचा प्रयत्न करतील; तथापि अशीं धर्मतत्त्वें अनेक आहेत कीं त्यांस गुंडाळून ठेवावें आणि तसें करण्याचा आम्हांस अधिकार आहे, असें सहसा कोणी जबाबदार शासक म्हणूं शकणार नाहीं. धर्मशास्त्रपंडित देखील ग्रंथांत व्यक्त झालेल्या तत्त्वांपैकीं कांहीं तत्त्वें अधिक आदरणीय आणि कांहीं कमी आदरणीय आहेत असें समजतो आणि अधिक आदरणीय तत्त्वांस बुद्धया बाजूस सारावें असें म्हणत नाहीं. त्यास असें वाटतें कीं, कांहीं धर्मतत्त्वें समाजानें पाळलींच पाहिजेत आणि कांहींच्या पालनासंबंधानें समाजास विकल्प म्हणजे स्वयंनिर्णयास अवकाश आहे.

चातुर्वर्ण्यसंरक्षण हें असें तत्त्व आहे कीं, तें तत्त्व पाळलेंच पाहिजे असें कोणाहि धर्मशास्त्रपंडितास वाटेल. तो चातुर्वर्ण्यसंरक्षण म्हणजे काय हें समजून बोलेल असें नाहीं, तर परंपरेनें सोंवळ्या झालेल्या शब्दांनीं अर्थबोध काय होतो याचा विचार न करतां पण शब्दांचें महत्त्व भासून बोलेल. कां कीं, चातुर्वर्ण्यसंरक्षण करण्यासंबंधानें सर्व धर्मशास्त्रावरील ग्रंथांत व नीतिशास्त्रावरील ग्रंथांत वचनें आहेत आणि त्यासंबंधानें राजे लोकांस ग्रंथकारांनीं आदेश केला आहे. वेद हे आपणांस धर्मशास्त्राचे मान्य आदिग्रंथ आहेत हें तत्त्व प्रत्येक धर्मशास्त्रज्ञास जितकें मान्य आहे, तितकेंच जवळ जवळ चातुर्वर्ण्यसंरक्षणाचें तत्त्वहि त्यास मान्य आहे, व इतर सर्व बाबतींतील धर्मनियम चातुर्वर्ण्यसंरक्षणास जुळते करून घ्यावेत अशी धर्मशास्त्रकारांची प्रवृत्ति आहे. बौद्धादि वेदविरुद्ध संप्रदायांनीं देखील चातुर्वर्ण्य मान्य केलें आहे. मुंजांचीं वयें काय असावीं? मुंजानें जानवें कशा प्रकारचें घ्यावें? दंड कसल्या लांकडाचा घ्यावा? धंदा कोणता करावा? लग्न कोणाशीं करावें? सुतक किती दिवस पाळावें? एका पुरुषाच्या अनेक वर्णांच्या स्त्रिया असल्या तर त्यांच्या संततीस हक्क कशा प्रकारचे असावेत? कोर्टांत शपथ घ्यावयाची ती कोणीं कशी घ्यावी? लोकांनीं एकमेकांचें स्वागत कसें करावें? इत्यादि गोष्टींसंबंधानें जे धर्मशास्त्रकारांचे नियम आहेत ते चातुर्वर्ण्यसंरक्षणाच्या तत्त्वानुरूप आहेत.

अर्थात् चातुर्वर्ण्य हा "प्रथमधर्म" आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं, आणि चातुर्वर्ण्य ज्याच्या योगानें बिघडेल असें

करणें योग्य होणार नाहीं. चातुर्वर्ण्यास प्रथमधर्म समजण्यास मुख्य साधक गोष्ट म्हटली म्हणजे चातुर्वर्ण्यविचाराचें अत्यंत प्राचीनत्व ही होय. चातुर्वर्ण्य हें सनातन आहे.

चातुर्वर्ण्याची कल्पना म्हणजे समाजांत कर्मपृथक्त्वामुळें चार वर्ग झाले आहेत ही कल्पना अत्यंत जुनी आहे. वेदपूर्व कालामध्यें म्हणजे जेव्हां वेदद्रष्ट्या ऋषींचे पूर्वज आणि इराणी व यूरोपियन लोकांचे पूर्वज एकत्र होते त्या कालीं देखील ती होती असें अनुमान काढण्यास जागा आहे. जुन्या ग्रीक ग्रंथांत चार भेदांचा उल्लेख केलेला आहे आणि हे चार भेद म्हणजे काय आहेत, हे धंद्यावरून पडले आहेत अगर हे चार वंश म्हणजे जाती आहेत कीं काय, असा वादविवाद तेथें उपस्थित केला आहे. "अवेस्ता"मधील अथर्वणादिक चार वर्गांचा उल्लेख तर सुप्रसिद्ध आहे. याप्रमाणें वेदकालापूर्वीपासूनची ही कल्पना आहे, म्हणून हिला सनातन म्हणण्यास हरकत नाहीं.

चातुर्वर्ण्याच्या कल्पनेस जितकें सनातनत्व आहे तितकें सनातनत्व धर्मशास्त्रांतील दुसऱ्या कोणत्याहि सामाजिक नियमास असलेलें दृष्टीस पडत नाहीं. श्रुतींत अनेक रीतीभातींचा आणि अनेक संस्थांचा उल्लेख आहे, म्हणजे वेदकालांत अनेक संस्था व रीतीभाती ठरल्या होत्या; पण आज त्या रीतीभातींपैकीं आणि संस्थांपैकीं अनेक नष्ट झाल्या आहेत. वेदोत्तरकालांत व्यवहारनियम बदलले, भोजनाचे पदार्थ बदलले, कालगणनापद्धति बदलली, वजनेंमापें बदललीं, परमार्थाचे मार्ग अगर साधनें बदललीं, लग्नव्यवहाराच्या रीतीभाती बदलल्या, शासनसंस्था बदलल्या, आयुष्याचा हेतु काय, मनुष्याचें कर्तव्य काय इत्यादिविषयींचे सिद्धान्तहि बदलले, अभ्यासविषय बदलले; पण एक गोष्ट स्थिर राहिली. चातुर्वर्ण्यसंरक्षण केलें पाहिजे ही कल्पना तेवढी स्थिर राहिली आणि यामुळें सनातन या पदवीस योग्य असें जर कांहीं असेल तर ती चातुर्वर्ण्याची कल्पना होय.

**चातुर्वर्ण्यसंस्थापन म्हणजे काय?**—चातुर्वर्ण्य म्हणजे काय, त्याचें संरक्षण कसें कसें करावयाचें, याविषयीं समाजांतील विद्वान् वर्गांत वागत असलेल्या कल्पना बरोबर असोत अगर नसोत, चातुर्वर्ण्य राहिलें पाहिजे हें समाजतत्त्व कांहीं सुटलेलें नाहीं. चातुर्वर्ण्य मृतकल्प झालें आहे, पण जें अजून आहे तें टिकविलें पाहिजे ही भावना कायम आहे. चातुर्वर्ण्य मृतकल्प झालें आहे ही भावना आहेच. पण तिजबरोबर हीहि भावना आहे कीं, जर तें मृतकल्प झालें आहे तर त्याची संस्थापना पुन्हां झाली पाहिजे. चातुर्वर्ण्यसंस्थापना कशी काय होईल, यासंबंधानें मात्र फारसा विचार झालेला नाहीं. चातुर्वर्ण्य म्हणजे काय याचीच कल्पना जर स्पष्ट नाहीं तर चातुर्वर्ण्यसंस्थापनेसंबंधाची कल्पना कितपत स्पष्ट असणार?

कांहीं वर्षांपूर्वीं धर्मशास्त्राच्या ज्ञानाबद्दल सर्व हिंदुस्थानभर प्रसिद्ध अशा एका काशीक्षेत्रांतील महामहोपाध्यायांस चातुर्वर्ण्यसंस्थापना म्हणजे काय आणि ती कशी करावयाची असा डॉ० केतकर यांनीं प्रश्न केला असतां, हें काम भगवंताचें आहे, चातुर्वर्ण्यसंस्थापना म्हणजे धर्मसंस्थापनाच होय; धर्मसंस्थापना म्हणजे दुसरें कांहीं नाहीं आणि ती करण्यास जो समर्थ असेल तो ती कशी करावी हें ठरवील, अर्थात् ती संस्थापना करण्यास "संभवामि युगे युगे" या वचनाप्रमाणें अवतारी पुरुषच पाहिजे, अशा मोठ्या प्रश्नाशीं इतरांस कांहीं एक कर्तव्य नाहीं, अशा अर्थाचें उत्तर मिळालें. हें उत्तर ऐकलें त्या वेळेस जितकें उडवाउडवीचें वाटलें तितकें तें आज वाटत नाहीं. चातुर्वर्ण्यसंस्थापनेस ज्या खटपटी लागणार त्या पार पाडण्यासाठीं मोठा निग्रही व कर्तृत्वाचा आणि अधिकाराचा पुरुष पाहिजे, किंवा विशिष्ट ध्येयाप्रमाणें कार्य करणाऱ्या व सामान्यपणें बलवान् अशा मंडळीची अनेक वर्षें टिकेल अशी परंपरा पाहिजे असें वाटतें. ती परंपरा उत्पन्न होईल अशी भावना असलेल्या लेखकाचें सध्यांचें कर्तव्य एवढेंच आहे कीं, विषयाची फोड करून कार्यक्षेत्र लोकांपुढें मांडावयाचें.

**चातुर्वर्ण्यांतर्गत कल्पना.**—चातुर्वर्ण्य म्हणजे काय हें ठरविण्यासाठीं चातुर्वर्ण्यान्तर्गत कल्पनांचें पृथक्करण करूं. त्यांत अंतर्भूत होणाऱ्या कल्पना येणेंप्रमाणें आहेतः—

(१) समाजांत चार वर्ण आहेत, अधिक नाहींत.

(२) ते चारहि वर्ण मिळून समाज पूर्ण होतो.

(३) प्रत्येक वर्णाचें पृथक्त्व गुणभिन्नतामूलक आणि कर्तव्यभिन्नतामूलक आहे.

(४) एकाच शरीराचे निरनिराळे अवयव असतात त्याप्रमाणें प्रत्येक वर्ण हा चातुर्वर्ण्याचा अवयव आहे म्हणजे निरनिराळे वर्ण आणि सर्व समाज यांच्यामध्यें अवयव आणि अवयवी हा संबंध आहे.

चातुर्वर्ण्यसंरक्षणाचा उपदेश लोकांस होत असतो याचें कारण तद्विषयक भावना लोकांत जागृत ठेवावयाची असते हें होय. कोणत्याहि संस्थेच्या संरक्षणार्थ तिच्याविषयीं सद्भावना लोकांत जागृत असावी लागते. चातुर्वर्ण्याच्या संरक्षणार्थ अवश्य असलेली भावना म्हणजे वर्णविषयक भावना होय. कोणतीहि भावना जागृत करावयाची हें कार्य असलें म्हणजे त्या भावनेशीं विरोध करणाऱ्या ज्या भावना असतील त्या भावनांचें गौणत्व उत्पन्न करणें प्राप्त होतें. जेव्हां राष्ट्रविषयक भावना जागृत करावयाची असेल तेव्हां व्यक्तीच्या किंवा एखाद्या जातीच्या खासगी हिताच्या भावना राष्ट्रहितभावनेपेक्षां दुर्बल होतील असा प्रयत्न करावा लागतो. मनुष्यांमनुष्यांत अनेक कारणामुळें ऐक्य अगर द्वैत उत्पन्न होतें. मनुष्यांमनुष्यांत जातिमूलक, मतमूलक, कर्ममूलक, द्वैतमूलक,

द्रव्यमूलक भेद असतात. आणि त्यामुळें त्यांचे निरनिराळे वर्ग बनतात. चातुर्वर्ण्यसंरक्षणाचें तत्त्व वारंवार सांगण्यांत येतें त्याचा हेतु हाच कीं, इतर भावनांपेक्षां वर्णविषयक भावना बलवान् व्हावी, जातिविषयक, कुलविषयक इत्यादि भावनांचें नियमन वर्णविषयक भावनांनीं व्हावें. जातिविषयक भावना आणि कुलविषयक भावना या वर्णविषयक भावनेच्या प्रसंगीं साधक असतात आणि प्रसंगीं विरोधी असतात. जेव्हां त्या विरोधी होतील तेव्हां त्यांचें नियंत्रण झालें पाहिजे.

अध्ययनाध्यापनादि क्रिया, संरक्षणादि क्रिया, द्रव्योत्पादक व्यवहार व इतर लोकांची सेवा या सर्व क्रिया ज्या समाजांत नाहींत असा समाज असणें अशक्य आहे. अर्थात् चातुर्वर्ण्याचें अस्तित्व स्वाभाविक आहे. जी गोष्ट स्वाभाविकच आहे तिचें संरक्षण तें काय करावयाचें? चातुर्वर्ण्य जर गुणकर्ममूलकच असेल तर चातुर्वर्ण्यसंरक्षणाची जरूरच नाहीं. कोणीहि व्यक्ति घेतली तरी ती या वर्णांच्या क्रियांपैकीं कोणती तरी क्रिया करीतच असणार आणि प्रत्येक वर्णाच्या क्रिया करणाऱ्या व्यक्ती समाजांत असतातच; मग संरक्षणासंबंधानें एवढा आक्रोश कां? उत्तर एवढेंच कीं, आपल्या देशांतील वर्णभिन्नत्व केवळ क्रियाभिन्नत्वमूलकच नाहीं.

**चातुर्वर्ण्याचे प्रकार.**—आपल्या देशांतील चातुर्वर्ण्य व इतर देशांतील चातुर्वर्ण्य यांत असा फरक आहे कीं, आपलें चातुर्वर्ण्य संस्कारांकित आहे. प्रत्येक वर्णास वर्णविशिष्ट संस्कार आहेत. इतर देशांतील चातुर्वर्ण्य संस्कारांकित नाहीं. अमुक मनुष्य अमुक पदवीचा हें पुष्कळदां बाह्य चिन्हांनीं ओळखलें जातें. राजा कोण तर जो सर्व लोकांवर हुकूम चालवितो तोच केवळ नव्हे तर ज्यास राज्याभिषेक होतो, जो सिंहासनावर बसतो, मुकुट घालतो आणि ज्याची प्रतिमा नाण्यावर कोरलेली असते तो, अशी सामान्य मनुष्याची कल्पना असावयाची. सामान्य मनुष्यास पदवी बाह्य चिन्हांवरून ओळखतां येते आणि समाजांतील पदवीचीं निदर्शक जीं बाह्य चिन्हें आहेत त्यांस यांमुळें महत्त्व आहे. अर्थात् वेदोक्त संस्कार हेंच आज द्विजत्वाचें बाह्य चिन्ह आहे, आणि वेदोक्त संस्कार आपणांस मिळावेत म्हणून जी धडपड दृष्टीस पडते तिचें कारण हेंच आहे.

एखादा मनुष्य वाण्याचा धंदा करीत असेल तर ती गोष्ट प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें कोणीहि नाकबूल करणार नाहीं. तथापि चातुर्वर्ण्यामध्यें आमचें वैश्यस्थान आहे असें त्यानें सांगितलें म्हणजे कुलाचा व त्याच्या इतिहासाचा प्रश्न आला. संस्कारांसंबंधानें पूर्वापार काय चाल आहे हे देखील प्रश्न उपस्थित झालेच.

संस्कारांकित चातुर्वर्ण्यामुळें दोन प्रश्न उपस्थित होतात. एक प्रश्न म्हटला म्हणजे क्रियेच्या दृष्टीनें चातुर्वर्ण्यांत अंतर्भूत होणारा, तथापि संस्काराच्या दृष्टीनें चातुर्वर्ण्याच्या बाहेरचा असा वर्ग समाजांत आहे काय?

दुसरा असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, संस्कारांकित चातुर्वर्ण्यांतर्गत जो समाज आहे त्या समाजामध्यें क्रियेच्या दृष्टीनें जो मनुष्य ज्या वर्णाचा आहे त्याच वर्णाचे संस्कार होत आहेत काय?

हे दोन प्रश्न वारंवार उपस्थित होतात, आणि त्यांस उत्तर जेव्हां असमाधानकारक येतें तेव्हां चातुर्वर्ण्यसंस्थापनेचें प्रयोजन उत्पन्न होतें.

वर सांगितल्यापैकीं पहिला प्रश्न जेव्हां प्राचीन काळीं उपस्थित झाला तेव्हां त्याच्या निराकरणासाठीं व्रात्यस्तोमादि संस्कार उत्पन्न झाले. ते मुसुलमानी राज्य सुरू झाल्यापासून प्रचारांत दिसत नाहींत. चातुर्वर्ण्याबाहेरील वर्ग वाढत आहे आणि समाजांत विशिष्ट वर्णाची क्रिया करणारांस त्या वर्णाचे संस्कार नाहींत असें झालें आहे. चातुर्वर्ण्यांकित समाजामध्यें जेव्हां क्रियामूलक वर्ण आणि संस्कारमूलक वर्ण यांत द्वैत उत्पन्न झालें तेव्हां वर्णव्यवस्था विघडली. ती वर्णव्यवस्था पुन्हां स्थापन कशी काय करावयाची हा प्रश्न आहे.

**चातुर्वर्ण्य विघडतें कसें?**—अशी कल्पना करा कीं, चातुर्वर्ण्ययुक्त समाज आज आहे आणि प्रत्येक वर्णास त्याच्या कर्मानुसार संस्कार घडत आहेत. अशा प्रकारच्या समाजाचें चातुर्वर्ण्य कशानें विघडेल हें पाहूं.

ज्यानें चातुर्वर्ण्य विघडणें अत्यंत स्वाभाविक आहे असें एक कारण प्रत्येक समाजांत असतें तें हें कीं, मनुष्याची कर्तृत्वशक्ति त्याच्या कुलावर म्हणजे त्याच्या बापाच्या संस्कारावर अवलंबून नसते. या कारणामुळें चातुर्वर्ण्य बिघडूं द्यावयाचें नसेल तर दोन गोष्टी अवश्य आहेत.

(१) संस्कार वर्णानुरूप असून वर्ण गुणकर्मावरच अवलंबून पाहिजे.

(२) वर्णनिर्णयार्थ (म्हणजे गुणकर्मनिर्णयार्थ) इतिहासापेक्षां प्रत्ययास म्हणजे सद्यःकालीन प्रत्ययास अधिक महत्त्व पाहिजे.

या दोन तत्त्वांची अंमलबजावणी कशी काय होईल तें आपण पाहूं.

चारहि वर्णांस जे संस्कार सांगितले आहेत त्यांत अनेक संस्कार असे आहेत कीं, ते मनुष्यानें आपलें आयुष्यांतील कर्म सुरू करण्यापूर्वींच करावे लागतात. उदाहरणार्थ उपनयन. हा उपनयनाचा संस्कार म्हणजे अध्ययनप्रारंभाचा संस्कार होय. अध्ययनास प्रारंभ तर बाल्यांतच करणें भाग आहे, आणि व्यक्तीचें आयुष्यांतील भावी कार्य जर अनिश्चित असणार तर त्यास कोणत्या वर्णाचा संस्कार करावा?

ब्राह्मणाचे संस्कार करावे तर तो पुढें शूद्रकर्म करणार नाहीं कशावरून ? अर्थात् अशा प्रसंगीं एक कल्पना गृहीत धरावी लागते ती ही कीं, बाप जें कर्म करीत आहे तेंच मुलगा करणार. व यावरून असा निर्णय करितात कीं, बापास जो संस्कारविषयक अधिकार आहे तोच मुलाचा आहे. असा संस्कारविषयक निवाडा करितांना आपण जें गृहीत धरतों तें खरें असतेंच असें नाहीं. बाप जें कर्म करतो तें मुलगा करीलच आणि बापांत जे गुण असतात ते मुलांत असतीलच असें नेहमींच कोठें शक्य आहे ? वर्ण-विषयक शिक्षा अगोदर मिळतो, आणि कर्म कोणतें करावयाचें हें मागाहून ठरतें. हीच क्रिया पिढ्यान् पिढ्या चालून गुण-क्रियेमुळें होणारे वर्ण आणि संस्कारामुळें होणारे वर्ण हे एक न राहतां भिन्न होऊं लागतात. कार्यभिन्नत्वमूलक चातुर्वर्ण्य आणि संस्कारभिन्नत्वमूलक चातुर्वर्ण्य यांची असंगति होणें म्हणजे चातुर्वर्ण्य बिघडणें आणि चातुर्वर्ण्यसंरक्षण करणें म्हणजे अशी असंगति न होऊं देणें.

समाजांतील पदवी वर्णानुरूप असणार आणि वर्ण जर केवळ गुणकर्मानुरूप असला पाहिजे तर वर्णनिर्णय करण्या-साठीं इतिहासाचें प्रयोजन काय ? कर्म तर प्रत्यक्ष अवलोक-नानें ओळखतां येतें, मग इतिहासाचा द्राविडी प्राणायाम कशाला ? शिवाय इतिहास फार तर प्रस्तुत व्यक्तीचे पूर्वज काय करीत होते हें सांगणार. वर्ण जर गुणकर्मावर तर पूर्वजांशीं काय करावयाचें आहे ? ही वर्णनिर्णयार्थ एक दृष्टि झाली आणि तत्त्वतः चातुर्वर्ण्याचें ध्येय हेंच आहे कीं, प्रत्यक्ष व्यवहारांत दृश्य होणाऱ्या वर्णाप्रमाणें समाजाचें वर्गीकरण असावें. तथापि वर्णनिर्णयार्थ इतिहासाचा उपयोग आपणांस वारंवार होतांना दिसतो; तर मग याचें कारण काय ?

कारण एवढेंच कीं, वर्णनिर्णयप्रसंगाशीं समकालीन असेल तेवढीच वस्तुस्थिति वर्णनिर्णयार्थ लक्षांत घेतली असतां घोंटाळे फार होण्याचा संभव आहे. वर्ण म्हणजे एक प्रकारची संपत्ति आहे. त्या संपत्तीस देखील अधिकारी शोधावा लागतो. केवळ प्रत्यक्षानें वर्णनिर्णय करावयास लागलें असतां 'ज्याच्या हातीं ससा तो पारधी' हा नियम अवलंबावा लागणार. एखादा दुसऱ्याचें नांव धारण करून संपत्तीचा उपभोग घेत असला म्हणजे त्यास मालक म्हणणें योग्य होणार नाहीं हें कोणीहि सांगेल; पण केवळ तत्कालीन प्रत्यक्षावरच भिस्त ठेवली तर त्यासच मालक म्हणवयाचा प्रसंग येणार. अर्थात् जें आज आहे तें सर्व धर्म नव्हे. त्याचेंहि नियंत्रण धर्मानें झालें पाहिजे, नाहीं तर अपहार योग्य होईल. जी गोष्ट द्रव्यापहारास लागू आहे तीच राज्यापहारास लागू आहे. क्षत्रियत्वहि केवळ राज्या-पहरणावर अवलंबून नाहीं. राजाचा राज्यावर हक्क असल्या-शिवाय तो खरा राजा नाहीं तसा क्षत्रियहि नाहीं अशी साधारणतः लोकांची विचारसरणी असते. अर्थातच केवळ प्रत्यक्ष हें तत्त्व सोडलें म्हणजे इतिहासाचा प्रश्न आला. आणि ऐतिहासिक पद्धतीनें अमक्या वर्णांत हा जन्मला म्हणून त्याचा वर्ण अमुक हें तत्त्व आलें म्हणजे गुणकर्मानेंच वर्ण ठरावयाचा हें तत्त्व मागें पडलेंच.

वर्ण जर गुणकर्मावर ठरवावयाचा असेल तर अर्थात् व्यक्तींच्या पूर्वजांच्या इतिहासास गौण स्थान दिलें पाहिजे आणि केवळ अपहारात्मक प्रवृत्ति टाळण्यापलीकडे न जाईल अशा तऱ्हेची सद्यःकालीन स्थितीची आणि इतिहासाची कांहींतरी तोंडमिळवणी केली पाहिजे.

चातुर्वर्ण्याचा विघाड होण्याचें स्वाभाविक नित्य कारण वर सांगितलें. तथापि त्याचा विघाड होण्यास दुसरीं किस्येक कारणें प्रसंगीं उत्पन्न होतात, व झालीं आहेत.

एक तर ब्राह्मणांकडे आणि त्यांनीं दिलेल्या संस्कारांकडे दुर्लक्ष करण्यास उपदेशिणारीं मतें वारंवार प्रसृत होतात. आणि त्यामुळें असें होतें कीं, त्या मतांचा प्रसार ज्या लोकांत म्हणजे विशेषेंकरून ब्राह्मणेतरांत होतो त्यांचे संस्कार नष्ट होतात. याचा परिणाम असा होतो कीं, जे लोक क्षत्रिय किंवा वैश्य वर्णाचे असतात त्यांचे संस्कार नष्ट झाल्यामुळें ते शूद्र वर्णाचे ठरतात. ज्या अनेक क्षत्रिय जाती ब्राह्मणांच्या अदर्शनानें शूद्र झाल्या त्यांपैकीं कांहींची यादी मनुस्मृतींत दिली आहे. बौद्ध व जैन हे संप्रदाय देशांत कांहीं काळ पसरल्यामुळें असा परिणाम झाला कीं, जनतेमध्यें जे क्षत्रिय आणि वैश्य होते ते शूद्र बनले. त्यांस पुन्हां संस्कार करून क्षत्रिय किंवा वैश्यपद देण्याचें काम समाजाकडून झालें नाहीं. म्हणजे व्रात्यस्तोमादि विधी वापरले गेले नाहींत.

चातुर्वर्ण्याचा विघाड होण्यास दुसरें कारण झालें तें असें. परदेशांहून आलेल्या शक-यवन-पल्हवादि वन्याच जाती व राष्ट्रें यांनीं देश काबीज केला. जुनीं राजघराणीं त्यामुळें नष्ट झालीं आणि नव्या राजघराण्यांनीं देश जिंकला. या जेत्यांनीं प्रथम संस्कारांची पर्वा केली नसावी किंवा त्यांस ते संस्कार मिळाले नसावेत.

ज्या राष्ट्रांच्या किंवा राजघराण्यांच्या मागें त्यांचे स्वतःचे धर्मोपाध्याय नव्हते तीं राष्ट्रें किंवा राजघराणीं देशांत आल्यानंतर कालांतरानें त्यांचे आचारविचार देशांतल्या लोकांसारखेच झाले आणि ते जनतेंत मिसळून गेले. किस्येक प्रथम बौद्धांचे अनुयायी झाले. व किस्येकांनीं कालान्तरानें हरिहरादि देश्य उपास्यें स्वीकारलीं ही गोष्ट देवदत्त भांडारकरांनीं नजरेस आणली आहे. चातुर्वर्ण्यांत त्यांनां प्रसंगीं क्षत्रियांचेंहि स्थान मिळालें, म्हणजे ते आपणांस क्षत्रिय म्हणवून घेऊं लागले. अशा रीतीनें बिघडलेलें चातुर्वर्ण्य पुन्हां कसेंबसें स्थापित होई; तथापि राजे जेव्हां समाजबाह्य असतात तेव्हां राजत्व आणि

क्षत्रियत्व यांची असंगति होते आणि चातुर्वर्ण्य बिघडावयास त्यांचें बाह्यत्व कारण होतें हें वरील हकिकतीवरून उघड होतें.

**चातुर्वर्ण्याचें संरक्षण व संस्थापन.**—गुणकर्ममूलक चातुर्वर्ण्य आणि संस्कारभेदमूलक चातुर्वर्ण्य या दोहोंमधील असंगति टाळण्यासाठीं समाजांत खालील गोष्टी अवश्य आहेत.

एक तर मनुष्याला पुन्हां म्हणजे मोठ्या वयांत संस्कार कर्मानुरूप करण्याची सोय असणें. ही धर्मशास्त्रांत आहेच. मनुष्य भ्रष्ट झाला असतां, किंवा दुसऱ्या कांहीं ( व्रात्यस्तोमादि ) प्रसंगीं प्रौढ वयांत संस्कार करण्याची धर्मशास्त्राची अनुज्ञा आहे.

चातुर्वर्ण्याच्या संरक्षणासाठीं वापरलेली दुसरी एक पद्धति म्हटली म्हणजे दंडाचा उपयोग करून लोकांस स्ववर्णाचें कर्म करावयास लावणें. या पद्धतीचा उपयोगहि धर्मशास्त्रकारांनीं आणि नीतिवेत्त्यांनीं उपदेशिला आहे.

पण या दोन्ही पद्धतींचा उपयोग करणें अशा वेळेसच शक्य आहे कीं, जेव्हां राजा म्हणजे राजाची सभा ( कोर्ट ) वर्णरक्षण हें कार्य आपलें आहे असें समजेल आणि संस्कार करणारे भिक्षुक या प्रकारच्या राजसभेच्या नियमनानें बद्ध असतील. ही गोष्ट हिंदु राज्यांत शक्य होती; कां कीं, धर्माधिकारी म्हणजे राजसभेचा मुख्य हा भिक्षुकांतीलच विद्वान् असे. तरीपण दंडाची पद्धति पुस्तकांत असली तरी पूर्वकालीन राजांनीं ती फारशी वापरली असेल असें वाटत नाहीं.

आपली कर्तृत्वशक्ति आपल्या वडिलोपार्जित वर्णकर्मास योग्य असो अगर नसो, आपण आपलें कर्म करीत रहावें, अशी वृत्ति सर्व जनतेंत असणें अशक्य आहे. आणि आपआपल्या वर्णाचीं कर्में करण्यास लोकांस भाग पाडणें राजासहि कठिण आहे. ब्रह्मकर्म ब्राह्मणाच्या मुलानें केलें पाहिजे असा जरी कायदा राजानें केला तरी ब्राह्मणपुत्रास तें कर्म येतच नसेल तर त्याच्याविरुद्ध तो कायदा अमलांत तरी कसा आणावयाचा? शिवाय कोणीं कोणतें कर्म करावें हें जनतेच्या बदलणाऱ्या गरजांवरून व संख्येवरून ठरतें. गरजांत बदल झाला नाहीं असें धरलें तरी आजच्या विशेष कर्में करणाऱ्या जातींत जननाचें व मृत्यूचें प्रमाण इतर जनतेच्या जननमृत्यूच्या प्रमाणानेंच राहील हें कसें शक्य आहे? अर्थात् जन्मतः जे संस्कार मुलाला होतील त्यावर त्या मनुष्याचें भावी कर्म ठरविणें हें युक्तीस व व्यवहारास सोडून आहे. राजदंडानें देखील याचा निर्णय होणें शक्य नाहीं. ही अडचण पूर्वीपासून भासत आली आहे. प्रत्यक्ष मनुस्मृतीच्या कालीं ब्राह्मण लोक तिसापेक्षां अधिक निषिद्ध धंदे करीत होते. वस्तुस्थिति आणि कर्मानुरूप वर्ण असावा हें तत्त्व यांची तडजोड करण्याचा प्रसंग आला असतां ही तडजोड दोन प्रकारें होणें शक्य होती. राजांनीं ब्राह्मणांचीं जानवीं तोडून त्यांनां ब्राह्मण वर्णांतून घालवून देण्याची व्यवस्था करणें किंवा आपद्धर्म म्हणून वर्णकर्माबाहेरील कांहीं कर्में कशींवशीं धर्मशास्त्राखालीं आणणें. पहिली व्यवस्था व्यवहार्य नव्हती; कारण, राज्यें अनेक, त्या सर्वांवर तावा कोण चालविणार? पोथी लिहीत बसणाऱ्या ग्रंथकारास दंडानें भिन्न कर्तव्यमार्गावर आणणें कसें शक्य होणार? म्हणून दुसऱ्या प्रकारची म्हणजे "आपद्धर्म" म्हणून वस्तुस्थिति व तत्त्व यांची तोंडमिळवणी करण्याची पद्धति मनूनें उपदेशिली. कां कीं तीच शक्य व व्यवहार्य होती.

संस्कारानुरूप कर्मनियमन शक्य नव्हतें व नाहीं. कर्मानुरूप संस्कार करणें मात्र शक्य आहे. तथापि ग्रंथकार असा उपदेश करितांना दिसतात कीं, ज्यानें त्यानें आपल्या वर्णाचें कर्म करावें. या प्रकारच्या उपदेशाचा अर्थ काय? अर्थ हाच कीं, स्वकर्माचा अभिमान हा समाजांत जागृत रहावा, वर्णविषयक अभिमान उत्पन्न व्हावा. हा अभिमान समाजास उपयोगी आहे. ब्राह्मणपुत्रास आपण ब्राह्मण आहों हा अभिमान श्रेष्ठ आचरण करण्यास प्रवृत्त करील; क्षत्रियास क्षत्रियत्वाचा अभिमान धैर्यशौर्य देईल; वैश्यास वैश्यवर्णाभिमान दारिद्र्याची लाज उत्पन्न करील; आणि हें सर्व हितावह आहे.

चातुर्वर्ण्यसंस्थापनेसाठीं प्रस्तुत समाजामध्यें जे फेरफार करावे लागतील असें दिसतें त्यांचें सामान्य स्वरूप येणेंप्रमाणें:—

( १ ) बाह्य व हिंदू मिळून जो समाज होतो त्या सर्व समाजास एकस्वरूपता देणें, आणि चातुर्वर्ण्याच्या नियमांत त्या सर्व समाजास आणणें.

( २ ) प्रत्येक व्यक्तीचा वर्ण क्रियेप्रमाणें ठरावा हें आत्यंतिक ध्येय साधण्यासाठीं व्यक्तींचा वर्ण ठरविण्याचा प्रयत्न करणें. हें कधीं कधीं होतें असें दृष्टीस पडतें. कांहीं ठिकाणीं राजास क्षत्रियस्थान द्यावयाचें व त्याचा त्याप्रमाणें संस्कार पुन्हां करावयाचा असा प्रकार आहे.

( ३ ) (अ) व्यक्तींचें वर्णानुसार वर्गीकरण करावयाचें झाल्यास त्याला जातिकुलादींच्या बंधनांपासून मुक्त करणें. (आ) किंवा त्याच्या जातीसच विशिष्ट वर्णामध्यें घालणें. म्हणजे रामा न्हावी याचा वर्ण ठरवावयाचा झाल्यास एक तर रामा न्हावी कोणत्या कुलांत अगर जातींत उत्पन्न झाला त्याचा विचार न करतां तो कोणतें कर्म करतो आहे एवढेंच पाहून त्याचा वर्ण ठरविणें. किंवा त्या व्यक्तीच्या कर्माचा विचार न करतां तो कोणत्या जातीचा आहे एवढेंच पाहून त्याची पदवी ठरविणें व त्या जातीस तिचें कर्मवैशिष्ट्य पाहून निश्चित स्थान देणें.

आज लोकांनां चातुर्वर्ण्याचें तात्त्विक दृष्ट्या मात्र रक्षण करावयाचें आहे. त्याचे आत्यंतिक परिणाम स्वीकारण्याची

कोणाचीच तयारी नाहीं. जे ब्राह्मण लोक आज शेंकडों वर्षें ब्राह्मणाचीं कर्में न करतां क्षत्रियवैश्यांचीं कर्में करीत आहेत, ते ब्राह्मण ही पदवी सोडावयास तयार आहेत काय ? महाराष्ट्रीय ब्राह्मणांत शेंकडा ऐशींपासून नव्वद लोक क्षत्रियवैश्यांचीं व प्रसंगीं शूद्रांचींहि कर्में करीत आहेत. जेव्हां लोकांचे हितसंबंध तत्त्वाच्या उपेक्षेवरच अवलंबून आहेत तेव्हां तें तत्त्व अमलांत कोणीच आणूं चहाणार नाहीं. त्या तत्त्वाचा आग्रह धरून बसणाऱ्या मनुष्यास अनंत शत्रू उत्पन्न होऊन सुधारणा पुढें जाणार नाहीं. आज व्यक्तीच्या कर्मानुरूप संस्कार करावेत हें तत्त्व पुढें आणलें तर त्यास ब्राह्मणच विरुद्ध होणार. शिवाय आज हिंदु मनुष्यास जीं जातिकुलादि बंधनें आहेत तीं तोडून तो केवळ वर्णबंधन लावून घ्यावयास तयार होईल किंवा नाहीं हाहि प्रश्न आहे. समजा, एखाद्या कायस्थ प्रभूस किंवा सोनारास त्याचे विशिष्ट गुण पाहून समाजाच्या कोणी तरी काल्पनिक मुख्यानें ब्राह्मणवर्णांत घातलें तर त्यास देखील आपल्या ज्ञातींतील इतर लोकांस सोडून जाणें बरें वाटेल किंवा नाहीं हा मोठा प्रश्नच आहे.

पुढेंमागें वर्णविषयक अभिमान वाढून व्यक्तीच्या गुणावरून त्याचें वर्णनियमन करणें शक्य होईल अशी आपण कल्पना केली तरी आज ती गोष्ट शक्य नाहीं. आज शक्य एवढेंच आहे कीं, व्यक्तीचा वर्ण न ठरवितां व्यक्ति ज्या समूहांत आहे त्या समूहाचें सामान्य स्वरूप पाहून त्या समूहाचा वर्ण ठरवावा; म्हणजे कायस्थ प्रभु, कोष्टी व चांभार या निरनिराळ्या ज्ञातींस कोणत्या वर्णांत घालावें याविषयीं विचार ठरवावा. बहुतेक प्रयत्न याच दृष्टीनें होत आहेत. कोणतीहि व्यक्ति आपल्या जातींतून सुटून जाण्याचा प्रयत्न न करितां ती ज्या समूहांत असेल त्या समूहाचें चातुर्वर्ण्यांत स्थान उच्च असावें म्हणून खटपट करीत आहे, आणि आपणास जीं व्यवस्थापत्रें दृष्टीस पडतात त्यांत सबंध जातींचाच विचार केलेला आढळतो.

चातुर्वर्ण्यसंस्थापनेंत एक मोठी अडचण म्हटली म्हणजे अनेक कर्में अशीं आहेत कीं, त्यांचें वर्गीकरण कोणत्या वर्णकर्मामध्यें करावें याविषयीं निश्चित विचारपरंपरा नाहीं. उदाहरणार्थ, लेखनकर्म घ्या. हें ब्राह्मणाचें कर्म आहे कीं क्षत्रियाचें कर्म आहे ? हें ब्राह्मणाचें कर्म असेल तर कायस्थ प्रभूस ब्राह्मणवर्णांत घातलें पाहिजे. तसेंच शूद्राचें कर्म सेवा असें आपण समजतों. सेवा म्हणजे काय ? ब्राह्मणहि सेवाच करीत आहे किंवा नाहीं ? लोकांचे संस्कार करणें ही सेवाच नव्हे काय ? क्षत्रियकर्म म्हणजे संरक्षण ही देखील सेवाच नव्हे काय ? व्यापार म्हणजे लोकांच्या गरजा पुरविणें ही देखील सेवाच नव्हे काय ? सेवा याचा अर्थ व्यक्तीची सेवा असा केला तर आणखी एक अडचण उत्पन्न होते. स्वयंपाक करणें हें सेवाधर्मांत घालतां येईल आणि खाटकाचा धंदा करणें हें व्यापारांत गणलें जाईल. ही दृष्टि वापरली असतां ब्राह्मण स्वयंपाकी व खाटीक यांच्या दर्जाचा निर्णय कसा ठरवावयाचा ?

वरील अडचणी लक्षांत घेतल्या असतां आपणांस चातुर्वर्ण्यसंस्थापनेविषयीं जे नियम बांधावयाचे ते बरेचसे समाजप्रवृत्ति पाहूनच बांधले पाहिजेत हें दिसून येईल. अर्थात् आज सर्व प्रश्न सुटणें शक्य नाहीं. परंतु सर्व प्रश्न सोडविण्याची आज आवश्यकताहि नाहीं. चातुर्वर्ण्यसंस्थापनेसाठीं समाज एखादें कोर्टासारखें यंत्र आज निर्माण करील तर तेवढेंहि पुरें आहे. याप्रमाणें प्रत्यक्ष कार्य करितांना अनेक तऱ्हेची उपयुक्त विचारमालिका उत्पन्न होईल.

**आजची समाजस्थिति.**—वरील प्रकारचें यंत्र निर्माण करण्याची आवश्यकता काय आहे हें ठरविण्यासाठीं आजच्या परिस्थितीकडे थोडेंसें लक्ष दिलें पाहिजे.

प्रत्येक मनुष्य कोणत्या वर्णाचा आहे हें ठरवावयाचें तें कोणीं ठरवावयाचें ? आज संस्कारास अधिकारी कोण आहे हें कांहीं अंशीं पूर्वी ठरलेलें आहे आणि कांहीं अंशीं भिक्षुक ठरवितात. या कामीं पैसे देणाऱ्या यजमानास खूष करण्याचा बोजा संस्कारकर्त्यावर पडतो. यजमानाला तर खूष केलें पाहिजे आणि धर्माप्रमाणें म्हणजे संस्कारकर्त्याच्या समजुतीप्रमाणें जो धर्म आहे त्याप्रमाणेंहि त्याला वागलें पाहिजे. भिक्षुकांमध्यें कांहीं बाबतींत एकमत आहे आणि त्यामुळें त्यांजवर यजमान फारसा पेंच लावूं शकत नाहीं. तरीपण आपल्या आश्रयदात्यांस खूष करण्यासाठीं आणि त्याबरोबर वेदोक्त कर्म कोणाच्या घरीं चालवावें यासंबंधानें भिक्षुकवर्गामध्यें प्रचलित असलेल्या कल्पनांचा अतिक्रम न होऊं देण्यासाठीं भिक्षुकाला पुष्कळदां दुटप्पी वर्तन करणें भाग पडतें. वेदोक्त आणि पुराणोक्त क्रियांमधील फरक गृहस्थ ब्राह्मणांमध्यें देखील आज शेंकडा पन्नासांस कळत नसेल, आणि ब्राह्मणेतर ज्ञातीमध्यें तर बहुतेकांनां कळत नाहीं. यामुळें पुष्कळदां यजमानाची समजूत करण्यासाठीं त्यास मी वेदोक्त करतों म्हणून सांगावयाचें आणि करावयाचें मात्र पुराणोक्त असें भिक्षुकांस करावेंच लागतें. येथें भिक्षुकास लबाड म्हणून दोष देऊन उपयोगी नाहीं. हा दोष भिक्षुकांचा नाहीं, तर समाजांतील नियंत्रणाभावाचा आहे. आपल्या समाजाच्या धर्मनिर्णयार्थ व संस्कारनिर्णयार्थ घटनेमध्यें जे दोष आहेत त्यांतील मुख्य येणेंप्रमाणें:—

१. एका गांवांतील निर्णयाचा दुसऱ्या गांवांतील निर्णयाशीं असलेला असंबंध.

२. वर्णनिर्णय करण्याची जबाबदारी परावलंबी लोकांवर असणें.

३. यासंबंधीं झालेल्या निवाड्यांची अप्रसिद्धि.

४. पूर्वीचे निवाडे व पुढील कार्यक्रम यांमध्यें असलेला असंबंध.

५. शेवटचा निर्णय कोणाकडून घ्यावा यासंबंधानें अनिश्चय.

६. निरनिराळ्या मतांचीं निरनिराळीं पीठें असल्यामुळें आचार्यपीठांच्या अधिकाऱ्यांमध्यें उत्पन्न होणारें द्वैत.

७. राजे व आचार्य यांच्यामध्यें एकमेकांचे निकाल एकमेकांनीं मान्य करावे याविषयींच्या ठरावांचा अभाव.

**सुधारणादिग्दर्शन.**—चातुर्वर्ण्यविषयक सुधारणा जर करावयाची असेल तर खालील गोष्टी आपणांस कराव्या लागतील.

१ धर्मविषयक शासनसंस्था निर्माण करणें.

२ वर उपस्थित केलेल्या चातुर्वर्ण्यविषयक अनेक प्रश्नांसंबंधानें समाजांत जागृति उत्पन्न करणें.

चातुर्वर्ण्यसंस्थापना करण्यासाठीं काय खटाटोप केला पाहिजे यासंबंधानें वर जे विचार व्यक्त केले ते संस्कारविषयक भेद रक्षावयाचा असतां काय काय करावें लागेल तें सांगण्याच्या दृष्टीनें केले. तथापि चातुर्वर्ण्यसंस्थापनेसाठीं वर सांगितलेला एकच मार्ग आहे असें मात्र नाहीं. चातुर्वर्ण्यसंस्थापना म्हणजे व्यक्तीस कार्यानुरूप समाजस्थान मिळण्याची व्यवस्था होय. हें समाजस्थान व्यक्त करण्यासाठीं संस्कार हा एक चिन्हविशेष आहे. कार्याच्या दृष्टीनें मनुष्याला पदवी एक आणि संस्काराच्या दृष्टीनें निराळी ही असंगति काढून टाकण्यासाठीं ज्या क्रिया ऐच्छिक तऱ्हेनें आपणांस करितां येतील त्या येणेंप्रमाणें:—

(१) सर्व समाजास सारखे म्हणजे उदाहरणार्थ ब्राह्मणाचे संस्कार करावे.

(२) वर्णविशिष्ट संस्कार अजीबात काढून टाकावे.

(३) प्रत्येक व्यक्तीचा वर्ण ठरवून त्यास त्याप्रमाणें संस्कार करावे.

या तीन प्रकारांपैकीं कोणताहि प्रकार अंमलांत आणल्यास चातुर्वर्ण्यसंस्थापना होईल.

श्रमविभागामुळें उत्पन्न होणारें चातुर्वर्ण्य राहणारच; आणि माणसें अमुक मनुष्य कोणत्या वर्णांतील आहे हें बाहेरच्या संस्कारांवरून ठरविण्याची खटपट न करितां प्रत्यक्ष कर्मांच्या अवगमनानेंच ठरवितील.

१९२० च्या सप्टेंबरमध्यें नाशिक येथें जी हिंदुधर्मपरिषद भरविली गेली त्या प्रसंगीं वाईचे वे. शा. सं. महादेव शास्त्री दिवेकर यांनीं अशी सूचना आणली होती कीं सध्यांच्या संस्कारांतील चार मुख्य संस्कार निवडून ते सर्वसामान्य करावेत. हा विचार सर्वमान्य झाल्यास संस्कारविषयक भेद नष्ट होऊन त्या बाबतींतील असमता नाहींशी होईल आणि केवळ कर्मावरच वर्णस्थान राहण्याचें ध्येय जवळ झाल्यासारखें होईल. संस्कार अजीबात बंद करणें किंवा संस्कार सामान्य करणें यांमध्यें अधिक ग्राह्य मार्ग संस्कार सामान्य करणें हा होय असें हिंदूंस स्वाभाविकपणेंच वाटेल. कां कीं, याच्या योगानें संस्कृत ग्रंथांशीं व जुन्या परंपरेशीं संबंध राहील.

---

## उपप्रकरण ६ वें.

## आर्थिक भवितव्य.

हिंदुस्थानाचें आर्थिक भवितव्य काय, याविषयीं दोन शब्द सांगणें अवश्य आहे. भविष्यकालीन गोष्टींबद्दल बोलावयाचें म्हणजे काढलेलीं अनुमानें पुष्कळ वेळां पुढें चुकीचीं ठरण्याच्या शक्यतेमुळें चूक करण्याचीच तयारी करावयाची. एखादी अनपेक्षित गोष्ट घडून येऊन आपली सर्वच अनुमानपरंपरा ढांसळून जाण्याची शक्यता असते. तथापि आपणांस केव्हांहि एक गोष्ट स्पष्टपणें दिसते ती ही कीं, अर्थशास्त्रीय नियम अबाधित असून ते आपलें कार्य करीतच असतात. मात्र केव्हां केव्हां कांहीं आगंतुक कारणांनीं त्यांचे परिणाम दृश्य होत नाहींत इतकेंच.

आतां हिंदुस्थानाच्या आर्थिक भवितव्याविषयीं बोलूं. आपला भविष्यकाल उज्ज्वल असून आपणांस आशावादी बनण्यास हरकत दिसत नाहीं. हिंदुस्थानाची यापुढें आर्थिक उन्नति होत जाणार अशी आमची खात्री आहे. ही उन्नति कोणत्या वेगानें व कोणत्या प्रमाणांत होत जाईल तें सरकार आणि जनता यांच्या उत्साहावर अवलंबून आहे. या दोन पक्षांमध्यें हिंदुस्थानचें आर्थिक सामर्थ्य वाढविणें व हिंदुसंस्कृतीचा जो उपयुक्त भाग आहे त्याचें संवर्धन करणें या बाबतींत कोणती राजनीति आचरावी यासंबंधांत एकमत झालें पाहिजे. जर या बाबतींत एकमत झालें, आणि येथील जनतेनें आपल्या देश्य संस्कृतींचें व विशेषतः आपल्या देश्य भाषांचें महत्त्व वाढविण्याच्या कामीं उत्साह आणि चिकाटी दाखविली तर आपला भविष्यकाल खात्रीनें उज्ज्वल होईल.

अलीकडे सरकारासहि जनतेसंबंधींच्या आपल्या कर्तव्याची दिवसेंदिवस जाणीव होऊं लागली आहे हें मँटेग्यूसारख्या मुत्सद्यांच्या व्याख्यानांवरून समजून येईल. येथें जालियनवालासारख्या ठिकाणीं ज्या घोडचुका झाल्या त्यामुळें शंकित होऊन अर्वाचीनकाळीं इंग्रजांची कर्तव्यनिष्ठा अधिक जागृत झाली आहे या गोष्टीकडे दुर्लक्ष करण्यांत शहाणपणा नाहीं.

हिंदुस्थानचें राष्ट्रीकरण करण्याचें ध्येय दिवसेंदिवस सुसाध्य होत जाणार. कारण तें ब्रिटिश साम्राज्याच्या धोरणाच्या विरुद्ध नाहीं. ब्रिटिशांचें साम्राज्यविषयक तत्त्वज्ञान दिवसेंदिवस जास्त शुद्ध स्वरूप घेऊं लागलें आहे.

इंग्रज जातीच्या हातांत सर्व सत्ता ठेवून निरनिराळ्या प्रदेशांचें राज्य करण्याची कल्पना नष्ट होत चालली आहे आणि प्रत्येक राष्ट्राला सहकार्याच्या नात्यानें साम्राज्याशीं जोडून त्याला आपल्या संस्कृतीची वाढ करण्यास पूर्ण अवसर देण्याची कल्पना आतां वळावत चालली आहे. ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका यांनां स्वयंशासनाचा हक्क देणें, आयर्लंडला स्वराज्य द्यावें लागण्यापर्यंत पाळी येणें, वेल्समधून इंग्लिश ख्रिस्ती संप्रदायाचें राजमान्यत्व काढून घेणें, इत्यादि गोष्टी वरील क्रियेचीं ठळक उदाहरणें आहेत. स्वयंनिर्णयाचा मंत्र आपली जादुगारी करीत आहेच. यांवरून पुढें समानत्वाच्या हक्काच्या पायावर साम्राज्याचे सर्व घटक एकमेकांस जोडले जाणार हा ध्वनि स्पष्टपणें बाहेर पडतो. अर्थात् या नवीन उत्पन्न झालेल्या वातावरणाचा फायदा हिंदुस्थानासहि मिळणार. हिंदुस्थानच्या राजनिष्ठेवर आतां सरकारचा विश्वास बसत चालला आहे. निदान महायुद्धांत केलेल्या मदतीमुळें राजनिष्ठा निःसंशय सिद्ध झाली आहे. हिंदुस्थानच्या लोकांच्या मनांत, विशेषतः महाराष्ट्रांत, बंड करून स्वतंत्र संस्थान स्थापन करण्याची जी कांहीं अंधुक आशा होती तीहि आज पूर्णपणें नष्ट झाली आहे. कांहीं वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत जी अस्वस्थतेची लाट उसळली होती तिचा परिणाम कांहीं चांगला झाला नाहीं. पण तिच्यांत ऐतिहासिक दृष्टीनें थोडेंसें तथ्य होतें. ती अस्वस्थतेची चळवळ म्हणजे, निदान दक्षिण हिंदुस्थानासंबंधीं बोलावयाचें तर, पूर्वीची स्थिति प्राप्त करून घेण्याचा तो एक शेवटचा परंतु निर्बल प्रयत्न होता. यापूर्वीचा अशा तऱ्हेचा प्रयत्न वासुदेव बळवंत फडके यानें १८७७ सालीं म्हणजे सत्तावन सालच्या बंडानंतर वीस वर्षांनीं केला होता. आमची अशी खात्री आहे कीं, महाराष्ट्रीय ब्राह्मण जे पूर्वी इतके चळवळे म्हणून प्रसिद्ध होते तेच सध्यां देशांत पसरलेली निराशावादाची लाट ओसरून गेल्यावर ब्रिटिश राजसत्तेस अविरोधक अशा मार्गांनीं सध्यांची स्थिति सुधारण्याच्या कामीं उत्साहानें पुढें येतील. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ब्रिटिश राजसत्तेस मान्यता देऊन तिच्याशीं एकनिष्ठ राहण्याइतकी लोकांच्या मनाची आतां तयारी झाली आहे, आणि या गोष्टीचा ब्रिटिश शासनतंत्रावर परिणाम झाल्यावांचून रहावयाचा नाहीं. जसजसा ब्रिटिश सरकारचा हिंदुस्थानांतील लोकांवर विश्वास बसत जाईल तसतसे ते हिंदुस्थानांतील लोकांस जास्तजास्त राजकीय हक्क देत जातील.

ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं सध्यां आपणांपुढें साम्राज्य हा एक संघ बनवावयाचें ध्येय ठेवलें आहे. परंतु हें ध्येय साध्य करण्याच्या कामीं त्यांस मुख्य अडचण हिंदुस्थानची वाटते. ही अडचण हिंदुस्थानामध्यें जेव्हां ऐक्याची भावना उत्पन्न होईल तेव्हां नाहींशी होईल. ऐक्याची भावना निरनिराळ्या प्रांतांमध्यें प्रथम वाढल्याशिवाय अखिलहिंदुस्थानविषयक ऐक्यभावना उत्पन्न होणार नाहीं. अशा तऱ्हेची भावना उत्पन्न करण्याकरितां प्रथम निरनिराळ्या प्रांतांच्या स्वायत्ततेची वाढ झाली पाहिजे. वरिष्ठ सरकारला या गोष्टीची जाणीव झाली असून निरनिराळ्या प्रांतांनां कायदेकौन्सिलें, हायकोर्टें व युनिव्हर्सिट्या देण्याचा उपक्रम झालेला आहे. निरनिराळ्या प्रांतांत ही ऐक्याची भावना भाषावार प्रांतरचना केली असतां कशी उत्पन्न होईल हें पूर्वी सांगितलेंच आहे.

हिंदुस्थानांतील जनता आतां कांहीं कांहीं प्रश्नांचा जास्त लक्ष लावून विचार करूं लागली आहे. देशाचे राजकीय विभाग सध्यां पाडलेले आहेत ते बदलावे यावद्दल जागृति झालेली स्पष्ट दिसत आहे. या चळवळीस जरी हिंदुस्थान सरकारनें विशेषशी सहानुभूति दाखविलेली नाहीं तरी त्या सरकारनें तिचा विरोधहि केलेला नाहीं. ओरिसांतील लोकांची इच्छा आपला स्वतंत्र प्रांत असावा अशी आहे. तेलगु भाषा बोलणारांचा एक स्वतंत्र प्रांत असावा म्हणून जी आंध्र लोकांनीं चळवळ चालविली आहे तीहि बरीच जोमानें वाढत आहे. मुंबई इलाखा, वऱ्हाड व मध्यप्रांत यांतील मराठी बोलणाऱ्या लोकांचा एक स्वतंत्र प्रांत असावा अशी त्यांची इच्छा आहे. आणि कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षानें हें तत्त्व आपल्या पक्षाचें कार्य म्हणून मान्य केलें आहे. गुजराथी, कानडी व सिंधी लोकांनीं आपल्या स्वतंत्र परिषदा घडवून आणल्या आहेत. या परिषदा भाषावार प्रांतरचना असावी या तत्त्वास पोषकच होतील. कॉंग्रेसकरितां जे देशविभाग पाडावयाचे ते भाषेच्या तत्त्वावर पाडावयाचें घाटत आहे. या स्वभाषागौरवाच्या चळवळीला हळू हळू जोर येईल व ती यशस्वी होईल असें दिसतें.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून वाचकांस हिंदुस्थानच्या सरकारचें आणि जनतेचें ध्येय हळू हळू कसें एकच होत चाललें आहे तें दिसून येईल. कोणत्या पद्धतीनें आपल्या देशाचें अधिक हित होईल याविषयीं दोघांच्या विचारांत हळू हळू सारखेपणा येत आहे. आमची अशी खात्री आहे कीं, सरकारनें पूर्वी कितीहि चुका केल्या असल्या तरी यापुढें त्याचें आर्थिक धोरण देशाला विघातक असून चालणार नाहीं. जसजशी सरकारच्या धोरणास देशाचें अधिक दूरचें पण कायमचें हित साध्य करून घेण्याच्या बुद्धीची जोड मिळत जाईल तसतसा त्यांच्या आर्थिक धोरणांत फरक होत जाईल. एका गोष्टीविषयीं मात्र हिंदुस्थानांतील लोकांनीं ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या योजनांस व त्यांच्या समर्थनार्थ निर्माण झालेल्या अर्थशास्त्रावरील प्रोफेसरांच्या लेखांस सर्व बल एकत्र करून विरोध केला पाहिजे. ती गोष्ट म्हटली म्हणजे सर्व साम्राज्य हें आर्थिक अवयवी होऊन साम्राज्यांतर्गत देशांनीं त्या अवयवीचे आर्थिकदृष्ट्या अवयव बनावें ही ब्रिटिश मुत्सद्द्यांची

खटपट होय. आर्थिक दृष्टीनें हिंदुस्थानासच जवळ जवळ पूर्ण अवयवी बनलें पाहिजे. सामाज्य अवयवी बनवावयाचें या ध्येयाचें व्यावहारिक स्वरूप इंग्लंडास मुख आणि हिंदुस्थानास पाद बनविणें हें होईल.

**उच्च देशी राहणीची आवश्यकता.**—आतां आपण अर्थशास्त्रांतील व्यय आणि उत्पादन या दोन महत्त्वाच्या गोष्टींच्या भवितव्याकडे वळूं. हिंदुस्थानामध्यें निरनिराळ्या मालाचा खप यापुढें कोणत्या प्रमाणावर वाढत जाईल हें आपणांस पहावयाचें आहे. सध्यां हिंदुस्थानांतील लोकांच्या गरजा कमी, व त्यामुळें समाजामध्यें मालाच्या खपाचें प्रमाण फारच अल्प आहे. यावरून येथील संस्कृति विकास पावली नाहीं असें म्हणावें लागतें. ज्या मनुष्याच्या गरजा कमी तो काम करण्यासहि कमीच उत्सुक असतो. गरजा कमी असल्यामुळें एकंदर कामहि कमीच प्रमाणावर असतें. ज्याला तुलनात्मक अर्थशास्त्राचा अभ्यास करावयाचा आहे त्याला मनुष्यांच्या गरजा व देशांत होणाऱ्या एकंदर मालाचा खप या दोन गोष्टी फार महत्त्वाच्या आहेत. हिंदुस्थानांतील लोकांच्या गरजा यूरोपीय लोकांच्या गरजांपेक्षां कमी असण्याचें एक कारण या देशांतील उष्ण हवा होय. तथापि हिंदुस्थानांतील हवेच्या उष्णमानाखेरीज दुसरीं अनेक कारणें या देशांतील मनुष्यांच्या गरजा वाढविण्याच्या कामीं प्रतिबंधक होत असलेलीं दिसून येतात. बंगालसारख्या प्रांतांत केवळ देश्य लोकांचा असा उच्च प्रकारचा आयुष्यक्रमच नाहीं. हिंदू लोकांची अशी जी उच्च प्रकारची राहणी होती ती बऱ्याच वर्षांपूर्वी नष्ट झाली आणि त्यानंतर महंमदी तऱ्हेची जी उच्च राहणी म्हणून कांहीं दिवस प्रचारांत होती तीहि हळू हळू दिसेनाशी झाली. कलकत्ता शहराची सध्यांची संस्कृति आपणांस हिंदूंच्या पूर्वीच्या ग्रामसंस्कृतीचें व इंग्रजांच्या नगरसंस्कृतीचें मिश्रण होऊन बनलेली दिसते. येथील म्हणजे देश्य लोकांची म्हणतां येईल अशी उच्च प्रकारची राहणी तेथें आढळत नाहीं. यामुळें एखाद्या मनुष्यानें जरा छानछोकीनें रहावयाचें म्हटल्यास त्याला इंग्रजांचें अनुकरण करावें लागतें. इंग्रजांच्या राहणीचें त्यांच्या अभिरुचीस अनुसरून अनुकरण करणें फार कठिण आहे, कारण त्यांची राहणी सर्वस्वीं विदेशीय आहे. कांहीं इंग्लंडांत जाऊन आलेले थोडेसे हिंदू जरी हें इंग्रजांचें अनुकरण करूं शकले तरी त्यांना ती राहणी सार्वत्रिक करणें अशक्य आहे. केव्हां केव्हां तर आपणांस या अनुकरणप्रवृत्तीमुळें फारच हास्यकारक परिणाम झालेले दिसून येतात. कारण अनुकरण हें केव्हांहि बिनचूक होत नाहीं. त्यामुळें अनेक प्रसंगीं असें अनुकरण करणारा मनुष्य विदेशीयांच्या व स्वदेशीयांच्या हास्यास मात्र पात्र होतो. आपल्या देशी मेमसाब ही चीज खरोखरच यूरोपीय लोकांस फार अजब वाटत असली पाहिजे. कलकत्त्यामध्यें एक खिस्ती डाक्टरीणबाई आमच्या अवलोकनांत आली. तिच्या पोषाखाकडे पाहून अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं दक्षिणेकडील संस्थानांतील नीग्रो स्वयंपाकीण व धोबीण यांची आठवण झाली. फरक एवढाच कीं, नीग्रो स्वयंपाकिणीचा पोषाख या डाक्टरणीपेक्षां जास्त नीटनेटका असतो.

अशा रीतीनें केवळ देश्य अशा उच्च राहणीच्या अभावाचा परिणाम असा होतो कीं, कांहीं कालपर्यंत समाजाची प्रगति बंद होते; एवढेंच नव्हे तर, पूर्वीच्या ज्या उच्च राहणीबद्दलच्या कल्पना असतात त्या देखील दूषित होऊं लागतात. परकीयांचें अनुकरण हास्यास्पद होत असलें तरी जित लोकांस त्यापासून कांहीं तरी फायदा होतो. एखादा मनुष्य जर कोट, पाटलोण, हॅट अशा तऱ्हेचा पोषाख करील तर तो जरी यूरोपियन समजला जाणार नाहीं तरी निदान हाफकास्ट समजला जाईल आणि रेल्वे वगैरे ठिकाणीं अडाणी लोकांचें वर्तन प्रतिष्ठित हिंदु मनुष्यापेक्षां हाफकास्टशीं जास्त अदबीचें व नम्रतेचें असतें. हिंदु संस्थानिक महाराजापेक्षां त्याच्या यूरोपीय स्वयंपाक्याला अथवा मोटारहांक्याला जास्त आदरानें वागविल्याचीं व त्याचवेळीं प्रत्यक्ष महाराजाकडे दुर्लक्ष केल्याचीं उदाहरणेंहि घडलेलीं आहेत. आतां महाराजे शहाणपणानें या गोष्टींचा फारसा बोभाटा करीत नाहींत हें निराळें. जोंपर्यंत परकीय तऱ्हेच्या पोषाखापासून प्रत्यक्ष फायदे दिसत आहेत तोंपर्यंत देशी पोषाखाकडे दुर्लक्ष होणारच व त्याचें स्वरूपहि थोडेंफार पालटणारच.

जरी या ठिकाणीं वरील गोष्टींना कोणते उपाय योजले पाहिजेत याचें सविस्तर विवेचन करण्यास सवड नाहीं तरी कांहीं गोष्टी येथें सांगणें अवश्य आहे. वरील प्रकारची स्थिति येथें उत्पन्न होण्याचें मुख्य कारण म्हणजे येथें इंग्रजांच्या सत्तेचें धोरण आजपर्यंत इंग्रज जातीचें वर्चस्व हिंदुस्थानांत कायम ठेवून हिंदुस्थानचें राज्य केवळ लष्करी सामर्थ्यावर चालवावयाचें असें जें होतें त्याचा राजनीतीवर आणि सामाजिक आयुष्यक्रमावर परिणाम होत होता, हें होय. वरील धोरणामुळें ब्रिटिश जनतेमध्यें इंग्रजी राहणीला विशेष चिकटून राहण्याची वृत्ति उत्पन्न झाली. कांहीं अँग्लोइंडियनांची अशी कल्पना होती कीं येथें ब्रिटिश संस्कृतीचा प्रसार करून सर्व हिंदु संस्कृतीचें स्वरूप पालटून टाकून तिला ब्रिटिश संस्कृतीचें वळण द्यावें. परंतु या सर्व कल्पना आतां नष्ट होत चालल्या आहेत. आणि हिंदुस्थानची प्रगति हिंदी मनोवृत्तीच्या धोरणानेंच घडवून आणण्याची इच्छा उत्पन्न होत आहे.

**या बाबतींत लोकांचें व सरकारचें कर्तव्य.**—परकीय सांस्कृतिक वर्चस्वाचे दोष काढून टाकण्यास एक उपाय म्हटला म्हणजे त्यांचें मूळ काढून टाकणें हा होय. ज्या गोष्टी उच्च वर्गांत होतात त्याच खालच्या वर्गांतहि घडून येतात असा नियम सर्व समाजांमध्यें दिसून येतो.

तेव्हां ज्यांनां सुधारणा घडवून आणावयाची असेल त्यांनीं उच्च वर्गांत म्हणजे सामाजिक परंपरेमध्यें ज्यांनां श्रेष्ठ स्थान आहे अशा लोकांत सुधारणा केली पाहिजे. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांतील लोक दिल्लीस जाऊन तेथें उच्च व सर्वमान्य राहणीचा असा एखादा शिष्ट वर्ग तयार होईल असा काल अद्याप यावयाचा आहे. हिंदुस्थानच्या राष्ट्रीय सभेला सर्वसामान्य आचार व विचारपरंपरा प्रसृत करणें हें आपलें एक कर्तव्य आहे अशी जाणीव अद्यापि झालेली नाहीं. राष्ट्रीयसभा ही थोड्या कालापूर्वींपर्यंत केवळ ह्यूम साहेबाच्या उपासकवर्गानें भरलेली होती. हे लोक कांहीं स्वतंत्र विचार करून देशाची सुधारणा करण्याचे नवीन मार्ग शोधून काढतील हें शक्य नव्हतें. ते फक्त पूर्वीं होऊन गेलेल्या (त्यांच्या दृष्टीनें) महात्म्यांच्या पावलांवर पावलें टाकून जात होते. पुढें कांहीं नवीन दमाचे लोक काँग्रेसमध्यें शिरूं लागले त्या वेळीं तींत दुफळी झाली. या दुफळीमुळें १९१२च्या काँग्रेसला इतकी थोडी मंडळी आली होती कीं त्या वेळीं काँग्रेस पुढें चालेल किंवा नाहीं अशी शंका वाटूं लागली होती. सध्यां राष्ट्रीयसभेस मोठ्या प्रमाणावर लोकशिक्षणाची चळवळ करणाऱ्या संस्थेचें स्वरूप येतें कीं नाहीं हा प्रश्न एकदोन वर्षांत सुटेलसें दिसतें. तरी पण सर्व राष्ट्राला सामान्य अशी एक संस्कृति उत्पन्न करण्याचें काम केवळ लोकांच्या सहकार्याच्या भावनेवर विसंबून चालावयाचें नाहीं असें वाटतें. हें कार्य घडवून आणण्याचें काम करावयास आपण सरकारचाहि उपयोग केला पाहिजे, किंवा सरकार हें यंत्र लावलें पाहिजे.

देशांत उच्च प्रकारची देश्य रहाणी उत्पन्न करणें हें काम सरकारला करतां येणें शक्य आहे काय? असा प्रश्न विचारल्यास सरकारला हें काम करणें शक्य आहे असें उत्तर आपणांस देतां येईल.

या देशांत येणाऱ्या यूरोपीय अधिकाऱ्यांनीं लोकांशीं ज्या ज्या प्रसंगीं संबंध येईल त्या त्या प्रसंगीं हिंदी तऱ्हेचा पोषाख वापरावा अशी सरकारनें त्यांस शिफारस करावी. व्हॉइसराय, गव्हर्नर, वगैरे मुख्य अधिकाऱ्यांनीं हिंदी तऱ्हेचा पोषाख वापरला पाहिजे. त्यांनीं अशा तऱ्हेचा पोषाख वापरावा असें त्यांस सांगण्याचा हिंदी जनतेचा अधिकार आहे. राज्यकर्ते परकीय जातीचे आहेत या गोष्टीस इलाज नाहीं, परंतु सरकारी अधिकाऱ्यांनीं शक्य तितकें कमी परकीय दिसलें पाहिजे. त्यांनीं आपण इंग्रज आहों ही गोष्ट विसरली पाहिजे आणि आपण हिंदी आहों—आंग्लहिंदी सुद्धां नव्हे—अशी भावना ठेवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सरकारी अधिकारी जेव्हां आपापल्या घरीं असतील तेव्हां त्यांनीं [illegible]सरावाचा पोषाख वापरूं नये असें आमचें म्हणणें [illegible]नीं लोकांमध्यें येतांना तरी निदान हिंदी पोषाख वापरावा. इंग्रज लोकांची—पुरुष व स्त्रिया दोघांचीहि पोषाखाच्या बाबतींतील अभिरुचि सामान्यतः चांगली असते आणि त्यांनीं जर हिंदी पोषाख करावयाचें मनांत आणलें तर ते चांगला पोषाख करतील यांत शंका नाहीं. इंग्रज लोकांनां हिंदी पोषाख आवडत नाहीं या गोष्टीवर आमचा बिलकुल विश्वास नाहीं. साडी नेसणें ज्यांनां खरोखर मनापासून आवडतें अशा कितीतरी इंग्रज स्त्रिया आढळून येतात. इंग्रज स्त्रियांनीं हिंदी पोषाख वापरला तर त्यांच्या पोषाखाविषयींच्या सभ्यतेच्या कल्पनांस धक्का पोहोंचेल असें आम्हांस वाटत नाहीं.

सरकारी अधिकाऱ्यांनीं अमुकच एका विशिष्ट जातीचा पोषाख करावा असें आमचें म्हणणें नाहीं. ह्या बाबतींत त्यांनीं आपल्या आवडीप्रमाणें पोषाख पसंत करावा. व्हॉइसरायनीं निदान हिंदी लोकांत मिसळतांनां कोणत्यातरी पद्धतीचें हिंदी पागोटें घातलें पाहिजे. व्हॉइसरायच्या या कृत्यामुळें कोणत्याहि जातीस कमीपणा येतो असा अर्थ मुळींच होऊं शकत नाहीं. असा पोषाख करणें म्हणजे उलट इंग्रजांची जी उदारमतवादाची परंपरा आहे तिला अनुसरण्यासारखें आहे. आमचे बादशहा जेव्हां रशियामध्यें जातात तेव्हां ते एखाद्या कोसॅकसारखा पोषाख करितात. आपले बादशहा जेव्हां गेल्या संस्मरणीय दिल्ली दरबारला आले होते त्या वेळीं त्यांचा पंजाबी शीख सैनिकाच्या वेषांत घेतलेला फोटो हिंदुस्थानांत आपणांस सर्वत्र आढळतो. परस्परांच्या चालीरीती व पोषाख यांबद्दल आदर दाखविणें हें खरें विश्वबंधुत्व होय. आपण ज्याप्रमाणें इंग्लडांत गेलों म्हणजे त्यांच्यासारखा पोषाख वगैरे करतों, त्याप्रमाणें इंग्रजांनीं या देशांत आल्याबरोबर आपणांसारखें झालें पाहिजे.

**सरकारनें निमकास जागलें पाहिजे.**—साम्राज्यवाद भारतीयांनीं घ्यावा असें जर इंग्रजांनां वाटत असेल तर खुद्द इंग्रजांनीं भारतीयांच्या राष्ट्रधर्माचे आणि राष्ट्रीय भावनांचे पुरस्कर्ते बनलें पाहिजे. ते आमचें निमक खात आहेत. अर्थात् त्यांनीं आमच्या निमकास जागलें पाहिजे. भारतीयांच्या हितसंबंधांची परकीय राष्ट्रांशीं गुंतागुंत होईल त्या वेळेस भारतीयांचा पक्ष इंग्रजांनीं घेतला पाहिजे. पण एवढ्यानेंच इंग्रजांचें कर्तव्य संपावयाचें नाहीं. देशसंस्कृतीच्या संवर्धनाचें पुरस्कर्तृत्वहि त्यांनीं केलें पाहिजे. इकडे देशी भाषांस गळफांस लावावयाचा, देशी वाङ्मयास खची करावयाचें, त्यास पोषक द्रव्यें मुळींच मिळूं द्यावयाचीं नाहींत, अर्थात् देशी भाषा दुर्बल करावयाची आणि इकडे 'ओरिएंटल रिसर्च' या नांवानें देशी भाषांतील देशासंबंधाचें ज्ञान इंग्रजी भाषेंत आणून तिला जोरदार करावयाचें व या कृतीबरोवर आम्ही देश्यसंस्कृतीचे उद्धारक असा टेंभा मिरवावयाचा ही कृति अट्टल लुच्चांसच फक्त योग्य आहे. देशी भाषांसंबंधीं सध्यां चालू असलेल्या

आपल्या धोरणामुळें सरकारानें आपलें वर्तन अत्यंत संशयास्पद करून घेतलें आहे. झाल्या चुका त्या झाल्या. आतां तरी निदान देशी भाषांच्या जोपासनेकडे सरकारनें लक्ष दिलें पाहिजे.

शास्ते म्हणजे राष्ट्राचे पुढारी होत. माणसें शासनसंस्थेखालीं राहतात आणि शासनसंस्थेच्या अधिकाऱ्यांचें अनुकरण पत्करतात तें अशाकरितां कीं समाजाची प्रगति व्हावी आणि या प्रगतीच्या मार्गांवर शास्त्यांनीं त्यांस पुढें पुढें न्यावें. ज्यांस आपण सामान्यतः पुढारी म्हणतों ते सर्व राष्ट्राचे पुढारी नसून एखाद्या विशिष्ट मताचे, चळवळीचे, किंवा वर्गाचे पुढारी असतात. परंतु सरकार हें सर्व राष्ट्राचें पुढारी असतें. सरकार राष्ट्राचें पुढारी असण्याचें हें ध्येय सर्व राष्ट्रांत स्वीकृत झालें आहे. हिंदुस्थानसरकार या ध्येयाच्या स्वीकाराच्या दृष्टीनें बरेंच मागसलेलें आहे, हें येथें सांगितलें पाहिजे.

**शास्ते पुढारी झाल्यानें होणारे हितकर परिणाम.**—वर सांगितलेल्या गोष्टींवरून हिंदुस्थानांत होणाऱ्या निरनिराळ्या मालाच्या खपाच्या बाबतींत क्रांति घडवून आणण्याकरितां व लोकांच्या अभिरुचीस चांगलें वळण देण्याकरितां आणि त्यांनीं आपली राहणी सुधारून उच्च प्रकारची करावी यासाठीं सरकारला भारतीयत्वाचें पुट कसें चढविलें पाहिजे हें लक्षांत येईल. जर इंग्रज लोकांनीं हिंदुस्थानांतीलच वस्तू घेऊन एक नवीन हिंदी पोषाखाची पद्धति रूढ केली तर तिचा परिणाम लोकांमध्यें सामान्य अशी पोषाखाची पद्धति उत्पन्न करण्याच्या कामीं होईल. अशा पद्धतीचा दोन तऱ्हेनें परिणाम होईल. लोकांमधील अनुकरणाची इच्छा आपलें कार्य करील आणि यामुळें हा प्रतिष्ठित समजला जाणारा पोषाख स्वीकारण्याची सर्व हिंदुस्थानांत प्रवृत्ति होईल. शिवाय हा पोषाख लोकांच्या परंपरेला सोडून नसून उलट तींत सुधारणा होऊन बनलेला असल्यामुळें त्यांस तो अप्रिय होणार नाहीं. दुसरें, ब्रिटिश लोकांस निरनिराळ्या प्रांतांतील पोषाख करण्यास तितकें अवघड वाटणार नाहीं; त्यांनां आज मराठी, उद्यां बंगाली तर परवां गुजराथी पोषाख करतां येईल, कारण त्यांच्या मनांत कोणत्याच विशिष्ट पोषाखाबद्दल विशेष आत्मीयभावना उत्पन्न झालेली नसणार; आणि याचा परिणाम असा होईल कीं, आज निरनिराळ्या प्रांतांत जे निरनिराळ्या जातींचे निरनिराळे पोषाख आहेत ते सर्वच कांहीं दिवसांनीं राष्ट्रीय पोषाख बनतील. आज जर एखाद्या महाराष्ट्रीय अथवा बंगाली गृहस्थानें आपला स्वतःचा पोषाख टाकून देण्याचें मनांत आणलें तर तो इंग्रजी पोषाखाचाच स्वीकार करतो. परंतु वर दाखविल्याप्रमाणें स्थिति पालटली असतां एका प्रांतांतील मनुष्यास दुसऱ्या कोणत्याहि प्रांतांतील पोषाख स्वीकारणें जड वाटणार नाहीं. यामुळें हिंदुस्थानांतील पोषाखाच्या घाटणींत वरचेवर फरक होत जाईल व त्यांत नवीन नवीन टुमी निघत जातील.

यावरोबरच आणखीहि एक फायदा होईल. जर हिंदुस्थानांत आलेल्या इंग्रज लोकांनीं हिंदी पोषाखाचा स्वीकार केला तर इंग्रजांखेरीज इतर यूरोपीय लोकहि तसेंच करतील. पुष्कळ अमेरिकन व यूरोपियन आपल्याकडे देश पाहण्याच्या हेतूनें आले म्हणजे त्यांनां आपल्या इकडील पोषाख विकत घ्यावे असें वाटूं लागेल.

सध्यांचा ॲंग्लोइंडियन लोकांचा पोषाख सौंदर्याच्या दृष्टीनें चांगला नाहीं. हिंदुस्थानांत राहणाऱ्या इंग्रज स्त्रियांच्या पोषाखांतहि फरक होणें जरूर आहे. यूरोपियन लोकांसहि पुष्कळ वेळां आपल्या पोषाखांत कांहींतरी फरक केला पाहिजे असें वाटूं लागतें. परंतु व्यक्तिशः कोणताहि सामान्य इंग्रज देशी पोषाख करूं शकत नाहीं किंवा पोषाखाची एखादी नवीन तऱ्हा शोधून काढूं शकत नाहीं. पोषाखांतील कोणत्याहि नवीन धाटणीचा उगम नेहमीं उच्च वर्गापासूनच होतो. तेव्हां वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांनींच हें काम हातीं घेतलें पाहिजे. या गोष्टीचें आर्थिक, सामाजिक व राजकीय दृष्टींनीं फार महत्त्व आहे.

या देशांत राहणाऱ्या यूरोपीय समाजापुढें या आमच्या त्यांजसंबंधाच्या अपेक्षा स्पष्टपणें मांडण्याचा परिणाम काय होतो हें आपणांस पाहिलें पाहिजे. हिंदू लोकांनीं इंग्रजांस आपल्या अवास्तव कल्पना बाजूस ठेवून येथील परिस्थितीस अनुकूल असा जरा सुधारलेला पोषाख करण्याची सल्ला दिली पाहिजे.

हिंदुस्थानांतील इंग्रजांचें स्वरूप थोडेंसें हिंदी बनलें म्हणजे परकीय रुचिवैचित्र्यामुळें उत्पन्न होणारे दोष नाहींसे होतील व हिंदुस्थानांत एकरूपता येण्यास मदत होईल. यामुळें परस्परांतील स्पर्धेस चांगलें वळण लागेल. हे सर्व बदल घडून आले म्हणजे त्यांचा परिणाम राष्ट्रीय आर्थिक स्थितीवर झाल्यावांचून रहावयाचा नाहीं.

**जमिनीचें वैभव म्हणजे लोकांचें वैभव नव्हे.**—आतां आपण उत्पादनांतील निरनिराळ्या बाबींकडे वळूं. उत्पादनासाठीं देशांतील निरनिराळ्या भौतिक संपत्तीचा आपणांस उपयोग करून घ्यावयाचा आहे. हा उपयोग करण्याचें काम भारतीय लोकांनीं केलें पाहिजे व सरकारनें त्यांस मदत केली पाहिजे. हिंदुस्थानची सुवत्ता म्हणजे या देशांत राहणाऱ्या परकीय लोकांची श्रीमंती नव्हे तर देशांतील लोकांचीच श्रीमंती होय. ती वाढली पाहिजे. केवळ हिंदुस्थानाची वृद्धि आपणांस नको आहे. केवळ देशाचें म्हणजे जमिनीचें वैभव वाढविणें म्हणजे देशाभिमान अशी जो देशाभिमानाची व्याख्या करील त्याला देशांतील लोकांस मारून टाकून तो जोरदार वर्गांतहि वसवावा असा पक्ष घ्यावयासहि हरकत नाहींसून येतो.

आपणांस केवळ जमिनीचा अभिमान नको आहे. हिंदुस्थानच्या व्यापारासंबंधींचे आंकडे पाहिले असतां असें दिसून येईल कीं, हिंदुस्थानचा व्यापार झपाट्यानें वाढत आहे, पण त्यावरून हिंदू लोक श्रीमंत होत आहेत असें मात्र सिद्ध होत नाहीं. आपणांला हिंदुस्थानच्या द्रव्योत्पादक भौतिक शक्ती शिस्तवार उपयोगिल्या जात आहेत किंवा नाहींत, अथवा हिंदुस्थानच्या भूमीवर कांहीं श्रीमंतीचीं चिन्हें दिसत आहेत किंवा नाहींत याच गोष्टीची केवळ काळजी बाळगून चालणार नाहीं. कर वसूल करणारें व तो पैसा भक्षून चैनीनें रहाणारें सरकारच काय तें अशी दृष्टि ठेवील आणि संपादणी करील कीं, देशाची भरभराट होत आहे. आपणांला या देशांतील लोकांनां कांहीं फायदा होत आहे कीं नाहीं याचा प्रामुख्यानें विचार केला पाहिजे. भौतिक शक्तींचा उपयोग करून घेतला पाहिजे ही गोष्ट आम्हांस कबूल आहे, पण तें काम आमच्या देशी लोकांनीं केलें पाहिजे. हें काम देशांत शिक्षण व ज्ञान यांची वाढ झाल्याशिवाय नीटपणें होणार नाहीं व देशी भाषांची जोपासना करण्याचा जोंपर्यंत प्रयत्न झाला नाहीं तोंपर्यंत शिक्षण आणि ज्ञान यांची वाढ चांगलीशी कशी होणार ?

**हिंदुस्थानांतील भांडवल.**—हिंदुस्थानांतील भांडवल आतां पूर्वीप्रमाणें लपून न राहतां नवीन नवीन धंद्यांत गुंतूं लागलें आहे. भांडवलवाल्यांमध्यें परस्परांशीं सहकार्य करण्याची व मोठमोठे धंदे उभारण्याची प्रवृत्ति दिसूं लागली आहे. नवीन नवीन खाणीचें काम करणाऱ्या कंपन्या, बँका, विमा उतरणाऱ्या वगैरे कंपन्या स्थापन होत आहेत. यांपैकीं कांहीं कंपन्यांची स्थिति आशाजनक नाहीं ही गोष्ट खरी आहे. परवां निघालेल्या बँकांच्या दिवाळ्यांवरून कांहीं बँका सट्टेवाज व लवाड लोकांनीं चालविल्या होत्या ही गोष्ट दिसून येते. कदाचित् कांहीं नवीन विमाकंपन्याहि बुडाल्याचें आपणांस ऐकूं येईल. परंतु अशा तऱ्हेची कोणतीहि नवीन गोष्ट सुरूं होण्याच्या वेळीं कांहीं चांगल्या लोकांबरोबर कांहीं धूर्त लोकांनीं आपला तळीराम गार करून घ्यावा हें साहजिकच आहे. हिंदुस्थानांतील भांडवल दडून वसतें अशाबद्दल फारच ओरड करण्यांत येते. यासंबंधांत हें कबूल केलें पाहिजे कीं, हिंदुस्थानांतील धनिक वर्गानें नवीन कारखान्यांमध्यें आपला पैसा एकदम गुंतविला नाहीं ही गोष्ट खरी आहे. परंतु त्यांनां तसें कचरण्यास कांहीं सबळ कारणें होतीं हें विसरतां कामा नये. रेल्वेसंबंधींच्या चुकीच्या धोरणाचाहि हिंदुस्थानांतील उद्योगधंद्यांच्या प्रगतीवर बराच विघातक परिणाम झाला आहे. जर प्रथमतः हिंदुस्थानांतील शहराशहरांच्या दरम्यान रेल्वे बांधली असती तर या शहरांचा एकमेकांत व्यापार वाढून त्यांच्या गरजांनुरूप उत्पादनक्षेत्रें निश्चित झालीं ... लहान लहान धंदे करणारे मोठ्या प्रमाणावर ... लागले असते, आणि हातांनीं काम करणाऱ्या वर्गांतूनच कारखानदार वर्ग निघाला असता. परंतु हिंदुस्थानाचे निरनिराळे प्रांत एकमेकांस जोडण्यापूर्वीं ते परभारें परकीय देशांशीं जोडले गेले. याप्रमाणें हिंदुस्थान आम्हांकरितां मोकळा केला न जातां परकीयांकरितांच मोकळा केला गेल्यामुळें येथील उत्पादक धंदे पार बुडाले. सामान्यतः कारखानदारांचा वर्ग धंदा करणाऱ्या लोकांमधून उत्पन्न झाला पाहिजे. परंतु हिंदुस्थानामध्यें या साहजिक प्रवृत्तीची वाढ होऊं न दिल्यामुळें असा वर्ग जो उत्पन्न व्हावयाचा तो व्यापार, शेतकी किंवा उच्च धंदे करणाऱ्या अथवा सावकारी करून जबर व्याजानें पैसे मिळविणाऱ्या धनिक लोकांमधूनच निघत आहे. हे सर्व वर्ग कोणताहि कारखाना चालविण्याच्या कामीं केव्हांहि पूर्णपणें वाकवगार नसतात. असल्या भांडवलवाल्यांनां कारखाने चालविण्याकरितां जबर पगार देऊन यूरोपमधून व्यवस्थापक आणावे लागतात व सर्वस्वीं त्यांच्यावर अवलंबून राहवें लागतें. अशा तऱ्हेचा कारखाना चालवावयाचा झाल्यास तो फारच मोठ्या प्रमाणावर उभारावा लागतो. अशा तऱ्हेचे मोठमोठाले कारखाने आपल्या देशांत थोडेफार आहेत. आपणांमध्यें वाण आहे ती लहान लहान कारखान्यांची आहे. असल्या कारखान्यांची संख्या फारच थोडी आहे व जे थोडे लहान कारखाने आहेत ते फारच अल्प प्रमाणावर असून यांत्रिक शक्तीचा उपयोग त्यांत करीत नाहींत.

हिंदुस्थानांतील रोकडीचें मोठ्या प्रमाणावर एकीकरण होणें व मोठ्या एकत्र झालेल्या रकमांनीं मोठमोठे व्यवहार होणें या गोष्टी आतां झाल्या पाहिजेत. मुंबई, मद्रास व बंगाल या तीन बँकांचें एकीकरण होऊन आतां इंपीरियल बँक स्थापन झाली आहे. या मोठ्या पेढीच्या ताब्यांत हिंदुस्थान सरकारची रोकड रहाणार आणि या संस्थेच्या पेढ्या सर्व राष्ट्रभर पसरणार. आतां प्रश्न एवढाच कीं, या मोठ्या बँकांकडून यूरोपियन व्यापाऱ्यांस जसें उत्तेजन मिळतें तसें हिंदू व्यापाऱ्यांस मिळेल कीं नाहीं ? या बँका आपल्या रकमांचा उपयोग व्यापाऱ्यांस करूं देतांना बराच पंक्तिप्रपंच करतात अशी ओरड चोहोंकडे ऐकूं येते. पुष्कळ नवीन बँका याच कारणामुळें निघाल्या आहेत. यूरोपियन कंत्राटदारांनां रकमा सहज मिळतात व हिंदुस्थानी कंत्राटदारांस मिळत नाहींत असेंहि ऐकण्यांत येतें. याचें कारण केवळ हिंदुस्थानी लोकांस दिलेल्या पैशाला अधिक धोका आहे हें आहे कीं केवळ पंक्तिप्रपंच आहे याचें पृथक्करण करणें कठिण आहे. ओळख असणें, विश्वास वाटणें या गोष्टींची जातिविषयक प्रश्नाशीं बरीच गुंतागुंत झालेली असते. ज्याशीं अधिक परिचय त्याविषयीं विश्वास अधिक वाटतो, आणि ज्याचा त्याचा परिचय स्वजातींतच असतो. या व अशासारख्या कारणांमुळें जोंपर्यंत पैशावर सत्ता यूरोपियन अधिकाऱ्यांची राहील तोंपर्यंत त्यांजकडून हिंदूंस कमी मदत आणि पाश्चात्त्यांस

अधिक मदत असें-अंतःकरण कितीहि शुद्ध ठेवलें तरी-व्हावयाचेंच. यासाठीं बँकांतील चालक मंडळींत आपला हात अधिकाधिक शिरेल असें लोकांनीं केलें पाहिजे.

**हिंदुस्थानचा मजूर.**-भांडवलाची चर्चा सोडून आतां मजुरांकडे वळूं. हिंदुस्थानांतील मजूर फारच अडाणी असतात. घरकाम करणाऱ्या इंग्रज आणि हिंदू नोकरांमध्येंहि आपणांस अनेक वेळां किती तरी अंतर दिसून येतें. हिंदुस्थानांतील मजुरी स्वस्त असूनहि तिचा मजुरांच्या अडाणीपणामुळें आपणांस पुष्कळ प्रसंगीं कांहीं उपयोग होत नाहीं. शिक्षणाची वाढ झाली म्हणजे आपल्या मजूरवर्गाची सुधारणा होईल अशी आशा आहे. मजुराला लिहितां वाचतां येत असलें म्हणजे बराच फायदा होतो. परंतु याहीपेक्षां त्याला चांगल्या शिस्तवार मनुष्याकडून जें शिक्षण मिळतें त्याचा उपयोग अनेक पटींनीं अधिक आहे.

आमच्यामध्यें आमच्या अडाणी लोकांची निरक्षरता घालविण्याची इच्छा वाढत आहे. आपापल्या जातिबांधवांमध्यें शिक्षणाचा प्रसार करण्याची तजवीज पुष्कळ जातींतून होत आहे. नामदार गोखल्यांनीं कौन्सिलामध्यें या बाबतींत पुष्कळ खटपट करून स्थानिक संस्थांस आपल्या हद्दींतील निरक्षरता घालविण्याची परवानगी मिळवून दिली. याप्रमाणें मजूरवर्गाला लिहिणें वाचणें शिकविण्यासंबंधानें थोडीशी व्यवस्था झालेली आहे. परंतु या मजुरवर्गास शिस्त लावण्याच्या बाबतींत आपणांस अजूनहि परकीयांवरच अवलंबून राहिलें पाहिजे.

**हिंदुस्थानचा शेतकरी.**—आतां आपण हिंदु समाजाच्या आर्थिक अंगांपैकीं औद्योगिक अंग सोडून त्याच्या जीवनास अत्यंत महत्त्वाचें अंग जें शेतकी त्याकडे वळूं. सरकारनें शेतकऱ्यांकरितां करावयाच्या गोष्टींपैकीं पुष्कळच गोष्टी अद्याप केलेल्या नाहींत. सरकारास आपल्या कर्तव्याची जाणीव होऊं लागली आहे असे उद्गार ऐकूं येतात, परंतु त्या उद्गारांनुरूप कृति मात्र दिसत नाहीं. आपणांस येथें हें नमूद करून ठेवलें पाहिजे कीं, हिंदी शेतकऱ्यांवर जो उत्कट पुराणप्रियत्वाचा आरोप करण्यांत येतो तो वास्तविक खरा नाहीं. आपणांस खेड्यांतून हिंदी शेतकऱ्यांजवळ पेंढ्या बांधण्याचें यंत्र अथवा वाफेनें चालणारा नांगर किंवा मळणी करण्याचें अवजड यंत्र दृष्टीस पडत नाहीं एवढ्यावरून हिंदी शेतकरी वर्ग पुराणप्रिय आहे असें आपणांस म्हणतां यावयाचें नाहीं. एवढेंच म्हणतां येईल कीं, अमेरिकेमधील मिझूरींतील शेतकऱ्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतील शेतकरी देखील संशयी आहे. त्याला प्रत्यक्ष प्रमाण पाहिजे असतें. हिंदी शेतकरी नवीन गोष्टींचा स्वीकार किती खुषीनें करतो याबद्दल थोडीं उदाहरणें दाखविलीं असतां त्याच्या पुराणप्रियत्वाबद्दलचीं सर्व विधानें खोटीं ठरतील. बटाटा, रताळीं, भुइमूग, मका, तंबाखू, मिरच्या इत्यादि पिकें घ्या. हीं सर्व पिकें परकीय असून त्यांचा देशाच्या कोनाकोपऱ्यांतूनहि प्रवेश झाला आहे. वऱ्हाड प्रांतांत इतर पिकांची जागा कापूस पटकावीत आहे. बंगाल प्रांतांत वरवर चवकशी केल्यासहि आपणांस असें दिसून येईल कीं इतर पिकांच्या ऐवजीं तागाच्या पिकाची वाढ होत आहे. या गोष्टींवरून हिंदी शेतकरी नव्या उपयुक्त सुधारणा घेण्यास उत्सुक असतो हें दिसून येईल. हिंदुस्थानांतील शेतकरी आणि इंग्लंड अथवा अमेरिका देशांतील लहान शेतकरी यांच्यांत विशेषसा फरक दिसत नाहीं. अमेरिकेंतील शेतकऱ्याला जरी वर्तमानपत्रें वाचतां येत असलीं तरी त्यांचा उपयोग त्याला स्वतःचें उत्पन्न वाढविण्याच्या कामीं मुळींच करून घेतां येत नाहीं. या विधानास अर्थातच व्यापारी वर्गांतून जे लोक शेतकीच्या धंद्यांत शिरले असतील अथवा जे पदवीधर शेतकीमध्येंच आयुष्य घालविण्याच्या इरायानें त्या धंद्यांत पडले असतील ते अपवाद आहेत. सुशिक्षित शेतकऱ्यांचा जो एकंदर शेतकरी वर्गावर परिणाम होतो तो फार महत्त्वाचा असतो. अशा तऱ्हेचा परिणाम आपणांस हिंदुस्थानांत दिसत नाहीं. अमेरिकेमध्यें शाळा आणि कॉलेजें उन्हाळ्यांत बंद असतात व तो काळ शेतकऱ्यास फार महत्त्वाचा असतो. शाळा व कॉलेजें हिंवाळ्यांत उघडीं असतात आणि तो काळ शेतकऱ्यांना मंदीचा असतो. यामुळें जो शेतकऱ्याचा मुलगा शहरामध्यें अथवा युनिव्हर्सिटीमध्यें शाळेचें अथवा कॉलेजचें शिक्षण घेण्यास जातो त्याला आपलें शेतकीपासून होणारें उत्पन्न बुडविण्याचें कारण नसतें; तसेंच त्याला शेतकीचा अनुभव आणि स्वतः हातांनीं परिश्रम करण्याची संधि यांसहि मुकावें लागत नाहीं.

**हिंदुस्थानचा कारागीर.**—आतां आपण हस्तकौशल्याचे धंदे घेऊं. हिंदुस्थानामध्यें मोठमोठीं शहरें वगळलीं तर चांगले कारागीर मिळण्याची फार मुष्कील पडते. हिंदुस्थानांतील कारागिरांमध्यें अद्यापि सौंदर्य आणि डौलदारपणा यासंबंधींच्या कल्पना नीटशा रुजलेल्या नाहींत. लहान लहान गांवांतील कारागिरांनां त्यांच्या कलेचें अथवा त्या कलेंतील तत्त्वांचें शिक्षण फारच दुर्मिळ असतें. डॉक्टर कुमारस्वामी आणि मिस्टर हॅवेल् यांनीं हिंदुस्थानी कला व कारागीर ह्यांविषयीं आपल्या एतद्विषयक ग्रंथांत बराच ऊहापोह केला आहे. त्यांनीं केलेल्या विधानांत बरेंचसें सत्य आहे, तथापि त्यांनां देखील कबूल करावें लागेल कीं, हिंदी अथवा यूरोपीय कोणत्याहि कलेमध्यें प्रावीण्य संपादन केलेले कारागीर आपणांला येथें फारसे आढळत नाहींत; आणि सामान्य कारागिरांचीं कामें ओबडधोबड आणि गचाळ अशींच दिसतात. प्राचीन हिंदी कलेची जी कांहीं थोडीफार परंपरा शिल्लक आहे ती अगदींच अल्प असून मोठमोठ्या [illegible] वर्गांतहि अथवा बरींच देवळें असलेल्या गांवांतच ती [illegible] दिसून येते.

इंग्रज किंवा अमेरिकन लांकुडकाम करणारा कारागीर हिंदी कारागिरापेक्षां पुष्कळच कुशल असतो. हिंदुस्थानांतील पुस्तकें बांधणारास पुस्तक सुंदर दिसेल अशा रीतीनें कसें बांधावें ही गोष्ट त्याच्या पाश्चात्त्य व्यवसायबंधूइतकी माहीत नसते. हा फरक होण्यास अनेक कारणें आहेत. सामान्य लोकांकडून अधिकाधिक चांगल्या वस्तूंकरितां जशी मागणी यावयास पाहिजे तशी येत नाहीं. जनतेमध्यें सुंदर वस्तूंबद्दल फारशी हौस दिसून येत नाहीं यामुळें अशा वस्तूंच्या उत्पादनास उत्तेजन मिळत नाहीं. याखेरीज आमच्या देशी भाषांची गळेचेपी वगैरे कारणें आहेतच. असो.

**समाजांतील जबाबदार वर्ग व त्यांचीं कर्तव्यें.**– आपला भविष्यकाल उज्ज्वल व्हावा याकरितां समाजांतील निरनिराळ्या वर्गांनीं आपणांवरील जबाबदारी ओळखली पाहिजे. या जबाबदारीच्या दृष्टीनें समाजाचे आपणांस तीन वर्ग करतां येतील. कामकरी, पुढारी व सरकार हे ते तीन वर्ग होत. समाजाच्या पुढाऱ्यांचें, सरकारचें आणि व्यक्तिशः कामकऱ्यांचें या बाबतींतील कर्तव्य काय आहे यावद्दल येथें दोन शब्द सांगणें अवश्य आहे. लोकांची सामाजिक व आर्थिक उन्नति व्हावयाची ती निरनिराळ्या व्यक्तींनीं आपापली उन्नति करून घेण्याचा स्वतंत्र प्रयत्न केल्यानें जो एक संयुक्त परिणाम होतो त्यामुळें व लोकांनीं संघटित प्रयत्न केल्यामुळें होते. जनतेनें एकमतानें स्वतः होऊन अथवा सरकारच्या मदतीनें अशा तऱ्हेची परिस्थिति उत्पन्न करावी कीं, प्रत्येक व्यक्तीला तिच्या समाजांतील स्थानापासून अधिकतम हित साधून घेतां यावें आणि एकंदर समाजाच्या हितास शक्य तितकी मदत करतां यावी. सरकारला व व्यापाऱ्यांच्या मंडळांसारख्या खासगी मंडळांनां बहुतेक सारखेंच काम करावयाचें असतें. दोघांसहि व्यक्तीच्या प्रयत्नास उत्कृष्ट मोबदला मिळेल अशी तजवीज करावयाची असते. मनुष्यानें आपल्या बुद्धीचा कितीहि उपयोग केला तरी त्याला फळ येणें कांहीं अंशीं परिस्थितीवर अवलंबून असतें.

मनुष्याला लागेल ती योग्य संधि कांहीं स्वतः होऊन आणतां येत नाहीं किंवा त्याला परिस्थितीमध्यें वाटेल तो बदल करतां येत नाहीं. त्याच्या हातांत फक्त कोणत्याहि कलेंत प्रावीण्य मिळविणें, आपणास योग्य अशा धंद्याची निवड करणें आणि प्रामाणिकपणानें व मेहनतीनें काम करणें एवढ्याच गोष्टी असतात. त्याला समाजाची कोठें चूक होत आहे अथवा समाज नागरिकांनां योग्य संधि मिळण्याच्या कसा आड येत आहे इत्यादि गोष्टी नागरिक या नात्यानें दाखवितां येतील. यापेक्षां जास्त त्याला कांहीं करतां यावयाचें नाहीं. प्रत्येक मनुष्यास स्वतःच्या पोटाचा धंदा चालवून समाजसुधारणेचें, धर्मप्रचाराचें अथवा अशाच एखाद्या चळवळीचें [illegible]तां या[illegible]चें नाहीं. समाजांतील पुढाऱ्यांनीं व [illegible]तीमध्यें अडथळा करणाऱ्या ज्या कांहीं गोष्टी असतील किंवा ज्यांच्यामुळें मनुष्याच्या संपत्ति मिळविण्याच्या मार्गांत अडथळा येत असेल त्या दूर करण्याची खटपट केली पाहिजे. मनुष्यानें परिस्थितीचा फायदा घेण्याचा व परिस्थित्यनुरूप आपलें काम करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. परंतु त्याला आपल्या स्थितीमध्यें एकदम फार मोठा फरक करणें भाग पडूं नये. त्याच्याकडून अशक्य अशी गोष्ट घडवून आणण्याची समाजानें अपेक्षा करतां कामा नये. कधींकधीं सभोंवतालच्या परिस्थितीमध्यें समाजानेंच फरक घडवून आणणें जरूर असतें.

**मनुष्याची उत्पादनशक्ति कशी वाढेल?**— मनुष्याची देशाच्या संपत्तीमध्यें भर टाकण्याची शक्ति त्याला संपत्ति मिळविण्याच्या कामांत आपल्या आयुष्याची किती वर्षें घालवितां येतील या गोष्टीवर, तसेंच त्याच्या कर्तृत्वशक्तीवर आणि भोंवतालच्या परिस्थितीमध्यें त्याच्या कर्तबगारीला किती वाव सांपडेल यावर अवलंबून असते.

मृत्युसंख्येचें प्रमाण कमी होत जाणें अथवा आयुर्मानाची वाढ होत जाणें या गोष्टीचा समाजाच्या सांपत्तिक स्थितीवर बराच महत्त्वाचा परिणाम होतो. कारण अशी वाढ झाली म्हणजे मनुष्याला आपल्या आयुष्यामध्यें जास्त उत्पादन करतां येतें व त्यायोगें समाजाच्या प्रत्येक घटकापासून समाजाला अधिक लाभ होतो.

आपल्या समाजांत अल्पवयांतील मृत्यूंचें प्रमाण कमी करण्याची कांहींच खटपट झालेली नाहीं. सरकार या गोष्टीला कांहीं उपाय शोधून काढीत आहे. परंतु या गोष्टीच्या मुळाशीं हात घालून प्रतिबंधक उपाय योजण्याची सरकारकडून कांहींच तजवीज होत नाहीं. औषधोपचार वगैरे पुरविण्याची तजवीज सरकार करतें, परंतु आरोग्यनाशाचीं कारणें समूळ नाहींशीं करण्याचा प्रयत्न तें करीत नाहीं. मद्यपान वगैरेसंबंधींचें सरकारी धोरण फारच सदोष आहे. सरकारनें लोकांनां दारू पिण्याचा हक्क पूर्णपणें दिला आहे. परंतु दारूपासून होणाऱ्या अनिष्ट परिणामांचें ज्ञान लोकांस सरकारनें करून दिलेलें नाहीं. लोकांनां हें स्वातंत्र्य मिळालें नसतें तर फार मेहरबानी झाली असती. आपणांस सुधारलेलें म्हणवून घेण्यासाठीं दारूबाजीचें पुरस्कर्तृत्व सरकारनें करणें अवश्य नाहीं. दारू न प्याल्यानें रानटीपणा खास पदरीं येत नाहीं. दारूपासून होणारें उत्पन्न मोठें असतें ही गोष्ट खरी. परंतु उत्पन्नाच्या दृष्टीनेंहि विचार केला असतां मद्यविक्रय कमी करणें हेंच एकंदरीनें अधिक फायदेशीर आहे असें दिसून येईल. मद्यविक्रयास बंदी केली असतां लोकांची आयुर्मर्यादा वाढेल आणि त्यांस इतर बाबतींत अधिक खर्च करावयास सवड मिळेल. व अशा तऱ्हेनें निरनिराळ्या गोष्टींत खर्च करावयास सांपडल्यामुळें लोकांचा जीवितक्रम सुधारेल.

रोगांचा प्रतिकार करणें अथवा लोकांची आयुर्मर्यादा वाढविणें या गोष्टी सरकारला एकट्यालाच पूर्णपणें करतां येणें अशक्य आहे. यासाठीं लोकांमध्यें स्वच्छतेच्या कल्पना वाढल्या पाहिजेत. त्यांस आपली राहणी सुधारण्याचें शिक्षण मिळालें पाहिजे. येथील देश्य राहणीमध्यें सुधारणा करून तिचा एक उच्च प्रकारचा नमुना लोकांसमोर ठेवला गेला पाहिजे असें जें आम्हीं म्हणतों त्याला हेंहि एक कारण आहे कीं, असा देशी नमुना समोर असल्याखेरीज सामान्य लोकांची राहणी सुधारणार नाहीं. जोंपर्यंत आरोग्यासंबंधीं व स्वच्छतेसंबंधीं घ्यावयाची खबरदारी फक्त यूरोपीय राहणीशींच संबद्ध असेल तोंपर्यंत हिंदू लोकांची राहणी सुधारावयाची तर नाहींच पण अधिक बिघडत मात्र जाईल. हें विधान प्रथमदर्शनीं जरा चमत्कारिक दिसतें, म्हणून त्याचें थोडें स्पष्टीकरण केलें पाहिजे. केवळ आरोग्यशास्त्रीय कल्पनांच्या प्रसारामुळेंच स्वच्छ राहणीची संवय लागते असें नव्हे. अमुक गोष्ट शुद्ध अथवा अशुद्ध आहे हें आपण पृथक्करण करून न ठरवितां सामान्यतः केवळ दृष्टीनें ठरवितों. जें दृष्टीला नीटनेटकें व सुंदर दिसेल तें शुद्ध आहे असें आपण ठरवितों. कांहीं गोष्टींमध्यें ही आपली समजूत चुकीची ठरेल, परंतु एकंदरींत जें दृष्टीला स्वच्छ दिसेल तेंच करण्याची काळजी घेणें श्रेयस्कर असतें. पुष्कळ स्त्रिया त्यांनां जर एखादी गोष्ट आरोग्यास अपायकारक आहे म्हणून करूं नका असें सांगितलें तर ऐकणार नाहींत. परंतु ती गोष्ट केल्यानें त्यांचें सौंदर्य कमी होईल, असें जर त्यांस सांगितलें तर त्याचा परिणाम त्यांच्या मनावर मुळींच होणार नाहीं असें नाहीं. आपलें सौंदर्य कायम ठेवण्याची इच्छा कोणत्याहि स्त्रीस सामान्यतः स्वच्छ राहणी ठेवण्यास प्रवृत्त करते. त्याप्रमाणेंच घराला एक तऱ्हेची शोभा असावी ही इच्छा तें आरोग्यकारक ठेवण्याची प्रवृत्ति उत्पन्न करते. लोकांनीं अनुकरण करण्याला लायक अशी चांगली राहणी त्यांच्या डोळ्यापुढें असावी लागते. कोणत्याहि राहणीचें अनुकरण करण्याची इच्छा सामान्य लोकांमध्यें उत्पन्न होण्याकरितां ती राहणी त्यांच्या राहणींतच सुधारणा होऊन निघालेली असली पाहिजे. जर अशा तऱ्हेची सामान्य राहणींतूनच उत्पन्न झालेली उच्च प्रकारची राहणी तयार होईल आणि तिला स्वच्छता व आरोग्य यांच्या कल्पनांची जोड मिळेल तर लोकांनां ती आपल्यापुढें उदाहरणादाखल ठेवून आपली राहणी सुधारण्याची प्रवृत्ति होईल.

कामकरी वर्गाची आर्थिक दृष्ट्या किंमत वाढविणारी आणखी एक गोष्ट म्हटली म्हणजे कामकऱ्याची वैयक्तिक कार्यक्षमता ही होय. या कार्यक्षमतेमध्यें मुख्यतः चार गोष्टी अंतर्भूत होतात.

(१) कसब.
(२) परिश्रम करण्याची शक्ति.
(३) परिस्थितीचें ज्ञान करून घेण्याची पात्रता.
(४) परिस्थित्यनुरूप काम करण्याची तयारी.

यांपैकीं स्वतःचें कौशल्य अथवा परिश्रम करण्याची ताकद वाढविणें या गोष्टी व्यक्तिशः कामकऱ्यावर अवलंबून असतात. तसेंच आपल्या सभोंवतींच्या परिस्थितीचें ज्ञान करून घेणें व तदनुरूप आपली तयारी करणें हेंहि प्रत्येक व्यक्तीचें कर्तव्य आहे. त्याला परिस्थितीप्रमाणें आपणा स्वतःमध्यें बदल केला पाहिजे. परिस्थित्यनुरूप वर्तन ठेवण्याचें सामर्थ्य असल्यानें विवक्षित लोकांस आपलें अस्तित्व कायम राखतां येतें. परंतु ही परिस्थितीप्रमाणें आपणांत बदल करण्याची शक्ति मनुष्याच्या अंगांत कांहीं मर्यादेपर्यंतच असूं शकते. या बाबतींत आपणांला एक नियम घालतां येईल तो असाः ज्या वेळीं अशा एक तऱ्हेची परिस्थिति उत्पन्न होते कीं, व्यक्तीस त्या परिस्थितींत आपलें हित साधण्यासाठीं आपल्या राहणींत मूलतः बदल करणें जरूर होतें, त्या वेळीं, स्वतःमध्यें असा मूलतः बदल करणें व्यक्तीस अशक्य असल्यानें, ती परिस्थिति तशीच कायम ठेवणें अगर न ठेवणें हें समाजाच्या इच्छेवर अवलंबून असल्यास तिच्यांत बदल करण्याचा समाजानें प्रयत्न केला पाहिजे. वर येथील देश्य संस्कृतींत सुधारणा करण्यासंबंधीं आणि परकीय भाषा, पोषाख वगैरेंचें महत्त्व कमी करण्यासंबंधीं जें विवेचन केलें आहे तें, प्रस्तुत नवीन परिस्थिति कायम ठेवावी किंवा नाहीं हें आपल्याच इच्छेवर अवलंबून आहे व या आमच्या समाजामध्यें नवीन परिस्थितीनुसार सर्वांगीण क्रांति करणें शक्य नाहीं या दोन गोष्टी स्पष्ट असल्यामुळेंच केलें आहे.

**वन्यसंस्करण.**—समाजापुढील एक मोठें आर्थिक व सामाजिक कार्य वन्यांस नागरिकांसारखें रहावयास शिकविणें हें आहे. प्रत्येक भागांत असे अनेक लोक आहेत कीं, त्यांचा एकंदर समाजाशीं संबंध थोडका येतो. त्यांच्या गरजा अगदीं अल्प आहेत आणि त्यांनां सुधारलेल्या लोकांच्या श्रमविभागांत आज भाग घेतां येत नाहीं. या लोकांमध्यें भिल्ल, गोंड, ठाकूर, कोळी, कोर्कू, निहाल इत्यादि लोकांचा समावेश होतो. या लोकांपैकीं बरेच लोक अजून डोंगरांत रहातात आणि त्यांस आगगाडीसारख्या सुधारणांचा फायदा झाला नाहीं. अशा लोकांचें संस्करण कसें करावें हा प्रश्न समाजापुढें आहे. वन्यांच्या संस्करणाविषयीं समाजांत कोणींच विचार केला नाहीं असें मात्र नव्हे. प्रत्येक वन्य जातींत जाऊन त्या लोकांस ख्रिस्ती संप्रदायांत सामील करण्यासाठीं आणि त्यांस अधिक उच्च दर्जाचा चरितार्थ चालविण्याचें शिक्षण देण्यासाठीं पाश्चात्त्यांचीं मिशनें खटपट करीत आहेत. त्यांच्या वन्य भाषांतून आज रामायण महाभारतादि ग्रंथांचें भाषांतर नसेल, पण बा[illegible] वर्गांतहि भाषांतर झालें आहे. या सर्व गोष्टींक[illegible]नी अ[illegible]मून येतो.

पाहिजे. वन्यसंस्करणाचें कार्य परदेशी लोकांपेक्षां आपणांसच चांगलें करतां येईल. संस्करणाचें बरेंच कार्य अनुकरणेच्छा घडविते. अनुकरण करण्यास योग्य असा उच्च प्रतीचा समाज जवळ असला तरी त्या उच्च समाजाचे अवयव म्हणून मोडले जाण्याची शक्यता असली तरच अनुकरण अधिक चांगलें होतें हें उघड आहे. वन्य लोकांनां ख्रिस्ती जरी केलें तरी त्यांस परकीय लोकांचे आचार उचलणें शक्य नाहीं असें आढळून आलें आहे. देश्यांचे आचार त्यांनीं उचलावयाचे तर देश्यांचे आचार शिकविण्यासाठीं शिक्षक मिळणार ते परके किंवा परक्यांच्या हाताखालीं तयार झालेले देशी ख्रिस्ती! वन्यांनां उच्च प्रकारचे आचार शिकविणें किंवा भाषा शिकविणें हें अर्थातच या शिक्षकांस कठिण जातें. वन्यांस आपल्यासारखें करणें हें आपलें कर्तव्य आहे आणि तें आपणांस केलेंच पाहिजे.

या वन्यांची संख्या लहानसहान नाहीं. हिंदुस्थानांत वन्यसंस्करणाचें काम मोठेंच आहे. चारपांच कोट लोकांस सुधारावयाचें हें कार्य आहे. हें कार्य करण्यासाठीं आपली कार्यपद्धति तरी काय असणार? ख्रिस्ती मिशनऱ्यांस विशिष्ट उपास्यांविषयीं वाटणारी श्रद्धा आपलें कार्य करण्यास आवेश उत्पन्न करिते, तसें आपणांस कोणतें तत्त्व चोदना उत्पन्न करील? आपणांस त्या लोकांस जाऊन काय शिकवावयाचें आहे? आपणांस शंकराच्या पूजेचा प्रसार करावयाचा कीं विष्णूच्या पूजेचा प्रसार करावयाचा?

यासंबंधाचें एक मुख्य तत्त्व येथें मांडलें पाहिजे तें हें कीं, वन्यसंस्करणाचा प्रश्न वन्यांच्या हिताच्या दृष्टीनेंच सोडविला पाहिजे. वन्यांस आपल्यासारखें करावें म्हणून हिंदूंस वाटणार, ख्रिस्त्यांस वाटणार व मुसुलमानांसहि वाटणार. वन्यांस संस्कार हिंदूंचा करावा असें ध्येय ठेवण्यांतच वन्यांचा फायदा आहे, कारण संस्कार्य व्यक्ति ख्रिस्ती अगर मुसुलमान झाली तर ती स्वजातीपासून तुटेल व रक्तानेंहि ख्रिस्त्यांत अगर मुसुलमानांत मिसळून जाईल आणि यामुळें तिच्या सन्निकर्षानें तज्जातीय इतर लोक सुधारणार नाहींत. पुष्कळदां असें झालें आहे कीं गोंड किंवा भिल्ल मुसुलमान किंवा ख्रिस्ती झाले म्हणजे ग्राम्यांस अगर नागरिकांस शोभतील असे धंदे करूं लागतात आणि वन्यांचे धंदे टाकून देतात; परंतु येवढ्यापुरती जरी त्यांची सुधारणा होते तरी ते परसमाजप्रविष्ट झाल्यामुळें त्यांच्या आचाराचा व जें थोडेंसें पुढारीपण त्यांस मिळतें त्या पुढारीपणाचा फायदा इतर गोंडांस किंवा भिल्लांस मिळत नाहीं. वन्य व्यक्तीस हिंदूंचा संस्कार केल्यास सदरील अडचण उत्पन्न होणार [illegible] सुधारणेचा फायदा तिच्या जातींतील इतर

वन्यांच्या उन्नतीसाठीं जे उपाय योजावयाचे ते साधारणतः येणेंप्रमाणें.

(१) त्यांच्यामधील निरक्षरता काढून त्यांस साक्षर करणें आणि त्यांच्या अत्यंत शेजारीं जे सग्रंथ लोक असतील त्यांची भाषा त्यांस शिकविणें.

(२) देशाचा सर्वसामान्य इतिहास त्यांस अवगत करून देणें आणि ग्राम्य अगर नागरिक जनतेमध्यें त्यांस स्थान मिळवितां यावें म्हणून त्यांस धंद्याचें शिक्षण देणें.

एवढ्या क्रिया झाल्या असतां इतर बाबतींत त्यांचें संस्करण इतर लोकांच्या बरोबर होऊं शकेल.

वरील विवेचनावरून वाचकांनां आपली सांपत्तिक वाढ राजकीय परिस्थितीवर किती अवलंबून आहे हें कळून येईल. आपणांला थोड्या फार राजकीय स्वरूपाच्याच सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत. अशा तऱ्हेच्या सुधारणा प्रस्तुत शासनकर्त्यांस वरील गोष्टी पटवून देऊन व त्यांच्यावर लोकमताचा दाव टाकून घडवून आणल्या पाहिजेत. प्रत्यक्ष राजकीय सुधारणा म्हणजे शासनशक्तीची निराळ्या तऱ्हेनें वांटणी घडवून आणण्यानें सर्व कार्य व्हावयाचें नाहीं. आपणांस सध्यां कांहीं प्रातिनिधिक सत्ता मिळाली आहे. आपल्या प्रतिनिधींनां व सरकारला दिशा दाखविण्याचें काम आपणांस करावयाचें आहे. आपणांपैकीं बऱ्याचशा प्रतिनिधींसमोर निश्चित असा कांहीं कार्यक्रम नसतो. त्यांनां वरील विवेचनावरून आपल्या कार्याची दिशा थोडीतरी कळूं लागेल अशी आशा आहे.

---

## उपप्रकरण ७ वें.

## देश्य चळवळ व परराष्ट्रीय राजकारण.

देश्य चळवळीचें कांहीं स्वरूप राष्ट्रधर्म व राजकीय बल यांविषयीं विवेचन करतांना स्पष्ट केलें आहे. या चळवळीच्या काँग्रेससारख्या यंत्राच्या सष्टीकरणाचें महत्त्वाचें अंग म्हटलें म्हणजे संस्था ज्या भावनांतून निर्माण होतात त्या भावनांचा आणि त्या भावनांच्या बनावटीचा इतिहास हें होय. सामान्य, अधिकारहीन आणि द्रव्यहीन अशा वर्गास चेतना उत्पन्न करण्यासाठीं ज्या कांहीं खटपटी झाल्या त्यांचें स्वरूप आपल्या लक्षांत नीट आलें पाहिजे. देश सुव्यवस्थितपणानें सुसंघटित करणें याच्या पुढील पायरी म्हटली म्हणजे त्या देशानें परराष्ट्राशीं बरोबरीच्या नात्यानें व्यवहार करणें ही होय.

**महाराष्ट्रीयांचें राजकारण.**—सर्वांत मोठा भावनांशीं संबद्ध असा विषय म्हणजे स्वातंत्र्य हा होय. लोकांच्या भावना एकत्र करण्यास साहाय्यक अशा ज्या चळवळी त्या राष्ट्रीय चळवळी होत. अशा चळवळींपैकीं राजकारणविषयक चळवळी-

कडे महाराष्ट्रीयांचें लक्ष बरेंचसें आहे असा निदान लौकिक तरी आहे. वस्तुस्थिति निराळी दिसते. सध्यांच्या परिस्थितीमध्यें एखादी गोष्ट साध्य कशी करून घ्यावी या प्रकारची तालीम महाराष्ट्रीय सुशिक्षितांस त्यांच्या राजकीय चळवळींच्या गुरूंनीं कितपत दिली आहे हें बऱ्याच सूक्ष्म अवलोकनाशिवाय समजावयाचें नाहीं. परंतु सामान्य अनुभव असा दिसतो कीं वैयक्तिक किंवा सामाजिक हिताची प्राप्ति करून घ्यावयाची झाल्यास त्या कामांत नांगऱ्ये व कारकून या दोहोंनीं भरलेल्या महाराष्ट्रीयांपेक्षां गुजराथी व बंगाली लोक अधिक यशस्वी होतात. महाराष्ट्रीयांची राजकीय प्रगति झाली असेल तर ती हीच कीं आपल्या ऐतिहासिक अस्तित्वाची जाणीव महाराष्ट्रीयांस आहे आणि पारतंत्र्याची चीड किंवा निदान इंग्रजांचा द्वेष हा महाराष्ट्रांत अधिक बद्धमूल झाला आहे. इंग्रजांचा अधिक द्वेष करण्याचें श्रेय ब्राह्मणास देणारें विधान दुसरा आपणाकडे कसें पाहतो तसें आपण आपल्याकडे पाहिलें पाहिजे या तत्वानुसार इंग्रज लेखकांच्या आधारावरून आम्ही करीत आहों.

महाराष्ट्रानें ५७ सालानंतर राजकारणामध्यें जें कार्य केलें तें हें कीं स्वतःच्या उन्नतीला आणि उन्नत्यर्थ प्रयत्नाला अवश्य असा असणारा जो स्वाभिमान तो त्यानें परकीय सत्तेखालीं असून देखील जागृत ठेवला. हा अभिमान जागृत ठेवण्यासाठीं वर्तमानपत्रें, काव्यें, नाटकें व कादंबऱ्या या सर्व प्रकारचें वाङ्मय खर्चीं पडलें. महाराष्ट्राचा इतिहास विशेषेंकरून शिवाजीचें चरित्र सर्व लोकांमध्यें उच्च प्रकारचें आत्मबल उत्पन्न करण्यास कामीं आलें. विष्णुशास्त्री चिपळूणकरांपासून ज्या जोरदार लेखण्या महाराष्ट्रांत दिसूं लागल्या, त्या लेखण्यांनीं केलेल्या विधानांची योग्यता कदाचित् फार थोर प्रतीची नसेल, पण सर्व राष्ट्रामध्यें आपण उपेक्षा करण्यासारखे लोक नाहीं अशी भावना जागृत करण्यास व ठेवण्यास अवश्य असणारें वाङ्मय त्या लेखण्यांनीं निर्माण केलें यांत शंका नाहीं.

सत्तावन सालानंतर इंग्रजांचें राज्य उलथून पाडावें या तऱ्हेचे विचार नष्ट झाले नव्हते. हे विचार ज्यांच्या मनांत वागत होते ते लोक अज्ञानी होते हें खरें, तथापि त्यांचे विचार म्हणजे केवळ एकलकोंड्या तऱ्हेवाईक लोकांचे विचार असें म्हणतां येत नाहीं. दहा विचार करणारांमधूनच एखादा कर्ता निर्माण होतो या न्यायानें वासुदेव बळवंत फडक्यांसारखेच विचार असलेल्या अनेक लोकांमधून एक कर्ता वासुदेव बळवंत फडके निघाला असें म्हणतां येईल. काँग्रेस जी निर्माण झाली ती निर्माण करण्याच्या योजनेस, त्या वेळीं कांहीं तरी गुप्त खटपटी देशांत चालू होत्या त्यांपासून प्रेरणा मिळाली असें ह्यूमचा चरित्रकार म्हणतो.

लोकमतास जागृत करून त्याचा शासनतंत्रावर परिणाम घडवून आणण्याची पद्धति काँग्रेसच्या पूर्वी महाराष्ट्रांत नव्हती असें नाहीं. १८५२ सालापासून अनेक संस्थांचीं राजकीय विषयांवरचीं पुस्तकें मराठींत प्रसिद्ध झालेलीं दिसतात. (महाराष्ट्रीय वाङ्मयसूची ऐच्छुर पृ. १३२ पहा). याच्या अगोदर देखील सार्वजनिक चळवळींचें अस्तित्व मुंबई शहरांत दिसून येतें. सदरील पुस्तकें मुंबई, पुणें, कऱ्हाड, सातारा, नाशिक इत्यादि ठिकाणीं लोकमतास एकीकृत करून त्यांचा परिणाम शासनतंत्रावर करण्याची प्रवृत्ति दाखवितात. इ. स. १८५० पासून आज १९२० पर्यंत म्हणजे ७० वर्षांत जी राजकीय भावनांत प्रगति झाली ती ही कीं, युद्ध करून स्वातंत्र्य मिळविण्याची कल्पना जवळजवळ नष्ट झाली व लोकमतास जागृत करावें आणि समाजांत प्रत्येकाच्या आर्थिक कार्यानें म्हणजे वर्णव्यवस्थेनें जो अन्योन्याश्रय उत्पन्न होतो त्या अन्योन्याश्रयामुळें समाजांत येणाऱ्या समतोलपणाचा आणि सुसंघटित स्थितीचा विघाड होण्याची शक्यता ओळखून लोकसंग्रहास अथवा लोकघटनेस अधिक व्यवस्थित स्वरूप द्यावें या कल्पनांचा फैलाव जोरानें झाला. राज्यक्रांति करण्याची कल्पना अगदींच नष्ट झाली नाहीं हें पंजाबांत युद्धकालीं झालेल्या चळवळींवरून दिसून येईल.

**सामान्य जनतेची जागृति.**—सध्यां हिंदुस्थानामध्यें सामान्य जनतेंत राजकीय जागृति होऊं लागली आहे ही गोष्ट कोणाहि मनुष्यास नाकबूल करतां यावयाची नाहीं. अन्योन्याश्रयामुळें विशिष्ट क्रियेच्या अगर ती विशिष्ट क्रिया करणाऱ्या वर्गाच्या हातीं एक प्रकारची सत्ता असते आणि संघशक्तीनें या सत्तेचा फार उपयोग करून घेतां येतो हें प्रत्येक वर्गास पटूं लागलें आहे. सरकारी नोकरींत असलेले कारकून, रेल्वे आणि टपाल यांतील नोकर आणि ट्रॅमवे, गॅस इत्यादि नगरोपयोगी कार्यांचे सेवक, तसेच भंगी व झाडूवाले इत्यादि लोकांस स्वहितरक्षणार्थ संघीभूत होऊन पगार वाढवून घेण्याचें धैर्य युद्धामुळें उत्पन्न झालेली महागाई आणीत आहे. जो अधिक ताणून धरील तो अधिक मिळवील आणि जो वर्ग एकजुटीनें वागेल तो अधिक ताणून धरण्यास समर्थ होईल, हीं तत्त्वें प्रत्येक काम करणारा ओळखूं लागला आहे. समाजांतील अन्योन्याश्रय ओळखून कामाच्या महत्त्वाच्या दृष्टीनें स्वतःच्या वर्गाचें भवितव्य ठरवून घेणें हा स्वयंनिर्णयाचा ओनामा आहे. येथील व इतरत्र जगांतील सर्व चालू व भावी राजकीय चळवळ समाजांतील या अन्योन्याश्रयावरच रचली गेली आहे व जाणार आहे.

संघामुळें उत्पन्न होणाऱ्या लोकशक्तीच्या होत असलेल्या वाढीमुळें आणि जे कायदेशीर हक्क लोकांस दिले गेले आहेत त्यांमुळें लोकांत आत्मविश्वास आणि स्वसामर्थ्यभावना उत्पन्न झाली आहे आणि यांच्या योगानें राष्ट्रास विशिष्ट हेतु अथवा ध्येय उत्पन्न होईल. आपणांस कांहींतरी [illegible] आहे असें जेव्हां वाटतें तेव्हां कांहीं [illegible] वर्गांतहि [illegible] दिसून येतो.

करण्याची प्रवृत्ति होते. ज्याच्या हातीं अधिकार नाहीं आणि अधिकार हातीं घेण्याची दूरची देखील ज्यास शक्यता नाहीं असा मनुष्य विनाकारण योजना करीत बसण्याचे परिश्रम त्यास मनोराज्याची खोड लागली असल्याशिवाय कशाला घेईल? कांहींतरी करतां येईल ही भावना जेव्हां नसेल तेव्हां लोकांत कर्तव्यशून्यता वागते आणि राष्ट्र दुर्गतीस पोंचतें. आजची कायद्यानें लाभलेली कार्यशक्ति अत्यंत अपुरी आहे असें जे समजतात त्यांनीं असहकारितेची चळवळ सुरू केली आहे. या चळवळीचे सर्व संभाव्य परिणाम सध्यां सांगण्याचा प्रयत्न करणें म्हणजे ज्ञानकोशकाराचा धंदा सोडून भविष्यवाद्याच्या धंद्यांत शिरणें होय. तथापि तात्कालिक परिणाम लिहिण्यास हरकत नाहीं. कारण ते सांगणें म्हणजे अत्यंत निकट कार्यकारणांचें विवेचन करणें आहे.

असहकारितेच्या चळवळीमुळें अधिक जहाल मंडळी नव्या कौन्सिलांचा त्याग करतील आणि त्यामुळें कौन्सिलांत शिरून सरकारशीं एकसारखा भांडत बसणारा वर्ग कमी होईल. लोकपक्षाच्या सुविचारयुक्त योजना पुढें मांडण्याची जबाबदारी त्यांचे प्रतिनिधी आपणांवर घेत तोंपर्यंत विधायक कामाची जबाबदारी सरकारवरच असते आणि यामुळें ही चळवळ नसती तर सरकारास नावडता पण अधिक जहाल व त्यामुळें अधिक लोकप्रिय वर्ग कौन्सिलांत प्रविष्ट होऊन त्यानें कोणतेंहि कार्य पार पाडणें सरकारास अशक्य केलें असतें. आज आंत जाणारा वर्ग लोकांच्या दृष्टीनें—कदाचित् चुकीच्या दृष्टीनें—'घरमेद्या' आहे आणि ज्या लोकांनीं 'घरमेदीपणा' करून कौन्सिलांत प्रवेश केला त्यांजवर काम चांगलें करून दाखविण्याची जबाबदारी अधिक पडली आहे. कारण हा घरमेदीपणा चांगल्या कामानेंच क्षम्य किंवा योग्य ठरणार. याशिवाय हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं, आंत गेलेल्या लोकांच्या वचनास अधिक महत्त्व देण्याची प्रवृत्ति सरकार दाखवील. कां कीं, सरकारवर विश्वास ठेवून ज्यांनीं काँग्रेसची आज्ञा अमान्य केली ते लोकहि चिडून कौन्सिल सोडून निघून गेले म्हणजे असहकारितेच्या तत्त्वाला अधिक जोर मिळेल.

असहकारितेचा विजय होण्यास एकंदर मजूरवर्गाची संघशक्ति वाढविली पाहिजे हें ओळखल्यामुळें आणि मजूरवर्गाची संख्या फार मोठी असून त्यांस मत असल्यामुळें मजूरवर्गामध्यें जाऊन काम करण्याची प्रवृत्ति मुत्सद्द्यांत वाढेल. आक्टोबर महिन्याच्या ३१ तारखेस पहिल्या (ट्रेड युनियन काँग्रेसमध्यें) कामकरी संघाच्या परिषदेंत अध्यक्ष या नात्यानें लाला लजपतराय यांनीं जें भाषण केलें त्यांत त्यांनीं समाजाच्या अन्योन्याश्रयामुळें मजूरवर्गाच्या हातीं समाजाच्या किल्ल्या आहेत आणि देशाचें दास्य नाहींसें करण्यास मजूरांचें [illegible] व पड़ेल या तऱ्हेची आशा

**श्रमजीविसत्तावाद**—श्रमजीविसत्तावाद हा तात्त्विक दृष्ट्या पुस्तकें वाचणाऱ्या सुशिक्षितांत किती जरी वाढला तरी तो मजुरांत वाढून कार्यप्रवर्तक होण्यास फार अवकाश लागेल. समाजामध्यें भांडवलवाल्यांचा वर्ग राहणारच आणि तो वर्ग जेथें अधिक राहील तेथें तो चोहोंकडचा सूत्रचालक बनेल. महाराष्ट्रामध्यें शिक्षण फारच कमी आहे, गुजराथ्यांच्या चतुर्थांशहि नाहीं, हें वाङ्मयसूचीच्या प्रस्तावनेंत दाखविलेंच आहे. शिक्षणाभावामुळें देशांतील निरनिराळ्या व्यापारांमध्यें उपयोगी पडणारा कारकुनांचा वर्गहि आज पुरेसा नाहीं. विचार प्रसृत करावयास व लोकांनां आत्मशिक्षणाच्या मार्गास लावावयास अडचण करणाऱ्या निरक्षरतेशीं जोंपर्यंत आवेशानें संग्राम केला जात नाहीं तोंपर्यंत कोणत्याहि प्रकारच्या सुधारणेची ओरड फोल आहे.

प्रत्येक प्रकारची स्थिति सुधारण्यास ती स्थिति सुधारणारी एक संस्था लागते. कोणत्याहि लोकांची संस्था चालविण्याची शक्ति मर्यादित असते. शिवाय प्रत्येक गरजेसाठीं स्वतंत्र संस्था लोकांनीं काढीत बसणें म्हणजे सरकारला अधिकाधिक बेजबाबदारपणा शिकविण्यासारखें आहे. समाजाची एखादी विशिष्ट गरज जर सरकार पुरवीत नसेल तर ती त्याजकडून पुरविली जावी या हेतूनें त्याचें कार्यक्षेत्र विस्तृत केलें पाहिजे. उदाहरणार्थ देशी भाषेंतील वाङ्मयाची वृद्धि घ्या. त्याविषयीं अत्यन्त अनास्था दाखविणारें सरकार लोकांनीं आपल्या शक्तीचा उपयोग करून आस्था दाखविणारें केलें पाहिजे. वाङ्मयविषयक व भाषाविषयक सुधारणांचा बोजा सर्व लोकांवरच पडण्याचें कारण जेथें देशाचे वेडेवांकडे विभाग असतील तेथें ते सरकारकडून दुरुस्त करविले पाहिजेत. ज्या समुच्चयाविषयीं आत्मीयभावना सहज होते तो समुच्चय आणि प्रादेशिक राजकीय समुच्चय यांत भेद जितका कमी करतां येईल तितका केला पाहिजे.

महाराष्ट्रामध्यें मोठा श्रीमान् देश्य वर्ग नाहीं त्यामुळें सामान्य महाराष्ट्रीयांमध्यें लोकसत्तावाद आणि उत्पन्नाचा सर्व फायदा परिश्रमाला मिळावा या तऱ्हेची भावना वाढत जाईल; व मजूरवर्गाला मतें पुष्कळ असल्यामुळें पुढें येऊं पाहणाऱ्या मुत्सद्द्यांस दिवसानुदिवस त्यांस प्रिय अशींच भाषणें बोलावीं लागतील.

**परराष्ट्रीय राजकारण.**—जें राष्ट्र अगोदरच परसत्तेखालीं आहे त्या राष्ट्रास परराष्ट्रीय राजकारणांत कितपत क्षेत्र असणार? फारसें नसणारच हें खरें, पण मुळींच नसतें असें नव्हे. राज्यें परराष्ट्राच्या सत्तेखालीं असलीं म्हणजे फितुरी व राज्यक्रान्त्यर्थ चळवळी या दोन दृष्टींनीं राष्ट्रांराष्ट्रांच्या व्यवहारांत तीं पडूं शकतील. राज्यक्रान्त्यर्थ खटपट करणारा पक्ष परकीय राष्ट्रांच्या साहाय्याची अपेक्षा करतो आणि त्यांची

दळणवळण सुरू करतो. हिंदुस्थानांत राज्यक्रांति करावी या हेतूनें हरदयाळ इत्यादि खटपटी मंडळींनीं गदर नांवाची चळवळ अमेरिकेंत सुरू करून इंग्लंडच्या शत्रूंशीं हातजमाई केली होती असें दिसून येतें. गदर चळवळ मृत झाली आहे आणि मोठ्या साम्राज्याला उलथून पाडण्यास आपण समर्थ होऊं अशा कल्पना यापुढें लोकांच्या डोक्यांत शिरण्याचा फारसा संभव नाहीं. अर्थात् या दृष्टीनें म्हणजे बंडासाठीं साहाय्य मागण्याचें राजकारण येत्या अनेक वर्षांत होईल असें दिसत नाहीं.

तथापि परराष्ट्रीय राजकारण अगदीं बंद राहणें मात्र शक्य नाहीं. राजकारण आणि सामाजिक चळवळी यांमधील रेषा दिवसानुदिवस कमी कमी होत जाईल. मजुरांच्या सार्वराष्ट्रीय परिषदा भरत आहेत आणि भांडवलवाल्यांच्याहि बऱ्याच भागांच्या परिषदा भरत आहेत. मजुरांच्या सार्वराष्ट्रीय परिषदांमध्यें हिंदुस्थानास अधिकाधिक महत्त्वाचें स्थान मिळावें म्हणून हिंदुस्थानसरकार व लोक खटपट करीत आहेत. मजुरांच्या परिषदांचा सर्व राष्ट्रांवर जर अधिकाधिक परिणाम होऊं लागला आणि हिंदुस्थान या मजूरपरिषदांमधून आपलें वजन वाढवूं लागलें तर सार्वराष्ट्रीय राजकारणाच्या खऱ्याखुऱ्या भागांत हिंदुस्थानचा प्रवेश झाला असें होईल. याशिवाय हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, राष्ट्रसंघ जसजसा अधिकाधिक बलवान् होत जाईल तसतसें परराष्ट्रीय राजकारणाचें किंवा त्यांत दाखविल्या जाणाऱ्या मुत्सद्दीगिरीचें महत्त्व कमी कमी होत जाऊन राष्ट्रसंघाच्या परिषदांत काम करण्याचें महत्त्व वाढेल.

परराष्ट्रीय मुत्सद्दीगिरीचें स्वरूप दिवसानुदिवस सामान्य व्यवहाराच्या नियमांनीं अधिकाधिक बद्ध होत जाईल. गुप्त तहनामे बंद होणार त्यामुळें मुत्सद्यांनां आपल्या राष्ट्राच्या नकळत कांहींएक करतां येणार नाहीं आणि एक मोठें राष्ट्र लहान राष्ट्रास धाकदपटशा देऊन कांहीं उपटूं लागेल तर तिकडे सगळ्या जगाचें लक्ष लागेल. या स्थितीमध्यें राजकारणाच्या मुत्सद्दीगिरीची खरी मजा गेली. राष्ट्राराष्ट्रांतील तहनामे या नवीन परिस्थितीमुळें दोन कंपन्यांमधील कराराच्या स्वरूपाचे होतील.

**व्यापारी प्रतिनिधि.**—हिंदुस्थानामध्यें व्यापारी मंडळीस आपला व्यापार वाढविण्यासाठीं संघ करून त्या संघाच्या शाखा चोहोंकडे उपस्थित करण्याची शक्यता आज आहे. या तऱ्हेनें त्यांनीं प्रयत्न केला तर आज कॉन्सल्स जें काम करतात तेंच काम या संघांच्या उपकार्यालयांकडे राहील. या तऱ्हेचीं गृहें विविध राष्ट्रांत स्थापन करावीं म्हणून व्यापारी मंडळींत आज थोडाबहुत बोलवा आहे. तो बोलवा फार नसण्याचें कारण एवढेंच कीं हिंदुस्थान देश हा कच्च्या मालाचा उत्पादक आहे, पक्क्या मालाचा उत्पादक नाहीं. पक्क्या मालाच्या उत्पादक देशास सर्व जगाच्या बाजारांकडे डोळ्यांत तेल घालून पहावें लागतें. सध्यां कॉन्सलचें मुख्य काम आपल्या देशांतील पक्का माल खपविणें हें आहे व तें करण्यास आपणांस फारसें क्षेत्र नाहीं.

जर राष्ट्रें दुसऱ्या राष्ट्रांच्या जमिनींचे तुकडे स्वतःच्या घशांत टाकण्याची हांव सोडून देतील तर त्यांस सार्वराष्ट्रीय मुत्सद्दीगिरीचें असें काम तरी कोणतें बजावावयाचें राहील? असें काम राहील तर तें व्यापारासंबंधाचें असणार व त्यांत साखर पेरणाऱ्या मुत्सद्यापेक्षां आपला माल दुसऱ्याच्या बाजारांत कां शिरत नाहीं याचें आर्थिक परीक्षण करणाराच मनुष्य अधिक उपयोगी पडेल. वर कल्पिलेल्या परिस्थितींत जें कार्य परदेशस्थ प्रतिनिधीस पहावें लागेल तें हें कीं, आर्थिक चढाओढीमध्यें दुसऱ्यास अधिक यश येण्यास कोणत्या गोष्टी कारण झाल्या असतील त्यांचा छडा लावणें व आपल्या राष्ट्राला परराष्ट्रांत धंदा करण्यास असलेली संधि शोधणें. या तऱ्हेच्या कार्यांसाठीं जर खासगी संस्था प्रयत्न करूं लागतील तर त्याच्या आड सरकार येणार नाहीं व कदाचित् या प्रकारचे प्रतिनिधी सरकारमार्फतहि नेमतां येतील.

**जित जगाची हिंदुस्थानवर भिस्त.**—आपण हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, राष्ट्रसंघाचा सदस्य या नात्यानें हिंदुस्थानानें प्रत्येक राष्ट्राच्या कारभारावर लक्ष ठेवलें पाहिजे आणि राष्ट्रसंघाच्या समयपत्रिकेंत व्यक्त केलेलीं ध्येयें पार पाडण्याचें अंगावर घेतलें पाहिजे. तेविसाव्या कांडाच्या (अ) कलमाप्रमाणें ज्या देशाशीं हिंदुस्थानाचा उद्यमव्यापारविषयक संबंध आहे अशा देशांत मोलमजुरी करणारे स्त्रीपुरुष व मुलें यांजकडून काम घेण्याच्या पद्धतींत व परिस्थितींत सचोटी व दयार्द्रता यांचा शिरकाव करवून ती स्थिति रक्षिण्याचें हिंदुस्थाननें अंगीकारिलें आहे. एशियांतील जित राष्ट्रांपैकीं अनेक राष्ट्रांचे आपण संरक्षक आहोंत ही भावना हिंदुस्थानानें जागृत ठेवली पाहिजे. सुमात्रा, जावा, बोर्निओ, सेलिबिस, अनाम इत्यादि राष्ट्रांस राष्ट्रसंघांत सदस्यत्व नाहीं व हिंदुस्थानास आहे. या द्वीपांतील बऱ्याच ठिकाणची प्रजा शैव, बौद्ध अगर मुसुलमान असल्यामुळें आपणांशीं सहानुभूतीनें बद्ध व यूरोपीयांशीं असंबद्ध असावयाची. त्यांची अपेक्षाच अशी असावयाची कीं, राष्ट्रसंघांत प्रविष्ट असलेल्या हिंदुस्थानानें आपली बाजू घ्यावी. एशियांतील लोक म्हणून सुमात्रा, जावा वगैरे बेटांसाठीं अगर हिंदुस्थानासाठीं जपान कांहीं करील अशी अपेक्षा करणें व्यर्थ आहे. जपानची हिंदुस्थानासंबंधानें सहानुभूति राहून आपला कांहीं तरी फायदा जपान करून देईल अशी भोळी आशा सादृश्य म्हणजे साहाय्यपरता असें समजणाऱ्या लोकांच्या डोक्यांत होती. तथापि फिलिपाइन्सनें स्पेनविरुद्ध जें राजकारण चाल[illegible] ठिकाणी [illegible] पिनोंस आलेल्या [illegible] तेव्हां [illegible] कांहीं [illegible] नी [illegible] वर्गांतहि [illegible] दिसून येतो.

त्या अनुभवाच्या माहितीवरून ती आशा कमी झाली असली पाहिजे. स्वतंत्र, महत्त्वाकांक्षी आणि साम्राज्यवर्धिष्णु जपानास आपली विस्तारेच्छा तृप्त करून घ्यावयाची आहे; आणि जित राष्ट्रांच्या प्रेतावर आपल्या घुगऱ्या भाजून ती तृप्त करून घेण्यास जपान मागेंपुढें पाहणार नाहीं. अर्थात् दुसऱ्या राष्ट्राच्या हितासाठीं न्यायाचा वाद करण्यास जपानासारखें राष्ट्र पुढें येईलच असें नाहीं. हिंदुस्थानसारख्या राष्ट्रास आपली सरहद्द वाढविण्याची हांव जपानाप्रमाणें असणें शक्य नसल्यामुळें इतर जित जगाची भिस्त हिंदुस्थानवरच असणार. ही जबाबदारी जितकी अधिकाधिक भारतीयांच्या लक्षांत येईल तितकी त्यांची इतिकर्तव्यता वाढेल.

जावामध्यें अत्यंत दुष्ट अशा राज्यास शोभणारी 'कल्चर सिस्टिम ' उर्फ (सभ्य नांवाखालीं असलेली) गुलामगिरी जी परवांपर्यंत चालू होती तिचे परिणाम यवद्वीपास पुष्कळ काळपर्यंत भोंवतील. जमीन अजून बहुतेक गोऱ्यांच्याच ताब्यांत असून काळ्यांनीं गोऱ्यांच्या तावडींत पूर्णपणें रहावें या ध्येयास परिपोषक अशी आर्थिक स्थिति अजून कायम आहे. आजपर्यंत झालेल्या जुलमाखालीं सर्व प्रकारचे हाल सोसून जी माणुसकी यवद्वीपस्थांत अजून उरली असेल ती ज्या वेळेस प्रकट होईल त्या वेळेस आपल्या दाराजवळच्या लोकांकडे हिंदुस्थानास पहावयास लावणारी परिस्थिति उत्पन्न होईल. डच लोकांच्या ताब्याखालीं असलेला मुलुख अजून मनुष्यहिताच्या दृष्टीनें तपासला जावयाचा आहे. हिंदुस्थानची त्या मुलुखाशीं जशी अधिकाधिक ओळख होत जाईल तसतसे अनेक प्रसंग उपस्थित होतील. जावाचा हिंदुस्थानशीं होणारा व्यापार घेतला तर त्याचा हिंदुस्थानाशीं व्यापार करणाऱ्या देशांत तिसरा नंबर लागेल असें असतां जावाशीं आपला प्रत्यक्ष संबंध फारच कमी येतो. जावाच्या डच सरकारनें अशी वृत्ति ठेविली आहे कीं, स्वाभिमानी हिंदु तेथें राहूं इच्छिणार नाहीं. ही गोष्ट हिंदुस्थानास जावाकडे लक्ष देण्यास भाग पाडणार.

जातां जातां काँग्रेससारख्या संस्थांचा उल्लेख केला पाहिजे. परदेशांत हिंदुस्थानचे म्हणजे काँग्रेसचे वकील असावेत अशी इच्छा लो. टिळक यांनीं वारंवार व्यक्त केली होती आणि त्याप्रमाणें त्यांचा प्रयत्नहि होता. या इच्छेच्या पूर्तीचें काय झालें तें सांगावयास नको. प्रतिनिधिगृहें स्थापन करण्याच्या कल्पनेंतील लो. टिळकांचें धोरण असें होतें कीं, कोणत्याहि देशांतील जनता आणि सरकार यांनीं हिंदुस्थानास विसरूं नये; ज्या ध्येयानें राष्ट्रसंघ तयार झाला तें ध्येय जें सर्व जगाची सुखसमृद्धि त्याची राष्ट्रांस वारंवार आठवण व्हावी आणि आपलें घोडें कसें तरी पुढें ढकललें जावें. काँग्रेसनें आपले प्रतिनिधी चोहोंकडे ठेवावे हा लोकमान्य [illegible] व कितपत पार पडेल हें पुढें

**भारतीय वसाहतींचें संरक्षण.**—भारतीयांच्या ज्या चोहोंकडे वसाहती असतील त्यांचें संरक्षण करणें, त्यांस तापदायक असणारे कायदे काढून टाकण्याची खटपट करणें, यांसारख्या खटपटी हा देखील आपल्या परराष्ट्रीय राजकारणाचा महत्त्वाचा भाग होय. प्रत्येक वसाहतीमध्यें काँग्रेससारख्या लोकांच्या प्रातिनिधिक संस्था तयार झाल्या आहेत. आतां जें कार्य करावयाचें तें हें कीं, त्या संस्थांची आणि काँग्रेसची संगति जोडावयाची. केनिया येथील भारतीय वसाहतीनें ती वसाहत हिंदुस्थान सरकारच्या अंमलाखालीं असावी असा आपला हेतु जाहीर करून तसें घडून येईपर्यंत असहकारितेची चळवळ चालू ठेवण्याचा निश्चय केला असल्याचें प्रसिद्ध झालें आहे. यावरून व इतर अनेक गोष्टींवरून हिंदुस्थानकडे परदेशीं वसाहत करून राहिलेल्या भारतीयांची कोणत्या प्रकारची दृष्टि लागलेली आहे तें कळून येतें.

अर्वाचीन कालीं जे लोक परदेशीं गेले आहेत त्या लोकांसाठीं भारतीयांनीं राजकारण करण्यास सुरुवात फार पूर्वीपासून केली आहे. ही जी खटपट भारतीयांनीं केली ती भारतीय राजकीय चळवळीच्या इतिहासांतील एक महत्त्वाचें पान होय. अत्यंत प्राचीन कालीं जें परदेशगमन झालें आणि त्यामुळें भारतीयत्वाचीं जीं पुटें इतर देशांत शिल्लक राहिलीं त्यांसंबंधाचें कर्तव्य मागें संस्कृतिप्रसाराचें पर्यालोचन करतांना (पृ० ३५४ पहा) सांगितलें आहे आणि जावा इत्यादि प्रदेशांचें संरक्षकत्व पत्करण्याचा बोध करतांना तें स्पष्ट केलें आहे. आतां पश्चिमेकडे मध्यकालांत जे भारतीय गेले त्यांचा थोडा विचार करूं.

**जिप्सींसंबंधानें हिंदुस्थानचें कर्तव्य.**—जिप्सींविषयीं आपलें कांहींतरी कर्तव्य आहे ही गोष्ट विसरणें अयोग्य होईल. जिप्सींचें परदेशगमन हें मध्यकालांत झालें.

जिप्सींच्या विषयीं आज आपणांस काय करतां येईल? जिप्सींच्या अंगांत भारतीय भावना संचरूं लागली तर ती गोष्ट हिंदुस्थानास हितावह होईल यांत शंका नाहीं. संस्कृतीच्या आणि मनुष्यहिताच्या प्रगतीस ही गोष्ट हितावह आहे कीं, ज्या भटक्या जाती आहेत त्यांस स्थायिकता प्राप्त व्हावी, आणि मनुष्यसमूह तुटक तुटक आहेत ते एकमेकांशीं संयुक्त व्हावे. जिप्सींचीहि या ध्येयानुसार प्रगति होणें अवश्य आहे. या प्रगतीसंबंधानें महत्त्वाचा प्रश्न एवढाच कीं, या भावी जिप्सींनीं त्या त्या देशांतील जनतेंत पूर्ण समाविष्ट व्हावें किंवा आपलें भारतीयत्व कायम ठेवावें. त्यांचें भारतीयत्व कायम रहाणें शक्य नाहीं या प्रकारच्या भवितव्याच्या सूचक गोष्टी घडून येत आहेत. रोमानिया, बलोरिया वगैरे भागांत पुष्कळ जिप्सी तेथील सामान्य रहिवाशांप्रमाणें राहूं लागले

आहेत, आणि खुद्द इंग्लडमध्यें देखील जिप्सी व इतर जनता यांचे लग्नव्यवहार होऊं लागले आहेत. जिप्सींची जात शुद्ध नाहीं. त्यांनीं निरनिराळ्या राष्ट्रांतील आणि निरनिराळ्या जातींची मुलें चोरल्यामुळें आणि कित्येक दुसरे भटक्ये त्यांत सामील झाल्यामुळें त्यांची जात आज मिश्र झाली आहे. शिवाय जिप्सींस स्थाईक वस्ती करून रहावयास भाग पाडणारे कायदेहि चोहोंकडे झाले आहेत. या तऱ्हेच्या गोष्टी जिप्सींचा समावेश पाश्चात्त्य राष्ट्रांत होईल अशी भवितव्यता दाखवितात.

उलट बाजूनें बोलावयाचें झाल्यास आपणांस असें म्हणतां येईल कीं, एक हजार वर्षें जी जात सतरा रक्तांशीं मिसळून सतरा ठिकाणचे हाल सोसून आणि कोणत्याहि तऱ्हेचें कायमचें वाङ्मय नसतां आपलें खत्व कायम ठेऊं शकली, ती जात ज्या राष्ट्रांत तिची वस्ती आहे त्या राष्ट्रास तेथील राष्ट्रीकरणाच्या शिक्षणपद्धतीनें एकदम पचनीं पाडतां येईल असें म्हणवत नाहीं. ज्यू लोकांसारख्या लोकांनां शहरांत रहावयास मिळतें, आणि त्या लोकांनां राष्ट्रांत मानाच्या जागाहि अनेक मिळतात; तरी देखील ज्यू लोकांस राष्ट्रांत समाविष्ट करण्याचें काम कोठेंहि यशस्वी झालेलें नाहीं. तसेंच पारमार्थिक संप्रदाय हें वैयक्तिक मत असून तें आजच्या काळांत सुद्धां बापापासून मुलाला प्राप्त होतें, यावरून पितृमूलक धर्म राष्ट्रीकरणाच्या तडाक्यांत सांपडले तरी विलीन होतील किंवा नाहीं असा संशय वारंवार वाटतो.

जिप्सींच्या संबंधानें आपणांस जें करतां येईल आणि जें करणें आपणांस हितावह होईल तें हें कीं, त्यांचें भारतीयत्व जागृत करणें. या जागृतीच्या कार्यासाठीं आपल्या देशांतून जिप्सींमध्यें काम करण्यासाठीं प्रचारक गेले पाहिजेत. त्यांच्या भाषांचा अभ्यास करून, हिंदुस्थानच्या इतिहासाची त्यांस माहिती व्हावी व त्यांस आपल्या रामायण-भारतादि ग्रंथांची ओळख व्हावी या हेतूनें त्यांच्या भाषांत वाङ्मयहि तयार केलें पाहिजे.

जिप्सींनां संस्कृत भाषेची ओळख होऊन त्यांस संस्कृत भाषेशीं त्यांच्या भाषांचा असलेला संबंध कळावा हेंहि त्यांच्यामध्यें भारतीयभावना प्रसृत होण्यास अवश्य आहे. त्यांच्यामध्यें जाऊन जें कार्य करावयाचें तें दोन हेतूंनीं करावयाचें. एक हेतु त्यांची भारतीयभावना दृढ होत जावी हा होय. आणि दुसरा हा कीं, त्यांनां त्यांच्या वस्तीच्या देशांत चांगली अधिक स्थिति प्राप्त होण्याची व्यवस्था व्हावी. त्यांनां अधिकाधिक चांगली स्थिति प्राप्त झाली आणि त्यांच्या पत्करलेल्या देशांत त्यांनां मानाची पदवी प्राप्त झाली म्हणजे ते आपली अधिक महत्त्वाची जबाबदारी ओळखून ती पार पाडण्यास लायक होतील. जे लोक एका देशांतून दुसऱ्या देशांत गेले व तेथील नागरिक बनले त्यांचें संस्कृतीच्या इतिहासांतील स्थान फार महत्त्वाचें आहे. ते दोन राष्ट्रांतील मध्यस्थांचें कार्य करतात. तसेंच दोन भिन्न संस्कृतींनीं एकत्र मिसळण्याचें कार्य ते सोपें करतात. असो.

परदेशीय राजकारणाचें मुख्य ध्येय सर्व राष्ट्रांचा परस्परांशीं सुलभतेनें व्यवहार व्हावा हें होय. दुर्बलांचें संरक्षण करण्यासाठीं हिंदुस्थान जी खटपट करील ती वरील ध्येयास पोषक होईल.

---

## उपप्रकरण ८ वें.

## अल्पप्रदेशविषयक कर्तव्यें.

जगामध्यें आत्महितसंवर्धनार्थ जे जे प्रयत्न चालू आहेत त्यांचें पृथक्करण करणें, त्यांचा परस्पर संबंध लक्षांत घेणें, समाजांतील अवयवांचा आणि क्रियांचा अन्योन्याश्रय ओळखणें आणि कोणत्याहि क्रियेची या अन्योन्याश्रयामुळें परिणामपरंपरा काय होते तिचा विचार करणें हें अर्थशास्त्राचें क्षेत्र आहे. या अभ्यासास प्रवृत्ति व्हावयाची ती अर्थात् इष्टवर्गाच्या हितार्थच व्हावयाची. जो इष्टवर्ग लेखकाच्या मनांत असेल किंवा ज्याचे अवयव आपण आहों अशी लेखकाच्या मनांत भावना असेल तो इष्टवर्ग अर्थशास्त्राचा अभ्यास करतांना आपण ओळखला पाहिजे. कोणाहि ग्रंथकाराचा सामाजिक, राजकीय किंवा अर्थशास्त्रावरील लेख घेतला कीं ग्रंथकाराचा इष्टवर्ग कोणता व त्याचें लिहिणें त्याच्या इष्टवर्गासाठीं किती आहे आणि सर्वसामान्य जनतेच्या हिताविषयीं किती आहे याचें पृथक्करण करणें अवश्य आहे. हा इष्टवर्ग अनेक प्रकारचा असतो.

**इष्टवर्गाचे प्रकार.**—(१) शासनतंत्राच्या म्हणजे राजकीय सत्तेच्या दृष्टीनें पृथक् असलेला वर्ग म्हणजे गांव, प्रांत, संस्थान, राष्ट्र, साम्राज्य इत्यादि. (२) जात किंवा महावंश या दृष्टीनें पृथक् असलेला वर्ग. (३) पारमार्थिक मतांप्रमाणें पृथक् झालेला वर्ग. ख्रिस्ती ( कॅथोलिक, प्रॉटेस्टंट इ० ), मुसुलमान, जैन इत्यादि. (४) धंद्यामुळें पृथक् झालेला वर्ग. (५) सामाजिक पदवी किंवा सांपत्तिक स्थिति यामुळें पृथक् झालेला वर्ग. उदा०, कामकरी मजूर, भांडवलवाले, घरवाले, भाडेकरी इत्यादि. (६) भाषेमुळें पृथक् असलेला वर्ग. उदा०, महाराष्ट्रीय, बंगाली, फ्रेंच इत्यादि.

ज्या वर्गांत विवक्षित व्यक्तीचा समावेश होतो त्या वर्गाच्या सुखदुःखावर त्या व्यक्तीचें सुखदुःख अवलंबून असतें आणि त्यामुळें वर्गविषयक अभिमान, वर्गविषयक व्यवहारनीति, वर्गविषयक सुखदुःखाची भावना हीं उत्पन्न होतात. या वर्गविषयक भावनांमुळें ज्या चळवळी उत्पन्न होतात त्या सर्वांचें विवेचन अर्थशास्त्रांत पाहिजे. तथापि इतकी व्यापक दृष्टि अर्थशास्त्रावरील ग्रंथांत अजूनं आले[illegible] कीं [illegible] ठमोठ्या [illegible] वर्गांतहि शास्त्रकार जगांतील जेत्या[illegible] कांहीं [illegible]नी अ[illegible]सीमून येतो.

ज्यांचें कर्तव्यक्षेत्र विस्तृत राज्य चालविण्यांत असतें अशा लोकांशीं संबद्ध असतात.

**अर्थशास्त्राचे प्रकार.**—लेखकाचा इष्टसमाज आणि त्या समाजाची शासनपद्धति यांचें जेथें ऐक्य असेल तेथें राष्ट्रविषयक अर्थशास्त्र उत्पन्न होतें. तथापि जेथें यांचें द्वैत असेल तेथें राष्ट्रविषयक अर्थशास्त्राचें क्षेत्र समाजांतील मुख्य वर्गांत नसून शासकवर्गापैकीं थोड्याशा भागांतच असतें. जित राष्ट्रें आणि जाती, पारमार्थिक संप्रदाय, भाषेनें पडणारे वर्ग यांच्यामध्यें समुच्चयभावना असेल तर त्या त्या समुच्चयाच्या सदस्यांत सामान्यहिताची कल्पना आणि आपल्या समुच्चयाच्या हिताची दृष्टि हींहि असतात आणि यामुळें राष्ट्रेतर-समुच्चयविषयक अर्थशास्त्रास अवकाश असतो. या प्रकारच्या अर्थशास्त्रावर अर्थशास्त्र या नांवाखालीं ग्रंथ नसतील. कारण अर्थशास्त्र या विषयाची विभागणी या तऱ्हेनें करावी अशी बुद्धि लेखकवर्गांत प्रसृत झालेली नाहीं; तथापि जे प्रयत्न अर्थशास्त्राचे विषय आहेत असे शेंकडों प्रयत्न राष्ट्रेतर समुच्चयांत दृष्टीस पडतात. त्या प्रयत्नांचें स्थूल स्वरूप येणेंप्रमाणें:—

(१) आपल्या चालीरीती, आपले ग्रंथ, आपली भाषा यांस चिरडूं पाहणाऱ्या बाह्य परिस्थितीपासून आपला बचाव करून घेणें.

(२) आपल्याआपल्यांत एकत्व उत्पन्न करणाऱ्या संस्था उत्पन्न करणें.

(३) जुन्या चालीरीतींस होतां होई तों चिकटून राहण्याचा प्रयत्न करणें.

(४) समाजाचें ज्या वाङ्मयानें एकीकरण होत असेल असें वाङ्मय उत्पन्न करणें.

(५) स्वतंत्र राज्यस्थापनेसाठीं प्रयत्न करणें.

(६) निराळ्या परिस्थितींत आणि निराळ्या देशांत जरी आपले लोक गेले तरी त्यांचें तद्देशीयांपासून पृथक्त्व व आपणांशीं सादृश्य राहील अशी खटपट करणें.

वरील प्रकारच्या चळवळी जित राष्ट्रांत अगर जातींत दिसून येतात. यहुदी लोक, आर्मेनियन लोक, हिंदुस्थानांतील पारशी आणि हिंदू यांच्यामध्यें या सर्व चळवळींचीं कांहीं अंगें दृग्गोचर होतील. यहुद्यानें आपली गिऱ्हाइकी होतां होई तों यहुद्यांसच द्यावी अशी यूरोपीय यहुद्यांमध्यें असणारी भावना, यहुद्यांमध्यें वारंवार निघणारे "अवतारी राष्ट्रोद्धारक"(मेसाया), झायनिस्ट चळवळ म्हणजे यहुद्यांचें संस्थान स्वतंत्र असावें म्हणून होणारी चळवळ आणि ख्रिस्ती लोकांशीं यहुद्यानें लग्न करूं नये म्हणून यहुद्यांस होणारा सिनेगॉगमधील उपदेश या सर्व [illegible] यहुद्यांचें कांहीं ज्ञातिविषयक स्वतंत्र अर्थशास्त्र आहे [illegible] आर्मेनियन लोकांनीं अनेक जुलूम [illegible] नये ही जी प्रवृत्ति दिसते, ती प्रवृत्ति अर्थशास्त्रानें उपेक्षा करण्याजोगी आहे काय? आज आर्मेनियानें स्वातंत्र्य पुकारलें त्याला राष्ट्रीय कर्ज देण्यास अमेरिका तयार झाली, आणि सोव्हियटांच्या संघामध्यें शिरण्याचें आर्मेनियानें ठरविलें इतकें आर्मेनियनांच्या स्वत्वस्थापनेच्या प्रयत्नास फल आल्यानंतर स्वत्वरक्षणासाठीं केलेला स्वार्थत्याग अयोग्य आहे असें कोण म्हणेल? प्रत्येक देशी नागरिकामध्यें स्वदेशीची भक्ति उत्पन्न करून त्यानें झीज सोसूनहि स्वदेशीच माल वापरावा ही जी बुद्धि उत्पन्न केली जाते ती बुद्धि अर्थशास्त्राचा विषय नाहीं काय? ऑस्ट्रियन साम्राज्यामधील हंगेरियन, क्रोईटन, बॉसनियन, स्लाव्ह या जातींनीं आणि रशियांतील फिनिक आणि युक्रेन लोकांनीं स्वभाषेच्या स्थापनार्थ जो प्रयत्न केला त्या प्रयत्नांतील आत्महितभावना सध्यांचे पुस्तकें लिहणारे अर्थशास्त्रज्ञ कोणत्या भागांत घालतील?

राष्ट्रांखेरीज इतर समुच्चयांमध्यें समुच्चयविषयक भावना असतेच; तथापि त्या भावनांचे अर्थशास्त्राच्या दृष्टीनें जे परिणाम घडतात ते राष्ट्रविषयक भावनेच्या परिणामांपेक्षां दुर्बल असतात; कां कीं, निग्रहानुग्रहशक्ति राष्ट्रांमध्यें असते तशी परतंत्र समाजांत नसते. महत्त्वाचे परिणाम घडवून आणणें हें जसें सरकारास शक्य असतें तसें इतरांस कसें शक्य असणार? समुच्चयभावना उच्च असली तरी अधिकाराभावामुळें ती अर्थशास्त्राच्या दृष्टीनें परिणामकारक होत नाहीं आणि एकंदर जगांतील अर्थशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाचे असे व्यवहार घेतले तर त्यांत राष्ट्रेतर समुच्चयांच्या विषयींच्या भावनांमुळें झालेले परिणाम क्षुद्र दिसतील. तथापि आपण आपल्या कल्पनाशक्तीस जर चांगलें चलन दिलें तर या समुच्चयभावनांचे परिणाम फारसे क्षुद्र दिसणार नाहींत. व्यक्तीकडून होणारें कार्य कांहीं अंशीं या समुच्चयभावनांवर अवलंबून असतें. मालाचा खप हा देखील समुच्चयभावनेनें ठरूं शकतो. उदाहरणार्थ, आज मुसुलमानांनीं बनवलेलीं लोणचीं हिंदू घेत नाहींत, हा जो खपावर परिणाम आहे हा या प्रकारचा आहे. फार कशाला, खोजानें किंवा वोहऱ्यानें बनविलेली मिठाई घ्यावयास कांहीं हरकत आहे काय असें विचारल्यास त्या प्रश्नाचें उत्तर देणें हिंदूस कठिणच जाईल. आर्थिक व्यवहारामध्यें आणि मालाची बनावट किंवा विक्री ह्यांमध्यें घातलेले समुच्चयविषयक प्रतिबंध थोडे आहेत काय? मोठ्या प्रमाणावर उत्पादन आणि खप होणें हें जातिभेदानें बद्ध असलेल्या हिंदुस्थानांत जेवण्याखाण्याच्या पदार्थांच्या बाबतींत शक्य आहे काय? अर्थात् नाहीं. कां कीं, येथें खाणावळी जात्यनुसार असतात. श्रीमंत महाराचा ब्राह्मणांच्या खाणावळींत शिरकाव व्हावयाचा नाहीं आणि गरीब ब्राह्मणास गिरणींतील मजुरांच्या खाणावळींत जाणें शक्य नाहीं. अर्थात् आपल्या रीतीभाती, आपल्या

अभिरुची, आपला आयुष्यक्रम यांचें पृथक् रक्षण करून समाजांत एकरूपता येण्यास व उत्पादन आणि खप यांची सार्वलौकिकता होण्यास विरोध करून समाजाच्या प्रगतीस आळा घालण्याचें काम राष्ट्रेतर समुच्चयांचें अर्थशास्त्र करीत असल्याचें दृष्टीस पडतें.

**राष्ट्रीयत्वाची तृष्णा व तिचें मूळ.**—राष्ट्रीयत्वाची तृष्णा जीं राष्ट्रें परकीय सत्तेखालीं असतात त्यांच्यामध्यें असते. ही तृष्णा उत्पन्न होण्याचीं व्यावहारिक कारणें कोणतीं आहेत हें पाहूं. हीं कारणें येणेंप्रमाणें दिसतात.

(१) शासकवर्गाची सामाजिक उच्चता.

(२) जनतेंतील लोकांस शासकवर्गांतील लोकांपेक्षां जीवनकलहांत शासकवर्गाकडून कमी साहाय्य मिळतें.

(३) सामाजिक सुखें शासकवर्गास जितकीं मिळतात तितकीं जनतेस मिळत नाहींत.

(४) राष्ट्रस्वातंत्र्यामुळें राष्ट्रांतील उच्चवर्गास दुसऱ्या राष्ट्राच्या उच्चवर्गाशीं बरोबरीच्या नात्यानें वागण्याची जी संधि मिळते ती जित राष्ट्रांतील उच्चवर्गास मिळत नाहीं.

(५) जित राष्ट्रांस सामुच्चयिक इतिहासच नसतो.

(६) स्वकीय उच्चवर्गाच्या आश्रयानें स्वतंत्र राष्ट्रांतील वाङ्मयास जें स्वरूप येतें तें जित राष्ट्रांच्या वाङ्मयास येत नाहीं.

या सर्व प्रकारच्या विचारांचा आज सुशिक्षित भारतीय जनतेवर परिणाम होत आहे; आणि जोंपर्यंत स्वतंत्र आणि जित असा भेद समाजांत आहे, तोंपर्यंत चालू सामाजिक घटना अस्थिर आहे असें समजावें.

**महाराष्ट्राचा विशेष विचार.**—सर्वसामान्य तात्त्विक विचार सोडून आतां आपलें लक्ष महाराष्ट्राकडे लावूं. विशिष्ट विषयाचा विचार केला असतां सामान्य तत्त्वें आपोआप स्पष्ट होतील. महाराष्ट्राचा आपल्याला शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास करणें आहे. शास्त्र म्हणजे सामान्य तऱ्हेचें जें ज्ञान असेल त्यास मोजमाप लावून अधिक निश्चित केलेलें ज्ञान. आज सामाजिक स्थितीचा अभ्यास करतांना फारच थोडें समाजविषयक ज्ञान आपणांस परिमाणात्मक करतां येतें. संपत्तीचे आंकडे देशादेशांचे मिळवून कोणत्याहि दोन देशांच्या संपत्तीची तुलना करतां येते. विवक्षित देशांतील लोकांच्या मृत्यूंचे आंकडे गोळा करून तेथील लोकांचा शिक्षणोत्तर उत्पादनकाल मोजतां येतो. तथापि आंकडेशास्त्र समाजाच्या सर्वच अंगांचा विचार करण्यास उपयोगीं पडत नाहीं. आंकड्यांचें अस्तित्व आणि आंकडे मिळविण्याची शक्यता या दोन गोष्टींचा विचार करून समाजशास्त्रीय प्रश्नाकडे वळावें लागतें. आंकडेरूपी साहित्याच्या अभावामुळें किंवा अशक्यतेमुळें, जेथें आंकडेशास्त्र लंगडें पडतें तेथेंहि समाजशास्त्राच्या अभ्यासकास कांहीं परिश्रमक्षेत्र असतें. प्रथमतः हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, परिमाणात्मक ज्ञान ज्ञानार्थयत्नाच्या उत्तरकालीं प्राप्त होतें. पहिल्यानें जें ज्ञान मिळतें तें गुणबोधक असतें. पाणी कढत आहे हें सांगणें निराळें आणि पाण्याचा कढतपणा ८० डिग्री सेंटिग्रेड आहे असें सांगणें निराळें. मापानें मोजतां येण्यापूर्वी म्हणजे परिमाणात्मक ज्ञान प्राप्त होण्यापूर्वी गुणात्मक ज्ञान मिळवितां येतें. असो.

आज भाषेच्या तत्त्वावर प्रांत पडले नाहींत त्यामुळें महाराष्ट्र व इतर भाग यांची तुलना करण्यासाठीं आंकडे मिळत नाहींत. प्रांतांचे आंकडे मिळतात पण त्यांचा शास्त्रास फारसा उपयोग नाहीं. मुंबई इलाख्यांतील ब्राह्मण व मध्यप्रांत आणि वऱ्हाड यांतील ब्राह्मण यांच्या आंकड्यांची तुलना करून काय उपयोग? एकीकडे सुशिक्षित महाराष्ट्रीय ब्राह्मण व पाणीभरे गुजराथी ब्राह्मण यांचे आंकडे एकत्र करावे लागतात तर दुसरीकडे महाराष्ट्रीयांचे आंकडे रांगड्यांशीं मिश्र होतात. समाजशास्त्राचा अभ्यास जो करावयाचा असतो तो विशेषतः समाजाचें हित साधण्यासाठींच करावयाचा असतो. शास्त्रीय दृष्टीचें म्हणजे पद्धतशीर अवलोकन जर व्यवहारांत त्या अवलोकनाचा उपयोग होणार असेल तरच होतें. सामाजिक अथवा कोणतींहि शास्त्रीय तत्त्वें विशिष्ट प्रश्न हातीं घेतल्यानेंच खुलीं होतात, आणि तीं लोकांपुढें सोदाहरण मांडलीं तरच त्यांस समजतात. समाजाचा पद्धतशीर अभ्यास कसा करावयाचा हें समजून घ्यावयाचें म्हणजे एखाद्या विशिष्ट समाजाचें हित करण्याची बुद्धि जागृत ठेवून तो समाज अधिक सुखी कसा होईल याचे उपाय शोधीत बसावयाचें. आपणांस भारतीय या दृष्टीनें आपलें सामुच्चयिक हित साधावयाचें आहे, तसेंच तें हिंदु या दृष्टीनें व महाराष्ट्रीय या दृष्टीनें साधावयाचें आहे. महाराष्ट्रीय दृष्टीनें आपलें हित साधण्यासाठीं खटखट करण्याकरितां समाजाचीं आजचीं वैगुण्यें शोधण्याकडे आणि नंतर त्यांवर उपाययोजना करण्याकडे आपण अगोदर लक्ष दिलें पाहिजे; कारण, महाराष्ट्रीयांस पुढें सारणें हें आपलें हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें कर्तव्य आहे. जोंपर्यंत महाराष्ट्र दुर्बल आहे तोंपर्यंत त्याच्याकडून इतर भागांशीं चांगल्या तऱ्हेनें सहकार्य व्हावयाचें नाहीं.

महाराष्ट्रीय समाजाचें स्थूल वर्णन येणेंप्रमाणें करतां येईल. हा सुमारें दोन कोटी लोकांचा समूह बऱ्याच विस्तीर्ण प्रदेशावर पसरला आहे. ज्या प्रदेशांत महाराष्ट्रीयांचें आधिक्य आहे तो महाराष्ट्र असें म्हटल्यास महाराष्ट्र मोठा विस्तृत प्रदेश आहे असें म्हणावें लागेल. जर या प्रदेशांतील लोकांस कार्यस्वातंत्र्य मिळालें तर बऱ्याच मोठ्या प्रदेशावर महा[illegible] मंडळीचा अधिकार चालेल. महा[illegible] [illegible]ठमोठ्या, [illegible] वर्गांतहि नाहीं. या प्रदे[illegible] [illegible] कांहीं [illegible]ती अ[illegible]सून येतो.

दार्ढ्य दृष्टीस पडतें. महाराष्ट्रामध्यें समाजाचा विस्तार अधिक होऊन दार्ढ्य कमी झालेलें दिसतें. या परिस्थितीचा पुढेंमागें महाराष्ट्रास हितकर असा परिणाम होईल. महाराष्ट्रांत आलेले परके लोक महाराष्ट्रीय होतील. महाराष्ट्राचा विकास होण्यास ही स्थिति उपकारक आहे. महाराष्ट्रांत येऊन वस्ती करून राहिलेले लोक जर पुढेंमागें महाराष्ट्रीय झाले तर आजचें जें समाजदौर्बल्य आहे तें नाहींसें होईल.

ही इष्ट स्थिति घडवून आणण्यासाठीं जी एक गोष्ट अवश्य आहे ती ही कीं, महाराष्ट्रीय जनतेची सामुच्चयिक आणि वैयक्तिक कार्यशक्ति आज आहे त्यपेक्षां पुष्कळच अधिक विकसित झाली पाहिजे. ती याप्रमाणें विकसित होण्यासाठीं काय केलें पाहिजे हें शोधणें कर्तव्यात्मक समाजशास्त्राचा म्हणजे सामाजिक सुधारणेचा मुख्य भाग होय. समाजाची अंतर्गत स्थिति कशी असावी, तेथें सामाजिक भेदभाव कमी असावा अगर अधिक असावा हें समाजाच्या पुढें जें कार्य असेल त्यावरून ठरतें. महाराष्ट्रापुढें जें कार्य पूर्वी होतें त्यामुळें आजची स्थिति उत्पन्न झालेली आहे. हें पूर्वीचें कार्य येणेंप्रमाणें होतें. महाराष्ट्रानें हिंदुस्थानांतील बऱ्याच मोठ्या भागावर राज्य करावयाचें, लोकांनीं सैनिक वृत्तीनें रहावयाचें आणि जमिनीची मालकी मिळवावयाची. या ध्येयामुळें व्यापार वगैरेकडे दुर्लक्ष झालें, आणि पुष्कळ प्रदेश थोड्या संख्येनें व्यापावयाच्या प्रयत्नामुळें देशास जें स्वरूप येतें तें प्राप्त झालें. याविषयींचें विशेष आंकडे महाराष्ट्रीय वाङ्मयसूचीच्या प्रस्तावनेंत दिले आहेत.

आतां आपणांपुढील जो प्रश्न आहे तो व्याप्त केलेल्या प्रदेशास महाराष्ट्रीय स्वरूप कसें काय यावें याविषयींचा आहे, आणि पुढील प्रयत्न या दृष्टीनें होईल असा अजमास आहे. महाराष्ट्रीयांनीं अधिकांशानें व्यापिलेल्या प्रदेशास महाराष्ट्रीय स्वरूप यावें यासाठीं भाषेनुसार देशविभागणीच्या तत्त्वाचा अंमल झाला पाहिजे. देशाचे विभाग भाषेच्या तत्त्वानुसार पाडावे हें तत्त्व आतां लोकांस हळू हळू मान्य होऊं लागलें आहे आणि कै. लोकमान्य टिळकांनीं काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचें जें कार्य म्हणून पुढें मांडलें त्यांत हें तत्त्व गोंवून दिलें आहे.

**सामुच्चयिक कार्यशक्ति.**—आतां यानंतर मुख्य प्रश्न हा आहे कीं, आपली सामुच्चयिक कार्यशक्ति कशी वाढवावयाची ?

एखाद्या समाजाची किंमत करावयाची म्हणजे प्रथमतः त्या समाजाची कर्तृत्वशक्ति मोजावयाची. ही मोजतांना [illegible] प्रश्न [illegible] पाहिजेत.

[illegible] य आहे ?

(२) समाजांतील व्यक्तींची प्रत्येक व्यक्तीच्या कार्यानें उत्पन्न झालेली शक्ति एकत्र केली असतां किती होते ?

समाजांतील व्यक्तींची संघटित स्थितींत उत्पन्न झालेली कार्यशक्ति प्रत्येक व्यक्तीच्या स्वतंत्रपणें कार्य करतांना दृग्गोचर होणाऱ्या शक्तीपेक्षां पुष्कळ पटीनें अधिक असते. राष्ट्र म्हणजे व्यक्तींची संघटित स्थिति. कंपनी, ट्रस्ट वगैरे संघ वस्तूंच्या उत्पादनासाठीं तयार झालेले असतात आणि त्यांचें कार्यक्षेत्र नियमित असतें. ज्या संघाचें कार्यक्षेत्र नियमित नसून सर्वव्यापी आहे आणि मनुष्यमात्राच्या सामुच्चयिक स्थितीची पूर्णावस्था ज्या संघांत दृग्गोचर होते तो संघ म्हटला म्हणजे राष्ट्र होय. सर्वच राष्ट्रें आपल्या सर्व सभासदांचें म्हणजे नागरिकांचें सर्व प्रकारें श्रेय साधण्यासाठीं आपलें अस्तित्व आहे हें ओळखतात असें नाहीं. जें राष्ट्र हें कर्तव्य अधिक ओळखतें तें राष्ट्र अधिक प्रगमनशील आहे असें समजलें जातें. स्वातंत्र्यनाश म्हणजे नागरिकांच्या सामुच्चयिक हितास अत्यंत उत्कटतेस पोंचवावयाच्या संधीचा नाश होय. स्वराज्याची इच्छा म्हणजे सामुच्चयिक हित अधिकाधिक साधतां येईल अशा परिस्थितीची इच्छा होय. ही इच्छा जोंपर्यंत अस्तित्वांत नाहीं तोंपर्यंत स्वराज्याची इच्छा म्हणजे समाजांतील कांहीं चळवळ्या व्यक्तींनां अधिक महत्त्वाचें पद मिळावें ही इच्छा होय.

महाराष्ट्रास स्वराज्य नाहीं म्हणजे महाराष्ट्रीयांस आपलें हितसाधन सामुच्चयिक प्रयत्नानें करण्याची संधि नाहीं. ही संधि नसतां महाराष्ट्रीयांचें सामुच्चयिक कार्य किती झालें याची मोजदाद करणें व्यर्थ वाटतें. आपणांस सोळा आणे सामुच्चयिक हितसाधन करून घेणें शक्य होण्यास दोन गोष्टी पाहिजेत. एक स्वराज्य पाहिजे आणि दुसरें सामुच्चयिक हितसाधनाची राष्ट्रांत आकांक्षा पाहिजे.

महाराष्ट्राची स्थिति एकंदरींत फार विलक्षण आहे. महाराष्ट्रांतील मुख्य राज्यकर्ते परके आहेत. इंग्रज, पोर्तुगीज व निजाम या त्रयीनें महाराष्ट्रांतील बहुतेक भाग व्यापला आहे. महाराष्ट्रीय संस्थानिक महाराष्ट्राबाहेर आहेत. तेथें जर राजांमध्यें प्रजेच्या हिताविषयीं अधिकाधिक दक्षता उत्पन्न होऊं लागली तर तिचा फायदा महाराष्ट्रीयांस न मिळतां इतरांस मिळणार. महाराष्ट्रीय हिताची वृद्धि स्वजातीय राज्यकर्त्यांमार्फत व्हावयासारखें क्षेत्र म्हटलें म्हणजे कोल्हापुर संस्थान आणि सांगली मिरजेसारख्या जहागिरी होत. तेथें स्वदेशीय लोकांच्या हातीं कांहीं तरी सत्ता आहे. महाराष्ट्रीय संस्थानांत देश्य लोकांच्या हितसाधनाचा प्रयत्न फारसा झालेला दिसत नाहीं याचें कारण तेथें असलेला एतद्विषयक विचाराभाव होय.

**सामुच्चयिक प्रयत्नाचें क्षेत्र.**—सोळा आणे हित स[illegible]साध्य होण्यासाठीं काय आवश्यक गोष्टी आहेत त्यांची कल्पना

मार्गे दिली आहे. स्वराज्य नसतां प्रयत्नास कांहीं एक क्षेत्र नाहीं असें मात्र नाहीं. सामुच्चयिक प्रयत्नास सध्यां जें क्षेत्र आहे त्याची स्थूल कल्पना येणेंप्रमाणें देतां येईल.

(१) भांडवलाच्या एकीकरणानें होणारे मोठे प्रयत्न.

(२) म्युनिसिपालिट्यांसारख्या संस्थांकडून होणारे प्रयत्न.

या दोन तऱ्हेच्या प्रयत्नांनीं कांहीं तरी सामुच्चयिक हित साध्य होईल.

सामुच्चयिक हिताची कल्पना अधिकाधिक वृद्धिंगत व्हावयासाठीं सामुच्चयिक स्पर्धेची कल्पना स्पष्ट झाली पाहिजे. सर्व हिंदुस्थानामध्यें द्रव्यानें दुर्बल असा जर वर्ग असेल तर तो महाराष्ट्रीयांचा होय आणि तो वर्ग सबल करणें हें प्रत्येक महाराष्ट्रीय संस्थेचें कर्तव्यकर्म आहे. ही कल्पना महाराष्ट्रीयांस जितकी अधिकाधिक पटेल तितका स्वकीय जनांच्या सामुच्चयिक हिताच्या वृद्धीसाठीं त्यांजकडून अधिकाधिक प्रयत्न होईल.

महाराष्ट्रीय लोकांनां जगांतील स्पर्धेत ज्या अडचणी आहेत त्या भासावयास नुकताच प्रारंभ झाला आहे. आज समाजाचें धंद्यांच्या दृष्टीनें पृथक्करण केलें तर असें दिसतें कीं, महाराष्ट्रीय वर्ग दोन कार्यांत गुंतला आहे. एक कार्य शेतकी करणें व दुसरें व्यापारी अगर सरकारी नोकरी करणें हें होय. महाराष्ट्रांतील राजकीय किंवा सार्वजनिक चळवळी करणारा वर्ग एकंदर हिंदुस्थानाच्या सांपत्तिक स्थितीविषयीं आपल्या बुद्ध्यनुसार चळवळी करतो. पण महाराष्ट्रांतील कसाबसा जीव धरून काम करणारा जो व्यापारी वर्ग आहे त्याच्या हिताकडे लक्ष देऊन त्याविषयीं चळवळ काय करावी याविषयीं महाराष्ट्रांतील विचार करणाऱ्या वर्गांत फारशी फिकीर असल्याचें दिसत नाहीं. महाराष्ट्रांत सामान्यपणें व्यापार करणारा वर्ग जर अत्यंत लहान, थोड्या भांडवलाचा आणि दुर्बल आहे तर तो भांडवलाचें एकीकरण करून मोठमोठीं कार्यें घडविण्यासाठीं कसा प्रवृत्त होणार? त्याची सामुच्चयिक महत्त्वाकांक्षाच लहान आहे. सर्व जगाच्या चळवळींत आपणांस कांहींतरी स्थान मिळावें या बुद्धीनें तो प्रेरित झालेला दिसत नाहीं.

**धंद्यांतील वाकबगारी.**—मोठमोठ्या कल्पना करून मोठें कार्य पार पाडण्यासाठीं आणि देशांतील व्यापार आपल्या हातीं घेण्यासाठीं आज प्रयत्न नाहीं तर नाहीं, आज निदान एवढें तरी झालें पाहिजे कीं, मुख्य कार्यसूत्रें परक्याच्या हातीं असोत, पण दुय्यम सूत्रें तरी आपल्या हातीं रहावीं असा प्रयत्न पाहिजे. मोठ्या प्रमाणावर जे धंदे अगर कार्यें होतात त्यांची मुख्य कार्यशक्ति त्या कार्यास जो भांडवल पुरवतो त्याच्या ठायींच स्थित होते. भांडवलाच्या अल्पत्वानें अडचणींत पडलेल्या महाराष्ट्रीयांच्या हातांत हीं मुख्य कार्यसूत्रें येणें शक्य नाहीं. दुय्यम मुख्यपणाचीं सूत्रें विशिष्ट कामांत जो वाकब असेल त्याच्या हातीं [illegible] असतात. भांडवलवाला त्याला जरी भाड्यानें घेतो तरी त्याच्या तंत्रानें बराचसा वागतो. महाराष्ट्रीयांच्या अंगीं हीं दुय्यम प्रकारचीं सूत्रें असल्याचेंहि दिसत नाहीं. तीं सूत्रें हातीं येण्यासाठीं कामांत वाकबगारी पाहिजे. ही वाकबगारी आज महाराष्ट्रीयांच्या अंगांत नाहीं; आणि असें असण्यास कारणेंहि आहेत. एकतर महाराष्ट्रामध्यें साक्षरवर्ग गुजराथ्यांपेक्षां फारच ल्हान आहे. गुजराथी हिंदूंमध्यें (१० वर्षांपेक्षां अधिक वयाच्या) साक्षरतेचें प्रमाण शेंकडा साडेबावीस आहे व तेंच महाराष्ट्रीयांच्या समाजांत शेंकडा सहा आहे.* यामुळें व्यापारधंद्यांमधील वरच्या जागा मिळविणें आज महाराष्ट्रीयांस शक्य नाहीं. मुंबईच्या बहुतेक मोठमोठ्या व्यापारी संस्था गुजराथी, मारवाडी, पारशी यांसारख्या लोकांच्या आहेत, एवढेंच नव्हे तर त्या संस्थांतील मुख्य मदतनीस देखील त्यांच्यांतलेच आहेत. मराठी कुणबी ओझीं उचलण्याचें हमाली काम करण्यास उपयोगीं पडतो व कधीं कधीं महाराष्ट्रीय मनुष्य व्यापारी कारकुनी करतांना दिसतो, इतकेंच काय तें. व्यापारी कारकुनींत देखील महाराष्ट्रीय विरळाच.

या तऱ्हेची स्थिति असल्यामुळें जे प्रयत्न झाले पाहिजेत त्यांचें स्वरूप येणेंप्रमाणें सांगतां येईल.

(१) साक्षरता अधिकाधिक वाढविली पाहिजे.

(२) तरुण मंडळीपैकीं बरेच लोक अधिक विविध धंद्यांत शिरावे म्हणून संघटित प्रयत्न झाला पाहिजे.

(३) लोकांच्या भांडवलाचें एकीकरण होऊन मराठी बोलणाऱ्या व्यापारी वर्गास प्रामुख्य मिळावें म्हणून प्रयत्न झाला पाहिजे.

**आर्थिक महत्त्वाकांक्षा.**—महाराष्ट्राला आर्थिक महत्त्वाकांक्षा नाहीं. महाराष्ट्र या देशाला मोठी महत्त्वाकांक्षा उत्पन्न होईल काय? महाराष्ट्र हा आज संपन्न देश नाहीं. मोठमोठ्या रकमा एकत्र होऊन त्या लोकांच्या हातीं येऊन त्यांचा अधिकद्रव्योत्पादनार्थ उपयोग कसा काय करावा या तऱ्हेचा प्रश्न लोकांपुढें उत्पन्न झाला म्हणजे देशांतील भौतिक संपत्तीचें आणि त्या भौतिक संपत्तीच्या अनेक उपयोगांचें आणि उद्यमांस उपयुक्त होणाऱ्या भौतिक शक्तींच्या लीलांचें ज्ञान करून घेण्याची वृत्ति देशांत उत्पन्न होते. कारखान्यास साहित्य जवळ मिळालें नाहीं तर दुरून मिळवावें, या प्रकारची कल्पना देखील व्यक्तीचें अवलोकनक्षेत्र विस्तृत करावयास लावते. या प्रकारची चोदना आज महाराष्ट्रास नाहीं. महाराष्ट्राच्या मोठमोठ्या रकमा फारशा कोठें गुंतल्या नाहींत आणि अनेक मनुष्यांच्या शिलका गोळा होऊन जो संचय होतो त्या प्रकारचा संचय महाराष्ट्रीयांच्या ताब्यांत नाहीं. त्यामुळें सर्व जगाकडे आर्थिक दृष्टीनें पाहण्याची महाराष्ट्रीयांची प्रवृत्तीच नाहीं.

---

* [illegible] मोठमोठ्या [illegible] वर्गांतहि [illegible] महाराष्ट्रीय [illegible] कांहीं [illegible] नी अ[illegible]सून येतो.

व्यापाराची वृद्धि होण्यास अवश्य लागणारी एक गोष्ट म्हणजे राजधानीचीं किंवा उतारपेठेचीं ठिकाणें. अशीं ठिकाणें महाराष्ट्रांत आजपर्यंत होऊन गेलीं त्यांपैकीं हिंदुकालामधील अवशेष देवगिरी, चौल व सोपारे याखेरीज दुसरे आढळत नाहींत. मुसुलमानी काळांत प्रसिद्धीला आलेलीं ठिकाणें म्हणजे विजापूर; अहमदनगर आणि इलिचपूर हीं होत. येथें चोहोंकडची संपत्ति येऊन खर्च होत गेल्यामुळें थोडीबहुत कला वाढलेली दिसत असे. मराठी अमदानींत पुणें, नागपूर, कोल्हापूर हीं शहरें भरभराटीस आलीं आणि मराठी राहणीस उपयोगीं पडणारी कला येथें थोडीशी वाढली.

व्यापारी राष्ट्र बनण्यास महाराष्ट्रीयांस अगदीं प्रारंभापासून अडचणी होत्या. अगोदर हें दंडकारण्य, उशीरा वसलेलें; त्यांत पुष्कळ भाग डोंगराळ. मेळघाट, बालाघाट, सह्याद्रि व सातपुडा हे डोंगर माळांच्या नेआणीस वरीच गैरसोय करणार. महाराष्ट्राला जवळचें असें बंदर तरी कोणतें होतें ? येऊन जाऊन चौल. तेथील व्यापारी वर्ग कोणता होता याविषयीं आज स्पष्ट माहिती नाहीं. गुजराथची गोष्ट निराळी आहे. गुजराथला बंदरें पुष्कळ. सुरत व भडोच हीं फार जुनीं बंदरें आहेत. यामुळें येथें बराच मोठा व्यापारी वर्ग येऊन राहिला. गुजराथी लोक व्यापारी बनले व महाराष्ट्रीय बनले नाहींत असें विधान करण्यापेक्षां व्यापार करणारे लोक गुजराथेकडे गेले असें विधान केलें असतां तें अधिक बरोबर होईल. गुजराथेमध्यें वाणी पुष्कळ आहेत पण महाराष्ट्रांत वाण्याची जात जवळजवळ नाहींच. कोंकणपट्टीला कांहीं कुडाळे वाणी, वैश्य वाणी म्हणून विड्यांचा धंदा करितात आणि पुण्याकडे थोडेसे काथर वाणी व कुळवंत वाणी आहेत. पण या सर्वांचे धंदे लहान प्रमाणावर आहेत. जे लोक मोठ्या उतारपेठेंत नाहींत ते लोक धंदा तरी काय करणार ? मराठी वाण्यांची कार्यशक्ति लहानशा दुकानदारीपलीकडे फारशी गेलेली दिसत नाहीं. पेशवाईमध्यें किंवा मराठेशाहीमध्यें सावकारीच्या धंद्यास एक निराळें क्षेत्र होतें. तें म्हटलें म्हणजे लढाया करणें, मुलुख जिंकणें इत्यादि खटपटींनां पैसा पुरविणें हें होय. या प्रकारची सावकारी पुण्यांत बरीच होती. त्याशिवाय सावकारीचें सध्यांचें जें जुजबी काम आहे तेंहि पूर्वीं असेच. जमिनीवर किंवा दागिन्यांवर पैसा देणें हा व्यवहार जितपत सध्यां समजतो तितपत पूर्वींहि समजत असे. कलाकौशल्य वाढविण्याच्या बाबतींत खटपट केली अशा तऱ्हेचा आरोप मराठेशाहीवर कधींच येणें शक्य नाहीं, तेव्हां कलाकौशल्याच्या संवर्धनासंबंधींच्या सावकारीचा हिशोब कशास घेत बसावयाचा ? महाराष्ट्रामध्यें जीं लुगडीं खपतात त्यांच्या देखील महत्त्वाच्या पेठा म्हणजे अहमदाबाद, महेश्वर, सकल. या पेठा महाराष्ट्राच्या बाहेरच आहेत. कुणब्याच्या [illegible] याजोगीं लुगडीं आणि घरांत वापरतां [illegible] आढळतात. सध्यां मराठी सुतारहि कोठें दिसेनासा झाला आहे. पांचकळशांनीं तर आपला सुतारीचा धंदा सोडून दिल्यासारखाच आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हटल्यास चहाचीं दुकानें, किरकोळ वाणसौदा व स्टेशनरी आणि मधूनमधून सामान्य कापडाचें दुकान यापलीकडे महाराष्ट्राच्या हातांत कांहीं व्यापार नाहीं, कलाकौशल्य नाहीं आणि धंद्यांस उत्तेजन देणारी सावकारीहि नाहीं.

**जुने व्यापारी मार्ग व जुनी सावकारी.**—महाराष्ट्रांतील पूर्वींचे दळणवळणाचे मार्ग व सावकारीची पद्धति यांवर प्रकाश पाडणाऱ्या कांहीं गोष्टी येथें देतों.

कोंकणांतील चौल, कल्याण, सोपारे, ठाणें व दक्षिणेंतील जुन्नर, नाशिक, पैठण यांचा प्राचीन इतिहास पाहिला असतां पुणें जिल्ह्यांतून बरेच व्यापारी मार्ग होते असें दिसतें. ख्रिस्ती शकापूर्वींच्या पहिल्या शतकांत जुन्नरहून समुद्रकिनाऱ्यावर जाण्याकरितां माळसेज घाटांतून एक व नानाघाटांतून एक असे दोन मुख्य रस्ते होते. या दोन्ही रस्त्यांवर त्या काळचे शिलालेख, पायऱ्या, हौद, इत्यादि गोष्टी अद्यापि अस्तित्वांत आहेत. त्याचप्रमाणें बेडसा, भाजा व कारला येथील बौद्धांच्या वेळचीं लेणीं व इतर स्थानें यांचा काल लक्षांत घेतां ख्रिस्ती शकापूर्वीं १०० पासून इ. स. ६०० पर्यंत बोरघाट हा देखील एक व्यापारी मार्ग होता असें दिसतें. शिवनेरीवर असलेल्या एका हौदावरून देवगिरीच्या यादवांच्या वेळेस जुन्नर हें एक व्यापाराचें ठिकाण होतें असें दिसतें. पुढें पेशव्यांची राजधानी पुणें शहर झाल्यावर पेशव्यांनीं नाना, माळसेज, भीमाशंकर आणि कसुर हे घाट बरेच सोईचे केले होते असें दिसतें.

**इ. स. १८२६ सालीं अस्तित्वांत असलेले रस्ते.**

मुंबई—अहमदनगर रस्ता. पनवेलपासून या रस्त्याची लांबी १४८ मैल.

मार्गः—पनवेल—चौक—खालापूर—खोपवली—बोरघाट—खंडाळें—लोणावळें—खडकाळें—वडगांव—कुवले—तथवडे—औंध—पुणें—वाघोली—लोणी—कोरेगांव—गणपतीचें रांजणगांव—कर्देलवाडी—शिरूर—हिंगणी—कडुस—रांजणगांव—सारोळें—अकुळनेर—केडगांव.

| | | |
|---|---|---|
| कल्याण-अवरंगाबाद | रस्ता | १८५ मैल. |
| पुणें-सुरत | रस्ता | २५४ मैल. |
| पुणें-कल्याण | ,, | ७५ मैल. |
| पुणें-जुन्नर | ,, | ८५ ,, |
| पुणें-खंडाळा | ,, | ५० ,, |
| पुणें-धुळें | ,, | २०१ ,, |
| पुणें-अवरंगाबाद | ,, | १४४ ,, |
| पुणें-सोलापुर (सावलेश्वरमार्गें) | ,, | १५७ ,, |
| पुणें-सोलापुर (दिवाघाटमार्गें) | ,, | १५७ ,, |
| सोलापुर-सिकंदराबाद | ,, | १९२ ,, |
| पुणें-पदूर-बेळगांव | ,, | २४१ ,, |
| पदूर—धारवाड | ,, | २१३ ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| पुणें–दापोली | रस्ता | ९७ | मैल |
| पुणें–गोरेगांव | ,, | ६६ | ,, |
| पुणें–निपाणी | ,, | २११ | ,, |
| पुणें–नागोठणें | ,, | ६४ | ,, |

मराठ्यांच्या अमदानींत सह्याद्रीपार होण्यास दोन महत्त्वाचे मार्ग होते. (१) पुणें-कोल्हापूर-कर्नाटक. या रस्त्यास बोरघाट साल्पाघाट आणि न्हावीघाट लागत. (२) रत्नागिरी-पंढरपूर रस्ता. कलढोण घाटांतून पंढरपूरकडे जात असे.

इ. स. १८२६ मध्यें सातारा जिल्ह्यांत पुढील रस्ते होते.

पुणें-सातारा-वेळगांव. (दोन रस्ते २४१ व २१३ मैल.)

सातारा-शिरूर ८७ मैल.

पुणें-सातारा-अहमदनगर. १२० मैल.

सातारा-सोलापूर (दोन रस्ते १३१ व १४८ मैल).

कऱ्हाड—राजापूर. ११७ मैल.

कऱ्हाड—मालवण. ११९ मैल. हा रस्ता कोल्हापूर-वरून फोंड घाटांतून जात असे.

सातारा-दापोली. (एक कुंभारली घाटांतून व दुसरा आंबोली घाटांतून).

देशावरून कोंकणांत यावयाचें म्हणजे मध्यंतरीं सह्याद्रि पर्वत लागतो. कुलाबा व ठाणा जिल्ह्याची एक सरहद्द सह्याद्रि पर्वतानेंच आंखली गेली आहे. त्या पर्वतावरून पलीकडे येण्या-करितां जे मार्ग आहेत त्यांस घाट असें म्हणतात. असे हे घाट ठिकठिकाणीं आहेत. महाबळेश्वरापासून राजमाचीपर्यंत जे घाट आहेत त्यांचीं नांवें:—

पार घाट—महाडाच्या आग्नेयीस सुमारें १५ मैलांवर किनेश्वरजवळ आहे. हा केवळ पायरस्ता असून येथून महाबळे-श्वरास जातां येतें. इ. स. १८२६ सालीं वंजारी लोक या मार्गानें कोंकणांतून धान्य व मीठ नेत असत.

फिट्झजेरल्ड घाट—पारघाटाच्या उत्तरेस अर्ध्या मैलावर कापडें खुर्द या खेड्याजवळ हा घाट आहे. साताऱ्यास जाणाऱ्या मार्गावर हा घाट आहे. येथून व्यापार बराच चालतो. महाड-हून वाई व नहर येथें आणि वाई व नहरहून महाड येथें दरवर्षी व्यापाराकरितां पुष्कळ माल येतो. कापडें येथें दस्तुरी होती.

ढवळा आणि कामठा घाट—फिट्झजेरल्ड घाटाच्या उत्तरेस सुमारें ५॥ मैलांवर आहेत. हे फक्त पायरस्ते असून यांचा कोणी फारसा उपयोग करीत नाहीं. या मार्गानें भोर संस्थानांतून वाई येथें जातां येतें.

वरंधा घाट—कामठा खिंडीच्या उत्तरेस पांच मैलांवर वरंधा नांवाच्या खेड्याजवळ हा घाट आहे. या घाटांतून हिरडोशी-भोर या गांवांवरून पुण्यास रस्ता जातो. इ. स. १८६७ सालीं हा रस्ता तयार झाला. या घाटांतून बराच व्यापार होतो. वरंधा घाटाच्या उत्तरेस पाव मैलावर माझेरीजवळ उंबर्डे घाट आहे. पायरस्त्याप्रमाणेंच याचा उपयोग होतो.

गोप्या घाट—उंबर्डे घाटाच्या उत्तरेस चार मैलांवर शिवतर-जवळ गोंदे-पुणें रस्त्यावर हा घाट आहे.

आंबेनाळ घाट—गोप्या घाटाच्या उत्तरेस एक मैल आंबे-शिवतरजवळ हा घाट आहे. येथून पुण्यास जाण्यास मार्ग आहे परंतु व्यापाराकरितां याचा कोणी उपयोग करीत नाहींत.

मढ्या घाट—आंबेनाळ घाटाच्या उत्तरेस एक मैलावर वाकी बुद्रुख खेड्याजवळ हा घाट आहे. येथून पुण्यास जाण्यास मार्ग आहे.

शेवत्या घाट—मढ्या घाटाचे उत्तरेस अर्ध्या मैलावर हा घाट आहे. येथून भोर संस्थानांतील पांगारा व तोरणा या गांवांवरून पुण्यास जाण्यास मार्ग आहे.

कावळ्या घाट—शेवत्या घाटाच्या उत्तरेस सहा मैलांवर हा घाट आहे. फक्त पायरस्ता आहे.

कुंभ घाट—कावळ्या घाटाच्या उत्तरेस आठ मैलांवर आहे. मशीदवाडी रस्त्यांतून हा रस्ता जातो. फक्त पायरस्ता आहे.

लिंग घाट—कुंभ घाटाच्या उत्तरेस चार मैलांवर लिंग घाट आहे. येथून ओझीं लादलेलीं जनावरें येऊं शकतात.

निसणी घाट—लिंग घाटाच्या उत्तरेस दोन मैलांवर हा घाट आहे. हा फक्त पायरस्ता असून चढ अतिशय आहे.

ताम्हाणे, देवस्थळी व थिव घाट—निसणी घाटाच्या उत्तरेस सहा मैलांवर माणगांवच्या ईशान्येस १४ मैलांवर असलेल्या विळे खेड्याच्या सरहद्दींत हे घाट आहेत. हे फक्त पायरस्ते आहेत.

पिंपरी घाट—ताम्हाणे घाटाच्या उत्तरेस चार मैलांवर पिंपरी घाट आहे. येथून ओझीं लादलेलीं जनावरें येऊं शकतात. हा घाट फार उपयोगांत आहे.

या घाटांपैकीं फिट्झजेरल्ड घाट, वरंधा घाट, पिंपरी घाट, आंबोली घाट, तळ घाट, बोर घाट, नाना घाट, कसुर घाट वगैरे घाटांतून बैलांवरून व्यापार होत असे. बाकीचे बहुतेक घाट फक्त पायरस्ते होते.

ठाणें जिल्ह्याच्या पूर्वेकडील सरहद्दीवर ११५ मैल सह्याद्रि पर्वत आहे. या भागावर असलेले घाट खालीं लिहिल्याप्रमाणें.

अंबोली घाट—त्रिंबकहून मोखाड्यास जातां येतें. घाट सोपा आहे.

चंद्रे आणि हुंबे मेट—हे दोन मार्ग त्रिंबकहून मोखाड्यास जाण्याकरितां आहेत. चंद्रे मेट सोपा आहे. हुंबे मेट हा फक्त पायरस्ता आहे.

गोंदे घाट—त्रिंबकहून जव्हार. जव्हार संस्थानांतील बराच व्यापार या घाटांतून होत असे.

शीर घाट—त्रिंबकहून वसईस जाण्याकरतां हा घाट होता. हल्लीं येथून गाड्या जाऊं शकतात. वंजारी लोक बैलावरून नाशिक येथून भिवंडी व वाडा येथें माल नेत असत.

तळ घाट—कसारा आणि इगतपुरी यांच्या दरम्यान हा खडी घातलेला रस्ता आहे. इ. स. १८२६ सालीं हा सर्वांत सोपा रस्ता होता. बैलगाड्या येथून जात असत. हल्लीं रेल्वे झाल्यामुळें या मार्गावरून व्यापार कमी होतो.

पिंप्री घाट—नाशिकहून वसई किं[illegible]ठमाळ्या [illegible] वर्गांतहि हा घाट फार सोयी[illegible] कांहीं [illegible]ती अ[illegible]सून येतो.

चोंढे-मेंढे—अहमदनगर जिल्ह्यांतील अकोला व राहुर गांवांहून शहापुर व भिवंडी येथें जाण्याकरितां याचा उपयोग होत असे. या मार्गानें धनगर लोक कोंकणांत मेंढरें व बकरीं विकावयास घेऊन येत.

साद्रे घाट—अकोला तालुक्यांतून मुरबाड तालुक्यांत या घाटानें उतरतां येत असे. हा अतिशय कठिण रस्ता होता. दरोडेखोरांच्या टोळ्या कोंकणांत दरोडे घालण्याकरितां याचा उपयोग करीत.

निसणी घाट—मुरबाड तालुक्यांतून जुन्नर तालुक्यांत जाण्याकरितां. हाहि फार अवघड आहे. पायरस्ता म्हणून देखील कोणी हल्लीं हा फारसा उपयोगांत आणीत नाहीं.

माळसेज घाट—अहमदनगरहून कल्याणास जातांना लागणारा घाट. येथून हत्ती, उंट जाऊं शकत असत.

भोरांडे घाट—मुरबाड तालुक्यांतून जुन्नर तालुक्यांत जाण्याकरितां. हा घाट कठिण असून फक्त कोळीच याचा उपयोग करतात.

नाना घाट—मुरबाड तालुक्यांतून जुन्नर तालुक्यांत जाण्याकरितां. तळघाट आणि बोरघाट यांच्या खालोखाल या घाटाचा उपयोग होत असे.

पलु घाट—कल्याण ते जुन्नर पायरस्ता.

कुटे घाट—मुरबाड तालुक्यांतून खेड तालुक्यांत जाण्याकरितां. हा फार अवघड असून फक्त कोळीच याचा उपयोग करतात.

गोवेली घाट—मुरबाड तालुक्यांतून खेड तालुक्यांत जातो. हा अवघड पायरस्ता आहे.

अवापे घाट—पायरस्ता. मुरबाड तालुक्यांतून खेड तालुक्यांत जातो.

शिदगड घाट—वरील प्रमाणेंच.

भीमाशंकर—देशावरून पनवेल पर्यंत जाणारा रस्ता. पूर्वी या घाटानें गूळ वगैरे कोंकणांत येत असे.

कसुर—सुस्थितींत आहे.

राजमाची घाट. यास कोंकण दरवाजा म्हणत.

फार प्राचीन काळापासून सोळाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत चौल गांव व्यापाराचें केंद्रस्थान होतें व त्या वेळीं सह्याद्रीच्या पार घाटांतून व थळ घाटांतून हा व्यापार चालत असावा असें दिसतें. त्याचप्रमाणें त्या वेळीं चौलशीं बराच व्यापार बोर घाटांतून होत असावा असेंहि दिसतें. या व्यापाराची इ. स. १८२६ च्या सुमारास पुढें दिल्याप्रमाणें स्थिति होती.

इ. स. १८२६ सालीं पुणें जिल्ह्यांतून कुलाबा जिल्ह्यांत येण्यास खालील रस्ते होते.

१. सावे खिंडींतून उन्हेरी-राहुबगांव, चिकणी-नागोठणें. एकंदर रस्त्याची लांबी ६३ मैल.

[illegible] लांबी १६३ मैल. हा रस्ता [illegible] प्रमाणें होता.

३. पुणें-घोडेगांव रस्ता—एकंदर लांबी ६५ मैल. कुंभघाटांतून खालीं येऊन हा रस्ता निजामपूर-काळ-तरमरी-कडापा या ठिकाणांवरून जात असे. या रस्त्यावर लागणारीं गांवें—शिरसदवोरवाडी—हरोंडी—करंवेली—ताम्हाणें—फुलसगांव—हटकेळी—तळेगांव—वडगांव इ०

४. पुणें—घोडेगांव रस्ता—एकंदर लांबी ५६ मैल. देवस्थळी घाटांतून खालीं उतरून उंबर्डी-शिरवली या गांवांवरून घोडेगांवास जात असे.

याशिवाय सावित्री नदीच्या तीरावर असलेल्या दासगांवापासून तीन रस्ते गेले होते.

१. दासगांव-नागोठणें. लांबी ३८ मैल.

२. दासगांव-शेवला घाटाचा माथा. लांबी २३ मैल.

३. दासगांव-खेड रस्ता. लांबी २७ मैल. पेण-पनवेल रस्ता. एकंदर लांबी २१ मैल.

इ. स. १८४० सालीं पुढील रस्ते तयार झाले. पेणेहून अलीबागेस जाण्यास तीन मार्ग होते.

१. पेण—नागोठणें—सांबरी—पोयनाड—अलीबाग. हा खुष्कीचा मार्ग होता. लांबी ४५ मैल.

२. पेण—कासू—सांबरी—पोयनाड—अलीबाग. यानें दळणवळण कमी असे. लांबी ३२ मैल.

३. पेण—धरमतर—पोयनाड—अलीबाग. मध्यंतरीं खाडी लागत असल्यामुळें पादचारी या रस्त्याचा क्वचितच उपयोग करीत. लांबी २४ मैल.

यानंतर इ. स. १८८१ सालीं आणखी कांहीं रस्ते उपयोगास आणतां येण्यासारखे झाले. हे एकंदर रस्ते बारा होते. त्यांची एकंदर लांबी १८७ मैल होती. यांपैकीं तीन रस्त्यावर पूल असून त्यांची एकंदर लांबी ४८ मैल होती. बाकीचे नऊ वरसातीखेरीज इतर आठ महिन्यांत उपयोगांत आणण्यासारखे होते.

१ नागोठणें—धरमतर रस्ता. लांबी १३ मैल. हा इ. स. १८८१ सालीं तयार झाला.

२ मुख्य रस्ता नागोठणें—कोलाड—माणगांव—महाड—पोलादपूर—महाबळेश्वरचा पायथा. लांबी ५६ मैल.

नागोठणें—महाबळेश्वर रस्त्यास फुटलेले फांटे:—

३ कोलाड—रोहें. लांबी १० मैल.

४ माणगांव—निजामपूर. लांबी ७ मैल. (लोकलफंडी रस्ता)

५ लोणेरे—घोडेगांव (गोरेगांव) लांबी २ मैल.

६ महाड—नातें. लांबी ४ मैल.

७ महाड—विन्हेरें—लांबी १२ मैल.

८ मुख्य रस्ता—वरंधा घाटाचा पायथा—लांबी ९ मैल.

९ मुख्य रस्ता—महाप्रळ. लांबी १६½ मैल.

१० रेवस–अलीवाग. लांबी १५ मैल.

११ धरमतर–खोपवली (बोरघाटाचा पायथा). लांबी २५ मैल.

१२ खोपवली–अलीवाग.

नागोठणें–महाबळेश्वर रस्त्यावरील इंदापूर पासून तळ्यास एक रस्ता जातो. तो तेथून मालाटी या गांवीं मांदाड नांवाच्या खाडीवर जातो. पावसाळ्याशिवाय इतर वेळीं हा रस्ता उपयोगी पडतो. या खाडींतून माणगांव तालुक्यांतील माल जलमार्गानें बाहेर जात असे.

कुलाबा जिल्ह्यांत एकंदर ११ खिंडी आहेत. त्यांपैकीं दोन अलीवाग तालुक्यांत, पांच पेणमध्यें, दोन रोहें तालुक्यांत आणि दोन महाड तालुक्यांत आहेत.

| रस्ता | खिंडींचीं नांवें. |
|---|---|
| अलीवाग–धरमतर रस्ता | कारवली खिंड. |
| | पीर खिंड. |
| धरमतर–खोपवली रस्ता | खाचर, गागाडे, |
| | दहीवली, गोविलें. |
| नागोठणें–महाबळेश्वर रस्ता | सुकेळी, दासगांव. |
| रोहें–अलीवाग पायरस्ता | चावरी खिंड. |
| महाड–नातें रस्ता | चांभार खिंड. |

कुलाबा जिल्ह्यांत एकंदर आठ दस्तुऱ्या होत्या त्या येणेंप्रमाणें:—

| रस्ता | दस्तुरी |
|---|---|
| अलीवाग–रेवस रस्ता | मांडवा. |
| अलीवाग–खोपवली रस्ता | १ कारली खिंड. |
| | २ कमरळी |
| महाबळेश्वर रस्ता | १ नागोठणें. |
| | २ वरसगांव. |
| | ३ पचपलें. |
| | ४ चांभारखिंड. |
| | ५ किनेश्वर. |

दरवर्षी यांचा लिलांव होत असे. इ. स. १८८१–८२ सालीं या दस्तुऱ्यांचें उत्पन्न १५८१० रुपये झालें होतें.

कुलाबा जिल्ह्यांत एकंदर ३१ नावा आहेत.

| | | |
|---|---|---|
| अंबा नदीपार होण्याकरितां— | ४ | नावा |
| कुंडलिका ,, | ४ | ,, |
| सावित्री ,, | ५ | ,, |
| रायगड–काळ ,, | ४ | ,, |

या शिवाय १४ नावा लहान लहान ओढ्यांवर व खाड्यांवर चालत असतात. यांपैकीं १६ सबंध वर्षभर चालू असतात व पंधरा फक्त पावसाळ्यांत चालू असतात.

कुलाबा जिल्ह्यांत चालू असलेल्या त्या वेळच्या सावकारीच्या धंद्याची पुढें दिलेल्या त्या वेळच्या व्याजाच्या दरांच्या तक्त्यावरून कल्पना येईल.

इ. स. १८५४ सालचे कुलाबा जिल्ह्यांतील व्याजाचे दर.

| कर्जदाराची स्थिति | गहाण ठेवून | गहाण न ठेवून | व्याजाचा दर दरसाल शेंकडा |
|---|---|---|---|
| श्रीमंत | गहाण ठेवून | — | ७ ते ९ |
| श्रीमंत | — | गहाण न ठेवून | १२ ते १५ |
| मध्यम स्थिति | — | गहाण न ठेवून | १८ ते ३७ |
| शेतकरी व मजूर | — | — | ४० ते २०० |

इ. स. १८८२ सालचे व्याजाचे दर.

| कर्जदाराची स्थिति | गहाण | किती रक्कम | व्याजाचा दर दरमहा दरशेंकडा |
|---|---|---|---|
| — | — | थोडी रक्कम | १ ते ३ १/४ |
| शेतकरी | पिकांची मनोती | — | १ १/२ ते ३ १/४ |
| — | जंगम गहाण | मोठी रक्कम | १/२ ते १ |
| — | स्थावर गहाण | मोठी रक्कम | ३/४ ते १ |
| मजूर | जामिनावर | — | १ १/२ ते २ |
| श्रीमंत शेतकरी | — | — | ३/८ ते ५/८ |
| मध्यम शेतकरी | — | — | ३/४ ते १ १/२ |
| गरीब शेतकरी | — | — | २ ते ६ |

इ. स. १८५४ सालीं अलीवाग येथें एक पेढी होती. ती मुंबई, पुणें आणि बनारस या गांवांवर हुंड्या देत असे.

| महिना | ज्या गांवांवर हुंडी दिली तें गांव | हुंडणावळ दर. |
|---|---|---|
| नवंबर ते मे. | मुंबई | शेंकडा १/४ |
| जून ते आक्टोबर | ,, | ,, १/२ |
| वर्षभर | पुणें | शेंकडा १ |
| ,, | बनारस | शेंकडा २ ते ३ |

पांच हजारपेक्षां जास्त रकमेची हुंडी त्यावेळीं क्वचितच देत असत. परंतु जरुरीच्या वेळीं २५००० रुपयांपर्यंतची देखील हुंडी मिळत असे. इ. स. १८८२ सालीं अलीवाग येथून ५ रुपयांपासून ५००० पर्यंत मुंबई, अहमदाबाद, पुणें, सातारा, चिपळूण आणि खेड या गांवांवर हुंड्या मिळत असत. मुदतीच्या हुंडीकरितां शेंकडा १/२ ते १ पर्यंत हुंडणावळ असे; व दर्शनी हुंडीची हुंडणावळ जरा जास्त असे.

**गुलामांचा व्यापार.**—हिंदुस्थानांत गुलामांचा व्यापार फार पूर्वीपासून चालत होता. गुलाम दुसरीकडून इकडे आणीत व इकडून दुसरीकडे नेत असत अशाबद्दलचा पुरावा मागें दिलाच आहे (पृष्ठ २९९ पहा). महाराष्ट्रांत गुलामांचा व्यापार किती असे हें सांगतां ये[illegible] [illegible] ठमोठ्या [illegible] वर्गांतहि मुंबईतील गुलाम[illegible] काहीं[illegible] नी अ[illegible]मून येतो.

इ. स. १६७७–ईस्ट इंडियाचे तीन गुलाम सेंट हेलेना येथें पाठवून द्यावे म्हणून ता. १६ फेब्रुआरी १६७७ च्या पत्रांत उल्लेख आहे.

इ. स. १६८३–इंग्लंदच्या राजाकरितां गुलाम एक पुरुष व दोन वायका जितक्या ठेंगण्या सांपडतील तितक्या राजानें मागविल्या. मुलाचें वय १७ असावें व मुलींचें वय १४ ते १६ असावें.

इ. स. १६८७–सेंट हेलेनाला आणखी कांहीं गुलाम पाठविले.

इ. स. १७३६–ता. २७ आगष्टचें इ. स. १७३६ चें Bombay Government चें Consultation (मुंबई सरकारचा खलिता) यांत १६५ गुलामांचा उल्लेख आहे.

इ. स. १७४१ सालीं एक स्लेव्ह ट्रेड पब्लिकेशन प्रसिद्ध झालें त्यांत असें आदेशिलें आहे कीं, गुलामाची जी जात असेल तीपेक्षां अन्य जातीच्या मनुष्यास त्या गुलामास विकतां येणार नाहीं; आणि जर अन्य जातीचा मनुष्य विकत घेईल तर त्यास १०० रुपये दंड होईल,

सरकारी गुलामांस वागवावें कसें याबद्दल खालीलप्रमाणें वारंवार आदेश आढळतो. तुम्ही त्यांस दयाळूपणानें वागवावें आणि ते जरी आपली मालमत्ता आहेत असें समजण्यांत येतें तरी त्यांनीं आपापलीं कामें आनंदानें करावींत म्हणून त्यांस सर्व प्रकारें उत्तेजन द्यावें. त्यांचें जेवणखाण, राहणें, कपडे यांविषयीं अशी काळजी घ्यावी कीं त्यामुळें त्यांची गुलामगिरी त्यांस त्रासदायक वाटूं नये. त्यांनां निराळे ठेवावें आणि कोणा विश्वासू मनुष्याच्या हातीं ठेवावें. त्यांस खाण्यापिण्यास थोडें द्यावें. सोल्जरांनां त्यांच्यापासून दूर राखावें, नाहींतर ते त्यांस बिघडवितील आणि ते आजारी पडले असतां जितकी आपण सोल्जरांनां डॉक्टरांची मदत देतों तितकी त्यांस द्यावी.

गुलामांची किंमत इ. स. १७५३ सालीं दर डोक्यास सरसकट ७१ रुपये दिली गेली.

इ. स. १६६७ सालीं ३८ काफरी वायकांची किंमत २१५५ रुपये लिहिली आहे.

मुंबईतील खाजगी गुलाम.–इ. स. १७८० सालच्या खानेसुमारीच्या वेळेस मुंबई शहरांत ४७१७० लोकसंख्येपैकीं ४३१ गुलाम होते.

इ. स. १७६२ च्या एका पत्रांतील सरकारी गुलामांच्या किंमती.

| | |
|---|---|
| प्रत्येक मनुष्य ( वय २० ते ४० ) | ११० रुपये. |
| प्रत्येक स्त्री ( वय २० ते ४० ) प्रत्येक स्त्रीमागें पांच पुरुष गुलाम नेमलेले असावे. | ८० रुपये. |
| प्रत्येक मुलगा ( वय १४ ते २० ) | ७५ रुपये. |
| प्रत्येक मुलगी ( वय १४ ते २० ) [illegible] मलें गुलाम | ५० रुपये. |

सरकारी गुलामांचें खाणें पिणें.–आठवड्यांतून पांच दिवस चांगली खिचडी व मासे व दोन दिवस मांसाहार आणि मनुष्यास एक रुपाया व बाईस आठ आणे पानतंबाखूसाठीं. शिवाय त्यांनां भाजीपाला करण्याकरितां जमीन द्यावी. त्यांनां दोन तुमानी, दोन शर्ट व एक टोपी दर सहा महिन्यांनीं द्यावीं असा इ. स. १७५२ च्या कोर्ट आफ डायरेक्टर्सच्या पत्रांत उल्लेख आहे.

इ. स. १७५७ सालीं कांहीं गुलामांनीं बंड केलें त्या वेळीं त्यांस हिंदी लास्करांचें ( खलाशांचें ) खाणें द्यावें असा शिक्षा म्हणून ठराव झाला. ही शिक्षा दिल्यानंतर ते वठणीस आले. यावरून लास्करांपेक्षां त्यांचें खाणें उच्च होतें असें दिसतें.

सरकारी गुलामांस दिलेलीं कामें–बरेचसे गुलाम लष्करांत व आरमार खात्यांत होते. कित्येक लहान लहान गुलामांस दुसऱ्यांस कामाकरितां देत असत. गुलामांचा खाण्यापिण्याचा खर्च मजुरांस द्यावयाच्या मजुरीपेक्षां अधिक पडत असे.

पूर्वोक्त विवेचनावरून एवढें स्पष्ट होईल कीं जगाच्या कोणत्याहि भागापेक्षां महाराष्ट्रामध्यें व्यापारी कर्तृत्व पूर्वीपासूनच कमी आहे आणि तें वाढविण्यासाठीं जितकी खटपट करावी तेवढी थोडीच. व्यापारी शिक्षण, अथवा प्रत्यक्ष चढाओढीच्या धंद्यांत नोकरी आणि पुढें स्वतंत्रपणें व्यापार या प्रगतीच्या पायऱ्या आहेत. धंद्यांत प्रवेश व्हावा यासाठीं तरुणांस व्यापारी नोकऱ्या लावून देण्याची खटपट झाली पाहिजे आणि सामान्य तऱ्हेच्या व्यापारी शिक्षणाचाहि फैलाव झाला पाहिजे.

पण या सर्वांपेक्षां एक गोष्ट अधिक महत्त्वाची आहे. ती म्हटली म्हणजे खात्रीचें पण थोडें उत्पन्न मिळवावयाचें सोडून पुष्कळ उत्पन्न मिळवावें आणि त्यासाठीं साहस करावें ही वृत्ति वाढली पाहिजे. भर्तृहरि म्हणतो–

कुसुमस्तबकस्येव द्वयी वृत्तिर्मनस्विनाम् ।
मूर्ध्नि वा सर्वलोकस्य विशीर्येत वनेऽथवा ॥

हा उपदेश जयिष्णु महाराष्ट्रानें लक्षांत ठेवला पाहिजे. महाराष्ट्रानें काय केलें पाहिजे तें सांगावयाचें म्हणजे आर्थिक उन्नतीचीं तत्त्वें सांगावयाचीं त्यांकडेच आतां लक्ष देऊं.

---

## उपप्रकरण ९ वें.

## आर्थिक उन्नतीचीं अंगें व त्यांची साधना.

शांततेच्या काळांत जो जीवनकलह चालतो त्याचें स्वरूप जितकें स्पष्ट होत जाईल तितकी कर्तव्यदिशा स्पष्टपणें समजेल. जर आपणांस कांहीं हवें असेल तर ती स्वहितसाधनार्थ

जोराची धडपड हवी आहे. देशांतील माणसांकडून द्रव्योत्पादन जोरानें व्हावें यांत मोठें राष्ट्रहित आहे.

आपल्या देशांत प्रत्येक गोष्ट अप्रगत आहे. आपल्यापेक्षां अधिक प्रगत अशा परिस्थितीची जशी आपणांस अधिकाधिक कल्पना येईल तसें भावी कर्तव्याचें स्वरूप आपल्या लक्षांत येईल. अधिक प्रगत स्थिति कशी असते याची अंशतः कल्पना कांहीं मुद्द्यांसंबंधानें देतों. भावी पिढीचा कर्तव्यात्मक भाग म्हटला म्हणजे आज जें कमी व्यवस्थित आहे तें अधिक व्यवस्थित करणें, जें लहान प्रमाणावर असेल तें मोठ्या प्रमाणावर करणें आणि जें कमी सुरक्षित असेल तें अधिक सुरक्षित करणें. प्रगतिक्षेत्राचे खालील भाग विशेष लक्षांत घेण्यासारखे आहेत.

१. भांडवलाचें एकीकरण.
२. भांडवलाचें विस्तरण.
३. मनुष्याच्या कार्यशक्तीचा विकास.
४. श्रमविभागाचें विविधत्व.
५. भौतिक द्रव्यांचा उपयोग.
६. मनुष्यबलाऐवजीं यांत्रिक बलाचा उपयोग.
७. जमिनीची उत्पादनशक्ति.
८. मनुष्याचें आयुष्यवर्धन आणि त्याचे आर्थिक परिणाम.
९. वस्तूंच्या उपयोगांसंबंधानें वाढलेलें ज्ञान.
१०. स्पर्धासंयमन व एकीकरण यानें होणारी काटकसर.

**भांडवलाचें एकीकरण व विस्तरण.**—वरील मुद्द्यांपैकीं भांडवलाचें एकीकरण व भांडवलाचें विस्तरण हे मुद्दे रोकडीच्या व्यवहारांतले आहेत. या मुद्द्यांसंबंधानें जी माहिती द्यावयाची ती सावकारीच्या धंद्याच्या अनुषंगानें दिली पाहिजे. पाश्चात्त्य सावकारी आणि देश्य सावकारी यांची थोडीशी तुलना केल्यावर मग आपणांस भांडवलाचें एकीकरण आणि विस्तरण या दृष्टींनीं काय करावयाचें आहे हें सांगतां येईल.

**सावकारी.**—देशांतील सावकारी अधिक सुव्यवस्थित करण्यासाठीं आणि सावकाराचा पैसा जास्त सुरक्षित करण्यासाठीं जीं यंत्रें पाश्चात्त्य देशांत उत्पन्न झालीं आहेत त्या यंत्रांचा उपयोग आणि घटना हीं समजलीं पाहिजेत. पैसे देणारे लोक आणि पैसे वापरणारे लोक यांचा संबंध जोडणाऱ्या ज्या संस्था आहेत त्यांत बँका, ट्रस्टकंपन्या, शेअरबाजार व रोकडदलाल हे प्रमुख होत. या संस्थांचें सामान्य स्वरूप येणेंप्रमाणें. लोकांच्या लहान लहान रकमा बँकांच्या सेव्हिंग बँकेमार्फत जमा होतात. बँकांमध्यें थोडे दिवसांकरितां व्यापाऱ्यांस रक्कम देण्याची पद्धत आहे. बँका पैसे देतात ते एक तर ओव्हर ड्राफ्ट–खात्यावर येणें–या स्वरूपानें देतात अगर दुसऱ्या कांहीं तारणावर देतात.

लोकांच्याकडून पैसा गोळा करण्याचें काम बँकेसारख्या मध्यस्थाशिवाय ज्या प्रकारांनीं होतें ते प्रकार येणेंप्रमाणें. एक, कंपन्यांची स्थापना होऊन त्यांचे शेअर लोकांनीं घेणें; शेअरवरील रक्कम हप्त्याहप्त्यांनीं भरण्याची सोय असल्यामुळें सामान्य व्यक्तींस काटकसर करून रक्कम गुंतविणें शक्य होतें. शेअरसारखाच दुसरा मार्ग म्हटला म्हणजे बाँड्स उर्फ डिबेंचर्स होत. बाँड्स म्हणजे एकंदर मालमत्तेवरील कर्जाच्या बोजाचा हिस्सा. बाँड म्हणजे एक तऱ्हेचा गहाणाचा रोखा होय. या गहाणरोख्यावर अर्थात् व्याज वेतचें असतें आणि कंपनीच्या व्यवहारांत मुनाफा होवो अगर न होवो, प्रथम या रोख्यावरील व्याज कापून द्यावें लागतें. शेअरमध्यें सुद्धां पुष्कळदां दोन प्रकार असतात. एक, साधा हिस्सा (ऑर्डिनरी शेअर) आणि दुसरा, अगाऊ मुनाफ्याचा हिस्सा (प्रेफरन्स शेअर). अगाऊ मुनाफ्याच्या हिश्शावरील फायद्याची रक्कम ठराविक असते आणि ती रक्कम दिल्यानंतर जो फायदा होईल तो फायदा कंपनीच्या साध्या हिस्सेदारांस मिळतो. शेअर किंवा गहाणरोखे विकण्यास मध्यस्थी दलाल असतात; आणि त्या दलालांमार्फत पैसेवाल्यांचा आणि रक्कम वापरूं इच्छिणारांचा म्हणजे रोकडीच्या गिऱ्हाइकांचा संबंध जडतो. असल्या हिस्सेदलालांच्या मुंबईस दोन संस्था आहेत. प्रत्येक देशांत या प्रकारच्या संस्था असतात.

हिंदुस्थानामध्यें रोख्यांचा क्रयविक्रय करावयाच्या ज्या संस्था आहेत त्यांत गिरण्यांचे शेअर व सरकारी प्रॉमिसरी नोटा यांचा विक्रय होत असतो. सध्यां सरकारानें ट्रेझरी बिलें काढलीं आहेत त्यांचाहि विक्रय तेथें होत असतो. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे ज्या वस्तूंची मालकी कागद घेतल्यानें देतां घेतां येते अशा सर्व प्रकारच्या गोष्टी शेअरबाजारमध्यें येतात.

मालकीचीं साक्षीपत्रकें म्हणून कांहीं कागदपत्र असतात; त्यांचा क्रयविक्रय होतो पण तो शेअरबाजारांत होत नाहीं. असे कागद म्हटले म्हणजे खात्यावरील घेण्याचें साक्षीपत्रक, गलबतावरून येणाऱ्या मालाचें साक्षीपत्रक (Bill of Lading), विम्याचें साक्षीपत्रक, हुंड्या, साधे कर्जरोखे, गहाणरोखे वगैरे होत. पुष्कळदां यांचा क्रयविक्रय बँकांमार्फत होतो.

जमिनीवरील गहाणाचे रोखे इकडे अजून शेअर बाजारांत येत नाहींत, कां कीं या गहाणाची जितकी सुव्यवस्थित घटना व्हावयास पाहिजे तितकी झालेली नाहीं. जमीनगहाणाचे दलाल अमेरिकेंत अलीकडे बऱ्याच मोठ्या प्रमाणावर धंदा करूं लागले आहेत आणि कित्येक ट्रस्टकंपन्याहि हा धंदा करतात. त्यांच्या धंद्याचें सामान्य स्वरूप येणेंप्रमाणें: प्र[illegible]. मनुष्यास जमि[illegible] कि[illegible] ठेमाळ्यां [illegible] वर्गांतहि [illegible] कांहीं[illegible] नी अ[illegible]सून येतो.

परंतु त्या गहाणामध्यें दोन तीन प्रकारच्या अडचणी असतात. एकतर पैशाच्या वसुलीचा त्रास. पैसेवाला मनुष्य एखाद्या खेड्यांत वसलेल्या शेतकऱ्यापासून व्याजाची वसुली करण्याच्या भानगडींत कशाला पडतो ? शिवाय शेताच्या गहाणावर रोखा करून घेऊन पैसे देण्यापूर्वी पैसे मागणाराचा हक्क त्या जमिनीवर कितपत आहे हें काळजीपूर्वक पहावें लागतें. हिंदुस्थानांत तर यासंबंधानें मुसुलमानांच्या अस्तित्वामुळें एक विकट प्रश्न उपस्थित झाला आहे. मुसुलमान आपल्या इस्टेटीचा वकफ ( स्वतःकडे व्यवस्थापकाचे अधिकार ठेवून इस्टेट धर्मार्थ देऊन टाकणें ) केव्हां करून टाकील याचा नेम नाहीं. शेताच्या गहाणरोख्याच्या बाबतींत दुसरी काळजीची गोष्ट म्हणजे कोणीहि आपली इस्टेट आपल्या बायकोस ( तिच्या उपभोगाच्या हक्कासाठीं ) देऊन टाकण्याचा संभव असतो आणि तिसरी गोष्ट म्हटली म्हणजे एका इस्टेटीचे मालक अनेक असतात आणि त्यामुळें एकानें सावकाराच्या पैशासाठीं केलेलें गहाणखत दुसरा ठिकाणावर नसलेला हक्कदार दहापांच वर्षांनीं उभा राहून रद्द होऊन जाण्याचा संभव असतो. येणेंप्रमाणें जमिनीच्या व्यवहारांत शेंकडों भानगडी असल्यामुळें सामान्य मनुष्यांस गहाणाचे रोखे करणें मोठें जोखमाचें असतें. महाराष्ट्रामध्यें नवऱ्याच्या परोक्ष पुष्कळ बायका कुणगा करून जमविलेल्या पैशाचे गहाणरोखे करून घेतात आणि त्यांस अनेकदां थप्पड खावी लागते.

**गहाणदलाली.**—थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे गहाणाचा व्यापार वराच भानगडीचा असल्यामुळें या धंद्यांत पैशाचा संचय करणारे लोक फारसे पडत नाहींत. यामुळें शेतकऱ्यास थोडक्या व्याजानें पैसे मिळत नाहींत आणि संचय करणाऱ्या वर्गास जमीनगहाणाच्या व्यवहारांत शेंकडा सहा व्याज मिळण्यास देखील पंचाईत पडते. दरमहा दरशेंकडा दीड रुपयाप्रमाणें व्यवहार करून देखील पुष्कळ सावकारांस शेंकडा ५।६ टक्के सुटत नाहींत. या परिस्थितीस तोड म्हणून जी गहाणदलाली अमेरिकेंत करतात तिचें स्वरूप येणेंप्रमाणें:—

दलाल किंवा दलाली करणारी कंपनी रक्कम देऊन गहाण घेऊं इच्छिणाराला खालील आश्वासनें देते.

१ ठराविक तारखेस आम्ही तुमचें व्याज पोंचतें करूं आणि मुद्दलाच्या वसुलीसंबंधानें किंवा गहाणजमिनीच्या मालकीसंबंधानें जर कांहीं भानगड उपस्थित झाली तर त्याचा खर्च आम्ही सोसूं.

२ तुम्हांस जर गहाणपत्र विकून टाकावयाचें असेल तर आम्ही तुम्हांस थोड्या खर्चानें बाजारभावाप्रमाणें विकून देऊं.

अर्थात् शेतकऱ्याकडून योग्य वेळेवर वसुली होण्या- [illegible] हा गहाण- [illegible] वसूल करून घेतो. त्या ठरावांत मुद्दल मिळवून देण्याबद्दल दलालास द्यावयाची रक्कम आणि व्याजाचा दिवस चुकल्यास व दलालास पैसे भरावे लागल्यास शेतकऱ्यानें दलालास द्यावें लागणारें व्याज यांचा उल्लेख असतो. शिवाय ज्या धनकोकडून पैसे घेऊन ऋणको शेतकऱ्यास दलाल पैसे देतो त्या धनकोस तो दोन पत्रकें देतो. एक शेतकऱ्याच्या सहीचें गहाणपत्र आणि दुसरा जमिनीवर मालकी दाखविणारा सरकारी ऑफिसांतून मिळविलेला दाखला.

हिंदुस्थानांत बऱ्याच ठिकाणीं आतां मालकीची माहिती देणारीं सरकारी दप्तरें झालीं आहेत. रेकॉर्ड ऑफ राइट्स ( मालकी दाखविणारीं दप्तरें ) नुकतींच पूर्णपणें तयार झालीं आहेत आणि या सोईमुळें गहाणदलालीचा धंदा महाराष्ट्रांत जोरानें सुरू झाला तर त्यांत नवल नाहीं. या धंद्याचे परिणाम शेतकऱ्यांत फार दूरवर जातील. त्यांतील एक परिणाम म्हटला म्हणजे शेतकऱ्यांसाठीं काढलेल्या कोऑपरेटिव्ह बँका शेतकऱ्यास कमी अवश्य होण्याचा संभव आहे.

**व्याजापेक्षी सावकारी.**—सावकारीमध्यें आणखी एक भेद केला पाहिजे तो हा कीं, गहाणवस्तूच्या उत्पन्नांतून व्याजाची अपेक्षा करणारी सावकारी आणि मुद्दलादाखल आणि व्याजादाखल किंमतीच्या तथापि अनुत्पादक वस्तू जमानत म्हणून घेऊन केली जाणारी सावकारी. जमिनीवरील सावकारी बऱ्याच अंशीं उत्पन्नावर रचलेली सावकारी असते; म्हणजे केवळ भूमिभक्षणाचा हेतु न धरतां आपल्या मुद्दलावर आपल्यास व्याज मिळावें या हेतूनें जेव्हां सावकार रकमा देतो तेव्हां तो अर्थात् त्या जागेपासून उत्पन्न होण्याची शक्यता पाहतो. चाळीवर दिलेल्या रकमा ही सावकारी देखील याच वर्गांत मोडेल. परंतु मोठ्या श्रीमंत लोकांनीं किंवा श्रीमंतीचा आव घालूं इच्छिणाऱ्यांनीं आपल्यास राहण्यासाठीं जे टोलेजंग वाडे बांधले असतील पण ज्या वाड्यांतून उत्पन्न निघण्याची सोय बेताचीच असेल म्हणजे उत्पन्न निघालें तरी तें शेंकडा तीन टक्के देखील निघण्याचा संभव नसेल, त्या वाड्यांवर जो सावकार व्याज मिळविण्याची अपेक्षा धरतो अशाकडून रकमा मिळण्याचा संभव नाहीं. केवळ एखादा भूमिभक्षक सावकारच असला वाडा वगैरे मालमत्ता आपल्या तावडींत घेण्याच्या इच्छेनें त्यावर रकमा देईल; आणि दरसाल व्याज मिळण्याचा संभव नसल्यानें आणि पुढें कबजा घेण्यासाठीं खटले करावे लागण्याचा संभव असल्यामुळें तो व्याजहि बरेंच आकारील. प्रत्येक व्यवहारामध्यें हा एक नियम लक्षांत ठेवावा कीं जेव्हां मालमत्तेपासून वार्षिक उत्पन्न बेताचेंच असेल तेव्हां तिची किंमत कितीहि मोठी असली तरी तिची पत रोकड बाजारांत थोडीच असणार.

कबजेगहाणाची सावकारी याच म्हणजे 'भक्षक' वर्गांत मोडते. ज्या वस्तूंपासून वार्षिक उत्पन्न होत नाहीं परंतु ज्यांची

किंमत मोठी आहे अशा गोष्टी म्हणजे दागिने, सोनें, घड्याळें, पिआनो वगैरे प्रकारच्या मौल्यवान् जिनसा सावकारास बहुतेक प्रसंगीं कबजांतच घ्याव्या लागतात. कां कीं, मालकास त्या वस्तूंच्या अस्तित्वापासून उत्पन्न होत नसतें; आणि शिवाय मुद्दल आणि व्याज मिळून जर रास वाढत गेली आणि ऋणकोस पैसा देणें अशक्य झालें तर ऋणको ती वस्तु लांबवील असाहि संभव महाराष्ट्रांत असतो. आणखी एक थोडीबहुत साहसाची सावकारी सांपडते. ती म्हटली म्हणजे बड्या बापाच्या बेट्यास त्याच्या भावी इस्टेटीच्या कबजावरच पैसा देणें ही होय. या सावकारींत कायद्याच्या भानगडी पुष्कळ असतात. पुष्कळदां हें कर्ज कोर्टामार्फत वसूल होणेंहि शक्य नसतें आणि यामुळें सावकारास बरेंच मोठें जोखीम अंगावर घ्यावें लागतें. उधळपट्टी करणाऱ्या तरुण मुलांस गांठून त्यांस जे रकमा देतात ते दिलेल्या रकमेच्या चौपट किंवा पांचपट रकमेचें खत लिहून घेतात; आणि कुळाची बेअब्रू करण्याचा धाक घालून यांस आपली रक्कम वसूल करून घ्यावी लागते. अशा प्रकारचे सावकार सर्व देशांत आहेत आणि इंग्लंडांत जाणारे हिंदुस्थानी राजपुत्र बरेच वेळां असल्या सावकारांच्या तावडींत सांपडण्याचा संभव असतो.

कांहींच जमानत नसतांना देखील लहान सहान रकमा कर्जाऊ देणें म्हणजे बिनजमानतीची सावकारी देशांत थोडक्या प्रमाणानें चालू आहे. असल्या प्रकारच्या सावकारीमध्यें देण्याची रक्कम पांच दहा रुपये फार तर असते. गरीब मजूर वर्गास केवळ आपल्या वेतनाच्या जोरावर पैसा काढावा लागतो आणि त्यांस महिन्याचें कधीं कधीं रुपयास एक आणा व्याज द्यावें लागतें. डोक्यावर माल घेऊन विकणाऱ्या लोकांस देखील सुमारें याच दरानें पैसे काढावे लागतात आणि कधीं कधीं तर रुपयास एक आणा रोज याप्रमाणें व्याज भरावें लागतें.

सावकारी आणि दुकान हे दोन धंदे पुष्कळदां एकत्र सांपडतात. ज्यापाशीं कांहीं एक नाहीं अशा पण कामवाल्या मनुष्यास रोजचा २५।३० रुपयांचा माल देऊन रोजच्या उत्पन्नांतून ते पैसे वसूल करण्याची रीत आहे. मुंबई, पुणें येथील चहाच्या दुकानांत असल्या प्रकारची सावकारी चालते. महिन्याचें भाडें ठरलें असेल त्याप्रमाणें घरवाला रोजचे दोन तीन रुपये वसूल करतो आणि वाणी आपल्या सामानाचे पैसे रोज घेऊन जातो.

**पातीची सावकारी.**—सावकारी व दुसरा धंदा यांचें एकीकरण जेथें झालें आहे असा आणखी प्रकार म्हटला म्हणजे आपल्या पैशानें काम करणाऱ्या मनुष्याबरोबर सावकारानें समाइकीनें व्यापार करणें किंवा कंत्राटें वगैरे घेणें. या प्रकारच्या धंद्यांत व्यवहार साधारण येणेंप्रमाणें असतो. सावकार आपल्या रकमेस सुमारें आठ आण्यापासून बारा आणेपर्यंत व्याज लावतो; काम करणारा मनुष्य आपल्या महिन्याचा अत्यंत आवश्यक तेवढा खर्च धंद्यांतून काढून घेतो; सावकार आपला कारकून धंद्याचे जागीं पाठवितो आणि त्याजकडून हिशेब ठेवितो व याप्रमाणें धंद्यांतून येणारें उत्पन्न सावकार व काम करणारा हे दोघे समाइकीनें वांटून घेतात.

सावकार आणि पैसे वापरणारा मनुष्य यांस एकमेकांच्या धंद्यांची आणि वृत्तींची जितकी अधिक माहिती होते तितका दोघांमधील व्यवहार अधिक सोपा होतो आणि यामुळें सावकारीचें विशिष्टीकरण प्रगमनशील देशांत बरेंच झालेलें आहे. घरें बांधणाऱ्या धंद्याचे सावकार निराळे, वाण्याच्या धंद्याचे सावकार निराळे आणि ग्रंथप्रकाशनादि धंद्यांतले सावकार निराळे. अशी या देशांत व्यवस्था आहे सावकार जितका बहुश्रुत असेल, म्हणजे पैसे मागण्यास ज्या धंद्यांतील माणसें त्याजकडे येतात त्या धंद्यांचें जितकें सूक्ष्म ज्ञान त्यास असेल तितकी त्यास पैसे देतांना भीति कमी वाटेल. उदाहरणार्थ, एल्.एल्. बी.च्या परीक्षेस जाणारा विद्यार्थी कर्जाऊ रकमेकरितां एखाद्या वकिलाकडे गेला तर त्यास पैसे लवकर मिळतील परंतु तोच जर एखादा वाणी आपलें दुकान वाढविण्याकरितां पैसे मागण्यास वकिलाकडे गेला तर त्यास त्याजकडून पैसे मिळविणें अधिक कठिण जाईल. परंतु आजकालच्या सावकारी धंद्यांत असलेल्या मारवाड्याकडे हीं दोन्हीं माणसें गेलीं तर दोघांसहि सारखाच विरुद्ध अनुभव येण्याचा संभव आहे. आपल्या देशांतील सांपत्तिक वृद्धि होण्यास सावकारांचा वर्गहि काम करणाऱ्या लोकांबरोबर सुशिक्षित झाला पाहिजे. नवीन अपरिचित धंद्यांत पैसे घालण्यास लोकांची प्रवृत्ति होत नाहीं. उदाहरणार्थ, उद्यां अमेरिकन एक्सप्रेस कंपनीसारखी एका मनुष्याच्या ठिकाणापासून दुसऱ्या मनुष्याच्या ठिकाणापर्यंत मालाची किंवा लहानसहान वस्तूंची नेआण करण्याचा धंदा करण्याची कंपनी काढावयाचें कोणीं मनांत आणलें तर स्थानिक सावकाराकडून त्यास कितपत साहाय्य होईल याची वरीच शंका आहे. तसेंच ज्या धंद्यांत भौतिक शास्त्रांचें ज्ञान विशेष लागतें त्या धंद्यांत पैसे घालण्याइतके म्हणजे उदाहरणार्थ, कोलटारपासून अनेक द्रव्यें काढावयाच्या धंद्यांत पैसे घालण्याइतके सुशिक्षित असे सावकार आज किती आहेत हें सांगतां येणार नाहीं. तथापि असे सावकार शोधूं गेल्यास त्या कामीं अगदींच अपयश येईल असें मात्र वाटत नाहीं. रासायनिक धंद्यांमधील त्या व्यवहाराची पूर्वी कांहींएक माहिती नसलेल्या कांहीं लोकांनीं तो व्यवहार समजून घेऊन त्यांत पैसे घातले आहेत आणि यामुळें असा नवीन व्यवहार करणारास आज एकदम निराश होण्याचें कारण नाहीं.

**स्थावर** [illegible] किं[illegible] ठमोठ्या [illegible] वर्गांतहि मत्ता ही [illegible] कांह[illegible]नी अ[illegible]मून येतो.

कोठेंहि मोठ्या महत्त्वाची समजली जाते. महाराष्ट्रांत तर सध्यांची मुख्य सावकारी शेतकऱ्यांनां पिकाकरितां किंवा इतर व्यवहाराकरितां पैसे लागतात ते पैसे जमिनीच्या किंवा जेव्हां जमीन विकणें शक्य नसेल तेव्हां पिकाच्या जामिनकीवर देण्यापुरतीच आहे. या प्रकारच्या सावकारीचे दोन हेतु असतात; एक हेतु म्हटला म्हणजे शेतकऱ्यांचें शेत किंवा घरवाल्याचें घर घशांत टाकणें. या हेतूनें केलेली सावकारी ही खरी सावकारी नव्हे. सावकारीचा दुसरा हेतु म्हटला म्हणजे निव्वळ व्याज खाणें. निव्वळ व्याजाच्याच दृष्टीनें चालविलेली सावकारी उच्च प्रकारची समजली जावी हें स्वाभाविक आहे. सध्यांची प्रवृत्ति या प्रकारच्या सावकारीकडे कितपत आहे आणि आपली स्थावर इस्टेट वाढवावी या हेतूच्या सावकारीकडे कितपत आहे याचें पृथक्करणात्मक ज्ञान आज मिळवितां येईल किंवा नाहीं हा प्रश्नच आहे. उदाहरणार्थ, आज नागपूरचे घटाटे, बुटी, टालाटुले, चिटणवीस यांच्याकडून होत असलेल्या व्यवहारांत आणि त्यांच्या दौलतीच्या इतिहासांत भूमिभक्षक सावकारी कितपत आहे आणि कुळांस जिवंत राखून त्यांस परिश्रम करण्यास उत्तेजन देणारी आणि केवळ पैशास योग्य व्याज नियमानें मिळावें एवढीच अपेक्षा करणारी सावकारी कितपत आहे हें ज्याचा तोच सांगूं शकेल.

पहिल्या सावकारीस आपण भूमिभक्षक सावकारी हेंच नांव ठेवूं आणि दुसऱ्या प्रकारच्या सावकारीस व्याजापेक्षी किंवा खरी सावकारी असें म्हणूं. या दोन्ही प्रकारच्या सावकाऱ्या एकमेकांहून अगदीं भिन्न, म्हणजे जो मनुष्य एक प्रकारच्या धंद्यांत आहे तो दुसऱ्या प्रकारच्या धंद्यांत नाहीं इतक्या भिन्न, नाहींत. दोन्ही प्रकारच्या सावकारीमध्यें व्यवहाराचीं कांहीं तत्त्वें सामान्य असून कांहीं मात्र भिन्न आहेत. या तत्त्वांचें पृथक्करण केलें असतां प्रथमतः एक स्थूल नियम असा दिसतो कीं, यूरोपियन तऱ्हेनें समाईक भांडवलाच्या ज्या बँका आहेत त्यांची प्रवृत्ति व्याजापेक्षी सावकारीकडे असते आणि खासगी सावकार आणि पैसे वाळगणारे इतर लोक यांची प्रवृत्ति भूमिभक्षक सावकारीकडे असते. धंद्यासाठीं ज्यांनां लोकांच्या कडून पैसा बेतानेंच घ्यावयाचा असतो आणि ज्यांचें ध्येय आपली कर्ज काढण्याची किंवा जनतेंतील पैसा ओढण्याची शक्ति विशेषशी न वाढवितां आपली स्थावर इस्टेट वाढविण्याचेंच असतें ते भूमिभक्षक सावकारीचा अवलंब करतात.

सामान्य व्यक्तीचीं रक्कम गुंतविण्याचीं तत्त्वें हीं दिसतातः

(१) मूळ रकमेची सुरक्षितता असली पाहिजे, मग व्याज [illegible]मी किंवा मुळींच न आलें तरी पुरवलें. पैसे पुरून ठेवण्याची [illegible] आहे [illegible] अंतर्भाव या

(२) रक्षण, उपभोग व संचय या गोष्टींचें एकीकरण ज्या खर्चांत होईल असा खर्च करणें. बऱ्याच कालपर्यंत उपभोग घेतां येईल, आणि तेणेंकरून ज्यांची किंमत फारशी कमी होणार नाहीं अशा वस्तूंचा म्हणजे जमीन, दागिने (म्हणजे सोनें व जडजवाहीर), यांचा संग्रह करणें.

(३) पुढील काळाकरितां म्हणजे वृद्धापकाळाकरितां किंवा मुलावाळांकरितां तजवीज करणें. विम्याची पॉलिसी घेणें वगैरे.

(४) मुलाच्या उधळपट्टी वगैरे दुर्गुणांनीं त्यास एकदम दारिद्र्य येऊं नये म्हणून एकदम खर्च करून टाकण्यास व्यत्यय येईल अशा व्यवस्थेनें रक्कम गुंतविणें.

पैशाच्या म्हणजे देण्याघेण्याच्या व्यापारावर उपजीविका करणाऱ्याचीं रक्कम गुंतविण्याचीं तत्त्वें कांहीं अंशीं सामान्य व्यक्तीच्या तत्त्वांशीं सदृश आणि कांहीं अंशीं भिन्न आहेत. खासगी सावकाराच्या धंद्यांत वरील सर्व प्रकारचे हेतू दृग्गोचर होतात. कां कीं, सावकार जरी झाला तरी त्याला व्यक्ति या नात्यानें काळजी असतेच. शिवाय सामान्य व्यक्तीस ज्या काळज्या आहेत त्यांची जाणीव ज्या सावकारास आहे त्याजवळच लोकांचे पैसे येतील. ज्या सावकाराची गहाण वगैरे येणाऱ्या वस्तूंचा स्वतः उपभोग घेण्याची दृष्टि कमी असते आणि उत्पादक रीतीनें रक्कम गुंतविण्याची इच्छा असते, तो जास्त जोखीम घ्यावयास तयार असतो. तो इस्टेट विकत न घेतां तिजवर कर्जाऊ रक्कम देऊन ती ताब्यांत घेण्याच्या विचारांत असतो. या प्रकारची वृत्ति सावकारीच्या धंद्याबाहेरील लोकांसहि असते.

दुसऱ्याचे पैसे फारसे न घेणारा सावकार व दुसऱ्याचे पैसे घेऊन त्यांवर सावकारी करणारा सावकार यांच्या व्यवहारपद्धतींत स्वाभाविकपणेंच तफावत उत्पन्न होते.

खासगी सावकारांस पैसे परत करण्याची निकड नसल्यामुळें आणि बँकांस अशी निकड असल्यामुळें ज्या रोख्यांचा विक्रय तावडतोब करून आपली रक्कम वसूल करून घेतां येणार नाहीं अशा प्रकारचे रोखे घेण्याच्या व्यवहारांत पडणें पहिल्यास शक्य होईल व दुसऱ्यास (बँकेस) शक्य होणार नाहीं. यामुळें एकाचा डोळा जमिनीवर व दुसऱ्याचा (बँकेचा) व्याजावर आणि मुद्दल तावडतोड परत मिळविण्यावर असणार. ज्यांस तावडतोब रकमेची जरूर नाहीं आणि स्वतःची रकम गुंतवावयाची आहे असले मुख्य सावकार म्हटले म्हणजे विमाकंपन्या आणि अमेरिकेंत प्रचलित असलेल्या ट्रस्टकंपन्या होत. यांनां दिलेले पैसे कोणी तावडतोव मागेल अशी भीति नसते आणि त्यामुळें त्यांनां आपले पैसे कायमच्या ठेवींनीं अगर अधिक व्याजाच्या इतर प्रकारांनीं गुंतवितां येतात. हिंदुस्थानांतील विमा कंपन्या जमिनीवर फारसा पैसा गुंतवीत

नाहींत, याचें कारण त्यांस येथील सामान्यतः अडाणी अशा शेतकऱ्यांबरोबर व्यवहार करणें रुचत नसावें. येथील विमा कंपन्यांपैकीं पुष्कळशा परक्या आहेत. ज्या परक्या नाहींत त्या परक्या कंपन्यांच्या हिंदुस्थानांतील व्यवहार-पद्धतीची नक्कल करणाऱ्या आहेत. परक्या कंपन्या आपली रक्कम कोठें गुंतवितात हें पूर्णपणें समजणें शक्य नाहीं. अमेरिकेंत जमिनींत रक्कम गुंतविण्याची विमा कंपनीची वहिवाट आहे.

आजचा शेतकऱ्यास पडणारा व्याजाचा दर दरमहा दरशेंकडा एक रुपया आहे. "कोऑपरेटिव्ह सोसायटी"च्या सेंट्रल बँका स्थापन झाल्या आहेत त्या शेंकडा ६ दरानें पैसा घेतात व रकमा व्यक्तीस न देतां पैसे मागणाऱ्या स्थानिक ऋणकोच्या संघांस देतात. या संघास ते शाखा म्हणतात. त्यांस सर्व सभासदांच्या सामान्य जोखमीवर पैसा दरसाल दरशेंकडा ९ दरानें मिळतो आणि या शाखा व्यक्तींस दरसाल दरशेंकडा १२ याप्रमाणें पैसा देतात. सरकारनें धडपड करून मोठाले अधिकारी नेमून शेतकऱ्यांस अत्यन्त अल्प दरानें पैसे देण्याकरितां जी खटपट केली तिचें शेवटचें फल म्हटलें म्हणजे शेतकऱ्यांस १२ रु. शेंकडा व्याज पडतें, आणि एखाद्या खासगी मनुष्यास आपल्या पैशावर त्रासा-शिवाय व्याज मिळवायचें झाल्यास शेंकडा ६ रुपये व्याज मिळवितां येतें. हें मात्र खरें कीं खासगी मनुष्यास शेंकडा ६ रुपये व्याज देखील सर्व ठिकाणीं मिळत नाहीं. कांहीं ठिकाणीं ४॥ व्याजानें सुद्धां अनेक लोक रक्कम ठेवतात.

जमीन पळून जात नाहीं असें असतां तिच्या जोखमीवर धंदा करणाऱ्या शेतकऱ्यास इतकें व्याज पडतें याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे शेतकऱ्याकडून वेळेवर रक्कम येईल किंवा नाहीं याची शाश्वती नसते हें होय. शेतकऱ्याकडून पैसे येण्याची शाश्वती असली तर बऱ्याच थोड्या व्याजानें पैसे शेतकऱ्यास मिळणें शक्य होईल. कां कीं आज बरेंच मोठें व्याज घेऊन शेतकऱ्यांमध्यें सावकारी करणाऱ्या सावकारास शें. ५ व्याज तरी सुटत असेल किंवा नाहीं याची वानवाच आहे. हें म्हणणें सिद्ध करण्याकरितां कांहीं गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत. ज्या सावकाराचीं दुकानें गांवोगांव आहेत अशा सावकाराचें एखादें दुकान उदाहरणार्थ घेऊं. समजा कीं, सावनेर येथील एका सावकाराच्या दुकानांत २०००० रक्कम आहे. पैकीं त्यानें १७०००, दरमहा १॥ रु. व्याजाच्या दरानें कर्जाऊ दिली तर त्याला सालीना ३००० रु. व्याज येईल. पण मुनीम, कारकून, रोकडिया व उग्राणी करणारे चारपांच 'वारकरी' यांचा जो एकंदर व्यवस्थाखर्च असेल तो त्यांतून वजा करावा लागेल. हा खर्च वर्षाचा अंदाजानें जर २००० धरला व तो ३००० मधून वजा केला तर साधारण शें. ६ व्याज येतें. हें शें. ६ व्याज सर्व रकमेवरील व्याज वसूल झालें असें गृहीत धरल्यासच येतें. पण सावकारास आणखी कांहीं खर्चांच्या बाबी असतात, व यामुळें शें. ६ व्याज देखील त्यास सुटत नाहीं. या बाबींपैकीं एक बाब म्हणजे पैसे वसूल करण्याकरितां त्यास कुळांवर खटले करावे लागले तर खर्चासाठीं जितके पैसे कोर्ट मंजूर करतें त्यापेक्षां अधिक खर्च लागतो. कोर्ट शें. ५ मंजूर करील पण ५० रुपयांच्या वसुलीकरितां २॥ रुपयावर कोणता वकील खटला घेईल ?

आतां कुळाविषयीं विचार करतां असें दिसतें कीं त्याला बुडविण्यास केवळ व्याजच कारण होतें अशी स्थिति नाहीं. तर त्याच्या नुकसानीच्या अनेक बाजू असतात. एक तर सावकाराच्या दुकानावरुन आपणास पैसे मिळावे म्हणून सावकाराच्या दुकानीं ज्यांचा वशिला असेल अशा कित्येक लोकांस मधल्यामध्येंच कर्जाची दलाली द्यावी लागते. ही दलाली कधीं कधीं शें. ५ रुपयांहूनहि अधिक असते. दुसरी गोष्ट गणेशपट्टी, धर्मादाय इत्यादि बाबींच्या नांवानें ऋणकोकडून धनकोसावकार अगोदरच पैसे कापून घेतात. शिवाय बहुधा पहिल्या वर्षाचें व्याजहि अगोदर कापून घेतात. एवढेंच नव्हे तर खतःच्या पैशांतून खतःच खाणारे सावकारहि आहेत. म्हणजे क्ष ला जर यनें १०० रु. कर्जाऊ दिले तर य सावकार कर्ज देण्याबद्दल क्षपाशीं बक्षिसी मागतो. अशा तऱ्हेनें १०० च्या जागीं कधीं कधीं ८५ रुपयेच कुळाच्या हातीं पडतात. यांशिवाय दुसऱ्या भयंकर लटपटी चालतात. उदाहरणार्थ, दिलेल्या रकमेच्या दुप्पट रकमेचा रोखा लिहून घेतात; आणि सावकार तोंडानें कुळास असें सांगतो कीं, तूं जर व्याज (अर्थात् दुप्पट रकमेचें) वेळच्या वेळेवर आणून दिलेंस तर रोख्यांत लिहिलेलें दुप्पट मुद्दल आम्ही वसूल करणार नाहीं आणि आम्ही आकारलेलें व्याज (द. म. २ रु. शें.) पांच सहा वर्षांत दामदुपटीच्या कायद्याखालीं येऊं नये म्हणूनच केवळ दुपटीचा रोखा लिहून घेत आहों. साधारण सुशिक्षित मनुष्य जर कर्ज मागावयास गेला तर तो जितकी रक्कम मागेल तितक्याचा रोखा लिहून घ्यावयाचा आणि शें. १ हेंच व्याज लिहावयाचें, निम्मे रक्कम तावडतोब द्यावयाची आणि उरलेली दोनचार दिवसांत पाठवून देतों म्हणून सांगावयाचें आणि ती कधींच द्यावयाची नाहीं, आणि सर्व रक्कम भरून पावलों अशी पावती अगोदरच लिहून घ्यावयाची. असाहि प्रकार चालतो.

प्रामाणिकपणानें दुकान चाललें तर दीड रुपया व्याज आकारूनहि सावकारास शें. ६ व्याज सुटत नाहीं, यामुळें सावकारांची वर सांगितल्याप्रमाणें लबाड्या करण्या[illegible] प्रवृत्ति होते आणि दीड रुप[illegible] ठमाळ्या[illegible] वर्गांतहि देऊन [illegible] कांह[illegible]ती [illegible]मून येतो.

कमी यामुळें सावकाराची इच्छा नसली तरी त्याची सावकारी व्याजापेक्षी न होतां भूमिभक्षक होते; व सावकारी करावयाची ती भूमिभक्षक करावयाची हें तत्त्व एकदां मंजूर झालें म्हणजे अर्थात् जमीन जितकी लवकर घशांत पडेल तितकी चांगली असें वाटूं लागून त्याप्रमाणें कृति होते.

**भूमिभक्षक सावकारीविरुद्ध सरकारी योजना.**-व्यक्तीचा तावा जमिनीवरून काढून घेऊन जमीन केवळ सरकारी मालकीची करण्याचे जेव्हां जेव्हां प्रयत्न होतात तेव्हां सावकारापासून कुळाचें रक्षण करण्याकरितां सरकार खटपट करीत आहे असें सांगण्यांत येतें. या सांगण्याची किंमत काय करावयाची यासंबंधानें एक शब्द देखील खर्चे करण्याचें प्रयोजन नाहीं. कुळाचें रक्षण करण्यासाठीं सरकारचा दुसरा प्रयत्न म्हणजे पतपेढ्यांसाठीं झालेला प्रयत्न होय. हा प्रयत्न स्तुत्य आहे. मध्यम वर्गाच्या व दुसऱ्या धंद्यांत पडलेल्या लोकांनां जमीनमशागतीच्या धंद्यासाठीं आपला पैसा व्याजानें देण्यास ही सोय बरी आहे. तथापि या सोयीनें देखील प्रत्यक्ष कुळास १ रु. शेंकड्यापेक्षां व्याज कमी पडत नाहीं ही गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे. शिवाय कोणत्याहि व्यक्तीस आपल्या स्वतःच्या जबाबदारीवर पैसा मिळविण्याचें वळण लागण्यास ही सोय उपयोगी नाहीं. कुळाचें रक्षण करण्याच्या कामीं पतपेढ्यांपेक्षां जी गोष्ट अधिक परिणामकारी आहे ती करण्यांत सरकारकडून चुकारपणा किंवा अंगचोरी बरीच झाली आहे. ती गोष्ट म्हटली म्हणजे शिक्षणाचा फैलाव होय. प्रत्येक व्यक्तीस कर्जासंबंधाची जबाबदारी ज्यायोगें भासेल, वेळेवर पैसा आणून दिला असतां सावकाराचें व्याज कमी पडेल ही गोष्ट पटेल, कायद्यानें दिलेले हक्क समजूं लागतील, सावकाराच्या लबाडीपासून आपलें संरक्षण करून घेण्याइतका सडेतोडपणा येईल आणि स्वतःचा व्यवहार जमाखर्च लक्षांत ठेवून करतां येईल अशा तऱ्हेचें शिक्षण मिळालें पाहिजे. हें शिक्षण देण्यास आपण असमर्थ आहों अशी सरकारनें जर सबब आणली तर ती सबब खोटी होईल असें नाहीं. कारण, साक्षरतेच्या योगानें वरील सर्व गुण व्यक्तीच्या ठायीं येतीलच असें नाहीं. तथापि वरील सर्व गुण अंगीं येण्याची पूर्व तयारी म्हणजे साक्षरता होय, आणि ती तयारी सरकारनें केल्याशिवाय लोकांचें पाऊल फारसें पुढें पडणार नाहीं.

**अब्रूला भिणारे सुशिक्षित पेढ्यांच्या धंद्यांत पाहिजेत.**—जगांतील रोकड नेहमीं स्थलांतर करीत असते. जेथें पैशास चांगलें व्याज मिळतें तेथें सर्व दुनियेचे पैसे जमा होतात आणि या जमा होण्यानें तेथील व्याजाचा दर भयंकर असला तर तो बेतांत येतो. परंतु ही क्रिया [illegible] जीं [illegible] लागणार तीं आपल्या देशांत नाहींत. [illegible] पैसे परत देण्याची शक्ति पेढ्यांच्या मार्फत जितकी दूरपर्यंत कळवितां येईल तितकी बाहेरचा पैसा आपल्याकडे ओढण्याची त्यांची लायकी वाढेल, आणि व्याजाचा दरहि उतरेल. ही क्रिया होण्यासाठीं निरनिराळ्या ठिकाणीं धनकोऋणकोस जोडणाऱ्या पेढ्या झाल्या पाहिजेत. सावकारांच्या वर वर्णन केलेल्या पद्धतीमुळें आणि प्रत्येक क्षणीं पैसा बुडण्याची भीति असल्यामुळें सध्यांचे सावकार जनतेचा विश्वास कितपत राखूं शकतील हा प्रश्नच आहे आणि यामुळें या धंद्यामध्यें सुशिक्षित व अब्रूला भिणारे आणि चोरटेपणाच्या तालमींत तयार न झालेले लोक पडले पाहिजेत. सुरुवातीला बेताचें भांडवल असलें तरी हरकत नाहीं. दिलेल्या पैशाची सवाई दिढी करूं शकेल अशा अब्रूला भिणाऱ्या हुषार मनुष्यांची जरूर पैसेवाल्यास पुष्कळच आहे. पुष्कळ स्वस्थ पडलेली रोकड व्यवहारांत येण्यासाठीं ट्रस्ट कंपनीसारख्या कंपन्यांची जरूर आहे.

**ट्रस्ट (निधिसंरक्षक) कंपनी.**—अमेरिकेमध्यें हा कंपन्यांचा प्रकार चांगलाच प्रचलित आहे. यांचें अस्तित्व यूरोपांत फारसें ऐकूं येत नाहीं यांचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे अज्ञानाच्या दौलतीची व्यवस्था पाहणें हा होय. या कंपन्यांस यांचें गिऱ्हाईक असणारा इसम आपल्या मृत्युपत्रांमध्यें व्यवस्थापक नेमतो आणि त्यामुळें अज्ञानाच्या इस्टेटीची व्यवस्था हातीं घेण्यास त्यांस अधिकार उत्पन्न होतो. पुष्कळदां इस्टेटवाले असें करितात कीं, आपला कोणी आप्त (बायको वगैरे) आणि ट्रस्ट कंपनी या दोघांस आपल्या इस्टेटीचे ट्रस्टी नेमतात. कंपनी तिच्यांतील व्यक्ती मृत झाल्या तरी चालूच राहते, असें असल्यानें इस्टेटीची व्यवस्था पाहणाऱ्या संस्थेंत एक कंपनी असल्यास त्या संस्थेला कायमपणा असतो. मनुष्याच्या शाश्वतीपेक्षां कंपनींत शाश्वती अधिक असते हा कंपनीकडे दौलतीची व्यवस्था सोंपविण्यांत एक फायदा असतो व दुसरा फायदा म्हणजे प्रत्येक व्यवहार कसा करावा हें काम तज्ज्ञाकडे असल्यानें लवकर होतें. उदाहरणार्थ, मृताच्या विम्याचा पैसा घ्यावयाचा असला तर मृताच्या आप्तास किंवा ज्यांच्या फायद्याकरितां विमा उतरला असेल त्यांस अतिशय त्रास पडतो. परंतु विम्याचे पैसे वसूल करण्यास या निधिसंरक्षक कंपनीस असा त्रास पडत नाहीं. मृताची पत्नी जर व्यवस्थापक असली तर कौटुंबिक गरजा तिला चांगल्या समजतील आणि ट्रस्ट कंपनीस त्या गरजांप्रमाणें व्यवस्था लावण्यास व्यावहारिक उपाय कोणते योजावेत हें चांगलें समजेल आणि या प्रकारच्या फायद्यामुळें आपल्या इस्टेटीची व्यवस्था पाहण्याचें काम पत्नी व ट्रस्ट कंपनी या दोघांकडे देण्याची वहिवाट ठीक आहे. ट्रस्ट कंपन्यांकडून काम करून घ्यावयाची पद्धत केवळ अज्ञानाच्याच हिताकरितां आहे असें नाहीं तर सज्ञानासहि तिची मदत होते. उदाहरणार्थ, एखाद्या व्यक्तीची

इस्टेट एके ठिकाणीं आहे आणि नोकरी दुसरीकडे आहे, अशा स्थितींत त्याला आपल्या इस्टेटीची व्यवस्था पाहण्याचें काम ट्रस्टकंपनीकडे सोंपवितां येतें. इस्टेटीची व्यवस्था पाहणें हें काम ट्रस्टकंपन्या करितात, पण त्यास मर्यादा आहे. उदाहरणार्थ, ट्रस्टकंपन्या अज्ञानाकरितां दुकान चालवूं शकणार नाहींत किंवा त्याच्याकरितां त्याचें शेत पिकवूं शकणार नाहींत. त्या फार तर दुकानाचा विक्रय करतील, पैसे जमा करतील, शेअर्सवरील मुनाफा वसूल करतील, शेत खंडानें देऊन खंड घेण्याची व्यवस्था करतील, घरें व चाळी यांचें भाडें वसूल करतील; पण यापलीकडे त्यांनां कांहीं करितां येणार नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हिंदुस्थानांत कोर्ट ऑफ वार्ड्समध्यें जें काम होतें तें अमेरिकेंत ट्रस्टकंपन्या करितात.

बँकांचा धंदा व ट्रस्टकंपन्यांचा धंदा यांत फरक आहे. ट्रस्टकंपन्या, ज्यांची रकमा वारंवार काढण्याची प्रवृत्ति असेल अशा ठेवी ठेवणारांचीं खातीं आपणांकडे उघडीत नाहींत तर साधारणपणें सेव्हिंग बँकेमध्यें पैसे ठेवणारा जो वर्ग असतो त्या वर्गाच्या ठेवी आपणांकडे ठेवतात. बँका व ट्रस्टकंपन्या यांच्यांतील दुसरा फरक म्हटला म्हणजे बँका पुष्कळ दिवस म्हणजे वर्षेंच्या वर्षें कर्जाऊ रकमा देत नाहींत, पण ट्रस्टकंपन्या दहा किंवा वीस वर्षांत फेड करण्याच्या शर्तीचे म्हणजे लांब मुदतीचे कर्जरोखे करून घेऊन पैसे देतात. कां कीं, जो वर्ग व्यापार करीत नाहीं पण संचय करीत आहे आणि ज्याची दृष्टि आपले पैसे अनेक वर्षें गुंतविले जाऊन व्याज सारखें मिळत रहावें अशी आहे अशांच्याच रकमा ट्रस्टकंपन्यांकडे असतात. जी जामिनकी रोकडीच्या स्वरूपांत तावडतोब आणतां येणार नाहीं अशा जामिनकीवर पैसे देण्याची प्रवृत्ति बँकांनां नसते, पण ट्रस्टकंपन्या तसल्या प्रकारची जामिनकी घेऊन पैसे देऊं शकतात. ट्रस्टकंपन्यांचे पक्षकार किंवा खातेदार बँकांच्या खातेदारापेक्षां अर्थात् निराळे असतात. त्यांचें साधारणतः वर्गीकरण येणेंप्रमाणें.

१ इन्शुरन्स कंपन्या.

२ संचय करूं इच्छिणारा आणि कायमच्या ठेवी ठेवूं इच्छिणारा वर्ग.

ट्रस्ट कंपन्यांकडून पैसा घेऊं इच्छिणारे वर्ग येणेंप्रमाणें.

१ जमीन गहाण टाकून तिजवर रकम मागणारा वर्ग.

२ मोठमोठ्या इमारती बांधणाऱ्या कंपन्या.

३ डिबेंचर्स म्हणजे गहाणाचे कर्जरोखे देऊन पैसा काढून त्याजवर धंदे करणाऱ्या कंपन्या.

ट्रस्ट कंपन्या या दुसऱ्यांचें विशिष्ट काम करून देणारे एजंट असतात. ज्यांस रकम उभी करावयाची असेल अशा रेल्वे कंपन्या वगैरेंचे शेअर किंवा डिबेंचर्स विकण्याचें काम या कंपन्या करतात. कां कीं, कायमच्या ठेवी ठेवूं इच्छिणाऱ्या रोकडवाल्यांशीं त्यांचा संबंध असतो.

न्यूयॉर्क संस्थानामध्यें हुंड्या वटविण्यास त्यांस मनाई आहे; पण हुंड्या विकत घेण्यास त्यांस मनाई नाहीं. कां कीं, ट्रस्ट कंपन्यांचें उद्दिष्ट हुंड्यांचा व्यापार करणें नसून रकमा गुंतवून व्याज घेणें हेंच असलें पाहिजे असें त्या संस्थानांतील कायद्याचें ध्येय आहे.

भांडवलाचें एकीकरण करण्यासाठीं जे महासंघ तयार होतात त्यांची स्थूल माहिती होण्यासाठीं महासंघ अथवा ट्रस्ट आणि होल्डिंग कार्पोरेशनची माहिती अवश्य आहे.

**महासंघ.**—आजकालच्या दिवसांत कोणतीहि गोष्ट लहानसहान प्रमाणावर यशस्वी रीतीनें चालवितां येत नाहीं म्हणून अनेक जणांच्या भांडवलांचें एकीकरण होऊं लागलें आहे. अनेक भागीदार मिळून धंदा केला आणि तो धंदा करणारा संघ हीच एक व्यक्ति बनली म्हणजे तिला आपण कंपनी म्हणतों. अशा अनेक कंपन्या एकत्र झाल्या म्हणजे त्याला ट्रस्ट असें म्हणण्याची पद्धति आहे. संघ करण्याचे हेतु दोन असतात. एक तर धंदा मोठ्या प्रमाणावर केल्यामुळें होणारी काटकसर संपादन करणें आणि दुसरा हेतु म्हटला म्हणजे त्या धंद्यांतील लोकांचें एकीकरण केल्यानें त्या व्यापारास मक्त्याचें स्वरूप आणणें. या प्रकारच्या संघाची घटना अमेरिकेंत फार झाली आहे आणि त्यामुळें इतर लोकांचे व्यापार चिरडून टाकण्याची अमेरिकन लोकांची शक्ति वाढली आहे. उदाहणार्थ, तेल किंवा पोलाद यांची गोष्ट घ्या. हें पोलाद अमेरिकेच्या एका मोठ्या कंपनीनें आपलेसें करून घेतलें आहे. देशांत उत्पन्न होणाऱ्या बहुतेक पोलादावर एक कंपनी स्वामित्व गाजविते. तीच गोष्ट तेलाची व तीच गोष्ट बऱ्याच अंशीं तंबाखूची. या अनेक कंपन्यांचें एकीकरण होऊन नंतर त्या मोठ्या होतात. ज्या कंपन्यांचें एकीकरण होतें त्यांचा धंदा एक तर समान असतो अगर अन्योन्याश्रयी असतो. छापखाना, दैनिकपत्र, कागदाची गिरणी आणि ज्या लांकडापासून कागद करतात त्या लांकडाचें अरण्य या सर्व गोष्टी अन्योन्याश्रयी आहेत; आणि यांच्या एकीकरणामुळें धंद्यांत विलक्षण काटकसर होते आणि त्यांच्यांशीं सर्धा करणें इतरांस जड जातें. सर्वच छापखाने एकाच व्यक्तीनें ताब्यांत घ्यावयाचे हा दुसरा प्रकार झाला. याच्यायोगानें गांवांतील छपाईच्या कामाचा मक्ता एकाच व्यक्तीस मिळाल्यासारखा होतो. मग ठरेल तो दर निमुटपणानें दिल्याशिवाय गिऱ्हाइकास गत्यंतर नाहीं.

मक्ता उत्पन्न करण्यासाठीं जो संघ करावयाचा तो वाटेल त्या गोष्टीचा करतां येत नाहीं. छापखान्यांचा संघ करून काय उपयोग ? हा फार तर १।२ वर्षें [illegible] वर्गांतहि काच मो[illegible] कांहि[illegible]नी अ[illegible]सून येतो.

गेलेंच. येथें स्पर्धेची भीति नाहीं असें नाहीं, परंतु खाणीची गोष्ट तशी नाहीं. ज्या खाणी आहेत त्या ताब्यांत घेतल्या किंवा त्या खाणीच्या मालकांनीं संघ केला म्हणजे त्यापुढें कांहींच इलाज नाहीं. जेथें स्पर्धेची भीति असेल तेथें मक्ता होत नाहीं असें नाहीं. नवीन भांडवल येऊन तेथें नवीन कारखाना निघेपर्यंत त्याला मक्त्याचें स्वरूप ठेवतां येईल आणि बाल्यावस्थेंत असलेल्या दुसऱ्या कारखान्यांस अतिशय हलके दर लावून चिरडून टाकतां येईल.

अमेरिकेंत जे असे मोठाले संघ झाले त्यामुळें अमेरिका देशाचें फार नुकसान होत आहे अशी अमेरिकन लोकांची ओरड आहे. धंद्याला मक्त्याचें स्वरूप आलें म्हणजे नुकसान होणार गिऱ्हाइकांचें. त्यामुळें गिऱ्हाइकांनां अर्थात् आपणांवर कंपनी जुलुम करीत आहे असें वाटतें. स्टँडर्ड ऑईल कंपनी दरसाल दरशेंकडा ४० मुनाफा देते. एकदां स्टँडर्ड ऑईल कंपनीस दोन कोट रुपयांच्या वर दंड झाला होता. त्यानंतर कंपनीनें तेलाचा भाव वाढवून दिला, तेव्हां हा दंड सरकारानें कंपनीस केला कीं लोकांनां केला अशी चर्चा तेथील वर्तमानपत्रांत चालू होती. यामुळें लोकांची महासंघांविरुद्ध वृत्ति आहे आणि या संस्थांचें दमन कसें करावें यासंबंधानें अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत. या महासंघांविषयीं अमेरिकेंत अतोनात वाङ्मय वाढलें आहे आणि या वाङ्मयाचा आढावा हारवर्ड युनिव्हर्सिटींतील प्रो. बुलक यांनीं आपल्या लेखांत घेतला आहे. या महासंघांचें दमन कसें काय करावें या विषयावर आणि हे महासंघ देशास हितकारक आहेत कीं अहितकारक आहेत यासंबंधानें जे ग्रंथकार लिहीत आहेत त्यांत प्रो. एली (Ely), प्रो. जेंक्स, मि. मीड इत्यादि लेखक प्रमुख होत. संयुक्त संस्थानांचें या महासंघांमुळें कल्याण अगर अकल्याण झालें याचा तात्त्विक विचार करण्याचें प्रयोजन नाहीं. येथें एवढेंच सांगितलें पाहिजे कीं बहुतेक लेखकांची दृष्टि जनता व महासंघ हे परस्परविरोधी आहेत व आपण जनतेचे अंश आहोंत अशा प्रकारची आहे; आणि प्रो. बुलक यांनीं जो आढावा घेतला आहे त्यांत हे महासंघ फार नफा खातात यावरच विशेष जोर दिला आहे.

या महासंघांच्या संबंधानें भारतीयांची दृष्टि निराळ्या प्रकारची असली पाहिजे. अमेरिकेंतल्या लहानसहान संस्थांस हे महासंघ चिरडून टाकतील तर त्याबद्दल आम्हांस बिलकूल दुःख नाहीं. आम्हांस या महासंघांचें भय निराळ्याच कारणामुळें आहे. तें कारण म्हटलें म्हणजे ज्या अमेरिकेंतल्या कंपन्यांनां या महासंघांपुढें टिकाव धरतां येत नाहीं त्याच कंपन्या आम्हां भारतीयांच्या दृष्टीनें फारच मोठाल्या व अजस्र [illegible] ...ारे हे महासंघ इतर [illegible] ...ील

हें होय. आपणांस स्वसंरक्षणासाठीं तरणोपाय म्हटला म्हणजे भांडवलाचें एकीकरण करून धंदे चालविणें आणि त्यांचेंहि एकीकरण करून महासंघ होऊं देणें हाच आहे. संघ जर व्यक्तीस चिरडणारे असतील तर आपल्या देशांतीलच संघांनीं व्यक्तींस चिरडणें हें परक्या देशांतील संघांनीं आमच्या देशांतील व्यक्तींस चिरडण्यापेक्षां पुष्कळ चांगलें. अर्थात्, आपणांस या महासंघांच्या घटनेकडे अनुकरणेच्छूच्या जिज्ञासेनें पाहिलें पाहिजे.

अमेरिकन लोकांची या महासंघांविरुद्ध असलेली बुद्धि प्रथमतः एका कायद्यानें कृतींत उतरली. तो कायदा शर्मन (Sherman) नांवाच्या गृहस्थानें पुढें आणला म्हणून त्यास शर्मनचा अँटी-ट्रस्ट कायदा असें म्हणतात. तो कायदा निरनिराळ्या संघांनीं एकीकरण करण्याच्या विरुद्ध होता. व्यापाराला विघातक अशीं जीं जीं एकीकरणें होतील तीं तीं एकीकरणें अमेरिकेच्या शासनघटनेच्या विरुद्ध आहेत असें तत्त्व अमेरिकेच्या शासनघटनेच्या आदिसूत्रांत गोंवलें गेलें आहे. त्या तत्त्वांनुरूप हा कायदा होत आहे अशी त्यावेळेस लोकांची व कायदे करणारांचीहि भावना होती. तथापि हें कायद्याचें ध्येय भांडवलवाल्यांनीं निराळीच एक खुबी करून फेंटाळून लावलें आणि शर्मनचा कायदा नाहींसारखाच केला. भांडवलवाल्यांनीं असें केलें: न्यू जर्सी संस्थानांत असा कायदा करून घेतला कीं, एका कंपनीनें दुसऱ्या कंपनीमध्यें शेअर घेण्यास हरकत नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं, न्यू जर्सी संस्थानांत बहुतेक सर्व मोठ्या कंपन्या रजिष्टर झाल्या आणि त्या कंपन्यांवर राज्य चालविण्याचा मुनाफा कराच्या रुपानें न्यू जर्सी संस्थानास मिळाला. एका इमारतीला शें दोनशें कंपन्यांच्या पाट्या लागावयाच्या असे प्रकार न्यू जर्सी संस्थानांत सुरू झाले. कंपनीचें रजिस्टर्ड ऑफिस म्हणजे एक नांवाची पाटी न्यू जर्सी संस्थानांत आणि कंपनीचें खरेंखुरें ऑफिस व धंदा कंपनीस वाटेल तेथें अशा प्रकारची स्थिति आज तेथें आहे. ज्या संस्थानांत कंपन्यांच्या व्यवहाराला फायदेशीर कायदे असतील अशा संस्थानांमध्यें कंपन्या रजिष्टर करून घेण्याचा धंदा सुरू झाला. जर कोणास अरिझोना वगैरे संस्थानांत एखादी कंपनी रजिष्टर करून पाहिजे असेल तर त्यानें असल्या कंपनी रजिष्टर करणाऱ्या लोकांस जर कांहीं रक्कम भरली तर त्या मनुष्याला कंपनीला लागणाऱ्या सर्व गोष्टी पुरवून कंपनी रजिष्टर करून त्याचें सर्टिफिकीट ते लोक आणून देतात. पहिले नामधारी डायरेक्टर किंवा कंपनीचे संस्थापकसुद्धां ते लोकच पुरवितात. असो.

शर्मन अँटी-ट्रस्ट ॲक्ट न्यू जर्सीनें कुचकामाचा कसा केला हें वर सांगितलेंच आहे. तथापि तो कायदा पास झाल्यानंतर जी महत्त्वाची घडामोड झाली आणि ज्या गोष्टींचा उदय

झाला त्यांत 'होल्डिंग कॉर्पोरेशन्स' (Holding Corporations) चा प्रमुखत्वानें उल्लेख केला पाहिजे. या कंपन्या दुसरा तिसरा धंदा न करतां दुसऱ्या कंपन्यांचे भाग घेणें आणि भागांवर येणारा मुनाफा वांटून घेणें हाच धंदा करतात. अशा कंपन्या करण्यांत फायदा आहे तो असा. समजा, एखाद्या कंपनीचे भाग हजार हजार रुपये किंमतीचे आहेत तर दहा रुपये गुंतवूं इच्छिणाऱ्यास त्या भागावरील मुनाफा कसा मिळवितां येईल? अशावेळीं त्यानें होल्डिंग कॉरपोरेशनचे शेअर घेतले आणि होल्डिंग कॉरपोरेशननें ते मोठाले शेअर घेतले म्हणजे हा थोडक्या रकमेचा मनुष्य देखील ज्यांचे भाग मोठाले आहेत अशा कंपन्यांच्या मुनाफ्याचा अंशभाक् होईल. दुसरा फायदा म्हटला म्हणजे ज्याअर्थी ही होल्डिंग कॉरपोरेशन निरनिराळ्या कंपन्यांचे शेअर विकत घेते त्याअर्थी होल्डिंग कॉरपोरेशनमध्यें शेअर घेणाऱ्याचे पैसे अधिक सुरक्षित होतात व रकमेचें जोखीम इतक्या निरनिराळ्या लोकांवर वांटलें जातें. होल्डिंग कॉरपोरेशनपासून होणारा तिसरा मोठा फायदा म्हटला म्हणजे निरनिराळ्या कंपन्यांचा जो महासंघ बनवावयाचा तो संघ बनविण्याची एक नवीन पद्धति निर्माण झाली. निरनिराळ्या कंपन्यांचें एकीकरण करावयास त्या कंपन्यांचें वैशिष्ट्य घालवून एकीकरण करावयाचें असें न करतां त्यांचें वैशिष्ट्य कायम राखून त्यांचें एकीकरण करणें सुलभ झालें; आणि थोडक्या भांडवलांत कंपनीचा सबंध ताबा हातीं घेण्याची संधि उत्पन्न झाली. समजा, बडनेरा मिल, पुलगांव मिल व हिंगणघाट मिल या सर्वांचें एकीकरण करावयाचें आहे तर हें एकीकरण करतांना प्रत्येक कंपनीच्या जनरल मीटिंगमध्यें ठराव पास झाला पाहिजे. शिवाय प्रत्येक कंपनीच्या भागांची किंमत या नवीन संघांत किती घालावयाची यासंबंधानें वाद जरा जास्त लांबेल. पुन्हा या सर्वांचें भांडवल एकत्र केलें म्हणजे सर्वाधिकार कोणास द्यावा यासंबंधानें आंत कारस्थान सुरू झालेंच. परंतु होल्डिंग कॉरपोरेशनमुळें या सर्व गोष्टींचा तंटा मिटतो. एखादी होल्डिंग कॉरपोरेशन तयार होते, ती बाजारभावाप्रमाणें दुसऱ्या कंपन्यांतील शेअर विकत घेते, प्रत्येक कंपनींत मताधिक्य करून कारभार आपल्या हातांत घेते आणि हिचेच चालक त्या सर्व कंपन्यांचे चालक बनतात. जर वर सांगितलेल्या तिन्ही कंपन्यांचें एकीकरण झालें तर अर्थात् त्यामध्यें आपआपसांत स्पर्धा रहात नाहीं व उत्पादन करावयाच्या मालाचें वाटल्यास विशिष्टीकरण करतां येतें. प्रत्येक गिरणीनें सर्व प्रकारचा माल न काढतां निरनिराळ्या गिरण्यांनीं निरनिराळ्या प्रकारचा माल काढावा असें करतां येईल.

**महासंघ आणि चढाओढ.**—महासंघांचा उपयोग स्पर्धा नाहींशी करून धंद्याला मक्त्याचें स्वरूप आणण्याकडे होतो हें मागें सांगितलें आहे.

बाजारांत येणारा तयार माल एकाच प्रकारचा असला व गिऱ्हाइकांस अमुक माल कोणत्या प्रतीचा आहे हें चटकन समजणें शक्य असलें व असा माल बाजारांत मोठ्या प्रमाणावर घाऊक खपत असला तर असा माल तयार करणाऱ्या कंपन्यांमध्यें साहजिकच चढाओढ लागते; आणि त्याचा परिणाम मालाच्या किंमतीवर होतो. साखर, तेल, दारू, मीठ हीं उदाहरणें या सदराखालीं येतात. कोणता माल उच्च प्रतीचा आहे हें गिऱ्हाइकास लवकर ओळखतां येतें व जो उत्तम माल सर्वांत कमी किंमतीस देईल त्याच्याच मालाचा अर्थात् जास्त खप होईल. साधारणपणें कमी किंमतीचा व चिल्लर खपणारा माल जो असतो त्याचीं निरनिराळ्या आकाराचीं पुडकीं कारखानदार तयार करतो व हीं पुडकीं गिऱ्हाइकास लवकरच माहीत होतात. कांहीं माल निरनिराळ्या छापाखालीं व ट्रेड मार्कखालीं खपतो व हाहि माल लवकरच गिऱ्हाइकाच्या परिचयाचा होतो. वर सांगितलेल्या प्रकारच्या मालांतहि निराळ्या रीतीची चढाओढ होणें शक्य असतें. एखाद्या कारखानदाराच्या मालाची प्रसिद्धि होऊन त्या मालाचा बाजारांत एकदां जम बसला म्हणजे गिऱ्हाइक विशेष चौकशी न करतां त्या मालाची खरेदी करीत असतें व त्या किंमतीस स्वाभाविक किंमतीचें स्वरूप येतें. अशा कारखानदारास जर कोणी बाजारांत प्रतिस्पर्धी भेटला तर कारखानदार किंमत कमी न करतां जाहिरातीचा खर्च जरा अधिक वाढवितो. साबण, कॅमेरे, कॉफी, पेटंट औषधें इत्यादि माल या सदरांत येतो. ज्या मालाच्या चढाओढीमुळें किंमतींत चढउतार होण्याचा संभव असतो असा माल तयार करणाऱ्या कारखान्यांचा संघ करून बाजारांतून प्रतिस्पर्धी काढून टाकणें व मग ज्या रीतीनें फायदा पडेल अशा मालास किंमती लावणें शक्य असतें. दुसऱ्या प्रकारच्या मालाच्या कारखानदारांनीं जर संघ केला तर प्रत्येक कारखानदारास आपला माल खपविण्याकरितां करावा लागणारा जाहिरात वगैरे खर्च वांचेल आणि अशा रीतीनें किंमत न वाढवितां धंदा किफायतशीर करतां येईल.

चढाओढ करण्यापेक्षां संघ स्थापन करून जे फायदे आहेत व ज्यामुळें हे महासंघ स्थापन झाले ते येणेंप्रमाणें:—

१ विक्रीखर्च बराच कमी होतो. वर जे दुसऱ्या प्रकारचे धंदे सांगितले त्या धंद्यांतील मालाचा खप करण्याकरतां जाहिरातीचा अतोनात खर्च करावा लागतो. ज्या अमेरिकन मासिकांचा फार खप आहे अशा मासिकांत कारखानदारास जाहिरात द्यावयाची असली तर एका अंकांत जाहिरात छापून येण्याकरतां शंभर डॉलरपासून कधीं कधीं चा[illegible] डॉलरपर्यंत आकार [illegible] ठेमोठ्या [illegible] वर्गांतहि जाहिरातीं[illegible] कांहीं[illegible]नी अ[illegible]मून येतो.

येईल. दुकानांतील किंवा वखारींतील गिऱ्हाइकांस माल दाखविण्याकरितां जी जागा केलेली असते ती सर्वांगसुंदर व मोहक करण्याकरितांहि पुष्कळ पैसा खर्च होत असतो. तसेंच सर्व देशभर, भिंतीवर, रेल्वेलाइनीवर, शेजारीं असणाऱ्या इमारतींवर जाहिराती चिकटविणें इत्यादि उदाहरणें यासंबंधाचीं देतां येतील.

२ विक्री करण्याकरितां मालखपवे पाठवावे लागतात. त्यांचा पगार व प्रवासखर्च कारखानदारावरच पडतो. हा सर्व खर्च महासंघ स्थापन केल्यावर त्या मानानें कमी होतो.

३ जेव्हां एका संघाखालीं असलेले कारखाने चोहोंकडे देशांत पसरलेले असतात त्या वेळीं मालासाठीं मागणी मुख्य ऑफिसांत घ्यावयाची आणि मागणी करणारा जेथें असेल तेथील नजीकच्या कारखान्यांतून त्या मागणीचा पुरवठा करावयाचा. या तऱ्हेनें रेल्वेभाडें वगैरे वांचतें व गिऱ्हाइकांस व कंपनीस फयदा पडतो.

४ पुष्कळ कारखान्यांमध्यें फायदा विशेषेंकरून मॅनेजरच्या गुणावर अवलंबून असतो. यामुळें सर्व कारखान्यांमध्यें जो हुषार मनुष्य असेल त्याच्या हातीं कार्यव्यवस्था सोंपवितां येते.

५ शिवाय असेंहि होतें कीं, निरनिराळ्या कारखान्यांमध्यें जीं माणसें असतात त्यांत निरनिराळ्या प्रकारची हुषारी आढळून येते. कित्येक कारखान्यांत विक्रीखात्याचा मनुष्य चांगला असतो, कित्येक कारखान्यांत माल तयार करण्यांत हुषारी दिसून येते आणि कित्येक कारखान्यांच्या यशस्वीपणाचें कारण कामकरी लोकांस संतुष्ट कसें ठेवावें यांत दिसून येणाऱ्या हुषारीवर अवलंबून असतें. या सर्व कारखान्यांचें एकीकरण झाल्यानें प्रत्येक कारखान्यांतील चांगुलपणाचेंहि माणसांच्या एकीकरणामुळें एकीकरण करतां येतें.

६ अनेक कारखान्यांमध्यें एक प्रकारचाच माल न करतां निरनिराळ्या प्रकारच्या कामाकरितां निरनिराळे कारखाने वापरतां येतात. त्यामुळें एक काम सोडून दुसरें काम हातीं घेतेवेळेस प्रत्येक कारखान्याची जशी घडी बिघडते तशी बिघडत नाहीं, व त्यामुळें वेळेची काटकसर होते आणि प्रत्येक कामांत विशिष्टीकरण होतें.

७ निरनिराळ्या प्रकारचा माल एकाच कंपनींत तयार होत असल्यानें गिऱ्हाइकी वाढते. कां कीं, एक प्रकारचा माल मिळविण्याकरितां सतरा कंपन्या धुंडाळण्यापेक्षां एकाच कंपनीकडे जाणें गिऱ्हाइकास बरें वाटतें.

८ मालाचा पुरवठा मोठ्या प्रमाणावर करण्याची ताकद ज्या कारखान्यास असेल तिकडे गिऱ्हाइक धांवतें. कां कीं, [illegible] तीं संबंधें [illegible]

९ बाहेरदेशीं माल पाठविण्यास मोठ्या कारखानदारांस अधिक सोपें जातें. त्यांनां माल बाहेरदेशीं पाठविण्यास स्वतःचें खातें उभारतां येतें व परदेशांतहि ऑफिसें उघडतां येतात.

१० ज्या वेळेस सर्धा चालू असते त्या वेळीं गिऱ्हाइक कायम राखण्याकरितां उधारीनें माल द्यावा लागतो आणि ही उधारी पुष्कळदां अहितकारक होते. संघ केल्यानें सर्धेची भीति कमी झाली म्हणजे घातुक उधारीला आळा बसतो.

पाश्चात्त्य देशांचा वाढलेला व्यवहार जो येथें वर्णन केला आहे त्यांत "ट्रस्ट" उर्फ महासंघ हीं भांडवलाच्या एकीकरणाचीं उदाहरणें होत; आणि मालमत्तेचे उदाहरणार्थ जमिनीचे बाजारांत विक्रीस असलेले गहाणरोखे हें भांडवलाच्या विस्तरणाचें उदाहरण होय. या प्रकारच्या रोख्यांनीं देशांत असलेल्या रोकडीखेरीज इतर संचयाचा व्यापारी दळणवळणास अत्यंत मोठा उपयोग होऊन देशाचें भांडवल अनेक पटींनीं वाढल्यासारखें होतें. व्यवहारांत जितका सुव्यवस्थितपणा व भक्कमपणा अधिक तितका रोख्यांवर लोकांचा विश्वास अधिक बसतो. असो. भांडवलाचें एकीकरण व विस्तरण या विषयासंबंधानें पुढच्या पायऱ्या जशा स्पष्ट दाखवून दिल्या तशा इतर मुद्द्यांसंबंधानें देतां येणार नाहींत. तथापि साधारण स्वरूपावगमासाठीं कांहीं ठळक गोष्टी देतां येतील.

**मनुष्याच्या कार्यशक्तीचा विकास.**—हा अनेक कारणांनीं घडून येतो. त्यांतील मुख्य कारण म्हटलें म्हणजे विशिष्ट धंद्याचें शिक्षण होय. अधिक सुशिक्षित मनुष्य अधिक कार्यक्षम बनतो. समाजामध्यें अधिक उत्पादक धंदे कांहीं माणसें करूं लागलीं म्हणजे समाजाचें उत्पादकत्व वाढतें किंवा असलेला धंदा मनुष्य अधिक चांगल्या तऱ्हेनें करूं लागला म्हणजे उत्पादकत्व वाढतें. देशामध्यें एकंदर लोकसंख्येशीं व्यापाऱ्यांचें प्रमाण अमुक असलें पाहिजे, शेतकरी इतके असले पाहिजेत, कच्च्या मालाचा पक्का माल बनविणारांचें प्रमाण अमुक असलें पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. देशांतील आणखी पुष्कळ लोक सुशिक्षित झाले म्हणजे सध्यांच्या कारकुनांनीं काय करावें आणि सुतार, चांभार वगैरे लोकांचे धंदे कोणी करावेत असा प्रश्न विचारण्यांत येतो. त्यास उत्तर एवढेंच कीं, अधिकाधिक सुशिक्षित धंद्यांस क्षेत्र आहे. सुशिक्षित लोकांस कार्यक्षेत्राची वाण कधींच पडणार नाहीं. जसजशी शिक्षणांत प्रगति होईल तसतशी निरनिराळ्या धंद्यांचीहि प्रगति होत जाईल, व अधिक लोकांस कार्य करण्यास क्षेत्र उत्पन्न होत जाईल. तसेंच निरनिराळ्या धंद्यांचें शिक्षण जसजसें वाढत जाईल तसतसा अधिक अधिक चांगल्या दर्जाचा माल बाहेर पडून जुने धंदेच सुधारून [illegible]धिक द्रव्योत्पादक होतील व त्यांनां अधिकाधिक योग्यतेचीं

सुशिक्षित माणसें आपल्या कार्यासाठीं घेण्याची शक्ति येत जाईल.

शिक्षणानें मनुष्याच्या कार्यशक्तीचा अनेक बाबतींत विकास होतो. त्याचें सर्वसामान्य ज्ञान वाढल्यानें प्रथमतः त्याला योग्य धंद्याची निवड करणें सोपें होतें. त्याची ग्राहकशक्ति वाढल्यानें कोणत्याहि धंद्याचें ज्ञान करून घेणें त्याला अधिक सुलभ होतें. शिक्षणानें त्याच्या अंगीं नियमितपणा, निरलसता इत्यादि गोष्टी येतात. निरक्षर मनुष्यापेक्षां साक्षर मनुष्याला त्याचें काम समजावून देणें सोपें होतें व ज्यावेळीं प्रत्यक्ष सांगतां येण्यासारखें नसेल त्यावेळीं लिहून कळवितां येतें. साक्षर मनुष्याला कामासंबंधीं नियम लेखी घालून देतां येतात व ते त्याला वरचेवर पाहतां येण्यासारखे असल्यामुळें ध्यानांत ठेवण्याचे परिश्रम करावे लागत नाहींत. उलट निरक्षर मनुष्याला एकाच वेळीं अनेक गोष्टी अथवा गुंतागुंतीच्या कल्पना ध्यानांत ठेवणें फारच अवघड जातें. याप्रमाणें केवळ शिक्षणानें देखील मनुष्याच्या कार्यशक्तीवर बराच परिणाम घडवून आणतां येतो. असो. आतां आपण येथील काम करणारांची व इंग्लंडांतील काम करणारांची कांहीं बाबतींत तुलना करून पाहूं.

*हिंदुस्थान* व इंग्लंड यांची आपण तुलना केली असतां आपणांस बरेच महत्त्वाचे निर्णय काढतां येतील.* हिंदुस्थानांत एकंदर लोकांत प्रत्यक्ष काम करणारे किती आहेत याचे आंकडे घेऊन त्यांची इंग्रजांच्या आंकड्यांशीं तुलना केली असतां आपणांस असें दिसून येईल कीं, प्रत्यक्ष काम करणाऱ्यांचें प्रमाण इंग्लंडांत शेंकडा ४५ असून हिंदुस्थानांत शेंकडा ४७ आहे. म्हणजे ५३ माणसांनां पोसण्यासाठीं हिंदुस्थानांत ४७ माणसांनां मेहनत करावी लागते तर इंग्लंडांत ५५ माणसांनां पोसण्यासाठीं ४५ माणसांस मेहनत करावी लागते. नुसत्या एवढ्या आंकड्यांवरून फारसें सिद्ध होत नाहीं. कां कीं, देशामध्यें अल्पायुषी लोक असले तर म्हातारे कमी असणार आणि त्यामुळें प्रत्यक्ष काम करणारांची संख्या वाढणार. शिवाय देशांतील विवाहित स्त्रियांस जितकें बाहेर काम करावें लागेल तितकी देशांत सुवत्ता कमी असें म्हटलें पाहिजे. यावरून काम करणारांची संख्या जास्त दिसली म्हणजे तें देशाच्या समृद्धीचें लक्षण समजावें किंवा नाहीं हें सांगतां येणार नाहीं. हिंदुस्थान व इंग्लंड यांजमध्यें दुसरा मोठा फरक म्हटला म्हणजे कच्च्या मालाची पैदास करणारा वर्ग हिंदुस्थानांत लोकसंख्येच्या $\frac{1}{3}$ आहे व काम करणाऱ्या लोकसंख्येच्या शेंकडा ७२ आहे; इंग्लंडांत शेतकीवर राहणाऱ्या लोकांचें व कच्च्या मालाची पैदास करणाऱ्यांचें एकंदर लोकसंख्येशीं प्रमाण फारच अल्प आहे; हिंदुस्थानांतील कामगारांच्या संख्येपैकीं खनिज द्रव्यें उकरण्याकडे असलेली अत्यंत क्षुद्र लोकसंख्या सोडून दिली तर बहुतेक वर्ग शेतकीवर आहे. सरकारी नोकरी व डॉक्टरी, वकिली यांसारख्या शिष्ट धंद्यांमध्यें असलेल्या लोकांचें प्रमाण इंग्लंडमध्यें जर दर हजार लोकवस्तींत ३४ तर हिंदुस्थानांत १४ आहे. हिंदुस्थानामध्यें स्थानांतरास मदत करणाऱ्या लोकांची संख्या दरहजारीं ७$\frac{1}{2}$ आहे तर इंग्लंडांत ४० आहे. म्हणजे इंग्लंडांत अधिक वृद्धिंगत झालेल्या स्थानांतराच्या सोयींमुळें तिकडे जितके लोक सरकारी नोकरीसाठीं लागतात त्यांच्यापेक्षां जास्त स्थानांतरास लागतात. आणि त्यांच्या मानानें हिंदुस्थानांतील संख्या फारच कमी दिसते. व्यापारांत गुंतलेल्या लोकांची संख्या दरहजारीं हिंदुस्थानांत २६ तर इंग्लंडमध्यें ४० आहे म्हणजे व्यापारांतील लोकांची संख्या इकडे फारशी कमी नाहीं. स्थानांतराच्या फार थोड्या सोयींवर देशांतील व्यापारीवर्गास अवलंबून रहावें लागत आहे. व्यापारीवर्गाचें सर्व जीवित कच्च्या मालाची पैदास आणि त्याचा पक्का माल बनविणें ही क्रिया आणि स्थानांतराच्या सोयी यांवरच अवलंबून आहे. उद्योगधंद्यांमध्यें हिंदुस्थानांत जर हजारीं ५६ माणसें आहेत तर व्यापारांत २६ आहेत. म्हणजे ५६ माणसांनीं उत्पन्न केलेला पक्का माल व ३४० लोकांनीं उत्पन्न केलेला कच्चा माल व बाहेरदेशींचा आलेला माल विकण्यास २६ माणसें लागतात; व या सर्व मालाची नेआण करण्यास ७$\frac{1}{2}$ माणसें पुरतात. म्हणजे दर शंभर व्यापाऱ्यांस कच्चा माल पैदा करणारे १३१६ लागतात, कच्च्याचा पक्का देशाच्या देशांत करणारे २१६ लागतात व २९ लोक त्या मालाचें स्थानांतर करण्यासाठीं लागतात. इंग्लंडांत व्यापारांतील दर शंभर माणसांमागें कच्चा माल पैदा करणारे ४८३ लागतात, कच्च्याचा पक्का करणारे १५८ लागतात व स्थानांतर करण्यासाठीं ९७ लागतात. असो.

जीं कामें यंत्रांनीं व्हावयाचीं तीं कामें करण्यास या देशांत माणसें लावलीं जातात एवढेंच नव्हे तर कठिण व कमी कुशलतेचें काम बायकांवरच पडतें. आपल्या देशांत साक्षरता वाढली तर बायकांची भवितव्यता बरीच सुधारेल. स्त्रियांच्या धंद्यांकडे आपणांस या दृष्टीनें नजर फेंकली पाहिजे.

**स्त्री व पुरुष कामगारांचें प्रमाण.**—पुरुषांशीं तुलना केली असतां स्त्रियांचें प्रमाण काम करणारांमध्यें कमी आहे. इंग्लंडांत जर पुरुषांपैकीं $\frac{2}{3}$ काम करणारे आढळतात तर स्त्रीजातीपैकीं $\frac{1}{3}$ च काम करणाऱ्या आढळतात. हिंदुस्थानामध्यें काम करणारे जर १००० पुरुष असले तर बायका ४६७ असतात. स्त्रिया कांहीं विशिष्टच धंदे करतात. [illegible] आकार [illegible] ठमोठ्या [illegible] वर्गांतहि [illegible] कांहीं [illegible]नी अ[illegible]वीमून येतो.

* आंकडे इंग्लंड व हिंदुस्थान या दोहोंचे १९११ चे आहेत.

नोकरी यांमध्यें वहुतेक पुरुषच आहेत. कांहीं धंद्यांमध्यें स्त्रिया पुरुषांपेक्षां सहज जास्त शिरतात. हे धंदे म्हटले म्हणजे तांदूळ सडणें व पीठ दळणें हे होत. या धंद्यांत पुरुष जर दोन गुंतले असले तर स्त्रिया पंधरा गुंतलेल्या असतात. तसेंच सुइणीचें किंवा नर्सचें काम, औषधें करणें, देवी काढणें इत्यादि धंद्यांत ३ स्त्रियांशीं १ पुरुष असें प्रमाण आहे. सुतळी किंवा दोऱ्या तयार करणें, भडभुंजाचें काम, मोळी विकणें इत्यादि धंद्यांत असलेल्या तीन माणसांपैकीं दोन स्त्रिया असतात. शेतावरील मजुरी, चहाच्या मळ्या-वरील मजुरी, मधमाशा किंवा रेशमी किडे यांची जोपासना, टोपल्या विणणें, मासे, दूध, भाजी किंवा गवत विकणें इत्यादि धंद्यांत स्त्रियांचें पुरुषांपेक्षां आधिक्य आहे.

काम करणाऱ्यांपैकीं सुमारें $\frac{३}{४}$ स्त्रिया शेतकामाकडेच गुंतल्या आहेत. शेतकामामध्यें नांगर धरणें आणि मळणी करणें हीं कामें वहुधा पुरुषांकडे असतात; व स्त्रियांकडे पेरणें, तण काढणें, कापणी करणें हीं कामें असतात. चहाच्या मळ्यामध्यें वायका पानें तोडतात आणि पुरुष कुळपणी करतात आणि पानांचा चहा तयार करतात. कोळशाच्या खाणींमध्यें पुरुष कोळसा कापतात व वायका वहातात. अभ्रकाच्या खाणींत वायका पत्रे अलग करतात. सोन्याच्या खाणींत कच्च्या मालाचा पक्का माल तयार करण्यांत जे लोक असतात त्यांत वायका अधिक असतात. कारागीर लोकांच्या वायका आपल्या नवऱ्यास त्याच्या कामांतील हलका भाग करण्यास मदत करतात. पुष्कळ वेळां माल तयार करण्याचें काम पुरुषांकडे असतें व विक्रीचें काम वायकांकडे असतें आणि कधीं कधीं पुरुषांच्या धंद्यापेक्षां वायकांचा धंदा अगदीं निराळा असतो. जंगली जातींमध्यें पुरुषांपेक्षां स्त्रियाच अधिक काम करणाऱ्या असतात. कोल आणि घासिया या जातींमध्यें काम करणाऱ्या स्त्रियांची संख्या पुरुषांपेक्षां अधिक आहे. आंधसारख्या जवळ जवळ कुणब्या-इतक्या संस्कृत जातींत काम करणाऱ्या वायका पुरुषां-इतक्याच आहेत. गोंड, कोरकू, भारिया आणि पंका या जातींत काम करणारे पुरुष १०० असले तर कामकरी स्त्रिया ९६ पासून ९८ पर्यंत असतील. मध्यप्रांतांत भोयारसारख्या उत्तर हिंदुस्थानीय जातींमध्यें काम करणाऱ्या स्त्रियांचें प्रमाण काम करणाऱ्या १०० पुरुषांशीं ९६ आहे; आणि मेहेरा, वसोर, चमार, निमार आणि तेली या जातींतल्या शंभर पुरुषांशीं स्त्रियांचें प्रमाण अनुक्रमें ९५,९४,९३ आणि ९१ असें आहे.

आतांपर्यंत स्त्री व पुरुष कामगारांत कोणत्या धंद्यांत [illegible]तं मुंबई [illegible]ख्यांतील निर-

आगरी, भंडारी, भिल्ल, भोई, न्हावी, कातकरी, कुणवी, लिंगायत, माळी, मराठे, मांग, महार, धेड, रामोशी, तेली, ठाकूर, वडर वगैरे जातींत स्त्रियांचें प्रमाण पुरुषांइतकेंच आहे व तें प्रसंगीं पुरुषांपेक्षां अधिक असून शंभर पुरुषांस १४० स्त्रिया यापर्यंत जातें.

कोणत्या धंद्यांत दर शंभर पुरुषांमागें स्त्रिया किती आहेत या कोष्टकाकडे पाहिलें असतां समाजाची विलक्षण स्थिति नजरेस येते. भिकारी, वेश्या, गुन्हेगार आणि कारागृह-वासी या वृत्तींनीं पोट भरणारांमध्यें पुरुषांशीं स्त्रियांचें प्रमाण ज्या जातींत अधिक सांपडतें अशा जाती म्हटल्या म्हणजे मांग, भंगी, मुसुलमान व औदीच्य ब्राह्मण या होत. मांगांमध्यें असल्या हीन स्थितींत असलेले पुरुष जर शंभर असतील तर स्त्रिया ६०५ आहेत; भंग्यांमध्यें ६० आहेत; औदीच्य ब्राह्मणांचें जरा आश्चर्य वाटतें. हें प्रमाण पुरुषांशीं आहे. म्हणजे असें असूं शकेल कीं, एकंदर जातींमध्यें याप्रकारचा वर्गच कमी असेल आणि दुर्गतीस पोंचलेल्या स्त्रियांची संख्या जरी कमी असली तरी ती फुगीर दिसत असेल. पण तसेंहि असल्याचें दिसत नाहीं. कारण या जातींत पुरुष व स्त्रिया मिळून या धंद्यांत असलेलीं माणसें दर हजारीं १४८ आहेत. पण भंग्यांत अशीं फक्त ८५ आहेत. मांगांत दर हजारीं ५६ आहेत व इतर मुसुलमानांत दर हजारीं २७ आहेत. भिक्षेकरी व वेश्या यांचा वर्ग एकत्र केला आहे त्यामुळें ही संख्या फुगीर दिसते असें म्हणावें तर परमार्थसाधन-विषयक धंद्यामध्यें दर हजारांत १८४ माणसें औदीच्य ब्राह्मणांत आहेत आणि स्त्रिया धार्मिक धंद्यांत शंभर पुरुषांत पंचवीस म्हणून दिल्या आहेत. स्त्रिया भिक्षुकी करीत नाहींत किंवा कथाकीर्तनें करीत नाहींत त्यामुळें या शंभर पुरुषांत २५ स्त्रिया धार्मिक धंद्यांत दिल्या आहेत त्या वहुतेक भिक्षेकरणीच असाव्यात. यावरून दुर्दैवी तऱ्हेनें पोट भरण्याच्या धंद्यांमध्यें दर शंभर पुरुषांमागें २७ स्त्रिया म्हणून दिल्या आहेत त्या असमाधान-कारक वृत्तीनें राहणाऱ्याच स्त्रिया असाव्यात असा निष्कर्ष निघतो.

व्यापारामध्यें पुष्कळ प्रसंगीं स्त्रियांचें आधिक्य दिसून येतें. वाणी, वोहरी, पारशी इत्यादि वर्गांत व्यापारांत स्त्रियांचेंहि आधिक्य वरेंच दिसलें तर त्या गोष्टीवद्दल आश्चर्य वाटणार नाहीं. परंतु पारशांमध्यें दर शंभर पुरुषांमागें आठच स्त्रिया आहेत; वोहरा, खोजा, मेमन वगैरे मुसुलमानांत चौदा आहेत; सिंधी सोनारांत दहा आहेत; श्रीमाळी वाण्यांत सात आहेत; ओसवाळ वाण्यांत पांच आहेत; कोंकणस्थ ब्राह्मणांत आठ आहेत; गौड सारस्वतांत सहा आहेत; भाटियांत तीन आहेत आणि लोहाणांत दोन आहेत. उलटपक्षीं खालच्या दर्जाचा व्यापार करणाऱ्या वऱ्याचशा वर्गांत स्त्रियांचें प्रमाण वरेंच मोठें दिसतें.

**कांहीं जातींमध्यें १०० व्यापार करणाऱ्या पुरुषांशीं स्त्रीव्यापाऱ्यांचें प्रमाण.**

| जात. | प्रमाण. |
|---|---|
| भंडारी | ४९ |
| शिंपी | १७ |
| लिंगायत | २९ |
| तेली | ३७ |
| वाघरी | ६४ |
| एतद्देशीय ख्रिस्ती | १५७ |

**धंदे व स्त्रीपुरुष कामगार.**

| धंदा | स्त्री कामगारांची संख्या (खालील आंकडे हजाराचे आहेत) | दर हजार पुरुष कामगाराशीं कामगार स्त्रियांचें प्रमाण |
|---|---|---|
| कृषिविषयक-जमिनी खंडानें करणारे | ७३१ | ३४६ |
| सामान्य शेतकरी | १९१३९ | ३६८ |
| शेतांत काम करणारे मजूर | १२७२१ | ९६७ |
| चहा, कॉफी, सिंकोना व निळी यांच्या मळ्यांत काम करणारे | ३५० | ८९४ |
| जंगलतोडे व कोळसा (लांकडी) करणारे | १५८ | ८६६ |
| लहान लहान मनुष्योपयोगी प्राण्यांची (रेशमाचे किडे इ०) निपज करणारे | १५ | १३६४ |
| कापूस पिंजणें व रुईचे गठ्ठे करणें | १०५ | ६३९ |
| दोरखंड, सुतळी तयार करणें | १६७ | २०२३ |
| इतर तंतूंचें काम करणें | ४३ | १४९७ |
| लोंकर कांतणें, पिंजणें व विणणें | ६७ | ६५२ |
| रेशीम कातणें व विणणें | ६४ | ८२३ |
| टोपल्या करणें इ० | ३८४ | १०४३ |
| कुंभारकाम मडकीं, चिलमा वगैरे | ३५१ | ५३८ |
| तेल गाळणें व शुद्ध करणें | २२५ | ६२७ |
| भात कांडणें व पीठ दळणें | ९६३ | ७५३१ |
| भडभुंजे | २४० | १८८३ |
| साखर, काकवी व गूळ तयार करणें | २४ | ९६९ |
| परीटकाम व रंगारीकाम | ५२४ | ७७५ |
| गोंदणें वगैरे | ९ | २०८६ |
| खोदकाम करणें, पाया बांधणें व विहिरी खणणें | ८६ | ६७३ |
| भंगी व झाडू | ३६६ | ८५० |
| दारू, सोडावाटर वगैरे विकणें | ११४ | ५९७ |
| मासे विकणें | २६० | १२०७ |
| दूध, लोणी, तूप, कोंवडीं विकणें इ० | १५९ | ९१६ |
| मिठाई, साखर, गूळ, काकवी विकणें | १११ | ७४३ |
| पानसुपारी, भाजीपाला व फळफळावळ विकणें | ४१४ | ९७१ |
| गवत, पेंढा, कडबी वगैरे विकणें | ८२ | १२६४ |
| सरपण, कोळसा इ० विकणें | २१६ | १८०६ |
| सुइणी, देवी काढणें, नर्सिंगचें काम करणें, औषधें करणें इ० | ८८ | २७९८ |
| स्वयंपाक, पाणी भरणें, व इतर घरकाम करणें | ९८८ | ६२२ |
| इतर कामकरी | १९९१ | ७४० |
| भिकारी, वेश्या इ० | ७६८ | ६५२ |

**श्रमविभागाचें विविधत्व** —वरील तुलनेवरून निदान एवढें तरी लक्षांत येईल कीं समाजांत विशिष्ट प्रकारचा धंदा करणाऱ्या लोकांचें प्रमाण अमुकच असलें पाहिजे असा नियम नाहीं. आजच्या श्रमविभागाचा समतोलपणा दोन गोष्टींनीं कमी जास्त होईल. त्या गोष्टी म्हटल्या म्हणजे नवीन धंदे उत्पन्न न होतां धंद्यांच्या आज असलेल्या परस्पर प्रमाणांत बदल होणें आणि नवीन धंदे उत्पन्न होणें. नवीन धंदे उत्पन्न होण्याची क्रिया एकसारखी चालूच आहे. असे हजारों धंदे पाश्चात्त्य लोकांच्या धंद्यांच्या यादींतून काढून देतां येतील कीं त्यांशीं तुल्य धंदा आपल्या समाजांत नाहीं. पन्नास वर्षांपूर्वी शेअरब्रोकरसारखा धंदा आपल्याकडे कोठें होता? अंडररायटरसारखा धंदा आपल्याकडे नुकताच डोकावूं पहात आहे. कंपनीसंस्थापकाचा धंदाहि लवकरच अस्तित्वांत येईल अशी कल्पना आहे. असो.

प्रकरणारंभीं निर्देशिलेल्या प्रगतीच्या इतर अंगांचा बोध केवळ निर्देशावरून होण्यासारखा असल्यामुळें त्यासंबंधानें अधिक लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

---

## उपप्रकरण १० वें.

## संघरक्षण, संघसदस्यत्व, आणि शिक्षणपद्धति.

समाजाचें सदस्यत्व वाटेल त्यानें ठेवावें किंवा वाटेल त्यानें टाकावें हा प्रश्न मागें जेव्हां विचारास घेतला होता त्या वेळेस एका अधिक व्यापक प्रश्नाच्या विवेचनावर या प्रश्नाच्या विवेचनाची पूर्णता अवलंबून ठेवली. तो प्रश्न म्हटला म्हणजे भारतीय राष्ट्रीयत्वाचें आणि विशेषेंकरून हिंदूंच्या सामुच्चयिक स्थितीचें जगद्विकासांत स्थान काय? हें स्थान अजमावण्यापूर्वी संघसमुच्चय कोणत्या संक्रमणांतून विश्वराष्ट्रत्वास पोंचेल हें पाहूं.

जगाची प्रकृति अधिका[illegible] [illegible]ओट्या [illegible] वर्गांतहि आणि [illegible] [illegible] कांहीं [illegible]ती अ[illegible]सीमून येतो.

आहे ही गोष्ट सिद्ध धरली आहे. विश्वैक्य पूर्णतेस येण्यापूर्वी जगास संघसमुच्चयाची स्थिति प्रथम येणार. संघसमुच्चय अधिकाधिक विकसित झाला आणि सर्व विश्वामध्यें एक अवयव-अवयवी संबंध उत्पन्न झाला म्हणजे विश्वास एक समाज समजतां येईल. हें जें भावी विश्वराष्ट्र उत्पन्न व्हावयाचें त्या राष्ट्रामध्यें देशाचे देश प्रामुख्येंकरून ब्राह्मण्य, क्षत्रियत्व अथवा वैश्यत्व पत्करून इतर देशांस शूद्रत्व पत्करावयास लावणार नाहींत कशावरून? अर्थात् विश्वराष्ट्र जरी झालें तरी स्पर्धा ही सुटावयाची नाहीं. असें स्पष्ट दिसतें.

संघसमुच्चयांतर्गत संघांचें पर्यवसान विश्वराष्ट्राच्या अवयवांत होणार असेल तर आपण मुख, बाहु, ऊरु किंवा पाद यांच्या कर्मापैकीं कोणतें कर्म स्वीकारावें हें प्रत्येक संघास म्हणजे राष्ट्रास ठरवावें लागणार आहे, आणि हें ठरवितांना स्पर्धा अत्यंत तीव्र होऊन अधिक कुशल व अधिक बलवान् अशा राष्ट्राच्या हातीं सर्वाधिकार जाण्याचा संभव आहे.

**हिंदु व हिंदुस्थान यांचा अभेद पाहिजे.—** विश्वराष्ट्र या समुच्चयाची घटना जी व्हावयाची तिच्या दिशा ठरलेल्या आहेत. मत किंवा दैवत या तत्त्वावर समाजरचना ठेवून अशा समाजांचा संघ करावयाचा ही पद्धति शक्य नाहीं. प्रादेशिक समुच्चय म्हणजे राष्ट्रें यांचाच समुच्चय होऊन विश्वराष्ट्र होईल. लेनिनसारख्या विचारास अत्यंत महत्त्व देणाऱ्या मनुष्यानें देखील प्रादेशिक समुच्चयच मान्य केले आहेत, तेव्हां जे समुच्चय प्रादेशिक नाहींत त्यांची एकी होऊन विश्वसंघ निर्माण होण्याचें कार्य होणें शक्य दिसत नाहीं. जे संघ प्रादेशिक नाहींत त्यांस जगाच्या शासनव्यवस्थेंत स्थान नाहीं. यासाठीं संघसमुच्चयांत सदस्यत्व मिळवून इतर सदस्यांशीं स्पर्धा किंवा सहकारिता करण्याचें काम मुसुलमानी, ख्रिस्ती वगैरे संप्रदायांचें नसून प्रांतांचें व देशांचें आहे. यामुळें ज्या संघाचें सदस्यत्व व्यक्तीस महत्त्वाचें आहे तो संघ संप्रदाय नसून राष्ट्र होय. मत बदललें म्हणजे संप्रदाय सोडण्यास बिलकुल हरकत नाहीं. आज हिंदुसमाजांत एखाद्यानें रामानुज मत टाकून शांकरमत ग्रहण केलें किंवा शांकरमत टाकून माध्वमत घेतलें किंवा रामोपासना टाकून गणपतीची उपासना केली तरी कोणीहि फिकिर करणार नाहीं. कारण हिंदुसमाज हा जो संघसमुच्चय तयार झाला तो उपासनेच्या तत्त्वावर मुळींच झालेला नाहीं. त्यामुळें हिंदुसमाजसदस्यत्वामध्यें घोंटाळा उत्पन्न होत नाहीं. हिंदु-समाज हा संघसमुच्चय आहे आणि राष्ट्रसंघ हाहि एक संघ-समुच्चय आहे. हिंदुसमाजास जगाचे अवयव हिंदु म्हणून व्हावयाचें असलें तर हिंदु आणि हिंदुस्थान यांचा अभेद झाला पाहिजे. हा अभेद व्हावयाचा तर हिंदुसमाजांतच [illegible] ...चें अगर ...टा[illegible] व हिंदुसमाजास मरूं द्यावयाचें हा प्रश्न लोकांच्यापुढें त्यांच्या स्वयंनिर्णयासाठींच आहे.

पुष्कळ लोकांनां वारंवार अशी भीति पडते कीं, राष्ट्रीय भावना या उदारबुद्धीच्या नसून इतर लोकांस अनुदार-पणानें वागविण्यास विशिष्ट देशाच्या नागरिकांस त्या प्रवृत्त करणाऱ्या आहेत. यांचें म्हणणें असें कीं, राष्ट्र म्हणजे विशेष भाषा किंवा स्थानिक रिवाज यांस प्रामुख्य देण्याचें म्हणजे इतर लोकांस अनुदारतेनें वागविण्याचें यंत्र होय. यासाठीं राष्ट्रीय भावना निंदास्पद होय. स्वतः विवाह करून गृहस्थाश्रमाची निंदा व ब्रह्मचर्या-श्रमाची तारिफ करणें हें जितकें लबाडीचें व चोरटेपणाचें असतें तितकेंच स्वतंत्र राष्ट्राच्या लोकांनीं राष्ट्रीय भावनांची थट्टा करणें लबाडीचें आहे. स्वतःच्या राष्ट्रीय आकांक्षा तृप्त करून घ्यावयाच्या, त्यापासून होणारे फायदे घ्यावयाचेच आणि दुसऱ्यास मात्र 'जगन्मिथ्या' म्हणून उपदेश करावयाचा अशी ही धूर्तता आहे.

एवढें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे कीं स्वसादृश्य इतरांवर लादावयाची इच्छा लोकांस प्रसंगीं तापदायक होत असली तरी वैसादृश्याविषयीं जी अनुदारता स्वतंत्र लोकसत्तात्मक राष्ट्रांत दृष्टीस पडते ती सर्वथैव निंदास्पद नाहीं. या लोकांशीं आपणांस बरोबरीच्या नात्यानें वागावयाचें, लग्नव्यवहार करावयाचा असें ध्येय ज्या लोकांसंबंधानें आपण बाळगूं त्या लोकांनीं आपल्यासारखें व्हावें अशी इच्छा होणें स्वाभाविक आहे. इतरास बरोबरीच्या नात्यानें वागवावयाचें नसलें किंवा आपल्या समाजांत स्थान द्यावयाचें नसलें म्हणजे वैसादृश्याचा द्वेष कोण करितो? प्रसंगीं मनुष्य त्याचें कौतुकहि करील. आपण पशुसंग्रहालयांतील पशूवर ते नागवे आहेत म्हणून कोठें रागावतों? कोळी किंवा ठाकूर हे अर्धनग्न आहेत म्हणून त्यांवर कोठें चिडतों? पण जर यांपैकीं कोणास आपल्यांतच वागूं द्यावयाचें असलें तर मात्र आपण वैसादृश्याविषयीं असहिष्णु बनूं.

यापुढें इतर राष्ट्रें व हिंदुस्थान यांचा परस्परांशीं संबंध अधिकाधिक होत जाऊन एका देशांतील लोक दुसऱ्या देशांत जाणार. आपल्या देशांतील लोकांस परकीयांनीं चांगल्या तऱ्हेनें वागविलें नाहीं तर आपणांस साहजिकच राग येतो. मग जे परकीय आपल्या देशांत येतात त्यांच्याविषयीं आपणांस विचार करावयास नको काय? आज देशसदस्यत्व आपल्या हातीं नाहीं. आपल्या देशांत कोणास येऊं द्यावें व कोणास येऊं देऊं नये हें ठरविण्यास आज आपल्या हातीं सत्ता नाहीं, तेव्हां मनुष्य स्वतंत्र आहे तो आपल्या देशांत येऊन राहीलच. तो देशांत आला म्हणजे आपल्या समाजांत आला [illegible]...सें मात्र सध्यां होत नाहीं.

देशसदस्यत्व आणि समाजसदस्यत्व यांचें एकत्व स्थापन करावें हें आपलें कर्तव्य आहे आणि या एकत्वस्थापनाच्या सिद्ध्यर्थ चातुर्वर्ण्यसंस्थापना हें आपलें कर्तव्य होतें.

लोकांस जर एका देशांतून दुसऱ्या देशांत जावयाची आणि एका समाजांतून दुसऱ्या समाजांत जावयाची मोकळीक ठेवावयाची असेल तर त्याबरोबर निरनिराळ्या राष्ट्रांत आर्थिक समानता आणि सामान्यतः कर्तृत्वसमानता स्थापित झाली पाहिजे.

या दृष्टीनें सर्व जगाला सारख्या पदावर आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आपला समाज सोडून इतर समाजांत आपल्या समाजांतील लोकांनीं जाऊं नये असें आपण म्हणतों, परंतु ही समाजनिष्ठता व्यक्तीपासून अपेक्षिण्यापूर्वी व्यक्ति सुटून जाऊं नये म्हणून व्यक्तीचें हित साध्य करून देण्याचा प्रयत्न पुष्कळ केला पाहिजे. समाजास जर व्यक्तिहिताची भावना राहणार नाहीं तर तो समाज मेला तरी काय हरकत आहे? आपण एखाद्या समाजास लोक सोडून देत असतील तर असें समजावें कीं, त्या समाजाची असलेली विशिष्ट तऱ्हेची समाजरचना जगास निरुपयोगी आहे.

स्पर्धेचा विषय राष्ट्रें रहाणार आणि राष्ट्रांराष्ट्रांत स्पर्धा म्हणजे राष्ट्रांखेरीज इतर समुच्चयांसंबंधानें उपेक्षा. देशांत जें परराष्ट्रीयत्व असेल त्यास द्वेश्य करून घेणें हा राष्ट्रीय शिक्षणाचा एक भाग आहे. परराष्ट्रीयांस स्वदेशांत पचनीं पाडण्याच्या प्रयत्नांत परकीयांस व आपल्या राष्ट्राच्या सदस्यांसहि एक तऱ्हेचें शिक्षण मिळतें.

**परकीय राष्ट्रसंप्रदायांविषयीं वृत्ति.**—ख्रिस्ती इत्यादि परकीय राष्ट्ररूपी संप्रदायांसंबंधानें आपली वृत्ति कशी असावी यावद्दल एक नियम असा सांगतां येईल कीं, ज्यांस आपणांस देशाबाहेर ठेवतां येणार नाहीं त्यांस आपण आपल्या समाजांत घेतलें पाहिजे. ख्रैस्त्य हें एक परमार्थसाधन आहे, ही एक परमेश्वरविषयक भावना आहे. ख्रैस्त्य म्हणजे विशिष्ट पोषाख नव्हे, विशिष्ट खाद्यपेयें नव्हेत व विशिष्ट राजसत्तेचा अभिमानहि नव्हे. तसेंच विशिष्ट भाषेची अथवा वाङ्मयाची उपासना नव्हे, किंवा विशिष्ट गुरुमंडळावर अवलंबन नव्हे. ख्रैस्त्य म्हणजे जीं राष्ट्रें ख्रिस्ती नसतील त्यांच्या आचारांचा त्याग करणें हेंहि नव्हे. वाङ्मय, भाषा, गुरुमंडळ, सण, रिवाज हे सर्व ख्रिस्तानें केलेल्या उपदेशाचे अगर उत्पन्न केलेल्या भावनांचे यदृच्छानिर्मित साहाय्यक अगर वाहक असतील पण त्या उपदेशाचा भाग नव्हत. कोणताहि ख्रिस्ती मनुष्य ज्या राष्ट्रांत जन्मला असेल त्या राष्ट्राच्या भाषेचा, वाङ्मयाचा व इतिहासाचा अभिमान त्यानें धरावा. जें ख्रिस्ती मतांशीं अविरुद्ध असेल तें टाकण्याचें ख्रिस्ती लोकांनां कारण नाहीं. रामनवमी हा सण घ्या. राम हा थोर ऐतिहासिक पुरुष होऊन गेला. त्याच्या आठवणीसाठीं जो सण स्थापित झाला तो ख्रिस्त्यांनीं [illegible] टाकावा बरें? जें जें कांहीं थोर असेल तें ईश्वरांशच होय, तें ईश्वरावतारच होय, ही कल्पना ख्रिस्ती मंडळीस मानावयाची नसली तरी केवळ लौकिक भावनांनीं ख्रिस्त्यांनीं रामनवमी करावयास हरकत नाहीं. जो पुरुष ऐतिहासिक आहे त्याचे गुण गातांना आमच्याबरोबर ख्रिस्त्यांनीं यावयास कोणती हरकत आहे? रामनवमीप्रमाणेंच गोकुळाष्टमी होय. तींतहि ख्रिस्ती लोकांचें अंग राहिल्यास हरकत ती कोणती? शालिवाहन किंवा विक्रमशकानुसार वर्षप्रतिपदा करण्यास तर कोणचीच हरकत नाहीं. सिंहलद्वीपांतील ख्रिस्तीमंडळींनीं शालिवाहनाची वर्षप्रतिपदा पाळण्यास सुरुवात केली आणि या कार्यांत चर्चनें देखील आडकाठी घेतली नाहीं. दसरा हा तर कार्यासाठीं आरंभ करण्यास शुभ मुहूर्त म्हणून धरला जातो. कां कीं, रामानें याच वेळेस रावणावरील स्वारीस प्रारंभ केला. महाराष्ट्रीयांचा लढाईसाठीं बाहेर पडण्याचा हाच दिवस असा देखील लौकिक आहे. शमीपूजनाचा विधि हा तर पांडवांच्या अज्ञातवासाच्या प्रारंभाची आठवण करून देणारा. याप्रमाणें आपल्या थोर पूर्वजांच्या किंवा त्यांच्या विजयाच्या स्मारकस्वरूपाचे जे दिवस आहेत ते टाळण्याचें मुळींच कारण नाहीं. दिवाळी हा उत्सव तर मोंगल बादशहांनीं दरबारचा उत्सव दिवस म्हणून ठरविला होता. अनेक उत्सव लौकिक आहेत तथापि परिस्थिति मात्र अशी झाली आहे कीं, ख्रिस्ती मंडळी या प्रकारच्या उत्सवांपासून अलिप्त आहेत.

ख्रिस्ती व मुसुलमान या समाजांसंबंधानें आपली वृत्ति काय असली पाहिजे याविषयीं कांहीं विचार मागें व्यक्त केलेच आहेत; पण एक मुख्य विचार व्यक्त करावयाचा राहिला तो येथें करतों.

आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ख्रिस्ती व मुसुलमान यांस आपलें परमार्थसाधन किंवा आपले मार्गदर्शक यांसंबंधींच्या ज्ञानाचा हिंदूंत प्रसार करावयास फारशी हरकतच करूं नये. देव एक आहे, मूर्ति त्याची कल्पना बरोबर होऊं देत नाहींत; यांसारख्या कल्पना मुसुलमानांनीं अगर ख्रिस्त्यांनीं देशांत पसरविल्या तर त्यानें हिंदूंचें काय बिघडणार? जर शैवास वैष्णव खपतात आणि दोहोंस गाणपत्य खपतात तर ख्रिस्ती लोक तरी आपणांस कां खपूं नयेत? खपत नाहींत हें मात्र खरें. गाणपत्यांपैकीं कोणी विष्णूची उपासना केली तर गाणपत्यांस खेद होत नाहीं अशी ज्या अर्थी आज स्थिति आहे त्या अर्थी ख्रिस्ती संप्रदायाविषयीं जी असहिष्णुता आम्हांस वाटते तिचें कारण आमच्या पारमार्थिक मतांचा ख्रिस्ती पारमार्थिक मतांशीं असलेला भेद खास नव्हे. या असहिष्णुतेचें कारण लौकिक आहे. ही गोष्ट ख्रिस्ती लोकांनीं व आम्हीं ओळखावी हें बरें. केवळ पारमार्थिक मतांखेरीज ज्या गोष्टींबद्दल [illegible] अधिक[illegible] [illegible] वर्गांतहि [illegible] कांहीं [illegible] ती [illegible]मून येतो.

प्रादेशिक समाज टिकून इतर प्रकारचे समाज दुर्बल होत जाणार म्हणून प्रादेशिक समाज जितके मनुष्याच्या सर्व प्रकारच्या अपेक्षांनां पोषक होतील तितके करावेत हें चांगलें. भाषावार प्रांतरचनेसंबंधीं विवेचन याकरितांच आवश्यक होतें.

आपल्या राष्ट्राच्या घटनेंत एक प्रश्न नेहमीं आपणांपुढें येणार कीं, राष्ट्राचा प्रत्येक भाषेशीं किंवा भाषामूलक प्रांताशीं संबंध काय असावा ? प्रांतिक म्हणजे भाषामूलक सामाजिक भावना आणि अखिल भारतीय सामाजिक भावना यांचा परस्परसंबंध काय राहील ?

केवळ भावनाच लक्षांत घेतल्या असतां दोन पक्ष दृष्टीस पडतात. एक प्रांतिक भाषेचा अभिमानी आणि एक भारतीय ऐक्याचा अभिमानी. पुष्कळांची अशी इच्छा आहे कीं, प्रांतिक भाषेचा विकास होऊं देण्यापेक्षां सार्वराष्ट्रीय अशा एखाद्या भाषेचा विकास होऊं द्यावा आणि त्या भाषेचें ग्रहण हिंदुस्थानांतील सर्व लोकांनीं करावें आणि प्रत्येक स्थानाच्या भाषा असंवृद्ध राहूं देऊन मरूं द्याव्या. हें सर्व अशा हेतूनें करावयाचें कीं, पुढें सार्वराष्ट्रीय भाषा प्रत्येक ठिकाणीं स्वीकृत होईल आणि त्यामुळें सर्व राष्ट्राचें खरेंखुरें ऐक्य होईल. राष्ट्रांतील कांहीं लोकांस अधिक फायदा देणारा आणि कांहीं लोकांचें तात्पुरतें नुकसान करणारा असा जरी हा कार्यक्रम होईल तरी याच्या योगानें देशाचें अंतिम कल्याण होईल असें या सार्वराष्ट्रीय भाषेच्या अभिमान्यांचें म्हणणें असतें. या दोन मांडण्यांचा आपण निःपक्षपातानें विचार केला पाहिजे. देशांत इंग्रजी भाषेचें स्थामिल राखावें आणि देशी भाषांचें महत्त्व कमी व्हावें म्हणून प्रयत्न करणारा मनुष्य देखील देशाच्या ऐक्याचेंच साध्य पुढें मांडीत असतो. देशाचें ऐक्य साधण्यासाठीं एक भाषेचा प्रचार करावा असें म्हणणारे जे कांहीं लोक आहेत ते कधीं इंग्रजीचा, कधीं उर्दूचा, कधीं हिंदीचा व कधीं संस्कृतचा पक्ष घेतांना दृष्टीस पडतात; किंवा खालील विधान केलें तर कदाचित् अधिक बरोबर होईल कीं देशामध्यें हिंदीचे, उर्दूचे, इंग्रजीचे आणि संस्कृतचे जे जे अभिमानी आहेत ते आपआपल्या प्रिय भाषेचें महत्त्व वाढविण्यासाठीं तिचें अखिलभारतीयत्व गात असतात.

हिंदुस्थानच्या प्रत्येक भागामध्यें तेथील देशभाषेस जर प्रामुख्य मिळालें तर हिंदुस्थान एक होण्याच्या ऐवजीं विभागला जाईल असा संशय वारंवार उपस्थित केला जातो; या प्रश्नाचा आपण काळजीपूर्वक विचार केला पाहिजे. कोणत्याहि प्रांतांतील लोकांचा जर पुष्कळ व्यवहार स्वभाषेंत [illegible] भागांत काय चाललें [illegible] वाटतें. परंतु देशांत ज्या त्या भाषेचें प्रामुख्य झाल्यानें आणि प्रत्येक भागांत इतर भाषा बोलणाऱ्या लोकांचेंहि अस्तित्व असल्यामुळें त्या देशामध्यें परका आलेला वर्ग देशभाषा अधिक काळजीपूर्वक शिकेल आणि परका मनुष्य तेथें परका न राहतां त्या देशांतील समाजाचा सदस्य होण्याचा अधिक संभव राहील व लग्नव्यवहारहि अधिक सोपे होतील. वऱ्हाड व मध्यप्रांत येथें कायमची वस्ती करून राहणाऱ्या तैलंगी नायडूंनीं तैलंगी ब्राह्मण ज्याप्रमाणें महाराष्ट्रीय ब्राह्मणांत लग्नें करितात त्याप्रमाणें त्यांनीं मराठ्यांबरोबर लग्नें करावयास हरकत नसावी अशा हेतूनें चळवळ चालविली होती. या तऱ्हेची चळवळ करण्याकडे प्रवृत्ति होण्यास एक कारण म्हटलें म्हणजे येथील बरेचसे नायडू ( तेलंगे ) भाषेनें मराठी झालेले आहेत. यावरून असें दिसतें कीं, देशभाषाप्रामुख्य विवक्षित देशाचा त्या देशांत आलेल्या इतरांशीं असलेला संबंध दृढ करण्यास पोषकच होईल.

दुसरी एक अशी गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, काश्मीरचा शेतकरी आणि पंढरपूरचा शेतकरी या दोहोंचा फारसा संबंध घडून येणें शक्य नाहीं. झालें तर एवढेंच होणार कीं, काश्मीर येथील मध्यम वर्ग उर्फ पुढारी वर्ग आणि पंढरपूरचा पुढारी वर्ग यांचें संघट्टन होईल. हें संघट्टन देशांतील राज्यकारभार देशभाषेंत चालला तरी बंद पडणार नाहीं. याशिवाय जर सर्वसामान्य जन सुशिक्षित व कर्तृत्ववान् होईल तरच त्या त्या भागाच्या पुढाऱ्यांस जोर येणार. प्रत्येक भागांत जर देशभाषा दुर्बल राहिली तर दोन भागांतील पुढाऱ्यांचा एकमेकांस पाठिंबा मिळाल्यापासून कांहीं एक फायदा व्हावयाचा नाहीं.

थोडक्यांत सांगावयाचें तें हें कीं, स्थानिक भाषा नष्ट करण्याचे खेळ कोणाहि मुत्सद्यानें करूं नयेत. हे खेळ केल्यानें ज्यांची भाषा दडपली गेली असेल त्यांच्यामध्यें द्वेषबुद्धि उत्पन्न होते. भाषा मारून टाकणें सोपें नाहीं हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. वेल्स आणि आयर्लंड येथें इंग्रजी भाषा देश्य भाषांस मारून टाकण्याचा प्रयत्न आज आठशें वर्षे करीत आहे, परंतु परिणाम काय झाला ? आज वेल्समध्यें व आयर्लंडमध्यें असे अनेक भाग आहेत कीं जेथें केवळ इंग्रजी जाणणारानें आपल्या बरोबर दुभाष्याच नेला पाहिजे. रशिया व जर्मनी यांनीं पोलिश, युक्रेन, फिनिक इत्यादि भाषा मारून टाकण्याचा प्रयत्न केला तरी त्या भाषा मेल्या नाहींत आणि त्या लोकांची राष्ट्रीय भावनाहि मेली नाहीं.

संघांचे संघ बनवून रचना करतांना हें तत्त्व लक्षांत ठेवावें कीं मूल संघ जितका अधिक पक्का असेल तितका संघांचा संघ पक्का होईल हा नियम लक्षांत ठेवून मूलसंघ एक भाषेचा पक्का होईल कीं अनेक भाषांचा हा विचार [illegible] दिशा ठरवावी.

या विवेचनाचा इत्यर्थ हाच कीं, कोणीहि आपली भाषा दुसऱ्यावर दडपण्याचा प्रयत्न करूं नये आणि प्रांतिक भाषेंत किती व्यवहार ठेवावा आणि परकीय भाषेंत किती व्यवहार ठेवावा हा प्रश्न त्या प्रांताच्याच हिताच्या दृष्टीनें सोडविला जावा. असो.

**शिक्षणविषयक सामान्य सिद्धान्त.**—हिंदुस्थानांतील शिक्षणविषयक प्रश्नासंबंधाचा विचार प्रत्येक सामाजिक किंवा शासनविषयक ग्रंथांत पाहिजेच. राजकारणाचा किंवा समाजनीतीचा विचार करतांना शिक्षणविषयक भाग हा त्यांतील बराच मोठा अंश होईल. ही गोष्ट ॲरिस्टॉटलपासून सर्व महत्त्वाच्या तत्त्ववेत्त्यांनीं मान्य केली आहे आणि आपल्या सामाजिक ग्रंथांत शिक्षणावर बरींच पानें खर्च केलीं आहेत.

समाजाच्या गरजा जसजशा भिन्न होतात तसतशा त्याच्या शिक्षणपद्धतीहि भिन्न होतात. एका काळचे आणि एका ठिकाणचे शिक्षणविषयक विचार किंवा शिक्षणपद्धति भिन्न कालस्थलीं उपयोगीं पडणार नाहींत. सर्व कालांस उपयोगीं पडणारे असे कांहीं तात्त्विक शिक्षणविषयक सिद्धांत मांडतां येतात, ते मांडल्यानंतर विशिष्ट काल व स्थलाकडे पाहून परिस्थिति बदलावयाची हा शिक्षणपद्धति ठरविण्याचा एक मार्ग झाला. दुसरा मार्ग असा आहे कीं, समाजांत गरजा जशा व ज्या मानानें व तऱ्हेच्या निर्माण होतील तशा त्या पुरवीत जावयाच्या. पहिला मार्ग तत्त्ववेत्त्यांस व ग्रंथकारांस उपयोगी आहे व दुसरा कामचलाऊ मुत्सद्द्यांस उपयोगी आहे.

शिक्षणविषयक अत्यंत सामान्य नियम येणेंप्रमाणें देतां येतील.

(१) विवक्षित शास्य-मग तें राष्ट्र असो अगर संप्रदाय असो-जिवंत ठेवण्यासाठीं त्याजविषयीं श्रद्धा उत्पन्न करणें आणि तें टिकवून ठेवण्यासाठीं सर्व जनतेंत तद्विषयक अभिमान उत्पन्न करणें हें शिक्षणाचें आदि-ध्येय होय.

(२) शिक्षणाचें दुसरें एक ध्येय असें आहे कीं, समाजांतील प्रत्येक शिक्षित व्यक्तीचा उपयोग समाजास जितका अधिक होईल तितका व्हावा.

(३) पहिल्या सांगितलेल्या आदिध्येयाच्या पूर्तीसाठीं जी गोष्ट अवश्य आहे ती ही कीं, जें शास्याचें केंद्र असेल, मग तें राजा असो अगर आचार्य असो, त्या केंद्राबरोबर व्यक्तीला उत्तम तऱ्हेनें सहकारिता करतां यावी म्हणून तिच्या ठिकाणीं शास्यावर जशी भक्ति उत्पन्न करावयाची तशी केंद्रावरहि भक्ति उत्पन्न करावी.

(४) विशिष्ट शास्य ज्या संस्कृतीशीं संबद्ध असेल त्या संस्कृतीविषयींहि आपलेपणाची अ[illegible]

प्रत्येक मनुष्याचा अत्यंत उपयोग व्हावा म्हणून ज्या संस्था आहेत त्यांत गृहें, शाळा, समाजव्यवहार या मुख्य होत. शिक्षणापैकीं कोणता भाग शाळांकडे द्यावा आणि कोणता भाग गृहाकडे म्हणजे आईबापांवर सोंपवावा, आणि कोणता भाग समाजांत सहज उत्पन्न होणाऱ्या नाट्यकाव्यादि वाङ्मयावर सोंपवावा हा विचार मुत्सद्द्यांच्या व लोकांच्या इच्छेवर, संवयीवर आणि परिस्थितीवर अवलंबून राहील.

जगांत जें वाढतें ज्ञान आहे त्यांतील कितपत अंश मनुष्यास द्रव्यार्जनाचें काम सुरू करण्यापूर्वी देतां येईल याचा विचार करून शिक्षणपद्धति बसवावी लागते. जें ज्ञान केवळ शुद्ध शास्त्रीय स्वरूपाचें आहे, त्या ज्ञानाविषयीं पक्षभेद फारसा उत्पन्न होत नाहीं. परंतु तो मुळींच होत नाहीं असें नाहीं. विशिष्ट ज्ञानामुळें कांहीं विशिष्ट कल्पना ढांसळत असतील आणि त्या कल्पना धरून बसण्यावरच समाजाची संघटित स्थिति अवलंबून असेल तर त्या प्रकारच्या ज्ञानास अडथळा होईल. उदाहरणार्थ, ब्राह्मण हे इतर सामान्य मनुष्यांतूनच, प्रसंगीं अत्यंत कनिष्ठ मनुष्यांतून, निघालेला वर्ग आहे असा ब्राह्मणांचा इतिहास असला तर त्या प्रकारच्या ज्ञानाच्या प्रसारास ब्राह्मणांच्या हातीं सत्ता असल्यास ब्राह्मण आडवे जातील. जगाच्या उत्पत्तीस ६००० वर्षांपेक्षां किती तरी हजार पटींनीं अधिक काळ लागला असेल या तऱ्हेच्या कल्पना जेव्हां प्रसृत होऊं लागल्या तेव्हां त्यांस ख्रिस्तीसंप्रदाय आडवा जाऊं लागला हें या प्रकारचेंच उदाहरण आहे.

हिंदुस्थानचें शिक्षण कसें असावें? आधुनिक हिंदुस्थानाविषयीं विचार करतांना जेव्हां आपण शिक्षणपद्धतीवर येतों, तेव्हां आपण विशिष्ट प्रकारचें भवितव्य स्वेच्छेनें ठरवावयाचें कर्तव्य अंगीकारितों. या बाबतींत आपल्या पुढें पहिला प्रश्न येतो तो हा कीं, हिंदुस्थानचा भावी नागरिक कसा असला पाहिजे? त्याची रूपरेखा ठरली म्हणजे तो माल कसा काढावा तें काढण्याची पद्धति ठरवितां येते. मूर्तीचा नमुना तयार केला म्हणजे छिनीचे ठोके कसे मारावे हें मागाहून ठरतें तर आपण आतां नमुन्याचा विचार करूं.

आम्हांस स्पर्धेत अपयश आणणाऱ्या ज्या किंतूंनीं त्रास दिला त्यांनीं हिंदुस्थानांतील भावी नागरिकांस त्रास होऊं नये, म्हणजे ज्या गोष्टी समाजास हितकर नाहींत तथापि ज्यांचें दास्य आपण केवळ लोकभयास्तव करतों त्या गोष्टींचें दास्य पुढच्या पिढीस करावें लागूं नये ही गोष्ट साध्य होण्यासाठीं आपणांकडून प्रयत्न झाला पाहिजे. समाजापुढें जें जयिष्णु ध्येय ठेवावयाचें तें [illegible] अधिक[illegible] वर्गांतहि दुस[illegible] कांहीं[illegible] ती अ[illegible]मून येतो.

आहे कीं, समाजास द्रव्य मिळविण्याचे जे मार्ग परिचित नाहींत तिकडे लोकांचें लक्ष ओढावें आणि त्यांची महत्त्वाकांक्षा जितकी व्यापक करतां येईल तितकी करावी. ती महत्त्वाकांक्षा अशी असावी कीं, तिच्यामध्यें समाजांतील महत्त्वाकांक्षी लोक एकत्र करण्याचा आणि त्यांस समाजाबाहेरील लोकांशीं सर्धा करावयास लावण्याचा प्रसंग असावा. जितकी महत्त्वाकांक्षा अधिक विस्तृत होईल तितकी निरनिराळ्या भारतीयांस एकत्र होऊन काम करण्याची इच्छा अधिक होईल आणि घरांतल्या क्षुद्र गोष्टींबद्दलची भांडाभांडी कमी होईल. ही महत्त्वाकांक्षा अधिक वाढण्यासाठीं सर्व जगांत होणारे अनेक व्यापार व पैसे मिळविण्याचीं किंवा मोठेपणास पोंचविण्याचीं अनेक साधनें वगैरे यांच्याकडे लक्ष गेलें पाहिजे. हें लक्ष जावयास अधिक व्यापक चळवळी ज्या ठिकाणीं होत असतील, मोठमोठ्या घडामोडीचीं सूत्रें चालविणारे लोक जेथें असतील, येथल्यापेक्षां अधिक प्रगत अशा संस्था जेथें असतील तेथें गेलें पाहिजे. महत्त्वाकांक्षी हिंदुस्थानास यूरोप, अमेरिका व जपान यांसारख्या ठिकाणचा प्रवास हा अत्यंत अवश्य आहे. त्याशिवाय त्यांस जगांतील स्पर्धेची व्यापक कल्पना येणें शक्य नाहीं.

आपली तरुणांसंबंधींची मुख्य कामगिरी म्हटली म्हणजे तरुणांची महत्त्वाकांक्षा व्यापक करून आणि ज्या अप्रयोजक भीतींनीं व संशयांनीं आपल्या पिढीचें नुकसान झालें त्या संशयांपासून त्यांस सोडवून जगत्स्पर्धेंत शिरतांना त्यांस आपल्यापेक्षां अधिक तयारीनें शिरतां यावें म्हणून प्रयत्न करावयाचे. सदर प्रकारची तयारी व्हावयाची म्हणजे खालील गोष्टी झाल्या पाहिजेत.

(१) येथील सामान्य तरुणांचें शास्त्रीय ज्ञान इतर देशांतील तरुणांच्यापेक्षां कमी असतां कामा नये.

(२) तसेंच त्यांस शिस्तवार काम करतां यावें म्हणून शिस्तीचेंहि वळण लागलें पाहिजे.

(३) कोणतेंहि कार्य करण्यास जी सहकारिता वारंवार लागते ती सहकारिता शक्य व्हावी म्हणून सर्व राष्ट्रास परस्परसहकारितेचें महत्त्व वाटून भावी तरुण सहकार्योन्मुख झाले पाहिजेत.

(४) तसेंच ज्ञान आणि अंगमेहनत यांची आज जी फारकत झाली आहे ती होतां कामा नये.

(५) सध्यांचे जगांतील व्यवहार इतके गुंतागुंतीचे [illegible] समध्यें कार्य करण्यापूर्वी [illegible]न्याकरितां

झाल्यानंतर त्या गोष्टीची पुनरावृत्ति दुसऱ्याकडून करवून घेणें, दुसऱ्याच्या चुकांकडे लक्ष देणें, कडक शिस्त वापरून दुसऱ्याच्या कामचुकारपणामुळें होणारें नुकसान टाळणें, शिवाय जी वस्तु आपण तयार करूं तशीच वस्तु तयार करणारे जे दुसरे लोक असतील त्यांच्या स्पर्धेकडे सारखें लक्ष ठेवणें आणि बाजारांत आपला पाय कायम ठेवणें; तसेंच कार्य करतांना ज्या पायऱ्या अथवा उपयोजना मधून मधून कराव्या लागतील त्यांकडे सारखें लक्ष ठेवून त्या अधिक काटकसरीनें करतां येतील काय हें पहाणें, व आपण व्यवहार करतांना कांहीं कायद्याचा अतिक्रम करतों काय हें पहाणें, इत्यादि क्रिया करण्यास जशी कार्यकर्त्याच्या अंगीं अंगमेहनत पुष्कळ पाहिजे, त्याप्रमाणेंच जें कार्य तो करीत असेल त्याचें पृथक्करण करीत असण्याची आणि प्रत्येक गोष्टीचा कार्यकारणभाव ओळखण्याची शक्ति त्याजमध्यें विकसित झालेली असली पाहिजे. निरलसता व पुष्कळ काम रेटण्याची शक्ति आणि हे गुण उत्पन्न करणारा निश्चय व तो निश्चय उत्पन्न करणारी महत्त्वाकांक्षा ही गुणमालिका ज्या उपायांनीं उत्पन्न होईल असे उपाय शिक्षणप्रवर्तकांनीं योजिले पाहिजेत. सर्व राष्ट्र शिक्षण संपादन करण्याच्या मार्गांत पाहिजे आणि जे अनुभव आजपर्यंत शिक्षणार्थ झालेल्या प्रयत्नांनीं मिळाले आहेत ते एकत्र होऊन पुढील मोठ्या प्रमाणावरचें कार्य करितांना वापरावयाच्या पद्धती निर्माण झाल्या पाहिजेत.

---

[या ग्रंथांत भारतीयांचे जगाशीं राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, पारमार्थिक संबंध व्यक्त केले आहेत, आणि हे संबंध व्यक्त करतांना सहकार्य आणि स्पर्धा या दोन्ही दृष्टींनीं भारतीयांचें कर्तव्य काय आहे याचें विवेचन केलें आहे. व्यापारविषयक अथवा आर्थिक संबंधांचें यांत फारच अल्पत्वानें विवेचन आलें आहे तरी आर्थिक दृष्ट्या भारतीयांची इतिकर्तव्यता काय आहे याचा प्रथम शब्द येथें स्पष्टपणें लिहिलेला सांपडेल. आर्थिक संबंधाचें विस्तृत विवेचन करावयास अवश्य साहित्य वेळेवर मिळालें नाहीं. ब्रिटिश सरकारचे प्रत्येक देशाशीं व्यापारविषयक तहनामे काय झाले आहेत त्यांच्या प्रती मिळाल्या नाहींत. तसेंच प्रत्येक राष्ट्राशीं हिंदुस्थानचा व्यवहार काय होतो आणि तो कोणत्या यंत्रामार्फत होतो, प्रत्येक देशांत भारतीय हितसंबंध काय आहेत, इत्यादि विषयांवरील माहिती परदेशीं असलेल्या साम्राज्याच्या वकिलांकडून मागविली तीहि बऱ्याच जणांकडून आली नाहीं. यामुळें व्यापारविषयक संबंधाचें विवेचन या ग्रंथांत अपूर्ण राहिलें आहे. हें विवेचन आपणांस अत्यंत अवश्य आहे व तें अन्यत्र करण्याचा मानस आहे.]

# परिशिष्ट.

## काँग्रेसची बदललेली वृत्ति—खिलाफत व पंजाब प्रकरणें.

### खिलाफत व पंजाब.

म. गांधींच्या *असहकारितेच्या चळवळीस ज़ोर आणण्यास आणि कांग्रेसची वृत्ति एकदम पालटून टाकण्यास ज्या कांहीं गोष्टी कारण झाल्या आहेत त्यांचें वर्गीकरण बाह्य व अंतःस्थ असें दोन तऱ्हेनें करतां येतें. बाह्य कारणांत जगाचा सर्वसामान्य इतिहास येतो. यामध्यें आयर्लंडमधील चळवळ, इजिप्तची चळवळ व दक्षिण आफ्रिकेंतील पुनरुज्जीवित झालेली चळवळ या गोष्टी येतील. खिलाफतीचा नाश हें तर असहकारितेस प्रत्यक्ष कारण म्हणूनच गांधींनीं पुढें मांडलें आहे. हें सर्वांत महत्त्वाचें बाह्य कारण समजलें पाहिजे. अंतःस्थ कारणांत सर्वांत महत्त्वाचें कारण म्हणजे पंजाबप्रकरण होय.

खिलाफतीसारख्या बाह्य प्रश्नास हिंदुस्थानांत महत्त्व येण्यास कारण झालेली पूर्वींची चळवळ म्हणजे पॅन-इस्लामिझम होय. या चळवळीस, म्हणजे मुसुलमानी देशांमध्यें बंधुत्व अधिकाधिक वृद्धिंगत व्हावें व मुसुलमानी संस्कृतीचें संवर्धन व्हावें या चळवळीस, कांहीं सरकारी अधिकाऱ्यांनीं उत्तेजनच दिलें होतें. त्या वेळेस पॅन-इस्लामिझमच्या चळवळीस मदत करणें म्हणजे राष्ट्रीय तत्त्वास झुगारणें होतें. आतां सुलतानाची शक्ति पार नष्ट झाली आहे आणि यामुळें या चळवळीपासून भारतीय राष्ट्रीयत्वास धक्का पोंचण्याचे दिवस गेले अशी म. गांधी वगैरे पुढाऱ्यांची समजूत झालेली दिसते. तुर्कस्तानाच्या सत्तानाशाचा सनदी लेख म्हटला म्हणजे नुकता (ता. १० आगस्ट १९२०) दोस्तांचा तुर्कांशीं झालेला तह होय. या तहाचा गोषवारा खालीं दिला आहे.

### तुर्कांबरोबर दोस्तांचा तह.†

#### संक्षिप्त गोषवारा.

[ तुर्कांबरोबर झालेल्या तहांत समाविष्ट झालेलीं राष्ट्रें–नूतन तुर्कस्तानच्या सीमा–कान्स्टांटिनोपलवरील तुर्कांची सत्ता–दार्दानेल्स, मार्मोराचा समुद्र व बास्फोरस या भागांवर सार्वराष्ट्रीय सत्तेची स्थापना–जलमार्गावरील सत्ताधिकारी सामुद्रधुनी-कमिशनचें अधिकारक्षेत्र–कमिशनच्या खर्चाची तरतूद व अंमलबजावणीचीं साधनें–कुर्दिस्तानच्या सीमा व त्याला टर्कीनें आज स्थानिक स्वराज्य व पुढें राष्ट्रसंघानें ठरविल्यास पूर्ण स्वातंत्र्य द्यावें अशी अट–ग्रीसला स्मर्ना शहर व त्याच्या भोंवतालचा टापू यांजवर पांच वर्षेपर्यंत टर्कीच्या नांवानें व त्यानंतर लोकांची तशी इच्छा दिसून आल्यास स्वतःच्या नांवानें राज्य करण्याची परवानगी–जुन्या यूरोपीय टर्कींतील प्रस्तुत तहान्वयें ग्रीसला दिलेला भाग–आर्मीनियास स्वातंत्र्य–सीरिया व मेसापोटेमिया यांस तुर्कांखालून काढून राष्ट्रसंघनियुक्त राष्ट्राच्या पालकत्वाखालीं मर्यादित स्वातंत्र्यदान–पॅलेस्टाइनवरहि तुर्कांच्या ऐवजीं पालकराष्ट्राची सत्ता–हैजाझचें स्वतंत्रीकरण व तेथील राजानें मक्का व मदीना येथें येणाऱ्या मुसुलमान यात्रेकरूंस अडथळा करूं नये अशी अट–टर्कीची इजिप्त, सुएझ कालवा व सायप्रस बेट यांच्यावरील आपल्या हक्कांसंबंधांत सोडचिठ्ठी व ब्रिटिश व इजिप्शन सरकारांमध्यें झालेला ठराव पाळण्याची कबूली–१८८१ पासून ट्यूनिसमध्यें व १९१२ पासून मोरोक्कोमध्यें असलेल्या फ्रेंचांच्या पालकसत्तेस टर्कीची मान्यता–१९१२ च्या तहानें टर्कीकडे राहिलेल्या लिबियावरील हक्काची सोडचिठ्ठी व यदिकानीज व कास्तेलोरीझो यांवरील हक्कांचें इटलीस दान–टर्कीपासून वियुक्त केलेल्या राष्ट्रांतील प्रजाजनांचें राष्ट्रगोत्र ठरविण्याचे नियम–दोस्तांच्या इतर राष्ट्रांशीं झालेल्या किंवा होणाऱ्या तहांस टर्कीची मान्यता–आपले इतर राष्ट्रांशीं झालेले जुने तह रद्द समजण्याची कबूली–टर्कींतील परकीयविषयक करारबद्ध न्यायपद्धतींत सुधारणा–युद्धांत टर्कीविरुद्ध दोस्तांस ज्यांनीं मदत केली त्या टर्की प्रजाजनांस टर्कीकडून माफी–परराष्ट्रांतील मुसुलमानांवरील आपल्या हक्कांची सोडचिठ्ठी–टर्कीकडे ठेवलेल्या मुलखांतील अल्पसंख्याकांच्या जीविताच्या व स्वातंत्र्याच्या संरक्षणाबद्दल टर्कीकडून हमी–युद्धकाळीं झालेल्या टर्कीच्या राज्यांतील अतुर्क लोकांच्या नुकसानीची राष्ट्रसंघनिर्मित पंचमंडळें ठरवितील त्याप्रमाणें टर्कीकडून नुकसानभरपाई–टर्कीस लष्करी पोलीस ३५०००, जादा फौज २०००० व सुलतानाचा लवाजमा ७०० एवढेंच सैन्य ठेवण्याची परवानगी–टर्कीच्या सशस्त्र सैन्यावर दोस्तांच्या कमिशनची हुकमत व लष्करी पोलिसांत तोफखाना वगैरे न ठेवण्याची व परराष्ट्रीय अंमलदार नेमण्याची अट–सशस्त्र सैन्य ५०००० ठेवण्याची परवानगी व दारूगोळा देशांत तयार करण्याची किंवा ठरलेल्या कारखान्यांशिवाय इतर ठिकाणां-हून घेण्याची किंवा सांठवून ठेवण्याची बंदी–सामुद्रधुनीच्या किनाऱ्यापासू[illegible] अधिक[illegible] [illegible]ठमोठ्या [illegible] वर्गांतहि [illegible] कांहीं [illegible]ती अ[illegible]सून येतो.

* पृ. ४१२ असहकारितेच्या [illegible]

नाश करण्याची अट व या टापूंत कोणत्याहि प्रकारच्या लष्करी कामास बंदी—लढाऊ जहाजें व बिनतारी संदेशवाहक स्टेशनें टर्कीनें दोस्तांच्या हवालीं करणें—स्थलव्यापी अथवा जलगामी आकाशी फौज ठेवण्याची टर्कीस मनाई व दोस्तांच्या अंतरिक्ष-यानांस टर्कीत हिंडण्याची मुभा—हे ठराव अंमलांत आणण्यासाठीं जीं दोस्तांचीं कमिशनें नेमिलीं जातील त्यांचा खर्च टर्कीनें द्यावयाचा—तुर्कांनीं युद्धकाळांत ज्यांनां कैद केलें त्यांनां स्वखर्चानें ज्याच्या त्याच्या देशीं पोंचवावयाचें व ज्या तुर्क अंमलदारांनीं दोस्त प्रजाजनांस लपवून ठेवल्याचें कमिशन ठरवील त्यांस शिक्षा द्यावयाची—ब्रिटिश, फ्रेंच व इतालियन शिपायांच्या कबर-स्थानाच्या जागा कर न घेतां दोस्तांच्या हवालीं करावयाच्या—युद्धाचे कायदे ज्यांनीं मोडले त्यांस दोस्तांचीं लष्करी कोर्टें सांगतील त्या शिक्षा करावयाच्या—टर्कीनें आपल्या राज्यांतील दोस्तांच्या हक्कसंरक्षक मुलुखव्यापी सैन्याचा खर्च व दोस्तांच्या प्रजाजनांची झालेली नुकसानी द्यावयाची, तहांत त्याजकडून काढलेल्या मुलुखांतील तुर्क साम्राज्याच्या किंवा सुलतानाच्या खाजगी मालमत्तेवरील हक्क सोडावयाचा आणि तुर्क साम्राज्याचें मागील कर्ज द्यावयाचें—टर्कीच्या जमाबंदीची व्यवस्था दोस्त-राष्ट्रांचें जमाबंदी कमिशन लावणार—आयात करांत फेरबदल करणें, उपभोगकर बसविणें, जर्मन रेल्वेकंपन्यांची मालमत्ता हस्तगत करणें, इत्यादि जमाबंदीकमिशनचे अधिकार—दोस्तांच्या आकाशयानांस टर्कीच्या जलस्थलप्रदेशावर वाटेल तिकडे जाण्यायेण्याची मुभा व दोस्तांविरुद्ध लढलेल्या राष्ट्रांस त्या गोष्टीची बंदी—दोस्त देशांतून येणाऱ्या व दोस्त देशांत जाणाऱ्या माणसांस, मालास, जहाजांस व आगगाड्यांस तुर्क मुलुखांतून जाण्यायेण्याची पूर्ण मुभा तुर्क राज्यांतून परमुलखांत जाणाऱ्या येणाऱ्या मालावर दोस्तांची देखरेख—कान्स्टांटिनोपलचा कांहीं भाग व हैदरपाशा, स्मर्ना वगैरे सहा बंदरें सार्वराष्ट्रीय समजणें—आगगाडीनें जाणाऱ्या दोस्तांच्या मालास व उतारूंस सवलती—टर्कीपासून विभक्त केलेल्या मुलखांतील लोहमार्गांवर चालविण्यास आगगाड्या वगैरे चालता माल ठराविक प्रमाणांत टर्कीच्या संग्रहांतून द्यावयाचा—दोस्तांच्या टेलिफोन व टेलिग्राफ तारायंत्र व्यवहारास टर्कीच्या राज्यांत मोकळीक—जेद्दा-स्वाकिन व सायप्रस—लाटाकीया या जलगामी तारायंत्रांच्या स्वामित्वाची सोडचिठ्ठी—सदरील कोणत्याहि बाबतींत मतभेद झाल्यास त्याच्या निर्णयाचा हक्क राष्ट्रसंघाकडे—तहावर सही करणाऱ्या राष्ट्रांकडे असलेलें आपलें मागील सर्व घेणें टर्कीनें सोडून द्यावयाचें. ]

---

## विस्तृत गोषवारा.

### —प्रस्तावना.—

प्रस्तावनेंत युद्धाचीं कारणें सांगितलीं आहेत व तह ज्या पक्षांमध्यें होत आहे त्या पक्षांचीं नांवें दिलीं आहेत. तहाचा एक पक्ष म्हणजे चार वडे दोस्त, ब्रिटिश साम्राज्य, फ्रान्स, इटाली व जपान आणि पुढील छोटे दोस्त बेल्जम, ग्रीस, हेजाझ, आर्मीनिया, पोलंड, पोर्तुगाल, रुमानिया, सर्व-क्रोट-स्लाव्ह व झेको-स्लोव्हाकिया; तहाचा दुसरा पक्ष तुर्कस्तान.

### —प्रकरण १.—

यांत राष्ट्रसंघाचा करारनामा आहे.

### —प्रकरण २.—

### तुर्कस्तानच्या सीमा.

यूरोपीय तुर्कस्तानची सीमा चाताल्जा रांग ही ठरली आहे, मात्र ही मर्यादा वायव्येकडे थोडी वाढवून डर्कोसचें सरोवर तुर्कांच्या हद्दींत घेतलें आहे. आशियांतील तुर्कस्तानच्या सीमा पूर्वींप्रमाणेंच आहेत, मात्र दक्षिण सरहद्द बदलली आहे. तहामध्यें यूरोपीय व आशियांतील तुर्कस्तानच्या नव्या सीमा, तसाच स्मर्ना ...ग मीकांनां दिला आहे त्य...ी सीमा विस्तारानें वर्णन केली आहे. ... ...तियान्‍यें काम आहे. ... बाबतींत बदलणें न बदलणें प्रेसिडेंट युनायटेड स्टेट्स यांच्या मतावर अवलंबून ठेविलें आहे. ट्रेबिझांड, अर्जरूम, वान व बिटलिक या भागांत आर्मीनियाची सरहद्द कशी असावी तें ठरविणें या प्रेसिडेंटाकडे सोंपविलें आहे.

### —प्रकरण ३.—

### राजकीय कलमें. कान्स्टांटिनोपल.

या तहांतील इतर कलमांनां विरोध न येतां कान्स्टांटिनोपलवर तुर्कांची सत्ता राखणें शक्य आहे तेवढी राखण्याचें दोस्त कबूल करीत आहेत. मात्र या कबुलीला एक अट आहे व ती ही कीं, तुर्कांनीं या तहांतील कलमांप्रमाणें वर्तन जर न केलें, किंवा याला पुरवणी तह अथवा ठराव म्हणून जे जोडले आहेत त्यांतील कलमें मोडलीं, विशेषतः जर तुर्कराज्यांत ज्या जाती संख्येनें अल्प आहेत त्यांचें रक्षण करण्याच्या कामांत तुर्कांनीं कसूर केली तर हा कान्स्टांटिनोपलसंबंधाचा ठराव दोस्त बदलतील व याप्रमाणें बदललेला ठराव तुर्कांस मान्य करावा लागेल.

### सामुद्रधुन्या.

दार्दानेल्स, मार्मोराचा समुद्र व बास्फोरस हे भाग यापुढें युद्ध असो वा शांतता असो सर्वदां सर्व राष्ट्रांच्या व्यापारी आणि लढाऊ जहाजांनां व व्यापारी व लष्करी आकाश-यानांनां जाण्यायेण्यास अगदीं खुले राहतील. या जलप्रदेशांत ...राचे हक्क बजावणें अथवा एखादें

युद्धाचें कुल करणें हें फक्त, राष्ट्रसंघाच्या कारभारीमंडळाचा तसा ठराव झाल्यास या ठरावानें मुभा दिलेल्या राष्ट्रालाच करतां येईल; एरवीं असलीं कृत्यें येथें करावयाचीं नाहींत. या जलप्रदेशावर सत्ता चालविण्यासाठीं सामुद्रधुनी–कमिशन नेमलें आहे. तुर्कसरकार व ग्रीकसरकार यांनीं या कमिशनास आपापले सत्ताधिकार जरूर तेवढे सर्व दिले आहेत. या कमिशनमध्यें प्रतिनिधी असणार ते येणेंप्रमाणें. युनायटेड स्टेट्सला या कामांत आपला भाग असावा असें वाटून तें आपल्या हिश्श्याप्रमाणें काम करण्यास खुषीनें पुढें येईल त्या वेळीं त्याचा एक प्रतिनिधि, ब्रिटिश साम्राज्य, फ्रान्स, इटली, जपान यांचा एकेक प्रतिनिधि, रशिया राष्ट्रसंघाचा सदस्य झाला म्हणजे त्याचा एक प्रतिनिधि, ग्रीस, रुमानिया यांचा एकेक प्रतिनिधि, बल्गेरिया राष्ट्रसंघाचा सभासद झाल्यावर त्याचा एक प्रतिनिधि, याप्रमाणें या कमिशनांत प्रतिनिधी असतील. प्रत्येक राष्ट्रानें एकेकच प्रतिनिधि कमिशनवर नेमावयाचा आहे; पण युनायटेड स्टेट्स, ब्रिटिश साम्राज्य, फ्रान्स, इटली, जपान व संयुक्त रशिया यांनां दोन मतें व राहिलेल्या तीन राष्ट्रांनां एकेक मत द्यावयाचा अधिकार राहील.

या कमिशनला सदरील जलप्रदेशावर अधिकार चालविण्याची जी सत्ता दिलेली आहे तिचा, त्या ठिकाणीं जे इतर स्थानिक अधिकारी असतील त्यांच्या अधिकाराशीं कांहींहि संबंध नाहीं. कमिशनचें निशाण, कमिशनचें बजेट, कमिशनची घटना सर्व अगदीं स्वतंत्र असेल. या जलप्रदेशांत मध्यमार्गांची सुधारणा करणें, बंदरांत जाण्याचे मार्ग नीट करणें, दिव्यांची तजवीज करणें, धोक्याचीं पिंपें लावणें; जहाजें नांगरण्याच्या जागा, जहाजें ओढून आणण्याची कामगिरी, जलमार्गज्ञ वाटाड्यांची व्यवस्था यांजवर देखरेख करणें; या तहांत बंदरें, जलमार्ग, आगगाडीचे रस्ते यांसंबंधाची व्यवस्था ठरविणारा जो भाग आहे त्यांतील कलमांबरहुकुम कान्स्टांटिनोपल व हैदरपाशा या बंदरांत व्यवस्था होत आहे कीं नाहीं हें पाहणें; फुटलेलीं जहाजें, अशा जहाजांतील माल वांचविण्याची व्यवस्था, माल जहाजांवर चढविणें किंवा जहाजांवरून उतरणें या गोष्टींवर देखरेख करणें, हे अधिकार कमिशनला दिलेले आहेत.

या सामुद्रधुन्यांच्या मार्गांच्या खुलेपणाला व्यत्यय येण्याचीं चिन्हें दिसलीं तर सदरील कमिशननें ग्रेट ब्रिटन, फ्रान्स व इटली यांच्या कान्स्टांटिनोपल येथील प्रतिनिधींकडे दाद मागावी असें ठरलें आहे. सदरील तीन राष्ट्रें या तहाअन्वयें सामुद्रधुनी-प्रदेशांत सत्तासंरक्षणार्थ सैन्य ठेवतील. यांचे प्रतिनिधी या प्रदेशांत आंतून किंवा बाहेरून मार्गप्रतिरोध होत आहे असें कमिशननें त्यांनां कळवितांच, दोस्तसरकारांच्या लष्करी व आरमारी सेनानींच्या सल्ल्यानें योग्य ती उपाययोजना करतील.

या कमिशनला जमीनजुमला व कारखाने विकत घेतां यावे, कर्ज काढतां यावें व सामुद्रधुनी-प्रदेशांतील जहाजांवर पट्ट्या बसवितां याव्या असे अधिकार दिले आहेत. कान्स्टांटिनोपलचें आरोग्यखातें, तुर्की आरोग्यखातें, बॉस्फोरसची राष्ट्रीय लाइफ बोट कचेरी यांनां [illegible] चालवितां येत असत ते आतां कमिशनकडे दिले आहेत, तसेंच गोद्या, प्रकाशगृहें, धक्के व इतर बाबींसंबंधीं कंपन्यांनां किंवा व्यक्तींनां जे सवलतींचे हक्क वगैरे आहेत त्या बाबतींत कमिशनचें आणि या इसमांचें व कंपन्यांचें नातें कोणत्या प्रकारचें आहे तें तहांत स्पष्ट केलें आहे.

कमिशनला आपली स्वतःची शिपाई–पलटण ठेवण्याचा अधिकार आहे. कमिशन जी नियमावली तयार करील तिज-विरुद्ध वागण्याबद्दल शासन करण्याचें काम त्या त्या ठिकाणच्या न्यायकचेऱ्यांनीं–कॉन्सलच्या, तुर्कांच्या अथवा ग्रीकांच्या कचेऱ्यांनीं–करावें अशी व्यवस्था केली आहे. कमिशननें जहाजांवर ज्या पट्ट्या व जे कर बसवावयाचे ते बसवितांना जहाज आलें कोठून, जावयाचें कोठें, कोणत्या बंदरांतून निघावयाचें, तें कोणत्या राष्ट्राचें आहे, त्याचा मालक कोण, त्यावरील माल कोणत्या देशांतला व कोणाच्या मालकीचा आहे वगैरे कसल्याहि गोष्टींचा विचार न करतां सर्वांवर सारख्याच प्रमाणानें बसवावे व त्यांची उकळणीहि सारख्याच तऱ्हेनें करावी, असें ठरलें आहे. १८८८ च्या सुएझ कालव्यासंबंधींच्या ठरावपत्रकांत, लढाऊ जहाजें, धरलेलीं शत्रूचीं जहाजें, युध्यमान राष्ट्राचीं जहाजें या कालव्यांतून जाण्यासंबंधानें व त्यांच्या तेथें राहण्यासंबंधानें जे नियम आहेत, तसेंच या जहाजांची दुरुस्ती, त्यांजवर अन्न-पाण्याचा पुरवठा करणें, नाखव्यांची भरती करणें यासंबंधानें जे नियम आहेत तेच नियम सामुद्रधुनीच्या बाबतींत केलेले आहेत. मात्र राष्ट्रसंघाच्या कारभारीमंडळानें संमति दिल्यावर युध्यमान राष्ट्रालाहि या प्रदेशांत वाटेल तसें वागतां येईल, असें ठरविलें आहे. शिवाय, तुर्कांच्या शत्रूकडे जात आहे असा युद्धोपयोगी माल या सामुद्रधुनी–प्रदेशांतून जाऊं द्यावयाचा नाहीं, वगैरे गोष्टींसंबंधानें कांहीं नियम करण्याचें काम राष्ट्र-संघावर सोंपविलें आहे.

## कुर्दिस्तान.

कुर्दिशांची वस्ती ज्या भागांत मोठी आहे त्या भागाला स्थानिक स्वराज्य देण्याचें टर्की कबूल करीत आहे. या प्रदेशाच्या सीमा पश्चिमेस यूफ्रेटीस नदी, उत्तरेस आर्मीनियाची दक्षिण सरहद्द जी ठरेल ती, दक्षिणेस टर्कीची दक्षिण सरहद्द ठरेल ती. आर्मीनियाची सरहद्द ठरविणार यु. स्टे. चे प्रेसिडेंट, टर्कीची सरहद्द ठरविणार ब्रिटिश, फ्रेंच व इटालियन प्रतिनिधींचें कमिशन. सदरील स्थानिक स्वराज्याच्या घटना–पत्रकांत असिरो-खाल्डियन आणि इतर ज्या अल्पसंख्याक जाती अथवा संप्रदाय आहेत त्यांच्या हक्कांचें संरक्षण होण्यासाठीं विशेष नियम घातले जातील. हाच हेतु साध्य होण्या-साठीं पर्शिया-टर्की सरहद्दीवर फेरफार करून टर्कीची सरहद्द नवी आंखली जाईल. याप्रमाणें कुर्दिस्तानला स्थानिक स्वराज्य प्राप्त झाल्यानंतर ठराविक मुदतींत त्यानें राष्ट्रसंघाच्या कारभारी मंडळाकडे पूर्ण स्वातंत्र्यासाठीं पाहिजे तर अर्ज करावा. हा अ[illegible] कारभारी मंडळीनें मंजू[illegible] अधिक[illegible] [illegible]ठमोठ्या [illegible] वर्गांतहि स्वातं[illegible] दिले [illegible] कांह[illegible] ती अ[illegible]सून येतो.

त्या भागांतील कुर्दिश लोकांनींहि त्यांना हवें असल्यास स्वतंत्र कुर्दिस्थानांत मिळून जावें.

### स्मर्ना.

स्मर्ना शहर व त्या भोंवतालचा कांहीं आंखीव टापू टर्की ग्रीक सरकारकडे देत आहे. टर्कीचे या टापूवरील राज्याधिकार ग्रीक सरकार यापुढें टर्कीचे म्हणून चालवील. अधिसत्ता टर्कीचीच राहील व या सत्तेची खूण म्हणून स्मर्नाच्या बाहेर एका किल्ल्यावर टर्कीचें निशाण राहील. ग्रीक सरकारनें या प्रदेशांत राज्यकारभार करावा, व्यवस्थेसाठीं सैन्य ठेवावें व आपल्या जकातबंदींत या प्रदेशाचा अंतर्भाव करावा. या प्रदेशांत एक पार्लमेंट प्रमाण-बद्ध प्रतिनिधि-निवडीच्या तत्त्वावर अल्पसंख्याक समुदायांचे प्रतिनिधी घेऊन स्थापन करावयाची. या पार्लमेंट-संबंधाची योजना ग्रीसनें राष्ट्रसंघाच्या कारभारीमंडळापुढें ठेवावी व त्या मंडळाची मताधिक्यानें मान्यता मिळाल्यावर ती अमलांत यावी. या योजनेप्रमाणें जी निवडणूक करावयाची ती कांहीं ठरींव दिवस, टर्कीनें हद्दपार केलेले लोक परत यावे म्हणून, तहकूब ठेवल्यास चालेल. तेथील अल्पसंख्याक समाजांचें संरक्षण, तेथील रहिवाशांची राष्ट्र-गोत्रवार नोंद व त्यांचें परदेशांत रक्षण व्हावें यासंबंधीं तजवीज, सक्तीच्या लष्करी नोकरीची बंदी, व्यापार व नेआण यांची मोकळीक, टर्कीनें स्मर्ना बंदर वापरावयाचें त्याच्या अटी, चलन, आर्थिक जबाबदारी आणि फोकीआच्या गीठखाणी यांसबंधीं विशेष ठराव केलेले आहेत. स्मर्नामध्यें पांच वर्षे या प्रकारचा कारभार झाल्यानंतर तेथील पार्लमेंटनें राष्ट्रसंघाच्या कारभारीमंडळाकडे ग्रीसच्या राज्यांत आपणांस सामील करून घेण्याविषयीं वाटल्यास अर्ज करावा. हें कारभारीमंडळ वाटल्यास या अर्जांतील मागणीच्या निकालासाठीं सर्वजनमत घ्यावयाची तजवीज करील. मध्यमंडळानें स्मर्नावाल्यांचा अर्ज मंजूर केल्यास टर्कीनें ग्रीक सरकारकडे स्मर्ना मुलखावरील आपले सत्ताधिकार कायमचे दिले पाहिजेत.

### ग्रीस.

तहनाम्याचा नकाशा झाला आहे त्यांत यूरोपीय टर्कीच्या ज्या सीमा दाखविल्या आहेत त्या सीमांबाहेरील सर्व मुलखावरील आपला सत्ताधिकार टर्की ग्रीसच्या स्वाधीन करीत आहे. इंब्रॉस, लेमॉन्स, सामोथ्रेस, मितिलेन, सॅमॉस, निकारिया, कोईस आणि इजिप्शन समुद्रांतील इतर कांहीं बेटें यांजवरील सत्ताहि टर्की ग्रीसच्या हातांत देत आहे. सामुद्रधुनी-प्रदेशांत ग्रीसला टर्कीइतकाच अधिकार व जबाबदारी आहे. ग्रीसशीं वेगळा तहनामा व्हावयाचा असून त्यांत असें ठरणार आहे कीं, ग्रीसच्या नव्या मुलखांत ज्या अल्पसंख्याक जातीं, संप्रदाय व भाषा असतील त्यांचें त्यानें संरक्षण करावें, विशेषतः आड्रियानोपल येथें या संरक्षणाच्या कामाकडे विशेष लक्ष द्यावें आणि आपल्या मुलखांत मालाच्या नेआणीस मोकळीक ठेवावी व परराष्ट्रांच्या व्यापाराला न्यायाच्या सवलती द्याव्या. ग्रीस या तहान्वयें कांहीं आर्थिक जबाबदारीहि अंगावर घेत आहे.

ट्रेबिझाँड, वान, बिटलिक या टापूंत जी ठरवितील ती टर्की मान्य करील. या प्रेसिडेंटाच्या मध्यस्थीनें जो तुर्क मुलख आर्मीनियाला प्राप्त होईल त्या मुलखाबरोबर आर्मीनियाला जी कांहीं जबाबदारी व जे कांहीं हक्क प्राप्त होतील, त्यासंबंधानेंहि तहांत खुलासा केलेला आहे. तसेंच टर्कीच्या मुलखांतील आर्मीनियाची सरहद्द कायमची ठरविणें, जॉर्जिया व अझरबैजन या देशांचा व आर्मीनियाचा ज्या प्रदेशांत संबंध येतो तेथें त्या तिघांची सरहद्द आपापसांत न ठरल्यास ती ठरविणें आणि आर्मीनियाशीं वेगळा तह करून त्या देशांतील अल्पसंख्याक पंथ, भाषा-समूह व जाती यांच्या संरक्षणाची व्यवस्था करणें व तेथें पर-राष्ट्रांचा व्यापार न्याय्य रीतीनें चालावा आणि नेआणीला प्रतिबंध होऊं नये यासाठीं तजवीज करणें या सर्व गोष्टींची व्यवस्था तहांत केली आहे.

### सीरिया व मेसापोटेमिया.

सीरिया व मेसापोटेमिया यांस तह करणारीं राष्ट्रें आज मर्यादित स्वातंत्र्य देत आहेत. राष्ट्रसंघाच्या करारनाम्याचें कलम २२ यांतील व्यवस्थेनुसार ही स्वतंत्रता मर्यादित केलेली आहे. कोणी तरी राष्ट्र त्याला मिळालेल्या आज्ञापत्रानुसार या स्वातंत्र्यदान केलेल्या देशांना राज्यकारभाराच्या संबंधांत सल्ला व मदत देईल. हे देश आपल्या पायांवर उभे राहण्यासारखे होत तोंपावेतों ही व्यवस्था राहील. सल्लामदतीसाठीं पालकराष्ट्र निवडणें व नियुक्त करणें आणि या देशाच्या मर्यादा ठरविणें हें काम मुख्य दोस्तांकडे आहे.

### पालेस्टाइन.

राष्ट्रसंघाच्या करारनाम्याच्या २२ कलमानुसार पालेस्टाइनचा कारभारहि पालकराष्ट्राकडे देण्यांत येत आहे. या पालकाची निवड व या प्रतिपालित देशाच्या मर्यादा ठरविणें हें काम प्रमुख दोस्तांकडे आहे. २ नोव्हेंबर १९१७ या दिवशीं ब्रिटिश सरकारनें जें अभिवचन जाहीरपणें दिलें आणि ज्याला इतर दोस्तांनीं आपली अनुमति दिली तें ज्यू लोकांनां पालेस्टाइनमध्यें आपलें राष्ट्रीय गृह करण्यास पूर्ण अधिकार देण्याचें अभिवचन या तहांत पुनः दिलें आहे. पालेस्टाईनमध्यें ज्या निरनिराळ्या सांप्रदायिक जाती आहेत त्यांचे हक्क वगैरेंचा अभ्यास करून त्यांची व्यवस्था लावण्यासाठीं एक जादा कमिशन राष्ट्रसंघनियुक्त अध्यक्षांच्या नेतृत्वाखालीं नेमावयाचेंहि ठरलें आहे. पालेस्टाइन-करितां जें पालकराष्ट्र नेमावयाचें त्या राष्ट्राला कोणकोणते अधिकार द्यावयाचे वगैरेसंबंधींचा खर्डा प्रमुख दोस्त तयार करतील व तो राष्ट्रसंघाच्या कारभारीमंडळाच्या अनुमतीसाठीं त्याजकडे पाठविला जाईल.

### हेजाझ.

दोस्तांनीं यापूर्वींच हेजाझ हें स्वतंत्र राष्ट्र म्हणून मान्यता दिलेली आहे. टर्की या दोस्तांच्या कृतीला मान्यता देत आहे. हेजाझच्या ज्या मर्यादा ठरतील त्या कबूल करून या देशावरील आपल्या स्वामित्वाचे हक्क टर्की सोडीत आहे. मुसुलमानांच्या दृष्टीनें [illegible] मदिना हीं तीर्थें असल्याकारणानें हेजाझचा राजा [illegible] मुसुलमानांनां या

तीर्थांच्या ठिकाणीं यात्रेसाठीं अथवा दुसऱ्या धार्मिक हेतूनें जाण्यायेण्यास बिलकुल अडथळा होणार नाहीं. या तीर्थांच्या ठिकाणीं ज्या धार्मिक देणग्या वगैरे चालत आहेत, त्या सर्व तो आदरानें पुढें चालवील. हेजाझच्या राज्यांत तुर्कस्तानाच्या साम्राज्यांत नवीं उत्पन्न झालेलीं राष्ट्रें आणि राष्ट्रसंघाचें साहाय्य असणारीं राष्ट्रें या सर्वांनां सारख्याच सवलतींनीं मोकळेपणानें व्यापार करतां यावा, असें कलमहि तहांत आहे.

### इजिप्त, सुदान, सायप्रस.

टर्की आपले इजिप्तवरील सर्व हक्क ता. ५ नोव्हेंबर १९१४ या दिवशींच रद्द झाले अशी मान्यता देत आहे आणि ग्रेटब्रिटननें १८ डिसेंबर १९१४ या दिवशीं इजिप्त आमचें रक्षित राष्ट्र म्हणून जो जाहीरनामा काढला त्याला टर्की आपली संमति देत आहे. टर्कीच्या प्रजाजनांनां इजिप्तचे प्रजाजन कसें होतां येईल त्यासंबंधाचे नियम, तसेंच दोस्तांनां व त्यांच्या प्रजाजनांनां ज्या सवलती वगैरे परराष्ट्रांत मिळतील तसल्याच सवलती इजिप्तला व त्याच्या प्रजाजनांनां मिळाव्या यासंबंधीं नियम, आणि या दोन पक्षांचा माल व जहाजें यांनां सारख्याच तन्हेनें वागविण्यांत यावें व ग्रेटब्रिटननें इजिप्तच्या प्रजेचें परदेशांत संरक्षण करावें यासंबंधीं व्यवस्था तहांत आहे. २९ आक्टोबर १८८८ च्या कान्स्टांटिनोपल येथें सहीशिक्का झालेल्या करारान्वयें सुलतानाला सुएझ कालव्यावर जे हक्क देण्यांत आले ते सर्व हक्क या तहाअन्वयें टर्की ग्रेटब्रिटनच्या हवालीं करीत आहे. तुर्क सरकारची व तुर्क प्रजाजनांची जी मिळकत इजिप्तमध्यें आहे तिची व्यवस्था लावण्यासंबंधाचीं कलमें यांत आहेत. इजिप्त तुर्क सरकारला पूर्वीं खंडणी देत होतें त्या खंडणीवरचा पूर्वीचा आपला हक्क या तहाअन्वयें तुर्क सरकार सोडून देत आहे. इजिप्तच्या खंडणीच्या तारणावर जें कर्ज तुर्कसरकारनें काढिलें होतें त्याची जबाबदारी ग्रेटब्रिटन या तहानें आपणाकडे घेत आहे. ब्रिटिश व इजिप्शन सरकारांच्या दरम्यान १९ जानेवारी १८८९ रोजीं झालेला ठराव व त्याचीच पुरवणी म्हणून १० जुलै १८८९ रोजीं झालेला ठराव सुदानच्या राज्यकारभाराच्या संबंधाचा व त्याच्या राजकीय स्थानासंबंधाचा आहे, तो पाळला जावा. तह करणारीं राष्ट्रें या दोन्ही ठरावांनां आपली अनुमति देत आहेत. ५ नोव्हेंबर १९१४ रोजीं सायप्रस आपल्या ताब्यांत घेतल्याचें ब्रिटिश सरकारनें पुकारलें त्या गोष्टीस तह करणारे मान्यता देत आहेत. टर्की या बेटावरील आपले सर्व हक्क सोडीत आहे. पूर्वी हें बेट टर्कीला खंडणी देत असे तिजवरील हक्कहि टर्की सोडीत आहे. सायप्रसमध्यें जन्मलेल्या व वस्तीस असलेल्या तुर्क प्रजाजनांनां ब्रिटिश प्रजाजनत्व प्राप्त होण्यासंबंधींचे नियमहि तहांत दाखल आहेत.

### मोरोक्को व ट्यूनिस.

३० मार्च १९१२ पासून फ्रेंचांचे प्रोटेक्टोरेट मोरोक्कोमध्यें आहे व १२ मे १८८१ पासून हें प्रोटेक्टोरेट (पालकसत्ता) ट्यूनिसमध्यें आहे. या दोन्ही ठिकाणची फ्रेंच पालकसत्ता टर्की मान्य करीत आहे. टर्कीमध्यें या देशांतून जो माल येईल त्याचा आणि फ्रेंच मालाचा टर्की [illegible]

### लिबिया, इजियन बेटें.

१२ आक्टोबर १९१२ च्या लौसानच्या तहानें लिबियावरचे जे हक्क सुलतानाकडे राहिले होते ते टर्की आतां सोडीत आहे. यदिकानीज आज इटलीच्या ताब्यांत आहे त्याजवरील आणि कास्तेलोरीझो याजवरील हक्कहि टर्की इटलीच्या स्वाधीन करीत आहे.

### राष्ट्र–गोत्र.

टर्कीचा जो मुलुख या तहानें टर्कीपासून वेगळा केलेला आहे त्या मुलखांत वस्तीला असणारे टर्कीचे प्रजाजन कोणत्या राष्ट्र–गोत्राचे ते ठरविण्यासाठीं तपशीलवार नियमावली आहे ती आस्ट्रियाशीं झालेल्या तहांतील नियमावलीच्या धर्तीवर आहे.

### सर्वसामान्य कलमें.

दोस्त राष्ट्रें तुर्केतर शत्रुराष्ट्रांशीं जे तह व पुरवणीकरार करून चुकले आहेत, तसेंच रशियन साम्राज्याच्या ठिकाणीं आज अस्तित्वांत आलेल्या व पुढें अस्तित्वांत येणाऱ्या राष्ट्रांशीं जे तह व करार दोस्तांनीं केले आहेत किंवा करतील त्यांनां टर्की मान्यता देत आहे. त्याचप्रमाणें ब्रेस्टलिटोस्कचा तह, बोल्शेव्हिस्ट सरकारशीं टर्कीनें केलेले तह, करार व ठराव हे सर्व टर्की अमान्य करीत आहे. प्रमुख दोस्त, इतर ज्या राष्ट्रांशीं टर्कीचे न्यायकोर्टविषयक करार झालेले आहेत त्या दोस्त व तिऱ्हाईत राष्ट्रांच्या तज्ज्ञांच्या सल्ल्यानें, तुर्की न्यायखात्याच्या सुधारणेसंबंधाची योजना तयार करतील व ही योजना टर्की मान्य करील. या योजनेंत तुर्की न्यायखात्यांत एकतंत्री अथवा मिश्र घटनेचा अंमल करावयाचें ठरेल. ही योजना, सध्यांची जी परकीयविषयक करारबद्ध न्यायपद्धति टर्कीमध्यें आहे ती रद्द होऊन तिचे जागीं अमलांत येईल. टर्कीच्या ज्या प्रजाजनांनीं युद्धांत दोस्तांनां मदत दिली त्यांनां माफी मिळावी, आणि जे मुसुलमान दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्राच्या स्वामित्वसत्तेखालीं अथवा पालकसत्तेखालीं आहेत त्यांजवर तुर्कांनीं आपला पूर्ण स्वामित्वाचा अगर विशिष्ट न्यायविषयक हुकमतीचा हक्क सोडून द्यावा, अशाबद्दलचीं कलमेंहि या भागांत आहेत.

### –प्रकरण ४.–

### अल्पसंख्याकांचें संरक्षण.

टर्कीच्या राज्यांतील सर्व लोकांच्या जीविताच्या व स्वातंत्र्याच्या संरक्षणाबद्दल टर्कीनें हमी घेतली पाहिजे. रहिवाशाचा जन्म, राष्ट्र-गोत्र, भाषा, मानवकुल अथवा धर्म यांच्याकडे पाहून भेदाभेद न करतां सर्वांचें सारखेंच संरक्षण केलें पाहिजे. युद्ध चालू असतां जबरदस्तीनें ज्या लोकांनां मुसुलमान बनविलें त्यांनां परत आपल्या धर्मांत जाऊं देण्याबद्दल तहांत जादा कलम घातलें आहे. तसेंच युद्धकालीं अटकेंत अथवा कैदेंत ठेवलेल्या अथवा पळवून नेऊन बेपत्ता केलेल्या इसमांनां, मग ते कोणत्याहि कुळी[illegible] वर्गांतहि [illegible] कांहीं [illegible] ती अ[illegible]मून येतो.

टर्कीतील अल्पसंख्याक जातींनीं खुषीनें देशत्याग करण्याचें व दुसऱ्या देशाला जाण्याचें ठरविल्यास त्यांस अडथळा येणार नाहीं, अशाबद्दल टर्की करारनामे करून देईल. त्याचप्रमाणें दुसऱ्या देशांतील अल्पसंख्याक जाती टर्कींमध्यें रहावयास येतील तर अन्योन्याच्या समान वागणुकीच्या तत्त्वावर त्यांनां मज्जाव होणार नाहीं असे करार टर्की करून देईल, हेंहि ठरलें आहे. १९१५ त पास केलेला सोडलेल्या मालमत्तेसंबंधींचा कायदा टर्की रद्द करीत आहे, आणि राष्ट्र-संघ अतुर्क जातींच्या ज्या लोकांचें युद्धकाळीं नुकसान झालें त्यांच्या नुकसानभरपाईसाठीं जीं मिश्रपंचमंडळें नेमणार आहे त्यांच्या नजरेखालीं टर्की या लोकांची मालमत्ता परत देईल किंवा त्यांचें नुकसान कांहीं मर्यादेपर्यंत भरून देईल. पुनर्घटनेचीं कामें, ठिकठिकाणीं असलेलीं अनिष्ट माणसें दूर करणें, युद्धामध्यें ज्या मालमत्तेचे मालक मरण पावले अथवा नाहींसे झाले आहेत आणि जिला आतां कोणी वारस राहिलेला नाहीं त्या मालमत्तेची व्यवस्था लावणें, तसेंच युद्ध चालू असतां जी मालमत्ता जबरदस्तीनें विकली तिची विक्री रद्द ठरवून तिची पुढची व्यवस्था लावणें, हीं सर्व कामें सदरील पंचमंडळांवर सोंपविलीं आहेत.

या प्रकरणांतील राहिलेलीं कलमें अल्पसंख्याकांच्या राजकीय व नागरिकत्वाच्या हक्कांचें संरक्षण व्हावें, त्यांनां आपापल्या भाषांचा अनिर्बंध उपयोग करतां यावा, टर्कीच्या सरकाराकडून प्रतिबंध न होतां आपापल्या धार्मिक व लोकोपकारी आणि शिक्षणाच्या संस्था स्थापण्याचा हक्क त्यांनां असावा, त्यांच्या धर्मांत व शिक्षणांत त्यांनां स्वातंत्र्य असावें अशा संबंधाचीं आहेत. या प्रकरणांतील गोष्टी लिहिल्याप्रमाणें व्यवहारांत घडून याव्या यासाठीं उपाययोजना करण्याचें काम प्रमुख दोस्त राष्ट्रसंघाच्या कारभारी मंडळाच्या साहाय्यानें करतील आणि ही उपाययोजना जी ठरेल ती टर्की मान्य करील.

### –प्रकरण ५.–

### लष्करी कलमें.

सर्व राष्ट्रांचीं सैन्यें मर्यादित करणें या हेतूस धरून कार्यारंभ व्हावा म्हणून टर्की खालील लष्करी, आरमारी, व आकाशयान-संबंधीं कलमें अक्षरशः पाळण्याचें मान्य करीत आहे. या तहावर सही झाल्यापासून तीन महिन्यांच्या आंत तुर्की सैन्यास रजा देणें आणि दुसऱ्या कित्येक लष्करी नियंत्रणा पाळणें टर्की मान्य करीत आहे. सैन्यभरती यापुढें खुषीची असली पाहिजे, कोणत्याहि जातीच्या व धर्माच्या मनुष्याला सैन्यांत शिरण्याचा सारखाच हक्क राहील, विनकमिशन्ड आफिसर व शिपाई यांची नोकरी ओळीनें १२ वर्षें घेतलीच पाहिजे, कमिशनी आफिसरांनीं २५ वर्षें काम केलें पाहिजे, युद्धांत काम केलेल्या आफिसरांची राखीव रांग ठेवावयाची नाहीं, दरवर्षीं जे कांहीं आफिसर व शिपाई त्यांची मुदत संपल्यापूर्वीं सैन्यांतून निघतील त्यांच्या जागीं नवी भरती कमिशनी व इतर वर्गांतील लागक माणसांच्या एकंदरीच्या शेंकडा ५ या प्रमाणाबाहेर करावयाची नाहीं, टर्कीला [illegible] अल्पसंख्याकांच्या [illegible] खालीलप्रमाणें लष्कर ठेवतां येईल. जेंदामेंरी (लष्करी पोलीस) ३५०००; विशेष आपत्तीच्या प्रसंगीं जेंदामेंरीला मदत करण्यासाठीं जादा फौज २००००; सुलतानचा लवाजमा ७००. जेंदामेंरीचीं माणसें टर्कीच्या निरनिराळ्या विभागांत वांटून दिलीं पाहिजेत. हे विभाग ठरविणें व टर्कीच्या सशस्त्र सैन्यावर हुकमत चालविणें हे अधिकार दोस्तांच्या कमिशनाला दिलेले आहेत. टर्कीच्या या दोस्तकमिशननें ठरविलेल्या प्रत्येक विभागांत एक जेंदामेंरी पलटण राहील. या पलटणींत एकंदर जेंदामेंरीच्या चवथ्या हिश्शापेक्षां अधिक लोक ठेवावयाचे नाहींत. जेंदामेंरीमध्यें तोफखाना व यंत्रकलाभिज्ञांची पलटण ठेवावयाची नाहीं. जेंदामेंरीला कवाईत शिकवून तयार करणें आणि तिच्यामध्यें अंमलदारीचीं कामें करणें यासाठीं दोस्त राष्ट्रें व तिऱ्हाईत राष्ट्रें यांच्याकडून लष्करी अंमलदार पुरविले जातील. जादा फौज म्हणून जी वर सांगितली आहे तिच्यांत पायदळ, घोडदळ व सामान्य कारभाराचें दळ याशिवाय तोफखाना व यंत्रकलाभिज्ञांच्या कंपन्या असल्या तर चालतील. कोणत्याहि एका विभागांत ही जादा फौज तिच्या एकंदरीच्या तिसऱ्या हिश्शापेक्षां अधिक ठेवतां कामा नये. याप्रमाणें तुर्की फौज सुलतानाच्या खासगी लवाजम्याचे लोक सोडून, ५०५०० ठरली आहे. या फौजेंत २०५०० पेक्षां अधिक आफिसर नसले पाहिजेत. जकातखात्यांतील व जंगलखात्यांतील अंमलदारांची संख्या आणि शहरपोलिसांची संख्या वाढविण्याची बंदी आहे. तसेंच शहरपोलिसांनां अथवा रेल्वेवरील कामगारांनां लष्करी शिक्षण देण्याची बंदी आहे. कोणत्याहि पलटणीला पुरवणी-रांग म्हणून फौज तयार करण्याचीहि बंदी आहे. लष्करी शिक्षणाच्या शाळा कमी करून सर्व राज्यांत अंमलदारांकरितां एक व विनकमिशनी अधिकाऱ्यांसाठीं दर विभागास एक, एवढ्याच शाळा ठेवावयाच्या.

सशस्त्र सैन्य टर्कीनें ५०५०० पर्यंत ठेवावें असें ठरलें आहे. या सैन्याला लागेल तेवढीच युद्धसामग्री, दारुगोळा व शस्त्रास्त्रें संग्रहीं ठेवण्यास टर्कीला परवानगी आहे; ही सामग्री किती लागेल, त्याचें कोष्टक सदरील सैन्यसंख्येच्या गरजांचा विचार करून तयार केलेलें आहे. या कोष्टकाप्रमाणेंच टर्कीनें या सामग्रीचा संग्रह करावा. सामग्रीचा जादा सांठा करावयाचा नाहीं. जी मर्यादा सदरील कोष्टकांत घालून दिलेली आहे त्या मर्यादेच्या बाहेर असलेली सामग्री, दारुगोळा व शस्त्रास्त्रें टर्कीनें दोस्तांच्या हवालीं केलीं पाहिजेत. ज्वाला–क्षेपकें, विषारी वायू, टांकीं अथवा शस्त्ररथ टर्कीनें बाहेरून आणावयाचे नाहींत व देशांतहि तयार करावयाचे नाहींत. दोस्तांच्या नियंत्रण–मंडळाच्या परवानगीनें चालविलेल्या कारखान्यांतूनच फक्त टर्कींमध्यें शस्त्रास्त्रें व इतर युद्धसामग्री तयार केली जाईल. परदेशीं पाठविण्याकरितां शस्त्रास्त्रें व दारुगोळा तयार करण्याची टर्कीला बंदी आहे. त्याचप्रमाणें परदेशांतून हा माल आणण्याचीहि त्याला बंदी आहे.

### गडकिल्ल्यांची व्यवस्था.

सामुद्रधुनी-प्रदेशांत जाण्यायेण्याचा अटक होण्याला संभव न रहावा म्हणून, मार्मोरा समुद्राच्या आणि सामुद्रधुन्यांच्या [illegible] अ. १२॥ मैल पावेतों असलेले किल्ले, तटबंदी

व तोफताफे यांचा नाश करावा. मार्मोरा समुद्रांतील बेटें व लॅम्नॉस, इम्ब्रॉस, सामोथ्रस, तेनेदोस आणि मिनिलेन हीं बेटें यांवरील तटबंदी वगैरेहि नष्ट करावी. सदरील प्रकारची तटबंदी वगैरे पुन्हां उभारण्याची बंदी आहे. त्याचप्रमाणें चालत्या तोफा लवकर इकडून तिकडे नेतां येण्यासाठीं पक्के रस्ते अथवा लोहमार्ग बांधण्याचीहि बंदी आहे. ग्रेटब्रिटन, फ्रान्स व इटली यांनां या प्रदेशांत जे पक्के व लोखंडी रस्ते तोफा वगैरेंची नेआण करण्यासारखे असतील ते मोडून टाकण्याची व लागेल तितकी फौज येथें ठेवण्याची सत्ता आहे. याव्यतिरिक्त या प्रदेशांत कसलेंहि लष्करी काम होतां उपयोगी नाहीं. या कलमाप्रमाणें दोस्त अधिकाऱ्यांच्या हुकमतीखालीं असणारी जेंदार्मेरी व सुलतानच्या लवाजम्यांतील फौज यांनांहि या प्रदेशांत फिरण्याचा हक्क नाहीं.

## आरमारी कलमें.

या कलमांअन्वयें टर्कीनें आपलीं लढाऊ जहाजें दोस्तांच्या स्वाधीन करावयाचीं आहेत. फक्त थोडींशीं हलकीं हलक्या शस्त्रांचीं पोलिसकामास व मासेमारीच्या कामास उपयोगीं अशीं जहाजें टर्कीनें स्वतःजवळ ठेवावीं. पृष्ठगामी लढाऊ जहाजें बांधणें अथवा दुसरीकडे मिळविणें या गोष्टीची टर्कीला बंदी आहे. पोलिसकामासाठीं व मासेमारीच्या कामासाठीं जी जहाजें ठेवण्याची टर्कीला परवानगी दिली आहे त्यांतील कांहीं कमी झाल्यास तेवढीं नवीं घ्यावयास अथवा तयार करावयास हरकत नाहीं. पाणबुडीं जहाजें मात्र मुळींच व्यापारासाठीं देखील घेण्याची अथवा तयार करण्याची परवानगी टर्कीला नाहीं. लढाऊ जहाजें पृष्ठगामी व पाणबुडी, तयार होत आहेत तीं मोडून टाकलीं पाहिजेत. मात्र जीं पृष्ठगामी जहाजें लढाऊ म्हणून तयार होत असतां आतां व्यापारी म्हणून बनवितां येत असतील, तीं तशीं बनवावीं. सदरील मोडतोडीनें जें सामान मोकळें होईल तें फक्त व्यापारासाठींच उपयोगांत आणण्याची परवानगी आहे. आरमारी युद्धसामग्री व दारुगोळा, पोलिस व मासेमारी जहाजांसाठीं जितका ठेवावयाची परवानगी आहे त्याखेरीज सर्व दोस्तांच्या स्वाधीन केला पाहिजे आणि हा माल यापुढें टर्कीच्या राज्यांत तयार करण्याची बंदी आहे. टर्कीच्या आरमारी आफिसरांतील व नाखव्यांतील कांहीं लोक पोलिस मासेमारी व रखवाली कामापुरते टर्कीनें ठेवावे व बाकीच्यांनां त्यानें रजा द्यावी. यापुढें पोलिस व मासेमारी कामासाठीं जी भरती करावयाची ती खुषीनें करण्यांत आली पाहिजे व भरती केलेल्या लोकांकडून सारखी पुष्कळ वर्षे नोकरी घेतली पाहिजे. सामुद्रधुनी, प्रदेशांत जीं बिनतारी संदेशवाहक स्टेशनें आहेत ती टर्कीनें दोस्तांच्या ताब्यांत द्यावयाचीं. यापुढें टर्कीला व ग्रीसलाहि अशीं स्टेशनें या प्रदेशांत बांधण्याची परवानगी नाहीं. प्रमुख दोस्तांचें एक आरमारी प्रतिनिधि–कमिशन या वरील गोष्टी टर्कीकडून व्हाव्या तशा होत आहेत कीं नाहींत हें पाहण्यासाठीं नेमण्यांत येईल.

## आकाशयानें.

या कलमान्वयें स्थलगामी अथवा जलगामी आकाशी फौज ठेवण्याची टर्कीला बंदी आहे. या तहावर सही [illegible] जो [illegible] दोन महिन्यांच्या आंत टर्कीनें आपली आकाशी फौज मोडून टाकली पाहिजे. दोस्त जोंपावेतों टर्कीतून अगदीं पूर्णपणें निघून गेले नाहींत तोंपावेतों त्यांच्या अंतरिक्षयानांनां टर्कीच्या राज्यांत वाटेल तिकडे फिरण्याची व वाटेल त्या ठिकाणीं उतरण्याची मुभा आहे. हा तहनामा कबूल झाल्यानंतर सहा महिनेपावेतों टर्कीच्या राज्यांत अंतरिक्षयानें तयार करणें, बाहेरून तेथें आणणें अथवा तेथून बाहेर देशीं पाठविणें, या गोष्टी मना आहेत. ही मनाई अंतरिक्षयानांच्या फुटकळ भागांनांहि लागू आहे. सध्यां टर्कीच्या राज्यांत जीं अंतरिक्षयानें लष्करी वा आरमारी तयार आहेत किंवा तयार होत आहेत, अथवा दुरुस्त केलीं जात आहेत अथवा ज्यांचे फुटकळ भाग जोडण्याचें काम चालू आहे अशीं सर्व यानें, तसेंच या यानांत ठेवण्यासाठीं असलेलीं शस्त्रास्त्रें, दारुगोळा अथवा इतर यंत्रें, हीं सर्व प्रमुख दोस्तांच्या स्वाधीन तह झाल्यापासून तीन महिन्यांच्या आंत केलीं पाहिजेत. इतर शत्रुराष्ट्रांशीं झालेल्या तहांतील कलमां-सारखींच अंतरिक्षक्रमणासंबंधाचीं कलमें या तहांत आहेत.

## दोस्त कमिशनें.

तहांतील लष्करी, आरमारी व अंतरिक्षदळासंबंधीं ठराव जे अमलांत यावयाचे ते त्या त्या खात्यासाठीं दोस्तांचें कमिशन नेमलें जाईल त्याच्या हुकमतीखालीं अमलांत यावयाचे असून या कमिशनांचा पगार व इतर खर्च टर्कीनें दिला पाहिजे. या कमिशनां-पैकीं लष्करी हुकमत व घटनेचें कमिशनखेरीजकरून बाकीचीं कमिशनें त्यांचें काम संपल्याबरोबर मोडलीं जातील. लष्करी कमिशनकडे नव्या तुर्की हत्यारी फौजेची घटना, विभागणी व हुकमत यांजवर देखरेख ठेवण्याचें काम असल्यानें, हें कमिशन मात्र इतरांसारखें मोडलें जाणार नाहीं. तह झाल्यापासून पांच वर्षेपावेतों हें कमिशन अधिकारावर राहील. या मुदतीनंतर प्रमुख दोस्त परिस्थितीचा विचार करून हें कमिशन पुढें ठेवावयाचें कीं नाहीं तें ठरवितील. सदरील तीन कमिशनांच्या प्रतिनिधींचें एक मंडळ सामुद्रधुनी–प्रदेश सुरक्षित राहण्या-साठीं जी उपाययोजना होईल तिजवर देखरेख करील. या प्रकरणांतील सामान्य कलमान्वयें ३० आक्टोबर १९१८ रोजीं झालेल्या युद्धतहकुबीच्या तहांतील कांहीं भागाचा अंमल पुढें चालू ठेवण्याचें ठरविलें आहे. टर्कीनें अथवा कोणत्याहि तुर्क मनुष्यानें परराष्ट्रांच्या लष्करी आरमारी अथवा अंतरिक्ष कारभारांत भाग घ्यावयाचा नाहीं. दोस्तांपैकीं कोणीहि कोणत्याहि तुर्क प्रजाजनाला या वरील कामासाठीं नेमणार नाहीं. फ्रान्सनें मात्र आपल्या लष्करी कायद्यानुसार आपल्या परकी पलटणींत भरती करावी असें जादा कलम या प्रकरणांत घातलें आहे.

## –प्रकरण ६.–

## युद्धकैदी.

तुर्कांनीं जे सामान्य लोक अटकेंत ठेवले आहेत ते व त्यांनीं युद्धांत केलेले कैदी आपल्या खर्चानें ज्याच्या त्याच्या देशीं पोंचवून द्यावे. १९२० जानेवारीच्या पूर्वी ख्रिस्तीविरुद्ध वागल्या-बद्दल जे सजा भोगीत [illegible] वर्गांतहि [illegible] कांहीं [illegible] नी [illegible] मून येतो.

खेरीज इतर गुन्हे ज्यांचे झाले आहेत त्यांनां ही सवलत नाहीं. दोस्तांच्या ताब्यांतील ज्या तुर्क प्रजाजनांनां टर्कीत परत जाण्याचें नसेल त्यांची व्यवस्था दोस्त आपल्या खुषीप्रमाणें लावतील आणि ज्यांनां टर्कींत परत जावयाचें आहे त्यांनां दोस्तांनीं टर्कींत परत पाठवावयाच्या अगोदर टर्कींत असलेल्या दोस्त प्रजाजनांची मुक्तता टर्कीनें केली पाहिजे. टर्कीच्या हातून ही गोष्ट न झाली तर कोणाहि तुर्क प्रजाजनाला टर्कींत पोंचविलें जाणार नाहीं. चौकशीकमिशनें जीं दोस्त नेमतील तीं, युद्ध-कैदी सांपडत नाहींत त्यांचा तपास लावणें, ज्या तुर्क अंमल-दारांनीं दोस्त प्रजाजन लपवून ठेवल्याचें ठरेल त्यांनां शिक्षा करणें, दोस्त प्रजाजनांविरुद्ध तुर्कांनीं काय अपराध केले आहेत ते बाहेर आणणें या गोष्टी करतील. या कार्यांत तुर्क सरकारानें या कमिशनांनां लागतील त्या सोयी करून दिल्या पाहिजेत.

### कबरस्थानें.

टर्कींत ज्या ज्या ब्रिटिश, फ्रेंच व इटालियन शिपायांचें व खलाशांचें दफन झालेलें आहे तीं ठिकाणें, तसेंच या राष्ट्रांनां दफनाकरितां लागणारी जागा व या दफन भूमींनां जाण्याचे मार्ग करण्यासाठीं लागणारी जागा तुर्क सरकारनें त्या त्या सरकारांच्या स्वाधीन केली पाहिजे. ग्रीक सरकारनेंहि याचप्रमाणें त्याच्या स्वामित्वाखालीं दिलेल्या सामुद्रधुनी-प्रदेशांत तजवीज केली पाहिजे. हा तह अमलांत आल्यापासून सहा महिन्यांचे आंत ब्रिटिश, फ्रेंच व इटालियन सरकारें तुर्क सरकारला व ग्रीक सरकारला आपल्या स्वाधीन कोणत्या जागा झाल्या पाहिजेत तें कळवितील. या जागांत गॅलीपोली द्वीपकल्पांतील कांहीं भाग घेतला जाईल. या जागांचा दफनाखेरीज इतर कोणत्याहि कामाकडे उपयोग केला जाणार नाहीं. किनाऱ्यावरील दफनार्थ दिलेली जागा लष्करी, आरमारी किंवा व्यापारी कार्यासाठीं उपयोगिली जाणार नाहीं. वरील दोस्त राष्ट्रांनां लागणारी जमीन जर जबरदस्तीनें घेण्याचें जरूर होईल तर तें काम तुर्क व ग्रीक सरकारांनीं आपल्या खर्चानें केलें पाहिजे. या सरकारांनीं सदरील जमिनीवर कसलाहि कर बसवूं नये. या जमिनीकडे जाण्यायेण्याचे सर्व मार्ग या सरकारांनीं नीट दुरुस्त ठेवले पाहिजेत, कबरस्थानाकडे जाऊं इच्छिणाऱ्या कोणत्याहि मनुष्याला मोकळेपणानें जाऊं दिलें पाहिजे, आणि या स्मशानांच्या व्यवस्थेसाठीं जीं माणसें नेमलीं जातील त्यांनां सर्व प्रकारें मदत केली पाहिजे. ही जी जमीन ब्रिटिश, फ्रेंच व इटालियन सरकारांच्या स्वाधीन होणार तिजवरील राज्याधिकार तुर्कांचा व ग्रीकांचाच राहील आणि त्यांनीं स्मशानांत अथवा कबरस्थानीं अपवित्र काम करून तीं अशुद्ध करणारांनां शिक्षा देण्याची तजवीज केली पाहिजे. दोस्त व तुर्क सरकारांनीं आपापल्या राज्यांत असलेल्या शिपाई व खलाशी यांच्या कबरस्थानांनां पवित्र मानून त्यांची व्यवस्था ठेवावी आणि दोस्त यासंबंधांत जीं कमिशनें नेमतील त्यांनां मान्यता देऊन हरप्रकारची मदत [illegible] कैदी [illegible] कोण व त्यांचीं कबरस्थानें कोठें आहेत [illegible] यांनीं एकमेकांनां

### —प्रकरण ७.—

### शिक्षा.

दोस्त राष्ट्रें युद्धाचे कायदे व चाली मोडणारांस देहदंड करण्यासाठीं लष्करी कोर्टें स्थापणार आहेत. टर्कीनें असे गुन्हे केलेले सर्व लोक दोस्तांच्या स्वाधीन केले पाहिजेत. टर्कीचा मुलुख तोडून दुसऱ्या ज्या सरकारच्या स्वाधीन करण्यांत आलेला आहे त्यांनींहि त्यांच्या हद्दींत व ताब्यांत असलेले वरील प्रकारचे गुन्हेगार दोस्तांच्या स्वाधीन केले पाहिजेत. आरोपींनीं लागेल तो वकील घ्यावा. टर्की सरकारनें या खटल्यांत लागतील ते कागद व माहिती पुरवली पाहिजे. तुर्कसरकार त्याच्या ताब्यांतील मुलखांत ज्या कत्तली झाल्या त्यांची जबाब-दारी ज्यांवर आहे तीं सर्व माणसें दोस्तांच्या स्वाधीन करील. या गुन्हेगारांची चौकशी करण्यासाठीं स्वतंत्र कोर्ट नेमावयाचें, किंवा राष्ट्रसंघानें या चौकशीच्या वेळेपावेतों असे खटले चाल-विण्यासाठीं कोर्ट नेमल्यास त्या कोर्टापुढेंच हे गुन्हेगार न्याव-याचे, हें दोस्त ठरवितील.

### —प्रकरण ८.—

### देणें घेणें.

या प्रकरणाच्या आरंभीं जर्मनी, ऑस्ट्रिया व बल्गेरिया यांच्याशीं झालेल्या तहांतल्याप्रमाणें 'आम्हीं (टर्कीनें) तुमच्यावर स्वारी करून तुम्हाला युद्धांत पाडलें व म्हणून तुमचें या युद्धानें जें नुकसान झालेलें आहे तें भरून देण्यास आम्ही बांधलेले आहों' असा मजकूर आहे. टर्कीचा मुलुख पुष्कळसा त्याच्या ताब्याखालून काढला असल्यानें दोस्त सरकारें त्याजवर फार देणें काढणार नाहींत; तर पुढें निर्दिष्ट केलेल्या बाबींची भरपाई टर्कीनें केली म्हणजे तो ऋणोत्तीर्ण झाला असें समजतील. तुर्कांच्या साम्राज्य-कर्जाकडे ज्या उत्पन्नाच्या बाबींचा विनियोग तारणाच्या अगर फेडहप्त्यांच्या रूपानें व्हावयाचें ठरलेलें आहे त्या बाबी वगळून इतर सर्व बाबींचें उत्पन्न खालील देणें वारण्याकरितां प्रथम लावावयाचें असें ठरलें आहे. खालील देण्याच्या बाबींचा अनुक्रम जसा येथें दाखल केला आहे त्याच क्रमानें सदरील उत्पन्नाचा फेडीकडे विनियोग केला जाईल.

(१) तहाची बजावणी सुरू झाल्या दिवसापासून दोस्तांचें जें हक्कसंरक्षक मुलुखव्यापी सैन्य टर्कीचे राज्यांत असणार त्याचा मामुली खर्च. (२) टर्कीचा जो मुलुख टर्कीच्या ताब्यांत राहणार आहे तेथील मुलुखव्यापी दोस्तदळाचा आक्टोबरपासूनचा खर्च, तसेंच टर्कीपासून जे भाग अलग केलेले आहेत त्यांपैकीं कांहीं सदरील ताबेदळाचा खर्च सोसणारांकडे गेलेले आहेत ते खेरीज करून राहिलेल्या प्रदेशांतील ताबाफौजेचा खर्च. या खर्चासाठीं वार्षिक हप्ते ठरविले जातील व हे हप्ते ठरवितांना टर्कीला या तहानें साम्राज्यकर्जाचें जें व्याज द्यावें लागणार तें व्याज पुरें देऊन टाकण्याला कांहीं व्यत्यय न यावा इकडे लक्ष दिलें जाईल. (३) युद्ध सुरू असतांना दोस्तांच्या प्रजाजनांनां जें नुकसान सोसावें लागलें आहे तें व या तहाची बजावणी सुरू होण्याच्या तारखेपर्यंत दोस्तांच्या बिनलष्करी प्रजाजनांचें जें [illegible] असेल तें सर्व भरपाई करून देण्याचें टर्की मान्य

करीत आहे. टर्कीच्या मुलुखांतून जे भाग काढले गेले आहेत ते ज्या राष्ट्रांनां मिळाले आहेत त्यांनां तेथील सर्व मालमत्ता, तुर्क साम्राज्याची अथवा सुलतानची खासगी म्हणून जी मालमत्ता आहे ती सर्व मालमत्ता, या तहाअन्वयें कांहीं एक मोबदला न देतां मिळणार आहे. ज्या राष्ट्रांनां टर्कीच्या मुलुखाचे भाग प्राप्त झाले आहेत, तीं राष्ट्रें तुर्कसाम्राज्याच्या कर्जाबाबत जो वार्षिक हप्ता तुर्कसाम्राज्याला द्यावा लागेल त्यांत आपल्या हिश्शाप्रमाणें हप्ता देण्याला बांधलेलीं आहेत. बाल्कन द्वीपकल्पांतील सरकारें व आशियांत जीं नवीन सरकारें निर्माण केलीं आहेत तीं सरकारें त्यांच्या त्यांच्या वांट्याला जें देणें आलेलें आहे तें देणें बिनहरकत त्याजकडून दिलें जाईल अशी योग्य जामीनकी देतील. बाल्कन युद्धाच्या पूर्वीच्या तीन वर्षांचें टर्कीचें उत्पन्न व टर्कीपासून अलग केलेल्या त्या त्या विभागांतलें उत्पन्न यांवरून सरासरीनें या सर्व प्रदेशांचें वार्षिक उत्पन्न काढून विवक्षित विभागाच्या उत्पन्नाच्या टर्कीच्या एकंदर उत्पन्नाशीं असलेल्या प्रमाणांत त्याच्या देण्याचें प्रमाण ठरविलें जाईल. बाल्कन युद्धानें दोस्तांनां जे मुलुख मिळाले त्यांनांहि तुर्क साम्राज्य-कर्जाचा भाग हिस्सेरशीनें आपल्या अंगावर घ्यावा लागेल व ही हिस्सेरशी वरीलप्रमाणेंच ठरविली जाईल.

### जमाबंदीवर ताबा.

फ्रान्स, ग्रेटब्रिटन व इटाली या राष्ट्रांच्या प्रतिनिधींचें एक जमाबंदी कमिशन टर्कीच्या जमाबंदीची व्यवस्था लावण्यासाठीं नेमण्यांत येईल. या कमिशनवर टर्कीचा एक प्रतिनिधि घेतला जाईल. त्याची सल्ला घेण्यांत येईल, पण त्याला मताचा अधिकार नाहीं. या जमाबंदी कमिशनकडे मुख्यत: खालीं दिलेलीं कामें सोंपविलीं जातील. (१) टर्कीसरकारचीं अंदाजपत्रकें तपासणें. ही तपासणी होऊन कमिशनची मंजुरी मिळाल्याशिवाय अंदाजपत्रकांचा अंमल होतां उपयोगी नाहीं. (२) अंदाजपत्रकाचा अंमल कसा काय केला जात आहे, जमाबंदीविषयींच्या कायदेकानूंची बजावणी कशी होत आहे त्यावर देखरेख करणें. (३) टर्कीचें चलन सुधारण्यासाठीं उपाययोजना निर्णीत करणें.

याशिवाय, टर्की सरकारनें नवा कर वसविण्यापूर्वीं किंवा जकातपद्धतींत फेरफार करण्यापूर्वीं तसेंच देशांत किंवा देशाबाहेर कर्ज काढण्यापूर्वीं या कमिशनची अनुमति घेतली पाहिजे. त्याचप्रमाणें टर्कीच्या राज्यांत नव्या सवलती कोणाला देणें असेल तर त्यालाहि कमिशनची अगोदर संमति घेतलेली पाहिजे.

हें जमाबंदीकमिशन पुढें कर्जफंडकचेरीचें काम करील. या कचेरीकडे टर्कीनें सावकारांनां लावून दिलेल्या वसूलबाबींची व्यवस्था करण्याचें काम आहे. जमाबंदीकमिशनची स्थापना सध्यांच्या कर्जफेडमंडळाच्या जागीं करावयाची किंवा कसें, तें ठरविण्याचा अधिकार फ्रान्स, ग्रेटब्रिटन व इटली येथील सरकारांनां आहे. हीं सरकारें यासंबंधांत सावकारांचा सल्ला घेऊन बहुमतानें निर्णय करतील. हा निर्णय करावयाचा तो सध्यांच्या कर्जफेडमंडळाची मुदत पुढें सहा महिने तरी राहील अशा बेतानेंच केला पाहिजे. [illegible]

या जमाबंदीकमिशनला सध्यां तहाच्या संबंधांत जें विशिष्ट कार्य आहे तें येणेंप्रमाणें:–दोस्तांनां तुर्क राज्यांत आपलें सैन्य ठेवण्याचा जो खर्च येईल, त्यासाठीं व दोस्तांच्या प्रजाजनांच्या नुकसानभरपाईसाठीं तुर्क सरकारनें वार्षिक हप्ते द्यावयाचे आहेत त्या हप्त्यांच्या रकमा ठरविणें; तसेंच टर्कीचे तुकडे ज्या राष्ट्रांच्या वांट्याला आलेले आहेत त्यांजवर टर्कीच्या कर्जाचा हिस्सा कोणता बसतो तें ठरवून, त्याप्रमाणें त्यांनीं या कर्जाच्या फेडीकडे देण्याचे हप्ते ठरविणें. या कमिशनकडे असलेलें तिसरें विशिष्ट कार्य म्हणजे जर्मन तहांतील कलम २५९–(१), (२), (४), (७), प्रमाणें व आस्ट्रियन तहांतील क. २१० (१) प्रमाणें जें सोनेंनाणें तुर्कांकडे येणार आहे त्याची व्यवस्था लावणें.

### –प्रकरण ९.–

### व्यापारी कलमें.

टर्कीशीं दोस्तांचें जें व्यापारी नातें असावयाचें तें पूर्वींच्या करारनाम्यांतील व्यवस्थेप्रमाणेंच असावयाचें आहे. ही पूर्वींची कौलबंदी व्यवस्था युद्धापूर्वीं ज्या दोस्तांनां लागू होती त्यांनां पुन्हां लागू केलेली आहे व ज्या दोस्त राष्ट्रांनां ही व्यवस्था लागू नव्हती त्यांनांहि या तहाअन्वयें तिचा फायदा मिळेल. जकातीचा दर किंमतीवर शें. ११ टक्के म्हणजे १९०७ मध्यें ठरविलेला आहे तोच राहील; मात्र या तहाअन्वयें जें जमाबंदीकमिशन नेमलेलें आहे त्या कमिशनला आयात करांत फेरफार करणें, उपभोग कर बसविणें, तुर्क प्रजाजन व तुर्क मालमत्ता यांजवर बसविलेले कर दोस्त प्रजाजन व दोस्त मालमत्ता यांस लागू करणें, आयात-निर्यातीस बंदी करणें, यासंबंधांत पूर्ण अधिकार दिलेले आहेत: मात्र सदरील कोणताहि व्यवहार करावयाचा तो दोस्तांनां सहा महिने आगाऊ कळवून केला पाहिजे.

जहाजासंबंधींचे कागदपत्र, नव्या राष्ट्रांचीं निशाणें, व्यापारांत अन्याय्य चढाओढ, पूर्वींचे दोन राष्ट्रांमधील व अनेक राष्ट्रांमधील तहनामे, औद्योगिक, वाङ्मयात्मक, कलात्मक मालमत्तेचें संरक्षण यासंबंधाचीं कलमें सामान्यत: पूर्वींच्या तहनाम्यांतल्याप्रमाणेंच आहेत. या पूर्वींच्या तहनाम्यांप्रमाणेंच या तहांतहि असें आहे कीं, दोस्तांच्या राज्यांत जी कांहीं तुर्क मालमत्ता असेल ती वाटल्यास विकून जे पैसे उभे राहतील ते, दोस्तांच्या तुर्कराज्यांतील मालमत्तेचें नुकसान व दोस्त प्रजाजनांचें तुर्क सरकारला युद्धापूर्वीं जें कर्ज होतें तें कर्ज तुर्कांनीं भरपाई करावयाचें आहे त्यास तारण म्हणून, दोस्त आपल्या ताब्यांत ठेवतील. या विक्रीच्या पैशांनीं तुर्कांकडे असलेलें घेणें भरून न निघाल्यास जी बाकी निघेल ती वर दिलेल्या जमाबंदी कलमानुसार वेळोवेळीं तुर्क राज्यांत वसुलाची जी वाढ दिसून येईल तिच्यांतून भरपाई करून घेतली जाईल. टर्कीचा जो मुलुख इतर राष्ट्रांनां प्राप्त झाला आहे त्यांत हें विक्रीचें कलम लावतांनां कोणाहि तुर्क व्यक्तीची मालमत्ता या कलमाखालीं येत नसून फक्त तुर्की व्यापारी मंडळ्यांचीच मालमत्ता विक्रीस पात्र आहे, असें ठरलें आहे.

दोस्तांनां [illegible] वर्गांतहि [illegible] कांहीं [illegible] नी [illegible] सून येतो.

अशी व्यवस्था करतां यावी, या उद्देशानें कांहीं कलमें तहांत घातलीं आहेत तीं:—दोस्त सरकारांनां तुर्क सरकारकडून सदरील राष्ट्राच्या प्रजाजनांची मालमत्ता विकून टाकविण्याचा हक्क आहे; तुर्क मुलुख जो जो तुर्कांकडून काढला गेला आहे तेथील जर्मनादिकांची मालमत्ता दोस्त स्वतःच विकून टाकतील; या विक्रीचे जे पैसे येतील ते सामान्यतः त्या त्या मालमत्तेच्या मालकांनां दिले जातील. मात्र जी मालमत्ता जर्मनादि सरकारांची आहे ती विकून आलेले पैसे पूर्वीच्या तहाअन्वयें जें नुकसानभरपाई-कमिशन नेमलेलें आहे त्या कमिशनच्या स्वाधीन केले जातील.

जर्मन लोकांच्या ताब्यांतील रेल्वे कंपन्यांची मालमत्ता हस्तगत करण्याबावत विशेष कलमें तहांत घातलेलीं आहेत तीं अशीं: निरनिराळ्या भागांत असलेल्या रेल्वे मालमत्तेची त्या त्या भागाच्या नव्या सरकारानें व्यवस्था लावावी. टर्कीच्या राज्यांत जी अशी मालमत्ता आहे ती जमाबंदी कमिशनच्या ताब्यांत दिली जाईल; या मालमत्तेची किंमत पंचांमार्फत ठरवून हें कमिशन त्याची व्यवस्था लावील; या सर्व विक्रीचा पैसा येईल तो जमाबंदी कमिशन तिऱ्हाईत राष्ट्रांपैकीं ज्याचा या रेल्वेंत कांहीं भाग आहे त्यांनां त्यांच्या हिशेबाप्रमाणें वांटून देईल व आस्ट्रिया, जर्मनी वगैरेंचा हिस्सा भरपाई कमिशनांच्या स्वाधीन करील.

युद्धापूर्वी टर्कीच्या राज्यांत तुर्क लोक व टर्कीत न राहणारे किंवा उद्योगधंदा न करणारे असे दोस्त प्रजाजन यांजमध्यें जें देणेंघेणें झालेलें होतें त्या देण्याघेण्याची व्यवस्था लावण्यासंबंधीं कांहीं कलमें या तहांत आहेत. दोस्त व तुर्क प्रजाजन यांजमध्यें युद्धापूर्वी झालेले करारमदार कायम ठेवावयाचे असतील किंवा मोडून टाकावयाचे असतील तर ज्या दोस्त राष्ट्रांचा त्यांत संबंध येतो त्यांच्या कायद्याप्रमाणें हा व्यवहार झाला पाहिजे असें ठरविलें आहे. कराराच्या निरनिराळ्या प्रकारांची व्यवस्था कोणत्या रीतीनें लावावयाची त्यासंबंधाचीं तपशीलवार कलमें आहेत. तुर्कसरकारकडून ज्या दोस्त राष्ट्रांनां कांहीं हक्क-सवलती प्राप्त झालेल्या होत्या त्या तशाच त्यांजकडे चालू राहिल्या पाहिजेत असें ठरलें आहे. तुर्की राज्याचे जे भाग अलग केलेले आहेत त्या भागांत जे हक्क युद्ध चालू असतांना टर्कीनें कोणाला दिले असतील ते दोस्तांनीं अमान्य करावयास हरकत नाहीं. पालकसत्तेखालीं जे टर्कीचे विभाग दिले जाणार आहेत त्या विभागांनीं वाटल्यास सदरील प्रकारच्या सवलती रद्द कराव्या, पण त्याजबद्दल त्या मालकांनां पंच ठरवितील तो मोबदला त्यांनीं दिला पाहिजे. या सर्व व्यवस्थेच्या बाबतींत व व्यापारी कलमांखालील दुसऱ्या व्यवस्थेच्या बाबतींत ज्या तुर्की व्यापारीमंडळ्या युद्धापूर्वी दोस्त-हुकमतीखालीं होत्या त्या दोस्त प्रजाजनांच्या म्हणून समजल्या जातील.

## —प्रकरण १०.—

## अंतरिक्षक्रमण.

[illegible] स्परमूंनां टर्कीच्या जमिनीवर व जलप्रदेशा- [illegible] नेतें उतरण्याचा, टर्की देत आहे. टर्कीमध्यें जीं विमानगृहें राष्ट्रीय व्यवहारासाठीं म्हणून आहेत तीं सर्व दोस्तांनीं वापरावीं, टर्कीच्या आकाशयानांनां वरील बाबतींत असणारे सर्व हक्क दोस्तांच्या यानांनां आहेत, व व्यापारी माल आकाशमार्गानें नेण्याआणण्यासंबंधांत दोस्तांच्या यानांनां पहिल्या नंबरच्या सवलतीच्या राष्ट्राप्रमाणें वागविलें जाईल, असें सामान्यतः ठरलेलें आहे. दोस्त सांगतील त्या ठिकाणीं विमानगृहें बांधण्याचें टर्की पत्करीत आहे. टर्कीच्या जमिनीवरून व जलप्रदेशावरून दोस्तांच्या आकाशयानांनां जाण्यायेण्यास अडथळा न व्हावा यासाठीं विशेष प्रसंगीं विशेष उपाययोजना करण्याचा हक्क दोस्तांनां आहे. टर्कीच्या बाजूनें लढलेल्या राष्ट्रांनां सदरील हक्क नाहींत; तसेंच दोस्तांच्या संमतीवांचून या राष्ट्रांच्या साध्या बिनलष्करी लोकांनां आकाशमार्गें जाण्यायेण्याची सवलत टर्कीनें द्यावयाची नाहीं. मात्र या राष्ट्रांनीं राष्ट्रसंघाचें सभासदत्व स्वीकारावें किंवा १३ ऑक्टोबर १९१९ च्या कराराप्रमाणें त्यांनीं चालावें अशी त्यांस दोस्तांकडून परवानगी मिळाली तर टर्कीनें त्यांस बिनलष्करी आकाशयानें टर्कीच्या जलस्थलप्रदेशांत चालविण्याची परवानगी देण्यास हरकत नाहीं. सदरील १३ आक्टोबरच्या करारांत जे अंतरिक्षक्रमणासंबंधीं नियम दाखल आहेत त्यानियमांप्रमाणें टर्कीचीं आकाशयानें चालतील अशी हमी टर्की घेत आहे. या प्रकरणांतील कलमांची अंमलबजावणी टर्की राष्ट्रसंघाचें सभासदत्व पत्करील किंवा त्याला सदरील १३ आक्टोबर १९१९ च्या कराराप्रमाणें चालण्याची दोस्त परवानगी देतील त्या वेळीं बंद होईल.

## —प्रकरण ११.—

## बंदरें, जलमार्ग व लोहमार्ग.

दोस्त देशांतून येणारीं व दोस्त देशांत जाणारीं माणसें, माल, जहाजें, आगगाड्या वगैरेंनां तुर्क मुलखांत तुर्की प्रजाजनांप्रमाणें जाण्यायेण्याची पूर्ण मोकळीक पाहिजे. तुर्क मुलखांतून दुसऱ्या देशांत जाण्यायेण्याबद्दल दोस्तांच्या मालावर कसलीहि जकात ठेवूं नये. वाहतुकीचे दर भलतेच ठेवूं नयेत. जहाजें अथवा दुसरीं नेआणीचीं साधनें अमुक राष्ट्राचीं आहेत अथवा नाहींत या गोष्टींवर त्यांनां सवलती देणें किंवा त्यांजवर जादा खर्च लादणें अवलंबून ठेवूं नये. तुर्कराज्यांतून परमुलखांत जाणाऱ्या येणाऱ्या व्यापारी मालावर दोस्तांची देखरेख राहील व अशा मालाच्या बाबतींत कोणाला विशेष सवलती अथवा त्रास दिला जाऊं नये अशी व्यवस्था होईल. अप्रत्यक्षपणेंहि असा पंक्तिप्रपंच करण्याची मनाई आहे. तुर्कांच्या मुलखांतून परमुलखांत जाणारा माल लवकर नेला जाईल अशी तजवीज केली जाईल. दोस्तांच्या बंदरांकडे जाणाऱ्या मालावर विशेष कर आकारण्याची मनाई आहे. तसेंच या बंदरांकडे जाणाऱ्या मालाला मुद्दाम मागें ठेवून इतरांचा माल अगोदर रवाना करण्याचीहि मनाई आहे.

पूर्वेकडील बंदरांपैकीं खालील बंदरें सार्वराष्ट्रीय केलीं आहेत. या बंदरांत राज्यसत्ता सामान्यतः तुर्क सरकारचीच राहील. ज्या बंदरांत अशी राज्यसत्ता सर्व अथवा अल्पांशानें नाहींशी केली [illegible] तंत्र कलमें आहेत. सार्वराष्ट्रीय बंदरें:—

सेंट स्टिफानोपासून डोल्मा बागचीपावेतोंचा कान्स्टांटिनोपलचा भाग, हैदरपाशा, सर्ना, अलेक्झांड्रेटा, हैफा, बसरा, ट्रेबिझाँड, बाटुम. राष्ट्रसंघाच्या सभासद-राष्ट्रांचे प्रजाजन, माल व निशाणें यांनां या बंदरांत सर्वांस सारखें पूर्ण स्वातंत्र्य राहील. या बंदरांत या सर्वांनां सवलती भाडीं व करपट्ट्या यांसंबंधानें सारखेंच वागविलें जाईल. या वरील बंदरांत "स्वतंत्र क्षेत्रें" म्हणून कांहीं टापू निश्चित केलेले आहेत. या स्वतंत्र भागांत सर्व राष्ट्रांनां लागतील त्या सोई कोणालाहि कमी अधिक न गणतां केल्या पाहिजेत. या भागांत एक लहानशी कायमची पट्टी जकात म्हणून घेतली जाईल. याखेरीज दुसरी कसलीहि जकात अगर इतर पट्टी या स्वतंत्र क्षेत्रांत कोणाकडूनहि घेतली जाणार नाहीं.

भूमध्य समुद्र व इजियन समुद्र यांजकडे जाण्याचा मार्ग तुर्कांनां खुला रहावा म्हणून टर्कीच्या राज्यांतून जीं बंदरें व जे मुलुख अलग केले आहेत त्या बंदरांतून व मुलखांतून जाण्यायेण्याची टर्कीला मोकळीक ठेवलेली आहे. सर्नाचा जो भाग 'स्वतंत्र क्षेत्र' म्हणून ठरेल त्या भागांतील कांहीं भागावर कायमच्या गहाणदाराची सत्ता टर्कीला दिली जाईल. या गहाणाच्या शर्ती राष्ट्रसंघ ठरवील. जॉर्जिया, अझरबैजन, पर्शिया, आर्मीनिया यांनां बाटुम बंदरानें काळ्या समुद्रांत उतरण्याचा हक्क दिला आहे. ट्रेबिझांड बंदरांत आर्मीनियाला कांहीं भाग कायम गहाण म्हणून मिळेल. या गहाणाच्या अटी सर्नांत तुर्कांनां घातल्या जातील त्याच असतील.

### आगगाड्या.

यासंबंधाच्या कलमांतील सार खालीलप्रमाणें आहे. दोस्त देशांतून टर्कीला येणारा अथवा इतर देशाकरितां आलेला पण टर्कीमधून जाणारा, तसेंच टर्कीमधून अथवा टर्कीच्या रस्त्यानें इतर देशांतून दोस्त देशाकडे जाणारा जो माल असेल त्याला शक्य तितक्या सवलती मिळतील. ज्या मंडळ्यांनां दोस्तांच्या इच्छेनें कांहीं विशेष हक्क प्राप्त झाले आहेत, त्या मंडळ्यांच्या हक्कांनां बाध न येतां जितक्या सोईसवलती वरील प्रकारच्या मालाला देणें शक्य आहे तितक्या सर्व देण्याचें ठरलें आहे. बर्नचे भाड्याच्या दरांचाहि विचार या कलमांत केलेला आहे. बर्नचे रेल्वेविषयक ठराव, त्यांच्या जागीं नवा रेल्वेकरार होईपावेतों टर्कीनें बंधनकारक धरून वागावें. नवा रेल्वेकरार झाला म्हणजे तो टर्कीला बंधनकारक होईल. दोस्त देशांतील ठिकाणांचीं थेटचीं तिकिटें असलेल्या माणसांनां व मालाला पोंचविणाऱ्या मालगाड्या व पासेंजर गाड्या, तसेंच परदेशीं वसाहतीसाठीं जाणाऱ्यांच्या गाड्या टर्की आपल्या राज्यांत दोस्तांच्या सहकारितेनें ठेवील. टर्कीच्या राज्यांत ज्या मालाच्या आगगाड्या आहेत त्यांचा व दोस्त देशांतील मालगाड्यांचा मेळ बसावा म्हणून लागणारे गाड्यांचे भाग टर्की आपल्या संग्रहीं ठेवील. जे मुलुख टर्कीच्या राज्यांतून वेगळे केलेले आहेत, त्यांत असलेल्या आगगाड्यांचीं स्टेशनें वगैरे बांधकामें त्या त्या नव्या सरकाराच्या स्वाधीन करण्याची तजवीज केलेली आहे. तसेंच या लोहमार्गांवर चालवावयास आगगाड्या वगैरे चालता माल टर्कीच्या एकंदर संग्रहांतून किती [illegible] जो भा[illegible] [illegible] ठरलेलें आहे. आगगाड्यांच्या ज्या रस्त्यांचा कारभार या तहाअन्वयें अनेक सरकाराच्या कक्षांत गेलेला आहे, त्या रस्त्यांच्या बाबतींत कोणीं किती गाड्या वगैरे चालता माल घ्यावयाचा तें परस्पर करारमदारानें ठरवावें. हें आपसांत न ठरल्यास राष्ट्रसंघ नेमील त्या पंचांकडून या बाबीचा निर्णय होईल. दोस्त देशांच्या दरम्यान थेट जाणाऱ्या येणाऱ्या मालाची नेआण, गाड्यांची देवघेव, थेटचे वाहतुकीचे दर व या संबंधीच्या इतर गोष्टी, १ आगष्ट १९१४ रोजीं जे तुर्क राज्यांत म्हणून आगगाडीचे रस्ते होते त्यांजपुरत्या ठरविण्यासाठीं, एक कायमची तज्ज्ञपरिषद निर्माण केली आहे. या परिषदेंत ज्या सरकारांचा सदरील वाहतुकीशीं संबंध येतो त्या सरकारांनीं प्रतिनिधी नेमावयाचे आहेत. ही तज्ज्ञपरिषद आपलें काम करूं लागण्यापूर्वी तात्पुरती व्यवस्था म्हणून असें ठरलें आहे कीं, सैन्याची नेआण, त्याचप्रमाणें दारुगोळ्याची व इतर सामग्रीची नेआण, तुर्क राज्यांतील कांहीं भागांत धान्य वगैरे पाठविणें, नेआणीसंबंधांत विशेष प्रसंगींचे म्हणून जे नियम केलेले आहेत ते रद्द करून मामुली पद्धतीवर नेआण सुरू करणें, या सर्व बाबतींत दोस्तांच्या अधिकाऱ्यांकडून ज्या सूचना टर्कीला केल्या जातील त्याप्रमाणें त्यानें वागावें.

येत्या पांच वर्षांत सार्वराष्ट्रीय वाहतुकीची व्यवस्था व जलमार्ग, बंदरें, आणि लोहमार्ग यांची सार्वराष्ट्रीय व्यवस्था, या बाबतींत जे सामान्य करारमदार राष्ट्रसंघाच्या पसंतीनें होतील ते सर्व टर्की मान्य करील.

### ध्वनिवाहक व लेखवाहक तारायंत्रें.
### ( टेलिफोन व टेलिग्राफ ).

टर्कीच्या राज्यांत टेलिफोन व टेलिग्राफच्या तारा घालण्यासाठीं टर्की विशेष सवलती देऊन पुढें या तारायंत्रांची व्यवस्था ठेवील. दोस्तांच्या दरम्यानच्या दोन्ही प्रकारच्या तारायंत्री व्यवहाराला टर्की सर्व प्रकारची मोकळीक ठेवील. हा तारायंत्रव्यवहार आपलाच आहे असें समजून सर्व प्रकारच्या राष्ट्रीय तारायंत्राच्या सवलती टर्कीनें याला दिल्या पाहिजेत. कॉन्स्टांटिनोपलच्या हद्दींतील तारा जमिनीवर जोडण्यासंबंधींचे हक्क टर्कीनें दोस्त सांगतील त्या सरकारच्या अथवा कंपनीच्या स्वाधीन केले पाहिजेत. जेद्दा-स्वाकिन आणि सायप्रस-लाटाकिया या जलगामी तारांचें स्वामित्व टर्की प्रमुख दोस्तांच्या स्वाधीन करीत आहे.

### सर्व सामान्य कलमें.

सदरील बाबींत कोठें मतभेद वगैरे होईल त्याचा निर्णय राष्ट्रसंघ करील. माणसें व माल वहाणें आणि परमुलखांत जाणाऱ्या माणसांनां व मालाला टर्कींतून मार्ग देणें या बाबतींत सर्व दोस्तांनां सारख्याच सवलती ठेवाव्या अशा स्वरूपाचीं जीं कलमें आहेत त्यांचा राष्ट्रसंघ तीन वर्षांनीं विचार करील राष्ट्रसंघानें अशी तपासणी न केल्यास, सदरील कलमांचा अंमल जीं दोस्त राष्ट्रें टर्कीला उलट सवलती देतील त्यांच्यापुरताच राहील.

निरनिराळ्या [illegible] वर्गांतहि [illegible] कांह[illegible]ती अ[illegible]मून येतो.

या तहांतील तत्संबंधीं कलमाअन्वयें होत आहे तेवढा वगळून बाकी जे कांहीं विशेष हक्क सदरील कौलबंदीनें कोणा राष्ट्राच्या प्रजाजनांनां, टर्कींच्या मुलखांत प्रजा झाले असतील त्यांनां अथवा सदरील करारनाम्यांच्या जागीं दुसरे करारनामे होऊन कोणाला दिले जातील त्यांनां या तहानें बाधा येत नाहीं.

**—प्रकरण १२ वें.—**

या प्रकरणांत जर्मनांशीं झालेल्या तहांत जो मजूरवर्गासंबंधाचा करारनामा आहे तो सविस्तर दिला आहे.

**—प्रकरण १३ वें.—**

**किरकोळ कलमें.**

२६ फेब्रुवारी १८८५ रोजीं पास झालेला बर्लिनचा करारनामा तसेंच २ जुलै १८९० रोजीं पास झालेला ब्रुसेल्सचा करारनामा व या करारनाम्यांत पुरवणीदाखल अथवा सुधारणेदाखल पास झालेले इतर करारनामे यांतून असलेलीं हत्यारांबाबतचीं आणि दारूबाबतचीं व दुसऱ्या गोष्टींबाबतचीं जीं कलमें आहेत तीं टर्की मान्य करीत आहे व असले दुसरे करारनामे दोस्त यापुढें करतील तेहि टर्की मान्य करील. १९१८ जुलैमध्यें फ्रान्स व मोंटेको यांच्या दरम्यान झालेल्या तहाला प्रस्तुत तह करणारीं राष्ट्रें मान्यता देत आहेत. या तहनाम्यावर सही करणाऱ्या कोणत्याहि दोस्त राष्ट्राकडे टर्कींचें, हा तह सहीशिक्कायुक्त होण्यापूर्वींच्या घटनांवरून, जें येणें वगैरे निघत असेल तें सर्व टर्की सोडून देत आहे. कोणत्याहि दोस्त राष्ट्राच्या प्राईझ कोर्टानें (जप्त-जहाज-न्यायकचेरीनें) तुर्की जहाजांच्या बाबतींत दिलेला निकाल व हुकुम टर्की मान्य करील. तुर्की जप्त-जहाज-कचेऱ्यांनीं दिलेले फैसले तपासण्याचा अधिकार दोस्त कचेऱ्यांनां आहे. युद्धामध्यें टर्कींच्या फौजेनें मोडलेल्या व बुडविलेल्या जहाजांची माहिती टर्कीनें दोस्तांनां पुरविली पाहिजे. तसेंच दोस्त सरकारच्या अथवा दोस्त प्रजाजनांच्या (दोस्त प्रजाजनांच्या कंपन्या धरून) कला-कुसरीच्या वस्तू, ऐतिहासिक स्मृतिचिन्हें, संगृहीत कागदपत्र व विजयचिन्हें जीं तुर्कांनीं पाडाव करून नेलीं तीं सर्व परत केलीं पाहिजेत.

यानंतर टर्कींचा पुराणवस्तुविषयक कायदा सुधारण्यासंबंधींचे नियम व ह्यापुढें पुराणवस्तुसंशोधन कोणत्या नियमांनुसार चालावें ते नियम या तहांत आहेत. तसेंच टर्कीपासून विभक्त केलेल्या मुलखांतील धार्मिक, पुरातन, ऐतिहासिक व कलाकुसरीच्या वस्तू युद्धामध्यें टर्कीनें आणल्या असतील त्या परत कराव्या, या मुलखांतील संगृहीत कागदपत्र, बांधकामांच्या वगैरे योजनापत्रिका, जमीनविषयक हक्कांचे कागद व मुलकी लष्करी जमाबंदी, न्याय आणि इतर खात्यांचे वरीलखेरीज इतर कागदपत्र वगैरे टर्कीनें त्या त्या सरकाराच्या स्वाधीन करावे, टर्कींतील वक्फसंबंधीं कागदपत्र पाहण्याचा हक्क या मुलखांतील सरकारांनां टर्कीनें उलट सवलतींच्या अटीवर द्यावा, [illegible]हकुवीच्या तहानंतर दोस्त न्यायकोर्टांनीं जे निकाल दिले [illegible] वाटल्यास तिऱ्हाईत [illegible]

कारभाराची योजना ठरवितील ती टर्कीनें मान्य करावी, हेजाझच्या यात्रेंत आरोग्यविषयक कारभाराची नियंत्रणा कोणाच्या हातांत असावी ती सदरप्रमाणें दोस्त राष्ट्रें ठरवितील तीहि टर्कीनें मान्य करावी, हा तह अमलांत येण्यासाठीं जरूर ते कायदे टर्कीनें पास करून घ्यावे, या तहाच्या अंमलबजावणीच्या संबंधांत ज्या गोष्टींचा तपास करणें राष्ट्रसंघाच्या कारभारीमंडळाला जरूर वाटेल त्या गोष्टीच्या तपासाला सर्वप्रकारें मदत टर्कीनें करावी, अशा प्रकारचीं कलमें तहांत आहेत. रशिया राष्ट्रसंघाचा सभासद झाला व कांहीं विवक्षित शर्ती त्यानें मान्य केल्या तर त्याला या तहाचा एक भागीदार होतां येईल असेंहि कलम तहांत आहे.

या तहावर टर्कीची सही झाली व प्रमुख दोस्तांपैकीं तिघांची सही झाली (या तहावर टर्कीतर्फे १० आगस्ट १९२० रोजीं सही झाली) कीं, हा तह तेवढ्या दोस्तराष्ट्रापुरता अमलांत येईल.

तुर्कीसंबंधाचा झालेला हा तह योग्य आहे अगर अयोग्य आहे हा विचार करण्याची ही जागा नाहीं. लोकमत क्षुब्ध फार झालें तें कां झालें, हिंदुस्थानाची अत्यंत राजनिष्ठ आणि शांतताप्रिय प्रजा येथील अधिकारीवर्गाच्या विरुद्ध फार कां झाली एवढेंच येथें स्पष्ट करावयाचें होतें व याचसाठीं वरील गोष्टी दिल्या आहेत.

तुर्कांशीं हा जो तह झाला त्या तहाविरुद्ध जे आक्षेप आणले जातात त्यांत ब्रिटिश मुत्सद्यांकडून कांहीं वचनभंग झाला आहे असेंहि प्रतिपादिलें जातें. वचनभंग झाला कीं झाला नाहीं हाहि विचार येथें अप्रस्तुत आहे. इंग्रजी अधिकाऱ्यांनीं पॅन इस्लामिझमच्या शिकवणीस पूर्वीं जें उत्तेजन दिलें त्यामुळें येथील मुसुलमानांच्या मनांत कांहीं भावना वाढविल्या गेल्या; या भावनांनां तुर्की तहामुळें मोठा धक्का कसा बसला याची कल्पना वरील हकिकतीवरून येईल. आजच्या असंतोषास पूर्वीं उत्तेजित केलेली पॅन इस्लामिझम् वरीचशी कारण झाली असें म्हणण्यास आम्हांस हरकत दिसत नाहीं.

असहकारितेच्या ठरावास जोर मिळण्यास कारण झालेल्या अंतःस्थ कारणांमध्यें ज्याला अत्यंत प्राधान्य दिलें जातें तें कारण म्हटलें म्हणजे पंजाबप्रकरण होय हें वर सांगितलेंच आहे. पंजाबांत १९१९ एप्रिल, मे व जूनमध्यें जे प्रकार घडले त्यांचा देशावर मोठा परिणाम झाला. कॉंग्रेसनें यासंबंधानें एक कमिशन नेमून चौकशी केली व एक अहवाल प्रसिद्ध केला. त्या अहवालांत निरनिराळ्या गांवीं झालेले म्हणून जे प्रकार उल्लेखिले आहेत, त्यांपैकीं कांहीं मासल्यासाठीं खालीं दिले आहेत.

पंजाबांत झालेल्या प्रकारांची लष्करी दृष्टीनें योग्यायोग्यता ठरविण्याचें हें स्थळ नव्हे. येथें लोक प्रक्षुब्ध होण्यास कारण काय झालें याची नीट कल्पना येण्यापुरत्या कांहीं गोष्टी मात्र [illegible] वर्णिल्या आहेत.

## पंजाबांतील प्रकार.

### अमृतसर.

[ जबाबदार अधिकारी—जनरल डायर ]

**लोकांच्या हातून घडलेलीं कृत्यें.**—[ लोक क्षुब्ध होण्याचीं कारणें—डॉ. किचलू व सत्यपाल यांची उचलबांगडी. यासंबंधांत डेप्युटी कमिशनरकडे दाद मागण्यास जात असलेले लोक त्यांनां पोलिसांनीं अडविलें असतां तसेंच पुढें जाऊं लागले तेव्हां त्यांच्यावर गोळीबार केला गेला; या गोळीबारानें कित्येक लोक मरून पडले व कित्येक जखमी झाले ]. लोकांनीं (१) लष्करी लोकांवर दगड फेंकले. याचें उत्तर म्हणून लष्करी लोकांनीं तावडतोब गोळ्या झाडून वीस मुडदे पाडले व कित्येकांस जखमी केलें. यानंतर लोकांनीं (२) नॅशनल बँकेची नासधूस केली आणि चार्टर्ड व अलायन्स बँकांवर हल्ला केला. (३) टाउन हॉल, पोस्ट ऑफिस, मिशन हॉल व भगतनवाला रेलवे स्टेशनचा कांहीं भाग जाळून फस्त केला. आणि (४) मिस शेरवुडवर हल्ला केला व पांच यूरोपीयांचे खून केले.

**सरकारी अधिकाऱ्यांच्या व नोकरांच्या हातून घडलेलीं कृत्यें.**—(१) नॅशनल बँकेचा माल पोलिसांच्या घरीं लपवलेला सांपडला. (२) शहरांतील विद्युत्प्रवाह बंद केले. (३) जालियांवाला बागेंत सभेसाठीं जमलेल्या लोकांवर १६५० गोळ्या झाडून कमींत कमी पांचशें लोक तरी ठार केले. तेथें मरून पडलेल्या किंवा जखमी झालेल्या लोकांची कोणतीहि व्यवस्था अधिकाऱ्यांनीं केली नाहीं व रात्रीं आठ वाजल्यानंतर घराबाहेर राहण्याचा हुकूम नसल्यामुळें लोकांनांहि ती करतां आली नाहीं. (४) एकंदर ५० इसमांवर पोटावर सरपटत चालण्याचा सक्तीचा प्रकार अंमलांत आणला. (५) शेरवुड बाईवर केलेल्या हल्ल्याबद्दल कोणत्या तरी सहा मुलांनां पकडून आणून त्यांनां प्रत्येकीं तीस तीस फटके मारले. (६) जे गोऱ्या लोकांस सलाम करण्यास चुकले त्यांचा निरनिराळ्या रीतीनें अपमान करण्यांत आला. (७) ९३ वकीलबॅरिस्टरांनां स्पेशल कॉन्स्टेबल बनवून त्यांच्याकडून २० दिवसपर्यंत साध्या शिपायाप्रमाणें काम घेतलें. (८) ३२६ लोकांनां तडकाफडकी कोर्टांकडून पुष्कळ प्रसंगीं खोट्या पुराव्याच्या आधारावर शिक्षा ठोठावण्यांत आल्या. कांहींनां तर देहांत शिक्षा देखील सुनावण्यांत आली. (९) शेंकडों लहानथोर लोकांस पकडून कबुलीजबाब देण्यासाठीं व खोट्या साक्षी देण्यासाठीं त्यांचे नानाप्रकारचे हाल करण्यांत आले. (१०) खासगी घरांत लष्करी ठाणें वसविणें, लाथा मारणें, प्रतिष्ठित लोकांस शिवीगाळ करणें, कैद्यांनां राहत्या कोठडींतच मलमूत्रोत्सर्ग करावयास लावणें, सात फूट लांब, दोन फूट रुंद व चार फूट उंच अशा लोखंडी पिंजऱ्यांत कोंडणें, दोघा दोघा कैद्यांचे हात एके ठिकाणीं बेडीनें अडकावून त्यांनां पायखान्यांत शौचास नेणें, जैन लोकांचें पवित्र स्थान भ्रष्ट करणें, गोऱ्या शिपायांनीं विहिरीजवळ लघुशंका व शौचविधि करणें, कैद्यापासून किंवा दुकानदारापासून मोबदला न देतां माल हिसकावून घेणें, गुडघ्याखालून हात घालून कान पकडून बसावयास लावणें, पागोटें हातांस [illegible] ... जो ... [illegible] टांगून ठेवणें, रात्रभर उघड्या मैदानांत पडावयास लावणें, उन्हांत उभें करणें, दाढी धरून ओढणें, खाटेच्याखालीं हात ठेवून त्यावर आठ आठ शिपाई बसविणें, अगदीं विष्ठामूत्र बाहेर येईपर्यंत गुदद्वारांत काठी खुपसणें, असले प्रकार करण्यांत आले.

### लाहोर.

[ जबाबदार अधिकारी—कर्नल जॉन्सन ]

**लोकांचीं कृत्यें.**—(१) महात्मा गांधींची सुटका करण्यांत यावी अशी विनंति करण्याकरितां लोक एक जुटीनें डी. सी. कडे जाऊं लागले व त्यांनीं हरताळ पाडला.

(२) सी. आय. डी. मधील एका आफिसरावर हल्ला करण्यांत आला.

(३) सनातनधर्म कॉलेजच्या भिंतीवरील लष्करी कायद्याची नोटीस कोणीशी फाडली.

**अधिकाऱ्यांचीं कृत्यें.**—(१) गांधींची सुटका करण्याविषयीं विनंति करण्यास जाणाऱ्या लोकांवर गोळ्या झाडल्या. ३।४ लोक मेले व कित्येक जखमी झाले.

(२) बादशाही मशिदींतील सभेच्या वेळीं लष्करी लोक तेथें न आणण्याचें आश्वासन दिलें असतांहि सभा झाल्यावर लोक घरोघर परत जात असतां त्यांच्यावर पुन्हां गोळ्या झाडण्यांत आल्या. कांहीं लोक ठार झाले व बरेच जखमी झाले.

(३) लोकप्रिय पुढाऱ्यांस भेटीस बोलावून कैद केलें.

(४) लोकांनां जबरदस्तीनें दुकानें उघडण्यास लावलें.

(५) दिवे लावल्यानंतर घराबाहेर न पडण्याचा बंदीचा हुकूम व तो चुकून मोडला गेला तरी त्याबद्दल जाहीर रीतीनें फटक्यांची शिक्षा.

(६) आठशें टांगे व हिंदी लोकांच्या मालकीच्या सर्व मोटार गाड्या लष्करी कायद्याच्या कारकिर्दींत कर्नल जॉन्सन यांनीं आपल्या ताब्यांत ठेवल्या.

(७) धान्याच्या किंमती ठरवून टाकल्या.

(८) बादशाही मशीद बंद ठेवण्याचा हुकूम सोडला.

(९) झटपट चौकशीच्या कोर्टांनीं २०१ इसमांस दोषी ठरवून तीस फटके, दोन वर्षांची कैद, हजार रुपये दंड अशा शिक्षा ठोठावल्या. ज्यास फटके मारावयाचे त्याची डॉक्टरकडून तपासणीहि होत नसे.

(१०) ज्यांची पुढें कधीं चौकशीहि केली नाहीं अशा निरपराधी माणसांस वारंट न दाखवितां व गुन्हाहि न सांगतां निष्कारण पकडून जवळ जवळ एक एक महिना कैदेंत ठेवलें.

(११) बायकांपोरांस सडें घराबाहेर काढून घराची झडती घेऊन घरास ताळा लावला.

(१२) घरांच्या भिंती [illegible] ... अधिक ... [illegible] वर्गांतहि ... [illegible] कांहीं ... ती ... [illegible] येतो.

(१३) असली एक जाहिरात फाडली गेल्यावद्दल सनातन-धर्म कॉलेजच्या वसतिगृहांतील ५०० विद्यार्थ्यांस व प्रोफेसरांस भर उन्हांतून डोक्यावर त्यांचे बिछाने देऊन तेथून तीन मैल असलेल्या किल्ल्यावर दामटीत नेलें व तेथें दोन दिवस अटकेंत ठेवलें.

(१४) तीन कॉलेजांतील विद्यार्थ्यांस तीन आठवडेपर्यंत दिवसांतून चार वेळ हजिरी देण्याकरितां लष्करी ठाण्यावर पायीं चालत येण्याचा हुकूम सोडला.

(१५) १०११ विद्यार्थ्यांनां कॉलेजांतून घालवून देणें, परीक्षांस वसण्याची वंदी करणें, स्कॉलरशिपा काढणें, दंड करणें, वगैरे शिक्षा करण्यांत आल्या.

(१६) एका लग्नाच्या मिरवणुकीवरोवर दहाहून अधिक माणसें होतीं म्हणून नवरदेवासुद्धां सर्वांस पकडून उपाध्याय व इतर माणसें यांस फटके मारण्यांत आले.

(१७) ट्रायव्यूनच्या संपादकांस कैदेंत टाकलें व पंजावी व प्रताप हीं पत्रें वंद पाडलीं.

(१८) ११ प्रतिष्ठित पुढाऱ्यांवर खटले केले. चौकशीच्या अवाढव्य खर्चापायीं यांपैकीं कांहीं भिकेस लागले.

### गुजरणवाला.

[ जवावदार अधिकारी.—१ कर्नल ओब्रायन, डेप्युटि कमिशनर. २ हेरॉन–पोलीस सुपरिंटेंडंट. ]

**लोकांच्या हातून घडलेलीं कृत्यें.**—[ लोकक्षोभाचीं कारणें.—हिंदु देवालयांच्या आसमंतांत मारून टाकलेलें वासरूं व डुकर; आणि मागाहून पोलिसांनीं झाडलेल्या गोळ्या ]. १ गुरुकुलजवळच्या रेल्वे पुलास आग लावण्याचा प्रयत्न केला.

२ चर्च, पोस्ट ऑफिस, तहसील कोर्ट व रेल्वे स्टेशन हीं सर्व जाळून टाकलीं व याखेरीज आणखी कांहीं नासाडी केली.

**अधिकाऱ्यांच्या हातून घडलेलीं कृत्यें.**—(१) कची पुलापाशीं लोकांवर गोळ्या झाडून कित्येक लोक मारले.

(२) लोकांनीं केलेल्या जाळपोळींत पोलिसचेंहि वरेंच अंग होतें.

(३) दंगा शांत झाल्यानंतर निरपराधी लोकांवर व खालसा बोर्डिंग हाऊससारख्या ठिकाणीं वॉंब टाकले.

(४) डिफेन्स ऑफ इंडिया कायद्याखालीं वकील, वॅरिस्टर वगैरे वहुतेक सर्व पुढारी लोकांस पकडण्यांत आले. यांमध्यें दंगेखोर लोकांस ज्यांनीं शांत करण्याचा प्रयत्न केला होता असेहि कांहीं लोक होते. कित्येकांस खटला न करतां कित्येक दिवस अटकेंत ठेवण्यांत आलें.

[illegible] सांखळीनें रेल्वेनें नेत असतां त्याला लघुशंकेस जाऊं न देतां बसल्या जागींच लघुशंका करण्यास सांगितलें.

(६) लष्करी कायद्याच्या अमदानींत लोकांस फटके मारण्यांत येऊन दुसऱ्या कित्येक अपमानकारक शिक्षा करण्यांत आल्या.

(७) गाडींतून किंवा घोड्यावरून जाणाऱ्या लोकांनीं गोरा माणूस पाहतांच खालीं उतरून व छत्री मिटून त्यास लवून नमस्कार करावा असा हुकूम सोडला.

(८) तसें करण्यास कोणीं चुकून विसरला तर त्यास चाबकाचा मार खावा लागे.

(९) संभावित लोकांस वाजारांतील गटारें साफ करण्यास लावलें.

(१०) मार्शल लॉ कोर्टापुढें वहुतेक सर्व पुरावा वनावट तयार करून मांडला.

### वजिरावाद.

**लोकांच्या हातून घडलेलीं कृत्यें.**—[ लोकक्षोभाचीं कारणें.—लाहोर, अमृतसर व गुजरणवाला येथें घडलेल्या गोष्टी ]. १ लोक तारा तोडण्यास व आगगाडीचे रूळ निखळून काढण्यास गेले.

२ रे. वेली यांचें घर त्यांच्या पुस्तकालयासकट जाळलें.

**अधिकाऱ्यांच्या हातून घडलेलीं कृत्यें.**—(१) लोकांच्या घरावर नोटिसा लावून घराच्या मालकांवर त्यांजवर पाहरा करण्याची जवावदारी टाकली.

(२) कोणी सलाम करण्यास विसरला तर त्याचेंच पागोटें काढून व तें त्याच्या गळ्याभोंवतीं गुंडाळून त्यास छावणीकडे ओढून नेत व त्यास फटके मारण्यांत येत.

(३) घरटीप एक रुपया वसूल करण्यांत आला व याशिवाय ६७००० रुपये खंडणी घेतली व शिवाय पोलिसांनीं वराच लांचहि घेतला.

(४) शाळेंतील मुलांनां रोज सायंकाळीं हजिरी द्यावी लागे व युनियन जॅकला तीन वेळां सलाम करावा लागे. यासाठीं मुलांनां भर दोनप्रहरीं उन्हांतून पुष्कळ लांब जावें लागे.

(५) लढाईमध्यें मोठी कामगिरी वजावल्यावद्दल खुद्द कमांडर इन चीफची ज्याच्याजवळ सनद होती अशा एका ६२ वर्षें उमरीच्या गृहस्थाची सर्व मालमिळकत तो घरीं नसतां त्याच्या घरांत शिरून व वायकांपोरांस अंगावरील कपड्यांनिशीं घराबाहेर काढून जप्त केली.

(६) लहान लहान पोरांस व वदमाष लोकांस साक्षीदार [illegible] लोकांनां शिक्षा ठोठावल्या.

### सांगला हिल.

[ जबाबदार अधिकारी–बॉस्वर्थ स्मिथ. ]

**लोकांच्या हातून घडलेलीं कृत्यें.**—*(१) सांगला व सालनवाला यांच्या दरम्यानच्या तारा तोडण्यांत आल्या.

*(२) सांगल्याजवळील सोमन स्टेशन जाळण्यांत आलें.

(३) एका शीख इसमानें एका लष्करी कैद्याची जबरीनें मुक्तता केली.

**अधिकाऱ्यांच्या हातून घडलेलीं कृत्यें.**—(१) आरंभीं २१ पुढाऱ्यांस पकडून कांहीं वेळ अडकवून सोडून दिलें.

(२) ता. २६ एप्रिल रोजीं आणखी धरपकड होऊन या लोकांनां २९ तारखेस सोडण्यांत आलें.

(३) ता. १३ मे रोजीं दहशत बसविण्याच्या उद्देशानें एका टेकडीवरून गोळ्या झाडण्यांत आल्या.

(४) त्याच दिवशीं १३ पुढाऱ्यांची हातकड्या घालून धिंड काढली.

(५) ता. १३ मे रोजीं ६४ इसमांस पकडून, त्यांच्याच पागोट्यांनीं त्यांचे हात बांधून अत्यंत अप्रतिष्ठेनें त्यांची पोलीस ठाण्याकडे धिंड काढली.

(६) पन्नास हजार दंड घाल तर तुमची सुटका होईल असें या लोकांस बजावण्यांत आलें होतें असें लोक म्हणतात.

(७) पकडलेल्या १२४ इसमांपैकीं ११६ जण सुटले व आठ-जणांस अगदीं तुटपुंज्या पुराव्यावरून सहा महिन्यांची कैद व १०० रुपये दंड अशा शिक्षा झाल्या.

(८) डॉक्टरकडून तपासणी न करवितांच क्षुल्लक कारणांवरून लोकांस फटके मारण्यांत आले.

(९) किंमत न देतां दुकानदारांजवळून जिन्नस उपटण्यांत आले.

(१०) संभावित माणसांकडून अधिकाऱ्यांस पंख्यानें वारा घालवून घेतला व त्यांनां प्रहरच्या प्रहर उन्हांत तिष्ठत उभें रहावयास लाविलें.

(११) शाळेंतील मुलांस दररोज दिवसांतून चार वेळ हजिरीस बोलवून उन्हांत तळमळत ठेवलें व 'महाराज, आम्हीं कोणताहि गुन्हा केला नाहीं व पुढें करणार नाहीं' असें प्रत्येकाकडून वदवून घेण्यांत येत असे. या हालांमुळें बालमुकुंद नांवाचा एक ७ वर्षांचा मुलगा पांचव्या दिवशीं घरीं परत आल्यावर तडकाफडकीं आजारी पडून मरण पावला.

(१२) अटकेच्या मुदतींत कैद्यांकडून पैसे घेतल्याशिवाय त्यांनां शौचास अगर लघवीसहि जाऊं देण्यांत येत नसे. यासाठीं दररोज २ रुपयेपर्यंत खर्च येत असे.

(१३) सरदारसिंग नांवाच्या इसमास तो खोटा पुरावा देईना म्हणून चार दिवस कोंडून ठेवण्यांत आलें.

(१४) लछमनदास नांवाच्या इसमानें मक्त्यानें घेतलेली सराई लष्करी कायद्याच्या अमदानींत लष्करानें आपल्या ताब्यांत घेऊन तेथें मुशाफर उतरविण्यास बंदी केल्यामुळें त्याला जागा-भाडें व नोकरचाकर यांबद्दल दोन महिने दरमहा १५० रुपये खर्च सोसावा लागला.

(१५) एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर व पोलिस इन्स्पेक्टर यांच्यासाठीं दूध मागण्यास आलेल्या इसमास दूध देण्यासाठीं एका इसमानें रात्रीं दुकानांत दिवा लावला या अपराधाबद्दल त्यास व त्याला पकडून नेल्यावर त्याचा वडील भाऊ काय झालें याची चौकशी करण्याकरितां घराबाहेर पडला म्हणून त्यास ५० रुपये दंड व ५ फटके अशी शिक्षा फर्मावण्यांत आली.

(१६) कांहीं कारण न सांगतां उगाच उन्हांत उभें राहण्याच्या शिक्षा देण्यांत आल्या यामुळें कांहीं लोक आजारी पडले.

(१७) धाकदपटशानें, मारहाणीनें व उन्हांत उभें करून लोकांनां सरकारी साक्षीदार बनविलें; यांत कांहीं १० वर्षांचीं मुलें होतीं.

### मनीयानवाला.

[ जबाबदार अधिकारी–बॉस्वर्थ स्मिथ ].

**लोकांच्या हातून घडलेलीं कृत्यें.**—[ लोकक्षोभाचें कारण–अमृतसर येथें घडलेल्या हकीकतीचीं लोकांनीं ऐकलेलीं अतिशयोक्तिपूर्ण वर्णनें.] (१) धावनसिंग स्टेशन लुटलें व जाळलें.

**अधिकाऱ्यांच्या हातून घडलेलीं कृत्यें.**—(१) जाळपोळ झाल्यावर तीन दिवसांनीं मनीयानवाल्यावर तोफा रोंखण्यांत आल्या.

(२) कांहीं शिपाई स्टेशनवरून बार काढीत गांवाकडे गेले. या गोळीबारानें एक मनुष्य ठार, एक जन्माचा व्यंग व कित्येक जखमी झाले. या गोळीबारानें कित्येक बायका घरें सोडून पळून गेल्या. त्यांत कांहीं गरोदर होत्या.

(३) अत्तरसिंग लंबरदाराच्या घराचा झाडा घेतला व कपाटें फोडून रोख रक्कम व चीजवस्त लांबवली. त्याचें वय आज ११५ वर्षांचें असून तो नेहमीं अंथरुणावर बसून असतो. त्याला स्टेशनवर नेऊन लोखंडी वाघणींत कांहीं दिवस कोंडून ठेविलें. या ठिकाणीं त्यास अन्नपाणी नीट मिळत नसे. ते उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें ती वाघीण दिवसा उन्हानें तापून तेथें राहणें असह्य होत असे.

(४) मुनशी नबाबदीन व लेन्हासिंग यांनां खूप चोप दिला.

(५) गांवापासून कांहीं [illegible] वर्गातहि त्यांतहि [illegible] कांहीं [illegible]ती आढळून येतो.

* हीं कृत्यें सांगला येथील लोकांनींच केलीं असें सरकारी चौकशींतहि सिद्ध झालेलें नाहीं असें दिसतें.

गांवाकडे आला, व गल्लोगल्लीं हिंडून सर्व बायकांस घरांतून बाहेर बोलाविलें व कित्येकजणींस काठ्या मारीत बाहेर काढलें. या बायकांनां त्यानें चावडीपाशीं उभें केलें. बायकांनीं त्याच्यापुढें हात जोडले, पण त्यानें त्यांस काठ्या लगाविल्या, त्यांच्या अंगावर व तोंडावर थुंकला, त्यांनां नाहीं नाहीं त्या शिव्या दिल्या, त्यांचे बुरखे काढले, त्यांनां गाढवी, कुत्र्या, डुकरिणी माशा वगैरे शिव्या दिल्या, तुम्हीं आपल्या नवऱ्यापाशीं अंथरुणावर निजला असतांना नवऱ्यांस असलीं दुष्कृत्यें करण्याकरितां घरांतून बाहेर कसें जाऊं दिलें इत्यादि अश्लील प्रश्न विचारिले. त्यांनां खालीं वांकून पायांतून हात घालून कान धरण्याचा हुकूम केला व एकीला तर त्यानें लाथहि मारली.

(६) ऐशींएक गांवकऱ्यांस पकडून त्यांस नाना प्रकारचा त्रास देण्यांत आला. अटकेंत असतां जें अन्न सरकारनें पुरवावयाचें त्याचा खर्च गांवकऱ्यांपासून चोपून वसूल करण्यांत आला; खोट्या साक्षी देण्याची त्यांजवर सक्ती झाली; त्यांनां फटके लगावण्यांत आले; त्यांच्यावर प्युनिटिव्ह पोलीस बसविण्यांत आले; मार्शल लॉ कमिशननें खटले चालवून काळ्या पाण्यासारख्या शिक्षा ठोठावल्या.

(या शिक्षा पुढें कमी झाल्या व बादशाही जाहिरनाम्यानें त्या माफहि झाल्या).

लष्करी कायदा एकंदर पांच जिल्ह्यांत लागू केला होता. ते जिल्हे अमृतसर, लाहोर, गुजरणवाला, लियालपूर व गुजरात हे होत. या कायद्याची अंमलबजावणी दोन महिने चालू होती. या कायद्याची मुहूर्तमेढ जालियनवाला बागेंत निरपराधी लोकांच्या कत्तलीनें भिजलेल्या मैदानांत रोंवण्यांत आली. कॉंग्रेसनें नेमलेल्या पंजाब–चौकशी–कमिटीला मिळालेल्या आंकड्यांवरून पाहतां पंजाबांत एकंदर १२०० जीवांची हत्या घडली व ३६०० इसम जखमी व त्यांपैकीं कांहीं जन्माचे जायबंदी झाले. याशिवाय लष्करी कायद्याच्या नांवाखालीं हजारों लोकांचा अनन्वित छळ झाला तो वेगळाच.

कांग्रेस सबकमिटीनें सदरील 'अन्यायांचें परिमार्जन होण्याकरितां, राज्यकारभाराची शुद्धता होण्याकरितां व असली बेबंदशाही पुन्हां न होण्याकरितां' जे उपाय सुचविले ते येणेंप्रमाणें:

(१) रौलॅट कायद्याचें उच्चाटन (२) सर मायकेल ओडवायर ह्याचे अधिकार काढून घेणें (३) जनरल डायर, कर्नल जॉनसन, मि. बॉस्वर्थ स्मिथ, रायसाहेब श्रीरामसद आणि मलिकसाहेब खान ह्यांस नोकरीवरून कमी करणें (४) कमिटीपुढें आलेल्या पुराव्यावरून ज्यांचे अपराध सिद्ध होत आहेत अशा किरकोळ अधिकाऱ्यांच्या गुन्ह्यांची चौकशी करून त्यांचे गुन्हे खरे ठरले तर त्यांस बडतर्फ करणें (५) व्हाइस [illegible]यांस परत बोलविणें (६) स्पेशल [illegible]टोंनीं ज्या इसमांस दंड केला [illegible] दंड बसविण्यांत आला त्यांस तो माफ करणें. वसूल केलेला दंड परत देणें आणि प्युनिटिव्ह पोलीस कमी करणें.

या सूचनांचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. जनरल डायर यास जरी हिंदुस्थानांतून परत बोलाविलें तरी त्याचा पगार कित्येक दिवस चालूच राहिला व पुढें त्यास पेन्शन मिळावें असें ठरलें. नंतर नुकताच त्याचा राजीनामा घेण्यांत आला. परंतु पंजाबप्रकरणाबद्दल जेव्हां पार्लमेंटमध्यें वादविवाद झाला तेव्हां ब्रिटिश लोकांचें 'डायरी' मत उघडकीस आलें व लॉर्डांच्या सभेंत तर डायरची पाठ थोपटणारा ठराव पास झाला. इकडे हिंदुस्थानांतील यूरोपीय लोकांनीं तर डायरची फारच वाहवा करून त्याला बक्षीस देण्याकरितां फंड गोळा करून बरीच मोठी रकम जमा केली. इतरहि अपराधी लोकांस फारच सौम्य शिक्षा देण्यांत आल्या. या शिक्षा म्हणजे सामान्यतः ताकिदीच्या पलीकडे फारशा गेल्या नाहींत. यामुळें हिंदुस्थानच्या लोकांचा ब्रिटिश सरकारवरचा व ब्रिटिश लोकांवरचा विश्वास बहुतेक पार नाहींसा झाला. आणि 'जो दुसऱ्यावरी विश्वासला, त्याचा कार्यभाग बुडाला, जो आपणचि कष्टला, तोचि भला' या श्रीसमर्थ रामदास स्वामींच्या उक्तींतील स्वकष्टाच्या महतीचें तत्त्व महात्मा गांधी आदीकरून लहानथोर पुढाऱ्यांच्या मनांत जोरानें ठसून असहकारितेचा मार्ग स्वीकारण्याचें त्यांच्या अंतःकरणानें घेतलें.

व्हाइसरायांसंबंधानें कॉंग्रेस सबकमिटीनें आपल्या रिपोर्टांत जीं दोन अक्षरें लिहिलीं आहेत तीं वस्तुस्थितीच्या आकलनास आवश्यक असल्यानें खालीं देत आहों.

* पंजाबांतील अधिकाऱ्यांच्या कृत्यांस हिंदुस्थानसरकारनें प्रत्यक्ष मदत केली नसली तरी तेथील अधिकारी धिंगाणा घालीत असतां हिंदुस्थानसरकार स्वस्थ हात जोडून बसलें होतें ही गोष्ट दृष्टीआड करून चालणार नाहीं. लोकांची बाजू तरी काय आहे हें समजून घेण्याचीहि व्हाइसरायांनीं तसदी घेतली नाहीं. व्यक्तिशः आणि सार्वजनिक संस्थांनीं पाठविलेल्या तारा व पत्रें यांकडे त्यांनीं ढुंकूनहि पाहिलें नाहीं; आणि पंजाबकडे स्वतः डोळे उघडून न पाहतां पंजाब सरकारच्या कृत्यास मान डोलविण्याला त्यांस दिक्कतहि वाटली नाहीं. उलटपक्षीं, माफीचा कायदा विसाड-घाईनें पास करून त्यांनीं अधिकाऱ्यांवर पांघरूण घालण्यास कमी केलें नाहीं. निरनिराळ्या अधिकाऱ्यांनीं हंटर कमिटीपुढील साक्षींत कबूल केलेल्या प्रत्येक गोष्टीची माहिती व्हाइसरायांस निदान मे महिन्यांत तरी झाली असलीच पाहिजे. तरी देखील जालियनवाला बागेंतील कत्तल व लष्करी कायद्याखालीं घडलेल्या गोष्टी ह्यांचें खरें स्वरूप लोकांस आणि साम्राज्यसरकारास त्यांनीं कळविलें नाहीं. मि. सी. एफ्. ॲन्ड्रूज यांसारखा

---

* पंजाबप्रकरण-प्रक[illegible] —श्री. शं. ह. मुळे, पुणें.

इंग्रज गृहस्थ, कीं ज्याच्या सत्यनिष्ठेविषयीं व उदारपणाविषयीं कोणास स्वप्नींहि शंका येणार नाहीं, अशा पापभीरु गृहस्थास पंजाबांत जात असतां बंदी करण्यांत आली. या कृत्यास व्हाइसरायांचीहि संमति होती. मि. अँड्र्यूज हे पंजाबी लोकांचीं मनें क्षुब्ध करण्यास जात नसून खरी हकीकत समजून घेण्याकरितां जात होते. पंजाबसरकारचे चीफ सेक्रेटरी मि. थॉमसन यांनीं वस्तुस्थितीचा मन मानेल तसा लपंडाव केला व तो व्हाइसरायांनीं चालूं दिला. मि. थॉमसन यांनीं पंडित मदनमोहन मालवीय यांचा भर कौन्सिलांत अपमान केला व तो व्हाइसरायांनीं चालूं दिला. पण थॉमसन यांनीं कौन्सिलांतील ज्या विधानांबद्दल पंडितजींचा उपमर्द केला तीं सर्व विधानें सरकारी अधिकाऱ्यांनीं आपल्या साक्षींत स्वमुखानें खरीं ठरविलीं आहेत. व्हाइसरायांनीं लोकांच्या मनोवृत्तींविषयीं इतकी बेपर्वाई दाखविली कीं, मार्शल लॉ ट्रायब्यूनलनें दिलेल्या फांशीच्या शिक्षा स्टेट सेक्रेटरी भाग पाडीपर्यंत तहकूब ठेवण्याची दयाहि त्यांचे ठिकाणीं दिसून आली नाहीं. पंडित मदनमोहन मालवीय यांसारख्या जबाबदार नामदारांनीं विचारलेल्या प्रश्नांस बंदी करून पंजाबासंबंधानें नवीन माहितीहि आपणांस समजूं नये अशी त्यांनीं खबरदारी घेतली होती. पंजाबांत घडलें तरी काय याची चौकशी करण्यास ते पंजाबांत गेले देखील नाहींत.







सी
... वर्गातहि
... कहि ...ती अ...ीसून येतो.